Mahārāshṭrīya jñānakośa.

# महाराष्ट्रीय ज्ञानकोश.

## ( शरीरखंड. )

Ketkar, Shridhar Vyankatesh

हा ग्रंथ

श्रीधर व्यंकटेश केतकर; एम्. ए. पीएच्. डी.

यांनीं

मंडळांतील अनेक साहाय्यकांच्या मदतीनें तयार केला.

## विभाग आठवा.

---:*:---

## आफ्रिका—इक्ष्वाकु

—*—

ज्ञानं राष्ट्रधनं महत्तमामिदं ब्राह्मण्यसंरक्षकम् ।
लोके क्षत्रियवैश्यकार्यघटनासौकर्यसंस्थापकम् ॥
कर्तृत्वागमबोधको ननु भवेज्ज्ञानार्थयत्नोऽधुना ।
ज्ञात्वा नागपुरे सुपाण्डितजनैःसंघःशुभो निर्मितः

१९२४

मुद्रक—डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर यांनीं ज्ञानकोश छापखाना ८४१ सदाशिव पेठ पुणें येथें छापला.

प्रकाशकः—महाराष्ट्रीय ज्ञानकोशमंडळ लिमिटेड नागपूर, तर्फे श्रीधर व्यंकटेश केतकर,
८४१ सदाशिव पेठ, पुणें.








——:*S*:——







## अं त रं ग प रि च य.

प्रस्तुत विभागांत ' आ 'चीं पृष्ठें १७७ ते ३८८, आणि ' इ 'चीं १ ते २३६ आलीं आहेत- ' इ ' या विभागांत पुरी झालेली आहे. विषयांचें वर्गीकरण असें:—

### आफ्रिका—आळवार

**हिंदुस्थान—**

**इतिहास** वै दि क—आरण्यकें, आविक्षित, आशौच. आश्रम, आश्वलायन, आह्वनीय, आह्वाव, आहिताग्नि, पौ रा णि क—आयु, आर्यक, आर्ष्टिषेण, आस्तीक. बौ द्ध—आर्यशूर. जै न—आर्यरक्षित, आशाधर. मु सु ल मा नी—आमील.हिं दु—आह्वमल्ल.म रा ठे—आबदारखाना,आबाजी कृष्ण शेलूकर, आबाजी विश्वनाथ प्रभु, आबाजी सोनदेव. इ ति हा स सा हि त्य—आयर्व्हिन. जा ती ति हा स—आयटन, आराध्यब्राह्मण, आरे, आर्य, आर्यन, आर्यपत्तर, आलकरी, आहोम.

**प्रादेशिक इतिहास व भूगोल**—मं ब ई इ ला खा, महाराष्ट्र—आंबेगांव, आळंदी. गुजराथ—आंवरण, आमलीयार, आमारा, आमोद, आयाबेज, आरास, आलमपूर. कर्नाटक—आरसिबिर्डी, आर्ताल, आर्लेकट्टी, आर्लेश्वर, आसुंदी, व ऱ्हा ड—आमला, आसेगांव. म ध्य प्रां त, हिंदी—आमगांव, आमला, आरंग, आलबाका. मराठी—आंबगांव, आरमोरी, आर्वी, आलेवाही. म द्रा स—आरणी, आर्कोनम, आर्मगांव, आलवार तिरुनगरी, आलूर, आस्का. म्है सू र संस्थान—आर्कलगूड, आर्सीकेरे, आसंदी. है द्रा बा द संस्थान—आर्मूर, आळंद, बं गा ल—आरामबाग, आलवखान. आ सा म—आसाम. ब्र ह्म दे श—आराकान, आव्हा. प्रा ची न हिं दु स्था न—आभीर, आर्यावर्त,आलुप.

**आशिया** हिंदुस्थानेतर—ऐ ति हा सि क—आब्बास, आबास मिर्झा, आब्बासीद, आयेषा. प्रा दे शि क—आयकोनियम, आयसौरिआ, आयोनिया. आरल, अराराट, आरूद्वीपसमूह, आर्मेनिया, ऑलिव्हज-टेंकडी, आशिया, आशियामायनर, आस्काबाद, आसोनि.

**यूरोप,** ऐ ति हा सि क—आब्बासीद, आयोनियन लोक, ऑरेंज घराणें, आलफ्रेड दि ग्रेट, आलम्हा, फरनन्डो, आस्टेंड कंपनी. च रि त्रें—आयर्व्हिग, आलबर्ट. प्रा देशि क इतिहास-भूगोल—आयर्लंड, आयस्लंड आयोनियन बेटें, आरास, ऑरेंज, आर्कॅबल, आह्रे, आर्मेंटेरिस, आलंड-बेटें, आलसेस-लोरेन. आसस, ऑस्टरलीझ, आस्टिया, आस्टेंड, आस्ट्राखान, ऑस्ट्रिया, आस्ट्रिया हंगेरी, ऑस्बोर्न, प्रा ची न :यूरोप—आलिंथस,आलिंपिस,आलिंपिआ,आलिस.

**आफ्रिका**—आफ्रिका, ऑमडरमन, आयव्हरी कोस्ट, ऑरेंज नदी, ऑरेंज फ्रीस्टेट.

**अमेरिका**—आलाजुएला.

**आस्ट्रेलेशिया**—आस्ट्रेलिया, आस्ट्रेलेशिया.

**वाङ्मयेतिहास**—सं स्कृ त—आरण्यकें, आर्यक,आर्यदीक्षित. जै न—आसड.ते लु गू—आयला भास्कर.ता मी ळ—आळवार. फा र सी—आल्बास बिन अली शिखानी.आंग्ल—आयर्व्हिग, ऑस्टिन जेन. इ टा लि य न—आरिओस्टो. ग्री क—आरिस्टोफेनीज.

**शास्त्रें**

**वैद्यक**—आंब, आमातिसार, आमांश, आयोडीन, आरोग्यविज्ञानशास्त्र,आर्यवैद्यक, आर्सेनिक,आवाळू, च रि त्रें—आबास अली.

**वनस्पति**—आबई, आंबा, आराख्ट,आर्निका,आलिव्ह, आलें, आवळी,

**रसायन**—आमोनिया, आयोडीन, आर्सेनिक.

**पदार्थविज्ञान,** च रि त्रें—आयर्टन.

**तत्त्वज्ञान**—आयोनियन तत्त्वज्ञान. आरिस्टाटल

**ज्योतिष**—आर्यभट.

**मानववंशशास्त्र**—आर्य, आर्यन्.

**यंत्रशास्त्र**—आवण.

**युद्धशास्त्र**—आरमार.

**संसारमंडणशास्त्र**—आरसा, आसन.

**कायदा,** च रि त्रें—आस्टिन जॉन.

**भाषा**—आवंतीभाषा.

**संप्रदाय**—आर्यसमाज.

## इ-इक्ष्वाकु.

**हिंदुस्थान—**

**इतिहास** वै दि क—इडा ( इला ), इंद्र. पौ रा णि क—इडा, इंद्र, इंद्रजित, इंद्रद्युम्न, इंद्राणी, इंद्रौतःशौनक, इध्मजिव्ह, इध्मवाह, इरावती, इरावान, इलावृत्त, इल्वल, इक्ष्वाकु. जै न—इंद्रभूति. मु सु ल मा नी इ ति हा स—इकबालखान. इब्राहिम कुतबशहा, इब्राहिमशहा, इमादशाही. म रा ठे शा ही—इनाम, इब्राहिमखान गारदी, इच्छुर फांकडा. इं ग्र जी अ मदा नी—इंपे सर एलिजा. इ ति हा स सा हि त्य—इब्न-बतूता, इत्सिंग.

**प्रादेशिक इतिहास व भूगोल**—मुं ब ई इ:ला खा, महाराष्ट्र-इगतपुरी, इचलकरंजी, इडभिंडे, इंदापूर, इंद्रगिरी किल्ला, इस्लामपूर. गुजराथ—इतवाद, इत्रियागधाला. कर्नाटक—इंगलगुंडी, इंगलेश्वर, इंदी, इलकल. व ऱ्हा ड—इतखेड. म ध्य प्रां त—हिंदी, इटारसी, इटावा, इन्दोरी, इबनदी, मराठी—इंगर. म द्रा स—इच्छापुरम्, इंजाराम, इटैपुरम्, इंद्रावती नदी, इरकद, इरिंजालकुड. म्है सू र—इक्केरी. म ध्य हिं दु स्था न—इच्छावर, इंदूर, इसागड. सं यु क्त प्रां त—इगलास, इटा, इटावा, इतिमादपूर, इस्लामनगर. पं जा ब—इंदरपत, इरावती, इसाखेल. का श्मी र—इस्लामाबाद, बं गा ल—इंग्लिशबाजार, इच्छामती, इलामबाझार. आ सा म—इंफाल. ब्र ह्म दे श—इंदाव, इंदावग्यी, इन्सीन, इरावती नदी, इरावती विभाग. प्रा ची न हिं दु स्था न—इंद्रकील, इंद्रप्रस्थ, इलावृत्त. जा ती—इंझवार, इझावा, इंथ लोक, इदैयन, इरालिग, इरुल, इलयतु, इळुवन. :

**आशिया**—प्रा दे शि क भू गो ल व इ ति हा स—इडुमिया, इंडोचीन, इराक, इराण, इरेक, इर्कुटस्क, इलाम, इस्टालिफ, इस्पहान. इतिहास—इटो, इत्सिंग. प्रा ची न दे व ता—इस्टर.

**यूरोप**—भू गो ल—इंग्लंड, इंटरलेकन, इटली, इन्व्हर्नेस, इन्व्हररी, इब्रोनदी, इलीरिया, इव्हँगोराड. पौ राणि क व्य क्ती—इडास, सं त—इब्न हझम.

**आफ्रिका**—इथिओपिया, इरिट्रिया, इस्मालिया. प्रा ची न दे व ता—इसिस.

**अमेरिका**—भौ गो लि क—इक्वेडोर, इडाहो, इंडियाना, इलिनाय. इ ति हा स—इंडियन लोक, इंडियन रिझर्व्हेशन. च रि त्रें—इंगरसाल.

**वाङ्मयेतिहास**—जै न—इंद्रनंदिन्. ते लं गी—इलेश्वरोपाध्याय. अ र बी—इद्रिसी. य हु दी—इब्न गॅबिरोल. आं ग्ल—इंग्रजी वाङ्मय, इलिअट अ मे रि. क न—इंगरसाल, इमर्सन. इ टा लि य न—इटालियन वाङ्मय.

**शास्त्रें—**

**वैद्यक**—इन्फ्लुएंझा, इसबा. च रि त्रें—इब्न तुफैल.

**वनस्पति**—इंद्रावणी, इसबगोल.

**रसायन**—इथिल, इथिल अल्कहल, इथिलक्षार, इंदिन.

**पदार्थविज्ञान**—इंद्रधनुष्य.

**तत्त्वज्ञान**—इब्न गॅबिरोल. इब्न तुफैल, इलियाटिक पंथ.

**कायदा**—इंग्लिश कायदेपद्धति, इनाम.

**इतिहास**—इतिहासशास्त्र.

**भूगोल**—इद्रिसी, इब्न बतूता.

**धार्मिक संप्रदाय**—इबादी पंथ, इब्लिस, इमाम, इस्रायल राष्ट्रधर्म

**लिपि**—इ.

या विभागांत आयर्लंड व आस्ट्रेलेशिया आणि इंग्लंड इटली हे नकाशे दिले आहेत.

नेमले जात असत. प्रोकॉन्सलला युद्धखात्याचेहि अधिकार होते. इ. स. ३७ साली बादशहा कॅलिगुला यानें सुभेदाराचे युद्धखात्याचे अधिकार काढून ते आपल्या प्रतिनिधीला ( इंपिरियल लीगेटला ) दिले व त्यामुळें प्रोकॉन्सलची सत्ता फार कमी झाली.

डायोक्लिटियन् यानें रोमन आफ्रिकेंतील राज्याची पुनर्घटना करून त्याचे कार्थेज,हाड्रमेटम, सिट्रा, ट्रिपोलिस, सेटिफ, चरचेल असे सहा भाग केले व त्यांवर एक एक अधिकारी नेमला. पुढें मूर व व्हँडॉल यांच्याशीं युद्ध झाल्यामुळें राज्यकारभारांत पुनः फेरबदल झाला व राज्याचे कार्थेज, बिझांशिअम, ट्रिपोलिटाना, न्युमिडिआ व मॅरेटानिया असे सहा भाग पडले गेले. यावेळेस मुलकी व युद्ध हीं खातीं वेगळीं असून त्यांवर वेगळाले स्वतंत्र अधिकारी होते. या काळांत बांधलेल्या दुर्गांचे अवशेष अद्याप आहेत. इ. स. ६४७ सालीं अरब लोक इफ्रिकिया प्रांतांत घुसून त्यांनीं तो मुलुख बळकावला व ६९७ मध्यें कार्थेजहि घेतलें.

रोमन आफ्रिकेंत तीन तऱ्हेचे लोक होते. मूळचे बर्बर लोक, पूर्वीचे कार्थेजियन लोक व वसाहतवाले रोमन लोक. बर्बरलोकांमध्यें पुष्कळ जाती होत्या. या एकोणचाळीस होत्या असें टॉलेमी म्हणतो.

या लोकांच्या देवतांचीं नांवें पुढीलप्रमाणें आहेतः— माटमॅनिअस,लिलेअस,गिल्व्हा,सिनिफेरे,मास्टिमन व गर्झिल, ट्युनिसिआ, कॉन्स्टॅंटाईन व उत्तर आफ्रिका यांमध्यें बर्बर लोकांचीं थडगीं पुष्कळ आहेत. " कुबेर एर रुमिया " हें थडगें फार प्रसिद्ध झालें आहे.

रोमन सत्तेच्या आरंभीं समुद्रकिनाऱ्यावरील शहरांतील बहुतेक लोक जुन्या कार्थेजियन लोकांचे वंशज होते.यावेळची प्रचलित भाषा " प्युनिक " होती, व तिचें अध्ययन ख्रिश्चन बिशपांना करावें लागत असे. सहाव्या शतकापर्यंत कार्थेजियन लोक हीच भाषा बोलत असत. रोमन लोकांनीं हा देश घेतल्यापासून या देशाच्या संस्कृतीस रोमन लोकांचें वळण मिळालें. आगस्टसच्या वेळेस कार्थेज हें राजधानीचें ठिकाण असून तेथें पुष्कळ रोमन लोकांनीं वसाहत केली. फ्रेंचांनीं अल्जेरिया व ट्युनिसिया हे प्रांत घेतल्यापासून रोमन आफ्रिकेंत ऐतिहासिक संशोधन व पुरातन वस्तुसंशोधन झपाट्यानें चाललें आहे. या प्रांतांत रोमच्या व बिझांशिअमच्या लोकांचे अवशेष पुष्कळ आहेत. देवळें, कबरी, कमानी, पुतळे शिलालेख इत्यादि अवशेष या प्रांतांत आढळलेले आहेत, व कांहीं खणून काढलेले आहेत. अल्जेरिया व ट्युनिसिया प्रांतांतील अजबखान्यांत हे अवशेष आहेत. अल्जेरिया प्रांतापेक्षां ट्युनिसिया प्रांतांत जुने अवशेष फार आहेत. यापुढील १९१० पर्यंतचा आफ्रिकेचा इतिहास चवथ्या विभागांत दिला आहे.

१९१० ते १९२१ पर्यंतच्या काळांत आफ्रिकेतील देशाची बरीच पुनर्विभागणी झाली. बऱ्याच अज्ञात प्रदेशाचें भौगोलिक संशोधन झालें, आणि दळणवळणाचीं साधनें वाढलीं. त्यामुळें पुष्कळ ठिकाणच्या सामाजिक व आर्थिक स्थितींत बराच फेरबदल झाला. सदरहु हकीकत ( १ ) संशोधन, ( २ ) दळणवळणाचीं साधनें, व ( ३ ) इतिहास या तीन सदराखालीं देऊं.

संशोधन.—साहारा वाळवंट हा प्रदेश १९१० सालीहि सर्वांत अधिक अज्ञात होता. साहाराच्या पश्चिम भागाचें संशोधन १९०४ पासून फ्रेंच अधिकाऱ्यांनीं चालविलें होतें. १९२१ पर्यंत बरीच माहिती उपलब्ध झाली. पश्चिम साहाराचा मध्यभाग हा साधारण उंचवट्याचा प्रदेश असून त्यांत वस्ती होण्यास योग्य अशीं कांहीं ठिकाणें आहेत. पण हल्लीं तेथें वस्ती नाहीं. मात्र दक्षिण मोराक्कोमधील कांहीं टोळ्या लुटालूट करण्याकरितां हा प्रदेश ओलांडून मॉरेटॅनियाच्या व मध्य नागारच्या प्रदेशांत जातात. तसेंच पश्चिम साहारामध्यें प्राचीन मानववस्तीचे अवशेष बरेच सांपडले आहेत. ही मानववस्ती इस्लामधर्मपूर्वकालीन होती, एवढेंच या अवशेषांवरून अनुमान निघतें. त्याशिवाय अधिक माहिती मिळत नाहीं. लिबीयन वाळवंटाबद्दल डब्ल्यू. जे. हार्डिंग किंग यानें देश्य साधनावरून बरीच माहिती जमविली आहे. १९२१ जानेवारींमध्यें मिसेस रोसिटा फोर्बेस नांवाच्या इंग्रज स्त्रीनें सीरेनैका येथून निघून कुफ्रापर्यंत प्रवास केला व तेथून ती नव्या मार्गानें जाराबूबला परत आली. अपर नाइल, दक्षिण जुबालँड, मध्य आफ्रिकेचा पूर्वभाग, कांगो झँबेझी, वगैरे प्रदेशाचें संशोधन १९११–१४ पर्यंतच्या काळांत झालें. विशेषतः जागतिक युद्धाच्या वेळीं जरूर म्हणून आफ्रिकेच्या उष्णकटिबंधांतील प्रदेशाची पाहणी अंशतः विमानांच्या मदतीनें, करण्यांत आली. १९२० मध्यें डॉ. पी. चामर्स मिचेलनें केलेली खारटूम नजीकच्या प्रदेशाची पाहणी भुस्तरशास्त्रदृष्ट्या महत्त्वाची आहे. या प्रदेशांत अनेक ज्वालामुखी पर्वत असल्याचें त्यानें प्रसिद्ध केलें आहे. मिचेलचें संशोधन हेंच आकाशमार्गानें केलेलें पहिलें महत्त्वाचें संशोधन होय.

दळणवळणाचीं साधनें.—आगगाडी व आगबोट या दोहोंच्या साहाय्यानें मिळून आफ्रिका ओलांडून जातां येईल अशी व्यवस्था १९१५ मध्यें झाली. हा अटलांटिक–हिंदी महासागरमार्गाचा कांहीं भाग कांगो नदींतून आहे व नौकानयनास अशक्य अशा भागीं रेल्वे बांधून हा मार्ग पुरा करण्यांत आला आहे. डेरासालामपासून टांगानिकासरोवराच्या पूर्व किनाऱ्यावरील किगोमापर्यंतची जर्मन रेल्वे १९१४ मध्यें झाली होती; व नंतर या सरोवराच्या पश्चिम किनाऱ्यावरील आल्बर्टव्हिलेपासून काबालो पर्यंत ( अपरकांगो ) रेल्वे १९१५ मार्चमध्यें तयार होऊन हा मार्ग पूर्ण तयार झाला. दक्षिण आफ्रिकेंत पूर्व पश्चिम जाणारा दुसरा पूर्ण रेल्वेमार्ग १९१५ सालींच तयार झाला. या रेल्वेनें वाल्फिशबे हा डेलागोआबेला जोडला गेला आहे.दक्षिण

आफ्रिकेंत पूर्वपश्चिम जाणारा आणखी एक पूर्ण रेल्वेमार्ग तयार होत आहे, त्यापैकीं फक्त ६०० मैल रस्ता तयार होणें असून त्याला आरंभ १९२१ मध्येंच झाला.

आफ्रिका दक्षिणोत्तर ओलांडण्याकरितां केप ते कायरो या मार्गाची जी योजना केलेली आहे त्यासंबंधांत १९१०-२१ च्या काळांत फार अल्प प्रगति झाली. या मार्गावरचा बुकामा पर्यंतचा ( अपरकांगो ) रेल्वेरस्ता १९१८ मध्यें पुरा होऊन त्यामुळें केपपासून उत्तरेस २५९८ मैल रेल्वेनें जाण्याची सोय झाली; आणि रेल्वे व टांगानिका सरोवर व कांगो नदी यांतील आगबोटीच्या योगानें केपपासून कायरोपर्यंत प्रवास करण्याची सोय बहुतेक पुरी झाली आहे. फक्त मध्यंतरीं ३०० मैल प्रवास पायीं करावा लागतो.

साहारा वाळवंट सबंध ओलांडून जाण्याकरिता आल्जेरिया व नायगेरिया हे देश एकमेकाला जोडणाऱ्या रेल्वेरस्त्याची पाहणी १९१२-१३सालींच झाली असून या मार्गांत बांधकामाला मोठ्याशा अडचणी नाहींत हें ठरलें आहे. या मार्गापैकीं बिसक्रपासून टुगुर्टपर्यंतची रेल्वे १९१४ मध्यें सुरूहि झाली. ब्लिडि तेजेल्फापर्यंतचा रेल्वेमार्गहि तयार झाला आहे.

ब्रिटिश वेस्ट आफ्रिकेंत रेल्वेरस्ता बांधण्याचें काम १९१०-२०च्या दरम्यान बरेंच झालें. नायगर नदीवर जेब्बा येथें पूल झाल्यानें लॅगॉसपासून कॅनोपर्यंत (७०४ मैल) रेल्वेनें जाण्याची सोय १९१४ मध्येंच झाली. हारकोर्ट बंदरापासून उदी येथील कोळशाच्या प्रदेशांतून लॅगॉस-कॅनो रेल्वेवरील कडुनापर्यंतहि रेल्वे मार्ग पुरा झाला आहे. याशिवाय फ्रेंचांनीं आपल्या हद्दींत रेल्वे बांधण्याचें काम बरेंच केलें आहे.

तारायंत्राचें बांधकाम बऱ्याच ठिकाणीं झालें असून बिनतारी संदेश पाठविण्याची सोय जागजागीं करण्यांत येत आहे. शिवाय जागतिक युद्धाच्या वेळीं आकाशमार्गानें दळणवळण बरेंच वाढून यूरोपांतून आशियाकडे व केपकडे ( दक्षिण आफ्रिका ) जाण्याच्या मार्गावरील कायरो हें महत्त्वाचें ठाणें बनलें आहे. १९१९ मध्यें ब्रिटिश अधिकाऱ्यांनीं कायरोपासून केपटाऊनपर्यंत जाण्याचा आकाशमार्ग आंखला व जागजागीं विमानें थांबण्याचीं स्टेशनें ( एअरोड्रोम ) २४ ठिकाणीं बांधलीं. हा आकाशमार्ग ५२०६ मैल लांबीचा आहे. कायरो ते केपपर्यंतचा जमिनीवरील मार्ग त्या मानानें अधिक लांब म्हणजे ६८२३ मैल आहे. आफ्रिकाखंड ओलांडून जाण्याचा पहिला प्रयत्न(१९२० फेब्रुवारी) डॉ. चामर्स मिचेल यानें केला; पण अर्ध्या वाटेंत त्याचें विमान मोडलें; पण पुढें १९२० च्या मार्चमध्यें कर्नल रीनेव्हेल्ड व मेजर सर ब्रँड यांनीं कायरो ते केपपर्यंतचा प्रवास ७२ तास ४० मिनिटांत करून पूर्ण यश मिळविलें. याच सुमारास आल्जेरियांतून निघून नायगर नदीवरील गाओपर्यंत फ्रेंच वैमानिक मेजर व्हिलेमननें प्रवास केला. १९२१ मध्यें कांगो नदीवरील स्टॅनलेपूलपासून स्टॅनलेव्हिलेपर्यंत १००० मैल अंतर आकाशयानानें जाण्याची कायमची सोय केली आहे.

इ ति हा स —जुन्या संस्कृतीचें यूरोपीभवन ( वि. ८. ) वर्णन करतांना स्थूल इतिहास दिला आहे आणि बराचसा राजकीय इतिहास प्रत्येक प्रदेशावरील लेखांत येईल. १९१० ते १९२१ या काळांत आफ्रिकेंत पुष्कळ घडामोडी झाल्या आहेत, त्याचें कारण जागतिक युद्ध हें आहे. १९१० मध्यें केपकालनी, नाताळ, ट्रान्सव्हाल व आरेंज फ्री स्टेट यांचें एक राज्य बनवून त्याला यूनियन ऑफ साऊथ आफ्रिका असें नांव देण्यांत आलें व यूनियन सरकारला इंग्लंडनें संपूर्ण स्वराज्याचे हक्क दिले. १९११ मध्यें फ्रेंच इक्विटोरियल आफ्रिकेचा बराचसा भाग कामेरूनच्या जर्मन प्रोटेक्टोरेटला जोडण्यांत आला आणि मोबदला म्हणून मारोक्कोच्या मोठ्या भागावर फ्रेंच प्रोटेक्टोरेट जर्मनीनें मान्य केलें. १९१२ मध्यें इटालीनें ट्रिपोली व बेंगाझी ( सीरेनैका ) यांपैकीं तुर्कस्तानचा बराचसा मुलुख आपल्या राज्यास जोडला व त्याला लीबिया असें नांव दिलें. याच सालीं युनैटेड स्टेटसनें लायबीरीयावर आपली आर्थिक सत्ता स्थापली. १९१४ मध्यें इजिप्त हें ब्रिटिश प्रोटेक्टोरेट असल्याचें जाहीर करण्यांत आलें. पुढें १९१९ जूनमध्यें जर्मनीनें समुद्रापलीकडील भागावर जेथें जेथें स्वतःची प्रोटेक्टोरेट राज्यें होतीं तीं सर्व व्हर्सेलसच्या तहानें दोस्त राष्ट्रांच्या स्वाधीन केलीं. त्यायोगानें जर्मन साउथ वेस्ट आफ्रिकेवर दक्षिण आफ्रिकेच्या यूनियन सरकारची मँडेटरी सत्ता चालू होऊन त्या भागाला हल्लीं साउथ वेस्ट प्रोटेक्टोरेट असें नांव आहे. टांगोलँड ( हा १९१४ आगस्टमध्यें ब्रिटिश व फ्रेंच दोन्ही सैन्यांनीं मिळून जिंकला) विभागला जाऊन त्यावर ब्रिटिश व फ्रेंच यांची कामेरूनच्या बहुतेक भागावर फ्रेंचांची व लहानशा भागावर ब्रिटिशांची, जर्मन ईस्ट आफ्रिकेवर ( हल्लींचें नांव टांगानिका टेरिटरी ) ब्रिटिशांची, याप्रमाणें सत्ता त्याच तहानें प्रस्थापित झाली आहे. जर्मन ईस्ट आफ्रिका, ब्रिटिश व बेल्जियन या दोन सैन्यांनीं मिळून जिंकल्यामुळें त्यांपैकीं कांहीं भाग बेल्जियन कांगोला जोडण्यांत आला आहे. ब्रिटिश ईस्ट आफ्रिका १९२० पर्यंत प्रोटेक्टरेट होती, ती त्या सालीं ब्रिटिशांच्या पूर्ण मालकीची होऊन तिला केनिया वसाहत असें नांव देण्यांत आलें आहे. अशा रीतीनें जागतिक युद्धामुळें मोठाले फेरफार झाले आहेत. आफ्रिका खंडाची आज जी वांटणी झाली आहे. ती येणेंप्रमाणेः—

| देश | चौरस मैल. | देश | चौरसमैल |
|---|---|---|---|
| ग्रे. ब्रिटन | ४३६४००० | बेल्जम | ९३०००० |
| फ्रान्स | ४२००००० | लायबेरीया | ४०००० |
| पोर्तुगाल | ७८८०० | आबीसिनिया | |
| इटाली | ६५०००० | (स्वतंत्र ) | ३५०००० |
| स्पेन | १४०००० | | |

१९१४ मध्यें जर्मनीच्या ताब्यांत आफ्रिकेंतील १०३०००० चौरस मैल व तुर्कस्तानच्या ताब्यांत ४००००० चौरस मैल

प्रदेश होता, तो आज सर्व त्यांच्या हातून गेला आहे. तुर्कस्तानच्या हातून उत्तर आफ्रिकेंतला सर्व मुलूख जाणार, हें भविष्य पुष्कळ दिवस दिसत होतें. कारण या मुलुखावर तुर्कस्तानची जी पांच शतकें सत्ता होती तीमुळें बहुतेक दुष्परिणामच झाले होते; सबब या तुर्कस्तानच्या हानीबद्दल वाईट वाटण्याचें कारण नाहीं.

जर्मनीच्या आफ्रिकेंतील साम्राज्यास सुरुवात १८८४ पासून झाली व तें साम्राज्य झपाट्यानें वाढलें. जागतिक युद्धापूर्वींच्या दहा वर्षांतहि आफ्रिकेंत साम्राज्याची वृद्धि करणें हा जर्मन सरकारच्या धोरणाचा एक प्रमुख विषय होता. आफ्रिकेच्या भूमध्य समुद्रकिनाऱ्याचा भाग मिळविणें व मोरोक्कोच्या अटलांटिक किनाऱ्यावर एखादें तरी बंदर मिळविणें ही जर्मनीची इच्छा होती. त्यामुळें जर्मनीचा फ्रान्स व इटली या दोन्ही राष्ट्रांशीं विरोध आला व या दोन्ही बाबतींत जर्मनीच्या विरुद्ध निकाल १९११ मध्यें लागला. इटालीनें तुर्कस्थानाशीं युद्ध करून ट्रिपोली व सीरेनैका प्रांत जिंकून घेतले, त्यामुळें जर्मनीची निराशा झाली आणि मोरोक्कोकडील बंदराकरितां फ्रेंचाबरोबर चालू असलेल्या वाटाघाटींत यश येण्याचें चिन्ह दिसेना म्हणून फ्रेंच इक्विटोरियल आफ्रिकेचा बराच भाग फ्रान्सनें जर्मनीला द्यावा असें बोलूं जर्मनीनें लावलें. इतकेंच नव्हे तर मध्य आफ्रिकेचा बराचसा भाग ताब्यांत घेऊन कामेरूनचा जर्मन साऊथवेस्ट आफ्रिकेशीं व जर्मन ईस्टआफ्रिकेशीं संबंध जोडावा आणि या आफ्रिकेच्या भागांत उत्पन्न होणारा सर्व कच्चा माल स्वतःस मिळावा असा प्रयत्न जर्मन सरकार करीत होतें. केवळ आर्थिक सत्ता जर्मनीनें घेण्यास ब्रिटिश मुत्सद्दी विरुद्ध नव्हते. १८९८ मध्यें पोर्तुगीज वेस्ट आफ्रिका ( अंगोला ) व पोर्तुगीज ईस्ट आफ्रिका ( मोझांबिक ) या भागांवर आर्थिक सत्तेची विभागणी जर्मनी व इंग्लंड यांनीं करार करून ठरविली होती व तसलाच करार १९१२ मध्यें करून पोर्तुगालच्या साम्राज्यसत्तेस हरकत न येईल, अशा रीतीनें दोघांनीं सदरहू पोर्तुगीजांच्या दोन प्रदेशांवरील आर्थिक सत्ता आपसांत विभागून घेण्याचें पुन्हां ठरलें. मात्र १९१३ आगस्टमध्यें या करारावर सही करण्यापूर्वी हे करार प्रसिद्ध करावे म्हणजे पोर्तुगाल सरकारला संशय राहणार नाहीं, अशा प्रकारची अट ब्रिटिश परराष्ट्रमंत्री सर एडवर्ड ग्रे यानें घातली. या अटीला जर्मनीची संमति मिळून करारावर सह्या होण्यापूर्वींच १९१४ मध्यें जागतिक युद्ध सुरू झालें.

या १९१०–१४ च्या काळांत फ्रेंच व जर्मन सरकारनें आफ्रिकेंतील आपापल्या प्रदेशांत रेल्वे वगैरे बांधून बरीच प्रगति केली. इंग्लंडनेंहि इजिप्त, सूदन व इतर वसाहती यांत भौतिक सुधारणा बरीच केली; पण त्याबरोबरच इजिप्तमध्यें स्वराज्याचे हक्क मिळविण्याची चळवळ सुरू झाली होती. याच काळांत जर्मनीनें दक्षिणेमध्यें बोअर ( डच ) पुढाऱ्यांशीं आणि उत्तर आफ्रिकेंत देश्य लोकांशीं इंग्रज व फ्रेंच यांच्याविरुद्ध स्नेहसंबंध जोडले होते, असें जागतिक सुरू झाल्यानंतर उघडकीस आलें.

पण युद्ध सुरू झाल्यानंतर ब्रिटिशांच्या समुद्रावरील वर्चस्वामुळें जर्मनीला आपल्या वसाहतींनां मदत करणें अशक्य झालें म्हणून टोगोलँड व कांगो या प्रदेशांनीं युद्धांत सामील न होतां तटस्थ राहावें, अशी सूचना जर्मन सरकारनें फ्रेंच व ब्रिटिश यांनां केली. बेल्जियन कांगोनें तटस्थ राहावें, अशी बेल्जमची इच्छा असल्यामुळें एम. डेव्हिग्नॉन या बेल्जियन परराष्ट्रमंत्र्यानें फ्रेंच व ब्रिटिश सरकारास तटस्थ राहणार कीं नाहीं, तें जाहीर करण्याबद्दल विचारलें; पण आगस्ट तारीख ६ च्या सुमारास ब्रिटिश व फ्रेंच यांनीं आफ्रिकेंतील जर्मन मुलुखावर हल्ला करण्यास सुरवात करून तटस्थ न राहण्याबद्दलचा निकाल जाहीर केला. तेव्हां जर्मनीनें तटस्थपणा राहावा म्हणून अमेरिकन सरकारमार्फत प्रयत्न करून पाहिला; परंतु तेव्हांहि फ्रेंच व ब्रिटिश यांनीं तटस्थ राहण्याचें नाकारलें. यामुळें लवकरच अबिसीनिया व स्पॅनिश प्रोटेक्टोरेट यांच्याखेरीज आफ्रिकेंतील सर्व भाग जागतिक युद्धांत सामील झाले. या सामन्यांत सर्व जर्मन वसाहती काबीज करूं, अशी खात्री फ्रान्स व इंग्लंड यांनां प्रथमपासूनच वाटत होती. कारण इटली लढाईत पडण्यापूर्वी १९१५ एप्रिल २६ रोजीं लंडन येथें फ्रान्स, रशिया, ग्रेटब्रिटन व इटाली यांच्यामध्यें करार झाला त्यांत जर्मन वसाहती जिंकून घेतल्यास इटालीला इरिट्रीया, सोमालीलँड व लिबीया वगैरे मुलुखांत सवलती देण्याचें कबूल केलें होतें. जागतिक युद्ध संपल्यावर इटलीनें बरीच अधिक मागणी केली; पण ती अमान्य होऊन इटालीला ट्युनिशियांत कांहीं रेल्वेविषयक व व्यापारविषयक हक्क मिळाले. जाराबूबचा सजल प्रदेशहि इटालीला मिळाला, शिवाय इटालियन सोमालीलँडनजीक ज्युबादरीनजीकचा पश्चिम भाग, ज्यांत उत्तम कापूस पिकतो तो व किसमायु बंदर हीं इटालीला मिळालीं.

१९१९–२१ या काळांत आफ्रिकेंतल्या मोठ्या राजकीय गोष्टी म्हणजे दक्षिण आफ्रिकेंत डच राष्ट्रीयपक्षाची स्वतंत्र होण्याची चळवळ व इजिप्तची स्वराज्यप्राप्तीस्तव चळवळ. याकरितां ‘ दक्षिण आफ्रिका ’ व ‘ इजिप्त ’ पहा.

याखेरीज आणखी एक महत्त्वाचा प्रश्न दक्षिण व पूर्व ‘ केनया ’ या लेखांत येईल. पण यापेक्षांहि अधिक आफ्रिकेंतील हिंदी लोकांच्या दर्जासंबंधाचा; याचें कांहीं विवेचन विभाग पहिला (पृ.२६६)यांत केलें आहे व दक्षिणआफ्रिका महत्त्वाची गोष्ट म्हणजे नीग्रो लोकांत उत्पन्न झालेली स्वजातीबद्दलची जागृति. शिक्षण व ख्रिस्तीधर्म यांचा प्रसार, आफ्रिकेंतील कारखान्यांत पुष्कळ नीग्रोंनां मिळालेल्या नोकऱ्या व जागतिक युद्धामुळें मिळालेले धडे, या सर्वांचा परिणाम नीग्रो लोकांत एकजातीयत्वाची भावना फार वाढून गोऱ्या वसाहतवाल्यांविरुद्ध सुरू झालेली चळवळ हा होय; पण नीग्रो लोकांच्या राष्ट्रीय भावनेला काय स्वरूप येणार हें अद्याप निश्चित कळत नाहीं.

आज ( १९२४ च्या जानेवारींत ) आफ्रिकेची एकंदर राजकीय परिस्थिति द्यावयाची म्हटल्यास असें सांगतां येईल, कीं सर्व आफ्रिका यूरोपीय राष्ट्रांच्या ताब्यांत आहे, आणि याला अपवाद म्हटला तर दास्यमुक्त निग्रोंचें अमेरिकेच्या दयेनें स्थापन झालेलें अर्वाचीन लोकसत्ताक राष्ट्र "लायबेरिया" ( पहा ) व ख्रिस्ती राष्ट्र "आबिसीनिया" हीं होत. म्हणजे जुनी आफ्रिका गेली व ख्रिस्ती व यूरोपीय सत्तेखालची आफ्रिका उरली आहे. या खंडांत तुर्कस्थानचें आतां कांहीं नाहीं. लायबेरियाखेरीज सर्व आफ्रिका प्रत्यक्ष यूरोपीय सत्तेखालीं किंवा यूरोपीय संरक्षणाखालीं असलेल्या आफ्रिकन राजांच्या सत्तेखालीं आहे. सध्यांच्या आफ्रिकेची वांटणी येणेंप्रमाणें दाखवितां येईलः

स्व तं त्र आ फ्रि का —( १ ) लायबेरिया, क्षेत्र. ४०००० चौरस मैल आणि लोकसंख्या पंधरा पासून वीस लाख ( २ ) आबिसीनिया ( पहा ) लोकसंख्या व क्षेत्रफळ अनिश्चित आहे.

ब्रि टि श सा म्रा ज्य. —३८ लक्ष ७२ हजारांवर क्षेत्रफळ आणि लोकसंख्या साडेचार कोट ( इजिप्त खेरजि ). इजिप्त, क्षेत्रफळ तीन लक्ष पन्नास हजार. लोकसंख्या एक कोटि सत्तावीस लक्ष. इजिप्त अजून ब्रिटनच्या तावडींतून सुटला नाहीं असें धरलें तर ब्रिटिश साम्राज्याच्या ताब्यांत आफ्रिकेंतील ४२ लक्ष मैलांवर जमीन व पावणेसहा कोट लोक आहेत. या प्रदेशांतील प्रत्येक भागावर स्वतंत्र लेख आहेत ते पहावे. प्रत्येक भागाचीं नांवें मात्र येथें देतों: " आसेन्शन बेट," "सेंट हेलीना" बेट, " नायजेरीया, " " कामेरून", " गोल्ड कोस्ट " ( संरक्षित संस्थानांसह ), टोगोलांड", "सिएरालिओन"आणि संरक्षित संस्थानें, 'गांबिआ' आणि सामंत राज्यें, " मारिशस " व तदाश्रयी भाग " सेचेलेस" , " सोमालीलांड, " " केनिया " वसाहत आणि संरक्षित संस्थानें, " टांगानिका, " " युगांडा संस्थान ", जंगबार ( " झांबीबार " ) आणि " पेंबा ", " न्यासालांड " , " युनियन आफ साऊथ आफ्रिका " "साऊथ वेस्ट आफ्रिका" 'ऱ्होडेशिया,' स्वाझिलंड," "बासूटोलंड," आंग्लो इजिप्शिअन " सूदान ". प्रस्तुत ज्ञानकोशांतील लेखविषय उलटया विरामचिन्हांनीं अंकित केले आहेत.

फ्रा न्स च्या ता ब्यां ती ल मु लू ख.—" अलजीरिया " लोकसंख्या ५८ लक्षांवर ( सेन्सस १९२१) क्षेत्र २२२१८० फ्रेंच इक्वेटोरिअल आफ्रिका ऊर्फ " फ्रेंच कांगो " क्षेत्रफळ ९८२०७४९ व लोकसंख्या अदमासें ( १९१५ तील ) नव्वद लाख.

" कामेरून, " क्षेत्रफळ १६६४८९.

" मादागास्कर " क्षे० २ लक्ष २८ हजार, लोकसंख्या ( ३१ डिसेंबर १९१७ ) ३५ लक्ष ४५ हजार.

"मोटेय "आणि " कोमोरा " बेटें क्षेत्र० ७९० चौ. मै. लोकसंख्या १ लक्ष.

" रेयूनिअां " क्षे. ९७० चौरस मैल व लोकसंख्या १ लक्ष ७३ हजार.

" फ्रेंच सोमालीलंड. " क्षे. ५७९० लो. ( १९२१ सालचा अंदाज ) ६५ हजार.

" फ्रेंच वेस्ट आफ्रिका " आणि सहारा क्षेत्र० १८ लक्ष. लो. संख्या एक कोटि बावीस लक्ष चौऱ्यायशी हजार.

" टयूनिस " क्षेत्रफळ ५० हजार चौरस मैल आणि लो. संख्या एकवीस लक्ष .

" मोरोक्को " फ्रेंच झोन क्षेत्रफळ दोन लक्ष वीस हजार चौ. मै. लोकसंख्या ५४ लक्ष.

स्पे न च्या ता ब्यां ती ल मु लू ख.—मोरोकोचा कांहीं भाग तेवढा स्पेनकडे आहे. क्षेत्रफळ ११ हजार मैल. व लोकसंख्या स्पानिशझोन व टांबीर मिळून ५ लक्ष.

पो र्तु गा ल च्या ता ब्यां ती ल मु लू ख.—यांत " केप व्हर्ड बेटें " " गिनी, " " प्रिन्सिपी, " " सेंट थामस बेटें " "अंगोला," व "मोझांबिक" हे प्रदेश येतात. एकंदर क्षेत्रफळ ९ लक्ष सत्तावीस हजार चौरस मैल व लोकसंख्या ७७ लक्ष ३४ हजार आहे.

इ ट लीं च्या ता ब्यां ती ल मु लू ख.—" इरिट्रिया " क्षेत्रफळ ४५८०० लोक संख्या चार लक्ष. इटालीयन "सोमलीलंड " क्षेत्रफळ १ लक्ष ४० हजार लोकसंख्या साडेसहा लक्ष. " त्रिपोलीटानिया व " सायरे नैका. " क्षेत्रफळ चार लक्ष सहा हजार चौ. मै. व लोक संख्या सुमारें दहा लाख.

बे ल्जि य म च्या ता ब्यां ती ल मु लू ख.—कांगो क्षेत्रफळ नउ लक्ष दहा हजार चौरस मैल व लोकसंख्या सुमारें एक कोटि दहा लक्ष.

**आफ्रिडी**—अफगाणिस्तान पहा.

**आंब.**—हरभऱ्याच्या झाडापासून एक प्रकारचें जें अम्ल तयार होतें त्यास आंब म्हणतात. तीं काढण्याची कृति पुढें वर्णन केल्याप्रमाणें आहेः—हरभऱ्याच्या ठोंबास फुलवरा येतो, तेव्हां पहांटेस शेतांत जाऊन त्यावर स्वच्छ वस्त्र पसरावें म्हणजे सकाळचें दंव त्यावर पडून तें भिजून जातें, तें भिजलेलें वस्त्र सूर्योदयानंतर काढून घ्यावें व त्यांतील पाणी पिळून शिशांत भरून ठेवावें. त्या पाण्यास आंब म्हणतात. तीं अतिशय आंबट असते. तीं थोडी घेतली तर जठराग्नि प्रदीप्त होऊन मोडशी वगैरे अपचनाचे विकार नाहींसे होतात. व्हिनीगर ज्या ज्या कामास उपयोगी पडते त्या ठिकाणीं देशी आंबेची योजना करतां येईल. [ शिवाय ' हरभरा ' पाहा ]

**आवई.**—ही एक घेवड्याची जात आहे. हिचीं नांवें लॅटिन–कॅनॅव्हॅलिआ एन्सिफॉर्मिस; इं. सोर्डबीन अथवा ओव्हरलुक; पॅटेगोनियनबीन; शिंबी; कडसंबळ; मेखुन; मखमशिम; सेम; सुफेद–सेम; टिह्रोन व आबई वगैरे आहेत.

याची विशेष लागवड केलेली कोठें आढळत नाहीं पण सर्व हिंदुस्थानांत, हिमालयापासून सिलोन व सयामपर्यंत साधारणतः बागेंत, शेतांच्या कांठावर अथवा झोंपड्यांच्या छपरांवर दृष्टीस पडते. ह्याच्या शेंगांची भाजी करतात व बिया विशेषकरून आमटींत घालतात. हिंदुस्थानांतील यूरोपिअन लोक कोंवळया व साधारण वाढलेल्या शेंगांचा फ्रेंचबीनसारखा उपयोग करतात. याच्या पांच जाती असून पांढरी, अरुंद, शेंग सर्वांत उत्तम गणली जाते. म्हैसूर व मुंबई इलाख्यांतील कांहीं भागांत यांतील पक्के दाणे खातात. मुसलमान लोकांनां ह्या शेंगा, विशेषतः पांढऱ्या फार आवडत असून ते त्या मांसाबरोबर शिजवून खातात. आबईच्या तीन रानटी जाती आहेत. त्यांचीं नांवें.—कॅनॅव्हॅलिआ व्हिरोसा. ( कथशिम, कलशिम ) ही वेल हिंदुस्थानांत विपूल असून कित्येक लेखकांच्या मतें यापासूनच लागवडीत असलेल्या वेलाची उत्पत्ति झाली. हा वेल विषारी आहे असें म्हणतात. कॅनॅव्हॅलिआ लिनिआटा हा समुद्रकांठच्या वाळूवर पसरणारा वेल आहे [ वॅट्स कमर्शियल प्रॉडक्टस ]

**आंबगांव,** जमीनदारी ( जिल्हा भंडारा. )—बाग नदीच्या आसपासचा प्रदेश या जमीदारींत येतो. आंबगांव हें बंगाल नागपूर रेल्वेचें एक स्टेशन आहे. प्रदेश सुपीक असून सपाट आहे. याचें क्षेत्रफळ ७९ चौरस मैल व खेडीं ३८ आहेत. इ. स १७९९ सालीं कामठ्याच्या चिमणा पाटलाचा पुतण्या सोना पाटील कुणबी यास मराठ्यांनीं ही जमीनदारी इनाम दिली. इ. स. १८१८ सालीं कामठा जमीनदारीप्रमाणें, ही जमीनदारी जप्त करण्यांत आली नाहीं. इ. स. १८१९ सालीं सोना मरण पावला. त्यास संतति नव्हती. तेंव्हा ही जमीनदारी त्याचा पुतण्या कोल्हु उर्फ तान्याबापु याजकडे आली. परंतु हाहि इ. स १८३८सालीं कांहीं संतान नसतांनाच वारला. हा मरण पावण्यापूर्वी यानें भाजापूर वराण्यांतील चिमणा नांवाचा एक पुरुष दत्तक घेतला होता. परंतु चिमणा हा कामठा घराण्यांतील नसल्याकारणानें जमीनदारींत बराच असंतोष पसरला होता. तेव्हां कामठा घराण्याचा मूळपुरुष जो कोल्हु त्याच्या नातवानें आपल्या ताब्यांत सर्व जमीनदारी घेतली होती. पुढें तो दत्तक सरकारनें कायदेशीर ठरविला. परंतु चिमणाहि लवकरच मरण पावला. म्हणून तान्याबापूची विधवा राधाबाई हिनें एक दत्तक घेतला. तोच हल्लींच्या जमीनदार असून त्याचें नांव माधवराव आहे. कामठाच्या घराण्यांतील मूळपुरुषापासून हा पांचवा आहे, या जमीनदारील फार कर्ज झालें होतें. परंतु माधवराव वयांत आल्यावर त्यानें आपल्या जमीनदारीची व्यवस्था चांगल्या प्रकारें ठेवली व हल्लीं तो कर्जमुक्त झाला असून त्यानें आपल्या जमीनदारीची सुधारणाहि पुष्कळ केली आहे.

इ. स. १९०१ मध्यें एकंदर लोकसंख्या २०७७५ होती. सुमारें ९००० एकर जमीन दोन पिकें होणारी आहे (इ. स. १९०६--७). या जमीनदारींत एकंदर ९०० तलाव आहेत. टाकोळी १०००० रुपये ठरविली असून तिचें प्रमाण जमीनदाराच्या एकंदर उत्पन्नाशीं शेंकडा ३८ आहे. फुकीमेटा आणि सावळी–डोंगरगांव या आंबगांव जमीनदाराच्या हाताखालील दुय्यम जमीनदारी होत्या. फुकी–मेटा जमीनदाराकडून आंबगांवच्या जमीनदारीस हल्लीं कांहीं उत्पन्न मिळत नाहीं व सावळी डोंगरगांव ही मालगुजारी इस्टेट आहे. येथील पाणी खारें असून हवा वाईट आहे. या जमीनदारींत मोठें जंगल आहे.

**आंबगांव**—तहशिल—तिरोरा, जिल्हा भंडारा. हें बंगाल नागपूर रेल्वेचें स्टेशन आहे. स्टेशनापासून हे खेडेंगांव एक मैल लांब असून आंबगांव जमीनदारीचें मुख्य ठिकाण आहे. क्षेत्रफळ ३००० एकर. लोकसंख्या सुमारें २७०० ( १९०१ सालची ). जवळच असलेल्या पदमपूर येथें कांहीं दगडी इमारतीचे अवशेष आहेत परंतु त्या कोणी व केव्हां बांधल्या हें समजत नाहीं. येथें गुरांचा बाजार बराच मोठा भरतो. छत्तिसगड आणि भंडारा जिल्ह्यांतील अशक्त व रोडकीं गुरें येथें विकण्याकरितां येतात व तीं कामटी येथील खाटीक विकत घेतात. या बाजाराचें उत्पन्न येथील जमीनदारास बरेंच आहे. दर रुपयामागें १ पैसा याप्रमाणें तो वसूल करतो व साधारणपणें दर बाजाराच्या वेळीं त्यास २०० रुपये मिळतात. इ. स. १९०४ सालीं या ठिकाणीं एकंदर ३४००० गुरें विकली गेलीं. येथें एक छानदार तळें असून त्याची दुरुस्ती इ. स. १९०० च्या दुष्काळांत १५००० रुपये खर्च करून सरकारनें केली आहे. येथें एक प्राथमिक शाळा. पोलिस ठाणें, पोस्ट ऑफिस वगैरे असून एक डाक बंगला आहे. जमीनदार ऑ. मॅजिस्ट्रेट आहे. ( भंडारा जिल्हा गॅ. १९०८; म. प्रां. गॅ. १८७० )

**आंबगांव,** परगणा—हा मूल तहसीलतींल ईशान्य दिशेकडील परगणा होय. ही मूल चांदा जिल्ह्यांतील तहसील आहे. हिचें व हिच्या अंकित असलेल्या जमीनदारीचें क्षेत्रफळ अंदाजी १२०० चौरस मैल आहे. अहिरी जमीनदारीचें क्षेत्रफळ याच्या बाहेरचें आहे. या जमीनदारींत ६७ गांव असून ४ जमीनदाऱ्या आहेत. वैनगंगेच्या आसमंतांतील प्रदेश सोडून बाकी सर्व भाग पहाडी आहे. त्यांतील जमीन लाल किंवा रेताड असून जंगलानें व्यापिली आहे. हा प्रदेश वैनगंगेच्या शाखांनीं विभागलेला आहे. त्यांपैकीं विशेष महत्त्वाच्या शाखा म्हटल्या म्हणजे कामेन, पोटपुरी व करूर ह्या आहेत. तांदूळ, जंगलचें उत्पन्न, तसर रेशीम हीं या जमीनदारींत उत्पन्न होतात. शिवाय या ठिकाणीं मिठाचा व्यापारहि मोठ्या प्रमाणांत आहे. मुख्यत्वें तेलगू भाषा प्रचलित आहे, परंतु उत्तरेस मराठीहि आढळून येते. सर्वत्र तेलगू लोक व्यापारी आहेत. शेतकऱ्यांपैकीं

कुणबी कापीवार व सोनतेली हे प्रमुखत्वानें आढळतात. मुख्य गांवें गरचिरोली व चामुर्सी हीं आहेत. मारकंडी येथें सुंदर व पुरातन देवालयें आहेत.

**आंबगांव**—हें गांव चांदा जिल्ह्यांत आहे. एका वेळेस हें परगण्याचें मुख्य स्थान होतें परंतु हल्लीं तें ओसाड होऊन त्या ठिकाणीं घनदाट जंगल वाढलें आहे. येथें एक महादेवाचें व एक महाकालीचें देवालय आहे आणि दोन तळीहि आहेत. ( म. प्रां. गॅ. १८७०; चांदा जिल्हा गॅ. १९०९ ).

**आबदारखाना**—अठरा कारखान्यांपैकीं एक. आबदार खान्याला शिवाजीच्या वेळेस पानीयशाला असें नांव होतें. ( 'अठरा कारखाने' पहा. ) सातारच्या छत्रपतींच्या खाजगी खात्याकडील शके १७४१ मधील नियम इतिहास संग्रहांत ( पु. ६, अं. ७-९ ) प्रसिद्ध झाले आहेत. त्यावरून पुढील माहिती घेतली आहे.

१ कारखान्याकडील कामें करावयाचीं:—

१ पाणी स्नानाचें देत असावें.

१ विडे खाशी व खर्ची बांधीत जावे.

१ फणी व वजरी कारखान्यांत असावी.

१ हार, तुरे व गजरे सरकारास कचेरीस बागेपैकीं किंवा खरेदीपैकीं येतील, त्यांचीं तबकें देवघरांतून कचेरीस येतील. नंतर चिटणीस यांनीं कचेरीस वाटावीं.

१ सरकारचें अभ्यंगस्नान व्हावयाचें त्यास अत्तर व तेल चमेली, अंगास लावावयास उटणी सामान देवघरांतून आणून तयार करून द्यावें. महालांत नहाण होईल ते दिवशीं सामान शिल्लक राहील, तें हुजरे व आबदार यांनीं घ्यावें बाहेर नहाण जहालें म्हणजे आबदार व न्हावी यांनीं घ्यावें सदरहू कामावर हुशार रहावें.

( १ ) कारखाने मजकूरचे कामगारिचे इरादे आहेत ते चालतच आहेत; परंतु सरकारचे मनांत जो कामांत वाकब दिसेल, त्यास कामगिरीस धाडतील. तो कारखानेबद्दल इरादा नव्हे. सरकार मेहेरबान व त्याचे शहाणपणावर.

( १ ) कायदे सरकारांतून चालवायाचे.

( १ )आबदार यानें सोवळयांनीं सरकारास स्नान घालाव याचें, सबब नेसावयास धोत्र शिरस्त्याअन्वयें पावत आल्याप्रमाणें पावत जाईल.

(१ ) नैवेद्य गोकुळअष्टमीचा एक व गणपति उत्साहांत एक व नवरात्रांत एक येणेंप्रमाणें पावत आहे म्हणोन कलम त्याप्रमाणें पावत जाईल.

( १ ) स्नानोदकांत सोनें, दसरा व दिपवाळी व वर्षप्रतिपदा व लग्नमुहूर्त जहाले म्हणजे नहाणाचे समयीं जें येतें तें निमेंत हवालदार व निमेंत आबदार व आडेकरी त्याप्रमाणें घेत जावें

( १ ) दसरियास कारखान्याचा नैवेद्य हवलदार याचा म्हणोन कलम. त्याप्रमाणें चालेल.

( १ ) दर पौर्णिमेस दरमाहाची सुवासीण व नवरात्रांत पातळ सनगें व शिमगी पौर्णिमेस पातळ सनगें चालत आल्याप्रमाणें चालेल.

( १ ) लग्नकार्य जहालें म्हणजे नवऱ्याचीं व नवरीचीं सणगें हळदीचीं असतील तीं हवलदार याजकडे चालत आहेत कलम. त्यास चालत आल्याप्रमाणें चालतील.

( १ ) काग्वलीचा नैवेद्य श्राद्धपक्षांत पावत आल्याप्रमाणें पावेल.

( १ ) श्राद्धपक्षांत पितराचे पडदणीचे धोत्र पावत आल्याप्रमाणें पावेल.

( १ ) दसरियाबद्दल बकरें सालाबादीप्रमाणें पावेल.

( १ ) गोकुळअष्टमीबद्दल कारकून व हवलदार यांस लोणी पावत जाईल, व निशाण व विडे पावतील.

( १ ) लग्नांतील कऱ्यास तांब्या असतो, तो हवलदार याचा म्हणोन कलम लिहिलें आहे. त्यास लग्नकार्य जहाल्यास शिरस्त्याप्रमाणें पावेल व दिपवाळीबद्दल तेल अर्गजा विडे पावतील.

( १ ) दसरा, दिपवाळी व वर्षप्रतिपदेस व दिपवाळीस नजर करीत आल्याप्रमाणें करीत जावी.

( १ ) वर्षप्रतिपदेस निंब व विडे पावतील.

( १ ) जे जे कायदे आहेत त्यांस भांडीं व सरपोस कारखान्याकडे रहातील नवे करून दिल्यावर जुनें सरकारांत गुजरावें.

(१ ) हवालदार यास टोपी सकलादि व आबदार यास मेणकापड शिरस्त्याअन्वयें चालविलें जाईल.

( १ )दसऱ्याचे सरकारांतून किंवा आणखी कोणाकडून शेलापागोटें आल्यास ज्याचें त्यांनीं घ्यावें. इनाम आल्यास निमेंत हवलदार व कारकून व निमेंत आबदार व आडेकरी यांनीं शिरस्ता असेल तसें वाटून घ्यावें.

**आंबरण**—नवानगरच्या खवा घराण्याचें मुख्य ठिकाण ( काठेवाड ). लोकसंख्या ३१९८ ( १८८१ ). हें प्राचीन शहर असून दावलशहा नांवाच्या पीराची समाधि असल्यानें प्रसिद्धीला आलें आहे. दावलशहा अंबरणचा फौजदार होता. त्यानें आसपासच्या रजपुतांचा पाडाव करण्याचा उद्योग जेव्हां आरंभिला तेव्हां त्याला रजपुतांनीं १५०९ त ठार मारलें. मरणानंतर साधुपुरुष म्हणून त्याची ख्याति झाली. येथें पुष्कळ यात्रेकरू त्याच्या समाधीच्या दर्शनास जमतात. ( मुं. गॅ. पु. ८. १८८४ )

**आंबा**—हें फळ हिंदुस्थानांतील फळांपैकीं एक उत्कृष्ट फळ आहे; इतकेंच नाहीं, तर हें फळ म्हणजे जसें कमल आमचें 'राष्ट्रीय पुष्प' आहे त्याप्रमाणेंच आमचें 'राष्ट्रीय फळ' असें म्हटलें असतां चालेल. आमचे कवी देखील इतर झाडांपेक्षां आम्रवृक्षासच अधिक मान देतात. कविश्रेष्ठ कालिदासास हा वृक्ष फारच प्रिय होता. त्याच्या काव्यनाटकांतून वसंतऋतूच्या वर्णनाबरोबरच वसंतागमनसूचक जी आम्रमंजरी तिचा उल्लेख आल्याशिवाय रहात नाहीं.

कामदेवाच्या पंचबाणांपैकीं आम्रमंजरी हा एक प्रमुख बाण असून कामदेवा ( मदना ) चा सखा वसंतऋतु हाच कोणी एक योद्धा आम्रमंजरीचा तीक्ष्ण बाण हातीं घेऊन कामी जनांचीं अंतःकरणें विद्ध करण्याकरितां आलेला आहे अशा अर्थाचें बहारीचें शृंगारिक वर्णन कालिदासानें आपल्या 'ऋतुसंहार' काव्यांतील वसंतवर्णनांत केलेलें आहे.

आपल्या भारतीय पूर्वजांनींच केवळ आंब्याला इतकें महत्त्व दिलें आहे असें नसून बौद्ध, महंमदीय व ख्रिस्ती परदेशस्थांनींहि, हिंदुस्थानांतील आंब्यांचें कौतुकच केलें आहे, असें इतिहासावरून दिसून येतें. बुद्धधर्मीय प्रवासी 'फाहायन' आणि 'संगयन' यांनीं लिहिलेल्या आपल्या प्रवासवर्णनांत असें सांगितलें आहे कीं, 'आम्रसारिकेनें' गौतमबुद्धास विश्रांतिकरितां किंवा तपश्चर्येकरितां एक आम्रवन नजर केलें होतें. मुसुलमान लोकांपैकीं, तुर्की कवी अमीर खुशरो यानें ( महमद तघलखाच्या अमदानींत १३२५ ते १३५१ ), फारशी कवितेंत सुंदर वर्णन केलेलें आहे, तिचा सारांश असाः—

आम्र नंदनवनींच विभूषण ।
श्रेष्ठ हिंद फळांतिल हें फळ ॥
मधुर अन्य फळें जरि पक्व ।
मधुर आम्र जरी न परिपक्व ॥

मुसुलमान लोकांसहि आंब्याचें फळ किती प्रिय होतें ह्याचें प्रत्यक्ष उदाहरण म्हणजे दरभंग्याजवळ मोंगल बादशहा अकबर ( १५५६ ते १६०५ इसवी सन ) यानें लाविलेली 'लाखबाग' होय. ह्या लाखबागेंत एक लक्ष आंब्याचीं झाडें लाविलेलीं होतीं असें म्हणतात अकबरशाहीनंतर सुमारें तीन शतकानंतर त्यांपैकीं कांहीं झाडें सुस्थितींत असल्याचें इंग्रज फलसंवर्धक चार्ल्स मेरीज् यास आढळलें ( पोपेनो. पृ. ७९ ). यूरोपीयन लेखकांनींहि आंब्याची फार स्तुति केलेली आहे. लेडी ब्रॅसी या नांवाच्या स्त्रीनें आंब्याला "फळांचाराजा" ( 'किंग ऑफ फ्रूट्स्' ) असें म्हटलें आहे. सफरचंद ( ॲपल ), नेक्टराइन् पीच ( सप्तालूं ), एप्रिकॉट ( जरदाळू ) वगैरे फळांपेक्षांहि आंबे श्रेष्ठ आहेत असें फ्रायरनें ( इ. स. १६७३ ) म्हटलें आहे ( पोपेनो. पृ. ७९ पहा ). हॅमिल्टन हा तर ह्याच्या पुढें जाऊन असें म्हणतो ( इ. स. १७२७ ) कीं, "गोव्याचा आंबा जगांतील इतर आंब्यांच्या मानानें सर्वांत मोठा व सर्वांत ज्यास्त रुचकर समजला तर जातोच; पण मी आणखी असेंहि म्हणतो कीं, हा आंबा इतर सर्व फळांपेक्षां ( शरीरास ) अधिक हितकर आणि अधिक रुचकर असतो." ( वुइलसन् पोपेनो. पृ. ८० पहा ). या वाक्यांत कांहीं अंशीं अतिशयोक्तीचा दोष आहे असें मानलें तरी, आंबा हें फळ ह्या लेखकास किती आवडलें हें स्पष्ट दिसून येतें. हिंदुस्थानचा जगतांतील इतर देशांशीं व्यापाराच्या व इतर कारणामुळें गेल्या कांहीं शतकांपासून संबंध येऊं लागल्यामुळें येथील कांहीं उत्तम आंब्यांच्या जातींचा प्रसार सर्व जगभर–जेथें जेथें हवामान वगैरे परिस्थिति आंब्यांच्या लागवडीस अनुकूल आहे तेथें तेथें–होऊं लागला आहे; आणि याचें कारण म्हणजे ( उत्तम जातीच्या ) आंब्याचा नैसर्गिक चांगुलपणाच होय. अमेरिकन फलसंवर्धनशास्त्रज्ञ वुइलसन् पोपेनो म्हणतोः–"आंब्याची स्निग्ध व खमंग रुचि, त्याचा कांहीं विशिष्ट प्रकारचा मोहक रंग आणि कांहीं जातीवरील रंगाच्या सुंदर छटा, इत्यादि आंब्याच्या गुणांमुळें ह्या फळाला अमेरिकेच्या बाजारांतील अत्यंत स्वादिष्ट व मोहक समजल्या जाणाऱ्या फळाचें स्थान मिळालेलें आहे" ( वुइल्सन् पोपेनोचें पुस्तक पान ८० पहा ).

वनस्पति शास्त्रांतील लॅटिन भाषेंतील नांव 'मॅंगिफेरा इंडिका' असें आहे. यांपैकीं मॅंगिफेरा या नांवावरून 'जीनस' चा म्हणजे एका विशिष्ट वृक्षसमुच्चयाच्या सर्व साधारण नांवाचा बोध होतोः आणि याच वृक्षसमुच्चयापैकीं 'इंडिका' ह्या शब्दानें 'मॅंगिफेरा' हें विशिष्ट झाड ( म्हणजे 'आंबा' ) दर्शविलें जातें; म्हणून वनस्पतिवर्गीकरणशास्त्रदृष्ट्या 'इंडिका' हें 'स्पीसिज' चें नांव झालें.

निरनिराळ्या भाषांमधील आंब्याचीं नावें.–संस्कृत आम्र, चूत, सहकार, रसाल, अतिसौरभ इ. इंग्रजी -मॅंगो हिंदी—आम, आंब. बंगाली—आम, आम्र. गुजराथी—आंबो. सिंधी—आंब, आमु. उरीया—आम. आसामी—आम, घारियम्. मागधी—त्सरत्सांग. सिंगली—आंब. फारशी—आंब, अंबा. ब्रह्मी—दटॅयॅ तामील—मांकाय, मम्मारूम, मांगाय. कानडी—माबू, माविनहन्नु. तेलगू—मामाडिचिट्टू. मलायकम्—मावा. यावद्वीपी—पलम्. आरबी—माघझाक. मराठी–आंबा.

वरील नांवांची तुलना केली असतां सर्व यूरोपियन भाषांतील आंब्याच्या नांवांत 'मांग्' अशा प्रकारचा भाग प्रत्येक नांवाच्या आरंभीं दिसून येतो. त्याचप्रमाणें, चिनी, मलायी, व तामील, ह्यांहि भाषांतील शब्दांच्या आरंभीं हींच अक्षरें दिसतात. त्याचप्रमाणें हिंदी, गुजराथी, सिंधी, उरीय, सिंगली, फारशी. या भाषांतील शब्दांच्या आरंभीं 'आम्' किंवा 'आंब' अशीं अक्षरें दिसतात; व हें शब्द संस्कृत 'आम्र', ह्या शब्दापासून झालेले असावेत, हें उघड आहे. 'मॅंगो' ह्या इंग्रजी शब्दाची व्युत्पत्ति देतांना यूल व बर्नेल हे लेखक असें म्हणतात कीं, 'मांकाय' किंवा 'मां–गाय' ह्या तामील शब्दावरून पोर्तुगीज लोकांनीं, ते पश्चिम हिंदुस्थानांत आल्यानंतर, 'मांगा' असा शब्द प्रचारांत आणिला ( पोपेनो पृ. ८८ पहा. ). त्याचप्रमाणें हें नांव 'वास्को दि गामा' जेव्हां प्रथम हिंदुस्थानांत आला तेव्हां कालिकतला प्रचलित असलेल्या तामील भाषेंतील 'मांगाय' या शब्दाच्या आधारानें प्रचारांत आलें असावें, असा तर्क आहे. असेंच श्री. पुंडे यांचेंहि म्हणणें आहे. स्कीट या लेखकाच्या मतें हें नांव

मलाया द्वीपकल्पांत प्रचलित असलेल्या ' मँगा ' किंवा ' मांगा ' ह्या नांवावरून आलेलें असावें.

आंब्याचा इतिहासः—वनस्पतिशास्त्रांतील ' मँगिफेरा इंडिका' ह्या आंब्याच्या नांवापैकीं ' इंडिका ' ( म्हणजे 'हिंदुस्थानांतील' ) ह्या शब्दावरून या फळाचें मूळस्थान हिंदुस्थान देश असावें असा वनस्पतिशास्त्रज्ञांचा अभिप्राय व्यक्त होतो. हवामान व इतर अनुकूल अशी परिस्थिति मिळाल्याबरोबर आंब्याचें झाड, एखाद्या विवक्षित नवीन ठिकाणीं दुसऱ्या ठिकाणाहून आलें असलें तरी, हवा चांगली मानवल्यामुळें चांगलें वाढूं लागतें, व मनुष्याची नजर त्याकडे न गेल्यास त्याला एखाद्या रानांत आपोआप निसर्गक्रमानें वाढत रहाणाऱ्या जंगली झाडाचें स्वरूप प्राप्त होतें. त्यामुळें आंब्याच्या झाडाचें मूलस्थान कोणतें हें नक्की सांगणें बिकट आहे. तरी पण आंब्याची लागवड हिंदुस्थानांत फार प्राचीन काळापासून होत असल्याचा पुष्कळ पुरावा सांपडतो. ह्या बाबतींत ऐतिहासिक दृष्ट्या पुष्कळ संशोधन होणें जरूर आहे. आजमितीस जो कांहीं पुरावा उपलब्ध आहे व मतें प्रचलित आहेत तीं वाचकांपुढें मांडीत आहों. ( ' फ्लॉरा ऑफ ब्रिटिश इंडिया ' ) सर जोसेफ हूकर ह्यांच्या मतें आंब्याच्या झाडाचें मूलस्थान म्हणजे हिंदुस्थानांतील खालील प्रदेश हे होयः—( १ ) कुमाऊन ते भूतान यांच्यामधील हिमालयीन प्रदेश. ( २ ) बहार प्रांतांतील नद्यांच्या थड्या. ( ३ ) खासियाचे डोंगर. ( ४ ) ब्रह्मदेश. ( ५ ) अयोध्या, ( ६ ) खानदेश व त्याच्या पश्चिमेकडील व दक्षिणेकडील प्रदेश.

डायट्रिक ब्रँडिस हा आपल्या भारतीय वृक्षांवरील ( " इंडियन ट्रीज " ) ग्रंथांत म्हणतो कीं, ब्रह्मदेश, पश्चिम घाट, खासियाच्या डोंगरटेंकड्या, सिक्किम आणि सातपुडा पर्वताचीं दरींखोरीं, या प्रदेशांतून आंब्याच्या झाडाची आरंभापासूनच उत्पत्ति होत आलेली आहे.

आल्फॉन्स डी कँडोल ह्याच्या मतें, आंब्याचें मूलस्थान फक्त हिंदुस्थानपुरतें संकुचित नसून एकंदर आशिया खंडाचा दक्षिण भाग एवढें असावें. वुइलसन पोपेनोचें मत कँडोलच्या मताप्रमाणेंच जवळ जवळ आहे. तो म्हणतो कीं, हिंदुस्थान, आसाम, ब्रह्मदेश, मलाया द्वीपकल्प वगैरे पूर्व आशियांतील प्रदेश हेंच आंब्याचें मूलस्थान असलें पाहिजे. ( पोपेनोचें पुस्तक पृ. ८६ ) वरील सर्व शास्त्रज्ञांचीं मतें पाहिलीं असतां आंब्याच्या मूलस्थानाच्या टापूंत हिंदुस्थान देश सर्वांच्याच मतें येतो. मतभेद कायतो एवढ्याच बाबतींत आहे कीं, मूलस्थानाची कक्षा हिंदुस्थानापुरतीच संकुचित समजावयाची किंवा ह्या कक्षेंत ब्रम्हदेश, मलाया द्वीपकल्प वगैरे प्रदेशाचा अंतर्भाव करावयाचा ? तें कसेंहि असलें तरी, आंब्यांची लागवड हिंदुस्थानांत फार प्राचीन कालापासून होत आली असावी असें दिसतें. श्री. ह. पु. परांजपे म्हणतातः—" आंबा हा उपनिषत्कालापासून माहीत आहे. याचा उल्लेख बृहदारण्यकोपनिषदामध्यें पुढीलप्रमाणें आला आहे.

स यत्रायमणिमानं न्येति जरया वोपततापाऽणिमानं निगच्छति तद्यथाऽऽम्रं वा पिप्पलं वोदुंबरं वा बंधनात् प्रमुच्यत एवमेवायं पुरुष एभ्योऽङ्गेभ्यः संप्रमुच्य पुनः प्रतिन्यायं प्रतियोन्याद्रवति प्राणायै व ॥ ३६ ॥ अध्याय ४ ब्राह्मण ३.

' अर्थः—ज्याप्रमाणें आम्रफल, उंबर अथवा पिंपळाचें फळ हें ( रस वाळल्यामुळें ) आपल्या डेंखापासून गळून पडतें त्याप्रमाणें मनुष्याचा देह वृद्धपणामुळें किंवा व्याधीमुळें कृश होतो किंवा नाहींसा होतो.

' याचा काळ इसवी सनापूर्वीं एक हजार वर्षें आहे असें समजतात. त्याकाळीं फळ डेंखाला रसानें चिकटविलेलें होतें अशी कल्पना होती. " ( ह. पु. परांजपेकृत "फळांचाबाग" पृ. ४२ ).

मारुती सीतेच्या शोधार्थ लंकेंत गेला असतां, त्याला तेथें एक " आम्रकानन " ( आंबराई ) आढळलें, असा उल्लेख रामायणांत सांपडतो. महाभारतांतहि आंब्यासंबंधीं एक उल्लेख आढळतो. उदाहरणार्थ रा. चिंतामणराव विनायक वैद्य आपल्या महाभारताच्या उपसंहारांत म्हणतात, " मोठमोठाल्या झाडांच्या बागा करण्याची त्यावेळीं विशेष प्रवृत्ति होती आणि मुख्यतः आंब्याचीं झाडें अशा बागांतून लावीत असत. आंब्यांचीं झाडें थोड्या वर्षांत म्हणजे पांच वर्षांत फळ कसें देतील या विषयींची कला त्यावेळेस माहीत होती असें दिसतें. ' चूतारामो तथाभग्नः पंचवर्षः फलोपगः ' । असे द्रोणपर्वांत एके ठिकाणीं उदाहरण घेतलें आहे. ' फळास आलेली पांच वर्षांची आंब्याची बाग जशी भग्न करावी ' या उपमेवरून हल्लीं लागत असलेल्या लहान लहान कलमी आंब्याच्या बागांची कल्पना आपल्यासमोर उभी रहाते "

अग्निपुराणांत ' मत्स्योदकेन शीतेन आम्राणां सेक इष्यते ' ( अग्निपुराण, वृक्षायुर्वेद प्रकरण. आनंदश्रमानें प्रसिद्ध केलेल्या आवृत्तींत ' वत्स्यांभसा तु सेकेन वृद्धिर्भवति शाखिनः' असा, व 'याम्यतस्त्वाम्रः ' असें उल्लेख सांपडतात.) आंब्याच्या झाडांना थंडसर मासळीचें पाणी द्यावें असें म्हटलेलें आहे.

ख्रिस्तीं शकाच्या अगोदर सुमारें चार हजार वर्षें किंवा सध्यांच्या कालाच्या अगोदर सुमारें चार हजार वर्षें इतक्या प्राचीन कालापासून मनुष्य प्राणी ज्या फळझाडांची लागवड करीत आला आहे त्यांपैकींच आंबा हेंहि फळ असावें असें अल्फॉन्स डी कँडोल यानें आपलें मत प्रदर्शित केलें आहे. ( पोपेनो पृष्ठ ८४. )

अमरसिंह यानें लिहिलेल्या अमरकोशांत आंब्याचा उल्लेख आलेला असून ' चूत ' ' रसाल ' ' सहकार ', ' अतिसौरभ ', असें प्रतिशब्द त्यानें दिलेले आहेत.

त्यासंबंधीं पूर्वी एकदां सांगितलेंच आहे. त्याचप्रमाणें 'फाहीआन' व संयमन या बौद्धधर्मीय प्रवाश्यांच्या हकीकतींत गौतमबुद्धाला आम्रदरानें एक आम्रवन अर्पण केल्याचा उल्लेखहि आलेलाच आहे.

कविकुलगुरु कालिदासाच्या कुमारसंभव, शाकुंतल, इत्यादि काव्यनाटकांतील श्लोकांतून आम्रमंजरींचें बहारीचें वर्णन संस्कृतज्ञ वाचकांस परिचित आहे.

अकबरानें दरभंगा येथें एक लक्ष आंब्याचीं झाडें लाविलीं असून त्यांपैकीं कांहीं अद्याप जिवंत आहेत असें म्हणतात. पंजाबांतील बक्कर शहरीं एक आम्रवृक्ष होता, त्याचे आंबे अफगाण बादशहांच्या वेळीं काबूल येथें पाठवीत असत. मुंबई, माजगांव येथील उत्तम आंबे शहाजहान बादशहाकरितां जात असत. अलीगड, अमृतसर, मुरादाबाद, कलकत्ता, ब्रह्मदेश, आसाम, भोपाळ, ग्वाल्हेर, राजपुताना उत्तरसरकार, बंगलूर, सेलम वगैरे ठिकाणीं आंब्यांचीं चांगलीं झाडें होत आहेत. एकंदरींत आंब्याची लागवड हिंदुस्थानांत कोठें नाहीं असा भाग सांपडणें कठीण. त्याचप्रमाणें अमेरिकेंत फ्लॉरिडा, ब्राझिल, वगैरे भाग आणि क्यूबा, पोर्टोरिको, कॅनरी, मदिरा, फिलिपाईन वगैरे बेटें, ऑस्ट्रेलिया, आफ्रिका सिलोन वगैरे उष्ण प्रदेशांत आंब्याची लागवड बरीच होत आहे.

मुंबई इलाख्यांत सिंध प्रांतात, कांहीं ठिकाणीं काठेवाडांत जुनागड, जामनगर येथें आंब्याचीं झाडें चांगलीं होत आहेत गुजराथेंत व खानदेशांत रायवळ आंबे पुष्कळ ठिकाणीं आहेत. नासिक, पुणें, सातारा या जिल्ह्यांत मोठमोठाल्या जुन्या राया दृष्टीस पडतात. बेळगांव, धारवाड ह्या जिल्ह्यांतहि आंब्याची लागवड बरीच आहे. कारवार, गोवा, रत्नागिरी, ठाणें या जिल्ह्यांतील हापूस पायरीचे आंबे फार प्रसिद्ध आहेत. सुरत जिल्ह्याच्या दक्षिण भागांत कलमी आंब्याची लागवड अलीकडे फार होऊं लागली आहे. एकंदरींत मुंबई इलाख्यांत किंवा महाराष्ट्रांत आंब्याचीं झाडें चांगलीं होत नाहींत असा टापू नाहींच म्हटलें तरी चालेल.

आंबे कोणकोणत्या ठिकाणीं होतात, याचें दिग्दर्शन वर केलेंच आहे. त्यावरून आंब्यास हिंदुस्थानांतील कोणतेंही हवामान चालतें असें म्हटलें तरी चालेल. पंजाब, सिंध वगैरे प्रांतांत भयंकर उन्हाळा व अतिशय थंडी पडते अशा ठिकाणीं आंबे होत आहेत; तसेंच सिंध व खानदेशांतील अतिशय रुक्ष हवा आणि गोवा व कोंकण येथील समुद्रकांठची दमट हवा या दोन्ही आंब्याला मानवतात. यावरून हवेच्या दृष्टीनें आंब्याचें झाड फारसें खोडकर नाहीं असें म्हणण्यास हरकत नाहीं. तरी पण समुद्रकांठच्या गरम व दमट हवेंत वाढलेलीं झाडें फार कोरड्या हवेंत किंवा थंडीचा कडका पडतो अशा ठिकाणीं लावलीं असतां तीं चांगलीं होत नाहींत. उदाहरणार्थ, मुंबईतील आंब्याचीं कलमें नागपूर प्रांतांत लावलीं असतां त्यांच्यानें तेथें टिकाव धरवत नाहीं, तीं लवकरच मरतात; पण नागपूर प्रांतांतच झाडें तयार केलीं तर तीं थंडीच्या कडक्याला फारशीं जुमानीत नाहींत, असा अनुभव आहे. यावरून आंब्याच्या अंगीं नैसर्गिक परिस्थितीला अनुसरून आपल्या अंगांत योग्य ते फेरफार करण्याची शक्ति आहे असें दिसून येतें. निरनिराळ्या हवामानांत वाढण्याची शक्ति जरी आंब्याच्या अंगांत आहे तरी समुद्रकांठची गरम दवमट हवा आंब्याला उत्तम मानवते असें दिसतें. गोवा, रत्नागिरी, ठाणें वगैरे समुद्रकिनाऱ्यावरील प्रदेशांतील आंबे फार उत्तम म्हणून सर्व हिंदुस्थानांत प्रसिद्ध आहेत. सिंध, खानदेश यांसारख्या अतिशय रुक्ष हवेच्या प्रदेशांत आंब्याचीं झाडें चांगलीं झालीं न त्यांस फळहि बऱ्यांपैकीं आलें तरी गोवा, कोंकणकडील आंब्याची सर त्यांना केव्हांहि येत नाहीं. तसेंच दमट हवेच्या प्रदेशांत झाडांनां फळ लवकर येतें व त्याचा मोसमही फार लवकर सुरू होतो. तसा तो रुक्ष हवेच्या प्रदेशांत होत नाहीं.

आंब्याच्या जाती अनेक आहेत. त्यांचें वर्गीकरण करण्याच्या भानगडींत फारसें कोणी पडलें नाहीं; व ज्यांनीं तें करण्याचा प्रयत्न केला त्यांना त्यामध्यें म्हणण्यासारखें यशहि आलें नाहीं याचें कारण असें आहे कीं, आंब्याचे प्रकार अनेक असल्यामुळें ते सर्व एके ठिकाणीं मिळवून त्याची प्रत लावणें जवळ जवळ अशक्य झालें आहे. एखादी जात घेऊन तिला एक शास्त्रीय नांव दिलें तरी ती जात कायमची आहे अगर तिच्या कोया रुजत घालून त्यांच्यापासून झालेल्या झाडांनां मूळच्याप्रमाणें आंबे येतील असें कांहीं खात्रीनें म्हणतां येणार नाहीं. कारण आंब्याच्या फुलांत गर्भधारणेसाठीं त्याच जातीचा पराग लागतो असें नाहीं. दुसऱ्या जवळच्या जातीचा पराग पडून त्यानेंहि गर्भधारणा होण्याचा संभव असतो. तेव्हां कोयीपासून झालेल्या झाडाला फळें मादीप्रमाणें किंवा नराप्रमाणें किंवा त्याहूनहि अगदीं भिन्न येण्याचा संभव आहे. पायरीच्या कोया लावून त्यांपासून झाडें होऊन त्यांस नऊ वर्षांनीं पहिल्यानेंच फळें आलीं, तीं मूळच्या पायरीसारखीं मुळींच नव्हतीं असें आढळून आलें आहे. शिवाय कोयांपासून केलेल्या झाडांनां फळ येण्याला आठ नऊ वर्षें लागतात. यामुळें एकादी जात पिढ्यानुपिढ्या सारखीच येते किंवा नाहीं हें समजण्याला फार वेळ लागून त्रास पडतो. तसेंच झाडांचा आकार, उंची, फळाचा आकार रंग, चव वगैरे धर्मांवरून आंब्यांचें वर्गीकरण करण्याचा अल्पसा प्रयत्न अमेरिकेंत झाला आहे; परंतु तो कितपत ग्राह्य होईल याबद्दल शंका आहे. नांवावरून जाती ठरविणें अत्यंत चुकीचें आहे. कारण एकाच जातीच्या आंब्याला निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळीं नांवें असल्यामुळें फार घोंटाळा होतो. उदाहरणार्थ महाराष्ट्रांतलि पायरी व बंगलोरकडलि रसपुरी या दोन्ही एकच आहेत. महाराष्ट्रांत

आंब्याचे तीन प्रकार मानले आहेत, ते रायवळ, इरसाल व कलमी. कोठेंतरी कोय पडून दैववशात वाढलेल्या झाडांनां रायवळ म्हणतात. यांचें फळ चांगलें असेल किंवा नसेल. मुद्दाम चांगल्या जातीचे आंबे पाहून त्यांच्यापासून काळजीपूर्वक झाडें केलीं असल्यास त्यां झाडांनां इरसाल म्हणतात. यांचें फळ बहुधा चांगल्यापैकीं असतें. या दोन्ही जातींचीं झाडें फार मोठीं होतात. जीं झाडें कलम बांधून केलेलीं असतात त्यांस कलमी म्हणतात; त्यांचीं फळें उत्तम प्रकारचीं असतात व झाडें बहुधां दुसऱ्या दोन जातींपेक्षां काळजीपूर्वक जतन केलेलें असून तीं रायवळ व इरसाल झाडांपेक्षा लहान असतात. यांच्या फळांना नेहमीं भाव चांगला येतो. हें वर्गीकरण सामान्य माणसाला उपयोगीं असलें तरी तें शास्त्रीयदृष्ट्या बरोबर नाहीं. कारण एखादा रायवळ आंबा उत्तमपैकीं असल्यास त्याचीं कलमें करून त्याची आणखी पैदास करण्यास हरकत नाहीं. अर्थात् त्याचीं कलमें उतरून घेतल्यावर कलमाचीं फळें व रायवळ आंब्याचीं फळें यांत मुळींच फरक असणार नाहीं. पण दोहोंचीं फळें सारखींच असतां एकाला रायवळ व दुसऱ्याला कलमी म्हणणें हें शास्त्रीयदृष्ट्या अगदीं गैर होय. आंब्याच्या कोयींत एक किंवा अनेक अंकुर असतात. अनेक अंकुर असल्यास कोयींतून एकाहून जास्त मोड बाहेर पडतात. कधींकधीं सात मोड देखील बाहेर येतात. अशा प्रकारच्या जाती फिलिपाइन बेटें, फ्लारिडा, मेक्सिको, वेस्टइंडीज वगैरे देशांत सांपडतात व त्या नेहमीं बियांप्रमाणेंच उतरतात. हिंदुस्थानांतील सर्व जाती एकांकुराच्या आहेत. त्या नेहमींच मूळ झाडाप्रमाणें उतरतात असें नाहीं. हिंदुस्थानांतील कांहीं प्रसिद्ध जातींचीं नांवें खालीं दिलीं आहेत.

बंगालकडील जाती.—फजली, गोपाळभोग, कृष्णावर्ती, वृंदावनी, खरबुज्या लंगरा,, महाजनपसंत.

मद्रास, म्हैसूरकडील जाती.—पिटर, गोवा, अमेरिकोला, दिलपसंत, नीलम्, नाजूकपसंत, चित्तूर सुंदरशा, रसपुरी.

गोव्याकडील जाती.—काळा व गोल अफूस, मांकुराद, फर्नांदिन, माल्डेझ, मुशराद, बिशप, मलगोवा

मुंबई इलाख्यांतील जाती.—आफूस, पायरी, कावसजीपटेल, बनछोड, पायपोशा, बोरशा, रुस, बाटली, शेंद्या वाळीमावु, करेमावु, साखऱ्या, पावशा, काळा इशाड, खुंट, गोप्टो कलकात्तियो.

जमीन.—आंब्याला जमीन अमुक एक प्रकारचीच पाहिजे असें नाहीं. परंतु रायवळ व कलमी आंब्यांची जोपासना थोडी निराळी केल्यास बरी असें आम्हांस वाटतें. रायवळ झाडें बऱ्याच चिकणवट जमीनींत देखील चांगलीं होतात. मात्र त्यास वाढण्यास थोडा जास्त वेळ लागतो एवढी गोष्ट खरी. ज्या माळावर सहसा एकहि झाड उगवत नाहीं किंवा प्रखर उन्हापासून व वाऱ्यापासून संरक्षण होण्याचा संभव नाहीं अशा ठिकाणीं देखील युक्तीनें व मेहनतीनें रायवळ आंब्यांचीं झाडें चांगलीं होतात. अशा माळांवर मोठमोठ्या ताली घालून तालींच्या खालच्या बाजूला जमीन चांगली खोल असते, पाण्याचा पुरवठा भरपूर व पुष्कळ दिवस मिळतो, व जोराच्या वाऱ्यापासून आडोसा मिळतो अशा ठिकाणीं नुसत्या आंब्यांच्या कोया टाकून दिल्यानेंहि उत्तम प्रकारचीं झाडें झालेलीं दृष्टीस पडतात. ताली बांधून शेतकीसाठीं तयार केलेली जमीन झाडांच्या वसव्यामुळें कांहीं अंशीं फुकट जाईल अशी शंका येण्याचें कांहीं कारण नाहीं. कारण त्यांची सावली बांधावर व बांधाच्या आसपास पडत असल्यामुळें पीक बुडण्याचा फारसा संभव नाहीं. आंब्याला नदीकांठची गाळाची, मऊ व भुसभुसीत जमीन चांगली मानवते. पण नदीकांठीं झाडें फार वेळ पाण्यांत बुडून राहणार नाहींत अशा ठिकाणीं तीं लावावींत. देशावर किंवा समुद्राकिनाऱ्यापासून झाडें दूर लावावयाचीं झाल्यास जमीन तीन फूट खोल असून खालीं मुरुम असावा निदान जमीनींतून निचरा चांगला होत असावा. कोंकणांतील तांबड्या जमीनींत झाडें फार चांगलीं होतात. त्या ठिकाणीं जमीन फारशी खोल नसते परंतु येथील दगड फार कठीण नसल्यामुळें मुळांनां दगडांच्या फटींतून घुसण्यास मुळींच अडचण पडत नाहीं. रत्नागिरी, गोवा, बाणकोट वगैरे ठिकाणीं डोंगरांच्या उतारांवर आंब्यांचीं झाडें चांगलीं होतात. धारवाड जिल्ह्यांतील तांबड्या जमीनींतहि आंब्याचीं झाडें फार चांगलीं होतात. या जमीनींत चुन्याचा अंश फार कमी असून त्या फार हलक्या असतात. रत्नागिरी, धारवाड वगैरे जिल्ह्यांतील तांबड्या जमीनी फारशा सपाट नसल्यामुळें झाडें लावण्यापूर्वी नांगरणी करणे फारसें शक्य नसतें. अशा ठिकाणीं फक्त खड्डे खणून झाडें लावितात. विजापूर, सोलापूर, खानदेश, अहमदनगर, गुजराथ, सिंध वगैरे रुक्ष हवेच्या प्रदेशांत झाडें लावावयाचीं असल्यास त्यांचें वाऱ्यापासून संरक्षण करण्याची तजवीज अगोदर झाली पाहिजे. विशेषतः निंबाच्या एक दोन रांगा पश्चिम व दक्षिण बाजूला लावून त्यांच्या आश्रयाला पूर्व व उत्तर बाजूंनीं झाडें लावावींत; म्हणजे तीं उन्हानें व कढत वाऱ्यानें करपून जात नाहींत. तसेंच अशा रुक्ष प्रदेशांत शक्य असल्यास जरा सखल ठिकाणीं झाडें लावल्यास तीं चांगलीं होतात.

खानदेश, सोलापूर, विजापूर वगैरे उष्ण प्रदेशांत आंब्याचीं झाडें लावावयाचीं असल्यास तीं वर सांगितलेल्या पद्धतीपेक्षां जरा निराळ्या पद्धतीनें लावली असतां तीं चांगलीं व लवकर होण्याचा विशेष संभव आहे. ही पद्धत इराक ( मेसापोटेमिया ) या देशांत मोसंब्याच्या बागेंत विशेष प्रचलित आहे. त्या देशांत जून, जुलै व आगस्ट

या महिन्यांत प्रखर उन्हाळा असून त्यावेळीं उष्णतेचें मान १००°–१२५° फा. पर्यंत चढतें. म्हणून या ऋतूंत मोसंब्याच्या लहान झाडांचें संरक्षण होण्यासाठीं त्यांची अगोदर दोन तीन वर्षांपासून तजवीज करतात. पहिल्यानें खजुरीचीं झाडें लावतात. नंतर जरदाळू, अलुबुखार वगैरे त्या देशांतील प्रखर ऊन सहन करणारीं झाडें लावतात. हीं सुमारें तीन वर्षांचीं होऊन त्यांचीं चांगली सावली पडूं लागली म्हणजे त्यांच्या जवळच व त्यांच्या आश्रयानें मोसंब्याचीं झाडें लावतात. आणखी दोन तीन वर्षेपर्यंत जरदाळूला चांगलें पिक येतें व वर खर्च निघून येतो. या अवधींत मोसंब्याचीं झाडें मोठीं होतात व तीं दुसऱ्या झाडांच्या आश्रयावांचून प्रखर उष्णता सहन करण्यास समर्थ होतात; व पुढें जरदाळूचीं वगैरे झाडें काढून टाकतात. फक्त खजुरीचीं झाडें मात्र काढीत नाहींत. कारण खजूर हें अरब लोकांचें महत्त्वाचें अन्न आहे व त्यापासून त्यांनां उत्पन्नहि चांगलें मिळतें. परंतु खजुरीपासून मोसंब्यांनां फायदा किंवा अडचण होते असें नाहीं. असो. अशीच पद्धत खानदेश, सोलापूर, अहमदनगर वगैरे जिल्ह्यांत थोडा फेरफार करून अमलांत आणली तर त्या प्रांतांतहि चांगल्यापैकीं आंब्यांचीं कलमें होण्यास हरकत नाहीं असें वाटतें. ज्या ठिकाणीं आंब्यांचीं झाडें लावावयाचीं असतील त्या ठिकाणीं रोहिणी किंवा मृगनक्षत्राच्या सुमारास राजेळी किंवा गुजराथवाळी ह्या जातींच्या केळी लावाव्या व थोडेच दिवसांनीं तीस फुटांच्या अंतरानें आंब्यांचीं कलमें लावावीं. केळीला खत व पाणी मिळत असल्यामुळें कलमांनां निराळें पाणी देण्याचें कारण नाहीं. केळी सात आठ वर्षेपर्यंत सहज टिकतात. इतक्या अवधींत आंब्यांचीं झाडें मोठीं होऊन तीं केळींपेक्षां उंच होतील व तीं उष्ण व रुक्ष हवा सोसण्यास समर्थ होतील. खानदेशांतील बलराई केळी दीड वर्षांनीं काढून टाकतात हें खरें, परंतु येवढ्या अवधींत देखील कलमांनां चांगली सावली मिळाल्यास तीं चांगलीं झाल्याशिवाय रहाणार नाहींत.

आतां रायवळ व इरसाल झाडें कोया लावूनच करावयाचीं असल्यामुळें त्यांच्या मुळ्या जिकडे चांगला वाव मिळेल तिकडे जातात;यामुळें चिकण जमीनींतसुद्धां आंब्यांचीं झाडें होण्यास अडचण पडत नाहीं. जमिनींत लावलेल्या झाडांवर जाग्यावरच कलमें बांधणें चांगलें; कारण अशींच झाडें उत्तम होतात. परंतु अशा रीतीनें झाडें करणें पुष्कळांस शक्य नसल्यामुळें त्यांनां आयतीं कलमें विकत घेऊन तीं लावावीं लागतात. हीं झाडें बरेच दिवस कुंड्यांत असल्यामुळें त्यांच्या मुळ्यांची वाढ जशी व्हावी तशी झालेली नसते. यामुळें कलमीं झाडें चिकणमातींत लावूं नयेत. कलमीं झाडांसाठीं जमीन चांगल्या प्रकारची व उत्तम निचऱ्याची असावी. सर्व जमीन पहिल्यानें दोन तीन वेळां नांगरून व कुळवून घ्यावी व झाडें लावण्यासाठीं तीन फूट लांब रुंद खाडे खणावे, यापेक्षां ते लहान असूं नयेत. ते तीन फूट खोल व चार फूट रुंद असे खणल्यास उत्तम. खाड्यांत दहा पौंड हाडांचें पीठ किंवा तें मिळत नसल्यास नुसतीं हाडें तळाशीं घालून बरेचसें म्हणजे४-५ टोपल्या शेणखत, नदीकांठची किंवा खड्यांतीलच वरची माती हीं सर्व एकत्र करून त्यानें मे महिन्यांत खड्डे भरावे. पाऊस बेताचा असल्यास पावसाळ्याच्या आरंभीं व फार असल्यास श्रावणांत पावसाचा भर कमी झाल्यावर झाडें लावावीं. बरेच वेळां झाडें फार खोल लावलीं जातात. परंतु ही चूक आहे. कारण त्यांच्या मुळ्या आधींच कुंड्यांत चोंदून गेल्यामुळें व पुढेंहि तीं खोल लागलीं गेल्यामुळें त्यांनां वाढण्याला चांगला वाव मिळत नाहीं. वारा फार असल्यास झाडें लावल्याबरोबर जवळ काठी रोवून तिचा झाडाला आधार द्यावा. झाडें लावल्यानंतर कोणतें तरी पोटपीक घ्यावें. बरेंच खत लागणारा भाजीपाला, कोबी, नोलकोल, मिरच्या, वांगीं, बटाटे वगैरे पिकें घ्यावीं. उन्हाळ्यांत पाणी पुरेसें नसल्यास फक्त पावसाळ्यांतच योग्य तीं पिकें घ्यावीं. धारवाडकडील तांबड्या जमीनींत वांगीं, बटाटे, गवार वगैरे पिकें घेतात. थोडी काळसर जमीन असल्यास भुइमूग, वाटाणा, घेवडा वगैरे पिकें घेतात. कोंकणांत शक्य असेल तेथें भात लावण्याची वहिवाट आहे; परंतु अशा ठिकाणचीं झाडें बहुधा चांगलीं होत नाहींत. कारण पावसाळ्यांत पाणी फार सांचतें व उन्हाळ्यांत जमीन फार घट्ट होते. गुजराथेंत पिंपळी लावण्याची वहिवाट आहे. झाडें मोठीं झाल्यावर पिंपळी चांगली होते व तिच्यापासून आंब्यांच्या झाडांनां मुळींच त्रास होत नाहीं.

झाडें लावल्यानंतर त्यांच्याखालीं कोणत्याहि प्रकारचें तण वाढूं देऊं नये. जमीन मधून मधून नांगरून व कुळवून निर्मळ व मऊ अशी ठेवावी. झाडें पांच वर्षांचीं होईपर्यंत त्यांनां जमीनीच्या मगदुराप्रमाणें चार ते दहा दिवसांनीं पाणी द्यावें; असें केल्यानें झाडें लवकर वाढतात; त्यांनां चवथ्या व पांचव्या वर्षी देखील फळ उत्तम येतें; पण बागेची निगा चांगली ठेविली नाहीं तर झाडें लवकर वाढत नाहींत, तीं खुजीं राहतात व त्यांनां फळहि चांगलें व भरपूर येत नाहीं. कलमी आंब्यांच्या फांद्या खालपासूनच फुटत असल्यामुळें त्या मोठ्या झाल्यावर झाडांमधून नांगरणी करणें वगैरे शक्य नसतें, त्यामुळें पुढें उत्पन्न कमी येऊं लागतें. यासाठीं पांच फूट उंचीपर्यंत प्रथमपासून झाडाच्या खालच्या खांद्या कापून टाकाव्या हें चांगलें. झाडें मोठीं झाल्यावर हें काम फारच जड जातें. लहान असतांनांच फांद्या कापल्या म्हणजे वरचें झाड आपोआपच सरळ होत जातें. फांदी कापावयाची ती अगदीं लहान असतांनां अंगाबरोबरच कापावी. पाऊस बेताचा असल्यास झाडांच्या आकारमानाप्रमाणें दोन ते सहा टोपल्या शेणखत

व पांच तें दहा पौंड हाडांची बुकटी असें खत वर्षास पावसाळ्याच्या आरंभीं द्यावें; पण पाऊस फार असल्यास तें श्रावणअखेर द्यावें. खत झाडाच्या बुंध्याशीच न टाकतां सर्व झाडाखालीं पसरून टाकून जमीन नांगरून किंवा खणून टाकावी. झाडें मोठीं झालीं म्हणजे त्यांनां खत देण्याची वहिवाट नाहीं; परंतु खत दिल्यास पीक जास्त येऊन तें वर्षास येण्याचा संभव आहे. आंब्यांनां वर्षास फळ येत नाहीं हें सर्वांस महशूर आहे. पण वास्तविक पाहतां फळ एक वर्षाआडहि चांगलें न येतां तें तीन वर्षांनीं एकदां चांगलें येतें. वर्षास खत दिल्यास फळ दरसाल येण्याला हरकत दिसत नाहीं.ग्वाल्हेर, अलाहाबादकडे मोठ्या झाडांनां नेहमीं पाणी देण्याची वहिवाट आहे. पण बंगाल व मुंबई इलाखा या प्रांतांत नाहीं. पाऊस थांबल्यापासून तों मोहोर येऊन कैरी धरीपर्यंत झाडांनां पाणी देऊं नये. पण कैरी धरल्यापासून फळांची पूर्ण वाढ होईपर्यंत पाणी द्यावें अशी पुष्कळ लोकांची समजूत आहे. परंतु यासंबंधीं जे प्रयोग झाले आहेत त्यावरून पाणी देण्यापासून फायदा कांहींच झालेला दिसून आला नाहीं. दुसरीं कांहीं फळझाडें व आंबा यांच्या लागवडीमध्यें एक फरक असा आहे कीं, इतर झाडांना बहुतेक वर्षभर पाणी द्यावें लागतें; आंब्यांनां पांच वर्षांनंतर पाणी द्यावें लागत नाहीं. यामुळें आंब्याची लागवड ही इतर झाडांच्या लागवडीपेक्षां सोपी व कमी दगदगीची असते. नेहमीं पाणी दिल्यानें तो विशेष नाहींसा होऊन शिवाय पाणी देण्याचा खर्च मात्र निष्कारण वाढेल. तसेंच फळ येण्यासाठीं फांद्यांची व मुळ्यांची छाटणी करण्यापासूनहि कांहीं फायदा किंवा उपयोग झालेला नाहीं. झाडांना मीठ देण्याची वहिवाट कोंकणांत व इतर कांहीं ठिकाणीं आहे. मीठ वर्षास किंवा दोन वर्षांनीं एकदां दोन ते चार पौंड झाडाच्या बुंध्याशीं आश्लेषा नक्षत्रांत ( श्रावण अखेर ) देतात. मिठाच्या योगानें झाडांना वाळवी लागत नाहीं; त्याच्यायोगानें पानांची वाढ न होतां फुलें धरतात अशी सामान्य समजूत आहे. परंतु ज्या बागांतून मीठ केव्हांच दिलेलें नसतें अशा बागांतून आंब्यांचें उत्पन्न चांगलें आलेलें आहे. यावरून मिठाचा उपयोग झाडांना चांगला होत असेलच असें वाटत नाहीं.

कोंकणांत आंब्यांच्या झाडांनां मीठ देतात हें ऐकून देशावरहि कांहीं लोकांनीं आंब्यांनां मीठ दिलें; तें किती व केव्हां द्यावयाचें हें ठाऊक नसल्यामुळें मीठ फारच घातलें गेलें व लगेच दोन दिवसाच्या आंत झाडें मरूं लागलीं; यासाठीं मीठ मुळींच न दिलेलें पुरवलें पण तें जास्त मात्र बिलकुल होतां कामा नये.

कोंकणांत झाडांच्या बुंध्याशीं गडगे करण्याची वहिवाट आहे. झाडांच्या बुंध्याशीं मातीचे ढीग घालून त्यावरच हातपाणी देतात. हातपाणी किती दिलें तरी तें फार बेताचेंच पडणार. शिवाय तें ढिगाच्या टकल्यावर बुंध्याशींच पडत असल्यामुळें मुळांनां मुळींच मिळत नाहीं. यासाठीं झाडांच्या विस्ताराप्रमाणें बांगडीसारखें आळें करून त्यांत पाणी द्यावें म्हणजे तें मुळांना पोंचून त्याचा उपयोग झाडाला होईल. तसेंच झाडें उथळ जमिनीवर व फार उघड्यावर लाविलीं असल्यास गडग्यांचा उपयोग होतो. पण जमीन खोल आहे व वाऱ्यापासून फारशी भीति नाहीं अशा ठिकाणीं गडग्यांचा उपयोग होत नाहीं.क्वचित ठिकाणीं आंब्यांच्या खोडांना मुळ्या फुटतात व त्या सपाटीबरोबर येतात.

कित्येक ठिकाणीं आंब्यांनां फळ सहसा येत नाहीं किंवा आलें तर तें फार थोडें येतें. याचीं कारणें अनेक आहेत. त्यापैकीं मुख्य खालीं दिलीं आहेत. कलमी झाडांना पांच वर्षेपर्यंत फळ येत नाहीं. मोहोर आल्यास तो धरत नाहीं, गळून पडतो. चार वर्षेपर्यंत कलमांना मोहोर आल्यास तो खुडून टाकावा. फळ धरल्यास झाडें खुरटीं राहातात. पण यापुढें फळ न धरल्यास झाडांची मशागत चांगली झाली नाहीं असें समजावें. झाडें खुरटीं राहिलीं अगर जमीन निःसत्व असली तर झाडांची विशेष काळजी घ्यावयास पाहिजे व खत, पाणी वगैरे जें कांहीं कमी असेल त्याकडे लक्ष दिलें पाहिजे. झाडांना मोहोर भरपूर येतो पण फळ धरत नाहीं याचें कारण बहुधा ढग हें असतें. ढग, पाऊस, धुकें वगैरे पडण्याच्या वेळीं एक प्रकारच्या अलिंब वर्गांतील वनस्पतीपासून रोग होतो. याचें नांव ओइडियम क्रिसिफोइडस असें आहे. हा रोग झाला म्हणजे मोहोरावर एक प्रकारचा भुरा दिसतो. थोड्याच दिवसांत तेथील भाग काळा होऊन सर्व मोहोर सुकून जातो. ज्या वेळीं धुकें, पाऊस, दंव, ढग वगैरे फार येतात त्या वेळीं या रोगाचा जोर फार होतो, म्हणून फळ धरत नाहीं. यावर उपाय मोहोर बाहेर पडल्याबरोबर बोर्डोमिश्रण शिंपडावें व फळ धरल्यावर पुन्हां एकदां तेंच मिश्रण शिंपडावें. झाडें फार मोठीं असल्यास मिश्रण मारणें फारसें शक्य नसतें; झाडें लहान असतांनाच मिश्रम मारणें सोपें असतें.

तीन फुटांखालील जमीन फार कठिण अगर खडकाळ असल्यानेंहि फुलें न धरतां गळून पडतील. याला उपाय नाहीं. अशा जमीनींत झाडें लावणें ही चूक आहे. जमीन नांगरानें नांगरून वर्षास भरपूर खत घालून व पावसाळ्यांत तागाचें वगैरे बिवड घालून जमिनीचा पोत सुधारल्यानें फळ धरण्याचा बराच संभव आहे.

तु ड तु डे कि डे—या किड्यांच्या एकंदर तीन जाती आहेत; त्यांचीं नांवें–( १ ) इडियोसीरस क्लायपिआलिस, ( २ ) इडियोसीरस ॲटकिन्सोनाय व ( ३ ) इडियोसीरस निव्हिओस्पोर्सस. मोहोर आल्यावर हे किडे मोहोरावर बसून त्यांतील रस शोषून घेतात; व त्यामुळें मोहोर लवकर सुकून जातो, व फळ धरत नाहीं. या किड्यांची उत्पत्ति

वर्षांतून एकंदर तीन वेळां होते. जून व आक्टोबर महिन्यांत आंब्यावर जी नवी फूट होते तिच्यावर यांची वाढ होते, व त्यांतील रस हे किडे शोषून घेतात; नंतर डिसेंबर व जानेवारी महिन्यांत मोहोर आल्यावर त्यावर त्यांची अमर्यादित वाढ होते, व त्यामुळें नुकसान फार होतें. अंड्यांपासून किड्यांची पूर्ण वाढ झाल्यावर मोहोर येईपर्यंत किडा तसाच राहातो. या जातींच्या किड्यांवर उपाय करतात तो असाः—किड्यांना पंख फुटण्यापूर्वी हे फक्त उड्या मारूनच इकडून तिकडे जात असतात. अशा वेळीं व विशेषतः मोहोर येण्याच्या सुमारास फिशआईल रोझीनसोप ( राळमिश्रित माशाच्या तेलाचा साबण ) हा १॥:१०० या प्रमाणांत पाण्यांत मिसळून तें मिश्रण झाडांवर पिचकारीनें मारावें. पंधरा फूट रबरी नळी पंपाला लावून २० फूट उंचीच्या झाडावर हें औषध सहज मारता येतें. दोन माणसें एका दिवसांत ( आठ तासांत ) १६ ते २० झाडांवर हें औषध सहज मारतात. १०–१५ वर्षांच्या झाडाला सुमारें अदपाव ( १० तोळे ) औषध एका शिंपडणीला पुरें होतें. किडे पुष्कळ दिवसपर्यंत अंडी घालीत असल्यामुळें एका शिंपडणीनें काम भागत नाहीं, म्हणून आठ दिवसांच्या अंतरानें सहा वेळांसुद्धां औषध मारावें लागतें. दर झाडाला सहा शिंपडण्यांना १–२–० साबणाचा व ०–६–० मजूरीचा खर्च येतो. एकेका कलमी झाडाचें उत्पन्न निदान पांच रुपये धरलें तर त्यांतील हा दीड रुपयाचा खर्च वजा जाऊन साडेतीन रुपयांचें उत्पन्न तरी वांचवितां येतें असें कोंकण प्रांतांतील प्रयोगांवरून दिसून येतें.

फुलांची रचना कांहीं जातींमध्यें भिन्न प्रकारची असल्यामुळें कांहींत मादी फुलें फार कमी असतात त्यामुळें भरपूर फळ येत नाहीं. उदाहरणार्थ, कावसजी पटेल जातीमध्यें शेंकडा ८६ ते ९६ फुलें नर असतात; पायरी व आफूसमध्यें शेंकडा ४५ ते ७५ फूलें नर असतात. यामुळें कावसजी पटेल जातीला आफूस व पायरीपेक्षां फळ कमी येतें.

खडक, दलदलीची जागा, जवळपास माडासारखीं दाट झाडें वगैरे कारणामुळेंहि फळ चांगलें येत नाहीं.

रो गः—आंब्याचा मोठा शत्रु म्हटला म्हणजे भिरूड या नांवाचा किडा होय. या किड्यामुळें आंब्यांचा जितका नाश होत आहे तेवढा दुसऱ्या कशानेंहि होत नाहीं. या किड्याची मादी बरसातीच्या सुमारास एकेक अंडें झाडाच्या सालींत घालते. अंड्यांतून किडा बाहेर पडल्यावर तो आंतलें लांकूड खात जातो. याचा जबडा फार दांडगा असल्यामुळें त्याला कठिण व जून लांकूड पोखरून खाण्याला मुळींच प्रयास पडत नाहींत. हा किडा ज्या ठिकाणीं लांकूड पोखरीत असतो त्या ठिकाणची बाहेरची साल ताजी खाल्लेली अगर कुरतडलेली दिसते, व खालीं लांकडाचा कीस पडलेला असतो. यामुळें तो कोठें आहे हें शोधून काढण्यास फारसें कठिण पडत नाहीं. याची पूर्ण वाढ झाल्यावर तो बाहेरचें तोंड बंद करून बरेच दिवस आंतमध्यें विश्रांति घेतो. नंतर त्याच्यापासून पंखाचा भिरूड तयार होतो. ह्या किड्यापुढें केवढेंहि मोठें झाड असलें तरी तें सर्व बाजूनें पोखरल्यामुळें जायबंदी होऊन अखेर तें मरतें. हा किडा सार्वत्रिक असून फार भयंकर आहे.

उ पा यः–झाडाला भिरूड लागला आहे असा संशय आल्यास सर्व झाड तपासून पहावें. विशेषतः हें काम जुलै तें सप्टेंबर महिन्यांत करावें. कारण हाच हंगाम सालींमधून लांकडांत जाण्याचा होय. ज्या ठिकाणीं साल ताजी खाल्लेली दिसेल किंवा काठीनें ठोकली असतां डबडब वाजेल त्या ठिकाणीं शोधून पाहिल्यास किडा सांपडेल, तो काढून मारून टाकावा. केव्हां केव्हां किड्यांचीं भोंकें सांपतात पण किडा सांपडत नाहीं. अशा ठिकाणीं जाईल तितकी बारीक सळई घालून किडा निघाल्यास काढावा, नाहीं तर सळईला कापसाचा बोळा बांधून तो क्लोरोफार्म व क्रिओसोट ह्यांमध्यें बुडवून तो भोंकांत ठेवून द्यावा व बाहेरचें भोंक चिखलानें पक्कें बंद करावें. याच्या वासानें किडा गुदमरून मरेल. हीं औषधें न मिळाल्यास पेट्रोल वापरावें; परंतु यानें जसें चांगलें काम व्हावयास पाहिजे तसें होत नाहीं. किडा काढल्यावर त्यानें केलेले सर्व बोगदे, भोंकें वगैरे साफ करावीं. बाहेरची साल पोखरली असल्यास व तिच्या आंत घाण असल्यास ती सर्व काढून टाकावी आणि सर्व ठिकाणीं डांबर लावून टाकावें. घाण काढते वेळीं कांहीं तरी हत्यार वापरावें; कारण त्यामध्यें कदाचित् विंचू वगैरे असल्यास तो नांगी मारण्याची भीति असते. झाडांमध्यें एकच किडा सांपडतो असें नाहीं; केव्हां केव्हां एका झाडांत चार पांच किडे सुद्धां सांपडतात. आंब्याच्या फळांमध्यें कधीं कधीं आळ्या पडतात. याचें कारण असें आहे कीं, मादी माशी पाडास लागलेल्या फळांच्या सालीला भोंक पाडून त्यांत अंडीं घालते. अंडीं थोड्याच दिवसांत फुटून आळ्या बाहेर पडून त्या आंतला गर खातात. त्यांची पूर्ण वाढ झालीं म्हणजे त्या बाहेर येऊन जमिनींत कोश घालतात. सात आठ दिवसांनीं त्यांतून माशी बाहेर पडते. व पुन्हां दुसऱ्या फळांत अंडीं घालते. यास उपाय झाडांखालीं जेवढे आंबे पडलेले असतील तेवढे सर्व वेंचून नदींत फेंकून द्यावें, अगर खोल खड्ड्यांत पुरून टाकावे.

आंब्यांवर बांडगुळें फार होतात तीं वर्षास कापून काढलीं पाहिजेत.

ढो ल्याः–खांदी मोडल्यामुळें अगर वेडीवांकडी तोडल्यामुळें मागें राहिलेल्या फांदीचा बुडखा वाळून व कुजून जातो. ही कुजण्याची क्रिया पुढें खोडामध्येंहि तशीच चालू

रहाते. यामुळें खोड पोकळ होऊन तें वाऱ्यानें केव्हां मोडेल याचा नेम नसतो. यासाठीं अशा झाडांच्या मोडलेल्या फांदीचा बुडखा पहिल्यानें अंगाबरोबर कापून टाकावा आंतील बाजू चांगली शाबूत असल्यास तीवर डांबर लावून टाकावें पण ती कुजली असल्यास जेवढा कुजलेला भाग असेल तेवढा सर्व नीट उकरून काढावा. नंतर एक भाग मोरचूद शंभर भाग पाण्यांत मिसळून त्या पाण्याचा एक हात ढोलीच्या आंतून सर्व बाजूनें द्यावा व लगेच एक डांबराचा हात द्यावा. म्हणजे रोगाचें सर्व बीज मरून जाईल. नंतर नदींतील बारीक वाळू स्वच्छ धुवून घेऊन तींत थोडें सिमीट मिळवून (प्रमाण ३ : १) त्यांत थोडें पाणी घालावें व त्या मिश्रणानें सर्व ढोली भरून काढावी. ढोली मोठी असल्यास मध्यें विटा वगैरे घातल्या तरी हरकत नाहीं. ढोली भरत आली म्हणजे वरचा थर नुसत्या मिश्रण केलेल्या सिमिटाचा व अगदीं वरचा दर्शनी थर फक्त सिमिटाचा द्यावा. वरचा दर्शनी थर कोंवळें लांकूड झांकून जाईल पण अंतर सालीचा वाढणारा भाग मुळींच झांकून जाणार नाहीं अशा बेतानें भरावा. तसेंच सिमिटाच्या भोंवतालची सर्व साल जिवंत असावी; नसेल तर वाळलेली साल कापून काढून जिवंत भाग सिमिटाबरोबर येईल असें करावें, व तोंडाशीं सालीला डांबर लावावें. सिमिटावर ओलें तरट थोडे दिवस बांधून ठेवलें असतां त्याला भेगा पडणार नाहींत. अशा रीतीनें झाडांची काळजी घेतल्यास त्या ठिकाणीं झाड मोडण्याचा मुळींच संभव नसतो व झाडाचें आयुष्यहि वाढतें.

[संदर्भग्रंथ—प्रो. ह. पु. परांजपे ( 'फळझाडांचा बाग' ) व वा. रा. गाडगीळ ( 'आम्रसंवर्धन' ) यांनीं आपापल्या पुस्तकांच्या शेवटीं आंब्यावरचें उपलब्ध व महत्त्वाचें वाङ्मय जोडलें आहे. रा. परांजपे यांनीं शेतकी व शेतकरी मासिकांतील बरेंचसें आधाराला घेतलें आहे. गाडगीळ यांच्या आम्रसंबंधीं आंग्ल वाङ्मय प्रदीपिकें'तील वूड्रो–मँगो इटस कल्चर अँड व्हराईटीज; आणि प्रबोधचंद्रदे—ए ट्रीटाईज ऑन मँगो हे दोन ग्रंथ महत्त्वाचे आहेत. ]

**आबाजी कृष्ण शेलूकर** –पेशवाईतील एक सरदार. सातारा जिल्ह्यांत कोरेगांव तालुक्यांत फत्यापूर म्हणून एक गांव आहे तेथचा हा कुलकर्णी. हा घरचा फार दरिद्री होता परंतु मोठा हुशार कारकून होता. वतनदारांच्या सवयीप्रमाणें हाल सोशीत हा तसाच पुष्कळ दिवस घरीं होता; परंतु शेवटीं कटाळून ह्यानें घर सोडलें आणि पुण्यास गेला. तेथें पुष्कळ खटपटी करून ह्यानें फडांत कारकुनीची जागा मिळविली. ह्याचें अक्षर फार उत्तम होतें व लिहिण्याची शैली इतकी उत्कृष्ट होती कीं, जेव्हां जेव्हां हा आपलें लिखाण घेऊन नाना फडणिसासमोर जाई तेव्हां तेव्हां तें पाहून नाना फार संतुष्ट होत. पुढें नानांनीं आपल्या खाजगी कारकून मंडळींत त्याची नेमणूक केली. तेव्हां तर नानांची त्यावर फारच मर्जी बसली. पुढें खुद्द नानांनीं आपला कागदपत्रांचा रुमालहि नानांनीं त्याच्या ताब्यांत ठेविला. नानांची जीं अति विश्वासू माणसें होतीं त्यांत आबा शेलूकर (शालूकर)व गोविंदराव पिंगळे हे मुख्य होते. नानाच्या कृपेनें पुढें ह्याला गुजराथची सुभेदारी मिळाली होती.

बाजीरावास पेशवाईचीं वस्त्रें आणण्यास आबा शेलूकर साताऱ्यास गेले होते. त्यास या कामीं ३४८१ रुपये खर्च लागला ( दु. बाजीराव—रोजनिशी पा. १९ ). दुसरा बाजीराव गादीवर आल्यानंतर त्यानें आपल्या दहा वर्षांच्या भावाला ( चिमाजीआप्पाला ) गुजराथचा सुभेदार करून आबा शेलूकरास दुय्यम सुभेदार नेमिलें. पण नाना फडणिसाला शिंद्यानें कैदेंत टाकिलें तेव्हां आबाचीहि तीच वाट केली. दहा लाख रुपये देण्याच्या कबुलीवर त्याची सुटका झाली तेव्हां तो सुभेदारीच्या कामावर रुजू झाला. शेलूकर नानांच्या पक्षाचा असल्यानें बाजीरावानें गोविंदराव गायकवाडाला त्याच्या विरुद्ध उठाविलें. शिंद्याची १० लाख खंडणी आबाला निकडीनें द्यावयाची होती तेव्हां त्यानें गुजराथेंत मोठा जुलूम करून जादा वसूल केला व कांहीं गायकवाडी गांवांपासूनहि कर जमा केला. तेव्हां गोविंदराव व आबा शेलूकर यांमध्यें लढा सुरू झाला. गायकवाडानें इंग्रजांना वश करून घेऊन आबा शेलूकराला कैद केला व अमदाबाद तालुक्यांतील पेशव्यांचीं ठाणीं आपल्या ताब्यांत घेतलीं. तेव्हां पुणें दरबारनें तडजोड करून आबा शेलूकरास हुजूरकडे धाडून देण्यास गायकवाडास लिहिलें ( दु. बाजीराव—रोजनिशी पा. ७८ ). शेलूकर कधीं वारला हें कळत नाहीं; पण इ. स. १८१३–१४ त तो हयात होता; कारण त्या सालीं त्याला इतर सरदारांबरोबर निशाणास किनखाप दिल्याचा उल्लेख रोजनिशींत सांपडतो (दु. बाजीराव रो. पा. २७७). पुण्यास शालूकराचा बोळ प्रसिद्ध आहे. [ भारतवर्ष पु. २, अं. ५ दु. बाजीराव रोजनिशी. ग्रँटडफ. मुं. गॅ. पु. १, भा. १ ऐ. ले. सं. ]

**आबाजी विश्वनाथ प्रभू**–आबाजीचा जन्म स. १८३१ त झाला. बाजी पासलकराबरोबर नेहमीं राहून तो राज्याचें काम करीत असे. त्याची हुशारी पाहून शिवाजीनें त्यास स. १६४९ त आपल्या सरदारांत दाखल केलें, तेव्हांपासून किल्ले वगैरे काबीज करण्यांत व शिवाजीच्या इतर मोहिमांत आबाजी प्रभू नेहमीं हजर असे. जावळी काबीज करितांना मोरे बंधूंचे खून झाल्यावर त्यांची फौज शिवाजीच्या फौजेवर चालून आली, तेव्हां शिवाजीचा मोड होतो, असें दिसूं लागतांच, आबाजी पुढें झाला आणि सगळ्या मावळे लोकांस परत फिरवून आवेशानें त्यानें मोरे यांच्या फौजेशीं लढाई केली आणि जय मिळविला तेव्हां जावळी हस्तगत झाली. पुढें वासोटा किल्ला काबीज करण्यांतहि आबाजीनें बहुत पराक्रम केला. रोहिडा किल्ला घेण्याचा शिवाजीचा विचार झाला, तेव्हां आबाजीनें फकीराच्या वेषानें गुप्तपणें

किल्ल्यावर जाऊन तेथील सर्व माहिती आणली. हिरडस मावळचा बांदल देशमूख व जावळीचा बाजी प्रभु हे दोघे किल्ल्यावर बंदोबस्तास होते. एके दिवशीं रात्रीं शिवाजी आपली मावळी फौज बरोबर घेऊन तटास शिडी लावून वर चढला. प्रथम शिवाजी वर चढला, त्यानंतर आवाजी प्रभु व मग इतर लोक वर चढले. तेव्हां किल्ल्यांतील लोक जागे होऊन हातघाईची लढाई झाली. एकमेकांस ओळखतां यावें म्हणून आबाजीनें एक गवताची गंजी पेटवून दिली. तो स्वतः मोठ्या शौर्यानें लढला. पुष्कळ जखमा लागल्या तरी त्यानें माघार घेतली नाहीं. बांदल देशमुख घायाळ होऊन पडला, तरी पुढें बाजी प्रभु लढूं लागला. तेव्हां आवाजीनें त्यास ' असें एकमेकांनीं आपसांत लढून निरर्थक मरून जाणें योग्य नाहीं; ' असें सांगून शिवाजीच्या पक्षास वळविलें. लगेच शिवाजीनें बाजी प्रभूस नोकरींत घेऊन सरदारी दिली.

आवाजी प्रभूनें शिवाजीची नोकरी एकनिष्ठपणें बजाविली. शिवाजी वारल्यानंतर संभाजीनें पुष्कळ सरदारांचीं वतनें खालसा केलीं, तेव्हां हे मावळे सरदार फार हवालदील झाले. त्या प्रसंगीं आवाजी प्रभूनें लोकांस दीलादिलासा देऊन औरंगजेबाच्या फौजेपुढें प्रांताचें संरक्षण केलें. संभाजीचा हृदयद्रावक शेवट ऐकून आवाजीस अतिशय त्वेष आला, आणि सेनापति खंडेराव गोमाजी पानसंबळ याच्या हाताखालीं राहून, आणि ' शिवाजीमहाराजाचा लोभ व राजाराम महाराजांची आज्ञा, तसेंच स्वराज्याचा अभिमान हीं चित्तात आणून, जिवाची पर्वा न बाळगता, मोंगल फौजेशीं लढण्याचा त्यानें क्रम चालविला. या त्याच्या पराक्रमाबद्दल राजारामानें सेनापतीच्या सांगण्यावरून त्यास नवीन इनामें करून दिलीं. रामचंद्रपंतानें मोंगलांच्या हातांतून दाभोळप्रांत परत मिळविण्याकरितां शंकराजी नारायण गांडेकर यास व आबाजी विश्वनाथास पाठविलें. आबाजीचा पराक्रम पाहून शंकराजीनें संतोष प्रगट केला. औरंगजेबाच्या फौजेनें सन १६९४ त तोरणा उर्फ प्रचंडगड किल्ल्यास वेढा घातला असतां आबाजीनें त्या किल्ल्याचें संरक्षण मोठ्या मर्दुमकीनें केलें. मोंगलांशीं लढून किल्ल्यांतून निघून जात असतां सन १६९४ त हा शूर वीर धारातीर्थी पतन पावला. आबाजीचा मुलगा जनाजी याजकडे त्यांचें वतन चालू होतें. [ मराठी रियासत, प्रथमार्ध पृ. २६१- २६२ ]

**आबाजी सोनदेव**— दादाजी कोंडदेवाप्रमाणें शहाजीच्या पदरीं असलेल्या सोनोपंत डबीराचा हा मुलगा. हा दादोजी कोंडदेवाच्या तालमींत तयार झालेला होता. याचा भाऊ निळो सोनदेव याला १६४७ त शिवाजीनें अमात्य केलें. इ. स. १६४८ त आबाजीनें कल्याणवर अचानक हल्ला करून तेथील मुल्ला अहमद नांवाच्या सुभेदारास कैद केलें, व कल्याण आणि कल्याणच्या आसपासचे सर्व किल्ले हस्तत करून घेतले. तेव्हां शिवाजीनें खुष होऊन याची फार प्रशंसा केली व त्यास त्यानें जिंकलेल्या मुलुखाचा सुभेनेमिलें. मुल्ला अहमदास पकडल्यावेळीं आबाजीनें त्याची सुंदर सूनहि हस्तगत केली होती. पण शिवाजीनें तिला सन्मानपूर्वक परत पाठविलें.

रायरी ( रायगड )ला राजधानीचें स्वरूप आणण्याकरितां सरकारी कामकाजासाठीं अवश्य त्या इमारती वगैरे बांधण्याचें काम इ. स. १६६२ त याच्याच देखरेखीखालीं सुरू होऊन १६६४ मध्यें तें संपविण्यांत आलें.

इ. स. १६६६ त ज्या तीन गृहस्थाकडे राज्याचा कुल अखत्यार देऊन शिवाजी अवरंगजेबाच्या दरबारीं दिल्लीस गेला त्यांत आबाजी सोनदेव होता. १६७० त मोरोपंत पिंगळे याजबरोबर आबाजी माहुली किल्ला व कल्याण प्रांत सर करून आला. राजारामानें १६९२ मध्यें आबाजीस रायगड घेण्यास पाठविल्याचा उल्लेख रा. खं. त सांपडतो ( ८. ४३. )

आबाजीस माधवराव व मेघःश्यामराव हे दोन मुलगे होते. माधवरावाचा वंश भोरास व मेघःश्यामरावाचा कोल्हापुरास आहे. आबाजीच्या वंशजाकडे हल्लीं मोठी जहागीर नाहीं. पुष्कळशी इनामी वावडेकराकडे गेली आहे. [डफचा मराठ्यांचा इतिहास. मराठी रिसायत. किंकेड–पारसनिसकृत मराठ्यांचा इतिहास. केळूसकर–छत्रपति शिवाजी महाराज. सभासद विरचित शिव–छत्रपतींचें चरित्र, राजवाडे खंड ८ वा. वावडेकर घराण्याचा इतिहास. महाराष्ट्र–मंडळाची बखर ]

**आंबेगांव** ( १ ) ( जिल्हा पुणें ):—खेडच्या वायव्येस सुमारें २० मैलांवर घोडनदीच्या वामतीरावर हें एक लहानसें खेडें आहे. लोकसंख्या ( स. १८८१ ) ८७७. याच्या पश्चिमेस एक मैलावर घोडनदीचें पात्र अरुंद होऊन ती खडकांतून वाहात आहे. आठवड्याचा बाजार दर बुधवारीं भरतो.

इ. स. १६७३ मध्यें फ्रायर नांवाचा इंग्रज प्रवासी जुन्नरला जात असतांना त्यास वाटेत आंबेगांव लागलें. त्यावेळीं नुकतीच मोंगलांची एक घोडेस्वाराची तुकडी येऊन गेली असल्यामुळें त्यास एका मुसुलमान फकीराशिवाय गांवांत कोणी आढळलें नाहीं. सर्व लोक पळून गेले होते ( मुं. गॅ. पु. १८, भा. ३. १८८५ )

( २ ) ( जिल्हा पुणें. )—खडकाच्या नैर्ऋत्येस १२ मैलावर हें जुन्या पनवेल–पुणें रस्त्यावर एक लहान गांव आहे. लोकसंख्या [ स. १८८१ ] ६५३ पावसाळ्या खेरीज येथें दर बुधवारीं आठवड्याचा बाजार भरतो. पूर्वी हा गांव महालाचें मुख्य ठिकाण होतें. [ मुं. गॅ. पु. १८. भा. ३. १८८५ ]

( ३ ) [ नाशिक जिल्हा. ]:—हें गांव दिंडोरीच्या पश्चिमेस १३ मैलांवर आहे. लोकसंख्या [ १८८१ ] ५८२. येथें एक महादेवाचें हेमाडपंती देवालय असून त्यावर फार उत्तम नक्षीकाम केलेलें आहे [ मुं. गॅ.पु. १६.१८८३ ].

**आब्बादीद.**—पश्चिमेकडील खलीफत ऱ्हास पावल्यावर स्पेनमध्यें आब्बादीद हें मुसुलमानी घराणें इ. स. १०२३ त उदयास आलें. या घराण्याचा मूळ पुरुष अबदुल कासीम महंमद हा होय. हा अरब जातीचा होता. यानें बर्बर लोकांशीं झगडून आपल्या सत्तेचा पाया घातला. १०४२ मध्यें हा मरण पावला. याचा मुलगा आब्बाद हा कवि व रंगेल म्हणून प्रसिद्ध होता. त्याच्या कारकीर्दींत सभोंवतालच्या लोकांशीं व बर्बर राजाशीं एकसारखें युद्ध चालू होतें. त्यामुळें मुसुलमानी बल कमी झालें व ख्रिश्चन राष्ट्रें बळावलीं. हा इ. स. १०६९ त मरण पावला. याच्यामागून याचा मुलगा महंमद अबदुल कासीम हा गादीवर आला. हा बापासारखाच ऐदी व दुर्व्यसनी होता. दोघेहि कवी व कवींनां आश्रय देणारे होते. कासीमच्या वेळीं कॅस्टाईलचा ख्रिस्ती राजा मोठा बलिष्ठ होऊन त्यानें कासीमला खंडणी देण्यास लाविलें. पण पुन्हां वितुष्ट येऊन युद्ध सुरू झालें. पुष्कळ हिकमती लढविल्यानंतर कासीमला शरण जावें लागलें. त्याची प्रजाहि त्याच्या अधर्माचरणामुळें त्याचें बरें चिंतीत नव्हती. १०९१ मध्यें त्याची राजधानी सेव्हिले अल्मोरॅव्हाइटनीं जिंकून घेतली. अबदुल कासीम १०९५ मध्यें तुरुंगांत मरण पावला, व आब्बादीद घराणें नष्ट झालें. (एब्रि पु. १.)

**आब्बास.**—अबदुल मुतालिबचा पुत्र व महंमद पैगंबरचा चुलता. प्रथम हा आपल्या पुतण्याच्या महत्त्वाकांक्षी विचारांविरुद्ध होता, पण बदरच्या लढाईंत पराभव पावल्यावर त्यानें महंमदाचा धर्म स्वीकारला व मुसलमान बनल्यामुळें त्याचा जो उत्कर्ष झाला त्याबद्दल त्यानें ईश्वराचे फार फार आभार मानिले. हुनैनच्या लढाईंत यानें महंमदाला अतिशय मदत केली व त्याचा जीव वांचविला. आब्बास २१ फेब्रुवारी ६५३ त वारला. यापुढें १०० चांद्रवर्षांनीं (इ. स. ७५० त) अबुल आब्बास नांवाच्या याच्या एका वंशजानें बगदाद येथें आब्बासी खलिपाचें राज्य स्थापिलें. तें ५२४ चांद्रवर्षें हयात होतें. या घराण्यांत अल्मसूद (स. ७५४–७७५) हारून–अल–रशीद (स. ७८६–८०९) मामून (८१३–८३३) वगैरे थोर राजे होऊन गेले. (ज्ञानकोश–बुद्धोत्तर जग आब्बासी घराणें पा. ३५३ पहा.) आब्बासचें थडगें मदिना येथें आहे.

**आब्बास**(१) प हि ला, (१५५७-१६२९)—इराणचा शहा. हा १५८६ सालीं इराणच्या गादीवर बसला. ह्याचें बहुतेक सर्व आयुष्य तार्तर व तुर्क लोकांशीं लढण्यांत गेलें. यानें प्रथमच इस्पाहान ही इराणची राजधानी केली. यानें इंग्रजांच्या मदतीनें १६२२ त ओर्मझ बेट पोर्तुगीजांपासून जिंकून घेतलें. बंदर–आब्बासी हें शहर त्याचें स्मारक होय. मरणसमयीं याच्या राज्याचा विस्तार तैग्रिस नदीपासून तों सिंधुनदापर्यंत होता. यानें मोठ्या भव्य इमारती बांधल्या व व्यापार व राज्यकारभारांत पुष्कळ सुधारणा केल्या. हा पक्का शियापंथी होता. ख्रिस्ती लोकांनां हा आदरानें वागवी "दि ग्रेट" हें उपपद याच्या नांवापुढें योजण्यांत येतें.

**आब्बास** प हि ला (१८१३–१८५४)—इजिप्तचा एक पाशा. हा चालू राजघराण्याचा संस्थापक जो महंमद अली त्याचा नातु होय. हा इ. स. १८४८ त इजिप्तच्या तक्तावर बसला. आपल्या आजानें ज्या कांहीं बऱ्यावाईट सुधारणा सुरू केल्या. त्या आब्बासनें शक्य तितक्या बंद केल्या. उदाहरणार्थ, व्यापारी मक्ते रद्द केले, कारखाने व शाळा बंद केल्या व सैन्य कमी केलें. हा स्वभावानें चिडखोर व अति मितभाषी होता. याची भेट दुसऱ्याना विशेषतः परकी व्यापाऱ्यांना होत नसे. यानें केरोपासून अलेक्झांड्रियापर्यंत आगगाडी सुरू करण्याला मोठ्या मिनतवारीनें परवानगी दिली. १८५४ सालीं याच्या गुलामांनीं याचा खून केला.

**अब्बास** दु स रा (१८७४—) इजिप्तचा एक खेदीव हा महंमद अलीच्या पणतवाचा मुलगा. १८९२ मध्यें इजिप्तच्या तक्तावर हा बसला. यानें यूरोपांत प्रवास केला. याला फ्रेंच इंग्रजी, जर्मन या भाषाचें बरेंच ज्ञान होतें. याचें धोरण प्रथम पहिल्या आब्बास प्रमाणें सुधारणेच्या विरुद्ध होतें. पण नंतर यानें ब्रिटिश सरकारच्या सल्ल्यानें न्याय, शेतकी, कर, या बाबींत पुष्कळ सुधारणा केल्या. तथापि ब्रिटिश सरकारला हा अराजक म्हणून भीती वाटत होती. १९१४ सालीं जेव्हां इजिप्त ब्रिटनच्या आधिपत्याखालीं आलें तेव्हां आब्बासला पदच्युत करण्यात येऊन, महंमद अलीच्या दुसऱ्या एका वंशजाला इजिप्तचा सुलतान बनविलें.

**आवास अली**—झोरोआस्टर (झरथुष्ट्र)च्या धर्माप्रमाणें वागणारा हा एक इराणी मग असून, वैद्यहि होता. बगदादच्या खलिपाच्या विनंतीवरून इ. स. ९८० मध्यें त्यानें "राजग्रंथ" या अर्थाचें नाव असलेलें एक पुस्तक लिहिलें; व तें खलिपाला अर्पण केलें. अँटिऑकच्या स्टीफननें ११२७ त लॅटिनमध्यें याचें भाषांतर केलें. (बील–ओ. बायो. डिक्शनरी.)

**आब्बास बिन–अली शिखानी.**—इ. स. १५३९ त हुमायुनास पदच्युत करून दिल्लीच्या तक्तावर वसलेला जो शेरशहा अफगाण, त्याचें चरित्र ज्यांत गोंविलें असा एक इतिहास आब्बासनें लिहून तो अकबर बादशहास अर्पण केला. या ग्रंथाचें नांव तुहफ–इ–अकबर–शाही असें होतें. याच्या पहिल्या भागाचें उर्दूत भाषांतर मझहर अलीखाननें लॉर्ड कॉर्नवालीसच्या कारकीर्दींत केलें व त्याला तारीख–इ–शेरशाही" असें नांव दिलें. (बीलचा कोश).

**आब्बास मिर्झा**—(सुमारें १७८३–१८३३).—इराणाचा एक राजपुत्र. याची आई राजघराण्यांतील असल्यामुळें हा आपल्या बापाच्या म्हणजे शहा फेथ अलीच्या मागून इराणच्या गादीवर बसणार म्हणून ठरलें होतें. यानें आपल्याकडे शहानें दिलेल्या एका सुभ्याची व सैन्याची व्यवस्था यूरोपीयन धर्तीवर ठेविली होती. याची मदत

लियनच्या वेळीं इग्लंड व फ्रान्स या दोघानाहि आशियांत एकमेकांच्या सत्तेस आळा घालण्याकरतां पाहिजे होती. यानें नेपोलियनचा पक्ष घेतला; पण त्याकडून त्यास फारशी मदत मिळाली नाहीं, त्यामुळें राशियाबरोबर जें यानें युद्ध केलें त्यांत त्याचा पराभव झाला. खोरासान प्रांताचा बंदोवस्त करीत असातां याला मृत्यु आला(१८३३). याची रहाणी साधी होती. याला वाङ्मयाची आवड असे. याचा वडील मुलगा फतेअल्लीच्या मागून इराणाच्या गादीवर बसला ( १८३४ ). [ ए. ब्रि. पु. १ ]

**आब्बासीद.**—मुसुलमानी साम्राज्यांतील दोन मोठ्या घराण्यांपैकीं दुसऱ्या म्हणजे बगदादच्या घराण्यांतील खलीफांनां सामान्यतः हें नांव दिलें जातें. आपण पैगंबराचा वडील चुलता आब्बास ( इ. स. ५६६–६५२ ) याचे वंशज असल्यानें महंमदाच्या गादीवर उमईद वंशापेक्षा आपला हक्क जास्त आहे असें अब्बासी खलीफा मानीत. उमईद घराण्याच्या दुसऱ्या अमदानींत आब्बासी घराण्यांतील पुरुषांनीं त्यावेळच्या राज्यकर्त्यांचा लोकांत पाणउतारा करून त्यांची पत नाहींशी व्हावी म्हणून बरीच खटपट केली. दुसऱ्या मर्वानच्या कारकीर्दींत या दोन घराण्यांतील वितुष्ट अगदीं विकोपास जाऊन त्याचा शेवट आब्बासच्या चवथ्या पिढींतील पुरुष इब्राहिम इमाम याच्या बंडांत झाला. खोरासान प्रांतानें इब्राहिमला मदत दिली, पण त्याचा पराभव होऊन तो बंदिवासांत मरण पावला. याचा भाऊ अबुल–आब्बास यानें हा झगडा कायम ठेवून शेवटीं उमईद घराण्याचा पाडाव केला ( इ. स. ७५० ) व आपण खलीफ झाला.

या नवीन घराण्याच्या अमदानींत चैन व कलाकौशल्य बरेंच वाढून त्याबरोबर देशांत अशांतताहि वाढली. दुसरा खलीफ मनसूर यानें आपली राजधानी बगदादला नेली व आशीया मायनर पादाक्रान्त केला. हरून अलरशिद (७८६–८०९ ) आणि मामुन ( ८१३–८३३ ) यांची अमदानी पराकाष्ठेची उत्कर्षाची म्हणतां येईल; पण एकंदर साम्राज्य खालावलेलें दिसत होतें. आफ्रिका आणि खोरासान येथें स्वतंत्र राज्यें स्थापन झालीं. आणि वायव्येकडे ग्रीक लोक सरसावले होते. आब्बासी घराण्याचा शेवट मोकतासीम यानें ( ८३३–८४२ ) स्वसंरक्षणार्थ पदरीं ठेवलेल्या तुर्की गुलामांकडून झाला. त्या गुलामांची सत्ता एकसारखी वाढत चालली होती; शेवटीं ती इतकी बलिष्ठ झाली कीं, आब्बासी खलीफ केवळ बाहुली बनवून या तुर्कांच्या हस्तें राज्यकारभार चालवीत होते. या घराण्यांतील शेवटचा खलीफा मोटावकील ( तिसरा ) ह्याला पहिल्या सलीमनें कैद करून कान्स्टांटिनोपलला नेलें तेव्हां हें घराणें बुडालें.शिवाय "खलीफत व इस्लामचा प्रसार" हें बुद्धोत्तर जग ( ज्ञानकोश विभाग ४ था ) यांतील प्रकरण पहा.

**आभीर.**—या देशाचा उल्लेख महाभारतामध्यें ( सभापर्व अ. ३२ ) व बृहत्संहितेमध्यें दाक्षिणेंतील एक देश म्हणून आला आहे. ( १८ १४), मत्स्यपुराणामध्यें आंध्र राजांनंतर सात आभीर राजे होऊन गेले असा उल्लेख आहे. वायुपुराणामध्यें आभीर राजांची संख्या दहा दिली आहे. परंतु या दोनहि पुराणांत त्यांचीं नांवें दिलीं नाहींत. विष्णुपुराणांत सात आभीर राजे होऊन गेले असें म्हटलें आहे. ( ४. २४ ). त्याच पुराणांत आभीर हा देश अपरांत सौराष्ट्र या देशाबरोबर पश्चिमेकडील देशांत दाखविला आहे. ( २. ३, १६ ) या ठिकाणीं शूराभीराः असें जें मूळ पद आहे त्याचा अर्थ विल्सननें चुकीनें शूर व भीर अशी दोन स्वतंत्र राष्ट्रें असा केला आहे. वायुपुराणांत यांनीं ६७ वर्षें राज्य केलें असें म्हटलें आहे. भागवत पुराणामध्यें शूर व आभीर यांचा उल्लेख आहे ( सौराष्ट्रावन्त्याभीराश्च शूरा अर्बुदमालवाः १२. १,३६ ) भागवतांत ७ आवभृत्य राजे होऊन गेले असें म्हटलें आहे तें बहुतकरून आभीरांबद्दलच असावें, टीकाकार 'हे अवभृति नगरचे राजे होते म्हणून त्यांस आवभृत्य असें म्हटलें आहे' असें स्पष्टीकरण देतो (विल्सन–विष्णुपुराण पु. ४ पृ. २०५ टीप १८६८ ). महाभारतामध्यें शल्य पर्वांत शूद्र आणि आभीर यांचा सामासिक उल्लेख केला आहे ( शल्य २११९ ). हरिवंशामध्यें (कलकत्ता प्रतींत) मद्राभीराः असा उल्लेख आढळतो ( हरि. १२, ८३७ ).

आभीरांच्या स्वाऱ्या आंध्रानंतरच्या काळांत वायव्येकडून झाल्या. व गुप्त काळांत ते पूर्व राजपुताना व माळवा या भागांत वस्ती करून होते. आंध्र राजा माढरीपुत्र सिरिसेन किंवा शकसेन ( इ. स. १८० ) याच्या नावाशिवाय इतर यासंबंधीं अथवा यानंतरच्या आंध्र राजांचा उल्लेख नाशीक :लेण्यांत आढळत नाहीं. यावरून यज्ञश्री ( इ. १५० ) याच्या मागून कोंकण, दक्षिण व गुजराथ या भागांत आंध्र सत्तेचा ऱ्हास झाला असावा असें दिसतें. आंध्रांच्या मागून ही सत्ता आभीरांच्या हातीं गेली असावी असें दिसतें.बर्ड गुजराथच्या इतिहासांत (पृ.८ लंडन.१८३५) आभीरांचा प्रदेश तापीपासून देवगड पर्यंत पसरला होता व त्याचे बर्बर अथवा मराठा (तापीपासून वसई पर्यंत), विराट(वसईपासून बाणकोट पर्यंत) व किरात (बाणकोटपासून देवगडपर्यंत)असे विभाग होते असें म्हणतो डॉ.भांडारकरांनीं विराट, किरात आणि कोंकण हे विभाग सामान्यतः प्रभु, ब्राह्मण, व शेणवी यांच्या प्रदेशांशीं जुळतात असें म्हटलें आहे ( कोंकणचा इतिहास प्रस्तावना पृ. १० मुं. गॅ. पु. १ भा. २ ) । । टॉलेमीनें सिंधच्या उत्तर भागांत अबिरिया नांवाच्या प्रदेशाचा उल्लेख केला आहे. पेरिह्लस मध्येंहि या राष्ट्राचा थर आणि पारकर या सुमारास निर्देश केला आहे. ( मॅकक्रिन्डल ११३ ). यावरून दक्षिणेंत येण्यापूर्वी उत्तर–सिंध हें आभीरांचें निवासस्थान होतें व तेथून ते

सिंधमधून खालीं उतरून पुढें जलमार्गानें कोंकणांत व नंतर नाशीककडे आले असावे. नाशीक लेणें १० लेख १५ यांतील आभीर राजा दमरी व शिवदत्त आभीर यांचा पुत्र ईश्वरसेन (याचें नांव डॉ. भांडारकर जे. बी. बी. आर. एस. पु. ७. नं. १५ वरून वीरसेन आभीर असें देतात.)हा आंध्रांची सत्ता बळकावणाऱ्यांपैकीं एक असावा. या लेखाचीं अक्षरें रुद्रदामन्‌च्या गिरनारच्या लेखांतील ( इ. स. १५० ) अक्षरांशीं समकालीन दिसतात. आभीरांची सत्ता नाशीक व खानदेश या भागांत होती, तर अपरांत म्हणजे कोंकण क्षत्रियांच्या अमलाखालीं होतें. क्षत्रपांनीं कन्हाड भागांत जो अंमल बसविला तो बहुधा चिपळून वरून कुंभारली घाटानें येऊन बसविला असावा. आभीर हे क्षत्रपांच्या दरबारीहि नोकर असल्याचें आढळून येतें. पहिल्या रुद्रसिंह क्षत्रपाच्या कारकीर्दींत ( इ. स. १८१ ) आभीर रुद्रभूति सेनापतीचा उल्लेख आला असून रुद्रभूतीचा बापहि सेनापतीच्याच पदावर होता. पुढें ५० वर्षांनी आभीर ईश्वरदत्तानें विजयसेन क्षत्रपाचें (इ. स.२३८ –२४९) राज्य जिंकून गुजराथ, काठेवाड व दक्षिणचा कांहीं भाग आपल्या राज्यांत समाविष्ट केला असें दिसतें. ईश्वरदत्त आपल्या लेखांत स्वतःच्या कारकीर्दीचें वर्ष देत असल्यामुळें याचा काळ खात्रीपूर्वक ठरवितां येत नाहीं. तथापि ईश्वरदत्ताचीं जीं नाणीं सांपडतात त्यांची घडण वगैरे विजयसेनाच्या नाण्यांसारखी दिसते, यावरून तो विजयसेनाचा समकालीन असावा. व तो पूर्वीच्या क्षत्रपांप्रमाणें आपल्या बापाचें नांव देत नाहीं यावरून तो पूर्वीच्या क्षत्रपांहून भिन्न असावा असा तर्क करण्यांत आला आहे. नाशिक लेण्यांतील ईश्वरसेनाच्या बापाच्या नांवाप्रमाणें (शिवदत्त) याच्या नांवाच्या शेवटीं दत्त असें पद असल्यामुळें हा ईश्वसेनाप्रमाणेंच आभीर असावा व तो स्वतःस महाक्षत्रप ह्मणवून नवीन शक सूरू करतो, यावरून तो मागील क्षत्रपांचा पाडाव करून राजा झाला असला पाहिजे असें प्रतिपादण्यांत येतें. तथापि याच्याकडे सत्ता फार दिवस राहिली नाहीं. पुढें दोनच वर्षांनीं ( सुमारें इ. स. २५१ ) महाक्षत्रप दामाजडश्री यानें क्षत्रपांचा गेलेला मुलूख पुन्हां काबीज केला.

समुद्रगुप्ताच्या ( ३७०,३९५ ) अलाहाबाद येथील स्तंभावरील लेखांत त्यानें आभीर राष्ट्रास पादाक्रांत केल्याचा व खंडणी घेतल्याचा उल्लेख आहे.

सिद्धराज जयसिंह याच्या दोहद येथील एका शिलालेखांत त्यानें सुराष्ट्र व माळवा या देशाच्या राजास बंदींत टाकल्याचा उल्लेख आहे. हा सुराष्ट्राचा राजा जुनागड येथें राजधानी असलेला अहीर अथवा चूडासमा राष्ट्राचा राजा असावा. प्रबंधचिंतामणि या ग्रंथांत सिद्ध राजानें स्वतः जातीनें स्वारी करून सुराष्ट्राचा अहीर राजा नोघन किंवा नवघनी यास जिंकलें असें म्हटलें आहे. या स्वारींत त्यानें प्रथम वर्धमानपूर अथवा वढवान येथें येऊन नंतर नोघनवर स्वारी करून त्यास मारिलें.

आभीरांची चूडासमा नांवाची एक शाखा होती(चूडासमा पहा ).

आंबें येथील एका शिलालेखांत ( आर्कि. सर्व्हे. वेस्ट इंडिया पु, २. पृ. ८५. ) सिंघण याच्या एका मुद्गल गोत्री खोलेश्वर नांवाच्या शूर ब्राह्मण सेनापतीनें गुजराथवर स्वारी करून तेथील राजाचा गर्व हरण केला, मालवांची सत्ता चिरडून टाकली व आभीरांचा वंश नष्ट केला असें वर्णन आहे.

अ ही र रा जे—अर्वाचीन कोशांत गोडबोले यांनीं याबद्दल खालील माहिती दिलेली आहे व यास आधार हिंदुस्थानचा हस्तलिखित इतिहास दिला आहे.

मित्रपाळ वंशांतील शेवटचा राजा विक्रमपाळ यास अहीरनामक त्याच्या वजिरानें मारिलें व तो (अहीर) गादीवर बसला हे राजे एकंदर ८ झाले, नांवें व त्यांची कारकीर्द येणेंप्रमाणें—

| राजाचें नांव | वर्षें | राजाचें नांव | वर्षें |
|---|---|---|---|
| १ अहीर राजा | २४ | ५ मूळचंद्र | २ |
| २ विक्रम अहीर | ३३ | ६ रूपचंद्र | १४ |
| २ मुलुखचंद्र | ० महिने २ | ७ मलराणचंद्र | १२ |
| ४ विक्रमचंद्र | १२ | ८ सूरचंद्र | २६ |

येणेंप्रमाणें या वंशांतील आठ राजांनीं मिळून १२५ वर्षे राज्य केलें. विक्रमपाळास मारलें, त्या वेळेस युधिष्ठिर शक २९१८ वर्षें गत झाला होता. अहीर वंशाच्या कारकीर्दीची व युधिष्ठिर शकाची समाप्ति बरोबर होऊन पुढें विक्रम संवत सुरू झाला. ( अ. को.)

**आमगांव**—(मध्यप्रांत) रायगड संस्थानच्या सरहद्दीवरील खेडें. क्षेत्रफळ १३५३ एकर. लोकसंख्या १६७८. येथें एक शाळा व आठवड्याचा बाजार भरत असतो. बाजारांत धान्य, लाख, शेतकीचीं अवजारें व वेळूच्या टोपल्या यांचा फार खप असतो. ( छत्तिसगड फ्यु. स्टे. गॅ. )

**ऑमडरमन**—(आफ्रिका) आंग्लो–इजिप्शियन सुदानमधील, नाईलच्या पश्चिम तीरावरील एक शहर.उ.अ.१५°३८' व पू. रे. ३२°२९'. १९१७ सालीं येथें ८४,०३३ लोकसंख्या होती, प्राथमिक शिक्षणाची व औद्योगिक शिक्षणाची एक व कांहीं इतर अशा शिक्षण संस्था येथें आहेत. कांसाराच्या व पाथरवटाच्या कामासंबंधीं औद्योगिक शिक्षण शाळेंत दिलें जातें. शहराची लांबी पांच मैल व रुंदी दोन मैल आहे. येथील घरें म्हणजे बहुतेक मातीचीं धाब्याचीं आहेत. कांहीं विटांनीं बांधलेलीं घरेंहि आहेत. शहराच्या मध्यभागीं माहदीच्या थडग्याचे अवशेष असून मागच्या बाजूस त्यानें रहातें घर आहे. हस्तिदंत शहामृगाचीं पिसें, व डिंक या मुख्य व्यापारविषयक

वस्तू होत. उंटांचा व गुरांचा बाजार येथें भरतो. प्राथमिक व औद्योगिक शिक्षणाच्या सरकारी शाळा आहेत. १८८४ साली माहदीनें हें शहर आपली राजधानी बनविलें. माहदीनंतरच्या खलिफांनीं येथेंच यूरोपिअन कैदी ठेविले होते. १८९८ सालीं किचनेरच्या सैन्यानें खलीफाचा पराभव केला त्यावेळीं हें शहर नूतन सुदान सरकारच्या ताब्यांत गेलें. ( ए. ब्रि. पु. २०. )

**आमला**(१)—उमरावती जिल्हा चांदूर तालुका. घरें. २४०लोकसंख्या २४३८. शिवरात्रीस येथें मोठी जत्रा भरते. साधारण २००० लोक येतात. येथें एक विश्वेश्वराचें ( महादेव ) देवालय असून त्याची व्यवस्था पंचांमार्फत चालते. देवस्थानाकरतां निराळ्या काढून ठेवलेल्या शेतांच्यां उत्पन्नांतून याचा खर्च चालतो. ( अमरावती गॅ. १९११ ).

( २ )—हें गांव बैतुल जिल्ह्यात आहे. हें पितळी भांड्यांच्या व्यापाराचें मुख्य स्थान असून येथें हा व्यापार मोठ्या प्रमाणावर चालतो. या ठिकाणीं पुरातन थडगीं असून तीं गोंड राजांचीं आहेत असें लोक समजतात. ( म. प्रां. गॅ. १८७० )

**आमलीयार**—(मुंबई इलाखा.) महीकाठांतील एक छोटें संस्थान. वात्रककांठामध्यें माजम नदीच्या तीरीं ३३ खेडीं मिळून ही जहागीर बनली आहे. हींत लागवडीचें क्षेत्रफळ (१८८० सालीं) १७९५८ एकर व लोकसंख्या १०६६१ होती. वार्षिक उत्पन्न २९००० रुपये असे. आमलीयारचे ठाकूर चवथ्या वर्गांतील संस्थानिक आहेत. ते खातकोळी जातीचे हिंदु आहेत. अजमीरच्या चव्हाण रजपुतांचे आपण वंशज आहोंत असें ते मानतात. अवरंगजेब बादशहाच्या अमदानींत आमलीयारची जहागीर त्यांनां मिळाली असें म्हणतात. हल्लीं हे गायकवाडांनां खंडणी ( घांसदाणा ) पोंचवितात.

रा ज धा नी.—आमलीयार हा उ. अ. २३°१३' व पू. रे. ७३°५' १४७४ लोकवस्तीचा गांव अहमदाबादच्या ईशान्येस ३४ मैलांवर आहे. ( इ. स. १९०१ ) येथें एक शंकराचें देऊळ, एक मशीद व जुन्या गांवाचे अवशेष आहेत. ( मुं. गॅ. ५; इं. गॅ. ५ )

**आमातिसार**—ज्यामध्यें मलमार्गाचा अधोभाग दूषित होऊन त्यांत दाह व व्रण होतात असा हा एक सांथीचा रोग आहे. उष्णकटिबंधांतील देश तेथील हवामान या रोगास अनुकूल असल्यानें या रोगाचें आदिस्थान होत, व या रोगामुळें या व इतर देशांत होणारी मृत्युसंख्या थोडी थोडकी नसते. पूर्वी या रोगाच्या खऱ्या कारणाची चांगलीशी माहिती नव्हती. फक्त लक्षणें व कांहीं उपचार ठाऊक होते. पण अलीकडे या रोगाविषयीं महत्वाचें नवे शोध लागून नवीन उपचारहि प्रचारांत आले आहेत. ते असेः—या रोगाचे दोन भेद त्याच्या कारणपरत्वें आहेत. एक ' प्राणिजंतुजन्य ' व दुसरा ' उद्भिज्जंतुजन्य ' आहे. प्राणिजजंतूस आमीबा असें नांव आहे. उद्भिज्ज जंतूंमध्यें दोन जाती आहेत व त्यांपैकीं एकाचा शोध शिगा या जपानी शास्त्रज्ञानें लाविला, व दुसऱ्याचा शोध फ्लेक्स्नर यानें फिलिपाइन बेटांत लाविला. प्रथम या दोन्ही उद्भिजजंतूमध्यें कांहींच फरक नाहीं असें वाटले होतें, पण अधिक शोधामुळें त्यांचे गुणधर्म कांहीं बाबतींत—विशेषतः विषोत्सर्जनाच्या बाबींत—अगदीं भिन्न असल्याचें आढळून आलें एकाचें विष द्रवरूप असतें दुसऱ्याचें तसें नसतें. दुसरा चमत्कार असा कीं ज्या एका उद्भिज प्रकारच्या जंतूमुळें आमातिसार होतो त्या रोग्याच्या रक्ताच्या लशींत त्याच प्रकारचे जंतू मिश्र केले असतां ते एकमेकाकडे आकर्षिले जाऊन संलग्न होतात पण दुसऱ्या प्रकारचे जंतू मिश्र केले असता असें होत नाहीं.

रो ग ल क्ष णें:—वरचेवर पोटांत कळ, मुरडा होऊन आंव पडणें ही मुख्य लक्षणें होत. ही दोन्हीं भेदांत कमी अगर जास्ती प्रमाणांत कधीं असतात तर कधीं नसतातहि यासाठीं सूक्ष्मदर्शक यंत्रानेंच रोगकारक जंतू उद्भिज आहे किंवा प्राणिज ( आमीबा ) आहे हें ठरवितां येतें. ज्या रोग्यांत सर्व लक्षणें उत्तम रीतीनें पाहाण्यास सांपडतात त्यास आमातिसार होण्याच्या अगोदर बरें न वाटून भूक नाहींशी होणें, थोडा अतिसार व त्या बरोबर जरा पोटांत दुखणें ही पूर्वचिन्हें होतात. हाच अतिसार पुढें जास्त वाढून एकामागून एक असे रेच होऊं लागतात. या प्रमाणें दिवसांतून फार वेळां शौचास होतें. मलोत्सर्जन होणार आहे असा भास व इच्छा सदा रोग्यास होऊं लागून त्यापासून त्रास होतो. प्रथम नेहमींप्रमाणें पण जरा पातळ असा मळ पडतो. पण पुढें त्याचें स्वरूप पार बदलतें. प्रथम बरेंच शौचास होत असतें तें थोडेथोडें होऊं लागून त्यांत चिकट आम पडूं लागतो. त्यानंतर थोडा रक्तमिश्रित असा आम पडून कधींतर निवळ रक्तहि पडतें. या रक्ताबरोबर आतड्यांतील कुजलेल्या अंतस्त्वचेचीं जळमटें व त्यापासून पू, लस इत्यादि दाहजन्यस्राव हीं मिश्रित असतात. मळास एक विशिष्ट प्रकारची असह्य दुर्गंधि असते. प्रथम रोग्याच्या शरीर प्रकृतींत फारसा फरक होत नाहीं पण रोगाचें वाढतें मान झाल्यावर ज्वर व दाहामुळें रोग्यास वरचेवर कोरड पडून तृषा लागते व लघवीस थोडें व उन्हाळी लागल्याप्रमाणें दुखून होतें. रोग्याची शक्तिहि एकदम फारच कमी होते ती इतकी कीं, इतर फारच थोड्या रोगांत अशी स्थिति होत असेल. यापुढें रोग्यास कदाचित आराम पडतो. पण जर तो न पडला तर मात्र मृत्यू येतोच. येणेंप्रमाणें मळावाटे रक्तस्राव होऊन अगर वरील मुरडा वगैरे इतर लक्षणांचे श्रम सहन न झाल्यामुळें रोगाच्या आरंभापासून एक ते तीन आठवड्याच्या आंत रोगी मरतो. मरणाचे अगोदर मळास मनस्वी दुर्गंधि येऊन तो आपोआप रोग्यास नकळत गुदद्वारांतून बाहेर पडतो.

उ ता र प ड ण्या चीं ल क्ष णें.—रोगाची परमस्थिति झाल्यावर पोटांत होणारा मुरडा थांबतो. जें निवळ रक्त व आंव पडत होती तें स्वरूप हळू हळू बदलत जाऊन पिंवळसर खरा मळ पडण्यास आरंभ होतो व शौचासहि कमी वेळां जावें लागतें. शक्तिपातामुळें आलेली ग्लानि कमी होऊं लागते. पण चांगली शक्ति येण्यास फार दिवस लागतात. कांहीं रोगी तर पूर्ण बरे न होऊन त्यांचा आजार संग्रहणीवर जातो. ह्या संग्रहणीमुळेंहि रोग्यास अतिक्लेश होऊन बहुधां अल्पवयांत व अकालीं मृत्यू येतो.

रो गा चे श री रा व र हो णा रे प रि णा म.—शरीरांत उदरामध्यें मोठा नळ ( आंतडें ) असतो, त्याच्या खालील भागांत अन्न पाचक, रसोत्पादक कांहीं पिंड व ग्रंथी असतात. या रोगाचें विष या उपयोगी ग्रंथीवर व पिंडावर दाहक्रिया सुरू करितें. रोग सौम्य असतांनां हे पिंडदाहामुळें लाल भडक होऊन त्यांतून रक्त, पु व लस हीं निघालेलीं असतात. तीं शौचावाटें पडून जातात. पण रोगाचें उग्र स्वरूप असल्यास आंतड्याची श्लेष्मलत्वचा व्रणारोपण होऊन त्या त्या ठिकाणीं कुजते, त्याचा क्रम असा असतो कीं प्रथम विविक्तपिंडामध्यें ( मोठ्या आंतड्यांतील ) व त्याच्या भोंवताली हे व्रण होऊं लागून त्यांतून स्राव होतो. प्रथम लहान असणारे हे व्रण मोठे होऊन एकमेकांत मिसळून मोठा व्रण तयार होऊन आंतड्याचा बराच भाग नासतो. रोग जर थांबला तर हे व्रणहि बरे होण्याचा संभव असतो. पण कधीं कधीं ते बरे न होऊन श्लेष्मावरणाखालील आंतड्याचीं आवरणें प्रणित होऊन संग्रहणी रोगाच्या रूपानें रोग सुरूच असतो. क्वचित्काळीं हे व्रण आंतड्यास भोंक पडेपर्यंत खोल जाऊन आंत्रावरणदाह अगर एखादी धमनी फोडून उदरांतर्गत रक्तस्राव यासारखें प्राणघातक भय व अरिष्ट उत्पन्न करितात. जरी हे व्रण बरे झाले तरी ते मोठे असल्यामुळें ते आंखडून लहान होतांना आंतड्याची पोंकळीहि मळ पुढें जाण्यास प्रतिबंध होईल इतकी संकोचित करतात. व या कारणानेंहि पुढें रोगी दगावण्याचा संभव असतो. या रोगाचा भयंकर दुष्परिणाम म्हणजे यकृत विद्रधि हा होय. हे एकच व भलें मोठें गळू होतें असा साधारण समज आहे. पण असे बारीक अनेक विद्रधी त्याच इंद्रियांत ( यकृत ) होत असावेत असें वाटतें. परंतु त्यांच्या लहान आकारामुळें बाह्य लक्षणें दिसून येत नाहींत असें विद्वान शोधकांचें मत आहे.

उ प चा र.—कोठल्याहि ठिकाणीं हा रोग तुरळक असा नेहमींचाच होऊन बसल्यास अगर त्याची सांथ आल्यास प्रतिबंधक उपाय योजल्यानें त्याच्या प्रसारास पुष्कळ आळा बसतो. उन्हांत हिंडून नंतर एकदम सर्द जागेंत जाणें, हिरवीं कच्चीं व आंबट फळें खाणें, खाण्यापिण्यांत अतिरेक करणें या सर्व गोष्टी वर्ज करून आपण जें खातों अगर पितों त्या जिनसांची स्वच्छता कितपत आहे याकडे बारीक लक्ष असावें. पिण्याचें पाणी उकळून प्यावें. असले रोगी घरीं अगर रुग्णालयांत उपचारासाठीं असल्यास जंतुघ्न औषधांचा उपयोग शक्य त्या ठिकाणीं नेहमीं करावा व त्यांचा उपयोग रोग्यास वारंवार होणारें मलोत्सर्जन त्यांशी मिश्र करून मग तें टाकून देण्याच्या कामीं करीत असावें. कांहीं रोगी सौम्य प्रकारच्या आजारानें पछाडलेले असतात; किंवा अजीर्ण होऊन अमातिसार होण्यास निमित्त घडलेलें असतें. रोग्यास सर्दीनाशक व घाम आणणारें एखादें औषध देणें प्रशस्त होय व शिवाय प्रथम थोडेसें एरंडेलांत ४–५ थेंब अफूचा अर्क मिश्र करून तो रोग्यास दिल्यानें रोगाचें आदिकारण जी आंतड्यांतलि अजीर्णजन्य घाण ती निघून जाते. दुसरा याहून बरा उपाय म्हणजे सोडियम सल्फेट हा रेचक क्षार असतो तो १ ड्राम प्रमाणांत पाण्यांत विरघळवून दिवसांतून चार ते सहा वेळ द्यावा. या बरोबरच पोटामध्यें 'इपिक्याकुआन्हा' या औषधाच्या पुडीच्या गोळ्या करून त्या देणें प्रशस्त होय. अत्यवस्थ रोग्यांनां उतार पडत नसल्यास काडीखार, टॅनालबीन या सारख्या औषधाचें अल्प प्रमाणांत पाण्यांत केलेलें स्तंभक मिश्रण घेऊन त्याचा बस्ति देतात. पण रोग्याच्या गुदद्वारास हें सहन होणें अवघडच असतें कारण तें फार नाजूक व अशक्त झालेलें असतें

जंतुजन्य अमातिसारांत ( शिगाजंतु ) रोगमारक लस टोंचून उत्तम उपयोग होतो व ती लस रोगप्रतिबंधकहि आहे म्हणून कोणी ती देवीच्या तोडग्याप्रमाणें सांथींत आपणांस रोग होऊं नये म्हणून अगोदरच टोंचून घेतात. रोग झाला असतां रोग्यास गरम कपडे घालून व अंथरूण पांघरूण गरम कपड्याचें योजून ऊब राहील अशी व्यवस्था ठेवावी. खाण्यास व पिण्यास फक्त पातळ पदार्थ द्यावेत व तेहि गरम करून द्यावेत. थंड पदार्थ प्याल्यानें आंतड्यांतील मळ पुढें ढकलण्याची लाट अगर शक्ति उत्पन्न होऊन शौचास लागते. प्राणिजंतुजन्य रोगामध्यें वर सांगितलेल्या इपिक्याकुआन्हा याचें सत्व ( एमेटीन हायड्रो क्लोराइड ) हें अर्धा ते एक ग्रेन एकदां अगर दोनदां पिचकारीनें टोंचून घालावें. अगर इपिकयाकुआन्हाच्या गोळ्या देण्याचे अगोदर अफूच्या अर्काचे १५–२० थेंब दिल्यानें रोग्यास ओकारी येत नाहीं. कारण या औषधानें ती येण्याचा संभव फार असतो. रोग्यानें अगदीं निजूनच असावें व पूड घेतल्यानंतर बराचवेळ खाण्यापिण्यास कांहीं देऊं नये. बहुधां ओकारी अशी क्वचित् होते. नुसते उमासे येतात व थोडा बर्फाचा तुकडा तोंडांत धरल्यानें ते थांबतात. गोळ्या फक्त आंतड्यांतच विरघळतील असे केराटीनचें पुट देऊन गोळ्या करितात त्यामुळें ही ओकारीची भीति व त्रास टळतो. रॉस ह्या डॉक्टराचें मत असें आहे कीं, या पुडीच्या गोळ्या घेणें व एमेटीन टोंचून घेणें हे दोन्ही उपाय बरोबर व एकदम अमलांत आणल्यानें, आंतड्यांत व एकंदर प्रकृतींत एकदम

चांगला आराम पडतो. या इलाजांनीं मुरडा लागलीच कमी होतो. आंव कमी होऊं लागून मळ बांधून शौचास होऊं लागतें. आंव व रक्त हीं कमी होतात. असें झालें म्हणजे हीं औषधें देण्याचें बंद करून अफू, खडूची भुकटी, बिसमथ क्षार इत्यादि सौम्य अवष्टंभक उपचार करून रोगशमन करावें.

हे रोगी बरे झाले तरी यांच्या मळामध्यें प्राणिजजंतु असतात म्हणून हे रोगी विषूचिका व विषमज्वरांत वर्णन केल्या प्रमाणें रोगप्रसारास फार मदत करितात. या साठीं अशा रोग्यांनां दहाबारा दिवस एमेटीन बिसमथ आयोडाईड हें औषध ५ ग्रेन प्रमाणांत दिवसांतून तीन वेळां द्यावें. संग्रहणी झालेले रोगी या वरील पोटांतील औषधांनीं व गुदद्वारांत घालण्याचीं वरील अन्य औषधें योजून बरे होतात. नंतर त्यांस लोहमिश्रित शक्तीचें औषध द्यावें. आमातिसारासंबंधीं आयुर्वेदांतील माहिती 'अतिसार' व अमांश या लेखांत आलेली आहे.

**आमारा**—(मुंबई,) कच्छप्रांत भुजच्या पश्चिमेस ४८ मैलांवर असलेलें ठिकाण. गझनीचा अमीर कारा कासम १४ व्या शतकांत पश्चिम हिंदुस्थानांतून प्रवास करीत असतांना कच्छच्या सामा रजपुतांनीं त्याला मारिलें. या अमीराच्या नांवानें चैत्र वद्यांतील पहिल्या सोमवारीं येथें मोठी जत्रा भरते व ती पांच दिवस चालते. तांदूळ, खजूर, रंगीत कापड, बैल, उंट, आणि मेवामिठाई यांचा कांहींसा व्यापार चालतो. (मुं. गॅ. ५. १८८०)

**आमांश**— माधवनिदानकारांनीं अतिसाराच्या प्रकरणांत "प्रवाहिका" नांवाचा रोग वर्णिला आहे. वाग्भट्टांनीं अष्टांग हृदयांत हा निराळा रोग मानिला नाहीं तर आमातिसारांतच या प्रवाहिका रोगाचा अंतर्भाव केला आहे. माधवनिदानकारांनीं अतिसार व प्रवाहिका यांमध्यें भेद सांगितला आहे तो असाः—अतिसारांत नानाप्रकारच्या धातूंचा स्राव होत असतो व प्रवाहिकेंत फक्त पुष्कळ कुंथून कफच (किंवा कफासारखा बुळबुळीत पदार्थ) पडतो ("अतिसारे नानाविधद्रवधातु स्रवणं, प्रवाहिकायांतु कफमात्र सरणं") प्रवाहिका हें नांव प्रवहण (कुंथणें) या संस्कृत शब्दावरून पडलें आहे.

या रोगांत रोग्यास पुष्कळ कुंथावें लागतें व थोडा कफ मळाबरोबर पडतो. जड, स्निग्ध वगैरे कफ वाढविणारे पदार्थ पुष्कळ असणाऱ्या मनुष्यास कफसंचय (पोटांत चिकट पदार्थ) झाला असतां वायु वाढून तो कफ बाहेर पाडतो त्या वेळीं प्रवाहिका होते. यासच आमांश असें म्हणतात. ('आमातिसार' व 'अतिसार' पहा.)

चि कि त्सा—यांत बहुतकरून वायूचाच जोर असतो म्हणून या विकारांत मुरडा व कुंथुन शौचाला होणें हीं मुख्य लक्षणें असतात. यांवर अंतर्बाह्य तेलाचा उपयोग करणें हितावह होय. दशमुळांच्या काढ्यानें अगर कचोरा, बडिशेप व कोष्ठ, यांनीं तयार केलेल्या काढ्यांत तूप अगर तेल घालून त्याचा बस्ति दिल्यानें मुरडा व आव दोन्ही हि लवकर थांबतात.

प्रवाहिकेंत रक्त असेल तर रक्तातिसारावर सांगितलेलीं औषधें अगर त्यांत तयार केलेलें तूप निरामस्थिति असेल तर द्यावें. सामस्थितींत उपास करणें, अल्पसें रेचक देणें इत्यादि अतिसार चिकित्साच करावी.

या रोगांत किंवा अतिसारांत देखील वेगांचा (मळमूत्रांचा) अवरोध करूं नये.

या विकारांत कुंथून कुंथून गुद बाहेर येतें. त्यास तेल लावून किंचित शेकून तें मऊ झालें म्हणजे हळूहळू आंत ढकलावें आणि त्यावर मध्यभागीं भोंक पाडलेल्या चामड्याचा गोफणीसारखा बंद बांधावा. पंचमूळाचा (मोठ्या) काढा, उंदराचें मांस, दूध, रास्ना, एरंड, वगैरे वातनाशक औषधें यांचा काढा करून त्यांत तयार केलेलें तेल गुदभ्रंशावर लावावें व पिण्यासहि द्यावें. अतिसारांतील पथ्यापथ्य या रोगांतहि पाळावें.

**आमील**—सोळाव्या शतकांत मुसुलमानी राज्यामध्यें जमीनी व कधीं कधीं तर गांवच्या गांव, लोकांस इजाऱ्यानें देण्यांत येत असत. या इजारदार लोकांपासून वसूल गोळा करण्याकरितां नेमलेल्या सरकारी नौकरांस आमील ही संज्ञा होती. गांवच्या बंदोबस्ताचें व लहान सहान दिवाणी कज्यांचा निकाल देण्याचें हीं कामें हाच करीत असे.

**आमोद**, ता लु का—(मुंबई इलाखा.) भडोच जिल्ह्याच्या ईशान्येकडील तालुका. उ. अ. २१° ५१' ते २२° ३' व पू. रे. ७२° ४१' ते ७३° ४' क्षेत्रफळ १७६ चौरस मैल. लोकसंख्या (१९०१) ३१९११. आमोद शहर व ५१ खेडीं या तालुक्यांत आहेत. एकंदर उत्पन्न (इ. स. १९०३–४) सुमारें ३ लाख रुपये. धाधर नदीच्या आसपास थोडें जंगल आहे. या तालुक्यांत काळी कापसायोग्य जमीन आहे. पण पाणीपुरवठ्याची टंचाई आहे. येथें मुख्य पीक कापसाचें आहे.

इ ति हा स—१७५७ सालीं आमोद महाल मुधोजी भोसले याजकडे होता (रा. खं. १. ७९, १५१). नारायणराव पेशव्यांच्या खुनानंतर राघोबादादासंबंधीं जें इंग्रज–मराठे युद्ध झालें त्यांत आपटणच्या तहाप्रमाणें आमोद वगैरे भडोच भोंवतालचा तीन लाखाचा मुलूख इंग्रजाकडे राहू द्यावा असें ठरलें. (१७७६). राघोबादादाच्या एका पत्रांत हाच उल्लेख आहे (रा.खं.१२. १५४. ९८)-श. १७०१ मार्गशीर्ष वद्य १० रोजीं गोविंद गोपाळनें बाळाजी नाईक नाना यांस लिहिलेल्या पत्रांत 'चंद्रराव पवार यांचें पारपत्य होऊन पेटलाद व आमोद येथील ठाणीं सरकारचीं बसविलीं आमोदेस सरंजाम आपले कडील आहे' असा मजकूर आहे (रा. खं. १०.२४९. १७६). पण पुढील सालीं इंग्रजांनीं तें परत

घेतलें. सालबाईच्या तहान्वयें पुन्हां हा तालुका मराठ्यांकडेच आला. १८०३ मध्यें इंग्रजांनीं भडोच जेव्हां शिंद्यापासून जिंकून घेतलें तेव्हां आमोदच्या संस्थानिकापासून खंडणीहि घेण्यास त्यांनीं सुरवात केली. १८१७ त झालेल्या पुण्याच्या तहाप्रमाणें जंबुसर, आमोद व देहेज भडोचला जोडण्यांत आलीं.

शहर—आमोद तालुक्याचें मुख्य ठिकाण उ. अ. २२° ०' पू. रे. ७२° ५१' भडोच शहराचे उत्तरेस २४ मैलांवर हा ४३७५ लोकवस्ती (इ. स. १९०१) चा गांव आहे. इ. स. १८८७ पासून येथें म्युनिसीपालिटी आहे. तिचें उत्पन्न इ. स. १९०३—४ सालीं ६०४६ रुपये होतें. गांवांत ३ शाळा व एक दवाखाना आहे. पाऊस सरासरी ३६ इंच पडतो. पूर्वी या गांवाला तट होता व ईस्टइंडिया कंपनीच्या कोंपन्याला एक किल्ला होता व त्या भोंवतीं जुन्या मशीदी होत्या. या ठिकाणीं व्यापार थोडासा असून तो मुख्यतः कापसाचा आहे. चाकू, वस्तरे यासारखीं हत्यारें करणारे कारागीर आहेत. [इं. गॅ. ५. मुं. गॅ.२.]

**आमोनिया**—अम्नवायूस इंग्रजी नांव आमोनिया असें आहे. (नऊ$_3$, अणुभारांक १७.०१, दार्ढ्य ८. ५) नत्र व उज्ज यांचा संयोग होऊन जे संयुक्त पदार्थ बनतात त्यांपैकीं अम्न हा फार महत्त्वाचा आहे.

अम्नचे क्षार फार पुरातन कालापासून माहीत आहेत. नवसागर या रूपांत "अम्न" १३ व्या शतकांतलि किमयागार (आल्केमिस्टस्) लोकांस माहीत होता. १५ व्या शतकांत बाझिल व्हॅलेन्टइन यानें नवसागरावर अल्क (अल्कलीज)ची क्रिया केली असतां "अम्न" वायु तयार होतो हें दाखविलें. पुढें बैलांचीं शिंगें व खूर यांचें उर्ध्वपातन करून जो कर्बित क्षार तयार होत असे त्यावर उदहराम्ला (हायड्रोक्लोरिक)ची क्रिया करून निर्गुण नवसागर तयार करूं लागले त्यावेळीं "अम्न" यास "स्पिरिट्स् ऑफ हार्टशॉर्न" असें नांव पडलें. इ. स. १७७४ सालीं प्रीस्टले यानें प्रथम "अम्न" हा वायुरूपांत काढला. त्यानें त्यास "अल्कीय वायु" (अल्कालाइन एअर) असें नांव दिलें इ. स. १७७७ सालीं शीली यानें अम्नचें पृथक्करण करून त्यांत "नत्र" चें अस्तित्व असल्याचें सिद्ध केलें. इ. स. १७८५ च्या सुमारास बर्थोलेट यानें अम्नची घटना निश्चित केली.

अस्तित्व.—अम्न हा कर्बित रूपांत अल्पांश मानानें वातावरणांत आढळतो. नत्रयुक्त प्राणिज व वनस्पतिज पदार्थांची कोथक्रिया (प्युट्रिफ्यॉक्शन) होऊन हा तयार होतो. अम्नचे क्षार पावसाच्या पाण्यांत थोड्या प्रमाणांत सांपडतात. तसेंच ज्वालामुखी पर्वतांच्या प्रदेशांत अमोनिहरिद (अमोनियम क्लोराइड) व अमोनि गंधकित (अमोनियम सल्फेट) हे क्षार सांपडतात. "ग्वानो" नांवाची जी पक्ष्यांची विष्ठा असते तींत अमोनि द्वि कर्बिताचे (अमोनियम बाय कार्बोनेटचे), स्फटिक सांपडतात. अम्न क्षार सर्व सुपीक जमिनींत, समुद्राच्या पाण्यांत व बहुतेक वनस्पती व प्राणी यांच्या रसांत असतात. तसेंच मूत्रामध्येंहि "अम्न" याचें अस्तित्व असतें. म्हणून त्यास कधीं कधीं "मूत्रवायु" असेंहि म्हणतात. नवसागर हा अम्नक्षार प्रथम कुंभाराच्या भट्टींत आढळला. म्हणून यास "चूलिका लवण" असें नांव प्राचीन आर्य वैद्यांनीं रसरत्नसमुच्चयांत दिलें होतें. पाश्चात्य (इजिप्त) देशांत "अम्न" हें नांव पडण्याचें कारण असें आहे कीं ॲमन ज्युपिटर (बृहस्पति) च्या देवालयाजवळ अरब लोक हा क्षार उंटाच्या लिदीपासून काढीत असत. दगडी कोळशांत नत्रचें प्रमाण सामान्यतः शेंकडा दोन प्रमाणांत असल्यानें त्याच्या उर्ध्वपातनापासून जे पदार्थ तयार होतात त्यांत अम्नचे क्षार नेहमीं असतात.

उत्पादन (प्रिपेरेशन).—नत्रवायु व उज्जवायु यांच्या मिश्रणावर मंदविद्युत्स्फुलिंगाची क्रिया केली म्हणजे त्यांचा संयोग होऊन "अम्न" वायु तयार होतो परंतु हें संयोगीकरण फारच अपूर्ण होतें. प्राणिज व वनस्पतिज पदार्थांचें निर्जल ऊर्ध्वपातन केलें म्हणजे "अम्न" वायु तयार होतो. नत्रसाम्ल (नायट्रस ॲसिड) व नत्रायितें (नायट्राइट्स) यांचें नवजात (नॅसंट) उज्ज वायूच्या योगानें सोज्जीकरण (रिडक्शन) केलें म्हणजे "अम्न" तयार होतो. तसेंच कोणत्याहि आमोनि क्षारावर अल्क उत्प्राणिदा (अल्कालाइन हायड्रॉक्साइड) ची किंवा विरवलेल्या चुन्याची क्रिया करून त्यांचें पृथक्करण केलें म्हणजे अम्न वायु तयार होतो. या कामीं मुख्य-"अमोनिहरिद" (अमोनियम क्लोराइड) हा क्षार वापरतात. यांत रासायनिक क्रिया प्रतिक्रिया होतात त्या खालीं दाखविल्या आहेतः—

अमोनिहरिद खटप्राणिद खटहरिद पाणी अम्न (वायु)

$$२नउ_4ह + ख(प्रउ)_2 = खह_2 + २उ_2प्र + २नउ_3$$

याशिवाय मग्न नत्रिदा (मॅग्नेशियम नायट्राइड)वर पाण्याची क्रिया करून त्याचें पृथक्करण केलें म्हणजे हा वायु तयार करतात जसेंः—

मग्ननत्रिद पाणी मग्नउत्प्राणिद अम्न

$$म_3न_2 + ६उ_2प्र = ३म(प्रउ)_2 + २नउ_3$$

धर्म.—अम्न हा वर्णहीन वायु असून त्यास विशिष्ट प्रकारचा तिखट वास असतो. व त्याचें लाल लिटमस कागदावर फार तीव्र अल्ककार्य होतें. अम्न वायूचें विशिष्ट गुरुत्व ०. ५८९ असल्यानें तो हवेपेक्षां बराच हलका आहे. १०° श उष्णमानावर वातावरणाच्या ६½ पट दाबा (भारावर) खालीं किंवा ४०°श उष्णमानावर अम्न वायूचा द्रव (रस = लिक्विड) होतो. हा अम्नरस वर्णहीन असून त्याचें वि. गु. ०.६३६२ असतें. त्याचा उत्क

थनांक ( बॉयलिंग पाइंट ) ३३. ७° श असून—७५° श उष्णमानावर घन होतो. घन अम्नचे पांढरे शुभ्र स्फटिक असतात. अम्नवायु पाण्यांत अतिविद्राव्य असतो. शून्य ०° श उष्णमानाच्या पाण्याच्या १ आकारमानांत अम्नवायूचे ११४८ आकारमान विद्रुत होतात. यास अम्नद्रव ( ॲक्वा अमोनिया ) असें म्हणतात. १५°श उष्णमानाच्या पाण्याच्या १ आकार मानांत अम्नवायूचे ७८३ आकारमान विद्रुत होतात.

पाण्यांत विद्रुत झालेला सर्व अम्न वायु उत्क्वथन ( बॉयलिंग ) करून पाण्यांतून काढतां येतो. उद्भिज्ज रंगावर अम्न वायूची फारच तीव्र पण अस्थिर ( ट्रन्झंट ) क्रिया घडते, व या धर्मावरून अम्नवायूस कधीं कधीं बाष्पभावी ( व्होलटाइल ) अल्क असें म्हणतात. अम्नज्वलन क्रियेला पोषक ( सपोर्टर ) नाहीं. तो हवेंत जळत नाहीं. परंतु प्राणवायूमध्यें तो तावडतोब पेटतो. त्यावेळीं त्याची ज्वाला फिकट पिंवळसर व हिरवट असतें. अम्नच्या ज्वलनक्रियेंत पाणी उत्पन्न होऊन नत्रवायु खालीं दाखविल्याप्रमाणें पृथग्भूत होतोः—

अम्नवायु प्राण नत्र पाणी
४ न उ$_3$ + ३ प्र$_2$ = २ न$_2$ + ६ उ$_2$प्र

अम्नवायूचा पाण्यांत केलेला द्रव हा व्यापारी दृष्ट्या फार महत्त्वाचा पदार्थ आहे. हा द्रव तयार करण्याकरितां दोन तोंडाच्या बाटलींत पाणी घालून तींत अम्नवायु घालतात, या द्रवाचा कस ( स्ट्रेंग्थ ) वि. गु. वरून काढतां येतो. द्रवांत ज्या मानानें अम्न वायूचें प्रमाण अधिक असतें त्या मानानें द्रवाचें विशिष्ट गुरुत्व कमी असतें

असा समज आहे कीं अम्न वायु व पाणी यांचा संयोग होऊन अमोनि उज्जित ( अमोनियम हायड्रेट ) तयार होतो तो पाण्यांत विद्रुत होऊन राहतो.जसें:—

आम्न पाणी अमोनिउज्जित
नउ$_3$ + उ$_2$ प्र = न उ$_4$प्रउ

विशिष्ट गुरुत्वावरून द्रवांत अम्नवायु किंवा अमोनि उज्जिताचें प्रमाण किती आहे तें काढता येतें. उदाहरणार्थ १४° श उष्णमान द्रवाचें विशिष्ट गुरुत्व. ८८४ असलें तर वजनानें १०० भार द्रवांत ३६ भार अम्नवायु असतो; वि. गु. ९२५१ असलें तर शेंकडा वीस भार, व वि. गु. ९५९३ असलें तर त्यांत शेंकडा १० भार अम्नवायूचें प्रमाण असतें.

कारीचें शीततताजनक यंत्र.— अम्नवायूचा रस सहज होण्यासारखा असल्यानें त्याचा फायदा शीततताजनक यंत्र तयार करण्याकडे करण्यांत आला आहे. हें यंत्र फ्रान्स देशांतील पारिसचा मॉशुअर कारि यानें सनदखात्यांत नोंदविलें आहे (पेटन्टेड). यांत एक भक्कम लोखंडी तापक ( बायलर ) असतो. त्यांत अम्नवायूचा संपृक्त द्रव (कान्सेन्ट्रेड ) भरलेला असतो. हा तापक उष्ण केला म्हणजे अम्न व तयार होतो. हा अम्नवायु थंड पाण्यांत ठेवलेल्या एका लोखंडी ग्राहकांत येतो व तज्जन्य भारानें अम्नवायूचा रस होतो. तापक विस्तवावरून काढला व पाण्यांत थंड केला म्हणजे हा अम्नरस तावडतोब बाष्परूप होऊन ग्राहकांतून परत तापकांत येतो व त्यामुळें इतकी शीतता उत्पन्न होते कीं ग्राहकांतील पोकळ भागांत मद्याच्या अर्कों( स्पिरिट ऑफ वाइन ) त एक पाण्याचें भांडें असतें त्यांतील पाणी एकदम गोठून बर्फ होतें.

या यंत्रापेक्षां मोठें व अखंड काम देणारें ( कंटिन्युअस ) यंत्रहि याच तत्त्वावर कारीनें तयार करून नोंदविलें आहे ( पेटन्टेड ). या यंत्राच्या योगानें विस्तीर्ण प्रदेश ( लार्ज स्पेसेस ) शीत करण्याकरितां यांत मिठवणी ( मिठाचा द्रव ) भरतात. हा मिठाचा द्रव पाण्याचा जो हिम बिंदु ( फ्रीझींग पॉइंट ) असतो त्या बिंदूखालीं थंड केला तरी थिजत नाहीं व हा थंड केलेला मिठाचा द्रव जो प्रदेश थंड करण्याचा असेल त्या भागांतील नळ्यांमधून फिरवितात व परत पुनः थंड करण्याकरितां शीततजनक यंत्रांत परत आणतात.

अम्न वायूच्या अंगीं पुष्कळ पदार्थांशीं संयोग होण्याचा धर्म आहे. हा धर्म मुख्यत्वें धातूंचे हरसंधिदांशीं संयोग होण्यांत फार दिसून येतो. उदाहरणार्थ खटहरिद ( कॅलशिअम क्लोराइड ) व अम्न यांचा संयोग होऊन खह$_2$. ८ न उ$_3$ या प्रकारच्या घटनेचा संयुक्त पदार्थ तयार होतो, यामुळें अम्नवायु निर्जल करण्याकरितां खटहरिदा( कॅलशिअम क्लोराइड )चा उपयोग करतां येत नाहीं. रजतहरिद ( सिल्व्हर क्लोराइड ) व अम्न याचे दोन संयुक्त पदार्थ होतात. १५° श. उष्णमानाखालीं एकाची घटना रह.३ नउ$_3$ अशी असते व २०° श. उष्णमानावर दुसऱ्याची घटना २रह. ३नउ$_3$ अशी असते. हे पदार्थ उष्ण केले असतां त्यांतुन अम्नवायु पृथग्भूत होतो व धातूचा हरिद मागें रहातो. इ. स. १८२३ मध्यें फॅरेडे यानें प्रथम अम्नवायु रसरूप केला तो याच रजतहरिद अम्न संयुक्त पदार्थांच्या योगानें केला. रसरूप अम्नवायु कृत्रिम रीतीनें पाण्याचा बर्फ तयार करण्याकडे उपयोगांत आणतात हें वर सांगितलेंच आहे. रसरूप अम्नवायूमध्यें पालाश व सिंधु धातु विद्रुत होऊन गर्द निळा ( ब्ल्यू ) द्रव तयार होतो. रक्तोष्णमानावर अम्नवायूचे घटक पृथग्भूत होतात, त्याचप्रमाणें अम्नवायूवर विद्युत्स्फुल्लिंगाची क्रिया केली म्हणजेहि त्याचे घटक पृथग्भूत होतात. अम्नमध्यें हरवायूंचा प्रवाह सोडला असतां तो पेट घेतो व नत्रवायु आणि उद्धराम्ल तयार होतात आणि अम्नचा अतिरेक ( एक्सेस ) नसला तर अतिशय स्फोटक नत्रहरिद नह ३ पदार्थ तयार होतो. अद व अम्न यांचा संयोग होऊन नउ$_3$. नद$_3$ या घटनेचा संयुक्त पदार्थ तयार होतो. अम्नमधील उज्जच्या स्थानीं धातु

आदिष्ट होतात. उदाहरणार्थ, मग्न धातु अम्नवायूंत जळतो व मग्न नत्रिद ( मॅग्नेशिअम नायट्राइड ) म$_3$ न$_2$ तयार होतो. उष्ण केलेल्या सिंधु अथवा पालाश धातूवरून अम्नवायूचा प्रवाह नेला असतां धुनउ$_2$ सिंधु अमिद ( सोडामाइड ) व पानउ$_2$ पालाशामिद (पोट्यासमाइड ) हे पदार्थ अनुक्रमें तयार होतात.

अम्नच्या सर्व मुख्य धर्मांत अम्न अम्लांशीं साक्षात् संयोग पावून क्षार होतात हा होय. अम्नाच्या संयोगानें अति तीव्र अम्लें सुद्धां निर्गुण होतात व चांगले सुबद्ध स्फटिकाकार असे अति महत्त्वाचे क्षार तयार होतात. त्यास अमोनि ( अमोनियम ) क्षार म्हणतात. उदाहरणार्थ. उद्–हराम्ल व अम्नवायु यांचा संयोग होऊन अमोनिहरिद तयार होतो. या अमोनिक्षारां ( अमोनियम सॉल्ट्स )ची घटना खालीं दिलेल्या समीकरणांवरून ध्यानांत येईल.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| अम्न | उद्–हराम्ल | | अमोनिहरिद ( नवसागर ) | | सिंधुहरिद |
| नउ$_3$ | + उह | = | नउ$_4$ह | … | … धुह |
| अम्न | नत्राम्ल | | अमोनिनत्रित | | सिंधुनत्रित |
| नउ$_3$ | + उनप्र$_3$ | = | नउ$_4$नप्र$_3$ | … | धुनप्र$_3$ |
| अम्न | गंधकाम्ल | | अमोनिगंधकित | | सिंधुगंधकित |
| नउ$_3$ | + उ$_2$गप्र$_4$ | = | ( नउ$_4$ )$_2$ गप्र$_4$ | … | धु$_2$ गप्र$_4$ |

चौथ्या रकान्यांत तुलनेकरितां सिंधुक्षार दिले आहेत, त्यावरून सिंधु धातु, व नउ$_4$ हे अनुरूप स्थान व्यापतात असें दिसून येईल. हा नउ$_4$ संघ तत्संयुक्त पदार्थांतून निष्कासित करून दुसऱ्या पदार्थांत पृथग्भूत न होतां निविष्ट करतां येतो.

नउ$_4$ हा संघ संयुक्त मूलका ( रॅडिकल )चें उत्तम व आश्चर्योत्पादक उदाहरण आहे. या संघाची क्रिया मूलतत्त्वांप्रमाणेंच होते व हे पदार्थ इतके आहेत कीं, या संघास अमोनि ( अमोनियम ) हें नांव देण्यांत आलें आहे; परंतु हा संघ पृथक् करून निराळा काढतां येत नाहीं, याचें कारण त्याचें तात्काळ पृथक्करण होऊन अम्न व उज्ज हे निरनिराळे होतात. अमोनिहरिदा( नवसागरा )ची घटना नउ$_4$ ह अशी लिहितात. निर्जल अम्नवायूचा संयोग निर्जल अम्लांशीं होत नाहीं. त्याचा संयोग होण्यास पाण्याच्या सांनिध्याची अवश्यकता असते. अम्नवायु पाण्यांत विद्रुत झाला म्हणजे नत्रचें मूल्यत्व(व्हॅलेन्स) तीनच्या ऐवजीं पांच होतें व अमोनि उज्जित ( अमोनियम हायड्रेट ) तयार होतो. जसें:–




या अमोनि उज्जिताची घटना सिंधु उज्जिताच्या धुप्रउ घटनेशीं तुल्य आहे. पुष्कळ बाबतींत अमोनि उज्जिताची रासायनिक क्रिया सिंधु उज्जित किंवा पालाश उज्जित यांसारखीच असते. उदाहरणार्थ, या सर्व पदार्थांच्या रासायनिक क्रियेनें लोहहरिदा ( फेरिक क्लोराइड ) च्या द्रवापासून लो (प्रउ)$_3$ या घटनेचाच निपात (प्रेसिपिटेट ) उत्पन्न होतो.

सेंद्रिय रसायनशास्त्रांत संयोगीकरण ( सिन्थिसिस ) करण्याच्या कामीं अम्न हा अति व्यापक क्रियाकारक( रीएजंट ) आहे. उल्किल अदिदांवर (आल्किल आयोडाइड्स ) अम्नची प्रतिक्रिया होऊन अमिनें ( अमाइन्स ) होतात. इथ क्षारांवर ( ईस्टर्स ) क्रिया होऊन अम्ल अमिदें ( अमाइड्स ) तयार होतात, चरबी वर्गांतील अम्लांच्या हरिदांवर क्रिया घडली म्हणजे अमिद अम्लें तयार होतात. तुल्य कर्बनत्र इथ क्षारां ( इसो सायनिक ईस्टर्स )पासून उत्कर्बिल्ल ( आल्किल ) मौत्रकें ( यूरिआज ) आणि सर्षपतैला ( मोहोरीचे तेल = मस्टर्ड ऑइल ) पासून गांधिक ( थिओ ) मौत्रकें होतात. प्रायोज्जिदांचाहि ( आल्डिहाइड्स ) अम्नशीं साक्षात् संयोग होतो.

अ म्न वा यू ची घ ट ना—अम्नवायूची घटना निश्चित करण्याकरितां अंशांकित ( ग्रॅज्वेटेड ) नळीमध्यें पारदावर अम्नवायु मोजून घ्यावा व त्यांत विद्युत्स्फुलिंगें ( विजेच्या ठिणग्या ) एकामागून एक अशीं अनेक सोडावींत म्हणजे अम्नवायूचें पृथग्भवन होऊन नत्र व उज्ज वायु हे वेगळे होतात आणि आरंभीं घेतलेल्या अम्नवायूचें जितकें आकारमान असतें, त्याच्या दुप्पट आकारमान यांचें असतें. अम्नवायूचे अल्कधर्म ( अल्कालिनिटि ) उग्र वास ( पंजन्सी ) व त्याचप्रमाणें त्याचा द्रावकधर्म हे सर्व नाहींसे होतात.

वायुघटनामापकानें अम्नवायूचे घटक खालीं सांगितल्याप्रमाणें निश्चित करतां येतात. वायुघटनामापक यंत्रांत १०० अंश अम्नवायु भरावा. त्यांत विजेच्या ठिणग्या सोडून त्याचें पूर्ण पृथक्करण झालें म्हणजे त्याचें आकारमान २०० अंश होईल. यांत १०० अंश प्राणवायु घालून त्या ३०० अंश प्रमाणावर जर पुनः विजेच्या ठिणग्यांची क्रिया केली, तर हें ३०० अंश वायूचें मिश्रण कमी कमी होत जाऊन शेवटीं फक्त ७५ अंश वायु राहील व २२५ अंश वायुमिश्रण अदृश्य झालेलें आढळेल. अदृश्य झालेल्या २२५ अंशांपैकीं दोन तृतीयांश म्हणजे १५० अंश उज्ज वायु व बाकी ७५ अंश प्राणवायु असला पाहिजे हें उघड आहे; पण प्राणवायु १०० अंश घातला होता, त्यांतून ७५ अंश खर्ची पडलेला प्राण वजा जातां २५ अंश प्राण शिल्लक राहतो. तो विद्युत्क्रिया केल्या नंतर शिल्लक राहिलेल्या ७५ अंशांतून वजा करतां बाकी ५० अंश वायु वायुघटनामापकांत शिल्लक राहतो हा नत्रवायु होय. यावरून आकारमान वाढून २०० अंश झालेल्या वायूंत १५० अंश उज्ज व ५० नत्रवायु असतो म्हणजे नत्रवायूचें एक आकारमान उज्ज वायूच्या तीन आकारमानाशीं संयोग पावून दोन आकारमान अम्नवायु तयार होतो व त्याची घटना नउ$_3$ अशी लिहितात.

अम्नवायूंत उज्ज वायूचें अस्तित्व दाखविण्याची दुसरी रीत अशी आहे कीं, आरक्तोष्ण नळींतून अम्नवायूचा प्रवाह नेला असतां तो पृथग्भूत होऊन जेव्हां वायू निघतात तेव्हां त्या नळीच्या तोंडाशीं जर बत्ती लाविली तर वेगळा झालेला उज्ज पेटतो आणि जळून त्याचें पाणी होतें. आरक्तोष्ण ताम्र प्राणिदावरून ( क्युप्रिक आक्साइड ) अम्नवायु पृथग्भूत करून निघालेला मिश्र वायूचा प्रवाह नेला, तर त्या मिश्रणांतील उज्ज प्राणिदांतील प्राणवायूशीं संयोग पावून पाणी होतें व बाकी राहिलेला नत्रवायु वायुपात्रांत ( गॅस जार ) धरून त्याची परीक्षा करावी.

उ न्न त्रि न आ णि उ त्प्रा णि ल अ मि न.—नत्र आणि उज्ज यांचा संयुक्त पदार्थ अम्न नउ$_{3}$ हा एकच आजपर्यंत माहीत होता. परंतु अलीकडे नत्र व उज्ज यांचे अम्नाशिवाय दुसरे संयुक्त पदार्थ असल्याचें आढळून आलें आहे. यांपैकीं उन्नत्रिन किंवा द्विअमिद न$_{2}$उ$_{4}$ आणि उत्प्राणिल अमिन नउ$_{2}$प्रउ या दोहोंचा नुकताच शोध लागला आहे. उन्नत्रिन किंवा द्विअमिद यास इंग्रजी नांव हायड्रझाइन किंवा डायअमाइड आणि उत्प्राणिल अमिन यास इंग्रजी नांव हायड्राक्सिल अमाइन अशीं नावें आहेत. या दोहोंचेंहि अम्नशीं साधर्म्य आहे. उन्नत्रिन हा स्थिर वायु असून त्यास विशिष्ट तिखट असा वास असतो. तो पाण्यांत पुष्कळ विद्राव्य असतो. त्याच्या अंगीं रजत व ताम्रक्षारास धात्ववस्थेस आणण्याचा धर्म आहे. याचा एक उज्जित न$_{2}$उ$_{4}$उ$_{2}$प्र या सारणीचा तयार होतो. नत्राम्लाचें वंग (टिन)च्या योगानें सोज्जिकरण ( रिडक्शन ) केलें म्हणजे हा उज्जित तयार होतो; यापासून क्षार तयार होतात त्यांच्या अंगीं उन्नत्रिनप्रमाणें धातुक्षारास धात्ववस्थेस आणण्याचा धर्म असतो व हे क्षार अम्नच्या क्षाराशीं सदृश असतात. उन्नत्राम्ल किंवा त्रिनत्राम्ल उन$_{3}$(हायड्रअझोइक किंवा ट्राय अझोइक ॲसिड) हें कर्टियस यानें इ. स. १८९० मध्यें शोधून काढलें. हें अम्ल वायुरूप असून अति भयंकर स्फोटक आहे.

अ मो नी ( अ मो नि य म ) संयुक्त मूलक—ज्या एका परमाणूस किंवा परमाणुसमुदायास संयुक्त पदार्थाच्या अणूचा मुख्य परमाणुरूप घटक असें मानितां येतें. त्यास मूलक अशी संज्ञा देतात. मूलक एकाकी किंवा संयुक्त असतात. मूल द्रव्याचे परमाणू हे एकाकी मूलक होत. दोन किंवा अधिक परमाणूंचे म्हणजे एकाकी मूलकांचे जे संघ पृथग्भवन न पावतां एका पदार्थास सोडून दुसऱ्या पदार्थांत मूलद्रव्याच्या परमाणुप्रमाणें जाऊं शकतात त्यांस संयुक्तमूलक म्हणतात. याचें उत्कृष्ट उदाहरण अमोनि नउ$_{4}$( आमोनियम ) हें आहे.

अम्नवायूचा अम्लांशीं साक्षात् संयोग होऊन जे अमोनि क्षार तयार होतात त्यांचें सिंधु व पालाश यांच्या क्षाराशीं पुष्कळ साधर्म्य आहे. या विलक्षण साधर्म्याची उपपत्ति लावण्याकरितां बर्झेलियस यानें इ. सं. १८१६मध्यें अंपीरच्या उपपत्तीवर आपली कल्पना बसवून असें प्रतिपादन केलें कीं, हे क्षार अमोनि नउ$_{4}$ ( आमोनियम ) या संयुक्त मूलकाचे क्षार आहेत. कारण या मूलकाचें कार्य एकमूल्य धातु सिंधु व पालाश याप्रमाणें घडतें. हा संयुक्त मूलक नउ$_{4}$ असंपृक्त ( ॲनसॅच्युरेटेड ) आहे. हा असंयुक्त स्थितींत असल्यास त्याची घटना सारणी उ$_{4}$ ≡ न–न ≡ उ. किंवा द्वित्तअणु न$_{2}$उ$_{8}$ अशी असली पाहिजे. वील यानें सिंधु धातूच्या सान्निध्यांत अम्नवायूस घनीकृत केलें तेव्हां एक तेजदार नील ( ब्ल्यू ) व धातुसदृश रस झाला. यास त्यानें सिंधुअमोनि ( सोडामोनियम ) असें नांव दिलें व त्याची सारणी न$_{2}$उ$_{6}$धु$_{2}$ अशी दिली. याची क्रिया अमोनि हरिदावर ( अमोनियम क्लोराइड ) केल्यावर तत्सदृश नील रस तयार झाला; हा त्याच्या मतें असंयुक्त स्थितींत असलेला संयुक्त मूलक नउ$_{4}$ हा होय. शिवाय पारदांत शेंकडा १ सिंधुधातु मिश्र करून तें मिश्रण नवसागराच्या ( आमोनिहरिदाच्या ) संपृक्त द्रवांत ठेवलें तर तें आकारमानानें अतिशय फुगतें यास अमोनिमेल( आमोनियम् अमॅलगम ) असें म्हणतात.

अ म्न चे क्षा र—अम्नपासून जे क्षार होतात त्यांस अमोनिक्षार असें म्हणतात. हे क्षार तयार करण्याकरितां अमोनिहरिद किंवा अमोनि क्षार चुनकळींत मिश्र करून तें मिश्रण उष्ण करून जो अम्नवायु उत्पन्न होतो तो योजलेल्या अम्लांत घालून त्यांशीं संयुक्त करतात. किंवा जेथें दगडी कोळशापासून धुराच्या दिव्याकरितां धूर तयार करण्याचे कारखाने आहेत तेथें अम्नयुक्त द्रव तयार होतो त्या द्रवांत चुनकळी मिसळून त्यापासून अम्नवायु तयार करून तो अम्लानें निर्गुण करतात. व तो द्रव आटवितात म्हणजे स्फटिकीभवन होऊन हे क्षार तयार होतात. हे क्षार अत्यंत उपयोगी असतात याकरितां त्यांचें वर्णन खालीं दिलें आहे.

न व सा ग र—अमोनिहरिद–नउ$_{4}$ह, अणुभारांक ५३.५. यास इंग्रजी नांव अमोनियम क्लोराइड व सॅल अमोनियाक असें दिलें आहे आर्यवैद्यकांत यास चूलिका क्षार हें नांव आहे.

नवसागर पूर्वी मिसर देशांतून येत असे. तेथें उंट, घोडे, मेंढ्या वगैरेंचा वाळलेला मळ घेऊन त्यांतून ऊर्ध्वपातनानें हा अर्कवत काढीत असत;परंतु हल्लीं दगडी कोळशांच्या धुराच्या कारखान्यांत जो अम्नयुक्त द्रव मिळतो त्यास अम्न द्रव ( अमोनियाकल लिकर ) म्हणतात; या द्रवांत अमोनि कर्बित ( कार्बोनेट ऑफ अमोनिया ) आणि उज्ज अमोनि गंधकित ( हायड्रो सल्फाइड ऑफ अमोनिया )हे क्षार असतात; या द्रवांत पुष्कळसें उत्–हराम्ल घातलें म्हणजे सदर कर्बित व गंधकिद या क्षारांचें पृथग्भवन होऊन कर्बाम्ल आणि उज्ज गंधकिद वायु निघतात. हे वायु सदर द्रव उकळतांना उडून जातात व बाकी शेष द्रव आटवून कोरडा करितात. नंतर हा कोरडा झालेला क्षार उष्ण करून त्यांत जी डांबरी पदार्थांची भेसळ असते तिचें पृथग्भवन करून

तीस घालवितात. शेवटीं लोखंडी मेघडंबरी पात्रांत घालून उष्णतेच्या योगानें उडवून त्याचें फूल धरितात. हीं लोखंडी पात्रें चिकण मातीनें आंतून मढविलेलीं असतात व त्यांवरील डेरा शिशाच्या पत्र्याचा असतो. या डेऱ्यांत नवसागराची वाफ भिजून फूल जमतें. हाच बाजारी नवसागर होय.

इ. स. १८ व्या शतकांत यूरोपमध्यें नवसागर मोठ्या प्रमाणावर करण्याचा कारखाना लंडन येथील रसायनशास्त्रज्ञ गुडविन यानें काढला होता. याकरितां तो समुद्राच्या पाण्यापासून मीठ तयार करून घेतल्यावर जो मागें शेषद्रव राहतो (मदरलिकर) त्या द्रवाचा उपयोग करीत असे. या द्रवांत पुष्कळ दिवसाचें शिळें मूत्र घालून त्यापासून नवसागर तयार करीत असे.

धर्मः—नवसागर चामट व तंतुमय असून त्याची पूड लवकर होत नाहीं. याची पूड करणें झाल्यास याचा दाट द्रव वारंवार ढवळून आटवावा लागतो. हा क्षार पाण्यांत बराच विरघळतो. वजनानें अडीचपट थंड पाण्यांत व वजनाइतक्याच उकळत्या पाण्यांत हा क्षार विरघळतो. नवसागराचा दाट द्रव उथळ भांड्यांत सावकाश आटूं द्यावा, म्हणजे झाडासारखे किंवा पिसासारखे फांद्या असलेले लांबट व अष्टपैलू स्फटिक पडतात, परंतु मूत्रामध्यें असलेला किंवा मूत्रांत विरघळविलेला द्रव आटविला तर त्यापासून चतुष्कोण घनस्फटिक पडतात. नवसागर पाण्यांत विरघळत असतां पाण्याचें उष्णमान उतरतें म्हणून शीततानजनक मिश्रणाकडे नवसागराचा उपयोग करितात. याच्या द्रवांत तीक्ष्ण व खारट रुचि असते. नवसागर उष्ण केला असतां न वितळतां व पृथग्भूत न होतां बाष्प रूपानें उडून जातो व ती वाफ थिजून फूल बनतें.

शिसें, लोखंड, जस्त आणि स्फट (अल्युमिनम) या धातूंचे क्षार नवसागरासमवेत उष्ण केले तर त्यांचें पृथग्भवन होऊन ते क्षार अगदीं उडून जातात. तसेंच कित्येक धातूंचे प्राणिद (आक्साइड्स)नवसागराच्या द्रवांत घालून उंच उष्ण मानावर उष्ण केले तर अम्नवायु निघून जाऊन त्या धातूंचे हरिद बनतात. व्यवहारांत भांड्यास कल्हई करण्यास व धातूंच्या जोड कामास नवसागराचा उपयोग होतो कारण हा क्षार धातूंच्या प्राणिदांतून धातूस वेगळें काढतो किंवा त्याचे वितळणारे हरिद बनवितो. रसायन शाळेंत यापासून अम्नवायु तयार करितात, व परीक्षा करण्यास ही वापरतात. औषधाच्या व रंग देण्याच्या कामांतहि याचा उपयोग होतो.

औषधी नवसागर.—ब्रिटिश फार्माकोपियामध्यें औषधी कामासाठीं जो नवसागर वापरतात तो पांढरा शुभ्र स्फटिकरूप निर्गंध भुकणी असतो त्यास खारटसर रुचि असते. ही नवसागराची पूड वजनानें तीन पट थंड पाण्यांत व शें.९० प्रमाणाच्या ५० पट अल्कहलांत (आल्कोहोलांत) विरघळते. नवसागर अल्ककार्बिता बरोबर वापरतां येत नाहीं. नवसागराचें औषधांत देण्याचें प्रमाण ५ ते २० ग्रेन असतें. दुसरे जे अमोनिक्षार आहेत त्यांच्यापेक्षां अमोनिहरिदाचा औषधी उपयोग व कार्य हीं अगदीं भिन्न आहेत. हृदयावर व श्वासोच्छ्वासावर याचा फारच अल्प परिणाम होतो. परंतु श्लेष्मलत्वचेवर याचा विशिष्ट परिणाम होतो. कारण या क्षाराचें अपसरण मुख्यत्वें फुप्फुसांतून होतें. त्या स्थळीं लघुश्वासनलिकेत सांठलेला अंतरोत्सर्ग या क्षाराच्या योगानें मोकळा होऊन सुटा होतो. या क्षाराचें असें कार्य होत असल्यानें लघुश्वासनलिकादाह (ब्रांकिटीस) लघुश्वासनलिका दाहयुक्त फुप्फुसदाह (न्युमोनिया) या रोगांवर या क्षाराचा अतिशय उपयोग होतो. हा क्षार स्निग्ध शर्करेंत (ग्लिसरीन) व ज्येष्ठमध यांत किंवा त्यांच्या मिश्रणांत क्षाराची अरुचि छपविण्याकरितां द्यावा. किंवा तुषारोत्पादक (अॅटोमायझर) यंत्रानें रजो रूपांत याचा उपयोग करावा. खोलीमध्यें अमोनिहरिद हा वायुरूपानें भरून त्याचा श्वासोच्छ्वास कुजट लघुश्वासनलिका दाहाच्या रोगांत घेण्याविषयीं प्रशंसा करण्यांत येते. नवसागराच्या अंगीं अन्नाशयाच्या कोठ्यांत कांहीं बिघाड करण्यासारखा क्षोभजनक जरी धर्म आहे तरी कोठ्यांतलि श्लेष्मोत्पादक त्वचा व्यापारहीन व शिथिल झाल्या असतील तर या क्षारानें ती स्थिति सुधारते, आणि जठरानलांतलि व कोठ्यांतलि मध्यम प्रतीच्या श्लेष्मल त्वचेला सूज येऊन झालेले आभिष्यंद वगैरे विकारांवर याचा उपयोग यशस्वी होतो. अम्लातिशयामुळें पीडाजनक अग्निमांद्य झालें असतां जेवणापूर्वी अर्धा तास या क्षाराचे दहा ग्रेन देतात. कोठा व यकृत यांस उत्तेजित करण्याचा धर्म याच्या अंगीं आहे.त्याच प्रमाणें याच्या अंगी थोडासा मूत्रलपणा असून हा स्वेदोत्पादक आहे. मज्जातंतूच्या कांहीं विकारांवर हा क्षार तर हटकून गुणकारक समजतात,

बाह्योपचाराकरितां नवसागराच्या द्रवांत तितकें सोरमीठ (पालाशनात्रित)मिळवून लावलें असतां तें उत्तम शीतक धावन म्हणजे जखम धुण्याचें औषध होतें. आवाळू—गळू वगैरे निचरण्याकरितांहि याचा उपयोग करितात.

अमोनिस्तंभिद—नउ,स्त अमोनिस्तंभिद यास इं. ना. आमोनियम ब्रोमाइड असें आहे. अम्नवर स्तंभ (ब्रोमिन) ची क्रिया केली म्हणजे हा क्षार तयार होतो. याचे वर्गहीन समपार्श्वाकाराचे (प्रिझ्म) स्फटिक होतात. यास खारट रुचि असते. हे उष्ण केलें असतां नवसागराप्रमाणें उडून फूल धरतात. हा क्षार पाण्यांत सहज विद्राव्य आहे. हवेंत उघडा राहिल्यास यावर हवेचा परिणाम घडून हलके हलके यास पीतवर्ण प्राप्त होतो व त्याच्या अंगीं अम्ल धर्म येतो. या क्षाराचा प्रकाशलेखनाच्या (फोटोग्राफी) कामीं फार उपयोग होतो.

**अमोनिअदिद.**—नउ$_4$द ( अमोनियम आयोडाइड ) उद् अदाम्ल (हायड्रो आयोडिक ॲसिड) व अम्न यांच्या संयोगानें हा क्षार तयार होतो. हा पाण्यांत सहज विद्राव्य असून त्याचे घनस्फटिक वर्णहीन असतात. हा क्षार अल्कहलांतहि विद्राव्य आहे. आर्द्र हवेंत उघडा राहिल्यास हा हलके हलके पृथग्भूत होऊन पिंवळसर होतो. हा पीतवर्ण पृथग्भूत झालेल्या अद (आयोडीन) मुळें येतो. याकरितां हा क्षार अंधारांत व अगदीं कोरड्या जागेंत ठेवावा. कारण नुसत्या प्रकाशानें सुद्धां याचें पृथक्करण सुरु होतें. अमोनि स्तंभप्रमाणें या क्षाराचाहि उपयोग प्रकाशलेखनकलेंत करतात.

**अमोनिप्लविद**—नउ$_4$प्ल (अमोनिफ्लुओराइड ) अम्न वायूच्या योगें उद् प्लवाम्ल ( हायड्रोफ्लुओरिक ॲसिड ) निर्गुण केलें म्हणजे हा क्षार तयार होतो. याचे लहान चतुरस्र स्फटिक असतात. यास तीक्ष्ण खारट रुचि असते. हा क्षार पाण्यांत अति विद्राव्य आहे. सिकित (सिलिकेट्स) क्षाराशीं युक्त करून हा क्षार उष्ण केला असतां सिकितांचें पृथक्करण होतें.

**अमोनिहरित**—नउ$_4$ह प्र$_3$ ( अमोनियमक्लोरेट ) हराम्ल उहप्र$_3$ ( क्लोरिक ॲसिड ) हें अम्न, किंवा अमोनि कर्बित यांच्या योगानें निर्गुण केलें म्हणजे हा क्षार तयार होतो. किंवा स्तंभ, खांत आणि खट यांच्या हरितांच्या द्रवांत अमोनि कर्बिताचा द्रव घालून हे धातू निपात केले म्हणजे द्रवांत हा क्षार रहातो. याचे लहान सूचिकाकार स्फटिक होतात, हे पाण्यांत सुलभ विद्राव्य असतात. हे स्फटिक १०२° श उष्णमानावर उष्ण केले असतां पृथग्भूत होतात आणि नत्र, हर, व प्राण हे असंयुक्त होऊन निघूं लागतात. हा क्षार सजल अल्कहलाच्या सौम्य द्रवांत विद्राव्य आहे परंतु तीव्र अल्कहलांत अविद्राव्य आहे.

**अमोनिनत्रित**—नऊ$_4$ नप्र$_3$ ( आमोनियम नायट्रेट ) नत्राम्ल हें अम्न, किंवा अमोनि कर्बित यांनीं निर्गुण करून किंवा पालाश नत्रित ( पोट्याशियम नायट्रेट ) व अमोनि गंधकित ( अमोनियम सल्फेट ) यांचें द्वित्त पृथक्करण करून हा क्षार तयार करतात. याचे निरनिराळ्या उष्णमानावर निरनिराळ्या आकाराचे स्फटिक तयार होतात. द्रवाचें उष्णमान ३५° श. ८३° श. व १२५° श. वर निरनिराळ्या आकाराचे स्फटिक होतात. द्रव सावकाश आटूं दिला तर चतुर्भुज कांड्या बनतात. उकळत असतांना आटविला तर तंतुमय गोळा होतो. यास तिक्ष्ण खारट व कडवट रुचि असते; हा क्षार कांहींसा आर्द्रताशोषक आहे. हा क्षार पाण्यांत विरघळत असतां पाण्याचें उष्णतामान अतिशय उतरतें व तें १५° श पर्यंतहि नेतां येतें. या धर्मामुळें या क्षाराचा उपयोग शीततजनक मिश्रण तयार करण्याकडे करितात. हा क्षार अग्नीवर टाकला असतां वितळतो, तडतडतो व पेटतो, याची ज्योत निळसर रंगाची असते. मंद उष्णतेवर हा क्षार वितळतो. २१०° श वर याचें पृथक्करण होतें व पाणी व हास्यकारक वायु हे उत्पन्न होतात हे खालील समीकरणावरून दिसून येईलः—

| अमोनिनत्रित | | पाणी | | हास्यकारकवायु |
|---|---|---|---|---|
| नउ$_4$नप्र$_3$ | = | २उ$_2$प्र | + | न$_2$प्र |

हास्यकारक वायूंत गूल असलेली काडी धरली असतां ती हवेंतल्या पेक्षां जास्त तेजस्वी ज्योतीनें जळूं लागते. हा वायु श्वासाबरोबर हुंगला तर मनुष्याच्या शरीरावर एक चमत्कारीक प्रकारचा मादक परिणाम घडतो आणि त्यास आवेश येऊन तो फार हसूं लागतो म्हणून यास हास्यकारक वायु असें म्हणतात. या वायूचा शोध १९ व्या शतकांत वेल्स यानें लावून त्याचा हा अपूर्व धर्म शोधून काढला. यामुळें शस्त्रक्रियेंत बरीच क्रांति झाली. पूर्ण बेशुद्धि येण्यास ४–५ ग्यालनभर हा वायु लागतो. इ. स. १८८३ मध्यें बर्थेलाट यानें दाखविलें कीं अमोनिनत्रित एकदम झपाट्यानें उष्ण केलें तर खालीं दाखविल्याप्रमाणें पृथक्करण होऊन मोठा स्फोट होतोः—

| अमोनिनत्रित | | पाणी | | नत्र | | प्राण |
|---|---|---|---|---|---|---|
| २नउ$_4$. नप्र$_3$ | = | उ$_2$प्र | + | २न$_2$ | + | प्र$_2$ |

**अमोनिनत्रायित**—नउ$_4$ नप्र$_2$ ( अमोनियम नायट्राइड ) अम्न वायूवर ओपग ( ओझोन ) किंवा उज्जपरिप्राणिद ( हायड्रोजन पेरॉक्साइड ) यांनीं प्राणिली क्रिया केली म्हणजे हा क्षार तयार होतो. या रीतिनें किंवा उष्ण प्लातिनच्या सांनिध्यांत हवेच्या योगानें खालीं दाखविल्याप्रमाणें अम्नची प्राणिली क्रिया केली तरी त्याचें या अमोनि नत्रायितांत पूर्णपणें रूपांतर होत नाहीं:—

| अम्न | | प्राण | | अमोनिनत्रायित | | पाणी |
|---|---|---|---|---|---|---|
| २नउ$_3$ | + | प्र$_3$ | = | नउ$_4$नप्र$_2$ | + | उ$_2$प्र |

भार, ( बेरियम ), किंवा सीस ( लेड ) नत्रायिताच्या द्रवांत अमोनि गंधकित ( सल्फेट ) चा द्रव घालावा किंवा रजत नत्रायिताच्या द्रवांत अमोनि हरिदाचा द्रव घालावा जो सांका येईल तो गाळून येणारें गळण ( फिल्ट्रेट ) न उकळतां अति मंद उष्णतेवर किंवा शोषक पात्रांत आटवावें म्हणजे अमोनि नत्रायिताचे वर्णहीन स्फटिक बनतात. हे पाण्यांत अतिशय विरघळतात.

अमोनि नत्रायिताचें उष्णतेनें सहज पृथक्करण होऊन नत्रवायु उत्पन्न होतो करितां नत्रवायु तयार करण्याकरितां या क्षाराचा उपयोग करितात.—

| अमोनिनत्रायित | | नत्र | | पाणी |
|---|---|---|---|---|
| नउ$_4$ नप्र$_2$ | = | न$_2$ | + | २उ$_2$प्र |

ही पृथक्करणाची क्रिया द्रव उकळला तरीहि होते. यामुळें पालाश नत्रायित ( पोट्याशिअम नायट्राइट ) आणि अमोनि हरिद यांच्या द्रवांचें मिश्रण नत्रवायु तयार करण्याकरितां उपयोगांत आणतात.

या क्षाराचें अस्तित्व पावसाच्या पाण्यांत व उज्जवायु वातावरणांत जाळून तयार केलेल्या पाण्यांत आढळून येतें.

अमोनिस्फुरित—( अमोनियम फास्फेट ) अम्न वायूचा दाट द्रव व स्फुराम्ल हे मिश्र केले म्हणजे वैधिक ( नॉर्मल ) अमोनि स्फुरिताचा स्फटिकरूप पूड तयार होते. वैधिक अमोनि स्फुरिताची सारणी (नउ$_4$ )$_3$ स्फुप्र$_4$ अशी आहे. अम्ल स्फुरित ( नउ$_4$ )$_2$ उस्फुप्र$_4$ च्या द्रवांत प्रमाणाधिक्यानें अम्नद्रव मिळविला म्हणजेहि हा वैधिक अमोनि स्फुरित तयार होतो. हा क्षार पाण्यांत विद्राव्य आहे. हा द्रव उकळला असतां अम्न निघून जातो आणि अम्नस्फुरित नउ$_4$उ$_2$स्फुप$_4$ क्षार तयार होतो.

द्विअमोनिउज्ञस्फुरित ( डायअमोनियम हायड्रोजन फास्फेट ) (नउ$_4$ )$_2$उस्फुप्र$_4$ हा क्षार स्फुराम्लाच्या द्रवांत प्रमाणाधिक्यानें अम्न घालून तो द्रव आटविला म्हणजे तयार होतो. याचे पारदर्शक मोठे चतुरस्र ( क्वॉड्रॅटिक प्रिझम ) स्फटिक होतात. हे उष्ण केले असतां वितळतात व पृथग्भूत होतात. शेष राहतो तो मितस्फुराम्लाचा ( मेटा फॉस्फोरिक ॲसिड ) उस्फुप्र$_3$ चा राहतो. अमोनि द्विउज्ज स्फुरित नउ$_4$ उ$_2$ स्फुप्र$_4$ ( अमोनियम डायहायड्रोजन फास्फेट ) हा क्षार अम्नच्या द्रवांत स्फुराम्लाचा द्रव पूर्ण अम्ल होईपर्यंत मिळविला म्हणजे तयार होतो. याचे चतुरस्र ( क्वाड्रॅटिक प्रिझम ) स्फटिक असतात.

उज्ञसिंधुअमोनिस्फुरित.—उधुनउ$_4$स्फुप्र$_4$४उ$_2$प्र या क्षारास इंग्रजी मध्यें हायड्रोजन, सोडियम, अमोनियम फॉस्फेट किंवा मायक्रोकॉस्मिक साल्ट असें म्हणतात.

उज्ञ सिंधुस्फुरित ( हायड्रोजन सोडियम फास्फेट ) याच्या उष्ण ६ भाग दाट द्रवांत १ भाग नवसागराचा दाट द्रव मिळविला म्हणजे हा क्षार तयार होतो. यांत क्रिया प्रतिक्रिया होतात त्या खालीं दाखविल्या आहेतः—

$$\frac{\text{उज्ञसिंधुस्फुरित}}{\text{धु}_2\text{उस्फुप्र}_4} + \frac{\text{नवसागर}}{\text{नउ}_4\text{ह}} = \frac{\text{उज्ञ सिं.अमोनिस्फु.}}{\text{उधुनउ}_4\text{स्फुप्र}_4} + \frac{\text{सिंधु.ह.}}{\text{धुह}}$$

याचे आरपारदर्शक मोठमोठे स्फटिक तयार होतात. हे स्फटिक पाण्यांत विद्राव्य असतात. ते उष्ण केले असतां त्यांची लाही होते. रक्तोष्णतेवर त्यास खदखदून उकळी येते व शेवटीं त्याची आरपारदर्शक कांच बनते. या कांचेची सारणी धुस्फुप्र$_3$ असते. ती अशीः—

$$\frac{\text{उज्ञसिं. अमोनिस्फु.}}{\text{उधु}_3\text{नउ}_4\text{स्फुप्र}_4} = \frac{\text{अम्न}}{\text{नउ}_3} + \frac{\text{पाणी}}{\text{उ}_2\text{प्र}} + \frac{\text{सिंधुमितस्फु. (कांच)}}{\text{धुस्फुप्र}_3}$$

ही सिंधुमित स्फुरिताची कांच हिचा मुख्यत्वें फुंकनळीच्या ज्योतींत धातूंची परीक्षा करण्यास उपयोग होतो. या कांचेच्या अंगीं टंकणखारा ( बोरॅक्स )प्रमाणें बहुतेक धातूंचे प्राणिद विरघळविण्याचा धर्म आहे, हे धातूंचे प्राणिद व ही सिंधुमित स्फुरिताची कांच मिळून जी कांच होते तीस धातूंच्या प्रकाराप्रमाणें निरनिराळ्या प्रकारचे रंग येतात यामुळें जातिपरीक्षा ( क्वालिटेटिव्ह अनॅलिसिस ) करण्याकरितां या क्षाराचा फार उपयोग होतो.

हा क्षार मनुष्यांच्या पृथग्भूत झालेल्या शिळया मूत्रांत व ग्वानो नांवाच्या पक्षांच्या मलांत सांपडतो. ऐतिहासिक दृष्टया या क्षाराला विशेष महत्व आहे कारण याच क्षाराचा उपयोग ब्रँड यानें स्फुर ( फास्फोरस ) तयार करण्याकरितां प्रथम केला होता.

अमोनिगंधकित.—(नउ$_4$ )$_2$ गप्र$_4$ (अमोनियम-सल्फेट ) सौम्य गंधकाम्लाच्या द्रवांत अम्न द्रव किंवा अमोनि कर्बिताचा द्रव निर्गुण होईपर्यंत घालावा म्हणजे हा क्षार तयार होतो. मोठ्या प्रमाणावर हा क्षार दगडी कोळशांच्या धुराच्या कारखान्यांत व प्राणिज कोळसे तयार करण्याच्या कारखान्यांत जे अल्क द्रव निघतात त्यांत चुनकळी घालतात, नंतर त्यास उष्ण करून त्यांतून जो अम्नवायु निघतो तो जलमिश्रित गंधकाम्लांत सोडून शोषूं द्यावा. तो द्रव आटविला म्हणजे अमोनि गंधकिताचे स्फटिक वेगळे होतात ते पुनः पाण्यांत विरवून स्फटिकीभवनानें शुद्ध करून घ्यावें.

धर्म.—याचे स्फटिक चपट्या कांड्यासारखे असतात ते पालाशगंधकितासारखे आकारानें असतात. हा क्षार त्याच्या दुप्पट वजनाच्या थंड व त्याच्या इतक्यांतच उकळत्या पाण्यांत विरघळतो. याच्या द्रवास फार वाईट रुचि असते. उष्ण केला असतां हा तडतडतो व नंतर वितळतो. याचा द्रव उकळला असतां अम्न वायु निघून जाऊन शेष क्षार अम्ल गंधकित होतो. अमोनि गंधकित अल्कहलांत अविद्राव्य आहे.

हा क्षार मोठ्या प्रमाणावर खतांकरितां तयार करितात. खताशिवाय या क्षाराचा दुसरा उपयोग वस्त्रें एकाएकीं न जळावीं आणि जळलीं तरी ज्वाळा उत्पन्न होऊं नये म्हणून त्यांस लावण्यास करितात. याशिवाय अम्नचे दुसरे क्षार तयार करण्यासाठीं याचा उपयोग करितात.

अमोनिगंधकिद—( नउ$_4$ )ग$_2$ ( अमोनियम सल्फाइड ) एका भाड्यांत अम्न वायु मीठ व बर्फ यांच्या मिश्रणानें थंड करून त्याच्या अर्ध आकारमानाइतका उज्जगंधकिद वायु त्यांत मिळविला म्हणजे हा क्षार वर्णहीन स्फटिकरूपांत तयार होतो. परंतु हा पदार्थ फार अस्थिर असल्यानें साधारण उष्ण मानावर सुद्धां हवेच्या संसर्गात त्याचें पृथक्करण होऊन अम्नवायु सुटा पडतो. त्याचें रूपांतर अमोनि उद्‌गंधकिदांत ( अमोनियम हायड्रो सल्फाइड ) नउ$_4$उग होतें. उज्जगंधकिद वायु व अम्नवायु शांत करून समाकारमानांत एकत्र केलें किंवा अम्नचा अल्कहलांत ( आल्कोहाल ) द्रव करून त्यांत उज्जगंधकित वायूचें शोषण केलें म्हणजे अमोनि उद्‌गंधकिदाचे वर्णहीन स्फटिक तयार होतात. हे स्फटिक सूचिकाकार असून अतिशय बाष्पभावी ( व्होलटाईल) असतात. यांचें तावडतोब अम्नवायु व उज्जगंधकिद यांत पृथक्करण होतें.

अम्नच्या दाट द्रवांत ०° श उष्ण मानावर उज्जगंधकिद वायु शोषला जाईल तितका घातला म्हणजे वर्णहीन द्रव नउ$_४$. उग चे स्फटिक निराळे होतात. हवेच्या संसर्गांत हा द्रव लवकरच पिवळा होतो कारण त्यांत ( नउ$_४$ )$_२$ गक्ष या घटनेचे अनेक अमोनि बहुगंधकिद ( अमोनियम पॉलिसल्फाइड्स ) तयार होतात. सरते शेवटीं त्या द्रवांत गंधकाचा निपात होऊन द्रव वर्णहीन होतो व गांधिक ( थियो ) गंधकित, गंधकायित ( सल्फाइट ) आणि अमोनीचा गंधकित ( अमोनियम सल्फेट ) हे क्षार तयार होतात. ताज्या तयार केलेल्या अमोनि उदगंधकिदाच्या वर्णहीन द्रवांत अम्ल मिळविलें तर द्रव स्वच्छ राहतो व त्यांतून उज्ज गंधकिद निघतो तो असाः—

| अमोनि उदगंधकिद | | उद–हराम्ल | | नवसागर अमो.हरि. | | उज्ज–गंधकिद |
|---|---|---|---|---|---|---|
| नउ$_४$उग | + | उह | = | नउ$_४$ह | + | उ$_२$ |

परंतु द्रव जर पीतवर्ण आधींच झालेला असेल तर दुधासारखा गंधकाचा निपात ( अम्ल मिळविल्यावर ) येतो, कारण बहुगंधकिदांचें पृथक्करण होतें. या बहुगंधकिदांपैकीं बहुतकरून अमोनिद्विगंधकिद (नउ$_४$)$_२$ग$_२$ हा एक असलाच पाहिजे.

बॉयलेचा बाष्पयुक्त द्रव या नांवाचा जो असह्यवासाचा पीतद्रव मिळतो त्याचे मुख्य घटक अमोनि बहुगंधकिदच असतात. हा द्रव चुना, गंधक व नवसागर एकत्र करून त्या मिश्रणाचें ऊर्ध्वपातन करून तयार करतात. या द्रवांतून नेहमीं बहुगंधकिदाचे पिवळे स्फटिक निपात झालेले दिसतात. अमोनिद्विगंधकिदाच्या द्रवांत गंधक विरविला म्हणजे नारंगी, पिवळ्या वर्णाचे चतुरस्त्र ( प्रिस्मॅटिक ) स्फटिक तयार होतात. हे स्फटिक अमोनि पंच गंधकिद ( अमोनियम पेन्टा सल्फाइड ) (नउ$_४$ )$_२$ग$_४$ या क्षाराचे असतात.

**अमोनिकर्बित**—( नउ$_४$ )$_२$ कप्र$_३$ ( अमोनियम-कार्बोनेट ) कर्बाम्ल वायु ( कॅर्बानिक ॲसिड गॅस ) आणि अम्न वायू एकत्र मिश्र केले म्हणजे अम्नवायूचीं दोन मापें, कर्बाम्ल वायूच्या एका मापाशीं संयोग पावून अमोनिकर्बित हा पांढरा पदार्थ बनतो. परंतु या रीतीनें हा क्षार मोठ्या प्रमाणावर तयार करीत नाहींत. हा क्षार मोठ्या प्रमाणावर तयार करण्याकरितां अमोनि गंधकितांत त्याच्या दुप्पट खडूची पूड मिश्र करून त्याच्या मिश्रणाचें लोखंडाच्या किंवा मृत्तिकेच्या मेघडंबरी(ए लार्जरिटॉर्ट)मध्यें ऊर्ध्वपातन करतात. अमोनि गंधकिताच्या ऐवजीं अमोनिहरिदाचाहि उपयोग करतात. ही मेघडंबरी एका मोठ्या लोखंडी नळाला जोडलेली असते, व हा नळ एका शिशाच्या ग्राहकाला जोडलेला असतो. या ग्राहकांत अमोनि कर्बित मूळरूपानें जमतो. शुद्ध करण्यासाठीं याचें पुनः लोखंडी पात्रांत ऊर्ध्वपातन करून त्यावरील शिशाच्या घुमटांत–डेऱ्यांत त्याचें फूल धरावें लागतें. खडूची पूड म्हणजे खटकर्बित याचें रासायनिक कार्य अमोनि गंधकितावर झालें म्हणजे वास्तविक वैधिक ( नॉर्मल ) अमोनिकर्बित (नउ$_४$)$_२$कप्र$_३$ हा क्षार तयार झाला पाहिजे व तो तयार होतांना त्याचें अम्ल अमोनिकर्बितांत पुढीलप्रमाणें रूपांतर होतें.

| अमोनिकर्बित | | अम्ल अमोनिकर्बित |
|---|---|---|
| क प्र( प्र नउ$_४$)(प्रनउ$_४$)... ...(न उ$_४$ )$_२$ क प्र$_३$ | = | कप्र(प्र नउ$_४$) (प्रउ)... ....(नउ$_४$ उ क प्र$_३$) |

त्याचप्रमाणें त्याच वेळीं अमोनिकर्बामित ( अमोनियम कार्बमेत ) यामध्येंहि अमोनिकर्बिताचें रूपांतर होतें तें असें:—

| अमोनिकर्बित | | अमोनिकर्बामित | | पाणी |
|---|---|---|---|---|
| कप्र(प्रनउ$_४$)(प्र नउ$_४$) | = | कप्र(प्रनउ$_४$)(नउ$_३$) | + | उ$_२$प्र |

बाजारी अमोनिकर्बित असतो तो बहुतकरून अम्ल अमोनिकर्बिताचे २ अणु व अमोनिकर्बामिताचा एक अणु या प्रमाणांत मिश्रित असतो. त्यावर तीव्र अल्कहल घातला असतां त्यांत अमोनिकर्बामित विद्रुत होतो व अम्ल अमोनिकर्बित अविद्रुत शेषरूपांत राहतो.

अमोनिकर्बितास हवा लागली म्हणजे त्यास अम्नचा वास येतो व हलके हलके त्याचें अम्न अमोनिकर्बितांत नउ$_४$उकप्र$_३$ रूपांतर होतें. बाजारी कर्बितावर थोडेंसें पाणी घातलें तर अम्ल अमोनिकर्बित अविद्रुत स्थितींत राहून अमोनिकर्बामिताचें रूपांतर वैधिक अमोनिकर्बितांत होतें व तो पाण्यांत विद्रुत होतो. हें रूपांतर खालीं दाखविलें आहेः—

| अमोनिकर्बामित | | पाणी | | अमोनिकर्बित |
|---|---|---|---|---|
| कप्र(प्र नउ$_४$)(नउ$_३$) | + | उ$_२$प्र | = | (नउ$_४$)$_२$कप्र$_३$ |

बाजारी कर्बितांत तीव्र अम्न द्रव घातला असतां अमोनिकर्बिताचे (नउ$_४$)$_२$ कप्र$_२$ स्फटिक होतात. या स्फटिकांत पाण्याचा १ अणु असतो. हे हवेंत चिघळतात (डेलिकेसंट), त्यांतून अम्न नउ$_३$ निघतो व त्याचें रूपांतर खालीं दाखविल्याप्रमाणें द्विकर्बितांत ( अम्लकर्बितांत) होतें:—

| अमोनिकर्बित | | अम्न | | अमोनि द्विकर्बित |
|---|---|---|---|---|
| (नउ$_४$)$_२$कप्र$_३$ | = | नउ$_३$ | + | नउ$_४$ उ कप्र$_३$ |

बाजारी हुंगावयाचा क्षार ( स्मेलिंग साल्ट ) असतो त्यास कधीं कधीं सार्धकर्बित ( सेस्की कार्बोनेट ) असेंहि म्हणतात. याचे ताजेपणीं पारदर्शक रेषामय खडे असतात. यास शुद्ध अम्नवायूसारखा उग्र व झणझणीत वास येतो व याच्या अंगीं तीव्र अल्कधर्महि असतात. कारण त्यांतून अमोनिकर्बित एकसारखा उडून जात असतो. यामुळें कांहीं वेळ याचे स्फटिक उघडे ठेविले असतां अपारदर्शक होऊन त्यावर अमोनिद्विकर्बिताचा भुका जमतो. बाजारी हुंगण्याच्या क्षारांत बहुतेक नवसागर आणि पालाशकर्बित यांच्या चूर्णाचें मिश्रण असतें. यांचें एकमेकांवर रसायनकार्य घडून उडणारा कर्बित तयार होतो, म्हणून कुपींतून वास कमी येऊं लागला म्हणजे हलविल्यानें अगर काडी घालून

ढवळल्यानें अथवा पाण्याचा थेंब टाकल्यानें पुनः तीव्र वास येऊं लागतो. अल्कहलांत केलेला या क्षाराचा जो द्रव असतो त्यास वाष्पभावी क्षार (सॅल व्हालटाईल) म्हणतात व रोगी कमी वेशुद्ध झाला असता त्यास हुंगारी आणण्याकरितां देतात.

हुंगण्याकरितां व औषधाच्या कामीं याचा फार उपयोग होतो. याशिवाय रोटीवाले व मिठाईवाले हलक्या स्पंजासारख्या रोट्या, बिस्किटें, पाव वगैरे करण्याकडे या क्षाराचा उपयोग करतात.

याशिवाय अम्नचे दुसरे क्षार तयार करण्याकरितां याचा उपयोग करतात. ज्या अम्लाचे क्षार पाहिजेत तें अम्ल त्यांत टाकिलें म्हणजे ते क्षार तयार होतात. अमोनिकर्बितांत नत्राम्ल घातलें म्हणजे अमोनिनात्रित तयार होतो. संत्राम्ल ( सायट्रिक ॲसिड ) घातलें म्हणजे अमोनि संत्रित होतें, दार्वाम्ल ( असेटिक ॲसिड ) मिळविलें म्हणजे अमोनिदार्वित होतें.

अ मो नि द्वि क र्बि त—नउ$_{४}$उकप्र$_{३}$ ( अमोनियम बायकार्बोनेट ) अम्ल अमोनि कर्बित अमोनि द्विकर्बित किंवा उद्ग अमोनि कर्बित हा क्षार अमोनीचे जे संयुक्त पदार्थ आहेत त्या सर्वांत अतिशय स्थिर आहे. बाजारी अमोनिकर्बित थोड्याशा उकळत्या पाण्यांत विरविला म्हणजे थंड झाल्यावर हा क्षार स्फटिकीभवनानें वेगळा होतो. अमोनिकर्बिताच्या द्रवांत कर्बाम्ल वायूचा प्रवाह सोडला म्हणजे अम्ल अमोनि कर्बित तयार होतो. या क्षाराचे स्फटिक पालाश द्विकर्बिताच्या क्षारासारखे असतात. हा क्षार गंधहीन असून निर्गुण असतो. १५° श उष्णमानाच्या साडे पांच पट पाण्यांत हा क्षार विरघळतो यावरून विरघळण्याचें याचें प्रमाण कमी दिसून येईल अमोनिकर्बिताचा पाण्यांत केलेला द्रव हवेंत उघडा ठेवला किंवा उष्ण केला तर त्यांतून कर्बाम्ल असंयुक्त होऊन निघतें व द्रव अल्कीय होतो. अमोनीचे जे दुसरे कर्बित आहेत त्यांचेहि द्रव उकळले असतां त्यांतून अम्नवायु व कर्बाम्ल असंयुक्त होऊन निघूं लागतात.

अम्लअमोनिकर्बिताचें महत्त्व औद्योगिकदृष्ट्या अतिशय आहे; कारण मिठापासून सिंधु कर्बित ( धाशिंग सोडा ) करण्याच्या कामीं हाच क्षार मुख्य कार्यकारी आहे, हें खालील समीकारणावरून दिसून येईल.

मीठ(सिंधुह.) अम्ल अमोनि कर्बि. अमोनिह. सिंधु द्वि.
धुह + नउ$_{४}$ उकप्र$_{३}$ = नउ$_{४}$ह + धुउकप्र$_{३}$
सिंधु द्विकर्बित भाजला म्हणजे सिंधु कार्बित होतो.

या कामीं अमोनि द्विकर्बित प्रत्यक्ष वापरीत नाहींत. मिठाच्या द्रवांत अम्नवायु संयुक्त करून त्यांत कर्बाम्लाचा प्रवाह सोडतात म्हणजे अम्नचें अमोनिकर्बित व नंतर अम्ल अमोनि कर्बितांत रूपांतर होतें तें असें:—

अम्न पाणी कर्बद्विप्राणिद अमोनिकार्बित
(१) २ नउ$_{३}$ + उ$_{२}$प्र + कप्र$_{२}$ + (नउ$_{४}$)$_{२}$कप्र$_{३}$
अमोनिकर्बित कर्बद्विप्राणिद पाणी अम्ल अमोनिकार्बित
(२)(नउ$_{४}$) कप्र$_{३}$+ कप्र$_{२}$ = उ$_{२}$प्र + २नउ$_{४}$ उ$_{३}$ कप्र$_{३}$

अमोनीचे कर्बित धातूंच्या क्षारांशीं संयोगपावून द्विक्षार बनतात.

अ मो नि क र्बा मि त–( अमोनियम कार्बमेट ) अम्नवायु व कर्बाम्लवायु हे दोन्ही पूर्ण निर्जल स्थितींत एकत्र मिसळले म्हणजे अमोनि कर्बामित हा पांढरा घन क्षार तयार होतो. हा पाण्यांत सहज विद्राव्य आहे. परंतु या द्रवास कांहीं वेळ गेला किंवा हवा लागली म्हणजे अमोनि कर्बामिताचें रूपांतर अमोनि कर्बितांत होतें. अमोनि कर्बामिताचा ताजा द्रव करून त्यांत खट हरिदाचा द्रव घातला तर सांका ( निपात ) येत नाहीं. परंतु कांहीं वेळ गेला किंवा त्यास उष्णता लावली म्हणजे खट कर्बिताचा निपात येऊं लागतो.

अमोनि कर्बामित एका नळींत घालून दोन्ही तोंडें बंद करून १३०° श उष्ण मानाइतकी उष्ण केली तर त्याचे अमोनि कर्बित आणि मोत्रक ( युरिया ) असें रूपांतर होतें जसें:—

अमोनिकर्बामित अमोनिकर्बित मौत्रक
२(नउ$_{४}$कप्र$_{२}$नउ$_{२}$) + (नउ$_{४}$)$_{२}$कप्र$_{३}$ + कप्रउ$_{४}$न$_{२}$

कर्ब अमिनाम्ल ( कार्बमिक ॲसिड ) उकप्र नउ$_{२}$ हें अद्याप असंयुक्त स्थितींत काढून निराळे करण्यांत आलें नाहीं. परंतु या अम्लाचें साम्य कर्बाम्लाशीं किती आहे हें त्यांच्या सारणीच्या तुलनेवरून दिसून येईल.

| कर्बाम्ल | कर्बअमिनाम्ल |
|---|---|
| कप्रप्रउप्र.उ | कप्रप्रउ नउ |

अमोनिकर्बामितांशिवाय दुसरे कर्बामित तयार करणें असेल तर निरनिराळ्या अनाम्लां ( बेस ) च्या दाट द्रवांत अम्न संयुक्त करून त्यांत कर्बाम्लांचा प्रवाह घालावा व नंतर अल्कहल घालून कर्बामिताचा निपात करावा.

कर्बामितांचें महत्त्व नत्र वायु तयार करण्याच्या दृष्टीनें अतिशय आहे. त्यांवर सिंधु उत्प्राणिद ( सोडियम हायड्रॉक्साइड ) आणि सिंधु अधि स्तंभायित ( सोडियम हायपो ब्रोमाइट ) याच्या मिश्रणाची क्रिया केली म्हणजे नत्र वायु निघतो जसें:—

सिंधु कर्बामित सिंधु अधि स्तंभायित सिउत्प्राणिद
२(क्प्रनउ$_{२}$प्रधू ) + ३ धुप्रस्त + २ धुप्रउ
सिंधुकर्बित सिंधूस्तंभिद पाणी नत्र
= २ कप्र(प्रधु)२ + ३धुस्त + ३उ$_{२}$प्र + न$_{२}$

सिंधु कर्बामिताच्या द्रवांत सिंधु अधिहरायित ( सोडियम हायपोक्लोराइड ) व सिंधु अधि उत्प्राणिद यांचें मिश्रण मिळविलें तर नत्र वायु निघत नाहीं स्तंभिदाचा द्रव मिळवितांच नत्र वायु निघूं लागतो. यावरून अति सौम्य

द्रवांत स्तंभिदाच्या अस्तित्वाची परीक्षा तयार करण्याकरितां ही रासायनिक क्रिया अत्यंत महत्त्वाची आहे. या कामीं लागणारा सिंधु कर्बाभिताचा द्रव तयार करण्याकरितां सिंधु उत्प्राणिदाच्या दाट द्रवांत अमोनि कर्बामित विरवावें व तो द्रव तीव्र गंधकाम्लावर १ किंवा २ दिवस कांचेच्या हंडी-खालीं ठेवावा.

अ म्न किं वा अ मो नि क्षा र यां ची प री क्षाः—अमोनिचे क्षार रंगहीन असतात. त्यांपैकीं पुष्कळ आरक्तोष्णतेनें उडून जातात व त्यांचें फूल धरतां येतें. परंतु टंकाम्ल ( बोरेसिक ॲसिड ) किंवा स्फुराम्ल ( फास्फोरिक ॲसिड ) प्रमाणें स्थिर अम्लाचे अमोनिक्षार असल्यास ते पृथग्भूत न होतां त्यांतून अम्न व पाणी उडून जातात. अम्नचें अस्तित्व पदार्थांत आहे किंवा नाहीं हें खालीं दिलेल्या परीक्षांवरून ओळखावें:—

( १ ) एका परीक्षा नळींत थोडासा अमोनि क्षाराचा द्रव घेऊन त्यांत दाहक पालाश ( कॉस्टिक पोट्याश) किंवा चुना यांचा द्रव घालून नळीस उष्णता लावावी. म्हणजे अम्नचा तिखट वास येईल. तांबडा लिटमसाचा कागद ओलसर करून नळीच्या तोंडाशीं धरला तर निळा होईल, हळदीचा ओलसर कागद लाल होईल. उद्–हराम्लामध्यें कांचेचा दांडा बुडवून नळीच्या तोंडाशीं धरला तर तें अम्ल व अम्नवायु यांचा संयोग होऊन नवसागराचा पांढरा धूर निघेल.

( २ ) पदार्थ पाण्यांत अविद्राव्य असल्यास त्यांत चुन-कळीची पूड व दाहक सिंधु ( किंवा पालाश ) मिसळून वरीलप्रमाणें परीक्षा करावी.

( ३ ) अमोनि क्षाराच्या द्रवांत अम्ल सिंधु द्राक्षित ( ॲसिड सोडियम टार्ट्रेट ) चा द्रव घातला तर अम्ल अमोनि द्राक्षित ( ॲसिड अमोनियम टार्ट्रेट ) $उनउ_{४}.क_{४}उ_{४}प्र_{६}$ चा पांढरा निपात होईल, मात्र द्रव अगदीं दाट असावा. हा निपात अम्लांत तसेंच पाण्यांत विद्राव्य असल्यानें अतिपातळ द्रवांत किंवा अम्लयुक्त द्रवांत येणार नाहीं. द्रव अति दाट असल्याशिवाय हा निपात एकदम येत नाहीं; द्रव हलविला असतां किंवा ढवळिला असतां निपात लवकर होतो. ही परीक्षा कधीं कधीं चांगली लागू पडते परंतु पुष्कळ प्रसंगीं लागू पडत नाहीं.

( ४ ) प्लातिन हरिद( प्लाटिनम क्लोराइड )चा द्रव अमोनि क्षाराच्या दाट द्रवांत घातला म्हणजे पिंवळा स्फटिक रूप अमोनि प्लातिन हरिद $(नउ_{४})_{२}प्लाह_{३}$ सांका बसेल. हा सांका अल्कहलांत अविद्राव्य असतो पण पाण्यांत विद्राव्य असतो यामुळें पातळ द्रवांत सांका येत नाहीं.

( ५ ) ज्या द्रवांत अम्न क्षार फार सूक्ष्म प्रमाणानें असतो व वास घेऊन किंवा दुसऱ्या रीतीनें सहसा परीक्षा होत नाहीं त्या द्रवाची परीक्षा नेसलरच्या द्रवानें करावी नेसलरचा द्रव व त्यानें परीक्षा करण्याची रीत अशीः—

३५ भाग पालाश अदिद ( पोट्याशियम आयोडाइड ) व १३ भाग पारदद्विहरिद ( मरक्युरिक क्लोराइड ) हे ८०० भाग बाष्पजळांत घालून पाणी उकळावें. सर्व क्षार विरघळ-ल्यावर पाणी थंड होऊं द्यावें. हा द्रव पूर्ण थंड झाल्यावर त्यांत पारदद्विहरिदाचा दाट द्रव थेंब थेंब घालावा. यामुळें जो सांका येतो तो ढवळला असतां विरघळत नाहीं इतका सांका येईपर्यंत हा पारदद्विहरिदाचा द्रव जपून मिळवावा. नंतर त्यांत १६० भाग दाहक पालाश ( पोटॅशियम हायड्रेट ), १००० भाग पाण्यांत विरघळवून मिसळावा. दाहक पालाशच्या ऐवजीं दाहक सिंधु घालणें झाल्यास तो १२० भाग घालावा. उर्जित सर्व विरघळल्यावर त्यांत थोडेसें पारदद्विहरिदाचे थेंब घालून एकीकडे ठेवावा. सांका खालीं बसल्यावर वर जो स्वच्छ द्रव येईल त्यास किंचित् पिंवळसर झांक असावी. द्रव जर रंगहीन असेल तर त्यांत पारद-हरिदाच्या द्रवाचे आणखी १–२ थेंब घालावे. हा द्रव उपयोगांत आणण्यापूर्वी बरेच दिवस आधीं केलेला असावा.

ज्या द्रवांत अम्नचा सूक्ष्म अंश असेल त्या द्रवांत हा वरीलप्रमाणें तयार केलेला नेसलरचा द्रव ३।४ थेंब घातला म्हणजे द्रवांत तांबुस, उदी रंग येतो. जरी परीक्ष्य द्रवांत अम्नचा $\frac{१}{१००००००००}$ अंश असला तरी द्रवास तांबुस रंग येतो. नळी पांढऱ्या कागदाच्या आड धरिली म्हणजे रंग स्पष्ट दिसतो. ही परीक्षा करणें ती ज्या खोलींतील हवेंत अम्न किंवा अमोनिक्षाराचा अंशहि नाहीं अशा खोलींत करावी. कारण ही परीक्षा इतकी सूक्ष्म आहे कीं हवेंत अम्नचें अगदीं थोडें प्रमाण असलें तरी त्याची परीक्षा द्रवांत येईल.

अमोनिक्षारांतील अम्नचें प्रमाण काढण्याकरितां परीक्ष्य अमोनिक्षाराचें सिंधु किंवा पालाश उत्–प्राणिदाच्या योगानें ऊर्ध्वपातन करावें. निघून आलेल्या अम्नचें शोषण प्रमाण ( स्टॅन्डर्ड ) गंधकाम्लाच्या द्रवांत करावें. याकरितां गंधकाम्लाचा वैधिक ( नार्मल ) द्रव मोजून घ्यावा. अम्नचें शोषण झाल्यावर अतिरिक्त ( एक्सेस ) अम्लाचें प्रमाण वैधिक ( नॉर्मल ) सिंधुकर्बिताच्या द्रवानें आकारमान ( व्हाल्युमेट्रिक ) परीक्षेनें काढावें.

किंवा अम्नवायूचें शोषण उद्–हराम्लाच्या द्रवांत करून प्लातिन हरिदाच्या योगानें निपात करावा. हा निपात अमोनि प्लातिन हरिदाचा $(नउ_{४})_{२}प्लाह_{६}$ असून त्यांत शेंकडा ८.११ $नउ_{३}$ असतो. या निपाताचें वजन केलें म्हणजे परीक्ष्य पदार्थांतील अम्न $नउ_{३}$ चें प्रमाण निघतें.

**आयकोनियम**(कोनिया).—आयकोनियम हें आशिया मायनर मधील आयकोनियम विलायतेंतील मुख्य शहर. आयकोनियम विलायतीचें क्षेत्रफळ ३९४१० चौ. मैल व लोकसंख्या १०,६९००० आहे. हें शहर एका सुपीक मैदानांत, पिसिडियन पर्वताच्या पश्चिमेस ६ मैलांवर आहे. शेतीसाठीं सध्यां पाटबंधाऱ्यांची येथें फार जरूरी आहे. कारण पाण्याचा अतिशय तुडवडा भासतो.

आयकोनियम हें मूळचें फ्रिजियन शहर होतें. इ. स. पूर्वी १६५ त गॅलेशियन देशाला जोडलेल्या लायकोनियन या छोटेखानी राज्याचें मुख्य शहर होतें. इ. स. पूर्वी २५ पासून इ. स. २९५ पर्यंत याचा गॅलेटिया या रोमन प्रांतांत समावेश होत असे. यानंतर पिसिडिया व लायकोनिया या प्रांतांत हें गेलें. ६६० नंतर तीन शतकें-पर्यंत आयकोनियमला अरबांनीं फार उपद्रव दिला. इ. स. २३५ त ख्रिस्ती संप्रदायाच्या आद्य सभांपैकीं एक सभा येथें भरली होती. सेंटपाल तीन वेळ ह्या शहरीं आला होता असें म्हणतात.

सेल्जुकांनीं १०७२-७४ च्या सुमारास हें शहर जिंकिलें, तेव्हांपासून याची अतिशय भरभराट झाली. नंतर सेल्जुकांनीं ही आपली राजधानी केली व जगांतील अतिशय सुंदर शहर म्हणून आयकोनियम मोठ्या प्रसिद्धीस आलें. सुलतानांचे राजवाडे, अलाउद्दीन कैकोबादची मशीद, मेव्हलेव्ही दरवेशांचे वाडे वगैरे प्रेक्षणीय इमारती सध्यां सुद्धां अवशेषरूपांत दिसतात.

या शहराभोंवतीं दोन मैल लांबीचा तट होता व त्यावर पुष्कळसें खोदकाम केलेलें होतें व कांहीं ठिकाणीं कोरीव काम केलेले संगमरवरी दगड मधून मधून बसविलेले होते त्यामुळें हा तट फारच प्रेक्षणीय दिसे; परंतु याचें विस्तृत वर्णन कोणत्याहि प्रवाश्यांनीं केलेलें आढळत नाहीं.

सेल्जुकांनंतर उस्मानली अथवा ओटोमन, बादशहांची सत्ता सुरू झाली. तेव्हां कोनियाचा ऱ्हास होत गेला परंतु १८९५ त अनाटोलियन रेल्वे चालू झाल्यामुळें आयकोनियमची पुन्हां भरभराट झाली. आयकोनियम विलायतवरच्या फेरिदपाशानें पिण्याच्या पाण्याची चांगली सोय केली. व इतर पुष्कळ सुधारणा घडवून आणल्या (१९०३).

आयकोनियम येथें सध्यां सतरंज्या तयार होतात. येथील लोकसंख्या सुमारें ५०,००० आहे. येथील मुख्य पीक अफूचें होय. येथें पाऱ्याच्या खाणी आहेत व इतरहि धातू सांपडतात शहरांत ओटोमन बँकची शाखा व कांहीं शिक्षणसंस्था आहेत.

**आयटन**.—ब्रह्मपुत्राखोऱ्यांतील जात. आसामांतील या जातीची लोकसंख्या ( १९११ ) ४१४ आहे. १९०१ सालीं जी खानेसुमारी झाली तींत आसामांत सारे ८५ आयटन नोंदले गेले आहेत. तेव्हां बरेचसे लोक शान या मोठ्या जातींत गेले असले पाहिजेत हें उघड दिसतें. शान राष्ट्रजातींतील एका पोटजातीचे हे लोक असून राजघराण्यांतील जनानखान्यांत लागणाऱ्या खोजांचा भरणा या लोकांतून केला जात असे. हे लोक बौद्ध धर्माचे आहेत. [ खानेसुमारी ( १९०१ व १९११ ) रिपोर्ट. ]

**आयर्टन, विलिअम् एडवर्डस्**—या इंग्लिश शास्त्रज्ञाचा जन्म तारीख १४ सप्टेंबर १८४७ रोजीं लंडन येथें झाला. लंडनच्या विश्वविद्यालयांत त्याचें शिक्षण झालें. व सन १८६८ सालीं त्याची बंगाल प्रांतांत तारखात्यावर नेमणूक झाली. पुढें १८७३ सालीं त्याला टोकिओ ( जपान ) च्या एंजिनिअर कालेजांत पदार्थविज्ञान आणि तारायंत्रशास्त्र या विषयाचे प्रोफेसर नेमण्यांत आलें. येथून सन १८७९ सालीं लंडन येथें त्यानें निरनिराळ्या विद्यालयांत प्रोफेसराचें काम केलें.

पदार्थविज्ञानशास्त्र व तदंतर्गत विद्युच्छास्त्र यांतील कित्येक विषयांवर त्यानें उत्तम लेख लिहिले आहेत. विद्युन्मापक यंत्राविषयीं शोध करण्याचें काम करतांना प्रोफेसर जान पेरी याच्याबरोबर यानें बरेच परिश्रम घेतले आहेत. याचा मृत्यु तारीख ८ नोव्हेंबर १९०८ रोजीं लंडन येथें झाला.

याची बायको मिसेस हर्था आयर्टन हिनें शास्त्रीय शोध लावण्यास आपल्या नवऱ्यास बरीच मदत केली व स्वतः विजेच्या कमानीविषयीं कांहीं शोध लावले आहेत. तिला १९०६ सालीं एक रॉयल मेडल ( पदक ) देण्यांत आलें.

**आयर्लंड**—हें बेट ग्रेटब्रिटनच्या पश्चिमेस असून, ग्रेट ब्रिटन व आयर्लंड यांनां मिळून युनायटेड किंगडम् असें म्हणतात. आयर्लंड ५१ २६' ते ५५° २१' उत्तर अक्षांशांमध्यें आणि ५° २५ते१०° ३०' पश्चिम रेखांशांमध्यें आहे. ह्याच्या सभोंवतीं अॅटलांटिक महासागर असून उत्तरेस नॉर्थ चॅनल, पूर्वेस आयरिश समुद्र आणि दक्षिणेस सेंट जॉर्जेस चॅनल आहे. या बेटाची जास्तींतजास्त लांबी ३०२ मैल आणि रुंदी १७४ मैल असून, एकंदर क्षेत्रफळ ३२५३१ चौरस मैल आहे. आयर्लंडचे अल्स्टर, लीनस्टर, मनस्टर व कॉनॉट हे चार प्रांत असून त्यांत एकंदर ३२ परगणे ( काऊंटी ) आहेत. आयर्लंडांत ३००० फुटांहून अधिक उंचीचा पर्वत क्वचितच आढळतो. स्कॉटलंडच्या उत्तर भागाप्रमाणें मोठा उंच डोंगराळ प्रदेश आयर्लंडांत कोठेंहि नाहीं, त्यामुळें परके लोक व सुधारणा यांच्यापासून देश्य लोकांनां पळून जाऊन सुरक्षित राहण्यासारखें आश्रयस्थान येथें नाहीं. आयर्लंडांत मोनेर्स, विक्लो, स्पेरिन्स, डेरिवीघ, नॉक मिडाऊन, कॉमेरॅग वगैरे पर्वत, स्लॅनी' लिफी, बॉइन, लेगन, बॅन, एर्ने, शॅनॉन, ली, ब्लॅक वॉटर वगैरे नद्या; आणि सरोवरें




Poona Litho Works 689 Sadashiv, Peth.




Poona Litho Works, 689 Sadashiv Peth.

असंख्य आहेत. त्यांत एनेल, ओवेल, शॅनॉन, मेलव्हिन, कीन, मास्क, कॉरिब, किलर्ने या सरोवरांच्या आसपासचें सृष्टिसौंदर्य फार अप्रतिम आहे. आयर्लंडचें हवा व पाऊस यांचें मान ग्रेटब्रिटनच्या मानानें मध्यम प्रकारचें आहे. स्कॉटलंडच्या उत्तर भागाइतका जास्त किंवा ग्रेट ब्रिटनमधील कित्येक भागांतल्या इतका अगदीं कमी पाऊस आयर्लंडांत कोठेंच पडत नाहीं. जानेवारी महिन्यांतहि आयर्लंडच्या कोणत्याहि भागांत उष्णतामान ४०° अंशाच्या खालीं जात नाहीं, व जुलै माईन्यांत जास्तींत जास्त उष्णतामान ६२° असतें. आयर्लंडच्या भोंवतालचा समुद्र बराच उथळ आहे. ॲटलांटिक महासागराच्या बाजूला २५ मैलपर्यंत १०० पुरुषांहून अधिक खोली नाहीं आणि आयरिश समुद्र तर इतकाहि खोल नाहीं. भूस्तरशास्त्रदृष्ट्या आयर्लंड बेट हें यूरोपखंडाचाच एक भाग आहे. व त्यामुळें यूरोपखंडाच्या भूमींत जे भूस्तरविषयक फेरबदल झालेले आहेत तेच फरक आयर्लंडच्या भूमींतहि झाले आहेत.

लो क सं ख्या.—आयर्लंडांतील लोकसंख्या १८४१ सालीं ८१९६५९७ होती ती एकसारखी कमी होत आली आहे याचें कारण परदेशगमन हें होय. १८४६ सालीं पडलेल्या भयंकर दुष्काळापासून हें परदेशगमन सुरू झालें आहे, आणि १८५१–१९०५ पर्यंत ४०२८५८९ लोक आयर्लंड सोडून गेले. यापैकीं बरेचसे लोक युनायटेडस्टेट्समध्यें गेले आहेत. धंदेवारीच्या दृष्टीनें पाहतां १९०१ सालीं शेंकडा ५५ लोक निरुद्योगी, ८८६०६२ लोक शेतकरी आणि ६३९४१३ लोक उद्योगधंदा करणारे होते.

या देशांत औरससंततीच्या मानानें अनौरस संततीचें प्रमाण फार अल्प असतें. १९०५ सालीं २७१०; १९१९ त २९०६ व १९२० सालीं ३३०३ अनौरस मुलें जन्मलीं.

१९११ सालीं ४३,९०,२१९ लोकसंख्या होती ती१९२० सालीं ४४७०००० झाली. म्हणजे आतां लोकसंख्या वाढत आहे. १९२० सालीं जन्म, मृत्यु, विवाह व परदेश गमन यांचे आंकडे अनुक्रमें:–९९५३६; ६६५३८;२८८२६; १५५३१ आहेत.

द ळ ण व ळ णः—आयर्लंडमध्यें एकंदर सुमारें६०००० मैल सार्वजनिक रस्ते आहेत. १८३१ मध्यें पास झालेल्या पार्लमेंटच्या कायद्यानें आयर्लंडांत पहिली रेल्वे बांधण्यास परवानगी मिळाली. डब्लिन ते किंग्ज पर्यंतचा ६ मैल रेल्वेरस्ता तयार झाला. आयर्लंडांत रेल्वेरस्त्यांची वाढ फार सावकाश झाली. १८४५ सालीं फक्त ६५ मैल, व १८५५ सालीं फक्त १००० मैल कायतो रेल्वेरस्ता झाला होता. १९१७ सालअखेर आयरिश रेल्वेमध्यें ३९६७८००० पौंड भांडवल गुंतले होतें, व उत्पन्न ६,३२०००० पौंड झालें.

१९०५सालीं आयर्लंडमधील कालव्यांची लांबी ८४८मैल होती व १९१८ च्या जानेवारींत ३०५ मैलांचा पाणरस्ता कॅनाल कंट्रोल-कमिटीच्या अधिकारांत होता. १९१९ त ६४६६६८ टन वहनशक्तीचीं जहाजें आयर्लंडमधील बेलफास्ट, कॉर्क व डब्लिन या बंदरांत आलीं व २३६५२१ टनाचीं बाहेर गेलीं.

शे त की.—आयर्लंडांतील जमीन निसर्गतःच सुपीक व लागवडीस सोईची अशी आहे. अनेक नद्यांच्या कांठचा प्रदेश सपाट व उत्तम पिकांस योग्य असा आहे. तथापि आयर्लंडच्या राजकीय इतिहासाचा शेतकीच्या स्थितीवर फार परिणाम झाला आहे. देश्य लोकांच्या जमिनी खालसा करणें व त्या वसाहतवाल्यांना देणें. रोमन कॅथॉलिकांविरुद्ध मनाईचे कायदे करणें, जमीनदारांचें परकी देशांत राहणें, वगैरेमुळें आयरिश शेतकीची हकीकत समाधानकारक नाहीं. परंतु विसाव्या शतकांत शेतकी खातें व सहकारी चळवळ यामुळें सुधारणा सुरू झाली आहे. आयर्लंडांत बटाटे, गहूं, ओट्स, बीट, कोबी हीं मुख्य पिकें आहेत. १९२१ सालीं दर एकरीं धान्य, कंद, गवत यांचें उत्पन्न किती येत होतें तें पाहिल्यास असें दिसून येईल कीं, गहूं ३३.८; बार्ली ३२. ६; ओट ३६;८. बुशेल; व बटाटे ४.५ टन, गाजरें १४.५ टन व गवत १.३७ टन. शेतकी खात्यानें शेतकीच्या शिक्षणाची कॉलेजें काढून कृषिशास्त्रज्ञ पदवीधर निर्माण करण्याची, व त्यांच्याकडून देशभर शेतकऱ्यांस शेतकीचे प्रयोग करून दाखविण्याची व्यवस्था केली. तसेंच घोडे, गुरें, डुकरें यांच्या वाढीला उत्तेजन दिलें. १९१७ मध्यें आयर्लंडांत ५९७६९२ घोडे, २४७४६ खेंचरें व जेनेट जातीचे घोडे, २२८६२८ गाढवें, ४९०७५६६ शेळयामेंढ्या,९४७५७२ डुकरें, २६८८५३ बकरीं व २२३४२५२४ कोंबडीबदकें यांची निपज झाली.

उ द्यो ग धं दे व व्या पा र—किनाऱ्यालगत व मोठ्या समुद्रांत मासे मारणें हा आयर्लंडांतला एक मोठा महत्त्वाचा धंदा आहे. या एका धंद्यांत १९०५ सालीं ६११० जहाजें व २४२८८ माणसें गुंतलीं होतीं. १९२१ सालीं ४१११०६ पौंड किंमतीचे मासे आयर्लंडांत पकडून आणले होते. उलट पक्षीं खनिज पदार्थ आयर्लंडांत फार थोड्या प्रमाणांत सांपडतात. कोळसा, लोखंड, रुपें या धातू व स्लेट, ग्रॅनाईट वगैरे जातीच्या दगडाच्या जाती आहेत. पण सर्व खाणी मिळून १९०५ सालीं फक्त ६००० माणसें कामावर होती. लोंकर व ताग यांच्यापासून कापड तयार करण्याचा धंदा येथें फार पूर्वीपासून चालू असून लोंकरीचें कापड उत्तम होत असे. १७ व्या शतकांत आयर्लंडमधील लोंकरीचें कापड इंग्लंडांत इतकें खपूं लागलें कीं, ब्रिटिश पार्लमेंटनें त्याच्या आयातीस कायद्यानें बंदी केली. यामुळें हा धंदा बुडून अनेक लोक दारिद्र्यानें मरण पावले. तागाच्या वाढत्या धंद्यालाहि इंग्लंडनें मधूनमधून अडथळा घातला. कापसाच्या

कापडाचा धंदा येथें १७७७ मध्यें प्रथम सुरू झाला व तो १८२२ पर्यंत बराच वाढला. परंतु लँकाशायर वगैरे ठिकाणीं विणकामाच्या यंत्रांची वाढ झाल्यापासून आयर्लंडांत हा धंदा बहुतेक बुडाला.१९२० सालीं आयात २०३७५०००० पौंड व निर्यात २०४७२५००० पौंड होती.

ध र्म.—आयर्लंडांत एकंदर लोकसंख्येपैकीं शेंकडा ७५ रोमन कॅथोलिक, १३ प्रॉटेस्टंट, १० प्रेस्बीटेरियन, व बाकीचे मेथॉडिस्ट वगैरे पंथाचे लोक आहेत.

शि क्ष ण.—आयर्लंडांत साक्षर लोकांचें प्रमाण १८९१ पासून एकसारखें वाढत आहे ही गोष्ट पुढील प्रमाणांवरून दिसेल. १९०१ सालीं शेंकडा ७९ लिहितांवाचतां येणारे, शेंकडा ७ फक्त वाचतां येणारे व निरक्षर फक्त शेंकडा १४ होते.

आयर्लंडांतील डब्लिन युनिव्हर्सिटी फार जुनी म्हणजे १५९१ पासूनची आहे. १८८२ पासून रॉयल युनिव्हर्सिटी ऑफ आयर्लंड ही युनिव्हर्सिटी अस्तित्वांत आली, पुढें १९०८ मधील आयरिश युनिव्हर्सिटीज ॲक्टनें रॉयल युनिव्हर्सिटीच्या ऐवजीं डब्लिन येथें नॅशनल युनिव्हर्सिटी ऑफ आयर्लंड, आणि बेलफास्ट येथें क्वीन्स युनिव्हर्सिटी अशा दोन युनिव्हर्सिट्या स्थापन झाल्या. निरनिराळ्या धर्मपंथांनीं आपापलीं निरनिराळीं कॉलेजें चालविलीं आहेत. १८९२ पासुन प्राथमिक शिक्षण, ६ ते १४ वर्षांच्या मुलामुलींकरितां सक्तीचें व विशिष्ट परिस्थितींत मोफत करण्यांत आलें आहे. १९१७ सालीं प्राथमिक शिक्षणाच्या ८०६० शाळा होत्या व शिक्षक तयार करणाऱ्या शाळा ७ होत्या. त्याशिवाय ५ रेफॉर्मेटरी शाळा, व ६८ धंदे शिक्षणाच्या शाळा १९१० सालीं होत्या, रॉयल कॉलेज ऑफ सायन्स ( डब्लिन ), मेट्रॉपॉलिटन स्कूल ऑफ आर्ट, आयरिश ट्रेनिंग स्कूल ऑफ डोमेस्टिक एकानमी, किलार्नी स्कूल ऑफ हाऊस वाईफरी या धंदेशिक्षणाच्या मोठ्या शाळा आहेत.

दुय्यम शिक्षणासाठीं एक बोर्ड असून,त्याला पार्लमेंटाचीहि पैशांच्या बाबतींत मदत होते. हें बोर्ड दरसाल परीक्षा घेण्याची व्यवस्था करतें. व शाळांना या परीक्षांच्या निकालावरून ग्रँट देतें. या बोर्डाखेरीज दुय्यम शिक्षण देण्याकरितां खाजगी संस्थाहि आहेत.

इ ति हा स, प्राचीनः— पूर्वपाषाण ( पॅलिओलिथिक ) युगांत आयर्लंडांत मानव वस्ती होती किंवा नाहीं याबद्दल अद्याप निश्चित पुरावा मिळाला नाहीं. ख्रि. पू. ६०० किंवा ५००च्या सुमारास केल्टिक भाषा बोलणाऱ्या गॉइडेल नांवाच्या लोकांनीं आयर्लंडांत प्रवेश केला. अल्स्टर लीन्स्टर, कॉनॉट, पूर्व मन्स्टर व पश्चिम मन्स्टर असे आयर्लंडचे पांच प्रांत याच लोकांनीं पाडले असावे. ख्रि. पू. ३००–१५० च्या दरम्यान बेल्जिक व इतर ब्रीथॉनिक जातींच्या टोळ्यांनीं आयर्लंडांत येऊन गॉइडेल लोकांवर आपलें वर्चस्व स्थापिलें. व स्कॉटलंडमधील पिक्टीश जातीच्या लोकांनीं आयर्लंडचा कांहीं भाग जिंकून तेथें कायमची वस्ती केली. टॉलेमीनें या बेटांतील १६ जातींच्या लोकांचीं नांवें दिलीं असून त्यांपैकीं कित्येक आजच्या नांवांशीं जुळतात. जुन्या दंतकथांत आयर्लंडचा इतिहास अगदीं थेट आद्य जलप्रलयापर्यंत नेऊन भिडविलेला आढळतो. 'नोहा'ची पुतणी ' तु आथ दानान ' ही प्रथम आयर्लंडच्या किनाऱ्यावर उतरली व तेथून त्या देशांतील मनुष्यवस्तीस सुरुवात झाली. त्यापूर्वी अमानुष योद्धे, राक्षस, मांत्रिक व जादुगार यांचीच कायती या ओसाड बेटावर वस्ती होती असें या कथांमधून वर्णिलें आहे.

मराठे लोकांत जसा शिवाजी तसेच आयरिश लोकांत कॉरमॅक व ब्रायन नांवाचे सुप्रसिद्ध वीर होऊन गेले. हिंदुस्थानांत जसें पांडवांचें कुल तसेंच आयर्लंडांत ऑनिल नांवाचें वीरकुल प्रसिद्ध आहे. महाराष्ट्रांतील रायगडाप्रमाणें तेथेंहि 'तारागड' नांवाचें ऐतिहासिक दृष्ट्या अभिमानाचें असें अत्यंत महत्त्वाचें स्थान आहे. येथें स्वदेशी राजांचे राज्यारोहणसमारंभ थाटानें होत. सहाव्या शतकापासून मात्र या तारागडचें ठाणें कायमचें उठलें.

रोमन लोकांचा आयर्लंडमध्यें फारसा प्रवेश झाला नव्हता, पण त्यांच्याकडून पिछेहाट पावलेल्या गॉल, केल्ट, पिक्टस, स्कॉट, वगैरे अनेक जातींचे लोक आश्रयार्थ आयर्लंडांत येऊन राहिले व कालांतरानें याच देशास स्वदेश मानूं लागले. आयर्लंडांतील लोक अधिक सुधारलेले व लढाऊ असल्यानें त्यांनीं इंग्लंडवर मधूनमधून स्वाऱ्याहि केल्या. विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट अशी कीं, आयर्लंड हें इतकें लहान बेट असूनहि परकीय राजांच्या अमलाखालीं जाईपर्यंत तेथें एकछत्री असें राज्य कोणाचेंच झालें नाहीं.

ध र्म सं प्र दा य वि ष य क मा हि ती.—ज्या सागानामक धर्मग्रंथावरून आयर्लंडांतील प्राचीन धार्मिक समजुतींची माहिती मिळते त्यांत ख्रिस्ती भिक्षु लोकांनीं स्वैर फेरफार केलेले आहेत. तथापि प्राचीन आयरिश लोक निसर्गोपासक होते व त्यांचा भुतपिशाच्च व वनदेवता यांवर विश्वास होता इतकी माहिती त्यावरून मिळावयास हरकत नाही. तेथें ड्रुईड नांवाचा एक पुरोहितवर्ग होता व तो मोठा मांत्रिक असून भूतभविष्य जाणीत असे अशी माहिती आयरिश वाङ्मयांतून मिळते.

सुमारें पांचव्या शतकांत आयर्लंडात ख्रिस्ती धर्माचा प्रवेश होण्यास सुरुवात झाली. पॅलेडिअस, पॅट्रिक, कोलंबा वगैरे अनेक ख्रिस्ती साधू व धर्मोपदेशक आयर्लंडांत होऊन गेले. सेंट पॅट्रिक हा एक विख्यात सिद्ध पुरुष होता. आयरिश राजा नियाल यानें फ्रान्सवर स्वारी केली तेव्हां 'बोलोन' शहरांत पॅट्रिक ( पॅट्रिशियस ) या नांवाचा एक मुलगा आयरिश शिपायांच्या हातीं लागला. तो वयाच्या बाविसाव्या वर्षापर्यंत आयर्लंडांतच गुलामगिरींत होता. पुढें तेथून पळून जाऊन ख्रिस्ती धर्मप्रचारक बनला व पुनः इ. स. ४४५

सालीं आयर्लंडांत येऊन तेथील ड्रुइड लोकांस चमत्कार दाखवून अखेरीस नियाल राजाचा मुलगा लिओदर यास त्यानें ख्रिस्ती धर्माची दीक्षा दिली. पुढें थोड्याच कालांत सबंध आयर्लंडभर ख्रिस्ती धर्माचा विलक्षण प्रसार होऊन आसपासच्या राष्ट्रांत देखील तेथून धर्मोपदेशक पाठविण्याचें काम सुरू झालें. तथापि आयर्लंडांत प्रत्यक्ष पोपचा अम्मल पुढें बरींच शतकेंपर्यंत बसला नाहीं व स्थानिक धर्मगुरूंनीं एक प्रकारचें स्थानिक स्वराज्यच भोगलें.

आठव्या व नवव्या शतकांत आयरीश लोकांच्या धार्मिक चरित्रास अत्यंत उज्ज्वल स्वरूप प्राप्त झालें होतें. भरतखंडांतील ऋषींप्रमाणेंच ख्रिस्ती धर्मगुरूंनीं प्राचीन काळीं व मध्ययुगांत धर्माचें रक्षण व विद्येचा पुरस्कार उत्साहपूर्वक केला. 'डरो' व 'आरमा' येथील विश्वविद्यालयांची कीर्ति दिगंत पसरली. रानटी यूरोपियन लोकांनीं आपल्या बाहुबलानें आयरिश लोकांवर जय मिळविला होता खरा; परंतु धर्म, सुधारणा व विद्या यांच्या बलानें जित आयरिश लोकांनीं आपल्या जेत्यांवर उलट जय मिळवून त्यांनां आपले दास बनविलें; दुर्दैवानें ही स्थिति फार दिवस टिकली नाहीं.

**इ. स. ७९५–११५२ पर्यंतचा इतिहास.**—डेन्स म्हणजे नॉर्थमेन अथवा उत्तरेकडील लोक यांनीं ७९५ मध्यें आयर्लंडवर पहिली स्वारी केली. या वेळीं आयर्लंडांतील लहान लहान राज्यांत परस्परांत यादवी सुरू होती. डेन्स लोकांनीं आयर्लंडांत उतरून ख्रिस्ती धर्ममंडळावर शस्त्र चालवून जाळपोळ, लुटालूट, छळ व भ्रष्टाकार यांची कमाल करून सोडली. यामुळें आयरिश लोकांनीं आपसांतील यादवी थांबवून या बाह्य संकटास तोंड देण्याची तयारी केली. तीनदां डेन्स लोकांनीं उचल केली व तितक्या वेळां आयरिश लोकांनीं त्यांचा पराभव करून त्यांनां धुडकावून लाविलें परंतु अंतःकलहरूपी दुष्ट पिशाच्चानें पछाडलेल्या आयरिश लोकांनीं पुनः पुनः आपसांत यादवी सुरू केल्यानें त्यांचें सर्व वैभव व सुख यांचा लोप झाला आणि कोणाहि नवीन शत्रूस या यादवीचा फायदा घेतां येऊं लागला. अशा स्थितींत बाराव्या शतकांत इंग्लंडचा व आयर्लंडचा संबंध जडला व आज आठशें वर्षेंपर्यंत आयर्लंडनें वाटेल तें केलें तरी त्यास तो तोडतां आला नाहीं.

**इंग्रजांचा आयर्लंडांत प्रवेश.**—बाराव्या शतकाच्या प्रारंभीं आयर्लंडांत अल्स्टर, लीन्स्टर, मन्स्टर व कॅनॉट अशीं चार निरनिराळीं राज्यें असून त्या सर्वांत अल्स्टरची गादी मुख्य होती. त्यांचे आपापसांत कलह होत असत. लीन्स्टर संस्थानचा दगलबाज व दुष्ट राजा मॅकडरमॉट मॅकमरो यानें इ. स. ११५२ सालीं रोरार्क नांवाच्या सरदाराची स्त्री पळवून नेल्यामुळें त्यास आयर्लंड सोडावें लागलें. मॅकमरो हा भटकत भटकत मदत मागण्यासाठीं इंग्लंडचा राजा दुसरा हेनरी याजकडे आला. या संधीचा फायदा घेऊन हेनरीनें कुलफरमान काढून लोकांस असें कळविलें कीं, जो कोणी बरोबर फौज घेऊन आयर्लंडवर स्वारी करून मॅकमरोचें साहाय्य करील, त्यावर दरबारची कृपा होऊन त्यास सरदारकी देण्यांत येईल. या फरमानास अनुसरून अनेक महत्त्वाकांक्षी इंग्रज तरुण आयर्लंडवर चाल करून गेले. याच सुमारास पापी मॅकमरोचा अंतहि झाला होता; परंतु रोमच्या गादीवर बसलेल्या चौथ्या हॅड्रियन नांवाच्या इंग्रज पोपनें विशेष आग्रह केल्यामुळें स्वतः हेनरीहि अखेर मोठी फौज घेऊन आयर्लंडांत उतरला व त्यानें तेथें आपलें स्वामित्व स्थापिलें. हेनरीचा हा दिग्विजय नांवाचाच होता. तो परत स्वदेशास निघून जातांच खुद्द डब्लिन शहर व त्याच्या आसपासचा थोडासा मुलूख याखेरीज कशावरहि इंग्रजांचें खरें स्वामित्व राहिलें नाहीं. बाहेरील सर्व देशांत स्वदेशी राजांचा अंमल पुढें पुष्कळ वर्षेंपर्यंत चालत होता. अल्स्टरच्या राजानें तर बरेच दिवसपर्यंत आपलें स्वामित्व इतर राजांवर पूर्वीप्रमाणेंच चालविलें.

आयरिश लोक व्यक्तिशः इमानी आहेत; परंतु ज्याचें निमक खाल्लें त्या व्यक्तीला अगर फार तर त्या घराण्याला त्यांचें इमान व त्यांची तरवार वाहिलेली असते. ते पिढ्यानुपिढ्या एकाच घराण्याचे बंदे गुलाम होऊन राहिलेले आढळतात. यामुळें ज्यांनां एखाद्या घराण्याचें बंधन नाहीं, असे शेकडों लढाऊ आयरिश लोक हिंदुस्थानांतल्याप्रमाणेंच फक्त पैसे दिले असतां स्वकीयांशींहि लढावयास मिळत असत व आजपर्यंत इंग्रजांचा आयर्लंडावरील अम्मल पुष्कळ अंशीं अशा प्रकारच्या आयरिश शिपायांच्याच तरवारीवर राखला गेला आहे.

दुसऱ्या हेनरीनें मीथ ही सुमारें आठ लक्ष एकर जहागीर ह्यू डी लेसी यास दिली व ती त्यानें सरंजामी पद्धतीनें आपल्या हाताखालील लोकांस वांटून दिली. तेव्हांपासून न्यूगेंट, टीरेल, ॲंगल, फ्लेमिंग वगैरे जमीनदारांचीं घराणीं इतिहासांत प्रसिद्ध झालीं. तिसऱ्या हेनरीच्या कारकीर्दीपासून आयरिश लोकांविरुद्ध जुलमी कायदे होण्यास सुरुवात झाली व ते पुढें पहिला, दुसरा व तिसरा एडवर्ड यांच्या कारकीर्दींत वाढतच गेले. १३३६ मध्यें किल्केनी येथें भरलेल्या पार्लमेंटांत कोणत्याहि आयरिश गोष्टीचा इंग्रजांनीं अंगिकार केल्यास त्यांनां फांशीची शिक्षा द्यावी असा प्रतिबंध घालणारा कायदा करण्यांत आला; यामुळें जातिद्वेष भयंकर माजला व चवथ्या, पांचव्या व सहाव्या हेनरींच्या कारकीर्दींत आयरिश लोकांनीं इंग्रज वसाहतवाल्यांनां अत्यंत त्रास दिला व त्यांनां आयर्लंडांत राहणें अशक्य करून टाकलें. या वेळच्या सर जॉन टॉलबॉट ह्या व्हाइसरॉयाची कारकीर्द विशेष महत्त्वाची झाली. हा अत्यंत दुष्ट होता, असें अल्स्टरच्या बखरकारांनीं नमूद करून ठेविलें आहे.

**इंग्लंडच्या नियंत्रणाखालीं आयरिश पार्लमेंटची स्थापना.**—आयर्लंडांतील इंग्रज वसाहतवाल्यांनीं

तेराव्या शतकांतच आपलें स्वतंत्र पार्लमेंट स्थापिलें होतें. रोझेसच्या युद्धाच्या वेळीं इंग्लंडांत माजलेल्या बखेड्याच्या वेळेपासून आयरिश लोकांनीं इंग्लंडमध्यें पराभूत झालेल्या पक्षास आश्रय देण्याचें व्रत सुरू करून इंग्लंडचा सूड उगविण्यास सुरुवात केली. असल्या कृत्यास आळा पडावा म्हणून इंग्रज सुभेदार सर एडवर्ड पॉइनिंग यानें "पॉइनिंग्ज ॲक्ट" नांवाचा कायदा करून पार्लमेंटचा अधिकार संपुष्टांत आणिला; तथापि त्यामुळें वसाहतवाल्यांच्या व्यावहारिक स्वातंत्र्यास फारसा धोका आला नाहीं.

आ य र्लं ड चा अ र्वा ची न इ ति हा स.—आठवा हेनरी याच्या कारकीर्दीत ( १५०९–१५४७) मात्र फिरून पारडें फिरलें. आयर्लंडांतील पोपच्या अधिकाराचा व रोमन कॅथोलिक पंथाचा उच्छेद व त्याच्या ठिकाणीं प्रॉटेस्टंट पंथाची स्थापना करण्याचा संकल्प करून त्यानें आयरिश जमीनी प्रॉटेस्टंट वसाहतवाल्यांनां दिल्या, राजेरजवाड्यांनां आपल्याकडे वळवून घेतलें व अमीर उमरावांनां इंग्रजी चालीरीतींचा स्वीकार करावयास लागलें.

यावेळीं रोमन कॅथोलिक लोकांचा अनान्वित छळ झाला; पण प्रॉटेस्टंट मताचा फारसा प्रसार झाला नाहीं. मेरी राणीच्या कारकीर्दीत रोमन कॅथोलिक मतास पुन्हां तेजी आली पण इलिझाबेथच्या वेळीं ती पुनः मावळली.

ए लि झा बे थ रा णीः—हिच्या कारकीर्दीत ( इ. स. १५५८ ) इंग्लंड व यूरोपांतील इतर कित्येक राष्ट्रें यांचीं युद्धें जुंपलीं. तीं बहुतेक धर्ममूलक असल्यामुळें इंग्लंडच्या रोमनकॅथोलिक शत्रूंनां आयरिश लोक ऋणानुबंधी असे वाटूं लागले. फ्रान्स, स्पेन व हालंड यांचें लक्ष आयर्लंडकडे लागल्यामुळें अर्थात् इंग्लंडच्या प्रधानमंडळास आयर्लंडची काळजी पडली. हा इ.स.१५६९ चा काळ म्हणजे आयर्लंडच्या स्वातंत्र्य युद्धाचा प्रारंभ काळ होय आयर्लंडास स्वदेश मानूं लागलेल्या जिरालिन नांवाच्या एका इंग्रज सरदारानेंच १५७९ च्या सुमारास मन्स्टर प्रांतांत या बंडाचा झेंडा उभारला पण उत्तरेकडील आयरिश रजवाड्यांनीं त्यास मदत केली नाहीं. इलिझबेथ या चांगल्या म्हणून नांवाजलेल्या राणीच्या कारकीर्दीत या स्वातंत्र्ययुद्धांत जितकी निरपराधी आयरिश प्रजा प्राणास मुकली तितकी दुष्ट व क्रूर मानल्या गेलेल्या मेरी राणीच्या कारकीर्दीतहि मुकली नव्हती. शिवाय राजद्रोहाच्या आरोपावरून मन्स्टर प्रांतांतील कॅथोलिक लोकांची कमीत कमी पांच लक्ष एकर जमीन जप्त करून प्रॉटेस्टंट सरदारांस व शिपायांस वाटून देण्यांत येऊन या दिव्य कृत्यावर कळस चढविण्यांत आला. यानंतर १५९८ त दुसरें बंड झालें. पण त्याचा मोड शांततेनेंच होऊन जमीनी जाण्याच्या ऐवजीं या खेपेस बंडवाल्यांनां इंग्रजी पदव्या मिळाल्या.

प हि ला जे म्स व प हि ला चा र्ल्स—जेम्सच्या कारकीर्दीत आयरिश लोकांचा छळ झाला नाहीं.तथापि जित राष्ट्राचें राष्ट्रीयत्व व स्वातंत्र्यप्रेम नष्ट करण्याच्या कामीं तरवारीपेक्षां राजदरबारच्या लेखणीचा उपयोग किती अधिक होऊं शकतो, हें आयरिश लोकांस कळून आलें. जे कित्येक पाणीदार आयरिश मांडलीक त्रासदायक व राजद्रोही असे वाटत होते त्यांचा दगलबाजीनें वध करण्यांत आला. ओनील व ओडॉनेल यांस पदव्या देऊन त्यांच्या जमीनी प्रथम राखण्यांत आल्या होत्या परंतु त्यांजवर फिरून गुप्त कटाचा आरोप लादून राजद्रोही गुन्हेगार म्हणून त्यांच्या नांवाची द्वाही फिरविल्यामुळें त्यांनां देशत्याग करावा लागला. आयर्लंडांत इंग्रजांची कायमची वसाहत झाल्याखेरीज बंडखोर लोकांवर दाब राहणें शक्य नाहीं अशी सल्ला लार्ड बेकननें दिल्यामुळें त्या गोष्टीचा जोरानें उपक्रम झाला. जेम्सच्या कारकीर्दीत अल्स्टर प्रांतांत वसाहत करविण्यांत आली होती तशी त्याचा मुलगा चार्लस याच्या कारकीर्दीत ( १६२५–१६४९ ) कॉनॉट प्रांतांत एक वसाहत झाली. राजद्रोहाची सबब या वेळीं न मिळाल्यामुळें ( इ. स. १६३५ ) न्यायमनसुब्याचा फार्स करून या वसाहतीसाठीं लागणाऱ्या जमीनी लुबाडण्यांत आल्या. पण १६४१ मध्यें आयरिश लोकांनीं हत्यार उपसलें. ओनीलच्या वीरवंशापैकीं सर फेलीम ओनील यानें त्यांचा पुढाकार घेतला व आपल्या जमीनी परत मिळविल्या. याला पोपिश बंड असें इंग्रजांनीं नांव दिलें, परंतु हें धर्माकरितां बंड नसून नाहक जमीनी खालसा करणारावर आयरिश लोकांनीं घेतलेला हा सूड होता. आयरिश रहिवाश्यांच्या जमीनी त्यांस परत मिळाल्या ही न्यायाचीच गोष्ट झाली; पण पहिलें बंड, जप्ती, दुसरें बंड व तें मोडतांनां अमलांत आणलेले कडक उपाय या सर्व व्यवहारांत उभयपक्षांकडून बरीच अनन्वित कृत्यें घडलीं.

आ य रि श पा र्ल मेँ ट ची वा ढ.—आयर्लंडांत इंग्रज वसाहतवाल्यांनीं जें पार्लमेंट स्थापिलें त्याची वाढ इंग्लंडच्या पार्लमेंट प्रमाणेंच बहुतेक होत गेली. प्रथम उच्च वर्गांतील शिष्टच ह्या बैठकी भरवीत. पुढें १२९५ मध्यें भरलेल्या पार्लमेंटमध्यें कॉमन्स ( मध्यमवर्ग ) लोकांचे प्रतिनिधी म्हणून सरदार ( नाइट ) लोकच बोलावले गेले होते. या सालच्या पार्लमेंटनें केलेले कांहीं कायदे अद्याप आहेत. १३१० पासून बर्जेस म्हणजे ग्रामप्रतिनिधींनां सामील करण्यांत आलें. १३६६ मध्यें किल्केनी येथें भरलेल्या पार्लमेंटला पुष्कळ प्रतिनिधी जमले होते. परंतु त्यांची निवड कशी केली गेली होती त्यावद्दल माहिती उपलब्ध नाहीं. जिची सविस्तर माहिती नमूद केलेली आज मिळते अशी सर्वांत पूर्वीची बैठक१३७४मधील होय.या पार्लमेंटच्या कामन्स सभेंत निरनिराळ्या काऊंटी व शहरें मिळून एकंदर तीस सभासद होते. पुढें उरलेल्या शहरांनां व काऊंटींनां प्रतिनिधी वाढविण्याचा अधिकार देण्यांत आला, व मध्ययुगाच्या अखेरीस ( इ. स. १५०० ) ही

संख्या साठाच्या वर फारशी गेली नव्हती. याच काळांतील आयरिश लार्डांच्या सभेंत गृहस्थ ( टेंपोरल ) लार्डापेक्षां भिक्षुक ( बिशप व अॅबट ) लार्डांची संख्या अधिक असे. पण आठव्या हेनरीच्या वेळीं, या भिक्षुक लार्डांनां भाषण करण्याचा किंवा मत देण्याचाहि अधिकार असूं नये, असें कायमचें ठरविण्यांत आलें. इलिझाबेथच्या कारकीर्दीत १५५९ मध्यें भरलेल्या पार्लमेंटच्या बैठकीला कनिष्ठ (कामन्स) सभेंत ७६ सभासद हजर होते; ही संख्या १५८५ मध्यें १२२ इतकी वाढली. १६१३ मध्यें पहिल्या जेम्सनें सर्व खेड्यांनां प्रतिनिधी पाठविण्याचा अधिकार दिल्यामुळें कामन्स सभेच्या प्रतिनिधींची संख्या २३२ झाली, व त्यामुळें त्या सभेंत अँग्लिकन पक्षाचें बहुमत होऊन जेम्सला स्वतःचें धोरण पार पाडण्यास सुलभ झालें. १६३९ मध्यें कामन्स सभेचे सभासद २७४ होते, व ही संख्या १६८८ च्या राज्यक्रांतीच्या वेळीं वाढून ३०० झाली. ती संयुक्त पार्लमेंट ( इ. स. १८००) होईपर्यंत कायम होती.

**आयरिश लोकांचा छळ**—इंग्लंडमधील राज्यक्रांति यशस्वी करून क्रामवेल इ. स. १६४८ त आयर्लंड कडे वळला. त्यानें ड्राव्हेडा, वेक्सफार्ड वगैरे ठिकाणीं आयरिश लोकांची खुशाल कत्तल करविली. हजारों लोकांस गुलाम करून अमेरिकेस पाठविलें; व हजारों लोक आपण होऊन देशत्याग करून फ्रान्स, स्पेन व अमेरिका या देशांत जाऊन परकी राजांच्या पदरीं नोकरी धरून राहिले. दुसऱ्या चार्लस राजाच्या कारकीर्दीत ( १६६०—८५ ) आयर्लंडचे दिवस थोडे बहुत शांततेचे गेले. तिसरा वुइल्यम हा शहाणा होता म्हणतात; पण इंग्लिश प्रॉटेस्टंट लोकांच्या मदतीनें तो राजा झाला असल्यामुळें त्याला आपली सदसद्विवेकबुद्धि गुंडाळून ठेवितां येत असे. लिमरिक शहराचें नांव उच्चारतांच अजूनहि आयरिश लोकांस इंग्रजांनीं केलेल्या विश्वासघाताची आठवण होते, व ते जळफळूं लागतात. वुइल्यमच्या हातून सुमारें दहा लक्ष एकर जमिनींचा बेवारा झाला. वुड नांवाच्या एका मानसपुत्राला त्यानें आयर्लंडांत नवीं नाणीं पाडण्याची सनद दिली. या सनदेप्रमाणें सुमारें दहा लक्ष रुपयांचे हाफ पेन्स व फार्दिंग पाडावयाचे होते, व या सर्व व्यवहारांत उरणारा चार लक्ष रुपये नफा, वुड आणि डचेस ऑफ केंडाल नांवाची वुइल्यम राजाची एक रखेली या उभयतांनीं मिळून वांटून घ्यावयाचा होता ! या सर्व दुर्वर्तनावर डीन स्विफ्ट यांनें आपल्या " ड्रेपियरचीं पत्रें " नामक उत्कृष्ट लेखांत कडक टीका केली व यामुळें तो कपटाचा गोंधळ उघडकीस येऊन वेळींच थांबला.

इंग्रजांनीं हिंदुस्थानांत धर्मछळ मुळींच केला नाहीं यामुळें आयर्लंडांतील धर्मछळाची कल्पना हिंदुस्थानांतील लोकांनां येणें कठिण आहे. या सर्व छळांतील मुख्य हेतु हा होता कीं, हरएक उपायांनीं आयरिश रोमनकॅथेलिक लोकांचा पाडाव होऊन त्यांनां आधार असा कोणताच उरूं नये; व सर्व बाजूंनीं गांजून जाऊन त्यांनीं प्रॉटेस्टंट धर्म स्वीकारावा. या दृष्टीनें त्यांच्या विरुद्ध वेळोवेळीं " पनिल लॉज " सारखे हास्यास्पद, अन्यायाचे व पक्षपाताचे कायदे करण्यांत आले. या कायद्यांच्या योगानें रोमनकॅथोलिक लोकांनां संपत्ति मिळविणें अगर तिचा संग्रह करणें अशक्य झालें, रोमन कॅथोलिक बापाच्या प्रॉटेस्टंट मुलास स्थावर जंगम मालमत्तेवर बापाविरुद्ध वाटेल तसा ताबा चालविण्यास सहाय मिळूं लागलें, व धर्मांतर करण्याच्या सबबीवर बायकोस भरपूर पोटगी मागतां येऊं लागली व मिळूं लागली. रोमनकॅथोलिक पक्षकारांचा न्याय प्रॉटेस्टंट लोकांकडूनच केला जाई !

रोमनकॅथोलिक लोकांस या कायद्यामुळें दुसऱ्याकडून मिळकत मिळविण्याची आशाच नव्हती. परंतु स्वतः कामधंदा अगर रोजगार करून द्रव्य मिळविणें हेंहि मुष्किलीचें झालें होतें. सर्व सरकारी खात्यांतून त्यांस ' मज्जाव ' होता. खासगी रीतीनें कुटुंबांत रोमनकॅथोलिक शिक्षक ठेवणें गुन्हा मानला जाई. परदेशांत जाऊनहि रोमन कॅथोलिक लोकांनां शिक्षण घेतां येत नसे. अगर त्यासाठीं पैसे पाठवितां येत नसत. शस्त्रें बाळगण्याची परवानगी धर्ममतावर अवलंबून असून त्यासाठीं रोमनकॅथोलिकांच्या घराची वाटेल तेव्हां अधिकाऱ्यांनां झडती घेतां येत असे.

**आयरिश शेतकरी व व्यापारी यांचा छळ.**—या छळांत व्यापारविषयक आप्पलपोटेपणाची भर पडली; व या दुहेरी छळामुळें अठराव्या शतकांत आयरिश लोकांच्या दुस्थितीचा कडेलोट झाला. देशांतील दोन विरोधी वर्गांत कॅथोलिक, शेंकडा नव्वद आणि प्रॉटेस्टंट शेंकडा दहा होते. परंतु या नव्वदांच्या हातांत लागवडीच्या एकंदर जमिनीपैकीं फक्त एकदशांश जमीन असून इतर दहांच्या हातीं बाकीची नऊदशांश होती. अर्थात् पहिल्या वर्गास ती पुरत नसे व दुसऱ्यास तिचें काय करावें हें सुचत नसे. पिकाच्या जमीनींत बटाटे व ताग यांचें तेवढें पीक चांगलें पिके. पण बटाट्यावर रोग पडल्यास दुष्काळ पडत असे. तागाचें कापड परदेशांत पाठविण्यास प्रतिबंध करण्यांत आला. आयरिश लोकांनीं गुरें पाळलीं तेव्हां गुरांच्या व्यापारास प्रतिबंध करण्यांत आला; व मेंढ्या पाळल्या तर लोंकरीच्या व्यापारास १६९९ सालीं पार्लमेंटनें आळा घातला. आयरिश जहाजांवर बहिष्कार घातलेला असून निर्गत व आयात दोन्ही व्यापारास इंग्लंडकडून अडथळा करण्यांत येत असल्यामुळें केवळ कायदा मोडून दंडेली केल्याशिवाय आयरिश लोकांस परदेशाशीं परस्पर असा कोणताच व्यवहार करतां येईनासा झाला. आयरिश राष्ट्रानें इंग्लंडच्या मर्जीप्रमाणें वागून त्याचें

कवडीचेंहि नुकसान न होईल अशा रीतीनें आपला व्यवहार ठेविला पाहिजे अशी कायद्यानें सक्ती करण्यांत आली होती. अशा रीतीनें तात्पुरत्या व्यापारी फायद्याकडे नजर देऊन इंग्रज मुत्सद्यांनीं आयर्लंडच्या व्यापारांत हात घातला. ब्रिटिश पार्लमेंटनें केलेले व्यापार विषयक कायदे आयरिश पार्लमेंटमध्यें मंजूर होणें भाग होतें यासाठीं तसें करण्यास आयरिश पार्लमेंटला हुकुम सुटले. लोंकरीच्या कापडावरील जकात मंजूर केल्यास आपण तागाच्या व कापसाच्या व्यापारास मदत करूं व उत्तेजन देऊं असें याप्रसंगीं मधाचें बोटहि नेहमीप्रमाणें लावण्यांत आलें होतें व या सर्व कारवाईस आयरिश पार्लमेंट बळी पडलें व त्यानें लोंकरीवरील जकातीचा कायदा पास केला, पण दिलेल्या वचनांप्रमाणें वागणें बाजूस राहून उलट इंग्लंड व स्कॉटलंड येथील ताग व कापूस यांच्या कापडाचा व्यापार करणाऱ्या लोंकांस पैशाची मदत देऊन व खुद्द आयर्लंडास बाधक होईल अशा रीतीनें परदेशी कापडावर जकात बसवून इंग्लंडनें आयर्लंडचा उपकार फेडला.

आयर्लंडच्या जमीनींत भौतिक संपत्ति व मूल्यवान द्रव्यें जेवढीं होतीं तेवढ्यांचा फायदा जर आयरिश लोकांस अबाधितपणें घेतां आला असता तर त्यांची स्थिति साधारणतः बऱ्यापैकीं राहिली असती. व्यापाराच्या सोयीचा समुद्रकिनारा असून इंग्लंड, फ्रान्स, अमेरिका वगैरे देश फारसे दूर नसल्यामुळें या लहानशा देशांतील व्यापार पुरून उरण्याइतका वाव सहज मिळाला असता. परंतु सुमारें १६६३ पासून इंग्लिश मारवाड्यांची करडी नजर आयर्लंडवर फिरली व तीस पस्तीस वर्षांत कायद्यावर कायदे करून व अन्यायाच्या आवृत्त्यावर आवृत्त्या काढून ब्रिटिश पार्लमेंटनें आयर्लंडच्या व्यापाराचा दिवसाढवळ्या सांगून सवरून खून केला! एकट्या लोंकरीच्या धंद्यावर उदरनिर्वाह करणाऱ्या पन्नासहजार कुटुंबांची वाताहात झाली. आयरिश पार्लमेंट सभेनें १७०३—५—७साली सर्वानुमतें ठराव मंजूर करून लोकांस असें जाहीर केलें कीं लोकांनीं फक्त स्वदेशांत तयार झालेलीं वस्त्रें व इतर देशी माल वापरावा. परकी मालावर बहिष्कार घालण्यासंबंधानें आयरिश पार्लमेंट सभासदांनीं १७०७ मध्यें उघडपणें शपथाहि घेतल्या. याच सुमारास डीन स्विफ्ट यानें देशाच्या त्यावेळच्या स्थितीस अनुसरून तीव्र व सणसणीत असे लेख प्रसिद्ध केले. आयर्लंडांत बहिष्काराचा उपदेश त्यानेंच प्रथम आरंभिला. १७२८ त शेरिडीन नांवाच्या लेखकानें असें लिहून ठेविलें आहे कीं, 'आयरिश लोकांच्या दारिद्र्याचा खरोखर कळस झाला. त्यांच्या घरांत व उकीरड्यांत फरक दिसून येत नाहीं, व आपल्या गुरांचें रक्त व शेतांतील झाडपाला यांजवर त्यांचा उदरनिर्वाह चालतो! अठराव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास दारिद्र्य, दुष्काळ व तापाच्या भयंकर सांथी या आपत्तींनीं आयर्लंडची सुमारें चार लक्ष प्रजा मृत्युमुखीं पडली. आप्पलपोटेपणामुळें कॅथोलिक लोकांबरोबर प्राटेस्टंट लोकहि इंग्रजांनां शत्रूसारखे वाटूं लागले. एकंदरींत या सुधारलेल्या म्हणविणाऱ्या राजकर्त्यांच्या अमलाखालीं अठराव्या शतकाच्या मध्यभागीं आयरिश लोकांस जी हीन दशा प्राप्त झाली तशी दुसऱ्या कोणत्याहि राष्ट्रास केव्हांहि आलेली इतिहासांत आढळून येत नाहीं.

**आयरिश पार्लमेंटला स्वातंत्र्य प्राप्ति.**—या छळामुळें देशत्याग करून बाहेर पडलेल्या लोकांनीं परदेशांत शिपाईगिरी व मुत्सद्देगिरी यांत नांवलौकिक मिळवून त्यांनीं स्वदेशाचें मुख उज्वल केलें व देशांतील चळवळीस द्रव्यसहाय करून धीर दिला. तिसऱ्या जार्ज राजाच्या कारकीर्दींत फ्रान्स व अमेरिका या देशांत असंतुष्ट आयरिश कॅथोलिक लोकांनीं पेरलेल्या विषवृक्षाचीं फळें इंग्लंडास चाखावीं लागलीं. अमेरिकेमध्यें इंग्रजी अमलाच्या विरुद्ध बंड होऊन अमेरिकन लोकांनीं पूर्ण स्वतंत्र असें स्वराज्य स्थापलें (इ. स १७७६). त्या प्रसंगीं आयरिश लोकांनीं त्यांना यथाशक्ति हातभार लाविला होता. तसेंच फ्रान्समध्यें राज्यक्रांति झाली त्या वेळीं नेपोलियनच्या सैन्यांत पुष्कळ आयरिश लोकांनीं नोकऱ्या धरल्या. या दोन्ही चळवळींचा परिणाम आयर्लंडवर झाला.

यावेळीं परचक्र येऊन आयर्लंड हातचें जाण्याची इंग्लंडास फार भीति वाटूं लागली व आयर्लंडांतील प्रॉटेस्टंट लोकांत सैन्याचीं पथकें उभारल्याखेरीज गत्यंतर नाहीं असें पाहून तसें करण्यास अधिकाऱ्यांस हुकूम सोडण्यांत आले. या संधीचा फायदा घेऊन आयरिश प्रॉटेस्टंटांनीं पन्नास हजार लढाऊ लष्कर जमविलें. याचा परिणाम उलट असा झाला कीं आयरिश प्रॉटेस्टंट लोकांस आत्मविश्वास वाटूं लागला व स्वतंत्र होण्याची इच्छा त्यांस उत्पन्न झाली. या सुमारास आयरिश पार्लमेंटचे नेते चार्लमॉंट, ग्रॅटन, फ्लड वगैरे होते. त्यांनीं स्वयंसैनिकांचा फायदा घेऊन आयरिश स्वातंत्र्याचा हक्क नेटानें पुढें मांडला व अमेरिकेचें उदाहरण डोळ्यापुढें ताजें असल्यामुळें इंग्लंडास तो मान्य करणें भाग पडलें. अशा प्रकारें १७८२ सालीं आयरिश पार्लमेंट स्वतंत्र झालें.

**स्वतंत्र पार्लमेंटचा यशस्वी कारभार.**—सन १७८२ सालीं आयरिश पार्लमेंट सभेस स्वातंत्र्य मिळण्याच्या पूर्वीचा संधिकाल व तें मिळल्यानंतरचीं पहिलीं पांच दहा वर्षें आयर्लंडचा यशोदुंदुभि चोहोंकडे वाजत होता. केवळ क्षणभर टिकणारी अशी ही चकम होती परंतु तिनें पाहणाराचे डोळे दिपवून टाकले होते यांत शंका नाहीं. देशामध्यें विद्या, कला, उदारमतें, बंधुप्रेम, धैर्य, धाडस, व वक्तृत्व या सर्वांचे ग्रह एकसमयावच्छेदेकरून व उच्चीचे आल्यासारखे भासत होते. ग्रेटन, फ्लड,

हाचिन्सन्, पॉनसन्बी वगैरे नांव घेण्यासारखे मुत्सद्दी या वेळीं आयरिश पार्लमेंटमध्यें होते. त्यांनीं पार्लमेंटचें स्वातंत्र्य मिळतांच व्यापारास प्रतिबंध करणाऱ्या कायद्यावर गदा आणली. तसेंच आयरिश मतांचें प्राबल्य व आयर्लंडच्या पैशावर चरणाऱ्या इंग्रजांच्या खुराकावर हल्ला या गोष्टी इंग्रजांनां आवडणें शक्य नव्हतें. यामुळें आयर्लंडांत रक्तपाताची वेळ लवकरच आली. इंग्रजी पार्लमेंटचा ताबा आयर्लंडवर विनाकारण राहणें हेंच या सर्व कटकटीचें मूळ होतें. तें उच्छेदून टाकण्यासाठीं वूल्फटोन या नांवाच्या तरुण, तरतरीत, व धाडशी देशभक्तानें ' युनायटेड आयरिशमेन ' या नांवाची संस्था काढून तिच्या शाखा अमेरिका व फ्रान्स यांमध्यें स्थापून अखेर १७९८ सालीं फ्रेंच लोकांची मदत घेऊन बंड केलें. त्या बंडांचा वेळींच मोड झाला परंतु या संधीचा फायदा घेऊन वुइल्यम पिट या इंग्लंडच्या मुख्य प्रधानानें आयरिश पार्लमेंटांतील लोकांस पदव्या व पैसा यांची यथास्थित खैरात करून आयरिश पार्लमेंट मोडून तें इंग्रजी पार्लमेंटास जोडून घेण्याचा ठराव पास करून घेतला, व इ. स. १८०० सालीं आयरिश स्वातंत्र्य पुन्हां नष्ट झालें.

पा र्ल में टां च्या ए की क र णा चे प रि णा म.— एकोणिसाव्या शतकाच्या पहिल्या तीस वर्षांत रोमनकॅथोलिक लोकानां प्रॉटेस्टंट लोकांशीं समान हक्क मिळवून देण्याची एक मोठी चळवळ डॅनियल ओकानेल या आयरिश देशभक्ताच्या परिश्रमामुळें यशस्वी झाली. तसेंच जमीन वाटणीच्या बाबतींतील अन्यायहि थोड्याफार स्वरूपांत दूर झाला. पण याहून अधिक महत्त्वाची चळवळ म्हणजे होमरूल संबंधाची होय.

हो म रू ल ची च ळ व ळः—आयरिश पार्लमेंट इंग्रजी पार्लमेंटास मिळाल्यामुळें राजकीय, आर्थिक, व्यापारविषयक वगैरे सर्व प्रकारचा फायदा इग्लंडाचाच झाला; आयर्लंडचा झाला नाहीं असें समजून अल्यामुळें ओकानेलनें सुरू केलेल्या ' रिपील ' च्या चळवळीस बरीच लोकप्रियता आली. परंतु १८४४ मध्यें ओकानेल यास व राष्ट्रीय पक्षाच्या इतर लोकास तुरुंगांत जावें लागलें; इतकेंच नव्हे तर धोरणांत थोडासा फरक करतांच त्याची लोकप्रियताहि नाहिशी झाली. परंतु हीच चळवळ पुढें १८७४ सालीं होमरूल या नांवानें प्रसिद्धीस आली. प्रथम लँड लीग व नंतर ' नॅशनल लीग ' या संस्था अस्तित्वांत आल्या व आयर्लंडभर बहिष्कारचें बंड माजून सर्व सत्ता लँडलीगच्या चालकांच्या हातीं कित्येक वर्षे राहिली. ब्रिटिश पार्लमेंटांतील आयरिश सभासदांना अडवणुकीची गुरुकिल्ली मिळाल्यामुळें त्यांनीं तिचा उत्तम उपयोग करून ब्रिटिश पार्लमेंटला इतकें सतावून सोडलें कीं आयर्लंडला स्वतंत्र पार्लमेंट दिलेलें पुरवलें पण हा त्रास नको, असें इंग्रज लोकांस वाटूं लागलें. या होमरूल चळवळीचें सर्व श्रेय प्रसिद्ध आयरिश पुढारी पार्नेलं यास आहे.

आयरिश पार्लमेंट सभा ब्रिटिश पार्लमेंटास जोडल्यापासून ५० वर्षांत कर्मधर्मसंयोगानें आयर्लंडची लोकसंख्या ५० लक्षापासून ८५ लक्षापर्यंत वाढली. परंतु १८४४–४५ पासून पुन्हां दुष्काळामुळें त्या लोकसंख्येचा बेसुमार संहार होऊं लागला, व शेवटीं आयर्लंडांत लोकवस्ती शिल्लक तरी राहते कीं नाहीं अशी शंका येऊं लागली. अर्थातच अशा आपत्तीमुळें लोकांचीं मनें असंतुष्ट होऊन या आपत्तीस मूळ कारण ब्रिटिश सरकार असें त्यांस वाटूं लागलें. दुसरें असें कीं कॅथोलिक लोकांनां धर्मस्वातंत्र्य देण्याबद्दलचें वचन दिल्याप्रमाणें कृति घडवून आणण्यास तीस वर्षे लागलीं. यामुळें ब्रिटिश मुत्सद्यांच्या वचनावरचा आयरिश लोकांचा भरंवसा उडाला. यामुळें पुन्हां १८४८ पासून १८५८ पर्यंत आयर्लंडमध्यें किरकोळ बंडें झालीं. १८५८ पासून पुढील तीस पसतीस वर्षांत सिनफिन पक्षाच्या लोकांनीं बरीच गडबड उडविली होती. फिनियन लोकांच्या चळवळीचा मोड झाल्यानंतर आयरिश लोक बहिष्कारादि स्वावलंबनाच्या मार्गास लागले. व पार्नेलचा शिष्य रेडमंड यानें ब्रिटिश पार्लमेंटांत शंभर आयरिश सभासदांच्या मदतीनें भांडून होमरूल मिळविण्याची खटपट सुरू ठेविली.

१८३३ मध्यें राष्ट्रीय शिक्षणपद्धति सुरू झाली, पण आयर्लंडची आर्थिक स्थिति चिंताजनक होती. दुष्काळ, परदेशगमन, आणि नवीन झालेला अनाथपोषण विषयक कायदा ( पुअर लॉ ) यांच्यायोगानें उपासमारीचा प्रश्न बराचसा सुटला. परंतु राष्ट्र राजनिष्ट बनूं शकलें नाहीं. १८४८ मधील यूरोपभर उठलेल्या राज्यक्रांत्यांच्या लाटेबरोबर आयर्लंडांतहि बंड झालें, पण तें मोडण्यांत आलें. अमेरिकेंतील आपसांतलें युद्ध ( अमेरिकन सिव्हिलवार ) संपल्यानंतर मोकळे झालेले बरेचसे आयरिश लढवय्ये लोक आयर्लंडांत परत आले. जॉन ओमहोनीनें अमेरिकेंत एक गुप्त मंडळ स्थापलें. त्याला ' फिनियन ब्रदरहूड, असें नांव होतें. या फिनियन लोकांनीं स्वतंत्र आयरिश पार्लमेंट स्थापण्याचीच चळवळ चालविली. ब्रिटिश पार्लमेंटांत आयरिश पक्षाचा पुढारी आयझॅक बट हा १८७९ मध्यें मरण पावल्यावर पार्नेल हा त्या पक्षाचा पुढारी बनला.

लँड लीगः—१८६० सालीं ' डीसीज ' ॲक्ट नांवाचा जमिनीबाबद एक कायदा पार्लमेंटनें पास केला. त्यांतील मुख्य तत्त्व असें होतें कीं, शेतकरी हा नुसता खंडकरी मानण्यांत येऊन त्याजकडून जमीनदारानें खंड किती घ्यावा, त्यास कसें वागवावें, अगर खंडचिठ्ठी रद्द कशी करावी, याविषयीं उभयतांमध्यें जो करार असेल त्याचाच अंमल करण्यांत यावा.

परंतु या कायद्यानें आयरिश शेतकऱ्यांस मदत न होतां हा विरोध अधिकाधिकच वाढूं लागला. कुळास वाटेल तेव्हां काढण्याचा हक्क जमीनदारास असल्यामुळें कुळानें जमीन दुरुस्त करण्याकरितां केलेली मेहेनत व खर्चलेले पैसे फुकट जातात व आयत्या बिळांत नागोबानें शिरावें याप्रमाणें जमीनदार एका कुळाचें ठिकाण हस्तगत करून आपल्यास अधिक नफा मिळेल अशा रीतीनें दुसऱ्यास तें लावी. या स्थितीचा कडेलोट होऊन १८७० सालीं पार्लमेंटला नवीन कायदा करावा लागला. या कायद्यानें असें ठरलें कीं, कूळ जेव्हां ठरलेली खंडाची रक्कम देणार नाहीं, व केवळ या कारणाकरितां जमीनदार त्याला ठिकाणांतून काढून लावील, तेव्हांच मात्र त्यास जमीनदारानें नुकसानीची भरपाई करून द्यावयाचें कारण नाहीं. परंतु खंड न देण्याखेरीज इतर कोणतीहि एखादी शर्त कुळानें मोडली अगर करार पाळला नाहीं, व या कारणाकरितां जर त्यास जमीनींतून काढिलें तर मग त्यास जमीनदारानें नुकसानीची भरपाई करून दिली पाहिजे असेंहि ठरलें. परंतु एवढ्यानेंहि भागेना कारण आयर्लंडांत हिंदुस्थानाप्रमाणें दुष्काळ नित्य पडतो. व दुष्काळ पडला म्हणजे अर्थातच कुळास खंडाची रक्कम देतां येत नाहीं. अतिवृष्टि किंवा अनावृष्टि होऊन पीक बुडालें तर त्यांत कुळास काय दोष? व दुष्काळ पडला असतां कुळानें खावें काय व जमीनदाराला द्यावें काय? अर्थात खंड वेळीं न दिल्यामुळें कुळास नुकसान भरून न देतां काढतां यावें असेंहि १८७० च्या कायद्यांत जें कलम होतें तें शेतकरीवर्गास फार जाचूं लागलें. १८७९ च्या सुमारास धान्याच्या भावास अतिशय मंदी आली आणि दुष्काळची पीडाहि फार झाली. तेव्हां पूर्वी १८६० सालीं जशी अस्वस्थता माजली होती, तशीच फिरून एकवार माजली. यामुळें शेतकीबाबद राजकीय चळवळ सुरू झाली. या सालीं आगस्ट महिन्यामध्यें मायकेल डीव्हिट यानें 'लँड लीग' नांवाच्या संस्थेची स्थापना केली व लवकरच पारनेल हा या संस्थेचा अध्यक्ष झाला. देशांतील जमीनदारांचें बंड मोडलें पाहिजे हें लँड लीगचें मुख्य तत्त्व होतें. व पूर्वी फीनियन चळवळींत सामील असलेले लोक हातीं घेऊन डीव्हिट व पारनेल यांनीं सर्व आयर्लंडभर या संस्थेच्या शाखा पसरल्या. अमेरिकेंतूनहि या कामास चार लक्ष रुपयांची कुमक मिळाली. व हळूहळू लँड लीगचें काम इतकें फैलावलें कीं, शेतकऱ्यांच्या दुःखाखेरीज दुसरें कोणी कांहीं बोलेनासे झाले.

**बायकॉट उर्फ बहिष्कार.**—१८८०सालीं पार्नेलनें एनिस येथील आपल्या व्याख्यानांत असें सांगितलें कीं, जमीनदारानें एका कुळास काढून टाकल्यास ती जमीन दुसऱ्या कोणाहि कुळानें लागवडीस घेऊं नये; घेतल्यास त्याला इतरांनीं महारोग्याप्रमाणें बाजूला टाकावा. मेयो येथील लार्ड अर्न याच्या कॅप्टन बायकॉट नांवाच्या वहिवाटदारानें कुळांनीं ठरवून दिल्याप्रमाणें खंड घेण्याचें नाकारलें; तेव्हां या अपराधाकरितां त्याला बाजूला टाकण्याचें म्हणजे बहिष्कृत करण्याचें ठरलें, व त्याच्या नांवावरूनच या कृत्याला 'बायकॉट' असा शब्द रूढ झाला, नोकरांनां त्याची नोकरी सोडण्यास भाग पाडण्यांत आलें, त्यामुळें पिकांचें रक्षण झालें नाहीं, शिवाय त्याला पत्रें तारा वगैरे मिळूं नयेत असा अडथळाहि करण्यांत आला. तेव्हां अल्स्टर परगण्यांतील ऑरेंजमेन पक्षापैकीं पन्नास इसमांनीं ५०० सैनिकांच्या मदतीनें त्याच्या पिकाची नीट व्यवस्था लावली. तथापि बहिष्काराचें अस्त्र अनेकांविरुद्ध वापरण्यांत येऊं लागलें तेव्हां या चळवळीचे पुढारी म्हणून पार्नेल व पार्लमेंटचे आणखी चार सभासद व लँड लीगचे प्रमुख अधिकारी यांच्यावर क्वीन्स बेंच कोर्टापुढें खटला भरण्यांत आला; पण ज्यूरर लोकांत एकमत न झाल्यामुळें आरोपी निर्दोषी ठरून सुटले. यामुळें बहिष्काराच्या चळवळीस फार उत्तेजन मिळून आयर्लंडांत दोन वर्षें झोटिंगशाही माजली. १८८५ मध्यें दि टाइम्स या पत्रांत या चळवळीचें असें वर्णन केलें आहे कीं, "बहिष्कार घालणें म्हणजे राजनिष्ठ प्रजाजनास अन्नपाणी मिळूं देऊं नये, त्याचा उद्योगधंदा बुडवावा, त्याच्या विकाऊ गुरांनां बाजारांत गिऱ्हाईक मिळूं नये, लोहारानें घोड्यांनां नालबंदी करूं नये, सुतारानें गाडी दुरुस्त करूं नये, मित्रांनीं भेट घेऊं नये, त्याच्या मुलांची हुर्यो करावी," इत्यादि, या बेकायदेशीर प्रकारांना आळा घालण्याकरितां पार्लमेंटांत "कोअर्शनबिल" (दडपशाहीचा कायदा) पुढें आलें, तेव्हां पार्लमेंटची सभा एकदां सारखी २२ तास व आणखी एकदां सारखी ४१ तास चालल्यावर तो कायदा पास करण्यांत आला. पण त्यावेळीं आयरिश सभासदांनीं इतकी बेशिस्त वर्तणूक केली कीं, पार्नेल व त्याचे ३५ साथीदार यांनां कांहीं काळ पार्लमेंटमधून बडतर्फ करण्यांत आलें. पुढें लवकरच पार्लमेंटनें आयर्लंडविरुद्ध आर्म्स ॲक्ट (हत्यारांचा कायदा) हि पास केला. तथापि त्यास न जुमानतां आयर्लंडांत दंगेधोपे अमेरिकेंतील लोकांच्या मदतीनें पुष्कळ झाले; व त्यांत अंग असल्याच्या संशयावरून पुष्कळांनां तुरुंगांत टाकण्यांत आलें. पण त्यानेंहि अत्याचार बंद न पडतां वाढत गेले. पुढें ग्लॅडस्टननें धोरण बदलून आयरिश पक्षाशीं सलोखा केला आणि पार्नेल, डिलन व ओ केली या पार्लमेंटच्या सभासदांनां कैदेंतून मुक्त केलें. या तडजोडीला किलमेनहॅमचा तह म्हणतात. येवढ्यानेंहि अत्याचार थांबले नाहींत. फोनिक्स पार्क येथें भर दिवसां दोन वरिष्ठ अधिकाऱ्यांचे खून झाले, व त्यासंबंधाच्या चौकशींत सर्व सरकारी अधिकाऱ्यांचे खून करण्यासंबंधाचा एक गुप्त कट उघडकीस आला. १८८१ च्या पहिल्या सहामाहींत २५९७ अत्याचार झाले. जुलैमध्यें क्राइम्स प्रिव्हेन्शन ॲक्ट (गुन्हेप्रतिबंधक कायदा) पास झाला; आणि

दुसऱ्या सहामाहींत अत्याचारांची संख्या ८३६; १८८३ सालीं ८३४ व १८८४ सालीं ७४४ झाली.बंद पडलेल्या लँड लीगच्या ऐवजीं नॅशनल लीग (राष्ट्रीयसंघ) स्थापन झाला, व अत्याचारांची परंपरा चालू राहिली व त्यांत डायनामाईटच्या स्फोटांनीं बराच विध्वंस केला. इ. स. १८८३ च्या डिसेंबर ११ तारखेस पार्नेलला त्याच्या अनुयायांनीं ३७००० पौंड रक्कम नजर केली आणि अत्याचारांचें व बहिष्काराचें सत्र चालूंच राहिलें.

आ य रि श हो म रू ल बि ल.—ग्लॅडस्टन आयर्लंडला होमरूल देण्याच्या मताचा बनला होता. इ. स. १८८५ मध्यें पार्लमेंटच्या निवडणुकींत ३३१ लिबरल, २४९ कांझरव्हेटिव्ह व ८६ होमरूलर निवडून आल्यामुळें १८८६ मध्यें लिबरल पक्ष अधिकारारूढ होऊन ग्लॅडस्टन मुख्य प्रधान झाला, व एप्रिल महिन्यांत गव्हर्मेंट आफ आयर्लंड ( होमरूल ) बिल पार्लमेंटपुढें मांडण्यांत आलें. पण दुसऱ्या वाचनाच्या वेळीं लिबरल पक्षापैकींच जॉन ब्राइट वगैरे ९३ सभासदांनीं विरुद्ध मत दिल्यामुळें बिल ३० मतांनीं नापास झालें. त्यामुळें पुन्हां निवडणूक होऊन लिबरल यूनियनिस्ट पक्षाचे ७४ सभासद निवडून आले, व त्यांच्या सहकारित्वामुळें कांझर्व्हेटिव्ह पक्षाच्या हातीं अधिकारसूत्रें गेलीं. पुन्हां अत्याचार व सरकारी धरपकड चालू झाली. १८८८ च्या जुलैमध्यें कमिशनमार्फत, दि टाइम्स पत्रानें पार्नेल व त्याचा पक्ष यांच्याविरुद्ध केलेल्या कांहीं आरोपांची चौकशी करण्यांत येऊन त्यांत तो निर्दोषी ठरला. शिवाय पार्नेलनें लावलेल्या फिर्यादींत टाइम्स पत्राला मोठी रक्कम भरून तडजोड करावी लागली. तथापि एका घटस्फोटच्या खटल्यामुळें पार्नेलच्या लोकप्रियतेस धोका आला, आणि ग्लॅडस्टननें लिबरल पक्षाचें पुढारीपण स्वीकारण्यास पार्नेलनें आयरिश पक्षाच्या पुढारीपणाचा राजीनामा द्यावा अशी अट घातली. त्यामुळें पार्नेलच्या अनुयायांत मतभेद माजले, व स्वतःचें स्थान कायम ठेवण्याची पार्नेलची खटपट चालू असतांना श्रमातिशयानें त्यांतच त्याचा १८९१ आक्टोबर ता. ६ रोजीं अंत झाला. सन १८९२ च्या निवडणुकींत ग्लॅडस्टन पक्षानें नॅशनॅलिस्ट पक्षाच्या मदतीनें आपलें माताधिक्य केलें, व अधिकारसूत्रें हातीं घेतलीं. १८९३ मध्यें दुसरें होमरूल बिल पार्लमेंटपुढें आलें. यावेळीं तीन वाचनें मिळून कामन्स सभेला ब्यायशीं रात्री वादविवादांत खर्चाव्या लागल्या व अखेर तें अवघ्या ३४ मतांनीं पास झालें; पण लार्डांच्या सभेनें २४९ विरुद्ध ३० इतक्या प्रचंड बहुमतानें नापास केलें.

सन १८९५ अखेर नव्या निवडणुकी होऊन यूनियनिस्ट पक्ष अधिकारावर आला.१८९६ मध्यें नवा लँड ॲक्ट पास झाला. १८९४ मध्यें नेमलेल्या कमिशननें १८९६ मध्यें रिपोर्ट प्रसिद्ध केला व आयर्लंडवर कराचा बोजा अधिक आहे असें मत दिलें. १८९८ मध्यें लोकल गव्हर्मेंट ॲक्ट पास झाला. रोमन कॅथोलिक युनिव्हर्सिटी स्थापण्याचे सर आर्थर बाल्फोरचे प्रयत्न मात्र निष्फळ झाले. १८९९ मध्यें ॲग्रिकलचरल अँड टेक्निकल इन्स्ट्रक्शन ॲक्ट ( शेतकी व कला यांचें शिक्षण देण्याबाबत कायदा ) पास झाला. १९०० च्या एप्रिलमध्यें विक्टोरिया महाराणीनें आयर्लंडला भेट दिली. पूर्वी १८६१ मध्यें महाराणीनें पतीसह आयर्लंडला भेट दिली होती. तसेंच १८८५ त युवराजानें, १८८७ मध्यें प्रिंस आल्बर्ट व्हिक्टर व प्रिंस जॉर्ज यांनीं, १८९७ मध्यें यॉर्कचा ड्यूक व डचेस यांनीं याप्रमाणें राजकुटुंबियांनीं आयर्लंडला भेटी दिल्या होत्या.

१९०० मध्यें डिलन, रेडमंड, वगैरे आयरिश पुढाऱ्यांनीं आपसांतील मतभेद बाजूस ठेऊन एकी करून होमरूलच्या चळवळीकरितां अमेरिकेंत जाऊन पैसे आणले. पण १९०२ मध्यें लॉर्ड रोजबरीनें स्वतः होमरूल चळवळीच्या विरुद्ध असल्याचें जाहीर केलें. १९०२ मध्यें वींडहॅमचा लँड परचेस ॲक्ट ( जमीनदारांपासून कुळांनीं जमीनी विकत घेण्यासंबंधाचा कायदा ) पास झाला. किंमतीपैकीं शेकडा १२ रक्कम पार्लमेंटनें मंजूर केलेल्या फंडातून जमीन विकणारास द्यावी असें ठरलें. याच सुमारास आयर्लंडच्या अंतर्गत खर्चाची व्यवस्था पाहण्याकरितां निम्मे सरकारनियुक्त व निम्मे लोकनियुक्त अशा सभासदांचें कौन्सिल नेमावें अशी एक योजना पुढें आली ती ' डेव्होल्यूशन पॉलिसी' या नांवानें प्रसिद्ध आहे. तथापि तिला पाठबळ न मिळाल्यामुळें ती मागें पडली.

१९०५ मध्यें बाल्फोरनें राजीनामा दिल्यामुळें सर हेनरी कॅम्बेल–बॅनरमन मुख्य प्रधान आणि लॉर्ड आबर्डीन लॉर्ड लेफ्टनंट व जेम्स ब्राइस चीफ सेक्रेटरी झाला. पण १९०६ च्या निवडणुकींत यूनियनिस्ट पक्ष पराभूत होऊन लिबरल पक्ष प्रचंड बहुमतानें अधिकारावर आला. १९०६ ते १९१० पर्यंत होमरूलची चळवळ साधारण चालू होती. मध्यंतरी एक आयरिश कौन्सिल स्थापण्याची योजना पुढें आली ती आयरिश राष्ट्रीय पक्षानें नापसंत ठरविली. १९१० च्या निवडणुकींत लिबरल व यूनियनिस्ट पक्ष समबल झाले. त्यामुळें रेडमंडच्या आयरिश नॅशनॅलिस्ट पक्षाला स्वतःचा कार्यभाग साधण्याची पुन्हा संधि आली.

नं त र ची च ळ व ळ.—या सालापासून आयर्लंडच्या इतिहासाला पुन्हां निराळी दिशा लागली. मागील वर्षांत असा अनुभव आला होता कीं, लोकांच्या आर्थिक अडचणी दूर करण्यांत येऊं लागतांच राजकीय चळवळ मंदावूं लागते. उदाहणार्थ, १९०३ सालीं पास झालेल्या वींडहॅम परचेस ॲक्टचा फायदा घेऊन १९०३ ते १९०९ या सालांत २१७००० शेतकऱ्यांनीं जमीनदारांपासून जमिनी विकत घेतल्या, व त्यामुळें इतक्या शेतकरी लोकांची आर्थिक स्थिति सुधारून ते सुखानें राहूं लागले.

परंतु १९०९ नंतर स्टॉकचा भाव उतरल्यामुळें जमीनदार लोक पूर्वीच्या अटीप्रमाणें जमिनी विकण्यास कबूल होईनात, त्यामुळें पुन्हां उरलेल्या शेतकरी वर्गांत असंतोष उत्पन्न झाला. दुसरा एक असंतुष्ट वर्ग उत्पन्न झाला, तो शेतावरील मजुरांचा. अशा मजुरांची, पूर्वीच्या खुशालचंद जमीनदारांच्या अमदानींत शेतकामांत चांगली मजुरी मिळत असल्यामुळें, चांगली स्थिति होती. पण आतां प्रत्यक्ष शेतकरीवर्गानें जमिनी विकत घेऊन घरगुती शेती करण्यास आरंभ केल्यामुळें मजुरीचे दर उतरले व मजूरांनां भरपूर काम मिळेनासें झालें. शिवाय अशा बेकार मजूर वर्गाला जागतिक युद्ध सुरू होतांच परदेशगमनाचा मार्गहि बंद झाला. अशा रीतीनें उपर्युक्त हे दोन वर्ग असंतुष्ट होऊन राजकीय चळवळीला गेल्या दहा वर्षांत अधिक जोर आला. या राजकीय चळवळीला म्हणजे आयरिश होमरूलच्या चळवळीला जोर १९१० च्या सुमारास येण्यास आणखी एक कारण असें झालें कीं, ब्रिटिश पार्लमेंटच्या निवडणुकींत यूनियनिस्ट व लिबरल हे दोन पक्ष समबल झाल्यामुळें जॉन रेडमंडच्या नेतृत्वाखालीं आयरिश नॅशनॅलिस्ट पक्षाचा पाठिंबा मिळविण्याकरितां होमरूलचा थंडावलेला प्रश्न लिबरल पक्षानें पुन्हां हातीं घेतला. होमरूलच्या प्रश्नाच्या या पुनरुज्जीवनाबरोबर आयर्लंडांतील पक्षभेदांनीं पुन्हां जोरानें डोकें वर काढलें. अल्स्टरमधील प्रॉटेस्टंटपक्षी ऑरेंजमेन नांवाच्या लोकांचा पक्ष हा इतर आयर्लंडांतील सर्व कॅथॉलिकपंथी लोकांच्या विरुद्ध होता. अल्स्टरखेरीजच्या आयर्लंडांत आयरिश नॅशनॅलिस्टपक्ष, आयरिश मजूरपक्ष व सिनफिन (आम्ही स्वतः) हा निर्भेळ स्वातंत्र्यवादी पक्ष, असे तीन उपपक्ष होते.

सिनफिन.—गेल्या दहाबारा वर्षांत सिनफिन पक्षानें फार जोराची चळवळ केली. ह्या पक्षाच्या कार्यक्रमांत आयर्लंडची सामाजिक व औद्योगिक उन्नति करणें हेहि उद्देश होते; व स्वतंत्र आयरिश रिपब्लिक स्थापणें हें ध्येय त्यांनीं जाहीरपणें स्वीकारलें होतें. शांततेच्या मार्गांनी स्वातंत्र्य मिळवावयाचें असेंच १९१० पर्यंत हा पक्ष प्रतिपादीत होता. पण त्यांचा पुढारी आर्थर ग्रिफिथ यानें पुरस्कृत केलेला मार्ग म्हणजे मग्यार लोकांनीं आस्ट्रियाच्या हंगेरीवरील सत्तेविरुद्ध यशस्वी रीतीनें स्वीकारलेला मार्ग आक्रमण्यासंबंधीं या पक्षाचे बेत सुरू झाले होते. आयरिश नॅशनॅलिस्ट पक्षाच्या सहकारितेच्या धोरणाची विटंबना करून सिनफिनपक्षानें लवकरच देशांतील बहुमत स्वपक्षाकडे ओढून घेतलें. हा पक्ष आयरिशभाषा, आयरिशवाङ्मय वगैरे सर्व राष्ट्रीय गोष्टींनां उत्तेजन देण्याची भाषा बोलत असे.

आयरिश नॅशनॅलिस्ट पक्षः-यांत ओब्रायन व रेडमंड पक्ष अशी दुफळी होती, तथापि साम्राज्यांतर्गत स्वराज्य मिळविणें हें या पक्षाचें ध्येय होतें. हा प्रयत्न पुन्हां जोरांत आणण्याकरितां रेडमंडनें अमेरिकेंत व्याख्यानें देऊन २००००० डॉलर फंड गोळा करून आणला. पण या होमरूलच्या चळवळीला यूनियनिस्ट पक्ष उर्फ अल्स्टर प्रॉटेस्टंट पक्ष सर एडवर्ड कार्सनच्या नेतृत्वाखालीं विरोध करीत होता. १९१२ मध्यें ब्रिटिश मुख्य प्रधान आस्क्किथ यानें होमरूल बिल पार्लमेंटमध्यें आणलें व त्याबरोबर यूनियनिस्ट पक्षानें त्याला विरोध करण्याची अधिक जोराची तयारी सुरू केली. जरूर तर सशस्त्र प्रतिकार करतां यावा म्हणून या पक्षानें स्वयंसेवकांचीं पथकें—सुमारें १००००० सैन्य—उभारून त्यांवर जनरल सर जॉर्ज रिचर्डसन यास मुख्य कमांडरहि नेमिलें. इंग्लंडच्या राजाशीं आम्ही पूर्ण राजनिष्ठ आहों व वेळ पडल्यास या सर्व सैन्यानिशीं इंग्लंडच्या शत्रूशीं लढण्यास तयार आहों, असेंहि या पक्षानें जाहीर केलें.

या अल्स्टरवाल्यांच्या चळवळीचा सिनफिन पक्षानें निराळ्याच तऱ्हेनें फायदा घेतला. निर्भेळ स्वातंत्र्याकरितां स्वयंसेवक सैन्य उभारावें, व स्पष्ट चिन्ह दिसत असलेल्या इंग्लंड व जर्मनी यांच्यामधील भावी युद्धाची संधि साधून स्वतंत्र व्हावें, अशा प्रकारचा उपदेश या पक्षानें 'आयरिश फ्रीडम'या स्वपक्षीय पत्रांतून सुरू केला, व राष्ट्रीय सेवक सैन्य जमविण्यास सुरवात केली. आयर्लंडांतलि तीन पक्षांच्या या त्रिविध वागणुकीमुळें होमरूल बिलाची विल्हेवाट कशी लावावी, याबद्दल ब्रिटिश मुत्सद्यांसहि मोठा प्रश्न पडला. तडजोड म्हणून अलस्टरला स्वतंत्र पार्लमेंट द्यावें असें सुचविण्यांत आलें. परंतु आयर्लंडचे असे दोन तुकडे पाडणें आयरिश राष्ट्रीय पक्षाला कबूल नव्हतें आणि या तडजोडीच्या सूचनेविरुद्ध आणि अलस्टरच्या लष्करी तयारी विरुद्ध रेडमंडनें टीकेचा भडिमार केला. तथापि अलस्टरपक्ष व आयरिश राष्ट्रीयपक्ष या दोघांनीं स्वयंसेवक सैन्याची तयारी सुरू ठेवली; चोरून हत्यारें मिळविण्याचा उद्योग चालविला, व त्यामुळें सरकारी पोलिसांच्या स्वयंसेवक सैन्याशीं क्वचित झटापटी होऊं लागल्या. इतक्यांत १९१४ आगष्ट ४ रोजीं जर्मनीबरोबर युद्ध पुकारण्यांत आलें. त्याचा अत्यंत आश्चर्यकारक परिणाम असा झाला कीं, सर्व आयर्लंड ग्रेटब्रिटनला मदत करण्यास एकदम तयार झालें, आणि जर्मनीविरुद्ध लढण्याचें नॅशनॅलिस्ट पक्षातर्फे रेडमंडनें आश्वासन दिलें. पार्लमेंट ॲक्टाअन्वयें आपोआप होमरूल बिलाला कायद्याचें स्वरूप प्राप्त झालें; पण त्या कायद्याची अम्मलबजावणी युद्ध संपेपर्यंत तहकूब ठेवण्याचें व त्या वेळीं अल्स्टरबद्दल निराळी योजना करण्याचें आश्वासन सरकारतर्फे मुख्य प्रधान आस्क्किथकडून देण्यांत आलें. युद्धारंभाचा फायदा घेऊन आस्क्विथनें होमरूल बिलाला कायद्याचें स्वरूप दिलें, ह्या गोष्टीचा बोनर लॉ व अल्टरचा पुढारी सर एडवर्ड कार्सन यांनीं निषेध केला; तथापि ब्रिटिश साम्राज्याकरितां जर्मनविरुद्ध लढण्याचा उपदेश कार्सननेंहि आपल्या अनुयायांस केला. सिनफिन

पुढाऱ्यांनीं मात्र रेडमंडचें धोरण बाजूस ठेवून सैन्यभरतीच्या ( रिक्रूटिंग ) कार्यास विरोध करण्याचा बेत केला, आणि 'आयरिश व्हालंटियर्स' नांवाचें स्वतःचें स्वतंत्र पथक उभारलें; पण त्यांनां लोकांचा पाठिंबा फारसा मिळाला नाहीं. उलट १९१४ ते १९१५ अखेरपर्यंत प्रत्येक कौंटींतील पोलीसचे रिपोर्ट असे होते कीं, युद्धारंभानें आयर्लंडांतील पक्षांत क्रांति घडली असून ते आपसांतील मतभेद पार विसरून गेले आहेत" अल्स्टरस्वयंसेवकांच्या ८५००० संख्येपैकीं २०७०० सैन्यांत दाखल झाले, आणि नॅशनल व्हालंटियरांच्या १७८६४९पैकीं १०फक्त दाखल झाले. तात्पर्य, पुढाऱ्याच्या उपदेशानेंहि सैन्यभरतींत यश समाधानकारक आलें नाहीं. त्याचीं कारणें अनेक होतीं. इंग्रज लष्करी अधिकाऱ्यांचा रेडमंडच्या नॅशनल व्हालंटियरवर पूर्ण विश्वास नसल्यामुळें त्या सर्वांनां चांगलें लष्करी शिक्षण देणें धोक्याचें वाटत होतें. शिवाय सिनफिन पक्ष आयरिश व्हालंटियरांची संख्या वाढवून सैन्यभरतीला व सक्तीच्या लष्करी नोकरीला विरोध करीत होता; 'इंग्लंडचें संकट ती आयर्लंडची संधि' असा उपदेश या पक्षानें चालविला होता. याला भिऊनच ब्रिटिश पार्लमेंटनें मिलिटरी सर्व्हिस ॲक्ट मधून आयर्लंडला वगळलें. शिवाय युद्धकालीं धान्याचे भाव फार वाढून मोठा नफा होऊं लागल्यामुळें आयर्लंडांतील सुखवस्तु जमीनदार घराण्यांतील तरुण लढाईतील दुःखकष्ट सोसण्यास पुढें येईनात अशी अनेक प्रकारें प्रतिकूल परिस्थिति असल्यामुळें, झाली सैन्यभरती झाली तीच अधिक झाली असें म्हणणें प्राप्त झालें.

**सि न फि न प क्षा चें ई स्ट र म धी ल बं ड.**—१९१५–१६ सालीं सिनफिन पक्षानें आपल्या वृत्तपत्रांमार्फत इंग्लंडविरुद्ध राजद्रोह पसरविण्याची, आणि आयरिश व्हालंटियर वाढविण्याची व त्यांनां गुप्तपणें हत्यारें पुरवून लढाईचें शिक्षण देण्याची चळवळ चालविली होती. या पक्षाच्या वाढत्या बळाबद्दल आयर्लंडांतील पोलीस खातें ब्रिटिश सरकारला मधूनमधून सूचना देत होतें. "डिफेन्स ऑफ दि रेल्म" ॲक्टानें हत्यारें व स्फोटकद्रव्यें जप्त करण्याचा अधिकार पोलीसला देण्यांत आला. तेव्हां हत्यारें काढून घेण्याच्या सरकारच्या प्रयत्नास सशस्त्र विरोध करण्यांत येईल, असे सिनफिन पुढाऱ्यांनीं जाहीरनामे काढले. १९१६ इस्टरमध्यें जर्मन सरकारच्या मदतीनें बंड उभारण्याचा बेत सिनफिनपक्षानें केला होता, त्याला हत्यारें काढून घेण्यासंबंधींच्या सरकारी हुकुमामुळें चांगलें कारण मिळालें, आणि ईस्टरच्या सोमवारीं डब्लिनमध्यें आयरिश व्हालंटियर व सिटिझन आर्मी ( नागरीक सैन्य ) यांनीं बंड करून किल्ला, कोर्टें, पोस्टआफीस, वगैरे ठिकाणें हस्तगत केलीं व 'आयरिश रिपब्लिकचें तात्पुरतें सरकार (प्रोव्हिजनल गव्हर्नमेंट)"स्थापल्याचा जाहीरनामाहि काढला.

ही बातमी कळतांच शहरांतील गुंड लोकांनींहि बाहेर पडून अनेक ठिकाणीं जाळपोळ व लुटालूट केली. परंतु एकदोन दिवसांत जनरल सर जॉन मॅक्सवेल यानें सरकारी सैन्याकडून शहरांतील रस्त्यांतून बंडखोरांवर मारा करवून सर्वांनां शरण येण्यास भाग पाडलें. याच वेळीं डब्लिन, वेक्सफर्ड, गॅलवे व लौथ या चार कौंटींमध्येंहि बंड उभारलें गेलें होतें, पण तेंहि थोडक्या प्रयासानें मोडून टाकण्यांत आलें. नंतर प्रमुख सिनफिनर व बंडांत सामील झालेले इतर लोक मिळून ३४३० पुरुष व ७९ स्त्रिया पकडण्यांत आल्या; व लष्करी कोर्टामार्फत चौकशी करून त्यांपैकीं १५ इसमांनां फांशी, ७५ इसमांनां जन्मठेप ते तीन वर्षेंपर्यंत निरनिराळ्या मुदतीची पीनल सर्व्हिट्यूड शिक्षा, आणि २३ जणांस दोन वर्षें ते सहा महिनेपर्यंतची सक्तमजुरीची शिक्षा याप्रमाणें शिक्षा देण्यांत आल्या.

कांहीं बंडखोरांस फांशी दिल्यामुळें आयरिश जनतेची सहानुभूति बंडखोर पक्षास अधिक मिळाली. पुन्हां आग भडकूं नये म्हणून मुख्य प्रधान आस्क्विथ यानें स्वतः आयर्लंडला १९१६ च्या मेमध्य भेट देऊन सर्व पक्षाच्या पुढाऱ्यांच्या भेटी घेतल्या व आयर्लंडला कोणते स्वराज्याचे हक्क द्यावयाचे त्याची वाटाघाट केली. तुरुंगांतील इसमांनांहि समक्ष भेट दिली. शिवाय परत आल्यावर लाईड जॉर्जला आयरिश पुढाऱ्यांशीं तडजोडीचें बोलणें करण्याच्या कामावर नेमल्याचें आस्क्विथनें पार्लमेंटांत जाहीर केलें. यामुळें ब्रिटिश सरकार पूर्ण नमलें अशी सर्व सिनफिन पक्षाची व इतरांची समजूत होऊन एका आठवड्याच्या सशस्त्र बंडाला मोठाच विजय मिळाला असें सर्व जगभर जाहीर झालें. तथापि होमरूलमधून अल्स्टरला वगळण्याची सूचना कायम असल्यामुळें व ती दक्षिण आयर्लंडला नापसंत असल्यामुळें या तडजोडीचे प्रयत्न निष्फळ ठरले. रेडमंडनें आयर्लंडच्या विभागणीस संमति दिल्याचें कळल्यावर लोकांवरचें त्याचें वजन मात्र कमी झालें. आयर्लंडांत लष्करी कायदा चालू होता, तो काढून टाकावा अशी सूचना रेडमंडनें पार्लमेंटमध्यें आणली; तेव्हां जनरल मॅक्सवेलला आयर्लंडांतून परत बोलावण्यांत आलें. पण त्यानंतर सिनफिन पक्षाची चळवळ अधिक बळावली.

१९१७ हें साल ब्रिटिश सरकारला आयर्लंडांत फार काळजीचें गेलें. एका हातानें सवलती व दुसऱ्या हातानें दंडपशाही असें धोरण सरकारनें चालू ठेवल्यामुळें पुढें १९२०–२१ सालांत अत्यंत अनिष्ट परिस्थिति उत्पन्न झाली. युनैटेड स्टेटस सरकार दोस्तांच्या वतीनें जागतिक युद्धांत पडल्यामुळें सिनफिन पक्षाच्या चळवळीस धक्का बसला. तथापि तहपरिषदेंत आयर्लंडचा स्वतंत्र प्रतिनिधि घ्यावा अशी खटपट, आणि निःशस्त्र प्रतिकार व अधिकाऱ्यांवर बहिष्कार या दोन साधनांनीं ब्रिटिश सरकारचा आयर्लंडांतील राज्यकारभार अशक्य करण्याची चळवळ त्या पक्षानें चालू

ठेविली. सक्तीची लष्करी नोकरी, युद्धखर्चाकरितां करवाढ, धान्यावरील कंट्रोल ( नियंत्रण ) वगैरे गोष्टींचें भेसूर चित्र रंगवून आयरिश जनतेचें मन ब्रिटिश सरकारविरुद्ध कलुषित करण्याचा कार्यक्रम त्या पक्षानें चालू ठेविला. शिवाय सिनफिन पक्षाला हत्यारें, दारूगोळा व इतर मदत करण्याचा जर्मनांचा दुसरा एक कट चालू होता. पार्लमेंटद्वारें होमरूल मिळविण्याची खटपट करणाऱ्या नॅशनॅलिस्ट पक्षाचें दोषाविष्करण व नालस्ती करण्याचा सिनफिनपक्षीय वृत्तपत्रांचा उद्योग सारखा चालूच होता. नॅशनॅलिस्ट पक्षाच्या आग्रहामुळें सरकारनें ६०० बंडखोर बिनशर्त बंधमुक्त केले, पण लवकरच जर्मनांचा उपर्युक्त कट उघडकीस आला तेव्हां सिनफिन पक्षाचे २८ चळवळे इसम सरकारनें हद्दपार केले. तेव्हां आयर्लंडला स्वराज्य द्यावें असा ठराव पुन्हां पार्लमेंटपुढें आला व आस्क्विथच्या जागीं आलेले मुख्य प्रधान लाइड जॉर्ज यांनीं असें उत्तर दिलें कीं कोणावरहि जबरदस्ती न करतां जो भाग होमरूल पार्लमेंट स्थापण्यास तयार असेल त्यास तो हक्क देण्यास सरकार तयार आहे. पण या विभागणीच्या सूचनेला रेडमंडपुरस्कृत नॅशनॅलिस्ट पक्षानें पुन्हां निषेधपूर्वक नाकबूली दर्शविली. सिनफिनरांनीं स्वतःचा पक्ष सर्व राष्ट्रभर फैलावण्याचे प्रयत्न केले.

१६ मे १९१७ रोजीं मुख्य प्रधानानें रेडमंडच्या संमतीनें सर्व पक्षांच्या मिळून आयरिश प्रतिनिधींची कन्व्हेन्शन भरविण्याचें ठरविलें, आणि सर्वांची दिलसफाई होऊन एकी व्हावी म्हणून १९१६ सालच्या बंडांतील सर्व कैदी बिनशर्त सोडून दिले. सिनफिन पक्षाच्या प्लंकेट नामक पुढाऱ्यानें सिनफिनपक्ष कन्व्हेन्शनपासून अलिप्त राहील असें जाहीर केलें आणि बंधमुक्त पुढाऱ्यांनीं स्वपक्षसंघटना अधिक चांगली करण्याचें काम जोरानें सुरू केलें. उलटपक्षीं ट्रिनिटी कालेजच्या हॉलमध्यें कन्व्हेन्शनच्या बैठकी १७ जुलै १९१७ पासून सुरू होऊन ५ एप्रिल १९१८ रोजीं एक योजना बहुमतानें पास झाली. आयर्लंडमध्यें स्वतंत्र पार्लमेंट स्थापून युद्ध व तह, सैन्य व आरमार, परराष्ट्रीय संबंध वगैरे बाबी वगळून बाकी सर्व राज्यकारभार त्या पार्लमेंटच्या हातीं द्यावा, वगैरे सूचना तींत होत्या.

डी व्हॅलेराचें पुढारीपण.—पण याच काळांत कन्व्हेन्शनपासून अलिप्त राहिलेले सिनफिन पक्षाचे पुढारी आयर्लंडभर व्याख्यानांचे दौरे काढून स्वावलंबनाच्या मार्गानें आयर्लंड स्वतंत्र बनविण्याचा उपदेश सामान्य जनसमाजाला करीत होते. १९१६ च्या बंडांतील एक पुढारी एडवर्ड डी व्हॅलेरा यानें लोकांवरील आपलें वजन झपाट्यानें वाढविलें, व स्वयंसेवक सैन्याच्या मदतीनें ठिकठिकाणच्या पोलीसांवर हल्ला करून ' इंग्रजांचा कायदा अशक्य करण्याची ' आपली सशस्त्र प्रतिकाराची मोहिम सुरू केली; आणि त्या बरोबरच पार्लमेंटमधील आयरिश प्रतिनिधींच्या जागा व आयर्लंडांतील स्थानिक स्वराज्याच्या संस्थांतील जागा स्वपक्षीय प्रतिनिधीं-कडून निवडणुकीमध्यें काबीज करण्याचें धोरणहि सुरू केलें. तेव्हां सरकारनें निरुपायास्तव पुन्हा १४ प्रमुख सिनफिनर पकडले. त्यांनीं तुरुंगांत अन्नत्यागाचा मार्ग अवलंबिला आणि त्यामुळें थॉमस ॲश नांवाचा एक पुढारी मरण पावला. त्याच्या प्रेतयात्रेला डब्लिनमध्यें प्रचंड गर्दी जमली, व सिनफिन पक्षानें या प्रकरणाचा फायदा सरकारविरुद्ध लोकमत खवळविण्यास चांगला करून घेतला. त्यामुळें सरकारनें पेचांत येऊन अन्नत्यागी कैद्यांनां मुक्त करावें व ते बरे झाले म्हणजे त्यांनां पुन्हां कैद करावें, असें ' मांजर–उंदीर–न्यायाचें धोरण सुरू केलें. या पोरखेळामुळें सरकारची आयर्लंडवरील सत्ता अगदींच संपुष्टांत आल्यासारखी भासूं लागली. इ स. १९१७ आक्टोबरमध्यें सिनफिनपक्षानें स्वतःची कन्व्हेन्शन भरवून स्वतंत्र आयरिश रिपब्लिकची राज्यघटना ठरविली; डी व्हॅलेराला प्रेसिडेंट, आर्थर ग्रिफिथ व फादर मायकेल ओ, फ्लानेगन यांनां व्हाइस प्रेसिडेंट नेमून प्रधानमंडळहि ठरविलें. आयरिश व्हालंटियरांची परिषदहि भरविण्यांत आली त्यांत डि व्हॅलेरानें, पांच लक्ष स्वयंसेवक सैन्य जमवून स्वातंत्र्य मिळेपर्यंत कधींहि स्वस्थ बसणार नाहीं, असें भाषण केलें; आणि सरकारनें या दोन्ही परिषदां मनाई न करतां भरूं दिल्या.

सिनफिन चळवळ बंद पाडण्याचे सरकारी प्रयत्न.—आयर्लंडचा कारभार सरकारच्या आटोक्याबाहेर जात आहे अशीं स्पष्ट चिन्हें दिसूं लागलीं. अशा सुमारास आयर्लंडचा पार्लमेंटांतील प्रसिद्ध पुढारी रेडमंड ६मार्च१९१८ रोजीं मरण पावला व त्याबरोबर आयर्लंडचा प्रश्न योग्य तडजोडीनें मिटविण्याची शेवटची आशा नष्ट झाली. लवकरच लॉइड जॉर्जनें सक्तीच्या लष्करी नोकरीची मर्यादा पन्नास वर्षांच्या वयापर्यंत वाढविण्याचा व ते सर्व नियम आयर्लंडलाहि लागू करण्याचा ठराव ब्रिटिश पार्लमेंटांत पास करून घेतला. जॉन डिलन याच्या नेतृत्वाखालीं आयरिश नॅशनॅलिस्टपक्षानें या ठरावाला विरोध करून सिनफिनपक्षाशीं सहकार्य करण्याचें ठरविलें आणि उभय पक्षाच्या पुढाऱ्यांनीं सक्तीच्या लष्करी नोकरीविरुद्ध लोकमत तयार करण्याकरितां व्याख्यानें व जाहीरपत्रकें यांची मोहीम आरंभिली. ब्रिटिश सरकारला स्वसत्तेच्या रक्षणार्थ कडक उपाय योजण्याशिवाय गत्यंतर नव्हतें म्हणून पूर्वीचे अधिकारी बदलून त्यांच्या जागीं नवे अधिकारी सरकारनें नेमलें; त्यांत विशेष महत्त्वाची नेमणूक व्हायकौंट फ्रेंचला लॉर्ड लेफ्टनंट उर्फ आयर्लंडचा व्हाईसरॉय करणें ( मार्च १९१८ ) ही होय. या लष्करीबाण्याच्या व्हाईसरॉयनें प्रथम माजी व्हाइसरॉयांची राहण्याची दरबारी व भपकेबाज पद्धति एकदम बंद करून खाजगी राहण्यावागण्यांतसुद्धां लष्करी शिस्त सुरू केली. या नव्या प्रकारच्या अधिकारी वर्गानें आपलें धोरण अमलांत आणण्यास उशीर लावला नाहीं. त्याच महिन्यांत प्रथम डी व्हॅलेरा व नंतर ग्रिफिथ, प्लंकेट, जॉन

मिलरॉय, हर्बर्ट मेलोज वगैरे सिनफिन पुढाऱ्यांनां पकडून इंग्लंडमध्यें हद्दपार करण्यांत आलें. या कृत्याचा नॅशनॅलिस्ट पक्षाचे पुढारी डिलन, हेली, ओब्रायन, डेव्हलिन वगैरेंनीं निषेध केला व सक्तीच्या कायद्याचाहि निषेध चालू ठेवला. लॉर्ड लेफ्टनंट फ्रेंचनें सक्तीचा कायदा एकदम अमलांत न आणतां लोकांनीं स्वखुषीनें लष्करांत दाखल व्हावें, नाहीं तर सक्ती करण्यांत येईल असा जाहीरनामा काढिला. लढाईवर जाणारांनां जमीनी बक्षीस मिळतील, असेंहि आश्वासन दिलें; तरी पण नोव्हेंबरपर्यंत लष्करी नोकरीस योग्य अशा १५०००० इसमांपैकीं फक्त ११३०१ इसमच सैन्यांत दाखल झाले.

सि न फि न व ब्रि टि श पा र्ल मेंट.—याच सुमारास जागतिक युद्ध बंद होऊन ब्रिटिश पार्लमेंटची नवी निवडणूक होण्याचें ठरलें. या वेळीं आयर्लंडांत नॅशनॅलिस्ट पक्षाविरुद्ध सिनफिनपक्षानें आपले उमेदवार सर्वत्र उभे केले आणि पार्लमेंटांतील एकंदर १०५ जागांपैकीं ७३ जागा काबीज केल्या. नंतर आपल्या पक्षास आयरिश रिपब्लिकन पक्ष असें नांव देऊन डब्लिन मॅन्शन हाऊसमध्यें डेल एरीन (असेंब्ली ऑफ आयर्लंड) या कायदेमंडळाची बैठक प्लंकेटच्या अध्यक्षतेखालीं सुरू केली. आयर्लंडच्या स्वातंत्र्याचा जाहीरनामा वाचून प्लंकेट, ग्रिफिथ व डी व्हलेरा या तिघांनां स्वतंत्र आयर्लंडतर्फे तहपरिषदेंत प्रतिनिधी नेमलें आणि आयरिश रिपब्लिकचा प्रेसिडेंट डी व्हॅलेरा यास निवडून त्याचें प्रधानमंडळ नेमलें. या सर्व गोष्टी ब्रिटिश सरकारनें मनाई न करतां कां चालू दिल्या, असा प्रश्न येथें उद्भवतो. त्याचें उत्तर असें आहे कीं, जेथें प्रत्यक्ष अत्याचार घडत नाहींत, त्या बाबतींत अडथळा करावयाचा नाहीं असें धोरण सरकारनें स्वीकारलें होतें. सिनफिन पक्षाकडून जेथें जेथें दंगे, मारामाऱ्या खून झाले तेथें तेथें 'डिफेन्स ऑफ दि रेल्म ॲक्ट'' (राज्यसंरक्षणकानू) व "क्रिमिनल लॉ अँड प्रोसीजर ॲक्ट." या दोन कायद्यांच्या आधारें बंदोबस्त व शिक्षा करण्यांत येत असत. शिवाय योग्य कारण व समय साधून सिनफिन पुढाऱ्यांनां सरकारनें हद्दपार केलें होतेंच. हिंदुस्थानांत गांधींच्या असहकारितेच्या चळवळीच्या वेळीं सरकारनें हेंच धोरण स्वीकारलें होतें. असो. ब्रिटिश पार्लमेंटमधल्या जागा अडवल्यानंतर सिनफिनपक्षानें पार्लमेंटवर बहिष्कार घालून तेथें हजर न राहण्याचें ठरविलें. इतर पक्षांच्या पुढाऱ्यांनीं आपली होमरूलची उर्फ वसाहतीच्या स्वराज्याची मागणी चालू ठेविली.

सि न फि न व त ह प रि ष द.—डेल एरीनचें महत्त्व अमेरिकेच्या मदतीमुळें अधिकच वाढलें. स्वयंनिर्णयाचें तत्त्व प्रेसिडेंट विल्सननें जाहीर केलें, आणि इतर राष्ट्रांनीं तें मान्य केलें, तेव्हां सिनफिनपक्षानें तहपरिषदेंत स्वतःच्या प्रतिनिधींनां प्रवेश मिळावा, अशी खटपट अमेरिकेमार्फत जोरानें सुरू केली; पण अखेर अमेरिकन प्रतिनिधींनीं आयर्लंडचे प्रतिनिधी घेण्याची तहपरिषदेला विनंति करण्याचें नाकारलें. यूरोपांत पाऊल ठेवल्यावर प्रेसिडेंट विल्सनला स्वतःचें स्वयंनिर्णयाचें तत्त्व मर्यादितपणेंच लागू केलें पाहिजे, ही गोष्ट लवकरच कळून आली. तहपरिषदेनें निराशा केली तेव्हां सिनफिनपक्षानें अमेरिकेची सहानुभूति मिळविण्याची जोरानें खटपट चालविली. डी व्हॅलेरा आपल्या दोन मित्रांसह लिंकन तुरुंगांतून पळून आयर्लंडांत आला होता व नंतर लवकरच इतर कैदीहि सोडण्यांत आले. डी व्हॅलेरानें अमेरिकेंत जाऊन तेथील सेनेटच्या परराष्ट्रीय कमीटीची आयर्लंडचें स्वातंत्र्य मान्य करून आयरिश रिपब्लिकला अमेरिकेनें कर्ज द्यावें, या गोष्टीला मान्यता मिळविली.

सि न फि न प क्षा ची अ त्या चा रां ची मो ही म.—तहपरिषदेनें निराशा करतांच सिनफिनपक्ष आपल्या अत्याचारांच्या मोहिमेकडे जोरानें वळला. सरकारी पोलीस व लष्कर आणि सरकारपक्षीय इतर इसम ठार करून आयर्लंडमध्यें सरकारी अम्मलच चालू द्यावयाचा नाहीं, असा या मोहिमेचा उद्देश होता. १९१९ सालीं विशेषतः १९२० सालीं या पक्षानें ही मोहीम इतकी यशस्वी केली कीं, त्या वेळची परिस्थिति म्हणजे सुप्रसिद्ध फ्रेंच राज्यक्रांतीच्या वेळच्या "रेन ऑफ टेरर"ची पुनरावृत्ति होय. १९१९ सालीं अत्याचाराबरोबरच बहिष्काराची मोहीमहि या पक्षानें हातीं घेतली. सिनफिनपक्षीय एका स्त्रीसंघानें असा ठराव केला कीं, संघाच्या सभासदांनीं पोलीस जवळ बोलूं नये व कोणताहि संबंध ठेवूं नये, फार काय पण चर्चमध्यें पोलीसमधील इसम असेल त्या बाकांवरसुद्धां बसूं नये. याशिवाय सिनफिनपक्षानें असेंहि जाहीर केलें कीं, पोलिसास किंवा त्यांच्या कुटुंबीयांस कोणाहि व्यापाऱ्यानें किंवा शेतकऱ्यानें रोजच्या गरजेचे पदार्थ विकूं नयेत. या एकंदर धोरणानुसार पोलीसांवर व सैनिकांवर सिनफिनवाल्यांनीं हल्ले सुरू केले. त्याच्या प्रतिकारार्थ लॉर्ड फ्रेंचनें डेल एरीन सभा बेकायदेशीर जसल्याचें ठरविलें आणि सिनफिनपक्षाचीं मुख्य ठिकाणें लष्कर पाठवून हस्तगत करविलीं आणि हत्यारें व राजद्रोही वाङ्मय जप्त केलें. सिनफिनपक्षाचीं कित्येक वृत्तपत्रें बंद पाडिलीं, तरी अत्याचार चालूच राहिले. अत्याचार झाले कीं, सरकारची धरपकड व कैद, कैद झाली कीं अन्नत्याग आणि अन्नत्यागापुढें नाइलाज म्हणून पुनः बंधमुक्तता, असा कार्यक्रम एकसारखा चालू झाला. पुढें सरकारनें अन्नत्याग केला तरीहि बंधमुक्तता होणार नाहीं असें जाहीर केलें. उलटपक्षीं तडजोडीचा प्रयत्न म्हणून लॉईड जॉर्जनें १९२० मध्यें होमरूल बिल पुन्हा पार्लमेंटपुढें मांडून अल्स्टर करितां एक पार्लमेंट व बाकीच्या आयर्लंडकरितां एक, अशी दोन पार्लमेंटें स्थापण्याची सूचना आणली पण पूर्वीप्रमाणेंच सिनफिन व नॅशनॅलिस्ट या दोन्ही पक्षांनीं आयरिश राष्ट्राची अशी विभागणी अमान्य केली.

हा तडजोडीचा प्रयत्न अमान्य झाल्यावर सिनफिन पक्षाचे अत्याचार वाढत जाऊन परमावधीला पोहोंचले. अत्याचारांचा निषेध करणारे, अत्याचार करणांची बातमी सरकारला देणारे, आणि प्रत्यक्ष सरकारी नोकरी करणारे अशा तिन्ही प्रकारच्या लोकांस देशद्रोही ठरवून भरदिवसा ठार मारण्याचा क्रम सिनफिनवाल्यांनीं झपाट्यानें चालविला. अशा देशद्रोही इसमांस रिपब्लिकन सरकारचा शिक्षेचा हुकूम कळवून त्यांना ठार मारण्याचें काम अगदीं व्यवस्थित चालू होतें; पण तें काम कसें चालतें हें मात्र गूढ होतें. खूनी इसम पकडले गेल्यास त्यांच्याविरुद्ध पोलीस खेरीज साक्षीदारहि कोणी मिळत नसे. अशा प्रकारें मे पासून दिसेंबर १९१९ पर्यंत १८पोलीस इसम ठार मारण्यांत आले होते, ती संख्या १९२० सालीं वाढून १७६ ठार व २५१ जखमी इतकी झाली. याच अत्याचारांच्या मोहिमेला कॉर्क शहराचा मेयर, लिमरिक शहराचा मेयर, वगैरे कित्येक मोठे इसमहि बळी पडले. या १९२० सालींच सिनफिन पक्षानें स्थानिक स्वराज्यसंस्था म्हणजे म्युनिसिपालिटया व लोकलबोर्डें स्वपक्षाचे प्रतिनिधी निवडून आणून हस्तगत केल्या, व त्यामुळें या संस्था डेल एरीननें सोडलेले हुकूम पाळूं लागल्या. शिवाय सरकारी खजिने, पोस्ट ऑफीसें व मेलगाड्या लुटून सरकारी पैसा सिनफिनवाल्यांनीं हस्तगत केला. तसेंच या पक्षानें स्वतःचीं सिनफिन न्याय कोर्टें जागजागीं स्थापलीं. अशा रीतीनें या पक्षानें बहुतेक आयर्लंडवर स्वसत्ता प्रस्थापित केली. या वेळीं या पक्षाचें—म्हणजे आयरिश रिपब्लिकन—सैन्य दोन लाख होतें.

**सरकारी प्रत्यपकार** ( रेप्रिझल्स ).—इतकी स्थिति झाल्यावर सरकारला एकजात शस्त्राचा अवलंब करण्याशिवाय गत्यंतर उरलें नाहीं. १९२० जुलैमध्यें ६०००० सरकारी सैन्य जमवून त्यावर सर नेव्हिल मॅक्रीडीला मुख्य अधिकारी नेमण्यांत आलें. शिवाय १५०० जादा पोलीस बंदोबस्तास दिले. या सरकारी सैन्यानें सिनफिन पक्षाच्या ठाण्यांवर हल्ले सुरू केले. त्यावेळीं सरकारी शिपायांनां खुनास खून पाडावे लागले. अर्थात् या पोलीसच्या व लष्कराच्या कृत्यांचा सिनफिनवाल्यांनीं मोठा गवगवा केला. पण सिनफिनवाल्यांचें अत्याचार बंद पाडण्यास दुसरा उपाय न उरल्यामुळें हाच मार्ग चालू ठेवणें सरकारला प्राप्त होतें.

**१९२० चा गव्हर्नमेंट ऑफ आयर्लंड अक्ट.**—आयर्लंडमध्यें अशा प्रकारें ' युद्ध चालू असतां २३ डिसेंबर १९२० रोजीं ब्रिटिश पार्लमेंटनें लॉइड जॉर्जचें उपर्युक्त होमरूल बिल पास केलें, व त्या योगें आयर्लंडांत दोन पृथक् पार्लमेंटें स्थापण्याचें ठरलें. एप्रिल १९२१ मध्यें या नव्या पार्लमेंटाच्या निवडणूकीसंबंधीं सरकारनें हुकूम सोडले. सिनफिन पक्षानें या निवडणूकींत भाग घेण्याचें ठरवून दक्षिण आयर्लंडच्या पार्लमेंटांतील १२८ जागांपैकीं १२४ जागा काबीज केल्या, कारण या पक्षाच्या अत्याचारांचा जनतेला इतका धाक बसला होता कीं, प्रतिपक्षाचे कोणी उमेदवारच निवडणुकींत उभे राहिले नाहींत. उत्तर आयर्लंडच्या म्हणजे अलस्टरच्या पार्लमेंटची निवडणूक होऊन त्यांत ५२ जागांपैकीं यूनियनिस्ट पक्षाचे ४० उमेदवार निवडून आले आणि सिनफिन पक्षाचे डी व्हॅलेरा, आर्थर ग्रिफिथ, मायकेल कालिन्स वगैरे ६ उमेदवार यशस्वी झाले. तेव्हां अर्थात् अलस्टर पार्लमेंटांत बहुमतवाल्या युनियनिस्ट पक्षानें आपलें प्रधान मंडळ नेमून सर जेम्स क्रेग यास मुख्य प्रधान नेमिलें; आणि पार्लमेंटचा प्रारंभ समारंभ २२ जून रोजीं बेलफास्ट येथें खुद्द पाचवे जार्ज राजेसाहेब यांनीं स्वतः हजर राहून साजरा केला. २८ जून रोजीं दक्षिण आयर्लंडचें पार्लमेंटहि भरविण्यांत आलें. पण सिनफिनपक्षीय प्रतिनिधींनीं गैर हजर राहून या पार्लमेंटवर बहिष्कार घातल्यामुळें कनिष्ठ सभेमध्यें ( लोअर हाऊस ) फक्त चारच सभासद हजर होते. या पूर्वींच म्हणजे २४ जुन रोजीं लॉइड जार्जनें पत्रें लिहून डी व्हॅलेरा व जेम्स क्रेग या दोघांनां तडजोडीचा आणखी प्रयत्न करण्याकरितां लंडन येथें बोलाविलें व ग्रिफिथ, मॅकनील वगैरे चार प्रमुख सिनफिन पुढाऱ्यांस बंधमुक्त केलें. डी व्हॅलेरानें हें निमंत्रण मान्य केलें. तडजोडीचें बोलणें शांत वातावरणांत व्हावें म्हणून सरकारपक्ष व सिनफिनपक्ष या उभयतांनीं आपसांत चालू असलेलें युद्ध तहकूब केल्याचेंहि जाहीर केलें.

डी व्हॅलेरानें प्रेसिडेंट या नात्यानें सैनिकांस व नागरिकांस उद्देशून शांतता राखण्याबद्दल जो जाहीरनामा काढला त्यानें तो दुहेरी पेचांत सांपडला; तो असा कीं, त्याच्या जाहीरनाम्यांस न जुमानतां अत्याचार चालूच राहिले तर सिनफिन सरकारला राष्ट्र मानीत नाहीं असें सिद्ध झालें असतें;उलट पक्षीं जाहिरनाम्याप्रमाणें शांतता खरोखरच प्रस्थापित झाली तर पूर्वींच्या अत्याचारांनां सिनफिन सरकारच जबाबदार आहे असें ठरलें असतें, आणि जाहीरनामा निघाल्यावर अत्याचार खरोखरच बंद झाले. शिवाय डी व्हॅलेरानें या संधीचा असा फायदा घेतला कीं, युनायटेडस्टेट्स, फ्रान्स, नार्वे, डेन्मार्क या देशांत बरेच संदेश पाठवून आयर्लंडच्या स्वातंत्र्याच्या मागणीला त्यांचा पाठिंबा मिळविण्याची खटपट केली. शिवाय मागील वर्ष दीडवर्षांत ब्रिटिश सरकारच्या सैन्याकडून जे प्रत्यपकार करण्यांत आले त्यांचें भडक चित्र जगापुढें मांडण्यांत आलें.

**अखेरची तडजोड व आयरिश फ्री स्टेटची स्थापना.**—१२ जुलै १९२१ रोजीं डी व्हॅलेरा आपले सहकारी ग्रिफिथ, स्टॅक, बार्टन, व चाइल्डर्स यांच्यासह लंडनला गेला व ता. १४ रोजीं त्याची लॉइडजॉर्जबरोबर पहिली मुलाखत झाली. अल्स्टर पार्लमेंटचे क्रेग व इतर

चौघे यांचीहि लॉइड जॉर्जबरोबर स्वतंत्र मुलाखत झाली. पुढें डी व्हॅलेराबरोबर अनेकदां बोलणें होऊन २० जुलै रोजीं लॉइड जॉर्जनें सरकारच्या सूचनांचा लेखी मसुदा त्याच्या हातीं दिला. त्यांत वसाहतींच्या दर्जाचें पूर्ण स्वराज्य (डोमिनियम स्टेटस ) देण्याचें कबूल केलें होतें. मात्र आयर्लंडनें ब्रिटिश साम्राज्यांतच राहिलें पाहिजे ही मुख्य अट त्यांत होती. २२ जुलै रोजीं डी व्हॅलेरानें डब्लिनला परत येऊन ब्रिटिश सरकारच्या सूचनांचा विचार करण्याकरितां १६ आगस्टला डेल एरीनची सभा बोलावली, पण त्यापूर्वीच वसाहतींचें स्वराज्य अमान्य असून पूर्ण स्वतंत्र होण्याचा हक्क पाहिजे असें त्यानें लॉइड जॉर्जला कळविलें व दोघांमध्यें पुन्हां उत्तरेंप्रत्युत्तरें झालीं. त्यानें (लॉइड जॉर्जनें) पूर्ण स्वातंत्र्य हक्क कधींहि कबूल केला जाणार नाहीं असें डी व्हॅलेराला पुन्हां पुन्हां बजावलें. जनरल स्मटसनेंहि डोमिनियम स्टेटस मान्य करण्याचा सल्ला रिपब्लिकनें पुढाऱ्यांस दिला. ठरल्याप्रमाणें डेल एरीनची सभा भरली. तिच्या कांहीं गुप्त बैठकीहि झाल्या. त्या सभेपुढें डी व्हॅलेरानें स्वयंनिर्णयाचें तत्त्व व पूर्ण स्वातंत्र्य यांचें महत्त्व पुनः पुनः प्रतिपादिलें. ता. १४ सप्टेंबर रोजीं डेल एरीनच्या संमतीनें डी व्हॅलेरानें ब्रिटिश प्रधानाला पत्र धाडून कळविलें कीं, स्वतंत्र राष्ट्र या नात्यानें आपले प्रतिनिधी ब्रिटिश प्रधानमंडळाशीं बोलणें करण्यास तयार आहेत. उलट लॉइड जॉर्जनें, अशा अटीवर तडजोडीची बैठक होणें शक्य नाहीं असें कळविलें. पण इतर प्रधानांच्या सल्ल्यावरून लॉइड जॉर्जनें डी व्हॅलेराला तडजोडीला येण्याविषयीं पुनः निमंत्रण धाडलें, व तें डी व्हॅलेरानें मान्यहि केलें. या बैठकीला सिनफिन पक्षाचे ग्रिफिथ, कोलिन्स, बार्टन व डफी हे प्रतिनिधी आणि चाइल्डस हा मुख्य सेक्रेटरी म्हणून हजर राहिले. खुद्द डी व्हॅलेरा गेला नाहीं. ही बैठक आक्टोबर ता. ११ पासून सुरू झाली, त्यांत ब्रिटिश सरकारतर्फे लॉइड जॉर्ज, चेंबरलेन, बर्कनहेड, चर्चिल, इव्हन्स, हेवर्ट व ग्रीनवुड हे सभासद होते. अनेक दिवस बोलणें चालून शेवटीं ६ डिसेंबर१९२१ रोजीं उभयपक्षांच्या सह्यानिशीं पुढील कलमांचा तह ठरून आयरिश फ्रीस्टेट स्थापण्याचें ठरलें.

आ य रि श फ्री स्टे ट च्या त हा चीं क ल में.—या तहाचीं एकंदर कलमें अठरा असून त्यांना एक पुस्तीहि जोडली आहे. त्यांतील मुख्य कलमें येणेंप्रमाणेः—

कलम १लें—आयर्लंडचा सनदशीर दर्जा ब्रिटिश साम्राज्य या नांवानें ज्ञात असलेल्या राष्ट्रांच्या समुदायांतील डोमिनियन ऑफ कानडा, कॉमनवेल्थ ऑफ आस्ट्रेलिया, डोमिनियन ऑफ न्यू झीलंड व यूनियन ऑफ साऊथ आफ्रिका यांच्यासारखा राहील, आणि आयरिश पार्लमेंटला शांतता, सुव्यवस्था व सुराज्य चालविण्याकरितां कायदे करण्याचा हक्क असून तेथील प्रधान तेथील पार्लमेंटला जबाबदार राहील; आणि आयर्लंड आयरिश फ्रीस्टेट या नांवानें संबोधिलें जाईल.

कलम २रें.–पुढील कलमांत नमूद केलेल्या व्यवस्थेखेरीज इतर सर्व बाबतींत आयरिश फ्रीस्टेट आणि साम्राज्य सरकार व पार्लमेंट यांच्यामधील संबंध डोमिनियन ऑफ कानडाप्रमाणें राहतील; तसेंच इंग्लंडचा राजा किंवा राजाचा आयर्लंडांतील प्रतिनिधि यांचा आयरिश फ्रीस्टेटशीं कानडाबरोबरच्या संबंधाप्रमाणें राहील.

कलम ३ रें— ब्रिटिश राजाचा आयर्लंडमधील प्रतिनिधि कानडाचा गव्हर्नर–जनरल नेमला जातो त्याचप्रमाणें नेमला जाईल.

कलम ४थें.—आयरिश पार्लमेंटच्या सभासदांनीं शपथ घ्यावयाची ती पुढील प्रकारची असेलः—' मी...कायद्यानें प्रस्थापित झालेल्या आयरिश फ्री स्टेटच्या राजघटनेशीं प्रजाधर्मानें व एकनिष्ठेनें राहण्याची ईश्वरस्मरून शपथ घेतों; तसेंच हिज मॅजेस्टी पंचम जॉर्ज राजेसाहेब व त्यांचे कायदेशीर वारस व सक्सेसर यांच्यांशीं, आयर्लंडचें ग्रेटब्रिटनशीं समान नागरिकत्वाचें असलेलें नातें व ब्रिटिश कॉमन वेल्थ ऑफ नेशन्स या नांवाच्या अनेक राष्ट्रांच्या समुदायापैकीं एक घटक असलेलें नातें याजमुळें, राजनिष्ठ राहीन "

यानंतर ५ वें कलम युनायटेड किंग्डमच्या राष्ट्रीय कर्जाची फेड व युद्धविषयक पेन्शनें यासंबंधीं व खर्चाचा हिस्सा आयरिश फ्री स्टेटनें पत्करण्यासंबंधीं; ६ वें कलम आयर्लंडच्या किनाऱ्याच्या संरक्षणासंबंधीं; ७ वें कलम ब्रिटिश साम्राज्याच्या सैन्याला आयर्लंडनें बंदरें व इतर बाबतींत द्यावयाच्या सवलतीविषयीं;८ वें कलम आयर्लंडच्या युद्धसाहित्यासंबंधींच्या मर्यादेविषयीं; ९ वें कलम ग्रेटब्रिटन व आयर्लंड यांच्या बोटींना एकमेकांच्या बंदरांत जकाती वगैरे कर भरून जाण्या येण्यास मोकळीक ठेवण्याविषयीं; १० वें कलम आयर्लंडांत पूर्वीं सरकारी नोकरी करीत असलेल्यांना नोकरींतून कमी करतांना योग्य तो मोबदला देण्याविषयीं; नंतर ११ ते १६ हीं कलमें अल्स्टर पार्लमेंट व ब्रिटिश पार्लमेंट यमांधील परस्पर संबंधाविषयीं आहेत.

कलम १७ वें.—सदरहू तहाच्या कलमाअन्वयें आयरिश फ्री स्टेटचें पार्लमेंट व सरकार प्रस्थापित होईपर्यंत मध्यंतरीच्या काळांत १९२० च्या गव्हर्नमेंट ऑफ आयर्लंड ॲक्टाप्रमाणें पार्लमेंटच्या निवडणुकी तावडतोब करण्यांत येतील व त्या पार्लमेंटच्या हातीं राज्यकारभार देण्यांत येईल. ही तात्पुरती व्यवस्था एक वर्षानंतर अमलांत रहाणार नाहीं.

कलम १८. वें—हा करार ब्रिटिश पार्लमेंट व दक्षिण आयर्लंडची कामन्स सभा यांच्यापुढें संमतीकरितां तावडतोब मांडण्यांत येईल, आणि त्यांनीं मान्य केल्यास त्याला कायद्यानें मान्यता देण्यांत येईल.

आ य रि श फ्री स्टे ट च्या रा ज्य का र भा रा स सु र वा त.—तहनाम्यावर उभय पक्षांच्या सह्या झाल्याचें जाहीर होतांच सर्वत्रांनां जीव खालीं पडल्याप्रमाणें वाटूं लागलें. जगांतील सर्व भागांतून लॉइड जॉर्जला अभिनंदपर संदेश आले. ब्रिटिश पार्लमेंटची सभा तावडतोब भरवून १६ डिसेंबर रोजीं तहाला संमति घेण्यांत आली. पण यापूर्वी ८ दिसेंबरलाच डी व्हॅलेरानें तहनाम्याला स्वतःचा विरोध असल्याचें जाहीर करून आयरिश राष्ट्रानें किंवा डेल ऐरीननें मान्यता देऊं नये असें विनंतिपत्रक काढलें. १४ डिसेंबर रोजीं डेल ऐरीनची बैठक सुरू झाली, व एकंदर वादविवाद ७ जानेवारी १९२२ पर्यंत चालला. त्यांत दोनच पक्ष होते एक ग्रिफिथचा व दुसरा डी व्हॅलेराचा; आणि अखेर मतें घेतां ६४ विरुद्ध ५७ मतें पडून थोड्याशा बहुमतानें तहनामा पास करण्यांत आला. आयरिश राष्ट्रीयपक्षाच्या लोकांनींहि तहनाम्याला संमति दर्शविली. डी व्हॅलेराचा पक्ष पराभूत झाल्यामुळें त्यानें प्रेसिडेंटच्या जागेचा राजीनामा दिला. १० जानेवारी रोजीं डेल ऐरिनची सभा भरून ग्रिफिथला त्याच्या पक्षानें प्रेसिडेंट नेमिलें. नंतर १९२० च्या कायद्याप्रमाणें आयरिश सदर्न पार्लमेंट भरविण्यांत येऊन प्रधानमंडळ बनविण्यांत आलें, व त्याच्या हातीं आयरिश फ्री स्टेटच्या राज्यकारभाराचीं सर्व सूत्रें लॉर्ड फिटझेलननें १६ जानेवारी रोजीं दिलीं. याप्रमाणें १८०० मध्यें बनलेलें संयुक्त पार्लमेंट नष्ट होऊन आयर्लंडचें स्वतंत्र पार्लमेंट स्वदेशाचा राज्यकारभार १९२२ पासून पाहूं लागलें.

डी व्हॅ ले रा च्या रि प ब्लि क न प क्षा चा वि रो ध.—मार्च १९२२ पासून रिपब्लिकन पक्षाच्या सैन्यानें फ्री स्टेटबरोबर युद्ध सुरू केलें. डी व्हॅलेराच्या अनुयायांनीं एप्रिलमध्यें बरेच खून केले. अल्स्टरनें फ्रीस्टेटच्या सरकारास मदत करून बरेच सिनफिनवाले कैद केले. तरी युद्ध चालू राहून आगष्टमध्यें फ्रीस्टेट सरकारचा कमांडर मायकेल कोलिन्स ठार मारला गेला. आक्टोबरमध्यें रिपब्लिकन सैन्यानें आपण आयर्लंडचे सत्ताधीश असल्याचें जाहीर करून डी व्हॅलेरास प्रेसिडेंट नेमलें व डेल एरिनच्या स्वतंत्र बैठकी होऊं लागल्या. ७ डिसेंबर १९२२ रोजीं जार्ज बादशहांनीं आयरिश फ्रीस्टेट स्थापन केल्याचा स्वतःच्या सहीचा जाहीरनामा काढला आणि टिमोथी हीले यास फ्रीस्टेटचा पहिला गव्हर्नर जनरल नेमिलें. अल्स्टर फ्रीस्टेट पासून निराळें असल्यामुळें तेथें निराळा गव्हर्नर नेमण्यांत आला. जानेवारी १९२३ मध्यें ब्रिटिश सैन्य आयर्लंडमधून काढून नेण्यांत आलें. यावेळीं फ्रीस्टेटजवळ सुमारें तीस हजार सैन्य होतें. फ्रीस्टेट सरकारनें रिपब्लिकन पक्षाविरुद्ध कडक धोरण स्वीकारलें व ६३ बंडखोरांनां फांशीं दिलें. एप्रिलपर्यंत आणखी बरेच रिपब्लिकन पुढें कैद करण्यांत आले. मे मध्यें डी व्हॅलेरानें स्वपक्षास लढाई बंद ठेवण्यास सांगितलें. आगस्टमध्यें डी व्हॅलेराला फ्रीस्टेटच्या सैनिकांनीं कैद केलें. सप्टेंबरमध्यें फ्रीस्टेटपार्लमेंटच्या नव्या निवडणुकी झाल्या त्यांत सरकार पक्षाचे ६३, रिपब्लिकन ४४, इंडिपेंडंट १६, मजूरपक्षाचे १५ व शेतकरी पक्षाचे १५ याप्रमाणें प्रतिनिधी निवडून आले.

इ. स. १९२४ च्या प्रारंभीं आयर्लंड हें शांततासंमुख दिसत होतें; पण मार्चमध्ये आयर्लंडचें राष्ट्रीय सैन्य मोठ्या प्रमाणावर कमी करण्यांत येऊं लागल्यामुळें सुमारें ९०० अधिकाऱ्यांच्या नोकऱ्या गेल्या आणि त्यामुळें बंडाळी उपस्थित झाली. फ्रीस्टेटच्या लष्करांत बंडाळी उपस्थित होऊन त्यांनीं दारूगोळा हस्तगत केला व नंतर उद्यम व संरक्षण यांच्या मंत्र्यानें राजीनामा दिला. २१–३–२४ रोजीं फ्रीस्टेट सैन्यानें इंग्रजी सैन्यावर हल्ला केला. या बंडाळयाची जबाबदारी आयरिश सरकारनें कबूल केली नाहीं. एवंच नवीन सरकार सर्व लोकांच्या आदरास अजून पात्र झालें नाहीं.

[ संदर्भ ग्रंथ—प्राचीन आयर्लंडसंबंधीं माहिती "दि आनल्स ऑफ दि फोर मास्टर्स डोनोव्हनकृत ( १८५१ ) या ग्रंथांत सांपडेल. त्यांत कथासूत्र सेल्टिक कालापासून १६१६ पर्यंत ओढीत आणलें आहे. सोळाव्या शतकासंबंधीं मुख्य इतिहास साहित्य "प्रिंटेड स्टेट पेपर्स" हें होय. या कालापासून क्यालेंडर्स ऑफ आयरिश स्टेट पेपर्स आणि पुढें पार्लमेंटरी रिपोर्ट हें साहित्य बहुमोल आहे. आयर्लंडचे इतिहास म्हणविणारे अनेक ग्रंथप्रसिद्ध आहेत, त्यांतच फ्राऊडचा इतिहास आहे. हा ग्रंथ कार्यास पूर्णपणें नालायख अशा मनुष्यानें लिहिला आहे. इतिहाससंशोधनशास्त्रांत नालायख इतिहासकार कशी घाण व चुका करतो, हें स्पष्ट करण्यास फ्राऊडचा इतिहास फारच उपयोगी आहे. इंग्लंडमध्ये "आन्युअल रेजिस्टर" ही माला उपयोगी आहे. आयर्लंडवर साहित्य फार असल्यानें त्यावरचे ग्रंथ कोणत्याहि लायब्ररीचा क्याटलाग पाहिल्यास पहावयास मिळतील. ]

**आयर्व्हिंग वाशिंग्टन** (१७८३–१८५९)—हा अमेरिकन लेखक न्यूयॉर्क येथें ता. ३ एप्रिल सन १७८३ इ. रोजीं जन्मला सामान्य शिक्षण आटोपल्यावर त्यानें कायद्याच्या अभ्यासास सुरुवात केली, पण प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें त्याला आपलें शिक्षण मध्येंच सोडून यूरोपमध्यें जावें लागलें. यूरोपमधून परत आल्यावर त्यानें कायद्याचा अभ्यास पूर्ण केला पण या धंद्याची त्यास गोडी नसल्यामुळें त्यानें वाङ्मयव्यवसाय सुरू केला. वाशिंग्टनचा बाप वारल्यावर त्यानें केवळ भांडवली भागीदार या नात्यानें बापाच्या दुकानाशीं संबंध ठेवला व सर्व वहिवाट भावाच्या स्वाधीन केली. पण लवकरच दुकान डबघाईस आलें व शेवटीं दिवाळें निघालें. त्यामुळें या वाशिंग्टनवर आपल्या लेखणीच्या मदतीनें उदरनिर्वाह करण्याची पाळी आली.

त्यानें इंग्लंडमध्यें जावयाचें ठरविलें. इंग्लंडमध्यें गेल्यावर त्याचा अनेक प्रसिद्ध लेखकांशीं परिचय झाला; तेथें असतांना त्यानें पुष्कळ पुस्तकें प्रसिद्ध केलीं. इ. स. १८३२

सालीं तो अमेरिकेस परत आला तेव्हां त्याची सर्वत्र प्रसिद्धि झाली होती. इतर राष्ट्रांतील वाङ्मय सेवकांच्या बरोबरीचा मान मिळवून राष्ट्राचें नांव राखल्याबद्दल त्याचा सर्वत्र सन्मान होऊं लागला. अमेरिकेंत आल्यावरहि त्याचा वाङ्मय व्यवसाय चालूच होता. ता. २८ नोव्हेंबर १८५९ रोजीं एकाएकीं हृदयक्रिया बंद होऊन तो मरण पावला. तो आमरण अविवाहित होता.

अमेरिकन वाङ्मयास तो जरी ललामभूत झाला असला तरी त्याची लेखनशैली अमेरिकन नाहीं. परंतु त्याचा विनोद विशिष्ट प्रकारचा आहे. त्याच्या भाषेंत प्रसाद प्रमुखपणें दिसून येतो. सालमागुंडी, निकर बॉकर्स हिस्टरी, टेल्स ऑफ ए ट्रॅव्हलर, दि अल्हांब्रा, रिप व्हॅन विंकल, लाइफ ऑफ जॉर्ज वाशिंगटन, वगैरे त्याचीं मुख्य पुस्तकें आहेत. ( एब्रि. )

**आयर्व्हिंग सर हेनरी** ( १८३८–१९०५ )--हा इंग्रज नट सॉमरसेट शायर ( इंग्लंड )मधील कैनटन--मान्डे-व्हिले येथें ६ फेब्रुवारी १८३८ मध्यें जन्मला. ह्याचें मूळचें नांव जॉन ब्रॉड्रिब हें होतें. कांहीं वर्षे शाळेंत शिक्षण घेतल्यावर त्यानें कांहीं दिवस व्यापारी कारकुनी केली पण ती सोडून देऊन त्यानें नटाचा धंदा पत्करला. १५८६ मध्यें रंगभूमीवर त्यानें प्रथम जें काम केलें ते ' रिचेल्यू ' या नांवाच्या नाटकांत गेस्टॉन डयूक ऑर्लियन्स या पात्राचें होय. पुढील दहा वर्षांत त्यानें अनेक नाटककंपन्यांत मिळून सुमारें पांचशें निरनिराळ्या पात्रांचीं कामें केलीं व नाट्य-कलेचा श्रमपूर्वक अभ्यास केला; व त्यामुळें त्याची प्रसिद्धि बरीच झाली. त्यानें हॅमलेट, अथेल्लो, मॅकबेथ, मर्चंट ऑफव्हेनिस या खेळांत महत्त्वाचीं कामें केलीं. त्या खेळांत बेटमन, एलनटेरी या नटी काम करीत. लीसेयम थिएटरांत ठेविलेली पोशाख, सीनसीनरी वगैरे संबंधाची व्यवस्था अगदीं नमुनेदार असे. शेक्सपियरचीं बहुतेक नाटकें, गटेचें फॉस्ट, वगैरे पुष्कळ नाटकें तो करीत असे. तो १३ आक्टोबर १९०५ मध्यें मरण पावला. तेव्हां त्याला वेस्टमिन्स्टर ॲबेमध्यें पुरलें जाण्याचा मान मिळाला. त्याला सरदार ( नाईटहुड ) हा किताबहि मिळाला होता; शिवाय डब्लिन, केंब्रिज व ग्लासगो या विश्वविद्यालयांनीं त्याला बहुमानाच्या पदव्या दिल्या होत्या. त्याला दोन मुलगे होते. त्यापैकीं एकाला वकीलीच्या धंद्याचें व दुसऱ्याला परराष्ट्रीय वकीलीच्या कामाचें शिक्षण देण्यांत आलें होतें. पण ते दोघेहि पुढें नटाचाच धंदा करूं लागले. ( ए. ब्रि. )

**आयर्व्हिन विल्यम**—हे बंगाल प्रांतांत नोकरीवर असून त्यांनां फारशीची आवड व हिंदी लोकांविषयीं सहानु-भूति विशेष होती. त्यांना फारशी कागद जमविण्याचा नाद असून, उत्तर मोंगलशाहीचे अनेक कागद व बखरी त्यांनीं जमविल्या. औरंगजेबाच्या पुढचा म्हणजे स. १७०७ पासून १८०३ त मोंगल बादशाही बुडाली तोंपर्यंतचा संगतवार इतिहास अस्सल कागदांच्या आधारें लिहिण्याचा आयर्व्हिन यांचा संकल्प होता. संशोधनाचें काम करण्यांत ते निष्णात असून वृद्धवेतन घेऊन स्वदेशीं गेल्यावर त्यांनीं हा उद्योग जोरानें सुरू केला. प्रो. जदुनाथ सरकारास औरंगजेबाचे कागद इंडिया ऑफिस लायब्ररींतून तेच पुरवीत असत. १७१२ ते २१ पर्यंतच्या दहा वर्षांच्या कारकीर्दीचा इतिहास लिहिल्यावर ते मरण पावले, आणि त्यांचें संकल्पित काम अर्धेंच राहिलें. १७१२–२१च्या या मोंगल कारभारास सय्यदांची कारकीर्द असें नांव असून आयर्व्हिनचे लेख 'अरेबियन नाईट' सारखे चटकदार झाले आहेत. आयर्व्हिनचे हे लेख आशियाटिक सोसायटीच्या जर्नलांत ( १८९६-१९०८ ) वेळोवेळीं प्रसिद्ध झाले आहेत. (मराठी रि मध्यवि.)

**आयला भास्कर**—हा तेलंगणांतील कवि चौदाव्या शतकांत प्रसिद्ध होता. ह्यानें लहानपणीं तेलगू भाषेचा साधारण अभ्यास करून नंतर तो व्याकरणशास्त्र शिकला. मोठेपणीं तो तेलगू भाषेंत काव्यरचना करूं लागला. ह्यानें केतुमतन नामक ग्रंथाचें तेलंगींत श्लोकबद्ध भाषांतर केलें. ह्या ग्रंथाचीं दोन प्रकरणें आहेत. त्यांत युगकल्पादिकाल, परिवर्तन, ऋतुपर्याय, पर्जन्य, मेघगर्जना, विद्युल्लता आणि सृष्टींतील पर्वत, नद्या, देश इत्यादि नानाविध पदार्थ तसेच जलप्रलयादि इतर अनेक विषय ह्यांचें विवेचन केलें आहे. दंतकथेवरून असें कळतें कीं, हा कवि पुष्कळ वर्षे वांचून अतिशय वृद्धावस्थेंत मरण पावला. [ अर्वाचीन कोश. कविचरित्र. परशा–तेलगू वाङ्मय ]

**आयव्हरी कोस्ट**—पश्चिम आफ्रिकेंतील एक फ्रेंच वसा-हत. हिच्या दक्षिणेस गिनीचें आखात, पश्चिमेस लायबेरिया व फ्रेंच गिनी, उत्तरेस अपर सेनिगालची वसाहत व नायगर व पूर्वेस गोल्ड कोस्ट आहे. या वसाहतीचें क्षेत्रफळ १९१७ सालीं सुमारें १,२५,०००चौरस मैल असून लोकसंख्या सुमारें १५,२९,२५१ होती; पैकीं आफ्रिकन जातीचे नसलेले असे, ७१६ लोक काय ते होते व ते सर्व युरोपियनच होते, या सालीं कोस्टमधील आयात ५,१२,६२५ पौंड व निर्यात ४,२८,६४६ पौंड होती. व्यापार व लोकवस्ती याच्या दृष्टीनें प्रमुख गणलीं जाणारीं ठिकाणें म्हणजे ग्रँड बसाम, ॲसिनी, ग्रँडलहौ, सास्सन्ड्रा, टबौ आणि अंतर्देशांत अबिजीन. बौआके अबोइसो, डिंबोको, टिआसाली, बोंडुकु व होगो होत मुख्य राजधानीचें शहर बिंगरव्हिले हें आहे. किनाऱ्यावरील भागांत निग्रो जातीचे लोक राहतात; आंतील भागांतहि निग्रो लोक राहतात; पण त्यांच्यांत हॅमिटिक अथवा बर्बर रक्ताची भेसळ फार आहे. बंबारा नांवाची शेत-करी जात सबंध वसाहतभर पसरली आहे. ही जात मूळच्या मांडिगो वंशाचीच एक शाखा असावी असा तर्क आहे. येथील अरण्यांत मनुष्यभक्षक जाती राहतात.

एतद्देशीय लोक मका, केळीं, लिंबें, कपाशी वगैरे जिन-सांची लागवड करतात. कापड विणणें, चिनीमातीचीं भांडीं

करणें व लोखंड गाळणें वगैरे धंद्यांतहि ते वाकबगार आहेत. रबर, महोगनी व ताडाचीं झाडें येथील जंगलांत फार होतात व याच वस्तू बाहेर देशीं व्यापारार्थ जातात. आगगाड्या, कालवे, आगबोटी व तारायंत्रें इत्यादि साधनांनीं दळणवळण चालतें. ॲबिजीन ते ब्रौआकेपर्यंत १९७ मैलांचा रेल्वेरस्ता बांधला आहे. १९१६ सालच्या अखेरीस २,०४२ मैल तारायंत्र व १४२ मैल टेलेफोन व पांच मैल सबमरीन तारा घातल्या होत्या.

फ्रेंच वेस्ट आफ्रिकेचा जो गव्हर्नर जनरल तोच मुख्यतः वसाहतीच्या राज्यकारभाराची देखरेख ठेवतो. स्थानिक राज्यव्यवस्था लेफ्टनेंट गव्हर्नर पाहतो. त्याच्या मदतीकरितां म्हणून बिनसरकारी पण सरकारनियुक्त सभासदांचें एक मंडळ आहे.

आयव्हरी कोस्ट पंधराव्या शतकाचे अखेरीस पोर्तुगीजांनीं शोधून काढलें. १७००–१७०४ या सुमारास असायनी येथें फ्रेंचांनीं एक ठाणें बांधलें व १७००–१७०७ पर्यंत ग्रँडबसाम येथें त्याची एक वखार होती. १८४२ त बोआबीयोमा या फ्रेंच दर्याधिकाऱ्यानें एतद्देशीय सरदारांपासून असायनी व ग्रँडबसाम हीं शहरें व त्यांच्याजवळील मुलूख फ्रान्सकरितां मिळविला. तेव्हांपासून फ्रान्सचा त्या किनाऱ्यावर चांगलाच जम बसला. १८८७ व १८८९ याच्या दरम्यान कॅप्टन बिंगर या फ्रेंच गृहस्थानें बाँटुकु व काँग देशच्या सरदारांशीं तह करून त्यांचा देश फ्रेंच संरक्षणाखालीं घेतला. १८८९ च्या इंग्लंड व फ्रान्समधील करारानें बाँटुकूसहित जामानजवळील मुलूख फ्रेंचांचा होय, अशी इंग्रजांनीं कबुली दिली. १८९३ त आयव्हरी कोस्टची स्वतंत्र वसाहत बनविण्यांत आली व कॅप्टन बिंगरला तिच्यावर गव्हर्नर नेमण्यांत आलें. वसाहतीची पश्चिम मर्यादा, १८९२ च्या फ्रँको-लायबेरिअन करारानें ठरविण्यांत आली. पूर्व मर्यादा १८९३ व ९८ च्या आंग्लो–फ्रेंच करारांनीं ठरवून दिली व उत्तरमर्यादा १८९९ मध्यें ठरविण्यांत आली. ( ए. ब्रि. व्हा. १५, पा. ९८–१०० )

**आयसिंग्लास**—हा शब्द हुसेनब्लास ह्या मूळ डच शब्दापासून निघालेला असावा असा कित्येकांचा समज आहे. स्टर्जन माशांच्या पोटांतील वायूच्या पिशव्यापासून केलेला हा एक चिकट पदार्थ आहे. दुसऱ्याहि कित्येक इतर जातींच्या माशांपासून हा पदार्थ तयार होऊं शकतो. परंतु त्या सर्व माशांत स्टर्जन माशांचें आयसिंग्लासच उत्तम दर्जाचें असें मानलें जातें. बाजारांत ३।४ जातींचा माल मुख्यत्वेंकरून दृष्टीस पडतो.

रशियन, ब्राझिलियन, आणि पीनांगमधील माशांच्या पोटांतून आंतडीं काढून तीं चांगलीं स्वच्छ धुवून काढतात. व नंतर तीं वाळवितात. हा पदार्थ वाळविण्याचेंहि पुष्कळ प्रकार आहेत. मद्यें, बीर नांवाची दारू व इतर प्रवाही पदार्थ यांची मळी काढून त्यांस पारदर्शक व शुद्ध करण्याकडे या पदार्थाचा उपयोग करितात. साध्या जिलेटिनमध्यें हा गुण नसून तो फक्त आयसिंग्लास मध्येंच आढळतो. दारू गाळणारे लोक बहुतेक हलकाच पदार्थ वापरतात. कोणी पीनांगचा सरस वापरतो, कोणी रशियांतील वापरतो. हा पदार्थ खाण्याच्या पदार्थांत व विशेषेंकरून मिठाईत व मुरंबे वगैरे मध्यें घालतात. गोंदावरोबर मिश्रण करून रेशमी कपड्यास लावल्यानें कपड्यास जास्त चकाकी येते. ज्येष्ठमदाच्या शिऱ्याच्या कांड्या, काजळांत घोटल्यास उत्तम काळ रंग तयार होतो. वितळलेल्या सरसांत थोडें असेटिक ॲसिड व गुलाबी अत्तर मिसळल्यास उत्तम सिमेंट होतें. मद्यार्क २ भाग घेऊन त्यांत आयसिंग्लास मिश्रण केल्यास एक पक्कें सिमेंट तयार होतें. तें फुटलेल्या कांचेच्या किंवा चिनीमातीच्या भांड्याची दुरुस्ती करण्यास फार उपयोगी पडतें.( ए. ब्रि. )

**आयसौरिआ**—आशिया मायनरच्या अंतः प्रदेशांतील एक जिल्हा. आयसौरानिया व आयसौरा पेलिआ हीं दोन शहरें प्रसिद्ध होतीं. रोमन लोक सिलिशिया ट्राकिया हा आयसौरिआचा भाग होता असें समजत असत. कॅलिकॅडनस खोऱ्याच्या दखिण भागांतील शहरें आयसौरियन डेकापोलिस नांवांनीं प्रसिद्ध होतीं. तिसऱ्या शतकांत राज्यकारभाराच्या सोईसाठीं सिलिशिया वेगळा करण्यांत आला. त्याला प्रथम आयसौरिया लायकोनिया व नंतर आयसौरिया नांव मिळालें. पुढें पिरिडिया व आयकोनियम एकत्र करण्यांत आले व आयसौरियांत पॅम्फिलियाचा समावेश झाला. आयसौरिया पेलियाला पर्डिकासनें वेढा दिला होता. आयसौरिअन लोक रोमविरुद्ध गेल्यामुळें सर्व्हिलियसनें सर्व आयसौरिया जिंकिला. तिसऱ्या शतकांत ट्रेबेलियानस नांवाच्या बंडखोर बादशहास येथें आश्रय मिळाला. ४ थ्या शतकांत येथील लोकांनीं आसपासच्या प्रदेशांत बरीच धामधूम केली. जस्टीनियननें या लोकांनां बरेच ताब्यावर आणलें. सेल्जुकांनीं तो देश जिंकिल्यामुळें आयसौरिया देश तुर्कोमन व युरूक यांच्या हातीं आला. आद्यापि देखील येथें बेबन्दशाही आहे.

या अप्रसिद्ध लोकांमधून झेनो व तिसरा लिओ हे दोन बायझन्टाईन बादशहा उत्पन्न झाले. आयसौरिया पोलिआ येथील अवशेष, तेथील सुंदर जागा, तटबंदी व कबरी यामुळें प्रेक्षणीय आहेत. [ ए. ब्रि. ]

**आयस्लंड.**—हें उत्तर अटलांटिक महासागरांतील एक मोठें बेट असून तें डेन्मार्कच्या मालकीचें आहे. तें उ. अ. ६३° १२′ व ६६° ३३′ आणि पूर्व रे. १३° २२′ व २४° ३५′ यांच्यामध्यें आहे. या बेटाची लांबी २९८ मैल व रुंदी १९४ मैल आहे. आयस्लंडचा प्रदेश उंच सपाटीचा उर्फ पठाराचा असून तेथील डोंगर ज्वालामुखी( व्होल्कॅनिक )च्या जातीचे आहेत. पठार प्रदेशाच्या

मानानें सखल प्रदेश फार कमी म्हणजे फक्त एक–चवदांश आहे. या सखल प्रदेशांतच कायती वस्ती आहे. पठाराचा प्रदेश ओसाड असून ज्वालामुखी रत्ता ( लाव्हा ) च्या प्रवाहांनीं व हिमनद्यांनीं ( ग्लेसियर्स ) आच्छादित आहे. बेटाचा वायव्येकडील भाग पृथक असून मध्यंतरी सवाचार मैल रुंदीची संयोगीभूमि आहे. किनाऱ्यालगतच्या प्रदेशांत गवत उगवतें त्यामुळें तेथें मेंढ्या पाळून लोक राहतात. तथापि बहुतेक लोक उदरनिर्वाह मासे मारून त्यांवर करतात. येथील ५१७० चौरस मैल प्रदेश बर्फानें व हिमनद्यांनीं आच्छादिलेला आहे. त्याचें कारण हवा सर्द, पाऊस पुष्कळ आणि उन्हाळ्यांतहि उष्णता फार कमी हें आहे. आयस्लंड बेट ज्वालामुखींनीं सर्वांत अधिक व्याप्त अशा प्रदेशांपैकीं एक आहे. तेथें १०७ ज्वालामुखी आढळले असून त्यांना लहान मोठीं हजारों मुखें आहेत. ज्या प्रदेशांत ज्वालामुखीपर्वत विशेष आहेत, तेथेंच भूकंपहि वरचेवर होतात. हें बेट बरेंच उत्तरेकडे आहे तरी तेथील हवा सौम्य आहे, फार थंड नाहीं. येथें उष्णतेचें वार्षिक सरासरी मान ३७° २′ फा. आहे. वार्षिक पर्जन्यवृष्टि दक्षिण व पूर्व किनाऱ्यालगत ४९.४ इंच असते.

लो क व स्ति.—येथील लोकसंख्या १८९० सालीं ७०९२७ व १९०१ सालीं ७८४८९ होती. एकंदर १९ व्या शतकांत लोकसंख्या २७००० वाढली. शिवाय १८७२ पासून १९०० पर्यंतच्या कालांत १५६०० लोक अमेरिकेंत राहावयास गेले; व त्यांतील बहुतेक मॅनिटोबा प्रांतांत राहिले आहेत. आयस्लंडांतील सर्वांत मोठें शहर रेकजाविक. ह्याची लोकसंख्या ६७०० आहे. हेंच राजधानीचें शहर असून येथें गव्हर्नर जनरल व बिशप राहतो. आलथिंग ( कायदे मंडळ ) ची सभा येथें भरते, आणि या बेटांतील प्रमुख सार्वजनिक संस्था म्हणजे शाळा, लायब्ररी वगैरे येथें आहेत. याशिवाय वायव्येस इसाफ जोरोर ( वस्ती १००० ), उत्तरेस आकुरेयरी (१०००) व पूर्वेस सेयदिसफ जोरोर (८००) हीं मोठालीं गांवें आहेत. येथील लोकांचा गुरें व विशेषतः मेंढ्या पाळणें हा मुख्य धंदा आहे. पण मासे मारण्याच्या धंद्यास अलीकडे झपाट्यानें महत्त्व येत चाललें आहे. १८५५ च्या सुमारास १४८० टन मासे बाहेर जात असत, ते १८९९ च्या सुमारास ११३३९ टन मासे व ६८०७९ बॅरल तेल बाहेर जाऊं लागलें तसेंच अलीकडे गुरांची संख्या कमी होऊन मेंढ्यांची वाढत आहे. येथें धान्य पिकत नाहीं, तें सर्व बाहेरून आणावें लागतें. बागाईत करण्याची सुरुवात झाली असून बटाटे व टर्निप यांचें उत्पन्न काढतात. शिवाय शेतकीला उत्तेजन मिळावें म्हणून येथें चार शेतकी शाळा, एक शेतकीची सोसायटी, व प्रत्येक जिल्ह्यांत एकेक शेतकीसंबंधीं असोसिएशन स्थापण्यांत आली आहे. तसेंच रेकजाविक येथें नाविकविद्येची शाळा, व कांहीं मरीन इन्शुअरन्स (जहाजांचा विमा उतरणाऱ्या ) सोसायट्या आहेत. १४ व्या शतकापर्यंत येथील व्यापार देश्य लोक व नॉर्समेन यांच्या ताब्यांत होता. नंतर १५ व्या शतकांत इंग्लिशांच्या, १६ व्यांत जर्मनांच्या, व पुढें डॅनिश सरकारच्या व लोकांच्या हातीं होता. १८५४ पासून सर्व राष्ट्रांस व्यापाराची मोकळीक मिळाली; पण १८७४ पासून पुन्हां येथील देश्य सरकारच्या हातीं व्यापाराची सर्व सत्ता गेली आहे. १८९१ च्या सुमारास आयात पौंड ३५६००० आणि निर्गत ३४०००० पौंड होती, १९०२ सालीं आयात ५९६१९३ पौंड व निर्गत ५११०८३ पौंड किंमतीची झाली. येथून मेंढ्या, घोडे, खारलेलें मांस, लोंकर, कातडीं, माशांचें तेल, व लोकरीचे कपडे बाहेर जातात. बाहेरून येणारा माल धान्यें, काफी, साखर, दारू, तंबाखू, धातूंचे जिन्नस, लांकूड, दगडीकोळसा इत्यादि आहेत. येथें दळणवळणाचीं आधुनिक साधनें आगगाड्या वगैरे अद्यापि नाहींत, सडकाहि फारशा नाहींत. बहुतेक प्रवास घोड्यांवरून करावा लागतो.

धर्मानें येथील लोक लूथरचे अनुयायी प्राटेस्टंट आहेत. सुधारलेलीं घरें, स्वच्छता, व डॉक्टर लोकांच्या संख्येची वाढ यामुळें लोकांचें आरोग्य बरेंच सुधारलें असून मृत्यूंचें विशेषतः लहान मुलांच्या मृत्यूंचें प्रमाण बरेंच कमी झालें आहे. येथें शिक्षणप्रसार बराच आहे; पण प्राथमिक शिक्षणाच्या सरकारी शाळा फारशा नसून लहान मुलांनां घरींच शिक्षण दिलें जातें, व त्यावर देखरेख ठेवणें धर्मशिक्षकांचें काम असतें. लोकांनां वाचनाचा नाद फार आहे. येथें अठरांहून अधिक वर्तमानपत्रें व बरींच मासिकें आहेत. रेकजाविक येथील ग्रंथसंग्रहांत ४०००० हून अधिक ग्रंथ आहेत, शिवाय तेथें वाङ्मयविषयक व पुराणवस्तुसंशोधनविषयक विद्वानांच्या संस्था आहेत.

रा ज्य का र भा र.—१८७४ सालीं येथें स्वतंत्र राज्यघटना प्रस्थापित झाली. आलथिंग नावाचें कायदेमंडळ स्थापन करून त्यांतील ३६ सभासदांपैकीं ३० गृहवारी मतानें ( हाऊसहोल्ड सफ्रेज ) निवडलेले, व ६ डेन्मार्कच्या राजानें निवडलेले असावे असें ठरलें. आलथिंगच्या वरिष्ठ व कनिष्ठ अशा दोन सभा असून वरिष्ठ सभेंत उपर्युक्त सरकारनियुक्त ६ व ३० लोकप्रतिनिधींनीं आपल्यापैकींच निवडलेले ६ मिळून १२ सभासद असतात व कनिष्ठ सभेंत उरलेले २४ असतात. डेन्मार्कचा राजा गव्हर्नर जनरलची नेमणूक करतो. आलथिंगचा बजेटवर पूर्ण ताबा असतो, व तें दोन वर्षांचें एकदम पास करण्यांत येतें. त्यांतील जमा व खर्चाकडील रक्कम अजमासें ७०००० पौंड असते.

इ ति हा स.—स्कँडिनेव्हियन लोकांनीं आयस्लंड(इ. स. ८५०)शोधून काढल्यावर तेथें आयर्लंड, नार्वे वगैरे देशांतील लोकांनीं वसाहत सुरू केली व पन्नास वर्षांत ४००० घरें तेथें

नांदूं लागलीं. सन १००० च्या सुमारास ख्रिस्ती संप्रदायाचा प्रसार सुरू झाला. प्रथम ४०० वर्षे येथील राज्यकारभार कॉमनवेल्थ पद्धतीचा होता; पण आपसांतील भांडणें वाढत गेल्यामुळें तेथील लोकांवर डेन्मार्कच्या राजानें १२८० पासून आपली सत्ता स्थापली. त्यानंतर २५० वर्षांत महत्त्वाची गोष्ट कांहीं झाली नाहीं. पुढें लूथरच्या प्राटेस्टंटपंथी चळवळीनें येथील लोकांत थोडीशी जागृति केली. अठराव्या शतकांत देवी, दुष्काळ, मेंढ्यांचा रोग व ज्वालामुखींचे स्फोट या भयंकर आपत्ति त्यांच्यावर आल्या, व याच शतकांत यूरोपांतील सुधारणाविषयक व क्रांतिकारक कल्पना या बेटांतील लोकांत पसरूं लागल्या. या वेळीं मॅग्नस स्टीफेन्सन नांवाच्या देशभक्त वकीलानें लोकांत ज्ञानप्रसार करण्याचें बरेंच कार्य केलें. तेथें वृत्तपत्रें व मासिकें निघूं लागलीं. खुल्या व्यापाराचें तत्त्व स्वीकारलें जाऊन सर्व देशांशीं संबंध येऊं लागला. तेव्हां लोकांनीं राजकीय हक्कांकरितां चळवळ केली व १८७४मध्यें आयस्लंडला होमरूल देण्यांत आलें.

वा ङ्म य.—येथील देश्य वाङ्मयांत काव्य, गाथा, इतिहास, बखरी, चरित्रें वगैरे प्रकार आहेत. राजकीय व धार्मिक परिस्थितींतील फेरबदलांचा काव्यग्रंथांवर परिणाम होत गेला. सागा हा आयस्लंडच्या वाङ्मयांतला विशेष प्रकार आहे. सागा ग्रंथांत शूर पुरुषांचीं चरित्रें असून तीं तोंडानें म्हणतां येतील अशा विशिष्ट भाषापद्धतीनें लिहिलेलीं आहेत. या सागा ख्रिस्तधर्मप्रवेशानंतरच्या ( १००२ ) शांततेच्या काळांत लिहिल्या गेल्या, व त्यांत नार्वे व डेन्मार्क येथील प्रसिद्ध राजांच्या व आयस्लंडांत प्रथम आलेल्या घराण्यांतील पुरुषांच्या शौर्याच्या गोष्टी वर्णिल्या आहेत [ एब्रि ]. फोर्ब्स–आयस्लंड; बेरिंग गोल्ड–आयस्लंड इटस सीन्स अँड सागाज इ० असणें शक्य आहे.

**आयान** ( ॲडिपोसेर )—हा एक मेणासारखा पदार्थ, मृत प्राण्यांचीं शरीरें ओलसर हवेंत पुष्कळ दिवस राहिलीं म्हणजे अस्थीखेरीज मांस, स्नायु वगैरे पदार्थांचें रूपांतर होऊन तयार होतो. त्यास ए. एफ. फोरक्रॉय यांनीं ' ॲडिपोसेर ' असें नांव दिलें. या आयानाचे धर्म चरबी व मेण या दोहोंसारखे असतात. इ. स. १७८६–८७ सालीं पॅरीस येथील अनाथ लोकांची स्मशानभूमी दुसरीकडे नेण्यांत आली, त्या वेळीं आयानच्या राशीच्या राशी शवांच्या पेट्यांतून आढळल्या. या पेट्या अगदीं जवळ जवळ ठेवलेल्या होत्या. सर्व शरीरांचें—अस्थीखेरीज—पृथक्करण होऊन आयानांत रूपांतर झालें होतें. हीं हाडें अति ठिसूळ झालेलीं होतीं. रासायनिक दृष्टीनें आयन हा पदार्थ वसाम्लाचें ( फॅटी ॲसिड्सचें ) मिश्रण आहे. यांत स्निग्ध शर्करा ( ग्लिसरीन ) अजीबात नसते हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. आयानचें फेनीकरण ( सॅपानिफिकेशन ) दाहक पालाशानें केलें असता थोडासा अम्न ( अमोनिया ) ( शेकडा १ ) निघतो आणि तालाम्ल ( पामिटिक ॲसिड ), मंजराम्ल (मारगारिक ॲसिड)आणि प्राणमंजराम्ल ( ऑक्सिमारगारिक ॲसिड ) यांचे पालाशक्षार तयार होतात. यांत जो अविद्राव्य पदार्थ राहतो. त्यांत मांस, स्नायु इत्यादि पदार्थांतील चुना वगैरे असतो. आयान हा पदार्थ बलकयुक्त ( आल्बुमिनस ) पदार्थापासून न बनतां शरीरांतील अनेक प्रकारच्या वसा (चरब्या ) एकत्र होऊन व त्यांचें पृथक्करण होऊन झालेला असतो. आयानाचे घटक मुख्यत्वें करून खट आणि पालाश तालितें ( पामिटेट्स) हे असतात.

**आयावेज**—(काठेवाड ) काठेवाडमधील उंडसर व या भागांतील एक स्वतंत्र खंडणी देणारें लहान संस्थान हें पालिठाणच्या नैर्ऋत्येस दहा मैलांवर आहे. आयावेज तालुकाहि असून त्यांत आयावेज व विरपुर हीं दोन खेडीं आहेत. आयावेज फार जुनें खेडें असून तेथें खोदियार मातेच्या देवळाचा अवशेष दाखवितात. ( मुं. गॅ. पु. ८ १८८४ )

**आयु**—( १ ) ( सोमवंशी ) पुरूरवा राजास उर्वशीपासून झालेल्या सहा पुत्रांतील ज्येष्ठ पुत्र. यास नहुष, क्षत्रवृद्ध, रजी, रंभ आणि अनेना असे पांच पुत्र होते (महाभारत १. ७५; ३. १७९; वगैरे ).

( २ ) ( सो. वं. ) यदुपुत्र क्रोष्टा, त्याच्या वंशांतील पुरुहोत्र राजाचा पुत्र, याचा पुत्र सात्वत राजा.

( ३ ) वैवस्वत मन्वंतरांतील ब्रह्मपुत्र क्रतु ऋषि, याचें हें नामांतर आहे.

( ४ ) दहा आंगिरस देवांतील एक.

( ५ ) एक प्रसिद्ध मंडूकांचा राजा. ( महाभा. ३.१९२.)

( ६ ) कृष्णास रोहिणीपासून झालेला पुत्र. हा महारथी होता ( भागवत स्कंध १० अ. ६१ ) प्रा. को.

**आयुर्वेद**—आर्यवैद्यक पहा.

**आयेषा**—अयेषा ही अबूबकरची कन्या आणि महंमद पैगंबराची अत्यंत लाडकी बायको होती. ही त्याची तिसरी बायको असून तीच एक कायती पैगंबराच्या बायकांत लग्नाच्या वेळीं कुमारिका होती. लग्नांत तिचें वय केवळ ७ वर्षांचें होतें. तिच्या कौमार्यामुळेंच तिचा बाप अबदुल्ला याला अबूबकर म्हणजे कुमारीचा पिता असें नांव पडलें असें कोणी म्हणतात. मरस्सीनें उल्लेखिलेला एक अरबी ग्रंथकार म्हणतो कीं, अबूबकर आपली लहान मुलगी महंमदाला देण्याविरुद्ध होता; पण आपल्याला ईश्वरानें तशी आज्ञा केली आहे असा महंमदानें बहाणा केला, तेव्हां अबूबकरनें खजुराची टोपली देऊन तिला महंमदाकडे पाठविलें. ती कुमारी महंमदाला एकटी दिसतांच त्यानें उद्धटपणानें तिच्या वस्त्राला हात घातला; तेव्हां ती रागानें पहात म्हणाली, " लोक तुला विश्वासू म्हणून नांवाजतात पण तुझें माझ्याशीं चाललेलें हें वर्तन पाहतां तूं बेइमान आहेस असें दिसतें. " पण ही गोष्ट कोणी तरी महंमदाविरुद्ध उठविलेली दिसते. महंमद पैगंबर

जिवंत असेतोंपर्यंत त्याच्यावर तिचें फार वजन होतें. महंमदानें अप्रत्यक्ष रीतीनें तिला सुधारण्याकरितांच कुराणांत बायकांच्यावर खरमरीत टीका व पैगंबराच्या स्त्रियांनीं कसें वागावें याविषयीं प्रकटीकरणें दिलीं आहेत. ईश्वरानें तिला जारकर्माच्या आरोपापासून दोषमुक्त करण्याकरितां जें एक प्रकटीकरण ( सूरतुन्नर अ. २४ ) पाठविलें त्या योगानें तिच्या चरित्राला लागलेला डाग धुवून निघाला इतकेंच नव्हे तर तिची कीर्ति सर्वत्र पसरली. मरतेवेळीं महंमद आयेषेच्या घरीं येऊन तिच्या बाहुपाशांत त्यानें प्राण सोडला इतकी महंमदाची तिच्यावर प्रीति होती.

महंमदाच्या मृत्यूनंतर आयेषेनें अल्लीला गादीवर येऊं न देण्याविषयीं कसून विरोध केला व त्याबरोबर अनेक लढाया केल्या. ती महत्त्वाकांक्षी व उद्धट होती तरी तिच्या विषयीं लोकांत आदर असे ती हातीं लागली असतांहि अल्लीनें तिला न दुखवितां सोडून दिलें. तिला मुसुलमान लोक पैगंबरी व धर्मनिष्ठांची माता ( उम्महातुल्—मोमिनीन ) असें संबोधीत. ती इ. स. ६७८ मध्यें ६७ वर्षांची होऊन वारली.

हिच्या मृत्यूविषयीं अशी एक अख्यायिका सांगतात कीं, पहिल्या मुआविआनें तिला खालील रीतीनें जगांतून नाहींशीं केली. येझिदशीं एकनिष्ठपणें वागण्याचें तिनें मोठ्या उद्दामपणानें नाकारल्यावर मुआवियानें एके दिवशीं तिला मेजवानीला घरीं बोलविलें; व तिच्या बसण्याच्या जागेखालीं एक खोल खड्डा खणून त्यावर खालचें कांहीं न दिसेल अशीं पानें फुलें पसरून देऊन त्या जागेवर खुर्ची ठेवून ती आल्यावर त्या ठिकाणीं तिला बसण्याविषयीं विनंति करण्यांत आली. या युक्तीनें ती खड्ड्यांत पडली तेव्हां त्या खड्ड्याचें तोंड चुना, दगड वगैरेंनीं बंद करून टाकण्यांत आलें. ही गोष्ट खरी मानण्याला विश्वसनीय पुरावा सांपडत नाहीं. [ब्रिटानिका; बील ओरिएंटल बायॉग्राफिकल डिक्शनरी ].

**आयोडीन** ( अद )—हर (क्लोरिन ), स्तम्भ (ब्रोमाईन) यांच्या जातींपैकीं हें द्रव्य आहे. याचा रंग जांभळा असतो. याचा अणुभारांक १२६.९ आहे. पाण्यांत सांपडणाऱ्या कांहीं झाडांची राख करून त्या राखेपासून हें द्रव्य काढतात. हें निर्भेळ स्थितींत सांपडत नाहीं. याचीं सिंधु (सोडियम) व पालाश ( पोटॅशियम ) या धातूंशीं झालेलीं अदिदें(आयोडाईड्स) फार सांपडतात. समुद्रांत जितकें झाड खोल असेल तितकें त्या झाडांत जास्त अद सांपडतें.

प्रथम हीं झाडें जाळून त्यांची राख करितात. त्यांत सिंधुकर्बामित मिसळून तीं उकळतात, नंतर तें पाणी गाळून त्यांत उज्ज हर निकाम्ल घालतात. ते पुनः गाळून त्यांत सिंधुदाहक घालतात. नंतर तें पाणी तापवितात म्हणजे सिंधुकर्बामितें, हरिदें व गंधकितें खालीं बसतात व वर जें पाणी राहतें त्यांत गंधकिताम्ल घालतात म्हणजे उज्जादाम्ल ( हायड्रिऑडिक ॲसिड ) तयार होतें. नंतर त्यांतून ऊर्ध्वपातन क्रियेनें अद निघतें.

चिली देशांत निघणाऱ्या सिंधुनात्रितामध्यें, थोडा भाग सिंधुअदित ( सोडियम आयोडेट )चा असतो. म्हणून सिंधुनत्रित काढून घेतल्यानंतर जें पाणी राहतें त्यांत सिंधु अर्ध गंधकाइत ( सोडियम बायसल्फाईट ) घालून ठेवतात म्हणजे अद बाहेर पडतें.

$$२सदअ_3+५ सउगअ_3 = ३सउगअ_४+२स_२उअ_४+उ_२अ+द_२.$$

अद हा किंचित काळसर करड्या रंगाचा असतो. व दिसण्यांत कांहींसा ग्रफाईटसारखा दिसतो. याचे वि. गु. ४.९ आहे. हा ११४ अंशावर वितळतो व १८४ वर उकळतो. याला वाईट वास येतो. परंतु तो स्तम्भा ( ब्रोमाईन ) इतका तीव्र नसतो. हें पाण्यांत विरघळत नाहीं परंतु सिंधु व पालाश यांच्या अदिदांमध्यें मद्यसार, ईथर, कर्बअर्धगंधकिदांत व क्लोरोफॉर्ममध्यें विरघळतें. हें इतर पदार्थांशीं लवकर संयोग पावत नाहीं, पिष्ट पाण्यांत कालवून त्यांत अदाचा एकसहस्रांश ग्रेन घातला असतां त्या पाण्यास निळा रंग येतो.

हा उज्जवायूशीं लवकर संयोग पावत नाहीं. परंतु काळी प्लाटिनम तापवून उज्ज वायू व अद यांचा संयोग घडवून आणतां येतो. त्यापासून उज्ज अदाम्ल तयार होतें.

अदाचा हरवायूशीं संयोग होतो व अदहरिद बनतें. अदाचे प्राणिलहि बनतात.

उ प यो ग—क्वीनीन, सँटोनीन इत्यादि जीं पाश्चात्य औषधें त्यांच्या अंगच्या विशेष गुणांमुळें अतिशय प्रचारात आलीं आहेत त्यांपैकींच आयोडीन हें एक महत्त्वाचें औषध होय. याचा बहुधा बिब्याप्रमाणें बाह्योपचाराच्या कामींच उपयोग करितात. याच्या अंगीं बिब्याप्रमाणें स्फोटकर धर्म आहे, परंतु बिब्याइतका तो तीव्र नाहीं. आयोडीनला ' बिब्याचें तेल ' असें अडाणी लोक म्हणतात. परंतु बिब्याचा व त्याचा कांहीं संबंध नाहीं. आयोडीनचीं मुख्य निरनिराळीं तीन औषधें इंग्रजी दुकानांतून आयतीं तयार मिळतात. तीं आयोडीनचा अर्क ( टिंक्चर ऑफ आयोडीन ), आयोडीनचा लेप (लिनिमेंट ऑफ आयोडीन ) व आयोडीनचें मलम ( ऑईन्टमेंट ऑफ आयोडीन ). हीं होत.

आयोडीनच्या अंगीं जंतुनाशक [ डिसइन्फेक्टंट ], पू न होऊं देण्याचे ( ॲन्टीसेप्टिक ) व दुर्गंधनाशक ( डीओडरायझर ) धर्म आहेत. रोग्याच्या जवळ नुसतें एक विनझाकण्याच्या पात्रांत थोडें आयोडीन ठेविल्यानें त्याच्या दुर्गंध व जंतुनाशक गुणाचा उपयोग होतो, कारण तें उडून जाणारें असल्यामुळें चोहोंकडे तेव्हांच पसरतें.

अनेक कारणास्तव त्वचेवर त्याचा उपयोग करितात. मुख्यत्वेंकरून लिनिमेंट आयोडीनचा आंतील दरद कमी होण्यासाठीं, वर फोड यावे म्हणून किंवा त्या जागची त्वचा अंमळ लाल व्हावी एवढ्यासाठीं करितात. लिनिमेंटचा लेप त्वचेवर लाविल्यानें प्रथम ती जागा गरम होऊन नंतर तेथें चुणचुण किंवा आगहि होऊं लागते. केव्हां केव्हां आग अगदीं असह्य होते. लिनिमेंटच्या लेपापासून त्वचेच्या भागाचाच फक्त सौम्य दाह होऊन तिचा कोंडा जातो. परंतु लिनिमेंट फार कडक असल्यास दाह त्वचेच्या खालच्या पदरास पोंचून पलिस्तरासारखा फोड येतो. त्यामुळें कायमचा डाग रहाण्याचा संभव असतो, सबब फोड येईल, असा लेप न लावणें बरें. त्वचेला लिनिमेंटच्या लेपाचे दोन हात सोसतात, परंतु पूर्वी तोच लेप लावून किंवा दुसऱ्या कांहीं कारणानें त्वचा हुळहुळी झाली असल्यास फक्त एकच हलका हात सोसतो. लिनिमेंटच्या लेपापासून फार आग होऊं लागल्यास ती जागा स्पिरिट ऑफ वाईन, जिन, व्हिस्की किंवा कोलनवॉटर यांनीं धुवावी. किंवा ह्याहीपेक्षां आयोडाईड ऑफ पोटॅशियम हा इंग्रजी क्षार थोडा थंडपाण्यांत विद्रुत करून त्यानें ती जागा हलकेच धुवावी व वर पोटीस लावावें म्हणजे आग नाहींशी होते. तिसऱ्या किंवा चवथ्या दिवशीं लेप लाविलेल्या जागीं किंवा सभोंवतीं खाज सुटून पुरळ येतो, तो पुढें आपोआप; कमीहि होतो.

फुफ्फुसावरणाच्या जीर्ण दाहांत ( क्रानिक प्लूरसी ) फुफ्फुसावरणांत सांचलेलें पाणी शोषून नाहींसे होण्यासाठीं लिनिमेंटचा लेप छातीवर लावितात. बहुत दिवसाच्या क्षयरोगांत जत्रूंच्या खालीं छातीवर लिनिमेंटचा लेप लावल्यास दुःसह असलेला खोकला कमी होऊन फुप्फुसाच्या नळ्यातील किंवा त्यांत पडलेल्या खोलग्यांतील कफाचा स्रावहि कमी होतो. छातींत सर्दी जाऊन बरेच दिवस खोकला येत असल्यास छातीच्या मागच्या व पुढच्या अंगास लिनिमेंटचा लेप लाविल्यास खोकला सौम्य होऊन कफ कमी पडतो. छातीच्या स्नायूंमध्यें कोठेंहि दुखूं लागल्यास लिनिमेंटचा लेप लाविल्यानें उपयोग होतो. पण अशा विकारांत राईचें पोटीस लावणें बरें, कारण जरूर पडल्यास पुन्हां त्याचा उपयोग करितां येतो. परंतु राईच्या पोटिसानें जो ठणका नाहींसा होतो तो लिनिमेंटच्या लेपानें रहातो. जीर्ण आमवातांत सुजलेच्या सांध्या भोंवतीं लिनिमेंट आयोडीन लावावें. सांध्यांमधील स्नेहनपेशीचा दाह झाला असतांनाहि ह्या उपायानेंच चांगला गुण येतो. पलिस्तराप्रमाणें लिनिमेन्ट आयोडीननें ठणका राहून सांध्यांत संचय पावलेले पाणी कमी होतें, पलिस्तराप्रमाणें पुष्कळदां त्यापासून प्रथम कांहीं दिवस सांधा मोठा झाल्यासारखा होतो, पण त्यास भिण्याचें प्रयोजन नाहीं. कारण, ह्यानंतरच आयोडीनचा खरा गुण यऊ लागतो. सारांश, सांध्याची सूज अधिक होणें हें लक्षण आयोडीनच्या लेपापासून खास उपयोग झाला ह्याचे सूचक होय. कंठमण्याच्या खालील ग्रंथीचा दाह ( ब्रांकोसील ) झाला असतां त्वचेवर लिनिमेंटचा लेप लावितात. गांठ कमी होईपर्यंत सोसेल त्याप्रमाणें लेप लावीत जावा. पण बहुधा आठवड्यांतून एकापेक्षां अधिक वेळ लेप त्वचेस सोसत नाहीं. तोंडावर होणाऱ्या एक प्रकारच्या दुष्ट व्रणांत [ ल्यूपस ] टिंक्चर किंवा लिनिमेंट व्रणाच्या कांठावर व सभोंवतीं लावावें. ह्या उपायानें तो व्रण पसरण्याचें बंद होतें. आयोडीनच्या मलमाचा उपयोग पुष्कळ विकारांत होतो. फार थंडीनें पायास होणाऱ्या चिखल्यांत ( चिलब्लेन्स ) हें मलम त्वचा चिरण्याच्या अगोदर लाविल्यास पुष्कळ उपयोग होतो. छातींत कोठें दाह नसून स्नायू ठणकूं लागल्यास मलमाचा उपयोग करावा.

लिनिमेंट, टिंक्चर व ऑईंटमेंट या तिघांचा सारख्या विकारांत उपयोग करण्यास हरकत नाहीं, परंतु जेथें तीव्र अंमलाची आवश्यकता असेल म्हणजे विस्फोटक परिणामाची आवश्यकता असेल तेथें लिनिमेंटचाच उपयोग करावा. दाह होऊन पुष्कळ दिवस गांठी राहिल्या असल्यास त्या विरघळण्यासाठीं त्यावर आयोडीनचा उपयोग करितात. परंतु ह्या उद्देशानें गंडमाळेच्या गांठीवर आयोडीनचा उपयोग केल्यास दाह वाढून त्यांत पू होण्याचा संभव असतो सबब गंडमाळेच्या गांठींवर आयोडीनचा उपयोग सावधपणें करावा.

आयोडीनचे अंगीं कृमिघ्न धर्म असल्यामुळें खवड्यावर त्याच्या मलमाचा उपयोग करावा.

धांवरे [ इरिसिपेलस ] या विकारांत टिंक्चर आयोडिन दाह जाहलेल्या व सभोंवतालच्या त्वचेवर लाविल्यानें तो पसरत नाहीं.

ज्या ठिकाणीं दाह झाला असेल त्याच्या सभोंवतांली पुरळ येण्यापुरतें लिनिमेंट लावलें असतां दाह कमी होतो. बद, विद्रधि, चाळपुळी इत्यादिकांच्या सभोंवतालच्या त्वचेवर लिनिमेंट लाविलें असतां, दाह कमी होऊन त्यांचें पुढें पाऊल पडत नाहीं.

अंडकोशांत पाणी झालें असतां तें प्रथम काढून आयोडीनचा अर्क पिचकारीनें घातला असतां त्यांपासून थोडा दाह उत्पन्न होऊन पाणी सांचणाऱ्या पिशवीचीं दोन्हीं अंगें एकमेकास चिकटून तींत पुन्हां पाण्याचा संचय होऊं शकत नाहीं. मोठमोठ्या विद्रधींत झालेला पू काढल्यावर आंत आयोडीनचा अर्क घातल्यास पुष्कळ उपयोग होतो.

पुष्कळ दिवसांच्या क्षयरोगांत फार त्रासदायक खोकला असून कफहि पुष्कळ पडतो. तेव्हां रोज सकाळीं

व सायंकाळीं आयोडीनची वाफ घेतल्यानें कफ पडण्याचें बंद होऊन खोकलाहि कमी होतो; सहापासून दहा वर्षांच्या वयाच्या मुलांनां गोवर येऊन गेल्यावर किंवा तो आला नसतांनाहि जरा सर्दी लागल्याबरोबर घसा बसून मोठा त्रासदायक खोकला येतो, त्यामुळें छातींत सुंई सुंई आवाज होतो व हा विकार लवकरच बरा न होऊन पुनः पुन्हां उलटतो ह्यांतहि आयोडीनच्या वाफेपासून उपयोग होतो; तसेंच घटसर्पामध्येंहि आयोडीनची वाफ दिवसांतून पुष्कळ वेळां ओढल्यानें बराच फायदा होतो; नाक किंवा डोळ्यांचें आंतील कोंपरे खाजणें. व डोळ्यांतून किंवा नाकांतून पाणी गळणें आणि अतिशय कपाळ दुखणें ह्या विकारानें पाहिजे त्या मनुष्यास वर्षेंच्यावर्षे मधून मधून त्रास होतो, तो विकारहि आयोडीनची वाफ घेतल्यानें जातो.

आयोडीनची वाफ घेण्याची अगदीं सोपी व साधी रीत म्हणजे निमुळत्या तोंडाचें सुमारें शेराचें भांडें घेऊन आधणाच्या पाण्यानें तें भांडें आंतून धुवावें व तें चांगलें तापवावें; नंतर त्यामध्यें सुमारें निम्म्यापर्यंत आधणाचें पाणी घालून त्यात २०–३० थेंब आयोडीनच्या अर्काचे टाकावे; मग रोग्यास आपलें तोंड भांड्याच्या तोंडावर धरण्यास सांगून आयोडीन मिश्रित वाफ ओढण्यास सांगावें; वाफ वाया जाऊं नये म्हणून भांडें व रोग्याचें डोकें रुमालानें झाकावें. ह्याप्रमाणें वाफ सुमारें पांच मिनिटेंपर्यंत रोज सकाळीं व सायंकाळीं घ्यावी. केव्हां केव्हां आयोडीनच्या पुष्कळ प्रमाणामुळें घशांत व छातींत कांहीं वेळ दुखल्यासारखें वाटतें. केव्हां डोळे येतात, नाकांतून पाणी गळतें व डोकेंहि दुखतें.

पुष्कळ दिवसांच्या पिनसामध्यें मिठाच्या पाण्यांत थोडा आयोडीनचा अर्क घालून त्या मिश्रणानें नाक धुतलें असतां चांगला उपयोग होतो.

आयोडीनचा अर्क लाविल्यानें दातांवरचें कीट निघतें; हिरड्या सुरकुतून दांत अधिक उघडे पडूं लागल्यामुळें त्यांस कीड लागण्याचा जेव्हां संभव असतो तेव्हां हिरड्यास आयोडीनचा अर्क लाविल्यानें त्या सुरकुतण्याचें बंद होतें व ह्यासाठीं दांताजवळच्या हिरड्यांच्या भागावर, आयोडीनचा अर्क घेऊन पावशेर पाण्यांत टाकावा व त्या मिश्रणानें गुळण्या कराव्या म्हणजे पान्यापासून लाळ गळून लागल्यास ती कमी होते; तोंडांतील गर्मीच्या अथवा साध्या घरास सुद्धां आयोडीनचा अर्क लावावा.

फाजील प्रमाणांत आयोडीनचा पोटांत उपयोग केल्यास कोठयाच्या नाजूक त्वचेचा दाह होऊन पोटांत दुखूं लागतें व वांति, जुलाब होऊन पुष्कळदां अत्यंत शक्तिपात होतो व मरणहि येतें. म्हणून, आयोडिन पोटांत द्यावयाचें असल्यास जेवल्यानंतर लागलीच द्यावें म्हणजे ह्या स्थितींत कोठ्याच्या नाजूक श्लेष्मलत्वचेचें अन्नामुळें आपोआपच रक्षण होतें.

हिवज्वरांत कोयनेलच्या ऐवजीं आयोडीन पोटांत दिल्यानें ज्वर येण्याचें बंद होतें, इतकेंच नव्हे, पण ज्या रोग्यांनां कोयनेलपासून गुण येत नाहीं त्यांचा ज्वर आयोडीनपासून राहतो असा अनुभव आहे. पोटांत आयोडीनचा अर्क बारा थेंबापासून पंधरा थेंबापर्यंत द्यावा. ( भिषग्विलास पु. ९ ]

**आयोनियन तत्त्वज्ञान**—इंद्रियज्ञान जडविश्वाच्या जडप्रकृति, गति व शक्ति यांनीं खुलासा करणाऱ्या अयोनियांतील तत्त्ववेत्त्यांच्या मताला हें ( अयोनियन स्कूल ऑफ फिलासाफी ) नांव आहे. इ. स. पू. ५ व्या व ६ व्या शतकांतील पुष्कळसे तत्ववेत्ते या पंथाचे होते. हे बहुतेक अयोनियांत जन्मलेले असून त्यांवर स्थानिक परिस्थितीचा पगडा पूर्णपणें बसलेला असल्यामुळें त्यांच्या मतांवरून आपणांस अयोनियन बुद्धिमत्तेचें व तिच्या विकासाचें चांगलें ज्ञान होतें. यासंबंधीं ही गोष्ट विशेष लक्षांत घेण्याजोगी आहे कीं, या मताचा ख्रि. पू. सहाव्या शतकांत उदय प्रत्यक्ष ग्रीसमध्यें न होतां इजियन समुद्राच्या पूर्व तीरावरील वसाहतींत झाला. या तत्त्ववेत्यांत प्रादेशिक ऐक्याप्रमाणें ध्येय व पद्धति या बाबतींतहि ऐक्य दिसून येतें. या सर्वांनीं इंद्रियज्ञात जडविश्वाचा खुलासा करण्याचा प्रयत्न केला. त्यांनीं जडप्रकृति, चलनक्रिया, व शक्ति यांच्या योगानें जगातील सर्व चमत्कार घडतात असें प्रतिपादन केलें. त्यांत व इलियाटिक व पायथेगोरीयन या पंथांमध्यें या बाबतींत मतभेद होता. पायथेगोरीयन तत्त्ववेत्ते पृथक् निरपेक्षपणें विचार करीत आणि ज्ञान व अस्तित्त्व याचें आध्यात्मिक दृष्ट्या स्पष्टीकरण करीत.

हिरॅक्लिटसपर्यंतचे प्राचीन तत्त्ववेत्ते सर्व गोष्टींच्या आदिकारणाचा–जडप्रकृतीचा–शोध करण्यांत गढून गेले होते. हिरॅक्लिटसनें " सार्वत्रिक गतीचें " तत्त्व हें आदिकारण म्हणून पुढें आणिलें, व सर्व गोष्टींचा खुलासा " शक्तिचलन व गतिमानशक्ति " यांनीं केला. त्यानें प्रेरक शक्ती कशी होती. इंद्रियज्ञात जग सध्या दिसतें तें कसें झालें? हे प्रश्न विचारिले. थेलीसचें या पंथात फार महत्त्व आहे. यानेंच प्रथम विविध चमत्कारांच्या मागील अमर्याद एक तत्त्व शोधण्यास सुरवात केली. " जल " हें तें एक तत्त्व आहे असें तो म्हणे. यानंतर अनॅक्सिमँडरनें हवा व अग्नि यांमधील आणि पृथ्वी व जल यांमधील एक जड तत्त्व, व त्याचें अनंतत्त्व प्रतिपादन केलें. हें अनंततत्त्व भूतकालीं, आज व पुढेंहि एकरूपच असणार. तें निर्विकल्प आहे असें त्याचें मत होतें. त्याचा शिष्य अनाक्झिमेनीझ यानें या आत्यंतिक जडवादाविरुद्ध बंड केलें. त्यानें 'हवा' हेंच एक तत्त्व आहे असें प्रतिपादन केलें. वाढीची क्रियां कोणत्या दोन मार्गांनीं होतें हें त्यानें दाखविलें उष्णता व थंडी यांनीं विरलीकरण व दृढीभवन होतें; यानंतर " हवा " ही ज्ञानवान देवता आहे असें म्हणण्यांत आलें. अस्तित्वा-

संबंधी विशिष्ट मतें व जड जीव वाद यांतील हा दुवा आहे. " फरक " ही अनुभवांतील मुख्य गोष्ट असून 'बहुत्वाचा' केवल भौतिक खुलासा करणें शक्य नाहीं. " बहुत " हें इंद्रियाचें व "एक" हें विचाराचें असतें. अस्तित्वाचा खुलासा परिवर्तनानेंच होतो. हिरॅक्लिटसनें अस्तित्व व नास्तित्व यांच्या परस्पर अवश्यक संबंधावरच विशेष भर दिला त्यानें आयोनियन तत्त्वज्ञान अत्युचपदास पोंहचांविलें. पण विषय व विषयी यांचा संबंध यास समजला होता असें म्हणतां येत नाहीं. इंद्रियज्ञानांत असलेल्या सर्वगामी सुसंगततेचें आकलन म्हणजेच मानवी ज्ञान होय. इंद्रियें विश्वसनीय नसतात कारण विविधता एका ईश्वराचें संबंधात निश्चित असते असें म्हणण्याऐवजीं ती स्वतःच निश्चित असते असें ते म्हणतात. यामुळें सार्वत्रिक ईश्वरी बुद्धीस मानवी वैयक्तिक बुद्धि अंकित असतें हें मत प्रमुख असलेलें 'नीति' मत सुरू झालें. नित्य ईश्वरासमोर वैयक्तिक क्षणभंगुरत्व कबूल करण्यास नाकारणें म्हणजे नैतिक कर्मापणा होय. येथें अमरत्वाचें तत्त्व आढळतें. प्राचीन यूरोपीय विचार व बुद्ध संप्रदायांतील मूल तत्त्वें यांचें साम्य आत्म्याच्या या अस्तित्व व नास्तित्व प्रश्नांत तसेंच व्यक्ति व ईश्वर याच्या संबंधांत दिसतें. येथपर्यंत या तत्त्ववेत्त्यांच्या विचारक्षेत्रांत प्रामुख्य होतें. सर्व विचारी पुरुष थेलीसच्या मार्गानें जात व अस्तित्व प्रश्न अनुभवाच्या बाजूनें सोडविण्याचा प्रयत्न करीत. पण हिरॅक्लिटसनें अगदीं नवीन विचार सुरू केला. परमेनिडस व झेनो यानीं " शून्यातून शून्यच येतें " असें म्हणून या प्रश्नास न्यायशास्त्रीय अनुभवपूर्वविचारात टाकिलें. यानंतरच्या आयोनियनानीं सारसंग्रह पद्धति स्वीकारली. अस्तित्व व नास्तित्व आणि सार्वत्रिक स्थिति स्थापकता व केवल सातत्य यांचा संबंध आणिला या विरोधी कलांच्या परीक्षणांत भिन्न भिन्न मतें पुढें आलीं. आनक्सिगोरसनें सर्व गोष्टी आरंभापासून अव्यस्थित स्वरूपात अस्तित्वांत असून त्या अनंतकणांत सर्व गोष्टींचीं बिजें असतात व एकीकरण व भिन्न तत्त्वसमाहार याच्या योगानें एकजातीय तत्त्वें एका ठिकाणीं येतात. "नोआस" —मन—हा या सर्व क्रिया करितो; पण तो अशरीरी नाहीं. फक्त विरळ आहे एवढेंच. त्यानें एका क्षणांत गती उत्पन्न केली व ती सर्वत्र पसरली. ही सार्वत्रिक गति चालू आहे व अनंतकालपर्यंत चालू राहणार या गतीनेंच सर्व वस्तू तयार केल्या. हा द्वैतवाद जडजीववादाच्या बराच पुढें गेला होता प्लेटो व ॲरिस्टाटलच्या टीकांवरून लोकांस या मताचें महत्त्व बरेंच होतें असें दिसतें पण या मतास व्यर्थ फार मोठेपणा देणेंहि योग्य नाहीं " नोआस " ही आत्मिक शक्ति अथवा सर्व शक्तीमानदेवता नाहीं. तो जगदात्माहि नव्हे. इतर सर्व वादांपासून बुद्धि निराळी काढून तीस सर्व विश्वाची चलनशक्ति समजून ज्या शब्दानें पुरुषत्व व कार्यकर्तव्य यांचा बोध होतो तो शब्द लोकमान्य करवून आनाक्झिगोरसनें यूरोपीय तत्त्वज्ञानांत नूतन चैतन्य आणिलें. डायोजिनसनें सर्व गोष्टींत एक तत्त्व असेल असें प्रतिपादन केलें. व हिरॅक्लिटसच्या बहुतत्त्ववादाविरुद्ध मत दिलें. हें एक तत्त्व म्हणजे सार्वत्रिक एकजातीपणा हवा होय. हवा अनंत व बुद्धिवंत आहे. व या बुद्धीनेंच निसर्गातील व्यवस्थित घटना झाली. असें तो म्हणे मिलेटस आरलेसनें आयोनियन तत्त्वज्ञानांत नीतिशास्त्राची भर घातली व पूर्वीचीं मतें संघटित केली. न्याय व अन्याय हे नैसर्गिक नसून कायदेशीर आहेत असें त्याचें मत असे. हिपो " जल " हें सर्वांचें मूळ आहे असें म्हणतो.

[ संदर्भ ग्रंथ—झेलरकृत ग्रीक तत्त्वज्ञानाचा इतिहास. बर्नेट—अर्ली ग्रीक फिलॉसॉफी ( १८९२ ) फेअरबँक्स—दि फर्स्ट फिलॉसॉफर्स ऑफ ग्रीस ( १८९४ ). ग्रोट–हिस्टरी ऑफ ग्रीस, प्रकरण ८ वें. विंडेलबँड—हिस्टरी ऑफ एन्शंट फिलॉसॉफी ( १८९९ ). बेन–दि ग्रीक फिलॉसॉफर्स(१८८३) आणि दि फिलॉसॉफी ऑफ ग्रीस ( १८९८ ). गोंपर्झ–ग्रीक थिंकर्स ( इंग्रजी भाषांतर पु. १, १९०१ ), ए. ब्रि. ए.रि.ए.]

**आयोनियन बेटें**—कॉर्फ्यु सेफालोनिया, झान्टे सान्टा मौरा, इथाका, सीथेरा व पॅक्सो या ग्रीक बेटांच्या समुदायाला हें नांव आहे. या बेटांची राजकीयदृष्ट्या एकी आधुनिक काळांत झाली, व तें स्वतंत्र राज्य म्हणून फक्त सातच वर्षें ( १८००–१८०७ ) होतें. इ. स. ८९० च्या सुमारास लीओ नामक तत्त्ववेत्त्यानें या बेटाचा एक प्रांत बनविला; व त्या वेळीं तो पूर्व रोमन साम्राज्याच्या सत्तेखालीं होता. तथापि हीं सर्व बेटें एका सत्तेखालीं टिकून राहूं शकलीं नाहींत, कारण कॉर्फ्यु, सेफालोनिया, झान्टे, वगैरे बेटें पृथकपणें कधीं ग्रीकानीं, कधीं व्हेनेशियन रिपब्लिकनें, कधीं तुर्कांनीं जिंकून आपल्या ताब्यात घेतलीं होतीं. अठराव्या शतकांत या बहुतेक बेटावर व्हेनेशियन लोकाची सत्ता होती. त्यानीं प्रमुख देश्य घराण्याना पदव्या, नोकऱ्या वगैरे देऊन आपल्याला पूर्ण अनुकूल करून घेतलें आणि त्याच्याशीं विवाहसंबंधहि केले. १७९७ मध्यें व्हेनेशियन रिपब्लिक नेपोलियननें नष्ट करून हीं बेटें फ्रान्सला जोडलीं. परंतु पुन्हा लवकरच घडामोड होऊन १८०० मध्यें पॉल बादशहानें याचें स्वतंत्र रिपब्लिक बनविलें. तें सात वर्षें टिकलें व १८०७ मधील टिलसिटच्या तहानें पुन्हा हीं बेटें फ्रेंच साम्राज्याचा भाग बनलीं. नेपोलियनचा पाडाव झाल्यावर १८१५ मधील पॅरिसच्या तहानें हीं बेटें ब्रिटनच्या संरक्षणसत्तेखालीं पूर्णपणें गेलीं.

ब्रि टि श प्रो टे क्ट रे ट.—पॅरिसच्या तहांतील कलमें बरींच अनिश्चितार्थक असल्यामुळें त्यांचा शक्य तितका आपल्या फायद्याच्या दृष्टीनें अर्थ लावून ग्रेट ब्रिटननें आपली सत्ता या बेटांवर शक्य तितकी अधिक बसविली, आणि तहांत या बेटांनां 'पूर्ण पृथक् व स्वतंत्र राज्य' असें ठरविलें असूनहि इंग्रजांनीं त्यांवर आपली पूर्ण सत्ता बसविली,

व सर थॉमस मेटलंड यास तेथें हाय कमिशनर नेमिलें. राज्यकारभार पाहण्याकरितां देश्य सरकार स्थापन करावें, असें तहांत कलम होतें, त्याची अंमलबजावणी म्हणून इंग्रजांनीं तेथें सहा सभासदांचें सेनेट व चाळीस सभासदांचें कायदेमंडळ ( असेंब्ली ) स्थापन केलें. परंतु राज्यकारभाराची खरी सत्ता हाय कमिशनरच्या हातीं ठेविली कारण तो वाटेल त्या गोष्टीस (व्हेटो सारख्या अधिकारानें) अडथळा करूं शकत असे, आणि वाटेल ती गोष्ट (सर्टिफिकेशनसारख्या अधिकारानें) अमलांत आणूं शकत असे. सडका बांधणें, प्रत्यक्ष कर नाहींसे करणें, चर्चच्या जमीनी लागवडीस लावणें, न्यायनिवाड्याचें काम निःपक्षपातपणानें करणें, व शाळा स्थापणें, वगैरे लोकोपयोगी कामें सर थॉमसनें केलीं. तथापि त्यानें जी अनियंत्रित सत्ता चालविली तीमुळें लोक चिडून गेले. १८२३ मध्यें त्याच्या जागीं जनरल सर फ्रेडरिक ॲडाम हाय कमिशनर नेमला गेला. त्याच्या वेळीं कॉर्फ्यू बेटाची नवी तटबंदी व इतर महत्त्वाचीं सार्वजनीक कामें करण्यांत आलीं. पुढें सर हावर्ड डगलस १८३५–११४१ यानेंहि बरीच अनियंत्रित सत्ता गाजावल्यामुळें लोकपक्षाचा अधिक क्षोभ झाला त्या वेळी ओड्डीस मुस्टोझिडी ( मृत्यु १८६१ ) या लोकांचा पुढारी होता. १८४८ मध्यें यूरोपांत राज्यक्रांत्यांची लाट उसळली त्या वेळीं तत्कालीन हाय कमिशनर (लॉर्ड सेटन १८४३–४९) यानें कित्येक महत्त्वाच्या सुधारणा केल्या. तथापि हीं बेटें ग्रीसला जोडलीं जावीं असें म्हणणारा जो पक्ष होता तो उत्तरोत्तर अधिक बळावत गेला. मधून मधून दंगेधोपे बरेच होऊं लागले पण ते लष्कराच्या मदतीनें मोडण्यात आले. पार्लमेंटनें बेटें ग्रीसला जोडावीं असा ठराव पास केला. १८५९ मध्यें सुप्रसिद्ध इंग्रज मुत्सद्दी ग्लॅडस्टन हान हा या बेटाचा हाय कमिशनर झाला. तेव्हां लोकांची स्वतःची इच्छा सफळ होण्याची विशेष संधि आली. पण थोडक्याच दिवसांत ग्लॅडस्टनच्या जागीं सर हेनरी स्टोक्सची नेमणूक झाली, तेव्हां ब्रिटिश सरकार व देश्य कायदेमंडळ ( असेंब्ली ) यांच्यामध्यें झगडा चालू झाला. हाय कमिशनर राज्यघटनेच्या नियमांचें आणि पॅरिस तहांतील कलमांचें उल्लंघन करीत आहे असा निषेधपर ठराव असेंब्लीनें केला. पुढें १८६२ मध्यें ग्रीसमध्यें राज्यक्रांति होऊन इंग्लंडच्या सल्ल्यानें ग्लुक्सबर्गचा प्रिन्स विल्यम जॉर्ज हा ग्रीसचा राजा झाला, तेव्हां हीं बेटें कांहीं अटींवर ग्रीसला जोडण्याचें इंग्लंडनें ठरविलें; पण त्यापैकीं एक अट असेंब्लीला मान्य नव्हती, त्यामुळें तो प्रश्न पुन्हा भिजत पडला. पण लवकरच इतर राष्ट्रांनीं ब्रिटिशांची या बेटावरील संरक्षणसत्ता रद्द झाल्याचें ठरविलें. त्यामुळें १८६४ मे ३१ रोजीं ब्रिटिश सरकारनें आपला हाय कमिशनर व सैन्य तेथून काढून परत नेलें. या असेंब्ली व सरकार यांच्यामधील झगड्यांत असेंब्ली दोनवेळां तहकूब ( प्रोरोगेशन ) ठेवण्यांत आली होती.

याप्रमाणें हीं बेटें ग्रीसच्या ताब्यांत गेल्यावर तेथें विशेष महत्त्वाची कांहीं गोष्ट झाली नाहीं, उलट त्यांची भरभराट अनेक कारणांमुळें कांहींशीं कमीच झाली आहे.

[ संदर्भ ग्रंथ—कर्कवाल—फोरइयर्स इन दि आयो.आयलंड्स, हाच एक प्रसिद्ध इंग्रजी ग्रंथ या बेटांविषयीं माहिती देतो. इतर जें कांहीं वाङ्मय उपलब्ध आहे तें जर्मन–ग्रीक वगैरे भाषांतून आहे. ब्रिटानिकामध्यें यावर लेख आहे. ]

**आयोनियन लोक**—हेलेनी ज्ञातीच्या लोकांपैकीं ही एक प्रमुख पोटजात आहे. ऐतिहासिक काळांत ॲटिका यूबीआचा कांहीं भाग,आशियामायनरच्या पश्चिम किनाऱ्याचा कांहीं भाग, पेलॉपोनीजचा ईशान्यभाग वगैरे प्रदेशांत राहणाऱ्या लोकांनां आयोनियन असें म्हणत. सातव्या व आठव्या शतकांतील हिब्रू वाङ्मयांत हें नांव आढळतें. प्राचीन ग्रीक इतिहासकार हिरोडोटस यानें या लोकांबद्दलचा स्पष्ट उल्लेख केलेला आहे. ' आयोन ' नांवाच्या पुरुषाचे हे वंशज असून मूळ पेलॉपोनीजच्या ईशान्य भागांत हे रहात होते. एकियन लोकांनीं त्यांना तेथून हांकून लावल्यावर ते आटिकांत राहूं लागले. ख्रिस्तपूर्व पांचव्या शतकांत आयोनियन लोकांचा पूर्वींचा लौकिक कमी होत चालला होता; याचें कारण त्यांचा शांतताप्रिय, चैनी व नमता स्वभाव, आणि आयोनियन राज्यांपैकीं प्रमुख गणलें जाणारें जें अथेन्सचें राज्य त्याचा ऱ्हास व नाश हें होय. हे आयोनियन लोक मूळचे यूरोपीय कीं एशियाटिक याबद्दल अलीकडील इतिहाससंशोधकांत अद्यापहि मतभेद आहे.आयोनियन संस्कृति व कला याना एका बाजूनें जुन्या एजियन (मिनोन) संस्कृतीपासून व दुसऱ्या बाजूनें हिटाइट संस्कृतीच्या मार्फत प्राच्य (विशेषतः असुरियन) संस्कृतीपासून उत्तेजन मिळालें. आयोनियन ग्रीकांचा इतिहास ग्रीसच्या इतिहासांत अंतर्भूत झालेला आहे.

प्राचीन भारतीय वाङ्मयांत उल्लेखिलेले यवन आयोनियनच होते कीं काय याचा निश्चय झालेला नाहीं. कारण मराठेशाहींतील फिरंगी या शब्दाप्रमाणें परकीयांनां यवन हा शब्द योजीत. सर विल्यम हंटरनें यवन म्हणजेच आयोनियन असें धरून त्यांचा फार प्राचीन काळापासून हिंदुस्थानशीं कसा संबंध आला हें दाखविलें आहे('ओरिसा'). पाणिनी सूत्रांमध्यें यवनलिपीचा निर्देश सांपडतो. या ग्रीकांचा भारतीयांशीं निकट संबंध अलेक्झांडरच्या स्वारीपासून आलेला दिसतो. आयोनिक कलेचा अवशेष जलालाबाद ( प्रोसीडिंग्स. ए. एस्. बी. १८७९. पा. २०९, प्लेट ११ ) व मथुरा ( मथुरा तिसरी आवृत्ति, पा.१७१) येथें सांपडतो. [ ए.ब्रि. स्मिथ–अर्ली हिस्टरी ऑफ इंडिया. वैद्य—मध्ययुगीन भारत. महाभारत—उपसंहार. इ. ]

**आयोनिया**—आशियामायनरच्या पश्चिम किनाऱ्याच्या एजियन समुद्राजवळ असलेल्या एका भागाचें हें प्राचीन नांव आहे. त्याच्या पूर्वेस लीडिया देश आहे. या भूभागांत व लगतच्या बेटांत आयोनिक वंशांतले ग्रीक लोक राहिले होते. ट्रोजन युद्धानंतर १४० वर्षांनीं या भागांत वसाहत झाली, अशी दंतकथा आहे. या लहानशा भागांतील निरनिराळ्या शहरांत निरनिराळ्या लोकांनीं वसाहत केली होतीसें दिसतें. कारण हिरोडोटस या प्राचीन इतिहासकाराच्या काळींहि निरनिराळ्या शहरांतले लोक निरनिराळी भाषा बोलत असत असें त्याच्या इतिहासांत म्हटलें आहे. आयोनियांत बारा प्रसिद्ध शहरें असून त्यांचा एक संघ बनविला होता, व एकीची खूण म्हणून एका पॅन-आयोनिक ( सर्व आयोनियाच्या ) समारंभांत संघाचे सर्व घटक भाग घेत असत. तथापि या संघाला धार्मिक स्वरूप होतें, राजकीय नव्हतें; कारण प्रत्येक शहराचा राज्यकारभार स्वतंत्रपणें चालत असे. आयोनिया हा भूप्रदेश फार लहान असून त्याची लांबी अवघी ९० मैल व रुंदी २० ते ३० मैल आहे. शिवाय यांपैकीं बराच भाग डोंगरांनीं व्यापला आहे. मात्र येथील हवा विशेष चांगली असून जमीन सुपीक आहे त्यामुळें येथें सर्व प्रकारचीं फळें विपुल होतात. येथील अंजीर व मनुका ( वाळलेलीं द्राक्षें ) यूरोपांतील बहुतेक बाजारांत असतात. येथील शहरांपैकीं मिलेटस हें शहर प्राचीन काळीं फार प्रसिद्ध होतें व हल्लीं स्मर्ना हें शहर फार प्रसिद्ध आहे.

इ ति हा स.—आयोनियासंबंधाची ज्ञात असलेली पहिली ऐतिहासिक गोष्ट म्हणजे ख्रिस्तपूर्व सातव्या शतकाच्या मध्यास सिमेरी लोकांनीं ( सीथिया पहा ) केलेली स्वारी होय. लीडियाचे राजेहि वरचेवर स्वाऱ्या करीत असत आणि क्रोसस या लीडियन राजाच्या वेळीं (ख्रि. पू. ५६०-५४५) आयोनियांतील बरींच शहरें लीडियाच्या अमलाखालीं गेलीं. पण इराणच्या सायरस राजानें तीं जिंकून इराणच्या अमलाखालीं घेतलीं. ख्रि. पू. ५००च्या सुमारास या शहरांनीं इराणविरुद्ध बंड केलें व तें मोडण्यांत आलें. पण ख्रि. पू. ४७९मधील मीकेलच्या लढाईंत ग्रीकांनीं आयोनियन लोकांच्या मदतीनें इराणी लोकांचा पराभव केल्यावर आयोनिया पुनः स्वतंत्र झाला, पण तो अथेन्सनें स्थापलेल्या डेलियन संघाचा अंकित होता. ख्रि. पू. ३८७ पासून पुनः इराणची सत्ता येथें स्थापित झाली. ख्रि.पू. ३३४ मध्यें अलेक्झांडर दि ग्रेटनें आयोनिया जिंकून घेतल्यापासुन मॅसिडोनियन राजांचा अंमल तेथें सुरू झाला; व नंतर रोमन अमलाखालीं हा देश गेला.

आयोनियानें जगावर मोठे उपकार केले आहेत; ते असे कीं, आयोनियानें अनेक विद्वान व शास्त्रज्ञ लोक जन्मास घातले; तसेंच चित्रकला उत्तम प्रकारें वृद्धिंगत केली. येथूनच पुढें पांचव्या शतकांत अथेन्स येथें या कलेच्या वाढीला उत्तेजन मिळून ती उत्कृष्ट दशेस पोहोंचली. आयोनियन चित्रकला ख्रिस्तपूर्व ८ व्या, ७ व्या व ६ व्या शतकांत भरभराटींत होती ( ग्रीक कला पहा ). आयोनियन प्रसिद्ध पुरुषांत सॅमॉस येथील थिओडोरस व ऱ्होकस; चिऑसचा ग्लॉकस, मेलास, मिसिआडीस, आर्चेर्मस, बुपालुस व अथेनिस; आणि मॅग्नेशियाचा बॅथीक्लीज, हे प्रमुख होत.

[संदर्भग्रंथ—आशियामायनरवरील ग्रंथांतून या भागाची माहिती सांपडेल. शिवाय ब्यू फोर्ट-आयोनियन अँटिक्विटीज ( १८११ ) चँडलर—आयोनियन अँटिक्विटीज ( १७६९ पासून पुढें ),मुरे वगैरेंनीं प्रसिद्ध केलेला ग्रीक पाषाण शिल्पाचा इतिहास. होगार्थ—आयोनिया अँड दि ईस्ट ( १९०९ ). ए. ब्रि. ]

**आरंग**—हें गांव रायपूर जिल्ह्यांत असून महानदीपासून ४ मैल दूर आहे. हें बंगाल नागपूर रेल्वेवरच्या रायपूर स्टेशनापासून २२ मैलांवर आहे. रायपूरपासून येथें जाण्याला टांगे, मोटारी मिळतात. येथील लोकसंख्या ( १९११ मध्यें ) ५८२०. पाऊस सरासरी ५० इंच. येथील तहशीलदाराचें कोर्ट इ. स. १८६३ च्या सुमारास उठून रायपुरला गेलें. त्या दिवसापासून या गांवाला उतरती कळा आली. येथें व्यापारी लोक पुष्कळ असून धातूच्या भांड्यांचा व्यापार मोठ्या प्रमाणावर चालतो. हयहय वंशी राजांचें हें स्थान असल्यामुळें या ठिकाणीं मोडकळीस आलेलीं देवालयें व तळीं बरींच आहेत. येथें एक जैनमंदिर असून तें फार प्राचीन काळचें आहे. या गांवाच्या उत्तर दिशेला खणलें असतां पुरातन घरांचे पाये सांपडतात. यावरून पूर्व काळीं हें गांव हल्लींपेक्षां फार मोठें असलें पाहिजे. या गांवाच्या सभोंवतीं फार मोठ्या आमराया आहेत. यांच्यांत वाघसुद्धां राहतात. या ठिकाणीं इ. स. १८७० च्या सुमारास नायबजकातदार राहत असे. यात्रेकरू लोक जगन्नाथास जातांना बागेश्वरच्या मंदिरास येऊन भेट देतात. (म. प्रां. ग्या. १८७० व १९०८ ).

**आरणी, पो ट वि भा ग**—(मद्रास इलाखा ) अर्काट. हा उत्तर अर्काट जिल्ह्याचा पोटविभाग असून त्यांत आरणीचा जमिनदारी तहशील, व पालूर आणि वांदिवाश हे तालुके आहेत.

त ह शी ल.—उत्तर अर्काट जिल्ह्याच्या दक्षिणभागीं जमीनदारी तहशील नांवानें प्रसिद्ध असलेला सर्वांत लहान तालुका. क्षेत्रफळ १८४ चौ. मैल व लोकसंख्या १९११ मध्यें १०८९४४ व १९०१ मध्यें ९६५४२ इतकी होती. ठाण्याचें गांव आरणी. सरकारास द्यावयाच्या पेषकश फंडासह २१००० रुपये असतो.

श ह र:—उत्तर अर्काट जिल्ह्यांत हें शहर असून तेथें डेप्युटि कलेक्टर व इतर अंमलदारांच्या कचेऱ्या आहेत. मुख्य महत्त्वाची इमारत किल्ल्याची असून तिचा बहुतेक भाग अगदीं मोडकळीस आला आहे. तीस वर्षांपूर्वी

आरणी हें एक मोठें लष्करी ठाणें होतें. पश्चिम बाजूच्या तटाजवळ दोन जुनीं यूरोपियनांचीं स्मशानें आहेत. कवाइतीच्या मैदानाच्या एका बाजूस एक द्वंद्वयुद्धाचा स्मारकस्तंभ आहे. वायव्येच्या कोंपऱ्यांत एक जुनें सुंदर देवालय असून तें वेलोर किल्ल्याचें स्मरण करून देत असतें. रेशीम व कापूस यांच्या विणकामाचा मोठा धंदा या शहरांत चालतो.

इ ति हा स.—प्रसिद्ध कवि आनंदतनय आरणीचाच होता ( आनंदतनय पहा ). कर्नाटक जिंकल्यावेळीं शहाजीनें आरणी प्रांत वेदोभास्कर या ब्राह्मण सरदारास जहागीर म्हणून दिला होता. कांहीं ठिकाणीं शहाजीस पकडून दिल्याबद्दल विजापूरच्या बादशहानें वेदोभास्करास हा दिला असा उल्लेख आढळतो(उदा. महाराष्ट्र सारस्वत–आनंदतनय, पहा). शिवाजीनें कर्नाटकावर स्वारी केली तेव्हां व्यंकोजीस आरणीसह इतर कांहीं प्रांत आपल्या वाट्यांचे देण्यास लिहिलें. व्यंकोजीशीं त्यानें जे करार केले त्यांत ‘ आरणी प्रांत वेदोभास्कर व त्याचे आठ मुलगे यांजकडे चालवावा, त्यांस कोणतेहि प्रकारची तोशीस लावूं नये ’ असें एक कलम घातलें होतें ( मराठी रियासत, पूर्वार्ध ). हा वेदोभास्कर शिवाजीस मिळाल्याबद्दल व्यंकोजी त्याचा पुढें सूड घेईल अशा धोरणानें हें कलम मुद्दाम घातलेलें दिसतें. इ. स. १७८० मध्यें हैदरअल्लीनें आरणीचा किल्ला घेतला ( रा. खं. १०. २५९ ). अर्काट इंग्रजांच्या ताब्यांत आल्यावेळीं आरणीहि साहजिकच त्यांच्या कडे गेली. [ इं. गॅ. ६. भावे–महाराष्ट्र सारस्वत. अजगांवकर–महाराष्ट्र कविचरित्र ( आनंदतनय ) मराठी रियासत. ग्रँटडफ इत्यादि ]

**आरण्यकें**—या वाङ्मयास ज्ञानकोश दुसऱ्या विभागांतील आरण्यकें व उपनिषदें हें सातवें प्रकरण सविस्तर विवेचनास दिलें आहे. आरण्यकीय विचारांची मांडणी तेथें सोदाहरण दिलीच आहे. निरनिराळ्या वेदावरील निरनिराळीं अरण्यकें तेथें पुढीलप्रमाणें मांडलीं आहेत.

| | |
|---|---|
| ऋग्वेद | ऐतरेय व कौषीतकी. |
| यजुर्वेद शुक्ल | शतपथ ब्राह्मणाच्या चौदाव्या कांडांचा पहिला $\frac{1}{3}$ भाग व बृहदारण्यकोपनिषद् |
| यजुर्वेद कृष्ण | तैत्तिरीय आरण्यक |
| सामवेद | छांदोग्य उपनि॰द् व तलवकार आरण्यक |
| अथर्ववेद | मुंडकोपनिषद् |

वर दिलेल्या कोष्टकांत सामवेद व अथर्ववेद यांचीं आरण्यकें म्हणजे उपनिषदेंच दिलीं आहेत. कारण त्यांनां स्वतंत्र आरण्यकें नाहींत. या उपनिषदांनाच त्या वेदांचीं आरण्यकें समजलें जातें.

आरण्यकीय वाङ्मय वेदां॰ आणि ब्राह्मणें याचें संयोजक आहे. जीं कर्में गृह्यसूत्रांत उपदेशिलीं आहेत, तीं किंवा तत्सदृश म्हणजे जीं आज नित्यकर्मांत मोडतील, अशीं कर्में आरण्यकांत (तै.आ.२.११) मांडलीं आहेत. यांत उच्चारविषयक नियम आहेतच ( ऐ. आ.५ २ )त्याअर्थी शिक्षाविषयाचें पूर्वस्वरूप या वाङ्मयांत दृग्गोचर होतें. व्युत्पत्त्यासंबंधानें तर ब्राह्मणांतच मजकूर पुष्कळ असल्यामुळें यांत आला असल्यास नवल नाहीं. वेदांगांत अंतर्भूत न होणारें परंतु उत्तरकालीन वाङ्मयाशीं संबंध असलेलेंहि कांहीं विषय यांत आहेतच. उदाहरणार्थ शकुनविषयक विचारहि यांत ( ऐ. आ. ३.२,४) प्रदर्शित केले आहेत

आरण्यक हे ग्रंथ प्राचीन वैदिक वाङ्मयापैकीं असून कालदृष्ट्या ते वेदांतर्गत ब्राह्मणग्रंथ रचनेनंतर व उपनिषद्रचनेपूर्वी तयार झाले असावेत. श्रौतविधींचा जो भाग ब्राह्मण ग्रंथांत स्पष्ट करण्यांत आला नसेल तो या ग्रंथांत स्पष्ट केला असल्यामुळें आरण्यकांना ब्राह्मण ग्रंथांचाच भाग समजतात, पण वास्तविक त्यांतील विषयांवरून पाहतां त्याचें उपनिषद् ग्रंथांशीं अधिक साम्य आहे. व उपनिषदें हीं आरण्यक ग्रंथांचा भाग म्हणून मानलीं जातात. अर्थातच आरण्यकें हे श्रुतिग्रंथ आहेत, स्मृतिग्रंथ नव्हेत. आरण्यक या शब्दाची व्युत्पत्ति दोन प्रकारें करतात. एक अर्थ असा कीं, अरण्यामध्यें रहाणाऱ्या ऋषींनीं लिहिलेले ग्रंथ; किंवा दुसरा अर्थ अरण्यामध्यें राहूं लागल्यावर म्हणजे वानप्रस्थाश्रमी लोकांनीं वाचावयाचे ग्रंथ. सायणाचार्यांनीं तैत्तिरीय आरण्यकावरील भाष्यांत ही दुसरी व्युत्पत्ति दिली आहे. तथापि तिसरेंहि एक स्पष्टीकरण शक्य आहे तें असें:—यज्ञसंस्थेमध्यें दृष्ट होणारी प्रवर्ग्य संस्था यज्ञाशिवायहि होत असे पण पण ती घरीं न करितां गांवाबाहेर, विशेषेंकरून अरण्यांत व्हावी असा परिपाठ असे. त्या प्रवर्ग्यसंस्थेचें विवेचन ब्राह्मणांऐवजीं आरण्यक वाङ्मयांत ॰सतें. अरण्यांत म्हणजे गांवाबाहेर होणाऱ्या विधींचा ग्रंथ आरण्यक होय. प्रत्येक शाखेचें एक आरण्यक मानिलें जात असे, आणि आरण्यकांतील विषयाची पूर्तता करणारें व पुरवणी म्हणून अधिक माहिती देणारें एकेक उपनिषद् असे.

ब्राह्मणें व आरण्यकें यांचा वैदिक धर्मांतील आश्रम व्यवस्थेशींहि संबंध जोडतां येण्यासारखा आहे; तो असा कीं, वैदिकधर्मी गृहस्थाश्रमी आपलीं धार्मिक कर्तव्यें व विधी ज्या ग्रंथाधारें करतात ते ब्राह्मण ग्रंथ; आणि नंतर तिसऱ्या म्हणजे वानप्रस्थ आश्रमांतील म्हणजे आरण्यांत राहणारे ज्या ग्रंथांचें अध्ययन करतात ते आरण्यक ग्रंथ होत अशीहि मांडणी करतां येईल. आरुणेय उपनिषदांत असें सांगितलें आहे कीं " संन्याशानें( कुटिचर ) वेदमंत्रांचें (संहिता व ब्राह्मण) पठण करूं नये, तर याबद्दलचा विचार करीत राहावें व वेद ग्रंथांपैकीं आरण्यकें व उपनिषदें यांचें पठण करावें. " याज्ञवल्क्यानें आपल्या स्मृतींत असें सांगितलें

आहे कीं, ज्याला योग साधावयाचा असेल त्यानें आरण्यक ग्रंथांचें ज्ञान करून घ्यावें. "

ऋ ग्वे दी य आ र ण्य कें.—ऋग्वेदाचें ऐतरेय नामक आरण्यक आहे. त्यांत पांच आरण्यकें असून त्यापैकीं शेवटच्या दोन आरण्यकांचे कर्ते आश्वलायन व शौनक आहेत असें मानतात. त्यांची रचना ब्राह्मण ग्रंथाशीं बरेच साम्य दर्शविते. यांतील दुसऱ्या आरण्यकाचे ४–६ अध्याय हेंच ऐतरेय उपनिषद होय. ऐतरेयाच्या पहिल्या आरण्यकांत 'गवामयना' तील शेवटच्या दिवशीं महाव्रत नांवाच्या विधींत सकाळीं, दुपारीं व संध्याकाळीं करावयाच्या कृत्यांचें विवेचन केलें आहे. दुसऱ्या आरण्यकाच्या पहिल्या तीन अध्यायांत 'उक्थ' (बोललेले) शब्द यांचा लाक्षणिक अर्थ प्रतिपादिला आहे. तिसऱ्या आरण्यकांत उपनिषदांतील पद्धतीनें, मूलाक्षरांचे व त्यांच्या संयोगांचे विवेचन केलें आहे.

ऐतरेय आरण्यक जेव्हां लिहिलें गेलें तेव्हां ऋग्वेद संहितेंतील सूक्तें निश्चित होतीं इतकेंच नव्हे तर ज्या स्वरूपांत तीं आज आपणांस उपलब्ध आहेत त्याच स्वरूपांत तीं त्या कालीं होतीं, हें ऐतरेय आरण्यकावरून दिसून येईल. कारण त्या ग्रंथांत(२.२,२)अनुक्रमणिकाग्रंथांमध्यें ऋग्वेदाच्या मंडळांचीं जीं नांवें दिलेलीं आहेत तींच आहेत व त्यांचा अनुक्रमहि तसाच दिला आहे. एवढेंच नव्हे तर तत्पूर्वी कांहीं काळ तीं नांवें चांगलीं प्रचारांत असलीं पाहिजेत. कारण आरण्यकाच्या कर्त्यानें त्यांची व्युत्पत्ति फारच चमत्कारिक सांगितलेली आहे; व आपल्या कित्येक अवास्तविक कल्पनांच्या भराऱ्यांनां त्याचा आधार दिलेला आहे. प्रथम तो शतर्चिनांची अथवा पहिल्या मंडळाच्या सूक्तकारांचीं नांवें सांगतो. नंतर २ ऱ्या पासून ९ व्या पर्यंत मंडळांच्या सूक्तकारांचें माध्यम असें एकच समान नांव असावें असें तो म्हणतो; आणि शेवटल्या दहाव्या मंडळांच्या सूक्तकारांचीं क्षुद्रसूक्त व महासूक्त अशीं नांवें तो देतो. मधल्या मंडलांचीं रुढ असलेलीं नांवें पुढीलप्रमाणें सविस्तर दिलेलीं आहेतः—( २ रें ) गृत्समद, ( ३ रें ) विश्वामित्र, (४थें) वामदेव, ( ५ वें ) अत्रि, ( ६ वें ) भारद्वाज, ( ७वें ) वसिष्ठ, ( ८वें ) प्रगाथ आणि ( ९ वें ) पावमानीय. शिवाय आरण्यकांत ऋग्वेद, यजुर्वेद आणि सामवेद या वेदांचीं नांवें दिलेलीं आहेत.

वरील नांवांच्या ज्या व्युत्पत्ती आरण्यकांत दिल्या आहेत त्या ब्राह्मण ग्रंथांत दिलेल्या त्यांच्या व्युत्पत्तीपेक्षां अधिक दूरान्वयी दिसत नाहींत. परंतु आरण्यक ग्रंथांमध्यें व्युत्पत्ति विषयक दुसरें कांहीं विवरण आहे तसें कोणत्याहि ब्राह्मण ग्रंथामध्यें क्वचितच आढळतें. या आरण्यक ग्रंथात इतस्ततः दिलेल्या लहान लहान स्पष्टीकरणांत निरुक्त ग्रंथाचें आद्य बीजस्वरूप आढळतें.

जेव्हां या आरण्यक ग्रंथाची रचना झाली त्या काळीं वेदांतील सूक्तांचा व्याकरणदृष्ट्या अभ्यास चांगला करीत असत. व त्यांत केवळ शाब्दिक पांडित्य नसून मोठी विद्वत्ताहि असे, असें स्पष्ट दिसतें. यांत ऋग्वेदांतील दहा मंडलांचीं नांवें दिलेलीं आहेत इतकेंच नव्हे तर मंडलांचे विभाग जीं सूक्तें, ऋचा, अर्धर्चा, पाद, अक्षर हेंहि दिलेले आहेत. कित्येकदां सूक्तांचीं अक्षरें व त्यांचे प्रकारहि मोजून दिलेले आहेत; त्यांच्या संख्येच्या आंकड्यांचा कांहीं विशिष्ट गूढ अर्थ आहे असें मानिलें आहे. एका भागांत ( २.२, २ ) वर्णांतील प्रकार व्यंजनें, घोष ( स्वर ) व ऊष्मन् ( ऊष्म वर्ण श, ष, स, ) याविषयीं विवेचन केलें आहे.

ऋग्वेदाची कौषीतकी नांवाची दुसरी शाखा आहे व त्या शाखेचें कौषतकी आरण्यक स्वतंत्र आहे. या आरण्यकांत एकंदर पंधरा अध्याय असून त्यांतील कांहीं अध्याय व ऐतरेय आरण्यकांतले अध्याय सारखेच आहेत. कौषीतकी आरण्यकाचे ३–६ अध्याय म्हणजेच कौषीतकी उपनिषद होय.

य जु र्वे दी य आ र ण्य कें.—यजुर्वेदाच्या कृष्णयजुर्वेद व शुक्लयजुर्वेद या शाखा आहेत. त्यापैकीं कृष्णयजुर्वेदाचें तैतिरीय आरण्यक या नांवाचें आरण्यक आहे. या तैतिरीय आरण्यकांत दहा प्रपाठक आहेत, त्यापैकीं ७–९ प्रपाठक म्हणजेच तैतिरीय उपनिषद होय. दहावा प्रपाठक हें महानारायणीय उपनिषद् होय, व त्यांतील भाषा व विषय ह्या दोन्हींवरून तें उत्तर काळांत रचलेलें असावें असें स्पष्ट दिसतें. बृहदारण्यक ही शुक्लशाखेच्या शतपथब्राह्मण या ग्रंथातील शेवटच्या भागाला संज्ञा आहे.

आरण्यकें हे ब्राह्मण कांळांतलि अगदीं शेवटीं निर्माण झालेले ग्रंथ आहेत, आणि त्यांच्यापैकीं कांहींचें कर्ते शौनकाच्या काळांतील असून कित्येक त्याच्याहि अलीकडच्या काळांतील आहेत, असें मॅक्समुल्लरनें प्रतिपादन केलें आहे.

**आरमार.** १ इ ति हा सः—हा शब्द पोर्तुगीज लोकांच्या आरमडा शब्दापासून आला असावा. याचा अर्थ लढाऊ जहाजांचा समुदाय आणि राष्ट्रांतील लढाऊ माणसें तो वापरीत. ही गोष्ट मोठ्या राष्ट्रांचीच आहे असें नाहीं तर नगरराष्ट्रें व जातीस्वरूपी राष्ट्रें हीं देखील आरमारें बाळगीत आणि त्यांच्या आरमाराचा विकासहि याच प्रकारचा होता. लढाऊ जहाज म्हणून स्वतंत्र नमुन्याचीं जहाजें बनविणें व त्यांवर लढण्याकरितां म्हणून स्वतंत्र लढाऊ इसम शिकवून तयार करून ठेवणें ही व्यवस्था नंतर अमलांत येऊं लागली. बाराव्या शतकापूर्वी नॉर्समेन, व्हेनिशियन, फ्रेंच, इंग्लिश, वगैरे लोकांचीं आरमारें मूळारंभापासून कशीं सुधारत गेलीं याचा इतिहास आपणांस माहीत आहे.पण या कालाच्या पूर्वी शेंकडों किंवा हजारों वर्षें भूमध्यसमुद्राच्या किनाऱ्यावरील प्राचीन राष्ट्रांनीं

स्वतःचीं आरमारें बनविलीं होतीं व तीं नष्टहि होऊन गेलीं, आरगोनॉट्स आणि युलिसेस यांच्या धाडसी कृत्यासंबंधानें ज्या दंतकथात्मक व काव्यमय गोष्टी आहेत त्यांत नॉर्स लोकांनीं पश्चिम यूरोपांत धुमाकूळ घालण्यापूर्वींच्या दोन हजार वर्षांपूर्वी होऊन गेलेल्या व्हायकिंगच्या युगाची माहिती पद्यावयाप सांपडते. उत्तर यूरोपांत राहून चोहों-कडे हे धडाडीनें लुटालूट करीत. ऐतिहासिक काळाच्या पूर्वकालांतहि लोकांनीं जरूरी भासल्यामुळें लढाईच्या कामास योग्य अशीं स्वतंत्र प्रकारचीं जहाजें बनविलीं होतीं. पुष्कळ गति देतां यावी म्हणून बांधलेलीं जहाजें आणि पुष्कळ माल नेतां यावा म्हणून बांधलेलीं वाटोळीं जहाजें, अशीं दोन प्रकारचीं जहाजें अत्यंत प्राचीन काळापासून होतीं. अशा नमुन्याच्या जहाजांचें श्रेय ग्रीक लोक कॉरिंथियन लोकांनां देतात परंतु प्राचीन हेलेनिक लोकांनां फिनिशियन लोकांकडून हे नमुने ज्ञात झाले होते. तथापि या प्राचीन काळच्या हेलेनिक किंवा ग्रीकेतर आरमाराबद्दल माहिती इतकी अल्प आहे कीं, आरमारासंबंधीचा इतिहास देण्यास अथीनियन लोकांपासूनच आरंभ केला पाहिजे.

अ थी नि अ न आ र मा र.—अथीनिअन आरमार चांगलें सुधारलेलें होतें. खाजगी लोकांकडून जहाजांचा भरपूर पुरवठा होत नसल्यामुळें अथीनिअन सरकारानें स्वतःचीं लढाऊ जहाजें ठेवण्यास सुरुवात केली. ख्रि. पू. ४८३ मध्यें पर्शियन लोकांच्या स्वारीचें संकट उद्भवतांच अथेन्सनें लांबट लढाऊ जहाजांची संख्या पंन्नासावरून शंभरावर नेली व त्यांचा खर्च मेरोनिया येथील खाणीच्या फायद्यांतून भागविला. पर्शियन स्वारीच्या भयामुळेंच सर्व ग्रीक संस्थानांनीं एक संघ बनवून आपलें एक संयुक्त आरमार तयार केलें. या संघाचें मुख्य ठिकाण डेलॉस येथें होतें. अथेन्सचें आरमार सर्वांहून अधिक चांगलें असल्यामुळें सदरहू संघांत वर्चस्व अथेन्सकडे होतें. या संयुक्त आरमाराच्या खर्चाकरितां प्रत्येक ग्रीक संस्थानां-कडून ठराविक रक्कम मिळत असे. पर्शियन युद्धाच्यावेळीं जहाजांची संख्या १०० होती ती ख्रि. पू. ५ व्या शतकाच्या अखेरीस ३०० पर्यंत वाढली, व पुढील काळांत ती ३६० झाली. प्राचीन काळांत कायमचा पगारी नोकर वर्ग रोमन साम्राज्याच्या वेळेपर्यंत अस्तित्वांत नव्हता. त्यामुळें अथेन्समध्यें ॲडमिरॅल्टी म्हणजे स्वतंत्र आरमार खातें नव्हतें. शांततेच्या काळांत हीं लढाऊ जहाजें निवाऱ्याच्या जागीं नीट ठेवीत असत. युद्धाच्यावेळीं स्ट्रॅटेगॉस नांवाचा अधिकारी आरमारावर मुख्य नेमीत असत, व त्यांच्यावर देखरेख करण्याकरितां सरकारी तपासनीस असत. वल्हीं दोरखंडें, खलाशांचा, पगार वगैरेचा खर्च सरकार करीत असे. शिवाय देशाभिमानी किंवा महत्त्वाकांक्षी श्रीमंत अथिनिअन इसम स्वतःच्या खर्चानें लढाऊ जहाजें तयार करून देत असत, परंतु अशा देणग्यांनीं पुरेसें मोठें आरमार तयार होणें शक्य नसल्यामुळें अथेन्सच्या सरकारला स्वतःचें आरमार ठेवणें भाग पडे. स्पेननें इंग्लंडवर पाठविलेल्या आरमेडाच्या वेळीं असाच अनुभव आल्यामुळें इंग्लंडनें स्वतंत्र सरकारी आरमार करण्याचें ठरविलें. सोळाव्या व सतराव्या शतकांत इंग्लिश आरमारामध्यें खलाशासंबंधींची जशी व्यवस्था होती तशीच बहुतेक अथेन्सच्या आरमारां-तहि होती. जहाजावर एक कप्तान, सुकाणूवाला, इतर दुय्यम अधिकारी, वल्हीं मारणारे खलाशी व लढणारे शिपाई अशीं माणसें असत. प्राचीन लढाऊ जहाज गॅलीच्या (वल्ह्यांच्या तीन तीन रांगा असलेलें जहाज) नमुन्याचें असल्यामुळें वल्हेवाल्यांची संख्या फार लागत असे. अशा शंभर जहाजांमध्यें एकंदर वीस हजार लोक असत. म्हणजे ही संख्या ट्राफल्गार येथें लढलेल्या ब्रिटिश आरमारावरील संख्येपेक्षां अधिक होती, तरीहि असलें ग्रीक आरमार मोठें म्हणून गणलें जात नसे, कारण रोमन व कार्थेजियन लोकांचीं आरमारें त्याहूनहि मोठीं म्हणजे शेंकडों जहाजें व १५०००० लोक इतक्या मिळून बनलेलीं असत.

सोळाव्या शतकाच्या शेवटीं जहाजाच्या रुंद बाजूवरून तोफा डागण्याची पद्धत आणि जहाजांनां शिडें लावण्याची पद्धत उपयोगांत येईपर्यंतच्या पूर्वींच्या काळांतील आरमारें अथीनिअन पद्धतीचींच असत. अलेक्झांडर नंतरच्या कार्थेज, रोम, बायझंटियम बादशाहा इटालीतील लोक-सत्ताक राज्य, अरब लोक आणि ॲरॅगॉनचें लढाऊ आरमार हीं गॅली जातींच्या जहाजांचींच असत. त्यामुळें त्यांतील व्यवस्था सर्वत्र सारखीच असे. तथापि रोमच्या आरमारासंबंधीं एक विशेष गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी होती ती ही कीं, प्रजेच्या निव्वळ संरक्षणासाठीं आरमाराचा उपयोग होत असे. ही विशेष गोष्ट प्राचीन रोमच्या आर-मारांतून कॉन्स्टंटिनोपल उर्फ बायझंटाइन आरमारांत व तेथून पुढें अर्वाचीन इटलीच्या आरमारांत परंपरेनें चालू राहिली होती.

रोम—प्राचीन रोमची व्यापारी शहर या नात्यानें चढा-ओढ इट्रुस्कन लोक, ग्रीक वसाहती, व कार्थेजिअन लोक यांच्याबरोबर चालू होती. रोम आपल्या आरमाराची काळजी किती घेत असे ही गोष्ट ख्रि. पू. ३११ मध्यें रोमनें आरमारी कामिशनर नेमले होते यावरून दिसते. पहिल्या प्यूनिक युद्धामध्यें रोमला मोठें आरमार तयार करावें लागलें. कार्थेजची सत्ता नष्ट झाल्यानंतर रोमला बलाढ्य प्रतिस्पर्धी कोणी उरला नव्हता, पण ख्रि. पू. पहिल्या शतकांत चांचे लोकांचा उपद्रव फार झाल्यामुळें रोमला पुन्हां आपल्या आरमाराकडे लक्ष द्यावें लागलें. रोमन साम्राज्यकाळीं समुद्रावर व जमिनीवर शांतता राखण्याकरितां बादशहांनां आरमार ठेवावें लागे. त्यावेळीं मुख्य दोन आरमारें असत. शिवाय ऱ्हाइन, डॅन्यूब व युफ्रेटीस या नद्यांमध्यें

रोमच्या लढाऊ जहाजांचे काफिले असत, व प्रत्येक ठिकाणीं लढण्याकरितां सैनिक ठेवलेले असत.

बा य झं टा इ न.—कॉन्स्टंटाइननें बायझंटिअमच्या जागीं नवें रोम शहर वसविलें तेव्हांपासून पूर्व साम्राज्याचें स्वतंत्र आरमार अस्तित्वांत आलें, त्याचा इतिहास फारसा उपलब्ध नाहीं. परंतु व्हँडॉल लोकांचें राज्य ( ४२८-५३४ ) होतें तोंपर्यंत पूर्वरोमन साम्राज्याच्या बादशहांनां आरमार ठेवणें भाग असे, पण त्यानंतर आरमाराकडे त्यांचें दुर्लक्ष झालें पण पुढें सातव्या शतकाच्या अखेरीस मुसुलमानी सत्ता उदयास आल्यानंतर स्वतःच्या किनाऱ्याचें रक्षण करण्याकरितां बादशहांनां आरमार ठेवावें लागलें. पूर्वेकडील खलिफांचे देश जिंकण्याकरितां आरमार ठेवलें होतें त्याचप्रमाणें कार्डोव्हाच्या अमीरांनीं व खलिफांनीं ठेवलें होतें. बायझंटाइन आरमार मॅसिडोनियन घराण्यांतील प्रबल राजांच्या वेळीं ( ८६७-१०५६ ) सर्वांत उत्तम स्थितींत होतें. या आरमाराचे बादशाही आरमार आणि प्रांतिक काफिले असे दोन भाग होते. या बायझंटाइन आरमाराची विशेष गोष्ट ही कीं, अलीकडल्या पद्धतीप्रमाणें त्यांत तोफा डागणारे खलाशी आणि तोफखान्यावरील स्वतंत्र अधिकारी असत. पुढें बाराव्या शतकांत जेव्हां तुर्कांच्या स्वाऱ्यामुळें पूर्व साम्राज्य मोडकळीस आलें त्यावेळीं बायझंटाइन आरमार कमकुवत झालें आणि बादशहांनां व्हिनिशियन लोकांच्या आरमारी मदतीवर अवलंबून रहावें लागलें.

म ध्य यु गां ती ल आ र मा रः—इटालींतील मध्ययुगीन लोकसत्ताक संस्थानें आणि भूमध्यसमुद्राच्या किनाऱ्यावरील राजसत्ताक संस्थानें यांचीं आरमारें अथेन्सच्या पद्धतीवरच असत. या आरमारांतील दर्यावर्दी लोक ( विशेषतः जिनोआ येथील दर्यावर्दी लोक ) पश्चिम यूरोपांतील राजांच्या नोकरींत राहत असत. गॅलीशियांतील कॅम्पिसॅगोचा पहिला आर्चबिशप डीगो गेल मिरेज यानें बाराव्या शतकांत व्हिगो येथें एक गोदी व जहाजांचा काफिला बांधण्याकरितां जिनोवी लोक कामावर ठेविले होते. इंग्लंडचा राजा तिसरा एडवर्ड यानेंहि जिनोवी लोकच ठेविले होते. आणि फ्रेंच राजांकरितां रुआं येथें गोदी बांधण्याच्या कामावर जिनोवी लोकच होते. या लोकांनीं भूमध्य समुद्राकडील आरमारी कलेच्या ज्ञानाचा आटलांटिक किनाऱ्यावरील राष्ट्रांत प्रसार केला. भूमध्यसमुद्रांतील आरमारांचा शेवटला मोठा प्रभाव इतिहासांतील लेपँटोच्या लढाईंत ( १५७१ ) दिसला. तेव्हांपासून आरमारांचें मुख्य कार्यक्षेत्र महासागर हें बनलें.

अर्वाचीन काळांतील मोठमोठ्या आरमारांची माहिती देशवार देणें अधिक सोईचें आहे.

ब्रि टि श आ र मा र.—अर्वाचीन जगांतील आरमारांत ग्रेटब्रिटनचें आरमार सर्वश्रेष्ठ आहे. कारण त्याचा इतिहास सर्वांत अधिक मोठ्या काळाचा व सतत सुधारणेचा आहे. नवव्या शतकांत नॉर्स लोकांनीं केलेल्या स्वाऱ्यांमुळें इंग्लिश लोकांचें स्वसंरक्षणार्थ आरमार तयार करण्याकडे प्रथम लक्ष गेलें. यावेळीं त्यांच्या प्रयत्नाला थोडेसेंच यश आलें आणि नॉर्स लोकांनीं इंग्लंडच्या पूर्व किनाऱ्यावर वसाहती केल्याच. तरीपण राष्ट्रीय आरमाराची व्यवस्था तेव्हांपासून अमलांत आली. प्रत्येक परगण्यानें आरमाराकरितां जहाजें पुरवावीं असें ठरलें. आलफ्रेड व तदुत्तर राजे यांचींहि स्वतःचीं लढाऊ जहाजें होतीं, व त्यांचा खर्च सरकारी खजिन्यांतून चालत असे. पुढें हीं निरनिराळ्या परगण्यांनीं जहाजें पुरविण्याची पद्धत नॉरमन लोकांच्या स्वारीपूर्वीच बहुतेक नष्ट झाली होती. पुढें ११ व्या शतकांत आरमार उभारण्याचा नवीनच मार्ग अस्तित्वांत आला. किनाऱ्यावरील शहरांनां दिलेल्या विशिष्ट सवलतींचा मोबदला म्हणून त्यांनीं आरमार उभारण्यास मदत करावी असें ठरलें. नॉर्मन लोकांनीं इंग्लंड जिंकल्यानंतर या पद्धतींत फारसा फरक झाला नाहीं. १२ व्या शतकांतील अँजेव्हिन घराण्यांतील राजांनीं आपलें लष्करी सामर्थ्य तीन साधनांनीं वाढविलें. एक सरंजामी आरमार, दुसरें राष्ट्रीय स्वयंसेवक आरमार, व तिसरें पगारी आरमार. सरंजामी आरमारांत डोव्हर, सँडविच, रॉमने, व किनाऱ्यावरील इतर शहरें यांनीं जमविलेल्या लढाऊ जहाजांचा अंतर्भाव होत असे. तिसऱ्या हेनरीच्या कारकीर्दींत (१२१६-१२७२)त्यांनीं ५७ जहाजें व ११९७ लोक दरसाल पंधरा दिवस लढाईच्या कामाकरितां द्यावे असें ठरलें होतें. या पंधरा दिवसांचा खर्च उपर्युक्त शहरांनां करावा लागे. त्याहून अधिक दिवसांचा खर्च राजाला सोसावा लागे. सदरहू सिंक्कपोर्टस स्क्वॉड्रन ( पांच बंदरांचा काफिला ) हाच पुढील रॉयल नेव्ही ( सरकारी आरमार ) चा पाया होय; परंतु हें सरंजामी पद्धतीचें आरमार पुढील राष्ट्रीय आरमाराहून निराळें असे. सदरहू बंदरी आरमार १३ व्या शतकांत बरीच प्रसिद्धी पावून पुढें लवकरच हतबल झालें. या आरमाराचा कल आपल्याच इतर इंग्लिश बंदरांत चांचेगिरी करण्याचा असे. त्यांनीं १२९७ मध्यें यार्मथ येथील वीस जहाजें पहिल्या एडवर्ड राजाच्या (१२७२-१३०७)डोळ्यादेखत जाळलीं होतीं. राष्ट्रीय स्वयंसेवक आरमार, वरील आरमारापेक्षां अधिक काळ टिकलें. किनाऱ्यावरील शहरें आणि परगणे यांच्यावरील राज्याच्या संरक्षणार्थ जहाजें व सैनिक पुरविण्याची जबाबदारी १७ व्या शतकापर्यंत अमलांत होती आणि अम्मलबजावणीची पद्धत बहुतेक सारखीच होती. जॉन राजाच्या कारकीर्दींत ( ११९९-१२१६ ) शेरीफच्या मार्फत प्रत्येक बंदरांतील जहाजांची संख्या, आकार व प्रकार या गोष्टींची नोंद करण्यांत येत असे. जेव्हां राजाला या जहाजांची जरूर लागे, तेव्हां त्यावर लढाऊ माणसें व सामुग्री भरण्यांत येत असे, आणि राजा हुकूम करील त्या ठिकाणीं एकत्र जमण्याची जबाबदारी त्यांजवर

असे; परंतु जहाजांची अशी जमवाजमव करण्यांत सरकारी नोकरांनां लांचलुचपत व जुलूम जबरदस्ती करण्यास फार वाव मिळत असल्यामुळें त्यासंबंधींच्या मोठाल्या तक्रारी तिसऱ्या एडवर्डच्या ( १३२७-१३७७ ) कारकीर्दीपासून पार्लमेंटपुढें येऊं लागल्या. अर्वाचीन काळांतील सरकारी आरमाराचें खरें मूळ मध्ययुगांतील राजांनीं ठेविलेल्या जहाजांत आणि पगारी खलाशांत आहे. जॉन राजाच्या कारकीर्दींतच सरकारी आरमाराची माहिती मिळते. १२०५ मध्यें त्या राजाजवळ ५० गॅली जहाजें निरनिराळ्या बंदरांत ठेविलेलीं होतीं. या जहाजावर खुद्द राजाची मालकी व हुकमत असल्यामुळें राजा तीं दुसऱ्यांनां भाड्यानें देत असे आणि पुढें पांचव्या हेनरीचीं (१४१३-२२) जहाजें राजाच्या कर्जफेडीकरितां विकण्यांत आलीं होतीं. या जहाजावर राजानें नेमलेले लोक अधिकारी असत. अशा रीतीनें अलीकडील सरकारी आरमाराचा मूळ उगम ह्याच आहे. कॅप्टन व ॲडमिरल हे आरमारावरील अधिकाऱ्यांचे वाचक शब्दहि तितकेच जुने आहेत. १३६० मध्यें नेमला गेलेला सर जॉन ब्यूचांप हा इंग्लंडचा १ ला ॲडमिरल होय. कायमचा लॉर्ड ॲडमिरल नेमण्याची पद्धत सन१४०६पासून सुरू झाली. मात्र गॅलीपद्धतीच्या जहाजांऐवजीं शिडांचीं जहाजें इंग्लिश लोक विशेषतः उपयोगांत आणूं लागले. दिव्यांच्या व निशाणांच्या साहाय्यानें संदेश पाठविण्या( सिग्नल देण्या)संबंधींचे नियमहि त्या वेळीं उपयोगांत होते. सरंजामी राष्ट्रीय आणि सरकारी जहाजें मिळून बनलेलें हें मध्ययुगांतील इंग्रजी आरमार शत्रूपासून इंग्लंडचें रक्षण करण्यास चांगलें समर्थ असे. १२१३ मध्यें इंग्लंडवर स्वारी करणाऱ्या फिलिफ ऑगस्टस या फ्रेंच राजाच्या आरमाराचा केलेला नाश, १२१७ मध्यें यूस्टेस्ट ड मंकचा केलेला पराभव, १३४० स्लुइश येथें फ्रेंच आरमारावर मिळविलेला जय आणि १३५० मध्यें विंचेल्सी नजीक स्पॅनियर्ड लोकांचा पराभव हे इंग्लंडचे त्या काळांतील मोठाले आरमारी विजय होत. जॉन राजाचें समुद्रावर वर्चस्व होतें, असें म्हणण्यास भरपूर पुरावा नाहीं; पण तिसऱ्या एडवर्ड राजाचें होतें यांत शंका नाहीं.

ट्यूडर घराण्यांतील राजांच्या कारकीर्दींत(१४८५-१६०३) इंग्रजी आरमाराची वाढ सतत चालू होती. सातव्या हेनरीला आरमारी युद्धाचा प्रसंग आला नाहीं, तरी त्यानें कांहीं लढाऊ जहाजें बांधलीं. आठव्या हेनरीनें ( १५०९-१५४७ ) आरमाराकडे पुष्कळ लक्ष पुरविलें. इटालियन कारागिरांच्या मदतीनें जहाजें बांधण्याच्या पद्धतींत सुधारणा करून चर्चला लुबाडून मिळविलेला बराचसा पैसा या कामीं खर्च केला. १५१६ च्या सुमारास त्यानें स्वतंत्र आरमारी ऑफिस स्थापन केलें. त्यानें अस्तित्वांत आणलेलें नेव्ही बोर्ड १८३२ पर्यंत आरमाराची मुख्य व्यवस्था पहात असे. या १६ व्या शतकांत इतर देशांतल्याप्रमाणें नौकानयनाच्या व नौकाबंधनाच्या बाबतींत पुष्कळ सुधारणा झाल्या. एलिझाबेथच्या कारकीर्दींत ( १५५८-१६०३ ) इंग्लंडच्या आरमारांत ५५३४ खलाशी, ८०४ गोलंदाज आणि २००८ लढाऊ शिपाई होते. ८ व्या हेनरीच्या वेळीं ५३ जहाजें असून त्यांचें वजन ११,२६८ टन होतें व त्यावर २३७ पितळी तोफा आणि १८४८ लोखंडी तोफा होत्या. एलिझाबेथच्या आरमारांत ४२ जहाजेंच होतीं; पण त्यांची भारवहनशक्ति १७०५५ टन होती म्हणजे जहाजें बरींच मोठीं होतीं. याच कारकीर्दींत १५८२ मध्यें अधिकाऱ्यांचे पगार दर्जानुरूप चढत्या प्रमाणांत ठरविण्यांत आले आणि आजारी व जखमी झालेल्या खलाशांच्या मदतीकरितां फंड जुळविण्यांत आला.

स्टयूअर्ड घराण्याच्या वेळीं ( १६०३-१६८८ ) इंग्लंडच्या आरमाराला खरें राष्ट्रीय स्वरूप आलें व त्याचा खर्च पार्लमेंटनें मंजूर केलेल्या पैशांतून होऊं लागला. पहिल्या जेम्स राजानें ( १६०३-१६२५ ) जहाजें बांधण्यामध्यें पुष्कळ लक्ष घातलें; पण बकिंगहॅमची लॉर्ड ॲडमिरलच्या जागीं नेमणूक झाल्यापासून आरमारी व्यवस्थेंत पैशाची अफरातफर सुरू होऊन आरमारी व्यवस्थेंत फार गोंधळ माजला. त्याबद्दल ओरड झाल्यावर आरमाराचा कारभार कांहीं कमिशनरांच्या हातीं देण्यांत आला व त्यांनीं १६२४ पर्यंत त्यांत बरीच सुधारणा केली. त्या वेळीं फक्त ३० जहाजेंच होतीं. पुढें १ ल्या चार्लसच्या कारकीर्दींत ( १६२५-१६४९ ) खलाशाला पगार १५ शिलिंग, कॅप्टनला पगार जहाजाच्या आकाराच्या मानानें ४ पौं. ६ शि. ८ पेन्स ते १४ पौंड., लेफ्टनंटला पगार २ पौंड १६ शिलिंग ते ३ पौंड १० शिलिंग; सुकाणू मास्तरला पगार २ पौंड ६ शिलिंग ८ पेन्स ते ४ पौंड १३ शिलिंग ९ पेन्स. याप्रमाणें दरमहा मिळत असे. १७ व्या शतकाच्या मध्याच्या सुमारास जहाजांचा आकार आणि मजबूत बांधणी या बाबतींत सुधारणा होऊन खर्च बराच वाढला आणि ब्रिटिश व्यापार वाढल्यामुळें त्याच्या संरक्षणार्थ ४०-५० लढाऊ जहाजें अपुरीं पडूं लागलीं. १६४१ मध्यें २२४११ टन वहनशक्तीनीं ४२ जहाजेंच होतीं. तीं संख्या सन १६६० मध्यें ५७४६३ वहनशक्तीचीं १५४ जहाजें इतकी वाढली आणि एवढ्या मोठ्या आरमाराचा खर्च राजाच्या केवळ खाजगी उत्पन्नांतून चालणें शक्य नसल्यामुळें आरमारावरील सर्व सत्ता पार्लमेंटच्या हातीं गेली. कारण पार्लमेंटनें मंजूर केलेल्या रकमेंतून सर्व खर्च होऊं लागला. १६५२-५३ मधील डचयुद्ध हें स्वयंसेवक आरमारानें केलेलें शेवटलें युद्ध होय. त्यानंतर लवकरच आरमारी व्यवस्थेच्या नियमांचा स्वतंत्र संग्रहित कायदा ( कोड ) करण्यांत आला. दुसरा चार्लस ( १६६०-१६८५ ) गादीवर आला, तेव्हांपासून ब्रिटिश आरमाराच्या इतिहासांतील आधुनिक काळाला सुरवात होते.

चांगले अधिकारी तयार करण्याच्या उद्देशानें चांगल्या घराण्यांतील मुलांनां प्रत्यक्ष जहाजावर ठेवून आरमारी शिक्षण देण्याचा उपक्रम करण्यांत आला. तेव्हांपासून कप्तान व लेफ्टनंट या जागांवर निवडक लोक नेमण्यांत येऊं लागले. ॲन राणीच्या कारकीर्दींत ( ७०२–७१४ ) आरमारी तज्ज्ञ होण्याचें शिक्षण आणि कायमची पगारी नोकरी या दोन्ही महत्त्वाच्या गोष्टी सुरळीत सुरू झाल्या. पण त्या पूर्वीच व्यापारी जहाजांच्या संरक्षणाकरितां ब्रिटिश लढाऊ जहाजें दूरदूरच्या ठिकाणीं पाठवण्यांत येऊं लागलीं होतीं. लढाऊ जहाजांचा असा एक ताफा मुंबईकडे, एक टँजियरकडे, व एक वेस्ट इंडीजमध्यें पाठविण्यांत आला. १६७३ पर्यंत जेम्स ड्यूक ऑफ यार्क, (भावी दुसरा जेम्स) हा लॉर्ड हाय ॲडमिरलच्या जागीं होता, व त्यानें चांगलें काम केलें. पुढें तो स्वतः राजा झाल्यावर ( १६८५–८८ ) त्यानें आरमाराची व्यवस्था चांगली ठेविली. त्यावेळीं ब्रिटिश आरमारांत एकंदर १०१८९२ टन वहन शक्तीचीं १७३ जहाजें, ४२००३ जहाजावरील नोकर, आणि ६९३० तोफा होत्या. १६८८ च्या राज्यक्रांतीनें आरमारच्या विकासास पूर्ण वाव दिला. तेव्हांपासून सर्व सत्ता पार्लमेंटच्या हातीं आली. लॉर्ड हाय ॲडमिरलच्या ऐवजीं पार्लमेंटची कमेटी आरमाराची सर्व व्यवस्था पाहूं लागली. या वेळीं सुरू झालेली व्यवस्था १८३२ पर्यंत बहुतेक जशीच्या तशीच कायम होती. तिचें थोडक्यांत स्वरूप पुढील प्रमाणें होतें.

आरमारांतील शिस्तसंबंधानें १६६० चा आरमारी शिस्तीचा कायदा (नेव्ही डिसिप्लिन ॲक्ट - २ र्‍या चार्लसचा १३ वा कायदा ) झालेला होता. त्यानंतर कांही दुरुस्ती करणारे कायदे झाले व अखेर सर्वांचें एकीकरण करून १७४९ मध्यें २ र्‍या जॉर्जचा २२ वा कायदा करण्यांत आला. या कायद्यान्वयें, शत्रू समोर असतां जो योग्य प्रकारें लढाई देणार नाहीं त्याला मृत्यूची शिक्षा ही एकच शिक्षा ठेवण्यांत आली. याच कडक कायद्यान्वयें ॲडमिरल बिंगला फांशी देण्यांत आलें. पुढें १७८० मध्यें या नियमांत दुरुस्ती होऊन सदर्हू गुन्ह्याबद्दल हलकी शिक्षा देण्याचाहि लष्करी कोर्टाला आधिकार देण्यांत आला.

आरमारासंबंधीं सर्व व्यवस्था आरमार खात्याच्या हातांत देण्यांत आली. त्याकरितां नेव्ही बोर्ड ( आरमार मंडळ) व्हायटलिंग बोर्ड ( अन्न पुरविणारें ), बोर्ड ऑफ ट्रॅन्स्पोर्ट, (वाहतुक मंडळ), पेऑफीस ( पगार मंडळ ) सीक अँड हर्ट ऑफीस( आजारी व जखम्यांची व्यवस्था पाहणारें) व इतर कित्येक ऑफीसें असत. या सर्वांच्या वर निशाणदार ( फ्लॅग ऑफीसर ) असत, त्यांचे वर्ग येणेंप्रमाणेः—मुख्य नाविक दळाचा दर्याधिकारी(ॲडमिरल), दुय्यम व पिछाडीचा असे तीन वर्ग असून त्यांचे पुन्हा तांबड्या निशाणाचे, पांढर्‍या निशाणाचे व निळ्या निशाणाचे असे एकाखालीं एक हुद्दे होते.

व्हाइट, रेड आणि व्ल्यू स्क्वॉड्रन असे १७ व्या शतकांतल्या आरमाराचे तीन भाग होते. पण वर सांगितलेले नऊ निशाणदार ( फ्लॅग ऑफिसर ) पुढें आरमार वाढल्यावर पुरेसे होईनात. कॅप्टन, कमांडर व लेफ्टनंट या ऑफिसरांतून कालाधिक्यानुसार ( सिनियॉरिटी ) निशाणदार नेमण्यांत येत असत. ऑस्ट्रियन वारसा युद्धाच्या वेळीं १७४७ पासून या नोकरी संबंधाची बढती ठराविक व्यवस्थेप्रमाणें होऊं लागली. ५ वर्षें समुद्रावर नोकरी केली आहे अशा कोणाहि माणसास लेफ्टनंटची जागा मिळूं लागली. कॅप्टनाना आपल्या हाताखालीं नोकर ठेवण्याचा अधिकार असल्यामुळें खोटाच मस्टर ( हजिरी बुक ) ठेवून पैसे खाण्याचे कित्येक गुन्हे होऊं लागले. अशा गुन्ह्याला बडतर्फीची शिक्षा होती, पण त्याचा अंमल नीटसा होत नसे. बरोबर बायका नेण्याची मनाई असे पण त्याचाहि अंमल नीट होत नसे. युद्ध बंद होताच आरमार कमी करण्याचा क्रम त्यावेळीं असल्यामुळें युद्धाच्या सुरवातीस पुरेसे ऑफिसर नसत. त्यामुळें आयत्यावेळीं प्रत्यक्ष माहिती असलेल्या पण आशिक्षित अशा लोकास अधिकाराच्या जागीं नेमणें भाग पडत असे. १८ व्या शतकात आरमारामध्यें औषधपाणी देण्याची सोयहि चांगली नसे. खलाशामध्यें भरती कांहीं खुषीनें व कांहीं मनें वगैरे वळवून होत असे. पण एवढ्यानें पुरेशी भरती न झाल्यास राजकीय व इतर गुन्हेगार कैद्यातून भरती करण्यात येत असे. सप्तवार्षिक युद्धाच्या आरंभीं अस्तित्वांत आलेली 'पेट्रिऑटिक सोसायटी' आरमारी नोकरीकरितां मुलांना शिक्षण देण्याचें काम करीत असे. फ्रेंच राज्यक्रांतीच्या वेळच्या आणि नेपोलियन बरोबरच्या युद्धात परतण्यास खलाशांची भरती करण्याबद्दल सांगण्यात आलें, त्यावेळीं तुरुंगांतील रिकामेमधून किंवा वर्क हाऊसमधील लोकांतून माणसें नोकरींत दाखल करण्यांत आलीं. आरमारी नोकरींतील शिस्त कडक असल्यामुळें आणि पगार अपुरा असल्यामुळें आपखुषीनें लोक आरमारी नोकरींत शिरत नसत. आणि प्रत्यक्ष शिरलेले पुष्कळसे लोक नोकरी सोडून जात असत. जहाजावर शिस्त राखण्याकरितां फटक्यांची शिक्षा देण्यांत येत असे. आणि या बाबतींत कॅप्टनकडून पुष्कळ वेळा जुलमी वर्तन होत असे, यामुळें जहाजांवर वरचेवर बंड होत असत. अशा प्रकारचें मोठें बंड १७९७ मध्यें झालें. स्पिथेड, दी नोर, प्लीमथ, आयर्लंडचा दक्षिणभाग व केप ऑफ गुडहोप इतक्या ठिकाणच्या आरमारांतील लोकांनीं एकापाठोपाठ बंड केलें. तें मोडण्याकरितां लोकांच्या योग्य मागण्या कबूल करण्यांत आल्या व तेव्हांपासून आरमारांतील सुधारणांचा जो उपक्रम झाला त्यायोगानें एकेकाळीं अगदीं अप्रिय

वाटत असलेली आरमारी नोकरी चांगली लोकप्रिय झाली. १८०२ सालीं एक आणि १८०६ सालीं दुसरें कमिशन पार्लमेंटनें नेमलें व त्यांच्या सूचनानुसार बऱ्याच सुधारणा करण्यांत आल्या. १८३२ मध्यें अर्ल ग्रेच्या प्रधानकीच्या काळांत सर जेम्स ग्रॅहॅम यानें आरमारी व्यवस्थेंत मोठी सुधारणा घडवून आणली. ती ही कीं, आडमिरल्टी आणि नेव्ही ऑफिस हीं दोन्हीं एकत्र करून त्यांचीं पांच वेगवेगळीं खातीं करून सर्व एकसूत्रीं कारभार बनविण्यांत आला. या महत्त्वाच्या सुधारणेपासून ब्रिटिश आरमाराच्या इतिहासांतील आधुनिक काळास सुरुवात होते. ॲन राणीच्या वेळेपासून नेपोलियनच्या पाडावापर्यंतच्या काळांत म्हणजे सन १७१४ पासून सन १८१६ पर्यंत शंभर वर्षांत जहाजांची संख्या २४७ वरून ७७६ वर गेली व वहनशक्तीची वाढ एक लक्ष सदुसष्ट हजारांपासून सात लक्ष चोवीस हजारांपर्यंत झाली. आरमार खात्यांतील नोकरांची संख्या लढाई चालू नसतांना बारापासून आठरा हजारांपर्यंत असे व लढाईच्या सालांत पाऊण लाखापासून लाखावर जात असे. ती १८१२ सालीं एक लक्ष चवेचाळीस हजार होती.

**फ्रेंच आरमार.**—फ्रेंच राजांनें स्वतःचें आरमार तयार होण्यापूर्वी त्यानां मोठमोठ्या मांडलिकांच्या ताब्यांत असलेला समुद्रकिनारा स्वतःच्या ताब्यात घेण्याकरितां लढाया कराव्या लागल्या. फिलीप ऑगस्टस ( ११८०–१२२३ ) नें इंग्लंडचा राजा किंग जॉन याची नॉरमंडी आणि पॉयटू या प्रांतांतील सत्ता नष्ट करून तो प्रांत आपल्या ताब्यांत घेतला. समुद्रकिनारा ताब्यांत घेण्याचें हें कार्य १२ व्या लुईच्या कारकीर्दीपर्यंत ( १४९८–१५१५ ) पुरें झालें नव्हतें. पण त्यापूर्वीच फ्रेंच राजानीं स्वतःचें आरमार तयार केलें होतें. फ्रान्सच्या विशिष्ट भौगोलिक रचनेमुळें फ्रेंच राजांनां एक इंग्लिश खाडीमध्यें आणि दुसरें दक्षिणेस भूमध्यसमुद्रामध्यें अशीं दोन आरमारें नेहमीं ठेवावीं लागत असत. जरूरीप्रमाणें दोन्हीं आरमारें एकत्र करावीं लागत पण तसें करणें त्रासाचें व धोक्याचें असे. इंग्लिश राजाप्रमाणें मध्ययुगीन फ्रेंच राजांचें आरमारहि जमीनदारांचीं जहाजें, राष्ट्रीय—म्हणजे सामान्य—लोकांचीं जहाजें आणि खुद्द राजांचीं जहाजें मिळून बनलेलें असे. पण फ्रेंच राजांनां जमीनदारांकडून व व्यापाऱ्यांकडून जहाजांची मदत नीटशी होत नसे, त्यामुळें फ्रेंच राजांनां स्वतःच्या जहाजावरच मुख्यतः भिस्त ठेवावी लागत असे. व आरमारी नोकरहि स्वराज्यांत भरपूर न मिळाल्यामुळें जिनोआ व ॲरॅगॉन येथून लोक आणावे लागत. १२४९ मध्यें म्हणजे पहिल्या क्रूसेडच्यावेळीं प्रथम फ्रेंच सरकारी आरमार तयार करण्यांत आलें. त्यावेळचे ॲडमिरल व जहाजें बांधणारे लोक जिनोई होते. हें आरमार गॅली जातींच्या जहाजांचें होतें, मात्र त्यांत वल्ह्यांच्या मदतीला शिडेंहि असत. ४ था फिलिफ ( १२८५–१३१४ ) यानें इंग्लिश खाडीमध्यें आरमार ठेविलें. परंतु फ्रेंच राजांचें आपल्या आरमाराकडे सतत लक्ष नसे. जमिनीवर मोठाली युद्धें चालू असत, त्यावेळीं आरमाराची अव्यवस्था होत असे. १ ला फ्रान्सिस ( १५१५–१५४७ ) यानें आरमार चांगल्या स्थितींत ठेविलें होतें पण तेव्हांपासून १७ व्या शतकापर्यंत फ्रेंच आरमार बहुतेक खालावलें होतें.

१३ व्या लुईचा सुप्रसिद्ध प्रधान रिचेल्यू यानें पुन्हां फ्रेंच आरमार तयार केलें. पण त्याच्या मरणानंतर तेंहि मृतावस्थेंत गेलें. पुढें १४ व्या लुईनें ( १६४३–१७७५ ) पुन्हां चांगलें व मोठें आरमार तयार केलें. कोल्बर्ट व लिओम यांनीं लायक अधिकाऱ्यांच्या सल्ल्यानें आरमारी कायदेसंग्रह तयार केला. त्यांतील कायदे मध्यंतरीं झालेल्या दुरुस्त्यासह १६८९ पासून फ्रेंच राज्यक्रांतीच्या काळापर्यंत अमलांत होते. या कोडाअन्वयें किनाऱ्यावरील आणि नदीकांठच्या रहिवाशांनां आरमारी नोकरींत सक्तीनें घेण्यांत येत असे. आरमारी खात्यांतील अधिकाऱ्यांचे मुलकी आणि लष्करी असे दोन वर्ग केले होते. लष्करी अधिकाऱ्यांत दर्याधिकारी ( ॲडमिरल ) हा मुख्य असे परंतु या जाग्यावर बहुधां राजपुत्राची नेमणूक होत असे आणि ते नुसता पगार घेत, पण समुद्रावर नोकरीला कधींच जात नसत. त्यांच्या हाताखालीं दुय्यम ( व्हाइस ) ॲडमिरल, पिच्छाडी ( रीयर ) चा ॲडमिरल, पोस्ट, कॅप्टन, कमांडर, व मेजर असे एकाखालोखाल अधिकारी असत.

फ्रेंच आमाराची कागदोपत्रीं व्यवस्था नीट होती, पण वास्तविक स्थिति वाईट होती. सक्तीच्या नोकरीसंबंधाचा नियम लोकांनां अगदीं नापसंत होता. शिवाय खलाशांनां पगार व खाणेंपिणें नीट मिळत नसे व नियमाप्रमाणें पेनशनहि मिळत नसे. यामुळें पुष्कळ लोक नोकरींतून पळून जात. शिवाय मुलकी आणि लष्करी अधिकाऱ्यांत वैमनस्य असे. १५ वा लुई ( १७१५–१७७४ ) व १६ वा लुई ( १७७४–१७९२ ) यांच्या कारकीर्दींत वरील स्थितीच चालू होती. पण फ्रेंच राज्यक्रांतीच्या वेळीं पूर्वीची सर्व व्यवस्था बदलून नवीन व्यवस्था करण्यांत आली. परंतु इंग्लंडच्या बलाढ्य आरमारामुळें फ्रेंच आरमार बलिष्ठ बनविण्याचे प्रयत्न व्यर्थ गेले. फ्रेंच आरमारांतील जहाजांची संख्या १४ व्या लुईच्या कारकीर्दींत सवाशें होती ती सप्तवार्षिक युद्धांत पन्नासावर आली व फ्रेंच राज्यक्रांतीच्या वेळीं म्हणजे १७९३ मध्यें अडीचशें होती.

**स्पॅनिश आरमार**—स्पॅनिश आरमाराचा सुसंगत इतिहास उपलब्ध नाहीं. सामान्यतः असें म्हणतां येईल कीं, स्पेनचें सरकारी आरमार असें नव्हतेंच. तें प्रथम बोर्बोन घराण्यांतील राजांनीं १७०० नंतर फ्रेंच नमुन्यावर तयार केलें. तथापि त्यापूर्वीहि स्पॅनिश द्वीपकल्पाचे राजे इतर मध्ययुगीन राष्ट्रांप्रमाणें कांहीं खाजगी,व कांहीं सरकारी जहाजें जमा करून जरूर पडेल तेव्हां आरमार उभारीत

असत. स्पॅनिश आरमार गॅली जातीच्या जहाजाचें असे. १४ व्या व १५ व्या शतकांतील इंग्लंड व फ्रान्स यांमधील झालेल्या युद्धांत फ्रान्सच्या बाजूनें स्पॅनिश आरमार लढत असे. अमेरिकेचा शोध लागल्यानंतर स्पेनच्या राजांनीं आपलें आरमार बलाढ्य करण्याकडे चांगलें लक्ष पुरवलें तथापि त्यावेळची स्पॅनिश जहाजें लढाईपेक्षां व्यापाराच्या दृष्टीनेंच तयार केलेलीं असत. स्पॅनिश राजे स्वतःच्या खर्चानें जहाजें बांधवीत नसत, तर इतरांचीं जहाजें करारानें आपल्या नोकरींत घेत असत व त्यांचा उपयोग प्रत्यक्ष लढाई करण्याकरितां नसून वाहतुकीपुरता करीत असत. जहाजावर जहाज चालवणारा एक कॅप्टन आणि शिपायावरील एक कॅप्टन असे दोन अधिकारी असत. शिपाई बंदुका झाडण्याचें किंवा शत्रूच्या जहाजावर चढून भाले, तरवारींनीं लढाईचें काम करीत. जहाज चालवण्यास किंवा तोफा डागण्यास ते मदत करीत नसत. या दुहेरी पद्धतीमुळें स्पॅनिश आरमारांत सुव्यवस्था व सामर्थ्य फारसें नसे. इंग्लंडनें स्पॅनिश आरमेडाचा पराभव केल्यावर सुधारणा करण्याचे कांहीं प्रयत्न करण्यांत आले. पण त्याचा फारसा उपयोग न होतां १७ व्या शतकांत स्पॅनिश आरमार बहुतेक नामशेष झालें. १७००मध्यें बोर्बोन घराण्याची कारकीर्द सुरू झाल्यानंतर स्पॅनिश आरमार फ्रेंच नमुन्यावर पुनः तयार करण्यांत आलें. १७१७ मध्यें डॉन जोस पेटिनो यानें आरमारी कायदेसंग्रह ( कोड ) फ्रेंच कोडाच्या नमुन्यावर तयार केला. त्याच्याच आधारावर पुढें १७४८ मध्यें सुधारून मोठें कोड तयार करण्यांत आलें. ही नवी व्यवस्था झाल्यावर कांहीं स्पॅनिश अधिकाऱ्यांनीं आरमारी लढायांत जय मिळवून चांगली कीर्ति संपादन केली. पण पुढें पैशाच्या तुटवड्यामुळें आणि स्पॅनिश राजांनीं आरमाराकडे दुर्लक्ष केल्यामुळें स्पॅनिश आरमार बलाढ्य बनलें नाहीं. इतकेंच नव्हे तर पेनिनशुलर युद्धाच्या वेळीं ( १८०८–१८१३ ) तें आरमारहि नष्ट झालें. व नंतर पैशाच्या अडचणीमुळें स्पेनला आपलें मोठें आरमार बनवितां आलें नाहीं. स्पॅनिश आरमारांतील जहाजांची संख्या १७३७ सालीं लहानमोठीं मिळून ५६ होती ती १७७८ सालीं केवळ मोठ्या जहाजांची संख्या ६२ आढळते.

ड च आ र मा र.—डच आरमाराचा उदय १६ व्या शतकांत स्पेनबरोबर झालेल्या मोठ्या सामन्याच्या वेळीं झाला. नेदर्लंडमधील लोक प्राचीन काळापासून दर्यावर्दीपणांत तरबेज असत. मध्ययुगीन राजांनां समुद्रावरील लढायांत या लोकांनीं चांगली मदत केली होती. १३९७ मध्यें ॲडमिरल्टी ऑफीस स्थापन झालें. स्पेनबरोबर झालेल्या युद्धांत खाजगी लोकांनींच समुद्रावरील लढायांत भाग घेतला. १५९७ मध्यें नेदर्लंडमधील राजांचा संघ ( कॉन्फीडरेशन ) बनल्यानंतर संयुक्त सरकारचें आरमार असण्याची गरज भासूं लागली, तेव्हां स्टेट्स जनरल नांवाच्या मुख्य सभेनें रिपब्लिकच्या आरमाराच्या व्यवस्थेकरितां नियम तयार केले. ते इसवी सन १७९५ पर्यंत अमलांत होते, त्याप्रमाणें पांच ॲडमिरॅल्टी बोर्डें स्थापन करण्यांत आलीं. तीं बंदरांत करवसुली करून आपापल्या काफिल्याचा खर्च चालवीत. युद्धाच्या वेळचा जादा खर्च प्रत्येक बोर्ड आपल्या प्रांताकडून घेत असे. डच आरमारांत खलाशांच्या खाण्यापिण्याची व्यवस्था अतिशय उत्तम असे. अन्न पुरविण्याचें काम कंत्राटानें देत असत व त्यावर कप्तानांची चांगली देखरेख असे; त्यामुळें डच खलाशी संतुष्ट व निरोगी असत. तसेंच जहाजावरील ॲडमिरल हे अधिकारी आपल्या कामांत चांगले हुषार असत त्यामुळें डच आरमार नेहमीं मोठें बलाढ्य असे. वर सांगितलेली व्यवस्था १७९५ पर्यंत चालू होती, पण फ्रेंच राज्यक्रांतिकारकांच्या सैन्याला विजय मिळून बटेव्हियाचें लोकसत्ताक राज्य ( रिपब्लिक ) स्थापन झालें व त्यानंतर लवकरच तो सर्व देश नेपोलियनच्या ताब्यांत गेला आणि डच आरमार फ्रेंच आरमारांत सामील करण्यांत आलें. नेपोलियनच्या पराभवानंतर पुनः स्वतंत्र डच आरमार तयार करण्यांत आलें.

यु ना य टे ड स्टे ट्स चें आ र मा र.—अमेरिकेनें स्वातंत्र्य जाहीर केल्यानंतर लवकरच अमेरिकेचें आरमार अस्तित्वांत आलें. १७७५ च्या आक्टोबरमध्यें कॉंग्रेसनें दोन राष्ट्रीय चिलखती जहाजें ( क्रुझरें ) बांधण्याचें ठरविलें आणि आरमाराच्या व्यवस्थेकरितां एक मरीन कमिटी नेमिली. प्रथम कॉंग्रेसनें आयतींच जहाजें विकत घेतलीं व जें आरमार बनवले त्यांत २४ तोफा असणारीं दोन जहाजें; १०–१२ तोफा असणारीं जहाजें ६; ८ तोफा असणारीं २,दहा तोफा असणारी तीन,आणि ४ तोफांचें एक इतकी संख्या होती. सन १७७६ पासून ॲडमिरल, व्हाइस-ॲडमिरल, रीयर ॲडमिरल व कोमोडोर असे चार अधिकारी नेमण्यांत आले. स्वातंत्र्ययुद्धाचे वेळीं या आरमारानें कांहीं चांगल्या लढाया केल्या व शत्रुपक्षाकडील लहानमोठीं ८०० जहाजें कैद केलीं. पुढें १७९४ मध्यें ६ फ्रीग्रेट जहाजें बांधविलीं. १७९८ मध्यें स्वतंत्र आरमार खातें स्थापण्यांत आलें. १८४५ मध्यें ॲनापोलीस येथें एक उत्तम नेव्हलॲकेडमी ( आरमारी शिक्षण संस्था ) स्थापण्यांत आली आणि १८८४ पासून कोस्टर्स हार्बर येथें आरमारी अधिकाऱ्यांच्या शिक्षणाकरितां वॉर कॉलेज चालू करण्यांत आलें आहे.

इ ति हा सां ती ल आ र मा रां चा स म तो ल प णा.—वर सांगितलेल्या पांच देशांच्या आरमाराकडे विशेष लक्ष देण्याचें कारण असें कीं, ब्रिटिश, डच व फ्रेंच हीं आरमारें प्रमुख असून इतरांनां नमुना म्हणून उपयोगीं पडलीं आहेत;स्पॅनिश आरमाराचा वरील तीन आरमाराशीं निकट संबंध आलेला आहे आणि अमेरिकन आरमार हें यूरोपबाह्य जगांतील पहिलेंच आरमार होय. वरील पांच

देशाच्या आरमाराखेरीज इतर देशांचीं आरमारें आहेत त्यांनीं पूर्वी महत्त्वाची कामगिरी केली आहे, व हल्लीं करीत आहेत. फार काय पण ज्या ज्या देशाला समुद्र किनारा आहे त्या प्रत्येक देशाचें स्वतःचें आरमार असावें अशी इच्छा आहे. पोपसारख्या धार्मिक सत्ताधिशानें सुद्धां स्वतःचीं लढाऊ जहाजें ठेविलीं होतीं व तीं कित्येक शतकें भूमध्यसमुद्रांतील आरमारी उलाढालींत भाग घेत असत. तुर्कस्तानच्या सुलतानांनीं आपलें आरमार ठेविलें होतें व त्याचा दक्षिण यूरोपला एकेकाळीं धाक वाटत असे. उलटपक्षीं स्कँडिनेव्हियाच्या आरमाराप्रमाणें कांहीं देशांचीं आरमारें स्वदेशाच्या किनाऱ्याच्या बाहेर कधींच पराक्रम करूं शकलीं नाहींत. टस्कनीच्या व नेपल्सच्या राजाचेंहि लहानसें आरमार असल्याचीं उदाहरणें आहेत.

र शि याः—रशियाचें आरमार बरेंच मोठें व महत्त्वाचें आहे. पीटर दीग्रेट ( १६८९–१७२५ )यानें हें आरमार प्रथम तयार केलें पण त्याची व्यवस्था बहुधा परकी तज्ज्ञांच्या हातांत असे. दुसऱ्या कॅथराईनच्या कारकीर्दीत (१७६२–१७९६)सन १७७० मध्यें रशियाच्या आरमारावर मुख्य अधिकारी ऑलार्फ हा केवळ नांवाला होता. पण खरी सत्ता परके जॉन एलफिन्स्टन व सॅम्युअल ग्रेग यांच्या हातीं होती व त्यांनीं तुर्कीविरुद्ध जय मिळविले पण पुढें बलिष्ठ शत्रूशीं गांठ पडली त्यावेळीं म्हणजे उदाहणार्थ क्रिमियन युद्धाच्या वेळीं हें आरमार स्वतःच्या बंदरांतच राहिलें किंवा पुढें जपानाबरोबरच्या युद्धांत ( १९०५ ) त्याच्या मोठेपणाच्या मानानें त्यांत खरें सामर्थ्य नाहीं असें सिद्ध झालें.

दक्षिण अमेरिकेंतील रिपब्लिक राज्यांचीं अनेक लहान लहान आरमारें आहेत.

इ ट ली, ज र्म नी, ज पा न व आ स्ट्रि याः—१९ व्या शतकांत इटली, जर्मनी व जपान यांचीं तीन नवीं आरमारें उदयास आलीं. पण तीं ब्रिटिश व फ्रेंच यांच्याच नमुन्याप्रमाणें आहेत. आस्ट्रियानेंहि आपलें आरमार तयार केलें तें चांगलें पण फारच लहान होतें.

आ र मा री सा म र्थ्या चें म ह त्त्वः—अर्वाचीन जगांतील आरमारांच्या परस्परांशीं असलेल्या संबंधाकडे पाहिलें तर असें दिसून येतें कीं, १५ व्या शतकांतील भौगोलिक शोधामुळें आरमारी सामर्थ्य दाखविण्याचें ठिकाण महासागर हें बनलें. वास्को–द–गामा व कोलंबस यांनीं महासागरावर सफरी करण्याचा मार्ग यूरोपीय धाडशांनां मोकळा करून दिल्यावर अशा सफरी करणारांनां पुष्कळ खलाशांनां मोठ्या सफरीला पुरेल इतका अन्नपाण्याचा भरपूर सांठा करतां येईल अशीं जहाजें वापरणें भाग पडलें. भूमध्यसमुद्रांत सफरी करणाऱ्या लोकांची तशी तयारी नव्हती. अटलांटिक महासागराच्या किनारावर असलेल्या देशांनां या बाबतींत अधिक सोय होती. त्यामुळें दूरदूरच्या सफरी करण्यांत पोर्तुगाल व स्पेन हे देश प्रमुख बनले. नौकानयनविद्या व भांडवल इटालीपासून मिळवून त्याचा फायदा मात्र या दोन देशांतील लोकांनीं घेतला. पण या दोन्ही देशांनां विशिष्ट राजकीय परिस्थितीमुळें पुढारीपणा स्वतःकडे कायम राखतां आला नाहीं. इंग्लंड, फ्रान्स व हॉलंड हीं राष्ट्रें स्पेन व पोर्तुगालला मागें टाकून पुढें सरसावलीं. १७ व्या शतकांत फ्रेंच राजाच्या हल्ल्यामुळें कमकुवत बनलेल्या हॉलंड देशाच्या आरमारावर इंग्लंडनें सरशी केली, त्यामुळें अखेर १८ व्या शतकांत ग्रेटब्रिटन व फ्रान्स या दोन देशांमध्येंच समुद्रावरील वर्चस्वाबद्दल मोठा सामना होऊन १८१५ मध्यें नेपोलियनच्या पराभवाबरोबर इंग्लंडचें वर्चस्व समुद्रावर स्थापन झालें. या चुरशीच्या काळांत ग्रेटब्रिटनला महत्त्वाचा फायदा असा झाला कीं, इंग्लंडचा प्रमुख शत्रु जो फ्रान्स त्याचें लष्करी सामर्थ्य यूरोपखंडांतील देशावर वर्चस्व स्थापन करण्यांत गुंतलें होतें. त्यामुळें आरमाराकडे दुर्लक्ष करून जमिनीवर लढणाऱ्या सैन्याकडेच मोठा खर्च फ्रान्सला करावा लागला.

यूरोपांतील सर्व सामनेवालीं राष्ट्रें पराभूत होऊन ग्रेटब्रिटननें समुद्रावर जें वर्चस्व प्रस्थापित झालें तें बरींच वर्षें बिनहरकत टिकलें. तथापि १९ व्या शतकांत फ्रान्सचा राजा लुई फिलीफ यानें आणि रशियाचा बादशहा पहिला निकोलस यानें ( १८२५--१८५५ ) स्वतःचें मोठें आरमार बनविण्याचा प्रयत्न केला. फ्रान्स आणि रशिया एकत्र होऊन इंग्लंडच्या आरमाराला मोठा धोका आणणार अशी भीति १८३८ मध्यें उत्पन्न झाली. या सालच्या आरमारी सामर्थ्याचें कोष्टक खालीं दिलें आहे

| देश | मोठीं जहाजें | फ्रिगेट | लढाऊ आगबोटी |
|---|---|---|---|
| ग्रेटब्रिटन | ९० | ९३ | १२ |
| फ्रान्स | ४९ | ६० | ३७ |
| रशिया | ५० | २५ | ८ |
| युनायटेड्स्टेट्स | १५ | ३५ | १६ |

१८३८ च्या सुमाराचें संकट टळलें आणि पुढें क्रिमियन युद्धाच्या वेळीं रशियाच्या आरमाराचा बराच नाश होऊन त्या आरमाराचा कमकुवतपणा सिद्ध झाला. तथापि फ्रान्स, रशिया व ग्रेटब्रिटन यांच्यामधील आरमारी चुरस चालू राहिली. १८५९ मध्यें लाग्लोइर हें पहिलें लोखंडी जहाज समुद्रावर अवतरल्यापासून समुद्रावरील वर्चस्वाकरितां नव्याच प्रकारची शर्यत सुरू झाली. याच सुमारास अमेरिका व आशिया यामधील कांहीं राष्ट्रांनीं मोठालीं आरमारें तयार केलीं.

अ लीक डी ल चु र सः—१८७१ पासून मोठालीं आरमारें बांधण्यास सुरवात झाली. या सुमारास राजकीय दृष्ट्या संयुक्त बनलेला इटाली देश व जर्मनसाम्राज्य या दोघांनीं

स्वतःचें मोठें आरमार उभारण्याचा उपक्रम सुरू केला. १८९० पासून युनायटेडस्टेट्सनें आरमाराची वाढ झपाट्यानें सुरू केली व जपाननेंहि त्याच सुमारास मोठें आरमार बनविण्यास सुरुवात केली. त्यावर तोड म्हणून फ्रान्स, रशिया व ग्रेटब्रिटन यांनीं आरमाराची वाढ झपाट्यानें चालविली.

इं ग्लं ड वि रु द्ध द्वि रा ष्ट्र सं घ:—फ्रान्स व रशिया यांच्या हिताहिताचे धागे असे एकत्र गुंतले होते कीं, त्या दोघांचा संघ बनणार हें उघड दिसत होतें. १८७०-७१ च्या युद्धानंतर फ्रान्सनें स्वतःचें लढाऊ सामर्थ्य वाढवितांना आरमाराची वाढहि सुरू केली. व त्याबरोबरच रशियानें बळकट जहाजें बांधण्यास आरंभ केला. १८८५ मध्यें ब्रिटिश आरमार वाढविण्यासंबंधानें जोराची मागणी सुरू झाली. १८८८ मध्यें सर डब्ल्यू डॉवेल, सर व्हेसे हॅमिल्टन आणि सर आर. रिचर्डस ह्या तीन ॲडमिरलांची कमिटी ब्रिटिश आरमारासंबंधानें रिपोर्ट करण्याकरितां नेमण्यांत आली. त्यांनीं असें मत दिलें कीं, कोणत्याहि दोन राष्ट्रांच्या संयुक्त आरमारापेक्षां बलिष्ठ असें ब्रिटिश आरमार शक्य तितक्या लवकर करण्यांत यावें. हें मत राष्ट्रास मान्य होऊन लॉर्ड जॉर्ज हॅमिल्टन आरमार खात्याचा मुख्य अधिकारी ( फर्स्ट लॉर्ड ऑफ ॲडमिरल्टी ) याचा आरमारी संरक्षण कायदा ( नेव्हल डिफेन्स ॲक्ट ) पास होऊन ३१८००० टन वहन शक्तीचीं ७० जहाजें, २१५००००० पौंड खर्च करून ४॥ वर्षांत बांधण्याचें ठरविलें. इंग्लंडविरुद्ध फ्रान्स व रशिया यांमधील चुरस १९०४ पर्यंत चालू होती. पण त्या सालीं रशियाचा जपाननें पराभव केल्यामुळें या चुरसीमधून तें गळलें. या दोन पक्षांच्या आरमारी आंकड्यांचें कोष्टक पुढें दिलें आहे व त्यांतील टनांचे आंकडे अजमासाचे असून हजारांचे आहेत.

| | स. १८८९ | स. १८९४ | स. १९०४ |
|---|---|---|---|
| इंग्लंड | ३२(२६२ टन) | ४९ ( ४४२ टन ) | ६७ (८९५टन) |
| फ्रान्स व रशिया | २२(१५१ टन) | ३५ ( २७१ टन ) | ५७ (६३५टन) |

याप्रमाणें वरील दोन पक्षांत चुरस चालू असतां दुसरीं राष्ट्रें स्पर्धाक्षेत्रांत शिरत होतीं. त्यांत इटली हा पहिला नवा सामनेवाला होय. संयुक्त बनल्यानंतर इटलीनें आरमाराकडे बराच खर्च करण्याचें ठरविलें. तथापि फ्रान्ससारख्या दुय्यम राष्ट्राची बरोबरी करणें शक्य नाहीं हें जाणून इटलीनें संख्येनें थोडीं पण फार मोठालीं व मोठाल्या तोफा नेणारीं लढाऊ जहाजें बांधण्याचें ठरविलें. १९०३ सालीं इटलीजवळ २२६६३० टन वहनशक्तीचीं १८ लढाऊ जहाजें होती.

ज र्म नी.—जर्मन आरमाराचा इतिहास दूरदर्शीपणा, हिशोबीपणा व सुसंगतपणा या गुणांचा दर्शक आहे.प्रशियाचें जें लहानसें आरमार असे त्याला १८७१ मध्यें प्रथम साम्राज्याच्या आरमाराचें स्वरूप आलें. १८५३ पर्यंत युद्धखात्यावर तें सर्वस्वीं अवलंबून होतें. सर्व गोष्टी प्रथम नीट योजना करून ठरवावयाच्या व त्या योजनेंतहि परिस्थित्यनुरूप फेरबदल करावयाचे अशी जर्मन सरकारची पद्धत असे. १८६७ मध्यें जर्मन सरकारनें १६ लोखंडी व ५० लहान जहाजें बांधण्याची योजना केली. १८८२ मध्यें एकंदर शंभर जहाजें तयार करण्याची योजना ठरली. १९०० मध्यें एका मोठ्या योजनेस दुसऱ्या वुइल्यम बादशहानें राइचस्टाग या लोकसभेची संमति मिळविली. या योजनेप्रमाणें १९१७ सालीं ३८ लढाऊ व त्याच प्रमाणांत क्रूझरें आणि लहान जहाजें मिळून मोठें आरमार तयार करण्याचें ठरलें. व ती योजना अमलांत येऊं लागून १९०९ मध्यें नवें जर्मन आरमार समुद्रावरील ब्रिटिशांच्या वर्चस्वाला मोठा धक्का आणणार अशीं चिन्हें दिसूं लागलीं.

यु ना य टे ड स्टे ट् स.—अमेरिकन अंतस्थ युद्धानंतरहि ( १८६२-६६ ) युनायटेडस्टेट्सचें आरमाराकडे फारसें लक्ष नव्हतें. १८८१ मध्ये आरमाराच्या गरजासंबंधींना सल्ला देण्याकरितां एक बोर्ड नेमण्यांत आलें. त्या बोर्डानें १८९० मध्यें असा सल्ला दिला कीं, १०० जहाजांचें आरमार तयार करावें व त्यांपैकीं २० लढाऊ जहाजें पहिल्या प्रतीचीं असावींत. १८९८ मध्यें स्पेनबरोबरच्या युद्धामुळें अमेरिकेचें आरमाराकडे चांगलें लक्ष वेधलें. १८८९ मध्यें युनायटेड स्टेटसजवळ आधुनिक पद्धतीचें लढाऊ जहाज एकहि नव्हतें. १८९९ मध्यें अशीं चार पांच जहाजें बांधलेलीं व बांधावयाचीं मिळून जहाजें २७होतीं व त्यांची वहनशक्ती ३५३२६० टन होती. १८९० सालीं आरमाराकडे खर्च ५११९८५० पौंड झाला व तो १९०३ मध्यें १६३५५३८० पौंड इतका वाढला.

ज पा न:—आरमारी स्पर्धा क्षेत्रांत जपान सर्वांच्या शेवटीं शिरलें. जपानच्या मोठ्या आरमाराला आरंभ १८९५ मध्यें झाला, पण जपान हें बेट असल्यामुळें दर्यावर्दीपणाचा गुण जपानी लोकांच्या अंगांत बराच मुरलेला होता तो या नव्या स्पर्धेच्या काळांत चांगला निदर्शनास आला. १८९६ मध्यें जपानच्या आरमाराकडे जगाचें लक्ष वेधलें. कारण त्यासालीं जपाननें चार अत्यंत बलाढ्य अशा लढाऊ जहाजांनीं युक्त असें मोठें आरमार तयार करण्याचें ठरविलें. इंग्लंडबरोबर दोस्ती ठेवून तिचा आपलें आरमार बलिष्ठ बनविण्याच्या कामीं जपाननें चांगला उपयोग करून घेतला, आणि १९०४ मध्यें रशियाबरोबरच्या युद्धांत आपलें आरमारी सामर्थ्य समुद्रावर जय मिळवून सिद्ध केलें.

१९१० च्या सुमाराची आरमारी परिस्थितिः—नेपोलियनबरोबरच्या युद्धाच्या शेवटीं समुद्रावर ग्रेटब्रिटनचें जें वर्चस्व स्थापन झालें होतें तें १९ व्या शतकाच्या उत्तरा-

भागांत जगांतील अनेक देशांच्या आरमाराच्या वाढीमुळें डळमळूं लागलें. हा फरक कशा प्रकारचा होता हें लक्षांत येण्याकरितां.१८३८ व १९१० या दोन सालांतील आरमारी आंकडे खालीं दिले आहेतः—

सन १८३८

| | इं. | फ्रा. | र. | ज. | इटा. | युना. | जपान |
|---|---|---|---|---|---|---|---|
| मोठालीं जहाजें | ९० | ४९ | ५० | ० | ० | १५ | |

सन १९०३

| | इं. | फ्रा. | र. | ज. | इटा. | युना. | जपान |
|---|---|---|---|---|---|---|---|
| लढाऊ जहाजें | ६७ | ३९ | १८ | २७ | १८ | २७ | ५ |

सन १९१० मध्यें बांधलेलीं जहाजें

| | इं. | फ्रा. | र. | ज. | इटा. | युना. | जपान |
|---|---|---|---|---|---|---|---|
| बॅटल शिप्स | ५६ | १७ | ७ | ३३ | १० | ३० | १४ |
| आर्म्ड सीडिव्हेल्सस. | ० | ८ | २ | ७ | ० | १० | ० |
| आर्म्ड क्रुझर्स | ३८ | २० | ४ | ९ | ८ | १५ | १२ |
| प्रोटेक्टेड क्रूझर्स १ | १८ | ५ | ७ | ० | ० | ३ | २ |
| ” ” २ | ३५ | ९ | २ | २३ | ३ | १६ | ११ |
| ” ” ३ | १६ | ८ | २ | १२ | ११ | २ | ६ |
| अन्प्रोटे. क्रूझर्स | २ | ० | ० | १० | ० | ५ | ६ |
| स्काउट्स | ८ | ० | ० | ० | ० | ३ | ० |
| टार्पेडो व्हेसल्स | २३ | १० | ६ | १ | ५ | २ | २ |
| टी.बी.डिस्ट्रॉयर्स | १५० | ६० | ९७ | ८५ | २१ | २५ | ५७ |
| टॉर्पेडो बोट्स | ११६ | २४३ | ६३ | ८२ | ९६ | ३७ | ६९ |
| सबमरीन्स | ६३ | ५६ | ३० | ८ | ७ | १८ | ९ |

बांधावयाचीं जहाजें

| | इं. | फ्रा. | र. | ज. | इटा. | युना. | जपान |
|---|---|---|---|---|---|---|---|
| बॅटल शिप्स | ९ | ६ | ८ | ८ | २ | ४ | ३ |
| आर्म्ड क्रूझर्स | ३ | २ | २ | ३ | २ | ० | १ |
| प्रोटेक्टेड क्रूझर्स २ | ९ | ० | ० | ५ | ० | ० | ३ |
| अन्प्रोटे क्रूझर्स | २ | ० | ० | ० | ० | ० | ० |
| टी.बी.डिस्ट्रॉयर्स | ३७ | १७ | ० | १२ | २ | १५ | २ |
| सबमरीन्स | ११ | २३ | अनिश्चित | ३ | ० | १० | ३ |

आ र मा रा ची घ ट ना—आरमारें सर्व राष्ट्रांची आहेत. सर्वांत ब्रिटिशांचें आरमार मोठें आहे. तेव्हां अत्यंत विस्तृत अशा आरमाराची मांडणी द्यावयाची म्हणजे ब्रिटिश आरमाराची घटना द्यावयाची. ब्रिटिश आरमारामध्यें अधिकाऱ्यांचें वर्गीकरण पुढीलप्रमाणें आहेः फ्लॅग—आफिसर, कमोडोर, कॅप्टन, स्टाफ—कॅप्टन,कमांडर, स्टाफ–कमांडर, लेफ्टनंट, नॅव्हिगेटिंग लेफ्टनंट, सब—लेफ्टनंट, चीफ गनर्स, चीफ बोटस्वेन, चीफ कार्पेंटर, गनर, बोटस्वेन, कार्पेंटर ( सुतार ), मिडशिपमेन, नेव्हलकॅडेट, फ्लॅग आफिसरांचे तीन पोटवर्ग असतात. रिअर–ॲडमिरल, व्हाइस—ॲडमिरल, व ॲडमिरल.

हुकमत हातीं असलेल्या सर्व फ्लॅग आफिसरांवर स्वतःच्या ताब्यांतील जहाजें उत्तम स्थितींत ठेऊन त्यावरील लोकांना लढाईची वरचेवर तालीम देऊन व्यवस्था, शिस्त व स्वच्छता राखणें याची जबाबदारी असते. आरमारांत नोकरीवर असूनहि प्रत्यक्ष हातीं हुकमत नसलेल्या फ्लॅग आफिसरांचें कर्तव्य हें कीं, जहाजावरील नाविक शिस्त व हुकूम वेळच्यावेळीं पाळतात किंवा नाहीं, अन्नसामुग्री व पाणी यांचा सांठा बरोबर आहे काय व नाविकांच्या आरोग्याची योग्य काळजी घेण्यांत येते कीं नाहीं; तसेच जहाजें समुद्रांत कामगिरीवर असतां आज्ञापित स्थळीं राहतात कीं नाहीं, लढाई चालू असतां स्वतःवरील कामगिरी बरोबर बजावतात कीं नाहीं वगैरे गोष्टींवर देखरेख ठेवणें, आणि लढाई संपल्याबरोबर तिचा कमांडर—इन—चीफकडे रिपोर्ट करणें, व लढाई चालू असतां कोणी कॅप्टन अयोग्य वर्तन करीत असल्यास किंवा लढाईची टाळाटाळी करीत असल्यास त्याच्या जागीं दुसरा इसम नेमणें, वगैरे कामें करणें. सदरहू रिपोर्टावरून लढाईंतील माणसांविषयीं शिफारस किंवा निषेध करण्याचें काम कमांडर—इन—चीफ करतो. एखादा फ्लॅग—ऑफिसर लढाईंत मारला गेल्यावर त्याचीं सर्व कामें लढाई संपेपर्यंत तो जिवंतच आहे अशा प्रमाणें चालू ठेवावयाचीं असतात, मात्र त्याच्या मृत्यूची किंवा काम करण्यास असमर्थ झाल्याची बातमी शक्य तितक्या लवकर कमांडर—इन—चीफला देणें जरूर असतें.

कप्तानाचें काम हें कीं, कमांडर—इन—चीफचे सर्व हुकूम त्याच्या मार्फत सुटतात व जहाजाच्या कामासंबंधीं सर्व कागदपत्र त्याच्या मार्फत कमांडर—इन—चीफकडे जातात. तसेंच काफिल्यासंबंधाचा दैनिक अहवाल ठेवणें व तो आरमार खात्याकडे पाठविणें हें त्याचें काम असतें. एकाद्या लढाऊ जहाजाचा कप्तान नेमला गेला कीं, तो लगेच अन्नसामुग्री तोफा दारुगोळा वगैरे लढाऊ सामान त्या त्या खात्याकडून घेतो व दुय्यम अधिकारी खलाशी, कारागीर, कोळसेवाले, आगवाले, व इतर नोकर जहाजावर भरतो. शिवाय हिशेबबुकें हजेरीबुकें, पगारबुकें वगैरे कागदपत्रें त्याच्याच ताब्यांत असतात. जहाजावरील शिस्त, हुकूम, वक्तशीरपणा, स्वच्छता, आरोग्य वगैरे बाबतींतील त्याच्या कर्तव्यांसंबंधींच्या नियमांचें छापील पुस्तक त्याच्या जवळ दिलेलें असतें. आणि इतरांच्या माहिती करितां जरूर ते नियम जहाजावर जाहीर ठिकाणीं लाविलेले असतात, व ते सर्व आफिसर व नोकर यांच्या देखत महिन्यांतून एकदां तरी वाचले जावे अशी व्यवस्था तो करतो. शिवाय जहाजावरील चॅप्लनचा योग्य मान राखून दर रविवारीं सर्व लोक प्रार्थनेला हजर राहतात. हें पहाण्याचें कामहि त्याचेंच असते. कमिशन किंवा वॉरंट आफीसर खेरीज इतरांना अपराधाबद्दल योग्य शिक्षा योग्य खुलासा करून चोवीस तासानंतर करण्याचा त्याला अधिकार असतो.

लहान जहाजावर कमांडर हाच मुख्य अधिकारी असतो, व मोठ्या जहाजांवर कॅप्टनच्या मदतीस तोच असतो. आणि लेफ्टनंट अनेक असून ते पाळीपाळीनें जहाजावरील सर्व कामकाजावर देखरेख करण्याचें काम करतात व कमजास्त कांहीं झाल्यास त्याची वर्दी कॅप्टनला देतात.

जहाजावरील सुकाणू आफीसर कॅप्टनच्या हुकुमाप्रमाणें जहाज चालू करणें, वळविणें, थांबविणें वगैरे कामें करतो, तसेच मार्गांत लागणारीं बंदरें व इतर खाणाखुणा वगैरे गोष्टींची नोंद ठेवितो. आफिसरासंबंधाची वर दिलेली व्यवस्था निरनिराळ्या देशांच्या आरमारांत बहुतेक सर्वत्र सारखीच असते.

ब्रि टि श आ र मा री खा तें:— ब्रिटिश बेटांचें संरक्षण करण्याचें आरमार हें एकच खरें साधन आहे, ही गोष्ट ७९६ मध्यें मरण पावलेल्या ओफा राजाच्या वेळेपासून इंग्लिश लोक जाणून आहेत. तेव्हांपासूनच्या इंग्लंडच्या इतिहासांत पुनः पुन्हा हाच अनुभव आला आहे आणि पार्लमेंटनेंहि ही गोष्ट जाणून अंमलबजावणी केली आहे. आरमारानें ब्रिटिश बेटांचें रक्षण होत असल्यामुळें जमिनीवर लढणारी ब्रिटिश फौज दूरदूरच्या देशांत जाऊन लढाया करण्यांस मोकळी मिळूं शकते. ब्रिटिश साम्राज्यांतील दूरदूरच्या देशांचें रक्षणहि याच आरमाराकडून होत असल्यामुळें ग्रेटब्रिटनचें आरमारी खातें हें एक अत्यंत महत्त्वाचें खातें होऊन बसलें आहे. ब्रिटिश आरमाराची व्यवस्था पाहणारें जें ॲडमिरल्टी बोर्ड आहे त्याचें काम असें असतें कीं, सरकारी धोरणास अनुसरून आरमाराची व्यवस्था ठेवणें व तें वाढविणें; आरमारावर योग्य शिक्षण मिळालेल्या नोकरांची व अधिकाऱ्यांची भरती करणें; जगांतील निरनिराळ्या भागांत तें विभागून ठेवणें आणि त्यावरील माणसें व सामुग्री लढाईच्या कामाला नेहमीं तयार व लायक ठेवणें. हें एकंदर काम अवाढव्य व गुंतागुंतीचें असल्यामुळें ब्रिटिश ॲडमिरॅल्टी बोर्डाची रचनाहि अगदीं विशेष प्रकारची आहे. या खात्याचा मुख्य लॉर्ड हाय ॲडमिरल हा असतो. बोर्डांतील सभासदांचा या लॉर्ड ॲडमिरलशीं व परस्पर एकमेकांशीं प्रत्यक्ष व सतत संबंध येत असतो. शिवाय आरमारांतील मुख्य मुख्य अधिकाऱ्यांचा या बोर्डाशीं सतत संबंध आला पाहिजे, म्हणून त्या सर्वांनीं शक्य तितक्या जवळजवळ राहिलें पाहिजे, आणि सर्वांनीं आठवड्यांतून निदान दोनदां तरी आरमारी ऑफिसांत असलें पाहिजे असा नियम पहिल्या जेम्सच्या कालापासून सुरू झाला, तो अद्याप चालू आहे. शिवाय अडचणीच्या प्रसंगीं एखाद्या जहाजावरच आरमारांतील दोन लॉर्ड अधिकारी व एक सेक्रेटरी यांचें बोर्ड बनून त्यांत निकडीच्या प्रश्नांचा तेथल्या तेथेंच ताबडतोब निकाल लावावा अशीहि सवलत या पद्धतींत आहे.

इ ति हा सः—आरमारी खात्याच्या इतिहासाला ८ व्या हेनरीच्या कारकीर्दीपासून सुरवात होते. त्या कारकीर्दीपासून आरमारांतील मुलकी कामासंबंधाची व्यवस्था नेव्ही बोर्डाकडे आणि आरमारी युद्धाच्या प्रत्यक्ष कामकाजासंबंधानें व्यवस्था ॲडमिरल्टी ऑफिसकडे असे. पण ही विभागलेली व्यवस्था गैरसोईची आहे असें ठरवून सर जेम्स ग्रॅहॅमनें १८३२ मध्यें त्यांत सुधारणा घडवून आणली व तेव्हांपासून ॲडमिरल्टी बोर्ड व नेव्ही बोर्ड हीं दोन्हीं एकत्र करण्यांत आलीं. त्या बोर्डांत हल्लीं एक वरिष्ठ अधिकारी, चार आरमारी अधिकारी व एक मुलकी अधिकारी इतके सभासद असून त्यांच्यावर संयुक्त जबाबदारी असते. बोर्डाची ही रचना उत्कृष्ट व पसंत असल्याचें आजपर्यंत पुष्कळ मुत्सद्यांनीं कबूल केलें आहे. मध्यंतरी १८६८–१८७१ मध्यें ग्लॅडस्टनच्या प्रधानकीच्या वेळीं मिस्टर चाइल्डर्स हे वरिष्ठ अधिकारी असतांना वरील व्यवस्थेंत फरक करून वरिष्ठ अधिकारी एकट्याच्या जबाबदारीवर पुष्कळशा गोष्टी करूं लागला. त्यावेळीं एक कॅप्टन नांवाचें जहाज आरमारखात्याकडून लायकीचा दाखला मिळून समुद्रावर गेल्यावर नालायक ठरलें. व त्याबद्दलची जबाबदारी एकट्या चाइल्डर्सवर पडली. त्यावेळीं असें ठरलें कीं, वरिष्ठ अधिकारी आरमारांतील तज्ज्ञ नसल्यामुळें इतर तज्ज्ञ अधिकाऱ्यांचा सल्ला त्यानें घेणें जरूर आहे व सर्व गोष्टींची जबाबदारी सर्व अधिकाऱ्यांस संयुक्त असावी असा निकाल झाल्यावर १८७१ पासून सर्व व्यवस्था पूर्ववत् चालू झाली.

हल्लीं ॲडमिरल्टी बोर्ड, फर्स्टलार्ड (वरिष्ठ अधिकारी), दोन आरमारी लॉर्ड (अधिकारी), एक ॲडिशनल नेव्हल लॉर्ड (जादा अधिकारी), एक ज्युनिअर नेव्हल लॉर्ड (दुय्यम अधिकारी) व एक सिव्हिल लॉर्ड (मुलकी अधिकारी) इतक्यांचें बनलेलें असतें व त्यांच्या मदतीला एक फायनॅन्शिअल सेक्रेटरी (मुज्मुदार) व एक परमनंट सेक्रेटरी (कायमचिटणीस) असे दोन सेक्रेटरी असतात. या सगळयांचीं कामें अगदीं स्पष्टपणें ठरवून दिलेलीं आहेत. वरिष्ठ अधिकाऱ्यामार्फत प्रधानमंडळाचें धोरण आरमारी अधिकाऱ्यांनां कळविलें जातें. वरिष्ठ अधिकारी हाच आरमार खात्याचा पार्लमेंटांतील प्रतिनिधि होय. बोर्डाचे बाकीचे सभासद केवळ सल्ला देण्याचें काम करितात. पण त्यांचा सल्ला अमान्य झाल्यास विरोध नमूद करून ठेवणें किंवा राजीनामा देणें याशिवाय दुसरा उपाय त्यांच्या हातीं नसतो. वरिष्ठ आरमारी अधिकारी याच्यावर आरमारांतील जागांकरितां योग्य माणसें निवडण्याची जबाबदारी असते शिवाय जहाजें बांधण्याकरितां योग्य प्रकारचें सामान मिळविण्याच्या कामांशींहि त्याचा संबंध येतो. दुसरा आरमारी लॉर्ड हा पहिल्या आरमारी लॉर्डला मदतनीस असतो. जादा आरमारी अधिकाऱ्याकडे आरमारासंबंधाच्या मुलकी खात्यांची व्यव-

असते आणि आरमाराकरितां गोद्या व इमारती यांची पाहणी व देखरेख करण्याचें काम त्याच्याकडे असते. नवीं जहाजें बांधण्याचें कामहि त्याच्याच देखरेखीखालीं होतें.

नव्या आरमारी अधिकाऱ्यास अन्नपाण्याचा पुरवठा, औषधें देण्याची व्यवस्था व दवाखाने, कोळशांचा पुरवठा वगैरे कामें करावीं लागतात. मुलकी अधिकाऱ्याकडे आरमारी खात्याकरितां जमीनी विकत घेणें, इमारती बांधणें, मुलकी खात्यांतील लोकांच्या नेमणुका करणें, वगैरे कामें असतात. फायनॅन्शिअल सेक्रेटरीकडे जमाखर्चाचें काम, अंदाजपत्रक करण्याचें काम, वगैरे पैशासंबंधाचीं सर्व कामें असतात. कायम चिटणिसाच्या मार्फत बोर्डाचे सभासद आणि आरमारी खात्यांतील कामासंबंधाची पूर्वपरंपरा व शिस्त कायम ठेवण्याचें अत्यंत महत्त्वाचें काम या सेक्रेटरीकडे असते.

ब्रिटिश आरमाराचें सामर्थ्य दोन गोष्टींवर अवलंबून आहे. पहिली गोष्ट ब्रिटिश प्रधानमंडळाचें परराष्ट्रीय धोरण आणि दुसरी गोष्ट आरमारी खर्चाकरितां मिळणारा पैसा. आरमाराकडे किती खर्च करणें आवश्यक आहे तें वरिष्ठ अधिकाऱ्यापुढें मांडणें हें बोर्डातील इतर अधिकाऱ्याचें कर्तव्य असतें. खर्चाचा विचार करिताना हातीं घेतलेलीं कामें पुरीं करणें व नवीं कामें चालू करणें या दोन्हीं गोष्टी विचारांत घ्याव्या लागतात. जहाजें कोणत्या प्रकारचीं व कशा नमुन्याचीं बांधावीं हें ठरविण्याचें कामहि बोर्डाकडे असतें. आरमारी खात्याच्या एकंदर कामापैकीं हें एक अत्यंत महत्त्वाचें अंग आहे. आरमारी खात्याच्या जमाखर्चाचा हिशोब ठेवण्याकरितां अकाउंटंट जनरल्स डिपार्टमेंट ( हिशोबी खातें ) नावाचें स्वतंत्र खातें असतें.

आ र मा रा ची जु ळ वा जु ळ वः—जहाजावरील माणसें व सामानसुमान लढाईकरितां नेहमीं तयार ठेवणें हें एक महत्त्वाचें काम असतें. याकरितां जहाजांना मधून मधून लढाईची तालीम द्यावी लागते. जहाजांचे दोन प्रकार असतात. एक लढाईकरितां कायम राखून ठेविलेलीं जहाजें व दुसरीं फक्त युद्धाच्या वेळीं लढाईकरितां वेऊन इतरवेळीं इतर कामाला द्यावयाचीं जहाजें. या दुसऱ्या प्रकारच्या जहाजांवर लढाईच्या वेळीं एकदम आरमारी खात्यातील माणसें नेमल्यास त्यांना जहाजांतील यांत्रिक भागाची नीट माहिती नसल्यामुळें बरेच अपघात घडतात असा अनुभव आला. म्हणून १९०४ पासून अशी सुधारणा करण्यांत आली कीं, अशा प्रत्येक जहाजावर $\frac{2}{5}$ खलाशी आरमार खात्यापैकीं ठेवावयाचे, व तीं जहाजें लढाईची तालीम देण्याकरितां मधून मधून न्यावयाचीं.

ग्रेटब्रिटनखेरीज रशिया, जर्मनी, फ्रान्स, इटली वगैरे देशांतील आरमार खात्याच्या व्यवस्थेसंबंधानें विशेष सांगण्यासारखें कांहीं नाहीं.

१९१० नंतरच्या ब्रिटिश आरमार खात्याच्या इतिहासांत जागतिक युद्धाचीं १९१४–१८ हीं वर्षें फार महत्त्वाचीं आहेत; कारण त्या वेळीं या खात्यांतील नोकरांची संख्या आणि कामकाज फार वाढलें व कामाच्या पद्धतीचीं तत्त्वें ठरून गेलीं. प्रत्यक्ष लढाईचें काम व साधनसामुग्री पुरविण्याचें काम हीं दोन कामें अगदीं पृथकपणें वाटून दिलीं पाहिजेत, या तत्त्वाची अम्मल बजावणी लार्ड हाल्डेननें ब्रिटिश सैन्यांत बरोबर केली होती, व त्याप्रमाणें आरमारांत अम्मल होणें जरूर होतें. आणखी एक महत्त्वाचा दोष असा होता कीं, लढाऊ लोकांवरचा ( वॉर स्टाफ ) मुख्य अधिकारी आरमारी बोर्डाचा सभासद नसे. आरमारी बोर्डाची रचना पुढील प्रमाणें होती.

| | |
|---|---|
| बोर्ड ऑफ अडमिरल्टी<br>कायम चिटणीस.<br>मुजुमदार. | पहिला दर्याधिकारी ( युद्धाची तयारी )<br>दुसरा दर्याधिकारी ( आरमारांत मनुष्य भरती )<br>तिसरा दर्याधिकारी ( अन्नसामुग्री )<br>चौथा दर्याधिकारी ( वाहतुक व कोठी )<br>मुलकी अधिकारी ( दिवाणी कामें ) |

या पद्धतींतले दोष डार्डानेल्सच्या स्वारीच्या वेळीं चांगलें नजरेस आले. एखाद्या महत्त्वाच्या आरमारी स्वारीच्या वेळीं युद्धरचना (स्ट्रॅटेजी) कशी करावी तें अगाऊ निश्चित ठरविण्यास स्वतंत्र साधन नव्हतें. ॲडमिरल्टी बोर्डापुढें येणाऱ्या सूचनांवर योग्य तज्ज्ञाकडून अभिप्राय किंवा टीका येण्यासहि साधन नसे. जागतिक युद्धाच्या वेळीं ह्या अडचणी भासूं लागल्यावर एकेक सुधारणा होऊं लागली. १९१६ च्या डिसेंबरमध्यें ॲडमिरल सर जॉनच्या जेलिको ॲडमिरल्टी बोर्डांत शिरल्यावर त्यानें प्रथम अँटि–सबमरीन डिव्हिजन (पाणबुडी प्रतिकारक विभाग) स्थापन केला. १९१७ च्या मे मध्यें वॉर स्टाफचें आरमारी नोकरवर्ग असें नांव बदलण्यात आलें; आणि आरमारी नोकरवर्गाचा मुख्य व वरिष्ठ दर्याधिकारी हे दोन हुद्दे एकत्र करण्यांत आले, आणि आरमारी नोकरवर्गाचा नायब मुख्य व ॲसिस्टंट(मदतनीस) चीफ असे दोन नवे हुद्दे निर्माण करून या अधिकाऱ्यांना ॲडमिरल्टी बोर्डाचे सभासद बनविण्यांत आले. या योगानें आरमारी नोकरवर्गावरील अधिकाऱ्यांना बोर्डांत प्रत्यक्ष प्रतिनिधित्व प्राप्त झालें. शिवाय एक कंट्रोलर व एक नायब (पहिला दर्याधिकारी) या दोन नव्या जागांवर इसम नेमण्यांत आले. १९१७ आक्टोबरमध्यें आणखी एक महत्त्वाची सुधारणा करण्यांत आली, ती अशी कीं, ऑपरेशन्स कमिटी व मेन्टेनन्स कमेटी अशा दोन कमिट्या नेमण्यांत आल्या, व त्या दोन्ही कमिट्यांचा चेअरमन वरिष्ठ अधिकारीच

असे. सुधारून वाढलेलें अॅडमिरल्टी बोर्ड व या दोन कमिटया यांची रचना पुढील कोष्टकावरून समजेल:—

बोर्ड ऑफ अॅडमिरल्टी

{ पहिला दर्याधिकारी. आरमारी नोकरवर्गाचा. नायब मुख्य. आरमारी नोकरवर्गाचा मदतनीस मुख्य पांचवा दर्याधिकारी नायब १ ला दर्याधि. }

वरिष्ठ अधिकारी.

कायम चिटणिस. | हालचाल कमिटी. | जेपासना कमिटी.

{ नायब पहिला दर्याधिकारी पार्लमेंटरी व जमाखर्चा चिटणीस दुसरा दर्याधिकारी तिसरा दर्याधिकारी चौथा दर्याधिकारी मुलकी अधिकारी कंट्रोलर. }

जागतिक युद्धाच्या वेळीं प्रत्यक्ष अनुभवामुळें वाढ होत जाऊन १९२१ सालीं आरमारी नोकरवर्गाच्या खात्याची रचना कायम ठरली ती येणेंप्रमाणें:—

पहिला दर्याधिकारी व आरमारी नोकर वर्गाचा मुख्य.

आरमारी नोकरांचा मदतनीस. मुख्य { यांत्रिक खातें, आकाशयान खातें, तोफखाना, टार्पेडो विभाग. }

आरमारी नोकरांचा नायब मुख्य { बातमी खातें, हालचाल, योजना खातें, स्थानिक संरक्षण, व्यापार, युद्ध शिक्षक व नोकर वर्गाचीं कामें }

नोकर नोंदींचे व चिटणीस ऑफीस.

जागतिक युद्धांतल्या अनुभवानें आरमारांत किती वाढ झाली त्याची कल्पना पुढील कोष्टकावरून येईल:—

१९१४–१९१८ ब्रिटिश आरमारांतील नोकर वर्ग

| आरमारी नोकरवर्ग | १९१४ | १९१८ |
|---|---|---|
| हालचाली | ७ | २४ |
| बातमी | १६ | १४० ४५ (बिनपगारी) |
| सैन्याचें एकत्रीकरण | ४ | मेंटेनन्स खात्यांत |
| व्यापार | ... | ३७ |
| पाणबुडी-प्रतिकारक } स्थानिक संरक्षण | ... | ४० |
| पाणसुरुंग निवारक } खात्यात अनामांव | ... | ७ |

| आरमारी नोकरवर्ग | १९१४ | १९१८ |
|---|---|---|
| निशाणें (आतां सिग्नल डिपार्टमेंट) | ... | २८ |
| योजना | ... | ११ |
| व्यापार विषयक सुधारणा ( लुप्त ) | ... | ३९ |
| युद्ध शिक्षण व नोकरवर्गाचींकामें | ... | ६ |
| स्थानिक संरक्षणविभाग (युद्धोत्तर) | ... | नाहीं |
| तोफखाना | ... | ४ |
| पाणतीर विभाग ( युद्धोत्तर ) | ... | नाहीं |
| एकूण | २७ | ३३६ |
| **चिटणिसी** | | |
| चिटणीस | ४५ | ८० (२बिनपगारी |
| मुख्य लेखन नियंता | ... | १९ |
| प्रसिद्धी खातें | ... | २५ |
| आंकडे खातें | ... | १२ |
| एकूण | ४५ | १३६ |
| **कामदार मंडळ** | | |
| एकत्रीकरण | ... | १७ |
| सैन्यभरती | ... | १० |
| रॉयल मरीन ऑफीस | १० | १५ |
| पगार खात्याचा मुख्य | ... | ४ |
| युद्ध शिक्षणाचा अधिकारी | ... | ,, |
| शारीरिक शिक्षण खेळ | ... | ,, |
| आरमारी शिक्षण | ५ | ५ |
| आरमाराचा धर्मोपदेशक | ५ | ५ |
| औषधोपचाराचा मुख्य अधिकारी | १० | १६ |
| एकूण | २७ | ६८ |
| **यांत्रिक विभाग** | | |
| समुद्राचे नकाशे करणारे | ३५ | ५८ |
| नौकानयन | ३ | ६ |
| आरमारी बांधकाम | ६८ | ९४ |
| आरमाराचा मुख्य इंजिनियर | २७ | ४८ |
| इलेक्ट्रिकल एंजिनियरिंग | ... | ३२ |
| आरमारी धर्माधिकारी खातें | ५३ ( व टार्पेडो ) | २४५ |
| पाणतीर पाणसुरुंग | ... | ११७ |
| आरमारी साहित्य | १० | ६० |
| होकायंत्र खातें | ३ | ३७ |
| गोद्या व नौकाबंधन | ... | ५० |
| लढाऊ जहाजे निर्मिति | ... | ९९ |

| | १९१४ | १९१८ |
|---|---|---|
| यांत्रिक विभाग | | |
| कुमककारी जहाजें | ... | ४६ |
| आरमार निर्मिति | | |
| आरमारी पुरवठा (हल्लीं आर्मामेंट सप्लाय) | ... | ४९ |
| आकाशयान निर्मिति | ... | ५७ |
| जमाखर्च विभाग | ... | २१ |
| किनारी वाहतुक विभाग | ... | ८६ |
| सामान्य व्यापारी जहाजांचें बांधकाम | ... | १६५ |
| आरमारांतील मजूरवर्ग खातें | ... | १४६ |
| मटीरियल्स व प्रायॉरिटी | ... | १०६ |
| संशोधन व प्रयोग | ... | ६७ |
| कामें | १०३ | २२९ |
| **एकूण** | ३०२ | १८१८ |
| पुरवठा | | |
| स्टोअर्स | ३६ | ९७ |
| अन्नपुरवठा | १९ | ३० |
| वाहतुक साधनें | ३१ | ११६ (४बिनपगारी) |
| **एकूण** | ८६ | २४३ |
| जमाखर्च | | |
| अकाऊंटंट जनरल | ११० | २९७(१बिनपगारी) |
| कंत्राटें व खरेदी | ४६ | ११२ |
| ग्रीनविच हॉस्पिटल | ७ | ७ |
| **एकूण** | १६३ | ४१६ |
| आढावा | | |
| आरमारी नोकर | २७ | ३३६ |
| चिटणिसी | ४५ | १३६ |
| कामदारमंडळ | २७ | ६९ |
| यांत्रिक } जोपासना | ३०२ | १८१८ |
| पुरवठा } जोपासना | ८६ | २४३ |
| जमाखर्च खातें | १६३ | ४१६ |
| **सर्वांची एकूण** | ६५० | ३०१८ |

तीन प्रमुख राष्ट्रांच्या आरमारांची १९२१ सालीं असलेली व १९२४ सालीं असणारी स्थिति पुढीलप्रमाणें:—

या दोन सालांत ग्रेटब्रिटनचीं लढाऊ जहाजें ३२; तयार व कामचलाऊ सबमरीन्स अनुक्रमें ९२ व ८ आणि लढाऊ तोफा २८४; तसेंच युनायटेड स्टेट्सचीं लढाऊ जहाजें अनुक्रमें १७ व १३; तयार व कामचलाऊ सबमरीन्स अनुक्रमें १०७ व ४१; लढाऊ तोफा १८८ व ३४०; व जपानचीं लढाऊ जहाजें अनुक्रमें ११ व १७; तयार व कामचलाऊ सबमरीन्स अनुक्रमें २४ व १५ आणि लढाऊ तोफा अनुक्रमें १०८ व १६४ होत्या;

वरील आंकड्यावरून युनायटेड स्टेट्स आपलें आरमार झपाट्यानें वाढवीत असून आरमारी सामर्थ्यांत पहिला नंबर मिळविण्याचा प्रयत्न करीत आहे असें दिसतें.

आ र मा री न्या य प द्ध ति —आरमारासंबंधींच्या मुलकी बाबतींतील न्यायनिवाडा देण्याकरितां पूर्वी इंग्लंडांत ठिकठिकाणीं ॲडमिरलांचीं कोर्टें असत व त्या सर्वांवर ॲडमिरॅल्टी हायकोर्ट असे. स्कॉटलंडमध्यें व आयर्लंडमध्यें एक हायकोर्ट असे. पण स्कॉटलंडमध्यें पुढें १८३० च्या ॲक्टानें हीं कामें सेशनकोर्टाकडे व शेरिफांच्या कोर्टाकडे देण्यांत आलीं, व इंग्लंडमध्यें १८३५ पासून स्थानिक व्हाइस ॲडमिरॅल्टी कोर्टें बंद करण्यांत आलीं. आणि १८७३ व १८७५ च्या ज्युडिकेचर ॲक्टानें पूर्वीचें ॲडमिरॅल्टी हायकोर्ट हें इंग्लंडच्या हायकोर्ट ऑफ जस्टिसचा एक भाग बनविण्यांत आलें. इंग्लंडांतील या सुधारणेनुसार इंग्लंडच्या बहामा, बर्म्युडा ब्रिटिश कोलंबिया, केपऑफ गुडहोप, सीलोन, जिब्राल्टर, हाँगकांग, जमेका, मॉरिशस, न्यूझीलंड, दक्षिण आस्ट्रेलिया, एडन वगैरे वसाहतींतील व्हाइस–ॲडमिरॅल्टी कोर्टेंहि बंद करण्यांत आलीं, हिंदुस्थानांत कलकत्ता,मुंबई व मद्रास येथें व्हाइस–ॲडमिरॅल्टी कोर्टें होतीं तीं १८६१ च्या इंडिया हायकोर्ट्स ॲक्टानें बंद करून तें काम हायकोर्टाकडे देण्यांत आलें. तुर्कस्तान, चीन व जपान येथें असलेल्या कॉन्सल कोर्टाकडे आरमारासंबंधींच्या बाबतींतील न्याय करण्याचें काम दिलेलें आहे. इंग्लंडांतील कौंटी कोर्टाकडे हें काम असतें, व त्यावरील अपीलें हायकोर्टाच्या ॲडमिरॅल्टी डिव्हिजनपुढें चालतात.

फौ ज दा री ख ट ले.—पृथ्वीच्या पाठीवरील कोणत्याहि समुद्रांत असलेल्या ब्रिटिश जहाजावर घडलेल्या गुन्ह्यांची चौकशी ब्रिटिश आरमारी कोर्टाकडून होते. तसेंच परकी राज्याच्या हद्दींत म्हणजे परकी किनाऱ्यापासून तीन मैलांच्या आंत असलेल्याहि ब्रिटिश जहाजावर घडलेल्या गुन्ह्याची चौकशी ब्रिटिश कोर्टें करतात. परंतु परकी जहाजांवर मोठ्या समुद्रांत घडलेल्या गुन्ह्यांची चौकशी या कोर्टांना करतां येत नाहीं. पण युनायटेड किंगडमच्या हद्दींतील म्हणजे ब्रिटिश किनाऱ्यापासून तीन मैलांच्या आंत असलेल्या परकी जहाजावरील गुन्हे ब्रिटिश कोर्टांत चौकशीस घेता येतात कीं नाहीं याबद्दल बराच काल संशय होता; आणि तसें करतां येत नाहीं असें बऱ्याच इंग्रज न्यायाधीशांचें मत होतें. पण १८७८ मधील टेरिटोरियल वॉटर्स ज्युरिस्डिक्शन ॲक्टाप्रमाणें असें ठरलें कीं, ब्रिटिश जलमर्यादेच्या आंत म्हणजे ब्रिटिश किनाऱ्यावरील ओहोटीच्या

मर्यादेपासून एक लीग ( तीन मैल ) च्या आंत असलेल्या परकी जहाजावर घडलेल्या गुन्ह्यांची चौकशी, गुन्हेगार ब्रिटिश प्रजाजन असला किंवा परकी इसम असला तरी ब्रिटिश आरमारी कोर्टीनां करण्याचा अधिकार आहे.

चांचे लोकांच्या गुन्ह्यांची चौकशी करण्याचा अधिकार ॲडमिरल्टी कोर्टीनां असे; मग त्या चांचे लोकांचें निशाण कोणत्याहि राष्ट्राचें असो व त्यांनीं गुन्हा कोठेंहि केलेला असो. पण अलीकडे सेंट्रल क्रिमिनल कोर्ट व सामान्य असाईझ कोर्टें यांनां हें काम दिलें आहे.

समुद्रावर लुटींत सांपडलेल्या मालासंबंधीं खटले ॲडमिरल्टी कोर्टें चालवीत असत. त्यासंबंधीच्या खटल्यांत न्याय कसा द्यावा त्यासंबंधीचे नियमहि प्रिव्ही कौंसिल घालून देत असे. अलीकडे हायकोर्ट ऑफ जस्टिसच्या ॲडमिरॅल्टी डिव्हिजनकडे हें काम असतें. १८९४ पासून असें ठरविण्यांत आलें आहे कीं, ब्रिटिश साम्राज्यांतील ज्या कोर्टीनां असले खटले चालविण्याचा अधिकार पूर्वी देऊन ठेवला असेल त्यांनी ग्रेटब्रिटन व दुसरा कोणताहि देश यांच्यामध्यें युद्ध सुरू झाल्याचें जाहीर झाल्यापासून प्रत्यक्ष अंमल बजावणी करावी. नेव्हल प्राईझ ॲक्ट नांवाच्या १८६४ मधील कायद्यानें व त्यानंतर १८९८ मध्यें हायकोर्टाकोरतां व व्हाईस ॲडमिरल्टी–प्राईज कोर्टांकरितां केलेल्या नियमांनीं याबाबतींत खटले कसे चालवावे व न्याय कसा द्यावा यासंबंधीचे नियम घालून दिले आहेत.

युनायटेड स्टेट्स, फ्रान्स, जर्मनी, रशिया, ग्रीस, तुर्कस्तान जपान, वगैरे देशांनीं आरमारी न्याय निवाडण्यासंबंधी स्वतंत्र व्यवस्था केली आहे.

सै न्य र च ना व डा व पे चः— या शास्त्रातील प्रगति समुद्रावरील युद्ध करण्याची पद्धति जहाजांचें सामर्थ्य व त्यावरील युद्धोपयोगी साधनें यांच्यावर अवलंबून असते. प्राचीन काळ व मध्ययुग म्हणजे इ. स. च्या १६ व्या शतकापर्यंत आरमारी युद्धांत हत्यारें वापरीत असत, तीं येणेंप्रमाणें:— जहाजाची नाळेकडची निमूळती मजबूत चोंच ( रॅम ); खलाशांच्या तलवारी; धनुष्यबाण, शत्रूच्या जहाजांत जड वजनाच्या वस्तू टाकण्याची साधनें, ग्रीकांची शत्रूवर अग्निवर्षाव करण्याचीं साधनें, इत्यादि. प्राचीन काळांतील साधनांकडे पाहतां असें दिसतें कीं, १४ व्या शतकांत तोफांचा उपक्रम होईपर्यंतच्या पूर्वीच्या काळांत लांबून शत्रूवर मारा करण्याचीं साधनें फारच अल्प व कमकुवत होतीं. त्यामुळें आरमारी लढाई, जहाजें व सैन्य जवळ जवळ भिडूनच होत असे. अशा युद्धांत वर सांगितलेल्या जहाजांच्या नाळीवर आणि शत्रूच्या जहाजांवर चढून जाण्याच्या कौशल्यावर मोठी भिस्त असे. नाळीचा उपयोग वल्ह्यांनीं चालणाऱ्या जहाजांनांच करतां येत असे. शिडांच्या जहाजांनां वारा अनुकूल नसल्यास त्यांचा उपयोग करणें शक्य नसे. या प्रमाणें प्राचीन काळच्या आरमारी युद्धाला दंडादंडीचें स्वरूप असल्यामुळें लढाऊ जहाजांमध्यें दोन सोई असणें अवश्य असे. पहिली सोय ही कीं जहाज हलकें व लहान म्हणजे खलाशांनां झपाट्यानें वल्हवितां व वळवितां येईल असें पाहिजे. आणि दुसरी सोय ही कीं, जहाजामध्यें पुष्कळ खलाशी मावण्याची सोय पाहिजे; म्हणजे वल्हीं मारण्यास व शत्रूच्या जहाजावर चढून लढाई करण्यास सांपडावें. प्राचीन काळांतील व मध्ययुगांतील जहाजानां शिडें असत पण त्यांचा उपयोग मोठालें अंतर तोडण्याच्या आणि वल्हेवाल्यांनां विसावा देण्याच्या कामीं करीत असत. प्रत्यक्ष लढाई चालू असतां शिडें गुंडाळून ठेवीत. अशी स्थिति ख्रि. पू. ५ व्या शतकांत अथेनियन ॲडमिरल फोर्मिओ याच्या वेळीं होती, व तशीच इ. स. च्या १० व्या शतकांत नॉर्स राजा ओलेफ ट्रिग्व्हेसन याच्यावेळीं आणि पुढें इ. स. ५७१ मध्यें ख्रिस्ती व तुर्की आरमार लेपँटो येथें लढले तेव्हांहि कायम होती.भूमध्य समुद्रापलीकडे महासागरावर सफरी करण्यास लांब, अरुंद आणि हलकीं अशीं १२० फूट लांब आणि २० फूट रुंद असलेलीं गॅली जहाजें नालायक होतीं.

प्राचीन काळातील व मध्ययुगातील या प्रकारच्या मध्यम आकाराच्या आणि माणसांनीं भरलेल्या जहाजांनां समुद्रांत लांब लांब सफरी करणें किंवा शत्रूच्या बंदराला पुष्कळ दिवस वेढा घालणें शक्य नसे. कारण पुष्कळ माणसांनां पुष्कळ दिवस पुरेल इतकी अन्नपाण्याची सामुग्री अशा जहाजावर रहात नसे. त्यामुळें त्या काळांतील आरमाराला अन्नपाण्याचा पुरवठा व्हावा म्हणून किनाऱ्याजवळ राहणें भाग पडत असे. शत्रूच्या बंदरावर हल्ला करणें झाल्यास बंदराशेजारीं किनाऱ्यावर प्रथम ठाणें वसविणें भाग पडत असे. तसेंच टक्कर देणें व शत्रूच्या जहाजावर चढणें या गोष्टी खलाशांच्या वल्हविण्याच्या कामांतील चातुर्यावर विशेष अवलंबून असत. अथीनियन खलाशी या बाबतींत फार कुशल असल्यामुळें ते टक्करीवर विशेष भर देत असत.तथापि टक्करीनें उभय जहाजांनां सारखीच इजा होण्याचा संभव असतो. त्यामुळें प्राचीन काळांतील टक्कर हें आरमारी लढाईतलें प्रमुख अंग मानलें जात नसे. या प्रकारची ही प्राचीनाची आरमारी लढाईची पद्धत बायझॅंशियम म्हणजे पूर्व रोमन साम्राज्याच्या मार्फत मध्ययुगांतील इटलीमधील लोकसत्ताक राज्यास व पश्चिम यूरोपांतील देशास अवगत झाली.

१४व्या शतकांत जहाजांवर तोफखाना ठेवण्यास सुरुवात झाली परंतु तोफांमध्यें दारू भरून त्या उडविण्यास प्रत्येक वेळीं फार वेळ लागत असे त्यामुळें जहाजें एकमेकांशीं भिडल्यावरच तोफांचा मारा करीत; व त्यांच्या साहाय्यानें शत्रूच्या जहाजांवर चढून जाण्यास सैनिकांस मदत होत असे.

मध्ययुगांत शिडांचा उपयोग गति देण्याच्या कामीं विशेष होऊं लागल्यापासून टक्कर मागें पडली, पण हातांहातींच्या

लढाईची पद्धति चालू राहिली. स्पॅनिश आरमार याच पद्धतीनें लढत असे. पण तोफांचा उपयोग अधिकाधिक होऊं लागला तेव्हां प्रत्येक जहाजावरून तोफांचा मारा नीट करतां यावा म्हणून जहाजें एकाच्या पाठीमागें एक अशीं ठेवण्याची पद्धति स्वीकारावी लागली. १६५२–५३ मध्यें इंग्लंड व डच लोकशाही यांच्या दरम्यानचें युद्ध झाल्यावर आरमारी लढाईच्या सूचनांचें एक कोड तयार करण्यांत आलें; तें १७ व्या व १८ व्या शतकांतील आरमारी लढायांतील डावपेचांनां, व त्यासंबंधानें नंतर अनेकांनीं लिहिलेल्या पुस्तकांनां आधारभूत झालें.

या कोडांत असा एक नियम होता कीं, जहाजांचा अनुक्रम लढाईच्या प्रारंभीं जसा असेल तसाच अखेरपर्यंत कायम रहावा. हा नियम योग्य नव्हता; कारण त्यामुळें, शत्रूच्या जहाजांत घोंटाळा माजला असला तरी त्याचा फायदा घेतां येत नसे. म्हणून १८ व्या शतकांतील इंग्लिश व फ्रेंच आरमारामधील लढाया अनिर्णित स्वरूपाच्या झाल्या, एखादें इंग्रजाचें जहाज जरा नादुरुस्त व मंदगति झालें कीं त्याच्या बरोबरीनें गति ठेवणें इतर जहाजांनां भाग पडे; व त्यामुळ शत्रूच्या जहाजांस दूर पळून जाण्यास अवसर सांपडे.

इंग्रजी आरमारांतील जहाजें अधिक चांगलीं असून सुद्धां त्यांनां फ्रेंचांविरुद्ध निश्चित विजय मिळवितां कां आला नाहीं, या प्रश्नाकडे मिस्टर क्लार्क ( १७२८–१८१२ ) नांवाच्या एका स्कॉटिश गृहस्थाचें लक्ष वेधलें, व त्यानें यासंबंधीं अनेक निबंध लिहून आरमारी अधिकाऱ्यांनां दिले व नंतर ते पुस्तकरूपानें प्रसिद्ध केले गेले त्या वेळची आरमारी लढाईची एकंदर पद्धति असमाधानकारक व सदोष आहे असें अनेक इंग्रज व फ्रेंच आरमारी अधिकाऱ्यांनां वाटूं लागलें. व प्रत्यक्ष लढाईत सुचतील तसे फेरफार एकमेक करूं लागले. १७८२ मध्यें डॉमिनिकाच्या लढाईत इंग्रज अधिकारी रॉडने यानें फ्रेंच आरमारांत उडालेल्या घोंटाळ्याचा फायदा घेण्याकरितां आपल्या जहाजांनां रांग मोडून शत्रूच्या आरमारांत शिरण्याचा हुकूम केला, व त्यामुळें त्याला शत्रूचीं जहाजें हस्तगत करतां आलीं. या एकाच अनुकूल अनुभवानें पूर्वीचा कडक नियम रद्द ठरविण्यांत आला. पुढें नेपोलियनच्या वेळीं सेंट व्हिन्सेंट, कँपरडाऊन व ट्रॅफलगार या तिन्ही लढायांत या नव्या पद्धतीचा इंग्रजांनीं पूर्ण उपयोग केला.

आधुनिक काळः—१८१५ ते १९०४(रुसोजपानीयुद्ध) पर्यंतच्या काळांत मोठें आरमारी युद्ध मुळींच झालें नाहीं. पण या काळांत जहाजें चालविण्याचीं साधनें, लढाईचीं साधनें आणि जहाजें बांधण्याचें सामान या तीहींमध्यें मोठी क्रांति घडून आली. १९ व्या शतकाच्या दुसऱ्या चतुर्थकांत लढाऊ जहाजें वाफेनें चालूं लागलीं. क्रिमियन युद्धाच्या वेळेपासून बोटींवर मोठाल्या तोफा ठेवण्यास सुरुवात झाली. आणि जहाजें लोखंडाचीं करण्यांत येऊं लागलीं. तोफेंतून पडलेल्या गोळयांनीं आगी लागण्याची फार भीति असल्यामुळें, लढाऊ जहाजें लांकडाचीं बांधणें अशक्य झालें. सर्वस्वीं लोखंडाचीं जहाजें बांधण्याचा उपक्रम प्रथम इंग्लंडनें केला. १९ व्या शतकांत टार्पेडोंची म्हणजे धावत्या सुरुंगांची युक्ति निघाल्यापासून आणि सबमरीन बोटी अस्तित्वांत आल्यापासून आरमारी युद्धाला अगदींच निराळें स्वरूप प्राप्त झालें. वाफेचीं जहाजें झाल्यापासून गति फार वाढली पण दूरदूरच्या सफरींत पुरेल इतका कोळसा सांठविण्याकरितां जहाजाची फार जागा अडूं लागली. त्यामुळें ज्या राष्ट्राला दूरदूरच्या देशांत कोळसा मिळण्याचीं ठाणीं नसतील त्याला जगाच्या लांबच्या भागांत आपलें आरमार नेणें अशक्य होतें. परंतु ही अडचण बरोबर कोळशाच्या बोटी घेऊन व तटस्थ राष्ट्रापासून कोळसा घेऊन दूर करतां येतें असें १९०५ मध्यें रुसोजपानी युद्धाच्या वेळीं सिद्ध झालें. याच युद्धांत असें दिसून आलें कीं, अलीकडील अनेक नव्या शोधांनीं सुद्धां आरमारी लढाईच्या पद्धतींत फारसा फरक झाला नाहीं. टार्पेडो बोटींनीं मात्र दोन महत्त्वाचे फरक घडवून आणले ते हे कीं, पूर्वीप्रमाणें जहाजाची जहाजाला टक्कर ( रॅमिंग ) देणें किंवा दोन्ही आरमारांतील जहाजांनीं जवळजवळ येऊन हातघाईची लढाई करणें या गोष्टी बहुतेक अशक्य झाल्या आहेत. इतकेंच नव्हे तर टार्पेडो हेंच आरमारी युद्धांतील मुख्य साधन होय, असें फ्रान्समधील शास्त्रज्ञ कांहीं काळ म्हणूं लागले होते. प्रत्यक्ष अनुभवानें टार्पेडोचा उपयोग करण्यांत दोन चार अडचणी दिसून आल्या. टार्पेडोचा उपयोग दोन हजार यार्डांपलीकडे होऊं शकत नाहीं, इतकेंच नव्हे तर तिला पाण्याचा अडथळा विशेष होत असल्यामुळें तिची गति मंद व मार्ग अनिश्चित बनतो व त्यामुळें शत्रूच्या जहाजांनां टार्पेडोचा मारा चुकवितां येतो. रात्रीच्या वेळींहि टार्पेडोच्या हल्ल्यावर सर्चलाईटच्या साहाय्यानें चांगली नजर ठेवतां येते. या अनेक कारणामुळें रुसो–जपानी युद्धांत सुद्धां टार्पेडोचा उपयोग दुय्यम प्रतीचा ठरला, शिवाय मार्गांत जहाजें बुडवून ठेवून शत्रूच्या जहाजांचा मार्ग कुंठित करण्याचा प्रयोग अमेरिकनांनीं सँशियेगो डीक्युबा येथें, व जपानी लोकांनीं पोर्ट आर्थर येथें केला. पण तोहि यशस्वी ठरला नाहीं. एकंदरीनें पाहतां जहाजावरील तोफखाना हाच पूर्वीप्रमाणें आतांहि आरमारी लढायांतील सर्वश्रेष्ठ साधन असल्याचें ठरलें आहे. प्रत्येक बोटीवरील तोफांना नीट मारा करतां यावा म्हणून लढाऊ बोटी एका मागें एक ठेवणेंच जरूर असतें. मात्र पाठलाग करतांना किंवा स्वतः पळून जातांना, किंवा शत्रूच्या आरमाराचा शोध काढीत असतांना बोटी बरोबरीनें चालविण्यास हरकत नसते, शिवाय जहाजांना मागेंपुढें वाटेल तसें

वळतां यावें म्हणून प्रत्येक दोन जहाजांमध्यें अंतर निदान ८०० यार्ड असावें लागतें. असा हिशोब केल्यास बारा बोटींची एक ओळ सहा मैल पसरून राहील. आरमारांतील बोटींची गती ही एक महत्त्वाची बाब असते, कारण त्या योगानें शत्रूच्या एका विशिष्ट भागावर एकदम अनेक जहाजांवरून तोफांचा मारा करणें शक्य होतें. परंतु सर्वांत महत्त्वाची गोष्ट तोफांच्या गोलंदाजींतील कसब ही होय. या सर्व बाबतींत श्रेष्ठ असलेल्या आरमारालाहि आयत्या वेळीं कमकुवतपणा त्यांतील दोनतीन प्रमुख जहाजें नादुरुस्त केल्यानें येतो. कारण इतर जहाजांना लढाईंत सिग्नल दाखविणाऱ्या ॲडमिरलला आपलें जहाज सर्वांच्या पुढें ठेवणें प्राप्त असतें; पण त्यायोगानें शत्रूच्या माऱ्यांत तें सांपडण्याचा फार संभव असतो. यामुळें प्रत्यक्ष लढाईच्या वेळीं अग्रभागीं राहून हुकूम देण्याचें काम बहुतेक अशक्य असल्यानें, नेलसनप्रमाणें, हल्लींच्या ॲडमिरलांनाहि आरंभीच एकदा लढाईसंबंधानें मुख्य हुकूम देऊन नंतरची बहुतेक जबाबदारी व्यक्तिशः कॅप्टनांच्या अंगावर टाकणें भाग असतें.

१९१० च्या सुमारास प्रथम फ्रेंचांनीं सबमरीन म्हणजे पाण्याखालून जाणाऱ्या बोटी उपयोगांत आणल्या त्यांचा उपयोग कितपत होतो ही गोष्ट पुढें जागतिक युद्धांत निदर्शनास आली.

हिं दु स्था नां तील ब्रि टि श आ र मा र.—या रॉयल इंडियन मरीनचा इतिहास १६१२ सालाइतका मागें जातो. त्या वेळीं सुरतेस वखार घालून बसलेल्या ईस्ट इंडिया कंपनीस आपला व्यापार डच किंवा पोर्तुगीज प्रतिस्पर्ध्यांपासून व तसेंच चांच्यांपासून सुरक्षित रहावा म्हणून सशस्त्र जहाजें बाळगण्याची अवश्यकता वाटली. त्यावेळेपासून हिंदुस्थानांतील इंग्रजसरकारनें निरनिराळ्या नांवांखालीं आरमार बाळगलेलें आहे या आरमाराला कोणत्या काळीं कोणतीं नांवें होतीं हें पुढें दिलें आहेः—

| | |
|---|---|
| ऑन. ई. इं. कंपनीज मरीन | १६१२—१६८६ |
| बॉंबे मरीन | १६८६—१८३० |
| इंडियन नेव्ही मरीन | १८३०—१८६३ |
| बॉंबे मरीन | १८६३—१८७७ |
| एच्. एम्. इंडियन मरीन | १८७७—१८९२ |
| रॉयल इंडियन मरीन | १८९२—१९२४ |

हें आरमार सुरवातीपासून बहुतेक नेहमीं मुंबईलाच जोडून असे. १६६८ त मुंबई कंपनीच्या हातीं आल्यापासून १८७० सालापर्यंत इंग्रजी आरमार मुंबई सरकारच्या देखरेखीखालीं असे. त्या वेळेपासून हिंदुस्थान सरकारच्या आधिपत्याखालीं साम्राज्य आरमारांत याचा अंतर्भाव करण्यांत आला. तथापि अद्यापि मुंबई हेंच मुख्य आरमारी ठाणें म्हणून कायम राहिलें आहे. या आरमाराची गेल्या महायुद्धापर्यंतची कामगिरी अशीः—१६१२ते १७१७—हिंदुस्थानचा पश्चिमकिनारा ताब्यांत घेण्याकरितां डच, पोर्तुगीज व इतर चांचे यांच्याशीं सतत चाललेलीं युद्धें. १७४४—फ्रान्सशीं युद्ध, चंद्रनगर व इंडिएन नांवांचें फ्रेंच जहाज काबीज केलें. १७५६—घेरियाचा किल्ला सर केला. १७७४—मराठ्यांशीं युद्ध. अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत फ्रेंच आणि डच यांशीं युद्ध, पांडिचरी, त्रिंकोमाली, जाफनापट्टण, कोलंबो इत्यादि ठिकाणें घेतलीं. १८०१—सर राल्फ ॲबरक्रॉंबी याच्या नेतृत्वाखालीं इजिप्तवर मोहीम. १८०३—फ्रान्सशीं युद्ध. १८१०—मारिशसचा पाडाव करून पोर्टलुई बंदरांतील फ्रेंच जहाज ताब्यांत घेतलें. १९ व्या शतकाच्या आरंभीं इराणी आखातांतील जोवास्मी चांच्यांचें बंड मोडलें. १८११—तारा घेतला १८१३—सांबरच्या सुलतानावर मोहीम. १८१७—१८ मराठ्यांशीं युद्ध. सुवर्णदुर्गांतील किल्ले घेतले. १८१९—इराणीआखातांतील चांच्यांचें निर्मूलन करण्याकरितां मोहीम. १८२०—मोचा घेतला. १८२१—बेनी—बु—अली अरबांवर मोहीम. १८२४ तें २६—पहिलें ब्रह्मीयुद्ध. १८२७—बर्बेरा व सोमाली किनारा यांचा कोंडमारा.१८३५—चांचा बेनी यसचा पराभव. १८३८—अफगाणिस्तानावर मोहीम. कराची व एडन घेतलें. १८४०—४२—चीनमध्यें युद्ध. १८४३ सिंधमधील युद्ध; मियानीची लढाई, हैद्राबाद घेतलें. १८४५तें४६—न्यूझीलंडमधील माओरी युद्ध. १८४८—४९—पंजाबमधील लढाई, मुलतानला वेढा. १८५२—दुसरें ब्रह्मी युद्ध, रंगून, मार्ताबान, बेसीन, प्रोम आणि पेगु जिंकू न घेतलें. १८५५—इराणशीं युद्ध, बुशायर, मुहामेरा आणि अहवाझ घेतलें. १८५६—५७ चीनमध्यें युद्ध. १७५७—५९—शिपायांचें बंड. १८५९—बेयट बेट घेतलें. १८६०—चीनशीं युद्ध. १८७१—अबिसिनियन युद्ध. १८८२—इजिप्तवर मोहीम. १८८५—पुनः इजिप्तवर मोहीम. १८८५—तिसरें ब्रह्मी युद्ध. १८८९—चीन-लशाई मोहीम. १८९६—स्वाकिन मोहीम. १८९७—पूर्व आफ्रिकेवर मोहीम. १८९९—१९०२ दक्षिण आफ्रिकेशीं युद्ध. १९००—०१—चीनमधील बॉक्सर बंड. १९०२—०४—सोमालीलॅंडवर मोहीम.

गेल्या महायुद्धांत रॉयल इंडियन मरीननें बरीच महत्त्वाची कामगिरी केली आहे. हिंदुस्थानच्या किनाऱ्याचें संरक्षण, युद्धसामुग्रीची वाहतूक, इराणचें आखात आणि सुवेझ कॅनाल यांतून झालेल्या लढाईंत भाग घेणें, लढाऊ जहाजें दुरुस्त करून पाठविणें वगैरे कामें या आरमारीखात्यानें केलेलीं आहेत व त्याबद्दल पार्लमेंटकडून त्याचा गौरवहि झालेला आहे.

मरीनचें काम पाहाण्यासाठीं एक डायरेक्टर, एक डेप्युटी डायरेक्टर, एक कॅप्टन सुपरिंटेंडेंट व इतर कमांडर, लेफ्टनंट, इंजिनियर, गोलंदाज हे अधिकारी असतात. डायरेक्टर

हा हिंदुस्थान सरकाराला सर्व आरमारी कामासंबंधीं सल्ला देतो. तो मुंबई गव्हर्मेंट डॉकयार्डमध्यें राहतो.

दि ई स्ट इं डी ज स्क्वॉ ड्र न.—हा रॉयल नेव्हीचा लढाऊ जहाजांचा काफिला १९०३ पासून हिंदी समुद्रांत ठेविलेला असतो. या काफिल्याच्या खर्चाबद्दल बादशाही सरकारला खंडणी द्यावी लागते. १८९६–९७ सालापासून ईस्ट इंडिया स्क्वॉड्रनमधील कांहीं जहाजांच्या तरतुदीसाठीं दरसाल १,००,००० पौंड द्यावे लागतात. या जहाजांनीं हिंदुस्थान सरकारच्या संमतीशिवाय एक विशिष्ट मर्यादा ओलांडावयाची नसते. [ इंडियन ईयर बुक ].

भा र ती य आ र मा र –युक्तिकल्पतरु ग्रंथांत नौकांच्या निरनिराळया जाती व नांवें दिलेलीं आढळतात. त्यांत युद्धनौका अथवा त्या प्रकारच्या उपयोगास येणाऱ्या नौका म्हणजे "सर्व मंदिरा" व "अग्रमंदिरा" याच दिसतात. "सर्व मंदिरा" नौका राजाचा खाजिना, घोडे वगैरे नेण्याच्या सोयीच्या असतात, व "अग्रमंदिरा" जलयुद्धास उपयोगी पडण्यासारख्या असतात. याच प्रकारच्या नौकेंतून तुग्रानें आपला पुत्र भुज्यु यास एका दूरच्या द्वीपांत राहणाऱ्या शत्रूवर पाठविलें असावें; या मोहिमेचा काय शेवट झाला हें ऋग्वेदांत (:१. ११६, ३,–५ ) आलेंच आहे. युद्धसामुग्रीसह विदुरानें तयार करून ठेविलेल्या अशाच नौकेंतून पांडव, आपल्या नाशार्थ रचलेल्या व्यूहांतून पळून गेले अशी महाभारतांत कथा आहे. रामायणांत अयोध्याकांडांत, ज्यांत शंभर शंभर कैवर्तयुवक शत्रूचा मार्ग अडविण्यासाठीं बसविले होते असें वर्णन असलेल्या पांचशें नावा अग्रमंदिराच होत्या. तसेंच अशाच नावांच्या साहाय्यानें वंगवासीयांनीं रघुस विरोध केल्याचें कालिदास वर्णन करतो.

कान्हेरी अजिंठा वगैरे प्राचीन लेण्यांतून जी नौकांचीं चित्रें काढण्यांत आलेलीं आहेत त्यांवरून प्राचीन भारतीय आरमाराबद्दल कल्पना करतां येते. या नौकांत अग्रमंदिरा व मध्यमंदिरा या जाती आढळतात. विजयानें सिंहलद्वीपांत पाय ठेविल्यावेळचा या ठिकाणीं काढलेला देखावा फारच प्रेक्षणीय आहे. जावामध्यें बोरबुदुरच्या देवळांत जी नौकांची चित्र मालिका आहे ती पाहिल्यास त्या काळच्या नौका कशा प्रकारच्या होत्या तें आढळून येतें. ख्रिस्तीशकाच्या पूर्वशतकांत भारतीयांनीं जावामध्यें वसाहती केल्यावेळचे ते देखावे आहेत ( ज्ञानकोश प्रस्तावना खंड, विभाग १, यांतील २१२ पानासमोरील चित्र पाहा ). या चित्रांतून कांहीं नौकांना शिडें उभारलेलीं आहेत, कांहीं बुडत आहेत, कांहीं नांगरल्या जात आहेत, कांहींतील लोक मासे धरण्याची करमणूक करीत आहे, वगैरे निरनिराळीं दृश्यें पाहण्यास मिळतात. यांतील नौका एकाच जातीच्या नसून, त्यांत कमी अधिक सोयी, लहान मोठेपणा, एक किंवा अधिक शिडें अशासारखे भिन्न प्रकार आहेत. जावांत जलधिमंत्रि या नांवाचा एक अधिकारी असे.

याखेरीज नाण्यांवरील नौकाचित्रें, उदाहरणार्थ इसवी सनाच्या दुसऱ्या अगर तिसऱ्या शतकांतील आंध्र नाण्यांवरील मोठ्या आकारांचीं दुशिडांचीं जहाजें, किंवा कुरुंबार व पल्लव नाण्यांच्या मागील बाजूवरील डोणीच्या आकाराची दुशिडीं मोठीं जहाजें यांवरून त्या त्या काळच्या आरमारांची कल्पना करितां येतें.

ऋग्वेदकालापासून इसवी सनाच्या पहिल्या शतकापर्यंत हिंदुस्थानच्या, फिनिशियन, ज्यु, असुरी लोक, ग्रीक, इजिप्तमधील लोक व रोमन लोक यांच्याशीं असलेल्या व्यापारी संबंधाचें अनेक उल्लेख ठिकठिकाणीं आढळतात. अर्थात् येवढ्या मोठ्या व्यापाराच्या संरक्षणार्थ लढाऊ आरमारहि सज्ज ठेवावें लगत असलें पाहिजे. मौर्यांच्या अमदानींत ( इ. स. पू. ३२१–१८४ ) तर याबद्दल स्पष्टच पुरावा आहे. या कालीं झालेल्या अलेक्झांडरच्या हिंदुस्थानावरील मोहिमांचा इतिहास ॲरियन, क्टेसिअससारख्या ग्रीक ग्रंथकारांनीं लिहून ठेविलेला आहे. त्यांत सैन्य वाहून नेण्यास अलेक्झांडरच्या दिमतीस २००० देश्य जहाजें असत असें म्हटलें आहे. जहाजें बांधणारांचा एक वर्ग असून तो सरकारी नोकरींत असे असें मेगॅस्थिनीझनें लिहिलें आहे. सिंहलद्वीपाच्या वर्णनांत प्लिनीनें म्हटलें आहे कीं, हिंदुस्थान व लंका यांमधील समुद्रांत चालणारीं विशिष्ट जहाजें बांधलेलीं असत; व या जुन्या जहाजांची वहनशक्ति साधारणपणें ७५ टन असे. सम्राट चंद्रगुप्ताच्या युद्धखात्यांतील सहा मंडळांपैकीं एक आरमारी मंडळ असून त्याचें अस्तित्व व सुव्यवस्था विशेष प्रकारची असल्याबद्दल उत्तम खात्रीलायक माहिती त्याच काळच्या कौटिलीय अर्थशास्त्र नामक ग्रंथांत सविस्तर मिळते. आरमारखात्याच्या वरिष्ठाला नावाध्यक्ष असें नांव असे. सर्व प्रकारच्या नावांवर देखरेख, बंदरावरील करवसुली, हीं कामें त्याच्याकडे असत. तसेंच बंदरासंबंधीं नियमांची अंमल बजावणी त्याजकडेच असे.

यानंतरच्या दोन तीन शतकांत हिंदुस्थानाचे रोमशीं व्यापारी व राजकीय दळणवळण होतें असे उल्लेख आहेत.

या वेळच्या तामीळ वाङ्मयांत दक्षिण हिंदुस्थानांतील कांहीं बंदरांविषयीं विश्वसनीय अशी माहिती मिळते. यांत विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे या चोल राज्यांतील बंदरांतून चुना व विटा यांनीं बांधलेलीं दीपगृहें असत, चोल आरमारांनीं बंगालचा उपसागर व हिंदी महासागर पालथा घालून गंगा, व इरावतीच्या मुखाजवळील प्रदेश, मलायी द्वीपसमूह वगैरे आपल्या कक्षेंत आणिले होते.

पूर्वेकडील दर्यावर्दी चळवळींतील विशेष महत्त्वाची व अभिमानाची गोष्ट म्हणजे भारतीयांनीं जावा बेटांत केलेल्या वसाहती होत. या वसाहत चळवळीला चेतना प्रथम कलिंग देशांत मिळाली. तेथून इ. स. ७५ त हिंदूंची एक मोठी

टोळी निघून जावांत उतरली व तेथील रहिवाशांची सुधारणा करून तेथें त्यांनीं आपला शक सुरू केला. दर्यावरील चळवळींत भाग घेणारा दुसरा मोठा वर्ग बंगाली लोकांचा. त्यांनीं ख्रिस्ती शकाच्या पहिल्या शतकांत धर्म, युद्धकला व दर्याव्यापार यांत मोठी कीर्ति मिळविली होती. हे लोक बौद्धधर्मप्रसाराकरितां व व्यापाराकरितां चीन, जपान व कोरियापर्यंत गेले होते. इसवी सनाच्या सहाव्या शतकांत हें हिंदुस्थान–चीनमधील दळणवळण फार वाढलें होतें. या सुमारास सिंध, कच्छ व गुजराथ या बाजूंकडील जाट लोक समुद्रावर विशेष कर्तबगार होते. त्यांची चांचेगिरी नाहींशी करण्याचा प्रयत्न चावडा कुळांतील गुर्जरांनीं सातव्या व आठव्या शतकांत केला; पण पुढें हे गुर्जर लोकच जास्त तापदायक चांचे बनले.

सातव्या ते अकराव्या शतकांपर्यंतच्या काळांत हिंदुस्थानचा चीन व जपानशीं संबंध अधिकच वाढून ब्रह्मदेशापासून चीनपर्यंतचा किनारा भारतीय वसाहतींनीं व बंदरांनीं गजबजून गेला होता. विशेषतः चोल राजांची सत्ता समुद्रावर फार वाढली होती. त्यांनीं बलिष्ठ आरमार बांधून बंगाल, बहार, ओरिसा व गुजराथ हे प्रांत आणि सीलोन व इतर बेटें हस्तगत केलीं व चीनला वकीलाती पाठविल्या. बाराव्या शतकापासून प्रथम मुसुलमानांचा व नंतर लवकरच यूरोपीय ख्रिस्ती लोकांचा भारतीय दर्यावर्दी लोकांशीं संबंध येऊनहि दूरदूर देशाचा व्यापार लवकरच यूरोपीयांनीं हस्तगत केला. अकराव्या शतकांत सुलतान महंमदानें जाट लोकांवर स्वारी केली व त्यांचा मोठा नाश केला. या लढाईत सुलतानाकडे १४०० व जाटांकडे ४००० बलिष्ठ जहाजें होतीं. असें तबकत इ-अकबरींत वर्णन आहे. १३व्या शतकांतील महत्त्वाची आरमारी मोहीम म्हणजे घियासुद्दीन बल्बन ( १२६९–८६ ) नें बंगालचा सुभेदार तुघ्रिलखान यावर केलेली होय. १४ व्या शतकांत सुलतान फिरोझशहा व तैमूर यांनां करावीं लागलेलीं जलयुद्धें व जलप्रवास यांचे उल्लेख आढळतात. पोर्तुगीजांच्या आगमनापर्यंत अहमदाबादचे सुलतान समुद्रावर सर्वांनां भारी होते. गुजराथच्या आरमारानें अनेकदां पोर्तुगीजांचा चांगला पराभव केलेला आहे.

मो ग ल का ल.—बाबरनें दोन जलयुद्धें केलेलीं आढळतात, एक गंगानदीवर व दुसरें घोग्रा नदीवर. अकबराच्या कारकीर्दीत आरमाराची कशी व्यवस्था होती हें ऐनी अकबरीवरून चांगलें समजतें, आरमारीखातें अगदीं स्वतंत्र असून त्याकडे नौकाबंधन व त्याची व्यवस्था, नद्या राखणें व त्यांवरील वहातुकीकडे लक्ष पुरविणें, करवसुली वगैरे कामें असत. या खात्याच्या मुख्याला 'मीरबेहरी' अशी संज्ञा असे. बंगालचें आरमार सुप्रसिद्ध आहे. त्याची माहिती तोडरमल्लाच्या 'औसिल तूमर जुम्मा' या जमाबंदीच्या ग्रंथावरून मिळेल. बंगालप्रमाणें सिंध हेंहि या वेळीं नौकानयनाचें एक प्रमुख केंद्र असे. बादशाही आरमाराप्रमाणें कांहीं हिंदु जमीनदारांचींहि लहान आरमारें असत. श्रीपुरचा अधिपति केदारराय यानें राजा मानसिंह व आराकानचा राजा यांनां नौकायुद्धांत जर्जर केल्याविषयीं उल्लेख आढळतो. श्रीपूरप्रमाणें बक्ल ( चंद्रद्वीप ) आणि चांडिकान ( सौगोरद्वीप) हीं हिंदी चळवळींचीं केंद्रें असत.

अकबरानंतर बादशाही आरमार फारसें खालावलें नाहीं. कारण मग–चांच्यांशीं त्याला टक्कर द्यावी लागे. या वेळीं कुचबिहारचें आरमार फार बलिष्ठ असे व तें पुष्कळदा बादशाही आरमारालाहि भारी होई. औरंगजेबाच्या वेळीं मीर जुमला हा नाविकाध्यक्ष असे. त्याच्या मृत्यूनंतर बंगाली आरमार खालावलें. तथापि शाहिस्तेखान सुभेदार झाल्यानंतर पुन्हां जहाजें बांधून बादशाही आरमार सुसज्ज करण्यांत आलें. त्यानें व्यापाऱ्यावर जहाजपट्टी बसविली होती. गोवळकोंड्याच्या बादशहाजवळहि व्यापारी आरमार असे. सुरतेस असणाऱ्या बादशाही आरमाराचें आधिपत्य जंजिऱ्याच्या सिद्दीकडे होतें. या काळांतील मराठ्यांचें व ब्रिटिशांचें आरमार यांवर स्वतंत्र माहिती दिलीच आहे.

मोंगल सत्ता खालावल्यावर भारतीय नौकानयनाला ब्रिटिशांनीं चांगलें प्रोत्साहन दिलें. ब्रिटिश अमदानींत मुंबई आरमाराला विशेष महत्त्व होतें. व तें उदयास आणण्याचें श्रेय लौजी नांवाच्या नौकाशिल्पज्ञ घराण्याकडे आहे. या घराण्याची मराठींत सविस्तर माहिती इतिहाससंग्रहांत आली आहे ( पु. ४, ७–९; ५. अ. १–३ ); ती व इतर "नौकानयन" या सदराखालीं येईल. १८६३ त आरमार बांधण्याचें काम हिंदुस्थानाबाहेर होऊं लागून भारतीय आरमार कायमचें बुडविण्यांत आलें.

[ आधार ग्रंथ—राधाकुमुद मुकर्जी–ए हिस्टरी ऑफ इंडियन शिपिंग. जॉन फिप्स—पेपर्स रिलेटिंग टु शिपबिल्डिंग इन् इंडिया. लो—दि हिस्टरी ऑफ इंडियन नेव्ही. लाकूपेरी—वेस्टर्न ऑरिजिन ऑफ चायनीज सिव्हिलिझेशन. युक्तिकल्पतरु. कौटिलीय अर्थशास्त्र. वेद संहिता व पुराणें. रघुवंश; शाकुंतल; रत्नावली; दशकुमारचरित्र वगैरे काव्यें ].

म रा ठ्यां चें आ र मा र.—मराठेशाहींत आरमाराची चांगली जोपासना होत असून तें अत्यंत वरिष्ठ होतें हें आतां बहुतेकांनां विदितच आहे. मराठ्यांच्या आरमाराचा इतिहास आंग्रे, धुळप, सांवतवाडीकर वगैरे घराण्याखालीं येणार असल्यानें या ठिकाणीं फार त्रोटक असा इतिहास घेतला आहे. तथापि त्यावरून या युद्धांगाची नीटशी कल्पना येण्यास व जिज्ञासा वाढण्यास अडचण येणार नाहीं.

इ. स. १६६१ मध्यें छत्रपति शिवाजी महाराज यांनीं मराठ्यांच्या आरमाराची प्रथम स्थापना केली. हबशी लोकांचा पाण्यांतील किल्ला जो जंजिरा तो जिंकून घेण्याकरितां या आरमाराची आवश्यकता मराठ्यांस उत्पन्न झाली, व त्यांनीं त्यावेळीं तें उभारलें असें दिसून येतें. त्यांनीं

प्रथम गुराबा, तरांडी, गलबतें, शिबाडें, पगार, मचवे अशीं निरनिराळ्या प्रकारचीं जलवाहनें तयार केलीं. नंतर शिवाजी महाराजांनीं कोंकणावर चाल करून वाडीकर सांवतांपैकीं तानाजी सांवत व रामदळवी यांस आपल्या आरमारावर अधिकारी नेमलें. इ. स. १६६४ मध्यें सिंधुदुर्ग जंजिरा बांधला व कुलाबा, सुवर्णदुर्ग व विजयदुर्ग हे किल्ले सुधारून तेथें जहाजें बांधण्यास सुरुवात केली. इ. स. १६६५ मध्यें शिवाजीनें कारवारपर्यंत कोंकण किनारा आपल्या आरमाराच्या " जोरावर जिंकून घेतला. या वेळीं शिवाजीच्या आरमारांत फ्रिगेट्स " म्हणजे ३० पासून १५० टन वजनाचीं व एक डोलकाठीचीं जहाजें ८५ होतीं. तीन डोलकाठ्यांचीं मोठालीं जहाजें तीन होतीं. ह्यानंतर १६७३ मध्यें मोठीं लढाऊ गलबतें ५७ झालीं व इ. स. १६७९ मध्यें तीं ८६ पर्यंत वाढलीं. ह्याप्रमाणें शिवाजीचें आरमार वाढत गेलें. ह्या आरमारावर शिवाजीचे मुख्य अधिकारी इब्राहिमखान, दौलतखान, दर्यासारंग, मायनाक भंडारी वगैरे होते. त्यांनीं आरमाराचें काम उत्तम प्रकारें करून मराठ्यांचें नांव दर्यायुद्धामध्यें गाजवून सोडिलें. या सालीं खादेरी बेटावर शिवाजीचें आरमार चालून गेलें. त्याच्या आरमाराचा मुख्य हेतु कोंकण किनारा परशत्रूंपासून रक्षण करण्याचा असे. आरमाराच्या सोयीसाठीं त्यानें १३ जंजिरे बांधिले. कोणत्याहि राजकीय आरमारास मराठ्याचें या वेळचें आरमार भारी होतें, असें इंग्रज इतिहासकारानींहि कबूल केलें आहे. शिवाजी महाराजांच्या मागून संभाजीनें आपल्या आरमारानिशीं जंजिऱ्यावर स्वारी केली पण त्यांत त्यास यश आलें नाहीं. राजारामाच्या कारकीर्दींत सिधोजी गुजर हा मराठ्यांच्या आरमाराचा अधिपति झाला. त्याच्या हाताखालीं कान्होजी आंगरे हा दर्यावर्दी युद्धामध्यें पुरा कुशल सरदार पुढें प्रसिद्धीस आला. राजारामानें त्यास 'सरखेल' हें पद देऊन मराठ्याच्या आरमाराचें मुख्य आधिपत्य सांगितलें. कान्होजी आंगऱ्यानें मराठ्यांच्या आरमाराची अतिशय सुधारणा केली व इंग्रज, फिरंगी, फरासीस्ट आदि करून सर्व परराष्ट्रीय लोकांस आरमाराच्या जोरानें नतिजा देऊन मराठ्यांची सत्ता समुद्रात फार वाढविली. आंग्र्याच्या आरमारांत ह्यावेळीं ३००टन वजन वाहण्याइतकीं मोठीं जहाजें असून त्यावर १६ पासून ३०पर्यंत लढाऊ तोफा होत्या. मोठ्या गुराबा १०, व लहान गलबतें ५० इतकें कान्होजीचें आरमार होतें. या आरमाराच्या जोरावर त्यानें परराष्ट्रीय जहाजांस हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्यावर मुंबईपासून कालिकतपर्यंत अगदीं फिरकूं दिलें नाहीं. भूमध्य समुद्रांतील ' अल्जेराईन्स ' नामक चांच्यांचें नांव ऐकतांच ज्याप्रमाणें तिकडील जहाजांचा थरकाप होतो, त्याप्रमाणें आंग्र्यांचें नांव ऐकतांच इकडील जहाजांचा थरकाप होत असे असें लो नांवाच्या इतिहासकारानें म्हटलें आहे. कान्होजी आंग्र्याच्या आरमाराची माहिती फार मनोरंजक आहे. त्याचा व इंग्रज गव्हर्नरांचा जो पत्रव्यवहार झाला होता, त्यावरून कान्होजी आंग्रे किती धूर्त व चतुर होता हें चांगलें दिसून येतें[कान्होजी आंग्रे पहा]. कान्होजीच्या मागून त्याचे पुत्र संभाजी, मानाजी व तुळाजी यांच्या कारकीर्दींत आंगऱ्यांच्या आरमाराला उतरती कळा लागली. या बंधूंमध्यें आपापसांत भांडणें झालीं त्यामुळें परकीयांस या भांडणाचा फायदा घेऊन पश्चिमकिनाऱ्यावर चंचुप्रवेश करण्यास संधि मिळाली. कान्होजीचा मुलगा संभाजी ह्यानें ४०० टन वहनशक्तीचीं जहाजें केलीं. आपल्या खंबीर आरमाराच्या जोरावर त्यानें सर्व यूरोपियन राष्ट्रांस अगदीं जेरीस आणिलें; परंतु त्याच्या गृहकलहामुळें मराठ्यांच्या आरमाराचा नाश झाला. संभाजीच्या मागून तुळाजी हा विजयदुर्गाच्या आरमाराचा अधिपति झाला. त्यानें इंग्रजांचीं जहाजें पाडाव केलीं व त्यांस मनस्वी त्रास दिला. ह्याप्रमाणें तो पेशव्यांसहि जुमानेनासा झाला. तेव्हां पेशवे व इंग्रज एक होऊन त्यांनीं विजयदुर्गावर चाल करून तुळाजीच्या आरमाराचा फडशा पाडिला. इ. स. १७५६ मध्यें ' घेरियाची लढाई ' म्हणून इतिहासांत जी लढाई प्रसिद्ध आहे तीच ही होय. ह्या वेळीं तुळाजी आंग्र्याजवळ ७४ तोफांचें एक मोठें पाल, २० पासून ३० तोफांच्या ८ गुराबा आणि लहानमोठीं साठ गलबतें एवढें मोठें आरमार होतें. हिंदीमहासागरांतील तीन्ही यूरोपियन राष्ट्रांस पराक्रमाच्या कामांत आंगरे यांनीं खालीं पहावयास लाविलें असें खुद्द इंग्रज इतिहासकार डग्लस लिहितो. परंतु खुद्द पेशवेच विरुद्ध झाल्यामुळें त्याच्या आरमाराचा फार नाश झाला [ ' आंगरे ' पहा ].

इ. स. १७५६ मध्यें आंगऱ्यांची आरमारी सत्ता नाहींशी केल्यावर पेशव्यांनी विजयदुर्ग येथें स्वतःचें आरमार उभारलें. ह्या आरमारावर आनंदराव धुळप नामक एक रणशूर दर्यावर्दी सरदार मुख्य नेमिला होता. इ.स. १७६५त आनंदराव धुळप यास जी पुढील प्रमाणें सनद दिली आहे तींत ( थोरले माधवराव पेशवे यांची रोजनिशी ) "सुभा आरमार येथील बंदोबस्त एक हातीं जरूर जहाला पाहिजे. सरदारीचा बंदोबस्त तुम्हांकडे आहे. परंतु कारभाराचा बंदोबस्त एक हातीं नाहीं. दर्यामध्यें टोपीकरांची बदनजर; तेव्हां गहाळ माणूस दूर होऊन चांगल्या माणसांची जगजोड होऊन शिलशिला शिलेपोस असावा. आरमार जर्जर जहालें आहे, त्याची मरामत होऊन जहाली पाहिजे, " इत्यादि मजकूर आहे. यावरून पेशव्यांचें आरमाराकडे किती लक्ष होतें हें दिसून येईल. आनंदराव धुळपानें इ. स. १७६४ पासून इ. स. १७९४ पर्यंत म्हणजे सुमारें तीसवर्षें मराठ्यांच्या आरमाराच्या सेनापतीचें काम केलें. ह्याच्या ताब्यांत लढाऊ सुमारें ५० मोठीं जहाजें असून त्यावर दोनतीन हजार सैन्य व तीनशें पर्यंत तोफा होत्या. ह्या लढाऊ-जहाजांमध्यें जीं जीं प्रमुख जहाजें होतीं त्यांचीं नांवें अशीं:— नारायणपाल, महादेवपाल, दत्तप्रसाद, आनंदप्रसाद, शिव-

प्रसाद, गणेशप्रसाद, गंगाप्रसाद, दर्यादौलत, समशेरजंग, फत्तेजंग इत्यादि होतीं. ह्या प्रत्येक जहाजावर ३००–४०० पर्यंत हशम म्हणजे लढाऊ लोक होते. नारायणपालावर २८ तोफा व चार जुंबरे असत. ह्या आरमाराचा सालीना खर्च दीड दोन लाख रुपये पर्यंत होता. आरमार सुभ्याकडे एक स्वतंत्र महाल तोडून दिलेला असे. ह्या आरमाराचे सेनापति आनंदराव धुळप व त्यांचे बंधु हरबाजी धुळप, जानोजी धुळप वगैरे शूर धुळप मंडळी ह्यांनीं दर्यायुद्धामध्यें फार वाहवा मिळविली व आपला दरारा समुद्रावर उत्कृष्ट प्रकारचा ठेविला. ह्या धुळपाप्रमाणेंच विचारे, सुर्वे, कुवेसकर, जावकर इत्यादि आरमारी सरदारांनीं फार शौर्य गाजविलें. आनंदराव धुळपाच्या शौर्याची हकीकत ग्रांटडफच्या इतिहासांत विशेष नाहीं. इ. स. १६८३ आनंदराव धुळपाचें आरमार व इंग्रज आरमार यांमध्यें लढाई होऊन इंग्रज आरमाराला हार खावी लागली [ आनंदराव धुळप पहा ].

मराठ्यांच्या आरमाराची व्यवस्था व समुद्रांतील परकीय जहाजांवरील व व्यापारी जहाजांवरील कौलावण, मोहोरणावळ, वलवा, नजर, मिठारु, शिबाड व पैदास्त वगैरे अनेक बाबी लक्षांत घेण्या जोग्या आहेत. त्यांचा अभ्यास स्वतंत्रच झाला पाहिजे.

मराठ्यांचें आरमार असतांना कोकण पट्टीवर आपला अंमल बसविण्याची इंग्रजांना छाती झाली नाहीं. मराठ्यांचें आरमार त्या वेळच्या स्थितीप्रमाणें उत्तमस्थितीप्रत पोंहोचलें असून मराठ्यांचें राष्ट्र दर्यावर्दी युद्धांत निष्णात होतें व त्या दृष्टीनें त्यांच्यामध्यें कांहीं उणीव नव्हती

[वाङ्मय—मराठे व इंग्रज. पेशव्यांच्या रोजनिशी. भा. इ. सं. मं. वार्षिक अहवाल. (शके १८३ :)च्या अहवालांत धुळप यांच्या आरमाराची माहिती आहे. ) आंगरे यांची हकीकत इतिहाससंग्रह पु. १ व मराठी रिसायत, मध्यविभाग २ यांत सांपडेल. पारसनीस—मराठ्यांचें आरमार. केसरी ता. ९ फेब्रुवारी १९०४ ग्रँटडफ, मुं. गॅ — कुलाबा व जंजिरा.

**आरमोरी**—हें गांव चांदा जिल्ह्यांत असून वनगंगेच्या उत्तर तीरावर चांद्यापासून ८० मैल दूर ईशान्य दिशेस आहे. हें वैरागड परगण्यांतील गांव असून व्यापाराच्या दृष्टीनें चांदा जिल्ह्यांत याचा तिसरा नंबर लागतो. या गांवीं जाडें व बारीक कापड, देशी गाड्या व तसर रेशीम हे पदार्थ बनतात. येथील बाजारांत विशेष प्रमाणानें पूर्वेकडील जंगली भागांतून जंगलचे पदार्थ, गुरें व लोखंड येऊन ते पश्चिमेकडील देशांच्या जिनसाच्या मोबदला दिलें जातें. याचा बाहेर गांवाचा व्यापार म्हटला म्हणजे वऱ्हाड, वर्धा नागपूर, भंडारा, छत्तिसगड, बस्तर व पूर्व किनारा यांच्याशीं आहे. पावसाळ्यांत येथील व्यापार नौकेच्या योगानें व वैनगंगेतून चालतो. इ. स. १८७०च्या सुमारास येथें मालावर महसूल ( ऑक्ट्राय)घेतला जात असे. इ. स. १८६६–६७ सालीं याचें उत्पन्न २००० रुपये झालें. या ठिकाणीं पोलीसचें ठाणें, मुलामुलींची शाळा व सुंदर बाजारगृहें हीं आहेत. ( म. प्रां. गॅ. १८७० ).

**आरल**—हें पश्चिम आशियांतील एक सरोवर असून उत्तर अक्षांश ४३°३०’ ते ४६° ’५१’ व पूर्व रेखांश ५८°१३’ ते ६१° ५६’ . यांचे दरम्यान आहे. या सरोवराचें क्षेत्रफळ २६२३३ चौरस मैल असून जगांतील मोठ्या सरोवरांत हें चौथें आहे. पाण्याची खोली सरासरी ५० फूट असते. समुद्रसपाटीपासून हें सरोवर सरासरी १५० फूट उंचीवर आहे.

च तुः सी मा.—उत्तरेकडे रशियामधील विस्तीर्ण माळरानें दक्षिणेकडे खिवामधील मळीचा प्रदेश; पूर्वेकडे कायझिलकम अथवा तांबडे वाळवंट; पश्चिमेकडे कास्पियन समुद्रापासून सरोवरास वेगळें करणारें उस्ट-उर्टचें खडकाळ पठार. ऑक्सस अथवा अमुदर्या व जक्सार्टिस् अथवा सरदारिया अशा दोन मोठ्या नद्या या सरोवरास मिळतात. या नद्यांमुळें सरोवरांत बराचसा गाळ वाहून येतो. सरोवराचा दक्षिण किनारा बहुतेक अमूच्या मुखानें ( डेल्टा ) व्यापला गेला असून त्यामुळें ८० मैल लांब व २० मैल रुंद असा एक मोठा दलदलीचा प्रदेश निर्माण झाला आहे. पूर्वकिनाऱ्यावर बरेच लहान लहान बेटांचे समूह आहेत. कग–आरल हें सर्वांत मोठें बेट आहे. सदोदित सोसाट्याचा वारा वहात असल्यामुळें व सरोवरांत कोठेंहि आसऱ्याचें ठिकाण नसल्यामुळें नौकानयाच्या दृष्टीनें हें फार धोक्याचें आहे. प्राचीन काळीं या सरोवराचें क्षेत्र बरेंच विस्तृत असावें. दिवसानुदिवस तें अकुंचित होऊं लागलें आहे. त्याचप्रमाणें प्राचीनकाळीं सरोवराच्या पाण्याची पातळी सध्यांपेक्षा बरीच उंच होती व उस्ट–उर्ट पठाराच्याद्वारें सरोवर कास्पियन समुद्राशीं जोडलें गेलें असा कांहींचा समज आहे. व हा समज बराचसा खरा असावा. कारण, सरोवराच्या दक्षिणेस असलेल्या कारा–कम वाळवंटांत प्राचीन कालीन पाण्याचें अस्तित्व सुचविणाऱ्या विशिष्ट प्रकारच्या शिंपा सध्यां सांपडतात. कारा–कम वाळवंट सध्याच्या सरोवराच्या सपाटीपासून ७० मैल उंचीवर आहे. यावरून सरोवराची सपाटी, पूर्वी बरीच उंच असावी हें निर्विवाद आहे. सरोवराच्या किनाऱ्यावर गांवें वसलेलीं नाहींत. लगतचीं गांवें म्हणजे सर नदीवरील पूर्वेकडे ५० मैलांवर कझाला हें गांव व अमूच्या मुखप्रांतातील चेम्बाई व कंग्रड हीं दोन गांवें हीं होत. पाण्याला समुद्राच्या पाण्याइतका खारटपणा नाहीं; क्षारांशाचें प्रमाण फक्त शें. १.०५ आहे. मासे विपुल सांपडतात व त्यांची निर्गत तुर्कस्तान, मर्व्ह व रशिया या देशांपर्यंत आहे. [एब्रि.]

**आरसा**—आदर्श व काच हे दोन्हींहि शब्द संस्कृत भाषेंत फार प्राचीन काळापासून रूढ असल्यामुळें आरसा तयार करण्याची कृति भारतीय लोकांस

पुरातन काळीं माहीत असावी असें वाटतें. परंतु कांचेचे आरसे केव्हांपासून प्रचारांत आले या संबधीं विश्वसनीय ऐतिहासिक माहिती सांपडत नाहीं.

एट्रुस्कन, ग्रीस व रोमन लोकहि प्राचीन काळीं धातूचेच आरसे वापरीत, प्लिनीनें सिडॉन येथें कांचेचे आरसे तयार करीत असल्याचा उल्लेख केला आहे. (नॅच. हिस्टरी ३६. ६६. १९३ ). पण या आरशांचा फारसा प्रचार नसावा. होमरला आरश्याविषयीं कांहीं माहिती नव्हती असें दिसतें.

ग्रीक वगैरेंनीं इजिप्शियनांपासूनच आरश्यांची कला उचलली. यूरोपमध्यें सोळाव्या शतकाच्या प्रारंभापासून काचेचे आरसे प्रचारांत येऊं लागले. या पूर्वी म्हणजे बारा ते पंधराव्या शतकाच्या दरम्यान धातूचे केलेले खिशांत ठेवण्यासारखे लहान आरसे वापरण्यांत येत असत. चांदी, पोलाद किंवा ब्रांझ (तांबे व कथील ह्यांची मिश्र धातु ) या धातूचा तुकडा झांकण असलेल्या तवकडींत किंवा दांडा असलेल्या लांकडाच्या चौकटींत घट्ट बसवून त्याचा आरशाप्रमाणें उपयोग करीत असत. त्यावेळच्या स्त्रियांच्या पोशाखांत अशा तऱ्हेचा दांडा लावलेला आरसा ही एक शोभेची वस्तु म्हणून गणली जात असे. तो आरसा कंबरपट्टयांत लटकावून देत असत. प्राचीनकाळीं आरसा ही इतकी अमोलिक चीज समजत कीं, ६२५ सालामध्यें चवथा पोप बानिफेस यानें नार्दंब्रिआची राणी एथेलबर्गा हिला चांदीचा आरसा नजराणा म्हणून पाठविला होता असा उल्लेख आढळतो.

सोळाव्या शतकाच्या आरंभीं जर्मनीमध्यें काचेचे लहान बाह्य गोल आरसे तयार करीत असत व त्यांना ' बुल्स आय ' असे म्हणत. व्यापारी धोरणावर काचेचे आरसे तयार करण्याची कला प्रथम व्हेनिस शहरांत निघाली. म्यूरानो गांवच्या दोनच रहिवाश्यांनां आरसे करण्याची कला माहीत होती म्हणून वीस वर्षेपर्यंत त्यांच्याखेरीज इतर कोणीहि आरसे बनवूं नयेत असा १५०७ मध्यें निर्बंध घातला होता. व्हेनिसमध्येंहि आरसे तयार करणारांनां १५६४ सालीं विशेष सवलती मिळाल्या होत्या. व त्या योगानें कांचेचे आरसे मागें पडले. फ्रेंच मिनिस्टर कोलबेर ह्याच्या संग्रहीं चांदीच्या चौकटींत बसविलेला ४६ इंच लांब व २६ इंच रुंद आरसा होता. त्याची किंमत कोलबेरच्या निधनानंतर रुपये ४००० वर झाली.

आपल्या देशांतील आरशाची कला परदेशीं जाऊं नये म्हणून व्हेनिस येथील अधिकारी फार दक्ष असत. एखादा कारागीर दुसऱ्या देशांत जाऊन आरसे करूं लागला तर त्याच्या घरच्या मंडळीस कैदेंत टाकीत व इतकें करूनहि तो कारागीर परत नच आला तर त्याच्यावर मारेकरी घालवयासहि कमी करीत नसत.

हिंदुस्थानांत प्रथम आरशांचा प्रचार कधींपासून सुरू झाला तें नक्की सांगतां येत नाहीं. कौषीतकी उपनिषदांत, (' एष आदर्शे पुरुषस्तमेवाहमुपासे '—आरशांतल्या पुरुषाची मी उपासना करितो ४, ११ ) आदर्श असा उल्लेख आलेला आढळतो. ख्रिस्ती शकाच्या प्रारंभीं उत्तर हिंदुस्थानांत धातूचे आरसे असत असा मिलिंदपन्हावरून ( ४. १, ६० )तर्क होतो. त्यापुढील वाङ्मयांत तर आरशांचा उल्लेख जागजागीं सांपडतो.

जपानांत जादूचे आरसे म्हणून असतात. त्यांच्या पाठीवर चित्रें, नक्षी वगैरे काढिली असते. त्यांच्यावर सूर्यकिरण पडलें कीं, त्यांच्या मागील बाजूचें प्रतिबिंब समोर वठतें. याचें कारण त्यांच्या घडणींत दिसून येतें. आयर्टन आणि पेरी यांनीं या प्रकारच्या आरशांचा इतिहास कारागिरी वगैरे सविस्तर विवेचिलीं आहेत. ( प्रोसि. रॉयल, सो. १८७८, पु. २८.)

काचेच्या मागें एखाद्या चकचकीत धातूचें पूट दिलें म्हणजे त्या कांचेंत प्रकाशाचें परावर्तन करण्याचा धर्म उत्पन्न होतो. असा आरसा करण्याच्या पुष्कळ कृती आहेत त्यापैकीं कांहीं महत्त्वाच्या येथें दिल्या आहेत. तसेंच त्याकरितां इतर सामान कोणतें लागतें त्याचेंहि वर्णन केलें आहे.

प्र का र प हि ला.—आरसा ज्या आकाराचा करणें असेल त्या आकाराची एक चिनी मातीची तवकडी घ्यावी व तींत ती कांच पुसुन स्वच्छ करून ठेवावी ( हें काम एका खोलींत तांबडा दिवा लावून करावें ) व तीवर पुढील मिश्रणापैकीं नं. १ चें मिश्रण एकदम टाकावें व नंतर नं. २।३चें मिश्रण मिसळून टाकावें म्हणजे५ मिनिटांत त्यावर रुप्याचा मुलामा चढेल व अति उत्तम आरसा तयार होईल. नंतर त्यावर शेंदराचा रंग पातळ करून सावकाश चोहोंकडे सारखा लावावा व वाळवावा म्हणजे आरसा तयार झाला.

नं. १ चें मिश्रणः—सिल्व्हर नैट्रेट १ औंस व पाणी १३ पौंड ह्याचा द्रव करून निळ्या रंगाच्या बाटलींत भरून ही बाटली नेहमीं अंधारांत ठेवावी.

नं. २ चें मिश्रणः—क्रीम ऑफ टार्टर २० औंस, पाणी १० औंस.

नं. ३ चें मिश्रणः—लिक्विड अमोनिया १० औंस, पाणी ५ पौंड.

या तिन्ही मिश्रणांचें—प्रमाण नं. १ चें मिश्रण २० भाग नं. २ चें ५ भाग व नं. ३ चें ५ भाग.

सूचनाः—नं. १ चें मिश्रण ओतणें तें त्यांत चांगली कांच बुडेल इतलें असावें व तें मोजून घालावें व त्या मानानें बाकीचीं दोन्ही मिश्रणें एकमेकांत मिसळून त्या कांचेवर ओतावीं.

प्र का र २ रा.—कांच तयार झाल्यावर एक सपाट शिळा किंवा तक्ता घेऊन त्यावर बिनखळीचा कागद पसरावा आणि खडूची बुकणी फडक्यांत बांधून ती पोटली त्या

कागदाच्या चौफेर पसरेल अशी झटकावी, नंतर त्यावर दुसरा पातळ कागद अंथरून त्यावर कल्हईचा पांढरा वर्ख कांचेस पुरेल इतका ठेवून त्यावर चौफेर पारा ओतावा. मग ज्या काचेवर पारा चढवावयाचा असेल ती कांच धुवून पुसून स्वच्छ करावी, आणि त्यांवर ठेवावी मग डाव्या हातानें वजन सारखें बसेल असा भार ठेवून दाबावें म्हणजे त्या वर्खावर पारा अधिक असल्यास तो चोहोंकडून बाहेर पडेल. नंतर त्यास धक्का न लागतां उजव्या हाताचा दाब देऊन कांहींसा भार टाकावा. म्हणजे कांचेस पारा लागून एकजीव होईल. नंतर जरूर वाटल्यास हलकेसें वजन त्या कांचेवर ठेवून कांहीं उशीरानें कांचेच्या पाठीस धक्का न लावतां ती काढून घ्यावी म्हणजे चवकटींत बसविण्याची कांच तयार झाली.

प्र का र ३ रा.—कथील ६ औंस, विस्मिथ २१ औंस, शिसें १० औंस. हीं सर्व एकत्र वितळवून त्यांत थोडा पारा घालावा म्हणजे कांहीं वेळानें तें मिश्रण धातूसारखें घट्ट बनतें. नंतर ज्या कांचेला कल्हई करणें असेल ती कांच स्वच्छ करून त्या कांचेच्या एका बाजूस धातूची आपण कल्हई करतो त्याप्रमाणें कल्हई केली असतां आरसा बनतो.

प्र का र ४ था.—शुद्ध शिसें १ औंस व कथील १३ औंस. या दोहोंचा एका पात्रांत अग्नीवर रस करून त्यांत १ औंस बिस्मथ मिश्र करावें. नंतर खालीं उतरून त्यांत १० औंस पारा मिसळावा. हें मिश्रण कांचेवर लाविलें असतां चांदी प्रमाणें चकाकी काचेवर दिसेल.

प्र. ५–प्लाटिनम क्लोराइड वापरून फ्रान्समध्यें आरसे करतात

आ र शा क रि ता कां च शु द्ध क र ण्या चीं रीं त.—शंख जिऱ्याची भुकटी १० भाग, कोळसा ५ भाग, खडू १० भाग, प्लास्टर आफ पारिस २० भाग व अभ्रक ५. भाग ह्या सर्वांची पूड करून पाण्यांत कालवून फडक्यानें कांचेवर चोळावी व शेवटीं कापसानें सर्व कांच पुसावी म्हणजे अगदीं स्वच्छ होते

चांदी चढविण्यासाठीं जें मिश्रण तयार करावयाचें त्यांत वाफेच्या पाण्याची आवश्यकता असते. विहिरीचें किंवा तलावाचें पाणी कितीहि गोड व स्वच्छ असलें, तरी तें चालत नाहीं. पावसाचें धरलेलें पाणी उपयोगांत येतें तें न मिळाल्यास कापरस्टिलच्या सहाय्यानें शुद्ध पाणी तयार करावें.

[ सं द र्भ ग्रं थ.—विविधकलाशतक; उद्यम मासिक (जून–जुलै १९१९) स्मिथ–डिक्शनरी ऑफ ग्रीक अँड रोमन अँटिक्विटीज. ए. रिएए. त्रि. विल्किन्स–मॅनर्स अँड कस्टम्स ऑफ दि एन्शंट इजिप्शियन्स. गाईड टु मेडिइव्हल रूम, ब्रिटिश म्युझियम १९०७ ]

**आरसिविडी**—(मुंबई इलाखा.) विजापूर जिल्ह्याच्या हुनगुंद तालुक्यांतील एक खेडें. १५° ५३' उत्तर अक्षांश व ७६° ०' पूर्व रेखांश.

सहाव्या विक्रमादित्यानें ( इ. स. १०७६–११२६ ) बसविलेली विक्रमपूर नांवाची चालुक्यांची राजधानी याच ठिकाणीं होती. या राजांच्या कारकीर्दींत चालुक्यांची सत्ता कळसास पोंचली होती. या राजानें गोवा, व उत्तरेकडे नर्मदा व कोंकणपर्यंत आपलें राज्य पसरविलें होतें. किती काळ विक्रमपूर राजधानीचें गांव होतें हें सांगणें जरी कठीण आहे तरी कलचुरींनीं हें राज्य बळकावल्यावरहि (इ. स. ११५१) या गांवाचें महत्त्व कमी झालें नव्हतें. येथें दोन पडकीं जैनांचीं देवळें असून जुन्या कानडी लिपींत दोन शिलालेख आहेत.

हल्लीं येथें वस्ती नाहीं; ज्वारी, गहूं, हरभरा, कापूस हीं पिकें होतात. (इं. गॅ. ५.; बॉ. गॅ. २३ )(अक्कादेवी पहा)

**आराकान, वि भा ग**—या विभागास आराकान हें नांव या देशाचें मूळचें नांव जें " राकाइंग " त्यावरून पडलें आहे. 'मग' ग्रंथकार या नांवाची निरनिराळ्या प्रकारें व्युत्पत्ति सांगतात; त्या सर्वांत ' रकक ' नांवाच्या एका नरमांसभक्षक राक्षसाच्या नांवावरून बहुतकरून हें नांव पडलें असावें हें जास्त संभावनीय वाटतें. विषुववृत्ताच्या उत्तरेस उत्तर अक्षांश १७°१५' ते २२°३०' व ९२°११' ते ९४°५२' पूर्व रेखांश एवढ्या भागावर या प्रांताची व्याप्ति आहे.

सीमाः–उत्तरेस 'नाफ' नदी व चितागांग आणि हा प्रांत यांच्यामध्यें असलेली एक पर्वतांची रांग आहे. पूर्वेस 'योम' पर्वत असून त्या योगानें ब्रह्मदेशापासून हा प्रांत तोडला जातो. दक्षिणेस याच प्रांताचें एक निमुळतें टोंक आलें आहे त्यास 'पॅगोडा' भूशिर म्हणातात, आणि पश्चिमेस बंगालचा उपसागर; येणेंप्रमाणें या प्रांताच्या सीमा आहेत. या प्रांताची जास्तींत जास्त रुंदी म्हणजे उत्तरभागाची होय व ती सुमारें ९० मैल आहे. पण एकंदर प्रदेशाची सरासरी रुंदी सुमारें ५० पासून ६० मैल येईल. एकंदर क्षेत्रफळ अजमासें १६५०० चौरस मैल आहे. साधारणपणें, प्रदेश डोंगराळ आहे तथापि समुद्रकिनारा व डोंगर यांमध्यें पुष्कळ सपाट भाग आहे, पण तो बहुतकरून दलदलीचा आहे. नद्या व ओढे या प्रांतांत चोहोंकडे आहेत. 'रामरी' व 'चेडुबा' हीं दोन बेटें मुख्य प्रदेशापेक्षां अधिक उंचीवर वसलेलीं आहेत, त्यामुळें पावसाळ्यांतहि सपाटभाग पुरामुळें बुडले तरी या बेटांस क्वचितच उपसर्ग पोहोंचतो.

' योम 'पर्वताच्या रांगेस जिकडे तिकडे फांटे फुटले आहेत व त्यांमुळें या प्रांताचा पश्चिमभाग म्हणजे उंच पर्वत व खोल दऱ्या यांचें बनलेलें एक जाळें होय असें वाटतें. आराकानच्या अगदीं उत्तरेस ' योम ' पर्वताचें सर्वांत उंच शिखर समुद्रसपाटीपासून सुमारें ५००० फूट ( अगर अधिकच ) येईल. येथपासून 'पॅगोडा' भूशिरापर्यंत या पर्वताची उंची एकसारखी कमी होत गेली आहे. ती इतकी कीं, पॅगोडा टोंकाजवळ तर ती सुमारें १००।२०० फूट भरेल. मुख्य मुख्य पर्वतरांगा उत्तर–दक्षिण अशा गेलेल्या आहेत व पर्वतावर झाडी बरीच आहे. तरी सुद्धा ते 'कीन्स' व इतर रानटी लोकांच्या टोळ्या यान

जमीन नांगरण्यास व लहान लहान खेडीं वसविण्यास हे उपयोगीं पडतात.

अक्यावपासून ते सँडोवेपर्यंत समुद्रकिनारा बेटांनीं भरून गेला आहे; यांपैकीं कांहीं मोठीं असून तेथें वस्ती आहे व कांहीं लहान आहेत तथापि एकंदर प्रदेशाला शोभा आणतात. अक्याब जिल्ह्यांतील 'मयु' 'कोलाडन' व 'लेमरू' या नद्यांतून ३०-४० मैलपर्यंत २००-३००टनांचीं जहाजें जाऊं शकतात. या मोठ्या नद्या सोडून दिल्या तर 'टलक' 'इंग' व 'सँडोवे' या नद्यांतूनहि होड्या जाऊं शकतात. लहान लहान ओढे तर विपुल आहेत व त्यामुळें दळणवळणाचा मार्ग सुलभ झाला आहे.

जमीनः—समुद्रालगतची जमीन रेताड आहे; किनारा व डोंगराळ प्रदेश यांमधील सपाट भूभाग यांतील माती काळी आहे. सगळयांत सुपीक असलेल्या जमीनींत सपाटून पीक येतें तर बरीच जमीन अशी आहे कीं नांगरलेली असूनहि त्याच्या निम्म्यानेंहि पीक हातीं लागत नाहीं.

खनिजः—भूगर्भशास्त्रदृष्ट्या ह्याची पहाणी अजूनपर्यंत केली आहेसें दिसत नाहीं. भूगर्भांत जो खडक असतो त्या-खडकांपैकीं (शास्त्रांतील क्रमाप्रमाणें ज्याला पहिला थर म्हणतां येईल ) पहिल्या थरालगतचा खडक स्लेट असावा असें दिसतें. लहान टेंकड्यावर पुष्कळ ठिकाणीं सँडस्टोन सांपडतो व किनाऱ्यावर पुष्कळ जागीं पोंवळीं आढळून येतात. 'रामरी' बेटाच्या उत्तर टोंकाजवळ लोखंड सांपडतें व दक्षिण टोंकाजवळ चुनखडी आढळते. कोळसाहि जागोजाग शोधून काढण्यांत आला आहे. आणि आराकान पर्वताच्या पोटीं आणखीहि खनिज संपत्ति सांपडेल, असें वाटतें, मात्र ती शोधून काढण्यास तेथील रहिवाशांपेक्षां अधिक हुशार लोक पाहिजेत.

वनस्पतीः—या प्रांतांतील वनस्पतींचें निरीक्षण करून वर्गीकरण अजून केलें नाहीं. पर्वतावर सागाचीं झाडें व इमारतीस उपयोगीं पडणारें इतर लांकूडहि सांपडतें, ऐवढेंच कीं जेथें त्याचा उपयोग आहे तेथें वाहून नेण्याचें मात्र साधन पाहिजे. जारुळ टून, प्रॅग इत्यादि झाडें आराकानांत मुबलक आहेत. त्याप्रमाणें वांबू, रतनवेत, आंबा, पेरू, संत्रें वगैरे फळझाडें तशींच इतर फुलझाडेंहि आढळण्यांत येतात.

प्राणीः—हत्ती, वाघ, चित्ता निरनिराळे हरिण, रानडुकर इत्यादि वन्यपशु मुख्यत्वेंकरून जंगलांतून व पर्वतावर पाहण्यांत येतात; तसेंच रानरेडा, रानमांजर, जंगली कुत्रा, व निरनिराळया जातींचे वानरहि आढळून येतात. शेजारच्या देशांत दिसून येणारे अनेक पक्षीहि आराकानांत दिसण्यांत येतात. नाग वगैरे जातींचे साप व इतर जातींचे किडे हेहि येथें आहेतच. उष्णकटिबंधांतील समुद्रांत व नद्यांत सांपडणारे सर्व तऱ्हेचे मासे येथें मुबलक आहेत. जवळ जवळ २०० तऱ्हेच्या माशांची 'मग' लोकांनीं मोजदाद केली आहे; तथापि श्वेतवर्णीयांना रुचतील अशा फारच थोड्या जाती आहेत.

लोकः—'मग' हे येथील जुने रहिवाशी होत. या लोकांची लोकसंख्या ( १९२१ ) ९०२२४६ होती. या लोकांस 'मग' हें नांव कसें पडलें या विषयीं एकाहि आराकानी मनुष्यास माहिती नाहीं; तें बहुतकरून परदेशी लोकांनीं ठेवलेलें नांव असावें. येथील लोक आपणास 'रकाइंग्थ' म्हणजे 'आराकान पुत्र' म्हणवून घेतात. म्योनमा वंशाची ती एक शाखा असावी; सध्यांचे ब्रह्मी लोक याच शाखेचे आहेत. या वंशांतील सर्व शाखाविषयींच्या दंतकथांची उत्पत्ति 'अगदीं उत्तरेकडील' प्रदेशांतून झाली असावी. भाषासरणी, चेहेरीपट्टींत दिसून येणारी मंगोलियन झांक वगैरे गोष्टींवरून या दंतकथांस अधिक पळकटी येते; व त्यावरून मंगोलियन वंशापासून या लोकांची उत्पत्ति आहे हें उघड होतें. सध्यांच्या रहिवाशांनीं येथें प्रथम वसाहत केव्हां केली याविषयीं माहिती मिळण्यास कांहीं साधन नाहीं. पूर्वीच्या दरबारी दप्तरांत ह्या देशाचा इतिहास फार जुन्या काळापर्यंत नेऊन भिडविला आहे. पण त्यांत सत्याचा अंश फारच थोडा असल्यामुळें त्यावर विसंबून राहतां येत नाहीं. अशी एक दंतकथा सांगतात कीं, इ. स. पूर्वी ६ व्या शतकांत बुद्धाचा शेवटला अवतार गौतम या देशांत आला होता; व त्याच्या सन्मानार्थ म्हणून त्यावेळच्या राजानें, महामुनींचें सुप्रसिद्ध देवालय ( आराकान शहराच्या उत्तरेस २० मैलांवर अजूनहि या देवालयाचा अवशिष्ट भाग दिसतो ) बांधिलें व त्याची एक पितळेची मूर्तीहि ओतविली. ( कोणी म्हणतात कीं ह्या राजाच्या कारकीर्दींत 'नाट' लोकांनीं ती बनविली ). 'महामुनी' चें देवालय फार पुरातन आहे याबद्दल मुळींच वाद नाहीं; व मूर्तीहि त्याच काळची आहे हेंहि खरें दिसतें. परंतु २४०० वर्षांपूर्वी आराकानमध्यें बुद्धधर्म फैलावला होता, अगर त्याकाळीं घडलेल्या गोष्टींची विश्वसनीय माहिती अजून उपलब्ध आहे असें मानण्यास फारच थोडी जागा आहे.

खालीं दिलेल्या 'मग' लोकांच्या त्रोटक इतिहासाचा बराचसा भाग आसामचे सब-कमिशनर चार्लस पेटन, यांच्या लेखावरून घेतला आहे ( हा लेख एशियाटिक रिसर्चेस या ग्रंथाच्या १६ व्या पुस्तकांत आला आहे ).

इतिहासपटावर नमूद केलेला पाहिला मग राजा पुष्कळ वर्षें राज्य करून इ. स. ७०१ मध्यें वारला. तेव्हांपासून इ. स. १७८४ मध्यें हा देश ब्रह्मी लोकांनीं जिंकून घेईपर्यंत १२० राजे तख्तावर बसले. इ. स. ११५८ ते ११६८ च्या दरम्यान आवा, सयाम व बंगाल व चीनचा कांहीं भाग येवढे देश आराकानच्या अंमलाखालीं ओढले गेले असें 'बादशाही दप्तरा'वरून दिसतें पण यांत सयाम व बंगालविषयीं अतिशयोक्ति असावी. बंगालपैकीं खात्रीनें चितगांव व टिपरा हेच फक्त आराकानच्या ताब्यांत होते.

बाराव्या शतकाच्या अखेरीस चीन, आवा व सयाम यांतील 'मग' लोकांच्या ताब्यांतील प्रदेश त्यांच्या हातांतून गेले असावेत असें दिसतें. इ. स. १४०७ ( हि. १० ) यावर्षी आराकानचा राजा मेंगत्सउल्मुन हा बंगालमध्यें पळून गेला व तेथील राजाच्या मदतीनें पुन्हां गादीवर बसला व बंगालचा मांडलिक झाला असा उल्लेख माबेल डफनें केला आहे. इ. स. १४३० सध्यांच्या आराकान शहरीं राजधानी बसविली गेली. राजधानीभोंवतीं ९ मैल लांबीचा मजबूत तट बांधला होता. इ. स. १७३० च्या सुमारास चितगांव व टिपरा हे परगणे स्वतंत्र झाले. यानंतर राज्यांत अंतःकलह सुरू होऊन कांहीं 'मग' सरदारांनीं 'आवा' देशच्या राजाशीं बोलणें सुरू करून स्वतःचा देश त्या राजाच्या ताब्यांत देण्याचा घाट घातला त्यांत यश मिळून त्याप्रमाणें 'आवा' च्या राजानें स्वारी करून ११८४ सालीं हा देश पादाक्रांत केला. एवढेंच नव्हे तर आराकानच्या राजास मुलांमाणसांसह पकडून, रत्नभांडार, खजिना व गौतमाची प्रख्यात पितळी मूर्ति हीं सर्व आवा येथें नेलीं. यानंतर हा देश ब्रह्मदेशाच्या अंमलाखालीं होता; मधून मधून 'मग' लोक परकीयांस हांकून लावण्याचे प्रयत्न करीतच असत. सरते शेवटीं १८२५ सालीं ईस्ट इंडिया कंपनीनें हा देश आपल्या ताब्यांत घेतला व येथें 'मग' लोकांचा इतिहास संपला.

आवा देशाच्या अंमलाखालीं हा देश असतांना बरेचसे ब्रह्मी लोक या देशांत आले असावेत. येथील मुसुलमान हे बंगाली गुलामांचे वंशज असावेत.भाषा व चालीरीति या पूर्व जांच्याप्रमाणेंच आहेत तथापि 'देश तसा वेष' या या म्हणीप्रमाणें त्यांनीं पोषाखांत बदल केला आहे. जास्त मोलमजुरी मिळविण्याच्या उद्देशानें बरेच लोक आराकानांत गेल्या कांहीं वर्षांत गेले आहेत, व वर लिहिलेल्या ५००० बंगाली लोकांत या लोकांचाच भरणा आहे. दिल्लीच्या तख्तावर बसण्याचे प्रयत्न फसल्यामुळें ज्याला आराकानच्या दरबारचा आश्रय करावा लागला अशा एका मुसुलमान राजपुत्राबरोबर आलेल्या लोकांचे वंशज सुमारें १००० वर आहेत व या सर्वांचा भरणा मुख्यतः रामरी बेटांत आहे. हे आलेले लोक राजपुत्राचे रक्षक म्हणून आले होते व त्यांचें मुख्य आयुध म्हटलें म्हणजे तीरकमठा होय; व त्यावरूनच त्यास 'कमंटास' म्हणजे धनुर्धारी म्हणत; व अजूनहि हेंच नांव त्यांच्या वंशजास चालू आहे. भाषा व पोषाक हीं 'मग' लोकांपासून यांनीं उचलली आहेत व कांहीं जणांनीं बौद्धधर्महि स्वीकारला आहे.

जंगलांत किंवा दरी खोऱ्यांतून गडप झालेल्या सैन्याच्या अवशिष्ट भागाचे 'कीन्स' लोक वंशज आहेत असें सांगतात. योम पर्वताच्या आसमंतात यांचें वास्तव्य आहे. यांच्यापैकीं फारच थोडे ब्रिटिशांच्या अंमलाखालीं येतात. म्योनमा वंशापासून यांची उत्पत्ति आहे हें उघड आहे. व 'मग' लोकांच्याहि आधींच यांच्या पूर्वजांनीं आपलें मूलस्थान सोडलें असावें.

'तुंगम्र' हेहि डोंगरी लोक आहेत; व उत्तर भागांतच त्यांचें वास्तव्य आहे. सभोंवतालच्या संस्कृतीचा त्यांच्यावर कांहींच परिणाम झालेला नाहीं व अजूनहि ते अतिशय रानटी आहेत. टिपरा प्रांतांतून आणलेल्या लोकांचे हे वंशज असून आपणांस 'त्रिपुर' म्हणवितात. ब्रह्मी भाषेहून यांची भाषा अगदीं भिन्न आहे. 'केमी' हेहि डोंगरांवर राहणारे लोक आहेत. हे बरेचसे 'मग' लोकांसारखे दिसतात. यांच्या उत्पत्तीविषयीं कांहींच माहिती नाहीं तथापि मग, ब्रह्मी वगैरे लोकांच्या वंशापासूनच हे निघाले असावेत.

करेन लोकः—ब्रह्मदेशांत चोहोंकडे पसरलेल्या करेन्न जातींपैकींच हे आहेत. शेंकड्यांनीं मोजतां येण्याजोगे हिंदु व मणीपुरी लोक आराकानमध्यें आहेत; चिनी, शान वगैरेहि थोड्या प्रमाणांत आढळून येतात.

राज्याच्या भरभराटीच्या दिवसांत एकंदर लोकसंख्या किती होती हें समजण्यास मार्ग नाहीं. पण सध्यांपेक्षां तेव्हां लोकसंख्या जास्त होती हें दाखविणाऱ्या खाणाखुणा जागोजाग, विशेषतः 'अक्याब' परगण्यांत दिसतात. नुसत्या दगडांनींच बांधलेल्या प्रख्यात 'महामुनी देवालयाचा मोडका तोडका भाग, पूर्वीच्या मोठ्या शहरांचे अवशेष उदाहरणार्थ तलाव, मोडकीं तोडकीं ( पॅगोडा ) देवळें, जुन्या राजधानीचा विस्तीर्ण चिरेबंदी तट हीं सर्व त्या काळच्या भरभराटीची साक्ष देतात. निदान ज्यावेळीं, ब्रिटिशांच्या ताब्यांत हा देश आला त्यावेळेपेक्षां पूर्वी अधिक भरभराट होती हें खास. ब्रिटिशांच्या ताब्यांत हा देश आला त्यावेळची लोकसंख्या फक्त एक लाख होती असें म्हणतात.

सर्व 'मग' लोक, ब्रह्मी व मुसुलमान यांपैकीं आहेत. या सर्वांचा मुख्य धंदा शेती होय; हवामानावरून वर्षाचे ३ ऋतु कल्पितां येतीलः—पावसाळा, हिंवाळा व उन्हाळा. मेच्या सुमारास पाऊस सुरू होतो व एक महिनाभर मधून मधून व बेताचा पडतो. जून जुलै ( विशेषतः जुलै)मध्यें पावसाची सतत धार लागते. आगष्ट सप्टेंबरमध्यें पाऊस असतो, आक्टोबरमध्यें पाऊस फारच थोडा व तोहि बारीक झिमझिम. दरसाल पर्जन्याचें मान सुमारें २०० इंच आहे. पावसाळ्यांत उष्णतामान सुमारें ८० अंश असतें. नोव्हेंबरचा दुसरा पंधरवडा डिसेंबर, जानेवारी, फेब्रुवारीचे पहिले कांहीं दिवस—या दिवसांत विशेषतः सकाळसंध्याकाळ हवा थंड असते; तेव्हां कांहीं वेळां तर पारा ५०° च्याही खालीं जातो. फेब्रुवारीच्या प्रारंभापासून उन्हाळ्यास सुरुवात होते. मे महिन्यापर्यंत उष्णतामान सारखें वाढत जातें. पारा ९५° किंवा कधीं कधीं त्याहूनहि अधिक अंशावर चढतो. याच वेळीं झाडें व वनस्पती मरावयास

टेंकतात ( यांची पालवी गळल्यामुळें ) व त्यामुळें सर्व प्रदेश ओसाड व रुक्ष भासतो.

उष्णतामानाचे वरील आंकडे रामरी बेटांतील घेतले आहेत; पण देशाच्या आंतील भागांत हें मान अर्थात अधिकच येईल.

आरोग्य.–उष्णतामानांत बदल एकदम व वारंवार होतात, शिवाय अंगावर वस्त्र प्रावरणहि पातळ व बेताबाताचें, ऊन वारा, पाऊस यांमध्यें काम करावें लागणें, राहण्याची जागा जेमतेमच, कुपथ्यकारक व जडान्न खाण्याचो सवय. या सर्व गोष्टींमुळें लोकांच्या आरोग्यावर अनिष्ट परिणाम होतो. मुदतीचे व विन मुदतीचे ताप, प्लीहेचो वाढ, देवी, व अगदीं अलीकडे बांखा या रोगांचा फैलाव बराच झाला आहे.

आराकानांतील सर्व जमीन ईस्ट इंडिया कंपनीच्या मालकीची होती त्यावेळीं ठराविक खंड भरून शेतकऱ्यास वाटेल तेवढी जमीन दर डुनःमागें आठ ते बारा रुपये याप्रमाणें खंडानें मिळत असे. भाताच्या जमीनींचे तीन वर्ग कल्पिले होते. सध्यां जमीन सरकारच्या मालकीची समजली जाते. एक माणूस दोन रेड्यांच्या साहाय्यानें एक 'डुन' जमीन सहज नांगरतो. नांगरण्यास रेड्यांचाच उपयोग होतो. बैलहि आहेत पण त्यांचा गाडी ओढण्याकडे उपयोग होतो. मग लोकांचीं शेताचीं आउतें अतिशय ओबडधोबड, रानटी व कमालीचीं स्वस्त आहेत. एखादी बैडगाडी, नांगर, कोयता, सुरा, कुदळ, खोरें एवढींच कायती शेतीचीं आउतें होत.

शेती.—मुख्य पीक म्हणजे भाताचें होय; व त्याचें एक पीक दरसाल काढण्यांत येतें.पाऊस पडून जमीन भुसभुशीत होतांच जमीनींचे तुकडे पाडून शेतकरी दोन तीन वेळां ती नांगरतो व नंतर जूनच्या दुसऱ्या पंधरवड्यांत पेरणी होते. भात जोरानें वाढून लवकरच कापण्यास योग्य होतें. कापणी व मळणी संपल्यानंतर भात परदेशीं रवाना होतें. सबंध आराकानांत तांदूळ किती पिकतो ह्याचा नक्की आंकडा माहीत नाहीं. तथापि एकट्या अक्याब परगण्यांतूनच दरवर्षीं सुमारें अकरा, लक्ष पन्नास हजार रुपयांचा तांदूळ परदेशीं रवाना होतो, यावरून बरीच कल्पना येईल.

भाताच्या हंगामानंतर, तंबाखूचा हंगाम सुरू होतो, व त्याकरितां नदीनाले यांलगतची जागा पसंत केली जाते. नोव्हेंबरमध्यें बी पेरून एप्रिल मेच्या सुमारास शेवटचीं कापणी करितात. तंबाखूचे दरसाल उत्पन्न किती आहे हें माहित नसलें तथापि प्रत्येकजण विडी ओढणारा असल्यामुळें देशांतल्या देशांतच बराच खप होत असावा. शिवाय परप्रांतींहि विशेषतः कलकत्त्यास. बरीच तंबाखू रवाना होते.

अंबाडीचीहि लागवड होते. पण तिचा खप फक्त देशांतल्या देशांतच जाळी विणणें, दोरखंड (गलबतास लागणारे)वगैरेकडे होतो. लागवड नोव्हेंबरमध्यें होऊन मार्चमध्यें काढणी होते. शिवाय लहान लहान जमीनींतून ऊंस, नीळ, कापूस, मिरीं, आलें, हळद, वगैरेंचें उत्पन्न काढतात. चेडुबा येथें आरारूट बराच पिकतो. गहूं फारच थोडा पिकतो. बागाइतीकडे लोकांचें फारसें लक्ष नाहीं. लोक कष्टाळू व उद्योगी नसल्यामुळें फारशी फळफळावळ उत्पन्न होत नाहीं. पावसामुळें काय होईल तेवढीच. भोपळे, कांकड्या, संत्रीं, बटाटे, कांदे, वगैरे मुख्य भाजीपाला होय. तसेंच आंबा, पेरु, केळीं, पपई, नारळ इत्यादि फळांकडेहि 'मग' लोक लक्ष देतात.

शेतीसंबंधीं बरीच अनास्था दिसून येते. कौशल्य, उद्योग यांचा तर अभावच आहे. खताचा बराच अभाव असून त्याचा जमीनीकडे क्वचितच उपयोग करण्यांत येतो; व जमीनीचा मगदूर वाढविण्यास येथील लोक कांहीं श्रम करीत नाहींत. त्यामुळें बरीच जमीन पडून आहे. आराकानचा सुमारें $\frac{3}{10}$ श भागहि पिकाची जमीन या सदराखालीं येत नाहीं. बराच प्रदेश डोंगराळ आहे; तथापि पडून असलेली जमीन पुष्कळ आहे.

व्यापारः—येथील व्यापार अक्याब बंदरांतून होतो. मद्रासच्या किनाऱ्याहून बरीच जहाजें येतात. आराकानांतील व्यापाराची विशेषतः तांदुळाच्या व्यापाराची मुख्य पेठ व बंदर केव्हांहि अक्याबच हें आहे.

तांदुळानंतर मिठाचा नंबर लागेल, रामरी व क्यौक फियू येथें मोठालीं मिठागरें आहेत. ८२००००० पौंड इतका मिठाचा वार्षिक खप आहे व याच्या दुप्पट तिप्पट मीठ चितगांवला रवाना होतें, क्यौक फियू याच बंदरांत मीठ भरतात.

तांदूळ व मीठ यांच्याशिवाय इतर जहाजांची वहातूक आराकान देशांत नाहीं. होड्या व मचवे यांमधून या देशाचा बंगालशीं बराच मोठा व्यापार चालतो व ब्रह्मदेशाशीं मुख्यत्वेंकरून खुष्कीच्या मार्गानें चालतो. होडीवाले दरसाल बहुधां एक फेरी करतात. ब्रम्हदेशाशीं होणारा व्यापार बैलांच्या पाठीवर गोण्या टाकून योम पर्वताच्या खिंडीच्या मार्गानें चालतो; यांपैकीं मुख्य खिंड 'एइंग' हीं होय.

हा व्यापार मुख्यतः ब्रह्मी व शान लोक यांच्या हातीं आहे. देशाच्या इतर भागाचाहि परदेशाशीं थोडा बहुत व्यापार चालतो.

या देशांतील रहिवाशांच्या मालकीचीं अशीं मुळींच जहाजें नाहींत व तीं व्यापारोपयोगीं जवळ जवळ नाहींतच. देशांतल्या देशांत अक्याब, एइंग, क्यौय फियू व रामरी बेटें यांमध्यें व्यापारी दळणवळण बरेंच आहे. सँडोवे बेटांचासुद्धां यांतच समावेश केला असता, पण त्यांच्याशीं होणारा व्यापार फारच थोडा. लहान लहान दुकानदार १० रु. अगर त्याहूनहि कमी भांडवलावर धंदा सुरू करतात. दोन दोन तीन तीन हजार रुपयांची रक्कम व्यापारांत गुंतविणारे व्यापारी फारच थोडे. व साधारणपणें एखाद्या

व्यापाऱ्याजवळ ५० रु. किंमतीच्यावर माल सांठविलेला नसतो. मोठमोठ्या शहरांतून मच्छीबाजार व भाजीपाला बाजार आहेत. या देशाचा असावा त्यापेक्षां किती तरी व्यापार कमी आहे. धाडस व कौशल्य हे गुण येथील लोकांच्या अंगी आल्यास व्यापार बराच फैलावेल.

'मग' व ब्रम्ही लोक बुद्धधर्मी आहेत, व ते गौतमाच्या मूर्तीची व स्तूपाची पूजा करतात. अस्तेय, अहिंसा, परस्त्रीगमन न करणें, असत्यभाषण, मादक पदार्थांचें सेवन न करणें या आज्ञा सर्व गौतमोपासकांनीं पाळल्या पाहिजेत; पण त्या पाळल्या जातील तेव्हा खऱ्या. धर्मोपदेशक व मोक्षप्राप्तीची ( निर्वाण ) इच्छा करणारे यांस आणखी धार्मिक बंधनें पाळावी लागतात. बुद्धधर्माविषयीं माहिती इतरत्र पुष्कळ आलीच आहे. प्रत्येक महिन्यांत पूजेचे म्हणून चार दिवस पाळावयाचे असतात. पण ते पाळणारे फारच थोडे; इतर धार्मिक विधींचीही तीच वाट. गौतमाप्रीत्यर्थ पैसा खर्चण्यांत 'मग' लोक बरेच चिक्कू आहेत. जुनीं देवळें, स्तूप मूर्ती मोडकळीस येत चालल्या आहेत, तथापि दुरुस्ती कोणी करीत नाही. यास दोन कारणें सांगण्यांत येतात. पहिलें, मूर्तिपूजेस राजाश्रय नाहीं, व दुसरें हें कीं पूर्वीच्या काळीं पैसा सुरक्षित ठेवावयास साधनें नस ल्यामुळें लोक देवळें वगैरे गोष्टींकडे पैसा खर्च करीत. या देशांत बुद्धधर्माचा ऱ्हास होण्याचीं हीं दोन कारणें आहेत. पण बुद्धधर्मावरील लोकांचा विश्वास उडत चालला हेंहि तिसरें कारण असावें. निरनिराळे पंथ व संप्रदाय वाढतच आहेत; व थोड्याच काळांत बुद्धधर्माचें वर्चस्व नष्ट होईल अशीं चिन्हें दृगोचर होऊं लागलीं आहेत, असें विचारी लोक म्हणतात. ब्रम्ही लोकांपेक्षां 'मग' लोक जास्त अडाणी व धर्मभोळे आहेत. आजारें, रोगराई यांतून सोडण्यांस औषधांपेक्षां मंत्रतंत्र, जादुटोणा यांवर लोकांचा अधिक विश्वास आहे. या सर्व लक्षणांवरून आराकानांत बुद्धधर्माचा ऱ्हास होत आहे हें उघड आहे सुमारें ६०० पुंगी किंवा उपाध्याय या देशांत आहेत. त्यांना राहाण्यास जागा व खावयास शिधासामग्री वगैरे सर्व खर्च लोकांकडून होतो. प्रेतसंस्कार व इतर धार्मिक विधी चालविणें व आपापल्या मठांतील मुलांस लिहावाचावयास शिकविणें पुंगी लोकच करतात स्वार्थ, कनक व कांता यांचा या पुंगींनीं त्याग केला आहे, असें समजतात, व लोक यांनां इतकें पूज्य समजतात कीं, दीक्षा घेऊन भगवी कफनी घातल्यावर प्रत्यक्ष स्वतःच्या मुलासहि आईबाप वंदन करतात. भगवी कफनी टाकून देऊन गृहस्थाश्रमांत यांनां पुनः केव्हांहि येतां येतें व अशा माणसास इतर माणसांप्रमाणेंच वागवितात.

इतरत्र असलेल्या मुसुलमानाप्रमाणेंच आराकानांतील मुसुलमानहि महंमदी धर्माचे अनुयायी आहेत; पण त्यांच्या वर्तनांत तितका कडवेपणा दिसून येत नाहीं. त्यांचा धर्मग्रंथ कुराण. हा फक्त आरबी भाषेतच आहे. तो कोणालाहि समजत नाहीं व फारच थोड्यांनां वाचतां येतो. 'अल्ला' या नांवाच्या पलीकडे धर्मतत्त्वांची ओळखच त्यांनां नाहीं. व भोंवतालच्या मूर्तिपूजकांच्या बऱ्याच समजुती व चालरीति त्यांच्यापैकीं पुष्कळांनीं उचलल्या आहेत. कित्येकांनीं तर स्वधर्म सोडून बुद्धधर्माचाच अंगिकार केला आहे. मशिदी कोठें कोठें दिसून येतात, मुसुलमानी सण पाळण्यांत येतात. सबंध देशांत सुमारें १०० धर्माधिकारी ( काजी ) असावेत. असें असलें तरी मुसुलमानी धर्मानें आपलें ठाणें येथें दिलें आहे असें म्हणतां येत नाहीं. पुष्कळ काजी ऐहिक गोष्टींतच गुरफटून गेलेले दिसतात.

धर्मविषयक समजुती व आचार या बाबतींत कीन व करेण यांमध्यें भेद नाहींच म्हटलें तरी चालेल. जरा, मरण, आधि, व्याधि या सर्वांपासून अलिप्त व ज्यापासून सर्वांची उत्पत्ति आहे, असें एक स्वयंभू ब्रह्म जगांत आहे, अशी त्यांची समजूत आहे; पण त्याविषयीं त्यांच्या कल्पना अर्धवट व अनिश्चित आहेत. ह्या ब्रह्माची पूजा ते करतात असें दिसत नाहीं. नाटांनां बळी देण्याची त्यांच्यांत चाल आहे व सर्व मित्रमंडळीसमवेत बळी देणारा बळी दिलेल्या पशूचा प्रसाद भक्षण करतो. कीन लोक कुत्र्यांचा बळी देतात व तो खातात. यांत त्यांची अशी समजूत आहे कीं, या योगानें आपल्या पूर्वजांच्या वेळीं जीर्ण त्वचेवर लिहिलेले पवित्र ग्रंथ कुत्र्यांनीं खाल्ले होते. तें कुत्र्यातील धर्मज्ञान आपल्या अंगीं येतें. भविष्यकाळच्या स्थितीच्या—ज्या काळीं सज्जन व दुर्जन स्थितींत भेद राहील—अशा काळाच्या त्यांच्या कल्पना फारच अंधुक आहेत.

तुंगम्रु लोकांच्या धर्माविषयीं माहिती उपलब्ध नाहीं, तथापि त्यांचा धर्म अगदीं रानटी स्थितींचा असावा.

केमी व कीन लोक यांच्या धर्मकल्पना व समजुती यांमध्यें बरेंच साम्य आहे; फरक इतकाच कीं, परमब्रह्माच्या केमी लोकांच्या कल्पना अधिक अस्पष्ट आहेत. हेहि नाटांचीच पूजा करतात व पर्वतावर नाटांचें वास्तव्य असून व शरीरप्रकृति, जीवित आणि शेतांतील पीक यांवर या नाटांची दृष्टि असते असें हे लोक समजतात व या देवतांस संतुष्ट करण्याकरितां ते रेडे, डुक्कर, अगर कोंबडीं यांचा—विशेषतः पेरणी व पीक काढण्याच्या वेळीं बळी देतात. एखादा केमी आजारी पडला तर ज्या नाटाच्या वक्र दृष्टीनें तो आजारी पडला त्या नाटाच्या नांवानें जंगलांत एक कोंबडें सोडून देतात. पापपुण्याचा झाडा देऊन पुढें काय मिळेल याविषयीं त्यांच्या कल्पना अनिश्चित आहेत. तथापि पुनर्जन्मावर त्यांचा विश्वास आहे. मृताचें शव जाळल्यावर मृताच्या वासना तृप्त करण्याची त्यांची तऱ्हा विशेष आहे. मृताकरितां दहनभूमीजवळ एक चांगलेसें घरकुलें बांधतात व त्यांत मृताच्या सामानाचा कांहीं भाग ठेवतात. उदाहरणार्थ, भांडींकुंडीं मासे धरण्याचीं जाळीं, चिलीम वगैरे वगैरे. थोडे तांदूळ व बदकें, कोंबड्या ( मृतांना खावयास करितां म्हणून ) हींहि

ठेवितात. ब्रह्मदेशांतील करेन जातीचा व आराकानांतील करेन जातीचा धर्म एकच आहे.

शि क्ष ण.—ब्रह्मी लोकांनीं आराकान घेतल्यावर त्यांनीं 'मग' लोकांस इतकें हतबल करून टाकलें कीं, ब्रह्मी लोकांपेक्षां तरतरीतपणा व चौकसबुद्धि या बाबतींत 'मग' लोक फारच मागें आहेत. साक्षरतेचें प्रमाण ब्रह्मदेशापेक्षां या देशांत फारच कमी आहे. ब्रह्मदेशांत प्रत्येक १० माणसांत ९ माणसांनां वाचतां येतें तर या देशांत निम्म्यापेक्षांहि कमी लोकांनां वाचतां येतें. दोन्ही देशांतील स्त्रियांनां वाचावयास येत नाहीं. 'मग' लोकांच्या स्त्रियांत तर हजारांत एक वाचणारी असें सुद्धां प्रमाण पडत नाहीं. ईस्ट इंडिया कंपनीच्या अमदानींत शिक्षणप्रसार अधिक होत गेला- तथापि वडील माणसें मुलांच्या शिक्षणाकडे दुर्लक्ष करतात. अक्याब परगण्यांतील १८४१ सालच्या १३६००० लोकसंख्येपैकीं फक्त ३७८ शिक्षक व १८०७ विद्यार्थी होते. हीच स्थिति इतर परगण्यांची. डोंगरी लोकांना स्वतःची लिपी नाहीं व ब्रह्मी लिपीहि त्यांस वाचतां येत नाहीं, यामुळें ते गाढ अज्ञानांधकारांत आहेत. ज्यांनां ब्रह्मी वाचतां येतें त्यांची स्थिति अधिक चांगली आहे असें नाहीं. कारण खरें ज्ञान ज्यांत सांठविलें आहे अशीं पुस्तकें त्यांस मिळतच नाहींत; गौतम, नाट वगैरेंच्या काल्पनिक व अद्भूत गोष्टी याच काय त्या त्यास वाचावयास मिळतात. ब्रह्मी लोकांच्या कल्पनेप्रमाणें विद्वान म्हणजे ज्याला तास तास पाली पाठ म्हणतां येतें तो. त्याचा अर्थ तर ५००० त एकाला तरी समजत असेल कीं नाहीं कोणास ठाऊक !

आपल्या ज्योतिःशास्त्रांत व भूगोलांत बऱ्याच चुका व असंभाव्य गोष्टी आहेत असें आतां कुठें कांहीं कांहीं विद्वानांच्या ध्यानांत येऊं लागलें आहे. ' पण चार मोठ्या बेटांभोंवतीं सूर्य फिरतो व फिरतां फिरतां तो म्येनमो पर्वताच्या मागें जातो त्यामुळें रात्र होते; तारका या नभःपटलावर बसविलेल्या टिकल्या आहेत व चार लाख मैल लांबीचा घेर असलेल्या दक्षिणेकडील मोठ्या बेटावर आपण राहतों; वगैरे गोष्टी त्यांच्या ज्या ग्रंथांत सांगितलेल्या आहे. त्यांवर सामान्य जनसमूहाचा पूर्ण विश्वास आहे. मनुष्याच्या निरनिराळ्या मनोवृत्ती व त्यांचे व्यापार या विषयीं सूक्ष्म देखील ज्ञान असणारे कित्येक अध्यात्मवादी आहेत. कित्येक अतिसूक्ष्म धर्माधर्म विचारक(मीमांसक) आहेत व अमकें कृत्य केलें असतां अमकें पाप लागेल असें ते अचूक रीतीनें सांगतात. पुष्कळ मग लोकांना वादविवाद करण्याची आवड आहे पण गृहीत धरलेल्या गोष्टी बरोबर आहेत कीं नाहींत हें न समजतां ते एकदम अनुमान काढतात, व स्वतःच्या कोटिक्रमांतील दोष दाखवून दिला तरी पुनः तेच तेंच चर्वितचर्वण करीत बसतात. तथापि कांहीं खरोखरच हुशार आहेत व पुष्कळ वेळां त्यांचा कोटिक्रम बिनतोड असतो व दुसऱ्याच्या विचारसरणींतील दोषहि ते चटकन दाखवितात. देशांत पुस्तकें साधारणपणें बरींच आहेत व कांहीं माणसें आपणांस अतिशय विद्वान म्हणवितात व लोकहि त्यांस तसें समजतात. असें जरी आहे तथापि एकंदर देशांत चोहोंकडे अज्ञानाचें साम्राज्य पसरलें आहे.

गृ ह चि त्र—'मग' लोकांना गृहसौख्याची कल्पना नाहींच म्हटलें तरी चालेल. बहुतकरून आईबाप अगदीं अल्पवयांत मुलांचीं लग्नें ठरवितात. तथापि विधुर अगर वयांत आलेले तरुण स्वतः मुलगी पसंत करतात. व मग आईबापांचा सल्ला विचारतात, 'मग' अगर ब्रह्मी लोकांत नवऱ्या मुलास नवरीच्या आईबापास हुंडा द्यावा लागतो व आपपल्या ऐपतीप्रमाणें वधूस कपडेलत्ते व दागिने यांची देणगी द्यावी लागते. लग्नाच्या आधींच्या सर्व गोष्टी ठरल्यावर लग्नाचा एक दिवस नेमतात. व त्या दिवशीं नवरीच्या बापाच्या घरीं सर्व आप्तइष्ट व मित्र यांस मेजवानी देतात. त्यावेळीं नवरानवरी. एका ताटात जेवतात व या गोष्टीच्या योगानें तीं नवराबायको :झालीं असें समजतात. लग्नानंतर थोड्याच दिवसांत कडाक्याचे भांडणतंटे सुरू होतात; अशीं पुष्कळ उदाहरणें आराकानांत घडतात. संतापाच्या भरांत नवऱ्यानें बायकोचे केस धरून फरफरां ओढणें, व लाथा बुक्या मारणें; व बायकोनेंहि उलट टाकून बोलणें वगैरे प्रकार सर्वांच्या परिचयाचे आहेत. यामुळें काडीमोडून देण्याचे प्रसंग वारंवार घडतात; व त्यास फारशी अडचण पडत नाहीं. काडी मोडून देणें दोन्ही पक्षांस संमत असल्यास गांव सभेपुढें आपापले हेतू दोघांनीं कळवावे लागतात. नंतर माल मिळकतीची निम्मेनिम वांटणी करतात व मग विभक्त होतात. पुष्कळ वेळां राग ओसरल्यावर तींच वधूवरें पुनः एकत्र होतात. नवऱ्याच्या मनांत बायकोस सोडचिठ्ठी द्यावयाची असल्यास नवऱ्यानें सर्व मालमत्ता बायकोस दिली पाहिजे व त्यास तिच्या कर्जाचा बोजा अंगावर घेऊन फक्त अंगावरील कपड्यानिशीं घर सोडावें लागतें. बायकोच्या मनांतून नवऱ्यास सोडचिठ्ठी द्यावयाची असल्यास तिला ग्रामाधिकाऱ्यासमक्ष नवऱ्यास २५ रुपये द्यावे लागतात; नवरा बहुतेक ते घेतो. फारच झालें तर त्यानें दिलेले दागिने व आईबापास दिलेला हुंडा ती परत करते. इतकें झाल्यावर विड्याच्या एका पानाचे ती दोन तुकडे करते व त्यांपैकीं एक आपण खाते व दुसरा नवऱ्यास खावयास देते म्हणजे घटस्फोटाचा विधि संपला. या सर्व उदाहरणांत मुलांच्या वांटण्या लिंगावरून करतात मुलगे बापाला देतात व मुली आईस देतात. मुलें आईबापाप्रमाणेंच दुर्गुणी निघतात. हातीं सांपडेल त्यानें बाप त्यांनां मुलास बेदम मारतो, व त्यांतून सुटका घरांतील कोणीतरी किंवा शेजारीपाजारी करतात. नाहीं तर बापाचा राग जाईपर्यंत मुलगा कोठें तरी पळून जातो.

एका माणसानें पुष्कळ बायका करणें हें कायदेशीर व मानमान्यतेचें लक्षण समजलें जात असलें तरी पुष्कळ लग्नें करण्याची चाल आराकानांत फारशी प्रचलित नाहीं. एकापेक्षां अधिक बायकांचीं पोटें भरण्याची ताकद नवऱ्यांत असेल तर असे प्रकार आहेत त्यापेक्षां पुष्कळ घडतील.

आईबाप, मुलेंबाळें तसेंच लग्न झालेलीं अगर न झालेलीं सर्व माणसें एकत्र राहतात. तीन तीन पिढ्यांतील माणसें एक कुटुंब करून राहतात. पण पुष्कळ वेळां भांडण तंटे होत असल्यामुळें सुखासमाधानानें राहणारीं अशीं मोठीं कुटुंबें निदान आराकानांत तरी फारच थोडीं आहेत.

या प्रांतांतील सर्व घरें बांबूचीं आहेत व त्यांवर पानांचीं छपरें आहेत. जेवणखाण करण्यास एक मोठी खोली, लहानसें स्वयंपाकघर, निजावयाकरितां १।२ खोल्या व धान्य वगैरे सामान ठेवण्यास एक कोठी इतक्या खोल्या बहुधां प्रत्येक घरास असतात. प्रत्येक घराची सरासरी किंमत सुमारें ३०–४० रु. असते. पुष्कळ घरें गलिच्छ आहेत; तथापि लोकांच्या अंगवळणीं पडल्यामुळें तशांतूनच लोक समाधानानें राहतात. लग्नकार्य वगैरे समारंभाच्या वेळीं घालण्याच्या पोशाखास सुमारें ३ ते४ रु. खर्च येतो व नेहमींच्या साध्या पोशाखास १।२ रु. पडतात. बायकांच्या कपड्यासहि तितकाच खर्च लागतो. मुलें ६ते ७ वर्षांचीं होईपर्यंत कपडेच घालित नाहींत. कपडे घाणेरडे असतात. आईबाप व तील चार मुलें येवढ्या कुटुंबाचा जेवणाखाणाचा खर्च सुमारें ३।४ रुपयांत भागतो. बऱ्या स्थितींतील माणसाच्या घरांतील इतर सामानसुमान, चीजवस्त यांची किंमत सु. ५ते ६ रु. होईल. अर्थातच कांहीं जणांना वर सांगितल्यापेक्षां जास्त खर्च येतो तर कांहींनां कमीहि येतो.

नदी अगर समुद्र यांजवळ राहणाऱ्या लोकांजवळ एखादी १२ ते१५ रुपये किंमतीची होडी असते. १५० ते २०० रु. किंमतीच्या मोटमोठ्या होड्या मालकीच्या असणारेहि थोडे लोक आहेत. त्यांतून ते कलकत्ता,रंगून वगैरे ठिकाणीं व्यापारास जातात. बहुधां २ ते४ रेडे अगर बैल प्रत्येक शेतकऱ्याच्या मालकीचे आहेत. पुष्कळजण भाड्यानें घेऊनहि कामें करतात. ज्या ठिकाणीं परदेशच्या लोकांची वस्ती आहे अशा ठिकाणीं फक्त गाई बाळगतांत व त्यांचें दूध परकीय देशाच्या लोकांस विकतात. कांहींजण बकरीं बाळगतात. पण पुष्कळ घरांभोंवतीं कोंबड्या बदकेंहि आढळून येतात. तीं परकीय लोकांच्याच उपयोगीं पडतात. कारण बुद्धधर्मीय लोक हिंसा करीत नाहींत.

वर सांगितलेल्या जिनसांशिवाय आराकानांतील लोकांजवळ इतर मालमत्ता बहुधा नसतेच. सर्व लोक दारिद्र्याच्या नांवानें ओरडतात; व त्यांच्या ओरडण्यांत पुष्कळ तथ्य आहे. तथापि पुष्कळ माणसें गळ्यांत रुपयांची माळ, हातांत रुप्याचीं कडीं, पायांत सांखळ्या वगैरे दागिने मुलांच्या अंगावर घालतात, व मुलें १०।१२ वर्षांचीं होतांच त्यांचे कान टोंचण्याच्या समारंभाचे वेळीं एक भली मोठी मेजवानी देतात व त्या वेळीं नाच, गाणें वगैरेहि करतात. याशिवाय लग्नकार्याच्या वेळीं अगर भगवी कफनी धारण करण्याचे वेळीं मुलाकरितां बराच खर्च येतो. इतर प्रसंगींहि मेजवान्या देतात व ऐपत असेल ते नाटकें,तमाशे वगैरे करितांहि पैसा खर्च करतात.यांत रंगभूमीवर फक्त चित्रें दाखवितात; संभाषणें म्हणजे पडद्याआडून माणसें बोलतात. असल्या प्रकारांनीं लोक मनोरंजन करतात व कधीं कधीं ते पाहण्यांत रात्रीच्या रात्री घालवितात. प्रेत पुरण्यासाठीं ( साधारणपणें जाळण्याचीच चाल प्रचारांत आहे. ) कांहीं पैसे काढून ठेवतात. त्यांचा उपयोग कबरस्थान सुशोभित करणें,प्रेतयात्रेच्या वेळीं वाद्यें वाजविणें. उपाध्यायास द्यावें लागणारें सामान, व मरणानंतर थोड्या दिवसांनीं होणारी मेजवानी वगैरे गोष्टी कडे करतात. वारसांनां थोडीशी इस्टेट कांहीं जण ठेवतात पण पुष्कळांनां तशी ऐपतच नसते. सर्वसाधारणपणें आराकानांतील लोक जरी गरीब आहेत तरी साधारणपणें त्यांच्या पद्धतीप्रमाणें राहण्याला त्यांनां जड जात नाहीं; पुष्कळांची स्थिती दरवर्षी सुधारतहि आहे.

**आराकान शक**—हल्लींच्या ब्रह्म शकाचा आरंभ काल;त्या शकाची स्थापना थेंग राहूझानें केली असें म्हणतात;हा आनाम, चंपा, लावो वगैरे भागांत चालणारा हाच चुल्लक शकराज शक दिसतो ( ज्ञानकोश प्रस्तावनाखंड—विज्ञानेतिहास पा. १०० ).

**आराकान योमा**—ब्रह्मदेशाच्या पश्चिम बाजूला जे डोंगर आहेत त्यांत हे डोंगर अगदीं दक्षिणेकडे असून पूर्व बंगाल आणि आसाम व ब्रह्मदेश यांच्या दरम्यान आहेत. योमा डोंगर फार उंच नाहींत. सर्वांत उंच शिखर ५००० फुटांच्या आंतच आहे.यांत जंगल पुष्कळ आहे पण सागवान मुळींच नाहीं. योमा डोंगरांत शिन लोकांची वस्ती आहे. या डोंगरांत दोन खिंडी प्रमुख आहेत. पैकीं एकींतून क्याकप्यू जिल्ह्यांतील आनपासून मिन्बू जिल्ह्यांतील न्गेपला रस्ता जातो व दुसरींतून सांदोवे जिल्ह्यांतील टाँगपहून प्रोम जिल्ह्यांतील पडाँगला रस्ता जातो.

**आराकान जिल्हा**—(उत्तर लोअर बर्मा.)हा आराकान भागापैकीं अगदीं उत्तरेकडील जिल्हा असून पूर्व बंगालच्या चितागांग मधील डोंगराळ प्रदेश व शिन पर्वत यामध्यें वसलेला आहे. उ. अ. २०° ४०' आणि २२°३०'व पू. रे. ९२° ३५' आणि ९३° ४५'.क्षेत्रफळ १५०० चौरस मैल ( प्रत्यक्ष अमलाखालीं नसलेला प्रदेश वगळून ) आहे.

सीमाः—उत्तरेस लुराई पर्वत; पूर्वेस शिन डोंगर; पश्चिमेस चितागांगमधील डोंगराळ प्रदेश व अक्याब जिल्हा. दक्षिणेंतील अक्याब जिल्हा. यांतील प्रदेश डोंगर असून कांहीं ठिकाणीं डोंगर ३००० पासून ३५०० फूट उंच व कांहीं ठिकाणीं तर ४५०० फूट उंच ( समुद्रसपाटीपासून) आहेत. वनश्री सुंदर परंतु कंटाळवाणी आहे. कलदन

व लेम्रो या मुख्य नद्या असून त्यांस पुष्कळ नद्या मिळतात.या जिल्ह्यांतील भूगर्भाचा अद्यापि योग्य अभ्यास झालेला नाहीं; वनस्पतीच्याअभ्यासासंबंधानेंहि तीच स्थिति आहे.

वन्य प्राणी—हत्ती, गेंडे, गवा, वाघ, अस्वल, डुक्कर इत्यादि.

हवा अति रोगट आहे. जंगल खोऱ्यांत हिंवतापाची सांथ बहुतेक नेहमीं असते मार्च, एप्रिल, मे व जून हे महिने फार वाईट जातात. हिंवाळ्यांत येथील हवा साधारण बरी असते. पावसाची वार्षिक सरासरी सुमारें १२० ते १३० इंचपर्यंत आहे. कधीं कधीं वादळापासून उपद्रव होतो. व धरणीकंपाचे धक्के देखील क्वचित् बसतात. या भागांत पूर आलेला ऐकिवात नाहीं.

इतिहास—यांतील डोंगराळ प्रदेश पूर्वी अक्याब जिल्ह्यांत मोडत असे. येथील वन्य जाती आपसांत नेहमीं भांडत असत व खालच्या जास्त सुधारलेल्या भागास यांच्या पासून त्रास होऊं लागला. इ. स. १८६५ सालीं अक्यावपासुन या भागास वेगळे करून त्यावर एक स्वतंत्र अधिकारी नेमला. इ. स. १८६८ सालीं या वन्य जातींनां व्यापार करण्यास उत्तेजन यावें म्हणून अक्याबच्या उत्तरेस सुमारें ६८ मैलांवर म्याकटांग येथें बाजार भरण्याची व्यवस्था केली. त्यामुळें वन्य जाती अक्याबमधील व्यापाऱ्याशीं देवघेव करूं लागल्यामुळें त्यांच्यापासून त्रास पुष्कळच कमी होऊं लागलां आहे

इ.स.१९११च्या खानेसुमारींत या जिल्ह्यांत फक्त२८खेडीं; होतीं. पलेट्वा हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण असून तेथील लोकसंख्या (१९०१) फक्त ४८१ आहे. येथील लोक वन्य धर्म आचरितात.

इ. स. १९०३–४ सालीं फक्त १७ चौरस मैल जमिनींत लागवड होती. गुरें, मेंढरें यांच्या अवलादी येथें आहेत. येथें गुरचरण पुष्कळ आहे. संरक्षित असें जंगल या प्रदेशांत नाहीं. येथें कापड व टोपल्या विणणें व मडकीं करणें हेंच धंदे आहेत. येथील बहुतेक व्यापार अक्याबशीं आहे. येथून कापूस, तंबाखु व तीळ बाहेर जातात. या प्रांतांत खडीचे रस्ते नाहींत. अक्याव व पलेट्वा यांचे दरम्यान दर आठवड्यास दोनदा एक छोटी बोट फेरी घालते.

या जिल्ह्याचे विभाग किंवा टाऊन शिप्स नाहींत. या प्रांतांत गुन्हे फारसे होत नाहींत. इ. स. १९०३–४ सालीं या जिल्ह्याचें एकंदर उत्पन्न १२००० रुपये होतें.

[संदर्भ ग्रंथ—इं. गॅ. ह्यूजेस–हिल ट्रॅक्टस ऑफ आराकान (१८८१), हे—आराकान, पास्ट–प्रेझेंट–फ्यूचर; ए. ब्रि; अ. ओ. सो. जर्नल पु. १]

**आराध्य ब्राह्मण**—तैलंग जातीतील एका शाखेचे ब्राह्मण. निजाम हैदराबादेकडे व मद्रास इलाख्यांत यांचा मोठा भरणा आहे. यांच्या वेषाचा प्रकार असा आहे कीं, यांच्या गळ्यांत यज्ञोपवीत तर असतेंच व त्याशिवाय लिंगाईत लोकांप्रमाणें लिंगाकृति प्रतिमाहि असते. हे आपणांस स्मार्त म्हणवितात. व भस्म, रुद्राक्ष धारण करितात. लिंगाईत धर्माचा स्थापक जो बसव तो याच जातीचा ब्राह्मण होता. या जातींत कित्येक वैष्णवहि असतात. ते गळ्यांत लिंग बांधीत नाहींत. आराध्य ब्राह्मणांत पूर्वी त्रिशूलादिकांच्या तप्तमुद्रा घेण्याची चाल होती. परंतु ती हल्लीं बंद आहे. वीरशैवांचे पंचाचार्य मूलतः याच ब्राह्मणांतील असावेत असें मत भांडारकरांनीं आपल्या शैव आणि वैष्णव संप्रदायांच्या इतिहासांत (ग्रुंड्रिस) लिहिले आहे.

आराध्य आपआपसांतच लग्नें करितात; कधीं कधीं उत्तर सरकारांतील एका विशिष्ट नियोगी पोटजातींतील मुलीशीं लग्नें लावितात. यावरून असें दिसतें कीं,ते आराध्यपंथांत येण्यापूर्वी नियोगी असावेत. 'आरुवेल्लु नियोगीं'शीं बेटी व्यवहार करीत नाहींत. वीरशैवांप्रमाणें ते मृतांनां बसलेल्या स्थितींत पुरतात. इतर ब्राह्मणांतल्या प्रमाणें जाळीत नाहींत. दहा दिवस सुतक पाळितात, आणि एकोद्दिष्ट वगैरे पितृश्राद्धें करितात. ते सांवत्सरिक श्राद्धें करीत नाहींत; आराधना करितात. आराधनेमध्यें अपसव्य, दर्भ वगैरे लागत नाहीं; तसेंच होम, पिंड, तिलांजलीहि लागत नाहीं. विधवांचें मुंडन करीत नाहींत. पाळपुरी सोमनाथ (१४ वें शतक) हा तेलगु कवि आराध्य ब्राह्मण होता. यानें "बसव पुराण" आणि "पंडिताराध्यचरित्र रचिलें आहे." तसेंच, पिडुपर्थी सोमनाथ आणि बसवकवि (१६ वें शतक) हे दोघे भाऊ मोठे ग्रंथकार होऊन गेले. (अ. को. कास्ट्स अँड ट्राईब्ज ऑफ सदर्न इंडिया)

**आरामबाग**(१)(बंगाल इलाखा)जिल्ह्याचा पश्चिमेकडील विभाग २२°३६' ते २३°२' उ.अ. व ८७°३०' ते ८७°५९' पू. रे. क्षेत्रफळ ४०६ चौरस मैल. अगदीं सखल प्रदेशांत हा विभाग बसला असल्याकारणानें या जिल्ह्यांत अति रोगट म्हणून हा विभाग समजला जातो. पुरानें पिकांचें नुकसानहि वारंवार होतें. लोकसंख्या (१९११) ३,१६,७५९ या विभागांत एक गांव व ६१५ खेडीं आहेत. श्यामबाजार, खावाकुल आणि बाली हीं बाजाराचीं गावें आहेत. आरामगडच्या पश्चिमेस आठ मैलांवर भीतरगड नांवाचें गड मांदारणपैकीं पडीत भाग आहेत. पंधराव्या व सोळाव्या शतकांत या भागांत फार लढाया झालेल्या आहेत.

(२) (बंगाल इलाखा) हुगळी जिल्ह्यांतील या विभागाचें मुख्य ठिकाण. हें द्वारकेश्वर नदीकांठीं आहे. २२°५३' उ. अ. व ८७°४७' पू. रे. लोकसंख्या ८२८१ (इ. स. १९०१). आरामबागेला जाण्याकरितां पुष्कळ मार्ग आहेत एक तर हौरा–आमता रेलवेवरच्या चंपाडंगा स्टेशनावर उतरून तेथून १४ मैल पालखींतून किंवा बैलगाडींतून जातात; पण

पावसाळ्यांत बी. एन. रेल्वेनें हौऱ्याहून कोल्याला जाऊन तेथून आगबोटीनें राणीच्कास व त्या ठिकाणाहून बोटीनें आरामबागेस पोंचतात. बरद्वानहूनहि आरामबागेस जातात. पाऊस सरासरी ५८ इंच पडतो. इ. स. १८८६ सालीं येथें म्युनिसिपालिटी स्थापन झाली. इ. स. १९०३-४ सालीं तिचें उत्पन्न ७००० रुपये व खर्च ६४०० रुपये होता. ( इं. गॅ. ५ अर्नोल्ड गाइड. )

**आरारट** (प र्व त)—समुद्रसपाटीपासून १७००० फूट उंचीवर असलेल्या आर्मेनिया पठाराच्या सर्वांत उंच शिखराला हें नांव दिलें आहे. आरारट पर्वताचा मासिक्स हा मुख्य भाग " आरास "च्या मळईच्या मुलुखाच्या उत्तरेस व पूर्वेस २५०० ते ३००० फूट उंचीवर पसरलेला असून त्याच्या आग्नेय दिशेस " बायझीड "चें पठार आहे. पर्वत ओळींच्या मुख्य भागावर ८८०० उंचीवर दोन मोठीं शिखरें आहेत. या दोन दोन शिखरामध्यें अंतर सात मैलाचें आहे. त्यापैकीं उंच शिखराला " मोठा आरारट " व दुसऱ्याला " लहान आरारट " असें म्हणतात. " मोठा आरारट " " घुमटाकार " व " लहान आरारट" "शंक्वाकार" आहे. पर्वताच्या मधल्या पट्टींतील जमीन सुपीक आहे. खालची व वरची पट्टी मात्र नापीक आहे. दोन्हीहि पर्वत ज्वालामुखोद्भव खडकांनीं व्याप्त असून विशेषतः 'अॅन्डेसाइट'व 'पायरोक्झीन अॅन्डेसाईट ' या जाती आढळतात. पर्वतावर कोठेंहि ज्वालामुखीचें तोंड आढळून येत नाहीं. स्फोटासंबंधीं ऐतिहासिक दाखला नाहीं. इ. स. १८४० सालीं " आरघरी " नांवाचें खेडें धरणीकंपामुळें नाश पावलें असें म्हणतात. परंतु त्या बाबतींत निश्चित सांगतां येणार नाहीं. [एब्रि.]

**आरारूट**—आरारूट हें दोन जातीचें आहे. एक जात हिंदुस्थानांत पैदा होते. तीस करकुमा, अंगुस्ति, फोलिआ हीं नांवें आहेत. दुसरी वेस्ट इंडीज व अमेरिकेंतील उष्ण प्रदेशांत होत असलेली. पहिल्या जातीसंबंधानें माहिती प्रथम दिली आहे.

या झाडाला तिखुर,तिकार, तंकिर, तवकिर, अरारुट–केगड्डे, अरारूट–किशंगु, कुवा इत्यादि नांवें आहेत.संस्कृतांत तवक्षीर हें नांव आहे.

बंगालचा डोंगराळ प्रदेश, मुंबई व मद्रास यांचें दरम्यान असणाऱ्या प्रदेशांत व हिमालयाच्या वायव्येकडील प्रदेशांत हीं झाडें होतात. हीं झाडें विशेषेंकरून मध्यप्रांतांत व त्यांतल्या त्यांत गोदावरी जिल्ह्यांतील उत्तरेकडील प्रदेशांत विपुल होतात रायपूर व मलबार येथें यांच्या मुळयांचा मोठा व्यापार आहे. कोचीन व त्रावणकोर येथें याच्या रानटी जातीच्या मुळापासून आरारूट काढतात.

मद्रास प्रांतांत यांचीं पिलें काढून तीं वर्षाऋतूच्या शेवटीं लावितात. जानेवारींत यांची कापणी करितात. या पिकाला उन्हाळ्यांत मधून मधून पाणी द्यावें लागतें. याचे कंद खणून काढावे लागतात. मद्रासमधील सैदापेठ येथील सरकारी शेतांतील प्रयोगावरून एका एकरामागें ३९४४ पौंड कंद किंवा ४९३ पौंड सत्व निघतें असें समजतें. पीठ करितांना कंद स्वच्छ धुवून वरील माती काढून टाकतात, आणि त्या नंतर ते कांदे कुटून त्याचा बलक करितात व तो बलक थंड पाण्यांत कुसकरून घुतात. येणेंकरून पाणी दुधासारखें होतें. तें पाढरें पाणी चाळणींतून मोठाल्या भांड्यांत गाळून ठेवतात. व तसेंच कांहीं वेळ ठेवल्यानें तळाशीं पांढरा सांका बसतो. वरील निवळ पाणी ओतून टाकतात व त्यांत पुन्हां पाणी घालून कुसकरतात व संथ राहू देतात. वरील पाणी ओतून टाकल्यावर खालीं राहिलेला सांका पत्र्यावर पसरून वाळवितात. वाळून तयार झाला म्हणजे तेंच तवकीर होय. तवकील फारच पाढरें व तकतकीत असतें. व तें बोटांत धरून दाबलें असतां कुरकुर असा आवाज निघतो. ५० शेर ताजा कांदा किंवा गड्डे घेतले असतां त्यापासून फारतर ८।१० शेर तवकीर निघतें. बर्म्यूडा बेटांतलें तवकीर श्रेष्ठ समजलें जातें. तवकीर हलकें व सहज पचणारें असल्यामुळें मुलास व आजारी माणसास देतात.

अमेरिकेंतील मूळरहिवासी लोकांस बाणापासून किंवा दुसऱ्या शस्त्रापासून जखम झाली असतां या झाडाचा चीक लावीत. म्हणून या मुळास आरारूट अशी संज्ञा प्राप्त झाली आहे.

उष्णतेपासून तोंडास चट्टे पडल्यास तवकील लावून लाळ गाळीत जावी. पित्तावर तवकील तुपात घालून खावें. मुलाची शक्ती वाढण्यास—दुधात घालून शिजवून पातळ लापशी तयार करावी व तींत थोडी खडीसाखर घालून पाजावी. रक्तप्रदरावर, तवकीर, राळ, व गेरू याचें चूर्ण तुपाशीं द्यावें असें म्हणतात.

आरारूटचें झाड साधारणपणें हळदीसारखें दिसतें. पण पानांचा रंग मात्र थोडा जास्त हिरवा गार, काळ्या झांकीवर असतो. याला हळदीसारखीं जमीनींत पाढरीं मुळें येतात. त्यांतून सत्व काढितात. हें पीक मध्यम काळ्या जमीनींत चांगलें पोसतें. जमीन चांगली तयार करून दर एकरीं सुमारें १०।१५ गाड्या शेणखत द्यावें व शेतांत दीड फूट अंतरानें सऱ्या पाडाव्या व नंतर १०×१० असे वाफे करावे. जमीन सपाट असल्यास अरुंद व लांब वाफोळ्या पाडाव्या. सरींत नऊ इंच अंतरानें मुळाचे तुकडे करून लागण मे महिन्यांत करावी. या पिकाला दोन चार खुरपण्या द्याव्या लागतात. पाणी आठ दहा दिवसांनीं देत जावें. पीक नऊ दहा महिन्यांनीं म्हणजे डिसेंबर जानेवारींत काढण्यास तयार होतें. पिकाची निगा राखल्यास उत्पन्न बरें येतें. भडगांव (खानदेश जिल्हा)येथें सरकारी शेतांत १८८८–८९ सालीं दर एकरी ६७५० पौंड मुळ्यांचें उत्पन्न येऊन त्याचें ९०० पौंड सत्व निघालें, असें प्रसिद्ध झालें आहे.

आरारूटची अरोरूट बर्म्यूडा ही एक अगदीं निराळी जात असून तिचें मूलस्थान अमेरिकेंतील उष्ण प्रदेश व वेस्ट इंडिझ बेटें हीं आहेत. ह्याच जातीची लागवड हिंदुस्थानांतहि होते. हिंदी आरारूटापेक्षां हें अगदीं उत्तम दर्जाचें व अस्सल समजलें जातें.

लागवड—२ फूट अंतरावर ३ किंवा ४ इंच खोलीचे खड्डे घेतात. व या खड्डयांत मे महिन्यांत आरारूटचीं मुळें लावून वर माती टाकून ती झांकून टाकतात. झाडाची रोपें तयार झाल्यावर बटाट्याच्या पिकाप्रमाणेंच या झाडास गड्डे किंवा कांदे येतात. त्यापासून आरारूट तयार करतां येतें. या पिकास चांगली खताळ जमीन लागत असून पाण्याचा पुरवठा लागतो.परंतु पीक खणून काढण्याच्या पूर्वी एक महिना दोन महिने पाणी देण्याचें बंद ठेवावें. कटक, नडीआद या जिल्ह्यांत पुष्कळ पीक होतें. वरील झाडाचीं पानें गळून पडावयास लागलीं म्हणजे जमिनीचे खालीं गड्डे तयार झाले असें समजावें दर एकरीं सहापासून सात टन गड्डे निघतात. कधीं बारा टनपर्यंत पीक निघतें.

व्यापारः—आरारूटचा व्यापार हिंदुस्थानांत बराच मोठा आहे. कधीं कधीं उत्तर हिंदुस्थानांत आरारुटांत मक्याच्या किंवा इतर सत्वाची भेसळ करतात. त्यामुळें निर्भेळ आरारूट मिळणें जरा मुष्किलीचें झालें आहे. [ मोडक कृत पदार्थवर्णन ]

**आरास**(१)–हें उत्तर फ्रान्सांतील पास डीकॅले विभागाचें मुख्य शहर आहे. आमीन्सच्या उत्तर–ईशान्येस आमीन्स लिले नॉदर्न रेल्वेवर ३८ मैलांवर हें शहर आहे. येथील लोकसंख्या ( १९०६ ) २०७३८ होती. स्केप व क्रिशन या नद्याच्या संगमावर हें शहर वसलें आहे. येथें बिशपचा एक वाडा व चित्रकलेचें व खोदीव कामाचें प्राचीन अवशेषांचें वस्तुसंग्रहालय तसेंच उत्तम ग्रंथसंग्रहालयहीं आहेत.

आरास हें बिशप व प्रिफेक्ट यांचें राहण्याचें ठिकाण असून येथें कनिष्ठ प्रतीची न्यायकचेरी, व्यापारी न्यायकचेरी, वणिक्सभा ( चेंबर ऑफ कामर्स ), फ्रान्सच्या पेढीचीं शाखा, काम्यूनचें विद्यालय, शिक्षकशाळा, लष्करी इंजिनियरिंग शाळा, वगैरे संस्था आहेत. शिवाय येथें तेल काढण्याचे व कापड रंगविण्याचे कारखाने, दारूच्या भट्टया व लोखंडी सामान तयार करण्याचे कारखाने आहेत. येथें गळिताच्या व खाण्याच्या धान्याचा मोठा बाजार भरतो. स्केप नदीपासून शहरापावेतो एक कालवा खोदल्यामुळें येथील व्यापारास फार मदत झाली आहे.

इतिहास.—खिस्ती शकारंभापूर्वी आरास हें ॲट्रेबेटिस प्रदेशाचें मुख्य शहर होतें. ह्यामुळेंच आरास हें नांव पडलें. रोमन अमलांत या शहरास थोडें महत्व आलें होतें. या वेळच्या रोमन अमलांचीं कांहीं चिन्हें अजून दिसतात. ४०७ मध्यें व्हॅन्डाल लोकांनीं हें शहर उध्वस्त केलें, व थोडें बहुत पुनः बांधलें गेल्यावर तें फ्रेंचांकडे आलें. सेंट व्हेडास्ट ( व्हॉस्ट ) यानें येथें ख्रिस्तीधर्माचा प्रचार केला व इ स. च्या ५०० सुमारास येथें बिशपची गादी स्थापन केली. मध्यंतरी कॅम्ब्राय येथें बिशपची गादी नेली होती. परंतु ११०० च्या सुमारास पुनः येथें आली. ८६३ मध्यें बाल्डवीन ( १ ला ) फ्लँडर्सचा काउंट यास हें मिळालें तेव्हां तें आर्टास प्रांताचें मुख्य शहर होतें. पुढें ८८० मध्यें नार्मन लोकांनीं या शहरावर सूड उगविला. ११८० च्या सुमारास या शहरास काम्यूनचा हक्क मिळाला. पुढें हें शहर फ्रेंचांनीं बळकावलें. परंतु १४९३ च्या सेनलिसच्या तहांत हें जर्मन राजा १ ला मॅक्समिलिअन यास मिळालें. १६४० मध्यें फ्रेंचांनीं हें शहर पुनः घेतल्यानंतर १६५९ च्या पिरिनिजच्या तहान्वयें त्यांच्याकडे राहिलें. येथें बरेच तह झाले. १४१४ मध्यें आर्मेग्नक्स व बर्गंडीतील लोकांत येथें तह झाला. १४३५ मध्यें इंग्लंड व बर्गंडीचीं दोस्त राष्ट्रें व फ्रेंच यांमध्यें तह करण्याकरितां एक कांग्रेस भरली होती. आंग्ल प्रतिनिधींनीं माघार घेतल्यानंतर २० सप्टेंबर मध्यें फ्रेंच व बर्गंडी मध्यें तह झाला. १४८२ मध्यें लुई ( ११ वा ) यानें फ्लँडर्समधील शहरांशीं व संस्थानांशीं तह केला.

(२) उत्तर अक्षांश २२° २९' व पूर्व रेखांश ७२° ३' यांमध्यें मुंबई इलाख्यांत खेडा जिल्ह्यांत हें एक मैदान आहे. हें आनंद व माही नद्यांच्या दुबेळक्यांत असून, अर्वाचीन काळीं या समरांगणांवर तीन युद्धें झालीं. इ. स. १७२३ मधील पहिल्या युद्धांत मोंगल बादशहाचा सुरतेचा सुभेदार रुस्तुमअल्ली याचा निझाम उल्मुल्क याच्या सरदारानें पिलाजी गायकवाडाच्या मदतीनें पराभव करून त्यास ठार मारिलें. इ. स. १७७५ च्या फेब्रुआरी महिन्यांत येथील दुसऱ्या युद्धांत रघुनाथराव पेशवे यांचा बारभाईच्या बाजूनें फत्तेसिंग गायकवाडानें युद्धांत पराभव केला तिसरे युद्ध लवकरच दोनचार महिन्यांनीं झालें. त्यांत इंग्लिशांच्या सैन्यानें कर्नल किटिंगच्या नेतृत्वाखालीं मराठ्यांशीं निकराची लढाई करून त्यांचा पराभव केला. ( इं. गॅ. १९०८ ).

**आरिओस्टोः**—हा इटालीयन कवि इ. सं. १४७४ मध्यें लांबर्डीतील रेगो गावीं जन्मला. लहानपणचीं कांहीं वर्षें बापाच्या आज्ञेवरून कायद्याचा अभ्यास करण्यांत गेल्यानंतर स्वतःच्या आवडीप्रमाणें त्यास ग्रेगोरिओ डिस्पोलेटो या गुरूजवळ लॅटिन ग्रंथांचा अभ्यास करतां आला. पण पुढें त्याचा गुरूच फ्रान्सला गेल्यामुळें ग्रीक भाषेचा त्याचा अभ्यास तसाच राहिला. नऊ भावंडांचा कौटुंबिक भार शिरावर पडला असतां याच सुमारास त्यानें कांहीं नाटकें व कविता लिहिलीं. त्यापैकीं कांहीं वाचल्यामुळें कार्डिनल इपोलिटो डि एस्ट या गृहस्थाचें लक्ष त्याजकडे जाऊन, त्यानें त्यास आश्रय

दिला. परंतु तेथें त्यास गौरव मिळालें नाहीं, व पुढें १५१८ त तो कार्डिनल हंगेरीस जावयास निघाला तेव्हां आरिओस्टोनें त्याचा आश्रय सोडून दिला. त्यानंतर त्याच कार्डिनलचा भाऊ डयूक ऑफ फेरास नांवाचा होता. त्याचा आश्रय त्यास मिळाला. परंतु यावेळीं रोम येथील वकिलातीचें काम केल्यामुळें त्यास मुत्सद्दी म्हणून थोडी प्रसिद्धि मिळाली होती. आपल्या हाताखालील एका प्रांतावर गव्हर्नर म्हणून डयूकनें त्याची नेमणूक केली. येथील काम तीन वर्षे उत्तमप्रकारें करून त्यानें आपलें राहिलेलें आयुष्य फेरास येथें नाटकें लिहिण्यांत व त्यांचे प्रयोग, थिएटरें यांची सुधारणा करण्यांत घालविलें. तो इ. स. १५३३ मध्यें क्षयाच्या विकारानें मृत्यु पावला. आरिओस्टोचा सुप्रसिद्ध ग्रंथ 'आर्लेंडो फ्युरोसो, हा असून त्यांतील असामान्य सौंदर्यामुळ इतर कित्येक अद्भूत रसयुक्त कवितांचें इटलीला तीन शतकेंपर्यंत विस्मरण पडलें होतें. असें सांगतात कीं गव्हर्नरच्या नोकरीवर असतांना कांहीं दरोडेखोरांनीं त्यांजवर छापा घातला होता परंतु हा आपला कैदी वरील आर्लेंडो फ्युरोसो ग्रंथाचा कर्ता होय असें समजतांच त्यांनीं त्यास मुक्त करून उलट त्याची क्षमा मागितली.

[संदर्भ ग्रंथः–इ. गार्डिनर.–आरिओस्टो, दि प्रिन्स ऑफ कोर्ट पोएटस्.]

**आरिस्टाटल** ( ख्रि. पू. ३८४–३२२ )—हा महान ग्रीक तत्त्ववेत्ता स्टागिरा येथें जन्मला. डायोनिशसनें त्याचें अल्प चरित्र दिलें आहे. आरिस्टाटलच्या बापाचें नांव निकोमाकस आणि आईचें फाएस्टिस होतें. आरिस्टाटलच्या आयुष्याचे चार भाग पडतात. अठराव्या वर्षापर्यंत आईबापांचें सांनिध्यांतील लहानपणा, अडतिसाव्या वर्षापर्यंत अथेन्स येथील प्लेटोजवळ शिक्षण, पन्नासाव्या वर्षापर्यंत ग्रीक जगांतील प्रवास, आणि त्रेसष्टाव्या मृत्यूच्या वर्षापर्यंत लायसिअम येथील स्वतःचें तत्त्वज्ञानाचें शिकवण. तथापि त्याच्या चरित्राची सविस्तर व खात्रीलायक माहिती नाहीं. त्याचा बाप मासिडोनिया येथील राजवैद्य असल्यामुळें तेथील दरबारांत आरिस्टाटलचें वजन वाढण्यास मदत झाली, आणि औषधिशास्त्र व प्राणिशास्त्र यांकडे त्याचा ओढा वळला, सृष्टिशास्त्रावर त्याचा विश्वास बसला, व अथेन्समध्यें त्यानें वैद्यकीचा प्रथम धंदाहि केला. तसेंच आपल्या आयुष्यांतील दुसऱ्या भागांत प्लेटोजवळ शिक्षण घेत असतां सृष्टिशास्त्र व अध्यात्मशास्त्र व नीतिशास्त्र यांचा तुलनात्मक अभ्यास त्याला करतां आला. तो स्वतः कळकळ बाळगणारा, गुणग्राही व स्वतंत्रपणें विचार करणारा विद्यार्थी होता. प्लेटोचेंहि ह्या शिष्याविषयीं विशेष चांगलें मत होतें, शिवाय त्याचे समकालीन युडोक्सस व कालिप्पस हे ज्योतिषशास्त्रज्ञ आणि इसोक्राटीस व डेमास्थिनीझ हे वक्ते यांच्यामुळें त्याच्या ज्ञानांत भर पडली अशा लोकांबरोबर त्याला विरोधहि उत्पन्न होई. त्यामुळें त्याला आपले स्वतंत्र व्यवसाय करावे लागत. अशा रीतीनें प्लेटोचा शिष्य म्हणून असतानांच त्याचे स्वतःचे विद्यार्थी असत, स्वतःचीं स्वतंत्र पुस्तकें, विशेषतः संवाद असत, व त्याचें स्वतःचें विशिष्ट तत्त्वज्ञान म्हणूनहि असे.

अशा तऱ्हेनें बालपणांत उत्तम वळण लागलेल्या, व तरुणपणांत उत्तम शिक्षण मिळालेल्या आरिस्टाटलला प्लेटोच्या मृत्यूनंतर त्यानें केलेल्या प्रवासामुळें अधिकच फायदा झाला. प्लेटोच्या मरणानंतर त्याच्या विद्यालयाचें ( अकॅडमी ) चालकत्व त्यानें आपल्या पुतण्याकडे दिल्यामुळें आरिस्टाटल हा आपला मित्र हर्मिआस याच्या दरबारीं गेला व तेथें त्यानें त्याच्या पिथिआस नांवाच्या बहिणीशीं विवाह केला. हर्मिआसच्या मृत्यूनंतर ३४३–३४२ मध्यें मॅसेडोनच्या फिलिपनें आपला तेरा वर्षांचा मुलगा अलेक्झांडर याला शिक्षक म्हणून आरिस्टाटला जवळ ठेविलें. आरिस्टाटलनें आपल्या शिष्याकरतां राजसत्ता व वसाहती या विषयांवर लेख लिहिले. अलेक्झांडरला आरिस्टाटलविषयीं इतका आदर असे कीं, त्यानें काढलेली होमरची आवृत्ति तो उशाखालीं घेऊन निजत असे.

तथापि पुढें कॅलिस्थेनिस नांवाच्या ॲरिस्टाटलच्या एका आप्तावरील अलेक्झांडरचा राग त्याच्या मरणानंतर आरिस्टाटलकडे वळला. तरी त्याच सुमारास उपस्थित झालेल्या हिंदुस्थानावरील मोहिमेच्या गडबडींत आरिस्टाटलकडे लक्ष देण्यास त्यास फावलेंच नाहीं. आरिस्टाटल उत्तम शिक्षक होता, व अलेक्झांडर लायक विद्यार्थी होता,ह्या गोष्टी खऱ्या; या बाबतींत बऱ्याच लेखकांनीं अतिशयोक्तीनें वर्णन केलें आहे. कारण ३४० मध्येंच फिलिप बायझंटिअमचे स्वारीवर गेल्यामुळें अलेक्झांडरला राज्यकारभार चालवावा लागला आणि आरिस्टाटलला आपल्या स्टागिरा या जन्मगावीं राहावयास गेला, यामुळें गुरुशिष्यांची ताटातूट झाली असावी. यावरून आरिस्टाटलनें आठ वर्षे प्रत्यक्ष शिक्षकाचें काम केलें, हे डायोनिशसचें म्हणणें चुकीचें दिसतें. शिवाय याच वेळीं आरिस्टाटलचे इतर दुसरे शिष्य होते आणि त्याचा लेखनव्यवसायहि चालू होता. असो इतकें मात्र खरें कीं, स्टागिरा हें ३४८ मध्यें उध्वस्त केलें. आरिस्टाटलच्या शब्दास मान देऊन शहर पुन्हां वसविण्याचें, आणि त्या शहराच्या ह्या तत्त्ववेत्त्याला प्राण्यांचा इतिहास या विषयांवरील संशोधनाच्या कामीं मदत केल्याचें श्रेय मात्र मसेडॉनच्या राजांकडे आहे.

शेवटीं आरिस्टाटल आपल्या आयुष्याच्या चवथ्या भागांत, अलेक्झांडर राज्यावर आल्यानंतर अथेन्सला येऊन तेथें एक विद्यालय काढून राहिला, व त्यांत स्वतः व्याख्यानें देत असे. शिवाय त्याचें ग्रंथ–लेखनाचें कामहि चालू होतें. प्लेटोप्रमाणें आरिस्टाटलचे ग्रंथ केवळ संवादरूप व मागाहून शिष्यांनीं लिहिलेले असे नाहींत. अथेन्समध्यें असतां आरिस्टाटल एका वेळींच विद्यार्थी, वाचक

व्याख्याता, लेखक व ग्रंथसंग्राहक होता. स्ट्राबो म्हणतो त्याप्रमाणें, अरिस्टॉटलनेंच प्रथम पुस्तकसंग्रह करण्याचा उद्योग केला व इजिप्तच्या राजांनां लायब्ररी बनविण्याचा सल्ला दिला.

इ. पू. ३६२ मधील मॅंटिनिआच्या लढाईनंतर ग्रीसमध्यें माजलेला घोटाळा त्यानें पाहिला होता, व पुढें विद्यालय काढण्यांत, अथेन्सवर अलेक्झांडरचीच सत्ता स्थापित झाली असल्यामुळें, त्याची मदत त्याला झाली होती. शिवाय अथेन्समधील लोकशाहीचा अन्याय्य करवसुली, स्पार्टा येथील लोकसंख्येचा ऱ्हास, व एकंदर ग्रीक जगांतील जुलमी व स्वार्थी सत्ता ह्या गोष्टी पाहून सर्व ग्रीक संस्थानांतील राज्यपद्धति लरकारहितदक्ष अतएव त्याज्य होत असा त्यांचा त्यानें निषेध सुरू केला, आणि प्रत्येक सरकार, मग तें लोकसत्ताक राज्यपद्धतीचें असो किंवा शिष्टसत्ताक पद्धतीचें असो, किंवा एकसत्ताक पद्धतीचें असो-प्रत्येक सरकार सार्वजनिक हितदक्ष असलें पाहिजे; व एकंदरींत एकसत्ताक पद्धतीच बरी आणि अलेक्झांडर सारख्या राजाची साम्राज्यसत्ता सर्वत्र स्थापन व्हावी, अशीं मतें तो प्रतिपादन करूं लागला. अर्थात् त्यामुळें त्याचें विद्यालय निर्विघ्नपणें चाललें होतें. परंतु इ. पू. ३२३ मध्यें अलेक्झांडर एकाएकीं मरण पावला; आणि अथेन्सनें आपलें स्वातंत्र्य प्रस्थापन करण्याचा प्रयत्न सुरू केला, तेव्हां मात्र आरिस्टॉटलचा जीव धोक्यांत आला आणि जुलमी हर्मिअसचा उपमर्द केल्याच्या गुन्ह्याचा आरोप अरिस्टाटलवर ठेवण्यांत आला, तेव्हां साक्रेटीसवरील प्रसंग लक्षांत घेऊन तो युबोईआंत चाल्किसला जाऊन राहिला व तेथेंच खि. पू. ३२२ मध्यें मरण पावला. त्यानें आपल्या मालमत्तेचें मृत्युपत्र करून ठेविलें होतें. अशी ही आरिस्टाटलच्या चरित्राची अल्प माहिती आहे. यावरून त्याचें आयुष्य वडिलार्जित संपत्ति व दर्जा मिळाल्यामुळें श्रीमंतींत गेलें आणि उद्योग व तत्त्वज्ञान यामुळें सुखांत गेलें असें दिसतें.

आरिस्टॉटलच्या तत्त्वज्ञानाचें विस्तृत विवेचन विज्ञानेतिहास पृ. २५१ ते ५३ मध्यें आलेलेंच आहे. त्याच्या ग्रंथांचें निरीक्षण केल्यास त्याच्या व्यापक अवलोकन शक्तीविषयीं मोठा चमत्कार वाटतो. ' साक्रेटीसचे संवाद ' या ग्रंथाची भाषाशैली तर अत्यंत मनोरम आहे. प्लेटो व आरिस्टॉटल या दोघांनींहि स्वतंत्र ग्रंथ लिहिले व विद्यार्थ्यांनां व्याख्यानें दिलीं. पण प्लेटोचे ग्रंथ उपलब्ध असून व्याख्यानें लुप्त झालीं आहेत, तर आरिस्टाटलची व्याख्यानें उपलब्ध आहेत पण ग्रंथ नष्ट झालेले आहेत. अगदीं अलीकडे इजिप्तमध्यें सांपडलेला त्याचा ग्रंथ म्हणजे अथेन्सच्या राज्यपद्धतीवरील निबंध होय. या निबंधाची भाषा सोपी व सरळ असून, मनांत आल्यास तो किती सुंदर लिही हें त्यावरून निदर्शनास येते. [ नीति, समाजशास्त्र, शासनशास्त्र साहित्यशास्त्र पहा. ]

सृष्टिविज्ञान व प्राणिशास्त्र यांवरील आरिस्टॉटलच्या ग्रंथाचा उल्लेख पूर्वी विज्ञानेतिहासांत ( ज्ञा. को. भा. ५ पृ. २५१ ) आलाच आहे.

[ संदर्भ-ग्रंथ.—ग्रोट-आरिस्टॉटल; ल्युकेसले-लाइफ आफ आरिस्टॉटल; कोप-ऱ्हेटॉरिक; डॉ. हेनरी जॅक्सन—निकोमॅशियन एथिक्स; बुचर—पोएटिक्स, हिक्स—डि ॲनिमा; सन्डे—अथेनियन कान्स्टिटयूशन; जेब-ऱ्हेटारिक; इ. कार्डवेल-निकोमॅशियन एथिक्स; इ. पोस्ट-पोस्टेरिअर ॲनॅलिटिक्स, व सोफिस्टिक एलेंची यांचें भाषांतर; आर. कांग्रेव्ह-पॉलिटिक्स; ए ग्रँट-निकोमॅशियन एथिक्स; इ. वालेस-डि ॲनिमा; बी जोवेट-पॉलिटिक्स; न्युमन-पॉलिटिक्स; डॉ ओग्ले-डि पॅर्टस ॲनिमालियन चें भाषांतर-जे. ए स्टूअर्ट—नोटस् ऑन दि निकोमॅशियन एथिक्स्; आर्. शुट—हिस्टरी ऑफ आरिस्टॉटलियन रायटिंग्ज्, प्रो. जे.ब्रट-निकोमॅशियन एथिक्स्; डब्ल्यु. डी रॉस—मेट्याफिजिक्स चें भाषांतर; आय. बी वाटर—निकोमॅशियन एथिक्स व पोएटिक्स्. ]

**आरिस्टोफेनिज** (१)—( खि. पू. ४४८-३८० ) हा आथेन्स येथील प्रसिद्ध नाटककार व कवि असून त्याचा जन्म इ. स. पू. ४४८ च्या सुमारास झाला असावा कारण खि. पू. ४२७ मध्यें त्याचे 'भोजलभाऊ' नांवाचें नाटक प्रसिद्ध झालें त्यावेळीं तो लहान मुलगाच होता असें म्हटलें आहे. त्याचा बाप फिलियस हा एजिना येथील जमीनदार होता. आरिस्टोफेनिज यास तीन मुलगे असून तेहि त्याच्या सारखेच कवी होते. पहिला फिलिप हा ३७६ पासून प्रसिद्धीस आला. आरारोज यानें आपल्या बापाचीं ' कोकेलस ' व 'एओलोसिकन ' हीं दोन नाटकें प्रसिद्ध केलीं व त्या नंतर ३७५ पासून स्वतःचें ग्रंथ प्रकाशित करूं लागला. व तिसरा निकोस्ट्रेटस हा न्यू कामेडीचा कर्ता म्हणून प्रसिद्धीस आला.

आरिस्टोफेनीजनें एकंदर ५४ नाटकें लिहिलीं. त्यांपैकीं अ वघीं अकरा शिल्लक आहेत. या अकरांत आथेन्सचें३६ वर्षांचें अंतर्बाह्य चित्र कुशलतेनें रेखाटण्यांत आलेलें आहे. हीं अकरा नाटकें अनुक्रमें पांच, चार व दोन अशीं तीन कालविभागांत विभागण्यांत येतात. पहिल्या भागांतील नाटकांत त्यानें राजकीय विषयांवर औपरोधिक लिहून खूप हात उगवून घेतला आहे. औपरोधिक लिहिणें हाच या कवीचा विशेष होय असें म्हटल्यास गैर होणार नाहीं. दुसऱ्या विभागांतील नाटकांत थोडी मुग्धता व सावधपणा यांची छटा दिसून येतें. 'दि नाइट्स ' 'दि क्लाउड्स', 'दि पीस' हीं पहिल्याचीं उदाहरणें असून दि बर्डस्, 'दि लिसिस्ट्राटा' 'दि फ्रॉगज' हीं दुसऱ्याचीं उदाहरणें आहेत तिसऱ्या विभागांतील नाटकें हीं विशेषतः मिडल कॉमेडी ' या वर्गांत येतात.

आरिस्टोफेनिज याची कवित्वशक्ति कितीहि मोठी असली तरी त्याच्या नाटकावरून तो निसर्गप्रिय होता असें दिसून येतें. पर्शियन लढायांच्या वेळचें अथेन्स हें

त्याचें ध्येय होतें. अथेनियन साम्राज्य ज्यामुळें मित्रराष्ट्रांनां तापदायक व ग्रीसला भयोत्पादक झालें तें धोरण त्यास आवडलें नाहीं; लोकसंख्येंतील जुलमीपणाचा व गांवढळपणाचा तो तिरस्कार करतो. शिक्षणाच्या नव्या कल्पनेस तो ढोंग व भ्रष्टपणा समजतो. त्यानें केलेली टीका विधायक स्वरूपाची नसल्यामुळें अथेन्सला तो नवें कांहीं शिकवूं शकला नाहीं. तो कवी या नात्यानें अमरआहे. सृष्टिसौंदर्यवर्णनपर कोणतीहि ग्रीक कविता याच्या कवितांची बरोबरी करूं शकत नाहीं. तसेंच अलीकडील कवींत फक्त शेक्सपीअरच कायतो कल्पनेच्या विविधतेंत त्याची बरोबरी करतो.

[ संदर्भ ग्रंथ—एच मूलर स्ट्रुबिंग—आरिस्टोफेनिज उंड डाय हिस्टॉरिशे क्रिटिक; ए. कोर्ट–आंरिस्टोफेनी एट लानासिन कॉमेडी ॲटिक; ए. ब्रि. ]

( २ )—हा एक ग्रीक टीकाकार व व्याकरणकार बायझँटाइन येथील राहणारा होता. याचा जन्म ख्रिस्ती शकापूर्वी सुमारें २५७ या वर्षी झाला. बालवयांतच तो अलेक्झांड्रिया येथें गेला, व तेथें हीरोडोटस व कॅलिमॅकस यांच्या जवळ विद्या शिकला. वयाच्या साठाव्या वर्षी तेथील अजबखान्याच्या ग्रंथसंग्रहालयाच्या मुख्य अधिकारावर त्याची नेमणूक झाली. कवींच्या काव्याच्या अभ्यासाकडे त्याचा विशेष कल होता. विशेषतः होमरचा त्यानें चांगला अभ्यास केला होता. शोकपर्यवसायी, आनंदपर्यवसायी व भावनात्मक कवितांचा संग्रह करून त्यानें हेसिअड नांवाचा ग्रंथ संपादीत केला होता. तसेंच प्लेटोच्या संवादांची त्रयीमध्यें विभागणी केली, व आरिस्टॉटलच्या ' प्राण्यांचे स्वभाव ' या ग्रंथाची संक्षिप्त आवृत्ति काढली. आरिस्टोफेनिज व इतर नाटककार यांच्या नाटकांवरील त्याची टीका अद्याप राखून ठेवण्यांत आली आहे. अथेन्सच्या वारयोषिता, म्हणी वगैरेवर त्यानें ग्रंथ लिहिला आहे. ग्रीक वाङ्मयाच्या इतिहासावरहि त्याची टीका आहे. बाह्यदेशीय व अपरिचित शब्द व वाक्प्रचारांचा संग्रह करून त्यानें कोशकाराचें कार्य केलें. वैय्याकरण या नात्यानें त्यानें एक शास्त्रीय विद्यापीठ स्थापन केलें व आपल्या 'ॲनॅलाजी' त शब्दाच्या कित्येक रूपांचें पद्धतशीर विवरण केलें. लेखनांतील स्पष्टीकरणात्मक चिन्हें त्यानें तयार केलीं. अलेक्झांड्रियन ' कॅनन ' त्याच्याच कल्पनेवरून निघाला. [ संदर्भ ग्रंथ—नॉक–आरिस्टोफेनिज बायझंटी प्रॅनॅटिकी फ्रॅगमेंटा ( १८४८ ). ]

**आरू द्वीपसमूह**—हा डच ईस्ट इंडीजपैकीं आम्बोयना रेसिडेन्सींतील एक द्वीपसमूह आहे. गिनीच्या नैर्ऋत्य किनाऱ्यापासून यांचा अगदीं जवळचा भाग ७० मैल आहे. येथील बेटें कांहीं मोठीं ( वोकन, कावरर, मैकोर व ट्रांगन ) यास टाना बेसर ( मोठा प्रदेश ) म्हणतात. व कांहीं लहान आहेत. या भागांत नदी सारख्या भेगा पडून जवळजवळ ८० लहान लहान बेटें मुख्य भागापासून अलग झालीं आहेत. या भागाचें एकंदर क्षेत्रफळ ३२४४ चौरस मैल असून लोकसंख्या सुमारें २२००० आहे. पूर्व किनाऱ्यावर प्रवाळाचे खडक आहेत. येथें बरेंच जंगल असून यांत देवदार, तालवृक्ष, नेचे, वगैरे झाडें आहेत. येथील रहिवाशी पापुअन वंशाचे परंतु मिश्र रक्ताचे आहेत. यांचे उली–लुना व उली–सावा असे दोन संघ असून ह्यांत वैमनस्य असतें. येथील घरें फार विचित्र तऱ्हेचीं आहेत; प्रत्येक घरास एका खोलीसभोंवती दुसरी अशा दोन खोल्या असतात. या लोकांच्या चाली रानटी आहेत. येथील राजावर डच लोकांची देखरेख असते. येथें कांहीं लोक ख्रिस्ती आहेत व कांहीं मुसुलमान आहेत. परंतु बहुतेक लोक कोणत्याच धर्माचे नाहींत. पश्चिमेकडील एका बेटावरचें डोबो हें शहर त्यांचें मुख्य स्थान आहे. पश्चिमेकडील पावसाच्या वाऱ्याच्या दिवसांत प्रत्येक वर्षी कांहीं व्यापारी लोक येथें येऊन राहतात. हे लोक मोत्याच्या शिंपा, कांसवांच्या पाठी, वगैरे या बेटांवर सांपडणाऱ्या वस्तूंचा व्यापार करतात. [ए. ब्रि ]

**आरे**.—आर्य शब्दापासून हें नांव बनलें आहे. दक्षिण कॉनडामध्यें या 'आरे' लोकांनां 'आर्यक्षत्री' म्हणतात व तेलगु प्रदेशांत मराठी शेतकऱ्यांनां 'आरे कापू' असें नांव आहे. दक्षिण कॉनडा, बेल्लारी व अनंतपुर येथें या जातीचे बरेच लोक आहेत, व हेच खरे आरे लोक होत. खरे आरे लोक मराठी जातीचे शेतकरी असून ते गळयांत जानवें घालतात, ब्राह्मणांकडून धार्मिक संस्कार करावितात, व शृंगेरी मठाच्या अधिपतीला मानतात. मुलींचीं लग्नें ऋतु प्राप्त होण्यापूर्वी किंवा नंतर करितात, विधवाविवाह यांच्यांत अशास्त्र मानितात. जारकर्माबद्दल नवऱ्याला बायकोशीं घटस्फोट करितां येतो, पण बायकोला तसें करितां येत नाहीं. मांसाशन करण्याची मुभा आहे, पण मद्यप्राशन अजीबात वर्ज आहे. दक्षिण कानडा मधील आरे मराठी किंवा कोंकणी भाषा बोलतात पण कासारगौडा तालुक्यांत ते कानडी बोलतात.

दक्षिण कानडा जिल्ह्यांतील मराठी बोलणारे आरे यवरु किंवा आर्यवरु म्हणजे बापाकडून मुलांकडे वारसाचा कायदा पाळतात. संस्कार चालविण्यासाठीं ते शिवल्ली ब्राह्मण आणितात. लग्नविधींतील एक मजेदार प्रकार म्हणजे, नवरा युद्धार्थ रणक्षेत्राकडे जाण्याचा आव घालून आपलें क्षत्रियत्व व्यक्त करितो. आरे व वरु पक्षी व मासे खातात. या जातीची देवता अम्मनोरु ( दुर्गा ) होय. हिच्या पूजेकरितां इतर मराठा जातींप्रमाणें गोंडल पुजारी नेमतात. ( थर्स्टन–कास्टस ॲंड ट्राईब्स ऑफ सदर्न इंडिया ).

**ऑरेंज, शहर**.—फ्रान्सच्या आग्नेय भागांतील व्हाक्लॉस विभागाच्या एका अरॉंडाइजमेंटचें मुख्य शहर. ॲव्हिग्नॉनच्या उत्तरेस १८ मैलांवर लिऑंपासून मार्सेलिसला जाणाऱ्या रेल्वेवर हें आहे. येथील लोकसंख्या १९०६ सालीं शहराची ६४१२ व कॉम्यूनची १०३०३ होती. हें ऱ्होनच्या वामतीरापासून

थोड्या अंतरावर वसलें आहे. हा भाग फार सुपीक असून येथें फळफळावळ, लोकर, रेशीम, मध, वगैरे मालाचा व्यापार फार होतो. रोमन काळांतील प्राचीन अवशेषाबद्दल या शहराची ख्याति आहे. येथील विजयाप्रीत्यर्थ उभारलेली कमान साऱ्या फ्रान्स देशांत अद्वितीय व यूरोपखंडांत विस्ताराच्या व महत्त्वाच्या दृष्टीनें तिसरी आहे. ही कमान इसवीसनानंतर २१ व्या वर्षी गॉलचा अधिपति सेक्रोव्हिर यावर टायबेरिअसनें मिळविलेल्या विजयाच्या स्मरणार्थ बांधण्यांत आली असावी असें तेथील लेखावरून समजतें. दुसरी भव्य इमारत सम्राट हॅड्रिअन याच्या वेळचें नाटकगृह ही होय.

हें शहर सब प्रिफेक्ट याचें राहण्याचें ठिकाण असून येथें पहिल्या प्रतीची न्यायकचेरी, व कॉम्यूनची शाळा वगैरे संस्था आहेत. येथें कवले व नकशी कामाचे कारखाने व बूट वगैरे तयार करण्याचे कारखाने असून फळफळावळ, दारू वगैरेंचा व्यापार चालतो.

ऑरेंज हें (आरासिओ) कॅव्हरीचें राजधानीचें शहर होतें. इसवीसनापूर्वी १०५ व्या वर्षी सिंब्री व ट्यूटन लोकांनीं एका रोमन सैन्याचा पराभव केला होता. सीझरनंतर हें शहर वसाहतीचें एक महत्त्वाचें स्थान झालें. आरेंज शहर आस्ट्रेलियाच्या राज्यांत मिळविण्यांत आलें होतें,पुढें सॅरासन लोकाच्या हातांत आलें, नंतर शार्लमेन यानें तें पुनः घेतलें. ११ व्या शतकांत येथें स्वतंत्र काउंटपद निर्माण झालें. १४ व्या शतकापासून क्रांतिकालापावेतों येथें एक विश्वविद्यालय होतें. राज्यक्रांतीच्या काळांत या शहराचें बरेंच नुकसान झालें. [ए.ब्रि.]

**ऑरेंज घराणें**—हें शार्लमन बादशहाच्या वेळेपासून अस्तित्वांत आहे. या घराण्याचा मूळपुरुष ८ व्या शतकांतील विल्यम लीकॉर्नेट हा होय. या घराण्याचें राज्य सध्यां फ्रेंचांच्या ताब्यांत असलेल्या ऑरेंज जिल्ह्यावर होतें. ११७४ त हा बेर्ट्रांड डी बॉक्स याच्या ताब्यांत गेला.पुढें येथें १३९३ मध्यें कलॉन्स ( शलॉन्स ) घराणें राज्य करूं लागलें. या घराण्यांतील राजे येणेंप्रमाणेः—पहिला जॉन ( १३९३–१४१८ ); पहिला लुई ( १४१८–१४६३ ); आठवा विल्यम ( १४६३–१४७५ ); दुसरा जॉन ( १४७५–१५०२ );फिलबर्ट ( १५०२–१५३० ).

फिलबर्ट हा पांचव्या चार्लसच्या फार मर्जीतला होता. हा मेल्यावर याला पुत्र नसल्यामुळें या घराण्याचें राज्य त्याच्या बहिणीच्या रेने नांवाच्या मुलाकडे गेलें. १५४४ त रेने मरण पावल्यावर या घराण्याचें राज्य त्याचा चुलतभाऊ नासॉडिलेनबर्गचा कौंट विल्यम याचा मुलगा विल्यम याचे ताब्यांत गेलें. याची जर्मनीमध्येंहि जहागीर होती. हाच पुढें प्रसिद्धीस आलेला विल्यम सायलेंट होय. १५७४ त याचा खून झाल्यावर याचा ज्येष्ठ मुलगा फिलीप विल्यम हा गादीवर आला. याला दुसरा फिलीप म्हणत असत. १६२८ त याच्या मरणोत्तर याचा भाऊ मॉरीस हा गादीवर बसला.याची उत्तम सेनापतींत गणना होती. हा १६२५ त मरण पावला व याच्यानंतर विल्यम सायलेंटच्या चवथ्या बायकोपासून झालेला फ्रेडरिक हेनरी सिंहासनारूढ झाला. हा मोठा शूर असून राजकार्य धुरंदर होता. पुढें हा मेल्यावर १६४७ त याचा मुलगा विल्यम हा राज्यपदारूढ झाला. याचा विवाह १६४१ त इंग्लंडची राजकन्या मेरी इच्याशीं झाला होता. यानंतर १६५०त याचा मुलगा तिसरा विल्यम हा गादीवर आला, याच्या कारकीर्दींत नेदर्लंडांतील संयुक्त प्रांतांत मोठी राज्यक्रांति झाली व१६७२त या राज्यक्रांतीचा प्रतिकार करण्याचा यानें पुढाकार घेतला. पुढें फ्रान्सचा राजा चवदावा लुई यानें ऑरेंज घराण्याचा ऑरेंज प्रांत काबीज केला त्यानंतर विल्यम यानें १६७७ इंग्लंडच्या दुसऱ्या जेम्सची कन्या मेरी इच्याशीं विवाह केला व सन १८८८ त इंग्लंडमध्यें राज्यक्रांति झाली असतां लोकांच्या मदतीनें दुसऱ्या जेम्सला हांकून देऊन आपण इंग्लंडचा राजा झाला. हा तिसरा विल्यम या नांवानें प्रसिद्ध आहे. हा १७०२ या वर्षी मेला. पुढें याला संतान नसल्यामुळें याची पदवी जॉन फ्रीसो यास मिळून हा चवथा विल्यम झाला. याच्यानंतर पांचवा व सहावा विल्यम अशीं याचीं दोन मुलें गादीवर आलीं. सहावा विल्यम हा १८१५त नेदर्लंडचा राजा झाला. व आपणास पहिला विल्यम म्हणवूं लागला. [ए.ब्रि.]

**ऑरेंज नदी**—ही दक्षिण आफ्रिकेंतील सर्वांत मोठी नदी आहे, व ही त्या खंडाच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत वाहाते. इचा उगम बासुटोलँडमध्यें आहे. ही अटलांटिक महासागरास मिळते. इच्या उपनद्या कॅलेडॉन्, के, स्ट्रॉमबर्ग व व्हीको इत्यादि अनेक आहेत. ह्या नदीच्या उगमाचा शोध टी. आर. वॉसेट व डूमा या दोन फ्रेंच मिशनऱ्यांनीं लावला.(१८३५) हिच्या काठीं ऑरेंज रिव्हरकालनी आहे. [ए.ब्रि.]

**आरेंजफ्रीस्टेट**—हा ब्रिटिश दक्षिण ऑफ्रिकेचा प्रांत आहे. इ. स. १८५४ पासून १९०० पर्यंत हें स्वतंत्र प्रजासत्ताक संस्थान होतें. १९०० पासून १९१० पर्यंत या प्रांताला ऑरेंजरिव्हर कॉलनी म्हणत असत. ऑरेंजनदीच्या उत्तरेस व व्हालनदीच्या दक्षिणेस, २६°३' ते ३०°५' उत्तर अक्षांश, व २४°२०' ते २९°४०' पूर्वरेखांश याच्या दरम्यान हा प्रांत आहे. याचें क्षेत्रफळ ५०३९२ चौरस मैल असून याच्या उत्तरेस ट्रान्सव्हाल, पूर्वेस नाताल, आणि दक्षिणेस व पश्चिमेस केप प्रांत आहे.

ड्रेकन्सबर्ग, ऑक्स, मेलानीज, कॉप, फ्लटबर्ग हे येथील मुख्य पर्वत आहेत. व्हॅनरीन घाटांतून रेल्वे गेली आहे. प्रांताच्या पश्चिमभागास नैसर्गिक सरहद्द मुळींच नाहीं. व्हाल आणि कॅलिडॉन नद्यांच्या दरम्यान रुडबर्जन व कोरानाबर्जन टेंकड्यांशिवाय रवझव्हिले नांवाचा सुपीक भाग आहे. सँड नदीच्या तीरावर ट्रान्सव्हालच्या स्वराज्याचा

करारनामा लिहिला गेला. रिब्ज, व्हिनास्टर, व्हेटमॉडर व रेट ह्या नद्या व्हालनदीस मिळतात.

कारु, एका, व्हिका, ब्यूफर्ट व स्टॉवर्ग जातीचे खडक येथें सांपडतात.

येथील हवा समशीतोष्ण असून आरोग्यकारक आहे. साधारण उष्णतामान हिंवाळ्यांत ४९°. व बाकीच्या दिवसांत ६६° असते. पाऊस १८ इंचापासून ३० इंचापर्यंत पडतो. येथें कांटेरी गुलाबाचीं, बाभुळ, शेर, कोरफड, व इमारतीच्या लांकडाचीं झाडें होतात. चित्रोष्ट वबूनमाकड व ग्नू हीं येथील विशिष्ट जनावरें आहेत.

बुशमेन, हॉटेनटॉटस, वारोलॉंग, बासुटो, डच, झुलु वगैरे जातीचे लोक निरनिराळ्या काळीं येऊन वसाहत करून राहिलें आहेत. १९११ सालीं येथील लोकसंख्या ५२८१७४ होती.

या प्रांतांत २ रेल्वे आहेत. एकीनें हा प्रांत केप व ट्रान्सव्हालशीं जोडला आहे व दुसरीनें नाताळशीं, जोडला आहे. शेतकी हा मुख्य धंदा असून मीलीज ( पिष्ट ) या प्रधानधान्या शिवाय गहूं, ओट बटाटे, भोंपळे, तंबाखू व जव ह्या जिनसा येथें होतात.

जनावरें पाळणें हा एक येथील धंदा आहे. सर्वसाधारण जनावरांशिवाय येथील लोक डुकरें व शहामृग पाळतात. १९०७ सालीं येथें जमीनधान्याचें नियामक मंडळ नेमलें होतें.

जागर्सफॅाटेन व कॉफांफॉन्टेन येथें मुख्य हिऱ्याच्या खाणी आहेत. व्हेरफॉटेन व फ्राइडस डेल येथें कोळशाच्या खाणी आहेत. सोनें, अशुद्ध लोखंड व पेट्रोलिअम या प्रांतांत सांपडतें. शिवाय पिठाच्या चक्या आणि साबणाचे व मिठाचे कारखाने येथें आहेत. हिरे, गहूं, कोळसा, लोंकर, गुरें व अंडीं हा येथील निर्यात माल आहे. सुती कापड, कमावलेलें कातडें, साखर, कॉफी, चहा व लांकडी सामान हा येथील आयात माल होय. १९०७ पासून १० पर्यंत ही स्वयंशासित वसाहत होती. आतां दक्षिण आफ्रिकेच्या युनियनचा हा भाग आहे. हल्लीं युनिअन पार्लमेंटांत येथून १६ वरिष्ट सभासद ( सीनेटर ) व १७ असेंब्लीचे सभासद जातात सहा महिने वस्ती असणाऱ्या प्रत्येक रहिवाशाला मत देण्याचा अधिकार आहे. प्रांताचा एक मुख्य अधिकारी असतो. त्याला साहाय्य करण्याकरितां प्रांतिक कौन्सिलनें निवडून दिलेल्या ४ सभासदांची कमिटी असते. प्रांतिक कौन्सिलांत २५ सभासद लोकनियुक्त असतात. ह्या कौन्सिलची मुदत तीन वर्षें असते.

रोमन डच कायदा येथें प्रचारांत आहे. न्यायाच्या सोयी करितां या प्रांताचे २४ भाग पाडले आहेत. प्रत्येक भागाला एक मॅजिस्ट्रेट असतो. १९०९ सालीं या प्रांताचा वसूल ८२०००० पौंड असून खर्च ८१९००० पौंड होता.

येथील लोक ख्रिस्ती धर्माचे असून त्यांत प्रॉटेस्टंट, कॅथोलिक, वेस्लिअन व अँग्लिकन हे भेद आहेत. कांहीं यहुदी आहेत. नास्तिक किंवा संशयवादीहि कांहीं आहेत

शेकडा ३६ लोकांनां लिहितां वाचतां येतें. शाळा सरकारच्या ताब्यांत असून शिक्षण इंग्रजींतून दिलें जात असे. १९०५ पासून ऐतिहासिक व धार्मिक शिक्षण डच भाषेत दिलें जातें. प्रत्येक जिल्ह्यांत शाळा तपासणीकरितां ९ सभासदांचें मंडळ असतें.

१९०८ च्या स्कूल अॅक्ट प्रमाणें या प्रांताचे अनेक शाळाबार जिल्हे पाडले आहेत. प्रत्येक सरकारी शाळा पालकांनीं निवडलेल्या शाळा कमिटीच्या देखरेखेखालीं असतात. प्रत्येक जिल्ह्याचें सरकार व स्कूल कमेटी यांनीं निवडलेलें एक शाळा बोर्ड असतें. १९१७ सालीं या प्रांतांत ७३१ सार्वजनिक व १३७ खासगी शाळा असून त्यांतून एकंदर ३६९३८ वर विद्यार्थी शिकत होते. ६ व्या यत्तेपर्यंत शाळेंत जाणें सक्तीचें असतें. सर्व विद्यार्थ्यांनां इंग्लिश व डच भाषा शिकविण्यांत येते. ट्रेनिंग कॉलेजांतून दरवर्षीं ८०–९० शिक्षक तयार होतात. १९१२ सालीं स्थापन झालेली विविधकला शाळा निरनिराळ्या कला व धंदे जाणणारे शिक्षक तयार करिते. विणकामाच्या शाळांवर उद्योगधंदे खात्याची देखरेख असते. १९०७ मध्यें मुलांकरितां सरकारी धंदेशिक्षणाची शाळा ब्लोएमफॉन्टी येथें उघडण्यांत आली. सर्व मोठाल्या शहरांतून दुय्यम शिक्षणाच्या शाळा आहेत.

इतिहास.—१८ व्या शतकाच्या अखेरीस यूरोपिअन लोक या प्रदेशांत आले. त्यावेळीं त्यांस येथें बंटु जातीपैकीं बेचुआना व हॉटेन्टॉट लोक वस्ती करून राहिलेले आढळले. यानंतर १८२४ सालीं डच व १८३१ सालीं झुलु व १८३६ सालीं ट्रेक लोकांनीं या प्रदेशांत वस्ती केली. बोअर लोकांनीं मोसालिकेट्झ या झुलु राजाचा पराभव करून बोअर प्रजासत्ताक राज्य स्थापिलें व पायेट रेटिफ यास गव्हर्नर व सेनापति निवडलें परंतु कांहीं दिवसांनीं आपापसांत वितुष्ट वाढल्यामुळें रेटिफ वगैरे मंडळी ड्रेकन्सबर्ग नदी ओलांडून नेटलमध्यें गेली. उरलेल्या लोकांत आपसांत वैमनस्य चालू होतेंच. या सुमारास मोशेश या बेचुआना राजानें निरनिराळ्या टोळ्या एकत्र करून बॅसुटो राज्य स्थापन केलें. मोशेश बेचुआनानें आणि अॅडामकॉक ( तिसरा ) यांनीं इ. स. १८४३ मध्यें ब्रिटिशांशीं संरक्षणाचा तह केला. याचा परिणाम असा झाला कीं ज्या प्रदेशांत बोअर शेतकरी होते अशा प्रदेशावर देश्य लोकांचें अधिराज्य मान्य करण्यांत आलें हें बोअर लोकांस आवडलें नाहीं. बोअर फिलीपोस जिल्ह्यांतील ग्रीक्वा लोकांत लढा जुंपला तेव्हां ग्रीक्वा लोकांनीं ब्रिटिशांच्या मदतीनें झार्ट कॉपडोस येथें बोअर लोकांचा पराभव करून ते स्वतः ब्रिटिशांचे आश्रित झाले. यावेळीं ब्लोएम मफॉन्टन हें राजधानीचें शहर बनून तेथें

ब्रिटिश रेसिडेंट एच. डी. वॉर्डन राहूं लागला. मेजर वारंडननें बुइनबर्ग घेतल्यामुळें येथील बरेच बोअर ट्रान्सव्हाल या प्रदेशांत गेले. सर हॅरी स्मिथनें १८४८ मध्यें ऑरेंज आणि व्हाल नद्यांमधील मुलूख ब्रिटिश राज्यास जोडला. ही व्यवस्था हाणून पाडण्याकरितां प्रजासत्ताक पक्षानें पुष्कळ प्रयत्न केले. परंतु शेवटीं त्यांचा बुमप्लाट्स येथें पराभव झाला. येथें सरकारनियुक्त कायदेमंडळ नेमण्यांत आलें, हायकोर्टाची स्थापना झाली व सर्व व्यवस्था लागली. येथील सरकारास 'ऑरेंज रिव्हर सॉव्हरिनटी' (ऑरेंज अधिसत्ता) असें नांव मिळालें. १८४९ सालीं मोशेशची राज्यमर्यादा संकुचित झाल्यामुळें तो १८५२ सालीं प्रजासत्ताक पक्षाला मिळाला. यामुळें कांहीं बखेडा होऊन अखेरीस १८५२ सालीं सँड नदीवर झालेल्या करार नाम्यानें ट्रांसव्हाल स्वतंत्र झालें. तरी ऑरेंज अधिसत्ता अबाधीत राहिली. सर जॉर्ज रसेल क्लार्क व लार्ड ग्रे (वसाहतींचे स्टेट सेक्रेटरी) यांच्या मतें साम्राज्यसत्ता येथें नसावी असें होतें. १८५४ सालीं सर जार्ज रसेल क्लार्कनें प्रांताला स्वतंत्र केल्यामुळें बोअर लोकांनीं प्रजासत्ताक राज्य सुरू केलें. अॅडमकॅमकॉक (ग्रीक्वा) नें आपले साम्राज्याचे हक्क फ्रीस्टेटला विकून स्वतः पूर्व ग्रीक्वालँडला गेला. या वेळेपासून याला आरेंजफ्रीस्टेट हें नांव पडलें. कायदे करण्याची सत्ता व्हॉल्कस्राड नांवाच्या मंडळाकडे असे. कार्यकारी सत्ता प्रेसिडेंटच्या हातांत असून त्याच्या मदतीला कार्यकारी मंडळ असे. प्रेसिडेंटची मुदत ५ वर्षांची असे. हॉफमन व बोशॉफ हे येथील पहिले प्रेसिडेंट होते. पॉल, क्रूगर व मारथीनस प्रिटोरीअस यांनीं ह्या प्रांतावर स्वाऱ्या केल्यामुळें बोशॉफनें त्याचा पाडाव केला. ह्या प्रांताचा समावेश केपकॉलनीमध्यें व्हावा ही व्हाल स्राडची सूचना जरी ग्रे साहेबास पसंत होती तरी ब्रिटिश सरकारास संमत नसल्यामुळें ती अमलांत आली नाहीं. वार्डन लाइन पलीकडचा देश आमचा आहे असें बसुटो व बोअर लोकांचें म्हणणें असल्यामुळें त्यांच्यांत जुंपलेला लढा ३० वर्षेपर्यंत चालू होता. इतक्या अवधींत बोशॉफ, प्रिटोरिअस व सर हेनरी ब्रँड हे तीन प्रेसिडेंट होऊन गेले यांत बसुटो लोकांचा पराभव होऊन १८६९ सालच्या अलीवाल नॉर्थच्या तहान्वयें बासुटोंचा प्रांत (बॅसुटोलॅंड) ब्रिटिश राज्यास जोडला गेला व ऑरेंज नदीच्या उत्तरेकडील व कॅलीडॉनच्या पश्चिमेकडील मुलूख बोअर लोकांनां मिळाला.

व्हॉल आणि आरेंज नद्यांमधील किंबर्ले येथील हिऱ्याच्या खाणींच्या प्रदेशाबद्दल निकोलर वाटरबोअर व फ्रीस्टेटमध्यें तंटा उपस्थित झाला. वास्तविक पाहतां वाटर बोअरचा प्रत्यक्ष अंमल येथें मुळींच नव्हता. परंतु त्यानें पूर्वी ब्रिटिशांशीं केलेल्या तहामुळें तो हक्क सांगूं लागला व अॅडाम कॉकजवळून तो प्रदेश विकत घेतल्यामुळें फ्रीस्टेटचा हक्क तेथें उत्पन्न झाला. वॅाटरबोअरनें हा सर्व प्रदेश व्हिक्टोरिया राणीस द्यावा असें सुचविलें. शेवटीं ब्रिटिश सरकारनें फ्रीस्टेटला ९०००० पौंड देऊन या प्रदेशावरील हक्क विकत घेतला व त्याला ग्रीक्वालॅंड वेस्ट हें नांव दिलें. आतांपर्यंत झालेल्या युद्धामुळें खजिन्यांत तूट पडली म्हणून चलनी नोटा येथें सुरू झाल्या पण त्यांची किंमत कमी झाली होती ती यामुळें मूळपदावर आली. १८९९ च्या बोअर युद्धापर्यंत बोअर व ब्रिटिश सरकारांत सख्य होतें. १८८० सालीं फ्रीस्टेटमधील कांहीं बोअर लोक ब्रिटिशांविरुद्ध उठलेल्या ट्रॅांसव्हॅालच्या लोकांस जाऊन मिळाले. या वेळेपावेतों प्रांतांची आर्थिक स्थिति सुधारली. प्रेसिडेंट रेटझनें फ्रीस्टेट व ट्रॅान्सव्हॅालचें एकीकरण केलें. प्रेसिडेंट स्टीयनच्या कारकीर्दींत महत्त्वाचें असें कांहींच झालें नाहीं. रेट्झ, स्टीन व बोरकन हेगन हे तीन आफ्रिकन्डर बॅांड या संस्थेचे उत्पादक असून दक्षिण आफ्रिकेला स्वतंत्र करणें हें त्यांचें ध्येय होतें.

ब्रिटिश लोक १९००सालीं फॅान्टोएम ब्लोनला आल्यावर त्यांनां सांपडलेल्या संस्थानच्या कागपत्रावरून असें दिसतें कीं, १८८७ सालीं येथें दोन गुप्त सभा झाल्या असाव्यात. या सभेंतील ठराव क्रूगरला मुळींच पसंत नसण्याचें कारण इतकेंच कीं, एकादा ब्रिटिश व्यापार सुरू झाला म्हणजे तो नाश केल्याशिवाय रहाणार नाहीं अशी त्याची पक्की समजूत होती. याकरितां ट्रान्सव्हाल व फ्रीस्टेट यांस एकत्र जोडावयाचें पण केपपासून व ब्रिटिशसंबंधापासून वेगळें ठेवावयाचें असें त्याचें धोरण होतें. ब्रॅंड, डॅाक्टर लीडस आणि क्रूगर यांचा या बाबतींत कडाक्याचा वादविवाद होऊन शेवटीं ब्रॅंडनें फ्रीस्टेटचा विघातक धोरणापासून बचाव केला. ब्रॅंडच्या मरणानंतर फ्रीस्टेट या धोरणाला बळी पडलें. १८९७ पासून झालेले कायद्यांतील फेरफार जरी क्रूगरच्या कडक धोरणाच्या विरुद्ध होते तरी ट्रान्सव्हाल व फ्रीस्टेट वरील धोरणाच्या जबड्यांत सांपडल्यामुळें त्यांनां सोडवणें अशक्य होतें. प्रेसिडेन्ट स्टीयननें आल्फ्रेड मिलनर व क्रूगर यांच्यामध्यें समेट करण्याचा प्रयत्न केला पण त्याचा फायदा झाला नाहीं.

यानंतर लवकरच बोअर युद्ध सुरू झालें(ट्रान्सव्हॅाल पहा). अर्थात फ्रीस्टेटला ट्रान्सव्हॅालबरोबर युद्धांत पडावें लागलें. या युद्धांत १९०० सालीं ब्रिटिशांनीं ब्लोएम फॅाटेन घेऊन फ्रीस्टेट आपल्या राज्यास जोडलें व त्यास ऑरेंज रिव्हर कॅालनी असें नांव दिलें. सर अल्फ्रेड मिलनर हा येथील गव्हर्नर व सर एच. जे. गूल्ड अडाम्स हा लेफ्टनंट गव्हर्नर नेमला गेला. एक सरकारनियुक्त कायदेमंडळ स्थापन केलें. ब्रिटिशांनीं येथें रेल्वे सुरू केल्या व शिक्षण खात्यांतहि पुष्कळ सुधारणा केल्या. युद्धामुळें लोकांची खालावलेली स्थिति सुधारण्याकरितां त्यांनीं ४००००००पौंड खर्च केले. परंतु स्वातंत्र्य मिळविण्याकरितां पुन्हां चळवळ

सुरू झाली १९०४ मध्यें ब्रेडफर्ट येथील सभेंत स्वराज्याचा ठराव पास करण्यांत आला, संस्थानांत व समाजांत बोअर हितसंबंध दृढ करणें व बोअर कल्पनांचा प्रसार करणें हा येथील ऑरेंजी युनी व हेटव्हॉल्क चळवळींचा उद्देश होता. अब्रॉहाम फिशर, डीवेट आणि स्टीअन हे या चळवळींत प्रमुख होते. लढाई चालू असतां बोअर लोकांच्या वतीनें भांडण्याकरितां फिशर यूरोपांत गेला होता.

जबाबदार राज्यपद्धति.—डिसेंबर १९०५ मध्यें सर हेन्री कँबेल बॅनरमन हा प्राइम मिनिस्टर झाल्यामुळें इंग्लंडचें धोरण जास्त उदार झालें व या कॉलनीला स्वराज्य देण्याचा विचार सुरू झाला. कॉलनीमध्यें कांहीं लोकांचें मत असें होतें, कीं पार्लमेंटप्रमाणें बहुमतवाल्यापक्षाकडे सत्ता न ठेवतां एक प्रतिनिधि मंडळ असावें व या प्रतिनिधी मंडळानें निवडलेले तीन व सरकारनियुक्त तीन असे सहा कार्यकारी मंडळाचे सभासद असावेत. परंतु अखेरीस पार्लमेंटरी पद्धतीचें स्वराज्य १ जुलै १९०७ रोजीं कागद तयार होऊन जाहीर करण्यांत आलें. व त्याप्रमाणें निवडणूक होऊन कारभार सुरू झाला. यावेळीं सांपत्तिक स्थिति चांगली होती. फिशर मुख्य प्रधान झाला. डच भाषेत शिक्षण देण्याचा ठराव पास झाला. रेल्वे, जकाती वगैरे संस्थानाशीं येणाऱ्या इतर संबंधाच्या प्रश्नासंबंधीं ठराव झाले. १९१० मध्यें फ्रीस्टेट दक्षिण आफ्रिका संघांत ( युनियन ऑफ साउथ आफ्रिका ) सामील झालें. फिशर व हर्टझोग हे संघाच्या मंत्रिमंडळाचे सभासद झाले व राम्स बॉटम हा संघाचा एक प्रांत म्हणून फ्रीस्टेटचा पहिला व्यवस्थाधिकारी झाला.

[ संदर्भ ग्रंथ एन्सा. ब्रि. स्टेट्समन्स ईअर बुक. कीन—आफ्रिका दि बोअर स्टेस. दि स्टॅटिस्टिकल ईयरबुक व इतर सरकारी पत्रकें. जॉन्सन—ऑरेंजिया ( १९०६ , यांत भौगोलिक माहिती चांगली आहे ). ब्रिटिश, केप आणि ऑरेंज फ्री स्टेटच्या पार्लमेंटरी दप्तरांतून या प्रांताचा इतिहास सांपडेल. दक्षिण आफ्रिकेवरील संदर्भग्रंथहि पहावे. ]

**आरोग्यविज्ञान शास्त्र**—रोगाचा अभाव म्हणजे आरोग्य हें सर्वांस विश्रुत आहेच. सर्व दुःखाचें आदिकारण रोग होत व ते कसे उत्पन्न होतात व ते कसे टाळावे हें ज्यांत सांगितलें आहे त्या शास्त्रास हें नांव आहे. अलीकडील रहाणीस अनुसरून याची व्यवस्थित मांडणी पाश्चात्य लोकांनीं आपापल्या ग्रंथांत केली आहे. प्राचीनकाळीं आपणांमध्ये आरोग्यविज्ञानाची जाणीव फारच उत्तम प्रकारची होती, तीमुळें तीस धर्मज्ञानाइतकें महत्त्व देऊन आरोग्ययुक्त आचारविचारांनां धर्मग्रंथांत स्थान मिळाल्याचें दिसतें. तथापि ते आरोग्य नियम आपल्या अलीकडील रहाणीस थोडेबहुत विपरीत असे वाटतील या शास्त्राचा अनेक इतर शास्त्रांशीं कसा संबंध येतो व हें शास्त्र किती महत्त्वाचें व विस्तृत आहे हें पुढील स्थूलवर्णनावरून ध्यानांत येईल; तें असें:—जेणेंकरून मानवी शरीराची वाढ पूर्णपणें होईल व त्याची झीज कोणकोणत्या उपायांनीं थांबवितां येईल, तसेंच शरीर, मन व जीवित हीं उत्साहपूर्ण व जोमदार कशीं होतील व अकालमृत्यु लोकांमध्यें टाळतां येऊन मानवी जीविताची आयुर्मर्यादा कशी लांबवितां येईल या मुख्य उद्देशांस अनुलक्षून जीं जीं साधनें व शास्त्रें मानवी शरीराचें शारीरिक व मानसिक आरोग्यवर्धन करितील त्या त्या सर्व साधनोपायांचा व शास्त्रांचा संबंध या आरोग्यशास्त्राशीं येतो हें सहाजिकच आहे. या शास्त्राचें महत्त्व कळून त्यांतील गुणग्रहणपात्रता अंगीं असण्यासाठीं जिज्ञासूचा पदार्थविज्ञानशास्त्र, रसायनशास्त्र भूगर्भशास्त्र शिल्पशास्त्र, वास्तुविद्याशास्त्र, स्थापत्यशास्त्र, वातमेघगतिशास्त्र, सांसर्गिक रोगनियमनशास्त्र, जंतुशास्त्र, आंकडेशास्त्र या व असल्या इतर शास्त्रांशीं अल्प परिचय असावा लागतो; अगर असेंहि म्हणण्यास हरकत नाहीं कीं या शास्त्राचें परिशीलन केल्यानें आपोआप बहुश्रुतता वाचकांच्या अंगीं येऊन वरील नानाविध शास्त्रांची व्यावहारिक उपयुक्तता त्यांनां कळून येते. व्यक्तिमात्राच्या आरोग्याचा विचार फक्त कर्तव्य असल्यास आपण जें अन्न खातों व पाणी पितों अगर इतर खाद्यपेयांचें सेवन करितो त्यांचे मुख्य प्रकार व गुणधर्मदोष यासंबंधीं ज्ञान व माहिती या शास्त्रांत आढळतें. तसेंच सूत, लोंकर, रेशीम यापासून केलेल्या वस्त्रांचे गुणदोष, फायदे तोटे निरनिराळ्या वयांच्या मनुष्यांनीं शारीरिक श्रम किती करावे व तेव्हां आहारविहार कसा असावा, व्यायाम झोंप, विश्रांति करमणूक मैथुन यांसंबंधीं कोणते नियम लक्षांत ठेवण्यासारखे आहेत हें सर्व आपणांस या शास्त्राच्या साह्यानें अवगत होतें. हितकारक व आरोग्यवर्धक संवयी कोणत्या व घातुक संवयी कोणत्या व कां तसेंच मद्य, तंबाखु, अफू,गांजा इत्यादि व्यसनापासून होणारे बरे वाईट परिणाम कोणते, शारीरिक स्वच्छता कशी राखावी, शीतोदकस्नान, उष्णोदकस्नान, बाष्पादि स्नान यांचे प्रकार व फायदे यांचाहि समावेश या शास्त्रांत होतो. या व्यक्तिशः आरोग्यविचाराखेरीज सबंध खेडें, गांव अगर यांच्या आरोग्याचा विचार कर्तव्य आहे. त्यांत वातमेघगतिशास्त्र (यांतच हवामानाच्या परीक्षणाचा समावेश होतो ) व जेथें एखादें घर अगर अनेक घरें बांधावयाचीं असतील तेथील भूमीचें आरोग्यशास्त्राच्या दृष्टीनें परीक्षण, घरें एकमेकांपासून किती अंतरापर्यंत अलग असावींत, त्यांतील ओल, गारठा कसा टाळावा व घालवावा; उजेड, हवा व पाणी मुबलकपणें कशी घरांत आणावीं, मोऱ्या, ...रें व पायखाने यांची आपले देशानुरूप बांधणी व निकाल कोणत्या रीतीनें करावा व त्यासंबंधीं सर्वांनां एकच प्रकार शक्य नसल्यास अल्प व अधिक खर्चाचे प्रकार कोणते याचें ज्ञान या शास्त्रांत आहे. निरनिराळ्या जातींतील शवांचें दहन अगर पुरणें यासंबंधीं

स्मशानभूमीमध्यें कोणते नियम घालून देणें आवश्यक आहे; तसेंच निरनिराळे साथे व साथीचे रोग ऋतुपरत्वें व कालपरत्वें गांवांत आले असतां त्यांची माहिती करून देण्यासारखी व रोगप्रतिबंधक उपचारांची माहिती व साधनें लोकांनां सहजी उपलब्ध माहितीपत्रकाच्या योगानें करून देणें हाहि या शास्त्राचा उद्देश असतो. पथ्यकारक पदार्थ व कुपथ्यकारक पदार्थ एरवीं व रुग्णावस्थेंत कोणते आहेत, अन्नाचे मुख्य प्रकार कोणते, त्यांत व तूप लोणी दूध यांत भेसळ होण्याचे हलगर्जीपणाचे आणि लबाडीचे प्रकार कोणते व ते कसे ओळखावेत हें या शास्त्रानें कळतें. गांवाचा पाण्याचा पुरवठा कसा असावा, वर्षभर पाणी शुद्ध कसें राखावें, पाणी फिल्टरच्या साह्यानें शहरासाटीं व व्यक्तिशः कसें गाळून घ्यावें याचें व पाणी तापविण्याचे श्रम व जळण वांचविणाऱ्या उपायांचें चिंतन व कथन या शास्त्रांत केलेलें असतें. सर्व शहरांतील मैला व गटारांतील गाळ यांची वासलात कशी लावावयाची, त्यांतील दुर्गंधी कशी नाहींशी करावी व ती पासून साधल्यास थोडेंसें उत्पन्नहि काढणें शक्य केव्हां व कसें असतें याची माहिती यांत सांगितलेली असते. हें उत्पन्न खतें वगैरे रूपानें मिळतें हें सांगण्यास नकोच. निरनिराळ्या साथींचे व इतर रोगांचे जंतू सूक्ष्मदर्शक यंत्राखालीं तपासून अमुक साथ अगर रोग आला आहे किंवा नाहीं याबद्दल जंतुशास्त्राच्या आधारें अभिप्राय देणें हाहि याच शास्त्राच्या कक्षेंतील विषय होय. असें हें परम उपयुक्त शास्त्र आपणांसर्वांच्या प्राणधारणेस आवश्यक असूनहि त्याच, गणित, भूगोल, इतिहास, भाषा व शास्त्रें यांचें प्रमाण आवश्यक-अभ्यास केला जात नाहीं ही एक मोठी आपत्तीच होय.

**आर्कलगूड**-( म्हैसूर,)हसन जिल्ह्यांतील एक तालुका. हा उ. अ. १२° ३१' आणि १२° ५० यांमध्यें व पू. रे. ७५° ५६' आणि ७६° १२' यांमध्यें वसलेला आहे. क्षेत्रफळ २६१ चौ. मै. लो. सं. (१९११) ८१६६३. पाऊस सुमारें ३२ इंच पडतो. मद्रास आणि सदर्नमराठा रेल्वेच्या म्हैसोर-आर्सिकेरे फाट्यावर होलेनरसीपुर म्हणून जें स्टेशन आहे त्यापासून आर्कलगूड १४ मैल दूर आहे. या तालुक्यांत आर्कलगूड(तालुक्याचें मुख्य ठिकाण,वस्ती सुमारें पांच हजार), कोननूर आणि बसवापट्टण अशीं तीन शहरें व ३०० खेडीं आहेत. जमीन महसूल १९०३-४ सालीं १२५० ४० रुपये होता. हेमावतीनदी याच्या उत्तर सरहद्दीवर वहाते तर कावेरी दक्षिण भागांतून जाते. पाटबंधाऱ्यावर होणारें तांदुळाचें उत्पन्न बरेंच असून निश्चित राहातें. कांद्याचेंहि पिक चांगले फायदेशीर असतें. तसेंच दक्षिणभागीं नारळ व सुपारी, व मध्यभागांत तंबाखु पिकतें. तालुक्याचा कुर्ग सरहद्दीपर्यंतचा पश्चिमभाग डोंगराळ व जंगली आहे. [ इं. गॅ. अर्नोल्ड गाईड ]

**आर्केंजल**—हें रशियांतील आर्केंजल प्रांतांतील मुख्य शहर आहे. हें द्विना नदीच्या मुखाजवळ वसलेलें आहे. सन १९१३ मध्यें येथील लोकसंख्या ४३६०० होती. १७ व्या शतकाच्या सुमारास नॉर्स लोक येथें व्यापाराकरितां आले होते; परंतु नवें शहर १५५३ पासूनचें आहे. या नंतर द्विनाच्या खालच्या भागाच्या कांठावर इंग्लिशांनीं वखार बांधली व १५८४ मध्यें किल्ला बांधण्यांत आला, व त्याच्याभोंवतीं शहर वसलें. पुष्कळ दिवसपर्यंत आर्केंजल हें रशियाचें ( १५९८–१६०५ ) एकटें बंदर होतें. बॉरिस गोडुनोव्ह नांवाच्या झारनें येथील व्यापार खुला केला. पिटर दि ग्रेटनें सेंटपीटर्सबर्ग राजधानी केल्यावर ( १७०६ ) हें शहर व्यापारास अयोग्य ठरविलें गेलें. १७६२ मध्यें या शहराला सेंटपीटर्सबर्गप्रमाणेंच सवलती देण्यांत आल्या. तेव्हांपासून हें भरभराटीस आलें. येथें तागाचें कापड, कातड्याचा माल, चटया, नरबी व दारू तयार होते. येथून इमारतीचें लांकूड, गळिताचीं धान्यें, ओट, कणिक, डांबर व कातडें या मालाची निर्गत होते. मध्य रशियांशीं आर्केंजल कालवे, नद्या व आगगाडीचा रस्ता यांनीं जोडलेलें आहे. येथें सर्वांत लहान दिवस म्हणजे ३ तास १२ मिनिटांचा असतो व सर्वांत मोठा दिवस २१ तास ४८ मिनिटांचा असतो. [ ए. ब्रि. ]

**आर्कोनम्**—(मद्रास)उत्तर अर्काट जिल्हा. वालाजापेट तालुक्यांतील एक शहर. उ. अ. १३°५' व पू. रे. ७९°४०' साऊथ इंडियन व मद्रास सदर्न मराठा या रेल्वेचें हें जंक्शन स्टेशन असल्यामुळें फार महत्त्वास चढलें आहे. साऊथ इंडियन रेल्वेच्या चिंगलपट-आर्कोनम फांट्यावरचें हें शेवटचें ( किंवा आरंभीचें ) स्टेशन आहे. प्राचीन देवळांविषयीं प्रसिद्ध असलेलें कांजीवरम् शहर येथून १७ मैल लांब आहे. लोकसंख्या ( १९११ ) ६८९६ होती. यांपैकीं बहुतेक रेल्वे नोकर आहेत पाऊसमान सरासरी ३८इंच असतें. दरवर्षी मे महिन्यांत श्री देवराज स्वामीच्या देवळांत मोठा उत्सव होतो. गांवांत बरींच छत्रें व खाणावळी आहेत. [ इं. गॅ. स. म. गाईड. अर्नोल्ड गाईड. ]

**आर्ड्रे**—(फ्रान्स.) 'पास–डी–कॅले 'च्या विभागांत असलेलें उत्तर फ्रान्सांतील एक शहर आहे. कॅलेपासून हें शहर आगगाडीनें १०॥ मैल असून पाट बांधून कॅलेशीं जोडण्यांत आलें आहे. येथील लोकसंख्या १९०६ सालीं १२६९ होती.१५२०सालीं 'इंग्लंड 'चा आठवा हेनरी व फ्रान्स देशांतील पहिला फ्रान्सिस, हे दोघे येथून अगदीं जवळच बेलिंगहॅम् या ठिकाणीं एकमेकांस अगदीं मित्रत्वाच्या नात्यानें भेटले होते. तेथील त्या वेळच्या समारंभांत जो थाट केला होता त्यावरून या स्थानाचें नांव ' सोन्याच्या कापडाचें शेत ' हें अजून इतिहासांत प्रख्यात आहे. या शहरांत गुरांचा व्यापार फार चालतो.

**आर्ताल**—(मुंबई इलाखा.)धारवाड जिल्हा. बंकापूरच्या वायव्येस नऊ मैलांवर आहे. येथें कांहीं देवळें व शिलालेख आहेत. [ मुं. गॅ. धारवाड ]

**आर्निका**—( आर्निसीन )हें अमेरिकेंत सांपडणारें झाड याचे अनेक भेद आहेत.यांपैकीं दोन प्रकारचीं झाडें औषधोपयोगी आहेत. यांच्या फुलांचा आकार झेंडूसारखा असतो. व फूल गेंदे असून २-२॥ इंच रुंद असतें. रंग पिंवळसर नारिंगी असतो. याचीं बारीक फळें पिंगट असून शेंड्यावर केंसाप्रमाणें तंतू असतात. यांपैकीं आर्निका मॉन्टाना या झाडाचें मूळ चिवट, बारीक व काळसर पिंगट रंगाचें सुमारें २ इंच लांब असतें. त्यालाच खालून आणखी मुळें फुटतात. यापासूनच एक औषधी तेल निघतें, व आर्निसीन नांवाचा एक राळीसारखा पदार्थ निघतो. याचा 'औषधी अर्क' तयार करितात. व याचा लचक भरणें अगर शरीराचा कोणताहि भाग ठेंचणें यास फार दिवसापासून उपयोग करीत आले आहेत. व याचा गुणहि चांगला येतो. आर्निसीन हा पदार्थ पिंवळा व चकाचकित असून त्याची चव तुरट असते. या झाडाची लागवड उत्तर आशियांत व इंग्लंडांतहि केली जाते. व हें दरवर्षी उगवणारें झाड आहे. याचीं फुलें शोभिवंत असल्यामुळें बागेंतूनहि हौसेखातर याची लागवड करितात.

**आर्मगांव**—( आर्मेधान, आर्मुगम् ).( मद्रास, ) नेलोर जिल्हा; गुडूर तालुक्यांतील एक गांव. बंगालच्या उपसागराच्या किनाऱ्यावर हें उ. अ. १३° ५९' व पू. ८०° १० यांत वसलें आहे. मोनपालेम; दुगराझुट्टग अशीं शेजारच्या गांवावरून याला नांवें पडलीं आहेत. सदर्न मराठा रेल्वेच्या गुडूर स्टेशनापासून हें २६ मैल दूर आहे.१६२५ त कारोमंडल किनाऱ्यावर ज्याच्या मदतीनें इंग्रजांनीं प्रथम वसाहत केली त्या आरुमुग मुदलियार गृहस्थाचें नांव या गांवाला दिलें गेलें असेंहि कोणी म्हणतात. मोनपालेम गांवीं जें दीपगृह बांधलें आहे त्याचा १४ मैलावरून दिसणारा उजेड आर्मगांवाजवळील उथळ भागाची जहाजांना आठवण देतो. आर्मगांव दीपगृहाच्या उत्तरेस सात मैलांवर दुगराझुट्टण नांवाचें गांव आहे. पूर्वी हेंच आर्मगांवचें बंदर असे, तेव्हां एकाचें नांव दुसऱ्याला साहाजिक वापरलें जाई. येथून जवळच ईस्टइंडिया कंपनीनें बांधलेल्या किल्ल्याचे अवशेष दिसतात. [ इं. गॅ. ]

**आर्मूर**,ता लु का.—(हैदराबाद) संस्थान निझामाबाद जिल्हा. क्षे. फळ ९८९; चौरस मैल लो. सं. (१९११) १५५४५. या तालुक्यांत आर्मूर व बालकोंडा हीं दोन शहरें, व १८४ खेडीं आहेत. १९०१ सालीं जमीन महसूल सुमारें साडेतीन लाख होता. तळ्याच्या पाण्यावर तांदूळ बराच पिकतो. मध्यभाग डोंगराळ असून उत्तरभागांतून गोदावरी वहाते.

श ह र.—आर्मूर तालुक्याचें मुख्य ठिकाण. उत्तर अ. १८° ४८' व पू. रे. ७८° १६'.हें निझामाबादच्या ईशान्येस १६ मैलांवर वसलें आहे.लोकसंख्या ७५३० म्युनिसिपालिटी, शाळा, दवाखाना, पोष्ट व चावडी येथें आहेत. रेशमी कापड व साड्या येथें मोठया प्रमाणावर तयार होतात. [ इं. गॅ. ]

**आर्मेंटिरिस**—(फ्रान्स)नॉर्डच्या विभागांतील एक शहर. येथून डनकर्क जवळ आहे. लोकसंख्या१९०६सालीं.२५४०८ होती. येथील मुख्य इमारत म्हणजे जुन्या काळची 'हॉटेल डी व्हिले' ही होय .येथें मुलांमुलींकरितां सामाजिक विद्यालय बांधलें आहे. चेम्बर ऑफ कामर्स वगैरे मध्यवर्ती व्यापारी संस्था आहेत. या शहरांत कापसाचें सूत काढण्याचें व कपडे करण्याचें काम होतें व तसेंच कापडास निरनिराळे रंग चढविण्याचें काम होतें. याशिवाय येथें इतर लहानसहान धंदेहि आहेत. मध्ययुगांत लोकरी कापडाच्या व्यापारावर येथील लोकांची भिस्त असे.

**आर्मेनिया**—हा प्रांत कॉकेशस पर्वत आणि काळा समुद्र ह्यांच्या दक्षिणेस आहे. हा प्रांत इराण, रशिया, आणि आणि तुर्कस्तान ह्यांच्यामध्यें असून तिन्हीं राष्ट्रें याची हिस्सेदार आहेत.हा डोंगरसपाटीचा प्रदेश असून ह्याची उंची सुमारें ६००० फूट आहे. सर्वांत उंच शिखर १७००० फूट. पर्वत.–आराराट,अलगुजदग आरासच्या उत्तरेस, बिंगुलदग अक्षरूमच्या दक्षिणेस, नद्या.–युफ्रेतीस, तायग्रीस, आरास चरकसु, केलकित, इर्मख. सरोवरें–व्हॅन, उर्मिया, सेव्हॅन आणि चालिडर. वातावरणः- उंच भागावर थंडी अतिशय असून उष्णता कमी असते. इतर ठिकाणीं साधारण. उत्पन्न.—तांदूळ आणि किंचित प्रमाणावर कापूस, द्राक्षें. प्राणीः—घोडा, खेंचर, वकरीं इत्यादि.

लो क सं ख्या—२९०००००. आर्मेनिअन लोक आणि इतर जातींचे पुष्कळ लोक यांत आहेत.आर्मेनियाच्या डोंगराळ प्रदेशामुळें तेथील लोकांत बराच फरक झाला आहे आणि त्याबरोबर इतिहासांतहि फरक दृष्टोत्पत्तीस येतो. मध्यवर्ती सत्ता जर नार्मद असेल तर तेथील लोक अशा संधीच्या फायदा घेण्यास कधींहि कुचराई करीत नाहींत. ताबडतोब ते लहान लहान स्वतंत्र राज्यें स्थापन करितात. काळयासमुद्रावरील बंदरांना इराणच्या बाजूनें ह्याच प्रांतांतून मार्ग गेलेले आहेत.

आर्मेनियामध्यें मूळ रहिवाशी कोण होते हें सांगता येत नाहीं. आशियामधून आर्य लोक ज्या वेळीं पूर्व आणि पश्चिम ह्या दोन्हीं दिशाकडे वळले त्यावेळीं पश्चिमेकडे जो संघ वळला त्याचा मुक्काम ह्या ठिकाणीं झाला असावा असें वाटतें. परंतु हे आर्य लोक अरब आणि सेल्जुक स्वाऱ्यामुळें कान्स्टांटिनोपल आणि सीलिशिया ह्या बाजूला आले. नंतर तार्तर आणि मोंगल लोकांनीं स्वारी केली. म्हणून आर्मेनियन लोकांमध्यें निरनिराळ्या जाती एकवटल्या आहेत असें वाटतें. ह्यांच्या चालीरीती, बांधा, आंगकाठी चेहऱ्याची ठेवण इत्यादि विषयीं विचार केला असतां निरनिराळ्या जातीचें वळण लागलें असावें असें दिसतें. टॉरस पर्वताच्या खिंडींत राहणारे शेतकरी, उंच, देखणे, शूर,

आणि चपल आहेत. आर्मेनिया आणि आशियामायनर येथील शेतकरी सशक्त, ओबडधोबड, कुरूप, गरूडनाकाचे आहेत. शहरांत राहणारे लोक इराणी लोकांच्या वळणावर गेले आहेत. हे मोठे कुशल कारागीर असून यांचे व्यापारी धोरणहि उत्तम आहे. उच्च प्रतीचे लोक सभ्य असून सुशिक्षित आहेत.

साधारणतः आर्मेनियन लोक हुशार, उद्योगी, सढळ हाताचे व जुन्या चालीरीतींचे भोक्ते आहेत, परंतु भांडखोर, स्वार्थी इत्यादि अवगुणहि ह्यांच्यांत पूर्ण आहेत.

इ ति हा स.–यांत प्रथम बिऐनियन राजे होऊन गेले. नंतर हें घराणें सिक्सरस ह्यांनीं उलथून पाडलें. ख्रिस्तापूर्वी ४०० वर्षांच्या सुमारास आर्यन (मेडो पर्शियन) जाती आर्मेनियांत आल्या. ३३१ च्या सुमारास अलेक्झांडर तर्फे आर्मेनियावर इराणचे गव्हर्नर येत असत. परंतु रोमच्या मदतीनें मोठा आणि लहान आर्मेनियाचा गव्हर्नर हे स्वतंत्र झाले. नंतर कांहीं कारणामुळें ख्रिस्तपूर्व ६६ वर्षे अर्मेनिया रोमच्या कक्षेत आला. ह्याचा परिणाम असा झाला कीं, रोम आणि पार्थिया ह्या राष्ट्रांचा संबंध येऊं लागला. कारण राजकीय दृष्ट्या आर्मेनिया जरी रोमचा बांधला होता तरी तेथील सामाजिक संघटना पार्थियासारखीच होती. ह्यामुळें पूर्व आणि पश्चिम भागाचा अर्मेनिया हा रणक्षेत्र बनला. परंतु इ. स. ३८७ मध्यें इराण आणि रोम ह्यामध्यें आर्मेनियाची विभागणी होऊन तात्पुरतें युद्ध थांबलें. इराणकडे जो भाग आला होता तेथें आर्मेनियन आणि इराणी लोक राज्यव्यवस्थेकरितां इ. स. ४२८ मध्यें पाठविण्यांत आले, आणि त्यांनां मर्झबन ही पदवी देण्यांत आली. विभागणी होण्यापूर्वी आर्मेनियांत ख्रिस्ती धर्माचा प्रसार झाला होता. इ. स. ४१७ मध्यें म्हणजे आर्मेनियाच्या विभागणीनंतर, बायबलचें आर्मेनियन भाषेमध्यें भाषांतर झाल्यामुळें रोम आणि इराणमधील आर्मेनियन लोक एक होऊं लागले. म्हणून मर्झबन हे ख्रिस्तानुयायांचा छळ करूं लागले व इराणी धर्माची दीक्षा देण्याला सुरवात झाली. ह्या बेबंदशाहींत कांहीं नवीन स्वतंत्र राष्ट्रें उदयास आलीं. परंतु ६३६ मध्यें आर्मेनिया खलिफाकडे येऊन त्यावर अरब आणि आर्मेनियन गव्हर्नर मुक्रर केले. पैकीं एका गव्हर्नरला मोतमिड खलिफानें ८८५ त राजा केलें. नंतर दुसऱ्या एका खलिफानें ९०८ मध्यें व्हॅन येथील गव्हर्नरला राज्याभिषेक केला.अशा घडामोडी झाल्या तरी ११५७ पर्यंत सेल्जुक राज्याचा आर्मेनिया हा भाग होता. नंतर अरब, कुर्द आणि सेल्जुक असे तीन तुकडे झाले. शेवटीं १२३५ मध्यें मोंगल स्वारींत हे तुकडे नामशेष झाले. तैमूरलंगाच्या स्वारीच्या वेळीं आर्मेनियन लोकांनीं संरक्षणाकरितां पळून जाऊन धर्मान्तर केलें. त्याच्या निधनानंतर तुर्कोमन घराण्यांतील राजांनीं ४४१ मध्यें पूर्ववत शांतता आणली.

पहिला सलीम (१५१४) ह्यानें इराणवर स्वारी केली, त्या वेळीं ओसमानअली तुर्कांच्या हातीं सर्व आर्मेनिया आला. त्याची व्यवस्था पाहण्याकरितां इद्रिस नांवाचा एक कुर्द अधिकारी नेमण्यांत आला. त्यानें देशांत शांततेचा प्रसार केला परंतु कुर्द लोकांचें महत्त्व फार वाढलें. नंतर इराणी लोकांनीं १५७५ आणि १६०४ ह्या वर्षी आर्मेनियांवर स्वारी केली. दुसऱ्या स्वारींत बरेचसे आर्मेनियन लोक इस्पाहान येथें नेण्यांत आले. १६३९ च्या तहान्वयें एरिव्हान हा प्रांत इराणला मिळाला. हा प्रांत १८२८ त रशियाकडे गेला. १८२८–२९ च्या तुर्को–रशियन युद्धामुळें रशियाची सरहद्द अर्पाचैपर्यंत आली, आणि पुष्कळसे तुर्कस्तानकडील आर्मेनियन लोक रशियांत गेले. नंतर १८७७–७८ च्या युद्धांत बाटूम, अर्दहन आणि कार्स हे प्रांत रशियाला मिळाले. १८३४ मध्यें कुर्द लोकांच्या स्वतंत्र सत्तेला बराच आळा घालण्यांत आला. त्याचप्रमाणें १८४३ आणि १८८० ह्या सालांतील बंडें मोडून टाकण्यांत आलीं.

तुर्कस्तानमध्यें जे आर्मेनियन लोक होते त्यांत बहुतेक रोमन कॅथोलिक पंथाचे होते. त्यांचा कारभार त्यांच्यापैकीं एका धर्माधिकाऱ्याकडे सोंपविलेला असे. १८४६ मध्यें तेथें प्रॉटेस्टन्ट धर्माचा प्रसार झाला.

इ.स.१८७६ मध्यें अब्दुल हमीद हा जेव्हां तुर्कस्तानच्या गादीवर आला तेव्हापासुन तेथील आर्मेनियन लोकांची स्थिति बरीच सुधारली. आणि निरनिराळे जे यूरोपीय राष्ट्रामध्यें तह झाले त्यांत आर्मेनियन लोकांचा प्रश्न पुढें येऊन त्यांनां बरेचसे हक्क मिळत गेले. ह्यांत इंग्लंडनें बरीच कळकळ दाखविली आहे.

१८०१ मध्यें ज्यावेळीं रशियाला जॉर्जिया प्रांत मिळाला. त्यावेळपासून रशियानें आर्मेनियन लोकांनां बरीच स्वतंत्रता दिली. सर्व आर्मेनियन लोकांचें मिळून एक स्वतंत्र राज्यच करावयाचें असा बेत होता, परंतु १८८१ त दुसरा अलेक्झांडर मारला गेल्यामुळें मनु पालटला, आणि आर्मेनियन लोकांवर करडा अंमल सुरू झाला. ह्यामुळें रशियन हद्दींतील आर्मेनियन लोक तुर्कस्तान व इतर आर्मेनियन लोकांबरोबर कट करूं लागले. परंतु रशियानें ह्यांचे बेत लटपटींत करून १९०० मध्यें पृथ्वीच्या कोणत्याहि भागांतील आर्मेनियन लोक आपल्या संरक्षणाखालीं असावे अशी योजना केली.

ग्रीगोरियन आर्मेनियन लोकांचा आर्मेनिया व सिलिशिया हे जोडून यांची व्यवस्था ख्रिश्चन लोकांनीं पहावी असा उद्देश होता. परंतु बर्लिनच्या तहामुळें हा उद्देश सिद्धीस गेला नाहीं. त्याचप्रमाणें यूरोपीय उच्च दर्जाच्या राष्ट्रांच्या निष्काळजीपणामुळें त्यांनां ज्या सुधारणा पाहिजे होत्या त्याहि झाल्या नाहींत, म्हणून आर्मेनियन लोकांपैकीं शिष्ट मंडळींनीं एक बंडखोर संस्था स्थापन केली आणि सर्वत्र होत असलेल्या त्यांच्या अपेष्टांचें मुख्यत्वेंकरून तुर्कस्ताना-

तील हालअपेष्टांचें प्रदर्शन सर्व जगापुढें मांडलें. परंतु त्यांना कोणीकडूनहि साहाय्य मिळविण्याचा संभव नाहीं असें दिसून आल्यावर स्वतःच जिकडे तिकडे धामधूम करण्याचा सपाटा चालविला. आणि क्रमाक्रमानें सर्वत्र कत्तल सुरू झाली. वरील सुधारणा व्हावी अशी इच्छा इंग्लंडची देखील होती. परंतु ही सर्वच चळवळ तुर्कस्तानच्या सुलतानानें बंद पाडून १९०८ मध्यें पूर्ववत शांतता झाली.

आर्मेनियांतील लोकांचीं लग्नरीत.—या लोकांत लग्नाच्या दिवशीं रात्रीं वधू आपल्या इष्टमित्र परिवारासह मोठ्या समारंभानें वरगृहीं येते. तेथें आल्यावर तिला स्त्रियांनीं गजबजलेल्या एका खोलींत नेऊन घालितात. दुसऱ्या खोलींत वर आणि पुरुष मंडळी बसलेली असते. वधू आल्यानंतर वरगृहीं मेजवानीचा थाट उडतो. त्यानंतर वराशिवाय इतर सर्व मंडळी वधूस भेटून तिचें अभिनंदन करितात. पण ती कांहीं उलट उत्तरानें त्यांचे आभार मानीत नाहीं.कारण तिनें तसें केलें तर ती असभ्य अथवा उद्धट आहे असें समजलें जातें. अभिनंदन करून मंडळी निघून गेली, म्हणजे वरपक्षाच्या स्त्रिया वधूला शय्यागृहांत दाखल करितात. तेथें ती आपला बुरखा काढून घेते; वर तेथें येतो आणि वधूवरांचें प्रथम दर्शन होतें. लागलीच वधू आपली कर्तव्यदक्षता दर्शविण्यासाठीं मद्याचा एक पेला भरून तो वरास देते; व नंतर आपणहि ग्रहण करिते. पुढें तीं नवविवाहित स्त्रीपुरुषें ऐषआरामांत निमग्न होतात. त्यांच्या शय्यागृहानजीकच्या दालनांत गाणारे गुणिजन बसलेले असतात. ते वराची सूचना होतांच संगीत सुरू करितात. अर्थात हें गायन शृंगारपरिप्लुत असून तें कामदेवाच्या सन्मानार्थ, व त्या नवदंपत्याच्या उत्तेजनार्थ गाथिलें जातें! ("लग्नविधि व सोहाळे".)

आर्मेनिअन लोकांचें स्वतःचें पारमार्थिक वाङ्मय होतें, परंतु तें ख्रिस्ती उपदेशकांनीं इ. स. च्या ४ थ्या व ५ व्या शतकांत पार जाळून टाकलें. तें इतकें कीं, त्यांपैकीं कोठें १०–१२ ओळी खोरेन येथील मोझेस यानें लिहिलेल्या आर्मेनियाच्या इतिहासांत आढळतात.

या लोकांमध्यें ख्रिस्ती वाङ्मयाचा प्रवेश प्रथम इ. स. च्या ४ थ्या शतकांत झाला. यावेळीं प्रथम मेस्रोप यानें आर्मेनिअन वर्णमाला शोधून काढली. ही वर्णमाला बहुधा प्राचीन असून मेस्रोपनें फक्त त्या वर्णांत स्वर घातले असावे. परंतु ग्रीक धर्मोपदेशक व राजा धाकटा थिओडोशिअस यांची समजूत काढण्याकरितां ही वर्णमाला ईश्वरदत्त होय असा पुकारा करण्यांत आला.

ही वर्णमाला तयार झाल्याबरोबर एकदम सिरिॲक व ग्रीक या भाषांतील ग्रंथांच्या भाषांतरांचा सपाटा सुरू झाला. या भाषांतरकारांनीं, एडेसा, अथेन्स, कॉन्स्टँटिनोपल, अलेक्झांड्रिया, अँटिऑक, सीझरिया, वगैरे ठिकाणीं जाऊन त्यांनीं तेथील सर्व ग्रीक व सीरिॲक लिखाणें आर्मेनियन भाषेंत आणण्याचें काम सुरू केलें.

या वाङ्मयामध्यें, वैद्यकीय, फलज्योतिषविषयक, पंचांगविषयक, भाषाशास्त्रविषयक, कोश वगैरे ग्रंथ आहेत. हे बहुतेक धर्मयुद्धांच्या काळांत लिहिलेले आहेत. यांच्या प्रार्थनांतील मंत्र इ. स. पांचव्या शतकाच्या पूर्वीचे नाहींत. हे प्रथम फार थोडे होते परंतु १२ व्या शतकांत त्यांमध्यें नेरसस व त्याच्या समकालीन लेखकांनीं भर घातली. बहुतेक आर्मेनिअन कवितेमध्यें शब्दालंकार फार दिसून येतात. यांत यमकाचा प्रचार इ. स. ८ व्या शतकाच्या सुमारास पडला. इ. स. १५ व्या शतकाच्या सुमारास कांहीं लौकिक ग्रंथकार निघाले. यांच्या ग्रंथांमध्यें पारमार्थिक ग्रंथांपेक्षां व मंत्रांपेक्षां जास्त माहिती आढळून येते. इ. स. १३ व्या शतकाच्या सुमारास बहुतेक सर्व पारमार्थिक ग्रंथ कविताबद्ध करण्याकडे प्रवृत्ति होती. बहुतेक आर्मेनियन वाङ्मय पारमार्थिकच होतें. त्यांत महाकाव्य व अद्भुत काव्यें दिसून येत नाहींत. परंतु शेजारील जार्जिया देशांमध्यें तीं दिसतात. हीं काव्यें वगैरे उपदेशकांस योग्य नसून ती इराणी वाङ्मयाचा संपर्क दर्शवितात, यांत कांहीं प्रचलित धर्माविरुद्ध पाखंड ग्रंथहि आहेत. त्यांत नेस्टेर व मनी यांचे ग्रंथ आढळतात. परंतु या ग्रंथावर धर्मोपदेकांचा फार कटाक्ष असे. त्यामुळें हे ग्रंथ बहुतेक दुर्मिळ आहेत. छापण्याची कला प्रथम १६ व्या शतकांत या वाङ्मयाच्या दृष्टीनें उपयोगांत आली.हल्लीं सर्व जगभर आर्मेनियन ग्रंथ छापून निघतात.

या वाङ्मयांतील हस्तलिखितांचाहि फार मोठा संग्रह ठिकठिकाणीं आहे.

१९०४ ते १९११ हीं वर्षे आर्मेनियाच्या इतिहासांत अत्यंत महत्त्वाचीं आहेत. १९०८ मध्यें तुर्कस्तानांत बिन रक्तपाती राज्यक्रांति झाली. त्यावेळीं आटोमन साम्राज्यांतील जातिवैमनस्यें नष्ट झाल्यासारखीं झालीं, पार्लमेंटचा राज्यकारभार सुरू झाला. त्याला आर्मेनियन लोक व त्यांचे पुढारी दोघांनींहि पूर्ण संमति दर्शविली. तरुण तुर्क पक्षाकडून आर्मेनियन लोकांचे हेतु सफल होतील अशी आशा वाटूं लागली, परंतु हा भ्रम लवकरच दूर झाला. १९०९ मध्यें आडाना येथें कांहीं मारामारी व कत्तल झाली, पण तो दंगा नव्या तुर्की सरकारच्या सैन्यानें ताबडतोब बंद पाडला. पण शिपायावर कोणी आर्मेनियन लोकांनीं गोळ्या झाडल्या व त्यामुळें सैन्य व लोक यांच्या झटापटी सुरू झाल्या. या दंग्याचा वणवा गांवोगांव पसरून २०००० पर्यंत लोक ठार झाले. या दंग्याचें कारण बाहेर आलें नाहीं. पण त्याला आंतून तुर्क अधिकाऱ्यांची फूस होती असें म्हणतात. पुढें कमिशन मार्फत चौकशी झाली, कांहीं आर्मेनियनांनां नुकसानभरपाई देण्यांत आली. तरी पण तरुण तुर्क पक्षाच्या अधिकाऱ्यासंबंधीं संशय वाढतच गेला.

उत्तरेकडी सीलिशियाच्या आर्मेनियन लोकांनींहि चुकीचें वर्तन बरेंच केलें आहे. राज्यक्रांति झाल्यापासून मुसुलमानांविरुद्ध चीड आणणारें मूर्खपणाचें वर्तन त्यांनीं चालविलें, तसेंच आर्मेनिया स्वतंत्र राष्ट्र आहे असा पुकारा करून आडानता येथें भर रस्त्यांत मुसुलमानांचा उपमर्द करून त्यांनां मारहाणहि केली. शिवाय आर्मेनियांतील ख्रिस्त्यांची लोकसंख्या वाढत होती व मुसुलमानांची कमी होत होती, या गोष्टीचाहि मुसुलमानांच्या मनावर परिणाम झाला, पुढें तरुण तुर्कांची सत्ता दृढ होऊन युनियन व प्रोग्रेस कमिटीच्या हातीं सत्ता जातांच आर्मेनियन लोकांना समानतेनें वागविण्याचें धोरण बदलून त्यांचे पार्लमेंटातील प्रतिनिधी कमी करण्यांत आले. आणि आर्मेनियन लोक तुर्क साम्राज्यांतले एक दुष्ट प्रजाजन होत अशी भावना फैलावण्यांत आली.

तु र्की यु द्ध. (१८११ ते १३).—१९११ ते १२ तलें इटालीबरोबरचें युद्ध व १९१२–१३ मधील बाल्कन युद्ध या वेळीं आर्मेनियन लोकांच्या स्थितींत कांहीं फेरबदल झाला नाहीं. बाल्कन युद्धाचे वेळीं आर्मेनियन लोकांवर सैन्यात नोकरी करण्याचा बोजा मात्र विशेष पडला, व त्यानां विशेष त्रासाची व अवघड कामें सांगण्यांत आलीं. तथापि तुर्की कमांडर–इन–चीफ नाझिमपाशा यानें आर्मेनियन शिपायांनीं राजनिष्ठपणें व धैर्यानें आपलीं कर्तव्यें केलीं अशीच शिफारस केली. बाल्कन युद्ध संपल्यावर आर्मेनियनांना आटोमन पार्लमेंटात अधिक प्रतिनिधी पाठविण्याचा हक्क मिळाला, आणि आर्मेनियन लोकांबरोबरच्या आटोमन अधिकाऱ्यांचें वर्तनावर देखरेख ठेवण्याकरितां दोन यूरोपीय इन्स्पेक्टर नेमण्याचें ठरलें.

जा ग ति क यु द्ध.—१९१४ नवंबर मध्यें तरुण तुर्की सरकारनें जर्मनीला मिळून ग्रेटब्रिटन, रशिया, फ्रान्स व सर्व्हिया यांच्याविरुद्ध युद्ध पुकारलें. या युद्धाचा फायदा घेऊन तुर्की साम्राज्यांतून ख्रिस्ती लोकांचा कांटा साफ काढून टाकावा असा तरुण तुर्कपक्षाचा विचार होता. आशियामायनरमधील ख्रिस्ती लोकें, आटोमन, ग्रीक आणि आर्मेनियन इतके लोक तुर्कांच्या डोळ्यांत सलत होते. त्यांचा नायनाट करण्याचे दोन उपाय ठरविले. एक कत्तल व दुसरा हद्दपारी. हें धोरण अबदुल हमीद याचें जुनेंच असून तें तलतपाशा व एनव्हरपाशा यांनीं अधिक मोठ्या प्रमाणांत अमलांत आणण्याचें ठरविलें. मेसापोटेमिया व पूर्वसीरिया यांत सक्तीनें वसाहती स्थापण्याची कल्पना जर्मन डोक्यांतली होती असें म्हणतात. नजीकच्या प्रांतांतले लोक वसाहती करण्यास पाठवावयाचें ठरलें व दूरच्या प्रांतातले आर्मेनियन लोक कत्तलीं करून नष्ट करण्याचें किंवा हद्दपार करण्याचें ठरलें. जागतिक युद्धांत तुर्कस्तान सामील झाल्यावर लवकरच हें दुष्कीर्तिकर धोरण सुरू झालें. दोस्तांनां साहाय्य करण्याचे गुप्त कट चालू आहेत असे खोटेच आरोप पुष्कळावर ठेवून सरसकट सर्व आटोमन आर्मेनियन लोकांचीं हत्यारें काढून घेण्यांत आलीं आणि कत्तलींस सुरुवात झाली. बिटलिस, मुश, सिव्हास, खारपुट; ट्रेबिझोंड या ठिकाणीं कत्तली फार मोठ्या प्रमाणांत झाल्या. लोकांचे मोठाले जमाव कत्तल करण्यांत आले. कांहींनां काळा समुद्र व नद्या यांत बुडवून मारण्यांत आलें, कांहीं घरांनां आगी लावून जाळण्यांत आलीं. तात्पर्य जो उपाय सोयीचा वाटेल तो योजून आर्मेनियनांचा नाश करण्याचें कसाईकाम सुरू झालें. आर्मेनियन मुलींनां तुर्कांच्या जनानखान्यांत कोंबण्यांत आलें. हें सर्व आर्मेनियन लोकांनीं निमूटपणें सोसलें असें नाहीं. त्यांनींहि सांपडेल तें शस्त्र घेऊन तुर्की मारेकऱ्यांचे शक्य तितके मुडदे पाडले.

मेसापोटेमिया व सीरियांत हाकून दिलेल्या लोकांचीहि धडगत लागली नाहीं, कारण त्यांच्यापैकीं पुष्कळसे वाटेंत उपासमारीनें, रोगांनीं, श्रमानीं वगैरे मरण पावले व त्यामुळें ही वसाहतीची योजना म्हणजे आर्मेनियनांनां परलोकीं पाठविण्याचें साधन ठरलें. याप्रमाणें लाखो लोक मृत्युमुखीं पडले. या एकंदर धोरणाला १९१४ पासून सातआठ लाख बळी पडले असा अंदाज आहे. या कत्तलींच्या भीतीनें पुष्कळ लोक रशियांत शिरले व तेथें रशियन सरकारनें त्यांनां आश्रय दिला पण त्यांना सैन्यांत दाखल करून लढाईवर पाठविलें, त्यामुळें युद्धांत पुष्कळसे मेले. त्यांचा हिशोब पाहतां आर्मेनियन जातीच्या एकंदर पुरुषसंख्येपैकीं एकषष्ठांश लोक युद्धात मेले असावे.

र शि या चें धो र ण.—झारशाहींतील रशियाच्या तुर्कस्तानावराबेरच्या धोरणाचा आर्मेनियन लोकांशीं बराच संबंध आहे. कॉंस्टांटिनोपल ताब्यांत घेऊन काळ्या समुद्रांतून भूमध्यसमुद्रांत शिरण्याचा मार्ग हस्तगत करावा असा रशियाचा प्रयत्न गेल्या दोनशें वर्षांचा आहे. पण या कामीं अलीकडे चाळीस वर्षे पूर्ण निराशा झाल्यापासून ट्रान्स काकेशियाच्या बाजूनें समुद्र गाठण्याचें धोरण धरावें लागलें आहे. व तुर्की साम्राज्यांतला त्या बाजूचा मुलुख हस्तगत होईपर्यंत तुर्कांबरोबर आर्मेनियनांचें अंतर्गत भांडण चालू राहावें अशीच रशियाची इच्छा होती. युद्ध सुरू झाल्यावर दोस्तांनीं डार्डानेल्स घेण्याचें ठरवितांच रशियानें कांस्टांटिनोपल व ती सामुद्रधुनी युद्धोत्तरकाळीं स्वतःस मिळावी अशी मागणी केली आणि पाश्चिम यूरोपस्थ दोस्तराष्ट्रांनीं ती कबूलहि केली. अशा रीतीनें युद्ध विषयक हालचालींच्या दृष्टीनें जगांतील एक अत्यंत महत्त्वाचें ठिकाण व त्याबरोबर आर्मेनिया देश कायमचा रशियन सत्तेखालीं जाणार असें भवितव्य दिसूं लागलें. १९१४ नवंबरमध्यें रशियानें तुर्कस्तानावर चाल केली, त्यांत तुर्कांचा पराभव होऊन बहुतेक सैन्य नाश पावलें. हें यश आर्मेमियन लोकांच्या फितुरीमुळें व गुप्त मदतीमुळें रशियाला मिळालें, असें तुर्कांनीं ठरवून आर्मेनियम लोकांच्या कत्तलीं त्यांनीं दुप्पट जोरानें

सुरू केल्या; त्याचा इतका गवगवा झाला कीं, त्याबद्दल तुर्की मंत्र्यांनां व्यक्तिशः जबाबदार धरलें जाईल असें ब्रिटिश व फ्रेंच सरकारनें १९१५ मध्यें जाहीर केलें एवढें खरें. रशिया युद्धांतसामील झाला त्या वेळीं एकलक्ष वीस हजार आर्मेनियन लोक रशियन सैन्यांत होते; शिवाय जादा सैन्य रशियानें उभारलें त्यांत आशिया मायनरमधून पळून गेलेले आर्मेनियन बरेच होते. आणि त्यांनां ट्रान्सकाकेशियाकडील सर्व रस्त्यांची व डोंगरी वाटांची माहिती असल्यामुळें तसेंच ते लोक तुर्कांबरोबर सूड बुद्धीनें लढल्यामुळें तुर्कांविरुद्ध रशियास जय मिळण्यास पुष्कळच मदत झाली. १९१६ फेब्रुवारीमध्यें आटोमन साम्राज्यामधील अर्झरूम हें महत्त्वाचें ठाणें रशियानें घेतलें व लवकरच आशियामायनरपैकीं आर्मेनियन लोकवस्तीचा बराचसा मुलूख हस्तगत केला. पण लवकरच रशियाची अंतस्थ स्थिति फार बिघडली. १९१७ मार्च मध्यें राज्यक्रांति होऊन झार पदभ्रष्ट झाला व रिपब्लिक स्थापन होऊन लेनिन व ट्रास्की यांच्या हातांत सर्व सत्ता गेली. या अंतस्थ घडामोडीमुळें दुबळा बनलेल्या रशियाबरोबर जर्मनीनें १९१८ मार्चमध्यें ब्रेस्ट लिटोव्हस्क येथें तह केला. तो तरुणतुर्क पक्षाला बराच फायद्याचा झाला. कारण त्यानें १८७७–७८ मधील रूटोइर्किश युद्धापूर्वीची तुर्तस्तान व रशियामधील सरहद्द कायम केली. आर्दहन, कार्स व बाटूम प्रांत तुर्कांनां परत मिळाले. म्हणजे, रशियन आर्मेनियांपैकीं भाग तुर्कांना मिळाला. या तहामुळें रशियाच्या मदतीनें स्वतंत्र होण्याची आर्मेनियनांची आशा नष्ट झाली, इतकेंच नव्हे तर तुर्कांच्या दाढेखालीं ते अधिकच सांपडले, आणि स्वतःची अक्कल, एकी व स्वार्थत्याग याशिवाय त्यांनां दुसरा कोणी त्राता उरला नाहीं. १९१७ सप्टेंबरमध्यें ट्रान्स्काकेशियांतील लोकांनीं आर्मेनिया, अझेर्बेजन व जॉर्जिया यांचें मिळून एक संयुक्त लोकसत्ताक राज्य ( फेडरल रिपब्लिक ) स्थापन केलें होतें, पण आपसांतील दुहीमुळें तें लवकरच मोडलें, आणि १९१८ एप्रिलमध्यें प्रत्येकानें आपलें स्वतंत्र रिपब्लिक स्थापलें

**ए रि व्हा न चें आ र्मे नि य न रि प ब्लि क.**—या प्रमाणें आर्मेनियाचें स्वतंत्र राज्य स्थापन झालें खरें, पण तें सर्व बाजूंनीं शत्रूंनीं घेरलेलें होतें व त्याला मदत करणाऱ्या मित्रांचा तेथपर्यंत शिरकाव होणें कठिण होतें. या रिपब्लिकचा बहुतेक प्रदेश डोंगराळ असून सुपीक जमीन फार थोडी असल्यामुळें लोकांच्या निर्वाहाची सोय नव्हती. अशा स्थितींत या स्वतंत्र झालेल्या मुलुखांत तुर्की आर्मेनियांतले चार लक्ष लोक पळून येऊन राहिले, त्यामुळें लोकांनां अन्नाचाच नव्हे तर जळण व युद्ध सामुग्री यांचा तुटवडा पडूं लागला. व त्याशिवाय अंतर्बाह्य इतर अडचणी अनेक होत्या. एरिव्हान म्हणजे आशियांतला स्वित्झर्लंडच होय. तेथून बाहेर जाण्यास रेल्वे रस्ता जार्जियामधून बाटूमपर्यंत एकच असून सडकहि एकच (जॉर्जिया मधून) आहे. आणि बाटूम तर या वेळीं तुर्कांच्या हातीं होतें. शेजारी एका अंगाला तुर्कस्तान व दुसऱ्या अंगाला रशिया हे बलाढ्य शत्रू असून राज्यकारभार पहाण्यास आर्मेनियाजवळ अनुभवलेले पुढारी नव्हते. अशा परिस्थितींत १९१८ जुलैमध्यें ब्रिटिशांनीं आर्मेनियनांनां मदत करण्याच्या हेतूनें बाकू शहर घेतलें, पण लवकरच तुर्कांनीं ब्रिटिश फौजेला तेथून हुसकून लाविलें. आक्टोबरमध्यें मुद्रोस येथें दोस्तांचा तुर्कांबरोबर तह झाला, व त्यानें आर्मेनियनांस मदत करण्याचा ब्रिटिशांना मार्ग मोकळा झाला. तथापि जॉर्जिया व एरिव्हान यांचा सरहद्दीबद्दल तंटा व लढाया चालूच होत्या.

**पॅ रि स त ह प रि ष द.**—ही परिषद आर्मेनियाचा प्रश्न सोडवील अशी आशा उत्पन्न झाली. एरिव्हानच्या व तुर्कस्थानांतल्या आर्मेनियनांनीं एकत्र होऊन एक स्वतंत्र राज्य स्थापण्याचें ठरविलें. त्यांचे वकील पॅरिसच्या तह परिषदेंत हजर राहून त्यांनीं आपला प्रश्न परिषदेपुढें मांडला. वंश, भाषा, धर्म व पूर्वेतिहास या सर्व दृष्टीनें आर्मेनियन लोकांचें स्वतंत्र राष्ट्र बनविणें जरूर होतें. पण आशियामायनरमधील कोणत्याहि भागांत कत्तलीपूर्वीहि ख्रिस्त्यांपेक्षा मुसुलमानांचीच वस्ती अधिक असल्यामुळें स्वयंनिर्णयाचें तत्त्व लावल्यास बहुसंख्याक लोक तुर्की साम्राज्यांत राहण्यासच तयार होते. शिवाय आर्मेनिया स्वतंत्र केल्यास तो तात्काल लष्करी व सांपत्तिक दृष्ट्या स्वतःच्या पायावर उभा राहण्यास समर्थ नव्हता. म्हणून आर्मेनियाचें मॅंडेट एकाद्या राष्ट्राला द्यावें अशी सूचना पुढें आली. अमेरिका अगदीं त्रयस्थ असल्यामुळें त्या राष्ट्राला मॅंडेट मिळावें हें आर्मेनियनांनां पसंत होतें; पण जुन्या जगाच्या अंतस्थ भानगडींत पडण्याचें टाळावें म्हणून अमेरिकन सेनेटनें तें मॅंडेट घेण्याचें नाकारलें, आणि ग्रेट ब्रिटन फ्रान्स किंवा इटाली ही जबाबदारी व तुर्कांबरोबरचें भांडण पत्करण्यास तयार होईनात. त्यामुळें सेव्हेरसच्या तहानें आर्मेनिया स्वतंत्र राष्ट्र होण्याचें ठरलें, तरी तुर्कांच्या ताब्यांतून प्रांत सोडविण्याचें काम कोणी करावें हा प्रश्न पडला. प्रेसिडेंट विलसननें अर्बिट्रेटर या नात्यानं तुर्कस्तान व आर्मेनिया यांच्यामधील सरहद्दी उत्तम रीतीनें ठरविल्या. पण त्याप्रमाणें अम्मलबजावणीचें काम करण्यास लागणारें लष्करी सामर्थ्य तहपरिषद किंवा राष्ट्रसंघ यांपैकीं कोणाजवळच नव्हतें. उलट तुर्कस्तानांत तरुण तुर्क पक्षानें आटोमन साम्राज्यांतून फुटून कोणताहि भाग जाऊं न देण्याची तयारी केली. तलतपाशा, एनव्हरपाशा, केमलपाशा वगैरे तरुण तुर्क पक्षाच्या पुढाऱ्यांनीं अंगोरा येथें राज्यसत्ता स्थापन करून लवकरच सर्व तुर्कस्तानावर त्यांनीं आपला अम्मल बसविला. ही नूतन सत्ता नष्ट करण्याचें सामर्थ्य कांस्टांटिनोपल येथील सरकारांत नव्हतें.

दोस्त राष्ट्रांचीं नवें युद्ध तुर्कांबरोबर सुरू करण्याची तयारी नव्हती. उलट पक्षी तुर्कांनीं बोल्शेव्हिक रशियाच्या मदतीनें तहपरिषदेचे निर्णय धुडकावून लावण्याची तयारी केली. ग्रीसनें मात्र स्वतःचाच प्रदेश जाऊं नये याकरितां तुर्क नॅशनॅलिस्ट पक्षाबरोबर १९२० मे मध्यें युद्ध सुरू केलें. या युद्धांत स्वतःचा फायदा होईल या आशेनें एरिव्हान रिपब्लिकनें ग्रीकांच्या मदतीला आपलें सैन्य तयार केलें. पण स्वतःची सरहद्द सांभाळण्यापलीकडे दुसरी मदत एरिव्हनकडून ग्रीसला होऊं शकली नाहीं. १९२१ फेब्रुवारी मध्यें दोस्तांची मदत किंवा इच्छा नसतांनाहि ग्रीकांनीं तुर्कांवर अधिक जोराची चाल करून अंगोराहि हस्तगत केलें. पण तुर्क नॅशनॅलिस्टांच्या सैन्यानें लवकरच ग्रीकांना मागें हटविलें. पण ग्रीकांनीं १९२१ च्या उन्हाळ्यांत पुन्हां जोरानें चाल करण्याची तयारी केली.

**बोल्शेव्हिकांची कॉकेशियावर स्वारी.**—दुसऱ्या बाजूला बोलशेव्हिकांनीं १९२० एप्रिलमध्यें बाकू शहर काबीज केलें. व अझर्बैजनचें रिपब्लिक मोडून तेथें सोव्हिएट सरकार स्थापिलें. या कार्यांत तुर्क नॅशलिस्टांची मदत बोल्शेव्हिकांना मिळाली, आणि एरिव्हन व जॉर्जिया स्वसत्तेखालीं आणून रशिया व तुर्कस्तान यांच्यामध्यें दळणावळणाचे मार्ग प्रस्थापित करण्याचा उभयतांचा विचार ठरला. पण एरिव्हानमधील आर्मेनियनांनीं या गोष्टीला विरोध केला, तेव्हां मास्को सरकारनें दोस्तीचा तह करण्याचें बोलणें सुरू केलें; पण तहाच्या अटी आर्मेनियनांनां मान्य होण्यासारख्या नव्हत्या. कारण एरिव्हान मधून रेल्वेनें सैन्याची वाहतूक करण्याचा एरिव्हानच्या परराष्ट्रीय धोरणावर नियंत्रण ठेवण्याचा वगैरे हक्क मास्को सोव्हिएटनें मागितले. ते एरिव्हाननें नाकारले व त्याबरोबर एका बाजूनें रशियानें व दुसऱ्या बाजूनें तुर्कांनीं एरिव्हानवर हल्ला चढविला. जार्जियावरहि तेंच संकट ओढवणार असल्यामुळें त्यानें युद्धाची तयारी केली, पण एरिव्हानच्या वतीनें प्रत्यक्ष युद्धांत उडी टाकली नाहीं. एरिव्हानच्या फौजेनें कांहीं काळ बचाव केला. पण अखेर एरिव्हान शहर तुर्कांच्या हातीं गेलें. तेथें सोव्हिएट रिपब्लिक स्थापन झालें. कार्स व आर्दहान प्रांत रशियाच्या संमतीनें तुर्कांनीं घेतलें. फक्त करावाघ येथें आर्मेनियनांची स्वतंत्र सत्ता अल्प प्रमाणांत अस्तित्वांत होती. एरिव्हानच्या मुलुखांत तुर्कांनीं पुन्हां कत्तली सुरू केल्या, ओल्टी कार्स, अलेक्झांड्रोपोल व नंतर खुद्द एरिव्हान शहरांत १९१५–१६ सालाप्रमाणें मोठाल्या कत्तली झाल्या. १९२१ मध्यें जेव्हां बर्फ वितळलें तेव्हां प्रेतांच्या राशींच्या राशी जिकडे तिकडे दिसूं लागल्या.

१९२० मध्यें फ्रेंचांच्या ताब्यांत असलेल्या सिलिसिया तुर्क नॅशनॅलिस्टांच्या सैन्यानें फ्रेंचांचा पराभव करून घेतला. तेथें फ्रेंचांच्या संरक्षणाच्या आशेनें पुष्कळ आर्मेनियन आधींच गेले होते, त्यांना आतां पुन्हां कत्तलीची भीति उत्पन्न झाली. परंतु दोस्त राष्ट्रांनीं मुसुलमानेतरांचें संरक्षण करण्याबद्दल तुर्कांनां बजावल्यामुळें कत्तलींनां कांहींसा आळा बसला. फ्रेंचांनींहि तुर्क नॅशलिस्टांबरोबर १९२१ मध्यें तह ठरवून सिलिशियांतून सैन्य काढून नेण्याचें कबूल केलें व त्याबद्दल मोबदला म्हणून आशियामायनरमध्यें महत्त्वाच्या आर्थिक सवलती मिळविल्या. पण त्या तहाला अंगोराच्या नॅशनल असेंब्लीनें अखेरची संमति देण्याचें नाकारलें.

[ **संदर्भ ग्रंथ.**— विशप—जर्नीज इन् पर्शिया अँड कुर्दिस्तान ( लंडन १८९१ ); ब्लिस—टर्की अँड दि आर्मेनियन ॲट्रासिटीज; लेप्सिअस—आर्मेनिया अँड यूरोप. टोझर–टर्किश आर्मेनिया अँड ईस्टर्न एशिया मायनर. लिंच आर्मेनिया; ए. ब्रि; ए. रि.ए; कर्झन—आर्मेनिया. विंटल—आर्मेनिया अँड इट्स सॉरो. कामिच—हिस्टरी ऑफ आर्मेनिया; सेथ—आर्मेनियन्स इन् इंडिया. इ. ]

**आर्य**—या शब्दासंबंधानें सत्य सांगण्यापेक्षां गैरसमज दूर करणें हेंच एक महत्त्वाचें काम आहे. आर्य हा शब्द विशिष्ट मानववंशाचा वाचक नाहीं. वेदांतील " अर्य " किंवा " आर्य " शब्द विशिष्ट वंशाचे बोधक नाहींत. तथापि जेव्हां यूरोपीयांत संस्कृत भाषेचा आणि तुलनात्मक भाषाशास्त्राचा अभ्यास होऊं लागला आणि प्राचीन भारतीय आणि प्राचीन यूरोपीय यांचें एकवंशसंभवत्वाचें नातें पाश्चात्यांस दिसूं लागलें तेव्हां या सर्व मोठ्या मानववंशास लागू पडेल असा कोणता तरी शब्द योजला पाहिजे असें वाटून संस्कृत वाङ्मयांत दिसून येणारा " आर्य " शब्द निवडला गेला आणि त्याचें " आर्यन् " असें रूपांतर होऊन तो शब्द विशिष्टमानववंशवाचक किंवा भाषासंघवाचक अर्थानें योजला गेला. त्या वेळेस पाश्चात्यांनां असें वाटलें कीं, संस्कृत सदृश भाषा बोलणारे लोक आपणांस आर्य म्हणवीत असावेत. व आर्य शब्द जिकडे तिकडे त्यांस दृष्टीस पडूं लागला. पुढें विशिष्ट मानववंश आपल्या वंशास आर्य म्हणवीत असे ही कल्पना सिद्ध करण्यास अडचणी दिसूं लागल्या तरी आर्यन् शब्द त्यागिला गेला नाहीं. ' आर्यन् ' शब्दाचें भाषांतर जेव्हां हिंदुस्थानांतील देशी भाषांत लोक करूं लागले तेव्हां " आर्य " शब्द वापरण्यांत येऊं लागला. आणि संस्कृतमध्यें जेव्हां जेव्हां आर्य शब्द सांपडे तेव्हां त्याचा महावंशवाचक अर्थ होऊं लागला. आणि त्यामुळें अर्वाचीन सुशिक्षित वाङ्मयांत घोंटाळा होऊं लागला आहे. आणि यामुळें "आर्य" आणि "आर्यन्" या शब्दांचें रूपभिन्नत्व कायम ठेवण्याचा प्रयत्न ज्ञानकोशांत होत आहे. डॉ. केतकर यांनीं आपल्या जातिभेदाच्या इंग्रजी इतिहासा( १९०९ इथका )मध्यें यासंबंधानें भेद ठेवण्याचा प्रयत्न करण्याकडे लक्ष ओढलें आहे. ( आर्यन् पहा )

**आर्य (जात).**—आर्य ही एक जात आहे असें १९११ च्या खानेसुमारीच्या वेळेस प्रथमच आढळून आलें. आर्य

समाजाचे कांहीं कट्टे अनुयायी जे–असुक जन्मावरून जाती बनतात असें मानीत नाहींत–त्यांनीं खानेसुमारीच्या वेळेस आपण कोणत्या जातींत जन्मलो तें न देतां आपली जात व पंथ आर्य आहे असें सांगितलें. [ पंजाब सेन्सस रिपोर्ट १९११ ]

**आर्यक**—(१)कद्रुपुत्र, एक नाग. याची कन्या मारीषा, अथवा भोजा यदुकुलोत्पन्न शूर राजाची स्त्री, तिच्या ठायीं शूरास, पृथा नामक कन्या झाली होती. तिला पुढें कुंति नांव पडलें. ( कुंतिभोज श. पहा. ) पृथा ही, आर्यकाची पौत्री असल्यामुळें, तिच्या भीमसेन नामक पुत्रास, दुर्योधनादिक शतबंधूंनीं, विषयुक्त अन्न चारून, प्रमाण कोटीतीर्थांत बुडविलें असतां, त्यास नदींतील नागांनीं दंश केल्यामुळें त्याचें विष उतरलें, परंतु त्यांनीं त्यास मारावें अशा बुद्धीनें दंश केला होता. नंतर हा सावध झाला असतां, पुनः ते दंश करावयास येतात, असें त्यानें पाहून तो त्यांस मारूं लागला. हें वर्तमान आर्यकास कित्येक नागांनीं कळविल्यावरून, तो स्वतः तेथें आला आणि पाहतो तों, तो भीम आहे असें त्यानें ओळखिलें. नंतर त्यास पाताळांत नेऊन यथेच्छ अमृतपान करविलें, आणि 'दहा सहस्र नागांचें तुला बळ असो,' असा अशीर्वाद देऊन, त्यास हस्तिनापुरासमीप पोहोंचतें केलें. ( भार. आदि. अ. १२८ ).

(२) धर्मसावर्णि मन्वंतरांत होणाऱ्या विष्णु अवताराचा पिता.

**आर्यक** ( घनश्याम )—हा महादेव व काशी यांच्या पासून झालेला मुलगा असून तुकोजी नांवाच्या मराठी राजाचा प्रधान होता. यानें राजशेखर कवीचा उल्लेख आपल्या ग्रंथांत केलेला आहे. यानें कुमारविजय नांवाचें पंचांकी नाटक लिहिलें. त्यांत तारकासुरावर कुमारानें मिळविलेल्या जयाचें वर्णन केलेलें आहे. तसेंच यानें डमरूक, मदनसंजीवन, नवग्रह चरित् नांवाचें तीन अंकी नाटक, प्रचंड राहूदय नांवाचें अन्योक्तिपर नाटक अशीं नाटकें लिहिलीं.

**आर्यदीक्षित**—हा कवि जातीचा द्रविड स्मार्त ब्राह्मण होता. हा शके १६०० मध्यें अग्रहार गांवीं होता याची मान्यता लोकांत चांगली होती. यानें अलंकारशास्त्र व अध्यात्मविद्या या दोहोंवर मिळून एकंदर ८४ ग्रंथ लिहिले. आपल्या वयाच्या ९० व्या वर्षी द्रविड देतांतील चिलब्रम गांवीं हा मरण पावला. ग्यारिटसाहेबांनीं याचें नांव आपल्या कोशांत आर्यहिच्छित असें चुकून लिहिलेलें आहे. ऑफ्रेक्टसूचींत याचें नांव आढळत नाहीं. [ गॅरेट—कोश. अ. को. ]

**आर्यन**—याविषयावर प्रस्तावनाखंडांत जो मजकूर आला आहे त्याचें थोडक्यांत सिंहावलोकन करणें अवश्य आहे. विषयप्रतिपादनसौकर्यार्थ या विषयाचे अनेक पोटविभाग केले पाहिजेत. आ र्य न मा न व वं श शा स्त्र.—यांत आर्यन हा भाषादृष्ट्या समुच्चय आहे त्याप्रमाणें रक्तदृष्ट्या एक समुच्चय होता किंवा नव्हता याविषयीं चर्चा करणें. शरीरमापनशास्त्रदृष्ट्या कांहीं वंशलक्षणें निश्चित करतां येतात किंवा नाहीं हें पाहाणें इत्यादि गोष्टी यामध्यें येतात. आ र्य न् लो कां चा इ ति हा स.—( १ ) यांत आर्यन् भाषासंघ व राष्ट्रसमुच्चय ( २ ) मूलगृहकालीन आणि पर्शुभारतीय कालीन इतिहास, ( ३ ) पर्शुभारतीय कालीन इतिहास, ( ४ ) भारतीय इतिहास आर्यन्संस्कृति, इत्यादि विषय येतात.

अनेक भाषाशास्त्रज्ञांनीं आर्यन हा शब्द अनेक अर्थांनीं वापरल्यामुळें बराच घोटाळा उत्पन्न झाला आहे. मॅक्समुल्लरनें हा शब्द 'इंडो–जर्मन याचा समानार्थक म्हणून वापरला आहे. व इंडो–जर्मन, भाषा बोलणारे जे लोक आहेत ते आर्यन् लोक होत. या ' शब्दाला भाषाशास्त्राच्या दृष्टीनेंच महत्त्व आहे मानववंशशास्त्राच्या दृष्टीनें नाहीं असें त्यानें स्पष्ट जाहीर केलें होतें. सर्व आर्यन् भाषा बोलणारांचा रंग व त्यांचें रक्त हें एकच आहे असें त्यानें केव्हांहि ध्वनित केलें नाहीं. पण हें स्पष्टीकरणहि समाधानकारक नाहीं कांकीं एखाद्या लोकांमध्यें ज्या लोकांचें संख्येनें प्राबल्य असेल त्यांचीच भाषा बहुधा संरक्षित रहाते. त्याचप्रमाणें कवटीची लांबी व केशतंतुघटना इत्यादि मानववंशशास्त्रांतलि खुणांच्या दृष्टीनें या शब्दाला कांहीं अर्थ नाहीं असें त्यानें बजाविलें होतें मॅक्समुल्लरच्या ग्रंथांच्या लोकप्रियतेमुळें हा शब्द विशिष्ट मनुष्यसमूह या अर्थी बराच रूढ झालेला आहे.

आर्य शब्दाच्या अतिप्राचीन उपयोगावरून हा शब्द बॅक्ट्रिया व इराण येथें व भारतवर्षांत राष्ट्रीय अर्थानें वापरीत असत असें विधान कांहीं ग्रंथकार करतात तें आम्हांस मान्य नाहीं. इरा म्हणजे पृथ्वी या शब्दापासून आर्य याची व्युत्पत्ति मॅक्समुलरनें लाविली आहे ती मात्र निश्चित मानतां येत नाहीं. 'अर' धातूपासून आर्य शब्द निघाला असेल परंतु अशा रूपाचे अनेक धातू आहेत, व त्यांचे अनेक अर्थ आहेत. त्यांपैकीं कोणत्या अर्थाच्या धातूपासून आर्य शब्द निघाला हें निश्चित सांगतां येत नाहीं. पिक्टे यानें आर्य शब्दाच्या एरिन् ( आयर्लंड )शीं संबंध लाविला तोही चुकीचा आहे. अरियोव्हिस्टस इत्यादि शब्दांमध्यें जो 'ॲरियो' हा भाग आहे त्याचें व आर्यशब्दाचें मूळ एकच असण्याचा बराच संभव आहे. हा 'ॲरियो' शब्दभाग केल्टिक व जर्मानिक दोंनही भाषांत सांपडतो. आर्मेनिया, आर्मीनी या शब्दांचा व आर्य शब्दाचा संबंध आहे किंवा नाहीं हें सांगतां येत नाहीं. संस्कृतमध्येंहि आर्य व अर्य असे दोन शब्द आहेत. पुष्कळ ऋग्वेदांतील ऋचांत अर्यः हें अरि शब्दाचें षष्ठीचें रूप आहे. अर्य आणि आर्य या शब्दाचें सर्व उतारे घेऊन त्यांचें पृथक्करण तिसऱ्या विभागांत केलेंच आहे. व 'अरि'चा " धार्मिक, कार्य करणारा " असा अर्थ कांहीं लेखकांनीं केला आहे. परंतु याच शब्दाचे 'लोभी' 'शत्रु' 'देवांवर विश्वास न ठेवणारा असे अनेक अर्थ होतात; त्यांवरून ग्रीक 'एरिस' कलह या शब्दाशीं अर्यः याचा संबंध जोडणें सयुक्तिक दिसते. ऋग्वेदांत आर्य शब्द

राष्ट्रीय अर्थानें युक्त नाहीं तर त्रैवर्णिकांपैकीं 'वैश्य' शेतकरी या अर्थी त्याचा प्रयोग केलेला आहे. अथर्ववेदांत शूद्राशीं विरोध दाखविण्याकरितां वैश्य या अर्थानें आर्य शब्दाचा प्रयोग सांपडतो. [ ४-२०-३; १९-६२-१ ] अवेस्तामध्यें ऐर्य शब्द नाम व विशेषण अशा दोनहि रूपांत सांपडतो; परंतु त्याच्या मुळाविषयीं कांहीं पत्ता नाहीं. ऐर्यान असें एक रूपहि अवेस्तांत सांपडतें. संस्कृत अर्यमन् व झेंद ऐर्यमन या दोहोंचा मूळ शब्द व ' आर्य ' शब्दाचा मूळ धातु एकच असावेत. याचा संस्कृत व झेंदमध्येंहि ' मित्र ' ' जिवाचा स्नेही ' असा अर्थ आहे; परंतु झेंदमध्यें फक्त उपाध्यायवर्गास हा शब्द लावतात. संस्कृतमध्यें दास किंवा दस्यू यांच्या विरोधानें आर्य हा शब्द वापरला जातो; परंतु एखादे वेळीं " विवाहामधील पतीचा प्रतिनिधि या अर्थी व कधीं कधीं 'देव' याअर्थी प्रयोग केलेला आहे. ऋग्वेदांत अर्यमन् ही देवता मित्र व वरुण या देवतांशीं युक्त अशी असते; परंतु झेंदमध्यें ऐर्यमनविषयीं गाथांमध्यें कांहीं विशेष माहिती सांपडत नाहीं. एकंदर आर्य शब्दाच्या उत्पत्तीविषयीं स्पष्ट असें कांहींच विधान करतां येत नाहीं; परंतु हा शब्द कांहीं तरी उच्च अशा अर्थानें इंडो-जर्मन लोकांच्या पूर्वशाखेचे लोक आपणां स्वतःला लावीत असत. हल्लीं आर्य शब्द दोन्ही शाखांना लावितात व त्यांत इराणी आर्यांपासून विशिष्टत्व दाखविण्याकरितां हिंदुस्थानी आर्यन वंशाच्या लोकांस इंडो-आर्यन असें म्हणण्याचा विद्वान् लोकांचा प्रघात आहे त्याचप्रमाणें द्रविड लोकांपासून भेद दाखविण्याकरितां आर्योइंडियन असें म्हणतात. आर्यन लोकांनीं इराणांत वसाहत केली तिचें क्रमवार वर्णन उपलब्ध नाहीं. कारण इराणी लोकांत आपण दुसरीकडून आलों अशी केव्हांहीं दंतकथा अस्तित्वांत नव्हती. हिंदुलोकांनाहि अशा तऱ्हेची दंतकथा नाहीं. तथापि ते हिंदुस्थानांत दुसरीकडून आले हें स्पष्टच आहे, व ते हिंदुकुश पर्वताच्या मार्गानें आले असले पाहिजेत अशी समजूत आहे. इसवी शका पूर्वी १००० च्या सुमारास ते सिंधुनदीच्या तीरावर वसाहत करून राहत होते. व या कालाच्या पूर्वी नुकतेच इंडो-आर्यन लोकांचे इंडो-इराणी लोकांपासून पृथक् भुवन झालेलें होतें अशीं मतें व्यक्त केलीं गेलीं पण त्यांस कांहींच महत्त्व देतां येत नाहीं. प्रो. हॉपकिन्स यांच्या मतानें ऋग्वेदाची रचना अंबाल्याच्या जवळच्या प्रदेशांत झाली. पांच नद्यांच्या पश्चिमेकडे या वेळीं आर्यन् लोक असले पाहिजेत. कारण जलावरून " उषा चांगले मार्ग पाडीत व प्रकाशीत येते " असें उषेचें वर्णन आहे.

आर्यन् भाषा.— दुसऱ्या इंडो-यूरोपियन भाषांत व इंडो-आर्यन भाषांत चार मोठे फरक दिसून येतात,व त्यामुळें इंडो-आर्यन भाषा ओळखण्यास मदत होते ( १ ) ऱ्हस्व व दीर्घ अ व ऱ्हस्व व दीर्घ ए व ओ यांचा घोंटाळा (२) ऱ्हस्व ए च्या जागीं इंडो-आर्यन भाषांत इ चा उपयोग होतो. जसें सं. पिता, ग्रीक पॅतेर ( ३ ) इ, व उ नें व कांहीं व्यंजनानंतरच्या स च्या जागीं ष होतो. ४ च्या स्वरांत नामांचें षष्ठीच्या बहुवचनाच्या अंतीं 'नाम' असा प्रत्यय लागतो. हा नाम् ' नं ' अंतीं आहे अशा नामांच्या षष्ठीच्या सादृश्यानें बनविलेला असतो. संस्कृत व इराणी झेंद अवेस्ता यांमध्येंही ४ स्पष्ट भेद दिसून येतात. ( १ ) घ, ध, भ यांच्या ऐवजीं अवेस्तांत ग, द, ब हे वापरतात व या दोहोंमधील फरक स्पष्ट दाखविला जात नाहीं. (२) मूळ आर्य ख थ, फ यांच्या जागीं झेंदावेस्तांत हकाररहित क, त, प असे येतात ( ३ ) संस्कृत स हा स्वरांपूर्वी झेंदावेस्तांत शब्दांच्या आरंभीं ' ह ' होतो;कधीं कधीं शब्दांचे मध्येंहि फरक दिसून येतो.

वैदिक भाषेंत नुसते उच्चारणाचे फरक करून अवेस्तांतील वाक्येंच्यावाक्यें बनवितां येतात यावरून इराणी शाखा व वेदभाषा बोलणाऱ्यांची शाखा ह्या नुकत्याच विभक्त झाल्या होत्या हें निश्चित आहे.

प्राचीन इराणी भाषेंत नाहींत असे पुष्कळ स्वरांचे भेद झेंदमध्यें दिसून येतात. व ते संस्कृतांतील स्वरांपेक्षां भिन्न असतात. संस्कृत आच्याऐवजीं झेंदमध्यें ऐ सांपडतो. हे फरक सोडून दिले तर संस्कृत व झेंदावेस्ता यामध्यें विलक्षण साम्य आहे.' एक ' शब्द मात्र अवेस्तांत ' एव ' असा होतो व हा फरक भाषाशास्त्राच्या दृष्टीनें विचित्र आहे. संस्कृत व इराणी या दोहोंहूनही भिन्न परंतु प्राचीन आर्यन भाषेपासून निघालेल्या अशा अनेक भाषा काफरिस्तान, चित्रळ व त्यांजवळचा प्रदेश येथें प्रचलित आहेत असें डॉ० ग्रिअरसन या विद्वानाचें मत आहे. त्यांस तो पैशाच भाषा म्हणतो. आणि अशा भाषांत तो काश्मिरी घालतो.

पूर्वेकडील आर्यन् भाषा इतर इंडोयूरोपियन भाषेहून कशा भिन्न झाल्या. तो इतिहास आपणास अवगत नाहीं. इंडो-यूरोपियन भाषांचा व प्राचीन चित्रलिपींत लिहिलेल्या कांहीं अज्ञात भाषांचा संबंध जोडण्याचा कांहीं विद्वानांनीं प्रयत्न केला आहे परंतु त्यांत फारसें यश आलें नाहीं. जर्मन पंडितांनीं बोगॅझ क्युई या ठिकाणीं खोदून जे नवीन शोध लावले आहेत त्यांवरून असें दिसतें कीं हिटाइटांचा राजा व मिटनीचा राजा या दोहोंमध्यें जे तह झाले त्यांत मित्र वरुण व इंद्र हीं नावें सांपडल्या कारणानें आर्य भाषा व या तहांच्या भाषा यांत कांहीं तरी संबंध आहे. संस्कृतशीं संबद्ध अशीं विशेष नामें त्यांत आहेत. हे तह इसवी सनापूर्वी १४ व्या शतकांत नोंदलेले आहेत. तुर्कस्थानांत जर्मन पंडितांनीं आणखी कांहीं शोध चालविले आहेत. ते पुरे झाल्यानंतर या प्रश्नाचा कांहीं तरी उलगडा होण्याची पुष्कळ आशा आहे. १९०० सालपर्यंत फक्त तोकरीश या भाषेची कांहीं माहिती मिळालेली आहे

व त्या भाषेचें इंडोयूरोपियन भाषांशीं बरेंच साम्य आहे एवढें सिद्ध झालेलें आहे.

या तोकरीश भाषेचा आर्यभाषांशीं कांहीं संबंध नाहीं. असें आतांपर्यंतच्या शोधांवरून दिसतें; परंतु आणखी पुष्कळ शोध केल्याशिवाय निश्चित असें कांहींच प्रतिपादन करतां येणार नाहीं. ( सीड्झंगबरिक्त डर बर्लिन आकाडेमी जुलै १९०८ पहा ).

आर्यन मानववंशशास्त्र यावर परिश्रम पुष्कळ झाला आहे तथापि त्या परिश्रमाचें निश्चयात्मक फल आमच्या दृष्टीनें फारच थोडें झालें आहे. आर्यन भाषा कोणत्या हें निश्चित करतां येण्याजोगें आहे आणि त्या भाषांच्या मुख्य शाखा भारतीय, इराणी, यवनी, इटालिक, केल्टिक, स्लाव्होनिक, लेटिक यांचा नामनिर्देश मागें ( विभाग पृष्ठ २४ ) केलाच आहे आणि त्यांतल्या त्यांत भारतीय भाषासंघांत मोडणाऱ्या भाषांचें विवेचन पहिल्या विभागाच्या तिसऱ्या प्रकरणांत केलें असून त्यांत वेदभाषा, संस्कृत, प्राकृत उर्फ अपसृष्ट भाषा, पाली, गाथाभाषा, अर्धमागधी, जैनमहाराष्ट्री, महाराष्ट्री, शौरसेनी, मागधी पैशाची अपभ्रंश, सिंधी, गुजराथी, पंजाबी, पश्चिम हिंदी, गढवाली,कुमाऊनी, काश्मिरी, नेपाळी, मराठी, बिहारी, बंगाली, आसामी, उडिया, सिंहली, मालदिवी, एळू वगैरेंची माहिती दिलीच आहे. यांपैकीं अर्धमागधी, सिंहली, एळू व मालदिवी यांचें सविस्तर विवेचन केलें आहे. अर्धमागधीवर, सातव्या विभागांत स्वतंत्र लेख आहे व सिंहली, एळू व मालदिवी यांवर पहिल्या विभागाच्या चवथ्या प्रकरणांत सविस्तर विवेचन आलें आहे. यूरोपांतील जिप्सींच्या भाषा याहि आर्यन भाषांच्या भारतीय शाखेंतीलच पोटभाषा होत ही गोष्ट सविस्तर व्याकरण व शब्दसंग्रह देऊन [ पहिल्या विभागाच्या आठव्या प्रकरणांत ] स्पष्ट केली आहे. याशिवाय अनेक भाषांवर व भाषासंघांवर स्वतंत्र लेख पुढें येतीलच. विशिष्ट आर्यन भाषा बोलणाऱ्या लोकांपैकीं अमुक लोक खरे आर्यन रक्ताचे आहेत आणि अमुक नाहींत अशा प्रकारचें विवेचन पुष्कळ लेखांतून आढळतें आणि तें विवेचन अत्यंत असमाधानकारक असल्यामुळें आणि अनेक प्रसंगीं तें पूर्वग्रहदूषित असल्यामुळें त्याचा गोषवारा कोठेंच दिला नाहीं. निश्चितपणें आर्यन शारीरिक स्वरूप कोणतें याविषयीं समाधानकारक कांहीं सांगतां येत नाहीं. मूलगृहकालीन, पर्शुभारतीय आणि प्राचीन यूरोपीय या संस्कृतींचें विवेचन तिसऱ्या विभागाच्या उत्तर भागांत तीन स्वतंत्र प्रकरणें देऊन केलें आहे. यांत मुख्य आधारभूत साहित्य शब्दसंग्रह असल्यामुळें शब्दसंग्रहांतील सादृश्यें जितक्या व्यापक तऱ्हेनें मांडतां येतील, तितक्या व्यापकपणानें मांडलीं आहेत. प्राचीन आर्यन लोकांच्या इतिहासांतील अत्यंत गूढ भाग म्हणजे आर्यअसुरसंबंध हा होय. या संशोधनाची आजची स्थिति अत्यंत असमाधानकारक असल्यामुळें निरनिराळ्या पंडितांचीं मतें आंतील परस्परसंगति न पहातां दिलीं आहेत.

आर्यन लोकांचा भारतीय इतिहास द्यावयाचा म्हणजे हिंदुस्थानचा बराचसा इतिहास देणें होय. त्यास येथें अवकाश नाहीं, तथापि वेदकालीन आर्यन इतिहासासंबंधानें कांहीं माहिती येथें देणें जरूर आहे. वेदकालीन आर्यन लोकांसंबंधानें अनेक प्रचलित मतें ज्ञानकोशाच्या दुसऱ्या विभागांत खोडून काढलीं आहेत. ज्ञानकोशांत स्थापन केलेलीं आर्य आणि आर्यन यांसंबंधानें मतें येणेंप्रमाणें:— ( १ ) ऋग्वेद हा आर्यन लोकांचें देशांत प्रथम आगमन दर्शवीत नाहीं. ऋग्वेद फक्त भरतांच्या हिंदुस्थानावर स्वारीचें वाङ्मय आहे आणि या स्वारीपूर्वीं आर्यन लोकांची वसाहत हिंदुस्थानांत निदान एक हजार वर्षें तरी असावी. ( २ ) आर्य आणि दास हा यजनविषयक विरुद्धतान्यास आहे, जातिविषयक आणि नाहीं. ( ३ ) आर्य आणि दास यांचें सामुच्चयिक युद्ध वेदांत नाहीं. ( ४ ) " दास " ही कल्पना हिंदुस्थानीय नाहीं तर ती पर्शुभारतीय आहे आणि त्यामुळें आर्यन वंशानें हिंदुस्थान जिंकून देश्य लोकास " दास " बनविलें, हें वैदिक पुराव्यानें सिद्ध होत नाहीं. ( ५ ) वर्ण या शब्दाचा अर्थ चातुर्वर्ण्यांतील एक अवयव अशा अर्थानें वेदांत नाहीं तर यजनमूलक वर्ग असा अर्थ वेदांत असावा आणि वर्ण हा शब्द पर्शुभारतीय असावा आणि वर्ण याचा अत्यंत प्राचीन अर्थ संप्रदाय असा असला पाहिजे.

**आर्यन**—मलबारप्रांताकडील एक दर्यावर्दी जात हे लोक वलन लोकांसारखे मासे धरणारे आणि नावाडी आहेत; परंतु वलन हे फक्त खाडींमध्यें मासे धरतात आणि आर्यन हे समुद्रांत सुद्धां मासे धरतात म्हणून त्यांनां कदल आर्यन म्हणतात. यांची कोचीनमधील लोकसंख्या ( १९११ ) ४७६६ आहे. हिंदूंतील श्रेष्ठ वर्णांच्या लोकांपासून ३२ फुटांच्या आंत हे जर आले, तर ते श्रेष्ठ वर्णांतील लोक ह्यांचा विटाळ मानतात. जरी आर्यन आणि वलन हे इतर लोकांच्या दृष्टीनें एकसारखे आहेत, तरी त्यांचा आपसांत रोटीव्यवहार किंवा बेटीव्यवहार होत नाहीं. ते वृद्धीचे किंवा सुतकाचे ११ दिवस पाळतात. आर्यन व वलन या जातींचे लोक उपाध्यायाचें काम करतात.

**आर्यप्पत्तर**—हे पूर्व किनाऱ्यावरून मलबारमध्यें प्रथम आलेल्या ब्राह्मणांचे वंशज आहेत असें मानण्यांत येतें. १९११ सालीं त्रावणकोरमध्यें यांची थोडीशीं घरेंच कायती करुगपल्ली नांवाच्या तालुक्यांत होतीं; परंतु यांची कांहीं वस्ती मदुरा व तिन्नवेल्ली जिल्ह्यांत आहे. या जातींतील पुरुषांचा विवाह पोत्ती जातींतील स्त्रियांशीं होतो; परंतु मुली आर्यप्पत्तर घराण्यांतच देण्यांत येतात. हे घरीं मल्याळी भाषाच बोलतात. आचारविचारांत मल्याळ ब्राह्मणांहून ते मुळींच भिन्न नाहींत. लग्नाच्या वेळीं मुलीला तामिळ तऱ्हेचीं वस्त्रें

नेसविण्यांत येतात. जातीसंबंधीं बाबतींत आर्यप्पत्तर हे नंबुद्री वैदिकांसच प्रमाण मानतात. [ सेन्सस १९११].

**आर्यभट** ( पहिला )—भारतीय ज्योतिःशास्त्रयांमध्यें पहिला आर्यभट होय. याचा आर्यभटीय नामक प्रसिद्ध ग्रंथ आहे. उपलब्ध असलेल्या पौरुष ज्योतिष ग्रंथांत याच्याहून प्राचीन दुसरा नाहीं. त्याच्या ग्रंथास आर्यसिद्धांत म्हणतात, व तें नांव यथार्थ आहे. आर्यभट या नांवाचा दुसरा एक ज्योतिषी होऊन गेला. आर्यसिद्धांताचे दोन भाग आहेत.पहिला दशगीतिक व दुसरा आर्याष्टाशत. आर्यसिद्धांत ग्रंथावर टीका सूर्ययज्वन् या नांवाच्या एका ज्योतिषानें केलेली आहे. सन १८७५ सालीं डॉ. केर्न यानें आर्यसिद्धांत टीकेसहित हॉलंड देशांत लेडेन येथें छापून काढला. तोंपर्यंत यूरोपांत आर्यसिद्धांताची फारसी माहिती नव्हती. सांप्रत आर्यसिद्धांत ग्रंथ फारसा कोणास माहीत नाहीं. महाराष्ट्र देशांत कोठें कोण जुन्या जोशाकडे आर्यसिद्धांताची प्रत संग्रहीं असेल असें दिसत नाहीं. आर्यपक्ष सांप्रत प्रचारांत आहे व त्याचे अभिमानी पुष्कळ आहेत, परंतु आर्यसिद्धांत मूलावरून जाणणारे थोडे. आर्यभटानें थोडक्यांत संख्या दाखविण्याकरितां जी परिभाषा योजली ती पूर्वी दुसऱ्या कोणत्याहि ग्रंथांत आढळत नाहीं यावरून ही मूळ कल्पना आर्यभटाची असली पाहिजे. या पद्धतीनें काम फार थोडक्यांत होतें.

आर्यभटाची युगपद्धति इतर सिद्धांतांहून थोडीशी भिन्न आहे. मनूचीं युगें आर्यभट ७२ म्हणतात. इतर ७१ म्हणतात महायुग त्यांचे आणि इतरांचें सारखेंच आहे. आर्यभटांचा जन्म शके ३९८ या वर्षी झालेला असून वसतिस्थान कुसुमपूर होतें. हें बंगाल्यांतील पाटणा होय असें समजतात. परंतु बंगाल्यांत आर्यसिद्धांत मुळींच चालत नाहीं यावरून आर्यभटाचें कुसुमपूर हें कदाचित् दक्षिणेंत असेल. पृथ्वी प्रत्यहीं आपल्याभोंवतीं फिरते म्हणजे तिला दैनंदिन गति आहे असें मानणारा ज्योतिषी हिंदुस्थानांत एक आर्यभटच झाला,पण पृथ्वी सूर्याभोंवतीं फिरते असें त्याचें मत होतें असें दिसत नाहीं.आर्यभटानीं आपला ग्रंथ जरी फार संक्षिप्त लिहिला आहे. तरी त्यांत जे विषय गोवले आहेत, ते असे आहेत कीं, त्यांचें वर्णन स्पष्ट व विशद केलें आहे. आर्यभटाचा एकादा करणग्रंथ असावा पण तो सांप्रत उपलब्ध नाहीं. याची ज्योतिःशास्त्रांतील कामगिरी विज्ञानेतिहासांत विस्तृत ( पृ. ३०३ व पुढें ] दिली आहे.

ज्योतिष सिद्धांतकारांची योग्यता पाहण्याचें मुख्य साधन त्यांचे ग्रंथावरून येणारा दृक्प्रत्यय होय. आणि यासंबंधानें पाहतां आर्यभटाची योग्यता मोठी आहे. श्रीषेण व विष्णुचंद्र यांनीं आर्यभटाच्याच ग्रंथांतून स्पष्टीकरण,मंदोच्चें वगैरे घेतलीं आहेत. बृहत्संहिताटीकेंत उत्पलानें आर्यभटीयांतील पुष्कळ आर्यांचें अवतरण केलें आहे, व त्यानंतरच्या बऱ्याच ग्रंथांत त्याचीं वचनें आढळतात. लल्ल या नांवाचा जो एक ज्योतिषी होऊन गेला तो आर्यभटाचा अनुयायी होता. आर्यभटाचे सिद्धांत दक्षिण हिंदुस्थान व मलबार प्रांतांत विशेष मान्य आहेत. बंगाल व महाराष्ट्रांत जे ज्योतिष ग्रंथ आहेत त्यांत आर्यसिद्धांताची वचनें आढळत नाहींत.

अबूअल हसन याच्या ग्रंथांतल्या ग्रहभगणसंख्या बेरुणीनें दिल्या आहेत त्यांतल्या बहुतेक पहिल्या आर्यभटाच्या ग्रंथाशीं मिळतात, कांहीं मिळत नाहींत. त्या लेखकप्रमादादिकांमुळें मिळत नसाव्या. बेरुणी याजपाशीं आर्यभटीय ग्रंथाचा कांहीं तरी भाग व त्याचें अरबी भाषांतर होतें. हें भाषांतर खलीफ मनसूर याच्या कारकीर्दींत झालें असावें. [ दीक्षितकृत. भा. ज्योतिःशास्त्र. ]

**आर्यभट** ( दुसरा )—याचा काल शके ८७५ च्या सुमारास असावा. आर्य सिद्धांत या नांवाचा याचाहि एक ग्रंथ आहे. त्या ग्रंथाचे १८ अध्याय असून त्यांत सुमारें ६२५ आर्या आहेत. पहिल्या १३ अध्यायांत करणग्रंथातील निरनिराळ्या अधिकारांत असणाऱ्या सर्व गोष्टी आहेत. चवदाव्या अध्यायांत गोल संबंधीं विचार व प्रश्न आहेत. पंधराव्यांत पाटीगणित आहे. यांत भास्कराचार्यांच्या लीलावतींतील बहुतेक विषय आहेत. १६ व्यांत भुवनकोश आहे. १७ व्यांत ग्रहमध्यगतीची उपपत्ति व १८ व्यांत बीजगणित मुख्यत्वें कुट्टक गणितें आहे. [ दीक्षित कृत भारतीय ज्योतिःशास्त्र. ]

**आर्यरक्षित.**—वि. सं. ११३६ ( इ. स. १०८० ) या वर्षी आर्यरक्षिताचा जन्म झाला. यानें वि. सं. ११६९सालीं जैनांच्या अंचलगच्छ पंथाची स्थापना केली.

**आर्यवैद्यक**—वेद ज्याप्रमाणें अनादि मानतात त्याचप्रमाणें आर्यवैद्यकहि अनादि समजण्यांत येतें. ऋग्वेद–यजुर्वेद संहितांतून ईश्वरालाच आद्य व उत्कृष्ट वैद्य म्हटलें आहे. अश्विनीकुमारांनीं च्यवनभार्गवाला तारुण्य दिलें, दक्षाचें तोडलेलें डोकें पुनः चिकटवून दिलें, इंद्राला बोकडाचें शिश्न लाविलें, पूषाला नवीन दांत व भगदेवाला नवीन डोळे दिले, इत्यादि अनेक वैद्यकांत गणल्या जाणाऱ्या गोष्टी घडून आल्याचीं त्या वेदांतून वर्णनें आढळतात. अथर्ववेदांत तर पुष्कळच वैद्यकीय विषय आले आहेत. मंत्र, ताईत व जादूटोणा, तसेंच अरुधंती, अपामार्ग, पृश्निपर्णी वगैरे औषधी वनस्पति रोगनिवारणार्थ उपयोजण्याविषयीं त्या वेदांत सांगितलें आहे. अथर्ववेद हाच आद्य आयुर्वेद म्हटल्यास हरकत नाहीं. आयुर्वेदाला या वेदाचें उपांग समजण्यांत येतें, तर त्याला ऋग्वेदाचा उपवेदहि म्हटलें आहे.

आयुर्वेदाचे शल्य, शालाक्य, कायचिकित्सा, भूतविद्या, कौमारभृत्य, अगदतंत्र व वाजीकरण असे आठ भाग पाडले आहेत. आयुर्वेदावर चरक, सुश्रुत, वाग्भट, धन्वंतरी, माधव, भावमिश्र वगैरे पंडितांनीं लिहिलेले ग्रंथ सुप्रसिद्ध असून अतिशय प्रमाणभूत मानिले जातात. आर्यवैद्यकाचा सविस्तर इतिहास विज्ञानेतिहास ( ज्ञानकोश–प्रस्तावनाखंड

विभाग ५ ) यामधील ९ व्या प्रकरणांत सांपडेल. या ठिकाणीं थोडें तात्विक विवेचन दिलें आहे.

प्राचीन भारतीय प्रथम रोग हे राक्षसांनीं आणलेले म्हणून समजूत त्यांवर मंत्रतंत्रांचा इलाज करीत हें अथर्ववेदांतील औषधीमंत्रांवरून दिसून येईल. चरकसुश्रुतादि शास्त्रीय ग्रंथांतूत सुद्धां भूतानें पछाडल्यामुळें मनोदौर्बल्य येतें अशा तऱ्हेचे उल्लेख आहेत. पुनर्जन्माची कल्पना भारतीयांत जेव्हां शिरली तेव्हां रोग कां होतात, याची नवीन उपपत्ति देण्यांत येऊं लागली. ती म्हणजे पूर्वजन्मींचीं पापें, या जन्मीं रोग, व्यंगें घडवून आणितात ही होय. या कर्मविपाकाच्या सिद्धांताप्रमाणें या जन्मीं ब्रह्महत्या करणारास पुढील जन्मीं क्षय होईल. दारुड्याचे दांत काळे पडतील, अन्नचोराला अग्निमांद्य येईल वगैरे. या पूर्वजन्मीच्या पापांबद्दल प्रायश्चित्तेंहि देण्यांत येतात.

यापुढील जास्त सयुक्त व प्रौढ सिद्धांत म्हणजे जंतूंचा. डोकें, कान, डोळे, आंतडीं इत्यादिकांचीं दुखणीं जंतुजन्य असतात. आधुनिक सूक्ष्मजंतुशास्त्राचें बीज या सिद्धांतांत सांपडेल.

प्राचीन काळीं रोगांवर उपाय म्हणून जादूटोणे करीत. पुष्कळदां रोगांवरील उपाय होमिओपाथी किंवा ॲलोपाथी तत्त्वांप्रमाणें असत. उदाहरणार्थ, कावीळ झालेल्या रोग्याचा पिंवळा रंग ज्या ठिकाणीं तो असेल तेथें—म्हणजे पीत सूर्य किंवा पीत पक्षी—पाठवून देण्याचा प्रयत्न करीत. वरुणानें पाठविलेला जलोदर रोग घालविण्याकरितां रोग्याच्या डोक्या-वर दर्भांनीं पाणी शिंपडीत. पांढरें कुष्ट जाण्याकरितां काळी वनस्पति लावीत. पुष्कळशा रोगांवर आप व अग्नि हें रामबाण समजत. [ वैद्यक ( वैदिक ) पहा. ]

आर्यवैद्यकाचा दुसरा काळ म्हणजे जीवक कोमारभच्चा ( कुमारभृत्या ) पासूनचा. जीवक हा बुद्धाचा समकालीन असून नांवाप्रमाणें बालरोगवैद्य होता. बौद्धकालीन वैद्यक चांगलें नांवाजलेलें असून बावर हस्तलिखितांत त्यावर एक बुद्धकालीन ग्रंथ आहे. बौद्ध राजांनीं रुग्णालयें, दवाखाने वगैरे रोगनिवारणसंस्था काढलेल्या परिचित आहेतच. या पुढील काळ चरक, सुश्रुतादिकांचा होय. या काळांतील ग्रंथांचा बौद्धग्रंथांशीं विरोध नसे. सुश्रुत, वाग्भटांतील भारतीय शस्त्रक्रिया आधुनिक यूरोपीय शस्त्रक्रियापद्धतीची जननी होय हें यूरोपीय पंडितांनांहि कबूल आहे. भारतीय वैद्य व वैद्यकग्रंथ यांनां परदेशीं मागणी असे. तथापि शास्त्रविकास झाला तरी पूर्वीच्या कोणत्याहि कल्पना सुटल्या नव्हत्या. विंचूसापां-वर मंत्र, देवीगोंवरांकरितां शीतलादेवीची पूजा, भूतबाधेवर उपाय, सटवीची पूजा या गोष्टी असतच व अद्यापिहि आहे-तच. चरककालानंतर टीकोपटीका नाडीपरीक्षा व रसायन वगैरे शाखांखेरीज शास्त्रीय उपपत्तींत मुळींच भर पडली नाहीं म्हटलें तरी चालेल व त्यामुळें हें वैद्यक सध्यां मागसलेलें असून सुशिक्षितांकडून आज त्याचा गौरव होत नाहीं. आर्य वैद्यकांतील प्रत्येक रोगावरील निदान-चिकित्सा-त्या त्या रोगावरील लेखांत येईल. तेव्हां येथें जास्त विवेचन केलें नाहीं.

[ वा ङ्म य—ब्लूमफील्ड—अथर्ववेद. जॉली—मेडिसिन. वाईज—कॉमेंटरी ऑन दि हिंदु सिस्टिम ऑफ मेडिसिन. कलांड—अल्टिन्डिश्चेस झौबेररिचुअल, ॲमस्टर्डम १९००. विंटरनिझ्फोक—मेडिसिन इन एन्शंट इंडिया ( ' नेचर ' ७ जुलै १८९८ ). सर भगवतसिंहजी—ए शॉर्ट हिस्टरी ऑफ आर्यन मेडिकल सायन्स, लंडन १८९६. पी. सी. रॉय—हिस्टरी ऑफ हिंदु केमिस्ट्री. जॉली—डिसीज अँड मेडि-सिन ( ए. रि. ए. पु. ४ ). दत्त—आर्यन सिव्हिलिझेशन. विज्ञानेतिहास इत्यादि. ]

**आर्यशूरः**—शूर किंवा आर्यशूर हा बराच प्रसिद्ध कवि असून हा जरी बराच उत्तरकालीन दिसतो तरी बहुधा अश्वघोषाच्या संप्रदायांतील असावा. याच्या जातकमालेची भाषा व रचनापद्धति अगदीं सूत्रालंकाराच्या पद्धतीसारखीच आहे. परंतु " जातकमाला " हें वास्तविक एका समूहाचें नांव आहे. कित्येक कवींनीं जातकमाला लिहिल्या आहेत; म्हणजे त्यांनीं निवडक जातकें खुबीदार गद्यपद्यात्मक भाषेंत पुन्हा लिहून काढिलीं आहेत. आर्यशूरानेंहि नवीन गोष्टी लिहिण्याची तसदी घेतली नाहीं; ह्यानें जुन्याच गोष्टी सुंदर खुबीदार भाषेंत पुन्हाः कथन केलेल्या आहेत. यांतील गद्य व पद्य काव्यदृष्ट्या उत्कृष्ट व शुद्ध असून त्यांत कृत्रिमते-पेक्षां खुबीदारपणा अधिक दिसून येतो. ज्याप्रमाणें धर्मो-पदेश करितेवेळीं भिक्षूंनां प्रवचनाच्या उपयोगासाठीं जातकांची योजना झालेली आहे. त्याचप्रमाणें धर्मप्रचारकांसाठीं जातक मालेची योजना झालेली असावी. तथापि हा कृति बहुधा राजदरबारीं धर्मोपदेशाचें काम करीत असल्यामुळें संस्कृत काव्य ज्यांनां पूर्णपणें समजत असे अशा दरबा-रच्या मंडळींत धर्मोपदेश करित असलेल्या भिक्षूकडेच फक्त या कवीचें लक्ष होतें. जातकमाला या ग्रंथांत चौतीस जातकें असून तीं चरियापिटकांतील पस्तीस जात-कांप्रमाणेंच, बोधिसत्वाच्या पारमितांचें ज्ञान करून देण्या-साठीं लिहिलेलीं आहेत. बहुतेक सर्व कथानकें जातक ग्रंथामध्यें आलेलीं असून, बारा कथानकें चरियापिट-कांत आलेलीं आहेत. पालिजातकसमुच्चयांत ज्या थोड्या गोष्टी सोडून दिलेल्या आहेत. त्यांपैकीं, एक ' क्षुधापीडित व्याघ्री आपल्या पिल्लांनां खाऊन टाकण्याच्या बेतांत आहे. असें पहातांच तिला अन्न पुरविण्यासाठीं बोधिसत्त्वानें स्वतः आपला प्राण दिला ' ही पहिली गोष्ट आहे. ही लाक्षणिक गोष्ट येथें थोडक्यांत देतों.

" पूर्व जन्मीं गुरूनें सर्व प्राण्यांवर अत्युत्कट व निःस्वार्थी प्रेम दाखवून सर्व प्राण्यांच्या जीवितांमध्यें तो स्वतः गढून गेला होता. म्हणून बुद्धगुरूवर आपण अतिशय प्रेम केलें पाहिजे. नंतर, उदाहरणार्थ, गुरूच्या पूर्व जन्मां-तील एक खालील अद्भुत कृत्य सांगितलेलें आहे ज्यानें आपल्या

कुशाग्रबुद्धीनें व सद्गुणानें आपल्या गुरूचें समाधान केलें, जो सद्गुणनिरीक्षणामध्यें पारंगत होता व जो तीन रत्नांची पूजा करीत असे त्या माझ्या पूज्य गुरूनें त्या अद्भुत कृत्यांची तारीफ केलेली आहे. आपल्या विलक्षण वचनांप्रमाणें, देणग्या देऊन, प्रेमयुक्त भाषणकरून, मदत करून व सहजस्फूर्तीच्या योगानें व प्रेमाच्या योगानें उत्पन्न झालेलीं अशीं इतर दयायुक्त निर्दोष कृत्यें करून त्या वेळीं बोधिसत्त्वानें ( जो हल्लीं गुरू आहे ) सर्व जगतावर उपकार केले; अतिशय विद्वान, कर्तव्यनिष्ठ, सदाचाराबद्दल प्रसिद्ध असलेल्या ब्राह्मण कुटुंबांत त्यानें जन्म घेतला. " तो मोठा झाल्यावर त्यानें सर्व कलांमध्यें व शास्त्रांमध्यें मोठें प्राविण्य मिळविलें. त्याला मोठी संपत्ति मिळून मानमरातबहि मिळाले. परंतु संसारामध्यें आनंद न मानतां लवकरच त्यानें एकांतवास पत्करिला. अरण्यामध्यें तो धर्मपरायण यति होऊन राहिला. एके दिवशीं एका शिष्याला बरोबर घेऊन तो टेकड्यांवर हिंडत असतां निःशंकपणें दूध पिण्यासाठीं जवळ आलेल्या आपल्या पिल्लांस क्षुधापीडित अशी एक तरुण व्याघ्री एका गुहेमध्यें खाऊन टाकण्याच्या बेतांत आहे असें त्याच्या दृष्टीस पडलें.

" ज्याप्रमाणें धरणीकंपाच्या वेळीं नगराजहि कंपायमान होतो, त्याप्रमाणें स्वतः शूर असूनहि आपल्या शेजारच्या प्राण्यांच्या दुःखाबद्दल कळवळा येऊन बोधिसत्त्वालाहि तो प्रकार पाहून भीति वाटली.

स्वतःवर मोठें संकट आलें असतां दयाळु लोक धिम्मेपणानें वागतात, परंतु दुसऱ्यावर लहानसें संकट आलें असतांहि ते कंपित होऊन जातात हें आश्चर्यकारक आहे. "

नंतर केवळ एकांत पाहिजे या निमित्तानें त्यानें आपल्या शिष्यांस मांस आणण्यासाठीं पाठविलें; कारण, त्या वाघांच्या पिलांचा जीव वांचविण्यासाठीं व व्याघ्राच्या भक्ष्यस्थानीं पडण्यासाठीं त्या कड्यावरून उडी टाकण्याचा त्यानें अगोदरच निश्चय केला होता. आपला देह दुसऱ्याला अर्पण करण्याशिवाय या निरर्थक नश्वर देहाचा दुसरा कांहीं एक उपयोग नाहीं, हें जाणून त्यानें हा निश्चय केला होता. शिवाय असें केल्यानें जगांत सत्कृत्य करूं इच्छिणाऱ्यांस प्रोत्साहन मिळेल, स्वार्थसाधु लोकांची मानखंडना होईल, सत्कर्म करणाऱ्यास स्वर्गाचा मार्ग दाखविल्यासारखें होईल, व आपल्या स्वतःला तात्काल उत्कृष्ट आत्मप्रबोधन होईल; असें त्यास वाटत होतें; त्याला याशिवाय कांहीं एक नको होतें.

" महत्त्वाकांक्षेसाठीं, कीर्तिसाठीं स्वर्गांतील सुखासाठीं, सार्वभौमत्व मिळविण्यासाठीं किंवा मला निरंतर मुक्ति मिळावी यासाठींहि मीं हें कृत्य करीत नसून फक्त माझ्या शेजाऱ्याच्या कल्याणासाठीं मीं हें करित आहें अशी वस्तुस्थिति असल्यामुळें, जगांतील सर्व दुःखांचा परिहार करण्याचें व ज्याप्रमाणें सूर्य नेहमीं प्रकाश देऊन अंधःकार नाहींसा करितो त्याप्रमाणें उद्धार करण्याचें माझ्या नशीबीं असो "

असें म्हणून त्यानें गुहेंत उडी टाकिली. त्या आवाजाच्या योगानें व्याघ्रीचें लक्ष्य तिकडे जाऊन तिनें आपल्या पिल्लांस सोडून दिलें, व बोधिसत्त्वाला खाऊन टाकण्यासाठीं तिनें त्याच्यावर झडप घातली; तो शिष्य परत आल्यावर त्याच्या दृष्टीस जेव्हां हा देखावा पडला तेव्हां त्याला अत्यंत कळवळा येऊन त्यानें त्या महात्म्याची ज्यांत स्तुती आहे असे कांहीं श्लोक म्हटले शिल्लक राहिलेल्या अस्थींवर, पुष्पमाला, रत्नें वस्त्रें व चन्दन टाकून, मनुष्यें, गंधर्व व देव यांनीं त्याची वाहवा केली. दुसऱ्या कित्येक कथानकामध्येंहि बोधिसत्त्वाच्या अमर्याद दयाळूपणाचें वर्णन केलें आहे.

त्यावेळीं हिंदुस्थानांत विशेष लोकप्रिय व बऱ्याच प्रचलित असलेल्या ग्रंथापैकीं एक अशी इत्सिंगानें जातकमालेची स्तुती केली आहे. अजिंठ्याच्या लेण्यांतील चित्रांमध्यें, जातक मालेंतील कथासंबंधीं चित्रें असून समर्पण लेखामध्यें आर्यशूरानें केलेले श्लोक आहेत. प्राचीन लिपिविद्येप्रमाणें, हे खोदीव लेख इसवी सनाच्या सहाव्या शतकांतील असावेत. ज्याअर्थी आर्यशूराच्या दुसऱ्या एका ग्रंथाचें इ. स. ४३४ त चिनी भाषेंत भाषांतर झालें होतें त्याअर्थी हा कवि बहुधा इसवी सनाच्या चौथ्या शतकांत होऊन गेला असावा.

[संदर्भ वाङ्मय—विंटरनिझ–हिस्टरी ऑफ इंडियन लिटरेचर ( बौद्धकाळ ). जातकमाला–हा खर्डाॅओ. सीरीजमध्यें प्रो. कर्ननें प्रसिद्ध केली आहे. हिचें स्वेयरनें भाषांतर केलें आहे. ( लंडन, १८९५ ).]

**आर्यसमाज**, सं स्था प क—आर्यसमाजाचे संस्थापक स्वामी दयानंद सरस्वती हे काठेवाडांतील मोरवी संस्थानातल्या एका खेड्यांत १८२४ सालीं जन्मले. त्यांनीं आपल्या हयातींत आपलें मूळ नांव किंवा जन्मस्थान कधींहि कोणास सांगितलें नाहीं; व याचें कारण, अंगीकारलेल्या धर्मकार्यांत नातेवाईक येऊन अडथळा करतील किंवा मरणोत्तर समाजाचा अधिपति म्हणून कोणी आपला नातेवाईक वारसा हक्क सांगूं लागेल, असें स्वामी सांगत असत. तथापि १८८३ मध्यें स्वामी परलोकवासी झाल्यावर त्यांचें खरें नांव मूलशंकर अंबाशंकर असल्याचें माहीत झालें. स्वामींचे वडील अंबाशंकर हे ब्राह्मण जातीचे शैवपंथी सुखवस्तु गृहस्थ असून त्यांचा धंदा पेढीवाल्याचा होता. मूलशंकर उर्फ स्वामी दयानंदसरस्वती यांच्या आयुष्याचे तीन विभाग पडतात. पहिला. पूर्व वय (१८२४—१८४५ ), दुसरा प्रवास व अध्ययन ( १८४५—१८६३ ), तिसरा सार्वजनिक कार्य ( १८६३—१८८३ ). आयुष्यांतील पहिल्या दोन विभागांची माहिती स्वामींनीं स्वतः लिहून ठेवलेल्या आत्मचरित्रावरून चांगली मिळते.

आर्यसमाजाच्या या संस्थापकाच्या धर्मबुद्धीसंबंधानें त्याच्या पूर्व वयांत तीन महत्त्वाच्या गोष्टी दिसून येतात. पहिली चवदाव्या वर्षीच मूर्तिपूजेविरुद्ध केलेलें बंड. त्याचें कारण शैव संप्रदायानुसार एका शिवरात्रीच्या दिवशीं उपोषण करून रात्रीं शिवालयांत भजन पूजन व जागरण करीत असतां त्यांनीं शिवाच्या मूर्तीवर एक उंदीर इकडे तिकडे बागडतांनां व नैवेद्य खातांनां पाहिला. दुसरी गोष्ट संसारत्याग करून मोक्ष मिळवण्याचा त्यांनें केलेला निश्चय; याचें कारण बहिणीच्या मृत्यूमुळें त्यांनां झालेलें अपरंपार दुःख. तिसरी गोष्ट एकविसाव्या वर्षी त्यांनीं केलेला गृहत्याग. याचें कारण त्यांच्या आईबापांनीं जुळवून आणलेला विवाह टाळण्याची त्यांची इच्छा. याप्रमाणें मूर्तिपूजेविरुद्ध बंड, मोक्ष मिळवण्याचा निश्चय, आणि संसारत्याग या तीन गोष्टींनीं स्वामींच्या भावी आयुष्याचा पाया घातला गेला या पूर्व इतिहासाबद्दल कोणास शंका येण्याचें कारण नाहीं. कारण स्वामींचें मूर्तिपूजेविरुद्ध मत अखेरपर्यंत कायम होतें, आणि मूर्तिपूजेविरुद्ध चळवळ स्वामींनीं हरिद्वार काशी, इत्यादि प्रमुख क्षेत्रीं केली. संसाराबद्दलच्या त्यांच्या विरक्तीबद्दलहि कोणास संशय येण्याचें कारण नाहीं. कारण स्वामींनीं एकदां जें घर सोडलें तें आप्तेष्टांचें दर्शन घेण्यास सर्व हयातींत एकदांहि ते गृहाकडे गेले नव्हते.

घर सोडल्यानंतर अठरा वर्षे स्वामींनीं संन्याशी होऊन प्रवास करण्यांत व निरनिराळ्या गुरूंपासून ज्ञान संपादण्यांत घालविलीं, त्यांत प्रथमपासूनच त्यांच्या मनावर वेदग्रंथांचा फार परिणाम झाला व व्यक्तिगत आत्मा आणि परमात्मा एकच असल्याबद्दल त्यांची खात्री पटली. ब्रह्मचर्याश्रमाची दीक्षा देऊन त्यांचें नांव शुद्धचैतन्य असे ठेवण्यांत आलें. पुढें चवथ्या संन्यासाश्रमाची दीक्षा देऊन त्यांनां दयानंद सरस्वती हें नांव देण्यांत आलें. तथापि पुढें लवकरच स्वामी वेदांतमार्ग सोडून योगमार्गाकडे वळले; आणि त्यानंतर स्वामींच्या चरित्रावर अखेरचा धार्मिक परिणाम मथुरा येथें रहाणाऱ्या स्वामी विरजानंद सरस्वती नांवाच्या एका अंध वैदिक विद्वानाचा झाला. हा वैदिक अलीकडील संस्कृत वाङ्मयाचा पक्का द्वेष्टा होता. त्यानें वेद शिकविण्यास आरंभ करण्यापूर्वी सर्व अलीकडील संस्कृत ग्रंथ फेंकून देण्यास सांगितलें व दयानंदांनीं तसें केल्यावर त्यांनां वेद शिकवले. वेदाध्ययन पुरें झाल्यावर त्या अंध गुरूनें "आतां जगांत हिंडून मनुष्य जातीला आपल्या ज्ञानाचा उपदेश कर" अशी आशीर्वादात्मक आज्ञा केली. येथें दयानंदांच्या आयुष्याचा दुसरा भाग संपतो.

स्वामींच्या धार्मिक मतांचा इतिहास थोडक्यांत पुढील प्रमाणें आहे. प्रथम पौराणिक ग्रंथांतील मतांचा, नंतर तत्त्वज्ञानात्मक ग्रंथांतील मतांचा, आणि अखेर वैदिक ग्रंथांतील मतांचा पगडा त्यांच्या मनावर पडला.

स्वामी शैवपंथ सोडून वेदांतमार्गी बनले, व शेवटीं सांख्य योगाला शेवटपर्यंत चिकटून राहिले. सर्व वेदग्रंथांचा अर्थ सांख्ययोगपर लावला पाहिजे असें त्यांचें मत होतें. आयुष्याचीं शेवटलीं वीस वर्षे स्वामींनीं सार्वजनिक कार्यांत घालविलीं. या काळांत धर्मोपदेश करीत सर्व हिंदुस्थानभर ते फिरले. पुण्यामुंबईपासून कलकत्त्यापर्यंत व उत्तरेस लाहोरपर्यंत मोठमोठे पंडित, मौलवी व मिशनरी यांच्याबरोबर त्यांनीं वादविवाद केले. प्रथम चार वर्षे स्वमतप्रतिपादन केल्यावर अधिक ध्यानमनन करण्याकरितां व चारित्र्य उत्तम बनविण्याकरितां ते गंगेच्या कांठीं जाऊन राहिले. या अल्पकालीन एकांतवासांत असतांनां स्वामींस प्रत्यक्ष भेटून आलेल्या एका यूरोपीय मिशनऱ्यानें त्यांचें वर्णन पुढीलप्रमाणें लिहून ठेविलें आहे:—

'सायंकालीं नदीच्या वाळवंटांत पाण्याच्या कांठाजवळ बसलेल्या एका फकीराची भेट मीं घेतली. त्याच्या विद्वत्तेबद्दल व पवित्राचरणाबद्दल मीं अगोदर बाजार पेठेंत पुष्कळांच्या तोंडून ऐकलें होतें. त्या ठिकाणीं तो फकीर एका गवताच्या आसनावर बसलेला होता. त्याचें शरीर भीमासारखें भक्कम व जाडजूड असून चेहरा पाणीदार होता. तो बहुतेक नग्नप्राय स्थितींत होता. मी जवळ गेल्याबरोबर त्यानें आनंदानें संभाषणास सुरुवात केली. संसाराचा पूर्ण त्याग करून परमेश्वरचिंतनांत तो काल घालवीत असे. झालेल्या संभाषणावरून सदरहू फकीराचें मन सुसंस्कृत आणि बुद्धि प्राचीन वैदिक ग्रंथांत तरबेज असल्याचें दिसून आलें. तो संस्कृतमध्यें बोलत होता त्यामुळें आमचें संभाषण एका दुभाष्या मार्फत झालें'

सुमारें अडीच वर्षांनीं स्वामी दयानंद एकांतवास सोडून पुन्हां सार्वजनिक वादविवाद करीत फिरूं लागले. हिंदूंचे प्रसिद्ध क्षेत्र काशी वगैरे ठिकाणीं ते मुद्दाम वेदामध्यें मूर्तिपूजा आहे काय ? या विषयावर व्याख्यानें देत असत. मूर्तिपूजेविरुद्ध त्यांनीं फार जोराची मोहीम सुरू केली. व त्या कामीं आपला दृढनिश्चय तसेंच स्वतःचें मोठें वजन आणि असामान्य वक्तृत्व त्यांनीं खर्च केलें.

मुंबई येथें १८७५ एप्रिल १० रोजीं स्वामी दयानंदांनीं आपला आर्यसमाज स्थापन केला. १८७७ मध्यें दिल्ली येथें भरलेल्या बड्या दरबाराच्या वेळीं हजर राहून स्वामींनीं पंजाबांतील कांहीं सुप्रसिद्ध गृहस्थांच्या गांठी घेतल्या. तेव्हां पंजाबांत येण्याबद्दल त्यांनां आमंत्रण झालें. तें मान्य करून स्वामी त्या प्रांतांत गेले. ती त्यांची पंजाबला पहिलीच भेट होती. त्यांच्या संस्थेनें पुढें जेथें विजय मिळविले तें क्षेत्र हेंच होय. १८७८ ते १८८१ या काळांत आर्यसमाज आणि थिऑसॉफिकल सोसायटी यांच्या दरम्यान मोठा चमत्कारिक संबंध आला; पण पुढें दोघे परस्पराबद्दल नाखूष झाले; कारण देवाच्या प्रत्यक्ष स्वरूपाबद्दल त्यांच्यामध्यें मोठा मतभेद उत्पन्न झाला. याशिवाय स्वामी दयानंदाचा

ब्रह्मसमाजाचे देवेंद्रनाथ ठाकूर आणि केशवचंद्रसेन, थिऑसॉफिकल सोसायटीचे मॅडम ब्लॅव्हाट्स्की आणि कर्नल आल्कॉट, प्रार्थनासमाजाचे भोलानाथ साराभाई, सुधारक मुसुलमानी पंथाचे सर सय्यद अहमद, आणि ख्रिस्ती पंथाचे डॉ. टी. जे. स्कॉट आणि रेव्ह. जे. ग्रे इत्यादि निरनिराळ्या संप्रदायांच्या पुढाऱ्यांशीं संबंध आला. स्वामी दयानंदांनीं प्रार्थनासमाज, ब्रह्मसमाज व आर्यसमाज सर्व एक करावे अशी सूचना त्या त्या समाजाच्या पुढाऱ्यांना केली होती; पण ती कोणासच मान्य झाली नाहीं.

१८८२–१८८३ मध्यें स्वामींनीं राजपुतान्याला भेट दिली आणि तेथें ते अनेक संस्थानिकांचे स्नेही व सल्लागार बनले. जोधपूरच्या महाराजांची वदफैली वर्तनाबद्दल स्वामींनीं चांगली कानउघाडणी केली असें सांगतात. या नंतर लवकरच स्वामी आजारी पडले त्यांना अन्नामधून विषप्रयोग केला गेला असें कोणी म्हणतात. तें कांहीं असलें तरी हें मात्र खरें कीं, त्याच दुखण्यांत स्वामींचा शेवट झाला. १८८३ आक्टोबर ३० रोजीं अजमीर येथें स्वामी वयाच्या एकोणसाठाव्या वर्षी परलोकवासी झाले.

स्वामी दयानंदांची प्रकृति फार चांगली, चेहरा भव्य आणि मन दृढनिश्चयी होतें. मूर्तिपूजकांबरोबरच्या वादविवादांत महामूर्ख हें विशेषण त्यांच्या तोंडून फार येत असे. त्यांचें संस्कृत ग्रंथांतील पांडित्य, समयसूचकता आणि आत्मविश्वास मोठ्या पुढाऱ्याला योग्य अशींच होतीं.

मु ख्य त त्त्वें.—प्रत्येक आर्यधर्मीयानें पाळावयाचीं मुख्य दहा तत्त्वें पुढील प्रमाणें आहेतः—

( १ ) सर्व यथार्थ ज्ञानाचा उगम व सर्व वस्तूंचें आदिकारण परमेश्वर आहे.

( २ ) ईश्वर सत् चित् व आनंदस्वरूपी आहे. तो अनादि, अनंत, निराकार, निष्कलंक, सर्वशक्तिमान्, सर्वसाक्षी, परमन्यायी, व परमदयाळु, सर्व जगाचा निर्माता, शास्ता, व पालक आहे. पूजा अथवा उपासना ही त्याचीच करावी.

( ३ ) वेद हे त्याचे निःश्वास आहेत; व सर्व यथार्थ ज्ञानाचा उगम वेदांतच असल्यामुळें वेदांचें अध्ययन करणें व करविणें हें प्रत्येक आर्याचें आवश्यक व पवित्र कर्तव्य आहे.

( ४ ) प्रत्येक आर्यानें सत्याचें ग्रहण करण्यास व असत्याचा त्याग करण्यास तयार असलें पाहिजे.

( ५ ) व्यवहारांतील प्रत्येक कृत्य धर्माला—सदाचाराला—धरून असलें पाहिजे. म्हणजे तें करणें हें नीतिमार्गाला धरून आहे कीं नाहीं, याचा पूर्ण विचार करून तें केलें पाहिजे.

( ६ ) आधिभौतिक, सामाजिक, आध्यात्मिक वगैरे प्रत्येक बाबतींत सुधारणा करून मनुष्यजातीचें सर्वांगीण कल्याण साधणें हाच आर्यसमाजाचा मुख्य उद्देश आहे.

( ७ ) सर्वांशीं प्रेमानें व न्यायानें वागणें हें प्रत्येक आर्याचें कर्तव्य आहे.

( ८ ) अज्ञानाचा नाश करून ज्ञानाचा सार्वत्रिक प्रसार झालाच पाहिजे.

( ९ ) केवळ स्वतःच्या कल्याणानें कोणींहि संतुष्ट राहूं नये; तर दुसऱ्याच्या कल्याणांतच आपलें कल्याण आहे अशी सदोदित भावना ठेवावी.

( १० ) सार्वजनिक हिताहिताचा प्रश्न जेथें उद्भवेल तेथें कोणाहि व्यक्तीनें आपल्या विशिष्ट मताचा अगर विचारांचा आग्रह धरूं नये. पण ज्या गोष्टी केवळ खाजगी व वैय्यक्तिक हिताहिताच्या असतील त्यांत प्रत्येक व्यक्तीस वाटेल तसें वागण्याची पूर्ण मोकळीक असावी. [ वि. ज्ञान. वि. पु. ४८ पृष्ठ ३९५ ].

आर्यसमाजाच्या तत्त्वांपैकीं परमेश्वराचें अस्तित्व व स्वरूप आणि वैदिक ग्रंथातील सिद्धांत यासंबंधाचीं पहिलीं तीन तत्त्वें धार्मिक व अत्यंत महत्त्वाचीं आहेत. व कांहीं तत्त्वें केवळ नीतिविषयक नियम आहेत. यावरून असें दिसून येईल कीं आर्यसमाजाचीं धर्मसूत्रें अगदीं थोडक्यांत आहेत. वरील दहा तत्त्वें शब्दांच्या कमजास्त फरकानें अनेक ठिकाणीं प्रसिद्ध झालेलीं आहेत. विशिष्ट शब्दाबद्दल या धर्म पंथाचा मुळींच आग्रह नसतो.

आर्यसमाजाच्या मुख्य तत्त्वांचा विचार करण्यापूर्वी त्याच्या संस्थापकाच्या मनांत मुख्य उद्देश काय होता हें लक्षांत घेतलें पाहिजे. तो उद्देश म्हणजे हिंदुस्थानची धार्मिक, राजकीय आणि शास्त्रीय बाबतींत उन्नति करणें हा होय. देशांत पसरलेलीं अनेक धर्ममतें पाहून या संस्थापकाचें मन प्रथम गोंधळून गेलें. या धर्मपंथांपैकीं मुसुलमानी आणि ख्रिस्ती हे धर्मपंथ पश्चिमेकडून आलेले आहेत. एतद्देशीय जो हिंदु धर्म तो अनेक मतांचें कडबोळें असून त्यांत शंकराचार्यांच्या अद्वैतसिद्धांतापासून तंत्रग्रंथांतील ग्राम्य व अश्लील धार्मिक विधींचा अंतर्भाव होत असतो. आणि हिंदू धर्मांतील ह्या सर्व पंथांना सामान्य असलेला जातिभेदहि आहे. अशा धार्मिक परिस्थितीचा व त्यावेळच्या राजकीय परिस्थितीचा संप्रदायस्वरूपावर परिणाम झाला आहे.

त्यावेळीं सर्व हिंदुस्थानावर ब्रिटिशांचा सुव्यवस्थित राज्यकारभार चालू झालेला होता; आणि रेल्वे, तारायंत्रें, कालवे, आगबोटी, इत्यादि अनेक प्रकारचीं साधनें पाश्चात्यांच्या शास्त्रीय ज्ञानाच्या प्रगतीची साक्ष देत होतीं. अशा स्थितींत स्वामी दयानंदांनीं जेव्हां सर्व हिंदुस्थानभर प्रवास केला, तेव्हां हिंदुस्थानची भूतकालीन स्थितीच नव्हे तर वर्तमानकालीन स्थितीहि उत्तम अवलोकन करावयास सांपडली, आणि वेद, उपनिषदें, सूत्रें आणि रामायणमहाभारतादि काव्यें यांच्या अभ्यासाबरोबर इंग्रजी भाषेतील नव्या नव्या शास्त्रीय शोधांचे ग्रंथ व इतर अनेक पाश्चात्य विचारांनीं

भरलेले ग्रंथ वाचावयास मिळाले. अशा ज्ञानार्जनानंतर हिंदू धर्माच्या सुधारणेचा प्रश्न स्वामींच्या पुढें उभा राहिला. ही सुधारणा जुन्या आणि नव्याचा पौरस्त्य आणि पाश्चात्य विचारांचा मिलाफ करून त्यांत हिंदू लोकांची बौद्धिक आणि आध्यात्मिक परंपरा कायम राहील व त्या बरोबरच इतर राष्ट्रांनीं ज्ञानाच्या क्षेत्रांत मिळवलेल्या विजयाबद्दल योग्य आदरबुद्धि राहील अशा तऱ्हेची धर्मांत सुधारणा स्वामींना पाहिजे होती. नव्या सुधारलेल्या धर्मपंथाचीं तत्त्वें सर्व जगाला मान्य होतील अशीं करण्याचा स्वामींचा हेतु होता. हा उद्देश साधण्यास अपौरुषेय उर्फ ईश्वरप्रणीत असे जे वेद, त्या ग्रंथांतील तत्त्वांवर आपला धर्मपंथ उभारावा असें स्वामींनीं ठरविलें.

दयानंदसरस्वती आणि मार्टिन ल्यूथर यांच्यामध्यें अनेक बाबतींत साम्य आहे. ज्याप्रमाणें मार्टीन ल्यूथर यूरोपमध्यें ग्रीक, लॅटीन विद्यांचें पुनरुज्जीवन झाल्यावर जन्मास आला, त्याप्रमाणें दयानंदहि हिंदुस्थानात विद्यांच्या अलीकडे झालेल्या पुनरुज्जीवनानंतर जन्मास आले. दोघानांहि जुन्या नव्यामधला झगडा स्पष्ट भासूं लागला. दोघेंहि आपापल्या परीनें नवमताचा पुरस्कार करूं लागले. ल्यूथरनें पापविमोचन पत्रांवर ( इंडल्जन्सेस् ) हल्ला केला; दयानंदांनीं मूर्तिपूजेवर हल्ला केला. ल्यूथरनें रोम येथील पोपच्या संप्रदायाविरुद्ध बंड करून प्रत्यक्ष बायबल ग्रंथाला सर्वस्वीं प्रमाण मानण्यास सुरुवात केली, त्याप्रमाणें स्वामी दयानंदांनींहि स्मृतिप्रणीत ब्राह्मणी धर्माला विरोध करून जुन्या अत्यंत प्राचीन अशा वैदिक ग्रंथांच्या आधारावर नवा पंथ काढला. ल्यूथरचा मंत्र " जुन्या मूळ बायबल ग्रंथाप्रमाणें चाला " असा होता आणि स्वामी दयानंदांचा मंत्र जुन्या मूळ वेदग्रंथा-प्रमाणें चाला ' असा होता. ही तुलना चरित्रविषयक मात्र करता येत नाहीं स्वामी संन्यासी असल्यामुळें राजाश्रय मिळविण्यासाठीं ल्यूथर जशी लटपटपंची करी तशी स्वामीस करावी लागली नाहीं. शिवाय दुर्बल समुच्चयास बलवान करणें हा स्वामींचा हेतू होता, ल्यूथरचा नव्हता, हा फरकहि लक्षांत ठेवला पाहिजे.

स्वामी दयानंद वेदग्रंथांसंबंधीं एकंदर सिद्धांत पुढील प्रमाणें मांडीत असत. वेद ह्या शब्दाचा अर्थ ' ज्ञान ' असा आहे. वेदग्रंथांतील ज्ञान ईश्वरप्रणीत असल्यामुळें अत्यंत शुद्ध आणि परिपूर्ण आहे. अशा ह्या ईश्वरी ज्ञानानें भर-लेल्या ग्रंथांत सर्व शास्त्रांचीं मूलतत्त्वें ग्रथित केलेलीं आहेत. जगांतील एकंदर तत्त्वें ईश्वरानें दोन मार्गांनीं व्यक्त केलीं आहेत. ( १ ) चार वेदांच्या द्वारें. हे वेद प्रथम अग्नि, वायू, सूर्य आणि आंगिरा या चार ऋषींस कोट्यावधि वर्षांपूर्वी, जगदुत्पत्तीच्या आरंभीं, शिकविले; आणि ( २ ) प्रत्यक्ष सृष्टी उत्पन्न करून तिच्या द्वारें या सृष्टीच्या उत्पत्ति स्थिति-लयाचीं तत्त्वें वेदांत ग्रथित केलेलीं आहेत. वेदांतील तत्त्वें आणि सृष्टींतील तत्त्वें यांच्यांत आत्यंतिक साम्य आहे. एकांतील तत्त्वें दुसऱ्यांतील तत्त्वांशीं तंतोतंत जुळतात. स्वामी दयानंद म्हणतः—"वेदांतील तत्त्वें स्वयंसिद्ध आहेत. याबद्दल शंका घेण्यास बिलकूल जागा नाहीं. कारण या ईश्वरप्रणीत ग्रंथांतील तत्त्वेंच सभोंवारच्या सृष्टींत सर्वत्र व्यक्त झालेलीं आहेत. "

या ठिकाणीं वेद हा शब्द द्व्यर्थी वापरला आहे हें नीट लक्षांत घेतलें पाहिजे. एक अर्थ असा कीं, ईश्वरप्रणीत ज्ञान, म्हणजे सर्वज्ञ अशा ईश्वराचें ज्ञान आणि वेद म्हणजे जुन्या संस्कृत भाषेंतील चार वेदग्रंथ. हे दोन अर्थ अगदीं निरनिराळे आहेत. पहिल्या अर्थाबद्दल कोणी शंका घेणार नाहीं; परंतु संस्कृत भाषेंतले चार वेद ग्रंथ हेंच सर्व ईश्वरप्रणीत ज्ञान असा जो स्वामी अर्थ करितात तो मात्र मान्य होण्यासारखा नाहीं; परंतु स्वामी मात्र वेदांत सर्व ईश्वरप्रणीत ज्ञान आहे म्हणजेच अर्थात वेद-ग्रंथांत सर्व शास्त्रीय तत्त्वें सांगितलेलीं आहेत असें मानीत असत. अशी श्रद्धा बनल्यावर प्राचीन, अर्वाचीन, अगदीं अलीकडील प्रत्येक शास्त्रीय शोध निदान बीजरूपानें तरी वेदग्रंथांत सांगितलेला असला पाहिजे असा निर्णय स्वामींनीं ठरविला. अर्थात अलीकडे पाश्चात्य देशात जे नवे शास्त्रीय शोध लागले आहेत ते सर्व पौरस्त्य देशां-तील आमच्या पूर्वज ऋषींच्या ज्ञानचक्षूंस अवगत झालेले होते. तात्पर्य, ज्ञानचक्षूंनीं सर्व गोष्टी आकलन करण्याची दिव्य देणगी ईश्वरानें पौरस्त्य देशातील आमच्या पूर्वजांना दिली होती, तर सर्व गोष्टी प्रत्यक्ष करून दाखविण्याची देणगी त्याच परमेश्वरानें आधुनिक पाश्चात्य लोकांना दिली आहे. सर्व शास्त्रीय शोधांचा कार्यक्रम पौरस्त्यांनीं घालून दिला आहे; आणि तो अमलांत आणण्याचें काम पाश्चात्यांनीं केले आहे. याप्रमाणें स्वामी दयानंदांनीं पौरस्त्यांना योग्य तें श्रेय दिलें असून पाश्चात्यांनांहि योग्य तें श्रेय त्यांच्या पदरांत टाकलें आहे. आणि स्वामी दयानंद म्हणत असत कीं, वेदांमध्यें सांगि-तलेलीं तत्त्वें प्रत्यक्ष आमलांत आणून दाखविण्यांत पाश्चात्य लोक एक प्रकारें नकळत वैदिक धर्माचा अवलंब करीत आहे.

सर्व शास्त्रीय ज्ञान वेदग्रंथांत सांठवलेलें आहे हेंच तत्त्व उपबृंहित करून स्वामींनीं असें प्रतिपादन केलें कीं अलीकडील सर्व धर्मांचा मूळ उगम व प्रेरणा या वैदिक ग्रंथांतूनच झाली आहे. वेद हें मूळ मनुष्य जातीला दिलेलें ईश्वरी ज्ञान होय. आणि म्हणून पारमार्थिक ज्ञानाचा मूळ उगम तेथें आहे. हें तत्त्व कित्येक ख्रिस्तलोक मानतात त्या ' आद्यप्रकटीकरणाच्या ' तत्त्वासारखेंच आहे.

वैदिक ग्रंथासंबंधाचा आर्य समाजानें पुढें मांडलेला सिद्धांत येणें प्रमाणें आहेः—( १ ) वेद ईश्वरप्रणीत आहेत कारण, त्यांतील ज्ञानाचा सृष्टींतील गोष्टींशीं पूर्ण मेळ असतो. ( २ ) वेद हा एकटाच ग्रंथ कायतो ईश्वरप्रणीत

आहे. कारण, दुसऱ्या कोणत्याहि ग्रंथांतील ज्ञानाचा इतका मेळ सृष्टींतील गोष्टींशीं पडत नाहीं. (३) म्हणून वेद ग्रंथ हे अखिल मानव जातीच्या शास्त्रीय ज्ञानाचा आणि पारमार्थिक विचारांचा उगम होत. या मूलाधारभूत. तत्त्वानुसार ठरविलेली आर्यसमाजाचीं दोन महान् कर्तव्यें आहेत तीं अशीं:—हिंदुस्थानला परत वैदिक मार्गावर नेणें; आणि सर्व जगाला वैदिक धर्म शिकवणें.

यांवरून हें स्पष्ट होतें कीं, स्वामी दयानंदांचा मतें फार व्यापक होतीं. ते मोठालीं उदात्त स्वप्नें पहात होते. सर्व भोळ्या भाविक समजुती सोडून दिलेल्या, शास्त्रीय ज्ञानाचीं सर्व फळें चाखीत असलेल्या, एकेश्वरी असलेल्या, एकेश्वरी मताचा पुरस्कार करणाऱ्या, स्वयंशासित असलेल्या ज्ञानाचा आणि जगांतील सर्व शास्त्रीय ज्ञानाचें आणि धर्माचें आद्य उगमस्थान म्हणून मान पावलेल्या अशा हिंदुस्थानाचा रम्य देखावा त्यांच्या दृष्टीला दिसत होता.

आर्यसमाजाच्या संस्थापकाच्या मनश्चक्षूंपुढील हें भावी हिंदुस्थानचें उज्वल चित्र खरोखरच फार रमणीय आणि उद्दीपक आहे. परंतु ही उज्वल स्थिति प्राप्त करून घेण्याचें साधन कोणतें ? तर वर सांगितल्याप्रमाणें मागें वेदाकडे धांव घेणें, आणि त्या प्राचीन वेदांचा अर्थ पिढीजाद संस्कृतज्ञ सांगतील तो नव्हे किंवा चिकित्सक बुद्धीचे पाश्चात्य पंडित सांगतील तोहि नव्हे, तर आर्यसमाजी पंडित सांगतील तो मान्य करून त्याप्रमाणें वागणें, हें होय. तात्पर्य, आर्यसमाजाचे धार्मिक आधार ग्रंथ दिसावयाला वेद असले तरी वास्तविक या ग्रंथांत आर्यसमाजी विद्वानांच्या चष्म्यांतून ज्या गोष्टी दिसतील त्या आधार होत, आणि हे विद्वान अर्थ करून ज्या गोष्टी सांगतात त्या आर्यसमाजाबाहेर कोणाहि पौरस्त्य किंवा पाश्चात्य संस्कृतज्ञाला मान्य होत नाहींत, कारण हे पंडित एकाच वैदिक शब्दाचे व वाक्याचे आपल्या लहरीप्रमाणें वाटेल तसे चमत्कारिक व निरनिराळे अर्थ लावतात. अगदीं अलीकडील काळांत लागलेले सर्व शास्त्रीय शोध वेदांत सांगितलेले आहेत असें हे विद्वान म्हणतात, या गोष्टीवरून त्यांच्या अर्थ लावण्याच्या करामतीची कोणासहि सहज कल्पना येईल. स्वामी दयानंदांनीं वेदांचा जो अर्थ लावलेला आहे त्यांत दोन विशेष आहेतः वैदिक कालांतील रूढार्थ न घेतां केवळ व्युत्पत्तिदृष्ट्या. निघणारा अर्थ घेणें, आणि काळ, पुरुष, विभक्ति व अर्थ या सर्व बाबतींत वैदिक रूपें अगदीं अनियमित होतीं असें मानणें. या विधानाच्या प्रतीतीकरितां स्वामी दयानंदांची ऋग्वेदावरील टीका वाचावी. या संबंधानें मॅक्सम्युल्लर साहेब म्हणतातः—दयानंदांनीं अगदीं अशक्य असा वैदिक ऋचांचा अर्थ लावून त्या ग्रंथांत अलीकडील शास्त्रीय शोधासुद्धां सर्व ज्ञान भरलेलें आहे अशी स्वतःची व आपल्या अनुयायांची समजूत करून घेतली आहे. वाफेचीं यंत्रें, आगगाड्या, आगबोटी सर्व कांहीं गोष्टी निदान बीजरूपानें तरी वेदकालीन ऋषींना माहीत होत्या. वेद म्हणजेच जर ज्ञान, तर वेदांत नाहीं अशी गोष्ट असूं शकेल तरी कशी ? असें स्वामींचें म्हणणें आहे ! ! " थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे स्वामींनीं लावलेला अर्थ हा सर्व केवळ स्वतःच्या एका सिद्धांताला धरून होता, आणि तो सिद्धांत वेदांत एकेश्वरी मत प्रतिपादिलें असून 'सर्व शास्त्रांचीं मूलभूत तत्त्वें त्यांत आहेत' हा होय. ही गोष्ट होमरच्या इलियड किंवा व्हर्जिलच्या एनियड काव्यांत शुद्ध एकेश्वरीमत व सर्व शास्त्रीय शोध दिलेले आढळतात असें म्हणण्यासारखीच हास्यास्पद आहे. वेद ईश्वरप्रणीत असून त्यांत फक्त सृष्टिव्यापारासंबंधाचीं तत्वें व नियम असल्यामुळें त्यांत ऐतिहासिक स्थलें किंवा व्यक्ती यांचा बिलकुल उल्लेख नाहीं असाहि आर्यसमाजी पंडितांचा आग्रह आहे ( आर्यपत्रिका-लाहोर १९ आक्टोबर १९०१ ). एवंच आर्यसमाजाचीं सर्व तत्वें वेदांच्या अशास्त्रीय व पूर्वग्रहदूषित अर्थावर उभारलेलीं आहेत असें डॉ. ग्रिस्वल्डनें आपलें मत व्यक्त केलें आहे.

दुसऱ्या पक्षीं, अनेक स्मृतिग्रंथ मिळून व्यावहारिक हिंदु धर्माचें जें बहुविध स्वरूप दिसतें तें सोडून देऊन मूळ वैदिक ग्रंथ आधारभुत मानण्यांत स्वामी दयानंदांनीं विशेष हुषारी दाखविली यांत शंका नाहीं. प्राचीन ग्रंथांचे अर्थ लावतांना उपयोगांत येत असलेली अलीकडील ऐतिहासिक व चिकित्सक पद्धति माहीत असूनहि स्वामींनीं वेदांतील ऋचांचे हास्यास्पद अर्थ लावले ही त्यांची बुद्धिपुरःसर केलेली चूक नव्हे. तो विशिष्ट मनःप्रवृत्तीचा परिणाम आहे. अशीच श्रीकृष्णाच्या गोपीसंबंधींच्या लीलांचा अर्थ लावण्यांतहि दिसून येते.

यासंबंधानें एक भारतीय लेखक विविधज्ञानविस्तारांत लिहितो.—

वेद हे प्रत्यक्ष ईश्वराचे शब्द.—ते मंत्रद्रष्ट्या ऋषींनीं आपल्याला दिले आहेत. धर्माचें व आचारांचें, सर्व रहस्य वेदांत आहे. वेदांत नाहीं असें कांहींच नाहीं. अशी त्यांची निष्ठा होती. पण ही धर्माची गंगाजळी एकाच वर्गाच्या हातांत असावी ही गोष्ट मात्र त्यांना गैर वाटते. ईश्वर व माणूस यांमध्यें तिसऱ्या कोणाहि मध्यस्थाची गरज नाहीं. प्रत्येक व्यक्तीला-मग तो जन्मतः कोणत्याहि जातीचा असो—वेदाध्ययन करून तद्द्वारा ईश्वराची आराधाना करण्याचा हक्क आहे. वेदांचा अर्थ करण्याची वाटेल त्याला मुभा आहे. वेदांचा शास्त्रोक्त पद्धतीनें अर्थयुक्त अभ्यास करण्याचा प्रघात मोडल्यापासूनच आर्यधर्माच्या अवनतीस सुरुवात झाली. आजकाल आपले आचार वेदोक्त व शुद्ध अशा विधींनीं नियमित नसून अनेक मतांचीं व वेडगळ समजुतींची त्यांत भर पडली आहे. या वेडगळ समजुतींचें उच्चाटन करण्याचा खरा मार्ग म्हटला म्हणजे वेदांचें सार्वत्रिक व सार्थ अध्ययन हाच एक होय, असें स्वामीजी प्रतिपादीत.

वेदांची आतापर्यंतची सर्व भाष्यें व टीका या अगदीं कुचकामाच्या व टाकाऊ होत असें स्वामींचें मत होतें. महीधरानें तर जाणूनबुजून खोडसाळपणानें वेदांचा भलभलता अर्थ केला आहे, व सायनाचार्यांनीं असा प्रकार जरी केला नसला तरी तत्कालीन धर्ममतांची व रूढींची त्यांच्या मनावर पुरी छाप बसल्यामुळें त्यांचें भाष्यहि दोषपूर्ण व भ्रामक असेंच वठलें आहे, असें ते म्हणत वेदांचा अर्थ लावण्याचे कांहीं ठळक नियम आहेत. त्या नियमान्वयें अर्थ केला तरच तो बरोबर उतरेल, नाहीं तर कदापि नाहीं; व हे नियम माहीत नसल्यामुळें पूर्वीचे टीकाकार वहकले असा स्वामींचा कोटिक्रम होता. या नियमांपैकीं एक प्रमुख नियम प्रख्यात निरुक्तकार यास्काचार्यांनीं असा दिला आहे कीं वेदांतील सर्व शब्द यौगिक म्हणजे व्युत्पत्तिसिद्ध अर्थानीं योजलेले असतात. अर्थात् मूळ धातु, व त्यांना उपसर्ग वगैरे लागून जे फेरफार झाले असतील ते,यांच्या अर्थाला धरूनच वेदांचा अर्थ केला पाहिजे असें झालें. प्रख्यात व्याकरणकार पंतजलि याचेंहि मत असें असल्याचें सांगतात. पाश्चात्य पंडित मोक्षमुल्लर यांनींहि वेदांच्या कांहीं भागापुरतें हें तत्त्व मान्य केलें आहे. ते म्हणतात कीं, " वेदांतील बहुतेक शब्द आपल्या धात्वर्थाला थोडेबहुत तरी चिकटून असतात. एखाद्या पूर्णावस्थेस पोंचलेल्या भाषेप्रमाणें वेदांतील भाषा टणक बनलेली नसून ती फार लवचीक आहे. त्यांतील विशेषनामें सुद्धां सार्थ असतात. "

वरील तत्त्वाचा शब्दशः उपयोग करून स्वामी दयानंदांनीं आपलें भाषांतर केलें आहे. त्यामुळें किंत्येक सामान्य शब्दांचें दयानंदांनीं दिलेले अर्थ फारच नवीन-कांहीं तरी विक्षिप्तपणाचें-वाटण्यासारखे आहेत, उदाहरणार्थ, "देवता" या शब्दाचा अर्थ " वेदमंत्रामध्यें ज्या ज्या पदार्थांच्या गुणधर्माचें विवेचन केलेलें असेल ते पदार्थ " असा त्यांनी केलेला आहे, व हे पदार्थ म्हणजे काल, दिक्, शक्ति,आत्मा, कर्म वगैरे होत, असेंहि त्यांच्या एका शिष्यानें [ पंडित गुरुदत्त ] ठरविलें आहे.

अशा तऱ्हेच्या कित्येक प्रकाराबद्दल पाश्चात्य एतद्देशीय पंडितांनीं स्वामी दयानंदांवर खूब कडक टीका केली आहे; व ती बऱ्याच ठिकाणीं यथार्थ आहे. ( वि. पु. ४८ पृ.३९८)

वेदग्रंथासंबंधानें आर्यसमाजाचीं मतें येथवर सांगितलीं. आतां तत्त्वज्ञानासंबंधानें पाहतां सांख्यमत त्यांनीं मान्य केलें आहे. या पंथांत प्रकृति आणि पुरुष म्हणजे ' जडद्रव्य आणि ' आत्मा ' अशीं दोन पृथक तत्त्वें मानतात. देव, आत्मा आणि जडद्रव्य ह्या तिघांनां स्वतंत्र अस्तित्व असतें. हीं तिन्ही सनातन आहेत. मोक्ष मिळविणें हेंच प्रत्येक व्यक्तीचें ध्येय असून तें प्रत्येकानें स्वप्रयत्नानें मिळविलें पाहिजे असें आर्यसमाजाचें मत आहे. मोक्षाची पूर्ण तयारी करतां यावी म्हणून पुनर्जन्माची योजना केलेली आहे. कर्म कोणालाहि सुटत नाहीं, कर्म आणि पुनर्जन्म यांची व्यवस्था करणारा तोच ईश्वर होय, ईश्वर हा पृथ्वीवरील नियंत्रित राज्यकारभार करणाऱ्या राजासारखा आहे. म्हणजे ईश्वराच्या हातींहि अनियंत्रित सत्ता नसते, तर त्याची सत्ता आत्मा आणि जडद्रव्य यांच्या सनातन अस्तित्त्वामुळें मर्यादित झालेली असते.

धार्मिक समजुती आणि शास्त्रीय सिद्धांत यांच्यामध्यें युगानुयुग असलेला विरोध नाहींसा करण्याचा आर्यसमाजानें प्रयत्न केला आहे. वेदप्रणीत ज्ञान आणि सृष्टीचे नियम या मध्यें पूर्ण एकवाक्यता असून अद्भुत चमत्कार असा विश्वांत कोणताच नाहीं असें आर्यसमाज सांगतो.

नैतिक दृष्टया पाहतां आर्यसमाजाचें एक तत्त्व फारच आक्षेपार्ह आहे. हें तत्त्व नियोगासंबंधाचें होय. नियोग म्हणजे प्राचीनकाळचें " देवरात् सुतोत्पत्ती "चें तत्त्व नसून अधिक स्वैर स्त्रीपुरुषसंबंधाचेंच तत्त्व होय. सत्यार्थप्रकाशांत पुढील वाक्य आहे; ' एका पुरुषानें ( एका मागून एक ) अकरा स्त्रियांशीं संबंध केला आणि त्याचप्रमाणें एका स्त्रीनें नियोगपद्धतीनें अकरा पुरुषांशीं संबंध केला तरी त्यास हरकत नाहीं. ' नियोगासंबंधानें स्वामी दयानंदानें सांगितलेले नियम पुढील प्रमाणें आहेतः—

" आर्यसमाज पतिपत्नी जिवंत असलेल्यांनां त्याचप्रमाणें विधुर व विधवा यांना, खालील नियमानुसार नियोग संबंध करण्यास परवानगी देत आहेः—

१ जेव्हां पति किंवा पत्नी रोग किंवा इतर कांहीं कारणांमुळें प्रजोत्पादनास असमर्थ असेल.

२ जेव्हां पति कांहीं धार्मिक कारणांकरितां किंवा अध्ययनाकरितां किंवा द्रव्यार्जनाकरतां कांहीं ठराविक काळ घर सोडून गेलेला असेल,

३ जेव्हां पति किंवा पत्नी त्रासदायक किंवा कटुभाषण करणारीं असतील,

४ जेव्हां पत्नी वंध्या असेल किंवा विवाह झाल्यानंतर आठ वर्षांत मूल झालें नसेल,

५ जेव्हां झालेलीं सर्व मुलें अल्पायुषी असतील,

६ जेव्हां पत्नीला सर्व मुलीच झाल्या असतील,

७ जर पत्नी गर्भवती किंवा सतत आजारी असेल किंवा नवरा आजारी असेल, आणि दोघांपैकीं दुसऱ्यास भर ज्वानी असून आपला काम आंवरणें शक्य नसेल, तर अशा प्रसंगीं नियोगसंबंध करावा. अशा प्रकारची नियोगाची मोकळीक देण्याचीं दोन कारणें सांगण्यांत येतात;

( १ ) वंश चालण्याकरितां पुरुष संतति निर्माण करणें, आणि ( २ ) कामविकार अनावर झाल्यास त्याच्या उपशमाचा नीतिप्रणीत मार्ग मोकळा करून व्यभिचार, जारकर्म इत्यादि अनाचार बंद करणें. सत्यार्थप्रकाश म्हणतोः—" विवाहाप्रमाणें नियोगहि सार्वजनिक विधिपूर्वक आचरावा. " या सर्व वर्णनावरून असें दिसून येईल कीं. स्वामी दयानंदांचीं स्त्रीपुरुष संबंधविषयक मतें प्लेटोप्रमाणेंच चमत्कारिक होतीं

निदान या बाबतींत तरी दोघेहि प्रत्यक्ष अनुभवशून्य असे केवळ तत्त्वज्ञानाबरोबर वाहवणारे होते. असें डॉ. ग्रिस्वल्ड म्हणतो. आता येथें हेंहि नमूद करून ठेवणें जरूर आहे कीं, आर्य समाजाच्या अनुयायांना ही वरील नियोगपद्धति अमलांत आणण्याचें धाडस झालें नाहीं आर्यपत्रिकेचे ( २० सप्टेंबर १९०२ ) संपादक म्हणतात "या उच्च तऱ्हेच्या नियोगपद्धतीचा अवलंब करणारें एकहि उदाहरण अद्यापि झालेलें नाहीं, हें कबूल करण्यास आम्हांस फार दुःख वाटतें."

याखेरीज आर्यसमाजाचीं मतें म्हटलीं म्हणजे आर्यसमाज कट्टा एकेश्वरवादी आहे; पण कांहीं पुरुषांत अगर स्त्रियांत ईश्वराचा अंश इतरांहून अधिक असतो, अशीहि त्यांची समजूत आहे. स्तुति, प्रार्थना, उपासना, आचार व विचार हाच सर्वेश्वराच्या आराधनेचा खरा मार्ग होय असें दयानंदांचें मत आहे.

कर्म व पुनर्जन्म या दोहोंवर आर्यसमाजाची पक्की निष्ठा आहे. प्रत्येक कर्माचें—मग तें बरें असो अगर वाईट असो-फळ कर्त्यास भोगावें लागतें मग तें तत्काल लागो अगर लक्षावधी वर्षांनीं भोगावें लागो हें तर मान्य केलें म्हणजे आत्म्याचें अमरत्व व पुनर्जन्महि ओघानेंच येतात. श्राद्धपक्षाच्या स्वरूपाची पितृपूजा मात्र स्वामी दयानंदास मान्य नव्हती.

प्रत्येक आर्य समाजानें पुढें दिलेले पंचमहायज्ञ दररोज केले पाहिजेत अशी समाजाची आज्ञा आहे.

( १ ) ब्रह्मयज्ञः—यांत संध्या व स्वाध्याय यांचा समावेश होतो. स्वाध्याय म्हणजे नित्य नियमानें वेदांपैकीं कांहीं भाग वाचणें अथवा म्हणणें.

( २ ) देवयज्ञः— होम करून अग्नींत आहुती देणें. कोणत्याहि विधीस या प्रकारच्या होमाची जरूरी असतेच. आर्यसमाजीयांत या होमाचें महत्त्व फार आहे.

( ३ ) पितृयज्ञः—याचा अर्थ दयानंदांनी वडिलांची आज्ञा पाळणें व त्यांची सेवा करणें असा केला आहे.

( ४ ) अतिथि ( मनुष्य ) यज्ञः—एखाद्या विद्वान व निराश्रित अतिथीला अथवा संन्याशाला भोजन देणें; ब्रह्मचारी व संन्याशी यांचें पोषण करणें हें गृहस्थाचें कर्तव्यच आहे अशी आर्यावर्तांत प्राचीन कालापासून समजूत आहे तीस अनुसरूनच वरील नियम आहे.

(५) बलि( वैश्वदेव )यज्ञः—भोजनापूर्वी अंध, पंगु, वगैरे अनाथास अगर पशुपक्ष्यास थोडेबहुत अन्न देणें.

हिंदूंचे सोळा संस्कारहि आर्यसमाजीयांना मान्य आहेत. मात्र त्यांचें वेदकालीन साधें स्वरूप कायम ठेवून मागाहून त्यांत जीं अनेक अंगें शिरलीं तीं अजीबात वगळलीं आहेत. मूर्तिपूजेविषयीं आर्यांचा कटाक्ष असल्यामुळें संस्कारांतील जो भाग मूर्तिपूजेसारखा वाटला तो त्यांनीं कमी केला आहे. या सर्व संस्काराविषयींची माहिती दयानंदांनीं तयार केलेल्या संस्कारविधि नामक ग्रंथांत दिलेली आहे,

आर्यसमाजाचें ध्येय पुढील सर्वमान्य तत्त्वांवर बसविलें आहे. ( १ ) परमेश्वर हा सर्व जगाचा प्रेमळ पिता आहे व सर्व माणसें हीं त्याचीं मुलें असल्यामुळें त्यांनीं बंधुभावानें वागणें हें त्यांचें कर्तव्य आहे. ( २ ) स्त्री व पुरुष या उभयतांचा सामाजिक दर्जा सारखाच आहे. ( ३ ) व्यक्तीव्यक्तींचें व राष्ट्राराष्ट्रांचें परस्परांशीं वर्तन अत्यंत शुद्ध व न्याय्य असलें पाहिजे. कोणाहि एका व्यक्तीला त्याच्या गुणांनीं व कर्मांनीं जे हक्क मिळाले असतील तेवढे खेरीज करून निष्कारण इतरांहून श्रेष्ठ मानूं नये (४) भूतदया व औदार्य हीं प्रत्येकानें बाळगिलीं पाहिजेत. स्वामी दयानंदांनीं आपलीं धार्मिक मतें लोकांत पसरवून हिंदुस्थानची आणि जगाची सुधारणा करण्याकरितां एक स्वतंत्र संस्था स्थापून तिला 'आर्यसमाज' असें नांव दिलें. आर्य हा शब्द हिंदुस्थानांत अति प्राचीन काळापासून फार चांगल्या अर्थानें वापरण्यांत आला आहे. यामुळें हें नांव धारण करण्यानेंच एक प्रकारचा धर्माभिमान, देशाभिमान, व समाजाभिमान जागृत करण्याचा स्वामींचा उद्देश होता.

इ ति हा स.—स्वामी दयानंद मृत्यु ( १८८३ ) पावल्यानंतर या समाजासंबंधाची एक महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे त्याच्या दोन शाखा झाल्या. त्याचीं कारणें दोन आहेत. एक अन्नामध्यें मांसाचा समावेश करण्यासंबंधानें मतभेद व दुसरें उच्च शिक्षणासंबंधानें पाळावयाचें धोरण. पहिल्या फरकामुळें एका शाखेला मांसाहारी व दुसऱ्या शाखेला शाकाहारी अशीं नांवें पडलीं. व दुसऱ्या मतभेदावरून एका शाखेला कॉलेज पक्ष, व दुसऱ्या शाखेला महात्मा पक्ष किंवा पुराणमतवादी पक्ष अशीं नांवें पडलीं. या वादासंबंधीं खालील तडजोड निघाली असावी असें एके ठिकाणीं ( विविध ज्ञान विस्तार पु ४८ पृ. ३९९ ) म्हटलें आहे. 'धर्मप्रसाराच्या दृष्टीनें दयानंदांचीं मतें सर्वांस मान्य आहेत असें समजावयाचें पण नियमदशकाच्या पालनापलीकडे व्यक्तिस्वातंत्र्याला हरकत घ्यावयाची नाहीं, अशा अर्थाची ही तडजोड आहे. उदारमतवादी पक्षाचें लाहोर येथें 'दयानंद अँग्लोवेदिक' नांवाचें कॉलेज आहे. त्यांत आधुनिक पद्धतीचें बऱ्याच चांगल्या प्रकारचें शिक्षण देण्यांत येतें. उलटपक्षीं महात्मा पक्षाची हरिद्वार 'गुरुकुल' नांवाची शिक्षणसंस्था असून तेथें प्राचीन शिक्षणविषयक ध्येयानुसार शिक्षण देण्यांत येतें.

घ ट ना आ णि व्य व स्था.—आर्यसमाजाच्या स्थानिक, प्रांतिक आणि अखिल भारतीय अशा तीन सभा आहेत. स्थानिक समाजाचे सभासद पुढील अटींवर होतां येतें.

स भा स द हो ण्या च्या अ टी —( १ ) वर सांगितलेल्या दहा तत्त्वांवर पूर्ण श्रद्धा ठेवणें व स्वामी दयानंदांनीं वेदांचा अर्थ लावण्याकरितां ठरवलेल्या नियमावर विश्वास ठेवणें.( २ )समाजाच्या खर्चाकरितां आपल्या उत्पन्नाचा एक शतांश वर्गणी म्हणून–दरमहा किंवा दरसाल–देणें. ( ३ ) सभेला नियमितपणें हजर राहणें. ( ४ ) चांगली वर्तणूक ठेवणें. सभासद होण्यास वय निदान १८ असावें लागतें. हिंदू द्विज जातींपैकीं इसमास समाजांत प्रविष्ट करतांना कोणताहि विशेष विधि नसतो. परंतु ख्रिस्ती किंवा मुसलमानी इसमास एक प्रकारचा शुद्धि करणाचा विधि करावा लागतो. स्थानिक समाजाचे सभासद दोन प्रकारचे असतात. ( १ ) उमेदवार सभासद, यांना मताधिकार नसतो. ( २ ) कायम सभासद,यांना मताधिकार असतो. उमेदवारीचा काळ १ वर्षाचा असतो. शिवाय सहानुभुति बाळगणाऱ्या इसमांचा म्हणून एक स्वतंत्र वर्ग असतो. स्थानिक समाजाचे अध्यक्ष, उपाध्यक्ष, चिटणीस, खजिनदार, वाचनालयाचा व्यवस्थापक इतके अधिकारी असतात, व ते कायमच्या सभासदांनीं निवडलेले असतात. हीं सर्व अधिकाऱ्यांचीं नांवें धार्मिक स्वरूपाचीं नाहींत ही गोष्ट ध्यानांत घेण्यासारखी आहे. प्रांतिक सभा ही स्थानिक समाजानें निवडून दिलेल्या सभासदांची बनलेली असते. प्रत्येक स्थानिक समाजाला २० सभासदांस एक याप्रमाणें प्रतिनिधी पाठविण्याचा हक्क असतो; आर्यसमाजाचा कारभार याप्रमाणें चालतो.

बडतर्फी.—उत्पन्नाचा शतांश फीच्या रूपानें न देणाऱ्यास अगर दुर्वर्तन करणाऱ्या सभासदास तात्पुरतें किंवा कायमचें बडतर्फ करण्याचा अधिकार समाजास आहे.

ई श्व रो पा स ना.—आर्यसमाजाची धार्मिक उपासना आठवड्यांतून एकदां दर रविवारीं सकाळीं करण्यांत येते. या उपासनेला बराच म्हणजे ३-४ तास वेळ लागतो. उपासनेच्या जागीं व्यासपीठाजवळ वैदिक अग्नीची वेदि असते. उपासनेला आरंभ अग्नीला हवि अर्पण करण्यापासून होतो. त्यावेळीं मंत्र म्हणतात. नंतर स्वामी दयानंदांनीं केलेलीं प्रार्थनापर पद्यें म्हणण्यात येतात. मध्यंतरीं प्रवचन होतें. आणि अखेर आर्यसमाजांतील तत्त्वांचा उच्चार करून उपासना संपवितात. उपासनेला लागणारें साहित्य अग्नींत अर्पण करावयाच्या हविर्द्रव्याव्यतिरिक्त इतर अगदीं साधें असतें. धर्मोपाध्याय किंवा पुरोहित म्हणून कोणी स्वतंत्र धर्माधिकारी नसतो. उपासनेंतील प्रवचनादि मुख्य काम लायक सभासद आळीपाळीनें करतात.

का र्य प द्ध ति.—आर्यसमाजाचें काम करण्याची पद्धति हिंदुस्थानांतील मिशनरी सोसायट्यांच्या नमुन्याची आहे. आपल्या मतांचा उपदेश करण्याकरितां व सभासद मिळविण्याकरितां सार्वजनिक उपदेशपर व्याख्यानें, शिक्षण, जाहीर पत्रकें, वर्तमानपत्रें यांचा उपयोग करतात. उपदेशक दोन प्रकारचे असतात; ऑनररी आणि पगारी. पहिल्या प्रकारांत वकील, शिक्षक, डॉक्टर, असे उच्च धंद्यातले विद्वान इसम असतात. या आर्यसमाजाची उदारमतवादी उर्फ सुसंस्कृत शाखा शिक्षण प्रसाराकडे विशेष लक्ष देते आणि महात्माशाखा केवळ उपदेशात्मक कार्यावर विशेष भर देते. या प्रत्येक शाखेचीं अनेक हायस्कुलें, अनाथगृहें, वृत्तपत्रें, आणि मासिकें आहेत.

आं क डे वि ष य क मा हि ती:—आर्यसमाजाचे १९०१ सालीं ९२००० सभासद होते. हल्लीं ते लाखापेक्षां अधिक आहेत. सभासदांची शेंकडा ९८ संख्या पंजाब व संयुक्त प्रांतात आहे. शिवाय ब्रह्मदेश, ब्रिटिश ईस्ट आफ्रिका इत्यादि दूर ठिकाणीं ह्याच्या शाखा आहेत. लाहोर हें या समाजाचें मुख्य ठिकाण आहे. तथापि अजमीर येथें स्वामींचें देहावसान झाल्यामुळें व तेथें वैदिक छापखाना असल्यामुळें त्याठिकाणालाहि बरेंच महत्त्व आहे. अस्पृश्यवर्गाची उन्नति करण्याचें काम या समाजानें बरेंच केलें आहे. ख्रिस्ती व मुसुलमान इसम आपल्या समाजांत ओढून घेण्याचें काम आर्यसमाजानें केलें आहे. प्राचीन काळची चातुर्वर्ण्यव्यवस्था पुन्हां अमलांत आणण्याचा समाजाचा प्रयत्न चालू असून पुनर्विवाहास उत्तेजन आणि बालविवाहास बंदी करण्याचें काम समाज करीत असतो. तात्पर्य आर्यसमाजाचें मुख्य काम सामाजिक सुधारणा होय. सध्या स्वामी श्रद्धानंद हे शुद्धिचळवळीचे पुरस्कर्ते असून हें कार्य ते मोठ्या जोमानें चालवीत आहेत.

का म गि री—आर्यसमाजाची सर्वांत महत्त्वाची सामाजिक कामगिरी म्हणजे त्यानें चालविलेली शुद्धीची चळवळ होय. शुद्धि या शब्दाचा धात्वर्थ शुद्ध करणें, पवित्र करणें, प्रायश्चित्त देणें असा आहे. आर्यसमाजी तो शब्द याहून व्यापक अर्थानें वापरतात तो असाः—( १ ) हिंदुधर्मबाह्य अशा लोकांनां हिंदुधर्माची दीक्षा देऊन आर्यसमाजांत सामील करून घेणें; ( २ ) मूळ हिंदु असून परधर्माचा स्वीकार केलेल्या पण फिरून स्वधर्मांत प्रवेश करून घेऊं इच्छिणाऱ्यास पावन करून घेणें आणि ( ३ ) मागसलेल्या आणि अस्पृश्य मानल्या जाणाऱ्या जातींनां शिक्षण देऊन त्यांचा उद्धार करणें व त्यांनां आपल्या बरोबरीनें वागविणें. या तिन्ही गोष्टींचा शुद्धीकरणांत अंतर्भाव होतो. पण या कार्यापेक्षांहि आर्यसमाजानें आपल्या मागसलेल्या बंधूंचा उद्धार करण्याकरितां जी खटपट केली व त्यांत जें यश मिळविलें आहे तें अपूर्व होय. त्या उद्धारकृत्याचीं दोन अंगें आहेत. ( १ ) ज्या जातींनां यज्ञोपवीत धारण करण्याचा अधिकार नसून त्या नीच मानल्या जात असतील अशांनां तो अधिकार देऊन त्यांचें द्विजत्व मान्य करावयाचें व ( २ ) ज्या जाती आज कित्येक शतकें अस्पृश्य मानल्या जात असतील त्यांनां शिक्षण वगैरे देऊन त्यांची नैतिक व धार्मिक उन्नति करावयाची व शेवटीं त्यांनां आपल्या बरोबरीस आणून पोंचवावयाचें. हें काम आर्य-

समाजाच्या वेगवेगळ्या शाखांनीं व एवढ्याच कामापुरता आर्यसमाजाशीं संबंध ठेवणाऱ्या इतर संस्थांनीं मिळून चालविलेलें आहे पण यांत मुख्य भाग आर्यसमाजाचाच आहे.

या कामगिरीशिवाय आणखी महत्त्वाची कामगिरी ह्मणजे दुष्काळपीडानिवारणाची होय.

मुलांच्या शिक्षणासाठीं आर्यसमाजानें दोन आदर्शभूत पाठशाळा स्थापिल्या आहेत त्यांपैकीं एक लाहोर येथील दयानंद आंग्लो वेदिक कॉलेज हें सरकारी युनिव्हरसिटीस जोडलेलें आहे व दुसरें हरिद्वारचें गुरुकुल अगदीं स्वतंत्र आहे.

आर्यसमाजाच्या भवितव्याबद्दल भविष्य करणें कठीण आहे. इतकें मात्र खरें कीं तो प्रार्थनासमाज, ब्रह्मसमाज यांपेक्षां अधिक लोकप्रिय आहे. या तीन समाजांचा धर्माभिमान व देशाभिमान फार उज्वल असतो. शिक्षणप्रसार आणि सामाजिक सुधारणा या दोन साधनांनीं आधुनिक हिंदुस्थानची उन्नति घडवून आणण्याचें बरेंच श्रेय याला आहे. वर्णव्यवस्था आणि वेदग्रंथ यांचा अभिमान बाळगल्यामुळें या समाजाचा पुराणमतवादी हिंदु लोकांशीं फारसा विरोध येत नाहीं. तथापि पूर्वी उत्पन्न झालेल्या अनेक धार्मिकशाखा व पंथ याप्रमाणें हाहि हिंदुधर्मरूपी पुरुषाच्या उदरांत गडप होऊन जाईल किंवा स्वतंत्रपणें कायम राहील हें आज निश्चित सांगतां येत नाहीं.

आर्यसमाजाची स्थापना जरी प्रथम मुंबई येथें ( १८७५) झाली, तरी त्याचा फारसा प्रसार मुंबई इलाख्यांत झाला नाहीं. त्याचें कार्यक्षेत्र अखेरीस मुख्यतः पंजाब (संयुक्त प्रांत) हेंच ठरलें. सध्यां(१९११) या संप्रदायात २४३००० लोक असून यांची वाढ १९०१ पेक्षां अडीचपट झाली आहे. यापैकीं जवळ जवळ निम्मे मीरत, आग्रा व रोहिलखंड या विभागांत असून जवळ जवळ दोनपंचमांश पंजाबात आहेत. दयानंदसरस्वती वारले त्या वेळीं पंजाब व संयुक्त प्रांतात आर्यसमाजाच्या ३०० वर शाखा होत्या.

याशिवाय व्याख्याते वगैरे काम करीत असत. उपदेशकांचें काम सर्व प्रांतभर प्रचार करणें व शाखा तपासणें हें असतें. आर्यसमाजांत मुख्यतः मूळच्या सनातनधर्मीयांचाच भरणा असतो; पण बाटलेल्या व जन्मतः असलेल्या ख्रिस्ती व महंमदी लोकांचाहि अन्तर्भाव करून घेण्याची खटपट चालू आहे. स्वामी श्रद्धानंद यांनीं चालविलेली मलकाना रजपुतांस शुद्ध करून घेण्याची चळवळ तर प्रसिद्धच आहे. मोपलांनीं बाटविलेल्या हिंदु लोकांस शुद्ध करून घेण्याचीहि खटपट यांनीं केली. त्याचप्रमाणें मेघ वगैरे अस्पृश्य लोकांस स्पृश्य करून घेण्याची खटपट चालली आहे. बहार आणि ओरिसा प्रांतांतहि यांची सुमारें चार हजार संख्या आहे. राजपुतान्यांत सुमारें दोन हजार, अजमीर मेरवाडा, काश्मीर, मध्यप्रांत व वऱ्हाड यांत सुमारें प्रत्येकीं एक हजार आहे.

यांत फक्त चार वर्ण मानतात व ते जन्मतः ठरत नसून धंदा व वेदज्ञान यावरून ठरवितात. उच्च जातींचे लोक आर्यसमाजांत शिरले असतां आपली जात सोडीत नाहींत; पण हलक्या जातींचे लोक सोडतात. यांच्यांतील जातिबंधनें शिथिल होत चाललीं आहेत. परस्पर रोटीव्यवहार व बेटीव्यवहार यांचें प्रमाणहि वाढत आहे. हे बालविवाह निषिद्ध मानतात, विधवाविवाहास मान्यता देतात. अजून कांहीं ठिकाणीं आर्यसमाजी लोकांस सनातनधर्मी हिंदू समजत नाहींत; पण लवकरच ते हिंदूंत अन्तर्भूत होतील.

[संदर्भ ग्रंथ—चरित्रात्मकः—दि आटोबायॉग्राफी ऑफ दयानंदसरस्वती स्वामी ( थिऑसॉफिस्ट, आक्टो. व डिसें. १८७९ आणि नोव्हें. १८८०. मॅक्समुल्लर—दयानंदसरस्वती ( बायाग्राफिकल एसेज ) १८८४. जे. सी. ओमान—कल्टस, कस्टम्स अँड सुपरस्टिशन्स ऑफ इंडिया,१९०८; दि आर्यसमाज अँड इट्स फाऊंडर. पंडित लेखराम व लाला आत्माराम—महर्षि स्वामी दयानंदसरस्वतीजी महाराजका जीवनचरित्र १८९७. बाबा अर्जुनसिंग—दयानंदसरस्वती फाऊंडर ऑफ दि आर्यसमाज १९०१. बाबा छज्जुसिंग—दि लाईफ अँड टीचिंग्स ऑफ स्वामी दयानंदसरस्वती १९०३.

तात्त्विकः—ऋग्वेदभाष्य( हिंदी ), ऋग्वेदादि भाष्यभूमिका ( वरील ग्रंथाला प्रस्तावना ) व सत्यार्थप्रकाश. हे तिन्ही ग्रंथ दयानंदजींच्या हातचे असून आर्यसमाजावरचे प्रमाणभूत वाङ्मय समजण्यास हरकत नाहीं.

विवेचकः—पंडित खाकसिंग व एच. मार्टिन क्लार्क—दि प्रिन्सिपल्स अँड टीचिंग ऑफ दि आर्यसमाज १८८७. हेनरी फोर्मन—दि आर्यसमाज, इट्स टीचिंग्स अँड अॅन एस्टिमेट ऑफ इट १८९०. लाला रुचिराम शहाणी—दि नियोग डाक्ट्रिन ऑफ दि आर्यसमाज, लाहोर १८९७. देवसमाजाचे पंडित एस. एन. अग्निहोत्री—पंडित दयानंद अन्व्हेल्ड, एच. डी. ग्रिस्वल्ड—दि आर्यसमाज ( ट्रन्झॅक्शन्स ऑफ दि व्हिक्टोरिया इन्स्टिटयूट ३५. १९०३ ). इश्वरसरण—दि आर्यसमाज, इट्स प्रेझेंट पोझिशन ( हिंदुस्थान रिव्ह्यू डिसें. १९०७ ). ए हँडबुक ऑफ दि आर्यसमाज बनारस १९०६. वेदिक मॅगॅझिन अँड गुरुकुलसमाचार, पु. १, १९०७–८.

याशिवाय ए ब्रि. ए. रि. ए. एनसायक्लो. सोशल रिफॉर्म्स. वि. विस्तार पु. ४८. सेन्सस १९११ ]

**आर्यावर्तः**—उत्तर हिंदुस्थानचें प्रचारांतील नांव जें आर्यावर्त त्याचे रहिवाशी यांचा उल्लेख बृहत्संहितेंत आला आहे. ( ५. ६७. ) आर्यावर्ताचा अर्थ आर्य अथवा उत्कृष्ट अथवा उदार लोकांचें घर असा आहे. समुद्र गुप्ताच्या अलाहाबाद येथील शिलालेखांत याचा उपयोग उत्तर हिंदुस्थान दर्शवि-

ण्याकडे केला आहे मानवधर्मशास्त्रांत ( २. २२. ) पूर्व व पश्चिम समुद्रापर्यंत पसरलेला हिमालय व विंध्य पर्वत यांच्या मधील देश अशी आर्यावर्ताची मर्यादा दिली आहे. रामायणांत ( बालकांड सर्ग ३९ ) अशाच तऱ्हेचा मजकूर आहे. परंतु उत्तर व दक्षिण हिंदुस्थान यांच्या मधील स्पष्ट विभागणी राजशेखर कवीनें दिली आहे. हा कवि बालरामायणाच्या सहाव्या अंकांत ( वा. शि. आपटे यांचे राजशेखर. त्याचें चरित्र व लेख पा. २१ पहा ). " विंध्य पर्वतांत उगम पावून त्याच्या दक्षिणे लगत वाहणाऱ्या नर्मदा ( नर्बदा ) नदीला आर्यावर्त व दक्षिणापथ यांच्या मधील मर्यादा (विभागणी रेघ ) म्हणतो. "

**आर्लेकट्टी**—(मुंबई इलाखा.) धारवाड जिल्हा. कोडच्या उत्तरेस पांच मैलावरील एक लहानसें खेडें. येथें जुन्या कानडी लिपींतील तीन शिलालेख आहेत.( मुं. गॅ. २२ )

**आर्लेश्वर**—(मुंबई) धारवाड जिल्हा. हानगलच्या ईशान्येस पांच मैलांवर हें लहानसें खेडेगांव आहे. येथील कदंबेश्वराच्या देवळांत तीन शिलालेख आहेत. एक मूर्तीच्या दक्षिणेकडील खांबावर ( इ. स. १०७६ ); दुसरा (१०८८), देवळाच्या मगरकमानीवर, आणि तिसरा शिलालेख मुख्य देवळाच्या दरवाजासमोर असलेल्या खांबावर आहे, याचा काळ संशयित आहे. [मुं. गॅ. २२. ]

**आर्वी**, त ह शी ल.—या नांवाची वर्धा जिल्ह्यांत एक तहशील आहे. इ. स. १९११ च्या शिरगणतीप्रमाणें या तहशीलीची लोकसंख्या ११०५९५ होती. हल्लीं या तहशीलीचें क्षेत्रफळ ८९० मैल व काळींचें उत्पन्न १९८००० रुपये आहे. या तहशिलींत कापूस फार होतो व गुरेंहि चांगली पैदा होतात. पूर्वेकडील भाग पाहाडी असून पश्चिमेकडील नदीच्या किनाऱ्यावरील भाग फार सुपीक आहे. येथें १९० चौरस मैल जंगल असून बाकीची $\frac{3}{4}$ जमीन लागवडीस आणलेली आहे. [ म. प्रां. ग्या. १८७० व १९०८ पृष्ठ ७ व ३३२ ]

श ह र.—वर्धा जिल्ह्यांतील हें एक शहर पुलगांव आर्वी स्टेशनपासून रेल्वेनें २२ मैल आहे मराठी अमदानींत परगण्याचा कमावीसदार या ठिकाणीं कचेरी करीत असे. परंतु हल्लीं येथें तहशील असून पोलीस ठाणें आहे. हें गांव सुमारें तीनशें वर्षांपूर्वी तेलंगराव वलीनें बसविलें असें म्हणतात. याला हल्लीं सुद्धां तेलंगरावाची आर्वी म्हणतात. हिंदु लोक तेलंगराव हा हिंदु होता असें समजतात, व मुसुलमान लोक तो मुसुलमान होता असें म्हणतात. दोन्ही धर्मांचे लोक त्याच्या समाधीची पुजा करीत असतात. समाधीची जागा लोकांनीं पैसे खर्चून सुंदर बांधली आहे. लोकसंख्या ( १९११ ) ११,९,०२ या ठिकाणीं व्यापारी लोक पुष्कळ असून व्यापारहि चांगला आहे. या ठिकाणीं म्युनिसिपाल कमिटी इ. स. १८६७ मध्यें स्थापन झाली. या कमिटीचें उत्पन्न इ. स. १९०३–०४ मध्यें २७००० रुपये होतें. हें शहर भरभराटींत असून या ठिकाणीं कापसाचा मोठा व्यापार आहे. या ठिकाणीं सरकी काढण्याचे कारखाने ७ असून कापसाचे गठ्ठे बांधण्याचे कारखाने आहेत. येथें आठवड्यास गुरांचा बाजार भरतो. या शहरांत इंग्रजी शाळा, दवाखाना, पुस्तकालय व उत्तम धर्मशाळा हीं आहेत. [ म. प्रां ग्या. १८७० व १९०८ पृ. ६–७ ३३२–३३३. ]

**आर्ष्टिषेण**–( १ ) याचा युधिष्ठिराशीं संवाद झाला होता. (भार० वन० अ० १५९). तो असाः–पूर्वी कृतयुगांत अर्ष्टिषेण नामक द्विजोत्तम गुरुगृहीं राहून नित्य अध्ययनांत तत्पर असे. वेद अवगत झालें नाहींत तरी असें पाहून तो अगदीं वैतागून गेला व त्यानें मोठी तपश्चर्या केली. तिच्या योगानें त्यास वेदांचें उत्कृष्ट ज्ञान झालें. मग त्या ऋषिसत्तमानें सिंधुद्वीप तीर्थाला तीन वर दिले. " महानदीच्या ह्या तीर्थांत आजपासुन पुढें जो मनुष्य स्नान करील त्यास अश्वमेधाचें महाफल प्राप्त होईल. " " या पुढें येथें सर्पादिकांचा बाधा होणार नाहीं " आणि " या ठिकाणीं अल्पकाळांत पुष्कळ मोठें फल मिळेल " ( महाभारत शल्यपर्व अ. ४० )

**आर्ष्टिषेणः**—( २ ) याचा आश्रम हिमालयावर नरनारायणाश्रमासमीप होता. ( भार० वन० अ० १५६. याचा पिता ऋष्टिषेण होता.

**आर्सीकेरे**, ता लु का–(म्हैसूर,) हसन जिल्ह्यांतील उत्तरेकडचा तालुका. उ. अ. १३°५' ते १३°३३' व पू. रे. ७६°२' ते ७६° २६' यांमध्यें हा पसरला आहे. क्षेत्रफळ ४८६ चौ. मै. लो. सं. ८६२५१. आर्सीकेरे, बाणावर व हारनहल्ली हीं तीन शहरें व ३५४ खेडीं या तालुक्यांत आहेत. १९०३-०४ सालचा जमीन महसूल १६२००० होता. याचा पृष्ठभाग फार चढउताराचा आहे. पश्चिमेस डोंगरांची रांग आहे, उत्तरेस हिरेकलगुड्डाचे डोंगर आहेत; त्यांवर माले कल तिरुपतीचें देवालय आहे. दक्षिणेकडे बऱ्याच अमृतमहाल चराई जमीनी आहेत व त्याठिकाणीं गुरांची चांगली निपज होते. नाचणी सर्वत्र पिकते तर पश्चिम आणि दक्षिण भागीं विशेषतः मिरच्यांची चांगली लागवड दृष्टीस पडते. येथून बाहेर बंगलोर व बल्लारी बाजारांत उत्तम खोबरें रवाना होतें.

श ह र.— म्हैसोर रेल्वे व मद्रास सदर्न मराठा रेल्वे यांचे हें जंक्शन आहे. लो. सं. ( १९११ ) ३६८५०. शहराबाहेर उत्तरेकडे कांहीं जुनाट देवळें आहेत. येथून जवळच डोंगरावर विष्णूचें देवालय आहे; त्याला शेंकडो दगडी पायऱ्या चढून जावें लागतें. म्हैसूर हारनहल्ली ही सोन्याची खाण येथून ७ मैलांवर आहे. [ इं. गॅ. आर्नोल्ड गाईड वगैरे ]

**आर्सेनिक**—( ताल. प. भा. ७५ ). हें रासायनिक मूलद्रव्य प्राचीन लोकांनां गंधकिदाच्या रूपांत माहीत होतें.

ज्यांत आर्सेनिक सांपडतें अशा खनिज पदार्थांचा उपयोग किमयागार लोक तांब्यांवर पांढरा रंग चढविण्याकरितां करीत असत. आर्सेनिकमध्यें धातूसारखा एखादा पदार्थ आहे ही गोष्ट प्रथम आलबर्टस मॅग्नस यानें पुढें मांडली.

आर्सेनिक शुद्ध स्वरूपांत कित्येक ठिकाणीं सांपडतें; परंतु विशेषतः तें इतर धातूशीं व गंधकाशीं संयोगीस्थितींत-(मिश्र गंधकिदाच्या स्वरूपांत) आढळतें. खनिज आर्सेनिकाचा रंग पृष्ठभागावर जमलेल्या गंजामुळें, अंधुक करडा असतो पण तें कापल्यास आंत कथलासारखा पांढरा चकचकीत रंग दिसूं लागतो.

आर्सेनिकयुक्त लोखंड किंवा आर्सेनिकल पायराइटीं या पदार्थांमध्यें आर्सेनिक असतें. बाजारांत विकलें जाणारें आर्सेनिक, नैसर्गिक किंवा आर्सेनिकल पायराइटीपासून तयार केलेलें असतें. नैसर्गिक आर्सेनिकबरोबर कमजास्त मानानें दुसऱ्या धातू असतात. आर्सेनिकल पायराइटीपासून तयार करण्याकरितां तें मातीच्या ऊर्ध्वपातन यंत्रात घालून हवेचा संसर्ग न लागूं देता तापवितात; व ह्यामुळें बाष्पीभूत आर्सेनिक ग्राहकांत जातें व यंत्रांत लोह गंधकिद उरतें. पुढें आणखी शुद्धीकरण करण्याकरितां, त्यात कोळसा मिळवून त्याचें बाष्पीकरण करितात किंवा त्यात थोडेसें अद (आयोडिन) मिसळून तापवितात.

तालस प्राणिदाचें (आर्सेनियस ऑक्साइड) कर्बानें संस्करण केलें असताहि तें मिळतें. गंधकिदापासून विद्युच्छक्तीनेंहि आर्सेनिक तयार होऊं लागलें आहे.

आर्सेनिकचा रंग पोलादासारखा करडा असून त्याला धातुविशिष्ट चकाकी असते. बाष्पीकरणानंतर सावकाश पणें घनीभूत होतांना त्याचे अंज (अँटिमनी) व भौम (टेल्युरिम) सारखे समभुज विषमघनाकृति (ऱ्हांबोहेड्रा) स्फटिक बनतात; तें फार ठिसूळ असतें. त्याचें विशिष्ट गुरुत्व ५.३९५ ते ५.९५९ असतें. १००° श. उष्णतामानावर तें उडून जातें व मंद रक्तोष्णतेपर्यंत तापविल्यास त्याची लवकर वाफ होते. त्याचा रसांक ४४६° श. व ४५७° श. यांच्यामध्यें आहे. आर्सेनिकच्या वाफेचा रंग सोन्यासारखा पिंवळट असून त्याला लसणीसारखा वास येतो.

आर्सेनिकची वाफ कांचेच्या नळींत उज्जसारख्या एखाद्या उदासीन वायूंत घनीभूत केल्यास पिठूळ आर्सेनिक मिळतें. प्राणाच्या प्रवाहांत तापविल्यास आर्सेनिक जळूं लागून त्याचें त्रिप्राणिद बनतें. त्याच्या ज्योतीचा रंग लव्हेंडरच्या पानासारखा फिकट निळसर किंवा जांभळा असतो. तीव्र नत्राम्लाबरोबर तें तापविलें असतां त्याचें लवकर प्राणिदीकरण होऊन तालाम्ल (आर्सेनिक ॲसिड) बनतें, व तीव्र गंधकाम्लाबरोबर तापविल्यास आर्सेनिक त्रिप्राणिद तयार होतें. पातळ नत्राम्लाच्या योगानें फक्त तालसाम्ल (आर्सेनियस ॲसिड) मिळतें. हराच्या वातावरणांत आर्सेनिक जळल्यानंतर त्रिहरिद तापविल्यानंतर तें ब्रोमीन व गंधक यांशींहि संयोग पावतें; व अल्काबरोबर वितळविलें असतां तालितें (अर्सेनाइट्स) तयार होतात.

आर्सेनिक व त्याचे द्राव्य संयुक्त पदार्थ अत्यंत विषारी असल्यामुळें, आर्सेनिक शोधून काढण्याच्या कृती फार महत्वाच्या आहेत.

(१) आर्सेनिक व त्याचे संयुक्त पदार्थ राइन्शच्या परीक्षेनें सामान्यतः शोधून काढितां येतात. उदहराम्लानें अम्लीकृत अशा तालस (आर्सेनिअस) च्या संयुक्त पदार्थांच्या द्रावणांत तांब्याचा स्वच्छ पत्रा टाकिल्यास त्यावर करड्या रंगाचा थर बसतो. तो पत्रा कोरडा कांचेच्या नळींत तापविला असतां नळीच्या थंड भागावर आर्सेनिकचा पांढऱ्या रंगाचा रवेदार थर जमतो. हाच प्रयोग केला असतां अंजचा (अँटिमनी) रवेदार थर बसत नाहीं.

(२) फ्लाइट्मनची परीक्षाः—तालस (आर्सेनियस) संयुक्त पदार्थाच्या द्रावणांत शुद्ध पालाशउत्प्राणिदाचें (पोट्याशियम हायड्रेट) द्रावण मिसळून त्यांत शुद्ध जस्ताचा किंवा अल्युमिनमचा पत्रा टाकून तें तापवितात. रजत नत्रितानें (सिल्व्हर नायट्रेट) भिजविलेला कागद नळीच्या तोंडावर धरल्यानंतर, द्रावणात आर्सेनिक असेल तर तो कागद काळा होतो. हाच प्रयोग अंज (अँटिमनी) वर केला असतां कांहीं एक प्रतिक्रिया होत नाहीं.

(३) मार्शची परीक्षाः—ह्या परीक्षेंत तालस (आर्सेनियस) संयुक्त पदार्थाच्या द्रावणांत शुद्ध उदहराम्ल मिळवून तें मिश्रण शुद्ध व गंधकाम्ल यांच्या मिश्रणापासून उज्ज तयार करण्याच्या उपकरणांत ठेवतात. नंतर शिशाच्या सिरकितांत बुडविलेला कागद व सोडालाईम ठेवलेल्या नळींतून व नंतर एका अरुंद नळींतुन ह्या तयार झालेला तालिकृत (आर्सेन्युरेटेड हायड्रोजन उज्ज) नेऊन शेवटीं पेटवितात; व ज्योतींत प्लातिन (प्लाटिनम) चा किंवा चिनी मातीचा थंड तुकडा धरतात. आर्सेनिकमुळें ह्या तुकड्यावर काळा डाग पडतो. अंज (अँटिमनी) च्या योगानें मिळणारा थर सिंधुउपहरिताच्या (सोडियम हायड्रोक्लोराइडच्या) द्रावणांत लवकर द्रवतो. प्रथम आर्सेनिकचा पदार्थ न ठेवतां नुसता उज्ज जाळून पहावा. कारण उज्ज तयार करण्याकरितां घेतलेल्या पदार्थांत आर्सेनिक असण्याचा संभव असतो. त्याच प्रमाणें नत्राच्या अस्तित्वामुळें हा प्रयोग नीट होत नाहीं ही गोष्ट लक्षांत ठेवणें जरूर आहे.

औ प धि वि ज्ञा न. (फार्मॅकोलॉजी).—ताल (आर्सेनिक) व त्याच्या संयुक्त पदार्थांपैकीं तालस अम्ल (आर्सेनियस ॲसिड) (डोस $\frac{1}{60}$ – $\frac{1}{15}$ ग्रेन.) व त्यापासून केलेलें ताललिस (आर्सेनिकॅलिस–फाउलरचें द्रावण) हे पदार्थ फार उपयोगांत येतात. कोंवळ्या कातडीवर लाविलें असतां

तालसाम्ल ( आर्सेनियस ॲसिड ) फार दाह करतें. पोटांत घेण्याचें प्रमाण अत्यंत सूक्ष्म नसल्यास, आर्सेनिकचे सर्व पदार्थ पोटांतील आंतड्यावर फारच क्षोभकारक परिणाम करितात. तें थोड्या प्रमाणांत दिल्यास उत्तेजक असून जठरांतील रस वाहण्याला मदत करितें. त्याचें रक्तांत शोषण ताबडतोब होतें. कांहीं प्रकारच्या रक्तक्षयांत याच्या योगानें रक्तगोलकांची संख्या ( रेडकॉर्प्यूस्कल्स ) व रंजक द्रव्याचें ( हीमोग्लोबीन ) प्रमाण वाढतें. हें औषध कांहीं काळपर्यंत घेतल्यास रोग्यामध्यें दिसून येणारा फरक कसा होतो हें नीट कळत नाहीं. तें मुख्यतः मूत्रामधून व कांहीं प्रमाणांत, पोषणनलिकेंतून घाम, लाळ, दूध अश्रू, केस वगैरेंतून निघून जातें पण थोडेसें यकृत आणि मूत्रपिंड यामध्येंहि साठविलें जातें.

भे ष ज प्र क र ण.—(थेरॅप्युटिक्स ) शरीरावरील रोगट वाढीचा नाश करण्याकरिता अडाणी वैद्य तालस अम्लाचें मलम किंवा द्रावण लावीत असत. त्या योगानें तेथील कातडी जळून जाऊन वाढ लवकर कमी होई. परंतु पुष्कळ वेळा आर्सेनिक आंत शोषलें जाऊन रोग्याच्या अंगात भिनल्यानें अपाय घडलेले आहेत. अग्निमांद्यावर याचा उपयोग होतो. परंतु कांहीं रोग्यांना हें औषध सहन होत नसल्यामुळें, प्रथम अत्यंत सूक्ष्म प्रमाणात घेऊन नंतर हळू हळू तें प्रमाण वाढवावें लागतें. सामान्यपणें मोठ्या माणसापेक्षा मुलास तें अधिक मानवतें. अनशेपोटीं हें केव्हाच देता कामा नये; नेहमीं पोटभर जेवणानंतर द्यावें. कांहीं प्रकारच्या रक्तक्षयांवर लोहापेक्षां याचाच जास्त उपयोग होतो. हींव (मलेरिया) तापानंतर होणारी मज्जातंतुव्यथा किंवा रक्तक्षय, संधिवातामुळें होणारा दाह, पटकी ( कॉलरा ), दमा व पडसें या रोगावर याचा चांगला उपयोग होतो. जलपेटिका, खरूज वगैरे त्वग्रोगांनांहि यापासून फायदा होतो. पण फार दिवसपर्यंत उपयोग केल्यास पुन्हां व्रण होण्याची भीति असते. कधीं कधीं कांहीं लोक आर्सेनिक खाण्याची सवय करितात. त्यानें वजन, शक्ती व तोंडाची रुची वाढते असें म्हणतात. याचें कारण त्यांच्या अंगांत ॲंटीटॉक्सिन नांवाचें द्रव्य तयार होत असावें.

वि ष वि ज्ञा न.—आर्सेनिक विषाचा सामान्य उपयोग तालस अम्ल किंवा पांढरें आर्सेनिक या स्वरूपांत केला जातो. तें पिठासारखें पांढरें असल्यामुळें पुष्कळ वेळां चुकीनें घातक परिणाम घडून येतात. शिवाय त्याला रंग किंवा चव नसल्यामुळें (विषप्रयोग करण्याकरितां ) तें अन्नावरोबर मिसळून सहज देतां येतें. पालाश ( पोटॅश ) किंवा सिंधु ( सोडा ) यांशीं मिसळून त्याचें माशा मारण्याच्या कागदाला लावण्याकरितां लुकण तयार करितात. हे कागद पाण्यांत बुडविले असतां तीव्र द्रावण मिळतें. या गोष्टीचाहि कधीं कधीं दुष्कृत्यें करण्याकडे उपयोग केला जातो. ताम्रतालिता (कॉपर आर्सेनाइट—शीलचा हिरवा रंग )चा उपयोग भिंतीच्या कागदांना किंवा कापडाला रंग देण्याकडे केला जात असे, व त्यापासून विषप्रयोग झालेले आहेत. धातुरूप आर्सेनिक बहुधा विषारी नाहीं, परंतु पोषणनलिकेंतून जातांना त्याचें प्राणिदीकरण होतें. व नंतर विषप्रयोगाचे परिणाम दृग्गोचर होऊं लागतात.

रिकाम्या पोटीं तीव्र द्रावण पोटांत गेल्यास त्याचे परिणाम जलद म्हणजे १० मिनिटें किंवा त्यापेक्षांहि कमी वेळांत दृग्गोचर होऊं लागतात; पण तेंच औषध घनरूपांत व पोट भरल्यानंतर घेतल्यास ते १२ तासानंतर किंवा त्यापेक्षां जास्त वेळानें दिसतात. परंतु सामान्यपणें ही मुदत अर्ध्यातासापासून एक तासपर्यंत असते. प्रथम घसा बसल्यासारखें वाटून नंतर मडका होऊं लागतो. लवकरच अनावर वांत्या होतात, व कांहीं वेळानें जुलाब होतात. त्याचा रंग प्रथम मळासारखा असतो. परंतु पुढें तो भाताच्या पेजेसारखा होऊन रक्तहि पडूं लागतें. रोग्याला अतिशय तहान लागते पण ती तहान भागवितां येत नाहीं. कारण प्यालेलें पाणी पोटात न रहाता पडून जातें. रोगी गळून जातो, त्याचा चेहरा सुकतो व कातडें ओलसर व निळें होतें. नाडी मंद व अनियमित चालते आणि श्वासोच्छ्वास करण्याला कष्ट पडतात. पोटातील दुःख कायमच असतें व त्याच्या जोडीला हातापायांत गोळे येऊं लागतात. केव्हां केव्हां मरणाच्या अगोदर बेशुद्धि येते परंतु सामान्यपणें शेवटपर्यंत शुद्धि कायम रहाते. हीं चिन्हें पटकी ( कॉलऱ्या) च्या चिन्हासारखींच आहेत, परंतु संशय असल्यास मलादि उत्सर्गांची म्हणजे सप्तमला( सेक्रीशन्स )ची परीक्षा करून तो फेडून घेण्यास हरकत नाहीं. क्वचित प्रसंगीं सर्व विष मज्जा तंतूंत एकवटल्यामुळें पोटांतील आंतड्यांवर त्याचे परिणाम फारच सूक्ष्म किंवा मुळींच दिसत नाहींत. यावरील उपचार म्हणजे, रबराच्या नळीनें पोट धुवून साफ करावें, व वांतिकारक औषधहि द्यावें, शक्य असल्यास लोह उज्जिताचा साका पाण्यांतून द्यावा तो मिळेपर्यंत मग्न ( मॅग्नेशिया ), एरंडेल, किंवा ऑलिव्ह तेल द्यावें. किंवा यापैकीं कांहींहि व मिळाल्यास लागेल तितकें थंड पाणी देत जावें. रोग्याची ग्लानी दूर करण्याकरितां अंगावर गरम कपडे घालून ऊन पाण्याच्या बाटल्यांनीं शेकावें, व दारू,इथ(ईथर)किंवा कुचलिन ( कुचल्याच्या बियांचा अर्क = स्ट्रिक्नाइन ) हे पदार्थ टोंचून अंगांत घालावें. अफूचा सत्वांश ( मॉर्फिआ ) अंगांत टोंचून घातल्यानें दुःख हलकें होतें.

कधीं कधीं थोड्या प्रमाणांत पुष्कळ काळापर्यंत आर्सेनिक शरीरांत शोषलें जातें. त्याचीं पहिलीं चिन्हें म्हणजे जठरांत थोडा बिघाड होणें, तोंडाची रुची जाणें, चैन नसणें, व नंतर पोटशूळ, पापण्यांचा दाह व अंगावर फोड येणें हीं होत. परंतु पुढें मागें ज्ञानेंद्रियांत बिघाड होऊन, चक्कर येणें, मुंग्या येणें, व स्पर्शज्ञानहानि हे विकार होऊन परिघस्थ मज्जातंतुदाह होतो. पुढें विकृत मज्जा फार नाजूक बनून

अमोषणक्षय होतो. शेवटीं कातड्यावर रंग येण्याचा संभव असतो. बरें होण्याची क्रिया फार सावकाश चालते, व मृत्यु आल्यास तो हृदयाची क्रिया थांबल्यामुळें येतो.

शीघ्रपरिणामी ( अक्यूट) विषानें मृत्यु आल्यानंतर, पोट अतिशय फुगलेलें असतें, व श्लेष्मलत्वचेचा रंग, काळसर तांबड्या रंगापासून चकचकीत हिंगुळी रंगापर्यंत निरनिराळा असतो; व ती सुरकुतलेली असते. बहुधा आंतल्या बाजूस रक्तस्राव होतो पण रक्त बाहेर क्वचितच येतें. पोषणनळीच्या बाकीच्या भागांतील सूज कमी असते. शरीराच्या बहुतेक सर्व भागांत आर्सेनिक सांपडतें पण यकृत आणि मूत्रपिंड यांत तें सर्वांत जास्त प्रमाणांत सांठविलें जातें. आर्सेनिकानें विषप्रयोग झालेला असल्यास आर्सेनिक शोधून काढण्याकरितां शक्य असल्यास रोग्याच्या लघवीचें पृथक्करण करून "राइन्शेची" किंवा "मार्शची" परीक्षा करितात.

हिंदुस्थानच्या बाजारांत तीन तऱ्हेचें आर्सेनिक विकतें. ( १ ) सफेत सोमल, ( २ ) हरताळ व ( ३ ) मनशीळ. सफेत सोमल म्हणजेच तालकाम्ल ( आर्सेनियस ॲसिड ) होय. हरताळ ( ऑरपिमेंट )चे दोन प्रकार आहेत. त्यांपैकीं एक दुसऱ्यापेक्षां जास्त विषारी असतो. विषारी हरताळावर चकाकणारे खवले असतात. हरताळ हा रंग, लाखेच्या कांड्या, व खेळणीं इत्यादि वस्तू तयार करण्याकडे उपयोगांत आणतात. मनशीळ, ( तालसगंधकिद–रिअलगार ) कुमाऊनमधील मुनसिआरी, चित्रळ, उत्तर ब्रम्हदेश व युनान यांतून येतें.

हरताळ स्वात व काशगारमधून पेशावर येथें येतो. हिरातमधून कंदाहार येथें हरताळ जातो. ब्रह्मदेश व चीन देशांमधूनहि तिन्ही तऱ्हेचें आर्सेनिक येतें. १८९७–१९०३ च्या दरम्यान आर्सेनिकची वार्षिक सरासरी निर्गत ३३४ हंड्रेडवेट व आयात २३४६ हंड्रेडवेट होती १९०६–७ सालीं याची निर्गत १०६ हंड्रे. असून त्याची किंमत २२३३रु. व आयात १९२५ हंड्रे. असून तिची किंमत ४४१९६ रु. होती. पंजाबमध्यें माणसांना विष घालून मारण्याकडे सफेत सोमलाचा उपयोग फार करितात. १९०४ च्या पूर्वी विषप्रयोगांतील शेंकडा ५० मृत्यू आर्सेनिकचे असत. १९०४ सालीं याबद्दल कायदा झाल्यापासून या गोष्टीला कांहींसा आळा बसला आहे.

[ संदर्भ ग्रंथ—अनालिस्ट, १९००, २६; १९०२, २७. ( थोर्प ) जर्नल ऑफ दि केमिकल सोसायटी, १९०३, ८३. जर्नल ऑफ सोसायटी ऑफ केमिकल इंडस्ट्री, १९०२ २१. वेटेन्डोर्फ—अनालीन. वॅट. बिट्रानिका. जिऑ. सर्व्हे ऑफ इंडिया ३२. पंजाब ॲन्युएल रिपोर्ट १९०२. तलीफ शेरीफ ( प्लेफेअरचें भाषांतर ). भिषग्विलास पु. १२, यांत आर्सेनिकविषयीं पुष्कळ मराठींत माहिती आहे. ]

**आलकरी,** व स्तीः—खानदेश, अहमदनगर व नाशीक यांतील आलकरींना श्रावगी व गोलालारे असेंहि म्हणतात. यांची संख्या १९०१ सालीं ३१३ ( १४२ पुरुष व १७१ बायका ) भरली. हे मुख्यतः खानदेशांत आढळतात. शिवाय अहमदनगर, नाशीक, व सातारा जिल्ह्यांतूनहि कांहीं थोडे लोक वस्ती करून राहिले आहेत. या जातीसंबंधीं खानेसुमारीचे आंकडे बरोबर नसतील, कारण यांतील पुष्कळसे रजपुतांत गणिले जाण्याचा संभव आहे, कां कीं आलकरी म्हणवून घेण्यापेक्षां या जातीला रजपूत म्हणवून घेणें जास्त आवडतें. आपण रजपूत असून, मुसलमानांनीं चितोड घेतल्यावर छळ चुकविण्याकरितां दक्षिणेंत आलों, असें हे आपणासंबंधीं सांगतात. यांच्यांतील रजपूत चालींचे अवशेष म्हणजे फक्त लग्नमंडपांत उभारावयाचा माणकस्तंभ ( माणकाचा खांब ) होय. तथापि गुजराथेंतील केडवा व आंजणा कुणब्यांत लग्नांतहि "माणेकस्तंभ" उभारण्याची चाल आहे. चितोडची भवानी अद्याप यांची कुलदेवता आहे. दक्षिणेस वस्तीस आल्यावर पोटासाठीं या लोकांनीं आळेंत्याच्या झाडापासून तांबडा रंग तयार करण्याचें काम हातीं घेतलें; व त्यांच्या धंद्यावरून त्यांना आलकरी हें नांव मिळालें असें ते मानतात. या जातींत एक जैन वर्ग आहे, तो मांसाशन, विधवाविवाह व घटस्फोट त्याज्य मानतो. या जैन पोटजातीवरून श्रावगी या संज्ञेची उपपत्ति लागते; कारण एखाद्या जातींतील जैनवर्गाला श्रावक असें म्हणतात. गोलालारे हें नांव गलियार ( गुजर्थेतील नीळ—रंगाऱ्यांची जात ) या जातिनामावरून पडलें असावें.

या जातींत खारोवाव आणि मिथोब नांवाच्या पोटजाती आहेत अशी एक माहिती मिळते. दुसऱ्या एका माहितीवरून पाहातां कच्छवासी, मालाबंजारी आणि ज्याफलोंड अशा तीन पोटजाती आलकऱ्यांत आहेत; पण तिसरी आणखी एक माहिती म्हणजे, आलकरी व लोधी आलकरी हे दोन वर्ग असून त्यांच्यांत रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. गोत्रांसारखी बहिर्विवाही कुलें पुढील होत. भंडारी, गरोडे, हाटोडिया, कुराटिये, निगोटे, पचलोर, पाचरतन, परिधे, पवग्ये रायटोर, शियाडिया, तिरोले आणि तेलव. एकाच कुलांत व चारपांच पिढ्यांतील नातलगांत लग्नें होत नाहींत. या जातींतल्या मनुष्याला आतेबहिणीस मावसबहिणीशीं किंवा मामेबहिणीशीं लग्न करता येत नाहीं. बायकोच्या बहिणीशीं तिच्या हयातींत किंवा ती मेल्यावर लग्न करितां येतें. दोघा भावांनीं दोघी बहिणीशीं लग्न करण्यास मुभा आहे. अनेक बायका करण्याची मोकळीक आहे.

बालविवाह व त्याचप्रमाणें प्रौढविवाह होतात. कांहीं जणाकडून अशी माहिती मिळते कीं, लग्नापूर्वी एखाद्या मुलीकडून जर व्यभिचार घडला तर त्याकडे दुर्लक्ष करण्यांत येतें;पण ती गरोदर राहिली तर मात्र तिला बहिष्कृत करण्यांत येतें. तिचा जार जर त्याच जातींतील असला तर त्याला दंड करितात, किंवा ज्ञातीला जेवण

घालण्यास लावितात. या संबंधांतली दुसरीकडून मिळणारी एक माहिती अशी की, सजातीय किंवा उच्चजातींत मनुष्याशीं जारकर्म करणारी मुलगी आपल्या केसाची एक बट कापून, एखादें व्रत आचरून आणि दंड देऊन किंवा ज्ञातिभोजन घालून जातींत राहूं शकते. नीच जातींतील मनुष्याशीं जारकर्म करणाऱ्या मुली बहिष्कृत केल्या जातात.

मुलाचा बाप लग्नाची मागणी घालतो. त्याला दोनशें रुपयांपर्यंत हुंडा देऊन मुलीच्या बापाचा हात ओला करावा लागतो. ब्राह्मण ज्योतिषी लग्नमुहूर्त ठरवितो. कांहींचें म्हणणें याच्यांत जातींतील वडील माणसें लग्न संस्कार चालवितात, तर दुसऱ्या कांहींचें असें म्हणणें पडतें कीं, पंडितजी ( ब्राह्मण भिक्षुक ) लग्न चालवितो. लग्नांतील मुख्य संस्कार येणेंप्रमाणें:—

(१) सगाई, सायखडा किंवा साखरपुडा—लग्नापूर्वी थोडे दिवस हा वाङ्निश्चय होतो. मुलाचा बाप इष्टमित्रांसह मुलीच्या बापाच्या घरीं जाऊन, मुलीला एक साखरपुडा व रुपया देतो. त्याचप्रमाणें मुलीचा बाप मुलाला रुपाया व साखरपुडा नजर करितो. दोन्ही घरीं गोड जेवण होतें, व हा समारंभ उरकतो.

(२) मा ग णी, किं वा कुं कु ला व णें.—यांत मुलाचा बाप मुलीला दागिने व वस्त्रें देतो. तसेंच मुलीच्या बापाकडून मुलाला आहेर होतो; व दोन्ही घरीं मेजवान्या होतात.

(३) ते ल ह ळ दी चा स मा रं भ.—पहिल्यानें मुलाला तेलहळद लावून मग मुलीला लावितात. सुवासिनी पानानें डोक्यावर तेल शिंपडून, नंतर वर अक्षता टाकितात. मग अंगाला हळद लाविण्यांत येते.

(४) ल ग्न मं ड प घा ल णें—लग्नापूर्वी चार पांच दिवस अगोदर नवरीच्या दाराशीं एक मांडव उभारतात, आणि त्यांत एक आंब्याचा वासा पुरून तो हळदीनें माखतात. या खांबाला माणकस्तंभ म्हणतात. लग्नांतील सर्व विधी या खांबाशी होतात.

(५) सी मां त पू ज न—गांवाच्या सीमेवर मुलीच्या बापानें, नवरदेवाचें स्वागत करावयाचें असते.

(६) रु ख व त—मुलीकडून मुलाच्या घरीं फराळाचे जिन्नस नेण्यांत येऊन ते त्याच्या आईला वाढतात.

(७) भा त भ र णें—मुलगा मुलीच्या गांवीं आल्यानंतर दुसऱ्या दिवशीं, त्याचा मामा त्याला व त्याच्या नातेवाईकांना आहेर करतो; नंतर मेजवानी होऊन मुलाकडील मंडळी बागेंत राहावयास जातात. तेथें एक दोन दिवस राहिल्यावर, मुलीचा बाप आहेर घेऊन येतो व वरपक्षाला मिरवीत गांवांत घेऊन जातो.

(८) ल ग्न— नवरामुलगा लग्नमंडपाजवळ आल्यावर डोक्यावर पाण्याच्या घागरी घेतलेल्या पांच सुवासिनी त्याला सामोऱ्या येतात. तो प्रत्येक घागरींत एकेक चांदीचें नाणें टाकितो, व मांडवाच्या दाराशीं बांधलेल्या आंब्याच्या तोरणावर काठीनें प्रहार करितो. नंतर माणकस्तंभाची पूजा होते; नवरानवरी एकमेकांचे गळ्यांत हार घालितात व पांचवेळां माणकस्तंभाभोंवतीं प्रदक्षिणा घालितात; या प्रदक्षिणेच्या कृत्याला 'चवरीभवरी' म्हणतात.

कांहींजण असें सांगतात कीं, गाड्यांचे चार जू चौकोनाकृती मांडून त्यांत वाळू भरतात. या वाळूवर होम होतो व नवरानवरी होमाच्या अग्नीला पांच प्रदक्षिणा घालितात.

लग्न बंधनकारक केव्हां होतें याबद्दल निरनिराळीं मतें आढळून येतात. नवरानवरीनें एकमेकांच्या गळ्यांत हार घालणें, मांडवाच्या दाराशीं बांधिलेल्या तोरणावर प्रहार करणें, चवरीभवरी, व होमाभोंवती प्रदक्षिणा घालणें,या चार गोष्टींपैकीं अमुक एक गोष्ट झाली असतां लग्न कायदेशीर झालें असें मानणारे चार पक्ष आहेत.

विधवांनां पुनर्विवाह करण्याची मोकळीक आहे. कुमारी म्हणून ज्याच्याशीं तिला लग्न करितां आलें असतें अशा कोणाहि माणसाशीं विधवेनें लग्न करावें. वर्षाच्या कोणत्याहि महिन्यांत अमावास्या सोडून एखाद्या काळोख्या रात्रीं विधवाविवाहाचा समारंभ करितां येतो. विवाहेच्छु विधवा व तिचा भावी पति पाटावर शेजारीं शेजारीं बसतात; विधवेला मळवट भरण्यांत येऊन त्या दोघांच्या वस्त्रांना गांठ देतात, म्हणजे त्या दोघांचें लग्न झालें. जर प्रथमवराला विधवेशीं लग्न लावावयाचें झालें तर प्रथम त्याचें आंगठीशीं लग्न लावितात.

बायकोशीं पटत नसलें तर, किंवा तिची वर्तणूक वाईट असली तर नवऱ्यानें तिला सोडचिठ्ठी द्यावी. विधवाविवाहाच्या पद्धतीनें सोडचिठ्ठी मिळालेल्या बायकोला पुन्हां लग्न करितां येतें. असें म्हणतात कीं, ज्याला अशा बाईशीं लग्न करावयाचें असेल त्याला तिच्या पहिल्या नवऱ्याकडे कांहीं रक्कम पोंचवावी लागते. एखाद्या बाईनें स्वजातीयाशीं किंवा उच्च जातीयाशी व्यभिचार केला तर दंड देऊन किंवा ज्ञातीला एक जेवण घालून तिला आपल्या जातींत राहतां येतें जर नीच जातींतील मनुष्याशीं हें कर्म केलें तर मात्र ती जातिभ्रष्ट होते. ही जात हिंदुवारसाचा कायदा पाळिते.

आलकरी शैव आहेत. कांहीं वारकरी व रामदासी पंथाचे आहेत असें म्हणतात. चितोडची भवानी त्यांची कुलदेवता आहे. मंगळवारीं भवानीला बकरीं व पक्षी अर्पण करून उपासक खातात. शिवाय, चैत्र व श्रावण महिन्यांतील सोमवार खेरीज करून सर्व वारीं भवानी व खंडोबा यांना बळी अर्पण करितात. हे लोक सर्व हिंदूसण पाळितात, व हिंदूंच्या सर्व यात्रेच्या ठिकाणी जातात. माघ महिन्याच्या अष्टमी किंवा नवमीला 'चक्रपूजा' नांवाचा सण असतो. त्या दिवशीं सोळा प्रकारच्या धान्याचें एक वर्तुळ करून त्यांत एक पिठाचा दिवा ठेवितात, याजवळ मद्यमांसाचा नैवेद्य ठेवितात. या पूजेच्या वेळीं अन्य जातींतील माणसांनां

हजर राहण्याची परवानगी नसते. ज्यांना लढाईत किंवा आकस्मिक रीतीनें मृत्यु आला असेल अशा माणसांच्या नांवानें "वरि" स्थापून, त्यांची देवांप्रमाणें पूजा करितात. आणि लग्नाच्या व इतर समारंभाच्या वेळीं त्यांना मिरवीत नेतात. जेव्हां एखादी रोगाची सांथ उद्भवते तेव्हां तिच्या अधिष्ठात्री म्हणून मानलेल्या देवतेची बकरीं अथवा पांखरें बळी देऊन आराधना करण्यांत येते; व कांहीं ठिकाणीं सांथीनें पछाडलेल्या गांवाभोंवतीं तूप किंवा दारू ओतण्यांत येते. मुसुलमान साधूंनाहि हे लोक भजतात. या जातीचे आचार्य म्हणजे गोवासी होत. शंकराचार्यांनाहि धर्मगुरु मानण्यांत येतें.

विवाहित मृतांना अग्नि देण्यांत येतो. अविवाहित मृत, देवी, कोड, कॉलरा व सर्पदंश यामुळें मृत पावलेलीं माणसें आणि ज्यांचें जावळ केलें नाहीं अशीं मृत मुलें उत्तरेकडे डोकें करून पुरण्यांत येतात. मेल्याच्या तिसऱ्या दिवशीं हाडें व राख भरून तीं पाण्यांत टाकितात. ज्यांना अनुकूलता असेल ते तीर्थाच्या ठिकाणीं अस्थी नेऊन तेथें पवित्रोदकांत सोडून देतात. अकराव्या किंवा तेराव्या दिवशीं ज्ञातीला भोजन घालतात श्राद्धसंस्कार करितात. आकस्मिक मृत्यु आला असतां मृताच्या स्मरणार्थ वीरांची स्थापना करितात.

या जातीचा मूळ उद्योग आल ( मोरिंडा सिट्रिफोलिया ) झाडाच्या मुळापासून तांबडा रंग तयार करण्याचा असे. पण कृत्रिम रंग अस्तित्वांत आल्यापासून हा धंदा बुडाला व बरेचसे आलकरी शेतकरी व मजूर बनले. कांहीं रयतवारी पद्धतीनें जमीनी करितात. कांहीं थोडे सरकारी नोकरींत आहेत. हे लोक बकरीं, शेळ्या, पाखरें, हरिणें व मासे खातात व दारू पितात. [खा. गॅ. एथ्नोग्रॅ. सर्व्हे ८६]

**आलंड बेटें**—बोथ्नियाच्या आखाताच्या मुखाशीं स्वीडनपासून २५ मैल व फिनलंडपासून १५ मैल अंतरावर जो एक द्वीपसमूह आहे त्यास आलंड बेटें असें नांव आहे. हा द्वीपसमूह फिनलंडच्या एका प्रांताचा भाग असून त्यांतील ३०० बेटांपैकीं फक्त ८० बेटांवर वस्ती आहे व बाकीचीं खडकाळ आहेत. हीं बेटें पूर्वी स्वीडनच्या मालकीचीं होतीं. व १७१४ मध्यें रशियाच्या पीटर दि ग्रेटच्या आरमारास स्वीडनच्या आरमारावर येथेंच जय मिळाला. १८०९ मध्यें तीं रशियास जोडलीं गेलीं. त्यांचें एकंदर क्षेत्रफळ १४२६चौ. किलोमीटर असून लोकसंख्या १९००० आहे. त्यांतील बहुतेक वस्ती आलंड बेटावर असून तेथील मेरिहेम नांवाच्या शहराची लोकसंख्या ११७१ आहे. लोक स्वीडिश जातीचे असून उत्तम खलाशी आहेत. बेटांवरील प्रदेश वालुकामय असून जमीनी उथळ व हवा कडक आहे. तरीहि स्कॉच, फर, स्प्रस व बर्च यांची तेथें उत्पत्ति होते. राय व बार्ली जातीचें धान्य, जवस व भाजीपाला विपुल तयार होतो. गुरांची जोपासना मोठ्या प्रमाणावर असून दहीं, लोणी, कातडीं व खारें मांस यांचा व्यापार चालतो. येथें अनेक चांगलीं बंदरें असून तेथील समुद्र थोडा काळ गोठत असल्यामुळें त्यांनें रशियास एके काळीं बरेंच महत्त्व होतें.

हीं स्टॉकहोम बंदर व बोथनियाचें आखात यांच्या वाटेवर असल्यामुळें, जेव्हां रशियाला हीं बेटें जोडलीं गेलीं त्या वेळीं नुसतें स्वीडनचेंच नव्हे तर ग्रेट ब्रिटनचेंहि नुकसान होऊं लागलें, म्हणून १८५४ मध्यें क्रिमीअन युद्धांत आंग्लो फ्रेंच सैन्यानें बोमरसंडची तटबंदी उध्वस्त करून टाकली, व १८५६ तील इंग्लंड, फ्रान्स व रशिया यांच्या 'ऑलंड कन्व्हेन्शन' नांवाच्या तहांत, आलंड बेटांत तटबंदी करूं नये व तेथें लष्करी अगर आरमारी ठाणें ठेवूं नये असें ठरविण्यांत आलें, व १८५६ च्या पॅरिसच्या तहांत तेंच कायम झालें. यानंतर १९०६–७–८ मध्यें या प्रश्नावर थोडा वाद उपस्थित झाला होता व रशियाला जरी१८५६चा ठराव लांछनास्पद वाटत होता तरी त्याच्यानें स्पष्ट व कायदेशीरपणानें हा प्रश्न त्यावेळीं पुढें आणण्याचें धाडस झालें नाहीं.

१९१५ सालीं रशियानें जेव्हां तटबंदी करण्याचें काम सुरू केलें तेव्हां स्वीडनला कांहीं वर्षांपासून वाटत असलेली धास्ती खरी ठरली. १९१७ च्या रशियन राज्यक्रांतीमुळें तर आलंडनें कोणाचें स्वामित्व पत्करावयाचें हा प्रश्न उपस्थित झाला. पुढील वर्षी आलंडर्सनीं स्वीडनच्या राजाकडे आपला स्वीडनमध्यें समावेश करण्याविषयीं अर्ज केला तेव्हां स्वीडनच्या राजानें स्वतंत्र झालेल्या फिनलंडशीं वाटाघाट करून ठरवूं अशी आशा दाखविली व बोल्शेविकांविरुद्ध कांहीं लष्करी मदतहि पाठविली. त्याच सालीं फिनलंड व जर्मनी यांमध्यें झालेल्या तहांत आलंडला तटबंदी करूं नये असें ठरलें.तथापि स्वीडनशीं निगडित होण्याच्या आलंडर्सच्या इच्छेविरुद्ध फिनलंड सरकार असून, आलंड हा फिनलंडचा एक स्वतंत्र प्रांत करण्याचें त्यांनां आमिष दाखून, आलंडला स्वराज्य देण्याचाहि १९२० सालीं ठराव केला. पण यापूर्वीच आलंडर्स रशियाच्या सक्तीच्या लष्करी नोकरीला कंटाळले होते; त्यांनीं स्वयंनिर्णयाच्या तत्त्वावर भर देऊन युनायटेड स्टेटस, ग्रेट ब्रिटन वगैरे राष्ट्रांकडे तक्रारीअर्ज पाठविला. १९१९ सालीं आपलें म्हणणें पॅरिसमधील वरिष्ठ कौन्सिलापुढें मांडलें. तहपरिषदेनें त्यांचा अर्ज फेटाळला तेव्हां राष्ट्रसंघाकडे त्यांनीं धांव घेतली. आलंडचा प्रश्न खाजगी असल्यानें राष्ट्रसंघाच्या कक्षेंत येत नाहीं असें फिनलंड जोराजोरानें प्रतिपादित राहिलें. उलट आलंडर्सनीं आपण स्वीडनशीं कसें एक रूप आहों, फिनलंड आपणाशीं कसें विसदृश आहे या तऱ्हेची कैफीयत राष्ट्रसंघाला सादर केली; त्यांत स्वयंनिर्णयावर विशेष जोर दिला होता. १९२१ च्या जून महिन्यांत राष्ट्रसंघानें असा निकाल दिला कीं, आलंड बेटें फिनलंडकडे राहावीं पण लष्करीदृष्ट्या त्यांनां स्वतंत्र ठेवावें व राज्यकारभाराच्या बाबतींत त्यांना पूर्ण स्वायत्तता द्यावी.

[ आधार ग्रंथ—डॉ. व्हर्नर सोडरबर्गचा नॅशनल रिव्ह्यू एप्रिल १९०८मधील लेख. हॅन्डबुक—हिस्टारिकल सेक्शन फॉरिन ऑफिस नं. ४८ ( आलंड आयलंड्स ).'दि आलंड क्वेश्चन अॅन्ड दि राईट्स ऑफ ' फिनलंड ( १९२० ) ' यांत फिनिश बाजूचें म्हणणें कळेल. ए.त्रि. ]

**आलवाका**—याच नांवाच्या जमीनदारीचें हें गांव व मुख्य स्थान होय. ही जमीनदारी उत्तर गोदावरी जिल्ह्यांत आहे. हें गांव गोदावरीच्या कांठीं असून डुम्मागुडमपासून ४० मैल उत्तरेस आहे. जमीनदारीचा नायब या ठिकाणचा मुख्य अधिकारी असून तो याच ठिकाणीं राहतो.या ठिकाणीं जवळच्याच पहाडावर मोडकळीस आलेलीं लेणीं आहेत. [ म. प्रां. ग्या. पृ. २ ]

**आलमपूर**—एक संस्थान ( काठेवाड ). लोकसंख्या ५९८ ( १८८१ ). याच्या दक्षिणेस धोलका रेल्वे जंक्शन व उत्तरेस चार मैलावर निंगाला स्टेशन आहे. ( मुं. गॅ. )

**आलवखाव**—(पूर्वबंगाल आणि आसाम). ठाकूरगांव विभागांतील बालिया नामक खेडेंगांवीं दरवर्षी रसपौर्णिमेचे दिवशीं भरत असलेल्या मोठ्या जत्रेस हें नांव आहे. उ. अ. २६° १८' व पू. रे. ८८° २१'. जत्रेत देवास (कृष्णास) कोरड्या भाताचा नैवेद्य दाखवितात म्हणून हें नांव पडलें आहे. जत्रा सुमारें १५ दिवस असून सुमारें ८५००० लोक त्याप्रीत्यर्थ येथें जमतात. त्यावेळीं मुख्यतः गुरांचा बाजार भरतो. ( इं. गॅ. '५–१९०८ )

**आलवार तिरुनगरी** –( मद्रास इलाखा. ) तिनवेल्ली जिल्हा श्रीवैकुंठम् तालुक्यांतील एक गांव. तिनवेल्ली गांवाच्या आग्नेयीस २१ मैलांवर ताम्रपर्णी नदीच्या दक्षिण तीरावर आहे. उ. अ. ८° ३७' पू. रे. ७७° ५७'. लोकसंख्या ( १९११ ) ६८२०. वैष्णवपंथांतील तम्मालवार नामक साधूची ही जन्मभूमि आहे. त्याचें एक मोठें देऊळ बांधलें असून तो ज्या झाडाखालीं ध्यानास बसत असे तें झाड देवळांत अद्यापि दाखवितात. वार्षिक जत्रा फेब्रुआरी व मे महिन्यांत भरते. स्थानिक तंटे बखेडे पंचायतीनें मोडले जातात. (इं. गॅ. )

**आलसेस–लारेन**–जागतिक युद्धानंतर या नांवाचा प्रांत आतां अस्तित्वांत नाहीं. फ्रॅंको–जर्मन युद्धानंतर १८७१ मध्यें बीस्मार्कनें हा प्रांत फ्रान्सचे तीन डिपार्टमेंट ( जिल्हे ) बास–ऱ्हिने, हॉद–ऱ्हिन, व मासेले हे एकत्र करून बनविला व जर्मन साम्राज्यास जोडला. पण येथील लोक जातीनें फ्रेंच असल्यामुळें जागतिक युद्धानंतर फ्रान्सनें हे जिल्हे आपल्या राज्यांत सामील केले. त्यावेळीं तेथील लोकांना अवर्णनीय आनंद झाला. पण ४०–५० वर्षांच्या जर्मन अमलामुळें येथील लोकांच्या चालीरीती फार बदलल्या असल्यामुळें फ्रेंच कायद्याचा अम्मल येथें पुन्हां सुरू करतांना फ्रेंच सरकार फार सावधगिरीनें एका जनरल कमिशनरच्या मार्फत कारभार चालवीत आहे. त्याला मदत करण्याकरितां पसतीस सभासदांचें एक सल्लागार मंडळ स्थापण्यांत आलें आहे.

हा प्रांत फार सुपीक आहे. येथें गहूं, राय, बार्ली, ओट, बटाटे व शुगर–बीट हीं पिकें होतात. खनिज संपत्तीहि येथें विपुल आहे. विशेषतः लोखंड व कोळसा येथें फार सांपडतो. जर्मनीनें १९१३ सालीं लोखंड २११३३६७२ टन आणि कोळसा ३७९५२६२ टन काढला. तेव्हांपासून मात्र हीं दोन्ही खनिज द्रव्यें कमी कमी प्रमाणांत सांपडत असून १९११ सालीं लोखंड ७१३७२०६ टन आणि कोळसा २३१०५८९ टन सांपडला. या शिवाय तेल, पोटॅश वगैरे पदार्थहि सांपडतात

१९१९ मध्यें येथें स्ट्रॉसबर्ग युनिव्हर्सिटी स्थापण्यांत आली व हल्लीं सर्व शिक्षण फ्रेंच भाषेमधून दिलें जातें.

**आलाजुएला**— हा मध्य अमेरिकेंतील कोस्टा-रिकांतील एक प्रांत व त्या प्रांताची राजधानी. हें ट्रॅन्सकॉन्टि-नेंटल रेल्वेवर आहे. लोकसंख्या ( १९०४) ४८६०. हें शहर पोआस ज्वालामुखीच्या दक्षिण पायथ्याशीं वसलेलें आहे. शहराच्या मध्यभागीं पंचरस धातूच्या कारंजानें सुशोभित केलेला चौकोन आहे. आलाजुएला कोस्टारिकाच्या साखरेच्या व्यापाराचें केंद्र असून कॉफीच्या व्यापाराचेंहि मुख्य ठिकाण आहे. या प्रांतांत गौतुसॉस इंडियनांच्या प्रदेशाचा समावेश होतो. अॅटनास. ग्रेथिआ, नाराञ्जो व सॅनरॅमान हीं शहरें, व अॅटेनासचे उत्तरेस असलेल्या ॲग्वाकेट येथील सोन्याच्या खाणी ह्याच प्रांतांत आहेत.

**ऑलिंथस**—हें एक ग्रीस मधील प्राचीन शहर असून टोरोन आखाताचें माथ्यावरील सुपीक मैदानांत वसलें आहे. ग्रेसीअन लोकांची बॉटीईअनस म्हणून एक पोटजात होती तिचे ताब्यांत ऑलिंथस हें इ. स. पूर्वी ४७९ पर्यंत होतें, त्या वर्षी इराणचा सेनापति आर्टाबाझस यानें येथील लोकांचा संहार करून हें शहर चालसिस प्रांताच्या ग्रीक लोकांच्या स्वाधीन केलें. इ. स. पूर्वी ४३२ या वर्षापासून या शहराचें महत्त्व फार वाढलें. हें पूर्वी डेलीअन संघांत केवळ सभासद या नात्यानें सामील होतें परंतु पुढें तें चालसीडिक संघाचें नायक या नात्यानें वावरूं लागलें. इ. स- पूर्वी ३८२ या वर्षी स्पार्टानें ऑलिंथसवर स्वारी केली तेव्हां त्याला हा संघ मोडणें भाग पडलें. मॅसिडोनचा फिलिफ व अथेन्स यां मध्यें ज्या वेळीं युद्ध उपस्थित झालें त्या वेळीं ऑलिन्थस हें प्रथम फिलिफच्या वतीनें लढलें पण पुढें लगेच त्यानें अथेन्सशीं तह केल्यामुळें इ. स. पूर्वी ३४८ त फिलिपनें तें धुळीस मिळविलें. याप्रमाणें ऑलिंथसचा मोड होण्याचें कारण ऑलिंथस संघांतील सभासदांचा तीव्र मतभेद हें होय. कांहींच्या मतें संयुक्तसत्ता ही उत्तम होती तर कित्येक स्वतंत्रसत्तेचे अभिमानी होते. अशा प्रकारें मतभेद माजून शेवटीं फिलिपच्या सैन्यापुढें ऑलिंथसला हार खावी लागली. [ संदर्भग्रंथः—इ. ए. फ्रीमन–हिस्टरी ऑफ फेडरल

गव्हर्नमेंट प्र. ४; ए. एच् जे. ग्रीनिज—हँडबुक ऑफ ग्रीक कॉन्स्टिटयूशनल हिस्टरी. ]

**ऑलॅंपसः**—ग्रीस मधील अनेक पर्वतांचें हें नांव आहे. या नांवाचा अतिशय विख्यात पर्वत म्हटला म्हणजे थेसली व मॅसिडोनिया यांचे सीमेवरील होय. या पर्वताच्या सर्वांत उंच शिखराची उंची १०,००० फूट आहे, व तें वर्षांतून बहुतेक नेहमीं हिमाच्छादित असतें. आरकेडिआचे नैर्ऋत्येस असलेल्या लायकेअस पर्वताच्या शिखराला देखील ऑलिंपस असें म्हणतात.या पर्वताच्या शिखरावर देव रहात असत असें ईलीअडमध्यें वर्णन आलें आहे.

**ऑलिंपिआ**—हें ग्रीसमधील एक शहर असून अफाली-असच्या उत्तर तीरास व अर्वाचीन पिरगॉसच्या पूर्वेस ११ मैलांवर आहे. याच्या पश्चिमेस क्लाडिअस, दक्षिणेस आल-फीअस, उत्तरेस लहान टेंकड्यांची रांग व पूर्वेस प्राचीन प्रसिद्ध क्रिडांगण आहे. येथील नैसर्गिक सौंदर्य फारच बहारीचें आहे.

ऑलिंपिआ शहराचा इतिहास धार्मिक व राजकीय या दोन्ही दृष्टींनीं महत्त्वाचा आहे. या ठिकाणीं जो क्रीडोत्सव साजरा करण्यांत येत असे त्याविषयीं निरनिराळ्या प्रकारच्या दंतकथा अस्तित्वांत आहेत; त्यांतील कांहींवरून पाहतां हा उत्सव हेरॅक्लीज यानें सुरू केला. या ठिकाणीं हिरा या देवतेचें एक देवालय होतें. या उत्सव प्रसंगीं या देवतेच्या अंगांत घालण्याकरितां सोळा बायका मिळून एक आंगरखा तयार करीत असत. धांवणें, उड्या मारणें, दांडपट्टा कुस्ती, घोडादौडी, इत्यादि प्रकारचे खेळ खेळले जात व जो कोणी जय मिळवील त्याला बक्षिस दिलें जाईल.

या क्रीडोत्सवाचा उद्देश मन आणि शरीर हीं सारखीं कमावलीं पाहिजेत, ही ग्रीक कल्पना जगजाहीर करणें हा होय. इ. स. नंतर ३९३ या वर्षापासून हा क्रीडोत्सव बंद पडला. इ. स. नंतर पांचव्या शतकांत या शहराच्या ऱ्हासाला सुरुवात झाली. इ. स. नंतर ४७६ या वर्षी झूसचा पुतळा कॉन्स्टान्टिनोपलला नेण्यांत येऊन अग्नीचे भक्ष्यस्थानीं देण्यांत आला. झूसचें देऊळ या पूर्वीच गॉथ लोकांनीं किंवा ख्रिश्चन धर्मवेड्यांनीं जमीनदोस्त करून टाकिलें होतें; परंतु इ. स. नंतर ६ वे शतकांतील धरणीकंपांनीं तर तें पुरेंच लोळविलें.

जर्मन शोधकांनीं येथील जागा शोधून काढून प्राचीन इतिहास उपलब्ध करून ठेविला आहे. झूसची मूर्ति ज्या ठिकाणीं असे त्या जागेच्या भोंवतालील प्रदेशास आलटीस असें म्हणत या आलटिसचे वायव्य कोपऱ्याला एक मल्ल भूमि सांपडली आहे व बाहेरील बाजूस सभागृह आहे. आंतील भागांत झूस, व हीरा, यांची देवालयें असून पुष्कळ प्रकारचीं यज्ञस्थानें आहेत. खेळांचे सार्वराष्ट्रीय सामने यूरोपांत आतां होतात त्यांस "ऑलिंपिक" असेंच नांव दिलें आहे. या खेळांत हिंदुस्थान भाग घेतें.

**ऑलिव्ह**.—या झाडाचा उल्लेख बायबलांत पुष्कळ वेळां आला असून त्याचें मूलस्थान सीरिया देश असावें असें वाटतें. पश्चिम आशियांतील उष्ण प्रदेशांत ऑलिव्हचें तेल फार उपयुक्त वाटल्यामुळें रानटी लोकांतहि तें प्रसिद्धि पावलें, इतकेंच नव्हे तर ऑलिव्ह हें झाड शांतता व सदिच्छा यांचें द्योतक बनलें. प्राचीन जलप्रलयांतून परमेश्वरानें तारलेल्या नोव्हालाहि प्रथम ऑलिव्ह झाडाचीच फांदी दिसली असें बायबलांत सांगितलें आहे. त्यामुळें जलप्रलयोत्तर शांततेचें चिन्ह ठरलेलें हें झाड पुढेंहि ख्रिस्ती जगानें शांततेचें निदर्शक मानण्याचा परिपाठ पाडला. इलियड काव्यावरून पाहतां होमरच्या काळामध्येंहि ऑलिव्ह तेल श्रीमंतांच्या चैनीचा पदार्थ गणलें जात असे. प्राचीन ग्रीसमध्यें या झाडाची लागवड इतकी वाढली होती कीं, तिजवर कायद्यानें नियंत्रण घालणें सोलनला भाग पडलें. ग्रीकांपासून रोमन साम्राज्यांत व त्यामुळें आधुनिक यूरोपांत या झाडाचा फैलाव झाला.

या झाडास लॅटिनमध्यें ऑलिआ यूरोपिआ किंवा यूरोपांतील तैलोत्पादक वृक्ष असें नांव आहे. या झाडाच्या फळांच्या तेलाचा यूरोपमध्यें फार मोठा व्यापार होतो. कारण पाश्चिमात्य देशांत याचा खाण्याकडे व औषधांत उपयोग होतो. ह्या झाडाच्या सुमारें ३० जाती आहेत. व बहुतेक भूमध्य समुद्राचें कांठापासून तों दक्षिणआफ्रिका व न्यूझीलंडपर्यंत या झाडाची व्याप्ति आहे. हीं झाडें जंगलांत आढळतात. जंगली झाडें फार उंच वाढत नाहींत त्यांच्या फांद्यांस कांटे असतात. पानें लांबट असून वरच्या बाजूनें करड्या रंगाचीं व अणकुचीदार असतात. व कोंवळेपणीं पानाचे खालचा रंग पांढुरका असतो. फुलें लहान पांढरें रंगाचीं असून जंगली झाडाचें फळहि लहानच असतें. फ्रान्स, इटाली, स्पेन, इत्यादि देशांत याची लागवड करण्याकडे लोकांचें बरेंच लक्ष लागलें आहे. ह्या झाडाची वाढ फार मंदगतीनें होते. परंतु वाढीस फारसा प्रतिबंध न झाल्यास व हवापाण्याची अनुकूल परिस्थिति असल्यास कधीं कधीं हीं झाडें फार उंच होऊन यांचा घेरहि फार मोठा होतो. डी कां डोल यानें एक झाड पाहिलें. त्याचा घेर २३ फूट होता व तें झाड सुमारें ७०० वर्षांचें असावें असा त्याचा अजमास आहे. इटलीमध्येंहि कांहीं झाडें फार पुरातन काळचीं आढळतात. अफगाणिस्तानामध्यें सुद्धां हीं झाडें सांपडतात. ग्रीसमधून आशियामध्यें या झाडाचा फैलाव झाला.

प्राचीन काळापासून यूरोपखंडांतील लोकांस तें माहीत होतें असें दिसतें.

आपल्या हिंदुस्थान देशांत आलिव्ह झाडाची एक जात पैदा होते तिचें नांव ओलिया कॉस्पिडार. हें झाड सरळ वाढतें व फांद्याहि वाकड्या तिकड्या जात नाहींत व या झाडाचा विस्तारहि बराच होतो. ह्याच्या पानाचा रंग हिरवट

असून पानाचे पाठीचा रंग पांढुरका असतो. हीं झाडें ज्या ठिकाणीं ६०° पासून ९०° पर्यंत उष्णता असते अशाच प्रदेशांत येतात. फळें पिकल्यावर गोळा करून त्यांचें तेल काढतात. तेल काढण्यास फार आयास पडत नाहीं. पिकलेलीं फळें आणून तीं एकांवर एक रचून ठेविलीं म्हणजे त्यांच्या एकमेकांच्या भारानें तेल तळाशीं जमतें. या रीतीनें निघालेल्या तेलास फार स्वाद असतो. याप्रमाणें एकदां तेल निघालें तरी फळांत पुष्कळ तेल शिल्लक असतेंच. तें काढण्याकरितां एका मोठ्या परातींत पहिलीं फळें टेवून त्यावर मोठा थोरला दगड दडपण ठेवितात. त्याच्या योगानें फळांतील बहुतेक तेल निघून येतें. हें तेलहि पहिल्या तेलासारखेंच स्वादिष्ट असतें. नंतर तीं फळें एका पोत्यांत भरून त्यांवर आधणाचें पाणी ओततात, आणि त्यावर पुनः दगडाचें दडपण ठेवून तेल काढितात. हें तेल पहिल्या व दुसऱ्या खेपेच्या तेलासारखें स्वच्छ नसतें. त्याचा रंग पिंवळट असून त्यांत थोडी हिरवटपणाची झांक मारते. फळांच्या चोथ्यांत अद्यापिहि तेलाचा अंश शिल्लक असतोच. तो काढण्याकरितां हा चोथा पुनः कुटून एका भांड्यांत चांगला उकडतात, व तेल दाबून काढतात.

हें तेल फार गुणकारी असून त्याचा लोण्यासारखा किंवा मलईसारखा खाण्याकडे व स्वयंपाकांत उपयोग करितात. त्याचा दिव्यांतून जाळण्याकडेहि उपयोग होऊं शकतो. घरगुती कामाकरितां हें तेल चिनीच्या किंवा कांचेच्या बरण्यांत भरून ठेवितात व बाहेर पाठवावयाचें असल्यास लांकडी पिंपांत भरून पाठवितात. १०० शेर फळापासून १० शेर तेल निघतें असा अजमास आहे.

**ऑलिव्हज-टेंकडी**—अलिव्हज टेंकडी अथवा आलिव्हेट ही एक लहान टेंकडी असून जेरुसलेमच्या पूर्वेस टेंपलमाऊंटच्या समोर आहे. सध्याचें नांव जैबलएत–तुर आहे. या टेंकडीचे निरनिराळे असे चार भाग आहेत अगदीं दक्षिण टोंकाकडच्या भागाला दंतकथेवरून 'पापगिरी' असें नांव आहे. ह्याच टिकाणीं सालोमनची प्रतिमापूजा होत असे. उत्तर शिखराला (चुकीनें)खरा आलिव्हेट म्हणतात. त्याच्या अलीकडच्या टेंकडीला 'स्कोपस' नांव देखील चुकीचें आहे. नव्या करारांत ह्या नांवाच्या उल्लेख आला आहे. या टेंकडीवर ख्रिस्तानें मृत्यु वगैरे विषयांवर उपदेश केला. कान्स्टन्टाईननें येथें एक 'सदेहस्वर्गारोहणमंदिर' बांधिलें होतें. सध्याची इमारत नवी असून मुसलमानांच्या ताब्यांत आहे. टेंकडीच्या थोड्या खालच्या बाजूस प्रवक्त्यांच्या कबरी आहेत. खलिफ उमरचें नांव असलेलें एक प्रार्थनामंदीर "स्वर्गारोहणमंदिरा" जवळ पूर्वी होतें. १९०७ मध्यें जर्मन सम्राज्ञीचे आश्रयाखालीं यात्रेकरूंसाठीं एक मठ स्थापन करण्यांत आला.

**ऑलिस.**—बिओशिया प्रांतांतील युरोपस वरील एक जुनें शहर. व्हाथी या गांवाच्या जवळ असून चालसिसच्या दक्षिणेला तीन मैलांवर आहे. ट्रोजन युद्धापूर्वी ग्रीक आरमार येथूनच निघालें असें म्हणतात. याच ठिकाणीं आरटेमिसचें देवालय होतें.

**आलुप**—आलुप, आलुव किंवा आलुक बनवासीच्या ईशान्येस असलेल्या इ. स. च्या सहाव्या सातव्या शतकांतील एक जुनें राज्य ( जी जोव्हो डुब्रेल. एन्शंट हिस्टरी ऑफ दि डेक्कन ). बदामी जवळील महाकूट येथील अंकित लेखांत डॉ. भांडारकर यांनीं आपल्या अर्ली हिस्टरी ऑफ दि डेक्कन पुस्तकांत (इ. स. १८८४) मलबार किनाऱ्यावरील अलु पै नांवाच्या गांवाचा वरील नांवाशीं संबंध दिसतो असें सुचविलें होतें, व डॉ. बुह्लरनेंहि आलुप हें समुद्र किनाऱ्यावरीलच गांव आहे असें म्हटलें होतें ( इं अँ. पु ५,पृ. ३२० टीप. ). परंतु या विधानांस मला कांहीं आधार दिसत नाहीं असा यावर फ्लीटनें शेरा मारला आहे. ( बॉ. गॅ. व्हॉ. १, भाग २, पृ. ३०९ )

बदामी जवळील महाकूट येथील स्तंभलेखावरून (इं. अँ. पु. १९ पृ. ७) हा देश कीर्तिवर्मा चालुक्यानें इ. स. ५६५–५९७ जिंकला होता असें कळतें. पुढें ऐहोळच्या अंकित लेखांत दुसऱ्या पुलिकेशीनें आलुपांनां पादाक्रांत केल्याचा उल्लेख आहे. (ए. इं. पु. ६ पृ. ४). ही गोष्ट६०८-९ सुमारास घडली. विनयादित्याच्या इ. स. ५९२ सालच्या सोरब दानपत्रांत त्यानें आलुप राजा गुणसागर याच्या महाराजा चित्रवाह नामक पुत्राच्या विनंतीवरून एडेवोळल विषयांतील सालींव्होगे ग्राम बक्षीस दिल्याचें म्हटलें आहे ( इं. अँ. पु. १९, पृ. १५२ ). त्याच राजाच्या इ. स. ६९४ सालच्या हरिहर येथील दानपत्रांत आलुव हे पश्चिमचालुक्यांचे वंशपरंपरागत चाकर म्हटलें असून एका आलुव सरदाराच्या विनंतीवरून विनयादित्यानें एडेवोळल विषयांतील किडु–कागामार्सा गांव बक्षीस दिला असें सांगितलें ( इं. अँ. पु. ७. पृ ३०३ ). पण पुढें गोव्याच्या कादंबांच्या लेखांत जयकेशीनें इ. स. १०५२—५३च्या सुमारास आलुपांनां जिंकून घेतलें असें म्हटलें आहे; त्यावरून ते पश्चिम चालुक्यांच्या शत्रुपक्षांत सामील झाले असें दिसतें ( रॉ. ए. सो. बॉ. ब्रॅ. चे जनरल पु. ९ पृ. २८२).या आलुपांचा बिल्हणाच्या विक्रमांकदेवचरितांतहि उल्लेख आला आहे. फ्लीटनें आलुप हे नक्की कोण आहेत कळत नाहीं असें म्हटलें आहे ( बॉं. गॅ. ) परंतु आलूप व महाकूटाच्या स्तंभलेखांतील आलुक हें एकच असल्यास आलुक हें शेषाचें एक नांव असल्यामुळें ती नाग लोकांची एक पोट जात असूं शकेल असें तो सुचवितो. ते बनवासीच्या ईशान्येस असलेल्या एडेवोळल विषयाचे (कदाचित् इतर लेखांतील एडेनाडसत्पति) सामन्ताधिपति होते असें विनयादित्याच्या दानपत्रांतील भाषेवरून दिसतें.

**आलूर**—मद्रास. बल्लारी जिल्ह्याचा पूर्वेकडील तालुका. उ. अ. १५°८' ते १५°४४' व पू. रे. ७६° ५७'ते ७७°२६'

क्षेत्रफळ ५८२ चौरस मैल. लोकसंख्या (१९११) १७०६८१. एकंदर खेडीं ८४, मोठा गांव एकहि नाहीं. जमीनमहसूल ४१४००० ( इ. स. १९०३-४. ) मुख्य पिकें ज्वारी, कापूस हीं होत.

**आलें ( सुंठ )**—या झाडास संस्कृतमध्यें आर्द्रक, इंग्रजींत जिंजर, गुजराथींत आंदु, हिंदींत आर्द्रक, आदा इत्यादि नांवें आहेत. वाळविल्यावर शुंठी, सुंठ वगैरे नांवें त्यास प्राप्त होतात. हें झाड अगदीं रानटी स्थितींत आढळत नाहीं; यामुळें याचें मूलगृह निश्चित करणें कठिण आहे. परंतु तें आग्नेय आशियाच्या उष्ण प्रदेशांतील असावें. येथूनच हें वेस्ट इंडीजमध्यें व आफ्रिकेंत गेलें. सध्यां बहुतेक उष्ण देशांत याची लागवड करतात. हिंदुस्थान व चीन या देशांत कित्येक शतकें आल्याची लागवड होत आहे. कन्फ्यूशिअस हा केव्हांहि आल्याशिवाय जेवीत नसे. ग्रीक व रोमन ग्रंथकार या झाडाच्या औषधी गुणाची माहिती देतात. त्यांच्याचप्रमाणें अरबी लेखकांच्या पुस्तकांतहि ती माहिती सांपडते. मार्कोपोलो ( १३ शतक ) याला आल्याची व सुंठीची माहिती असून मलबारमध्यें कोईलम (आधुनिक क्विलॉन ) येथें चांगली सुंठ होते, असें तो म्हणतो. ही जात मध्ययुगांतील व्यापाऱ्यांना ' कोलंबिनो अथवा कॉईलमीन' या नांवानें माहीत होती. नंतर हिला 'कॉलबाईन' सुंठ म्हणत. त्या वेळीं बेलेडी, कॉलंबिनो व मेदिनो ह्या तीन जाती प्रसिद्ध होत्या. पहिली हिंदुस्थानांतील निरनिराळ्या जिल्ह्यांत होत असे. दुसरी क्विलॉन येथें; व तिसरी ' मक्का ' येथें उत्पन्न होत असे. ' बल्लडी ' हा ' देशी ' शब्दाचा प्रतिशब्द असून कमी दर्जाच्या सुंठीला लावीत असावेत असें वाटतें. रशिदुद्दीन लिहितो कीं, गुजराथहून ' बेलडी ' सुंठ येत असे. पंधराव्या शतकांत हिंदुस्थानांत आलेला प्रवासी निकोलो कॉंटी म्हणतो कीं, पश्चिम किनाऱ्यावर असलेल्या पॅकाग्युरिआ शहराच्या आसपास ' बेलेडी, जेबेली व नेली या नांवाची सुंठ होत असे. सोळाव्या शतकाच्या आरंभीं कालिकतहून सुंठीची निर्गत होई, असें बार्बोसा म्हणतो. याच गोष्टीला गार्शिया डी ओर्टो व लिंश्चोटेन यांची पुष्टी मिळते. टेरी म्हणतो कीं, मोंगलांच्या राज्यांत 'सुंठ' सर्वत्र होत असे ( १६५५ ) मँडेल्सो लिहितो कीं, सुंठ गुजराथमध्यें विपुल होत असे. मोंगलांच्या राज्यांत सुंठ होती असें टॅव्हर्निअरच्या पुस्तकावरून कळतें. वरील आधारावरून मध्ययुगांत सुंठीची हिंदुस्थानांत चांगलीच माहिती असून तिचा व्यापार चांगला चालत असे असें सिद्ध होतें.

**ला ग व ड.**—या झाडांची लागवड हिंदुस्थानांतील सर्व उष्ण व सर्द अशा प्रदेशांत होते. त्याचप्रमाणें हिमालयाच्या ४ ते ५ हजार फूट उंचीच्या प्रदेशांत सुद्धां ह्याची लागवड होते. या पिकाला जास्त परिश्रम व काळजी घ्यावी लागते. जमीन चांगली असून ती विशेष भुसभुशीत अथवा कठिण नसावी. पाणी नियमित लागतें. खत चांगलें घ्यावें लागतें व तण नेहमीं परंतु काळजीपूर्वक काढावें लागतें.

या पि का ची प्रां त वा र थो ड क्यां त मा हि ती, बंगाल.—या प्रांतांत पुष्कळ ठिकाणीं हें पीक होतें; परंतु त्याची माहिती मिळत नाहीं. रंगपूरमध्यें पहिलें पीक तागाटचें असून दुसरा नंबर सुंठ व तंबाखूचा लागतो. रॉय म्हणतो कीं, रेताड लापण जमीन या पिकाला चांगली असते. काचू नांवाच्या कडदणाच्या नंतर आलें पेरतात. १५ फेब्रुवारी पासून १५ एप्रिलपर्यंत जमीन वारंवार नांगरतात. त्यानंतर ती सारखी करून शेतांत पाण्याचा दांड काढतात. पहिल्या नांगरण्याच्या वेळीं एकराला १०० मणांप्रमाणें कुजलेलें शेणखत देतात. आदल्या वर्षाच्या पिकांतून राखून ठेविलेले आल्याचे कोंब वाफ्यांत लावितात. शेतांतील गवत वारंवार काढावें लागतें. आक्टोबर ते मार्चच्या दरम्यान तुकडे खणून काढतात. दर एकरी ४० ते ६० मण सरासरी उत्पन्न होतें.

संयुक्त प्रांत— कुमाऊनच्या उष्ण खोऱ्यांत आल्याची लागवड जास्त होते. एप्रिल महिन्यांत आल्याचे तुकडे लावितात. सबंध शेतांत रोपाच्या फांद्या पसरतात व त्यावर बांबू अथवा लांकडाच्या काड्या ठेवितात. फेब्रुवारी महिन्यांत आलें खणून गोळा करतात.

पंजाब—हिमालयाच्या उष्ण खोऱ्यांत आल्याची लागवड करतात. पेरण्याच्या फण्यांनां गाईचें शेण लावून त्याच्या राशी करतात. येथेंहि शेतांत पानें पसरतात. त्यावर खताचा थर मात्र देतात. जानेवारींत आलें खणून बाहेर काढतात. एक महिना तें दुसऱ्या ठिकाणीं ठेविल्यानंतर एक दिवस त्यांस ऊन देतात. एक बिघा जमिनींत ८ मण आलें पेरतात व ३२ मण आलें उत्पन्न होतें.

मद्रासः—प्रसिद्ध मलबारी सुंठ कालिकतच्या दक्षिणेस असलेल्या शेरनाड जिल्ह्यांत होते. अर्ध्या मेमध्यें सुंठीची लागवड करितात. पीक नोव्हेंबरमध्यें तयार होतें. येथें खड्डे खणून त्यांत खत घालतात. नंतर त्यांत आल्याचे तुकडे लावतात. त्यावर पानांचा थर ठेवितात.

मुंबई इलाखाः—येथें हें पीक बागाईतीपैकीं आहे. त्यास कसदार व निचऱ्याची जमीन लागते. आलें हें मूळ असून त्याला कोंब फुटून त्याचे दांडे एक दोन हात उंच होऊन त्याला पात्या येतात. जमीन चांगली कमावकेली असल्यास केळवें माहिम(ठाणें जिल्हा)कडे आलें कमरेइतकें उंच वाढतें. मुंबई इलाख्यांत गुजराथेंत, अहमदाबाद, खेडा, सुरत, नवसरी प्रांतांत, कोंकणांत ठाणें जिल्ह्यांत व मध्यभागापैकीं सातारा जिल्ह्यांत आल्याची लागवड बरीच आहे. मुंबई इलाख्यांत या पिकाखालीं सरासरीनें दरवर्षी २००० एकर क्षेत्र असतें. हिंदुस्थानांतून सुंठीची निर्गत सरासरीनें किती होते त्याचा तपशील येणेंप्रमाणेः—

| इ. स. | टन. | किंमत रुपये |
|---|---|---|
| १९१३-१४ | ९२१४,००० | १८४०,००० |
| १९१४-१५ | ७७२९,००० | १३१०,००० |

आलें रेताड, लापग, गोराडू व ठाणें जिल्ह्यांतील झिरप्या जमीनींत चांगलें होतें. सातारा जिल्ह्यांत तारळें खोऱ्यांत याची बरीच लागवड होते. मद्रास इलाख्यांत एरनाड भागांत याची विशेष लागवड होते. तेथें हें पीक पावसावरच घेतात. या पिकाचा फेरपालट इतर बागाइत पिकांशीं करितात. उत्तर गुजराथेंत वाफ्यांत गोवारी टाकतात व वाफ्याच्या कडेला गोराडू लावितात. दर एकरीं सुमारें ३०–४० गाड्यापावेतों कुजलेलें शेणखत घालतात. जमीन नांगरून कुळवून अगदीं भुसभुशीत करितात. बारा फूट लांब व सहा फूट रुंद असे वाफे करितात. ठाणें जिल्ह्यांत फार करून शेणखत न देता सुमारें तीन वेळां ( जुलई, आगस्ट, सप्टेंबर ) वरखत देतात; तें एरंडीचें असतें. पेंड एकरीं ३००० पौंडपर्यंत लागते. आल्याची लागवड मे महिन्यांत करितात. त्याचे फणे चार अगर पांच इंच अंतरानें ओळीनें लावून दोन ओळींत नऊ इंच अंतर ठेवितात. दर एकरीं ५५०० ते २००० पौंड बियाणें लागतें. लागण झाल्यावर दर चार दिवसांनीं किंवा ६–१० दिवसांनीं जमीनीच्या मग-दुराप्रमाणें पीक तयार होईपर्यंत पाणी द्यावें लागतें. सरते-शेवटीं एक महिना पाणी तोडून आलें खणून काढितात. हें पीक वरचेवर खुरपून स्वच्छ ठेवावें लागतें. सुमारें तीन ते पांच खुरपण्या द्याव्या लागतात.

गुजराथेंत कांहीं ठिकाणीं आलें व हळद मिसळून लावि-तात. हळद वाफ्याच्या वरंब्यावर व आंत आलें लावि-तात. त्याचप्रमाणें गुजराथेंत आल्याच्या वाफ्यांत ताग अगर गोवारी फेंकितात. पुढें एक महिन्यानंतर दरमहा याच्या फांद्या मोडून थोडथोड्या वाफ्यांत टाकितात. त्यांचें कुजून खत होतें. पीक आठ महिन्यांनीं तयार होतें. तथापि पक्कें होण्यास बारा महिने लागतात. बियासाठीं गड्डे सावलींत हवा खेळेल अशा ठिकाणीं चांगले बंदोबस्तानें ठेवावे. आलें जानेवारींत खणतात. व तें व्यापाऱ्याला विकतात, किंवा त्याची सुंठ तयार करितात. दर एकरीं सरासरी उत्पन्न १२००० तें १५००० पौंड येतें.

व्या पा र.— सुंठीचा हिंदुस्थानांत अंतर्गत व्यापार बराच चालतो. १९०६–०७ सालीं नदीतून व रेल्वेच्या मार्गानें ८६,२११ हंड्रेडवेट सुंठीचा व्यापार झाला. त्यावर्षीं सर्वांत जास्त निर्गत पूर्व बंगाल व आसाम प्रांतांतून झाली. मुंबई बंदर, पंजाब, मद्रास व संयुक्तप्रांत येथील निर्गत त्याच्या खालोखाल होती. इ.स.१९०५–०६ सालीं किनाऱ्यानें ३,२१,१६० रु. किंमतीची २६,२४,०२० पौंड सुंठ हिंदुस्था-नांतील इतर ठिकाणीं गेली. यांपैकीं बरीच सुंठ मुंबईस झाली परदेशांत होत असलेल्या निर्गतीचे आंकडे १९०५–०६ सालीं निर्गत पौंड ८९,६९,१७४, व किंमत १२,५२,७४० आयात पौंड १,०८९,५१५ व किंमत रु. १, ३५,८७६ इतकी होती सुंठीचे गिऱ्हाईक म्हणजे संयुक्त राज्य ( १,५६५,०२० पौंड.) एडन(१,५१७,६९६ पौं.) संयुक्त संस्थानें, अरबस्तान, सिलोन, व जर्मनी हे देश होत. हिंदुस्थानांत सुंठीची आयात मुख्यतः जपान व चीन देशांतून होते.

सुं ठ त या र क र ण्या ची कृ ति.—शेतांतून आलें काढून आणल्यावर कोंवळीं व जून कुडीं वेगवेगळीं करावीं. कोंवळीं कुडीं विकून टाकावीं, व जून कुड्यांपैकीं पुढील सालापुरतें बीं राखून ठेवून बाकीच्या आल्याची सुंठ करावी.

( १ ) आलें खणल्यावर एक दिवस शेतांत पडूं द्यावें व दुसऱ्या दिवशीं कुड्यांना चिकटलेली माती हळूच हातानें काढावी व कुडीं पाण्यांत भिजत घालावीं. भिजत घातल्यानें साल लवकर सुटते. कुडीं हातानें धुवावीं. त्यांच्यावरीस साल शिंपीनें, खापरीनें अथवा चाकूच्या बोथट पातीनें खरडून काढावी. पुनः कुडीं पाण्यात धुवावीं व चार दिवसपर्यंत उन्हांत वाळल्यानें सुंठीस पांढरा रंग चढतो. सुकलेली सुंठ गोळा करून हातानें चोळावी. चोळण्याच्या वेळीं फणे न मोडतील अशाबद्दल खबरदारी घ्यावी. पुनः तीच सुंठ तीन दिवस उन्हांत वाळवावी व गोळा करून हातानें चोळावी. आणखी एक वेळ दोनपासून तीन तासपर्यंत सुंठ पाण्यांत भिजत घालून बाहेर काढावी, व साफ वाळेपर्यंत उन्हांत पसरावी. वाळल्यानंतर सुंठ घरीं नेऊन खरबरीत पोत्यावर घासावी. ह्या घासण्यानें पूर्वीं कांहीं साल राहिली असल्यास ती निघून जाऊन सुंठ तयार होईल. सदरहू सुंठ करण्याच्या कृतीस पल्ल्यामागें सुमारें एक रुपया खर्च येतो.

( २ ) एक मोठें लांकडी तेलाचें वगैरे रिकामें झालेलें पीप घ्यावें. त्यात निम्में आलें व निम्मे पाणी घालावें, व त्यांत एक वल्ह्यासारखा लांकडाचा दांडा घालून तें सारखें तास दीड तास ढवळावें. इतक्या अवकाशांत पिपांत शक्यतर पाणी दोन तीन वेळां घालावें. पाणी घालून ताजें आलें ढवळल्यामुळें वरील माती व सालहि निघते. नंतर हें आलें बाहेर काढून जमीनीवर पसरावें. ( निम्में पीप भरलें म्हणजे त्यांत मुंबईचे दहा मण म्हणजे २८० पौंड आलें राहतें; व तितक्या आल्याची सुंठ बनवावयाची आहे असें समजून पुढील प्रमाणें दिली आहेत ). नंतर दुसरें पीप घ्यावें व त्यांत निम्में पाणी घालावें व त्यांत भाजलेल्या चुन्याच्या कळ्या ७ पौंड घालाव्या व तें मिश्रण ढवळावें. सुमारें अर्ध्या तासानें त्यांत जमीनीवर पसरलेलें आलें टाकावें व दांड्यानें १५–२० मिनिटें ढवळावें. मग हें आलें बाहेर काढून सावलींत ३–४ तास पसरून ठेवावें. नंतर एक कढई ( गुळासाठीं उपयोग करतात तीहि चालेल ) घ्यावी व त्यांत अर्धा पीप पाणी घालावें व त्यांत १५ पौंड चुन्याची कळी टाकावी व खालीं जाळ लावावा. पाण्यास आधण

येतांच पसरलेलें आलें त्यांत टाकावें व तें २-२॥ तास शिजवावें. पाणी अाटत येतांच खालील जाळ कमी करावा; व आंतील आलें बाहेर काढून जमिनीवर सावलींत पसरावें. नंतर दुसरे दिवशीं पुनः पिपांत निम्में पाणी घालून त्यांत ७५ पौंड कळीचा चुना घालावा ( कळीच्या चुन्याऐवजीं २ पौंड मिरचीची पूडहि घालतात ) व त्यांत आलें घालून १५-२० मिनिटें ढवळावें,मग बाहेर काढून सावलींत वाळवावें वाळवितांना दिवसांतून निदान दोन वेळ आल्याची खालची बाजू वर व वरची बाजू खालीं झाली पाहिजे. उन्हाळयाच्या दिवसांत सावलींत सुंठ वाळण्यास ५।७ दिवस लागतात. पण सावलींत वाळविण्याचें काम त्रासाचें असल्यामुळें प्रथम २ दिवस ( उन्हाळयांत ) व ३ दिवस ( हिंवाळयांत ) सावलींत सुंठ ठेवून मग चांगलें ऊन्ह द्यावें. तें उत्तम वाळलें कीं, सुंठ तयार झाली. दहा मण आल्याची सुंठ ५-५॥ मण होईल. जास्त करणें असल्यास वरील जिनसांचीं प्रमाणें योग्य प्रमाणांनीं वाढवावींत.

सुंठीचे उपयोगः—निरनिराळया व्याधींच्या निवारणार्थ आर्य व युनानी वैद्यकांत आल्याचा व सुंठीचा उपयोग फार प्राचीन काळापासून होत आहे. इंग्रजी पद्धतींतहि सुंठीची योजना केली जाते. कांहीं पेय पदार्थ व मद्यें तयार करण्यांतहि सुंठीचा उपयोग करतात. सुंठीचे तेल निघतें हेंहि औषधी कामाकडे लावतात. आलें हे पाचक, सारक, अग्निदीपक, तोंडास रुचि देणारें व कंठास हितकर आहे. आलेपाक—आल्याचा रस काढून त्यांत तितकेंच पाणी घालावें. नंतर साखर घालून पाक करावा; व त्यांत केशर, वेलची, जायफळ, जायपत्री, व लवंग हीं घालून तो भरून ठेवावा. हा श्वास, कास, अग्निमांद्य व अरुचि यांवर हितकर आहे.अजीर्णादिकांवर फार हितकर आहे. अजीर्णावर आल्याच्या रसांत निंबूरस व सैंधव हीं घालून तें मिश्रण प्राशन करावें म्हणजे अजीर्ण दूर होऊन अग्नि प्रदीप्त होतो. अग्निमांद्यावर—आल्याचा व निंबाचा रस समभाग घेऊन त्यांत तितकेंच सैंधव मिश्र करून भोजनाच्या पूर्वी प्राशन करावें म्हणजे अग्निमांद्य दूर होतें. भोजनारंभीं हे तिन्ही पदार्थ भक्षण केले असतां अग्नि प्रदीप्त होऊन जिव्हा, कंठ व हृदय यांची शुद्धि होते. आमपित्तावर सुंठ, आवळकटी व खडीसाखर बारीक कूटून चांगला खल करून सकाळीं एक गोळी ध्यावी. आमसंग्रहणीवर सुंठ थंड पाण्यांत गंधाप्रमाणें उगाळून तितकेंच तूप, आणि गूळ किंवा खडीसाखर घालून शिजवून चाटण तयार करावें व थोडें थोडें चाटवावें. तसेंच श्वेत प्रदर, अर्धशिशी पक्षघात, दंतशूल इत्यादि अनेक विकारांवर सुंठीचा उपयोग होतो. अशाप्रकारचे आल्याचे उपयोग देशी वैद्य करतात.

[ वाट. पदे. फार्माकोग्राफिआ इंडिका. दत्त—मटीरीया मेडिका. रा. ब. ग. के. केळकर-प्रस्तुत कोशाकरितां लेख ]

**आलेवाही**—हें चांदा जिल्ह्यांतील एक लहानसें खेडें गांव आहे. या ठिकाणीं एक सुंदर तलाव असून त्याजपासून शेतीला पाणी घेतलें जातें. हें गांव ब्रह्मपुरीपासून ४० मैल नैर्ऋत्य दिशेस आहे. ( मध्य. ग्या. )

**आल्फ्रेड दि ग्रेट**— ( ८४८—९०० ) इंग्लंडचा आल्फ्रेड दि ग्रेट हा एथल्वुल्फ राजाचा चौथा पुत्र. हा वँटेज येथें इ. स. ८४८ त जन्मला. पांच वर्षांचा असतांनां त्याला रोम येथें पाठविण्यांत आलें; त्या वेळीं चौथ्या लिओनें त्याला राजा असें कबूल केलें असें म्हणतात. परंतु यास राज्यप्राप्ति होईल असें त्यावेळीं कोणासहि वाटलें नाहीं, कारण याला तीन वडील भाऊ होते. त्याचा पिता ८५८ त मरण पावला. एथल्बाड व एथल्बर्ट या त्याच्या भावांच्या छोट्या कारकीर्दींत आल्फ्रेडनें कांहीं एक चळवळ केली नाहीं, परंतु त्याचा तिसरा भाऊ एथिलरेड हा जेव्हां गादीवर बसला ( ८६६ ) तेव्हांपासून हा सार्वजनिक कामांत पडूं लागला व डेन्स लोकांपासून इंग्लंडची मुक्तता करण्याचें काम त्यानें हातीं घेतलें. ८६८ त दोघा भावांनीं डेन्स लोकांपासून मर्सिआ प्रांताचा बचाव करण्याचा प्रयत्न केला परंतु तो निष्फळ झाला. इ.स ८७१सालास आल्फ्रेडच्या लढायांचें वर्ष असें म्हणतात; कारण त्यानें त्या वर्षी नऊ लढाया केल्या. लवकरच एथिलरेड मरण पावल्यामुळें सर्व सत्ता व जबाबदारी आल्फ्रेडकडे आली. डेन्स लोकांनीं इंग्लिशांचा पुनः एक दोन ठिकाणीं पराभव केला. इ. स. ८७७ मध्यें एक्झिटर येथें आल्फ्रेडनें डेन्स लोकांचा पराभव केला. परंतु पुढें लवकरच त्याला अॅथिल्ने येथें पळून जावें लागलें. पुढें त्यानें लढाईची मोठी तयारी करून एडिंग्टन येथें त्याचा पूर्ण पराभव केला. डॅनिश राजा त्याला शरण गेला व त्यानें व इतर २९ सरदारांनीं बाप्तिस्मा घेतला. वेडमोरच्या तहाच्या योगानें वेसेक्स, मर्सिया वगैरे प्रांतांतून डॅनिशांची हकालपट्टी झाली. व अशा प्रकारें मूर्तिपूजक स्कॅाँडेनेव्हियन लोकांपासून पश्चिम यूरोपचें संरक्षण झालें. ८८४-८८५ त डेन्स लोकांनीं पुनः बंड केलें तें आल्फ्रेडनें मोडून टाकिलें. परंतु ८९२-८९३ त डॅनिश लोकांनीं पुनः एकदां इंग्लंडावर मोठी स्वारी केली परंतु आल्फ्रेडचा पुत्र एडवर्ड यानें त्यांचा पराभव केला. आपला निभाव लागत नाहीं असें पाहून डॅनिश लोकांनीं इंग्लंडचा नाद सोडून दिला. आल्फ्रेड हा मोठा मुत्सद्दी होता; त्यानें आपल्या लष्करांत चांगल्या सुधारणा केल्या म्हणूनच डॅनिश लोकांवर त्याला जय मिळाला. त्यानें आपलें आरमार वाढविलें. त्यानें न्यायखात्याची उत्तम व्यवस्था केली. गरीबांचा पालनकर्ता असें त्याला नांव मिळालें आहे. त्यानें हिंदुस्थानांत व रोम येथें आपले वकील पाठविले होते असें म्हणतात. हिंदुस्थानांत म्हणजे कोठें तरी दूर देशीं एवढ्याच अर्थानें प्राचीन इंग्रज या शब्दाचा उपयोग करीत असावेत.

आयर्लंड व इतर देशांतील मठांकडे त्यानें देणग्या पाठविल्या असें म्हणतात. आयर्लंड देशावर त्याचें प्रेम होतें. त्यानें कांहीं मठ स्थापिले व परदेशांतून कांहीं धर्माधिकारी आपल्या देशांत आणविले परंतु या कामीं त्यास यावें तसें यश आलें नाहीं; दरबारांत त्यानें एक शाळा काढिली. व युरोपखंडांतून विद्वान शिक्षक आणवून त्यांची तेथें नेमणूक केली. क्रर्जी व इतर लोक यांच्या उपयोगासाठीं त्यानें कित्येक ग्रंथांचीं भाषांतरें करविलीं; त्यानें स्वतः बरींच भाषांतरें केलीं आहेत. त्यानें कित्येक स्वतंत्र ग्रंथहि लिहिले. " आपलें ज्ञान वाढविण्याचा जो मनुष्य प्रयत्न करीत नाहीं तो मूर्ख व हतभागी असला पाहिजे " असें त्यानें एका ग्रंथांत म्हटलें आहे. तो इ. स. ९०० त मरण पावला. त्याच्या तोडीचा दुसरा इंग्लिश राजा झाला नाहीं व ग्रेट ही पदवी त्याच्या शिवाय दुसऱ्या कोणालाहि शोभत नाहीं असें इंग्रज लोक म्हणतात.

[ संदर्भ ग्रंथ.—प्लमर—लाइफ अँड टाइम्स ऑफ आल्फ्रेड दि ग्रेट ( क्लॅरेंडन प्रेस १९०२ ); आल्फ्रेड बौकर संपादित—आल्फ्रेड दि ग्रेट चॅप्टर्स ऑन हिज लाइफ अँड टाइम्स बाय व्हेरिअस ऑथर्स ( १८९९ ); अर्ल–दि आल्फ्रेड ज्वेल ( क्लॅरेंडन प्रेस १९०१ ); दि लीगल कोड ऑफ आल्फ्रेड दि ग्रेट ( एम्. एच्. टर्क. हाले १८९३ ). ]

**आल्बर्ट**—( १८१९—१८६१ ) फ्रान्सिस चार्लस ऑगस्टस आलबर्ट इमॅन्युअल, व्हिक्टोरिया राणीचा पति. हा सॅक्सनीच्या राजघराण्याच्या ज्येष्ठ शाखेपैकीं असून, सॅक्सकोबर्ग गोथाच्या अधिपतीचा दुसरा मुलगा होय. याचें शिक्षण प्रथमतः फ्लॉरश्टझ याच्या देखरेखीखालीं झालें व नंतर तो बॉन येथील विश्वविद्यालयांत प्रविष्ट झाला. बॉन येथील विद्यापीठांत अभ्यास करीत असतांना, अर्थशास्त्र, तत्त्वज्ञान, व सृष्टिज्ञान या विषयांचा त्यानें चांगला अभ्यास केला. संगीत व चित्रकला यांचाहि त्याला नाद असल्यामुळें, त्याहि विषयांचें ज्ञान त्यानें संपादन केलें. मर्दानी खेळांत व विशेषतः ' फेन्सिंगच्या ' कलेंत तो प्रवीण होता. इंग्लंडची राणी व्हिक्टोरिया ही याच्या आतेची मुलगी. आलबर्टचा या व्हिक्टोरियाशीं विवाह व्हावा अशी आलबर्टचा चुलता जो बेलजमचा राजा पहिला लिओपाल्ड याची इच्छा होती. यामुळें त्यानें, आलबर्ट व त्याचा बाप व आलबर्टचा थोरला भाऊ अर्नेस्ट या तिघांनां, इंग्लंडमध्यें पाठवून दिलें. व्हिक्टोरिया ही त्यावेळीं राजकन्या होती, व ती केन्सिंग्टन येथील राजवाड्यांत रहात असे, आलबर्ट वगैरे मंडळी हीं अर्थातच, व्हिक्टोरियाच्या राजवाड्यांतच रहाण्यास आलीं. या ठिकाणीं असतांना, व्हिक्टोरिया व आलबर्ट यांचें परस्परांवर प्रेम जडलें. आलबर्ट हा फार देखणा व सुस्वभावी असल्यानें व्हिक्टोरियाची त्याच्यावर फार भक्ति जडली. इंग्लंडचा राजा चवथा वुइल्यम यास ही गोष्ट पसंत नव्हती, पण व्हिक्टोरियाच्या इच्छेपुढें त्याचें कांहीं चालेना. पुढें कांहीं दिवसानंतर, आल्बर्ट हा पुन्हां आपल्या गांवीं परत आला. लवकरच वुइल्यम राजा वारल्यामुळें, व्हिक्टोरिया ही इंग्लंडच्या राज्यावर बसली; व कांहीं दिवसांनीं आल्बर्ट व व्हिक्टोरिया यांचा विवाह घडून आला,

आपला पति या नात्यानें, इंग्लंडच्या राजकारणांतील महत्त्वाच्या प्रश्नांसंबंधीं, व्हिक्टोरिया ही आलबर्टचा सल्ला घेत असे व तोहि आपल्या मताप्रमाणें योग्य तो सल्ला देत असे, पण ही गोष्ट, इंग्लंडमधील वजनदार लोकांनां आवडत नसे. त्यामुळें ते याचा मनांतून द्वेष करीत असत. पण तिकडे लक्ष्य न देतां, आल्बर्ट हा इंग्लंडची सार्वत्रिक सुधारणा जेणेंकरून घडून येईल, त्या गोष्टी, करण्यास मागें पुढें पहात नसे. इ. १८५१ सालीं त्यानें, निरनिराळ्या कलांचें प्रदर्शन भरविलें. व अतिशय खटपट करून त्यानें तें यशस्वी रीतीनें पार पाडलें. हें प्रदर्शन, भरविल्यानें इंग्लंडचें नुकसान होईल असें पुष्कळांनीं उद्गार काढले तर, हे प्रदर्शन हॉऊस ऑफ कॉमन्स आणि हॉऊस ऑफ लॉर्डस यांच्या संमतीशिवाय हाईडपॉर्कमध्यें भरवितांच येत नाहीं असाहि एका लार्डानें आक्षेप घेतला, पण या आक्षेपकांची पर्वा न करतां, व्हिक्टोरिया राणीच्या हस्तें हें प्रदर्शन उघडण्यांत आलें. या प्रदर्शनाचें निवळ उत्पन्न खर्च वजा जाता, दीड लाख पौंड झालें व तें दक्षिण केन्सिंग्टनच्या म्यूझियमकरतां देण्यांत आलें. तो विद्यासंपन्न असून उदारमतवादी होता. शास्त्रीय शोध लावण्याकरितां स्थापन झालेल्या संस्थांनां तो नेहमीं सढळ हातानें मदत करीत असे. १८५९ सालीं आबर्डीन येथें शास्त्रीय शोध लावण्याकरितां स्थापन झालेल्या ब्रिटिश ॲसोसिएशनची वार्षिक सभा भरली. त्या सभेचें अध्यक्षस्थान, आल्बर्ट यास देण्यांत आलें होतें. त्यासमयीं त्यानें जें भाषण केलें तें विचार परिपूर्ण व मार्मिक असें होतें. आपल्या खासगी जमीनींची व्यवस्था पहाणें, तींत शक्य ती सुधारणा करणें, आपल्या मुलांच्या शिक्षणाची उत्तम व्यवस्था करणें या सर्व बाबतींत तो स्वतः मन घालीत असे. इंग्लंडच्या युवराजाच्या खर्चासाठीं, तोडून दिलेल्या कॉर्नवाल परगण्याची त्यानें नमुनेदार व्यवस्था लावून दिली, व त्यामुळें त्या परगण्यांतील भाडेपट्टीचें उत्पन्न ११००० पौंडापासून तें ५०००० पौंडापर्यंत वाढलें. वुइंडसर येथें असलेलें त्याचें शेत, अगदीं नमुनेदार म्हणून प्रसिद्ध असे.

त्यानें ज्या निरनिराळ्या सुधारणा घडवून आणल्या त्यामुळें, त्याच्या संबंधीचे लोकांचे जे पूर्वग्रह झाले होते ते नाहींसे होत चालले. लोकांचा त्याच्यावर विश्वास जडूं लागला. १८४० मध्यें, केंब्रिज येथील विश्वविद्यालयाचा त्याला कुलपति ( चॅन्सेलर ) निवडण्यांत आलें

सन १८५० मध्यें, 'प्रिन्स कान्सॉर्ट' ही पदवी त्याला देण्यांत आली; त्यामुळें, परराष्ट्रीय राजकारणांतहि त्याला भाग घेतां येऊं लागला.

१८६१ मध्यें सार्वराष्ट्रीय औद्योगिक प्रदर्शन भरावयाचें ठरलें होतें. त्या बाबतींत, यानें पुढाकार घेतला होता, यानिमित्त तो फार श्रम करीत असे. त्यामुळें, तो आजारी पडला व शेवटीं त्यांतच त्याचा अंत झाला. त्याच्या आकस्मिक मृत्यूमुळें, व्हिक्टोरिया राणीला, तसेंच इंग्लंडमधील लोकांनां अत्यंत दुःख झालें. फ्रागमोर येथें त्याच्या अस्थी पुरण्यांत येऊन, त्या ठिकाणीं एक सुंदर कबरस्थान बांधण्यांत आलें. तसेंच आल्बर्ट हॉल, आल्बर्ट मेमोरियल इत्यादि त्याच्या प्रीत्यर्थ लंडनमध्यें व इतरत्रहि स्मारकें करण्यांत आलीं.

[ संदर्भग्रंथः—जनरल ग्रे—अर्लीईज ऑफ प्रिन्स कन्सॉर्ट १८६७; थिओडॉर मार्टिन—लाईफ अँड लेटर्स ऑफ प्रिन्स कान्सॉट,( पहिला भाग १८७४, दुसराभाग १८८० ) लेटर्स ऑफ व्हिक्टोरिया १९०७ ]

**आल्व्हा फरनॅन्डो आल्व्हॅरेझ डी टोलेरा–डयुक** ( १५०८–१५८३ )—हा एक स्पॅनिश शिपाई असून याचा स्पेनमधील एका नामांकित घराण्यांत जन्म झाला. याच्या आज्यानें याला लष्करी शास्त्र व राजनीति शिकविली. यानें लहानपणींच पॅव्हीयाच्या लढाईत पराक्रम गाजविला. पांचव्या चार्लसनें याला सैन्यातील एक अधिकारी नेमलें. यानंतर यानें दोन तीन लढाया जिंकल्या. पुढे याला इटालींतील बादशाही फौजेचा सेनापति नेमलें. यानंतर दुसरा फिलिप गादीवर आल्यावर त्यानें १५६७ त पाखंडी लोकांचें निर्मूलन करण्याकरितां याची १०००० फौजेनिशीं नेदर्लंड देशांत रवानगी केली. तेथें गेल्यावर यानें पाखंडी व अराजक लोकांस शिक्षा देण्याकरितां न्यायमंदीर स्थापिलें हें न्यायमंदीर रुधिरपीठ (कोर्ट आफ ब्लड) या नांवानें प्रसिद्ध आहे, यानंतर यानें खजिना भरून काढण्याकरितां तेथील सर्व विक्रीवर शेंकडा पांच ५ टक्के कर बसविला. अशाप्रकारें लोकछळ करून यानें आपली स्वामिनिष्ठा व्यक्त केली. पण इतकेंहि करून जेव्हां लोकांनीं आल्व्हाच्या लष्करी सामर्थ्यास न जुमानतां आपला विरोध कायम ठेवून बादशाही फौजेस जेरीस आणलें, तेव्हां कंटाळून जाऊन हा स्वदेशीं परत जाण्यास तयार झाला. "मीं येथें ( नेदर्लंडांत ) १८००० लोक फांशीं दिले" असें तो मोठ्या गर्वानें म्हणत असे. पुढें कांहीं दिवसांनीं बादशहानें याला त्याच्या मुलाच्या अपराधावरून कैदेंत ठेविलें यानंतर याला पोर्च्युगाल देशावर स्वारी करण्यास पाठविलें. हा १५८३ च्या जानेवारी महिन्यांत आपल्या वयाच्या ७४ व्या वर्षी मरण पावला.

**आवण**–शक्तीच्या योगानें काम करून घेण्याची सर्वांत सोपी रीत म्हणजे शक्तीचें गोल–गतींत रूपांतर करणें ही होय गोलगति उत्पन्न करून तिच्या योगानें काम करून घेण्यास जीं साधनें लागतात त्यांत अगदीं पहिल्यानें दोन येतात. या दोहोंची नेहमीं जोडी असते. यंत्रामध्यें अशा जोड्या कांहीं ठरलेल्या आहेत. त्या योग्य ठिकाणीं सांगण्यांत येतीलच, परंतु आवण व लाट ही एक ठरलेली जोडी आहे. जेथें आवण तेथें लाट असलीच पाहिजे व जेथें लाट आहे तेथें आवण असलेंच पाहिजे( लाट पहा ). शक्तिसंवाहनामध्यें या जोडींपैकी एक भाग स्थिर असतो व दुसरा फिरत असतो. रहाटामध्यें असलेली लोंखडी लाट ( मधील दांडा ) फिरतो तर बाजूच्या खांबांतील लोंखंडी आवणें स्थिर असतात. याच्या उलट बैलगाडीचा आंख स्थिर असतो तर चाकाच्या आंतील लोखंडी आवण चाका सुद्धां फिरत असतें. गिरणींत किंवा आगबोटीवर मोटमोठ्या लाटा फिरत राहून शक्ति वाहून नेतात व आवणें स्थिर असतात. मोटारगाड्यांच्या मागच्या चाकांचीं आवणें स्थिर असतात व लाटा फिरत असतात तर पुढच्या चाकांच्या लाटा ( आंख ) स्थिर असतात व आवणें फिरत असतात. आगगाडीचीं चाकें लाटांनां घट्ट बसविलेलीं असतात. तीं फिरतात व आवणें स्थिर असतात.

यंत्रामध्यें आवणें फार लागतात. आवणांचा उपयोग घर्षणानें झालेली झीज काढून टाकणें हा होय. एखाद्या यंत्राच्या सांगाड्यांत ४।५ लाटा फिरत असल्या तर (प्रत्येक लाटेला निदान दोन आवणें जरूर असतात.) एकंदर १० आवणें झालीं. हीं आवणें झिजल्यावर काढून नवीन बसविलीं म्हणजे पुन्हां सांगाडा नव्यासारखा झाला. सांगाड्याच्या किंमतीच्या मानानें आवणें बदलण्यास किंमत पुष्कळ कमी पडते.

आवणांमध्यें पुष्कळ प्रकार आहेत. यंत्रशास्त्रांत व धातुशास्त्रांत जसजसे शोध लागत गेले तसतशा आवणामध्यें सुधारणा होत गेल्या.

अगदीं पहिल्या प्रथम जीं आवणें तयार झालीं त्याच जातींचीं आवणें आजकालच्या यांत्रिक प्रगतीच्या काळांतहि वापरण्यांत येत आहेत. कोंकणांत पाणी काढण्यासाठीं रहाटगाडगें वापरतात. यांत लाट ( शॉफ्टिंग ) व आवणें ( बेअरिंग ) लाकडांचीच असतात. रहाटाच्या मधील आडवें लाकूड(कनेकड) तें लाट व हें लाकूड ज्या ठोकळ्यावर टेंकलेलें असते तीं "आवणें". या प्रकारचीं लांकडी आवणें व लाट वापरण्यानें रहाट फिरता होतो. पण फिरतांनां "घर्षण" फार होत असतें. व या घर्षणाच्या योगानें कर्र्र्र असा आवाज एकसारखा निघत असतो. चौल, रेवदंडा, व नागांव इ. गांवीं बागेला "शिपणें" चालू असतांना सर्व गांवभर हा आवाज घुमत असतो.

आवणांत पुढें सुधारणा होत गेल्या. लांकडाच्या जागीं लोखंड, बीड, पितळ, गनमेटल, व्हाईटमेटल इ. धातु

वापरण्यांत येऊं लागले ( लाटा मात्र एकाच धातूच्या म्हणजे निम–पोलादी राहिल्या ) आज प्रत्येक कामाला योग्य अशीं आवणें तयार मिळतात.

आ व णां च्या जा ती—स्थितीवरून—आडवीं उभीं; धातुवरून—लोखंडी, पितळी, मिश्रधातूचीं; रचनेवरून—साधीं फिरत्या तेलाचीं बेधूळ, दाबधरणारीं (थ्रस्ट बेअरिंग ), फिरक्यांचीं ( रोलर बेअरिंग ), गोळ्यांचीं ( बाल बेअरिंग); वंगणावरून—तेलाचीं, चर्बी–ग्रीसचीं, कोरडीं इत्यादि जाती आहेत.

आ व णा ची र च ना—अगदीं साधें आवण ( आडवें ) दोन तुकड्याचें असतें खालच्या तुकड्यास बैठक म्हणतात. वरच्यास टोपी म्हणतात. खालची बैठक पक्की बसण्यासाठीं बोलट घालता येतील अशी २ किंवा ४ भोकें असतात. तशीच टोपी पक्की बसावी म्हणून बैटकीला आणखी २ किंवा ४ बोलट बसविलेले असतात. अशा साध्या आवणांत आंतील बाजूस पितळेचीं अस्तरें बसविलेलीं असतात. हीं अस्तरें झिजलीं म्हणजे काढून नवीन बसवितां येतात.

साध्या आवणांत वरचेवर तेल घालावें लागतें, किंवा वंगणपात्रांत तेल भरून तें थेंब थेंब गळेल अशा बेतानें ठेवावें लागतें यांत पडलेलें तेल फुकट जातें म्हणून तेलाची काटकसर करण्यासाठीं फिरत्या तेलाचीं आवणें तयार केलीं आहेत.

फि र त्या ते ला चीं आ व णें—हीं सारख्या मापाच्या साध्या आवणापेक्षां आकारानें मोठीं असतात, यांची बैठक पोकळ असून तिच्यांत तेल टेवण्यास जागा असते.

लाटेभोंवतीं एक सांखळी किंवा बांगडी टेवलेली असते ती फिरते, व आपल्या बरोबर तेल उचलुन घेऊन लाटेच्या वरच्या बाजूस आणून सोडते. वर आलेलें तेल गुरुत्वाकर्षणा मुळें पुन्हा आपोआप खालच्या पोकळ जागेंत जातें. या जातीच्या आवणाला एकदां तेल भरून टेवलें म्हणजे पुन्हा वरचेवर त्याचेकडे पाहावें लागत नाहीं, व तेल कमी लागतें.

च र्बी किं वा ग्री स चीं आ व णें—ज्या ठिकाणीं तेलाचे डाग पडणें अनिष्ट असतें किंवा तेल टिकण्यासारखें नसतें तेथें हीं वापरतात.

को र डीं आ व णें—आजपर्यंत अशी समजूत होती कीं आवणें तेलाने किंवा चर्बीनें माखलेलीं ओलीं असलींच पाहिजेत, परंतु आता कोरडीं आवणें निघालीं आहेत. यांत तेल किंवा चर्बी नसतें ग्रॅफाइट किंवा त्या सारखा दुसरा पदार्थ असतो. या पदार्थानें वंगणाचें काम होतें.

गो ळ्या चीं व ग ड ग ड्यां ची आ व णें—मोटारगाड्या व अशाच इतर यंत्रांत जीं आवणें वापरतात, तीं गिरणींतील आवणांपेक्षां निराळीं असतात. यांच्या रचना पुष्कळ प्रकारच्या आहेत. यांचा उपयोग केल्यानें घर्षण कमी होतें बायसिकलमध्यें गोळ्यांचीं आवणें असतात.

उ भीं आ व णें—कांहीं ठिकाणीं लाट उभी असते. दळण्याच्या यंत्रांत कांहीं यंत्रें अशा प्रकारचीं असतात. यांतील लाट उभी असते व तिच्या बुडाशीं एक उखळी सारखें आवण बसविलेलें असतें. हें उभें आवण उभ्या लाटेचा जोर व वजन बुडावर पडत असल्यामुळें बूड झिजते म्हणून त्यांत एक वाटीसारखा भाग बसवितात. झिजल्यावर हा काढून टाकून दुसरा बसवितात. कांहीं आवणांत एक गोळी बसविलेली असते. या गोळीवर लाटेचें टोंक येऊन बसतें. फिरतांना गोळी फिरल्यामुळें या आवणांत घर्षण कमी होतें. [ लेखक—दि. य. फाटक ]

**आवंतीभाषा**—साहित्यदर्पणकार वगैरे ग्रंथकारांनीं आवंती ही धूर्तांची भाषा होती असें म्हटलें आहे. व्याकरणकारांनीं आवंति वगैरेंच्या कांहीं प्राकृत भाषांचा उल्लेख केलेला आहे त्यांच्याबद्दल माहिती मिळण्याची आशा बेताचीच आहे. पृथ्वीधरानें म्हटल्याप्रमाणें मृच्छकटिकांतील वीरक आणि चंदनक हे दोघे रक्षकाधिकारी अवंतिनगरींतील भाषा बोलतात, आणि त्यासंबंधानें तो एवढेंच सांगतो कीं, त्या भाषेंत स, र हे वर्ण येतात, आणि तिच्यांत म्हणीवजा वाक्यें पुष्कळ चांगलीं आहेत "तथा शौरसेन्यवंतिजाप्राच्या । एतासु दंत्यसकारता । तत्रावंतिजा रेफवती लोकोक्तिबहुला" पृथ्वीधरानें उतारा दिला आहे भरत. असा १७, ४८, भरत १७, ५१ अथवा साहित्यदर्पण ह्यावरून अवंतिजा ही भाषा धूर्तांच्या तोंडीं आहे, आणि धूर्त म्हणजे सोंगट्या खेळणारे अथवा द्यूतकार असा लासेननें ( इन्स्टिट्यूशनेस लिंग्वाए प्राकृतिके पा. ३६ ) अर्थ दिला आहे. लासेन ( पा० ४१७–४१९ ) वरील कारणास्तव असें म्हणतो कीं, माथुराच्या तोंडीं असलेली भाषा आवंती होय. पण हें म्हणणें चुकीचें आहे. क्रमादीश्वर ५. ९९ याच्याप्रमाणें मार्कंडेयानें आवंतीचा भाषाः यांत समावेश केला आहे, आणि पुढें तो म्हणतो कीं, आवंतीभाषा म्हणजे महाराष्ट्री आणि शौरसेनी यांचें मिश्रण आहे. पुढील एकाच वाक्यांत हें मिश्रण पाहावयास सांपडतें आवन्ती स्यात् माहाराष्ट्री शौरसेन्यास्तु संकरात् ॥ अनयोः संकराद् आवन्तीभाषा सिद्धा स्यात् । संकरश्चैकस्मिन्नेव वाक्ये बोद्धव्यः । उदा० त्यामध्यें असें म्हटलें आहेः होइ = भवति, पेच्छदि = प्रेक्षते, दरिसेदि = दर्शयति. हें वर्णन रक्षकाधिकारी याच्या तोंडच्या भाषेशीं जुळणारें आहे. एका पद्यांत ( ९९. १६. १७ ) एकत्र शेजारीं शेजारीं पुढील शब्दप्रयोग आलेले आहेत. शौरसेनी, अच्छध. माहाराष्ट्री भेत्तूण, वच्चइ; ( ९९, २४. २५ ). शौ. आअच्छध व माहा. तुरिअम्, जत्तेह, करेज्जाह, पढवइ, ( १००, ४ ). दरिसेसि; ( १००, १२ ) माहाराष्ट्री जह) याच्या शेजारीं शौरसेनी खुडिदो; ( १००, १९; १०१, ७; १०५. ९ ) वच्चदि, माहाराष्ट्रीचें मिश्रण वच्चइ ( ९९, १७, व शौरसेनी वज्जदि; तसेंच यज्जइ ( १००; १५ ); कहिज्जदि

( १०३,१५ ) व ( १०३, १६ सासिज्जाई; ) दुसरें शुद्ध माहाराष्ट्री रूप आहे, व पहिलें माहाराष्ट्री कहिज्जइ व शौरसेनी कधीअदि यांचें मिश्ररूप आहे; आणि याप्रमाणें गद्यांत व पद्यांत पुष्कळ उदाहरणें आहेत. या पुराव्यावरून पृथ्वीधरानें केलेलें विधान बरोबर आहे असें दिसेल. अवंति म्हणजे माळवा महाराष्ट्राशेजारीं आहे. त्यामुळें मालवींत आज मराठी सपाटूनच शिरली आहे. परंतु चंदनकासंबंधानें बोलावयाचें म्हणजे असें कीं, त्याचें स्वतःचें वाक्य त्याच्या विरुद्ध जात आहे ( १०३, ५: ) वअम् दक्खिणत्ता अव्वत्त भासिणो'' म्लेच्छजातीनाम्अनेकदेशभाषाभिज्ञा यथेष्टम् मंत्रयामः म्हणजे आम्ही दाक्षिणात्य अस्पष्ट बोलतों, पुष्कळ म्लेंच्छ जातींच्या देशांतील भाषा आम्हास माहीत असल्याकारणामुळें आमच्या इच्छेस येईल त्याप्रमाणें आम्ही बोलतों—याप्रमाणें चंदनकानें स्वतःच स्वतःस दक्षिणदेशीय ( दाक्षिणात्य ) असें म्हटलें आहे; व हीच गोष्ट त्याच्या तोंडच्या उद्गारांवरून ( १०३, १५ ) दर्शविली जाते. ते उद्गार असे. कन्नडकलह प्पओअम् करोमि "कर्णाटातील (कर्नाटकातील ) पद्धतीप्रमाणें मी भांडणास सुरवात करीन". या वाक्यांवरून तो आवन्ती भाषा बोलणारा असावा हें म्हणणें अगदीं असंभवनीय आहे; उलट असें गृहीत धरलें पाहिजे; कीं, त्याची भाषा दाक्षिणात्य असली पाहिजे. व ती भाषा सात भाषांपैकीं एक आहे असें भरतानें म्हटलें ( १७ ४८ ) आहे; आणि ती ( १७, ५२ साहित्य. पा० १७३,५ यांत म्हटल्या प्रमाणें ) त्या नाटकांतील व्याध व रक्षकाधिकारी यांच्या तोंडीं आहे. मार्कंडेयानें ती भाषा चमत्कारिक आहे, तिचीं विशिष्ट लक्षणें अशीं कांहींच नाहींत असें म्हणून ती विचारांत घेतलीच नाहीं ( लक्षणाकरणात्). लॅसेन ( पा. ४१४–४१६ ) म्हणतो कीं, मृच्छकटिकांतील एक नांव न दिलेल्या द्यूतकाराच्या तोंडीं दाक्षिणात्य ही भाषा आहे; आणि या भाषेचा शाकुंतलांतील रक्षकाधिकारी याच्या तोंडीं असलेल्या भाषेशीं संबंध असल्याचें दाखविण्याचा त्यांनें प्रयत्न केला आहे तथापि दोन्हींहि गोष्टी चूक आहेत. द्यूतकाराच्या तोंडची भाषा ढक्की आहे. आणि रक्षकाधिकाराच्या तोंडीं असलेली भाषा ही सामान्य शौरसेनी भाषेहून मुळींच निराळी नाहीं आणि असेंच बॉथलिंक याच्या पूर्वीच निदर्शनास आलेले आहे, बंगालमधील कांहीं हस्तप्रतींवरून ज्या अर्थी ' ह 'वर्णयुक्त सर्व अक्षरांचें द्वित्व होतें असें दिसलें त्यावरून त्या भाषेंत दाक्षिणात्य भाषेंतील विशेष धर्म दिसून येतात असें मला पूर्वी वाटत होतें असें पिशेल म्हणतो परंतु आतां असें आढळून आलें आहे कीं, हा द्वित्वाचा प्रकार मागधी भाषेंतील हस्तलेखांतहि आढळतो; तेव्हां ही गोष्ट एखाद्या विशिष्ट भाषेचें विशिष्ट लक्षण आहे असें मुळींच म्हणतां येत नाहीं, तर हा केवळ एक लेखनपद्धतींतील विशिष्ट प्रकार आहे एवढेंच ठरवितां येण्यासारखें आहे कीं, दाक्षिणात्या या भाषेचें वीरकाच्या तोंडीं असलेल्या आवंती भाषेशीं फार निकट साम्य असलें पाहिजे; परंतु त्या दोन्ही भाषांचें शौरसेनी भाषेशीं साम्य असावें. आणि शौरसेनी भाषांतील पद्धतीच्या विरुद्ध असे भाषांचें मिश्रणहि आवंती भाषेंत झालेलें आढळतें; त्याचीं उदा० अम्हेबद्दल वअम, दो = द्वौ, आणि विशेष चमत्कारिक प्रकार म्हणजे ' त्य 'बद्दल ' त्त ' असा फरक दाक्षिणात्य भाषेंतल्याप्रमाणें होत असतो. दरिसअंति असें रूप शौरसेनी भाषेंत झालेलें मृच्छकटिकांत आढळतें. या भाषेची फारशी माहिती आढळत नाहीं.

**आवळी,** नां वें.—संस्कृतमध्यें आमलकी. इंग्रजींत एम्ब्लीक मायरोबॅलन. मराठींत आंवळा, आवळकठी. हिंदींत आमल, अमरी इत्यादि नांवें आहेत. याचीं पानें शमीच्या पाना सारखीं असतात. व फळ साधारण सुपारीच्या आकाराचें असतें. आवळ्याच्या दोन जाती आहेत एक रानआवळा व दुसरा पांढरा आवळा. यांसच कृष्णआवळा व रायआवळा असें म्हणतात. हें झाड साधारण उंचीचें असून हिंदुस्थान व ब्रह्मदेश येथें सर्वत्र आढळतें. ४००० फूट उंचीवर सुद्धां मुख्यत्वेंकरून रुक्ष जंगलांत हीं झाडें होतात.

या झाडापासून डिंक निघतो. याचीं फळें, साल, व पानें यांचा उपयोग रंगविणें व कातडीं कमावणें यांच्याकडे करतात. कच्च्या अथवा हिरव्या आंवळयांच्या वाळलेल्या गिरांत शें. ३५ ट्यानिक अम्ल असतें. परंतु पिकलेल्या आंवळ्यांत त्याचा फारच थोडा अंश असतो. कातडीं कमावण्यास या झाडाचीं पानें सर्वांत चांगलीं आहेत असें बंगालप्रांतांतील चांभार समजतात. पानांत शें. १८ टॅनिकाम्ल असतें. त्रावणकोरमध्यें साल कातडीं कमावण्याकडे लावितात. फक्त फळापासून काळवट करडा रंग निघतो. काळा रंग होण्यासाठीं आंवळ्याच्या फळांत लोहाचे क्षार किंवा दुसऱ्या झाडांच्या साली मिसळतात. आंवळ्याची साल व पानें मिळून फळासारखाच रंग निघतो. आंवळा, हिरडा, जांभूळ व पेरु या झाडाच्या सालींपासून सिबसागर जिल्ह्याच्या जोर्हाट विभागामध्यें काळा रंग तयार करतात.

ह्या व इतर जातीच्या आंवळ्याच्या ताज्या रसाचा उपयोग थंड व दाहोपशामक सरबत म्हणून करतात. वव येण्यासाठीं ह्याचा रस शिरक्यांत घालतात. पिकलेलीं फळें स्तम्भक व रेचक म्हणून वापरतात. आंवळे खातात व त्यांचीं लोणचीं तयार करतात. कांहीं ठिकाणीं उकडून व त्यांच्या गिराचा रांधा करून त्याचीं भांडीं तयार करतात.

आंवळीच्या लांकडाचे चांगलें वासे होतात. त्याचप्रमाणें याचा शेतकीचीं आऊतें, व इमारती सामान करण्याकडे उपयोग होतो. पाण्यांत हें लांकूड टिकाऊ असल्यामुळें विहिरीच्या कामीं याचा उपयोग करितात.

आंवळा स्वभावतः हृद्य, रुचिकारक, मूत्रल, पित्तशामक आणि किंचित सारक आहे. आमपचन कर-

ण्याचाहि याच्या अंगीं मोठा धर्म आहे. त्याच्या अंगीं असलेल्या काषायरसानें तो कफदोष कमी करतो. मधुर रसानें पित्त कमी होतें. आणि आम्ल रसाच्या योगानें वातदोषाचें संयमन होतें.

आंवळयाची विशेष प्रसिद्धि पित्तशामक म्हणून आहे. आम्लपित्ताच्या विकारांत आवळ्याचा उपयोग फार करतात नेत्राभिष्यंद, अनंतवास, अन्यतोवात ह्या विकारात आवळ्याचें चूर्ण अगर काढा यांत सुवर्णमाक्षिक मिश्रकरून दिलें असतां उत्तम उपयोग होतो. उपदंशामुळें स्वरभेद झाल्यास आंवळयाचा उपयोग करावा. क्षयाच्या अगदीं प्रथमावस्थेंत व बाळन्तपणानंतर होणाऱ्या क्षयांत याचा उपयोग होतो. आंवळा, दालचिनी, जिरे, व खडीसाखर यांचा काढा कसल्याहि पित्तविकारांवर उत्तम उपयोगी पडतो. पित्तजन्य अतिसार, मूत्रकृछ्र व सर्व प्रकारचे मेह यांवर आंवळयाचा चांगला उपयोग होतो. संधिवाताच्या विकारांत आंवळा हें उत्तमापैकीं एक औषध आहे. रसायन म्हणजे शक्तिवर्धक म्हणूनहि आंवळयाचा उपयोग करण्याचा प्रघात आहे. जरा न येण्यास आवळकठी पाण्यांत वाटून अंगास लावून नंतर कांहीं वेळानें स्नान करावें याप्रमाणें नित्यक्रम ठेवल्यास वार्धक्य येणार नाहीं व केशहि पांढरे होणार नाहींत असें आर्यवैद्यकांत सांगितलें आहे. याप्रमाणें आवळकाठीचे निरनिराळे उपयोग आहेत.

भु ई आ व ळी.—हिची पानें लाजाळूच्या पानासारखीं बारिक असतात.व उंची वीत दोन वीत असते.पावसाळ्यांत ही झाडें उगवतात. या झाडाच्या डाहळीस नाचण्याएवढी बारीक फळें येतात. त्यांचा रंग हिरवा असतो. याला संस्कृतांत भूम्यालकी म्हणतात. जरामला, सदाहझुरमनी, तिरूरी, किझ, कायनेली इत्यादि याचीं दुसरीं नांवें आहेत. ही लहान वनस्पती पंजाबपासून पूर्वेस आसामपर्यंत व दक्षिणेस त्रावणकोर, मलाक्का व सिलोनपर्यंत हिंदुस्थानांतील सर्व उष्ण भागांत आढळते. ३००० फूट उंचीवर सुद्धां ही वनस्पति सांपडते. मूत्रवर्धक म्हणून या वनस्पतीचा फार उपयोग होतो. व देशी वैद्यकांतहि ही वनस्पती फार वापरतात. उदाहरणार्थ प्रदरावरः—भुईआवळीचें मूळ तांदुळाच्या धुवणांत वाटून रस काढावा व त्यांत तूप घालून तीन दिवस घ्यावें म्हणजे दुःसाध्य प्रदरही बरा होतो.

आ व ळे ः—आवळयाचा साधारण मोसम कार्तिक, मार्गशीर्ष मासाच्या सुमारास असतो. त्यावेळीं आंवळे आणून त्यांचा रस काढावा.

र स का ढ ण्या चा प्र का रः—आवळे आणून त्यांतील आंटोळी बाहेर काढावी व फक्त आवळयाचा मगज घेऊन लांकडी अगर दगडी उखळींत अगर दगडी खलबत्त्यांत कुटून रस काढावा. लोखंडी बत्ता अगर खल यांचा उपयोग करूं नये कारण लोखंडाचे स्पर्शानें रस काळ्या रंगाचा उतरेल. आवळेल तयार करणें असल्यास त्यासाठीं पुढील प्रत्येक जिन्नस १ छटाकप्रमाणेंः—गवला,कचोरा,कपुरकाचरी, मेंदी, वाळा, पाचपाला, दवणा, मरवा, ब्रह्मी, नागरमोथा, बावची, गुलाबकळी, जटामांशी. अर्धा छटाक नखला; पुढील प्रत्येक जिन्नस १ छटाक कवड्याऊद दालचिनी, नागकेशर. एक १ तोळा लवंगफूल. पुढील प्रत्येक जिन्नस १ छटाकः–बादिआणा, जायफळ, वेलजोडे ( इलायची ) इत्यादि घ्यावें.

वरील मसाल्याच्या वजनाच्या चौपट ताज्या आंवळयाचा रस किंवा तो न मिळाल्यास आवळकठीचा काढा घेऊन त्यांत ५ शेर पाणी घालून पाणी आटेपर्यंत १–२ दिवस भांड्यांत तसेंच झांकून ठेवावें. सर्व मिश्रणाच्या दुप्पट आकाराचें तरी भांडें असावें. कारण पुढील कृति सर्व विस्तवावरती करण्याची असून तेलांत मिश्रित झालेलें पाणी जाळण्याची असल्यामुळें भांडें मोठें घेणें जरूर आहे. याप्रमाणें भांडें घेतल्यावर त्याच्यावर बसेल असें दुसरें एखादें भांडें ठेवून त्याभोंवतीं फडकें गुंडाळावें व त्यावर मातीचें लिंपण द्यावें. नंतर मैदानांत उघड्या जागेवर चूल मांडून त्या चुलीवर हें भांडें ठेवावें व मंद जाळ लावावा. तसेंच वरच्या भांड्यांत थोडेंसें म्हणजे अजमासें दहा तोळे थंड पाणी ओतावें म्हणजे ह्या वरील भांड्यांतील पाण्यास आधण येईल. अशीं अजमासें ४।५ आधणें काढावीं.म्हणजे खालच्या भांड्यांतील आवळयाचा रस जळून आंत पिवळट हिरवट रंगाचें उत्तम तेल शिल्लक राहील. नंतर तें भांडें उतरून ठेवावें व सुमारें चोवीस तासांनीं थंड झाल्यावर असें आढळून येईल कीं, अजमासे २०–२५ तोळे तेल पूर्वीपेक्षां कमी निघालें आहे. सुगंध जास्त येण्याकरतां सुगंधी अर्क एक तोळ्यापर्यंत टाकावा. बाटल्या बंद करतेवेळीं १ तोळा कापराची भुकटी टाकावी म्हणजे तेल लौकर खवट होणार नाहीं. बाटल्या भरल्यानंतर घट्ट बूच बसवून वर मेण अगर लाख लावावी.

याच कृतीनें आवळयाच्या रसाचे ऐवजीं ब्राह्मीरस,नागरमोथा, या जिनसा तेलांत घातल्या असतां ब्राह्मी तेल, नागर तेल वगैरे तेलें तयार करतां येतील.

[ सं द र्भ ग्रं थ.—पदे. वाट. फार्माको. इंडिको, ३ बावरमेमाइर्स ( लेडन–एर्स्किनचें भाषांतर ) डंकन–मोनोग्रॅफ्स, डाईज अँड डाईंग इन् आसाम. हूपर–अग्रि. लेज. १९०२, नं १. भिषग्विलास पु. ३० अं. २–३. दूत मे १९२१ ]

आवाळू ( अर्बुक ) नि दा न–शरीराच्या कोणत्याहि भागीं दोष मांस व रक्त दुष्ट करून दुखावा फार नसलेला, मोठा अतिशय खोल, लौकर वाढणारा व न पिकणारा, वाटोळा व स्थिर असा जो मांसाचा उंचवटा उत्पन्न करितात त्यास अर्बुद किंवा आवाळूं असें म्हणतात. वातानें, पित्तानें, कफानें, रक्तानें, मांसानें व मेदानें होणारा हा विकार ६ प्रकारचा आहे. याचीं व शरीरावर होणाऱ्या गांठीचीं लक्षणें सारखींच आहेत. दोष दुष्ट होऊन रक्त व शिरा यांस संकुचित करून व मांस गोळा करून मांसांकुर वाढलेला मांसाचा गोळा

उत्पन्न करितात व त्यांतून रक्ताचा स्राव होऊं लागतो व त्यामुळें फार रक्त जातें. हा रक्तदोषामुळें झालेला आवाळूचा विकार असाध्य होतो, कारण रक्त फार गेलें म्हणजे रक्तक्षयाचे जे पांडु इत्यादि रोग ते रोग होऊन प्राणहानि होते. मांसल मनुष्याच्या अंगावर मुष्टिप्रहार किंवा इतर मोठे आघात झाले असतां मांस दुष्ट होतें त्यांत ठणका नसतो. त्याचा रंग बदलत नाहीं तें दगडासारखें घट्ट असतें हें मांसार्बुद होय. हें बरें होत नाहीं.

रक्तजन्य व मांसजन्य जीं असाध्य अर्बुदें सांगितलीं त्यां शिवाय बाकीचीं अर्बुदें साध्य आहेत तथापि त्यांतहि कांहीं असाध्य आहेत तीं येणेंप्रमाणेः—ज्या अर्बुदांतून स्राव फार झाला आहे किंवा जें हृदय, बस्ती, इत्यादि मर्मावर झालें आहे अथवा एखाद्या स्रोतसांत झालें आहे, तें अर्बुद बरें होत नाहीं. केव्हां केव्हां पूर्वी झालेल्या आवाळावर दुसरें आवळूं येतें त्यास अध्यर्बुद व जें जोडीनें म्हणजे एकास एक चिटकून दोन उंचवटे येतात त्यास द्विरर्बुद म्हणतात, हें असाध्य आहे. व्याधिस्वभावामुळें व कफ आणि मेद यांचें आधिक्य असल्यामुळें हीं आंवाळें पिकत नाहींत.

चि कि त्सा.—आवाळूंची चिकित्सा ग्रंथिचिकित्सेप्रमाणेंच करावी, कारण ग्रंथी व आवाळू ह्यांची दोष व दुष्य हीं सारखींच आहेत.

वातार्बुदावर दूध, तुप, व तेल यांत तयार केलेलीं पोटिसें बांधून शेकावें. शिंगानें रक्त काढावें, रक्त वरचेवर काढून पोटिसें बांधून शेकावें. वातघ्न औषधें पोटांत घ्यावीं.

पित्तार्बुदावर विरेचन घ्यावें, व पोटिसें फार उष्ण नाहींत अशीं बांधावीं व तीं घृतयुक्त असावीं. उंबर, साग, यांचीं पानें मधांत वांटून अर्बुदावर लेप करावा.

कफार्बुदावर प्रथम ओकारीचें औषध देऊन विरेचन घ्यावें नंतर तें कापून काढावें व कापल्यावर व्रणाप्रमाणें चिकित्सा करावी. याप्रमाणेंच रक्तार्बुद व मेदोर्बुद यावर चिकित्सा करावी.

जवखार, वावडिंग, व गंधक यांचें बारीक चूर्ण करून सरड्याचे रक्तांत खलून आवाळूवर लेप द्यावा, त्यानें तें नाश पावतें असें राजमार्तंडांत लिहिलें आहे.

थोर मथाळाचा पाला कांजींत वाटावा, त्यांत मीठ घालून आवाळूवर लेप दिला असतां कांहीं दिवसांनीं त्याचा नाश होतो.

निवडुंगाच्या गीरानें आवाळू शेकलें असतां नाश पावतें. हळद, लोध्र, पतंगाचें लांकूड, गूळ, घेरोसा, मनशीळ, यांचा मधांत लेप करावा म्हणजे मेदोर्बुद बरें होतें. शर्करार्बुदावरही हेच उपाय करावेत. कोणतेंहि अर्बुद फार मोठें झालें आणि तें मर्मावर नसलें तर शस्त्रानें कापून काढणें हाच मुख्य उपाय आहे.



दुधाचे पदार्थ, अनुपमांस, पिष्टान्न, जड पदार्थ गोड पदार्थ, व अभिष्यंदी पदार्थ आवाळु झालेल्या मनुष्यानें वर्ज करावे.

**आविक्षितः**—मरुत्ताचें नामांतर ( ऐ. ब्रा. ८.२१ श. ब्रा. १३ ५, ४, ९, ) हा दिष्टकुलोत्पन्न सार्वभौम राजा होता. हा शौर्यानें इंद्राच्या तोडीचा, यज्ञशील, धर्मावर श्रद्धा ठेवणारा, धैर्यशाली व जितेंद्रिय असा तेजानें सूर्यासारखा, क्षमेनें पृथ्वीसारखा, बुद्धीनें बृहस्पतीसमान आणि धैर्यानें हिमालयासारखा होता असें वर्णन आहे. कर्म, वाणी, दम व प्रशम यांच्या योगानें त्या राजानें प्रजा संतुष्ट ठेविली होती. त्यानें शंभर अश्वमेध यज्ञ यथासांग केले, व स्वतः विद्वान् बृहस्पतीनें त्याचें याजन केलें.(महाभारत आश्वमेधिक पर्व अ–४ ).

**आव्हा**—ब्रह्मदेशची जुनी राजधानी. जुन्या शहराचा अवशेष भाग मितंगी ( दोक्तावदी ) व इरावती या नद्यांच्या संगमावर आहे. मितंगी व इरावती यांच्यामध्यें तयार केलेल्या कालव्याच्या योगानें बनलेल्या एका त्रिकोणाकृति बेटावर ईशान्य टोंकाला, हें गांव वसलेलें होतें. गांवाच्या बाहेरच्या व आंतल्या भिंतींसभोंवतीं खंदक आहेत. राजवाड्याच्या भागापैकीं फक्त एक विटांचा डळमळीत बुरुज शिल्लक उरला आहे. दोन्ही भिंती मात्र अद्याप चांगल्या मजबूत आहेत, त्यावरून हें शहर भरभराटीच्या वेळीं कसें असावें, याची थोडी-बहुत कल्पना होते. या दोन भिंतींमधील प्रदेशांत शेतें, घरें, व पूर्वीच्या देवालयांच्या विटांचे वृक्षाच्छादित ढीग दिसतात. हा बुरुज व भिंतीच्या आंतील प्रदेश फारच पाहण्यासारखा आहे. चिंचेचीं फार जुनी व मोठीं अशीं असंख्य झाडें, हिरव्यागार गवतानें आच्छादिलेली जमीन, पुष्कळशीं लहान लहान झाडें, अर्धवट दिसणारीं गवती छपराचीं घरें, भक्कम भिंती व मोडलेलीं देवालयें, वगैरेंच्या योगानें आपण जुन्या राजधानीची जागा पहात नसून एखादें उपवन पहात आहों कीं काय असा भास होतो. प्राचीन पेगू येथील घराणें मोडकळीस आल्यानंतर, थाडोमिनपया ह्या राजानें १३६४ मध्यें ह्या शहराची स्थापना केली. चवदाव्या व पंधराव्या शतकांत आव्हाचे राजे तलेंगांच्या प्रदेशावर स्वारी करण्यांत किंवा पेगूच्या लोकांच्या हल्ल्यांचा प्रतिकार करण्यांत गुंतलेले असत. त्या अवधींत पुष्कळ वेळां शान राजांनीं आव्हा येथें राज्य केलें. चीननें सैन्यहि या गांवाजवळ एकदां उतरलें होतें. १६ व्या शतकांत टोंगू घराणें बलिष्ठ होऊन १५५४ त वेयिन राजानें ब्रह्मी राजधानीला वेढा दिला. इ. स. १६३६ पर्यंत आव्हाच्या राजांची सत्ता खालावत गेली; परंतु त्या वर्षी, पेगू व हल्लींच्या ब्रह्मदेशाचा बहुतेक भाग त्यांच्या ताब्यांत

आला. अठराव्या शतकाच्या मध्यांत पेगूच्या लोकांनीं बंड करून ब्रह्मी सत्ता झुगारून दिली. इ. स. १७५२ त तलेंग सैन्यानें आव्हा काबीज करून जाळून टाकिलें. थोड्याच दिवसांत अलांगपया यानें तलेंग लोकांचा पराभव केला; व शेबो येथें राजधानी नेली. परंतु १७६६ मध्यें त्याचा मुलगा सिनब्यूशिन यानें आव्हा येथें नवा राजवाडा बांधून राजधानी पुन्हां येथें आणिली. मध्यंतरीं राजधानीची जागा शेबो येथें होती. नंतर थोड्या वर्षांनीं बोडवापया यानें अमरपूर हें नवीन शहर वसवून १७८३ त राजधानी तिकडे नेली; परंतु त्याच्या नातवानें ( बग्यदेव ) ती फिरून आव्हा येथे १८२२ त आणली. ब्रह्मदेशाशीं इंग्रजांचें पहिलें युद्ध झालें त्या वेळीं इंग्रजांचा रोख आव्हावर होता. सरतेशेवटीं बग्यदेवाचा मुलगा थरवदी यानें आव्हा येथील राजधानी कायमची सोडून अमरपूर येथें नेली. ब्रिटिश राज्यांत सामील केल्यावर कांहीं काळ जिल्ह्याचें हें मुख्य ठिकाण होतें. परंतु लवकरच त्याचा अंतर्भाव सगेंग जिल्ह्यांत केला. आव्हा आणि अमरपुर हीं आतां एकत्र जोडलीं आहेत (अमरपुर पहा).

**आशाधर**—व्याघ्रेरवाल कुळांतील, सल्लक्षणाचा मुलगा. आशाधर हा वि. सं. १२९२–१३००या सुमारास उदयास आला. तो सपादलक्षाचा रहिवाशी होता, पण त्याचें राज्य मुसलमानांनीं जिंकून घेतल्यानंतर तो मालव प्रांतांत जाऊन राहिला व तेथें त्यानें जैन धर्मतत्वांचा अभ्यास केला, आणि त्यानें ( वि. सं. १२९२ सालीं ) 'त्रिषष्टिस्मृति' व ( वि. सं. १३०० सालीं ) 'भव्यकुमुदचंद्रिका' असे दोन ग्रंथ लिहिले. यांपैकीं 'भव्यकुमुदचंद्रिका' हा ग्रंथ म्हणजे, त्यानें परमार देवपालाचा मुलगा जैतुगिदेव याच्या कारकीर्दीत स्वतः लिहिलेल्या 'धर्मामृत' नांवाच्या काव्यावरील टीका होय. त्यानें 'जिनयज्ञकल्प' आणि पुष्कळ इतर ग्रंथ लिहिले आहेत.

[ संदर्भ ग्रंथः—मेबल डफ–इंडियन कॉनॉलॉजी. आफ्रेट कोशांत बरेच आशाधर नांवाचे ग्रंथकार सांपडतात. कोणता ग्रंथ नक्की कोणत्या आशाधराचा हें कोशकाराला देखील अजमावतां आलें नाहीं. ]

**आशिया**—हें पृथ्वीच्या पृष्ठभागावरील चार मुख्य खंडांपैकीं एका खंडाचें नांव असून त्यांत, ज्याला जुनें जग म्हणतात, त्यांपैकीं ईशान्येकडील प्रदेशाचा समावेश होतो; व याच जुन्या जगाच्या वायव्येकडील प्रदेशाला यूरोप व नैर्ऋत्येकडील प्रदेशाला आफ्रिका खंड म्हणतात.

आशिया या शब्दाची व्युत्पत्ति फार संशयित आहे. प्राचीन ग्रीक भूगोलवेत्ते एकंदर जगाचे आशिया व यूरोप असे दोनच भाग ( अमेरिका खंड ऊर्फ नवें जग त्या वेळीं अज्ञात होतें) मानीत असत. लिबिया (आफ्रिकेचें ग्रीक नांव) याचा आशियांतच समावेश करीत असत. हिरोडोटसनें मात्र लीबिया हें यूरोप व आशिया यांहून वेगळें असें स्वतंत्र खंड मानलें आहे. पण यूरोप व आशिया हीं नांवें कोठून आलीं याबद्दलचें कोडें त्यालाहि उकललें नाहीं. तथापि त्याचा उलगडा असा दिसतो कीं, यूरोप हें नांव असुरियन किंवा हिब्रू भाषेंतील मूल शब्दापासून निघालेलें असून त्या मूल शब्दाचा अर्थ पश्चिम किंवा मावळणारा सूर्य असा आहे; आणि आशिया हे नांव त्याच भाषेंतील पूर्व किंवा उगवणारा सूर्य अशा अर्थाच्या शब्दापासून निघालेलें आहे. आशिया या शब्दानें सूचित होणारा भूभाग प्रथम बराच अल्प व अनिश्चित स्वरूपाचा होता; व हल्लींहि आशिया खंडाची मर्यादा नैसर्गिक किंवा भौगोलिक परिस्थितीच्या भेदभावाच्या आधारावर ठरविलेली नाहीं.

स्व रू प व र्ण न.—आशियाच्या उत्तरेस आर्टिक महासागर असून आशियाचा उत्तर किनारा ७०° ते ७५° उत्तर अक्षांशाचे दरम्यान म्हणजे शीतकटिबंधांत आहे. त्या किनाऱ्याचें सर्वांत अधिक उत्तरेकडे गेलेलें टोंक चेल्युस्किन भूशिर हें आहे व तें ७८° उत्तर अक्षांशांत आहे. आशियाचा दक्षिण किनारा फारच अनियमित असून अरबस्तान, हिंदुस्थान व कांबोडिया या द्वीपकल्पांचीं टोकें १०° उत्तर अक्षांशापर्यंत खालीं उतरलीं आहेत, आणि मलाया द्वीपकल्पाचें दक्षिण टोंक तर भूमध्यरेषेपासून फक्त दीड अंशाच्या अंतरावर आहे. पश्चिमेकडे आशियाचें सर्वांत पुढें गेलेलें टोंक म्हणजे भूमध्यसमुद्रांतील केप बाबा या नांवाचें भूशिर होय. तें२६°पूर्व रेखांशावर आहे. येथून आशियाची पश्चिम सरहद्द तांबड्या समुद्राच्या कांठानें खालीं अरबस्तानाच्या दक्षिणेस बाबेल-मांडेबच्या आखातापर्यंत जाते, आणि हीच पश्चिम सरहद्द वरती काळा समुद्र, काकेशस पर्वत व उरल पर्वत या मार्गानें आर्टिक महासागरापर्यंत पोहोंचते. आशियाचें सर्वांत पूर्वेकडील टोंक 'ईस्ट केप' १९०° पूर्वरेखांशावर बेहेरिंग सामुद्रधुनीच्या तोंडाशीं आहे. तेथुन आशियाची पूर्व सरहद्द उत्तर पॅसिफिक महासागर, चीनचा समुद्र, पीत समुद्र, टॉगकिंगचे व सयामचें आखात यांना लागलेली आहे.

बे टें—आशियाच्या पूर्वेला व आग्नेयीला बरींच महत्त्वाचीं बेटें आहेत. त्यांपैकीं क्युराइल बेटें, जपानी बेटें, लुचु, फोर्मोसा व फिलिपाईन बेटें हीं आशिया खंडापासून अगदीं दूर व पृथक् आहेत. बोर्निओ व सेलिबिस बेटांच्या पश्चिमेकडील भूभागांत प्राणी व वनस्पती आशिया खंडांतल्यासारखेच आहेत; पण त्या बेटांच्या पूर्वेकडील व दक्षिणेकडील भागांत आस्ट्रेलियांतील जातींचे प्राणी व वनस्पती आढळतात. हा नैसर्गिक परिस्थितींतील फरक विख्यात सृष्टिशास्त्रज्ञ ए. आर. वॉलेस यानें प्रथम निदर्शनास आणून दिला, म्हणून या सरहद्दीला वॉलेसची रेषा' असें म्हणण्याचा प्रघात आहे.

भू पृ ष्ठ व र्ण न.—आशिया खंडाचा विस्तार फार मोठा असल्यामुळें त्याचा आकार कशासारखा आहे हें सांगणें

कठिण आहे. आशिया खंडाच्या एकंदर भूपृष्ठभागाचे तीन विभाग पडतात, पैकीं उत्तरेकडील भूभाग हा साधारणपणें समुद्रसपाटीपासून ५००० फुटांहून कमी उंचीचा असून यांतील बहुतेक नद्या उत्तरवाहिनी आहेत व त्या भूमध्यसमुद्र आर्टिक समुद्र, किंवा कास्पियन समुद्र यांना मिळतात. दुसरा मध्यवर्ती भूभाग खोलगट असून त्यांची उंची २०००फुटांहून अधिक कोठेंहि नाहीं. तिसरा म्हणजे दक्षिणेकडील विभाग. यांत कांहीं डोंगरसपाटीचे प्रदेश फार उंच म्हणजे समुद्रसपाटीपेक्षां १५००० ते १६००० हजार फूट उंच आहेत, तर उलट अरबस्तात, हिंदुस्थान, सयाम व चीन यांतील कांहीं प्रदेश फार सखल आहेत.

स रो व रें.—आशिया खंडांत सरोवरें असंख्यात आहेत. व आकाराचे बाबतींतहि त्यांच्यांत विविधता फार आहे. बैकल व बाल्कश हीं समुद्रप्राय मोठीं सरोवरें आहेत,कित्येक सरोवरें समुद्रसपाटीपासून फार उंचीवर आहेत; उदाहरणार्थ व्हिक्टोरिया सरोवर १३४०० फूट उंचीवर असून बहुधा सर्वांत अधिक उंचीवरचें सरोवर तेंच असावें. हीं सरोवरें म्हणजे प्राचीन हिमयुगाचे अवशेषच होत.

रा ज की य वि भा ग—पृथ्वीच्या पृष्ठभागाचे समुद्रामुळें ज्याप्रमाणें निरनिराळे विभाग पडतात त्याप्रमाणें मोठाले डोंगर व पर्वत यामुळेंहि विभाग पडतात, व अशा निरनिराळ्या विभागांतील लोकांची सामाजिक व राजकीय परिस्थिति पुष्कळच भिन्नभिन्न स्वरूपाची असते असें आढळून येतें. तसेंच समुद्रसपाटीबरोबर सखल प्रदेशांत व डोंगरसपाटीवरच्या उंच प्रदेशांत हवापाण्याच्या दृष्टीनें जे फरक असतात त्यामुळेंहि त्या त्या ठिकाणच्या लोकांच्या शारीरिक व सामाजिक आणि राजकीय परिस्थितींत फरक आढळतो. आशियाखंडांत अशा तऱ्हेची भिन्नता फार आढळते. आशियाखंडाचे राजकीय विभाग पडण्याचें सर्वांत प्रमुख कारण हिमालय पर्वत हें होय. हा पर्वत सुमारें दोनहजार मैल लांब आणि शंभर ते पांचशें मैल रुंद असून त्याचीं बहुतेक शिखरें वीस हजार फूट उंच,व कित्येक त्याहूनहि अधिक उंच आहेत. पृथ्वीवर सर्वांत उंच शिखरें या पर्वताचींच आहेत. या अत्यंत उंच भिंतीप्रमाणें पसरलेल्या हिमालय पर्वतामुळें वारे व पाण्याची वाफ अलीकडून पलीकडे वाहून जाण्यास मोठा अडथळा होतो. अशा या मध्यवर्ती पर्वतामुळें आशियाखंडाचे जे विभाग पडतात ते येणें प्रमाणें—

तिबेट—तिबेट देश म्हणजे हिमालय पर्वतावरचा अत्यंत उंच डोंगरसपाटीचा प्रदेश होय. हा सर्व देश बराच उंचसखल असून त्यांत मोठमोठाले डोंगरहि आहेत. तसेंच या देशांत अनेक सरोवरें आहेत, व अनेक नद्या या देशांत उगम पावतात. यांतील डोंगर व पर्वत निरंतर हिमानें आच्छादित असतात. येथील हवा अत्यंत थंड असते, पण येथें पाऊसहि फार कमी पडतो, त्यामुळें हा देश बहुतेक ओसाड मुलूख असून फार गरीबीच्या स्थितींत आहे. येथें झाडझुडपें फार विरळ आढळतात. मोठालीं उंच झाडें तर बहुतेक कोठेंहि नाहींत. सखल दऱ्यांच्या प्रदेशांतील लोक घरें करून राहतात. व शेतकीवर निर्वाह करतात, व उंच डोंगरसपाटीवरील लोक मेंढपाळांचा धंदा करतात.

चीन देशः—चीन बेट तिबेट व उत्तर पॅसिफिक महासागर यांच्यामध्यें वसलेला आहे. तो उत्तर अक्षांश ४०° ते २०° यांच्यामध्यें यांत मधून मधून साधारण उंचीचे पर्वत आहेत, आणि पश्चिम सरहद्दीवर मात्र मोठाले पर्वत आहेत. या सर्व देशांत पाण्याची विपुलता व चांगली सुपीक जमीन असल्यामुळें सर्वत्र लोकवस्ती चांगली दाट आहे. झाडें व जंगलेंहि आहेत आणि हवा दक्षिण यूरोपांतल्यासारखी उन्हाळ्यांत बरीच उष्ण व हिवाळ्यांत बरीच थंड असते.

इंडोचीनः—या देशांतहि उंच पर्वत असून त्यांच्या रांगा कोचीन चीन व मलाया द्विपकल्पापर्यंत पसरल्या आहेत, आणि त्या रांगामधून मेकांग, मेनाम, सालवीन, व इरावती या मोठाल्या नद्या वाहतात. यांतलि पोटविभाग पाणी विपुल असलेले, सुपीक व दाट वस्तीचे आहेत. येथील हवा बहुतेक पूर्व बंगालच्या हवेसारखी आहे.

हिंदुस्थान.—तिबेटच्या डोंगरसपाटीपासून खालीं हिंदी महासागरापर्यंत हा देश पसरलेला आहे. हिंदुस्थानचा २५° उत्तर अक्षांशापासून खालीं दक्षिणेकडील भागहि डोंगरसपाटीचाच आहे व त्याची उंची कित्येक ठिकाणीं समुद्रसपाटीपासून आठहजार फुटांहून अधिक आहे. पूर्वकडे गंगा व ब्रह्मपुत्रा या नद्यांमधील प्रदेशापासून पश्चिमेकडे सिंधू नदीपर्यंत व हिमालय पर्वताच्या पायथ्याला लागून उत्तर हिंदुस्थानचा मोठा सपाट मुलुख पसरलेला आहे. त्याचें क्षेत्रफळ सुमारें पांच लक्ष चौरस मैल असून हा सर्व प्रदेश फारच सुपीक, दाट वस्तीचा व सुधारणेंमध्यें प्राचीन हिंदुस्थानच्या इतर भागांपेक्षां अधिक प्रगत असे. येथील जमीन इतकी उत्तम आहे कीं, या सुमारें दोन हजार मैल अंतराच्या प्रदेशांत एक बारीक खडाहि सांपडणें कठिण आहे. उत्तर हिंदुस्थानांतील तिन्ही मोठाल्या नद्या—सिंधु, गंगा व ब्रह्मपुत्र—तिबेटांतील उंच प्रदेशांतून निघतात. हिंदुस्थानची लोकसंख्या पुष्कळ आहे, आणि कित्येक जिल्हे जगांतील अत्यंत दाट वस्तीच्या भागापैकीं आहेत. सर्व प्रदेश जंगले तुटून मोकळा झालेला आहे, व मोठालीं अरण्यें फक्त पर्वताच्या बाजूंवर आहेत, पर्जन्य अत्यंत विपुल पडतो. हिंदुस्थानांतलि हवापाणी असें आहे कीं, लोकांना फारसे श्रम करावे न लागतां निर्वाहाला लागणारे सर्व पदार्थ मिळूं शकतात. पण पुष्कळ ठिकाणीं हवा फार उष्ण व कोरडी असल्यामुळें गवताळ कुरणें वाढत नाहींत. बहुतेक लोक शेती व व्यापारधंदा करून पोट भरतात.

सीलोनः—येथील राज्यकारभार स्वतंत्र असून तेथें बौद्धधर्मी लोकांची वस्ती विशेष आहे. सीलोनांतील सर्वांत उंच पर्व-

तांचें शिखर नऊ हजार फूट उंच आहे, व तेथील पर्वताच्या बाजूंवर दाट जंगल आहे. तेथील हवापाणी व जमीनीची सुपीकता मलाया द्वीपकल्पाप्रमाणें आहे.

बंगालच्या उपसागरांतील बेटांपैकीं अंदमान व निकोबार हीं बेटें विशेष महत्त्वाचीं होत. हिंदुस्थानच्या किनाऱ्यालगतची लखदीव व मालदीव हीं प्रवाल कीटक निर्मित बेटें असून हिंदुस्थान सरकारच्या ताब्यांत आहेत.

पश्चिम आशियाचा प्रदेश.—अरबस्तान व सैबेरिया वगळून बाकी सिंधूनदीपासून भूमध्यसमुद्रापर्यंत जो आशिया खंडाचा प्रदेश पसरलेला आहे तोहि डोंगरसपाटीचाच आहे पण तो तिबेटपेक्षां बराच ठेंगणा आहे. त्याची पूर्वपश्चिम लांबी अडीच हजार मैल व रुंदी अडीचशें ते सहाशें मैलाच्या दरम्यान आहे;आणि समुद्रसपाटीवर दोन ते आठ हजार फूटपर्यंत आहे. यामध्यें अफगाणिस्तान, बलुचिस्तान, इराण उर्फ पर्शिया, आर्मेनिया व आशियामायनर इतके देश असून त्यांपैकीं पूर्वभाग म्हणजे इराण अफगाणिस्तान व बलुचिस्तान हे देश गरीब व नापिक आहेत. येथील हवा हिंवाळ्यांत कडक थंड व उन्हाळ्यांत प्रखर उष्ण असते. पर्जन्य फार कमी पडतो; लोकवस्ती विरळ, बहुतेक भटकणारी व लुटालुट करणारी आहे. कलाकौशल्य व सुधारणा यांत त्यांची प्रगति फार अल्प आहे. पश्चिमेकडील प्रदेश म्हणजे आशिया मायनर वगैरे प्रांत तुर्की साम्राज्यांत आहेत. तेथील हवा कमी उष्ण असून जमीन बरीच सुपीक आहे. लोकवस्ती अधिक स्थायिक व अधिक सुधारलेली आहे.

अ र ब स्ता न.—याचा उत्तर भाग खेरीज करून बाकी सर्व प्रदेश ३००० तें ४००० फूट उंचीच्या पर्वतांनीं व्यापलेला आहे. समुद्रकिनाऱ्यालगत पाऊस बराच पडतो त्यामुळें तो भाग सुपीक आहे. पण बहुतेक ओसाड भाग वाळवंटमय आहे. या देशांत बरींच स्वतंत्र लहान लहान संस्थानें असून त्यांतील लोक भटकणारे, मेंढ्या पाळणारे व लुटालूट करणारे आहेत.

मध्य आशियाः—इराणअफगाणिस्तानच्या उत्तरेला मध्यआशियाचा प्रदेश असून त्यांत बुखारा, खिवा, व तुर्कस्तान यांचा समावेश होतो. या प्रदेशांत उझबेग तुर्कांचें वर्चस्व आहे व येथील लोक भटकणारे व चोऱ्या माऱ्या करणारे आहेत. शेतकीला पुरेल इतका पाऊस कोठेंहि पडत नसल्यामुळें कालवे काढल्याशिवाय शेती होणें शक्य नाहीं. याच भागांत पामीरच्या पठाराचा अंतर्भाव होतो. त्या देशाची सर्व स्थिति तिबेट सारखी आहे. आक्सस व जक्सार्टिस या नद्या येथूनच निघतात.

मांचुरिया.—याच्या उत्तरेस अमूर नदी व पलीकडे याब्लोनाइ व स्टॅनोव्हाई हे पर्वत आहेत. पश्चिमेस खिंगन पर्वताची ओळ आहे.

इराण.—या देशाची भौगोलिक पहाणी शास्त्रीय रीत्या बहुतेक झाली आहे व या देशाला प्राच्य देशांच्या राजकारणांत महत्त्व येत चाललें आहे.

अफगाणिस्तान.—या देशाच्या सीमा ठरविण्याकरितां १८८४ पासून अनकेदां कमिशनें नेमिली गेलीं व १८९७ मध्यें सीमा कायम करण्यांत आल्या.

क्षे त्र फ ळ व रा ज की य वि भा ग.—आशियांतील परतंत्र व स्वतंत्र भागांचें क्षेत्रफळ पुढील प्रमाणें आहे.

| प्रदेश | क्षेत्रफळ | प्रदेश | क्षेत्रफळ |
|---|---|---|---|
| रशिया | ६४९५९७० | जर्मन | १९३ |
| ब्रिटिश | १९९८२२० | तुर्की | ६८१९८० |
| डच | ५८६९८० | चिनी | ४२९९६०० |
| फ्रेंच | २४७५८० | जपानी | १६१११० |
| युनैटेडस्टेटस | ११४३७० | इतर स्वतंत्र मुलूख | २२३२२७० |

एकूण क्षेत्रफळ १६८१९००० चौरस मैल, आणि लोकसंख्या ८२३०००००० आहे.

ह वा मा न.—पृथ्वीच्या पाठीवर ज्या ठिकाणीं हवेंतील उष्णतामान अत्यंत कमी अंशापर्यंत उतरतें, अशा ठिकाणांपैकीं कांहीं ठिकाणें उत्तर आशियांत आहेत. आणि ज्या ठिकाणीं उष्णतामान सर्वांत अधिक चढतें अशांपैकीं कांहीं ठिकाणें दक्षिण आशियांत आहेत. पूर्व सैबेरियाच्या उत्तर किनाऱ्याचें सरासरी उष्णतामान फॉरेनहैट शून्यांशाहून थोडेसें अधिक असतें. आणि जास्तींत जास्त उष्णतामानाची दक्षिण आशियांतील सरासरी ८२° हून फारशी अधिक नाहीं.

ऋतुमानानुसार उष्णतामानांत पडणारें अंतर सैबेरियांत फार मोठें आढळतें. किनाऱ्यावरील मुलुखांत उन्हाळ्यांतील आणि हिवाळ्यांतील सरासरीं उष्णतामानांतलें अंतर १०० हूनेहि अधिक असतें. दक्षिण आशियांत मात्र हें अंतर कमी व असतें भूमध्यरेषेजवळ तें सुमारें ५°असतें. सैबीरिया मध्यें उन्हाळ्यांतील आणि हिवाळ्यांतील सरासरीं उष्णतामानांतलें अंतर कोठेंहि ६०° हून कमी नसतें. आरल समुद्राजवळ हें अंतर ८०° असतें. कास्पीयन समुद्रावरील आस्ट्राखान येथें ५०° हून अधिक असतें आणि टिफ्लिस येथें ४५° असतें. उत्तर चीनांत पेकिंग येथें ५५ कँटन येथें ३०° आणि मनिला येथें २०°. उत्तर हिंदुस्थानांत सर्वांत अधिक अंतर ४०° हून अधिक नसतें. कलकत्त्यास तें १५° व मुंबई येथें १०° किंवा १२° असतें. इराणच्या आखाताच्या नजीकच्या प्रदेशांत उष्णतामान बहुतेक उत्तर हिंदुस्थानांतल्यासारखें असतें आणि एडन येथें मद्रास शहरासारखें असतें. सिंगापूर येथें ५० हून कमी अंतर असतें व सुमारें तितकेंच जावा बेटांतील टेव्हिया येथें, आणि सिलोन मधील गॅले येथें असतें. सैबिरियांत जास्तींत जास्त उष्णता ८०° व ९०° यांच्यां दरम्यान असतें आणि कमींत कमी उष्णतामान ४०° फ आणि

७० यांच्या दरम्यान असतें. कास्पियन आणि आरल समुद्राजवळ सर्वोच्च उष्णतामान १००° पर्यंत असतें आणि नीचतम उष्णता मान २०° किंवा त्याहूनहि कमी असतें. दक्षिण आशियांत सर्वांत अधिक उष्णतामान ११०° किंवा ११२° याहून अधिक क्वचित असतें. उत्तर हिंदुस्थानांत ३०° अक्षांशावर उष्णतामान ३२ पेक्षां खालीं क्वचित जातें. कलकत्त्यास ४०° पर्यंत मद्रासेस ६५° पर्यंत आणि मुंबईस ६०° पर्यंत उष्णतामान उतरतें. सिंगापूर व बेटेव्हिया येथील उष्णतामान ७०° खालीं क्वचित जातें. एडनचें उष्णतामान कमींत कमी ७०° पर्यंत आणि जास्तींत जास्त १००° पर्यंत असतें.

वरील आंकड्यावरून आशियाखंडांतील उष्णतामानाची साधारण कल्पना येतें. आशियाखंडाच्या उत्तर भागांत हिंवाळा बराच काळ टिकणारा व फार कडक असतो. ३५° उत्तर अक्षांशांच्या उत्तरेकडील प्रदेशांत कमींत कमी उष्णतामान पुष्कळदां शून्यांश असतें. आशियाखंडांत उन्हाळा बहुतेक सर्वत्र कडक असतो, पण उत्तर आशियांत तो थोडा काळ टिकतो, व तेथील उष्णता दक्षिण आशियांतील उष्णतेपेक्षां थोडी कमी असते. आशियाच्या दक्षिण व पूर्व भागांत समुद्राच्या सान्निध्यामुळें उन्हाळा कमी भासतो. आशियाच्या मध्यभागांतील अफगाणिस्तान व इराण या देशांतील डोंगरसपाटीच्या प्रदेशांत हिंवाळा फार कडक असतो. आणि पाऊस कमी आणि प्रदेश नापिक असल्यामुळें उन्हाळ्यांत उष्णता अधिक वाढते. आशियाखंडापैकीं उष्णकटिबंधांत असलेल्या प्रदेशांत उन्हाळ्यांतील वाढत जाणाऱ्या उष्णतामानावर उन्हाळ्यांत मधून मधून होणाऱ्या पर्जन्यवृष्टीचा सुपरिणाम होत असल्यामुळें उन्हाळ्यांतलें उष्णतामान अत्युच्च कोटीला जात नाहीं.

**वातावरणाचा दाब आणि वारे.**—उन्हाळ्यांत उष्णता पुष्कळ वाढून हवा विरळ होऊन दूरवर पसरल्यामुळें वातावरणाचा दाब कमी होतो. उलटपक्षीं हिंवाळ्यामध्यें हवा थंड होऊन एकत्र जमते व त्यामुळें वातावरणाचा दाब वाढतो. आशियाखंडांतील बहुतेक भागांत उन्हाळ्यामध्यें हवामापक यंत्रावरचा दाब कमी झालेला आढळतो आणि हिंवाळ्यांत वाढतो हा ऋतुमानाप्रमाणें उष्ण व थंड होणाऱ्या हवेचा परिणाम आहे.

ऋतुमानाप्रमाणें वातावरणाच्या दाबांत होणाऱ्या फेरबदलामुळें नियतकालिक वारे उत्पन्न होत असतात. हे नियतकालिक वारे वाहण्याची दिशा एकच नसून अनेक स्थानिक कारणामुळें ती दिशा निरनिराळी असते. उदाहरणार्थ आरबी समुद्र, बंगालचा उपसागर, चिनी समुद्र वगैरे ठिकाणच्या वाऱ्यांच्या दिशा निरनिराळ्या असतात.

आशियाखंडांतील उष्ण कटिबंधांतल्या समुद्रांत दुसरा एक महत्त्वाचा सृष्टिचमत्कार पहावयास सांपडतो. तो चमत्कार म्हणजे वाऱ्याचे भोंवरे उर्फ चक्रवात होय. असे चक्रवात हिंदीमहासागर आणि चिनी समुद्र यांवर उन्हाळ्याच्या महिन्यांत फार वेळां उद्भवतात.

**पर्जन्यवृष्टि.**—हिंदीमहासागरावरून जी तापलेली हवा हिंदुस्थान, ब्रह्मदेश व सयाम या देशांकडे वहात येते तिच्याबरोबर पाण्याची झालेली वाफहि बरीच वाहून येतें. आणि त्यामुळें या प्रदेशांत पर्जन्यवृष्टि बरीच होते. हिंदुस्थानांतील सह्याद्रि पर्वत आणि मलाया द्वीपकल्पांतील पश्चिम किनारा या ठिकाणीं पुष्कळ पाऊस पडण्याचें कारण वर सांगितल्याप्रमाणें आहे. कलकत्त्याच्या ईशान्येस खासी नांवाच्या पर्वतांवर जगांतील कोणत्याहि ठिकाणापेक्षां अधिक ( दरवर्षी ६०० इंचाहून अधिक ) पाऊस पडतो. उत्तर आशियांत व्होल्गा नदी आणि मांचुरियांतील लेना नदी यांच्या दरम्यानच्या प्रदेशांत आणि उत्तर चीनांत १९—२९ इंच पाऊस पडतो. टिफ्लिस येथें २२ इंच पडतो. कास्पियन समुद्रावर ७ किंवा ८ इंच; आरल समुद्रावर ५ किंवा ६ इंच पडतो. पूर्व सैबेरिया १५ ते २० इंच; चीनांतील पेकिंग येथें २३ इंच; पण कँटन येथें ७८ इंच पाऊस पडतो. जाव्हा बेटांतील बटेव्हिया येथें ७८ इंच, आणि सिंगापूर येथें १०० इंच पाऊस पडतो. ब्रह्मदेशाच्या किनाऱ्यावर कोठें कोठें २०० इंच पर्यंत पाऊस पडतो. खासी डोंगरांत ४५०० फूट उंचीवर १० वर्षांची पावसाची सरासरी ५५० हून अधिक आहे. येथें एका महिन्यांत १५० पाऊस पडल्याची नोंद आहे. हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्यावर ७५ ते १०० इंचपर्यंत पाऊस पडतो. पण पूर्व किनाऱ्यावर कोठेंहि ५० इंचाहून अधिक पडत नाहीं. सिलोनमध्यें ६० ते ८० इंच पाऊस पडतो.

अफगाणिस्तान, इराण, आशियामायनर व सीरिया यांमध्यें मुख्य पर्जन्यवृष्टि हिंवाळा आणि वसंतऋतु या काळांत होते. आशियांतील इतर सर्व भागांत पाऊस मे व सप्टेंबर या महिन्यांच्या दरम्यान पडतो.

**मानववंश.**—आशियाखंड व आसपासचीं बेटें मिळून मानवजातीच्या मंगोलियन, कॉकेशियन, ऑस्ट्रलॉइड ( द्रविडी वगैरे ) व निग्रो या चारहि प्रमुख वंशांची वस्ती येथें आढळते. अधिक क्षेत्रफळ मंगोलियन वंशाच्या लोकांनीं व्यापिलें आहे. या वंशाच्या लोकांचा वर्ण पिंगट, डोळे व केंस काळे, नाकें चपटीं आणि डोळे तिरकस असतात. त्यांच्या शरीराचा बांधा ठेंगणा असून शरीरावर व चेहऱ्यावर केंस थोडे असतात या वंशाच्या लोकांची वस्ती उत्तर आशिया, तिबेट, चीन, इंडो–मलाया द्वीपकल्प व बेटें इतक्या ठिकाणीं आहे, पण पाप्युआ व इतर पूर्वेकडील बेटांत नाहीं. हा मानववंश फार पुरातन काळापासून या भागांत राहात आहे. आणि उत्तर आशियाच्या ज्या ज्या भागांत हा वंश आहे त्या सर्व ठिकाणची हवा बहुतेक सारखी आहे. याच वंशाच्या पोटशाखा

सर्व अमेरिका खंडांत पसरलेल्या सांपडतात, ही या मानव वंशाबद्दल एक विशेष महत्त्वाची गोष्ट आहे.

उत्तर आशियांतील मोंगोलियन लोक बहुतेक भटके शिकारी, व मेंढ्या गुरेंढोरें पाळणारे आहेत. यांच्यापैकीं सर्वांत मागासलेले पण सर्वांत अधिक शांतताप्रिय लोक सैबेरियांतील होत. यांच्या दक्षिणेकडे राहणारे याच वंशांतले लोक मांचू व मोंगल या नांवाचे असून मोंगल व तुर्क यांना तार्तार म्हणतात, व त्यांनाच प्राचीन काळीं सिथियन (शक) हे नांव असे अशी कित्येकांची समजूत आहे. हे लोक ४० ते ५० अक्षांश दरम्यानच्या प्रदेशांत राहतात. तुर्क लोक मुसुलमान असून ते अफगाणिस्तान, इराण, कास्पियन समुद्राकडील भाग यांत राहतात व ते पर्शियन लिपी वापरतात. मांचु व मोंगोल हे लोक बौद्धधर्मी असून ते प्राचीन सीरियॅक लिपीपासून निघालेली लिपि वापरतात. मांचु लोकांवर चिनी संस्कृतीचा पगडा बसत आहे. तुर्क व मोंगोल या लोकांच्या स्वाऱ्यांनीं जगाच्या इतिहासांत मोठाले परिणाम घडवून आणले आहेत.

मोंगोलिया व हिंदुस्थान यांच्या दरम्यानच्या प्रदेशांत मोंगोल व चिनी जातीचे लोक राहतात. त्यांची भाषा बहुतेक एकावयवी असून लिपी हिंदुस्थानांतील लिपीपासून निघालेल्या आहेत, आणि धर्म बौद्ध आहे. हे लोक म्हणजे तिबेटी, ब्रह्मी व सयामी हे होत. तिबेटांतील मोंगोल जातीचा हिंदुस्थानांतील भिल्ल, कोल्ल या डोंगरी जातींशीं संबंध आहे असें कित्येकांचें मत आहे. आर्यन् लोकप्रमाणें मोंगोलियन लोकहि हिंदुस्थानांत शिरले होते, त्यांनीं तत्पूर्वीच्या नीग्राईड लोकांनां हुसकावून लाविलें, व मंगोलियन लोकांना तदनंतर आलेल्या आर्यन लोकांनीं डोंगररानांत पळवून लाविलें. अंदमान, निकोबार येथील देश्य लोक त्या निग्रॉइड लोकांचेच वंशज असावेत.

मलाया द्वीपकल्प व बेटें यांत राहणारे हल्लींचे मलायी लोकहि मूळ मंगोलियन वंशांतले असून त्यांच्यावर हवापाणी व समुद्रसान्निध्य यांचा फार परिणाम झाला आहे. त्यांच्यावर प्रथम भारतीय संस्कृतीचा परिणाम होऊन ते बरेच सुधारले व पुढें इस्लामी धर्म व संस्कृति पुष्कळांनीं स्वीकारली.

आर्यनः—प्राचीन संस्कृत भाषेपासून निघालेल्या किंवा तिच्याशीं संबंध असलेल्या भाषा बोलणाऱ्या अनेक जातीच्या लोकांनां आर्यन् हें नांव असून अर्थात् हे लोक आशियांतील समशीतोष्ण प्रदेशांत भूमध्यसमुद्रापासून आशिया मायनर, इराण, अफगाणिस्तान, व हिंदुस्थान या प्रदेशांत पसरलेले आहेत. प्राचीन असुरियन भाषेशीं सदृश असलेल्या हल्लींच्या अरबी वगैरे भाषा बोलणारे लोक सेमेटिक वंशांतले आहेत, व ते इराण, सीरिया, अरबस्तान, व उत्तर आफ्रिका या प्रदेशांत आहेत. या लोकांपैकीं कांहींकांहींच्या भाषा परस्पर फार भिन्न आहेत तरी हे सर्व लोक एकाच सेमेटिक वंशांतले आहेत.

हिंदुस्थानांतील आर्यन् लोक हे आशियांतील इतर सर्व ठिकाणच्या आर्यन् वंशी लोकांपेक्षां अधिक सुधारलेले आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. आर्यन् वंशांतले निर्भेळ लोक उत्तर व वायव्य हिंदुस्थानांत आहेत, आणि मध्य व दक्षिण भागांत आर्यन् आस्ट्रलॉईड वंशाच्या मिश्रणानें बनलेले लोक आहेत असें पाश्चिात्य कित्येक संशोधक करतात.. मद्रास व दक्षिण हिंदुस्थानांतील लोक द्राविडोत्पन्न भाषा बोलतात, आणि इतर सर्व हिंदुस्थानांतले लोक संस्कृतोत्पन्न भाषा बोलतात. हिंदुस्थानांत बहुतेक लोक हिंदुधर्मी आहेत, पण सात कोटी मुसुलमान असून ते बहुतेक सर्व भागांत आहेत. हिंदुस्थानाबाहेर पश्चिम आशियांत सर्वत्र मुसुलमान लोक आहेत. फक्त आशियामायनर व सीरिया यांतील कांहीं भागांत ख्रिस्ती लोकांचें संख्याधिक्य आहे. हिंदुस्थानांतील सिंधी व उर्दू यांखेरीज सर्व लिपी डावीकडून उजवीकडे लिहितात. आणि इराण, अरबस्तान, व तुर्कस्तान यांतील लिपी उजवीकडून डावीकडे लिहितात.

ऑस्ट्रलॉइडः—या वंशांतील लोकांचे केस काळे व सामान्यतः मऊ, डोकें व शरीर काळे, नाक रुंद व चपटें, ओंठ जाडे, ओबडधोबड आणि जबडे जड असतात. हिंदुस्थानांतील द्राविड लोक मूळ या वंशातले आहेत असें एक मत आहे. अरबस्तान व इजिप्तमध्येंहि या जातीचे लोक आहेत असें वाटतें.

निग्रॉइड.—या वंशांतील कांहीं लोकांच्या लहान बांध्यावरून याला नेग्रिटो असेंहि नांव पडलें आहे. या लोकांचें दक्षिण आफ्रिकेंतील नीग्रो लोकांशीं फार साम्य आहे. त्यांचा वर्ण विशेष प्रकारचा काळा, केस लोंकरीसारखे भरड, नाकें रुंद व चपटीं, व ओंठ पुढें आलेले असतात. या वंशांतले लोक अंदमान बेटें, पाप्युआ व त्याच्या आसपासचीं कांहीं बेटें या प्रदेशांत आहेत. हे नेग्रिटो लोक खरे नीग्रो लोक व ऑस्ट्रलॉइड वंशी लोक यांच्या मिश्रणापासूनचे असावेत.

उ प शा खा.—सिथ या नांवानें प्राचीन काळीं ज्ञात असलेले व हल्लीं ताजिक नांवानें संबोधिले जाणारे लोक आर्यन् वंशांतले आहेत, कारण त्यांच्या भाषेंत संस्कृत भाषेपासून निघालेले शब्द आढळतात. हे लोक मध्यआशियांतील डोंगराळ भागांत आणि इराण, अफगाणिस्तान, बलुचिस्तान वगैरे देशांत आहेत. या लोकांनां तुर्कांनीं पादाक्रांत केलें, तथापि त्यांचें बौद्धिक गुणाधिक्य कायम आहे. उझबेग व खिरजी या जाती मोंगोलियन वंशांतील आहेत. खिरजी व किपचाक हे एकच असून त्यांची भाषा तुर्की व धर्म इस्लामी आहे. कालमुख नांवाचे लोक धर्मानें बौद्ध पण वंशानें मोंगोलियन आहेत. हे प्रथम झुंगारियांतून

निघून सायबेरियांत व्होलगा नदीच्या कांठीं वसले व नंतर १८ व्या शतकांत चिनी सत्तेखालील कुलजा प्रांतांत येऊन राहिले. तुर्कोमन ही तुर्की लोकांपैकीं सर्वांत शुद्ध जात आहे. मध्यआशियांतील तुर्कोमन व युरोपांतील टयूटॉनिक वंश यांच्यांत आचारपरंपरासादृश्य असल्यामुळें त्यांचा परस्पर वांशिक संबंध असला पाहिजे असें मानववंशशास्त्रज्ञांचें मत आहे. तुर्कोमन व रजपूत यांच्यांत शरीराचा आरक्तवर्ण या बाबतींत साम्य आढळून आल्यापासून तुर्कोमन ही जात मोंगोलियन नसून कॉकेशियन ( आर्यन ) आहे असें मानववंशशास्त्रदृष्टया ठरत चाललें आहे. तुर्क व मोंगोल या दोघांनांहि प्राचीन काळीं 'सिथ' हें नांव होतें, व दिल्लीस बाबरनें स्थापलेल्या तुर्की राजघराण्याला मोंगल असें नांव पडलें. आणि मोंगोल व मोंगल यांच्यांतील फरक दाखवितां येत नाहीं. दुराणी अफगाण हे बेने इस्रायल आहेत हें म्हणणें अलीकडील संशोधनांत कमजोर झालेलें नाहीं.

इ ति हा स.—आशिया खंडाची हल्लीं जी पश्चिम सरहद्द मानतात ती तितकीशी सयुक्तिक नाहीं. कारण उरल पर्वताच्या पूर्वेस व पश्चिमेस राहणारे लोक निरनिराळ्या मानव वंशांतले नाहींत. प्राचीन ग्रीक व नंतरच्या तुर्की सत्तेच्या काळांत आशियामायनरचा संबंध आशियापेक्षां यूरोपबरोबरच अधिक असलेला आढळतो. या सरहद्दीवरील देशांसंबंधीं यथातथ्य ऐतिहासिक ज्ञान होण्यास पॅलेस्टाईन व आशियामायनर आणि भूमध्यसमुद्रकांठचे इतर देश यांचा साकल्यानेंच विचार करावयास पाहिजे. 'आशियाटिक 'व 'पौरस्त्य 'हे शब्द सांस्कृति स्थितीच्या सूचक अर्थानें वापरण्याची चूक कित्येक लोक करतात. वास्तविक रशियांतील व आशियांतील लोक यांत बरेंच साम्य आहे; आणि आशियांतल्याच पण तुर्कस्तान, चीन, व हिंदुस्थान येथील लोकांत फारच महत्त्वाचे फरक आहेत. एकंदरीनें पाहतां आशियांतील लोक आफ्रिकेंतील व अमेरिकेंतील मूळच्या देश्य रहिवाशांपेक्षां पुष्कळच अधिक सुधारलेले आहेत. पण पश्चिम यूरोपमध्यें आधिभौतिक सुधारणेंत जी विशेष प्रगति झाली आहे तितकी आशियांतील कोणत्याहि देशांत झालेली नाहीं. मानसिक गुणांच्या दृष्टीनें पाहतांहि आशिया व यूरोप यांत साम्य नाहीं, कारण यूरोपमध्यें स्वायत्तता व स्वातंत्र्य या भावना जितक्या प्रगत झालेल्या आढळतात तितक्या आशियांत नाहींत. आशियांतील प्रत्येक इसम कुटुंबाचा, राज्याचा, किंवा धर्मसंप्रदायाचा घटक अतएव बद्ध व परावलंबी मानला जातो. व्यक्तीला स्वतःचे निराळे हक्क व निराळें भवितव्य आहे असें समजत नसत. त्यामुळें राजकारणांत अनियंत्रित सुलतानीं अमलाखालीं नमणारे, धर्माचे बाबतींत सदा दैववादी बनलेले, व या दोन्ही बाबतींत पुराणपरंपरेला सदा चिकटून राहणारे असेच लोक फार आहेत. आशियांतील देशांची कालदृष्ट्या ऐतिहासिक परंपरा यूरोपांतल्यापेक्षां फार दीर्घकालीन असली तरी आशियाटिक देशांच्या इतिहासांत नव्या नव्या गोष्टी व उलाढाली, किंवा नव्या नव्या कर्तबगारीचे इतिहासप्रसिद्ध पुरुष फारसे आढळत नाहींत सर्व कालांतील राजकीय घडामोडी व ऐतिहासिक व्यक्तींचे पराक्रम बहुतेक एका सांच्याचेच असतात.

ध र्म व सं स्कृ तीः—आशियांतील धर्म या बाबीकडे विशेष लक्ष वेधलें जातें. जगांतील सर्व प्रमुख धर्म व संप्रदाय वैदिक अथवा हिंदु धर्म, बौद्ध, ख्रिस्ती व महंमदी संप्रदाय आणि दुय्यम प्रतीचे धर्म म्हणजे यहुदी, पारशी, आणि ताओ संप्रदाय ( चिनी तत्त्ववेत्ता लाउत्से यानें प्रसृत केलेला ) हे सर्व मूळ आशियांत उत्पन्न झाले आहेत. यूरोपमधील कोणत्याहि मानववंशी लोकांमध्यें मूर्तिपूजेच्यापलीकडे धर्म या विषयाची वाढ झाली नव्हती. प्राचीन ग्रीक तत्त्वज्ञान बरेंच प्रगट झालेलें दृष्टीस पडतें, परंतु त्याला विशिष्ट धर्माचें स्वरूप नव्हतें. उलटपक्षीं ख्रिस्तीसंप्रदाय जरी मूळ आशियांत उत्पन्न झाला तरी त्याची पुढील सर्व वाढ यूरोपखंडांत झाली. पूर्वेच्या बाजूला आशियामायनरच्या पलीकडे ख्रिस्ती संप्रदायाचा फारसा प्रसार झाला नाहीं. आधुनिक काळांत ख्रिस्ती मिशनऱ्यांनीं मध्य आशिया, चीन, आणि हिंदुस्थान यांमध्यें ख्रिस्ती सांप्रदायाचा प्रसार करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला आणि लोक त्यांचे म्हणणें शांत रीतीनें ऐकून घेतात, परंतु प्रत्यक्ष संप्रदायाचा स्वीकार फारसे कोणी करीत नाहींत. तात्पर्य आशियाखंडांत ख्रिस्ती सांप्रदायाचा प्रसार बौद्ध धर्म आणि मुसलमानी संप्रदाय यांच्या प्रसाराच्या मानानें फार अल्प झाला आहे. बौद्ध धर्माचा प्रसार आशियांतील पूर्वेकडील देशांत म्हणजे चीन, जपान, तिबेट इत्यादि देशांत फार झाला, तसा तो हिंदुस्थानच्या पश्चिमेकडील देशांत झाला नाहीं. महंमदी संप्रदाय यूरोपियन लोकांनां मुळींच मानवत नाहीं असें यूरोपियन लेखक म्हणतात व त्याचें कारण असें देतात कीं यूरोपांतील तुर्कस्तानावर मुसुलमानी अंमल चालू असतांहि तेथील यूरोपियन लोकांनीं महंमदी संप्रदायाचा स्वीकार हिंदुस्थानांत हिंदु लोकांनीं जितका केला त्या मानानें फारच कमी प्रमाणांत केला. पण याचें कारण महंमदी संप्रदायानें ख्रिस्ती लोकांस दाखविलेलें औदार्य व हिंदुस्तानांत हिंदूंचा केलेला छळ हें होय. निरनिराळ्या धर्मांच्या प्रसाराच्या या हकीकतीवरूनहि आशियाखंड आणि यूरोपखंड यांतील लोकांच्या मनःस्थितींत असलेलें मोठें अंतर स्पष्ट दिसून येतें. या फरकाचें स्पष्टीकरण करतांनां मात्र बहकणें शक्य आहे. पौर्व व पाश्चिम संस्कृतींतील फरक या देशांतील लोकांच्या विशिष्ट मानसिक वैशिष्ट्यामुळें झाला असें म्हणणें चुकीचें होईल. जें प्रथम एशियांत होतें तें नंतर तें यूरोपांत गेलें आणि जें यूरोपांत आज आहे तें हिंदुस्थानांत होणार हें लक्षांत ठेऊनच इतिहासाकडे पाहिलें पाहिजे.

यूरोपापेक्षां आशियांत फार जुन्या काळापासूनचे लेख सांपडतात. अर्थात मानवजातीच्या सुधारणेचें व संस्कृतीचें जन्मठिकाण आशियाखंड आहे असें मानलें जाणें स्वाभाविक आहे. तथापि ही संस्कृति मूळ हिंदुस्थानांतच उत्पन्न झाली असें म्हणतां येत नाहीं. हिंदुस्थानांतील आर्यन लोक पश्चिमेकडूनच आले. राज्यकारभारपद्धति आणि राजकीय संस्था या प्राचीन यूरोप आणि प्राचीन आशिया यांत एकाच प्रकारच्या आढळतात. प्रथम लहान लहान जमीनदार व त्यांच्या ताब्यांतील कुळें अशी शासनपद्धति सुरू होऊन पुढें त्याची वाढ राजसत्ताक पद्धतींत ( मॉनर्की ) झाली पण नंतर यूरोपमध्यें प्राचीन ग्रीक व रोमन लोकांत लोकसत्ताक राज्यपद्धति ( पॉप्युलर गव्हर्नमेंट ) अस्तित्वांत येऊन तिनें अनियंत्रित राज्यसत्तेला हुसकून लाविलें. ग्रीस व रोम याच्या संस्कृति जेव्हां अतिराष्ट्रीय होऊं लागल्या तेव्हां साम्राज्यसंस्थाच अवश्य झाली. पण आशियांत या प्रकारचा विकास न होतां अनियंत्रित राजसत्ताक पद्धतीच चालू राहिली, आणि ती साम्राज्यसंस्थेंत विकास पावली. त्यामुळें आशियांत राज्यक्रांति याचा अर्थ राजघराण्यांची अदलाबदल येवढाच होतो. प्राचीन भारतांत लोकराज्यें होतीं तर अरबस्तानांत वगैरे तर कांहीं लोक अद्यापहि लहान टोळ्या करून प्राथमिक रानटी अवस्थेंत रहात असलेले आढळतात.

आशियाखंडापुरता विचार करतां असें दिसून येतें कीं, स्थानांतर करून दुसऱ्या देशांत गेल्यावर लोकांची किंवा धार्मिक मतांची आणि संस्थांची प्रगति फार जोरानें होते. उदाहरणार्थ, मूळ पौरस्त्य अशा कित्येक सुधारणाविषयक कल्पना ग्रीस देशांत गेल्यावर तेथें त्यांची फार प्रगति झाली. तसेंच बौद्धधर्म मूळ हिंदुस्थानांत उत्पन्न झाला, परंतु त्याची वाढ हिंदुस्थानापेक्षां बाहेर इतर देशांतच अधिक झाली.

आ शि यां ती ल दे शां च्या इ ति हा सा ची सा मा न्य रू प रे षाः—आशियाच्या दक्षिणेकडील देशांत म्हणजे सीलोन, मलाया द्वीपकल्प व चीन येथें कांहीं लोक अर्धवट रानटी स्थितींतच आढळतात. त्यांचें आस्ट्रेलियांतील लोकांशीं कांहीं बाबतींत साम्य आहे. हा परस्परसंबंध ऐतिहासिक दृष्ट्या सत्य ठरल्यास तो फार प्राचीन काळाचा म्हणजे आशियाचा दक्षिण भाग आणि आस्ट्रेलियाखंड यांना जोडणारे भूभाग प्राचीनकाळीं जेव्हां अस्तित्वांत होते त्या वेळचा असला पाहिजे. आशियाच्या उत्तर भागांतहि कित्येक ठिकाणीं मूळचे देश्य लोक आहेत. उदाहरणार्थ चुकची जातीचे लोक व जपानांतील ऐनु जातीचे लोक. या लोकांचा प्राचीन इतिहास उपलब्ध नाहीं. या खेरीज बाकीच्या देशांतील लोक मूळ बाहेरून आलेले आहेत. चीनमधील लोक पश्चिमेकडून आले. हिंदु व इराणी लोक वायव्येकडून आले. व ब्रह्मी आणि सयामी लोक उत्तरेकडून आले. मोंगोली लोक व तुर्क लोक हे मूळ मध्यआशियांतले किंवा इतर कोणत्या देशांतले हें नक्की समजत नाहीं. परंतु ते लोक आपला मध्य-आशिया देश सोडून इतर दूरदूरच्या देशांत गेले ही गोष्ट इतिहासप्रसिद्ध आहे.

वारंवार मत व्यक्त केलें जातें कीं, आशियांतील बाबिलोनिया व आसुरिया हे दोनच देश फार प्राचीन आहेत; बाकीच्या देशांचें ऐतिहासिक महत्त्व ख्रिस्तपूर्व १५०० नंतरचें आहे. कारण या सुमारास चिनी लोक मूळ होआंगहो नदीचा प्रदेश व्यापून राहिले व आर्य लोक वायव्येकडून हिंदुस्थानांत शिरले. या दोघांचेहि देश्य लोकांशीं मोठे सामने झाले. बाबिलोनी संस्कृतीचा परिणाम आशियांत दूरवर पसरला असावा असें दिसतें. कारण बाबिलोनिया व चीन यांच्यामध्यें संबंध होता ही गोष्ट आतां साधारणपणें मान्य झाली आहे. तसेंच हिंदुस्थानांतील लिपि मूळ सेमिटिक लिपिवंशांतील असून तिचा हिंदुस्थानांत प्रवेश इराणच्या आखातांतून हिंदुस्थानाशीं चालू असलेल्या व्यापारविषयक संबंधामार्फत झाला. सरदहू मतें कितपत चुकीचीं आहेत हें आशियांतील प्राचीन राष्ट्रांचा व संस्कृतींचा इतिहास ज्ञानकोशाच्या तिसऱ्या व चवथ्या भागांत व लीपिचा विकास पांचव्या विभागांत दिला आहे त्यावरून दिसून येईल.

अलीकडे यूरोपियन लोकांनीं आशियांतील कांहीं देश जिंकले. तत्संबंधीचा इतिहास वगळतां त्यापूर्वीच्या दोन हजार वर्षांत चीन, हिंदुस्थान, मुसलमानी देश आणि मध्य आशिया यांतील लोकांचे एकमेकांवर आघात प्रत्याघात चालू होते. यांपैकीं पहिल्या तिघांची एक एक पृथक संस्कृति होती. मध्य आशियांतील लोकांची मात्र कोणतीहि विशिष्ट संस्कृति नव्हती. परंतु आशियांतील राजकीय परिस्थिति आणि निरनिराळे मानवसमाज यांमध्यें मध्य आशियांतील लोकांच्या परिश्रमामुळें बऱ्याच उलथापालथी झाल्या.

( अ ) चीननें पूर्वआशियाचा सर्व भाग व जपान देश येथील संस्कृतींना वळण लाविलें आहे. मलाया द्वीपकल्पांत मात्र चिनी संस्कृतीचा फारसा परिणाम झाला नाहीं. चिनी संस्कृतीचा प्रत्यक्ष परिणाम कोरिया, जपान आणि आनाम या देशावर झाला असून मंगोलिया, तिबेट, सयाम, कांबोडिया, व ब्रम्हदेश येथें भारतीय हिंदु संकृति आणि चिनी संस्कृति यांचे संयुक्त परिणाम झाले आहेत. व त्यांतहि भारतीय संस्कृतीचे परिणाम अधिक बलवत्तर आहेत. जपानखेरीज उपर्युक्त सर्व देश चीनचे कांहीं काळ तरी मांडलीक होते. जेथें चिनी संस्कृतीचे परिणाम पूर्णपणें झाले तेथें कनफ्यूशिअसचा संप्रदाय, चिनी कला व चिनी लेखनपद्धति या तिन्ही गोष्टी आढळतात. ख्रिस्ती शकानंतर चीनांतील बौद्धधर्महि उपर्युक्त देशांत पसरला.

(आ )भारतीय संस्कृति, म्हणजे श्रौत व पौराणधर्म आणि बौद्धधर्म यांच्यामुळें उत्पन्न झालेली मिश्र संस्कृति असा अर्थ घेतला पाहिजे. ही हिंदु संस्कृति इंडोचीन, मलया द्वीपकल्पाचा बराचसा भाग, तिबेट आणि मंगोलिया या देशांत पसरली.

शिवाय चीन आणि जपान या देशांवरहि तिचे परिणाम बौद्धधर्मामार्फत झाले. बौद्धधर्माच्या प्रसाराचा परिणाम केवळ आध्यात्मिक स्वरूपाचा नाहीं; तो सांस्कृतिक स्वरूपाचा आहे. कारण बौद्धधर्माबरोबर त्या त्या देशांत हिंदु कला आणि हिंदु वाङ्मय व कित्येक वेळां हिंदु लिपी यांचाहि प्रसार झाला आहे. अलेक्झांडरच्या स्वारीनंतर हिंदु कलेवर ग्रीक कलेचा परिणाम होऊन त्या मिश्र स्वरूपांत ती उपर्युक्त देशांत पसरली. हिंदुस्थानांतील लिपी तिबेट, कांबोज उर्फ कांबोडिआ, जाव्हा व कोरिया या देशांत पसरली. हिंदु संस्कृतीचा फैलाव उपर्युक्त देशांत केव्हां कसा व किती प्रमाणांत झाला त्याचा इतिहास ज्ञानकोशाच्या पहिल्या विभागांत सविस्तरपणें दिला आहे.

( इ ) मुसुलमानी किंवा इस्लामी संप्रदाय हा ( परिणामकारकतेच्या दृष्टीनें पाहतां ) जगांतील धर्मापेक्षां सर्वांत बलवत्तर होय. या संप्रदायाचा परिणाम पश्चिम आशियांतील सर्व देशांवर, उत्तर आफ्रिकेवर, स्पेन देशावर आणि पूर्व यूरोपांतील देशांवर आणि हिंदुस्थानावर झाला आहे. तरवारीच्या जोरावर धर्मप्रसार करणें हें तत्त्व मुसुलमानी संप्रदायास मान्य असल्यामुळें युद्धप्रिय जातींनां हा धर्म आवडला आहे आणि या धर्मांत राजकीय आणि धार्मिक सत्ता एकाच व्यक्तीच्या हातांत असल्यामुळें मुसुलमानी संस्कृतीच्या प्रसाराला फार मदत झाली आहे. शिवाय राजकीयदृष्ट्या मुसुलमानी प्रजेचा राजकीय दर्जा इतर धर्मांच्या प्रजाजनांपेक्षां अधिक मानला जात असल्यामुळें मुसुलमानी राजांचा अम्मल असलेल्या देशांत मुसुलमानानां मुसुलमानेतरांवर राज्य करणारी विशिष्ट जात असें स्वरूप प्राप्त झालेलें आढळतें. हिंदुस्थानांत मोंगल बादशहांच्या वेळीं अशी स्थिति होती आणि तुर्कस्तानात अशीच स्थिति आज आहे. सांप्रत मुसुलमानी संप्रदायाचें वर्चस्व तुर्कस्तान, इराण, अफगाणिस्तान आणि अरबस्तान इतक्या देशांत आहे. हिंदुस्थानांत उत्तर व मध्य भागांत मुसुलमानी संप्रदायाचें बरेंच प्राबल्य आहे; पण दक्षिणेकडील भागांत तें बरेंच कमी आहे. हिंदुस्थानच्या पूर्वेकडील देशांत या मुसुलमानी संस्कृतीनें तत्पूर्वी प्रसार पावलेल्या हिंदु संस्कृतीस बरेंच ग्रहण लाविलें व अशा रीतीनें ही मुसुलमानी संस्कृति फिलिफाइन बेटांपर्यंत पसरली. जपान आणि इंडोचीन या देशांत मात्र मुसुलमानी संस्कृतीचा प्रसार झाला नाही. खुद्द चीनमध्यें मुसुलमान लोकांची संख्या बरीच आहे; परंतु मुसुलमानी संस्कृतीचा चिनी संस्कृतीवर मुळींच परिणाम झाला नाहीं, उलटपक्षीं चिनांतील मुसुलमान लोक धर्मेतर बाबतींत चिनी संस्कृतीचेच अनुयायी आहेत. तात्पर्य मुसुलमानी संस्कृतीच्या प्रसाराला यशस्वी रीतीनें प्रतिकार करणारा चीन हा आशिया खंडांतील एकटाच देश होय.

बौद्धधर्मापेक्षांहि मुसुलमानी संप्रदायानें मुसुलमानी संस्कृति आणि मुसुलमानी कलाकौशल्य यांचा प्रसार उत्तर देशांत अधिक केला आहे. ज्या ज्या देशांत मुसुलमानी संप्रदायाचा प्रसार झाला, तेथें तेथें अरबी लिपी आणि शब्दसंग्रह हीं लोकव्यवहारांत रूढ झालेलीं आढळतात. हिंदुस्थानांतील हिंदी आणि हिंदुस्थानी भाषा हें द्वैत मुसुलमानी संस्कृतीच्या परिणामाचें एक ठळक उदाहरण आहे.

( ई ) मध्य आशियांतील लोकांनीं आशिया खंडाच्या इतिहासांत जी महत्त्वाची कामगिरी केली आहे, तिचें यथातथ्य स्वरूप सदहू लोकांच्या संस्कृतीला विशिष्ट नांव नसल्यामुळें बरोबर लक्षांत येत नाहीं. भाषांच्या दृष्टीनें पाहतां या मध्य आशियांतील लोकांचे तुर्क, मंगोल, हूण इत्यादि अनेक विभाग पडतात; परंतु हे निरनिराळ्या भाषा बोलणारे लोक एकाच राजसत्तेखालीं असलेले अनेक ठिकाणीं आढळतात व दूर दूर स्वाऱ्या करून जाणाऱ्या सैन्यामध्येंहि निरनिराळ्या भाषा बोलणारे लोक खांद्यास खांदा लावून लढतांनां दिसतात. ख्रिस्ती शकारंभानंतर लवकरच मध्य आशियांतील ह्या लोकांनीं दूर दूर स्वाऱ्या करण्यास आरंभ केला. या लोकांच्या अशा स्वाऱ्या मुख्य सात असून त्यांशिवाय बारीकसारीक स्वाऱ्या अनेक आहेत. त्यांच्या मुख्य सात स्वाऱ्या येणेंप्रमाणेः—( १ ) अव्हार, हूण व बलगर या लोकांनीं यूरोपवर केलेल्या आरंभींच्या स्वाऱ्या. ( २ ) मंगोल लोकांनीं रशियावर केलेली स्वारी व तेथें बसविलेला तात्पुरता अम्मल. ( ३ ) तैमूरलंगानें केलेल्या स्वाऱ्या. ( ४ ) तुर्क लोकांनीं आशियामायनर आणि पूर्व यूरोप यांवर स्वारी करून बसविलेला अम्मल. ( ५ ) मोंगल लोकांनीं हिंदुस्थानवर केलेली स्वारी आणि बसविलेला राजकीय अम्मल. ( ६ ) कुबलाइखानाच्या नेतृत्वाखालीं मंगोल लोकांनीं चीनवर स्थापिलेली राजकीय सत्ता. ( ७ ) नंतर मांचू लोकांनीं चीनवर स्थापन केलेला राजकीय अम्मल. यांशिवाय मध्य आशियांतील लोकांनीं हिंदुस्थान, चीन आणि इराण या देशांवर अनेक लहान लहान स्वाऱ्या केल्या.

या मध्य आशियांतील लोकांच्या अंगीं युद्धप्रियता व युद्धकौशल्य विशेष आढळतें यांत शंका नाहीं. तथापि त्या मानानें राज्यकारभार, कलाकौशल्य किंवा वाङ्मय या बौद्धिक क्षेत्रांत ते फार मागसलेले असल्याचें दिसतें. या विधानाला एकच अपवाद आहे, तो हिंदुस्थानांतील अकबरादि मोंगल बादशहांचा. उपर्युक्त स्वाऱ्यांखेरीज मध्य आशियांतील लोकांची महत्त्वाची कामगिरी म्हटली म्हणजे निरनिराळ्या देशांतील धर्मांचा व संस्कृतींचा दूरदूरच्या देशांत फैलाव करणें ही होय. अशा रीतीनें मुसुलमानी संप्रदायाचा व संस्कृतीचा हिंदुस्थानमध्यें आणि यूरोपमध्यें प्रसार करण्यास हेच लोक कारणीभूत झाले. तसेंच चीन देश आणि पाश्चात्त्य देश यांच्यामध्यें परस्पर संबंध मध्य आशियांतील लोकांमुळेंच चालू राहिला.

बा बि लो नि या आ णि अ सु रि या.—वर सांगितलेल्या मध्य आशियांतील लोकांच्या स्वाऱ्या ह्या आशिया खंडाच्या

इतिहासांतील अलीकडल्या काळांतल्या मुख्य गोष्टी होत; पण फार प्राचीन काळांत राजकीय घडामोडी आणि वैज्ञानिक प्रगति यांचें केंद्रस्थान बाबिलोनिया व असुरिया हे देश होते. हीं दोन प्राचीन राज्यें ख्रिस्तपूर्व ७ व्या शतकांत नष्ट होऊन त्यांच्या जागीं इराणचें साम्राज्य उदयास आलें. या साम्राज्याची राजकीय सत्ता अनेकवार संकोच विकास पावत पावत इ. स. च्या सातव्या शतकापर्यंत चालू होती. त्यानंतर पश्चिम आशियांतील इतर देशांबरोबर इराणवरहि मुसलमानी अम्मल सुरू झाला आणि पूर्वीच्या इराणी साम्राज्याची स्मृति पूर्णपणें नष्ट झाली.

बाबिलोनिया आणि असुरिया यांच्या प्राचीन इतिहाससंबंधाचें साहित्य अलीकडे पुष्कळ उपलब्ध झालें आहे. तथापि अद्याप या देशांच्या इतिहासाचें स्वरूप बरेंच वादग्रस्त आहे. नैर्ऋत्य आशियाच्या प्राचीन इतिहासांत सेमाइट लोक हा अत्यंत महत्त्वाचा मानववंश होता. प्राचीन इतिहासांत त्यांच्या भाषेला व इतर अनेक गोष्टींना मोठें महत्त्व आहे. जगांतील मुख्य संप्रदायांपैकीं ख्रिस्ती आणि मुसुलमानी धर्म हे दोन व त्याच प्रमाणें यहुदी हे या सेमिटिक जातीच्या लोकांतच उत्पन्न झाले. आधुनिक काळात या सेमिटिक मानववंशांतील लोकांनीं राज्य स्थापून मोठाले विजय मिळविले नाहींत. परंतु प्राचीन काळीं एकदां बाबिलोनिया व असुरिया येथील सेमिटिक लोकांचीं राज्यें होतीं आणि तीं संस्कृति,सुधारणा आणि प्रगति यांचीं केंद्रस्थानें होतीं. ही प्राचीन संस्कृति सुमेरो-ॲकेडियन लोकांनीं वृद्धिंगत केली असें दिसतें. हे सुमेरो ॲकेडियन लोक तुर्क व हूण यांच्या पूर्वजांचेच नातेवाईक असल्यास,एखाद्या संस्कृतीच्या वाहकाचें स्थानांतर झाल्यावर त्या संस्कृतीची वाढ किती जोरानें होते, याचें हें एक उदाहरण आहे.आशियामायनरमध्यें राहणाऱ्या हिटाईट व ॲलेरोडियन या प्राचीन अनार्य जातीसंबंधानें माहिती फारच कमी मिळते. एक उपपत्ति अशी आहे कीं, भूमध्यसमुद्राच्या किनाऱ्यावर आर्यन नव्हे व सेमिटिक नव्हे अशा एका निराळ्याच जातीचे लोक मूळारंभीं रहात होते.

अत्यंत प्राचीन सुमेरियन लेख ख्रि. पू. ४००० वर्षांपूर्वीचे असावेत असें दिसतें. या काळानंतर लवकरच बाबिलोनियावर सेमाइट लोकांनीं स्वारी केली व ते लोक राज्यकर्ते बनले. बाबिलोन हें शहर ख्रि. पू. २२८५ च्या सुमारास खमुरब्बी राजाची राजधानी म्हणून प्रसिद्धीस आलें. असुरियाचें राष्ट्र हें बाबिलोनीयाचीच एक शाखा असून त्या देशांत दुसऱ्या सहस्रकापूर्वी वसाहत झाली होती. असुरियन लोक बाबिलोनी लोकांची भाषा वापरीत. परंतु असुरियन लोकांचें कलाकौशल्य व धर्म यांत स्वतःचें निराळें वैशिष्ट्य होतें. ख्रि. पू. ९ व्या व आठव्या शतकांत असुरियाची सत्ता फार बलिष्ठ बनली व तिनें बाबिलोनियावरहि सार्वभौमत्व स्थापिलें. परंतु या असुरियन सत्तेचा मीडोपार्शियन सत्तेनें ख्रि. पू.६०६ मध्यें नाश केला. आणि नंतर ख्रि. पू. ५५५ मध्यें इराणचा राजा सायरस ( कुरुस ) यानें बाबिलोन शहरहि घेतलें.असुरियाचें राष्ट्र मुख्यतः लष्करीसामर्थ्यप्रधान असल्यामुळें त्या राष्ट्राची राजधानी निनेव्हे हें शहर पडल्याबरोबर सर्व राष्ट्र नष्ट झालें. परंतु बाबिलोनियाचें राष्ट्र इराणनें जिंकून घेतल्यानंतरहि अनेक शतकें बाबिलोनी धर्म आणि संस्कृति यांचा परिणाम शेजारच्या राष्ट्रांवर होत होता.

**चीन**—सांप्रत अस्तित्वांत असलेल्या राज्यांपैकीं चीनचें राज्य हें सर्वांत जुनें आहे. तथापि या राज्याविषयीं विश्वसनीय ऐतिहासिक माहिती ख्रि. पू. १००० वर्षांच्या फारशी पूर्वीची मिळत नाहीं.प्राचीन चिनी संस्कृति व बाबिलोनि संस्कृति यांचा एकमेकांशीं कांहींसा संबंध होता.ही गोष्ट हल्लीं मान्य झालेली आहे. परंतु हा संबंध कशा प्रकारचा होता हें निश्चित ठरलें नाहीं.इतकें मात्र स्पष्ट आहे कीं,चिनी लोक मूळ पश्चिमेकडून येऊन होआंगहो नदीच्या प्रदेशांत ख्रि.पू.३०००वर्षांच्या सुमारास वस्ती करून राहिले. चीनच्या आद्य ऐतिहासिक काळांत चीन देश हा सरंजामी पद्धतीच्या संस्थानांचा एक संघ होता. ख्रि. पू. २२०च्या सुमारास त्सिन अथवा चिन ( यापासूनच चीन हें नांव पडलें आहे ) हें संस्थान बलिष्ठ होऊन त्यानें सर्व चीनवर आपलें साम्राज्य स्थापिलें. चीनचा यानंतरचा इतिहास तार्तर जातीच्या अनेक टोळ्यांतील आपसांतील युद्धांच्या हकीकतींनीं भरला आहे. या काळांत चीनच्या साम्राज्याला बरेवाईट दिवस अनेकदां आले, त्यांत दोन वेळां चीनचें साम्राज्य आशिया खंडांत फार बलाढ्य बनल्याचें आढळतें, तें एकदां हान घराण्याच्या वेळीं ( ख्रि. पू. २०० ते इ. स. २२० च्या दरम्यान ) आणि दुसऱ्यांदा तअंग घराण्याच्या वेळीं(इ. स.६१८-९०६) तअंग घराण्याच्या साम्राज्याचा विस्तार मध्य आशियाच्या पलीकडे उत्तर हिंदुस्थानापर्यंत पसरला होता. परंतु हेंच साम्राज्य नंतर किटन लोकांच्या हल्ल्यांनीं विस्खलित केलें गेलें. पुढें सुंग घराण्यानें ( ९६०-११२७ )पुन्हां फक्त चीन देशाचें सुसंघटित राज्य बनविलें. १३ व्या शतकांत मंगोल लोक बलिष्ठ बनले आणि त्यांचा पुढारी कुबलाईखान यानें चीन देश जिंकिला. यानंतर सुमारें एक शतक चीनवर मंगोल घराण्याचें राज्य होतें, त्यानंतर पुन्हां मिंग नांवाच्या देश्य चिनी घराण्यानें चीनवर आपली सत्ता स्थापिली. हें घराणें सुमारें ३०० वर्षे राज्य करीत होतें. याच्या कारकीर्दींत हिंदुस्थान, सिलोन आणि पूर्व आफ्रिका या देशांवर स्वाऱ्या करण्यांत आल्या. १७४४ मध्यें उत्तरेकडील मांचू लोकांनीं चीनवर हल्ले करून मिंग घराण्याची सत्ता नष्ट केली व तेव्हांपासून मांचू घराण्यानें आपली साम्राज्यसत्ता चीनवर स्थापन केली. तें मांचू घराणें २०व्या शतकांत राज्यक्रांति होऊन म्हणजे वैराज्य स्थापन होऊन नष्ट झालें.

अलीकडे यूरोपियन लोकांशीं संबंध येईपर्यंत चिनी लोकांचा संबंध नेहमीं कनिष्ट संस्कृतीच्या लोकांशीं असे. या

मागसलेल्या परंतु दणकट युद्धप्रिय लोकांनीं कित्येक वेळां चीन देश जिंकून घेतला. परंतु चिनी संस्कृतीचा परिणाम मागसलेल्या जित जातींवर व त्याचप्रमाणें मागसलेल्या पण जेत्या जातींवरहि झालेला आहे. चिनी राष्ट्रामध्यें पुराणप्रियता आणि परक्याबद्दल द्वेष फार भरलेला आहे. चीनचें राष्ट्र बिनमुरवतखोर, बिन लष्करी बाण्याचें आणि धर्मोपाध्यायांचें वर्चस्व नसलेलें असें आहे. सरकारी नोकरीतल्या मोठमोठ्या जागा उमेदवारांची परीक्षा घेऊन लायकीप्रमाणें देण्यांत येतात. बादशहा हा सर्व राज्याचा व त्याचप्रमाणें धर्माचा मुख्य मानण्यांत येत असे.

चिनी वाङ्मयांत सर्वांत प्रसिद्ध नांव कॉन्फ्यूशियस ( ख्रि-पू. ५५१–४७५ ) याचें आहे. त्यानें परंपरागत चालत आलेल्या कल्पना व मतें आपल्या ग्रंथांतून सुव्यवस्थितपणें पुढें मांडिलीं; स्वतःचें नवीन असें कांहींच लिहिलें नाहीं. तथापि पूर्व आशियांतील देशांत कॉन्फ्यूशियसच्या ग्रंथांचा फार परिणाम झालेला आहे. तो शांतता आणि भूतदया यांचा अत्यंत जोरदार पुरस्कर्ता होता. कॉन्फ्यूशियसचीं मतें म्हणजे धर्मपंथ नसून विचाराचा तो एक विशिष्ट पंथ आहे. व म्हणूनच बौद्ध धर्माशीं विरोध न येतां तो टिकूं शकला. चीनमध्यें बौद्ध धर्माचा प्रवेश ख्रिस्ती शकाच्या पहिल्या शतकांत झाला. व तेव्हांपासून चिनी लोकांच्या धार्मिक समजुतींना मुख्यतः बौद्धधर्मी वळण लागलें आहे. चिनी लोक स्वभावतः धार्मिक वृत्तीचे नाहींत. धर्मसंस्था ही राज्यशासन संस्थेची एक शाखा आहे असें यूरोपीय लोकांप्रमाणें चिनी लोकांचें मत आहे.

ज पा न —येथें पूर्वी ऐनु जातीचे लोक रहात होते. नंतर प्रागैतिहास काळांतच कोरियन लोकांच्या जातीच्या लोकांनीं जपानवर स्वारी केली. जपानसंबंधाची विश्वसनीय ऐतिहासिक माहिती इ. स. च्या ६ व्या शतकापासून मिळते. या शतकांत जपानमध्यें चिनी संस्कृति आणि बौद्ध धर्म यांचा प्रवेश झाला. प्रथम जपानमध्यें अनियंत्रित राज्यसत्ता सुरू होती. परंतु सातव्या शतकापासूनच जपानच्या राजकारणांत विशिष्ट परिस्थिति निर्माण झाली. ही विशिष्ट गोष्ट म्हणजे राजसत्तेलाहि ग्रहण लावणारी अशीं कित्येक घराणीं उदयास आलीं. अशा घराण्यांपैकीं फूजिवर घराण्याबद्दल, तसेंच तइर आणि मिनमोटो घराण्यांतील स्पर्धेबद्दल इतिहासांत उल्लेख आहे. मिनमोटो हें घराणें सदहू स्पर्धेत विजयी होऊन इ. स. ११९२ पासून जपानमध्यें द्विराजकपद्धति सुरू झाली. आणि जपानी बादशहा अथवा मिकॅडो हा केवळ नामधारी राजा बनून राज्यकारभाराची सर्व सत्ता शोगून नांवाच्या वंशपरंपरागत चालणाऱ्या लष्करी अधिकाऱ्याच्या हातीं गेली. ऐतिहासिक काळांत जपानवर कोण्याहि परक्या लोकांनीं स्वारी केली नाहीं. फक्त एकदां कुबलाई खानानें जपान देश जिंकण्याचा प्रयत्न केला परंतु तो हल्ला यशस्वी रीतीनें परत फिरविण्यांत आला. यानंतर मुख्य राजकीय सत्ता शोगुनांच्या आशिकग नांवाच्या घराण्याच्या हातीं गेली. व ती दोनशें वर्षें त्याच्या हातीं राहिली. या काळांत आशिकग शोगुनांनीं कलाकौशल्याला मोठा आश्रय दिला. १६ व्या शतकाच्या उत्तरार्धांत जपानमध्यें कांहीं काळ अस्वस्थता व बेबंदशाही माजली. याच सुमारास पोर्तुगीज लोकांनीं जपानांत प्रवेश केला. या धामधुमींतून अनेक साहसी पुरुष उदयास आले त्यांपैकीं हिदेयोशी हा एक होय. त्यानें कोरिया देश जिंकला आणि चीनवरहि स्वारी करण्याचा बेत केला. परंतु इतक्यांत तो मरण पावल्यामुळें सदरहू बेत रद्द झाला. हिदेयोशीनंतर आयेयसू हा पुरुष सत्ताधीश बनला. त्यानें जपानच्या सामाजिक व राजकीय परिस्थितीला जें वळण लाविलें तें पुढें सुमारें तीनशें वर्षें ( १६०३–१८६८ ) पर्यंत कायम होतें. हें वळण म्हणजे जपानला इतर देशांच्या संपर्कापासून अलिप्त व अलग ठेवण्याचें धोरण होय. जपाननें कोणत्याहि परदेशावर स्वारी करावयाची नाहीं, ख्रिस्ती धर्माचा जपानमध्यें प्रसार होऊं द्यावयाचा नाहीं, तसेंच कोणाहि परकी लोकांनां जपानांत येऊं द्यावयाचें नाहीं असे तीन नियम अत्यंत कडक रीतीनें अमलांत आणले गेले. फक्त डच लोकांनां अगदीं मर्यादित प्रमाणावर जपानबरोबर व्यापार करण्याची परवानगी देण्यांत आली होती. अशी स्थिति सुमारें तीनशें वर्षें चालू राहिल्यानंतर १८५४–१८५९ यांच्या दरम्यान प्रथम युनायटेडस्टेट्सनें व नंतर इतर ख्रिस्ती राष्ट्रांनीं जपानबरोबर व्यापार करण्याचा आपला हक्क जपान सरकारला मान्य करावयास लावला. ही व्यापाराची मोकळिक झाल्यामुळें नव्या नव्या कल्पनांचा व मतांचा जो मोठा लोंढा जपानमध्यें शिरला त्यामुळें जपानमध्यें आपसांत यादवी युद्ध होऊन त्यामध्यें शोगुनाची सत्ता अस्तंगत झाली आणि मिकॅडोच्या हातांत पूर्ववत सर्व अधिकार आले. यूरोपियन लोकांशीं यशस्वी रीतीनें सामना देण्याकरितां सुधारलेल्या सर्व पाश्चात्त्य साधनांचा उपयोग करण्याशिवाय गत्यंतर नाहीं ही गोष्ट जपानी लोकांनीं ओळखली आणि पाश्चात्त्यांच्या आधिभौतिक सुधारणा अंगीकारण्यास नीट विचारपूर्वक सुरुवात केली. त्याचप्रमाणें राजकीय बाबतींत लोकनियंत्रित राज्यकारभार पद्धतीचाहि त्यांनीं आरंभ केला. अशा रीतीनें जपानी लोकांनीं राष्ट्रसुधारणेच्या बाबतींत अल्पकाळात जें यश मिळविलें त्यास जगाच्या इतिहासांत दुसरें उदाहरण नाहीं. जपानी राष्ट्रानें १८९५ मध्यें चिनी लोकांचा युद्धांत पराभव केला आणि नंतर दहा वर्षांनीं रशियन लोकांचा पराभव केला. या अद्भुत पराक्रमामुळें पाश्चात्त्य राष्ट्रांनीं जपानबरोबर तह करून जपानी राष्ट्राचा समान दर्जा मान्य केला. आणि जपानमध्यें असलेल्या परकी लोकांना जपानी कायदाच लागू करण्यासंबंधाचा, कोणत्याहि ख्रिस्तेतर राष्ट्राला न मिळालेला हक्क दिला.

जपानची अकस्मात झालेली प्रगति ही १९ व्या शतकाच्या उत्तरार्धातील अत्यंत महत्त्वाची गोष्ट होय. कारण जपानच्या या उदाहरणानें आशियांतील राष्ट्रें स्वतःची पाश्चात्यांच्या धरतीवर सुधारणा करून घेऊन त्यांच्याशीं टक्कर देऊं शकतात ही गोष्ट सिद्ध झाली. तथापि जपानचा इतिहास आशियांतील इतर देशांच्या इतिहासाहून फारच निराळा असल्यामुळें जपानला अशा तऱ्हेनें आश्चर्यकारक प्रगति घडवून आणतां आली. जपानचें राष्ट्र चीन व हिंदुस्थान या राष्ट्रांची ऐन उमेद उलटून जाईपर्यंत जन्मालाहि आलें नव्हतें. तसेंच जपान देश आशिया खंडापासून अलग असल्यामुळें आशियांतील इतर देशांनां रानटी लोकांच्या स्वाऱ्यांमुळें जो त्रास सोसावा लागला व देशाचें जें सामर्थ्य खर्ची घालावें लागलें, तशा प्रकारचा त्रास व व्यय जपानला मुळींच करावा लागला नाहीं. जपानला मुसुलमानी लोकांच्या स्वाऱ्यांचा उपद्रव पोंचला नाहीं. तसेंच अगदीं अलीकडील काळांत यूरोपीय लोकांनीं आशियाखंडांतील कित्येक देशांत व्यापाराच्या निमित्तानें शिरून जो धुमाकूळ घातला, तशा प्रकारची सवड जपाननें परकी लोकांनां आपल्या देशांत दिली नाहीं. सोळाव्या शतकापासून एकोणिसाव्या शतकापर्यंत कोणाहि परकीयाबरोबर युद्धप्रसंग न उद्भवल्यामुळें जपानचें शारीरिक व आर्थिक बळ कायम राहिलें इतकेंच नव्हे तर पुढील ५० वर्षांत तें झपाट्यानें वृद्धिंगत झालें. जपानची राजकीय प्रगति याप्रमाणें अभिनंदनपर असली तरी धर्म, वाङ्मय किंवा तत्त्वज्ञान या कोणत्याहि क्षेत्रांत जपाननें स्वतः नांवाजण्यासारखी कांहींहि कामगिरी केलेली नाहीं. आशियाच्या बौद्धिक प्रगतीवर जपानचा यत्किंचितहि परिणाम झालेला नाहीं. उलटपक्षीं चीन आणि हिंदुस्थान यांची गोष्ट अगदीं निराळी आहे. जपानला स्वतःचा धर्म, तत्वज्ञान, वाङ्मय, संस्कृति वगैरे कांहीं नसल्यामुळें जपाननें दुसऱ्या देशांतील लोकांच्या कल्पना भराभर ग्रहण करून आत्मसात् केल्या ही गोष्ट सरळच झाली यांत आश्चर्य करण्यासारखें कांहीं नाहीं. परंतु या परिस्थितीमुळें जपानला कोणत्यातरी तऱ्हेचा कमीपणा येतो असें समजण्याचें कारण नाहीं.

को रि या.—कोरियानें धर्मसंप्रदाय व संस्कृति चीनपासून घेतली व जपानला दिली. तथापि कोरियाची भाषा व कांहीं अंशीं चालीरीती भिन्न आहेत. कोरियांत हिंदुस्थानांतून आलेली एक लिपि व त्याचप्रमाणें चिनी लिपीहि चालू आहे. १६ व्या शतकांत जपानी लोकांनीं कोरिया थोडा काळ आपल्या ताब्यांत घेतला होता. नंतर १८९४ मध्यें कोरियानें चीनबरोबर साम्राज्यसत्ता झुगारून देण्याकरितां युद्ध केलें व १८९५ मध्यें आपलें स्वातंत्र्य जाहीर केलें, अलीकडे १९०८ पासून कोरिया जपानच्या नियंत्रणाखालीं गेला आहे.

हिं दु स्था न.—हिंदुस्थानांतील लोकांचे स्थूलमानानें तीन वर्ग पडतात. पहिला वर्ग कोळी, संताळ इत्यादि अत्यंत असंस्कृत देश्य जातींचा. दुसरा वर्ग तामिळ कानडी इत्यादि द्राविड लोकांचा. हे हिंदुस्थानावर उत्तरेकडून स्वारी करून येणारे सर्वांत अगोदरचे लोक असावे या लोकांची कांहीं थोड्या मर्यादेपर्यंत विकास पावलेली अशी स्वतःची संस्कृति आहे. "कोलेरियन" लोक व द्राविड लोक हे दोघेहि एकाच शारीरिक वळणाचे आहेत असें अगदीं अलीकडील तज्ज्ञांचें मत पडलें आहे. ऐतिहासिकरीत्या या मताच्या खरेखोटेपणाबद्दलचा निर्णय कसाहि झाला तरी इतकें मात्र निश्चित आहे कीं या दोन जातींच्या लोकांच्या भाषा निरनिराळ्या आहेत. तसेंच संस्कृति दृष्ट्या दोघांचा दर्जाहि भिन्न आहे. प्राग्ऐतिहासिक काळांत हे लोक सर्व हिंदुस्थानभर पसरलेले होते. परंतु पुढें जेव्हां अधिक सुसंस्कृत अशा आर्यन् लोकांनीं हिंदुस्थानावर स्वारी केली आणि नंतर मोंगोलियन लोकांनीं उत्तर हिंदुस्थानावर हल्ले केले तेव्हां हे द्राविड लोक मध्य हिंदुस्थान व दक्षिण हिंदुस्थान या भागांत खालीं खालीं घुसले. ही गोष्ट केव्हां घडली याबद्दलचा पुरावा अद्याप उपलब्ध नाहीं. तथापि या गोष्टीचा बंगाल्यांतील लोकवस्तीवर मोठा परिणाम झालेला आहे कारण आजचे बंगाली लोक मंगोली व द्राविड मिश्रणापासूनचे आहेत असा समज आहे. आर्यन् लोक हिंदुकुश पर्वताच्या उत्तरेस वसाहत करून राहिलेले होते. तेथून ते हिंदुस्थानांत शिरले. अशी अटकळ आहे. या आर्य लोकांचें मूळवसतिस्थान कोणतें याबद्दल विद्वानांत मतभेद आहे. एक मत असें कीं, हे आर्य लोक प्रथम दक्षिण रशियांत किंवा आशियामायनरमध्यें रहात होते. तेथून त्यांच्यापैकीं एक भाग पूर्वेच्या बाजूला पसरला. व पुढें त्याच्या दोन शाखा होऊन एक शाखा इराणांत राहिली व दुसरी हिंदुस्थानांत शिरली. या आर्यन् लोकांनीं हिंदुस्थानांत दोन निरनिराळ्या वेळीं प्रवेश केला असावा असें दिसतें. या दोन वेळच्या आर्यन् लोकांमध्यें हिंदुस्थानमध्यें मोठें युद्ध झालें, व तेंच महाभारतांत वर्णिलेलें युद्ध होय, असें सर चार्लस एनू. इ. एलियट (ब्रिटानिका)चें म्हणणें आहे. हें आमच्या मतें बाष्कळ आहे ऋग्वेदांत आर्यन् लोकांच्या चरित्रक्रमाचें व रीतीभातीचें जें वर्णन आहे, त्यावरून हे लोक त्यावेळीं परिभ्रमणवृत्तीचे असावे असें दिसतें, व या आर्यन् लोकांतील शासनसंस्था लोकनियंत्रित पद्धतीच्या कांहीं अंशीं होत्या, असेंहि दिसतें. राजसत्ता होतीच पण पुढें राजसत्तेवर वरिष्ठ ब्राह्मण वर्गाचें महत्त्व व समाजावरील वजन फार प्राचीन काळापासून आतांपर्यंत होतें तसेंच चालू आहे. हिंद समाजांत जातिभेद दृढमूल झाल्यामुळें हें महत्त्व कायम टिकण्यास बरीच मदत झाली आहे. ब्राह्मणी वर्चस्वाला मध्यंतरीं बौद्ध धर्माच्या उदयामुळें मोठा धक्का बसला. पुरातन ब्राह्मणी धर्म आणि नवीन उत्पन्न झालेला बौद्ध धर्म

यांमधील झगडा अनेक शतकें चालून त्यामधून आधुनिक काळांतील हिंदु धर्म व संस्कृति तयार झाली आहे. बौद्ध धर्माचीं महत्वाचीं तत्वें अखेर हिंदु धर्मांत अंतर्भूत झालीं. आणि बौद्ध धर्म हिंदुस्थानांतून अजीबात नाहींसा होऊन पूर्व आशियांतील देशांत पसरला.

ख्रि पू. ३२६ मध्यें अलेक्झांडरनें पंजाबवर स्वारी केली. या स्वारीचा तात्कालिक परिणाम फार अल्प होता, पण या स्वारीमुळें नंतर मध्य आशियांत अनेक पर्शुग्रीक राज्यें स्थापन झालीं, त्यांच्या सान्निध्यामुळें हिंदुस्थानांतील कलाकौशल्य आणि विद्या व शास्त्रें यांच्यावर फार परिणाम झाला. साम्राज्यसत्तेची कल्पनाहि हिंदूंच्या मनावर उपर्युक्त पर्शुग्रीकांच्या सान्निध्यामुळेंच ठसली, कारण आशियांतील इतर देशांपेक्षां हिंदुस्थानांत साम्राज्याची कल्पना मागाहून उद्भूत झालेली दिसते, असेंहि सदहू लेखकाचें म्हणणें आहे. हिंदुस्थानांतील पहिलें साम्राज्य मौर्यांचें होय. हें साम्राज्य अशोकाच्या वेळीं ( ख्रि. पू. २६४–२२४ ) अत्यंत विस्तार पावलेलें होतें, कारण अशोकाचा अंमल अफगाणिस्थानापासून मद्रासपर्यंत चालू होता. अशोक स्वतः कट्टा बौद्धधर्मी होता. व त्यानें प्रचारकांमार्फत धर्मप्रसार करण्याचें पहिलें उदाहरण घालून दिलें. बौद्धधर्माचा प्रसार करण्याकरितां त्यानें सर्व हिंदुस्थानभर व सिलोनांत प्रचारक पाठविले. असो. हिंदसाम्राज्यें कधींच चिरकाल टिकलीं नाहींत. त्याप्रमाणें मौर्यांचें साम्राज्यहि अशोकाच्या मृत्यूनंतर ५० वर्षांनीं नष्ट झालें.

या नंतरच्या काळांत ( ख्रि. पू. १५०—इ. स. ३०० ) हिंदुस्थानावर उत्तरेच्या बाजूनें कांहीं अंशीं पार्थियन जातीच्या व कांहीं अंशीं तुर्कीजातीच्या लोकांच्या टोळ्यांनीं स्वाऱ्या केल्या. या स्वाऱ्या करणाऱ्या लोकांमध्यें कुशान जातीचे लोक मोठी प्रसिद्धि पावले व त्यांच्यापैकीं कनिष्क नांवाच्या राजानें उत्तरहिंदुस्थान व काश्मीर यांवर आपलें राज्य स्थापिलें. हे कुशान लोक बौद्धधर्मी बनले होते आणि बौद्धधर्मापैकीं महायान पंथ खुद्द गौतमबुद्धाचीं तत्वें आणि कुशान लोकांतील ग्रीक व पर्शियन कल्पना यांच्या संमिश्रणानें तयार झाला असावा. हिंदुधर्मांतील शैवपंथहि पुष्कळ अंशीं या कुशान लोकांपासून घेतलेल्या गोष्टींनीं भरलेला आहे. कुशानांचें राष्ट्र नष्ट होऊन तेथें गुप्त नांवाच्या देश्य सम्राटांनीं आपला अंमल बसविला. गुप्त साम्राज्य सत्तेनेंहि कांहीं काळ आपला अंमल बहुतेक सर्व हिंदुस्थानभर बसविला. परंतु पांचव्या शतकांत नव्या हूण लोकांनीं उत्तरेकडून हिंदुस्थानावर स्वाऱ्या केल्यामुळें हें साम्राज्य लयास गेलें. ६ व्या शतकांत मालव नांवाच्या राजघराण्यानें हिंदुसंस्कृतीला आश्रय दिला. पुढें इसवी सन ६०६—६४६ पर्यंत हर्ष नांवाच्या सम्राटानें उज्वल प्रकारानें साम्राज्य केलें. त्याची राजधानी कनोज येथें होती. या काळांत बौद्ध धर्माचा ऱ्हास होऊन हिंदुधर्म आणि संस्कृत वाङ्मय यांचें पुनरुज्जीवन झालें. हर्षानंतर हिंदुस्थानांत कोणीहि बलाढ्य सम्राट उत्पन्न झाला नाहीं आणि सर्व देशभर लहान लहान राज्यें परस्परांबरोबर स्पर्धा करणारीं आणि ऐक्यविघातक अशीं चालू राहिल्यामुळें पुढें मुसुलमानी स्वाऱ्यांचा हिंदुस्थानवर जो मोठा लोंढा आला त्याला यशस्वी रीतीनें कोणीच तोंड देऊं शकलें नाहीं. इ. स. ७९२ मध्यें मुसुलमानी अरबांनीं सिंध देश जिंकून घेतला आणि पुढें ११ व्या शतकाच्या अखेरीच्या सुमारास सर्व उत्तर हिंदुस्थान मुसुलमानांच्या हातीं गेला. यापुढील मुसुलमानधर्मी लोकांच्या अंमलाचे दोन कालविभाग पडतात. एक विभाग ( १२००—१५२६ ) तुर्की लोकांच्या अंमलाचा व दुसरा मोंगल बादशहांच्या अंमलाचा. पहिल्या कालविभागांत तुर्की व इराणी अशा मिश्र जातींचीं अनेक राजघराणीं झालीं. परंतु त्यांपैकीं कोणीहि सुसंघटित साम्राज्य हिंदुस्थानभर स्थापूं शकलें नाहीं. मुसुलमान राजांच्या राजधानीच्या आसपास मुसुलमानी धर्म झपाट्यानें पसरला पण राजपुताना आणि विजयानगर ( म्हैसूर) येथील राज्यांत हिंदुधर्म आणि हिंदुसंस्कृति कायम टिकून राहिली.

१५२६ मध्यें हिंदुस्थानवर मोंगल लोकांचा अंमल सुरू झाला. त्यांनीं आपली राजधानी दिल्ली येथें स्थापिली. या मोंगल बादशहांना दक्षिणहिंदुस्थान पूर्णपणें कधींहि जिंकतां आला नाहीं तथापि हिंदुस्थानच्या बऱ्याचश्या भागावर सुमारें २ शतकें यांचें साम्राज्य चालू होतें. या मोंगल बादशहांपैकीं अकबर आणि शहाजहान यांची कारकीर्द फार उज्वल झाली. १७०७ नंतर मोंगल साम्राज्यास उतरती कळा लागली. प्रांतोप्रांतीच्या मोंगल सुभेदारांनीं स्वतंत्र राज्यें स्थापिलीं आणि मध्यहिंदुस्थान व दक्षिणहिंदुस्थानमध्यें मराठ्यांची सत्ता फार बळावली. तिनें मोंगल बादशाहीला पूर्ण ग्रहण लावून आपली सत्ता बहुतेक हिंदुस्थानावर बसविली. मध्यंतरी नादिरशहानें दिल्लीवर स्वारी केली व अहंमदशहा अबदालीनें हिंदुस्थानावर स्वाऱ्या केल्या. याच सुमारास मुंबई, मद्रास व बंगालकडे फ्रेंच व इंग्लिश यांची सत्ता वाढत चालली होती. त्या एकंदर बखेड्यांत कसेबसे जीव धरून राहिलेले मोंगल साम्राज्य अखेर १८५७ च्या बंडानंतर नष्ट झालें.

हिंदुस्थानात मुसुलमानी लोकांचा अंमल सुरू होईपर्यंत हिंदुस्थानचा इतिहास राजकीय घडामोडींपेक्षां बौद्धिक क्षेत्रांतील प्रगतीनें व धर्मविषयक निरनिराळ्या मतमतांतरांनींच विशेष भरलेला आहे. हिंदुस्थानांतील निरनिराळे प्रांत व्यापून राहिलेल्या अखिल हिंदु समाजामध्यें जी कांहीं एकराष्ट्रीयत्वाची भावना जागृत होती, तिचें कारण वरिष्ठ ब्राह्मण जातीचें अखिल हिंदु समाजावर अगदीं खालच्या थरापर्यंत सतत चालू असलेलें वजन हें होय. खुद्द राजांनांहि मान दुय्यम दर्जाचा असे. राजांचा अधिकार राजकीय क्षेत्रापुरता चाले. सर्व हिंदु राष्ट्राचे नेते व प्रतिनिधी अशा

प्रकारचा मान व दर्जा त्यांनां केव्हांहि नव्हता. तात्पर्य हिंदुस्थानावर राज्य करणारे राजे व सम्राट यांच्यापेक्षां ब्राह्मण जाती, हिंदु धर्म, वाङ्मय, आणि कलाकौशल्य यांचा परिणाम हिंदुस्थानावर फार अधिक झाला आहे. इतकेंच काय पण इराणपासून जपानपर्यंत आशियाखंडाच्या सर्व भागावर हिंदु संस्कृतीचा परिणाम कमजास्त प्रमाणांत झाला असल्याचें दिसून येतें.

इ रा ण.—इराणी लोक, आणि त्यांच्याच जोडीनें पुष्कळ वेळां उल्लेखिले जाणारे मीड लोक, हे मूळ शुद्ध आर्यकुलांतले असावेत असें दिसतें. कारण इराणी लोकांची मूळ भाषा आणि धर्म यांचें हिंदु लोकांच्या वेदांतील भाषेशीं आणि धर्माशीं बरेंच साम्य आहे. त्यामुळें इराणी लोकांचे पूर्वज आणि हिंदु लोकांचे पूर्वज हे पूर्वी एकेकाळीं मध्यआशिया-मध्यें एकत्र राहात असावे असें वाटतें. इराणी लोकांच्या प्राचीन धर्माला पुढें झरथुष्ट्रानें सुधारून नवें स्वरूप दिलें. झरथुष्ट्र हा ऐतिहासिक पुरुष होता व तो खि. पू. ७ व्या शतकाच्या सुमारास होऊन गेला असें मानण्यास हरकत नाहीं. खि. पू. ६ व्या शतकापासून इराणी लोकांचें साम्राज्य, जें त्यावेळीं मीडियन साम्राज्य म्हणून प्रसिद्ध होतें तें आस-पासचीं राज्यें नष्ट करून बरेंच वाढलें. या इराणच्या साम्राज्यानें बाबीलोनियाचें दोस्त असलेलें निनेव्हे येथील असुरियन लोकांचें राज्य नष्ट केलें आणि नंतर अर्ध्या शतकानें सायरस नांवाच्या इराणी बादशहानें बाबिलोन शहरहि हस्तगत केलें, सायरसनें स्थापन केलेलें सुप्रसिद्ध ऑकिमेनिडी राजघराणें मेडियन जातीचें होतें. तथापि मीडियन लोक म्हणजे इराणी लोकांचीच एक शाखा होती, स्वतंत्र मानव जात नव्हती. आकिमेनिडी राजघराण्याची सत्ता अगदीं शिखरास पोहोंचली त्यावेळीं ऑक्सस नदी-पासून पूर्वेस सिंधुनदीपर्यंत, पश्चिमेस थ्रेस प्रांतापर्यंत व दक्षिणेस ईजिप्तपर्यंत इतक्या विस्तृत प्रदेशावर पसरली होती. तथापि हें अफाट साम्राज्यहि ग्रीक लोकांच्या हल्ल्यापुढें टिकाव धरूं शकलें नाहीं. प्रथम डरायस व क्सर्क्सीज या इराणच्या बादशहांनीं ग्रीक देश जिंकून घेण्याचा प्रयत्न केला परंतु त्यांचे हल्ले ग्रीक लोकांनीं परत फिरविले, इतकेंच नव्हे तर अलेक्झांडर दि ग्रेटनें इराणचा बादशहा तिसरा डरायस याला खि. पू. ३२९ मध्यें युद्धा-मध्यें जिंकलें. तथापि सेल्युसिड नांवाच्या राज्याच्या सत्तेखालीं इराणी साम्राज्याचा बराच भाग कायम राहिला. सेल्युसिड राजे हेलेनी उर्फ ग्रीक संस्कृ-तीचे होते. त्यांनीं ग्रीक विद्यांचा पूर्वेकडील देशांत प्रसार करण्याचें महत्त्वाचें कार्य केलें. लवकरच बॅक्ट्रिया देश एका इंडोग्रीक राजसत्तेखालीं स्वतंत्र झाला. या राज्यांत ग्रीक, इराणी, मध्य आशियाटिक व हिंदु इतक्या संस्कृतींचें एकत्र मिश्रण होऊन त्याचा परिणाम हिंदुधर्म कला-कौशल्य, आणि हिंदुस्थानच्यामार्फत पूर्व आशियांतील देश यांच्यावर झाला. याच काळाच्या सुमारास (खि. पू. २५० इ. स. २२७) खोरासन व आसपासचे प्रांत यांमध्यें आर्सेसिडी लोकांचें पार्थियन साम्राज्य उदयास आलें. हे पार्थियन लोक मूळ तुराणियन जातीचे दिसतात, पण पुढें त्यांनीं इराणी लोकांच्या पुष्कळ चालीरीती उचलल्या. या पार्थियन सत्तेनें रोमन लोकांच्या हल्ल्यांनां यशस्वी रीतीनें तोंड दिलें. आणि एके काळीं या पार्थियन साम्राज्याची सत्ता हिंदुस्थानपासून सीरिया देशापर्यंत पसरली होती. पुढें हें साम्राज्य सस्सानिड नांवाच्या इराणी राजघराण्यानें धुळीस मिळविलें. या सस्सानिड इराणी राजघराण्यानें चार शतकें राज्य केलें. झरथुष्ट्र संप्रदाय राजधर्म म्हणून मान्य केला व पूर्व रोमन साम्राज्याबरोबर यशस्वी रीतीनें सामना देऊन आपली सत्ता कायम राखिली. परंतु ७ व्या शतकांत त्यांचा हेरॅक्लियसनें पराभव केला आणि पुढें लवकरच मुसुलमानी लोकांच्या हल्ल्यामुळें हें इराणी साम्राज्य धुळीस मिळालें आणि प्राचीन इराणी संस्कृतीहि नामशेष झाली. मुसुलमानी रिसायतींच्या बहुतेक काळांत इराणमध्यें अल्प-कालीन अशीं अनेक राजघराणीं होऊन गेलीं, व देशांत बहुतेक अस्वस्थताच होती. अब्बासशहा (१५८५-१६२८) या मुसुलमान राजाच्या वेळीं इराणला एकी व राज्यवैभव कांहीं अंशीं लाभलें.

पुढें अफगाण लोकांनीं स्वाऱ्या केल्यामुळें अस्वस्थता व अव्यवस्था उत्पन्न झाली. हल्लींचें इराणचें राजघराणें तुर्कोमन वंशातलें असून तें १७८९ पासून चालू आहे. नुक-तीच जवळ जवळ पूर्ण लोकसत्ता स्थापन झाली आहे. इराणी लोकांचीं कलाकौशल्य, वाङ्मय आणि धर्म या संबंधाची काम-गिरी अगदींच टाकाऊ नाहीं. परंतु ती संमिश्र स्वरूपाची आहे. इराण देश भौगोलिक दृष्ट्या ज्या ठिकाणीं वसलेला आहे त्यामुळें इराणचें साम्राज्य आसपासच्या देशावर पसरलें व आशियामायनर बाबिलोन व हिंदुस्थान या देशांतील कला-कौशल्य आणि कल्पना यांचा परस्पर विनिमय करण्याचें कार्य इराणनें केलें. उदाहरणार्थ ग्रीक शिल्पकला इरा-णच्या द्वारें हिंदुस्थानांत शिरली आणि मिथ्र देवतेची उपा-सना इराणच्या द्वारेंच पश्चिम यूरोपांत गेली. इराणचें वाङ्मयहि संमिश्र स्वरूपाचें असल्यामुळें त्याबद्दलची आवड हल्लीं पौरस्त्य देशापेक्षांहि यूरोपांत अधिक आहे. उलटपक्षीं इराण व ग्रीस यांच्यामधील युद्धास एक प्रकारें आशिया व यूरोप यांच्यामधील झगड्याचें स्वरूप प्राप्त झालें होतें. वास्तविक दोन्हीहि राष्ट्रें मूळ आर्यन्‌वंशीं असतांहि युध्यमान पक्षांना त्यावेळीं त्यांची जाणीव नव्हती.

य हु दी लो क.—इस्राइल उर्फ यहुदी लोक हे मूळचे अरब लोकांप्रमाणेंच भटक्या जातीपैकीं होते. सुव्यवस्थित शासनपद्धतीची आवड व धर्मविषयक विचारांत विशेष प्रकारची बुद्धिमत्ता या दोन्ही गोष्टींचा अरबांप्रमाणें यहुदी लोकांतहि अभाव होता. तथापि यांच्या अंगीं अनेक

नांवाजण्यासारखे गुण आहेत. त्या गुणांपैकीं परक्या राष्ट्रांत, परक्या समाजांत पूर्णपणें एकजीव होऊन न जातां किंवा राजकीयदृष्ट्या विशेष पक्षभाव न माजवितां वास्तव्य करून राहण्याचा एक विशेष गुण त्यांच्या अंगीं आहे. या लोकांच्या प्राचीन दंतकथात्मक इतिहासांवरून असें दिसतें कीं, ते प्राचीन काळीं आपला मूळ देश सोडून इजिप्तच्या सरहद्दी-वरील प्रांतांत वसाहत करून कांहीं शतकें तेथें राहिले. ही गोष्ट ख्रि. पू. १३०० च्या सुमारास घडली. त्यानंतर आणखी थोडें उत्तरेकडे सरून त्यांनीं तेथें आपलें एक लहानसें राज्य स्थापिलें. हें राज्य सालोमन नामक राजाच्या वेळीं थोडा काळ चांगलें सुसंघटित बनलें. परंतु पुढें अंतस्थ कलहामुळें व असुरीया आणि बाबिलोन यांच्या हल्ल्यांमुळें मृत्युपंथीं लागलें. ख्रि.पू.७२० मध्यें शाल्मनेसर यानें इस्रायल अथवा उत्तरेकडचें राज्य नष्ट केलें, आणि त्यावेळच्या पद्धतीस अनुसरून तेथील बहुतेक लोकांस हद्दपार केलें. तथापि त्यांचे वंशज हल्लीं तेथें असलेल्या निरनिराळ्या जातींच्या लोकांमध्यें मिसळलेले असण्याचा संभव आहे. तथापि हल्लीं ज्या लोकांनां ज्यू म्हणून म्हणतात त्यांचें शारीरिक वळण इस्रायल लोकांपेक्षां भिन्न आहे. ख्रि. पू. ५८८ मध्यें नेबुखाड नेझर यानें ज्यू लोकांना कैद करून नेलें परंतु इराणी लोकांनीं बाबिलोनिया जिंकल्यावर ज्यू लोकांची मुक्तता होऊन ते पॅलेस्टाइनला ५३८ मध्यें परत आले. या बंदिवासाच्या काळांत ज्यू लोकांचीं मतें आणि सामाजिक संस्था यांमध्यें बराच फेरबदल झाला. बाबिलोन हें बराच काळ ज्यू लोकांचें केंद्रस्थान होतें, आणि तेथून ज्यू लोक अनेक देशांत गेले. यरुशलेम येथें ज्यू लोकांचें पुन्हा स्थापन झालेलें राज्य सुमारें ६ शतकें टिकलें. या काळांत त्यांचें राज्य अंशतःस्वतंत्र व अंशतः इराणी, इजिप्शियन, सीरियन व रोमन अमलाखालीं होतें. या काळांत स्वतःचे राष्ट्रीय आचारविचार कायम राखण्याकरितां ज्यू लोकांनां त्यांच्या वरील साम्राज्यसरकारशीं अनेक झगडे करावे लागले. या झगड्यांत अखेर इ. स. ७० मध्यें टायटसनें ज्यू लोकांचें देवालय नष्ट केलें आणि पुढें लवकरच ज्यू लोकांचा देश उध्वस्त करून टाकिला. या आपत्तीच्या काळांत पुष्कळसे ज्यूलोक ईजिप्तमध्यें टॉलेमी राजांच्या अमलाखालीं जाऊन राहिले आणि त्यांनीं अलेक्झांड्रियन शास्त्रकलांमध्यें नांव घेण्यासारखी भर घातली. ईजिप्तखेरीज सीरिया, आशियामायनर, ग्रीस व इटाली या देशांतहि ज्यूलोक जाऊन राहिले व त्यांनीं तेथें ख्रिस्ती धर्मप्रसाराच्या कार्यास मदत केली. ज्यूलोक जेथें जेथें जात तेथें तेथें अप्रिय होत. तथापि परकीयांचा छळ सोसूनहि ज्यूलोक हळू हळू यूरोपांतील बहुतेक देशांत पसरले. पंधराव्या शतकांत स्पेनमधून त्यांची हकालपट्टी करण्यांत आली तेव्हां ते पूर्वेकडील प्रदेशांत गेले. हल्लीं यूरोपमधील पूर्वेकडील देशांतच ज्यूलोकांची वस्ती अधिक आढळते. ज्यूलोक आशियाटिक लोकांशीं गुण्यागोविंदानें राहूं शकतात, त्या मानानें यूरोपांत त्यांनां त्रासच भोगावा लागतो. तथापि नवलाची गोष्ट ही कीं, ज्यू लोक आशियांत राहण्यापेक्षां यूरोपांत राहणेंच अधिक पसंत करितात.

अ र ब लो कः—अरब लोकांमध्यें इस्लामी धर्माचा उदय होण्यापूर्वीचा या लोकांचा इतिहास बहुतेक उपलब्ध नाहीं. तथापि अरब या नांवाचा उल्लेख ख्रि. पू. ९ व्या शतकापासून अलीकडच्या काळांत भोंवतालच्या राष्ट्रांच्या इतिहासांत आढळतो. या लोकांत कांहीं लहान लहान राज्यें होतीं, तथापि बहुतेक हे लोक टोळ्या टोळ्या करून आपापल्या पुढाऱ्याच्या नेतृत्वाखालींच रहात असत. अरब लोकांचा बाबिलोनियन व ज्यू लोकांशीं संबंध असल्याचें भाषाविषयक व मानववंशशास्त्रविषयक पुराव्यावरून दिसतें. पूर्वी एका काळीं आबीसीनिया देशांत जाऊन राहिलेल्या सेमाइट लोकांची भाषा व लिपि यांचें दक्षिण अरबस्तानांतील भाषा व लिपि यांच्याशीं साम्य असल्याचें आढळतें. यावरून हे सेमाइट लोक मूळ अरबस्तानांतून आफ्रिकेंत गेले असावे असें दिसतें. आरंभीच्या मुसुलमानी वाङ्मयावरून अरबस्तानांत इराणी, ख्रिस्ती आणि ज्यू लोकांतील कल्पना शिरल्या होत्या असें दिसतें.

मुसुलमानी धर्माचा उदय होतांच या अरब लोकांनां एकदम मोठी स्फूर्ति झाल्याचें दिसतें. कारण महंमद पैगंबरानंतरच्या चार दोन शतकांत हे लोक तत्कालीन ज्ञात असलेल्या सर्व जगावर आपलें राजकीय वर्चस्वच नव्हे तर आपला नवा धर्म व आपली संस्कृति यांचा अंमल बसवतात कीं काय असा धाक उत्पन्न झाला. त्यांनीं पूर्वेकडे हिंदुस्थान व मध्यआशिया यांवर स्वाऱ्या करून विजय मिळविले. त्याचप्रमाणें पश्चिमेकडे स्पेन व मोरोक्को हे देश पादाक्रांत केले. दमास्कस येथील उमईद खलिफांच्या वेळीं आणि बगदादच्या अब्बासी खलिफांच्या वेळीं आशि हिंदुस्थानपर्यंतच्या पश्चिमआशियांत ही मुसुलमानी सत्ताच सर्वश्रेष्ठ होती. तथापि चिरकालीन टिकाऊपणा येण्याकरितां लागणारा सुव्यवस्थितपणा व सुसंघटितपणा या मुसुलमानी सत्तेमध्यें नव्हता. त्यामुळें मुसुलमानी साम्राज्याचे तुकडे पडून त्यांपैकीं कांहीं स्वतंत्र झाले, व बाकीचे तुर्क लोकांनीं आपल्यांत सामील केले. स्पेनमध्यें अरब लोकांची सत्ता होती त्यावेळीं त्यांच्यामध्यें परधर्मसहिष्णुता आणि सुसंस्कृतपणा बराच दिसून आला. ही अरबांची सत्ता १५ व्या शतकामध्यें चार्लस मार्टेल यानें नष्ट केली.

अरबांच्या राजकीय सत्तेचा पात झाला तोहि अगदीं पुरा झाला. खलिफ हे जरी अरबी होते तरी त्यांचें वसतिस्थान अरबस्तानाबाहेर असे. आणि खलिफांची सत्ता नष्ट झाल्यावर तर अरबस्तान पुन्हां मुसलमानी धर्माच्या उदयाच्या पूर्वीच्या स्थितींत जाऊन पडला. अद्यापहि पृथ्वीच्या पाठीवरील अत्यंत कमी ज्ञात अशा देशांपैकींच

अरबस्तान एक आहे. त्याचा इतर जगाशीं राजकीय संबंध फार थोडा आहे. याप्रमाणें राजकीय दृष्ट्या अरबस्तान अगदीं मृत स्थितींत असला तरी अरबी धर्म आणि अरबी वाङ्मय यांचा प्रभाव पश्चिमेकडील अर्ध्या आशियांत तसेंच उत्तरआफ्रिकेंत आणि कांहीं अंशीं पूर्व यूरोपांत पूर्ववत् कायम आहे.

सि लो नः—भौगोलिक दृष्ट्या सिलोनचा हिंदुस्थानाशीं निकट संबंध असला तरी सिलोनचा इतिहास भिन्न स्वरूपाचा आहे. दंतकथात्मक परंपरागत माहितीवरून असें दिसतें कीं ख्रिस्तपूर्व ६ व्या शतकांत गंगेच्या कांठीं रहात असलेल्या आर्यन भाषा बोलणाऱ्या लोकांनीं सिलोनवर स्वारी केली. पुढें अशोकाच्या कारकीर्दींत बौद्ध धर्माचा प्रवेश सिलोनमध्यें झाला. व येथूनच त्या धर्माचा परिणाम ब्रह्मदेश व सयाम या देशांवर झाला असल्यामुळें बौद्ध धर्मी संस्कृतीचें एक केंद्रस्थान या नात्यानें सिलोनला बरेंच महत्त्व आहे. मध्ययुगीन काळांत सिलोनचा इतिहास देश्य राजे आणि वरचेवर स्वाऱ्या करणारे तामिळ लोक यांच्यामधील सामन्यांनीं भरलेला आहे. १२ व्या शतकांत एक बलाढ्य देश्य राजघराणें सिलोनवर राज्य करीत होतें. परंतु पुढें १४०८ मध्यें या बेटावर चिनी लोकांनीं हल्ला केला आणि पुढें १५०५ पासून अनेक यूरोपीयन लोकांच्या हल्ल्यामुळें व भांडण तंट्यामुळें सिलोनांत सर्व अस्वस्थता माजली. ही अस्वस्थता काहीं अंशीं प्रथम पोर्तुगीज लोकांनीं व नंतर डच लोकांनीं नाहींशी केली. १७९६ मध्यें डच लोकांनां इंग्रज लोकांनां हांकून दिलें व तेव्हांपासून हें बेट इंग्रजांच्या अंमलाखालीं आहे.

इं डो ची नः—ब्रह्मदेश, सयाम, कांबोडिया, आनाम वगैरे भागांनां मिळून हें नांव आहे. व तें सार्थहि आहे. कारण भौगोलिक दृष्ट्या, त्याचप्रमाणें संस्कृतिदृष्ट्याहि हा देश हिंदुस्थान आणि चीन यांच्यामध्यें आहे. हिंदु संस्कृतीचा परिणाम कांबोडियापर्यंतच्या भागांत अधिक आहे. कारण येथें हिंदुस्थानांतील लिपि प्रचारांत आहे आणि सिंहलीस्वरूपाचा बौद्ध धर्म चालू आहे. आनाम आणि टाँगकिंग, या भागांत चिनी लिपि आणि पुष्कळ चिनी स्वरूपाच्या संस्था लोकांत रूढ आहेत. या देशांतील लोक अनेक निरनिराळ्या मानव वंशांतले आहेत. तसेंच तेथें अगदीं मागासलेल्या रानटी जातीहि आहेत. या देशांतील निरनिरनिराळ्या देशांची सविस्तर माहिती ज्ञानकोशाच्या पहिल्या विभागांत दिली आहे.

म ला यी लो क.—या जातीचे लोक बऱ्याच भागांत पसरले आहेत परंतु ते एका शासनसंस्थेखालीं नाहींत. आणि या लोकांच्या विभागणीसंबंधानें मानववंश–वर्णन शास्त्रालाहि अद्याप कोडेंच आहे. या जातीचे लोक मलाया द्वीपकल्प, जावा, सुमात्रा, बोर्निओ, फिलिपाइन बेटें व आसपासचीं इतर बेटें तसेंच मादागास्कर बेट या सर्व ठिकाणीं आढळतात. शिवाय दक्षिण समुद्रांतील न्युझीलंड, हवाई वगैरे बहुतेक बेटांतील लोक प्रत्यक्ष मलायी भाषा नाहीं तरी मलायी भाषेचा ज्यांच्यावर मोठा परिणाम झाला आहे अशा भाषा बोलतात. यावरून मलायी लोक भूखंडवासी नसून समुद्रावरच नेहमीं भटकणारे असावे असें वाटतें. अगदीं अलीकडील उपपत्ति अशी आहे कीं, या भागांतील सर्व भाषांचा मिळून एक समुच्चय असून त्यांत मुंडा, मोनख्मेर, मलायी, पॉलिनेशियन व मायक्रोनेशियन इतक्या भाषांचा समावेश होतो. व हा भाषासमुच्चय मूळ पश्चिम आशियामधून या भागांत पसरला. मलाया द्वीपकल्पाच्या इतिहासांत तीन कालविभाग पडतात. पहिल्या कालविभागांत हा सर्व प्रदेश अर्धवट रानटी लोकांनीं व्यापलेला होता. दुसऱ्या कालविभागांत मलाया द्वीपकल्प, जावा, सुमात्रा व इतर बेटें यांत हिंदुसंस्कृतीचा प्रसार झाला. हल्लीं या भागांत जे हिंदुपद्धतीचे अवशेष सांपडतात. तसेंच तिकडील भाषेंत हिंदुस्थानांतील भाषेंतले पुष्कळसे शब्द आढळतात आणि हिंदु चालीरिती आढळतात त्यावरून एका काळीं या भागांत हिंदुसंस्कृतीचा फार मोठा परिणाम झाला असें स्पष्ट दिसतें. यानंतरच्या तिसऱ्या विभागांत मलाया द्वीपकल्प व मलायी बेटें यामध्यें हिंदुसंस्कृति दडपून जाऊन मुसुलमानी धर्म स्थापन झाला. हल्लीं मलाया द्वीपकल्पांत अरबी लिपी प्रचारांत आहे. परंतु जावा, सुमात्रा वगैरे बेटांत हिंदुस्थानांतील लिपी चालू आहे.

ति बे ट.—या बाजूला असलेल्या डोंगराळ देशांतील संस्कृति कांहीं विशेष प्रकारची आहे. मुसुलमानी धर्माच्या तडाक्यांतून ही संस्कृति पूर्णपणें अलिप्त राहिली आहे आणि तिबेट जरी चीनच्या साम्राज्यसत्तेखालीं आहे तरी चिनी संस्कृतीचा प्रत्यक्ष परिणाम तिबेटवर फार झालेला नाहीं. या देशांतली सर्वांत अधिक लक्षांत भरणारी गोष्ट म्हणजे तेथला धर्म ही होय. याला लामा धर्म असें म्हणतात. ते उत्तर कालीन हिंदी बौद्ध धर्माचें एक अपकृष्ट स्वरूप आहे. चेंगीझखान व तदुत्तर सत्ताधीश यांच्या कृपेमुळें येथील लामांनां राजकीय सत्ताहि प्राप्त झाली असून हल्लीं येथील राजास यूरोपांतील पोप सारखें स्वरूप आहे.

मं गो ल लो क.—मंगोल लोकांची जी संस्कृति आहे ती चिनी आणि हिंदुसंस्कृति यांचें मिश्रण आहे. हिंदुसंस्कृतीचा परिणाम मंगोल लोकांवर तिबेट मार्फत झाला. तेथें प्रथमारंभींच्या नेस्टोरियन मिशनऱ्यांनीं आणलेली सीरिअक लिपी हल्लीं प्रचारांत आहे.

वा ङ्म य, क ला व शा स्त्र.—आशियाखंडांतील देशांपैकीं प्रत्येक देशाला स्वतःचें वाङ्मय आहे. कांहीं देशांचें वाङ्मय देश्य नसून परकी ग्रंथांचें विशेषतः धार्मिक ग्रंथांचें भाषांतर केलेले ग्रंथ किंवा मूळच कायम ठेवलेले

ग्रंथ यांचें बनलेलें आहे. उदाहरणार्थ इंडोचीन तिबेट मंगोलिया, कोरिया, व मांचूरिया इतक्या देशांचें वाङ्मय मुख्यतः चिनी किंवा हिंदू आहे. आशियांतील मुख्य स्वतंत्र वाङ्मयें चिनी, संस्कृत, पाली, अरबी व इराणी हीं आहेत. जपानी लोकांनीं महत्त्वाचे असे थोडे ग्रंथ लिहिले आहेत. आणि हे ग्रंथ लौकिक विषयांवरील आहेत. प्राचीन चिनी ग्रंथ फार मोठ्या योग्यतेचे आहेत व त्यांचा परिणामहि पुष्कळ झालेला आहे. हिंदुस्थानांतील संस्कृत वाङ्मय फार अफाट आहे आणि या संस्कृत ग्रंथांची भाषांतरें होऊन चीन, जपान व जावा या देशांत गेलीं आहेत. संस्कृत वाङ्मयाचे मुख्य विषय धर्म व काव्य हे असून इतर अनेक विषयांवर ग्रंथ आहेत. पण इतिहास ग्रंथ फारसे नाहींत. आधुनिक काळांत हिंदुस्थानांतील निरनिराळ्या भाषांत मोठालें वाङ्मय तयार झालें आहे. पालीवाङ्मय हा वाङ्मयाचाच एक भाग आहे, परंतु त्याचा इतिहास स्वतंत्र आहे. कारण पाली वाङ्मय हिंदुस्थानांतून नष्ट होऊन तें सिलोनमध्यें सुरक्षित ठेवले गेलें आहे. आणि तेथून त्याचा प्रसार ब्रह्मदेश व सयाम यांमध्यें झाला आहे. बुद्धाच्या संवादांचें पालींत झालेलें भाषांतर हे ग्रंथ आशियांत उत्तमोत्तम ग्रंथांपैकीं आहेत. सर्व मुसुलमानी ग्रंथांचें वाङ्मय पुष्कळ अंशीं अरबी वाङ्मयांतील ग्रंथांच्या स्फूर्तीनें तयार झालें आहे, या वाङ्मयांत गद्यात्मक व पद्यात्मक असे पुष्कळ मोटमोठाले ग्रंथ आहेत. इराणी वाङ्मय मूळ अरबी वाङ्मयाचें स्वरूपांतर असून त्याचा परिणाम आशियांतील हिंदुस्थानी व तुर्कीपर्यंत सर्व मुसलमानी वाङ्मयावर पुष्कळ झाला आहे.

ओ ल्ड टे स्टॅ मेंट.—( बायबलांतील जुना करार ) हा ग्रंथ पश्चिम आशियांत निर्माण झालेला आहे. पण त्याखेरीज आशियांतील वाङ्मयाचा यूरोपवर झालेला परिणाम फारच अल्प आहे. तुर्कांचा अंमल सुरू झाल्यावर ग्रीक आणि हेलॅनिक भाषावर मोठीच आपत्ति कोसळली. तरीहि यूरोपीय लोकांनीं तुर्की किंवा अरबी वाङ्मय स्वीकारण्याकडे मुळीच कल दाखविला नाहीं असें ब्रिटानिकाकार म्हणतात. पण बऱ्याचशा अरबी शास्त्रीय ग्रंथांचीं भाषांतरें लॅटिन वगैरे भाषांतून झालीं आहेत व त्यामार्फतच ग्रीक संस्कृतीचें पुनरुज्जीवन झालें.

आशियांतील कलाकौशल्याचे, मुख्य तीन प्रकार आहेत चिनी हिंदु व मुसुलमानी. चिनी कलाकौशल्यांत स्वतंत्र स्वतःच्या अशा बऱ्याच गोष्टी आहेत. शिल्पकला चिनांत फारच कमदर्जाची आहे. परंतु चित्रकला, चिनी मातीचीं भांडीं करण्याची कला आणि काचमिना (एनॅमेल) या विशेष कौशल्याच्या कलांत चिनी लोकांनीं प्रावीण्य संपादिलें आहे. जपानी कलाकौशल्याला चिनी कलाकौशल्यापासूनच फार स्फूर्ति मिळालेली असून पुढें जपानी लोकांनीं स्वतःच्या स्वतंत्र गोष्टींची त्यांत पुष्कळ भर घातली आहे. चिनी व जपानी या दोन्ही कलाकौशल्यावर हिंदुकलाकौशल्याचा बौद्धधर्मामार्फत बराच परिणाम झाला आहे. हिंदुकौशल्य दक्षिण हिंदुस्थानाशिवाय करून निर्मळ हिंदूचें नमुने तें देश व ग्रीको इराणी यांचें मिश्रण आहे. चिनी आणि हिंदु कौशल्य यामध्यें मुख्य भेद असा आहे कीं, हिंदु लोकांची बुद्धिमत्ता चित्रकलेपेक्षां शिल्पकला आणि खोदकला यांत अधिक प्रगत झालेली दिसते. मुसुलमानी कलाकौशल्य पुष्कळ अंशीं शिल्पकलेंत दिसून येतें, आणि त्याचा परिणाम बहुतेक सर्व मुसुलमानी देशांवर झाला आहे. मुसुलमानी कलाकौशल्यांत अरबी अंग अल्प आहे, पण बायझँटियमची भर फार आहे.

आशियासंबंधानें दुसरी महत्त्वाची गोष्ट अशी आहे कीं, कलाकौशल्य आणि वाङ्मय या दोन्ही बाबतींत अर्वाचीन आशियाची कामगिरी प्राचीन काळांतील कामगिरीच्या मानानें फार कमी दर्जाची आहे. पण यूरोपांत याच्या अगदीं उलट स्थिति आहे, म्हणजे प्राचीन कामगिरी अधिक श्रेष्ठ प्रतीची आहे.

शास्त्रसंबंधानें पाहतां बाबिलोनियन लोकांनीं फार प्राचीन काळांत ज्योतिषशास्त्रांत बरीच प्रगति केली होती. आणि ज्योतिष शास्त्राचें ज्ञान तेथून सर्व आशियावर पसरलें असावें असें वाटतें. व्याकरणशास्त्र आणि छंदःशास्त्र या शास्त्रांत हिंदुस्थाननें ख्रिस्ती शतकापूर्वीच कित्येक शतकें फार वाखाणण्यासारखी प्रगति केली असल्याचें दिसतें. गणितशास्त्रांत चिनी, हिंदु आणि अरब या तिघांनीहि प्रगति केलेली आहे. पण वैद्यकशास्त्रासारखीं सृष्ट पदार्थांचें प्रत्यक्ष अवलोकन करून वाढ करावयाचीं शास्त्रें आशियाखंडांत यूरोपच्या मानानें आज सर्वत्रच मागासलेल्या स्थितींत आहेत. दोन तीन शतकांपूर्वी यूरोपखंडाची स्थिति जवळ जवळ याच्या उलट होती. इतिहास व प्रवासवृत्तें या जातीचे ग्रंथ अरबी व चिनी भाषेंत पुष्कळ आहेत.

आ शि या चा इ त र खं डां व र प रि णा म.—पश्चिम आशियाखंडाचा परिणाम मुख्यतः यूरोप खंडावर झाला आहे, व तें स्वाभाविक आहे. कांहीं यंत्रविषयक शोधांच्या बाबतींत यूरोपियन लोक चिनी लोकांचे ऋणी असले तरी चीन देश फार दूर असल्यामुळें चीनचा प्रत्यक्ष परिणाम यूरोपवर घडणें अशक्य आहे. हिंदुस्थानचा परिणाम पश्चिमेकडील देशांपेक्षां पूर्वेकडील देशांवर मुख्यतः झाला आहे. आद्य आवस्थेंतील ख्रिस्ती धर्म आणि बौद्धधर्म यांत कित्येक साम्य स्थळें आहेत. पण तें साम्य केवळ काकतालीयन्यायाचें असावें असा पाश्चात्य पंडितांचा आग्रह आहे. तसेंच आद्यकालीन ग्रीस तत्त्वज्ञान व नंतरच्या अलेक्झांड्रियन कल्पना यामधेंहि कांहीं सारखेपणा दिसतो. तथापि हिंदुस्थानचा चीनवर जसा प्रत्यक्ष परिणाम झाला

आहे तसा स्पष्ट परिणाम यूरोपीय देशावर झाला असल्याचें दिसत नाहीं.

पश्चिम आशियांतील संस्कृतीचा यूरोपखंड किती ऋणि आहे हें आज नक्की सांगतां येत नाहीं. क्रीट बेट आणि बाबिलोनिया येथें प्राचीन गोष्टीसंबंधाचें बरेंच संशोधन झालें आहे तरी ईजिप्त व बाबिलोनिया यांचा क्रीट बेटांतील संस्कृतीशीं कशा प्रकारचा संबंध होता, त्याबद्दल तज्ज्ञांनीं अद्याप स्पष्ट निकाल दिलेला नाहीं. इजिप्शियन संस्कृतीचा इजियन बेटांतील लोकांवर परिणाम झाला होता हें निश्चित आहे. आणि ग्रीक लेखनपद्धति आणि कालगणनापद्धति मूळ बाबिलोनियांतून घेतली होती असें जें कित्येकांचें म्हणणें आहे तें योग्य पुराव्यानें अद्याप खोटें ठरलेलें नाहीं.

ऐतिहासिक काळांत आशिया खंडानें यूरोपवर अनेक स्वाऱ्या करून वर्चस्व स्थापण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. परंतु त्यांपैकीं बहुतेक स्वाऱ्या यूरोपनें मागें परतविल्या. अशा प्रयत्नामध्यें इराणी लोकांनीं ग्रीसबरोबर केलेलीं युद्धें, इराणी व पार्थियन लोकांनीं रोमन साम्राज्यावर केलेले हल्ले यांचा समावेश होतो. त्यानंतरच्या काळांत आवार लोक हूण, बुल्गार, व त्यांच्यानंतर मोंगोल व तुर्क यांनीं रोमन साम्राज्यावर हल्ले केले आणि ते रोमन साम्राज्याला परतवितां आले नाहींत. मुसलमानांनीं यूरोपांत दोनदां पाय रोवला; एकदां अरबांनीं स्पेनमध्यें आणि दुसऱ्यांदा तुर्कांनीं कान्स्टांटिनोपल येथें. आरंभीच्या काळांत आशियाटिक लोकांनीं यूरोपवर ज्या स्वाऱ्या केल्या त्यांमधील सैनिक दूरदूर देशचे असल्यामुळें ते लवकरच स्वदेशीं परत जात असत. यूरोपांत कायम वस्ती करून क्वचित कोणी राहिल्यास त्यांचा मूळ आशियांतील देशांशीं संबंध कायम रहात नसे. अरबांनीं स्पेनमध्यें मात्र कांहीं काळ कायमचें ठाणें दिलें होतें. तुर्कांनीं पूर्व यूरोप कायमचा व्यापला आहे तथापि आशियाटिक विद्याकलांचें यूरोपांत कायमचें बीजारोपण त्यांनां करतां आलें नाहीं.

सामान्यपणें पाहतां यूरोपनें ऐतिहासिक काळांत आशियाटिक संस्था आणि आचारविचार यांचा पूर्ण तिटकारा दाखविला आहे, अगदीं अलीकडे शोपेनहार सारखे कित्येक पौरस्त्य वाङ्मयाचे अभ्यासी यांच्या ग्रंथांनीं आशियाटिक तत्त्वज्ञानाबद्दल यूरोपीय लोकांत कांहीं आवड उत्पन्न केली आहे.

आशियाचा आफ्रिकेवर बराच परिणाम झाला आहे कित्येक तज्ज्ञांचें असें मत आहे कीं, ईजिप्शियन संस्कृति बाबिलोनियांतून आलेली आहे. कार्थेज आणि फिनिशिया यांमधील संबंध अधिक निश्चित स्वरूपाचा आहे आणि प्राचीन अबिसीनियाचें राज्य दक्षिण अरबस्तानांतील सेमाइट लोकांनीं स्थापिलें हेंहि निश्चित आहे. मुसलमानी धर्म उदयास येण्यापूर्वी अरब लोकांचा प्रवाह पूर्व आफ्रिकेमध्यें सारखा चालू होता व त्यांनीं त्या किनाऱ्यावर अनेक शहरें वसविलीं आहेत. उत्तर आफ्रिकेचा इजिप्तपासून मोरोक्कोपर्यंतचा सर्व भाग मुसुलमानी बनला आहे. तसेंच टिंबक्टूपासून चाड सरोवर व वदई येथपर्यंत मुसलमानी संस्कृतीचा सामान्यपणें बराच परिणाम झाला आहे. ११ व्या शतकाच्या दुसऱ्या व तिसऱ्या चतुर्थकांत अरब लोकांनीं झांझिबार ते मध्य आफ्रिकेंतील सरोवरापर्यंतच्या मुलुखांतील लोक पकडून गुलाम करण्याचा व्यापार बराच चालविला होता. हल्लीं हा व्यापार पूर्ण बंद पडला आहे. यूरोपीय संस्कृति अमेरिकेंत शिरण्यापूर्वीच्या काळांत अमेरिकेंतील देश्य संस्कृतीशीं आशियाचा कितपत संबंध होता हें अद्याप नक्की ठरलें नाहीं. तथापि मेक्सिको आणि मध्य अमेरिका येथील अर्ध सुसंस्कृत लोक मूळ आशियामधून बेहेरिंग सामुद्रधुनीच्या मार्गानें तिकडे जाऊन राहिले. या उपपत्तीला पुष्टि देणारा बराच पुरावा आढळतो. पेरूमधील संस्कृति ही पूर्णपणें देश्य आहे असें कांहीं तज्ज्ञांचें म्हणणें आहे. परंतु केचुआ भाषा मध्य व उत्तर आशियांतील चिकट्या भाषांहून भिन्न नाहीं.

**यूरोपचा आशियावर झालेला परिणाम.**— आशियावर यूरोपचा परिणाम विशेषतः दोन कालविभागांत मोठा झाला आहे. प्रथम, अलेक्झांडरच्या स्वारीनंतरच्या काळांत आणि नंतर अलीकडे सोळाव्या शतकानंतरच्या काळांत, अलेक्झांडरच्या स्वारीमुळें आशियांत अनेक पर्शु ग्रीक राज्यें स्थापन झालीं. या राज्यांनीं आपापल्या मुलुखांत हेलेनी संस्कृतीचा पगडा बसविला, इतकेंच नव्हे तर हिंदुस्थान आणि कांहीं अंशीं चीन येथील धर्म आणि कलाकौशल्य यांवरहि परिणाम घडवून आणिला. यानंतरहि बराच दीर्घ काळपर्यंत आशियाटिक लोकांनीं केलेल्या स्वाऱ्यांस तोंड देण्यांत पूर्व यूरोप गुंतला होता. त्यामुळें पौरस्त्य देशावर यूरोपीय संस्कृतीचा प्रसार करण्याची सवड यूरोपला मिळाली नाहीं. तथापि क्रूसेडस नामक धर्मयुद्धामुळें आशियाचा आणि यूरोपचा बराच संबंध आला. पूर्व यूरोप आणि पश्चिम आशिया एवढ्या भागांपुरताच विचार करतां अद्यापपर्यंत आशियाटिक कल्पनांचाच पश्चिम यूरोपवर पगडा बसलेला आहे. कारण त्या भागांत मुसुलमानी धर्माचें वर्चस्व आहे, आणि यूरोपीय संस्कृतीला तेथें अगदीं कमी मान आहे. परंतु गेल्या महायुद्धापासून ही स्थिति पालटूं लागली आहे. आणि आशिया खंड आणि यूरोपखंड यांचा सामान्यपणें विचार करतां अलीकडे दळणवळणाचीं साधनें वाढल्यापासून मध्य आशिया आणि पूर्व आशिया यावर यूरोपीय संस्कृतीचा परिणाम सारखा वाढत्या प्रमाणावर चालू आहे.

१६ व्या शतकांत पोर्तुगीज लोकांनीं केप ऑफ गुडहोपच्या मार्गानें हिंदुस्थानला जाण्याचा जलमार्ग शोधून काढल्यापासून सर्व मनु एकदम बदलला आहे. तेव्हांपासून आरमारी दृष्ट्या प्रबळ असलेल्या राष्ट्रांनीं पौरस्त्य देश जिंकून घेण्याचा प्रयत्न सुरू केला. हे प्रयत्न मुख्यतः हिंदुस्थान आणि आशियांतील अगदीं पूर्वेकडील भाग यांत

सफल झाले आहेत.आशियांतील हिंदुस्थानच्या पश्चिमेकडील देश आरमारी हल्ले करण्यास कमी सोईचे असल्यामुळें ते बरेच सुरक्षित राहिले आहेत. गेल्या महायुद्धानंतर या सर्व मुसुलमानी देशांतहि हात शिरकविण्याचा दोस्त राष्ट्रांनीं उपक्रम केला आहे. तथापि एकंदरीनें पाहतां यूरोपनें आशियावर जी सत्ता स्थापिली आहे ती समुद्रावरील दळ-वळणाचे मार्ग सुधारल्यानंतरची आहे. तरी पण यूरोपनें आशियांतील देश मोठमोठाली सैन्यें नेऊन जिंकले नाहींत. तर प्रथम व्यापाराकरितां शिरकाव करून हळूहळू प्रदेश आपल्या अंमलाखालीं आणला आहे. आशियांतील देश जिंकण्याकरितां ज्या यूरोपीय राष्ट्रांची स्पर्धा चालू होती त्यांचें यशापयश त्या त्या राष्ट्रांचा यूरोपांतील युद्धांत मिळा-लेल्या यशापयशावर अवलंबून असे. प्रथम पोर्तुगीज लोक आशियांत आले, व त्यांनीं १६ व्या शतकांत पूर्व आफ्रिका, हिंदुस्थान व चीन यांच्या किनाऱ्यावरील मुलूख काबीज करून बरेचसें साम्राज्य वाढविलें. पुढें डच लोक आशियाकडे वळले, व त्यांनीं पोर्तुगीज लोकांवर सरशी केली. तथापि दक्षिण आशियाचा मुलूख जिंकण्याकरितां मुख्य झगडा फ्रान्स व इंग्लंड या देशांमध्यें १७४०–१७८३ च्या दरम्यान झाला. या दोन्ही देशांनीं हिंदुस्थानांत प्रथम व्यापारी कंपन्यांच्या रूपानें प्रवेश केला. आणि नंतर मोंगल साम्राज्याला पडता काळ येऊन हिंदुस्थानांत अस्वस्थता उत्पन्न झाल्यावर तिचा फायदा घेऊन या कंपन्यांनीं स्वसंरक्षणा-करितां लष्कर ठेवण्यास सुरवात केली. पुढें देश्य राजांच्या आपापसांतील भांडणांत लष्करी मदत करण्याची या कंप-न्यांनीं सुरुवात केली. या खटाटोपांत अखेर इंग्लंड यशस्वी झालें, आणि त्याचें कारण फ्रान्सपेक्षां इंग्लंडचें आरमारी सामर्थ्य अधिक ठरत जाऊन इंग्लंडची समुद्रावर सत्ता प्रस्थापित झाली हें होय. नेपोलियनबरोबरच्या युद्धानंतर पोर्तुगालच्या ताब्यांत फक्त मकाऊ, दीव, दमण आणि गोंवा; हॉलंडच्या ताब्यांत जावा, सुमात्रा व इतर कांहीं बेटें; फ्रान्सच्या ताब्यांत हिंदुस्थानांतील पाँदेचरी, चंद्रनगर वगैरे किरकोळ दोन चार ठिकाणें राहिलीं; आणि इंग्लंड पूर्ण-पणें विजयी होऊन त्याला हाँकाँग, सिंगापूर, सिलोन आणि हिंदुस्थान इतका मुलूख मिळाला. ईस्ट इंडिया कंपनीनें वॉरन हेस्टिंग्ज वगैरे अधिकाऱ्यांच्या मार्फत हिंदुस्थान देश जिंकण्याच्या कामांत चांगलें यश मिळविलें. १८०९ मध्यें व्यापार करण्याचा हक्क ईस्ट इंडिया कंपनीखेरीज इतरांनाहि देण्यांत आला. आणि ईस्ट इंडिया कंपनीनें आपली राज-कीय सत्ता वाढविण्याचें काम विशेष जोरानें केलें. पुढें १८५७ मध्यें बंड झाल्यानंतर हिंदुस्थानावरील कंपनीचा अंमल नष्ट करून राज्यकारभाराचा सर्व अधिकार ब्रिटिश पार्लमेंट व बादशहा यांनीं आपल्या हातीं घेतला. आतां जबाबदार राज्यपद्धति अलीकडे सुरू होत आहे. १९ व्या शतकांत यूरोपिय लोकांनीं आशियां-तील कित्येक स्थळें हस्तगत केलीं आहेत, उदाहरणार्थ, इंडोचीन ( फ्रान्स ), ब्रह्मदेश व वे–है–वे ( ब्रिटन ) आणि किओ–चौ ( जर्मनी, सध्यां जपान ). पण हीं स्थळें निराळ्या तऱ्हेनें हस्तगत करण्यांत आलीं. १७ व्या व १८ व्या शतकांतील देश जिंकण्याचें काम व्यापारी कंपन्यां-मार्फत पुढील कार्याची पूर्ण जाणीव नसलेल्या स्थितींत केलें; याच्या उलट वर उल्लेखिलेलीं स्थळें १९ व्या शतकांत त्या त्या राष्ट्राच्या प्रधान मंडळानें बुद्धिपुरःसर प्रयत्न करून मिळविलीं आहेत. जणू काय १९ व्या शतकांत यूरोपांत अशी समजूत होती कीं, सर्व आशिया खंड यूरोपीय राष्ट्रांनां जिंकून घेण्याकरितां असून त्यांत ज्याला जितका साधेल तितका त्यानें हात मारून घ्यावा.

रशियानें मात्र आशियाचा भाग निराळ्या रीतीनें म्हणजे जमीनीवरील मार्गानें जिंकला आहे. आणि हें काम रशि-याला फारसें अवघडहि गेलें नाहीं, कारण रशियानें जिंक-लेल्या प्रदेशांत अर्धवट रानटी स्थितींतले लोकच राहात असल्यामुळें सैबिरिया व मध्य आशिया जिंकण्यास रशि-याला फार अडचणी आल्या नाहींत. तुर्कस्तान जिंकण्याचा एकदां रशियानें प्रयत्न केला पण यूरोपीय राष्ट्रांतील मत्सरा-मुळें तेव्हां तुर्कांचा बचाव झाला. त्यानंतर कान्स्टांटिनोपल व इराण जिंकण्याचा रशियानें प्रयत्न केलाच नाहीं, आणि अगदीं पूर्वेकडे जपानशीं संबंध येतांच रशियाचा तेथें पराभव झाला.

एकंदरीनें अलेक्झांडरच्या स्वारीचा आशियावर परिणाम किती झाला हें सांगणें अवघड आहे, तसेंच आधुनिक पाश्चात्त्य सुधारणेचा पौरस्त्य देशांवर किती परिणाम झाला आहे, हेंहि आज नक्की ठरविणें कठिण आहे.आजकाल आशि-याच्या बहुतेक भागांत रेल्वे झाल्या आहेत. तसेंच हिंदुस्था-नासारख्या कांहीं देशांत पूर्वींच्या काळांतील राजकीय अस्वस्थता व बंडाळी नाहींशीं होऊन बरीच शांतता प्रस्था-पित झाली आहे. तथापि अशा बाह्यसुधारणा होणें सोपें आहे, पण आशियाटिक लोकांनां यूरोपबरोबर स्पर्धा करणें तितकें सोपें काम नाहीं. जपाननें अनेक व्यावहारिक गोष्टींत यूरोपीय पद्धति स्वीकारली असली तरी जपाननें यूरोपीय सामाजिक कल्पना तितक्या आत्मसात् केल्या नाहींत

भूस्तर.–आशिया खंडाचे भूस्तरशास्त्रदृष्ट्या तीन भाग कर-तात. दक्षिणेकडील भागांत सीरिया, अरबस्तान व हिंदुस्थान या देशांतील खडक येतात. यांत खालचा थर फार जुन्या खडकांचा असून तो थर जागजागीं दुमडलेला आहे, व त्यावर मेसोझोइक व टर्शिअरी काळांतील खडक आहेत. ते क्षितिजाशीं समांतर आहेत, व कोठेंहि दुमडले गेलेले नाहींत. परंतु कांहीं ठिकाणीं त्यांच्यांत स्तरच्युति झालेली आढळते. या भागाच्या उत्तरेस जो पट्टा आहे त्यांतील खडक मेसोझोइक व टरशिअरी पैकीं असले तरी ते दुमडलेले आहेत व त्याच्यामुळेंच मध्य आशियांतील पर्वतांच्या रांगा तयार झालेल्या आहेत. हिमालयासारखे पर्वत याच पट्ट्यांत

आहेत. हा सर्व पट्टाच दुमडलेल्या खडकांचा झाला असला तरी दोन दुमडींमध्यें बिन दुमडलेला असा बराच भाग आढळतो. अगदीं उत्तरेकडील पट्टयांत सायबेरिया, मोंगोलिया, उत्तरचीन वगैरे देश येतात. या देशांतून केंब्रियन काळांतील खडक फारसे दुमडले गेलेले नाहींत. या पट्टयातील कांहीं पर्वत खडक दुमडल्यामुळें झाले आहेत; परंतु बहुतेक जे पर्वत झाले आहेत त्यांचे मुख्य कारण असें आहे कीं बरेच ठिकाणीं स्तरच्युति झाल्यामुळें कांहीं भाग खोल दडपला गेला व बाकी वर शिल्लक राहिलेला भाग पर्वतासारखा उंच राहिला. वर सांगितलेल्या तीन भागांखेरीज आशियाखंडाचा जो चवथा भाग आहे त्यांत पूर्व किनाऱ्यावरील बेटें येतात. पर्वत उत्पन्न होण्याचीं जीं कारणें सांगितलीं आहेत त्याच कारणामुळें समुद्रांत हीं बेटें झालेलीं आहेत.

आशियाखंडांतील पर्वतांत हिमालय पर्वतच सर्वांत अत्यंत महत्त्वाचा आहे. त्याच्यासंबधानें जी कांहीं माहिती आतांपर्यंत उपलब्ध झाली आहे त्यावरून असें दिसतें कीं, मध्य आशियांतील खडक उत्तरेकडून फार जोरानें दक्षिणेच्या बाजूस ढकलले गेले. परंतु दक्षिणेकडे हिंदुस्थानांतील भक्कम खडकांचा भाग असल्यानें हे मधले खडक वर उंच उचलले गेले व त्यांच्या ज्या दुमडी झाल्या त्या योगानें हिमालय पर्वताच्या रांगा झाल्या. आशिया खंडांतील उत्तर भागांत व दक्षिण भागांत भक्कम व न दुमडले जाणारे खडक आहेत. परंतु मध्य भागांतील खडक इतरांच्या मानानें लवचिक असल्यानें दुमडले गेले. ज्या ठिकाणीं दुमडलेल्या खडकापासून पर्वत झालेले आहेत त्या ठिकाणीं पूर्वी समुद्र होता. या समुद्रांत झालेले खडक उत्तर व दक्षिणेकडील खडकांच्या मानानें लवचिक होते म्हणून पृथ्वीच्या आकुंचनाच्या योगानें ते दुमडले गेले. केंब्रियन व त्यापूर्वीच्या काळची आशिया खंडाची फारशी खात्रीलायक माहिती मिळत नाहीं. परंतु असें दिसतें कीं त्या काळीं बऱ्याच भागावर समुद्र असावा. पॅलिओझोइक काळापासून नंतर उत्तर व पूर्व भाग समुद्राखालीं नव्हता असें खात्रीनें सांगतां येईल. त्याचप्रमाणें हिंदुस्थान द्वीपकल्प कारबोनेशियस काळानंतर समुद्राखालीं गेलें नाहीं अशाबद्दलहि भक्कम पुरावा आहे; सुएसनें उत्तरेकडील भागास आंगारा लँड व हिंदुस्थानाच्या भागाला गोंडवनालँड अशीं नांवें दिलीं आहेत व या दोहोंमध्यें जो समुद्र होता त्याला टेथिस असें नांव दिलेलें आहे. आशियाखंडाचा पश्चिमेकडील बराचसा भाग अरबस्तान, इराण, बलुचिस्तान व अफगाणिस्तान हे सर्व भाग क्रिटेशिअस काळांत समुद्रानें व्यापले होते. आर्कटिक महासागरापासून दक्षिण चिनापर्यंत कार्बानिफेरस काळानंतर समुद्रांतील अश्मीभूत पदार्थ सांपडत नाहींत. तेथें गोड्या पाण्यांतील अश्मीभूत पदार्थ मात्र सांपडतात. या वरूनच येथें कार्बोनिफेरस कालानंतर समुद्र नव्हता. असें म्हणतां येतें. त्याचप्रमाणें गोंडवानानंतर हिंदुस्थान द्वीपकल्पांत सुद्धां समुद्रांतील अश्मीभूत पदार्थ सांपडत नसल्यानेंच गोंडवान काळानंतर हा भाग समुद्राखालीं नव्हता असें समजण्यास कांहींच हरकत नाहीं.

वर सांगितलेल्या आंगारा व गोंडवन यांमधील समुद्रांतून क्रिटेशियस काळापासून जमीन वर येऊं लागून हल्लींचा वीस हजार फूट उंचीचा हिमालय पर्वत तयार झालेला आहे. क्रिटेशियस काळांत दक्षिण हिंदुस्थानांतील ट्रॅप नांवाचा अग्निजन्य खडक झाला. पूर्वीच्या ज्वालामुखींच्या खुणा आशियांत व सायबेरियांत आहेत. परंतु सर्व ज्वालामुखी थंड झाल्याला फार काळ झाला आहे. हल्लीं पूर्वेकडील व दक्षिणेकडील बेटांत ज्वालामुखींचा प्रभाव अजून दृष्टीस पडतो.

व न स्प ति आ णि प्रा णी —उत्तर आशियांत सांपडणाऱ्या वनस्पती व प्राणी हे यूरोपांतल्या तशाच प्रकारची हवा असलेल्या प्रदेशांतील वनस्पती व प्राणी यांच्यासारखे असतात. तसेंच दक्षिण यूरोप आणि आशियाखंडांतील आशियामायनर, उत्तर इराण, अफगाणिस्तान वगैरे प्रदेशांतील प्राणी व वनस्पती या सारख्या प्रकारच्या आहेत. अरबस्तान, दक्षिण इराण, बलुचिस्तान आणि सिंध या उष्ण आणि कोरड्या हवेच्या प्रदेशांतील वनस्पती व प्राणी आफ्रिकेंतील तशाच प्रकारच्या हवेच्या प्रदेशांतील वनस्पती व प्राणी यांच्यासारखे आहेत. हिंदुस्थान, इंडोचीनचें द्वीपकल्प, दक्षिण चीन आणि मलाया द्वीपकल्पाचा पश्चिमभाग यांतील वनस्पती व प्राणी सारख्या प्रकारचे आहेत. मध्य आशिया, तुर्कस्तान, मोंगोलिया आणि पश्चिम मांचुरिया हा प्रदेश बहुतेक पर्जन्यहीन असून तेथें हिवाळा अत्यंत कडक आणि उन्हाळा फार तीव्र असतो, त्यामुळें येथील प्राणी व वनस्पती अगदीं निराळ्या प्रकारच्या असतात. उत्तर चीन आणि जपान यांत पुष्कळ सारख्या जातींच्या वनस्पति व प्राणी आहेत. उत्तर आशिया व उत्तर यूरोप यांतील वनस्पतींच्या मुख्य जाती सारख्या आहेत; पोटजातींत मात्र कांहीं कांहीं फेर आहेत. उरलच्या पूर्वेकडील प्रदेशांत ओक व कोणत्याहि प्रकारचें दीर्घ झाड होत नाहीं हें लक्षांत घेण्यासारखें आहे. देवदार, साग, भूर्ज हीं डोंगराळ प्रदेशांतील मुख्य झाडें होत. आणि वाळुंज अल्डर व हिवर हीं झाडें सखल प्रदेशांत होतात. आशियांतील वनस्पती व प्राणी यांचें अधिक विवेचन प्राणी व वनस्पतिशास्त्रांत पहा.

[संदर्भ ग्रंथः—कॉन–आशिया; आशिया (दि ऑक्सफोर्ड सर्व्हे ऑफ दि ब्रिटिश एम्पायर भाग २) हर्बर्टसन आणि होवार्थ प्रत १९१४; हर्बर्ट–सम ईयर्स ट्रॅव्हल्स इन आफ्रिका अँन्ड आशिया; बेली- एनशन्ट हिस्टरी ऑफ आशिया (दोन भाग); अलस्टन–व्हाईट मॅन्स वर्क इन् आशिया अॅन्ड आफ्रिका; कॉक्से–अकाउंट ऑफ दि रशियन डिस्कव्हरीज इन आशिया आणि अमेरिका; टाऊनसेंड–आशिया आणि यूराप; डॉ. बेल्यू–अफगाणिस्तान अँन्ड दि आफगान्स (लंडन १८८०); कॅप्टन जिल—दि रिव्हर ऑफ गोल्डन

सॅन्ड ( लंडन १८८० ); सर आर टेंपल—सेंट्रल ट्रेंड इन आशिया; सॅम्यूअल बील—बुद्धिस्टिक रेकॉर्ड्स ऑफ दि वेस्टर्न वर्ल्ड ( बोस्टन १८८५ ); चार्लस डौरी—ट्रॅव्हल्स इन नार्दर्न अरेबिया ( केंब्रीज १८८६ ); हेन्री लॅन्सडेल थ्रू सेंट्रल आशियां ( लंडन १८८७ ); आर्चिबाल्ड कलकौहन-रिपोर्ट ऑन रेल्वे कनेक्शन, बिट्वीन बर्मा ॲन्ड चायना ( लंडन १८८७ ); मेजॉर सीयट—नॉर्दर्न अफगाणिस्तान ( एडिंबरो १८८८ ); कॅप्टन यंग हजबंड—दी हार्ट ऑफ ए कॉन्टिनेंट ( लंडन १८९३ ); आणि ए जर्नी थ्रू मॅन्चूरिया ( लाहोर १८८८ ); पीर बॉन व्हेलाट—थ्रू दी हार्ट ऑफ आशिया—भाषांतर पिटमन कृत ( लंडन १८९१ ); कर्नल मार्कबेल—ट्रेड रूट्स् इन आशिया ( १८९४ ); रॉकहिल दि लॅन्ड ऑफ दि लामाज ( लंडन १९८१ ); मॅक्समुल्लर-दि सेक्रेड बुक्स ऑफ दि ईस्ट ( ऑक्सफोर्ड १८९०-१८९४ ); एच. एफ. ब्लानफोर्ड—जीऑग्रफी ऑफ इंडिया बर्मा ॲन्ड सीलोन ( लंडन १८९० ); तसेंच गाइड टू दि क्लायमेट ॲण्ड वेदर ऑफ इंडिया; लॉर्ड डन्मोर—दि पामीरस् ( लंडन १८९२ ); लार्ड कर्झन—पर्शिया ॲन्ड दि पर्शियन क्वश्चन ( लंडन १८९२ ); रशिया ॲन्ड दि ॲंग्लो रशियन क्वश्चन ( लंडन १८८९ ); प्रॉब्लेम्स ऑफ दि फार ईस्ट ( लंडन १८९४ ); हेडन—सेंट्रल आशिया ॲन्ड तिबेट ( १९०३ ); वारिंग्टन स्मिथ—सियाम ( व्हॉल्यूम ६ प्रोसीडींग—आर्. जी. सोसायटी १८९५ ); हॉलडिच्-दि एन्शंट ॲण्ड मिडिव्हल मक्रान ( व्हॉ. ७ जर्नल आर जी एस १८९६ ); इंडियन बॉर्डरलंड ( लंडन १९०१ ); ऑक्सफोर्ड हिस्ट्री ऑफ इंडिया ( १९०४ ); सर जी रॉबर्टसन-दि कॅफीरस् ऑफ दि हिंदूकुश ( लंडन १८९६ ); सर डब्ल्यू हंटर-हिस्ट्री ऑफ ब्रिटिश इंडिया ( लंडन १८९८ ); कॅप्टन डी सी—वेस्टर्न तिबेट ( व्हॉ. ९ जरनल रा. ज. सोसायटी ) तसेंच, इन तिबेट ॲन्ड चायनीज तुर्कस्तान ( लंडन १९०१ ) ए लिटल—दि फार ईस्ट ( ऑक्सफोर्ड १९०५ ); आर् कर्बोल्ड—इन रमोस्ट आशिया ( लंडन १९०० ); महन—दि प्रॉब्लेम ऑफ आशिया. हंटिंग्टन—दि पल्स ऑफ आशिया. ऑफिशिअल गाइड टू ईस्टर्न आशिया भाग ४ अर्नोल्ड-लाइट ऑफ आशिया ( १८८५ ); गोल्ड-वर्ड्स ऑफ आशिया. ]

आशिया मायनर—आशिया खंडाच्या अगदीं पश्चिम टोंकाला तुर्की साम्राज्यान्तर्गत जो एक द्वीपकल्प आहे त्याचें हें नाव आहे. मर्यादा,—उत्तरेस काळा समुद्र. पश्चिमेस इजिअन समुद्र. दक्षिणेस भूमध्यसमुद्र. पूर्वेस युफ्रेटीस नदी. लांबी ७२० मैल; रुंदी ४२० मैल. पर्वत—दक्षिणेस टॉरस व दुसरा ॲंटी टारस; नद्याः—बोआस, इरिस, हलिस, संगरियस, बिलाईस, या काळ्या समुद्रास मिळतात. रिंडाकस, व मॅकेस्टस, या मार्मोराच्या समुद्रास मिळतात. हर्मस, व मिॲन्डर, या इजिअन समुद्रास मिळतात. सिहुन, आणि गेरेनीझ, या भूमध्यसमुद्रास मिळतात. सरोवरेंः—टुझगेउल, बल्दरगेउल, अजितझगेउल, हीं खाऱ्या पाण्याचीं व बेशरगेउल व एगिर्दिरगेउल हीं गोड्या पाण्याचीं सरोवरें आहेत.

भू स्त र.—आशिया मायनरचें मध्य पठार निरनिराळ्या खनिज द्रव्याच्या थरांनीं युक्त असून, त्या ठिकाणीं तृतीय युगांतील, चिकणमातीचे व चुन्याचे अवशेष सांपडतात. या मध्य पठाराभोंवती डोंगराच्या रांगाच रांगा पसरल्या आहेत. समुद्रकिनाऱ्याच्या सभोंवतींहि तृतीय युगांतील अवशेष सांपडतात. टॉरस पर्वताच्या आग्नेयीस ज्वालामुखी पर्वतांची ओळ असून, त्यांतून हल्लीं ज्वालांचे लोट निघत नाहींत. पण तृतीय युगाच्या वेळेस ते ज्वालायुक्त असावे असें दिसतें. मध्य पठाराच्या दक्षिणेस टॉरस व ॲन्टी टॉरस पर्वतांची रांग पसरली आहे. ॲन्टीटॉरस पर्वतांत पुष्कळ ठिकाणीं,शुद्ध कोळसा करतां येणाऱ्या द्रव्यांचें प्रस्तरीभूत अवशेष सांपडतात.टॉरसमध्यें चुन्याच्या दगडाच्या खाणी आहेत.

ह वा पा णी.—डोंगर सपाटीवरील हवा हिंवाळ्यांत अतिशय थंड आणि उन्हाळ्यांत अति उष्ण असते. उत्तर किनाऱ्याकडे थंडी अतिशय असते. पूर्व भागांतील हवा समशीतोष्ण असते. दक्षिणेकडे उन्हाळा कडक असून हिंवाळा साधारण असतो. पश्चिम किनाऱ्यावरील हवा शीतोष्ण असते.

उ त्प न्न.—आशिया मायनरमध्यें खनिज पदार्थ अतिशय आहेत. तुरटी, अज्जन, तालस, असबस्ट, क्रूम, कोळसा तांबें, टाकणखार, कुरुंद, खळ करण्याची माती, सुवर्ण, लोखंड, शिसें, चुंबकीय लोह, मंगल, पारा, निकल, सैंधव, चांदी, गंधक, जस्त वगैरे.

झा डें, व न स्प ति.—पाईन वृक्ष, देवदारः सीडर नांवाचे वृक्ष वाळुंजीचीं झाडें, हिंवर, अंजीर, आलिव्ह, चेस्टनट नावाचीं झाडें, नारिंगें, लिंबुंण, द्राक्षें सफरचंद चेरी नांवाचीं झाडें, ईडलिंबू, ऊस, समरमस्तकी, गहूं, खाद्यधान्यें, कापूस, ज्येष्ठमध, अफू, तांदूळ, केशर, सालमिश्री, तंबाखू, रेशीम, पिंवळ्या बेरी, वगैरे.

प्रा णी.—क्रूर पशुः-अस्वल, डुकर, हरीण, गेंझेला, कोल्हा, चित्ता, लांडगा, रानटी मेंढ्या वगैरे. पाळींव जनावरें-म्हशी, उंट, खेंचर, मेंढ्या, घोडा, बैल.

प क्षी.—विलायती बगळे, माळटोक, गरुड हंस, तित्तिर प्राऊज, पाणकोळी, कृकणपक्षी, करकोंचा, राजहंस.

उ द्यो ग धं दे.—सतरंज्या, रंग, कापूस, तंबाखू आणि रेशमी कापड, साबण दारू आणि कमावलेलें कातडें.

नि र्ग त मा ल.—धान्यें, कापूस, सरकी, फळफळावळ ( वाळलेली ) औषधी, फळें, मायफळ, सका, सुपारी, आलिव्ह तेल, अफू, तांदूळ,तीळ, शिलापुष्प, इमारती लांकूड, तंबाखू, वालनटवृक्षाचें लांकूड, पिंवळ्या बेरी, मद्यें, सतरंज्या, सूत, रेशमाचेकोसले, कातडें, कमावलेलें कांतडें, रेशीम,

ब्लँकेट, मेणबत्ती. लोकर, जळवा, पाळीव जनावरें, खनिज द्रव्यें इत्यादि.

आ या त मा ल.—बुंद, कापड, सुती माल, चिनी मातीचीं भांडीं. कांचेचें सामान, फीत, दोरा, सुया, सुताच्या गुंड्या, लोखंडी सामान, तागाचा कपडा, काड्याच्या पेट्या, पेट्रोल, मीठ, साखर लोकरीचा माल.

द ळ ण व ळ सा ध नें.—पक्के रस्ते थोडे आहेत. लोहमार्ग-(१)हैदरपाशापासून अंगोरापर्यंत (२) मूदानिया ते ब्रूसा.(३) एस्केशेर ते बलगर्लीपर्यंत (४). स्मर्ना ते आफियम करहिसारपर्यंत (५) स्मर्ना ते दिनेशेरपर्यंत (६) मर्सिना ते अदनापर्यंत ह्याशिवाय इतर रेल्वे आहेत.

मा न व जा ती.—ह्या देशांतील मूळ लोक कोण होते ह्याचा पत्ता मुळींच लागत नाहीं. कारण ह्या देशावर पूर्व आणि पश्चिम ह्या बाजूंनीं स्वाऱ्या होत होत्या. यावेळीं जित लोक पळून जात असत किंवा जेत्यांमध्यें मिसळून जात. या खेरीज यांच्या मूळ वंशाचें ज्ञान न होण्याचें कारण म्हणजे निरनिराळ्या जातींचे आणि धर्मांचे लोक तेथें येऊन रहात असत. प्रथम ग्रीक, नंतर ख्रिस्ती मुसुलमान, नंतर मेंढपाल वगैरे येऊन गेले. साधारणतः येथील लोक वस्तीचे तीन भाग करितां येतील ते मुसुलमान, ख्रिस्ती, आणि यहुदी हे होत. त्यांपैकीं मुसलमानांसंबंधी कोष्टक खालीलप्रमाणें आहे.

मुसुलमानः—कॅपॅडोशिया—अनार्य; गॅलेशिया—गॅलिक; पश्चिम आणि वायव्य भाग केरियन व लीशियन; काळ्या समुद्राच्या किनाऱ्यावरील-बिथ्रिया पॅफ्लेगोनिया व पॉंटस यांतील आलेल्या जाती अंगोरा,सिवस-कुर्दःबोधाझ केनीच्या पूर्वेस-किझिलबश उर्फ शिया पंथाने तुर्क;सायलेशियाचा सपाट प्रदेश-नोसैरिस, अंगोरा व अदना तुर्कोमन; अॅन्टीटॉरस-अवशर;अंगोरा आणि ब्रूसा; तार्तर, कोनिया युरुक, ऐदिन-खेपी व तख्तजी.

वरील सर्व जाती मुसुलमानी असून वर दिलेल्या जिल्ह्यांत किंवा ठिकाणीं रहात असतात. शिवाय इतर भटकणाऱ्या जाती पुष्कळ आहेत.

ख्रि स्तीः—स्मर्ना आणि पॅम्फिलिया यांत बरेचसे ग्रीक लोक आहेत. या देशांतील कांहीं ग्रीक लोक पूर्वी तेथें आले आणि कांहीं बायझन्टाइन राज्याचे रहिवाशी म्हणून ग्रीक बनले. पश्चिम किनाऱ्याच्या बाजूला रोमन भाषा आणि दक्षिण किनाऱ्यावर तुर्की भाषा प्रचारांत आहेत. स्मर्नाजवळ बऱ्याच ग्रीक वसाहती आहेत. तसेंच मोठमोठ्या शहरांत आर्मोनियन वस्ती आहे.

यहुदी लोकः—स्मर्ना,-ऱ्होडस, ब्रूसा, बॉस्परस आणि इतर पश्चिमेकडील शहरें ह्यांत आढळतात. जिप्सी लोकहि बरेच आहेत.

इ ति हा स.—पूर्वी हिटाइट अथवा श्वेत सिरियन लोक आणि इतर अनार्य जाती बोघाझ केइ आणि आसपासचा प्रदेश येथें रहात असत. यांचे वंशज हल्लीं देखील कॅपाडोशियाच्या खेड्यापाड्यांत दिसतात. ख्रिस्त पूर्व ११ किंवा१२ व्या शतकांपूर्वी आर्यन लोक यावयास लागले त्यावेळीं त्यांनीं प्रथम फ्रिजिया येथें राज्य स्थापन केलें अशी माहिती दगडी मनोरे, किल्ले आणि ग्रीक दंतकथा यांवरून कळते. नंतर ९ व्या किंवा ८ व्या शतकांत सिमेरी लोकांनीं आर्मेनियामधून स्वारी करून आर्यन् लोकांचा मोड केला. त्यानंतर लिडीयाचें राज्य उदयास आलें. परंतु हें राज्य सिमेरी लोकांच्या दुसऱ्या स्वारीनें लयास गेलें. या लुटारू लोकांनां अल्याटीस यानें हांकून लाविलें ख्रिस्त-( पूर्व. ६१७ ). या राजानें बराच राज्यविस्तार केला परंतु हा सर्व प्रांत पुढें इराणच्या हातीं लागला ( ख्रि. पू ५४६ ). इराणच्या सत्तेखालीं लिडियाचे राज्याच्या बंदोबस्ताकरितां चार भाग झाले, आणि ग्रीक वस्तीचा भाग ग्रीक लोकांकडे, आणि इतर वस्तीचा भाग त्या त्या वस्तीच्या लोकांकडे सोंपविण्यांत आला होता. परंतु सायरस यानें इराणवर स्वारी केली त्यावेळीं तेथील ग्रीक रहिवाशी सायरसला मिळाले ( ख्रि. पू. ४०२ ). नंतर त्याच्या पुढील शतकांत ( ख्रि. पू. ३३४ ) अलेक्झान्डरनें आशियामायनरवर स्वारी केली ( अलेक्झान्डर पहा ). अलेक्झान्डरच्या निधनानंतर सेल्यूकस ह्याच्याकडे सर्व आशियामायनर आला, परंतु हा राजा दुर्बल असल्यामुळें देशाचे निरनिराळे भाग स्वतंत्र झाले. खि. पू. २७८-२७७ च्या सुमारास गॅलिक जातींनीं मध्य आशियामायनर येथें राज्य स्थापिलें. आणि सर्व स्वतंत्र भाग आपल्या साम्राज्याखालीं आणले. परंतु ख्रि. पू. १८९ मध्यें मॅानलिअस यानें या जातींचा पराभव केल्यामुळें सर्व देश पर्गामम याच्या स्वामित्वाखालीं आला.

आशियामायनर मधील बेबंदशाहीचा फायदा घेऊन रोमन लोकांनीं पॉम्पे याच्या नेतृत्वाखालीं हा देश जिंकून बरींच वर्षें राज्य केलें आणि साम्राज्य काळांत सर्व आशियामायनरभर ख्रिस्ती धर्माचा प्रसार केला.

बरींच वर्षें शांततेचा उपभोग घेतल्यामुळें तेथील लोकांमध्यें पूर्वीचें शौर्य राहिलें नाहीं. त्यामुळें इ. स. ६१६ ते ६२६ मध्यें इराणी सैन्याला कोठेंहि अडथळा झाला नाहीं. त्यांच्या मागून अरबलोक आले. परंतु १० व्या शतकांत अरब लोकांनां सेल्जुक तुर्क लोकांनीं हांकून लाविलें. १२४३ पर्यंत सर्व प्रांत मोंगोल लोकांच्या हातीं आला, आणि तेथील सुलतान परतंत्र बनले. ही परतंत्रता फक्त औपचारिकच होती. कारण १३०७ मध्यें रूमचा सुलतान वारल्यानंतर त्याच्या प्रांतांतील तुर्कोमन सुभेदारांनीं मोंगल लोकांना घालवून दिलें. परंतु त्या सुभेदारांमध्येंच कलह उपस्थित होऊन शेवटीं ब्रूसाच्या ओस्मान्ली तुर्कांनीं सर्व सत्ता बळकाविली. इ. स. १४०० मध्यें सर्व आशियामायनर सुलतान बयाझिद पहिला याच्या सत्तेखालीं होतें, परंतु १४०२ मध्यें

तैमूरलंगानें त्यास कैद केलें. तैमूर वारल्यानंतर ओस्मान्ली तुर्कांचें वर्चस्व पूर्ववत् स्थापलें जाऊन दुसरा महमद ( १४५१–१४८१ ) यानें करमानिया आणि ट्रेबिझॉन्ड हे प्रांत आपल्या राज्यास जोडले. यानंतर आशियामायनरचा इतिहास म्हणजे तुर्की साम्राज्याचा इतिहास होय. पण यांतहि एक मुख्य महत्त्वाची गोष्ट म्हणजे ( १८३२–३३ ) इजिप्तच्या इब्राहिम पाशाची स्वारी होय. वरील मोंगलांच्या स्वारीमुळें आशियामायनरमध्यें ख्रिस्ती धर्म व इतर ज्या कांहीं पाश्चात्य सुधारणा झाल्या होत्या त्यांचा समूळ उच्छेद झाला. हल्लीं रेल्वे वगैरे बांधणें चाललें आहे. पाश्चात्य सुधारणेचा जोरानें प्रवेश होत आहे. आशिया संकुचित अर्थानें एजिअनच्या पूर्वेस १९०८ सालीं झालेल्या तुर्की राज्यक्रांतीमुळें व पुढील सालीं झालेल्या आर्मेनियनांच्या कत्तलीमुळें, आशिया मायनरच्या राजकीय परिस्थितींत मोठमोठ्या घडामोडी सुरू झाल्या. १९११—१३ च्या इटालोतुर्की व बाल्कन युद्धांत आशिया मायनरच्या किनाऱ्यावरील बेटें आटोमन साम्राज्याच्या हातांतून निसटलीं. १९१४—२१च्या महायुद्धांत खुद्द साम्राज्यच संपुष्टांत येऊन त्याचें बहुतेक आशिया मायनरमध्ये राज्य करणारें "आनाटोलिया" असें तुर्की संस्थान बनलें. आनाटोलियाच्या तुर्की राष्ट्रीय सरकारनें सेव्हरसच्या तहाच्या अंमलबजावणीला सशस्त्र विरोध केला. अलीकडे सत्ताकेंद्र "अंगोरा" झालें. [' अंगोरा ' मेसापोटेमिया, आर्मेनिया वगैरे वरील स्वतंत्र लेख पहा ]

[संदर्भग्रंथ.–बार्क्ले–राइड थ्रू आशियामायनर अँड अर्मेनिया; चँडलर-ट्रॅव्हल्स इन आशियामायनर व ग्रीस; मसेरा एक्सकर्व्हेशन इन आशिया मायनर; चाइल्डस-ऑन फूट ॲक्रास आशिया मायनर; आइन्सवर्थ—ट्रव्हल्स ॲन्ड रीचर्सेस इन आशियामायनर; एडि–न्यू ईरा इन आशिया मरे–हँडबुक ऑशिया मायनर; रम्से—सिटीज अँड बिशप्रिक्स ऑफ फ्रीजिया ( १८९५ ); इंप्रेशन ऑफ टर्की ( १८९८ ); ब्यूफर्ट—करमेनिया ( १८१७ ); स्प्रॅट ॲन्ड फोर्स—ट्रव्हलस इन लीशिया ( १८४७ ) डेव्हीस—लाइफ इन आशियाटिक टर्की (१८७९)]

**आशौच**—कोणीहि मनुष्य मृत झाला असतां त्याच्या आप्तेष्टांनीं कांहीं दिवस इतर जनांशीं अस्पृश्य रहावयाचें त्यास आशौच असें म्हणतात. यालाच दुसरा सूतक असाहि शब्द आहे आणि वरील अर्थानें सूतक हाच शब्द वैदिक वाङ्मयांत आढळतो, आशौच आढळत नाहीं. ऐतरेय ब्राह्मणांत ( ७.७ ) सूतकाचा उल्लेख आहे. शिवाय सूत्रग्रंथांत सूतक शब्द आढळतो. सत्याषाढ गृह्यसूत्रांत औपसन होम प्रसंगीं सूतकाचा उल्लेख आहे. आश्वलायन गृह्यसूत्रांत ( ४.४) मृताच्या आप्तेष्टांनीं तीन, दहा अथवा बारा दिवस व्रतस्थ रहावें असें सांगितलें आहे. सूत्रकालींच आशौच मानण्यास आरंभ झाला असल्याचें वरील उल्लेखावरून दिसतें. पुढें स्मृतिग्रंथांत मृताच्या आप्तेष्टांपैकीं कोणी किती दिवस आशौच पाळावें यासंबंधीं जास्त नियमन केलेलें आढळतें.

आशौच्यामध्यें जननाशौच व मृताशौच असे दोन भेद आहेत. त्यांचें विवेचन स्मृतिग्रंथांत जास्त व्यापकपणें विवेचिलें आहे. आज समाजांत धर्मसिंधु, निर्णयसिंधु वगैरे ग्रंथाधारें कार्य भागवितात.

ज न ना शौ च—या आशौचांत अशुचि यानें दुसऱ्यास स्पर्श केला असतां विटाळ नाहीं. मात्र आशौच असलेल्यास कर्माचा अधिकार नाहीं. जननाशौच गर्भस्रावापासून असतें व तें गर्भधारणा झाल्यापासून मासपरत्वें मातेला ( तिसऱ्या महिन्यापासून पुढें ) अधिकाधिक दिवस जास्त असतें. उदा० पहिल्या तीन महिन्यास तीन दिवस, चवथ्यांत चार याप्रमाणें सात महिन्यापर्यंत अधिक. सातव्या महिन्यांत प्रसूति होईल तर पूर्ण दहा दिवस जननाशौच असतें. यांत स्पर्शाचा विटाळ नाहीं. मातेस मात्र गर्भस्रावजन्य व प्रसूति आशौचांत अस्पृश्यत्व. असतें गर्भस्रावजन्य आशौचांत पित्यास व सपिंडास (मूळपुरुषांपासून सात पिढ्यांतील लोकांस ) नुसतें स्नान. पूर्ण जननांत दहा दिवस अशुचित्व असतें. मातेला जननाशौचाचें अशुचित्व दहा दिवस असून पुढें मासपर्यंत कर्माचा अधिकार नसतो. हें पुढील अशुचित्व बालक मुलगा असेल तर कमी असतें.

मृ ता शौ च.—प्रसूतीच्या पूर्वी गर्भांत बालक मृत झाल्यास जननाशौच व नालच्छेदनापूर्वी बालक मृत झाल्यास पिता व सपिंडांस तीन दिवस जननाशौच; नालच्छेदनानंतर दहा दिवसांच्या आंत बालक मृत झाल्यास दहा दिवस जननाशौच, मृताशौच नाहीं. मृताशौचांत पुत्रापेक्षां कन्या मृत झाल्यास आशौच कमी असतें. पुत्राचें नाकमरणापासून दंतोद्गमापर्यंत व त्यांनंतर चूडाकर्म व उपनयन होईपर्यंत कालपरत्वें अधिकाधिक ( १ ते ३ दिवसपर्यंत ) आशौच असतें. अशौचामध्यें ज्याचा जितका संबंध असेल त्याप्रमाणें आशौच कमीजास्त असतें. कन्या परगोत्री झाल्यानंतर तिला आशौच कमी असतें. लग्न झालेली बहीण भावाच्या घरीं मृत झाल्यास भावास तीन दिवस आशौच व ती आपल्या श्वशुरगृहीं मृत झाल्यास एक दिवस आशौच. आशौच आप्तसंबंधाशिवाय उपकृतिसंबंधाचेंहि मानितात. उदा० उपकार करणारा सासरा अथवा सासू मृत झाल्यास जावयास तीन दिवस व तीं उपकारी नसतील तर एक दिवस. दत्तक झालेल्यास पूर्वगृहीच्यांचें दत्तकसंबंधांतील लोकांपेक्षां आशौच कमी.

गुरुशिष्यांचेंहि परस्परांत जितका कमजास्त अध्ययन संबंध असेल त्या मानानें कमजास्त आशौच असतें. सख्खे भाऊ असून त्यांचें परस्पर सख्य नसेल तर आशौच कमी असतें. उपनयन होऊन समावर्तन न झालेल्यास माता व पिता यांशिवाय इतरांचें आशौच नाहीं; कारण तो व्रती

असतो. मातापितरांच्या आशौचांत मात्र त्यानें व्रतस्थ ( सोंवळ्या प्रमाणें ) रहावें लागतें.

आप्तेष्टांशिवाय शववाहक यांनांहि रात्री शव वाहिलें असल्यास सूर्योदयापर्यंत व दिवसा वाहिलें असल्यास नक्षत्र दर्शनापर्यंत अशुचित्व असतें.

धर्मसिंधु वगैरे ग्रंथांत क्षत्रियादि इतर तीन वर्णांनांहि आशौच सांगितलें आहे. मात्र त्याचें प्रमाण ब्राह्मणांपेक्षा जास्त आहे.

आशौचासंबंधी सविस्तर विवेचन धर्मसिंधु, निर्णय सिंधु इत्यादि ग्रंथांतून आढळेल.

**आश्रम**—' आश्रम ' हा शब्द श्रम—देह क्लिन्नविणें या संस्कृत धातुपासून झालेला असून त्याचे ( १ ) तप करण्याची जागा किंवा ( २ ) तप वगैरे करण्याची क्रिया, असे अर्थ आहेत. परंतु यापैकीं मूळचा अर्थ कोणता हें ठरविणें कठिण आहे. यापैकीं दुसऱ्या अर्थाची झालेली परिणति लक्षांत घेतां प्राचीन भारतीयांच्या आयुष्यक्रमावर पुष्कळ प्रकाश पडतो.

ऋग्वेदकालीं आर्यांची वस्ती पंजाबमध्यें झाली असतांनां वर्णाश्रमांचा कांहीं प्रश्नच नव्हता, व अगदीं मागाहूनच्या ऋग्वेदसूक्तांत ( ऋ. १०–९० ) म्हणजे पुरुष-सूक्तांत चार समाज विभागांचा उल्लेख आहे, परंतु त्या चार समाजविभागांस वर्ण ही संज्ञा प्राप्त झाली नव्हती व आश्रमसंस्थाहि दिसत नाहीं. चातुर्वर्ण्य संस्थेची जसजशी परिणति होत गेली तसतशी प्रत्येक वर्णाचीं कर्तव्यें ठरत जाऊन ब्राह्मणवर्णानें अध्ययन, अध्यापन इत्यादि कार्यें स्वतःकडे घेतलीं, व हलके हलके प्रत्येक त्रैवर्णिक मुलानें कांहीं वर्षें गुरुगृहीं अध्ययन केलेंच पाहिजे असा नियम बनून गेला. अगदीं प्रथम प्रत्यक्ष बापच स्वतः गुरूचें कार्य भागवीत असे, परंतु पुढें प्रत्येक पित्याला आपल्या मुलांस सर्व प्रकारचें शिक्षण स्वतः देतां येणें शक्य नव्हते. या विद्यार्थि धर्माचा विकास होण्यास श्रौतस्मार्त सप्तसंस्थांचें अध्ययन कठिण, आणि अध्ययनोत्तर ऋत्विजाच्या धंद्यांत बऱ्याच प्रकारची प्राप्ति हीं कारणें झालीं असावीं. व ह्यामुळेंच पुष्कळ विद्यार्थी विद्यार्जनाकरितां दूरवर प्रवास करीत ( बृहदारण्यक उप. ३. ३, १ ) त्याच प्रमाणें मोठे प्रसिद्ध आचार्य जागजागीं शिष्यांस अध्यापन करीत फिरत असत ( कौषीतकी ब्रा. ४. १ )

अर्थात सर्व त्रैवर्णिकांनां सारख्या तऱ्हेचें शिक्षण मिळत नसे. ह्या मिळणाऱ्या शिक्षणाबद्दल शिष्यास यज्ञशालेंतील किंवा बाहेर शेतांतील कामें करावीं लागत. व अध्यायनाचें शेवटीं कांहींतरी दक्षिणा गुरूस द्यावी लागे. गुरुगृहीं काम करून फावल्या वेळांत वेदाध्ययन करण्याची चाल असे. अशा रीतीनें अध्यायनसमाप्तीनंतर सर्वच लोक गृहस्थ होत नसत तर कांहीं नैष्ठिक ब्रह्मचर्य धारण करून गुरुगृहीं कायम वास करीत. किंवा कांहीं अध्ययन समाप्त झाल्यावर वनांत जाऊन खडतर कृच्छ्र-चांद्रायणादि व्रतें करण्यांत आपला काळ घालवीत, व कांहींना अशा प्रकारचा आयुष्यक्रम देखील त्याज्य वाटून, ते सर्वसंग त्याग करून परिव्राजक होत व भिक्षावृत्तीवर जीवितयात्रा संपवीत असत. चतुर्थाश्रमसंस्थेची व्यवस्था ह्यानंतर उपनिषत्कालांत घटनास्थितींत असून धर्मसूत्र कालांत व मागाहूनच्या स्मृतिकालांत पूर्णपणें अंमलांत आलेली दिसते. अंमलांत आली याचा अर्थ तशी धर्मशास्त्रांत मांडणी करण्यांत आली एवढाच समजावयाचा, सर्व लोक चारहि आश्रम पाळीत असें नव्हे तर सुशिक्षित वर्गापैकीं कांहीं वर्ग पाळीत असावा. कारण धर्मसूत्रें व स्मृति या ग्रंथांत प्रत्येक मुलानें ( १ ) ब्रह्मचर्य, ( २ ) गार्हस्थ्य, ( ३ ) वानप्रस्थ व ( ४ ) संन्यास, ह्या चार आश्रमांतून क्रमाक्रमानें गेलें पाहिजे असे नियम घालून दिलेले दिसतात. अखिल मानव जातीच्या इतिहासांत ह्या चतुर्थाश्रम संस्थेची इतकी उदात्त कल्पना कोणीच नाहीं असें पाल डासनें म्हणतो (एरिए–आश्रम) उपनिषत्कालीं आश्रमसंस्थाची कसकशी वाढ होत गेली ह्याचा इतिहास पाहण्यासारखा आहे. छांदो० उप० ८–१५ यामध्यें ब्रह्मचारी व गृहस्थ यांचाच उल्लेख आला असून ह्यांच्या भिन्न भिन्न कर्तव्याचें फल एकच मोक्ष प्राप्ति सांगितलें आहे. छां. उ. २–२३–१ "त्रयो धर्मस्कंधा यज्ञोऽध्ययनं दानमिति प्रथमस्तप एव द्वितीयो ब्रह्मचर्याचार्यकुलवासी तृतीयोऽत्यंतमात्मानमाचार्यकुलेऽवसादयन्सर्व एते पुण्यलोका भवन्ति ब्रह्म संस्थोऽमृतत्वमेति" ह्या सुप्रसिद्ध उल्लेखांत एका बाजूस तीन प्रकारचीं कर्तव्यकर्में व दुसऱ्या बाजूस ब्रह्मज्ञ मनुष्य ह्यांनां कशा प्रकारचीं भिन्न भिन्न फलें मिळतात ह्याबद्दल वर्णन आहे. त्याचप्रमाणें बृह० उप० ४–४–२२ ह्या ठिकाणीं ( १ ) वेदाध्ययन, ( २ ) यज्ञ दान वगैरे व ( ३ ) तप अशीं तीन प्रकारचीं कर्तव्यें करणारे लोक यांनां मिळणाऱ्या फळाहून आत्मज्ञानी मनुष्याला निराळेंच फल मिळतें असें वर्णन आलें आहे.

वरील उल्लेखावरून असें दिसून येतें कीं, उपनिषत्कालीं चतुराश्रम व्यवस्थेचा विकास होत होता. प्रथम ब्रह्मचर्य व गार्हस्थ्य असे दोनच आश्रम मानले जात,परंतु पुढें ह्यांतूनच तीन आश्रम म्हणजे ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य व वानप्रस्थ असे निघाले, व ह्या सर्वां पलीकडे आत्मज्ञानी लोकांची योग्यता मानली जात असून त्यांस "अत्याश्रमी" अशी संज्ञा श्वे. उ. ६–२१ व कैवल्य उ. २४ यांत दिली आहे.

पुढें कालांतरानें आत्मज्ञानाची थोरवी वरील तिन्ही आश्रमांपेक्षा जास्त मानल्याचा परिणाम असा झाला कीं, एक नवीन संन्यासाश्रमच बनविण्यांत आला, व अशा रीतीनें क्रमवार अशी चतुराश्रम संस्था पूर्ण झाली. तरी देखील कांहीं कालपर्यंत वानप्रस्थ व संन्यासाश्रम ह्यामध्यें स्पष्ट भेद केलेला नव्हता. परंतु ह्यानंतर झालेल्या मागाहूनच्या

'जाबाल' वगैरे उपनिषदांत चारहि आश्रमांचे उल्लेख व वर्णनें आढळतात.

(१) ब्रह्मचारिन्—उपनिषदांतलि कांहीं उल्लेखांवरून असें दिसून येतें कीं, ब्रह्मचर्याश्रम स्वीकारण्याची रूढि हलके हलके बनत चालली होती, परंतु तो कांहीं अद्याप धर्मशास्त्रीय नियम झाला नव्हता. छांदोग्य उपनिषदांतील श्वेतकेतूप्रमाणें पित्यापाशीं विद्यार्जन करणेंहि शक्य होतें. परंतु कधीं कधीं त्याच मनुष्यास दुसऱ्या गुरूचाहि स्वीकार करावा लागे, प्रथम हातांत समिधा घेऊन "उपैमि अहं भवंतं" (बृ. ६.२,७) असे शब्द उच्चारून शिष्य गुरूकडे येई, व नंतर गुरु त्याला त्याच्या जन्माबद्दल व कुलगोत्र वगैरेबद्दल माहिती विचारी हा ब्रह्मचर्याश्रमाचा काल १२ वर्षें व प्रसंगविशेषीं कमीजास्त वर्षें असे. छां. उ. ६.१,२ मध्यें श्वेतकेतूनें आपल्या वयाच्या १२ व्या वर्षी गुरुगृहीं जाऊन १२ वर्षें अध्ययन केल्याचा उल्लेख आहे. गुरुगृहींच्या शिष्यांस "अंतेवासी" ही संज्ञा असे. कांहींनां अशा प्रकारचें आयुष्यक्रमणा करणें इतकें मानवे कीं, ते पुढें सर्व जन्मभर गुरुगृहींच वास करीत असत. शिष्याचें अध्ययन समाप्त झाल्यावर गृहस्थाश्रम स्वीकारण्यापूर्वी गुरु त्यास पुढीलप्रमाणें उपदेश करीः—सत्यं वद । धर्मंचर । स्वाध्यायान्मा: प्रमदः । आचार्याय प्रियं धनमाहृत्य प्रजातंतुं मा व्यवच्छेत्सीः । इत्यादि (तै. उ. १.११) त्याचप्रमाणें माता, पिता, आचार्य, अतिथि यांचा सन्मान राखणें, आपलें आरोग्य–धन वगैरे संभाळणें, आपल्यापेक्षां श्रेष्ठ दर्जाच्या लोकांचा आदर राखणें वगैरे गोष्टींबद्दल उपदेश करण्यांत येत असे.

(२) गा र्ह स्थ्यः—छां. उ. ८.१५ यांतील उल्लेखावरून कांहीं शिष्य गुरुगृहीं अध्ययन संपल्यावर गृहस्थाश्रमी होऊन दुसऱ्या शिष्यांनां विद्या शिकविण्याचें काम आयुष्यभर करीत असलेले दिसतात, व अशा लोकांनां ब्रह्मप्राप्तीचें फल सांगितलें आहे; परंतु ह्याच्या उलट छां. उ. ५.१० सारख्या उल्लेखांत केवळ यज्ञ, दान करणाऱ्या लोकांस चंद्रलोकाचें फळ व पुनश्च त्या जगांत प्रवेश सांगितला आहे. गृहस्थाचा मुख्य आवश्यक धर्म म्हणजे कुलसंस्थापना करून प्रजोत्पत्ति करणें हा सांगितला आहे. कांहीं उल्लेखांत प्रजोत्पत्तीमुळें पितरांचें ऋण फिटतें, असें वर्णन आहे; व बृ. उपनिषदाच्या शेवटीं मनुष्यानें कांहीं विशिष्ट गुणांनीं युक्त पुत्र किंवा कन्या उत्पन्न करतांना कशा प्रकारचा आहार करावा वगैरे नियम सांगितले आहेत. ह्या वेळीं बहुपत्नीकत्वाची चाल प्रचारांत असावी व याज्ञवल्क्याच्या दोन बायकांचा तर स्पष्ट उल्लेख बृ. उ. २.४,४;५ मध्यें आहे.

(३) वा न प्र स्थ.–हा व संन्यासाश्रम यांमधील भेद मागाहून पडला. प्रथम वानप्रस्थ स्थिति ही गार्हस्थ्याप्रमाणेंच एक 'धर्मस्कंध' म्हणजे कर्तव्यकर्माचा भाग होय, असें मानण्यांत येत असे; परंतु कांहीं कालानें गृहस्थाचीं कर्तव्यकर्में यथासांग समाप्त झाल्यावर वृद्धापकालीं वानप्रस्थ व्हावयाचें अशी चाल पडली. बृहदारण्यकोपनिषदांत याज्ञवल्क्यानें आपल्या गार्गी व मैत्रेयी या दोन बायकांत द्रव्याची वांटणी करून गृहस्थाश्रमाचा त्याग केल्याचा उल्लेख आहे. तो आत्मस्वरूपाचें ज्ञान प्राप्त करून सर्वसंगविवर्जित अशी परिव्राजक वृत्ति धारण करण्याकरितां होय. ह्या ठिकाणीं वानप्रस्थ व परिव्राजक असे निराळे भेद असल्याचें दिसत नाहीं.

(४) संन्यासिन् ( परिव्राजक–भिक्षुः ) संन्यास, ह्याचा मूळ अर्थ सर्व प्रकारच्या आयुष्याचा त्याग करणें असा होता, परंतु कालांतरानें हा संन्यासाश्रम शेवटचा आश्रम झाला. ह्या शेवटच्या संन्यासाश्रमाचा विकास फारच आश्चर्यकारक आहे. कारण आत्मज्ञानानें प्राप्त होणारी स्थिति म्हणजेच संन्यास अशी जी मूलभूत कल्पना ती जाऊन पुढें आत्मज्ञानाचें तें एक आवश्यक साधनच होऊन बसलें. विशेषतः मागाहून तयार झालेल्या ब्रह्म, संन्यास, आरुणेय, कंठश्रुति, परमहंस, जाबाल, आश्रम इत्यादि उपनिषदांत आपणास ह्या संन्यासाश्रमाचे नियम, त्याचें आचरण वगैरेचें यथास्थित विवेचन आढळतें. शंकराचार्यांनीं प्रस्थापित केलेल्या अद्वैमतांतील आचारमार्गाचा ह्या संन्यास मार्गावर बराच परिणाम झाला आहे.

ह्या मागाहूनच्या उपनिषदांत संन्यासाचे अनेक प्रकार वर्णन केले आहेत. उदाहरणार्थ संन्यासोपनिषदांत कुटीचक, बहूदक, हंस, परमहंस, तुरीयातीत व अवधूत असे संन्यासाचे सहा प्रकार सांगितले आहेत, व ह्या प्रत्येकांचे आचारभेदहि सांगितले आहेत.

[ संदर्भ ग्रंथ—उपनिषदें, धर्मसूत्रें, मनुस्मृति, महाभारत, जे. सी. ओमन—मिस्टिक्स, असेटिक्स, अँड सेंट्स ऑफ इंडिया, लंडन १९०३; तसेंच याच ग्रंथकाराचें कल्ट्स, कस्टम्स अँड सुपरस्टिशन्स ऑफ इंडिया लंडन. १९०८, डायसेन—फिलासफी ऑफ दि उपनिषद्स् ( इंग्लिश-भाषांतर ) १९०६ एडिंबरो. ]

**आश्वलायन**—एक ऋषि व त्याच्या नांवावरून पडलेली ऋग्वेदाची शाखा. शुक्लयजुर्वेदाच्या आरण्यकांत उल्लेखिलेला जनकराजाचा होता जो अश्वल त्याच्याशीं आश्वलायन नांवाचा संबंध कदाचित असूं शकेल. शिवाय आश्वलायनांतील 'अयन' हा प्रत्यय अग्निवेश्यायन, आलंबायन, ऐतशायन, औदुंबरायण, कदंबायन, कात्यायन, लाट्यायन वगैरेंतील अयनांप्रमाणें शाखावाचक असून तो आपल्याला उत्तरकालाकडे नेतो असें मानण्यास हरकत नाहीं. कसेंहि असलें तरी एवढें खरें कीं अशा तऱ्हेचीं बनलेलीं नांवें ब्राह्मणवाङ्मयांत क्वचित येत असून, तीं पुढील काळाचीं द्योतक आहेत. याला दुसरा पुरावा आश्वलायन सूत्रांतच सांपडतो. त्यांत आलेला आश्मरथ ऋषि नवीन

कल्पकार म्हणून पाणिनिभाष्यकार धरितात. तेव्हां जर आश्वलायनानें आधाराला घेतलेले ऋषीच अर्वाचीन मानण्यांत येत होते तर आश्वलायन स्वतः त्यापेक्षां अर्वाचीन असला पाहिजे असें ठरतें. आश्वलायनानें उल्लेखिलेला दुसरा एक आचार्य जो तौल्वलि त्याला पाणिनीनें प्राच्य म्हणजे पूर्वेकडला राहाणारा असें म्हटलें आहे ( २. ४, ६१ )

कात्यायनाच्या सर्वानुक्रमणीवरील भाष्यामध्यें षड्गुरुशिष्य म्हणतो कीं, शौनकाचा शिष्य आश्वलायन यानें गुरूपासून सर्व विद्या शिकून एक सूत्र रचिलें तें शौनकाला पसंत पडून त्यानें आपलें सूत्र फाडून टाकिलें. तेव्हांपासून आश्वलायनसूत्र हें ऋग्वेदसूत्र म्हणून प्रसिद्धीस आलें. आश्वलायनानें तीन ग्रंथ लिहिले. एक बारा अध्यायांचें श्रौतसूत्र, चार अध्यायांचें गृह्यसूत्र व ( ऐतरेयारण्यकांतील ) चवथें आरण्यक. आश्वलायनाचें कल्पसूत्र शाकल व बाष्कल या दोन्हि शाखांकरितां असून इतर संहितांतील ऋचांचाहि त्यांत कोठें कोठें उल्लेख आढळतो( उदा० श्रौतसूत्र ६.१२)ऋग्संहितेच्या प्रस्तावनेंत सायण म्हणतो कीं,शाकलसंहितेंत न येणाऱ्या ऋचांचा विनियोग आश्वलायन आपल्या सूत्रांत देतो. आणि तें खरें आहे.

श्रौ त सू त्र.—या ग्रंथांत यज्ञांतील होता नामक ऋत्विजानें करावयाच्या हौत्रकर्मांचें विवेचन आहे व यांत ऋग्वेदांतील बहुतेक ऋचांचा हौत्रकर्मांकडे कसकसा उपयोग करावयाचा हेंहि सांगितलें आहे. ऋग्वेदावरील हौत्रविषय प्रतिपादन करणारे सूत्रापूर्वीचे ग्रंथ म्हणजे शांखायन व ऐतरेय हीं ब्राह्मणें होत. परंतु त्यापुढील शांखायन व आश्वलायन हीं दोनहि त्या त्या शाखेचीं सूत्रें त्या त्या ब्राह्मण ग्रंथांशीं कोठें कोठें विरोधी आहेत. याबद्दल ज्ञानकोश विभाग दोनमध्यें परिशिष्टांत उल्लेख आहे. आश्वलायनशाखी लोक आपल्या शाखेचें ब्राह्मण ऐतरेय समजतात. परंतु तें ब्राह्मण व आश्वलायन सूत्र यातीहि कांहीं ठिकाणीं विरोध आहेच.

आश्वलायनापुढें संहिता कोणत्या स्वरूपांत होत्या यावर त्याच्या ग्रंथावलोकनानें प्रकाश पडतो. त्यास साहित्य प्रतीकें होत. जी ऋचा संहितेंत परिचित आहे तिचें आश्वलायन प्रतीक देतो आणि जी अपरिचित ती संबंध ऋचा मांडतो, तर प्रतीकांच्या परीक्षणावरून पहातां आजची शाकलसंहिता जशीच्या तशीच त्याच्या पुढें होती. ऐतरेयब्राह्मणकारापुढें मात्र आज जशीं आहे तशी नव्हती.

आश्वलायन श्रौतसूत्राचे बारा अध्याय असून त्यांचें सहा सहा अध्यायांचे दोन भाग (षट्क) मानतात. पहिल्या भागांत दर्शपूर्णमास, अग्न्याधान, पुनराधान, आग्रयण, निरनिराळ्या काम्येष्टी, चातुर्मास्यें, पशु, सौत्रामणी, अग्निष्टोमादि सप्त सोमसंस्था यांचें हौत्र दिलें आहे. व दुसऱ्या भागांत सत्रांचें हौत्र देऊन शेवटीं गोत्रप्रवरांचा संग्रह केला आहे. होत्याच्या कर्मांशिवाय हौत्रक गणांतील मैत्रावरुण, वगैरे सप्तहोत्यांचें हौत्र व ब्रह्मा नामक ऋत्विजाचें प्रायश्चितादि कर्म यांत दिलें आहे. या सूत्रांत मुख्य विषय हौत्र हा आहे तरी कोठें कोठें अध्वर्यु कर्मांचाहि संग्रह आहे. उदाहर०—अग्निहोत्र होम. याशिवाय यजमानानें प्रवासास जातेवेळीं करावयाचें कर्म, कर्मवैगुण्याबद्दल निरनिराळीं प्रायश्चित्तें, आहिताग्नीनें आचरावयाचे धर्म यांचाहि संग्रह क्वचित् ठिकाणीं आहे. आश्वलायन गृह्यसूत्रांतील विषयासंबंधीं विवेचन ज्ञानकोश विभाग दोन ( वेदविद्या ) यांतील परिशिष्टांत आलें आहे.

**आसड** ( ११९२ )—भिल्लमाल ( मारवाड प्रांतांतील, भीनमाल ) कुलांतील राजकटुक याचा मुलगा. यानें " विवेक मंजरि " या नांवाचा ( जैन ) ग्रंथ व कालिदासाच्या मेघदूतावर एक टीका लिहिली. [ आफ्रेक्ट यादी. माबेल डफ—क्रॉनॉलॉजी ऑफ इंडिया. ]

**आसंदी**—(संस्थान म्हैसूर), जिल्हा कडूर, तालुका कडूर उ.अ. १३° ४२' व पू.रे. ७६° ६' हें अजमपूर स्टेशनपासून ५ मैलांवर आहे. प्राचीनकाळीं, गंग व होयसळ राजांच्या अमदानींत हें राजधानीचें ठिकाण होतें, आठव्या शतकांत येथें श्रीपुरुषाचा मुलगा विजयादत्त व बाराव्या आणि तेराव्या शतकांत गंग घराणें राज्य करीत होतें. कडूरच्या शिलालेखांत ( काल अदमासें ११८० ) आसंदिनाडच्या सुभेदाराचा अंतकाळ वर्णिला आहे. [ इं. गॅ. कृष्णस्वामी अय्यंगार एन्शंट इंडिया ]

**आसन**—बसण्याची वस्तु किंवा प्रकार. उदाहरणार्थः—खुर्ची, कंबल, तक्त, हत्ती, घोडा इत्यादि. स्त्रीपुरुष संयोगाच्या प्रकारांसहि आसनें असें म्हणतात.["कामशास्त्र" पहा] त्याच प्रकारचीं योगासनेंहि आहेत. ["योग"पहा] युद्धकाळीं जो तळ देतात, त्याला आसनच म्हणतात. जमाखर्चांत सुलभ रीतीनें प्रकरणाचें ज्ञान व्हावें म्हणून जी सदर घडणी लिहितात, तिच्यांतील प्रत्येक सदरास आसन म्हणतात. कंबलासन, कुशासन, मृगासन आणि व्याघ्रासन हीं नित्य उपयोगाचीं आसनें पूर्वीपासून परिचित आहेत. कंबलासन म्हणजे पांढरें ऊर्णा वस्त्र स्नानसंध्येच्या वेळीं बसावयास घेतात तें. कुशासन अथवा दर्भासन म्हणजे दर्भ विणून जें आसन करतात तें. हें सध्यां अनुष्ठानाचे वेळेस बसण्यास घेतात. मृगासन म्हणजे ( कृष्णाजिन ) स्नानसंध्येच्या वेळेस किंवा मोक्षसाधनार्थ जें अनुष्ठान करतात त्या वेळेस मृगचर्मावर बसतात. हें आसन तयार करणें झाल्यास प्रथमतः मृगाचे चार पायांच्या खुऱ्या व दोन शिंगें चर्मास कायम रहातील, अशा रीतीनें चर्म काढून त्यास स्वच्छ पायानें धुवून जमिनीवर खुंट्या मारून ताणावें आणि हळद व तूप लावून सुकवावें. नंतर हें चर्म अइन, तरवड, बाभूळ, आंवळी इत्यादि वृक्षांचे सालीच्या काढ्यांत बुडवून कांहीं वेळ राहूं द्यावें नंतर बाहेर काढून सुकल्यावर त्यास तुपाची किंवा तेलाची मवारी देऊन कांहीं दिवस ठेवावें म्हणजे तयार होतें, ह्या रंगाच्या योगानें आसनास दुर्गंध न येतां मृदु

राहतें. व्याघ्रासन हें जारण, मारण, उच्चाटन इत्यादि कर्मांचें अनुष्ठान करण्याचे वेळीं उपयोगांत आणलें जात असे. व्याघ्राच्या चारहि पायांचीं नखें चर्मास कायम ठेवून चर्म काढावें आणि मृगासनाप्रमाणें रंगवून तयार करावें. या व्याघ्रासनास कडासनहि म्हणतात.

बसण्याची पद्धत या दृष्टीनें आसन याचा अर्थ घेतां नित्य परिचित आसनें म्हटलीं म्हणजे वीरासन, कुक्कुटासन, पद्मासन सिंहासन हीं होत. वीरासन म्हणजे वीराचें आसन. उजवें पाऊल जमिनीवर ठेवून डाव्या पायाचीं बोटें व गुडघा जमिनीवर टेंकून त्यावर सर्व शरीर तोलावें आणि छाती पुढें काढून केवळ शौर्याचा आविर्भाव दाखविणें. कुक्कुटासन याचा अर्थ कुक्कुटासारखें आसन. दोनहि पावलें जमिनीवर ठेवून गुढघे उभे करावे आणि सर्व शरीराचा तोल पायांवर ठेवून उकिडवें बसावें यास कुक्कुटासन म्हणतात. असें आसन भोजन करतेसमयीं असावें अशी शास्त्राज्ञा आहे. भोजनसमयीं असें बसलें असतां मित भोजन होतें म्हणून किंवा पाट नसतील म्हणून हा नियम घातला असावा.

पद्मासन म्हणजे कमलाकार बसणें. प्रथम डावें पाऊल उजव्या मांडीवर ठेवून उजवें पाऊल डाव्या मांडीवर ठेवावें. तें असें कीं, डावे पायाच्या पोटरीवर उजवे पायाची पोटरी येईल, अशा रीतीनें मांडी घालून बसणें, त्याला पद्मासन असें म्हणतात. सिंहासन. (सिंहासारखें बसणें). खुरमांड्या करून दोनहि बाजूंस दोनहि तळहात टेंकून बसणें. हें आसन योगासनांतील आहे ( विद्याकल्पतरु ). पां. गो. बाळ समाधिशास्त्र

**आसस**—( आधुनिक बेहराम ), हें ट्रोआडचें प्राचीन ग्रीक शहर अड्रामिटियन आखातावर आहे. ह्याच्या समोरच लेसबॉस आहे. या लेसबॉसमधील एका शहरांतून–मेथिम्नातून–इ.स. पूर्वी १००० ९०० या सुमारास आससचे संस्थापक आले असावे. जवळपास ५० मैलांत आसस हेंच व्यापारी बंदर आहे. निर्गत व्यापाराचें केंद्र असे. हें शहर क्रमाक्रमानें लीडियन, इराणी, परगाममचे राजे, व ओटोमन तुर्क यांच्या हातीं गेलें. इराणी युद्धापासून इ. स. ३५० पर्यंत आसस हें थोडें बहुत स्वतंत्र होतें. इ. स. पूर्वी ३४८ ते ३४५ च्या सुमारास अरिस्टाटल हा तीन वर्षेपर्यंत हरमियस बरोबर आसस येथें राहिला. बेहराम या तुर्की नांवाखालीं आसस अद्यापि दक्षिण ट्रोआडचें व्यापारी बंदर आहे. ( ब्रिटानिका )

**आसाम**, (हिंदुस्थानांतील एक प्रांत) मर्यादा.—हा प्रांत बंगालच्या ईशान्य सरहद्दीला लागलेला असून हिंदुस्थानच्या सरहद्दीवरील प्रांतांपैकीं एक आहे. उ. अ. २२° १९' ते २८° १६', व पू. रे. ८९° ४२' ते ९७° १२' यांमध्यें हा प्रांत वसलेला आहे. ह्याच्या उत्तरेस हिमालय पर्वताचा पूर्वभाग; ईशान्येस मिश्मी नांवाच्या टेकड्या; पूर्वेस ब्रह्मदेशची सरहद्द; दक्षिणेस चीन टेकड्या, चितागांगचा डोंगराळ प्रदेश व टिपरा नांवाचें संस्थान आणि पश्चिमेस टिपरा, मैमनसिंग व रंगपूर हे बंगाल मधील जिल्हे, कुचबिहारचें संस्थान व जलपैगुरी जिल्हा हे आहेत. मणिपूर संस्थानासुद्धां या प्रांताचें क्षेत्रफळ ६१६८२ चौ. मैल आहे.

आसाम हें नांव 'असम' ह्या संस्कृत शब्दापासून निघालें असावें असें म्हणतात. ज्यांना हल्लीं आहोम लोक असें म्हणतात व ज्यांचें एके काळीं नांव शान असें होतें त्या लोकांनीं आशान किंवा आशाम हें स्वतःचें नांव या प्रांतास दिलें असावें असें कांहीं लोकांचें मत आहे. आसामी भाषेंत 'स' बद्दल 'ह' येतो, व त्याप्रमाणें 'आहोम' या शब्दांत तो आलेला आहे; परंतु 'आसाम' या शब्दांत तो विशेष कारण नसतां तसाच कायम राहिला आहे. वरील व्युत्पत्ति स्वीकारणें जरा धोक्याचें आहे.

स्वा भा वि क व र्ण न.—ह्या प्रांताचे स्वाभाविक तीन भाग आहेत. सुरमा अथवा बराक नदीचें खोरें, ब्रह्मपुत्रा नदीचें खोरें किंवा आसाम खुद्द आणि मधला डोंगराळ प्रदेश. मणिपूरचें संस्थान काचारच्या पुर्वेस आहे. व दक्षिणेस लुशाई नांवाचे लोक रहात असलेल्या टेंकड्या आहेत. ब्रह्मपुत्रा नदीच्या खोऱ्यांत पाटाच्या पाण्यावर भाताची लागवड केलेली आहे. यूरोपियन लोकांनीं चहाचीहि लागवड पुष्कळ ठिकाणीं केली आहे.

या प्रांतात पूर्वपश्चिम एक डोंगराची रांग गेली असून नाकेक हें तिचें पश्चिम टोंक ४६०० फूट उंच आहे. पूर्वेकडील बहुतेक भाग ह्यापेक्षां उंच असून शिलांग हें सर्वांत उंच शिखर ६४५० फूट उंच आहे.

सुरमा व ब्रह्मपुत्रा या दोनहि नद्यांच्या खोऱ्यांत दलदलीची जागा फार असून, सिलहटचा पश्चिम भाग पावसाळ्यांत बहुतेक पाण्यानें आच्छादित असतो. मणिपूर संस्थानांत लोकटाक नांवाचें एक सरोवर आहे. ब्रह्मपुत्रा व सुबनसिरी ह्या नद्यांच्या योगानें झालेलें माजुली हें बेट ४८५ चौरस मैल आहे.

आसामच्या डोंगरांत गारगोटी, चुनखडी व जंबूर वगैरे खनिज पदार्थ सांपडतात. येथील खोऱ्यांत जंगल पुष्कळ असून, खजूर, बांबू, केळीं, वगैरेचीं झाडें आहेत. येथील मुख्य रानटी पशु म्हटले म्हणजे हत्ती, गेंड, वाघ, चित्ते, अस्वलें, रानटी कुत्रे, हरणें, रेडे आणि गवे हे होत. मुबलक पाणी, मोठमोठीं जंगलें आणि डोंगरांच्या रांगा या सर्वांमुळें येथील हवा थंड असून सर्द आहे. मार्च व मे यांच्या दरम्यान येथें पुष्कळ पाऊस पडतो. हिंवाळा व पावसाळा असे दोनच ऋतु येथें आहेत. नोव्हेंबर ते फेब्रुवारीपर्यंत हवा थंड असते. शिलांगच्या पठारावर उष्णतामान ८० ° पेक्षां कधींहि जास्त नसतें व हिंवाळ्यांत तर रात्रीं लहान तळ्यांचें पाणी गोठतें.

आसामांत पाऊस पुष्कळ पडतो पण तो सर्व ठिकाणीं सारखा पडत नाहीं. चेरापुंजी येथें पाऊस ४५८ इंच

पडतो. पण १८६१ मध्यें ९०५ इंच पाऊस पडला; त्यापैकीं ५०३ इंच जून आणि जुलई या दोन महिन्यांत पडला होता. कामरूप, नौगांग व दरंग ह्या जिल्ह्यांत वार्षिक पाऊस ७१ ते ७७ इंच पडतो व कापिलीच्या दरींत लंका येथें ४३ इंचापेक्षांहि कमी पडतो. पाण्याच्या क्रमतरतेपेक्षां पाणी जास्त जाहल्यामुळेंच येथील लोकांचें फार नुकसान होतें. १८८१ सालीं नद्यांनां एवढे प्रचंड पूर आले व त्यामुळें इतकी नासाडी झाली कीं सरकारनें प्रयत्न केले असतांहि दुष्काळांत सुमारें एक तृतीयांश लोक परण पावले. ह्या पुरांमुळेंच मुसुलमान लोकांनां ह्या प्रांतावर स्वाऱ्या करितांनां फार अडथळे येत असत. ज्या थोड्या ठिकाणीं ब्रह्मपुत्रा नदीचें पात्र खोल असल्यामुळें पाणी कांठावर जाऊं शकत नाहीं. अशीं ठिकाणें सोडून बाकीच्या भागांत कांठावरचा बराच मोठा प्रदेश पावसाळ्यामध्यें शेतकीला निरुपयोगी असतो.

आसाममध्यें धरणीकंप वारंवार होतात. इ. स. १६०७ मध्यें एक टेकडी फुटून गडप झाली. १८३७ मध्यें म्या कॉश यानें असें लिहून ठेविलें आहे, कीं सुमारें २० वर्षांपूर्वी गोलपाड्याजवळील एक सबंध गांव नाहींसा होऊन त्या ठिकाणीं पाण्याचें एक लहानसें तळें तयार झालें. धरणीकंपाचा सर्वांत मोठा धक्का १८९७ सालीं जूनच्या १२व्या तारखेस बसला. शिलांगचें स्टेशन जमीनदोस्त झालें; व बायकांमुलांस पावसाळ्याचे कित्येक दिवस तंबू राहुट्या किंवा झोपड्या यामध्यें काढावे लागले. गोहत्ती आणि सिलहट येथील बहुतेक सर्व दगडी इमारती मोडून गेल्या; १५४२ लोक मरण पावले. रस्ते व पूल यांची नासाडी झाली; व ३७ लक्ष रुपये खर्चूनहि सरकारला सर्व कामें पूर्ववत करतां आलीं नाहींत.

इतिहास.—सुरमा नदीच्या खोऱ्यांत कांहीं द्राविड वंशाचे लोक आहेत; पण आसामचे बरेच रहिवासी पश्चिम चीन मधून आलेल्या मंगोलियन वंशाचे आहेत. आसामचा उल्लेख पुराणांत आढळतो, व महाभारतांत आलेलीं कांहीं ठिकाणें आसामांत आहेत. गोहत्तीजवळ कामाख्य या गांवीं असलेलें शक्तीचें देवालय पुष्कळ दिवसांपासून प्रसिद्ध आहे. कालिकापुराण व योगिनीतंत्र या पुस्तकांत दानव व असुर ही पदवी धारण करणाऱ्या राजांचीं नांवें दिलीं आहेत. यांपैकीं नरक हा प्रख्यात होता. त्यानें 'प्राग ज्योतिष पुर' म्हणजे हल्लींचे गोहत्ती हें गांव स्थापन केलें. तो श्रीकृष्णाकडून मारला गेला. त्याचा मुलगा भगदत्त हा दुर्योधनाचा अनुयायी होता. त्यानें चीन व किरातांचें सैन्य आणिलें होतें. अर्जुनानें त्याचा पराभव करून कुरुक्षेत्रावर त्यास मारिलें. रघुवंशांत कामरूपाचा उल्लेख आलेला आहे (४, ८३–८४; ६. १७) रघुराजास कामरूपाच्या राजानें हत्ती दिले त्यावरून प्राचीन काळीं हा प्रांत हत्तीविषयीं प्रसिद्ध होता असें दिसतें.

चिनी प्रवाशी ह्युएनत्संग हा इ. स. ६४० मध्यें हिंदुस्थानांत आल्यापासून विश्वसनीय इतिहास मिळण्यास प्रारंभ होतो. त्यावेळीं भगदत्ताचा वंशज कुमार भास्करवर्मा हा राजा राज्य करीत होता. पुढें दोन शतकेंपर्यंत हें ब्राह्मणी राज्य चालू होतें ( मध्ययुगीन भारत १ ). ह्युएनत्संग गेल्यानंतर हा देश मूळच्या रहिवाशांच्या हातांत गेला. त्यांनीं हिंदुधर्म स्वीकारला होता. प्रलंभ नांवाच्या पुरुषानें त्या सर्वांचा नाश करून आपलें राज्य स्थापन केलें. त्याचे वंशज शिवोपासक होते. हारुपेश्वर ही त्यांची राजधानी होती, पण ते स्वतःस प्राग्ज्योतिषपुरचे राजे म्हणवून घेत. अकराव्या शतकाच्या आरंभीं त्यांच्या मागून दुसरें घराणें गादीवर आलें. त्यापैकीं तिसरा राजा रत्नपाल यानें 'पृथ्वी देवालयांनीं व आकाश यज्ञांतील धुरानें आच्छादून टाकिलें' असा उल्लेख आहे. तांब्याच्या खाणीपासून त्याला पुष्कळ संपत्ति मिळाली; त्यानें जयस्तंभ बांधिले व नवी राजधानी स्थापन केली. त्याच्या मागून सेन व पाल हीं घराणीं होऊन गेलीं.

पंधराव्या शतकांत खेन नांवाचें घराणें आसामचा खालचा भाग व बंगाल जवळचा भाग यांवर राज्य करीत होतें. त्यांच्यापैकीं तिसरा जो नीलांबर याचा हुसेन शहा नामक बंगालच्या मुसुलमान राजानें १४९८ पराभव करून त्यांची राजधानी कामतपूर ही घेतली.

पुढें बिसवासिंगानें कोचचें राज्य स्थापिलें. त्याचा मुलगा नरनारायण यानें आपलें राज्य बरेंच वाढविलें. सोनार गांवचा सरदार इसाखान यानें त्याचा पराभव केला. पुढें त्याचा मुलगा लक्ष्मीनारायण हा गादीवर आला. पूर्वेकडील रघु राजाचा मुलगा परिक्षित याशीं त्याचें वैर उद्भवल्यामुळें त्यानें मुसुलमान राजांची मदत मागितली. परिक्षित राजानें कांहीं वेळ ठिकाव धरला, पण मुसुलमानांनीं त्याला कैद करून दिल्लीस नेलें. त्याचा भाऊ बळिनारायण हा आहोम राजा प्रतापसिंग याजकडे पळून गेला. प्रतापसिंगानें मुसुलमानांचा पराभव करून त्यास गादीवर बसविलें पण इ. स. १६३७ त मुलसुमानांनीं पुन्हां स्वारी करून त्याला ठार मारिलें व आहोम लोकांनां कामरूपाच्या बाहेर घालविलें. पुढें त्यांच्यामध्यें तह होऊन बरनाडी ही दोघांमधील हद्द ठरली.

इ. स. १६५८ त शहाजहान आजारी पडला, व गादी संबंधानें बखेडे सुरू झाले त्या वेळीं कोचराजा प्राणनारायण यानें मुसुलमानी सत्ता झुगारून दिली. आहोमराजा जयध्वजसिंग यानें प्राणनाथाला संकोशच्या पलीकडे घालवून सबंध ब्रह्मपुत्रा खोरें आपल्या ताब्यांत घेतलें.

बंगालमधील बखेडे शांत झाल्यावर, डाक्याचा सुभेदार, मीर जुमला, यानें मोठ्या सैन्यासह आहोम लोकांवर चाल करून त्यांचें राजधानीचें शहर गरगांव गांठलें, पण पावसाळा जोराचा सुरू झाल्यामुळें त्याचे व त्याच्या सैन्याचे फार हाल झाले; व कसातरी तह करून त्याला डाक्यास

परत जावें लागलें. आहोम लोकांनीं गेलेला मुलूख लवकरच परत मिळविला. आहोम लोकांत पुढें अंतःकलह उद्भवले. त्याचा फायदा घेऊन मुसुलमानांनीं गोहत्ती काबीज केलें. पण इ. स. १६८१ त गदाधरसिंगानें त्यांचा पराभव करून त्यांनां कायमचें घालवून दिलें.

गदाधरसिंगानंतर रुद्रसिंग गादीवर बसला. मुसुलमानांच्या स्वारीची भीति न उरल्यामुळें त्यानें आपलें राज्य वाढविण्यास सुरुवात केली. काचरी लोकांपासून त्यानें नौगांगचा दक्षिण भाग घेतला. काचरच्या मैदानांतील प्रदेशावर वस्ती करण्याचा त्याचा विचार होता, परंतु पावसाळ्यांत रोगराईमुळें त्याच्या सैन्याचें फार नुकसान झाल्यामुळें त्याला तो विचार रहित करावा लागला. मध्यंतरी काचरच्या राजानें जेंटियापूरच्या रामसिंगाची मदत मागितली होती. पण आहोम लोक परतल्यामुळें त्याची मदत घेण्याची ताम्रध्वजास आवश्यकता लागली नाहीं; म्हणून रामसिंगानें विश्वासघातानें त्याचा देश काबीज केला व त्यालाहि पकडलें. ताम्रध्वजानें आहोम राजाला मदत करण्याबद्दल विनंति केली. त्यावर रुद्रसिंगानें, सैन्याची एक तुकडी काचरकडून व दुसरी जंटिया टेंकड्यामधून, अशा दोन तुकड्या जंटियापूरवर पाठविल्या व रामसिंगाचा पराभव केला.

रामसिंगाच्या राज्यांत आहोम लोकांचा धर्म बंद होऊन हिंदु धर्म प्रचारांत आला. त्याचा मुलगा सिवसिंग हा शाक्त होता. त्याच्या बायकोनें एका वैष्णवपंथी शूद्र महंताच्या कपाळाला दुर्गादेवीस बळी दिलेल्या एका पशूचें रक्त फांसून त्याचा अपमान केला. प्रजेनेंहि राजाचें अनुकरण करून हिंदुधर्म स्वीकारला. पण यामुळें त्यांच्यांतील स्वाभिमानादि गुण कमी होऊन अंतःकलह सुरू झाले, व त्यांची सत्ता कमी होऊं लागली. ते वैष्णवांचा छळ करूं लागले. त्यामुळें शेवटीं १७८६ त मोआरिया जातीनें बंड उभारून आहोम राजा गौरीनाथ याचा पराभव केला व त्यास पळवून लाविलें.

गौरीनाथानें इंग्रजांची मदत मागितल्यावरून, लॉर्ड कॉर्नवालीस यानें इ. स. १७९२ त कॅप्टन वेल्स यास त्याच्या मदतीकरितां पाठविलें. कॅप्टन वेल्स यानें गौरीनाथाच्या सर्व शत्रूंचा पराभव करून राज्यामध्यें सुव्यवस्था आणली, व तो तेथेंच १७९४ पर्यंत राहिला; पण सर जॉन शोअर यानें त्याला परत बोलाविल्यामुळें राज्यांत पुन्हां बखेडे सुरू झाले.

इ. स. १८१० त चंद्रकांत राजा गादीवर होता. गोहत्तीच्या सुभेदारावर त्याची इतराजी झाल्यामुळें तो सुभेदार बंगाल्यांत इंग्रजांची मदत मागण्याकरितां पळून गेला. पण इंग्रजांची मदत न मिळाल्यामुळें त्यानें ब्रह्मी राजाची मदत मागितली ब्रह्मी राजानें त्याला मदत करून पुन्हां गादीवर बसविलें. पण त्याचें सैन्य परत जातांच त्या सुभेदाराचा खून झाला, व चंद्रकांताला पदच्युत करण्यांत आलें. ब्रह्मी लोकांनीं पुन्हां येऊन चंद्रकांताला गादीवर बसविलें, पण या वेळीं परत न जातां त्यांनीं आसामांत कायमचें ठाणें दिलें.

आहोम सत्ता याप्रमाणें कमी होत गेल्यामुळें त्यांचा काचरी राजांवरील दाब कमी झाला; पण त्यांनां मणिपुरी लोक नवे शत्रू उत्पन्न झाले. इ. स. १८२४ त ब्रह्मी लोकांनीं काचार व जेंटिया यांवर स्वारी केल्यामुळें, इंग्रजांनीं ३००० सैन्य काचर लोकांच्या मदतीस पाठविलें. पावसाळ्यांत ब्रिटिशांनां गोहत्तीपर्यंत हटावें लागलें, पण पावसाळा संपल्यावर त्यांनीं चढाई करून ब्रह्मी लोकांस प्रांताबाहेर हुसकून लाविलें.

सन १८२६ सालच्या यांडाबो येथील तहान्वयें ब्रह्मी लोकांनीं आसाम प्रांत ईस्टइंडिया कंपनीस दिला. त्या प्रांताचा राज्यकारभार पहाण्याकरितां, रंगपूरचा कमिशनर स्कॉट यास नेमण्यांत आलें. मोआमारी लोकांना त्यांचा मुख्य बोर सेनापति याच्या हाताखालीं स्वतंत्र ठेवण्यांत आलें. सादिया–खोवा गोहैन यानें आहोम राजाचें राज्य घेतलें होतें; तें त्याच्याकडेच ठेवून त्याला कंपनी सरकारचा मांडलिक करण्यांत आलें व बाकीचा लखिमपूरचा प्रदेश पुरंदरसिंगाकडे देण्यांत आला. पण ही व्यवस्था फार दिवस टिकली नाहीं. पुरंदरला राज्यकारभार नीट पहातां येईना म्हणून त्याचें राज्य १८३८ त खालसा करण्यांत आलें. सादिया खोवा गोहैन यास त्याच्या जागेवरून दूर करून, खामती सरदारांकडे सर्व अंतर्व्यवस्था सोंपविण्यांत आली; पण त्यांनीं शिबंदीवर हल्ला करून कर्नल व्हाइट यास मारिलें म्हणून त्यांना नदीच्या पलीकडे हद्दपार करून त्यांची सत्ता मोडली गेली. सन १८४२ त, बोर सेनापति मरण पावला; व त्याच्या मुलाला इंग्रजांच्या अटी मान्य न झाल्यामुळें त्याचें राज्यहि खालसा झालें

काचरमध्यें मूळच्या राजाला कंपनीनें पुन्हां गादीवर बसविलें; पण त्याला राज्याचा बराच भाग तुळाराम नांवाच्या बंडखोरास द्यावा लागला. त्या राजाचा १८३० मध्यें खून झाला; व त्याला कोणी वारस नसल्यामुळें त्याचें राज्य कंपनीच्या मुलुखास जोडलें गेलें. इ. स. १८५० त तुळारामच्या मरणानंतर त्याचें राज्य त्याच्या मुलास चालवितां येईना, म्हणून तेंहि कंपनीनें आपल्या ताब्यांत घेतलें. जंटियाच्या राज्यांत ब्रिटिश प्रजाजनांचे काली देवीला बळी दिल्यामुळें तेथील राजास काढून टाकण्यांत आलें. ब्रिटिश प्रजाजनांचें संरक्षण करण्याकरितां नागा डोंगर हळूहळू घेण्यांत आले. गारो डोंगर १८६९ त, व लुशाई डोंगर १८९० त, इंग्रजांनीं आपल्या राज्यास जोडले.

यांडाबोच्या तहान्वयें, ब्रह्मी राजानें गंभीरसिंगाला मणिपूरच्या गादीवर पुन्हां बसविलें. ब्रिटिशसरकार त्याच्या राज्यांत विशेष कारणाशिवाय ढवळाढवळ करीत नसे. परंतु सन १८९० त तेथील लोकांनीं राजाविरुद्ध बंड केल्यामुळें

ब्रिटिशांनीं त्या राजवंशांतला दुसरा राजा गादीवर बसवून तेथें आपला पोलिटिकल एजंट ठेविला.

आसामांत पुराणवस्तूंचे अवशेष फारसे नाहींत. सिलहट येथील शहाजलालच्या थडग्यावर बांधलेली मशीद अद्याप चांगल्या स्थितींत आहे.

गोहत्ती जवळचें कामाख्या देवीचें देवालय व हाजो येथील हयग्रीव महादेवाचें देवालय हीं प्रख्यात आहेत. शिवसागरमध्यें पुष्कळ देवालयें असून बहुतेक तळ्यांच्या कांठांवर आहेत. सर्वांत मोठें तळें ११४ एकरांचें आहे. गरगांव जवळ, नाझीर या आहोम राजधानीचे अवशेष आहेत. बरेलीच्या खिंडींत भालुकपांग येथें जुन्या किल्ल्याचे अवशेष आहेत, त्यावरून देशी राजांनीं आपलें राज्य हिमालयापर्यंत वाढविलें होतें असें दिसतें. तेराव्या शतकांत अरिमात राजानें कामरूपमध्यें बांधलेला बैदरगड किल्ला, त्याच्या मुलानें नौगांगमध्यें बांधलेला किल्ला, त्याचप्रमाणें प्रतापगड येथील मातीचीं गढीवजा कामें हीं महत्त्वाचीं आहेत.

औरंगजेबकालीन आसामी लोक.—अलमगीरनाम्यांत याचें वर्णन पुढीलप्रमाणें आढळतें. आसामी लोकांच्या चालीरीती सामान्येंकरून गांवढळ आहेत. त्यांच्यांत धार्मिक बंधनें नाहींत. ते पूर्ण चैनी आहेत. ते सर्व प्रकारचें मांस खातात, परंतु ते नरमांस भक्षक नाहींत. त्यांनां तुपाचा वास देखील आवडत नाहीं.त्यांच्यांत पडदापद्धति नाहीं. बहुपत्नीत्व कायदेशीर आहे असें मानिलें जातें. व्यापार व विनिमय यांच्या योगानें स्त्रियांचे सौदे सर्व साधारण आहेत. पुरुष शिशा, डोकें व दाढी यांचे केंस साफ काढून टाकितात.

आसामची प्रांत भाषा बंगालच्या भाषेहून भिन्न आहे. स्नायूंची शक्ति, उद्धटपणा, शौर्य, धीटपणा हे गुण आसामी लोकांनां पाहिल्याबरोबर आढळून येतात. त्यांच्या कांहीं संवयी जंगली प्राण्यांच्या संवयींशीं सदृश आहेत. ते लढाऊ, कसून काम करणारे, धूर्त, व तंटेखोर आहेत. सहानुभूति, खरेपणा, मायाळूपणा, लज्जा व सभ्यता ( दाक्षिण्य ) हे गुण त्यांच्या स्वभावांत नाहींत. तरटाचें मुंडासें, कमरेभोंवतीं एक कपडा, व खांद्यावरील एक कपडा एवढाच त्यांचा पोषाख असतो. ते जोडे घालीत नाहींत. करगांवचे दरवाजे व देवळें याखेरीज सुतार काम कोठेंहि आढळून येत नाहीं. घरें लांकूड, बांबू व गवत यांचीं नेहमीं करितात. अधिपति व उमराव वर्ग पालखींत जातात व वरच्या दर्जाचे डोलींत जातात. घोडे, उंट व गाढव मुळींच आढळून येत नाहींत. घोड्याची त्यांनां फार भीति वाटते.

आसामच्या दोन प्राचीन राष्ट्रजाती ( १ ) आसामी व ( २ ) कुल्तानी ह्या आहेत. दुसऱ्या जातीला सन्मान देतात. परंतु क्षात्रतेज, काटकपणा व शारीरिक सहनशीलता ह्या गोष्टींत पहिल्या जातीचे लोक अधिपतीच्या वाड्याचें रक्षण करितात. त्यांचीं शस्त्रें:—तरवार, ढाल, बंदूक, धनुष्यबाण, भाला, व बांबूच्या काठ्या हीं आहेत. बंदुका व रामचंगी ( मोठ्या बंदुका ) किल्ल्यांवर व नावांवर चढवितात.

अधिपती व मोठे अधिकारी यांनां जमीनीखालच्या कमानींत पुरतात व त्यांच्याबरोबर सर्व जरूरीच्या वस्तू —सचेतन व अचेतन देखील—पुरल्या जातात. नंतर त्या कमानींचें तोंड तुळया व लांकडाच्या फळ्यांनीं पक्कें ( छिद्र राहूं न देतां ) बंद करून टाकितात. तेथें पुरलेल्या वस्तूंचा उपयोग मृताचा आत्मा घेतो असा या लोकांत समज आहे.

ब्रह्मपुत्रेमुळें पडलेल्या दोन भागांपैकीं दक्षिणगोल जास्त दुर्गम असल्यामुळें अधिपतीची राजधानी तेथें असते. उत्तर गोलांतले लोक सुदृढ, बांध्याचे निरोगी व गौरवर्णाचे आहेत.

करगाव येथें राजवाडा आहे. प्रत्येक घराजवळ एक बगीचा व लगतच एक शेत आहे. म्हणून हें शहर बरेंच विस्तृत झालें आहे. विक्याचीं पानें फक्त बाजारांत येतात. राजवाड्याभोंवतीं उंच केलेला वर्तुळाकार पायरस्ता आहे. अधिपतीच्या मिरवणुकीच्या प्रसंगीं पडघम व झांज ह्यांवर गायन करितात. हल्लींच्या अधिपतीचें नांव जयध्वजसिंग आहे. " [ इं. अँ. पु. ६ मध्यें बाबू रामप्रसाद यांनीं उदयपूर दरबारचे कवि कविराज श्यामलदास यांच्या प्रबंधाचा अनुवाद केलेला आहे].

लोकसंख्या.-मणिपूर संस्थानासुद्धां आसामची लोकसंख्या १९२१मध्यें पाऊण कोटीवर म्हणजे७६०६२३०होती. बहुतेक लोक खेड्यांत रहातात. सिलहट, गोहत्ती, डिब्रूगड, सिलचर, बारपेटा आणि शिलाँग हीं मोठीं गांवें होत. शिलाँग हें राजधानीचें ठिकाण आहे. मणिपूरची राजधानी इंफल आहे.

या प्रांताची पहिली खानेसुमारी १८७२ त झाली. तेव्हां लोकसंख्या ४१,५०,७६९ होती. यामध्यें मणिपूरची व लुशाई डोंगरवस्तीची लोकसंख्या धरली नव्हती. १८९७ त रोगराई फार झाली. कांहीं ठिकाणीं काळा आजार सुरू होता त्यामुळें ह्या प्रांताची लोकसंख्या शें. २५ ते ३० कमी झाली होती; पण चहाच्या मळ्यावर काम करण्याकरितां दुसऱ्या प्रांतांतून मजूर लोक आणिल्यामुळें लोकसंख्या पुनः वाढली.

पुरुषापेक्षां स्त्रियांची संख्या कमी असल्याचें प्रत्येक खानेसुमारींत दिसून आलें आहे. बाहेरून आणलेल्या मजूर लोकांत पुरुषच जास्त असतात हें कांहीं अंशीं याचें कारण आहे.

आसामांतील कांहीं लोकांच्या लग्नरीती.—आसाम प्रांतांतील कांहीं लोकांत वधूवरपक्षांनीं एकमेकांस पानसुपारी दिली म्हणजे लग्नविधि आटोपतो. कित्येक जातींत उभयपक्षांची एक लटकी लढाई होऊन तींत वरपक्षाची टरीव सरशी होते. नंतर वरपक्षाकडून वधूच्या

बापाची संभावना होऊन लग्नसमारंभ संपतो. संताळ परगण्यांतील लोकांत सोळा वर्षांच्या आंतील मुलांची आणि पंधरा वर्षांच्या आंतील मुलींचीं लग्नें करीत नाहीत वयांत आलेलीं मुलें व मुली एकमेकांत निःशंकपणें मिसळतात व त्यांस आपल्या इच्छेनुरूप आपापल्या जन्माचे सोबती व सोबतिणी पसंत करून घेण्याचें पूर्ण स्वातंत्र्य असतें. तथापि आईबाप अथवा पालक यांनीं मुलाला नवरी पाहून देणें, हें अधिक चांगलें, असें समजतात. वरपक्षाकडून वधूच्या पित्यास अथवा पालकास मुलीबद्दल पांच रुपये देण्यांत येतात. वरानें वधूच्या कपाळीं शेंदूर लावून वधूवरें एका पात्रांत जेवलीं म्हणजे लग्नविधि संपला. ( अलीनी " लग्नविधि व सोहाळे " )

सुरमा नदीचें खोरें व गोलपाडा येथील हिंदु व मुसलमान लोकांत बालविवाह प्रचलित आहे; पण खुद्द आसामांत ब्राह्मण व गणक या जातींशिवाय इतर जातींत मुलींचा विवाह ती वयांत येईपर्यंत करीत नाहींत. लग्न होण्यापूर्वी जांवई आपल्या सासऱ्याच्या घरीं काम करण्याकरितां रहातो. या अवधींत त्याला आपल्या भावी पत्नीशीं संबंध ठेवण्यासहि मुभा असते. लग्नापूर्वी गरोदर रहाणें हें इकडे लज्जास्पद मानीत नाहींत; परंतु बापाच्या घरीं प्रसूत होऊन तिला जिवंत मूल होतां कामा नये, म्हणून सातव्या महिन्यांत गर्भपात करवितात. पुरुषांच्या विवाहाची वयोमर्यादा त्यांनां द्याव्या लागणाऱ्या मुलीच्या किंमतीवर अवलंबून असते. खासी जातींत क्षुल्लक कारणांवरून काडी मोडून देतां येते. एकापेक्षां जास्त बायका एकाचवेळीं करण्याचा प्रघात येथें नाहीं.

आसामांतील शें. ४८ लोक बंगाली भाषा बोलतात व शें. २२ लोक आसामी बोलतात. दुसऱ्या महत्त्वाच्या भाषा म्हटल्या म्हणजे बोडो, खासी, नागा, गारो, मणिपुरी वगैरे होत. हिंदुस्थानी, मुंडारी, उरिया ह्या भाषाहि चालतात.

आ सा मी वा ङ्म य.—व्याकरणदृष्ट्या आसामी भाषेचा बिहारी भाषेशीं फार निकट संबंध आहे. तितका तिचा बंगाली भाषेशीं संबंध नाहीं. आसामी भाषा ही अगदीं स्वतंत्र भाषा आहे. इ. स. १८००त आसामचें वाङ्मय बंगालच्या वाङ्मयापेक्षां जास्त विस्तृत व विविध प्रकारचें होतें. (आसाम–इंग्रजी पुस्तक अमेरिकन बाप्टिस्ट मिशन प्रेस, १८५५). रामसरस्वती व श्री. होंकर ( शंकर ) यांनीं आसामी भाषेंत महाभारत व रामायण यांचें भाषांतर केलेलें आहे. श्रीभागवत व भगवद्गीता ह्यांचेंहि भाषांतर झालेलें आहे. धर्म, वैद्यक, इतिहास, नाटकें व दुसऱ्या विषयांवरील संस्कृत ग्रंथांचीं केवळ आसामी भाषेंत भाषांतरें झालीं आहेत असेंच नव्हे तर प्रमाणभूत स्वतंत्र ऐतिहासिक ग्रंथरचना देखील त्या भाषेंत झालेली आहे. त्या ग्रंथसमूहाला बूरंजी असें म्हणतात व ख्रिस्ती शकाच्या तेराव्या शकापासून हा ग्रंथसमूह अस्तित्वांत आहे.

इतिहास.—इतिहासाशिवाय वाङ्मयाच्या दुसऱ्या कोणत्याहि शाखेंत आसामी लोकांचे यत्न जास्त फलद्रूप झाले नाहींत. इतिहास हा शिक्षणाचा एक आवश्यक भाग आहे असें ह्या लोकांचें मत आहे. इतिहास विषयाची माहिती आसामी लोकांस आराकानी व ब्रह्मी लोकांप्रमाणेंच होती.

वैद्यकशास्त्र.—वैद्यशास्त्राचें ज्ञान प्रत्येक व्यक्तीला आवश्यक आहे, असें मत असल्यामुळें वैद्यकशास्त्रावरील ग्रंथाचा भरणा फार मोठा आहे.

नाटकें:—होंकर, माधव वगैरेंनीं महाभारत, रामायण व भागवत यांतील कथांवर लिहिलेलीं नाटकें फार लोकप्रिय आहेत.

गणित.—बकुलकैठ यानें पद्यात्मक ग्रंथ लिहिला व लीलावतीचें भाषांतर केलें.

कोशः—जदुरामचा कोश प्रसिद्ध आहे. याशिवाय शिक्षण विषयक व ख्रिस्तीधर्मशास्त्रविषयक पुष्कळ पुस्तकें झालीं आहेत. ब्रह्मी युद्धामध्यें व मट्टकबंडांत पुष्कळ ऐतिहासिक ग्रंथ नाश पावले. तथापि शिल्लक असलेल्या ग्रंथांवरून ठरतें कीं, आसामी ही एक केवळ प्रांतभाषा नसून स्वतंत्र भाषा आहे व त्या भाषेंतलें वाङ्मय अगदीं स्वतंत्र आहे ( इं. अँ. २५ ).

येथील मूळचे रहिवासी इंडोचिनी जातीच्या वंशाचे होते. त्यावेळीं आसामच्या खोऱ्यांत पश्चिमेकडील हिंदुलोक येऊन राहिले होते. नंतर बोडोवंशांतले चुटिया, देशाचे मालक झाले व मागून आहोम आले. हे मूळचे शान जातीचे असून तेराव्या शतकांत पॉंग राज्यांतून निघाले आणि त्यांनीं सर्व आसाम काबीज केला व देशभर पसरले. हल्लीं चहाच्या मळ्यांवर काम करण्याकरितां बाहेरून पुष्कळ मजुर लोक आल्यामुळें लोकसंख्येंत त्यांचें प्रमाण बरेंच आहे. निरनिराळ्या वंशांच्या मुख्य जाती व त्यांचें १९०१ मधील संख्याबळः– काचरी ( २४०००० ), गारो ( १२८००० ), रभा ( ५७००० ), मेच (७५०००), मिकिरी (८७०००), मणिपुरी (२५६०००), नाग (१६२०००), खासी (१७८०००), लालुंग ( ३६००० ), लुशाई (६३०००), कुकी (५६०००), मिरी (४७०००). येणेंप्रमाणें आहे. मिकिरी जातीचे लोक गरीब व शांत स्वभावाचे आहेत. काचारी, राभा, व मेच ह्या जातीचे लोक कणखर असतात. गारो, नाग, आणि लुशाई यांनां लढण्याची फार आवड आहे. नाग जातीचे लोक विशेष क्रूर आहेत. निरनिराळे लोक येथें आल्यामुळें येथील हिंदु लोकांत जातीचा तीव्रपणा बंगालपेक्षां कमी आहे. येथील मुख्य जात कलिता होय. ही हळू हळू कायस्थांत मोडूं लागली आहे. बार व सरू या तिच्या पोटजाती होत. केवाट लोकांचा दर्जा बंगालपेक्षां येथें अधिक उच्च मानिला जातो. ते स्वतःस माहिश्य वैश्य असें म्हणवितात. राजवंशी, ( पूर्वीची कोच जात ) सालोई, पटिया याहि दुसऱ्या जाती आहेत. आहोम लोकांनींहि हिंदु आचार स्वीकारला आहे. एकंदर लो. सं. पैकीं शें. ५६ हिंदु आहेत; पैकीं निम्मे वैष्णव आहेत. त्यांचे मुख्य गुरू ज्यांना गोसावी

म्हणतात, ते आपल्या शिष्यवर्गासह मठामध्यें रहातात. धार्मिक व सामाजिक बाबतींत यांचा अधिकार मोठा असतो. ते बहुतकरून ब्राह्मणांपैकीं असतात; पण लहान मठांमध्यें कलित किंवा कायस्थ गोसावीहि असूं शकतो. गोसावी व त्यांचे शिष्य यांचा योगक्षेम चालण्याकरितां सरकारांतून त्यांना मोफत धान्याची जमीन दिलेली असते. व कित्येक वेळीं अशी जमीन हजारों एकरहि असूं शकते. शंकरदेव या कायस्थानें काढलेला महापुरुष हा वैष्णवांचा एक पंथ आसामाच्या खोऱ्यांत आहे. त्याचे अनुयायी कृष्णभक्त असून ते जातिभेद फारसा पाळीत नाहींत. हिंदूंपैकीं एक-पंचमांश शाक्त आहेत. कामरूपमध्यें कामाख्या देवीचें देवालय हें फार प्रसिद्ध आहे. शैवांची संख्या या मानानें कमी आहे. आसामांत शाक्तसंप्रदाय इतर ठिकाणापेक्षां अधिक जोरांत आहे.

लोकसंख्येंत मुसुलमानांचें प्रमाण शेंकडा २५ आहे. शेंकडा १७ लोक अद्याप भुतांखेतांवर विश्वास ठेवून त्यांचीच आराधना करितात. पण ह्यांपैकीं बरेच लोक आतां हिंदु किंवा ख्रिस्तीधर्म स्विकारूं लागले आहेत. आसामांतील बहुतेक लोकांचा धंदा शेतकी हा असून ते घरें बांधणें, शेतकीचीं अवजारें करणें, कपडे शिवणें वगैरे कामें स्वतःच करितात. शेतकीचें काम करण्यांत बायकाहि पुष्कळ मदत करितात. येथील लोकांचें मुख्य अन्न तांदूळ हें होय. मांसाहारीहि पुष्कळ लोक आहे. प्रतिष्ठित ब्राह्मणसुद्धा मांसाहार करितात. साधारण गांवांतील घरें लहान असून हवाशीर नसतात. विटांचीं घरें क्वचित् दिसतात.

हिंदुलोक आपलीं प्रेतें जाळतात व मुसलमान पुरतात; कांहीं जातीमध्यें श्रीमंत लोकांचीं प्रेतें कित्येक महिनेपर्यंत राखून ठेवण्याची चाल आहे. अशावेळीं तीं कुजूं नयेत म्हणून कांहीं लोक प्रेतांच्या अंगाला चरबीचा केलेला एक पदार्थ लावतात. त्यामुळें कातडें कठिण होतें. नंतर प्रेताला सजवून भात वगैरे पदार्थहि त्याच्या घशांत घालितात.

हिंदूंच्या इतर उत्सवाशिवाय सर्वांची देवी बिशोरी हिचा उत्सव होतो. सिलहटमध्यें कार्तिक उत्सव व आसाममध्यें माघव्यूह व वैशाखव्यूह हे उत्सव होतात. माघव्यूह हा उत्सव डिसेंबरच्या शेवटीं पिकें निघाल्यानंतर असतो वैशाखव्यूह हा वर्षारंभीं असून एक आठवडाभर चालतो.

ब्राह्मणांच्या नांवापुढें शर्मा, वैद्यांच्या पुढें गुप्त व इतर जातींच्या नांवापुढें दास हे शब्द लावतात. राय, चौधरी, मुजुमदार, गोसांईन, फुकन, बारुआ हीं नांवें आसामखोऱ्यांत प्रचारांत आहेत.

**शे त की**—तीन बाजूनीं डोंगर असलेलीं नद्यांतील वाहून आलेल्या गाळामुळें झालेलीं दोन मैदानें आसामामध्यें आहेत. एक आसाम खोऱ्यांत आहे, व दुसरें सुरमा नदीच्या खोऱ्यांत आहे.

यापैकीं पहिल्यांत पाऊस जास्त पडतो व दुसऱ्यांत कमी पडतो. पहिल्यांतील जमिनीपेक्षां दुसऱ्यांत वाळूचें प्रमाण कमी असल्यामुळें तेथील जमीन जास्त सुपीक आहे. दोन्ही ठिकाणीं निरनिराळ्या प्रकारचें भाताचें पीक होतें. डोंगराळ प्रदेशांत, भात, मिरच्या, कापूस, बाजरी, नाचणी इत्यादि धान्यें, व भोंपळे व दुसरा भाजीपाला होतो; पण एकाच जमिनींत एकसारखें तीन किंवा चार वर्षांपेक्षां जास्त पीक घेतां येत नाहीं. नंतर कमींत कमी चार वर्षें जमीन ओस ठेवावी लागते.

ब्रह्मपुत्रा नदीच्या खोऱ्यांत भात, कडधान्य, चहा, ऊंस, रसू, मोहरी वगैरे पिकें होतात. गोलपाडा जिल्ह्यांत गहूं व ताग पिकतो. सिलहटमध्यें ताग व जवस होतो. तंबाखू केळीं, विड्याचीं पानें, मिऱ्यें, वगैरे बागाइती जिन्नसहि होतात.

मजूर लोक पुरेसे नसल्यामुळें शेती वाढण्यास फार अडथळा होतो. पावसाळ्यांत हवा काम करण्यास उत्साहकारक नसल्यामुळें, शेतकरी लोक स्वतःच्या निर्वाहास लागेल इतक्याच जमिनीची लागवड करतात. कर्जबाजारीपणा लोकांत फारसा नाहीं; व मारवाड्यांशिवाय दुसरा श्रीमंत लोकांचा वर्गहि येथें नाहीं.

चारा मुबलक असूनहि गुरेंढोरें चांगलीं मजबूत नाहींत. याचें कारण पैदाशीचे नियम पाळण्यांत येत नाहींत, त्यांचेकडून काम फार घेतलें जातें व त्यांची काळजी मुळींच घेतली जात नाहीं.

सरकारनें बांधलेले कालवे आसामांत मुळींच नाहींत. पण हिमालयाच्या पायथ्याशीं आसामखोऱ्यांत रहाणाऱ्या काचरी व मेच लोकांनीं पुष्कळ कालवे तयार केले आहेत. दुसऱ्याहि भागांत कालवे आहेत, पण बहुतकरून सर्व भागांत पाऊस चांगला पडत असल्यामुळें, पाण्याची कमताई पडून पिकांचें नुकसान होत नाहीं. नद्यांच्या पुरांमुळें मात्र त्यांचें नुकसान होण्याचा संभव असतो. यासाठीं आहोम राजांच्या वेळीं लोक विगारीस धरण्याची चाल असतां, ब्रह्मपुत्रा व तिला मिळणाऱ्या नद्यांना बंधारे घातले होते. सिवसागर जिल्ह्यांत आहोम राजांच्या राजधानीच्या आसपास हे बंधारे पुष्कळच आहेत. त्यामुळें ह्या प्रदेशाचें पुरांपासून संरक्षण होतें. ब्रिटिश सरकारानेंहि हे बंधारे दुरुस्त ठेवण्याकरितां पुष्कळ पैसा खर्च केला आहे.

**शे त की खा त्या च्या १९२२–२३ सा ल च्या का र भा रा चा अ ह वा ल**—जोरहाट, करिमगंज व अपर शिलांग या तीन ठिकाणीं सरकारचीं प्रयोगक्षेत्रें आहेत. जोरहट येथें चुना व लांकडाची राख यांविषयीं प्रयोग करून अनुमानें काढण्यांत आलीं आहेत. तसेंच तेथील प्रयोगांत उंसाच्या निरनिराळ्या जातींची परीक्षा, निवड, व रासायनिक खतें व त्यांच्या योग्य जातींचा प्रसार इत्यादि गोष्टींचा समावेश होतो. १९१९ सालीं आसामांत ३८७ पतपेढ्या होत्या.

म जु री, धा रा, व धा र ण.—बहुतेक ठिकाणीं रयतवारी पद्धत चालू आहे. गोळपाड्याचा बराच भाग व सिलहटचे दाट वस्तीचे प्रदेश यांमध्यें बंगालप्रमाणें कायमधाऱ्याची पद्धत सुरू आहे. काचरमधील वहिवाटी पद्धत, व कामरूपमधील सवलतीच्या करानें दिलेल्या मोठाल्या इस्टेटी, यामुळें तेथें कास्तकार लोकांचा नवीन वर्ग उत्पन्न होत आहे. पण ओसाड जमीन अद्याप पुष्कळ असल्यामुळें, जमीनदारांनां शेतकऱ्यांपासून फार फायदा मिळत नाहीं. सिलहटमध्यें भाताच्या शेताला एकरीं १२ रुपये ते १२ आणे लागतात; पण साधारण दर एकरीं तीन रुपये असतो. भाताच्या शेतावर एकरीं कर सिलहटमध्यें १२ रुपये ते १२ आणे. गोळपाडा ६ रु. ते १२ आ., आसाम खुद्द ६ रु., काचर ७ रुपये ४ आ. ते ४ रु. ८ आणे असे आहेत. जमीनदार कधीं कधीं रोख पैशाबद्दल उत्पन्नाचा कांहीं भाग भाड्यादाखल घेतात. खुद्द आसामांत उत्पन्न अर्धें अर्धें वाटतात. जमीनदार अर्धें बीं व अर्धा कर देतो, व शेतकरी जमिनीची मशागत करून पीक तयार करतो.

आसाम प्रांतांत मजूर वर्गाचा फार तुटवडा आहे. कामकरी लोकांनां रोजची मजुरी सहा आणे मिळते. हा व पुढील दर युद्धापूर्वींचे आहेत. शेतावर काम करण्याकरितां बहुतकरून मजूर लावीत नाहींत. पण लाविल्यास त्यांनां रोजची ४ किंवा ५ आणे मजुरी किंवा धान्य देतात. रेल्वे, रस्ते, व चहाचे मळे यांवर काम करण्याकरितां बाहेरून मजूर आणावे लागतात. चहाच्या मळ्यात पुरुष मजुराला दरमहा रु. ४ ते ५ व बायकानां रु. ३ ते ४ देतात.

आसामांत धारण एकसारखी बदलत आहे. सन १९००साली तांदुळाचा भाव १ रु. स १५ शेर होता. त्याच्या पूर्वीच्या सहा वर्षांत हा भाव सरासरी १रु. स. ३॥ शेर होता. उत्पन्न व दळणवळणाचीं साधनें वाढलीं असता धान्याचा भाव स्वस्त होत नाहीं, याचें कारण बाहेरून येणाऱ्या लोकांची संख्या वाढत आहे हें होय. साधारण शेतकरी लोक घरीं तयार केलेले कपडेच वापरतात. पुरुषांनां कपड्याचा वार्षिक खर्च ५ रु. व बायकानां १० रु. येतो. २ किंवा ३ मनुष्यें असलेल्या, कारकुनाच्या कुटुंबाचा दरमहा अन्नखर्च १० रु. येतो. घराकरितां लागणारें बहुतेक सामान फुकट मिळतें; पण विकतच घ्यावयाचें असल्यास एका घराला सुमारें २५ रु. लागतात.

आ सा म लें ब र इ न्क्वा य री क मि टीः—या कमिटीनें आक्टोबर १९२२ मध्यें एक रिपोर्ट प्रसिद्ध केला असून त्यांत १९२१मध्यें मजूर निघून गेल्यानंतरच्या चहाच्या मळ्यांच्या अवस्थेचें वर्णन केलेलें आहे. मजुरीचा प्रश्न व मजूर मिळविण्याची पद्धति याबद्दल कमिटीनें विचार केला आहे.

म जु री.—कांहीं बाबी वगळून त्यांनीं जसा निकाल दिला आहे कीं, मजुरी व इतर अनेक सवलती मिळून साधारणपणें पुरेसा पैसा होतो. आसामसरकारची अशी समजूत आहे कीं, मळेवाल्यांनीं महागाईच्या पूर्वींच्या सुबत्तेच्या वर्षांचा उपयोग करून घेऊन त्याच वेळीं मजुरांचे पगार वाढविले असते तर हा प्रसंग टाळतां आला असता ( ! ) जिल्हापोट कमिट्यांनीं पगाराचें किमान मान ठरवावें व एखाद्या कारखान्यानें तें अमान्य केल्यास ती गोष्ट असोशिएनशनला कळविण्यांत यावी अशी कमिटीची सूचना आहे व ती आसामसरकारनें मान्य केली आहे.

म जू र मि ळ वि ण्या ची प द्ध ति.—आसामसरकारला सध्यांचा रिक्रूटमेंटाचा कायदा ( ॲक्ट १३ सन १८५९ ) उपयुक्त झाला असें वाटतें. पण कमिटीच्या रिपोर्टांत त्याचा दुरुपयोग करण्यांत आल्याचीं उदाहरणें आहेत. म्हणून कायदा मागें घ्यावा अशी वरील कमिटीकडून चर्चा झाली.

जं ग लें.—जंगलें पुष्कळ आहेत. राखलेलीं व खुलीं असे त्यांचे दोन प्रकार आहेत; १९१९ मध्यें पहिल्या प्रकारचीं ५४९५ एकर, व दुसऱ्या प्रकारचीं १६३०९ एकर होतीं. गोळपाड्यांतलि जंगलें महत्त्वाचीं आहेत. इतर जंगलांतहि सालाशिवाय, तितासपा, जारूळ किंवा अजहार, नाहोर, साम, गोमारी, खैर, शिसू, आणि गुनसराई हीं झाडें होतात. झाडें तोडण्याकरितां सरकारचा परवाना घ्यावा लागतो. निवडलेलीं झाडें वर्षारंभीं तोडून त्यांच्या खोडांचे ६ ते ७ फूट लांबीचे तुकडे करितात; व ते लोटीत नदीकांठीं नेऊन ठेवितात व पावसाळा संपण्याच्या सुमारास नदींतून वहात नेतात. लांकूड पुष्कळ असल्यास या कामाकरितां हत्तींचा उपयोग करितात. विक्रीकरितां नेलेल्या लाकडांवर सरकारी कर वसूल केला जातो. सरकारसारा भरणाऱ्या लोकाना, हलक्याप्रतीचें लाकूड खुल्या जंगलांतून फुकट नेण्याची मुभा असते. सरकारी जंगल इतकें विपुल आहे कीं लोकांना भांडणाचे प्रसंग सहसा येत नाहींत. अशा जंगलांतून ज्या गुरांचें दूध विकलें जात नाहीं, जीं गुरें विकण्याकरितां नसतात अशांनां ह्या जंगलांत फुकट चारतां येतें. प्रत्येक जिल्ह्याकरितां एक जंगल अधिकारी असतो. तो डेप्युटी कमिशनरच्या हाताखालीं काम करतो. जंगलांत वणवा पेटूं नये म्हणून फार काळजी घेण्यांत येते. कळक, वेत, गवत, लाख व रबर हीं जंगलांत होतात. जंगलांत जमा केलेल्या रबरावर कर घेतला जातो. या करापासून १९०१ सालीं ९३००० रु. उत्पन्न झालें. लाखेचा व्यापार मुख्यत्वेंकरून कामरूप, खासी, जंटिया, व गारोचे डोंगर यांमध्यें चालतो. लाखेच्या किड्यांची वाढ कित्येक प्रकारच्या झाडांवर होते. त्या किड्यांभोंवतीं पारदर्शक व तांबूस किंवा नारिंगी रंगाचा चिकट पदार्थ तयार होतो. हा पदार्थ खरडून काढतात व विकतात.

ख नि ज सं प त्ति, व खा णी.—दगडी कोळसा, चुनखडी व पेट्रोलियम येवढेच आसामांतील महत्वाचे खनिज पदार्थ होत. कोळशाच्या मुख्य खाणी लखिमपूर व शिव-

सागर या जिल्ह्यांच्या दक्षिणेस ११० मैलपर्यंत पसरलेल्या आहेत. येथील कोळसा कठिण असून वजनदार असतो. ह्या खाणीकरितां १९०३ त ३५७००० पौंड भांडवल खर्च झालें व २३९००० टन कोळसा निघाला.

याशिवाय शिवसागरच्या दक्षिणेस व गारो, खासी, आणि जंटिया ह्या डोंगराळ मुलखांत थोडाबहुत कोळसा सांपडतो. खासी व जंटियाचा डोंगराळ मुलुख येथें चुनखडी पुष्कळ सांपडते. इतर ठिकाणींहि कांहीं खाणी आहेत. बहुतेक खाणी देशी लोकांनीं चालविलेल्या आहेत.

पेट्रोलियमचा कारखाना फक्त लखिमपूरमध्यें माकुम येथें चालू आहे. १८९३ त, तेथें, पेट्रोलियम शुद्ध करण्याकरितां एक प्रयोगशाळा तयार करण्यांत आली. इ. स. १८९९ त आसाम ऑइल कंपनी निघून तिनें डिगबोई येथें एक मोठी शुद्धीकरणशाला (रिफायनरी) सुरू केली. एकंदर ४२ विहिरी खोदल्या होत्या. त्यांची खोली ६०९ पासून १८३३ फूट पर्यंत असते. उत्तम विहिरींतून दरमहा ५९०० गॅलन तेल निघतें. तेल अशुद्ध असून त्यांत मेण, नफ्था व राकेल हे पदार्थ सांपडतात. तेल देशांतच विकलें जातें, पण मेण मात्र इंग्लंडास रवाना होतें. लोखंड फारच थोड्या प्रमाणांत सांपडतें, आसाम खोऱ्यांत आहोम राजांच्या वेळीं सोनें काढीत असत. प्लॅटिनम ही धातू डिहिंग नदीच्या वाळूंत सांपडली होती. कोरंडम व कोओलिन हे पदार्थहि सांपडतात. लखिमपूर येथील कोळशाच्या खाणी व तेलाच्या विहिरी दहाहून अधिक वर्षें सुरू आहेत. नागा टेकड्यांमध्यें बोरजन येथें एक नवीन कोळशाची खाण सुरू करण्यांत आली आहे. यांत्रिक शक्तीनें चालणारे (चहाच्या बागा धरून) तेथें एकंदर ६११ कारखाने आहेत. कारखाने ऑइल एंजिनवर चालतात. आसामामध्यें अद्याप कारखान्याकरितां विजेचा सार्वजनिक पुरवठा नाहीं. पण शिलांग येथें निघालेली हायड्रोइलेक्ट्रिक कंपनी लवकरच विजेची शक्ति व प्रकाश पुरवूं लागेल,

कलाकौशल्य व कारखाने.—चहाच्या मळ्यांशिवाय दुसरे महत्वाचे कारखाने आसामांत फारसे नाहींत. विशिष्ट धंदा करणारे कारागीरहि आसामांत नाहींत. जे कांहीं कारखाने आहेत, त्यांपैकीं चुन्याच्या भट्ट्या, रेशमी व सुती कापड मोहरीचें तेल, होड्गीं, गलबतें, चहाच्या पेट्या, मातीचीं भांडीं वगैरेंचे महत्वाचे आहेत. खुद्द आसामांत, घरोघरीं कापड काढण्याचे हातमाग आहेत. घरीं लागणारें कापड घरच्या बायका काढतात. विणता येणें हा मुलींच्या शिक्षणाचा एक भाग समजला जातो. आसाम खोऱ्यांत, रेशीम काढून त्याचें कापड तयार करितात. पाट, मुगा, व एरी अशा किड्यांच्या तीन जाती आहेत. पहिल्याचें खाद्य तुतीच्या झाडांचीं पानें आहे, दुसऱ्याचें सम किंवा चाप झाडांची पानें व तिसऱ्याचें एरंडांच्या झाडाचीं पानें, आहे. पाट किड्याचें रेशीम पांढरें असून उंची असतें. व एरी किड्याचें टिकाऊ असतें. बारपेटा येथें जरतारी काम व जोरहाट येथें गिलिटाचें काम होतें. सिलहट येथें सिसलचा कारखाना आहे, आणि गोलपारा येथें ज्यूट दाबण्याचे प्रेस आहेत.

व्यापार व धंदे.—आहोम राजांच्या कारकीर्दींत व्यापार फारसा चालत नसे. कारण लोकांनां स्वतःचा देश सोडण्याची व दुसऱ्या देशात जाण्याची बंदी होती. वर्षांतून एक वेळ उंटांचा तांडा सोनें, कस्तुरी, आगर, मिऱ्यें व रेशीम वगैरे जिन्नस बरोबर घेऊन गोहत्तीस जात असे, व तेथून मीठ, सोरा, गंधक वगैरे जिन्नस घेऊन येई.

हल्लीं आसामचा व्यापार बंगाल प्रांताशीं, आणि पूर्व व उत्तर सरहद्दवरील टोळ्यांबरोबर चालतो. कच्चा माल देशांतून बाहेर पाठविला जातो व पक्का माल देशांत आणिला जातो. कापसाचें कापड व सूत, तांदुळ, मीठ, साखर, केरोसीन तेल, द्विदळ धान्यें, तंबाखू व धातूचें सामान हे मुख्य आयात जिन्नस होत. चहा, भात, गळिताचीं धान्यें, दगडी कोळसा, चुना, इमारती लाकूड ताग, लाख कातडीं व रबर हे मुख्य निर्गत जिन्नस होत.

गोळपाडा, बारपेटा, तेझपूर, नौगांम, गोळाघाट, जोरदार, डिब्रूगड, आणि सादिया हीं आसाम खोऱ्यांत, व हबीगंज, अजमीरगंज, सुनामगंज, छाटक, बालागंज, सिलहट व सिलचर हीं सुरमा खोऱ्यांत, व्यापाराचीं ठिकाणें आहेत. १९१९ सालीं आयात ९८६६१६७८ रुपयांची व निर्गत १६०२३०२३० रुपयांची होती.

आसामच्या उत्तरेस हुलाग खोऱ्यांत एक तलाव बांधण्याची योजना तयार करण्यांत आली आहे. दोन हजार फुटांचा धबधबा या योजनामुळें तयार होऊन ९० हजार अश्वशक्ती उत्पन्न होईल. हा प्रदेश दूर आडरानांत असला तरी आसाम—ब्रह्मदेशच्या नव्या आंखलेल्या रस्त्यास नजीक आहे.

व्यापारी दृष्टीनें आसामचें मुख्य पीक चहा हें होय. ह्या झाडाचा प्रथम शोध रॉबर्ट ब्रूस यानें इ. स. १८२१ मध्यें लाविला. इ. स. १८३४ मध्यें लॉर्ड विल्यम बेंटिक या गव्हर्नर जनरलनें या झाडासंबंधीं विशेष माहिती मिळवून त्याची लागवड जास्त करण्याकरितां एक कमिटी नेमिली; व चीनमधून चहाचें बी व चहाच्या लागवडीची माहिती असलेले हुषार लोक आणविले. इ. स. १८३५ मध्यें सरकारनें प्रयोगादाखल एक चहाचा मळा लखिमपूर येथें तयार केला; व १८३८ मध्यें चहाच्या १२ पेट्या इंग्लंडांत पाठविल्या. हा प्रयोग यशस्वी झाल्यावर सरकारनें आपला कारखाना "आसाम टी कंपनी"च्या स्वाधीन केला. पुढें इ. स. १८५४ त दरंग व कामरूप येथें चहाचे मळे सुरू झाले. काचरमध्येंहि चहाचीं झाडें आढळून आलीं. इंग्लंडमधील लोकांनीं आपलें भांडवल या धंद्यांत घातलें व हा व्यापार हळू हळू वाढत चालला.

इ. स. १९१८ त आसाममध्यें चहाचे ८१४ मळे होते. व ४०५९५१ एकर जमीनींत चहाची लागवड केली होती. व तीवर १०८४९५७ माणसें कामावर होतीं. चहाचें उत्पन्न दर एकरीं सुमारें ५॥ मण होतें व खर्च अदमासें ४५० रु. येतो.

आसामांतील लोकांनां मजुरी करण्याची आवश्यकता नसल्यामुळें तेथें मजुरांचा फार तुटवडा आहे. प्रवासाच्या दगदगीमुळें, व तेथील हवा सर्द असल्यामुळें बाहेरून मजूर पुरेसे येऊं शकत नाहींत. मजुरांचे व मळेवाल्यांचे संबंध ठरविण्यायकरितां कायदे केलेले आहेत. त्यांच्या योगानें ठरलेली मुदत संपेपर्यंत मजुरांनां काम सोडतां येत नाहीं. यामुळें मजुरांवर जुलूमहि होतो.

चहाचे मळे विशेषतः शिवसागर, सिलहट, लखिमपूर व काचर या जिल्ह्यांत आहेत. लागवडीची पद्धत थोडक्यांत अशी आहे;—नीट तयार केलेल्या जागेंत बीं पेरून रोंपं सुमारें १ फूटभर झाल्यावर, तीं तेथून काढून चार किंवा पांच फूट अंतरानें लावितात. झाडें थोडीं मोठीं झाल्यावर त्यांचे शेंडे खुडतात; त्या योगानें नवीन फूट येऊन फांद्या वाढतात. रानटी झाड ५० फुटापर्यंत वाढूं शकतें; पण अशा रीतीनें वरचेवर शेंडे छाटीत गेलें असतां ४ किंवा ५ फुटांपेक्षां झाड उंच वाढत नाहीं. झाड तीन वर्षांचें झाल्यानंतर प्रत्येक कोंवळया कोंबाची ( शेंड्याची) तीन चार पानें व कळी हीं तोडून घेतात; अशा रीतीनें प्रत्येक मोसमांत अशी तोड दहा बारा वेळां होते. नंतर तीं पानें चहागृहांत नेऊन सुकण्याकरितां पसरून ठेवतात, मग चांगली वाळण्याकरितां, त्यांतील इतर द्रव पदार्थ काढून टाकण्याकरितां, व त्यांनां एक प्रकारचें वळण देण्याकरितां फिरत्या यंत्रामध्यें घालितात. त्यांतून काढिल्यावर तीं थंड जागेंत ठेवितात. मग पुन्हां एकदां यांत्रिक सहाय्यानें त्यांनां चांगली आंच देऊन, गरम असतांच पेटयांतून भरतात.

द ळ ण व ळ णा चीं सा ध नें.—शेतकी व चहाची लागवड यांखेरीज इतर धंद्यांची येथें आबाळ होण्याचें कारण म्हणजे भांडवल व दळणवळणाचीं साधनें यांचा अभाव हें होय. गारो टेंकड्यावरील उत्तम कोळसा आगगाडीपर्यंत पाठविणें कठिण असतें. उत्तर आसामांतील कोळशांचे प्रदेश फारच उतरणीचे आहेत. सावनाह गवत व बांबू कागदाच्या उपयोगी पडण्यासारखे आहेत, परंतु दळणवळण व धाडस यांची वाण आहे, तथापि एक कागदाची कंपनी अलीकडे निघाली आहे.

रेल्वेः—आसाम बंगाल रेल्वे ही आसामांतील मुख्य रेल्वे होय. तिचा एक फांटा चितागांगपासून सिलचरपर्यंत जातो व दुसरा आसाम खोऱ्याच्या दक्षिणेस गोहत्तीपासून तिनसुकिया ह्या डिब्रू सादिया रेल्वेच्या स्टेशनपर्यंत जातो. हे दोन्ही फांटे उत्तर काचर टेंकड्यामधून जाणाऱ्या फाट्यानें जोडले गेले आहेत. ह्या रेल्वेचें काम १८९१ त सुरू होऊन इ. स. १९०३ त संपलें. ह्या रेल्वेच्या रुळांमधील अंतर ३ फूट ३ इंच आहे व एकंदर ह्या प्रांतांतील रेल्वेची लांबी ५७१ मैल आहे.

डिब्रूगड बंदरापासून मार्घेरिटापर्यंत जाणारा, केवळ ७८ मैल लांबीचा लहानसा आगगाडीचा फांटा, व्यापाराच्या दृष्टीनें बराच महत्त्वाचा आहे. चहाच्या मळ्याच्या सोईसाठीं शिवसागर जिल्ह्यांत काकिळा मुखापासून मरियानी व तितावारपर्यंत एक फांटा गेलेला आहे. ईस्टर्न बंगाल स्टेट रेल्वेचा १५ मैल फांटा आसाममध्यें आहे. हा धुब्रीपर्यंत गेला आहे. या गांवाजवळ गलाकलंजपासून गोहत्तीपर्यंत फांटा करण्याचें काम चालू आहे. यामुळें ब्रह्मपुत्राखोऱ्याचें पूर्व टोंक व ज्या ठिकाणाहून मजूर लोक आणतात असा हिंदुस्थानचा दाट वस्तीचा भाग यामध्यें दळणवळण सोपें होईल.

इ. स. १९०३ पर्यंत या प्रांतांत रेल्वेची एकंदर लांबी ७१५ होती पैकीं ६१७ मैल सरकारच्या मालकीची आहे.

रस्ते व सडकाः—दळणवळणाकरितां नद्या पुष्कळ असल्यामुळें हिंदुस्थानांतील इतर भागांप्रमाणें येथें सडकांची जरूरी तितकी भासत नाहीं. त्यामुळें ब्रह्मपुत्रा खोऱ्यांत १८६५ पर्यंत मोठी सडक नव्हती. ब्रह्मपुत्रा खोऱ्यांत ही सडक, नदीच्या दक्षिण तीराला असून ती पूर्वेस सादियापासून धुब्रीपर्यंत जाते. तेथून गोळपाडा व उत्तर बंगालच्या रस्त्यांकडे जाण्याकरितां लहान आगबोट आहे. गोहत्तीपासून शिलाँगपर्यंत पक्की सडक आहे. तेथून चेरापुंजी, तेहरीघाट, कपाणिगंज या गांवावरून काचरला रस्ता जातो. काचरपासुन मणिपूरपर्यंत घोडे पायवाट आहे; तेथून कोहिमा दिमापूर, आणि गोलाघाटावरून ब्रह्मपुत्रा नदीपर्यंत जाणारा गाडीरस्ता आहे. दुसरी मोठी सडक ब्रह्मपुत्रानदीच्या उत्तर तीरावरून जाते. पण तिकडे दळणवळण फारसें नाहीं. सुरमा खोऱ्यांत दोन सडका आहेत. सिलहटहून फ्रेंचगंज व कुलौरा स्टेशनपर्यंत जाणारी एक, व दुसरी सिसरहून हैलाकंडी खोऱ्याकडे जाणारी.

नद्याः—आसाम खोऱ्यांतील बहुतेक व्यापार ब्रह्मपुत्रा नदींतून होतो. सुरमा खोऱ्यांत प्रवाहांचें एक जाळेंच पसरलें आहे. दोन्ही खोऱ्यांत व्यापारी कंपन्यांनीं पुष्कळ आगबोटी चालू केल्या आहेत. या बोटींतून माणसांची व मालाची ने आण होते. थंडीच्या दिवसांत धुक्यामुळें कधीं कधीं बोटींनां अडथळा होतो. कांहीं ठिकाणीं लांकडाचीं लहान होडगींहि चालतात.

इ. स. १९०६ पूर्वी येथें सरकारी व लोकलबोर्डांनीं चालविलेली अशा दोन प्रकारच्या पोस्ट कचेऱ्या चालू होत्या.

पण आतां सर्व पोस्ट कचेऱ्या सरकारनें आपल्या ताब्यांत घेतल्या आहेत.

रा ज्य का र भा र.—हा प्रांत गव्हर्नरच्या ताब्यांत आहे. पूर्वी यावर चीफ कमिशनर असे. यांत एकंदर १२ जिल्हे आहेत. प्रत्येक जिल्ह्यावर एक डेप्युटी कमिशनर असतो. त्याच्याकडे सारा वसूल करणें, न्याय देणें, शांतता राखणें वगैरें सर्व कामें असतात. आसाम खोऱ्यांतील सहा जिल्ह्यांचा एक भाग करून त्यांवर कमिशनर नेमिला असतो. व बाकीचा भाग खुद्द गव्हरनरच्या हाताखालीं आहे. एकंदर जिल्ह्याचे २७ लहान भाग केले आहेत. या लहान भागावर बहुतकरून यूरोपियन मॅजिस्ट्रेट नेमिलेले असतात व ते डे. कमिशनरच्या हाताखालीं कामें करितात. मौजा हा आसामांतील सर्वांत लहान विभाग होय. मौझेदार हा सारा वसूल करणारा अधिकारी होय. मध्यंतरी या मौजाबद्दल तहशिली करून त्यांवर तसशिलदार नेमिले होते. पण लोकांनां मौजदारी पद्धत आवडत असल्याकारणानें पुन्हां तीच पद्धत सुरू करण्याचें सरकारनें ठरविलें. लहान गांवांत पूर्वी पंचायती पद्धत चालू होती. डोंगराळ गांवांत पाटील हा मुख्य असतो. त्याला लहान लहान फौजदारी व दिवाणी दाव्यांचा निकाल लावण्याचा अधिकार असतो.

गव्हर्नरच्या हाताखालीं पोलीस, तुरुंग, रेजिस्ट्रेशन, अबकारी, 'पब्लिक वर्क्स', (सडका, इमारती वगैरे लोकोपयोगी काम करणारें खातें) शिक्षण, जंगल व वैद्यक वगैरे खातीं आहेत. पोस्ट खातें व तार खातें हीं मात्र गव्हर्नरच्या हाताखालीं नाहींत.

का य दे का नू व न्या य खा तें.—हिंदुस्थान सरकारच्या कायदे करणाऱ्या मंडळीनें पास केलेले कायदे आसामांत चालतात. हिंदुस्थानांतील इतर प्रांतांत पास झालेला कायदाहि हिंदुस्थान सरकारच्या परवानगीनें येथें सुरू करितां येतो. १९१९ च्या इंडियन अॅक्टान्वयें आसामाला कायदेमंडळ मिळालें आहे. त्यांत ५३ सभासद बसतात.

न्याय व अंमलबजावणी खातें यांची फारकत केलेली नाहीं. मॅजिस्ट्रेट, डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट किंवा डेप्युटी कमिशनर यांच्याकडेच न्याय देण्याचें काम आहे. प्रत्येक खोऱ्यांत एक सेशन्स जज्ज आहे. त्याच्या निकालावर कलकत्ता हायकोर्टाकडे अपील करितां येतें. शे. ८४ दिवाणी मुकदमे, रु. १०० पेक्षां कमी रकमेचे असतात, व बहुतेक लोक आपलें देणें कबूल करून फिर्यादी आपसांत मिटवितात.

क रां चें उ त्प न्न.—आहोम राजाच्या वेळीं सोळा वर्षांवरील प्रत्येक पुरुषाकडून सक्तीनें मजुरी घेण्यांत येत असे. अशा मजुरांस "पाइक" म्हणत. तीन किंवा चार पाइकांच्या टोळीला "गोट" म्हणत. प्रत्येक गोटांतील एक मनुष्य सरकारी कामावर असे व उरलेले लोक त्याच्या उदरनिर्वाहाची तरतूद करीत. शंभर गोटांवर "शैक्य" नांवाचा अधिकारी असे व दहा शैक्यांवरील मुख्यास "हजारी" असें म्हणत. अशा रीतीनें मजूर लोकांचा पुरवठा झाल्यामुळें, त्या राजांनां मोठमोठीं सार्वजनिक कामें करितां आलीं; तीं कामें अद्यापहि दिसून येतात. राजाला लागणारे जिन्नस शेतकरी, कोष्टी, तेली, कोळी व दुसरे कारागीर यांजकडून मिळत असत. त्याचप्रमाणें राजांच्या कामगारांनांहि लागणाऱ्या वस्तू लोकांकडून मोफत मिळत असत. वयांत आलेल्या सर्व पुरुषांस जरूर पडेल त्यावेळीं लष्करांत सामील व्हावें लागत असे. या सर्व कारणामुळें त्यावेळीं रयतेवर निराळे कर लादण्याची जरूर नव्हती. इ. स. १८७१ त ज्यावेळीं आसाम हा बंगालचा एक भाग होता, त्यावेळीं कर घेण्याची पद्धत प्रथम सुरू झाली. वाढता खर्च भागविण्याकरितां १८७८ मध्यें, ह्या पद्धतींत सुधारणा केल्या. उत्पन्नाच्या मुख्य बाबी म्हटल्या म्हणजे, अबकारी खातें, जमीन महसूल, रजिष्टर खातें, न्यायखातें, शिक्षण खातें व तिकिट विक्री ह्या होत. इ. स. १८८२ च्या करारांत अबकारी खातें, रजिस्टर खातें, व तिकिट विक्री यांतील उत्पन्न व खर्च हिंदुस्थान सरकार व प्रांतिक सरकार यांच्यामध्यें वाटलें गेलें. त्यावेळीं प्रांताचें एकंदर वार्षिक उत्पन्न ४४७७००० रु. व खर्च ४३६८००० रु. होता. पण तो करार बदलून इ. स. १८८७, १८९२, व १८९७ या सालीं निरनिराळे करार होत गेले. त्यांत या प्रांतांच्या वाट्यास पुरेसा पैसा येईनासा झाला. शिवाय इ. स. १८९७ च्या धरणीकंपामुळें, ४० किंवा ५० लक्षांचें नुकसान झालें. म्हणून १९०४ सालीं पुन्हां नवा करार झाला व त्या अन्वयें जमिनीचा सारा, तिकिट विक्री, अबकारी खातें, जंगलखातें, व रजिस्टर खातें यांचें अर्धे उत्पन्न आसाम प्रांतास मिळतें; व अर्धा खर्च आसामला करावा लागतो. इतर खात्यांचाहि खर्च त्यालाच करावा लागतो. हिंदुस्थान सरकारकडून दरसाल १२ लाख रुपयांची देणगी आसामास मिळते.

जमीन महसूल वगैरेः—प्रांताच्या निरनिराळ्या भागांत जमीन वहिवाटीच्या भिन्न पद्धती चालू आहेत. खुद्द आसामांत पुष्कळ जमीन पडीत आहे. शेतकरी सरकारकडून एक किंवा दहा वर्षांच्या करारानें जमीन घेतात. योग्य वेळीं सरकारी कामगारास सूचना देऊन जमीन केव्हांहि सोडितां येते. शेताची पाहणी करण्याकरितां कानुंगो नांवाचे अधिकारी नेमिलेले आहेत; व त्यांच्यावर सब-डेप्युटी कॅलेक्टर असतात.

आहोम राजांच्या वेळीं पाइक लोकांनां २ ½ एकर जमीन मोफत असे. त्यापेक्षां जास्त जमीन असल्यास, दर एकरास १३ आणे प्रमाणें कर द्यावा लागत असे; त्याचप्रमाणें १ रु. डोईपट्टी द्यावी लागे. चौधरी लोक कर देण्याचे मक्ते घेत व प्रत्येक नांगरापाठीमागें दोन रु. वसूल

करीत. पण त्यांच्यावर कोणाचा दाब नसल्यामुळें ते रु. ७ पर्यंतहि वसूल करण्यास कमी करीत नसत.

ब्रिटिश राज्य सुरू झाल्यावर बिगारीची पद्धत बंद झाली. पण डोईपट्टी ३ रु. झाली; जमिनींच्या चांगले वाईटपणाप्रमाणें तिचे तीन प्रकार ठरवून त्याप्रमाणें कर आकारण्यांत आले. आहोम राजांच्या वेळीं लोकांनां मिळालेल्या पुष्कळ जमिनींस अर्धे किंवा पूर्ण कर माफ आहेत.

चहाच्या मळ्यांच्या योगानें आसामची पुष्कळ वाढ झाली आहे. जमिनीची लागवड वाढण्याकरितां ¼ जमिनीचे कर कायमचे माफ करण्यांत आले होते. उरलेल्या जमिनीवर जमिनीच्या मानानें पांच ते वीस वर्षेपर्यंत कर माफ असत; ते पुढें हळूहळू वाढविण्यांत आले, हल्लीं जमीन देण्याचे नियम येणेप्रमाणें आहेत. प्रथम दर एकरीं एक रुपयाप्रमाणें जमीन ३० वर्षांच्या करारानें देतात. पहिलीं दोन वर्षे कर माफ असतो. मग कर हळूहळू वाढत अकराव्या वर्षी एकरी आठ आणे व एकविसाव्या वर्षी १ रुपया होतो. डोंगराळ भागांत, कर जमिनीवर वसूल न करितां प्रत्येक घरापाठीमागें, २ किंवा ३ रुपयेप्रमाणें आकारितात.

गांवांतील एखाद्या वजनदार गृहस्थाला कर वसूल करण्याचा मक्ता देण्याची पूर्वी वहिवाट असे. हल्लीं सरकारनें या कामाकरितां पगारी कामगार नेमिले आहेत. परंतु ही पद्धत समाधानकारक नसल्यामुळें, पुन्हां मूळची पद्धत सुरू करण्याचें सरकारनें ठरविलें आहे.

किरकोळ उत्पन्नः—इ. स. १९१८–१९ मध्यें, अफूवरील रुपये३३९१५२२, दारुवरील रुपये१६८०७९७,व गांजापासून ७॥ लक्ष रुपये, उत्पन्न झालें सरकारी नोकर व चहाच्या मळ्याचे व्यवस्थापक यांच्याशिवाय प्राप्तीवरील कर देणारे लोक फारसे नाहींत.

लोकलबोर्डें व म्युनिसिपालिट्याः—इसवी सन १९१९ त एकंदर १९ लोकलबोर्डें होतीं; व त्यांत ७७ सरकारी नोकर, ४५ सरकारनें नेमलेले, व २०८ लोकांनीं निवडलेले होते. एका बोर्डाचा अध्यक्ष लोकांनीं निवडलेला बिनसरकारी इसम होता. रस्ते, डांकबंगले, दवाखाने, खेड्यांतील आरोग्य वगैरेंची व्यवस्था पाहण्याचें काम लोकलबोर्डाकडे असतें. प्राथमिक शिक्षणहि त्यांच्याच हातांत आहे; शिक्षणखात्याची त्यावर देखरेख मात्र असते.

कर, बोटींचे उत्पन्न, वगैरें पासून एकंदर उत्पन्न २२२३७९४ होतें, व खर्च २१३२३९९ झाला होता. पांचशें रुपयांपेक्षां ज्यास्त खर्चाच्या सर्व कामांनां पब्लिक वर्क्स खात्याची संमति घ्यावी लागते. त्यांनीं केलेलीं मोठीं कामें, दिसाई नदीवरील मूळ गौरीपूर शहरची सडक, सिलहट—मुक्तापूर घांट हा रस्ता, व सुनामगंजपाला रस्ता, हीं होत.

आसामांत १९१९ सालीं १५ म्युनिसिपालिटया व आठ पंचायती होत्या, त्यांपैकीं तिघांनां स्वतःच अध्यक्ष निवडण्याचा हक्क मिळाला होता. प्रत्येकीची लोकसंख्या सरासरी सहा सात हजार आहे. मुख्य ठिकाणीं डेपुटी कमिशनर किंवा सब डिव्हिजनल ऑफिसर हा तिचा अध्यक्ष असतो. उपाध्यक्ष हा बहुतकरून बिनसरकारी सभासद असतो. करापासून दर माणशीं सरासरी २–१२–११ रु. उत्पन्न येतें मोठ्या गावांनां सरकारी मदत मिळते. त्यामुळें, तेथें माणशीं उत्पन्न दुप्पट पडते.

पब्लिक वर्क्स खातेंः—यावर एक मुख्य इंजिनीअर असून त्याच्या हाताखालीं दुसरे बारा कामगार आहेत. सरकारी इमारती व दुसरी मोठीं सार्वजनिक कामें या खात्याकडून केलीं जातात. या खात्यानें कृष्णाई, सिंग्रा व डिग्रु या नद्यांवर पूल बांधले आहेत व निरनिराळे रस्ते तयार केले आहेत.

लष्करः—डिब्रू गंज,कोहीमा, मणिपूर, सादिया व शिलाँग हीं लष्करी ठाणीं आहेत. १९०३ मध्यें आसामांत एकंदर सैन्य २२२७ होतें; पैकीं ५८ ब्रिटिश होते. सिलचर, डिब्रूगाड, लुमडिंग व शिलाँग येथें स्वयंसेवकांचीं पथकें आहेत.

पोलीस व तुरुंगः— लष्करीपोलीस, गांवपोलीस व चौकीदार असे पोलीस शिपायांचे प्रकार आहेत. सन १९१९ मध्यें लष्करी पोलिसांची संख्या ३६३३ होती. मोठे ७ व लहान १७ असे एकंदर २४ तुरुंग आहेत. सिलहट, तेजपूर, गोहत्ती व डिब्रुगड येथील तुरुंग मोठे आहेत. आमांश, अतिसार, ताप व कधीं कधीं पटकी यांच्या योगानें तुरुंगांतील मृत्युसंख्या बरीच वाढते. वेताचें काम, कापड विणणें तांदुळ सडणें, मोहरीचें तेल काढणें व बागेचें काम करणें, हीं कामें कैद्याकडून करून घेतात.

शिक्षणः—देशी राजांच्या अमदानींत शिक्षण फार मागासलेलें होते. इ. स. १८३८ त नौगांग जिल्ह्यांत फक्त ३० च शिकलेले इसम होते असें म्हणतात इ. १८५६ पर्यंत सिलहट व गोहत्ती येथें इंग्रजी शाळा, व जिल्ह्याच्या ठिकाणीं प्राथमिक शिक्षणाच्या सरकारी शाळा सुरू झाल्या होत्या. सर जार्ज कॅंबेल साहेबाच्या योजनेप्रमाणें स्थानिक संस्थानां मदत मिळूं लागल्यापासून शाळांची संख्या वाढूं लागली. इ. स. १९१९ मध्यें ४९५० शिक्षणसंस्था होत्या व त्यांत २२४७१५ विद्यार्थी शिकत होते. दोन दुय्यम प्रतीचीं कॉलेजें आहेत; एक राजा गिरीशचंद्र राय यांनीं सिलहट येथें स्थापिलेलें, व गोहत्ती येथील सरकारी कॉटन कॉलेज; हीं कॉलेजें, कलकत्ता विश्वविद्यालयास जोडलेलीं आहेत. एक कायदा शिकविणारें कॉलेज आहे. दुय्यम शिक्षण देण्याकरितां २७८ शाळा होत्या. शिक्षण इंग्रजीतून दिलें जातें. शाळेंत जाण्यायोग्य मुलांपैकीं शेंकडा तीन दुय्यम शिक्षण घेत होतीं. प्राथमिक

शाळा ३९२४ होत्या. प्राथमिक शिक्षणाचे दोन प्रकार आहेत. वरिष्ठ व कनिष्ठ. वरच्या वर्गात शेंकडा पांच पेक्षांहि कमी विद्यार्थी आहेत. या प्रकारच्या शाळा हळू हळू कमी होत आहेत. खालच्या वर्गात, लिहिणें, वाचणें, शुद्ध-लेखन, अंकगणित व आसामचें भूवर्णन शिकवितात. या शाळा लोकलबोर्डें किंवा म्युनिसिपालिट्या यांच्या ताब्यांत असतात. शिक्षक तयार करण्याच्या ११संस्था होत्या. डाक्का येथें एक इंजिनियरिंग शाळा आहे.

स्त्रीशिक्षण वाढत असून मुलींच्या शाळा दीडशें आहेत. शाळेंत जाण्यायोग्य मुलींच्या संख्येशीं शिकणाऱ्या मुलींच्या संख्येचें प्रमाण एक हजारास पंधरा असें आहे. मुसुलमान लोक शिक्षणाच्या बाबतींत फार मागसलेले आहेत. दर हजारीं सरासरी ३० मनुष्यांस लिहितां वाचतां येतें. असें इ. स. १९११ च्या खानेसुमारींत दिसून आलें. अरबी व फारसी भाषा शिकविणाऱ्या ४ खाजगी शाळा आहेत. कुराण-शिक्षणाच्या शाळा १०५ आहेत. इ. स. १९१९ त आसामांत एक इंग्रजी, एक आंग्ल-देशी व ९ देशी वर्तमानपत्रें व ६ नियतकालिकें होतीं. फक्त ३२ पुस्तकें प्रसिद्ध झालीं; त्यांतील बारा शैक्षणिक होतीं.

जेरी-व्हाईट-मेडिकल स्कूल या वैद्यशालेशिवाय विशेष मोठी अशी वैद्यकीय संस्था आसामांत नाहीं. दवाखान्यांची संख्या १३५ आहे. डिब्रुगड, ढुब्री, तेजपूर आणि नौगांग येथील दवाखाने सर्वांत मोठे आहेत. इ. स. १८९६ पासून पोस्टांत कोयनेल विकण्यास ठेविलें जातें.

आसामच्या सपाट प्रदेशाच्या दोन विभागांत लोकसंख्या ७० लक्ष असून त्यांत ३६ हायस्कुलें व ३३८६ प्राथमिक शाळा आहेत,व जवळच्या बंगाल प्रांताच्या स्थितीपेक्षां ही स्थिति बरीच मागसलेली आहे.

आगस्ट १९२१ मध्यें नुराइचंद कॉलेज स्थापण्यांत आलें. व आसामसाठीं स्वतंत्र युनिव्हर्सिटी असावी अशा सूचना आल्या. जून१९२३मध्यें गव्हर्नर व शिक्षणमंत्री यांनीं प्राथमिक शिक्षणाविषयीं ठराव करून घेतला. साक्षरतेचें प्रमाण शेंकडा ६. २ इतकें आहे. सक्तीच्या शिक्षणासाठीं कायदे कसे असावेत याबद्दल चर्चा झाली. आसाममध्यें प्राथमिक शिक्षणाचा खर्च मुंबईच्या निम्म म्हणजे दर विद्यार्थ्यास नऊ रुपये इतका येतो. याप्रमाणें दरसाल एकूण तेरा लाख रुपये येवढा खर्चाचा अंदाज आहे.

गु न्हे.—पोलिसखात्याच्या रिपोर्टाप्रमाणें १९२१ हें वर्ष धामधुमीचें गेलें. त्याचीं मुख्य कारणें, (१) चहाच्या मळ्यांतील खळबळ, (२) आसाम बंगाल रेल्वेवरील लांबलेला संप, व (३) असहकारितेच्या चळवळीचा परिणाम हीं होत.

बं गा ल शीं जो ड णी.—आसाममध्यें सुधारणा कायद्यान्वयें तयार करण्यांत आलेला वरिष्ठ अधिकारी वर्ग कमी करून काटकसर होण्यासाठीं आसाम बंगालशीं जोडण्यांत यावा असा खलिता आसामच्या पुढाऱ्यांनीं १९२२ च्या डिसेंबरांत इंचकेप कमिटीकडे पाठविला. यामुळें एकंदर२३॥ लक्षांची बचत होण्यासारखी असून डोंगराळ मुलूख वेगळाच ठेवून नुसता आसामचा सपाट प्रदेश बंगालशीं जोडल्यास बंगालसरकारच्या उत्पन्नांत ४५॥ लक्षांची भर पडते व डोंगराळ मुलूख वेगळा करण्यामुळें २२ लक्षांची बचत होते, व या रीतीनें आसाम युनिव्हर्सिटी स्थापन करण्यास लागणाऱ्या भांडवलाचा प्रश्नहि आपोआप सुटेल, असें दाखविण्यांत आलें आहे.

आ सा म म धी ल नि र नि रा ळ्या वै ष्ण व ध र्म पं था चे सं स्था प क—.ज्याच्या भक्तिमार्गानें आसामांतील प्राचीन तांत्रिक-शाक्तपंथ बहुतेक नाहींसा केला व वन्य लोकांना सोप्या व आवडत्या धर्माची माहिती करून दिली, त्या यशस्वी धर्मपंथाचा थोडा इतिहास ध्यानांत घेतला पाहिजे.

शंकरदेव.—बाराव्या शतकाच्या आरंभीं किंवा त्या सुमारास आसामच्या एका भागावर गौरेश्वर राज्य करीत होता. त्याची कारकीर्द प्रजेला फार सुखावह गेली, याचें कारण त्याचा मंत्री महेंद्र याची मोठी धोरणी दृष्टि व बुद्धि-प्रभाव हें होय. पण त्यामुळें महेंद्राला राजदरबारीं शत्रु उत्पन्न होऊन त्याचा नाश करण्याचें त्यांनीं मनांत आणिलें. महेंद्राच्या मुलाचें राजाच्या अंतःपुरांत जाणें येणें असे. या गोष्टीचा अर्थ वाईट करून त्यांनीं ही गोष्ट राजाच्या कानावर घातली, व राजानें महेंद्राच्या मुलाला मारून व त्याचें मांस शिजवून महेंद्राला नकळत जेऊं घातलें. महेंद्राला आपल्या विरुद्ध राजासुद्धां सर्व लोक आहेत असें आढळून आल्यावर तो तें राज्य सोडून कैवजपूरच्या धर्मेश्वर राजाकडे गेला. बंगालच्या पाल घराण्याच्या ऱ्हासानंतर धर्मेश्वरानें राज्य स्थापिलें होतें. महेंद्राच्या बाबतींत धर्मेश्वर व गौरेश्वर याच्यांत लढाया सुरू झाल्या. शेवटीं तह होऊन गौरेश्वर महेंद्राला मागत असतांहि धर्मेश्वरानें त्याला पाठीशीं घालून त्याऐवजीं सात ब्राह्मण व सात कायस्थ आसामच्या राजाकडे पाठवून दिले. हिंदूमधील श्रेष्ठ वर्णाचे लोक जे आसामांत शिरले ते हेच होत. शंकराचा पूर्वज चंडिवर व माधवाचा पूर्वज ब्रह्मगिरी हे दोघे कायस्थ गौरेश्वराकडे पाठविलेल्या लोकांमध्यें होते. गौरेश्वरानें या लोकांना जमिनी वगैरे देऊन त्यांची चांगली बडदास्त ठेविली होती, तरी चंडिवर व ब्रह्मगिरि यांना आसामांत राहणें न आवडून ते आपल्या मायदेशाला चोरुन परत आले. धर्मेश्वरानें चंडिवराला बंदिवान करून पुन्हां परत गौरेश्वराकडे पाठविलें. व तेथें तो आपल्या पांडित्याच्या जोरावर सुटका करून घेईपर्यंत कैदेंत राहिला. राजानें त्याला बारा घरावरचा भूयन केलें. शिवाय त्याला नौगांगमधील बोरद्वार जवळील आलिपुखरी हें प्राचीन स्थान जहागीर दिलें. चंडिवराला राज्यधर व सूर्यवर असे दोन पुत्र होते. सूर्यवराचा

पुत्र कुसुमगिरि व त्याचा महापुरुषीय पंथाचा संस्थापक शंकरदेव होय.

शंकरदेव हल्लींच्या बोरद्वारच्या लगत असलेल्या आलिपुखरी गांवीं इ. स. १४४९ त जन्मला. तो भूयन वंशांतला कायस्थ होता. महेंद्रकुंडलि त्याचा गुरु. बालपणींच त्याची धर्मावर प्रीति दिसून आली. तो रहात होता तेथील लोक शैव व शाक्त अशा दोन पंथाचे होते. पूर्वीपासूनच शंकराला मूर्तिपूजेचा तिटकारा असून वेद व वेदांत शिकण्याकडे व धर्माचें शुद्ध स्वरूप शोधून काढण्याकडे त्याचें लक्ष वेधलें. कांहीं दिवस तो अस्वस्थ मनस्थितींत असतां जगन्नाथमिश्र याच्याकडून त्याला भागवताची पोथी मिळाली. तेव्हां त्यानें लगेच देशी भाषेंत भाषांतर करण्याला सुरवात केली. हें भाषांतर म्हणजेच त्याचीं शास्त्रें असून त्याच्या आधारावर एकेश्वरी पंथाचा उपदेश करण्याला त्यानें सुरवात केली.

बंगालमधून यात्रा करून आल्यावर त्यानें अलिकतिआई इच्याशीं लग्न केलें. एक मुलगी झाल्यावर ही वारली, तेव्हां त्यानें पुन्हां लग्न करून बोरद्वार येथें आपलें बिऱ्हाड नेलें. त्याच्या दुसऱ्या बायकोचें नांव कालिंदी असें होतें. बोरद्वार येथें तो बारा वर्षें राहिला. या वेळीं चैतन्य हा बंगालमध्यें वैष्णव संप्रदायाचा प्रसार करीत होता. त्याला भेटण्यासाठीं पुढें दोन निरनिराळ्या पंथांचे संस्थापक झालेले हरिदेव व दामोदरदेव यांच्यां बरोबर तो चैतन्याला जाऊन भेटला. त्यानंतर ते तिघेहि उत्तरआसामला परत आले. येथून पुढें शंकरानें उघड उघड भागवतांतील वैष्णव पंथाचा प्रचार करण्याला आरंभ केला.

त्यावेळीं आहोम घराण्याचा चुहमंग राजा राज्य करीत होता. मूर्तिपूजेविरुद्ध शंकरानें चालविलेली मोहीम पाहून ब्राह्मणांमध्यें त्याच्याशीं शत्रुत्व उत्पन्न झालें. प्रजेंत खळबळ उडवून सोडण्याच्या आरोपावरून त्याला पकडण्यांत आलें, पण त्याच्यावर आरोप शाबीत होईना. या सुमारास काचरी मल्ल यांच्या आसामावर एकसारख्या स्वाऱ्या चालल्या होत्या. तेव्हां शंकर आणखी उत्तरेकडे रहावयास गेला पण तेथें आहोम राजाकडून त्याचा छळ होऊं लागला, तेव्हां बारपेटला तो जाऊन राहिला. तेथून तो पटबौसीच्या आसमंतात असलेल्या कुमारकाची गांवीं गेला. पण तेथें चाराल जातीच्या लोकापासून धार्मिक बाबतींत उपसर्ग होऊं लागल्यामुळें तो पटबौसी येथें गेला.

बार्पेट येथें भागवत धर्माचा तो उपदेश करूं लागला. त्याचा अनुयायी माधव यानें त्याला धर्मप्रचारांत फार मदत केली व त्या ठिकाणीं कसल्याहि प्रकारचा अडथळा न आल्यामुळें बरेच लोक त्याच्याकडे वळले. लवकरच त्याची कीर्ति पसरून कुचबिहारच्या राजानें त्याला पाचारण केलें. तो वारंवार कुचबिहारला जात येत असे. इ. स. १५६८ मध्यें ककटकट नांवाच्या कुचबिहारमधील एका गांवीं त्याला मरण आलें. त्यानें आपल्या मागें आपल्या धर्मपीठावर माधवाला नेमिलें होतें. शंकराला रामानंद, हरिचरण व कमललोचन असे तीन पुत्र होते. त्याच्या मृत्यूनंतर त्याचे भक्त शंकराला विष्णूचा अवतार मानूं लागले. शंकर नवधर्मसंस्थापक नसून त्याला भागवत धर्माचा एक आसामांतील प्रसारक म्हणतां येईल.

महापुरुषीय लोक.—हे शंकर आणि माधव यांनां कृष्णाचे अवतार मानितात. यांच्या मतें केवळ सत्कृत्यांनींच मुक्ति मिळते. सत्कृत्यांच्या अभावीं ईश्वरनाम संकीर्तनानें ती मिळूं शकते. उपासनेंतील मुख्य गोष्टी म्हणजे संकीर्तन आणि गुरूकडून घेतलेला मंत्र जपणें या होत. जातिद्वेष हा शंकर व माधव यांच्या उपदेशाविरुद्ध असल्यामुळें तो कोणी मनात बाळवगायाचा नाहीं. पण उलट हल्लीं तो महापुरुषीयांत फार बोकाळलेला दिसतो. एक भगतवर्ग जाती मुळींच पाळीत नाहीं. त्यांनां कौलियभगत म्हणतात. हे ब्रह्मचारी, जोगी हातांत पताका घेऊन हिंडतात. महापुरुषीय लोक तेहतीस कोटी देव मानीत नाहींत व त्यांची पूजाहि करीत नाहींत. ते अरण्यपशूंचें मांस खातात प्राण्यांना सुरीनें किंवा तलवारीनें कंठस्नान घालून न मारता, काठीनें कुदलून मारतात. ते देवी टोचून घेण्याच्या विरुद्ध असतात. थोडा विटाळ झाला किंवा विटाळाचा भास झाला तरी ते शुद्ध होण्याकरितां स्नान करितात. कांहीं ओरिया लोकाप्रमाणें हजामत करितात तर कांहीं शेंडी ठेवितात. कपाळाला तिलक व आंगातोंडावर वैष्णवाप्रमाणें गंध फांसतात. प्रत्येक माहिषपुरुषीय शास्त्रागारांत कृष्णमूर्ति असते. ती अज्ञानी लोकानां ईश्वराची कल्पना आणून देण्याकरितां असते असें सुशिक्षित लोक सांगतात. या एका गोष्टीखेरीज मूर्तिपूजेचें दुसरें चिन्ह यांच्यांत आढळत नाहीं कौलीय साधू तर मूर्तीकडे आदरानें पाहातहि नाहींत. मुख्य शास्त्रें म्हणजे शंकराचें कीर्तन आणि दशम व माधवाचे नामघोष आणि रत्नावली हे ग्रंथ होत. कीर्तन आणि नामघोष हे ग्रंथ निरनिराळ्या हिंदु शास्त्रग्रंथावरून रचलेले असून दशम किंवा दशमस्कंध आणि रत्नावली हे भागवतावरून तयार केलेले आहेत. महापुरुषीय दामोदरी यांच्या बरोबर रोटीव्यवहार करीत नाहींत.

माधवदेवः—माधवाचा पूर्वज आसामच्या राजाला ओलीस दिलेल्या सात कायस्थापैकीं एक होता. हा ब्रह्मगिरी ( वर उल्लेखिलेला माधवाचा पूर्वज ) आसामांतून पळून येऊन बंगालमधील बांडुका गांवीं राहिला. माधवाचा बाप गोविंदगिरि याला पहिल्या बायकोपासून दामोदर गोमस्त नांवाचा पुत्र झाला, तो कनैजपूरच्या राजाचा मुजुमदार होता. त्याच्यावर राजाची अवकृपा होऊन पितापुत्रांनां आसामची वाट धरावी लागली. गोविंदगिरी बोरद्वारला येऊन शंकरदेवाला भेटला. तेथें शंकरदेवानें त्याचें सत्यादिआई इच्याशीं लग्न करून दिलें. माधव हा या

लग्नसंबंधापासून झालेला मुलगा होय. ही गोष्ट शंकरदेव बारपेटला जाऊन धर्मप्रचारक म्हणून पुढें येण्याचा पूर्वीची होय. गोविंदगिरीला जुहमंग राजापासून बराच त्रास पोंहोचला. तो अशाच कष्टमय स्थितींत असतां माधवाचा जन्म झाला.

बालपणींच माधवाच्या अंगीं भावी मोठेपणाचीं चिन्हें दिसूं लागलीं. बाविसाव्या वर्षाचा होईपर्यंत तो नौगांग येथें होता. नंतर गोविंदगिरि त्याला घागरा येथें घेऊन गेला व तेथें तो जाऊन राहिला. पुढें तो माधवाचें लग्न करण्यासाठीं आपला वडील मुलगा दामोदर राहत होता त्या बांडुक गांवीं माधवासह गेला. तेथें माधव शास्त्राध्ययन करूं लागला. लवकरच गोविंदगिरि बांडुक येथें वारला, व माधव उत्तर आसामांत आपल्या आईकडे परत गेला. वाटेंत त्याला शंकरदेवाचा एका चमत्कारिक प्रसंगीं उपदेश मिळून तो त्याचा कट्टा भक्त बनला. पुढें माधव आणि शंकर बारपेटला निघाले. शंकर पटबौसी येथें राहिला व माधव त्या गांवच्या वाटेवर असलेल्या गनककुची येथें स्थायिक झाला. या गांवीं राहत असतां शंकरदेवानें शेवटल्या वेळीं कुचबिहारला जाण्यापूर्वी आपला धार्मिक अधिकार माधवाच्या हवाली केला. शंकराच्या मृत्यूनंतर माधव बारपेटच्या उत्तरेस दोन मैल असणाऱ्या सुंदरीय गावीं जाऊन १४ वर्षें राहिला. मरण्यापूर्वी शास्त्रगुद्दी ( गादी )वर मथुरादास आटा याची स्थापना केली. तो बंगाल्यांतील भेल गावीं वारला.

माधव आमरण ब्रह्मचारी होता. तो शंकरापेक्षां जास्त हुशार व वादविवादपटु होता. त्यानें सामान्य जनांना पटण्याकरितां आपल्या संप्रदायांतील आचार जरा शिथिल केले. शंकरदेव स्वतः मांसाशन करीत नसल्यानें आपल्या अनुयायांनीं तें करूं नये, म्हणून त्याची इच्छा असे. पण बारपेटांतील लोकांत चारल, डोम व इतर हलक्या जातींचे लोक असल्यानें त्यांना हा प्रतिबंध आवडत नसे. व त्याच्यावर सक्ती केल्यास ते आपल्यातून फुटून जातील असें पाहून माधवानें आपल्या गुरूला मांसाशनाची बंदी काढून घेण्याचा सल्ला दिला तेव्हां शंकरानें तें मान्य केलें. अशा कारणामुळें माधव हा शंकरापेक्षां जास्त लोकप्रिय झाला. त्याला महापुरुष असें संबोधण्यांत येऊं लागलें. शंकराचें कीर्तन लोक सात दिवस करतात तर माधवाचें दहा दिवस व मथुरादास आटाचें कीर्तन पांच दिवस चालतें. शंकरानें अपुरें टाकलेलें धर्मप्रसाराचें काम माधवानें पुरें केलें. त्यानें बरींच शास्त्रें ( शास्त्रगृहें किंवा पीठें ) स्थापिलीं.

दामोदर.—हा बोरद्वारच्या पूर्वेस असलेल्या नऊगांवमधील नलज गांवीं जन्मला. याच्या पित्याचें नांव सदानंद असें होतें. त्याचे संप्रदायी दामोदरीय जरी कबूल करीत नाहींत तरी दामोदर हा शंकराचा अनुयायी होता हें खास. दामोदर ब्राह्मण असून त्याला कलापी भट्टाचार्यानें शिक्षण दिलें होतें.

उत्तर आसामांत असतानांच दामोदर शंकराचा शिष्य बनला. नंतर शंकर पटबौशीला गेला. तेव्हां हाहि त्याच्या मागोमाग तेथें गेला. पटबौशी येथें दामोदराचें एक " शास्त्र " ( मठ ) आहे. शिवाय तेथें एका पडक्या विटांच्या देवळांत दामोदराचें पाऊल वठलेला दगड दाखवितात. बारपेटकडे जात असतां वाटेंत दामोदर हयग्रीव मूर्तीचें दर्शन घेण्याकरितां थांबला असें सांगतात.

शंकराच्या मृत्यूनंतर त्याच्या अनुयायांत फूट पडली. त्याला कारण असें झालें कीं, माधवानें बारपेटहून दामोदराला शंकराच्या श्राद्धाकरितां येण्याविषयीं पटबौशी येथें बोलावणें पाठविलें. शंकर हा शूद्र असल्यामुळें दामोदराची आई सुशिला हिनें, बारपेटला न जातां श्राद्धाला लागणारी शिधासामुग्री मात्र धाडून द्यावी असें आपल्या मुलाला सांगितलें व दामोदरनेंहि त्याप्रमाणें केलें. तेव्हां माधवाला राग येऊन त्यानें ती शिधासामुग्री परत पाठविली व दामोदराला महापुरुषीय संप्रदायांतून काढून टाकिलें. त्यावेळेपासून माधवाचा एक पंथ व दामोदराचा एक पंथ असे दोन पंथ निघाले.

वास्तविक दामोदर शंकराचा कट्टा अनुयायी नव्हताच. बाहेरून महापुरुषीय पंथाचीं तत्त्वें तो आचरीत असलेला दिसला तरी, मनात पुराणधर्मश्रद्धा दिसून येई. उदाहरणार्थः—कर्मठ हिंदूप्रमाणें तो जपमाळ ओढीत बसे. ब्राह्मण आणि शूद्र याच्यात भेद मानी. त्याच्या संप्रदायनियमावर पौराणिक मताची छाया पडलेली दिसून येई. महापुरुषीयानीं मूर्तीकडे दृष्टी सुद्धा फिरवावयाची नसे तरी दामोदरीय दुर्गापुजेंत भाग घेत.

दामोदर ९२ वर्षांचा होऊन वारला. पटबौशी हें त्याचें आवडतें वस्तिस्थान होतें. तो त्याला निजधाम म्हणे. त्याच्या मागून भट्टदेव हा पटबौशीच्या पीठावर आरूढ झाला. सध्या त्याचे वंशज दामोदरीय पटबौशीशास्त्रा (मठा)चे अधिकारी आहेत.

दामोदराला एक पुतण्या होता पण त्यानें आपल्या चुलत्याच्या अधिकारात वाटणी न मिळवितां पहमुरा ( दक्षिण कामरूप ) येथे स्वतंत्र शास्त्र स्थापन केलें.

विद्वत्ता व धार्मिक चळवळ या बाबतींत दामोदर शंकर आणि माधव याच्याहून कमी दर्जा होता यांत शंका नाहीं. त्याचा पंथ म्हणजे शंकरसंप्रदायावरून कमीअधिक तयार केलेला आहे.

दामोदरीय लोक कृष्णमूर्तीला भजतात, व दामोदराला कृष्णावतार मानतात. शूद्रांचें धार्मिक वर्चस्व त्यांना कबूल नसल्यानें ते शंकर व माधव यांना धर्मगुरु म्हणून अभिवादन करीत नाहींत. हेहि ईश्वरनामस्मरणसंकीर्तन करितात. वर दाखविल्याप्रमाणें पौराणिक श्रद्धेखेरीज यांच्यांत

व महापुरुषीयादि पंथांत फारसा भेद नाहीं. मुख्य भेद म्हणजे हे कांहींसे मूर्तिपूजक असून देवळांत जाण्याची यांत पद्धती आहे. दामोदरीय जातिभेद मानतात. त्यांना गुरु व पीठाधिकारी ब्राह्मणच पाहिजे असतात. खाद्यपेयाच्या बाबतींत ते फारसे सोंवळे नाहींत. बकरीं, कबुतरें, बदकें इत्यादिकांचें मांसहि ते खातात. देवी काढून घेण्यास यांची हरकत नसते. महापुरुषीयांइतके स्नान किंवा शुद्धिसंस्कार यांकडे हे लक्ष देत नाहींत. महापुरुषीयांकडे हे जेवतात. सारांश यांच्यांतील भेद सामाजिक स्वरूपाचा आहे.

हरिदेवः—अनुयायांच्या संख्याबलाच्या मानानें याचा दर्जा दामोदराच्या खालीं लागतो. याच्या पित्याचें नांव अजानाथ व मातेचें नांव पारिजाती असें होतें. हा शसेमर ( लखिमपुर ) मधील नारायणपुर गांवीं जन्मला. शंकर व दामोदर याचे समकालीन असून त्यांच्याबरोबर हा बंगाल मध्यें चैतन्याला भेटण्यास गेला होता.

हरिदेव फारसा प्रख्यात नव्हता. तथापि त्यानें बरींच पीठें स्थापिलीं आहेत. असें सांगतात कीं प्रारंभीं शंकर, हरिदेव व दामोदर या तिघांनीं मिळून मनरीचें शास्त्र (पीठ) स्थापिलें; व पुढें शंकरानें हरिदेवाला तेथील गादीवर बसविलें. मनरी शब्दाचा अर्थ "मान" असा असून या शास्त्राला हें नांव पडण्याचें कारण शंकरनें हरिदेवाला मान देऊन या पीठावर स्थापिलें हें होय.

ज्या कारणांकरितां शंकरानें उत्तर आसाम सोडलें. त्याच कारणामुळें हरिदेवहि तो प्रदेश सोडून निघाला. कामरूपांत त्याचें मुख्य पीठ बारपेटमधील बहरी गांवचें होय. या पीठावरील सध्यांचे अधिकारी, हरिदेवाचा पट्टशिष्य व जांवई जो जगन्नाथ त्याचे वंशज आहेत.

हरिदेवाचे अनुयायीः—दामोदरीयांप्रमाणेंच यांचीं मतें असतात. शंकराचा धर्मग्रंथ हा या पंथाचा प्रमाणभूत धर्मग्रंथ होय. हे हरिदेवाला कृष्णावतार मानितात तरी शंकराचा अवमान करीत नाहींत. शुद्धिकरणाचे विधी पाळतात, व भक्तसेवा स्वीकारतात. यजमानांकडून कसल्याहि वस्तूचा आचार्यांनीं स्वीकार करावयाचा नाहीं हें महापुरुषीयांचें तत्त्व हरिदेवाचे अनुयायी धाब्यावर बसवितात. हरिदेव जरी माधव व शंकर यांना विशेष मान देत असे तरी त्याच्या पंथांतील लोक हल्लीं दामोदरीयांच्या वळणावर गेले आहेत.

गोपालदेवः—हा पुरुष फारसा प्रसिद्ध नाहीं. प्रथम हा माधव देवानें नेमलेल्या नऊ आटहा( धर्म प्रचारकां )पैकी एक होता. पण पुढें माधवाला हा मूर्तिपूजक आहे असा संशय आल्यावरून त्यानें याला आपल्या पंथांतून बाहेर काढलें. तेव्हांपासून गोपालानें आपला पंथ स्थापून, परभर व कलजर या बारपेट जिल्ह्याच्या भवानीपुर मौझ्यांतील गांवीं शास्त्रे ( मठ ) निर्माण केलीं. त्याच्या बारा शिष्यांनीं बारा 'सरु बरजनियें' स्थापिलीं. गोपाल जातीनें शूद्र होता. दामोदरीय पंथानें या पंथांतील अनुयायांच्या मनांत ब्राह्मणी धर्माच्या कल्पना भरविल्यामुळें गोपालाच्या मृत्यूनंतर त्याच्या मठांतील ब्राह्मणी भक्त दामोदरीय पंथाला मिळाले.

गोपाळदेवाचे अनुयायी —यांच्यांत व महापुरुषीयांत निकट साम्य आहे. शंकर व माधव यांनीं घालून दिलेले सर्व नियम हे पाळतात. त्यांपेक्षां जास्त असा गोपालाचा वार्षिक उत्सव मात्र करितात. हरिदेव पंथांतील लोकांप्रमाणें हेहि भक्तसेवा स्वीकारतात. यांच्यामधील साधू जटा वाढवितात. [ घोष–ए ब्रीफ स्केच ऑफ दि रिलिजिअस बिलीफ्स ऑफ दि असामीज पीपल. ]

आसाम खोरें.—ब्रह्मपुत्रा खोऱ्यांतील, पूर्व बंगाल व आसामचा भाग.याच्या उत्तरेस हिमालय व दक्षिणेस आसामरांग आहे. लोकसंख्या १९२१ सालीं ३९९१६८२. क्षेत्रफळ२४६०५ चौरस मैल होतें. आसाम खोऱ्यांतील बहुतेक प्रदेश सपाटीचा आहे. मोठीं गांवें:—गोहत्ती व डिब्रुगड. व्यापाराचीं ठिकाणें:–गोलपाडा, बारपेटा, गोहत्ती, तेझपूर व डिब्रुगड. आसाम खोऱ्यांत मुख्य व्यापार चहाचा चालतो. कामरूपमध्यें कामाख्या व हाजो आणि खोऱ्याच्या पूर्व टोकास ब्रह्मकुंड हीं यात्रेचीं ठिकाणें आहेत. शिवसागर व नाझिरा हीं आहोम राजांच्या राजधानीचीं गांवें होतीं.

आसाम रांग.— आसाम डोंगरांची रांग ब्रह्मपुत्रा व सुरमा खोऱ्यांच्या मध्यें आहे. या डोंगराची उंची साधारण पणें ३००० तें ६००० फुटापर्यंत आहे, परंतु नागा टेंकडींत जापव्हो येथें मात्र ती १०००० फूट आहे. खासी टेंकड्यांत शिलांग शिखर सर्वांत उंच ( ६४५० फूट ) आहे. गारो, खासी व लखिमपूरच्या दक्षिणेकडील टेंकड्यांत दगडी कोळसा सांपडतो.

[ संदर्भग्रंथ –रिपोर्ट ऑन दि प्रोग्रेस ऑफ हिस्टॉरिकल रिसर्च इन आसाम ( शिलाँग १८९७ ), या ग्रंथांत आसामवरील वाङ्मय सांपडेल. पी. एन्. बोस यांच्या जिऑ. सर्व्हे ऑफ इंडियामधील टीपा. सर चार्लस लायल–आसाम. आसाम अॅडमिनिस्ट्रेशन रिपोर्ट, १८८२–८३ व पुढील सालचे. मोनोग्राफ ऑन दि कॉटन फॅब्रिक्स ऑफ आसाम. ( कलकत्ता १८९७ ). प्रिन्सिपल हेड्स ऑफ दि हिस्टरी अँड स्टॅटिस्टिक्स ऑफ दि डाक्का डिव्हिजन ( कलकत्ता १८६८ ) मोफाट मिल्सः—रिपोर्ट ऑन दि प्राव्हिन्स ऑफ आसाम ( कलकत्ता १८५४ ). रॉबिन्सन–ए डिस्क्रिप्टिव्ह अकाउंट ऑफ आसाम ( कलकत्ता १८४१ ). मॅक्कॉश–टोपोग्रॅफी ऑफ आसाम (कलकत्ता१८३७). कर्नल डाल्टन–दि एथ्नॉलॉजी ऑफ बेंगाल. सेन्सस रिपोर्टस ऑफ आसाम १८८१–१९११. जे. ए. एस्. बेंगाल पु. ४१ व ६२. गेट–ए हिस्टरी ऑफ आसाम ( कलकत्ता १९०६ ). आसाम डिस्ट्रिक्ट गॅझिटीयर्स पु. ३.८. मन्मथनाथ घोस–ए ब्रीफ स्केच ऑफ दि रिलिजिअस बिलीफ्स ऑफ

दि आसामीज पीपल, ( कलकत्ता १८९६ ) इं. गॅ. ए. ब्रि. ए. रि. ए वगैरे ].

**आसुंदी**—( मुंबई इलाखा ) धारवाड जिल्हा. राणीबेन्नूरच्या पश्चिमेस पांच मैलांवर असलेलें एक खेडें. या खेडयाच्या वेशीबाहेर कालेश्वराचें देऊळ आहे. त्यांत इ. स. १११२ व ११४३ या सालचे शिलालेख असून तिसरा शिलालेख अतिशय पुसट आहे ( मुं. गॅ. धारवाड जिल्हा).

**आसेगांव**—हें गांव उमरावती–इलिचपूरच्या रस्त्यावर असून उमरावतीपासून आठरा मैलांवर आहे. या ठिकाणीं पूर्णा नदीवर एक चांगला पूल आहे. हा गांव साधारणपणें उमरावती आणि इलिचपूरच्या दरम्यान असल्यामुळें व रायभान पाटील यांच्या खटपटीनें येथें एक डाकबंगला व इन्स्पेक्टरबंगला या दोन सार्वजनिक इमारती झाल्या आहेत. पोलिस ठाणें, सराई, सबरजिस्ट्रेशनचें ऑफिस, शाळा, चावडी, कोंडवाडा वगैरे येथें आहेत. ( उमरावती जिल्हा गॅ. १९११ ).

**आस्का**—( मद्रास ). गंजम जिल्हा. आस्का हें तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. १९२१ मध्यें लोकसंख्या ४४९१ होती. येथें साखरेचा व दारूचा असे दोन कारखाने आहेत. पैकीं साखरेच्या कारखान्यांत गुळापासून साखर न करतां एकदम उंसापासूनच तयार करितात यामुळें साखरेचें उत्पन्न सव्वापट होतें. १९०३ सालीं या कारखान्यांत १,७१००० रुपये किमतीची साखर तयार झाली होती. जिल्ह्याचा मुनसफ येथें असतो. या गांवांत एक टाउनहॉल व एक छत्र आहे ( इं. गॅ. )

**आस्काबाद**—( मध्यआशिया ). ट्रॅंसकॅस्पीयन या प्रांताच्या राजधानीचें हें शहर आहे. हें क्रॅस्नोव्होडस्कच्या आग्नेय दिशेस आगगाडीनें ३४५ मैल व समरकंदपासून ५९४ मैल दूर आहे. हें कोपेटडाघ पर्वताच्या उत्तरपायथ्याशीं वसलें आहे व या ठिकाणीं एक सार्वजनिक ग्रंथसंग्रहालयहि आहे. लोकसंख्या १८८१ सालीं २'१०० होती ती १८९७ सालीं १९,४२८ झाली. बहुतेक लोक बाबी पंथाचे आहेत ( एब्रि. )

**ऑस्टरलीझ**—(आशिया) हें शहर आस्ट्रियांतील मोरेव्हिया प्रांतांत आहे. ह्याची लोकसंख्या ३१४५ असून येथील बहुतेक लोक झेक आहेत. येथें कॉनिट्झ राईटबर्ग राजपुत्राचा एक भव्य राजवाडा व एक सुंदर ख्रिस्ती देवालय आहे. ह्या शहरीं पहिल्या नेपोलियननें ऑस्ट्रियनांचा व रशियनांचा ता. २ डिसेंबर १८०५ रोजीं पराभव केला. ही लढाई नेपोलियनच्या युद्धनैपुण्याचें उत्कृष्ट उदाहरण होय. ह्या लढाईत फ्रेंच सेनेपैकीं सुमारें ? लोक गमावले व दोस्त राष्ट्रांच्या ८२५७० लोकांपैकीं १२२०० सैनिक मेले व जाया झाले. [ ए. ब्रि. ]

**ऑस्टिन जॉन**( १७९०—१८५९ )—हा कायदेशास्त्रावरील लेखक इंग्लंडमध्यें सफोक परगण्यांत क्रीटिंगमिल येथें १७९० मध्यें जन्मला. यानें सोळाव्या वर्षी सैन्यांत नोकरी धरली; पण पांच वर्षांनीं ती सोडून लंडन येथें कायद्याचा अभ्यास केला. १८१८ मध्यें याला वकिलीची सनद मिळाली. याचा जेरेमी बेन्थॅम, जेम्स मिल्ल व जॉन स्टुअर्ट मिल्ल यांच्याशीं निकट संबंध होता. वकीलीच्या धंद्याकडे त्याचें विशेषसें लक्ष नव्हतें. इ. स. १८२६ मध्यें लंडन युनिव्हर्सिटीनें याला कायदेशास्त्राचा ( ज्युरिसप्रुडन्स ) प्रोफेसर नेमलें, पण चार वर्षांनंतर पुरेसे विद्यार्थी मिळत नाहींसे झाल्यामुळें त्याला राजीनामा द्यावा लागला. हा क्रिमिनल लॉ कमिशनचा सभासद होता. याचें विशेष लक्ष लेखनाकडे होतें. त्यानें 'राज्यसत्ता' ( सॉव्हरिन्टी ) याबद्दलचें प्रतिपादिलेलें तत्त्व विशेष प्रसिद्ध आहे. 'प्रॉव्हिन्स ऑफ ज्यूरिस प्रूडन्स डिटरमिंड ' ( कायदेशास्त्रक्षेत्रमर्यादानिश्चय ) हा त्याचा ग्रंथ १८३२ मध्यें प्रसिद्ध झाला. कायदेशास्त्रावरील त्याच्या व्याख्यानाचें पुस्तक त्याच्या पश्चात त्याच्या पत्नीनें प्रसिद्ध केलें. ऑस्टिनचें पुस्तक मुंबई युनिव्हर्सिटीच्या फर्स्ट एलएल. बीच्या परीक्षेला बरींच वर्षे नेमलें होतें. ऑस्टिन हा उपयुक्ततावादाचा ( युटिलिटेरियॅनिझमचा )वहाता होता. पुष्कळांचें पुष्कळ सुख ( ग्रेटेस्ट गुड ऑफ ग्रेटेस्ट नंबर ) ही कसोटी त्यानें कायदेशास्त्रांत ग्राह्य केली होती. धर्मशास्त्र, नीतिनियम व कायदे उर्फ राज्यसत्तेचे नियम यांचें क्षेत्र शास्त्रीय पृथक्करण पद्धतीनें निश्चित करण्याचा प्रयत्न त्यानें केला आहे.

[ संदर्भ ग्रंथ.—जे. एस. मिल—डिसर्टेशन्स अँड डिस्कशन्स पुस्तक ३. ' लेक्चर्स ऑन ज्यूरिस्प्रूडन्स ' च्या प्रस्तावनेंतील चरित्र. ब्रिटानिका ]

**ऑस्टिन जेन**—( १७७५–१८१७ ) –ही एक सुप्रसिद्ध इंग्रजी कादंबरीकर्त्री असून तिचा जन्म बॅसिनस्टोक जवळील स्टिव्हेंटन उपाध्यायगृहांत झाला. तिचा बाप एक पाद्री होता. त्यानें तिला सामान्य मुलींच्यापेक्षां अधिक चांगलें शिक्षण दिलें होतें. लेखन व्यवसायास तिनें लवकरच सुरुवात केली. तिच्या आयुष्यक्रमांत विशेष गोष्टी कांहींच घडल्या नसून फक्त एक प्रेमभंगाच्या आपत्तीखेरीज तिचें सर्व आयुष्य सुखांत व शांततेत गेलें. हांटस् परगण्यांतील चॉटन गांवीं तिच्या बहुतेक कादंबऱ्या लिहिल्या गेल्या. १८१७ मध्यें क्षयरोगाच्या भावनेची शंका आल्यामुळें मे महिन्यांत योग्य वैद्यकीय मदतीसाठीं ती विंचेस्टर येथें गेली परंतु रोगाची वाढ फार झपाट्यानें होऊन अवघ्या दोन महिन्यांत ती तेथें मृत्यु पावली.

तिनें एकंदर सहा कादंबऱ्या लिहिल्या त्यांपैकीं ' सेन्स ॲन्स सेन्सिबिलिटी ', ' प्राईड ॲन्ड प्रेज्युडिस ', ' मॅन्स्फील्डपार्क ' व ' एमा ' या चार कादंबऱ्या तिच्या ह्यातींत प्रसिद्ध झाल्या होत्या. ' नार्थेंजर ॲबे ' व ' पर्स्वेशन ' या तिच्या मृत्यूनंतर लवकरच प्रसिद्ध करण्यांत आल्या. या तिच्या कादंबऱ्यांपैकीं 'प्राईड ॲन्ड प्रेज्युडिस' ही कादंबरी

सर्वश्रुत आहे, तथापि ती सर्वोत्कृष्ट आहे असें नाहीं. हिची लिहिण्याची धाटणी अस्खलित व स्पष्ट असून व्याजोक्ति व वस्तुस्थितीचें यथातथ्य दर्शन या गुणांनीं ती सर्वमान्य झाली आहे. प्रथमपासूनच तिच्या कादंबऱ्या लोकप्रिय होत्या; तरी तिच्या गुणांची योग्य पारख नंतरच्या काळांत झाली. पात्रांचीं स्वभावचित्रें विशेषतः रोजच्या व्यवहारांत व नाजुक प्रसंगी होणारे स्त्रियांच्या मनोभूमिकेचे सूक्ष्म फरक दाखविण्यांत तिचें कौशल्य वाखाणण्यासारखें आहे. मध्यम व उच्च वर्गांतील अगदीं सामान्य प्रतीच्या पात्रांच्या वैशिष्ट्याचा व स्वभावाचा परिपोष तिनें सुंदर रीतीनें केला आहे. तरी स्वतःच्या स्वभावाची छटा त्यांत कोठेंहि दिसूं दिली नाहीं. क्वचित जातां जातां वाचकांच्या खोल भावनांनां ती स्पर्श करते, व जे धडे तिला शिकवावयाचे असतात त्यांबद्दल एक शब्दहि न बोलतां तें काम ती कादंबरींतील त्या त्या प्रसंगांवर सोंपविते. सर वा. स्कॉटनें तिची फारच स्तुति केली आहे. तसेंच मेकाले, कोलेरिज, साउदे, सिडने स्मिथ यांनींहि तिची बरीच वाहवा केली आहे.

[ संदर्भ ग्रंथ.—जेनच्या पुतण्यानें १८७० त तिचें प्रमाणभूत मानण्यांत येणारें चरित्र प्रसिद्ध केलें. लॉर्ड ब्रेब्रोर्नेनें तिचीं पत्रें प्रसिद्ध केलीं ( १८८४ ). याशिवाय एस्. एफ्. माल्डन ( १८८९ ); गोल्डविन स्मिथ ( १८९० ); पोलॉक; कान्स्टन्स हिल ( १९०२ ); मिटन ( १९०५ ); इत्यादि मंडळींनीं जेन व तिचा परिवार यासंबंधीं ग्रंथरचना केली आहे. ]

**ऑस्टिया**–इटलीमधील लॅटियम प्रांतांतील बंदर व जुनें शहर. हें शहर टायबर नदीच्या डाव्या किनाऱ्यावर वसलेलें होतें. हें ऑस्टिएन्सिस रस्त्यानें रोमच्या नैर्ऋत्य दिशेस १४ मैलाच्या अंतरावर आहे. रोमन लोकांची अगदीं पहिली वसाहत या शहरीं झाली होती असें म्हणतात. प्राचीन कालीं या शहराला बंदर म्हणून चांगलें महत्त्व आलें होतें. साम्राज्याच्या कालांत या शहराची राज्यव्यवस्था फार सुरळीत चालत असावी असें कांहीं शिलालेखांवरून समजतें. येथील प्राचीन लोकांची मुख्य देवता व्हल्कन " अग्निदेवता " होती. त्यानंतर येथील लोक इसिस, सिबेली इत्यादि देवतांचे उपासक झाले.

येथील धर्ममंडळाविषयीं चवथ्या शतकाच्या पूर्वीची कांहीं माहिती उपलब्ध नाहीं. चवथ्या शतकापासून आजमितीपर्यंत येथील बिशपची गादी चालू आहे.

प्राचीन काळीं, ट्रोजन लोकांनीं " सेंटन्सेले "हें बंदर उवडीतोंपर्यंत, ऑस्टियाचें बंदर सर्वांत उत्तम ठरलें होतें. ख्रि. पू. २६७ त दुष्काळ पडल्यामुळें परदेशचा माल याच बंदरांतून येत होता; व त्यामुळें याला चांगलें महत्त्व आलें होतें. परंतु ऑस्टिया बंदरांत नैर्ऋत्य दिशेचे वारे थडकूं लागल्यामुळें, त्याचप्रमाणें टायबर नदीचा गाळ साठूं लागल्यामुळें, ऑस्टिया खेरीज इतर बंदरांची गरज भासूं लागली व इ स. ४६ सालीं " नेरो पोर्टस ऑग्युस्टी " व १०३ सालीं हल्लींचें " फोसा ट्राजाना " हीं बंदरें उघडलीं गेलीं.

पुढें मध्य कालांत " ऑस्टिया " या बंदरास पुन्हां उर्जितावस्था प्राप्त झाली; व गिउली आनो डेला रोव्हेरे यानें ऑस्टिया येथें " बासिओ पोटेली " नांवाचा तटबंदी केलेला दुर्ग बांधिला. १५५७ पर्यंत येथील हवा चांगली होती, परंतु या सालीं टायबर नदीला पूर येऊन तिचें पात्र पश्चिमेकडेस हटलें व तेव्हां पासून पूर्वीच्या पात्राची जागा दमट व हवा रोगट झाली. जेव्हां १८ व्या शतकांत ऑस्टिया शहर वसलेल्या ठिकाणीं खणण्यांत आलें तेव्हां कांहीं थडगीं व छावणी करितां बांधलेलीं घरें सांपडलीं. तसेंच एक भव्य न्यायमंदिर, त्याच्या नैर्ऋत्य दिशेस एक देऊळ, व कांहीं वखारी इत्यादि इमारतींचा शोध लागला. या सर्व इमारतींत चित्रविचित्र दगडांची कामें केलेलीं आढळतात. याच्या आग्नेय दिशेस कांहीं देवळें व अरण्यें आहेत.

सन १८७५ सालीं आस्टिया येथें एक नवी वसाहत केली गेली असून तेथील दलदलीची जागा ओलावा काढून राहण्यायोग्य करण्यांत आली. रोमपासून आस्टिया पर्यंत एक विद्युत् ट्रामगाडीहि नेली आहे. [ ब्रिटानिका ]

**ऑस्टेंड**—(बेल्जम). पश्चिम फ्लॅन्डर्स प्रांतांतील एक शहर. लोकसंख्या १९१२ सालीं ४३,००२ होती. बेल्जममधील हें समुद्रावरील हवा खाण्याचें उत्तम ठिकाण असून महत्त्वाच्या दृष्टीनें दुसरें बंदर आहे. मध्ययुगांत याच्याभोंवतीं बळकट तट बांधलेला असून त्याला अनेकदां वेढे पडले होते. सन १८६५ मध्यें तटबंदी अजीबात नाहींशी झाली व तेव्हांपासून हें एक नवीन शहर म्हणून प्रसिद्ध झालें. समुद्राकडे तोंड करून बांधलेलें एक उत्तम नृत्यगृह व राजाचा बंगला हीं प्रमुख ठिकाणें या शहरांत असून त्याच्या मागील बाजूस एक उत्तम बाग व शर्यतीचें मैदान आहे. १९०० सालीं बंदर दोन मैल मागें हटविण्याचा मोठा यत्न झाला. हल्लीं गोद्यांतून मोठमोठालीं जहाजें राहूं शकतात. ब्रूसेल्स, कोलोन व बर्लिन या शहरांनां येथून थेट आगगाडीनें जातां येतें. शिवाय या ठिकाणाहून बरेचसे आगगाडीचे फांटे किनाऱ्यावरून व फ्लॅन्डर्समधील शहरांकडे गेले आहेत.

**ऑस्टेंड कंपनी**– डच, इंग्लिश आणि फ्रेंच ईस्ट इंडिया कंपनी यांचा उत्कर्ष पाहून ऑस्टेंडमधील व्यापाऱ्यांनां व जहाजांच्या मालकांनां इंडीजशीं आपला प्रत्यक्ष व्यापारी संबंध घडवून आणण्याची इच्छा झाली. त्याप्रमाणें इ. स. १७१७ मध्यें एक खाजगी कंपनी निघून कांहीं जहाजें पूर्वेकडे पाठविण्यांत आलीं. आस्ट्रियाचा बादशहा सहावा चार्लस यानें आपल्या प्रजेला या नवीन कार्यांत

कंपनीला मदत करण्याविषयीं उत्तेजन दिलें, पण स्वतः मात्र एखादा परवाना किंवा पेटंटीचें पत्र दिलें नाहीं. कांहीं दिवस वरील कंपनीला थोडेंफार यश आलें. पण शेजारील राष्ट्रांच्या मत्सरामुळें ती खालावूं लागली. इंग्लिशांनीं मादागास्कर जवळ एक ऑस्टेंड जहाज व डचांनीं आफ्रिकेच्या किनाऱ्याजवळ दुसरें एक मौल्यवान मालानें भरलेलें जहाज काबीज केलें. तथापि या नुकसानीमुळें ऑस्टेंडरांचा धीर खचला नाहीं. त्यांनीं १७२२ मध्यें बादशहाकडून मोठ्या मिनतवारीनें पेटंटीचीं पत्रें मिळविलीं. या पत्रांच्या द्वारें ऑस्टेंड कंपनीला तीस वर्षेंपर्यंत ईस्ट आणि वेस्ट इंडीज व आफ्रिकेचा किनारा यांशीं व्यापार करण्याचा हक्क प्राप्त झाला. तेव्हांपासून कंपनीची इतकी चलती झाली कीं, १७२३ च्या ऑगस्टमध्यें कंपनीच्या शेअरचा भाव १२ ते १५ टक्के चढला. कॉरोमांडल किनाऱ्यावर कोव्लोम येथें एक व गंगा नदीवर बंकीबाजार येथें दुसरी, अशा दोन वखारी कंपनीनें स्थापिल्या. आरंभीं कंपनीला भावी उत्कर्षाची मोठीच आशा वाटत होती,व तसें वाटणें त्यावेळच्या स्थितीवरून सहाजिकच होतें. पण डच आणि इंग्लिश यांचें वैर व मत्सरबुद्धि हीं आडवीं आलीं. १६४८ सालीं वेस्ट फॅलियाचा जो तह झाला त्यायोगानें स्पेनच्या राजानें दक्षिण नेदर्लंड मधील लोकांनां स्पेनच्या वसाहतींशीं व्यापार करण्याचा प्रतिबंध केला होता. तेव्हां युट्रेचच्या तहानें (१७१३) दक्षिण नेदर्लंड आस्ट्रियाकडे गेला तरी हा प्रतिबंध नाहींसा होत नाहीं असें डच व्यापारी प्रतिपादूं लागले. तथापि स्पॅनिश सरकारनें थोडेसे आढेवेढे घेतल्यानंतर आस्ट्रियाशीं एक व्यापारी तह केला, आणि ऑस्टेंड कंपनीला मान्यता दिली. पण याला उत्तर म्हणून इंग्लंड 'युनायटेड प्रॉव्हिन्सेस' आणि रशिया यांनीं १७२५ त हेरेनहौसेन येथें आपला एक संरक्षकसंघ स्थापन केला. हा जोराचा विरोध पाहून व्हिएन्ना दरबारनें पडतें घेण्याचें ठरविलें. १७२७ त झालेल्या पॅरिस येथील तहान्वयें बादशहानें कंपनीचा परवाना सात वर्षे तहकूब केला व याबद्दल बादशहाला बक्षीस म्हणून इतर राष्ट्रांनीं त्याच्या 'प्रॅगमॅटिक सँक्शन' (वारसपत्रका) ला उचलून धरण्याचें कबूल केलें. अशा रीतीनें परवाना तहकूब झाल्यानंतर कंपनी कांहीं दिवस जीव धरून राहिली होती. पण शेवटीं लयाला गेली. १८१५ मध्यें हॉलंडशीं त्यांचा संयोग होईपर्यंत ऑस्ट्रियन नेदर्लंडसना इंडीजशीं दर्याव्यापार करण्याची अजीबात मनाई होती.

**आस्ट्राखान**—एक रशियन प्रांत. हा आग्नेय रशियांत आहे. याच्या उत्तरेस समरा प्रांत व साराटोव्ह प्रांत, पश्चिमेस साराटोव्ह प्रांत, दक्षिणेस स्टव्होपाल व टेरेक, पूर्वेस कास्पियन समुद्र व उरलप्रांत आहेत. याचें क्षेत्रफळ ९१०४२ चौरस मैल आहे व लोकसंख्या १९१५ मध्यें १४२७५०० होती. येथील हवा फार उष्ण आहे.

श ह र—आस्ट्राखान प्रांतांतील मुख्य शहर. हें व्होलगा नदीच्या डाव्या तीरावर असून कास्पियन समुद्रापासून ५० मैल आहे. बाकूच्या पेट्रोलियमच्या धंद्याचे वाढीपासून व ट्रॅन्स कास्पियन रेल्वे सुरू झाल्यापासून आस्ट्राखान हें व्यापाराचें महत्त्वाचें ठिकाण झालें. येथून मासे, साखर, धातूंचीं भांडीं, कापसाचें व लोकरीचें कापड वगैरे माल परदेशीं जातो. धान्य, कापूस, फळें व इमारतीचें लांकूड, हा माल या देशांत येतो. आस्ट्राखान हें कास्पियन समुद्रावरील मुख्य बंदर असून कास्पियन समुद्रावरील रशियाच्या आरमाराचें मुख्य ठिकाण आहे या शहराभोंवतीं द्राक्षांचे मळे आहेत. पूर्वी आस्ट्राखान हें एका तार्तर संस्थानाची राजधानी होती. व तें हल्लींच्या शहराचे उत्तरेस सात मैलांवर होतें. १३९५ मध्यें मंगोल राजा तैमुर दि ग्रेट यानें या शहराचा नाश केल्यावर हल्लींचें शहर वसलें. १५५४ मध्यें रशियाच्या चवथ्या इव्हाननें तार्तर लोकांनां हांकून दिलें. १५६९ त या शहराला तुर्क लोकांनीं वेढा दिला, परंतु त्यांची रशियानें मोठी कत्तल करून, पराभव केला. १६७० मध्यें स्टेंका रॅझीन नांवाच्या बंडखोरानें हें घेतलें. पुढील शतकाच्या आरंभीं पिटर दि ग्रेट यानें जहाजें बांधण्याची गोदी येथें बांधली व हें शहर इराणच्या लढाईकरितां मुख्य ठिकाण करण्यांत आलें. नंतर त्याच शतकांत दुसऱ्या कॅथेराईननें याला व्यापार विषयक सवलती दिल्या. १७०२, १७१८ व १७६७ या सालीं याचें आगीनें बरेंच नुकसान झालें. व १७१९ मध्यें इराणी लोकांनीं हें शहर लुटलें. १८३० मध्यें पटकीच्या रोगानें येथील लोकसंख्या कमी झाली. सन १९१३ मध्यें येथील लोकसंख्या १६३८०० होती. [ए. ब्रि.]

**ऑस्ट्रिया**—हा एक मध्ययूरोपांतील देश आहे. याच्या मर्यादा—पूर्वेस रशिया आणि रुमानिया, दक्षिणेस हंगेरी, ॲड्रियाटिक समुद्र, आणि इटली; पश्चिमेस स्वित्सरलंड, लिचटेनस्टिन आणि जर्मन साम्राज्य,—(बव्हेरिआचा भाग) उत्तरेस जर्मन साम्राज्य (सॅक्सनी आणि प्रशियाचा भाग). रशियाचें क्षेत्रफळ ११५५३३ चौरस मैल आहे. भूगोलदृष्ट्या हा देश एक नाहीं.

स मु द्र कि ना रा.—बहुतेक सरहद्दीवर जमीन आहे. फक्त सरासरी एकदशांश सरहद्दीला समुद्रकिनारा आहे. पश्चिमेस ट्रिस्टचें आखात आणि पूर्वेस फ्यूम किंवा कारनेरोचें आखात आहे व या दोन्ही आखातांच्या मध्यें इस्ट्रिआ हें द्वीपकल्प आहे. कारनेरो आखातांत कारनेरो बेटें आहेत. ट्रिस्ट, कपोडिस्ट्रिआ, पिरानो, पॅरेन्झो, रोव्हिग्नो हीं मुख्य बंदरें आहेत. डालमेशियाच्या किनाऱ्यावर झारा, कटारो, आणि रगुसा हे उपसागर आहेत व बेटांची एक रांग आहे.

प र्व त.—हा देश स्वित्झरलंडप्रमाणेंच अतिशय डोंगराळ आहे आणि याचा सरासरी चारपंचमांश भाग समुद्रसपाटीपासून सहाशें फुटावर आहे. येथील पर्वतांच्या तीन रांगा

आहेत. आल्प्स पर्वत, कारपेथिअन पर्वत, आणि बोहेमिअन-मोरेव्हिअन पर्वत.

न द्या.—येथील मुख्य नद्या डान्युब, नीस्टर, व्हिस्चुला, ओडर, एल्ब, ऱ्हाइन, आणि एडीज किंवा एत्स्च ह्या आहेत. या सर्व नद्यांचीं मुखें आणि डान्युब नदीचा उगमहि बाहेरील प्रदेशांत आहेत. पसाऊच्या दरींतून डान्युब नदी आस्ट्रियांत शिरते. येथें तिला इन नदी मिळते. ही पुढें हेनवर्गपर्यंत आल्प्स पर्वतामधून वहात जाते. लिन्झ आणि व्हिएन्ना या दोहोंमधील भागांत या नदीच्या तीरावरील देखावा फारच रमणीय आहे. ही नदी आस्ट्रियांत शिरतांना ८९८ फूट आणि येथून बाहेर पडतांना ४००फूट समुद्रसपाटीचे वर आहे. या नदीचा आस्ट्रियांतील प्रवाह २३४ मैल लांब आहे व हिचेपासून ५०३७७ चौरस मैल जमिनीला पाण्याचा पुरवठा होतो. ही काळया समुद्राला जाऊन मिळते. नीस्टर या नदीचा उगम पूर्व गॅलेशिआमध्यें कार्पेथिन पर्वतांत होतो व ही देखील काळया समुद्राला जाऊन मिळते. हिचा आस्ट्रियांतील प्रवाह ३७०मैल आहे, त्यांपैकीं ३००मैल नौकानयनास योग्य असा आहे. १२००० चौ. मैल क्षेत्रफळास हिचेपासून पाण्याचा पुरवठा होतो. व्हिस्चुला आणि ओडर या दोन्ही नद्या बाल्टीक समुद्रांत जाऊन मिळतात. व्हिस्चुला नदीचा उगम मोरेव्हिआमध्यें होतो. हिचा प्रवाह २४० मैल आहे. व ही १५५०० चौ. मैल जमिनीस पाण्याचा पुरवठा करिते. ओडर नदीचा उगम देखील मोरेव्हिआमध्यें होतो. हिचा येथील प्रवाह ५५ मैल लांब आहे. एल्ब नदी उत्तर समुद्रास मिळते. हिचा उगम रिसेन्जेबर्ज येथें होतो. हिचा येथील प्रवाह १८९ मैल आहे, त्यापैकीं सरासरी ६५ मैल नौकानयनास योग्य असा आहे. २१००० चौ. मैल जमिनीला ही नदी पाणी पुरवते. ऱ्हाइन नदीचा आस्ट्रियामध्यें सारा २५ मैलांचाच प्रवाह आहे. एडिज नदी अॅड्रिआटिक समुद्राला मिळते. टिरोल पर्वतांत हिचा उगम होतो. हिचा येथील प्रवाह १३८ मैल आहे व ही ४२६६ चौ. मैल जमिनीस पाण्याचा पुरवठा करिते. येथें मोठालीं सरोवरें मुळींच नाहींत.

पा ता ळ ख नि ज प दा र्थ व झ रे.—सर्व यूरोपांत आस्ट्रियामध्यें सर्वांत जास्त आणि महत्त्वाचे असे खनिज पदार्थांचे झरे आहेत व हे सर्व बहुतेक बोहेमिआमध्यें आहेत. यांपैकीं मुख्य म्हटलीं म्हणजे अल्कजल, ( अल्कलाइन ), अल्काम्लजल ( अल्कलाइन अॅसिडयुलेटेड वॉटर्स ), लोहजल, कटुजल ( बिटर वॉटर्स ), क्षारजल ( सलाइन वॉटर्स ), अदजल ( आयओडाइन वॉटर्स ) आणि उष्णजल(थर्मल वॉटर्स) हीं होत.

भू स्त र व र्ण न.—आस्ट्रियाची खनिज संपत्ति विपुल आहे. आस्ट्रियांतील फार प्राचीन काळचे खडक हे अनेक धातूंनीं युक्त असे आहेत. अर्सेबर्ज व प्रायब्रम येथील रौप्यमिश्रित शिशांच्या खाणींचे अवशेष सांपडतात. तसेंच स्टीरीया व बुकोव्हिना येथें कच्च्या लोखंडाच्या खाणी आहेत. कार्निओला येथें पाऱ्याच्या खाणी असून, तृतीय युगांतील ज्वालामुखी पर्वतांच्या खडकांत, सोनें व चांदीच्या कच्च्या खाणी आढळून येतात. सायलेशिया व बोहेमियामध्यें पुष्कळ कोळशाच्या खाणी आहेत. गॅलीशिया वगैरे प्रांतांत मिठाच्या खाणी असाव्यात असें तेथें सांपडणाऱ्या क्षारांच्या अवशेषांवरून अनुमान काढतां येतें.

ह वा मा न.—हवामान निरनिराळ्या प्रकारचें आहे, कारण हा देश फार अफाट असून लहान मोठ्या उंचीच्या डोंगरांनीं व्यापलेला आहे. हवामानाप्रमाणें याचे तीन भाग करतां येतील. ( १ ) उत्तरअक्षांश ४६° पर्यंत सर्वांत दक्षिण भाग पसरलेला आहे. येथें सर्व ऋतूंतील हवा सौम्य आणि उन्हाळा पांच महिनेपर्यंत असतो. ( २ ) उत्तरअक्षांश ४६° आणि ४९° यांमध्यें मध्यभाग पसरलेला आहे. येथें हिंवाळा मोठा आणि जास्त कडक असतो आणि उन्हाळाहि जास्त कडक असतो. (३) उत्तरभाग उत्तर अक्षांश ४९° अंशांच्या उत्तरेकडील भागांत पसरलेला आहे. या भागांत हिंवाळा जास्त असतो. साधारणपणें दरवर्षी आस्ट्रियामधील उष्णतेचें मान दक्षिण भागांत सरासरी ५९° आणि उत्तर भागांत ४८° पर्यंत असतें. व्हिएन्नामध्यें सर्वांत जास्त उष्णतेचें मान ९४° आणि सर्वांत कमी २° असतें. पश्चिमेकडील प्रदेशांपेक्षां उत्तरेकडील प्रदेशांत पाऊस जास्त पडतो. दक्षिण प्रदेशांत वसंतऋतूंत, आणि शरदृतूंत आणि उत्तर आणि मध्य प्रदेशांत उन्हाळ्यांत पाऊस पडतो. दक्षिण आल्प्स टापूंत आणि समुद्रकिनाऱ्यावर वादळें नेहमीं होतात.

वि भा ग.—याचे १७ विभाग आहेत. या विभागांना ' लँड ' किंवा ' क्रौन लँड ' असें म्हणतात. यांपैकीं तीन म्हणजे बोहेमिया, गॅलेशिआ आणि लोडेमेरिया आणि डालमेशिआ राज्यें होतीं. लोअर आणि अप्पर आस्ट्रिया यांवर आर्चड्यूक असत आणि साल्झबर्ग, स्टिरिया, कारिन्थिया, कार्निओले, सिलेनिआ आणि बुकोव्हिया यांवर ड्यूक असत. गोर्झग्रेडीस्का आणि टिरोल कौंटच्या ताब्यांत होते. दोन मोरेव्हिआ आणि इस्ट्रिआ हीं मारग्रेव्हच्या ताब्यांत असत. व्होरालबर्ग याला फक्त लँड असेंच म्हणत. आणि ट्रीस्ट हें शहर क्रौन लँड समजलें जाई.

लो क सं ख्या.—१९१० सालीं ३१ डिसेंबरच्या खानेसुमारीप्रमाणें आस्ट्रियाची लोकसंख्या २,८५,७१,९३४ होती. म्हणजे प्रत्येक चौरस मैलाला २४७ माणसें पडतात. या देशांत कायद्यानें विवाहबद्ध न झालेल्या स्त्रीपुरुषांपासून झालेल्या मुलांची संख्या फार आहे. तसेंच मुलांची मृत्युसंख्याहि फार आहे.

वं श.—मानववंशशास्त्रदृष्ट्या येथें निरनिराळ्या वंशांचे लोक आहेत. यूरोपांतील निरनिराळ्या वंशांपैकीं लॅटिन, ट्यूटॉनिक आणि स्लाव्होनिक या तीन मुख्य वंशाचे लोक येथें आढळतात. स्लॅव्होनिक लोकांची संख्या बरीच मोठी

आहे व हे संख्येनें इतर वंशांच्या लोकांपेक्षां जास्त आहेत. जर्मन लोकांची संख्याहि बरीच असल्यामुळें त्यांचा येथें फार मोठा राष्ट्रसंघ आहे. सरकारी कामकाजांत व पुस्तकें छापण्यासाठीं जर्मन भाषेचा उपयोग करतात येथील राज्यकारभारांत यांचें वर्चस्व होतें व येथील राज्याची स्थापना व भरभराट करण्याच्या कामीं यांचेंच विशेष अंग होतें. लॅटिन वंशांत इटालियन, लाडिनि आणि रुमानियन लोक येतात.

शे ती.—पूर्वीपासून शेती ही येथील लोकांची मोठी उत्पन्नाची बाब आहे. १९०० सालीं एकंदर लोकसंख्येपैकीं अर्धेअधिक लोक शेतीच्या धंद्यावर आपली उपजीविका करीत असत. एकंदर जमिनीचें क्षेत्रफळ ७४१०२००१ एकर होतें. त्यापैकीं शेंकडा ९४.२ एकर जमिनींतून उत्पन्न होतें. ९४.२ एकर जमिनीपैकीं ०.४ एकर जमिनींत तळीं आहेत व त्यांतून माशांचें उत्पन्न होतें. उत्पन्नाच्या बाबींच्या जमिनींपैकीं शेंकडा ३७.६ एकर लागवडीत आणण्याच्या उपयोगी पडेल अशी आहे. ३४.६ एकर जंगल, २५.२ एकर कुरणें, १.३ एकर बगीचे,०.९ एकर द्राक्षाचे मळे आणि ०.४ एकर तळीं वगैरे. मुख्य पीक म्हणजे गहूं, राय, जव, ओट, मका, बटाटे, साखरेचें बीट, गाजर यांचें आहे. गहूं आणि मका यांचें पीक पुरेसें होत नाहीं म्हणून यांची बाहेरून आयात व्हावी लागते. जव आणि ओट यांचें पीक बाहेर पाठविण्याइतकें होतें.

जं ग ल.—उत्पन्नाचे जमिनीपैकीं ⅓ वर जमीन जंगलानें व्यापली आहे. जंगलांत शेंकडा ८५ झाडें उंच आणि इमारती लांकडाचीं आहेत. विशेषकरून ओक, पाईन,बीच, ॲश, एल्म आणि अशाच प्रकारचीं झाडें आहेत व यांचें बरेंच उत्पन्न होतें. येथें उत्तम प्रकारचे आणि पुष्कळ घोडे होतात.

ख नि ज द्र व्यें.—या बाबतींत यूरोपांतील पहिल्या प्रतीच्या देशांत या देशाची गणना केली जाते. प्लॅटीनम सोडून सर्व प्रकारच्या उपयुक्त धातू येथें सांपडतात. सोनें, चांदी तसेंच लोखंड, तांबें, शिसें आणि कथील हीं अतिशय आहेत.(पिट कोल आणि ब्रौनकोल) कोळशाच्या खाणींतून थरचे थर आहेत. जस्त, ॲंटिमनि, सोमल, ( आर्सेनिक ) कोबाल्ट, निकल, मँगनीज, बिसमथ क्रोमिअम, यूरेनिअम, टेल्युरिअम, गंधक, ग्रॅफाइट आणि असफाल्ट हीं थोड्या प्रमाणांत सांपडतात. याशिवाय संगमरवरी दगड, घरें शाकारण्याच्या पाट्या, जिप्सम, चिनी माती, मडक्यांची माती आणि जवाहीर यांच्याहि खाणी आहेत. १८२५ सालीं कोळशाचें उत्पन्न अजमासें १५०००० टन होतें आणि १९०० सालीं ३२५०००००० टन झालें.

धं दे.—१९ साव्या शतकाच्या शेवटल्या सरासरी २५ वर्षांत येथें धंद्यांची आणि कारखान्यांची बरीच वाढ झाली; परंतु या वाढीचा प्रसार सर्व देशभर झाला नव्हता. निरनिराळ्या धंद्यांना उपयोगी पडणाऱ्या जिनसा उदाहरणार्थ, काळसा, कच्चा माल वगैरे येथें विपुल असल्यामुळें त्यांची लवकर व जोरानें वाढ होण्याला येथील परिस्थिति अगदीं अनुकूल आहे. कापड विणणें, शुद्ध धातु तयार करणें मद्यार्क काढणें, चामडीं, कागद आणि साखर तयार करणें कांचकाम, चिनीमातीचें काम आणि कुंभारकाम, रासायनीक द्रव्यें करणें आणि गायनवादनाला लागणारीं वाद्यें शास्त्रीय रीत्या तयार करणें हे सर्व येथील मुख्य धंदे आहेत.

कापूस, लोंकर, रेशीम आणि निरनिराळ्या प्रकारच्या तागाच्या सुताचें कापड करण्याचे कारखाने बहुतेक सर्व बोहेमिआ, मोरेव्हिआ, सिलेसिआ आणि खालील आस्ट्रिया या ठिकाणीं आहेत. १९०२ सालीं २१८३७ कारखाने होते व त्यांत एकंदर काम करणारे लोक ३३७५१४ होते.

शुद्ध लोखंड तयार करून त्याचें निरनिराळें सामान तयार करण्याचे कारखाने बोहेमिया, मोरेव्हिया, सिलेसिया, अप्पर आणि लोअर आस्ट्रिया, स्टिरिया, कारिन्थिया या ठिकाणीं आहेत. याशिवाय निरनिराळ्या धातूंचें सामान तयार करण्याचे कारखाने निरनिराळ्या ठिकाणीं आहेत. येथें कांचेचे कारखाने फार जुने असून ते सर्व बोहेमियामध्यें आहेत.

बहुतेक व्यापार आगगाडीनें व देशांतील नद्यांवर चालतो. १९०० सालीं परदेशाशीं चालणाऱ्या व्यापारांत गुंतलेल्या व आस्ट्रो–हंगेरीच्या निशाणाखालीं चालणाऱ्या जहाजांची एकंदर वहनशक्ति १४४८७६४ टन होती आणि परदेशी निशाणाखालीं चालणाऱ्या नौकांची २६६५९१ टन होती.

रा ज्य का र भा र.—येथील राजाची सत्ता नियंत्रित किंवा पार्लमेंटच्या साह्यानें चालणारी असे व येथील राजा सम्राट होता. हॅप्सबर्ग–लोथ्रिंजेन घराण्यांतील जेष्ठ पुत्राकडे गादी वंशपरंपरेनें जात असे पण पुत्र नसल्यास वारसा-मुलींकडे जात असे. राजा रोमन कॅथोलिक चर्चचा असला पाहिजे असा नियम होता. आस्ट्रिआचा सम्राट हा हंगेरि-आचा देखील राजा होता. राजा आणि कांहीं सामान्य राज्यकारभार सोडून आस्ट्रिया हंगेरीपासून अगदीं स्वतंत्र होता. राजा सर्व सेनेचा वरिष्ठ सेनानायक असे. त्याला उमरावी वगैरे देण्याचा आणि गुन्हेगारांना क्षमा करण्याचा अधिकार असे. कार्यकारी सत्ता सर्वस्वी त्याचेचकडे असे. परंतु कायदेकानू करण्याची सत्ता लोकसभा ( रीचस्राट ) आणि राजा यांचे मध्यें वाटलेली असे. सर्व न्याय त्याचेच नांवाखालीं दिला जाई. कार्यकारी सत्ता चाल-विण्याचें काम राजानें मंत्रिमंडळावर सोपवून दिलेलें असे. या मंडळापैकीं एक मंडळाचा अध्यक्ष असे. दिवाणी काम करण्यासाठीं निरनिराळ्या प्रांतांत सुभेदार ( स्टथोल्डर ) नेमलेले असत. स्थानिक कारभार चालविण्यासाठीं प्रति-निधिक संस्था असत. कायदे करण्याची सत्ता रीचस्राट कडे सोपविलेली असे. रीचस्राटचे वरिष्ठसभा ( हेरेनहॉस ) आणि कनिष्ठसभा ( ॲबजिऑर्डनेटेन हॉस ) असे दोन

ग होते. सभासदांना वेतन आणि जाण्यायेण्याचा खर्च ळे. प्रत्येक बिल कायदा होण्यापूर्वी दोन्ही सभेंतून पसार ऊन त्याला राजाची संमति मिळावी लागे. रीचसाट ना दरवर्षी राजानें बोलाविलीच पाहिजे असा नियम ता.

ध र्म.—कायद्यानें मान्य केलेल्या सर्व धर्मपंथांना प्रार्थ- स्वातंत्र्य, कारभाराची देखरेख, व मालमत्तेची देखरेख, सर्व हक्क मिळाले होते. राजा हा रोमन कॅथोलिक ाचा असलाच पाहिजे अशी वहिवाट असल्यामुळें या ाचा धर्म राजधर्म झाला होता. राजघराणें या पंथाचें नुयायी असे तरी जेव्हां जेव्हां पोपनें आपलेकडे फाजील घेण्याचा घाट घातला तेव्हां तेव्हां त्याला या घराण्यानें डा घातलेला आहे. चर्चच्या मालमत्तेवर कर बसविणें, शपची नेमणूक करणें, आणि पोपनें स्वतःचा हुकूम हीर करण्यासाठीं राजाची परवानगी घेणें हे हक्क राजानें पल्याकडे ठेविले होते.

शि क्ष ण.—प्राथमिक शिक्षणाच्या शाळांची पद्धत येथें ाया थेरेसाचे वेळेपासून चालत आलेली आहे. हल्लींची क्षणपद्धति मे १४, सन १८६९ सालच्या शिक्षणाच्या यद्यान्वयें सुरू करण्यांत आली होती. या कायद्यानें रकारनें चर्चच्या अधिकारामधील शाळांचा कारभार काढून पले स्वाधीन करून घेतला व प्रत्येक जाती करितां प्राथमिक ाळा बांधून ती चालविण्याची जबाबदारी घेतली. ६ व्या र्षापासून चवदाव्या वर्षापर्यंत ( कांहीं ठिकाणीं बाराव्या र्षापर्यंत ) सर्वांनीं शाळेंत गेलेच पाहिजे. अशी सक्ति ती. धार्मिक शिक्षण देण्याचें काम गांवांतील उपाध्याकडे से. व मोठाल्या शाळांमधून मुद्दाम एखाद्या माणसाचीच मणूक केलेली असे. खासगी शाळा काढण्याचीहि लोकांना रवानगी होती. शिक्षण ( १ ) प्राथमिक ( २ ) माध्यमिक जिम्नाशिया ) ( ३ ) उच्च ( युनिव्हर्सिटि व कॉलेज ), ४ ) औद्योगिक ( टेक्निकल ), ( ५ ) खनिशास्त्र ( माइ- ंग ), ( ६ ) पशुवैद्यक व ( ७ ) विशिष्ट अशा निरनिराळ्या स्थांत दिलें जातें. माध्यमिक शिक्षणाच्या शाळा १९१५- ६ मध्यें ५२४ होत्या व प्राथमिक शाळा १९१२ मध्यें ३२४७ होत्या. १९१६-१७ सालीं आठ युनिव्हर्सिट्या सून साल्झबर्ग येथें एक नवीन निघणार होती. औद्योगिक ाळा १९१५-१६ मध्यें ६ ठिकाणीं होत्या.

न्या य.—न्याय देण्यासाठीं ९६३ कौंटी कोर्टें; ७४ ांतिक आणि जिल्हा कोर्टें; ९ वरिष्ठदर्जाचीं प्रांतिक कोर्टें; हएन्नामधील सर्वांत वरिष्ट कोर्ट आणि कसेशन ोर्ट, इतकीं कोर्टें होतीं. कार्यकारी खातीं आणि न्यायखातीं ागदीं एकमेकापासून स्वतंत्र होतीं. याशिवाय इतर विशिष्ट कारच्या विषयावर न्याय देणारीं कोर्टें होतीं (उ. व्यापार ष्कर वगैरे ). व्हिएन्नामध्यें आणखी एक राजाचें कोर्ट होतें ( साम्राज्य कोर्ट ). येथें न्यायाधिशांमधील मतभेद असलेले खटले येत.

ज मा ख र्च.—१९१३ सालीं जमा ३१३७४८१ हजार क्रौन व खर्च ३१३७२०२ हजार क्रौन ( २४ क्रौन म्हणजे १ पौंड ) होता व १९१८—१९ सालीं उत्पन्न ४८५४७८९ हजार क्रौन व खर्च २४३२११४० हजार क्रौन होता. प्रत्यक्ष कर, अप्रत्यक्ष कर, जकात, पोस्ट आणि टेलेग्राफ, रेल्वे, जंगलावरील आणि खाणीवरील कर व फायदा ह्या उत्पन्नाच्या मुख्य बाबी होत्या. १९१८ मध्यें ऑस्ट्रियाचें जादा कर्ज ५ खर्व ४ अब्ज क्रौन होतें. व त्याचें वार्षिक व्याज २ अब्ज क्रौन होतें.

आ ग गा ड्या.—देशांतील दळणवळणासाठीं आग- गाड्या आहेत. १८५४ सालीं सेम्मरिंग आगगाडीचा बांध- लेला रस्ता हा यूरोपांत डोंगरावरील आगगाडीचा पहिलाच रस्ता होय. १८२४ सालीं येथें पहिला रस्ता बांधण्यांत आला व त्यावरून पहिल्यानें घोड्यांची ट्रॅमगाडी चालवि- ण्यांत आली. वाफेची आगगाडी १८३७ पासून सुरू कर- ण्यांत आली. १९०५ सालीं येथें आगगाडीच्या रस्त्यांची एकंदर लांबी १३९९० मैल होती.

[सं द र्भ ग्रं थ—टर्नबुल—ऑस्ट्रिया; व्हिट्मन-ऑस्ट्रिया ( दि स्टोरी ऑफ नेशन्स ); वाइल्ड—ऑस्ट्रिया इटस लिट- ररी सायंटिफिक अँड मेडिकल इन्स्टिटयूशन्स; बेकर— ऑस्ट्रिया, हर पीपल अँड देअर होम लँडस; गयद—मॉडर्न ऑस्ट्रिया. हर रेशल अँड सोशल प्रॉब्लेम्स; स्टेट्स्मन्स इयर बुक ]

**आस्ट्रिया हंगेरी**—या नांवाचा देश महायुद्धापूर्वी मध्ययूरोपांत होता. महायुद्धानंतर हा एक देश न राहतां आतां त्यांत निरनिराळीं राष्ट्रें निर्माण झालीं आहेत, याच्या मर्यादा—पूर्वेस रशिआ आणि रुमानिया; दक्षिणेस रुमानिया, सर्व्हिआ, तुर्कस्तान, आणि मॉन्टेनिग्रो; पश्चिमेस, ॲड्रिआटिक समुद्र, इटली, स्वित्झरलंड, लिचटेनस्टीन आणि जर्मन साम्राज्य; उत्तरेस, जर्मन साम्राज्य आणि रशिया अशा होत्या. यूरोपच्या एकंदर क्षेत्रफळापैकीं आस्ट्रिया हंगारीनें सुमारें १६वा हिस्सा व्यापलेला होता. १९०५ सालीं २३९९७७ चौ. मैल क्षेत्रफळ होतें. आस्ट्रिया आणि हंगेरी हीं दोन्ही स्वतंत्र राज्यें एकाच राजाच्या छत्राखालीं होतीं. १९०१ सालीं येथील लोकसंख्या ४५४०५२६७ होती. बोस्निआ आणि हर्झेगोव्हिना येथील राज्यकारभार बर्लिनच्या १८७८ सालच्या तहाप्रमाणें आस्ट्रिया हंगेरीच्या हातीं ठेवला होता. व हे दोन्ही १९०९ सालीं आस्ट्रिया हंगेरीला जोडण्यांत आले होते.

रा ज्य का र भा र.—आस्ट्रिया आणि हंगेरी हे दोन्ही देश अगदीं स्वतंत्र आहेत, फक्त त्यांचा राजा आणि कांहीं बाब- तींत राज्यकारभार एक होता. परराष्ट्रीय राज्यकारभार, सैन्य

आहे व हे संख्येनें इतर वंशांच्या लोकांपेक्षां जास्त आहेत. जर्मन लोकांची संख्याहि बरीच असल्यामुळें त्यांचा येथें फार मोठा राष्ट्रसंघ आहे. सरकारी कामकाजांत व पुस्तकें छापण्यासाठीं जर्मन भाषेचा उपयोग करतात. येथील राज्यकारभारांत यांचें वर्चस्व होतें व येथील राज्याची स्थापना व भरभराट करण्याच्या कामीं यांचेंच विशेष अंग होतें. लॅटिन वंशांत इटालियन, लाडिनि आणि रुमानियन लोक येतात.

शे ती.—पूर्वीपासून शेती ही येथील लोकांची मोठी उत्पन्नाची बाब आहे. १९०० सालीं एकंदर लोकसंख्येपैकीं अर्धेअधिक लोक शेतीच्या धंद्यावर आपली उपजीविका करीत असत. एकंदर जमिनीचें क्षेत्रफळ ७४१०२००१ एकर होतें. त्यापैकीं शेंकडा ९४.२ एकर जमिनींतून उत्पन्न होतें. ९४.२ एकर जमिनीपैकीं ०.४ एकर जमिनींत तळीं आहेत व त्यांतून माशांचें उत्पन्न होतें. उत्पन्नाच्या बाबींच्या जमिनींपैकीं शेंकडा ३७.६ एकर लागवडींत आणण्याच्या उपयोगी पडेल अशी आहे. ३४.६ एकर जंगल, २५.२ एकर कुरणें, १.३ एकर बगीचे, ०.९ एकर द्राक्षाचे मळे आणि ०.४ एकर तळीं वगैरे. मुख्य पीक म्हणजे गहूं, राय, जव, ओट, मका, बटाटे, साखरेचें बीट, गाजर यांचें आहे. गहूं आणि मका यांचें पीक पुरेसें होत नाहीं म्हणून यांची बाहेरून आयात व्हावी लागते. जव आणि ओट यांचें पीक बाहेर पाठविण्याइतकें होतें.

जं ग ल.—उत्पन्नाचे जमिनीपैकीं ⅓ वर जमीन जंगलानें व्यापली आहे. जंगलांत शेंकडा ८५ झाडें उंच आणि इमारती लांकडाचीं आहेत. विशेषेंकरून ओक, पाईन, बीच, ॲश, एल्म आणि अशाच प्रकारचीं झाडें आहेत व यांचें बरेंच उत्पन्न होतें. येथें उत्तम प्रकारचे आणि पुष्कळ घोडे होतात.

ख नि ज द्र व्यें.—या बाबतींत यूरोपांतील पहिल्या प्रतीच्या देशांत या देशाची गणना केली जाते. प्लॅटीनम सोडून सर्व प्रकारच्या उपयुक्त धातू येथें सांपडतात. सोनें, चांदी तसेंच लोखंड, तांबें, शिसें आणि कथील हीं अतिशय आहेत. (पिट कोल आणि ब्रौनकोल) कोळशाच्या खाणींतून थरचे थर आहेत. जस्त, ॲंटिमनि, सोमल, (आर्सेनिक) कोबाल्ट, निकल, मॅंगनीज, बिसमथ क्रोमिअम, यूरेनिअम, टेल्युरिअम, गंधक, ग्रॅफाइट आणि असफाल्ट हीं थोड्या प्रमाणांत सांपडतात. याशिवाय संगमरवरी दगड, घरें शाकारण्याच्या पाट्या, जिप्सम, चिनी माती, मडक्यांची माती आणि जवाहीर यांच्याहि खाणी आहेत. १८२५ सालीं कोळशाचें उत्पन्न अजमासें १५०००० टन होतें आणि १९०० सालीं ३२५००००० टन झालें.

धं दे.—१९ साव्या शतकाच्या शेवटल्या सरासरी २५ वर्षांत येथें धंद्यांची आणि कारखान्यांची बरीच वाढ झाली; परंतु या वाढीचा प्रसार सर्व देशभर झाला नव्हता. निरनिराळ्या धंद्यांनां उपयोगी पडणाऱ्या जिनसा उदाहरणार्थ, काळसा, कच्चा माल वगैरे येथें विपुल असल्यामुळें त्यांची लवकर व जोरानें वाढ होण्याला येथील परिस्थिति अगदीं अनुकूल आहे. कापड विणणें, शुद्ध धातु तयार करणें मद्यार्क काढणें, चामडीं, कागद आणि साखर तयार करणें कांचकाम, चिनीमातीचें काम आणि कुंभारकाम, रासायनीक द्रव्यें करणें आणि गायनवादनाला लागणारीं वाद्यें शास्त्रीय रीत्या तयार करणें हे सर्व येथील मुख्य धंदे आहेत.

कापूस, लोंकर, रेशीम आणि निरनिराळ्या प्रकारच्या तागाच्या सुताचें कापड करण्याचे कारखाने बहुतेक सर्व बोहेमिआ, मोरेव्हिआ, सिलेसिआ आणि खालील आस्ट्रिया या ठिकाणीं आहेत. १९०२ सालीं २१८३७ कारखाने होते व त्यांत एकंदर काम करणारे लोक ३३७५१४ होते.

शुद्ध लोखंड तयार करून त्याचें निरनिराळें सामान तयार करण्याचे कारखाने बोहेमिया, मोरेव्हिया, सिलेसिया, अप्पर आणि लोअर आस्ट्रिया, स्टिरिया, कारिन्थिया या ठिकाणीं आहेत. याशिवाय निरनिराळ्या धातूंचें सामान तयार करण्याचे कारखाने निरनिराळ्या ठिकाणीं आहेत. येथें कांचेचे कारखाने फार जुने असून ते सर्व बोहेमियामध्यें आहेत.

बहुतेक व्यापार आगगाडीनें व देशांतील नद्यांवर चालतो. १९०० सालीं परदेशाशीं चालणाऱ्या व्यापारांत गुंतलेल्या व आस्ट्रो-हंगेरीच्या निशाणाखालीं चालणाऱ्या जहाजांची एकंदर वहनशक्ति १४४८७६४ टन होती आणि परदेशी निशाणाखालीं चालणाऱ्या नौकांची २६६५९१ टन होती.

रा ज्य का र भा र.—येथील राजाची सत्ता नियंत्रित किंवा पार्लमेंटच्या साह्यानें चालणारी असे व येथील राजा सम्राट होता. हॅप्सबर्ग-लोथ्रिंजेन घराण्यांतील ज्येष्ठ पुत्राकडे गादी वंशपरंपरेनें जात असे पण पुत्र नसल्यास वारसामुलीकडे जात असे. राजा रोमन कॅथोलिक चर्चचा असला पाहिजे असा नियम होता. आस्ट्रिआचा सम्राट हा हंगेरिआचा देखील राजा होता. राजा आणि कांहीं सामान्य राज्यकारभार सोडून आस्ट्रिया हंगेरीपासून अगदीं स्वतंत्र होता. राजा सर्व सेनेचा वरिष्ठ सेनानायक असे. त्याला उमरावी वगैरे देण्याचा आणि गुन्हेगारांनां क्षमा करण्याचा अधिकार असे. कार्यकारी सत्ता सर्वस्वी त्याचेचकडे असे. परंतु कायदेकानू करण्याची सत्ता लोकसभा (रीचस्राट) आणि राजा यांचे मध्यें वाटलेली असे. सर्व न्याय त्याचेच नांवाखालीं दिला जाई. कार्यकारी सत्ता चालविण्याचें काम राजानें मंत्रिमंडळावर सोपवून दिलेलें असे. या मंडळापैकीं एक मंडळाचा अध्यक्ष असे. दिवाणी काम करण्यासाठीं निरनिराळ्या प्रांतांत सुभेदार (स्टथोल्डर) नेमलेले असत. स्थानिक कारभार चालविण्यासाठीं प्रतिनिधिक संस्था असत. कायदे करण्याची सत्ता रीचस्राट कडे सोपविलेली असे. रीचस्राटचे वरिष्ठसभा (हेरेनहॉस) आणि कनिष्ठसभा (ॲबजिऑर्डनेटेन हॉस) असे दोन

भाग होते. सभासदांना वेतन आणि जाण्यायेण्याचा खर्च मिळे. प्रत्येक बिल कायदा होण्यापूर्वी दोन्ही सभेंतून पसार होऊन त्याला राजाची संमति मिळावी लागे. रीचस्राट सभा दरवर्षी राजानें बोलाविलीच पाहिजे असा नियम होता.

ध र्म.—कायद्यानें मान्य केलेल्या सर्व धर्मपंथांना प्रार्थनास्वातंत्र्य, कारभाराची देखरेख, व मालमत्तेची देखरेख, हे सर्व हक्क मिळाले होते. राजा हा रोमन कॅथोलिक पंथाचा असलाच पाहिजे अशी वहिवाट असल्यामुळें या पंथाचा धर्म राजधर्म झाला होता. राजघराणें या पंथाचें अनुयायी असे तरी जेव्हां जेव्हां पोपनें आपलेकडे फाजील हक्क घेण्याचा घाट घातला तेव्हां तेव्हां त्याला या घराण्यानें मोडा घातलेला आहे. चर्चच्या मालमत्तेवर कर बसविणें, बिशपची नेमणूक करणें, आणि पोपनें स्वतःचा हुकूम जाहीर करण्यासाठीं राजाची परवानगी घेणें हे हक्क राजानें आपल्याकडे ठेविले होते.

शि क्ष ण.—प्राथमिक शिक्षणाच्या शाळांची पद्धत येथें मराया थेरेसाचे वेळेपासून चालत आलेली आहे. हल्लींची शिक्षणपद्धति मे १४, सन १८६९ सालच्या शिक्षणाच्या कायद्यान्वयें सुरू करण्यांत आली होती. या कायद्यानें सरकारनें चर्चच्या अधिकारामधील शाळांचा कारभार काढून आपले स्वाधीन करून घेतला व प्रत्येक जाती करितां प्राथमिक शाळा बांधून ती चालविण्याची जबाबदारी घेतली. ६ व्या वर्षापासून चवदाव्या वर्षापर्यंत ( कांहीं ठिकाणीं बाराव्या वर्षापर्यंत ) सर्वांनीं शाळेंत गेलेंच पाहिजे. अशी सक्ति होती. धार्मिक शिक्षण देण्याचें काम गांवांतील उपाध्याकडे असे. व मोठाल्या शाळांमधून मुद्दाम एखाद्या माणसाचीच नेमणूक केलेली असे. खासगी शाळा काढण्याचीहि लोकांना परवानगी होती. शिक्षण ( १ ) प्राथमिक ( २ ) माध्यमिक ( जिम्नाशिया ), ( ३ ) उच्च ( युनिव्हर्सिटि व कॉलेज ), ( ४ ) औद्योगिक ( टेक्निकल ), ( ५ ) खनिशास्त्र ( माइनिंग ), ( ६ ) पशुवैद्यक व ( ७ ) विशिष्ट अशा निरनिराळ्या संस्थांत दिलें जातें. माध्यमिक शिक्षणाच्या शाळा १९१५–१६ मध्यें ५२४ होत्या व प्राथमिक शाळा १९१२ मध्यें २३२४७ होत्या. १९१६–१७ सालीं आठ युनिव्हर्सिट्या असून साल्झबर्ग येथें एक नवीन निघणार होती. औद्योगिक शाळा १९१५–१६ मध्यें ६ ठिकाणीं होत्या.

न्या य.—न्याय देण्यासाठीं ९६३ कौंटी कोर्टें; ७४ प्रांतिक आणि जिल्हा कोर्टें; ९ वरिष्ठदर्जाचीं प्रांतिक कोर्टें; व्हिएन्नामधील सर्वांत वरिष्ठ कोर्ट आणि कसेशन कोर्ट, इतकीं कोर्टें होतीं. कार्यकारी खातीं आणि न्यायखातीं अगदीं एकमेकांपासून स्वतंत्र होतीं. याशिवाय इतर विशिष्ट प्रकारच्या विषयावर न्याय देणारीं कोर्टें होतीं (उ. व्यापार लष्कर वगैरे ). व्हिएन्नामध्यें आणखी एक राजाचें कोर्ट होतें ( साम्राज्य कोर्ट ). येथें न्यायाधिशांमधील मतभेद असलेले खटले येत.

ज मा ख र्च.—१९१३ सालीं जमा ३१३७४८१ हजार क्रौन व खर्च ३१३७२०२ हजार क्रौन ( २४ क्रौन म्हणजे १ पौंड ) होता व १९१८—१९ सालीं उत्पन्न ४८५४७८९ हजार क्रौन व खर्च २४३२११४० हजार क्रौन होता. प्रत्यक्ष कर, अप्रत्यक्ष कर, जकात, पोस्ट आणि टेलेग्राफ, रेल्वे, जंगलावरील आणि खाणीवरील कर व फायदा ह्या उत्पन्नाच्या मुख्य बाबी होत्या. १९१८ मध्यें ऑस्ट्रियाचें जादा कर्ज ५ खर्व ४ अब्ज क्रौन होतें. व त्याचें वार्षिक व्याज २ अब्ज क्रौन होतें.

आ ग गा ड्या.—देशांतील दळणवळणासाठीं आगगाड्या आहेत. १८५४ सालीं सेम्मरिंग आगगाडीचा बांधलेला रस्ता हा यूरोपांत डोंगरावरील आगगाडीचा पहिलाच रस्ता होय. १८२४ सालीं येथें पहिला रस्ता बांधण्यांत आला व त्यावरून पहिल्यानें घोड्यांची ट्रॅमगाडी चालविण्यांत आली. वाफेची आगगाडी १८३७ पासून सुरू करण्यांत आली. १९०५ सालीं येथें आगगाडीच्या रस्त्यांची एकंदर लांबी १३९९० मैल होती.

[सं द र्भ ग्रं थ—टर्नबुल—ऑस्ट्रिया; व्हिट्मन-ऑस्ट्रिया ( दि स्टोरी ऑफ नेशन्स ); वाइल्ड—ऑस्ट्रिया इट्स लिटररी सायंटिफिक अँड मेडिकल इन्स्टिट्यूशन्स; बेकर—ऑस्ट्रिया, हर पीपल अँड देअर होम लँड्स; गयद—मॉडर्न ऑस्ट्रिया, हर रेशल अँड सोशल प्राब्लेम्स; स्टेट्स्मन्स इयर बुक ]

**आस्ट्रिया हंगेरी**—या नांवाचा देश महायुद्धापूर्वी मध्ययूरोपांत होता. महायुद्धानंतर हा एक देश न राहतां आतां त्यांत निरनिराळीं राष्ट्रें निर्माण झालीं आहेत, याच्या मर्यादा—पूर्वेस राशिआ आणि रुमानिया; दक्षिणेस रुमानिया, सर्व्हिआ, तुर्कस्तान, आणि मॉन्टेनिग्रो; पश्चिमेस, ॲड्रिआटिक समुद्र, इटली, स्वित्झरलंड, लिचटेनस्टान आणि जर्मन साम्राज्य; उत्तरेस, जर्मन साम्राज्य आणि राशिया अशा होत्या. यूरोपच्या एकंदर क्षेत्रफळापैकीं आस्ट्रिया हंगारीनें सुमारें १६वा हिस्सा व्यापलेला होता. १९०५ सालीं २३९९७७ चौ. मैल क्षेत्रफळ होतें. आस्ट्रिया आणि हंगेरी हीं दोन्ही स्वतंत्र राज्यें एकाच राजाच्या छत्राखालीं होतीं. १९०१सालीं येथील लोकसंख्या ४५४०५२६७ होती. बोस्निआ आणि हर्झेगोव्हिना येथील राज्यकारभार बर्लिनच्या १८७८ सालच्या तहाप्रमाणें आस्ट्रिया हंगेरीच्या हातीं ठेवला होता. व हे दोन्ही १९०९ सालीं अस्ट्रिया हंगेरीला जोडण्यांत आले होते.

रा ज्य का र भा र.—अस्ट्रिया आणि हंगेरी हे दोन्ही देश अगदीं स्वतंत्र आहेत, फक्त त्यांचा राजा आणि कांहीं बाबतींत राज्यकारभार एक होता. परराष्ट्रीय राज्यकारभार, सैन्य

आणि जमाखर्च या तिन्ही गोष्टींत दोन्ही देशांचा कारभार एक होता.

एकसत्ताक राज्यपद्धतीच्या सामान्य कारभाराला लागणारा खर्च ऑस्ट्रिया आणि हंगेरी या दोहोंमध्यें वांटला जात असे. या खर्चापैकीं कोणी किती करावयाचा हें अगोदरच कांहीं वर्षांकरितां ठरविण्यांत येत असे. त्याप्रमाणें १८९७ पासून १९०७ जुलैपर्यंत शंभरांपैकीं आस्ट्रियानें ६६ $\frac{46}{49}$ वा हिस्सा आणि हंगेरियानें ३३ $\frac{3}{49}$ वा हिस्सा द्यावयाचा असें ठरविण्यांत आलें होतें. १९०७ पासून पुढें हंगेरीनें ३६.४ वा हिस्सा द्यावा असें ठरविण्यांत आलें. या खर्चाला संमति देण्याचा अधिकार दोन्ही राष्ट्रांनीं निवडलेल्या कांहीं लोकांच्या सभेकडे असे.

लष्कर.—या दोन्ही ठिकाणची लष्करीपद्धत एकसारखीच होती. या देशांचें एक सामायिक सैन्य असून प्रत्येकाचें याशिवाय निरनिराळें सैन्य असे. सामान्य फौज समायिक असे. तिच्यावर एक संयुक्त प्रधान नेमलेला असे व प्रत्येकाच्या निरनिराळ्या सैन्यावर निरनिराळा प्रधान असे. लष्करी खात्याच्या देखरेखीसाठीं या एकछत्रीराज्यपद्धतीचे १६ लष्करी भाग केले होते आणि १०८ आणखी निराळे भाग केले होते (१०५ फौजे करितां आणि तीन आरमारा करितां).

तटबंदीचीं ठिकाणें:—मुख्य तटबंदीचीं ठिकाणें क्रॅको आणि क्षेमिसल गॅलिशिआमध्यें, कोमारोन पेटरव्हारड, ओअरड, टेमेस्व्हार; सेराजिवो, मोस्टर आणि बिलेक बोस्निआ हर्झेगोविना प्रांतांत; ॲड्रिआटिक समुद्र किनाऱ्यावरील पोला हें आरमारी बंदर; त्याचप्रमाणें ट्रीस्ट, झर आणि कॅटारो हीं होत.

व्यापार—ज्याप्रमाणें आस्ट्रिया आणि हंगेरी यांचा कांहीं बाबतींत राज्यकारभार एक असे तसा त्यांच्या व्यापारांतहि कांहीं कारभार एकत्र असे. उदाहरणार्थ व्यापार विषयक जकाती वगैरे बाबी, उत्पन्नावरील कर, चलन, आस्ट्रोहंगेरियन पेढी व ज्यांत दोहोंचे हितसंबंध निगडित आहेत अशा रेल्वे वगैरे.

आयातीचा मुख्य माल.—हा म्हणजे कापूस आणि कापसाचा माल; लोंकर आणि लोंकरीचा माल; रेशीम आणि रेशमी माल; कॉफी, तंबाखू आणि धातु हा होता.

निर्गतीचा माल.—लांकूड, साखर, गुरें, कांच आणि कांचसामान, लोखंड आणि लोखंडीसामान, अंडीं, कडधान्य, वस्त्रसामग्री, भपकेदार माल, मातीचें कुंभारकाम आणि चामड्यांचें सामान.

या दोन्ही राष्ट्रांची एक 'आस्ट्रोहंगेरिअन बँक' आहे हिची १८१६ मध्यें स्थापना झाली व तिलाच फक्त बँक नोटा काढण्याचा अधिकार असे.

इतिहास.—हॅब्स्बर्ग या घराण्यांतलि राजे इसवी सन १८०४ पासून आस्ट्रियाचे बादशहा झाले. त्या सालीं होली रोमन बादशहांपैकीं शेवटचा बादशहा फ्रान्सिस यानें आपल्याला आस्ट्रियाचा बादशहा असें म्हणवून घेतलें. परंतु 'आस्ट्रियाचे बादशहा' ही पदवी फक्त नांवाचीच होती. कारण, हॅब्स्बर्ग घराण्याचा इतर लहान लहान राज्यांशीं फारसा संबंध आलाच नाहीं. व त्यांनीं 'बादशहा'' हा किताबहि कबूल केला नाहीं; व त्या बादशहाची सत्ताहि फार नव्हती; ते फक्त नामधारी बादशहा होते.

डॅन्यूब नदीच्या तीराजवळ एक लहानसा प्रदेश आहे, तेंच आस्ट्रियाचें उगमस्थान होय. या प्रदेशानेंच फ्रँक लोकांच्या राज्याचें स्लाव्ह लोकांपासून रक्षण केलें. याच प्रदेशाला ऑस्ट्रीरिच् (आस्ट्रिया) म्हणजे पूर्वेकडचें राज्य असें म्हणत. याच प्रदेशाची हळू हळू वाढ होऊन आस्ट्रिया हंगेरीचें साम्राज्य बनलें. बेबनबर्ग घराण्यानें या प्रदेशाची बरीच वाढ करून त्याला बळकटी आणिली. व नंतर हॅब्सबर्ग घराण्यानें आसपासच्या प्रदेशावरहि आपला ताबा बसविला. परंतु आस्ट्रियाच्या या प्रगतीनें यूरोपमध्यें आस्ट्रियास विशेष महत्त्व मिळालें नाहीं. स्लाव्ह लोकांना जर्मनींत न येऊं देण्याच्या कामीं आस्ट्रियाचा उपयोग झाला. ऑस्ट्रियामध्यें टयूटन व स्लाव या लोकांच्या नेहमीं स्वाऱ्या होत. याचमुळें आस्ट्रियाच्या इतिहासाचें यूरोपमध्यें महत्त्व आहे.

हल्लीं ज्याला 'आस्ट्रिया' असें म्हणतात, तेथें ख्रिस्ती शकापूर्वी तौरिस्की किंवा नॉरिसी या जातीचे लोक रहात असत; इ. स. पूर्वी रोमन लोकांनीं यांना जिंकलें. डॅन्यूब नदीच्या उत्तरेकडे, मारकोमनी क्वादि जातीचे लोक रहात असत; व हेहि रोमन लोकांशीं नेहमीं भांडत असत. ख्रिस्ती धर्माचा थोडाबहुत प्रसार येथें झाला, परंतु रोमन बादशहांच्या दौर्बल्यामुळें, रानटी लोकांनीं आस्ट्रियास बराच त्रास दिला; व हूण लोकांनीं तर बरेच हल्ले केले. इ. स. ५९० च्या सुमारास येथें स्लेव्होनिक लोक रहात होते. या लोकांचा अव्हार लोकांच्या राज्यामध्यें समावेश होत असे. या अव्हार लोकांचा इ. स. ८०५ त पराभव होऊन यांचा देश फ्रँक लोकांच्या साम्राज्याखालीं आला.

ओटो दि ग्रेट हा आस्ट्रियाचा खरा संस्थापक होय. इ. स. ९७६ त दुसऱ्या ओटोनें बेबनबर्ग घराण्यांतील, लिओपोल्ड यास आस्ट्रियाचें राज्य दिलें. लिओपोल्ड व त्याचे वंशज यांनीं १२४६ पर्यंत राज्य करून आस्ट्रियाची स्थिति बरीच सुधारली. यावेळीं व्हिएन्ना हें राजधानीचें ठिकाण होतें. याच सालीं, जर्मनींत शांतता रहावी या हेतूनें पहिल्या फ्रेड्रिकनें, आस्ट्रिया देश हा एक स्वतंत्र ड्यूक नेमून त्याच्या स्वाधीन केला व त्याला महत्त्वाचे हक्कहि दिले. बादशहानें बोलाविलें असतां त्याच्या भेटीस जाणें व सैन्य पाठविणें या गोष्टी त्या ड्यूकला कराव्या लागत. ड्यूक लिओपोल्डनें (दुसरा) लॉर्ड ऑफ कार्निओला हें नांव

धारण केलें. १२४६ त बेबनबर्ग घराण्याचा शेवट झाला. त्यावेळीं अस्ट्रियाची मर्यादा वाढलेली असून, एकंदर स्थितीहि समाधानकारक होती. ड्यक लिओपोल्ड (दुसरा) यानें ११९४ पासून १२३० पर्यंत राज्य केलें; याच्यावेळीं अस्ट्रियाची फार भरभराट झाली; तो व त्याचे वंशज यांनीं बहुतेक स्वतंत्रपणें राज्य केलें; बादशहानें तिकडे विशेष लक्ष दिलें नाहीं.

बेबनवर्ग घराणें बहुधा बादशहाशीं एकनिष्ठपणानें वागत असे. दुसऱ्या लिओपोल्डचें बादशहाशीं वैमनस्य होतें; परंतु लवकरच त्यांचा समेट झाला; परंतु ड्यक फ्रेड्रिक (दुसरा) याचें व बादशहाचें वितुष्ट येऊन बादशहानें ड्यकला बहिष्कृत केलें व १२३६ त अस्ट्रियावर स्वारी करून पूर्णपणें तो देश आपल्या ताब्यांत आणिला. पण थोड्याच काळानंतर ड्युकनें आपला देश पुन्हां मिळविला; पुढें १२४६ त त्याचा खून होऊन वेबनबर्ग घराण्याचा शेवट झाला!

आ स्ट्रि या ब द्द ल तं टा.—अस्ट्रिया व स्टीरिया याबद्दलच्या वारसाहक्काच्या बाबतींत बादशहा व पोप यांमध्यें तंटा झाला; शेवटीं बोहेमियाचा राजपुत्र, ओताकर यास ड्यूक नेमण्यांत आलें; यानें आपल्या राज्याची व्यवस्था उत्तम प्रकारें ठेविली; व राज्यविस्तारहि बराच केला; जर्मनीची गादी मिळविण्याची त्याला महत्त्वाकांक्षा होती. परंतु इ. स. १२७३ त रुडॉल्फ हा जर्मनीचा राजा झाला; त्याचें ओताकरशीं वैर पडून, लढाई झाली; त्यांत ओताकरचा पराभव झाल्यामुळें, त्याला अस्ट्रियांतून घालवून देण्यांत आलें; व अस्ट्रियाचा कारभार रुडाल्फच्या मुलाकडे आला; अस्ट्रियाच्या ड्यूकांपैकीं चौथा ड्यूक रुडाल्फ हा अतिशय प्रसिद्ध आहे. त्यानें व्हिएन्ना येथें १३६५ त एक विश्वविद्यालय काढिलें; आस्ट्रिया स्वतंत्र व्हावा अशी त्याची इच्छा होती; त्यानें आपली राज्यमर्यादा बरीच वाढविली; तो मेल्यानंतर त्याच्या लिओपोल्ड व आल्बर्ट या भावांनीं तो देश वांटून घेतला. पुढें रुडॉल्फच्या वंशजांपैकीं, पांचवा आल्बर्ट हा १४३८ त जर्मनीचा राजा झाला,व त्यास पुढें हंगेरी व बोहेमिया हीं राज्येंहि मिळालीं; परंतु त्याच्या मरणानंतर त्याच्या सर्व राज्यांत अव्यवस्था झाली व हॅब्स्बर्ग घराणें अगदीं मोडकळीस आलें. परंतु पहिल्या मॅक्झिमीलिअन बादशहानें आस्ट्रियाचा सर्व मुलख आपल्या ताब्यांत आणिला. त्यानें आस्ट्रियांत उत्तम प्रकारची व्यवस्था केली.

यूरोपीय मध्ययुगाच्या शेवटीं ऑस्ट्रियाचा बराच विस्तार झाला; परंतु त्या मानानें त्याची अंतःस्थिति चांगली नव्हती. मॅक्झिमीलिअननें एकीकरणाचें काम केलें होतें,त्यांत आणखी दोन गोष्टींची भर पडली. (१) यूरोपच्या आग्नेय दिशेकडे तुर्कांची होत असलेली प्रगति व (२) ऱ्हाइन नदीवरील हॅब्स्बर्ग घराण्याच्या देशाचा नाश. पहिल्या गोष्टीमुळें निरनिराळे देश स्वसंरक्षणासाठीं एकत्र झाले व दुसरीमुळें हॅब्स्बर्ग पूर्वेकडे आपला विस्तार करण्याचा विचार करूं लागले. मॅक्झिमीलिअननंतर स्पेनच्या चार्लस बादशहाकडे आस्ट्रियाचा कारभार आला; त्यानें आपला भाऊ फर्डिनंड यास आस्ट्रिया, बोहेमिया व हंगेरी हे देश दिले; परंतु १५२६ ते १६९९ पर्यंत हंगेरीचा बहुतेक भाग तुर्कांकडे होता. पांचव्या चार्लस् बादशहाला तुर्कांपासून हंगेरीची सुटका करितां आली नाहीं; त्याचा भाऊ फर्डिनंड (१५५६–१५६४)यानें अर्वाचीन हॅब्स्बर्गआस्ट्रियन साम्राज्याची स्थापना केली. दुसऱ्या मॅक्झिमीलिअनचे वेळीं राज्यांत शांतता होती. तुर्क लोकांचें वर्चस्व कायम होतें. दुसऱ्या रुडॉल्फच्या वेळीं जिकडे तिकडे अव्यवस्था व दंगेधोपे चालू होते. इ. स. १६०६ त मॅथिअस याच्या हातीं मुख्य कारभार देण्यांत आला; परंतु त्याच्या हातून नीट व्यवस्था झाली नाहीं व बोहेमिया स्वतंत्र झाला.

दुसऱ्या फर्डिनंडनें प्रॉटेस्टंट पंथ मोडून टाकण्याचा प्रयत्न केला; हा १६१८ त बोहेमियाचा राजा झाल्यावर बोहेमियांत जेसुइट लोकांचा अंमल बसविण्याचा यानें निश्चय केला; व यामुळेंच "तीस वर्षांच्या युद्धास" सुरुवात झाली (१६१८). फर्डिनंडच्या अंमलाखालीं इ. स. १६३० पर्यंत ऑस्ट्रियाची भरभराट झाली; परंतु त्या सालीं ऑस्ट्रियास उतरती कळा लागली. इ. स. १६३५ त त्या युद्धांत फ्रान्स सामील झाल्यामुळें त्या युद्धाचें धार्मिक स्वरूप जाऊन त्यास राजकीय स्वरूप प्राप्त झालें. या युद्धानें ऑस्ट्रियाचें फार नुकसान झालें. "होली रोमन" साम्राज्याचे अनेक विभाग झाले; हॅब्स्बर्ग घराण्यांतील राजे साम्राज्याचे हिताहित न पाहतां फक्त ऑस्ट्रियाकडेच लक्ष्य पुरवूं लागले. लिओपोल्डनें (१६५७–१७०५) एकंदर राज्यकारभाराचें धोरण निश्चित केलें. याच्या कारकीर्दींत तुर्कांचा पुरा मोड होऊन पूर्वेकडे ऑस्ट्रियाचा अंमल कायम झाला. लिओपोल्डनें शिक्षणास बरेंच उत्तेजन दिलें; व विश्वविद्यालयें स्थापन केलीं. लिओपोल्ड १७०५ मध्यें वारला. नंतर जोसेफ आला (१७०५–११) जोसेफनंतरचा राजा सहावा चार्लस होय. जोसेफच्या कारकीर्दींत "स्पानिशवारशा"ची लढाई (पहा) सुरू झाली ती युट्रेक्टच्या तहानें संपली.

युट्रेक्टतहानें (१७१४) बुर्बोन घराण्याकडे स्पेन राहिला. व स्पॅनिश नेदरलंड, सार्डिनिआ व नेपल्स हे देश ऑस्ट्रियास मिळाले. अठराव्या शतकाच्या आरंभीं आस्ट्रियाची सत्ता बरीच वाढली. व एकंदर परिस्थिति समाधानकारक दिसत होती; तरी पण सुरळीतपणें राज्य चालविण्याच्या बाबतींत पुष्कळ अडचणी होत्या. या सर्व अडचणींना तोंड देऊन राज्यशकट चालविणें म्हणजे सोपें काम नव्हे व त्याला, चांगल्या अनुभवी व बुद्धिमान मुत्सद्याची आवश्यकता असते. परंतु चार्लस (सहावा) (१७११–१७४०) याच्या अंगीं मुत्सद्दीपणा नसल्यामुळें. तो वारल्याबरोबर, सर्व राष्ट्रांस आस्ट्रियाबद्दल लोभ सुटला.

तुर्क लोकांबरोबर चार्लसला युद्ध करावें लागलें (१७३८-३९) व त्यांत त्याचा पराभव झाल्यामुळें आस्ट्रियाची स्थिति फारच शोचनीय झाली.

अशा स्थितींतहि चार्लसच्या मरणानंतर त्याची मुलगी मराया थेरिसा हिनें मोठ्या धैर्यानें व दृढ निश्चयानें शत्रूंशीं टक्कर देऊन आस्ट्रियाचा बचाव केला; परंतु प्रशियानें आस्ट्रियापासून सायलेशिया प्रांत घेतला. मराया थेरिसानें आस्ट्रियाचें प्रथमतः एकीकरण केलें. हिच्या वेळीं जर्मन भाषा सर्व सरकारी खात्यांत वापरण्यांत येऊं लागली. हिच्या कारकीर्दीत अनेक सामाजिक व धार्मिक सुधारणा घडून आल्या शिक्षणपद्धतींत अनेक फेरबदल करण्यांत आले व विश्वविद्यालयांत नवीन विषय ठेवण्यांत आले.

यानंतर आलेला दुसरा जोसेफ हा रूसोचा अनुयायी होता; तो क्रांतिवादी होता; उपाध्याय वर्गाला त्यानें पूर्णपणें आपल्या अंमलाखालीं आणून, रोमशीं असलेला सर्व संबंध तोडून टाकिला. लोकांस सक्तीनें लष्करांत दाखल करण्याची पद्धत त्यानें सुरू केली. यामुळें लोकांचीं मनें क्षुब्ध झालीं. व जिकडे तिकडे बंडें होऊं लागलीं. बव्हेरिया प्रांत मिळविण्यासाठीं त्यानें खटपट चालू केली, परंतु त्यांतहि त्यास यश आलें नाहीं. तो १७९० त मरण पावला.

लिओपोल्ड ( दुसरा ) हा योग्य मनुष्य होता. त्यानें राज्यांत सुव्यवस्था केली. १७९१ तुर्क लोकांबरोबर तह होऊन जिकडे तिकडे शांतता झाली.

नेपोलियननें जर्मनींत ढवळाढवळ केल्यामुळें आस्ट्रिया व जर्मन संस्थानें यांमध्यें बरीच क्रांति घडून आली. इ. स. १८०४ त फ्रान्सिस ( दुसरा )यानें ' आस्ट्रियाचा बादशहा ही पदवी धारण केली. परंतु दोन वर्षांनीं त्याचा पराभव झाल्यामुळें, व्हेनिस व टिरोल हे प्रांत आस्ट्रियाच्या ताब्यांतून गेले. जर्मनीचे अनेक विभाग होऊन फ्रान्सिसनें बादशहा ही पदवी सोडून दिली व होली रोमन साम्राज्याचा शेवट झाला ( १८०६ ). व्हिएन्नाच्या तहानें आस्ट्रियाचा बराच पाणउतारा झाला ( १८०९ ) परंतु रशियन स्वारींत नेपोलियन यास अपयश आल्यामुळें आस्ट्रियानें आपली हानि भरून काढिली व नेपोलियनचा सूड उगविला.

नेपोलियनचा पाडाव करण्यांत आस्ट्रियानें बराच भाग घेतल्यामुळें, नेपोलियननें नाहींशी केलेली यूरोपची शक्तिसमता कायम ठेवण्यासाठीं, व्हिएन्ना येथेंच महापरिषद भरविण्यांत आली ( १८१४ ).

दुसऱ्या फ्रान्सिस नंतर आस्ट्रियाचा राज्यकारभार मेटरनिक याच्या हातांत आला. तो मोठा महत्त्वाकांक्षी होता. सद्यस्थितींत एकदम फेरबदल करून लोकांचीं मनें क्षुब्ध न करितां फक्त आवश्यक अशा सुधारणा हळु हळु केल्या जाव्या हें त्याचें मुख्य तत्त्व होतें. मेटरनिकचा कारभार एकंदरींत यशस्वी झाला. व्हिएन्ना परिषदेनंतर १५ वर्षेपर्यंत यूरोपांत शांतताभंग झाला नाहीं; व १८३० सालांतील पॅरिसच्या राज्यक्रान्तीचाहि ऑस्ट्रियावर कांहीं एक परिणाम झाला नाहीं. त्या नंतर गादीवर आलेला फर्डिनंड ( पहिला ) हा लोकप्रिय होता; परंतु तो राज्यकारभार करण्यास नालायक असल्यामुळें, एक प्रतिनिधिमंडळ नेमण्यांत आलें; परंतु त्या मंडळांतील आपापसांतील कलहांमुळें राज्यकारभारांत बराच गोंधळ माजून राहिला; व लोकांमध्यें असंतोष पसरला. गॅलिशियामध्यें शेतकरी लोकांनीं बंड केलें; कारण त्यांनां सरंजामी पद्धत नको होती. ही त्यांची मागणी कबूल केली गेली; परंतु तेवढ्यानें त्यांचें समाधान न होतां राज्यपद्धतींत पूर्ण बदल झाल्याशिवाय आपलीं दुःखें कमी होणार नाहींत, असें त्यांस वाटून, राज्यक्रान्ति करण्यासाठीं त्यांनीं बंड केलें. राष्ट्रीय पक्षाचे लोक व हे शेतकरी एकत्र झाल्यामुळें आस्ट्रियामध्यें क्रान्ति घडून आली. मंत्रिमंडळाच्या सभागृहासभोंवतीं बंडखोर लोक जमून तेथें त्यांनीं दंगा केला. मध्यम वर्गाचे लोकहि बंडवाल्यांस सामील झाले. अशा प्रकारें बंडास राज्यक्रान्तीचें स्वरूप आलें. या बंडखोरांच्या कृत्यानें भिऊन मेटरनिक इंग्लंडमध्यें पळून गेला. मेटरनिकच्या पाडावाबरोबर, मध्ययूरोपांत सर्वत्र खळबळ उडून गेली. हंगेरी स्वतंत्र झाला. बोहेमियामध्येंहि नवीन राज्यपद्धति सुरू झाली. मोठा वादविवाद होऊन ता. ३१ आगष्ट १८४८ रोजीं सरंजामी पद्धतीचा व नोकरीचा कायदा रद्द करण्यांत आला. राज्यक्रान्तीचा हाच काय तो टिकाऊ परिणाम झाला. व अशा प्रकारें शेतकरी लोकांची इच्छा परिपूर्ण झाली.

स्लाव्ह लोक व साम्राज्यांतील पुराणमतवादी ( कॉन्झर्व्हेटिव्ह ) लोक यांचा जेलाकिच हा पुढारी झाला. इलीरिअन पक्षाचे आपण आहोंत असें त्यानें दर्शविलें व हंगेरियाशीं असलेलें दळणवळण बंद करून टाकिलें; परंतु व्हिएन्ना येथील बंडखोरांविरुद्ध मॅजीरची मदत येईल असें सरकारास वाटत असल्यामुळें सेनापति जेलाकिच याच्या कृत्याचा त्यानें निषेध करून राजद्रोहाच्या आरोपावरून त्यास सेनापतीच्या पदावरून काढून टाकण्यांत आलें. त्याचा अंतस्थ हेतू वाईट नव्हता; तो राजनिष्ठ होता. यामुळें पुनः लवकरच त्यास त्याची पूर्वीची जागा देण्यांत आली. लवकरच आस्ट्रिया व हंगेरी हे देश निरनिराळे झाले, जेलाकिच हा हंगेरीवर स्वारी करण्यासाठीं निघाला.

इकडे व्हिएन्ना येथें पुनः अस्वस्थता झाली. आमूलाग्र सुधारणापक्षाचें ( रॅडिकल ) सरकारशीं व स्लाव्ह लोकांशीं वितुष्ट पडलें. ज्याचें आस्ट्रियावर प्रेम असेल व ज्याला स्वातंत्र्य पाहिजे असेल त्यानें बादशहाला येऊन मिळावें असें फर्डिनंड बादशहानें जाहिर केलें. विन्डिस्ग्रेट्स यास सेनापति नेमण्यांत आलें; व लवकरच त्यानें व्हिएन्ना आपल्या हस्तगत करून घेतलें.

डिसेंबर १८४८ त फर्डिनंडनें राजीनामा दिल्यामुळें, फ्रान्सिस जोसेफ हा बादशहा झाला. साम्राज्यांतील सर्व

देश व सर्व लोक पुनः एका छत्राखालीं आणण्याचें जोसेफनें ठरविलें, बंडवाल्यांचा पुढारी व्हिलेगाज स्वाधीन झाल्याबरोबर, हंगेरियांतील बंड मोडलें व जर्मनींत आस्ट्रियाचें वर्चस्व स्थापण्यास संधि सांपडली.

इसवी सन १८५१ त ऑस्ट्रियामध्यें पुनः शांतता झाली. इसवी सन १८६३ त फ्रान्सिस जोसेफनें फ्रँकफोर्ट येथें सर्व राजांनां बोलाविलें होतें; तेव्हां लहान लहान संस्थानांत आस्ट्रियाचें वर्चस्व दिसून आलें, परंतु प्रशिया सामील झाल्याशिवाय सर्व लहान लहान संस्थानांत एकी होणें शक्य नाहीं हेंहि त्यावेळीं दृष्टोत्पत्तीस आलें. श्लेस्विग होल्टेन प्रश्नाच्या योगानें आस्ट्रिया व प्रशिया यांमध्यें उघडपणें वैमनस्य उत्पन्न होऊन १८६६ त आस्ट्रियाचा पाडाव झाला.

प्रागच्या तहानें आस्ट्रियाचा जर्मनीशीं असलेला संबंध नाहींसा झाला. आपण स्वतंत्र असावें असें हंगेरियन लोकांसहि वाटूं लागलें; व त्यांनीं बंड केलें. आस्ट्रियाचा व आपला कांहीं एक संबंध नाहीं असें हंगेरिअन लोकांस वाटलें. हंगेरीमध्यें निराळें पार्लमेंट व मांत्रिकमंडळ असावें, बादशहानें हंगेरीमध्यें फक्त राजा या नात्यानें राज्य करावें; प्रत्येक देशाचें जमाबंदखातें निराळें असावें, वगैरे गोष्टी निश्चित झाल्या. दोन्ही पार्लमेंटमधून निवडलेल्या साठ प्रतिनिधींनां दोन्ही देशांतील सामान्य प्रधान जबाबदार असावेत; व दोन्ही देशांतील सामान्य कामें या प्रतिनिधींवर सोंपविण्यांत यावीं असाहि ठराव झाला.

आस्ट्रिया व फ्रान्स यांचें सख्य होतें. इ. स. १८७२ त रशिया व आस्ट्रिया यांचेंहि सख्य झाल्यामुळें, सर्वत्र शांतता झाली. पण लवकरच बाल्कनमध्यें चळवळ सुरू झाली; बोस्निआ व हर्झिगोविना या ठिकाणीं झालेल्या बंडाचा आस्ट्रियावर परिणाम झाला. त्या ठिकाणचे अनेक लोक आस्ट्रियामध्यें येऊन राहूं लागले. तुर्कस्तानांतील ख्रिस्ती लोकांच्या हालअपेष्टांकडे दुर्लक्ष करणें आस्ट्रियाला शक्य नव्हतें; परंतु हंगेरियन लोक तुर्कांच्या बाजूचे असल्यामुळें ख्रिस्ती लोकांनां प्रत्यक्ष मदत करणें त्याला शक्य नव्हतें. रशियाचीहि तुर्कांनां मदत होती; रशियाचें वर्चस्व वाढूं देणें हेंहि आस्ट्रियाला धोक्याचें होतें. जर्मनीच्या मध्यस्थीमुळें तुर्कस्तान व आस्ट्रिया यांमध्यें कांहीं कालपर्यंत सलोखा राहिला; परंतु हें सख्य फार वेळ टिकलें नाहीं. ग्रेटब्रिटन या भांडणांत पडल्यामुळें, आस्ट्रियाचा बराच त्रास कमी झाला. बर्लिन परिषदेंत असें ठरलें कीं, बोस्निआ व हर्झिगोविना हे प्रांत तुर्कांकडे न ठेवितां, किंवा रशियाकडे जाऊं न देतां, आस्ट्रियानें आपल्या ताब्यांत घ्यावे.

इटालीमध्यें ‘ इरेडेंटिस्ट ’ या नांवाचा एक पक्ष होता. त्याचें असें म्हणणें होतें कीं आस्ट्रियाच्या ताब्यांत असलेल्या प्रांतांपैकीं ज्या प्रांतांत इटालियन भाषा चालते ते प्रांत इटलीला जोडण्यांत यावे; या कारणामुळें तेथें बरीच चळवळ झाली; परंतु लवकरच ही चळवळ बंद पडली.

इ. स. १८७९ त आस्ट्रिया व जर्मनी यांमध्यें सलोख्याचा तह होऊन त्यांत असें ठरलें कीं एकमेकांनीं एकमेकांनां मदत करावी. या वेळेपासून विशेष महत्त्वाकांक्षा न बाळगतां शांतता राखणें हें आस्ट्रिया हंगेरीचें धोरण होतें. बाल्कन स्टेटमध्यें व्यापार करून आपलें वर्चस्व राखणें, व रुमानिया, सर्व्हिया, बल्गेरिया वगैरे देशांशीं व्यापारासंबंधीं तह करणें हे आस्ट्रिया हंगेरीचे त्या वेळचे उद्देश होते.

एकंदर यूरोपमध्यें शांतता नसल्यामुळें व इतर देशांनीं आपलें लष्करी सामर्थ्य वाढविल्यामुळें, आस्ट्रियालाहि आपलें सैन्य वाढविणें आवश्यक झालें. इ. स. १८६८ त आस्टिया व हंगेरी या दोन्ही देशांत सक्तीचें लष्करी शिक्षण सुरू करण्यांत आलें; व प्रत्येक मनुष्यानें लष्करांत नोकरी केली पाहिजे असें ठरविण्यांत आलें. इ. स. १९०३ त आस्ट्रिया हंगेरीनें जर्मनी, इताली, बेल्जम व स्वित्झर्लंड या देशांशीं व्यापारसंबंधाचे तह केले. अशा प्रकारें १०९३ पर्यंत व्यापार सुरक्षितपणें चालला. या व्यवस्थेमुळें आस्ट्रियाची सांपत्तिक स्थिति सुधारली.

१९०३ ते १९०७ हा काल आस्ट्रिया हंगेरीच्या इतिहासांत महत्त्वाचा आहे. सॅदोवा येथें प्रशियानें इ. स. १८६६ त केलेला आस्ट्रियाचा पराभव, १८६७ त स्थापन झालेलीं दोन निराळीं राज्यें व १८७१ त नवीन जर्मन साम्राज्याची स्थापना या सर्व गोष्टींमुळें, आस्ट्रिया हंगेरीच्या खऱ्या इतिहासाला प्रारंभ झाला; परंतु १९०३ ते १९०६ पर्यंतच्या अडचणी व सर्वांनां मत देण्याचा अधिकार असला पाहिजे या तत्त्वाचा प्रसार, या दोन गोष्टींमुळें, आस्ट्रिया व हंगेरी यांमध्यें द्विदल राज्यपद्धतीवरील विश्वास उडाला व आस्ट्रिया हंगेरीच्या राज्यव्यवस्थेचें स्वरूप टिकाऊ आहे किंवा नाहीं हा प्रश्न उपस्थित झाला. एकोणिसाव्या शतकाच्या शेवटीं आस्ट्रिया व हंगेरी या दोन्ही देशांत मोठे आणीबाणीचे प्रसंग आले. आस्ट्रियाचा कारभार प्रधानमंडळाकडे असून, ते प्रधान नांवाला पार्लमेंटला जबाबदार होते; परंतु वस्तुतः ते फक्त बादशहालाच जबाबदार होते. अशा प्रकारें एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीं आस्ट्रियाची राज्यव्यवस्था फारशी समाधानकारक नव्हती, परंतु हंगेरीची व्यवस्था इतकी वाईट नव्हती. इ. स. १८९९ त प्रधानमंडळाची स्थापना झाली; परंतु उदारमतवादी पक्षाचें पुढारीपण कायम राहिलें. इ. स. १९०२ त हंगेरीचा मुख्य प्रधान झेल यानें आस्ट्रियन प्रधान कोरबर याच्याशीं व्यापारासंबंधाचा तह केला; व या तहाच्या तत्त्वांवरून, आस्ट्रिया हंगेरीनें जर्मनी, इटली वगैरे राष्ट्रांशीं व्यापारासंबंधीं तह केले. आस्ट्रिया व हंगेरी यांमधील हा तह फार महत्त्वाचा आहे; या तहाच्या योगानें

आस्ट्रिया हंगेरीचें वैमनस्य नाहींसें होऊन, त्याठिकाणीं शांतता होईल असें लोकांस वाटलें; परंतु ही आशा पुढें निष्फळ झाली.

इ. स. १९०५ त आस्ट्रिया हंगेरीनें जर्मनी व इटली या देशांशीं व्यापारासंबंधाचे तह केले. या तहांमुळें सांपत्तिक अडचणीपासून हंगेरीचा बचाव झाला व आस्ट्रियांशीं असलेल्या सहकारित्वापासून हंगेरीला आपला फायदा करून घेतां आला.

आस्ट्रिया व हंगेरी यांमध्यें एकमेकांविषयीं पुष्कळ दिवसपर्यंत असंतोष माजून राहिला होता. अखेरीस इ. स. १९०७ मध्यें त्यांचा सलोख्याचा तह झाला. आस्ट्रियाचा व हंगेरीचा संबंध तुटल्यास, व्यापाराच्या दृष्टीनें हंगेरीचें फार नुकसान होईल व आस्ट्रियामध्येंहि महागाई होऊन, तेथील कारखान्यांचें नुकसान होईल असें आढळून आल्यामुळें त्या दोन राष्ट्रांमध्यें १९०७ सालीं व्यापारासंबंधाचा व राज्यव्यवस्थेसंबंधाचा एक नवीन करार होऊन दोन्ही देशांत शांतता झाली.

इ. स. १८६७ पासून आस्ट्रियांतील शासनसंस्थेचा इतिहास.—हॅप्सबर्ग घराण्याच्या ताब्यांतील प्रदेशांपैकीं १८६७ च्या कराराप्रमाणें ज्या प्रदेशाचा समावेश हंगेरीच्या राजाच्या ताब्यांतील प्रदेशांत झाला नाहीं, त्या प्रदेशाला आस्ट्रिया हें नांव आहे. हंगेरी वेगळा झाल्यामुळें आस्ट्रियाची राज्यपद्धति ठरविणें भाग पडलें. यासाठीं अनेक प्रयोग करून पाहण्यांत आले. इ. स. १८६१ च्या फेब्रुवारींत राज्यकारभाराचे नवीन नियम करण्यांत आले. त्या नियमांप्रमाणें पार्लमेंटची योजना झाली, बड्या लोकांची सभा (हाऊस ऑफ लॉर्डस् ), राजघराण्यांतील पुरुष, कांहीं पगारी लोक, कांहीं पिढीजाद लोक व कांहीं प्रतिनिधी इतक्या लोकांचा समावेश पार्लमेंटमध्यें होत असे. मंत्रिमंडळाकडून प्रतिनिधींची निवड होत असे; हें मंत्रिमंडळ सहा वर्षांनीं निवडलें जात असे; परंतु ही पद्धति फार वेळ टिकली नाहीं, कारण भिन्न भिन्न देशांतील लोकांना भिन्न भिन्न नियमांची आवड असते. जी पद्धति लोअर आस्ट्रियाला संमत होती, ती गॅलिशिया व बोहेमिया यांनां पसंत पडली नाहीं. इ. स. १८६५ त फेब्रुवारी १८६१ ची राज्यपद्धति नाहींशी झाली; फक्त मंत्रिमंडळ कायम राहिलें. हंगेरीशीं करारनामा करण्यासाठीं इ. स. १८६७ सालीं समाईक पार्लमेंट बोलाविणें आवश्यक झालें.

स्लाव्ह व संयुक्तशासनपद्धतिपक्षीय लोकांनां द्विदलराज्यपद्धति पसंत नसल्यामुळें जर्मन लोकांचें आधिक्य असलेल्या पार्लमेंटनें राज्यकारभाराचे नियम ठरवावे, असें हंगेरियन लोकांचें मत होतें. बेल्क्रेडी या संयुक्तराज्यपद्धतीच्या पुरस्कर्त्यानें १८६७ त, १८६१ ची राज्यपद्धति मोडून मंत्रिमंडळाची निवडणूक करण्याचें ठरविलें. या मंत्रिमंडळानें पार्लमेंटचे सभासद निवडावयाचे असून त्या सभासदांकडे हंगेरीच्या प्रश्नांचा विचार करण्याचें काम होतें; परंतु जर्मन व उदारमतवाद्यांनीं असें सांगितलें कीं, १८६१ सालांतील राज्यपद्धति अद्यापि अस्तित्वांत असल्यामुळें पार्लमेंटनें फक्त आवश्यक फेरबदल करावे; हंगेरीशीं तह करूं नये, असें संयुक्तशासनपद्धतिवाद्यांनां वाटत असल्यामुळें अशा परिस्थितींत निवडलेलें पार्लमेंट हंगेरीशीं तह करण्याचें नाकारील असें बेल्क्रेडीला वाटलें; परंतु साम्राज्याला धोका येईल, असें ब्यूस्टला वाटल्यामुळें त्याला या भानगडींत पडावें लागलें. १८६१ सालांतील नियमाप्रमाणें पार्लमेंटच्या सभासदांची निवडणूक करण्याचें ब्यूस्टनें ठरविलें; परंतु संयुक्तशासनवाद्यांनां हें निवडणूक पसंत नव्हती, यामुळें निवडणुकींत त्यांनीं कांहीं एक भाग घेतला नाहीं व ते पार्लमेंटमध्यें गेले नाहींत; परंतु ब्यूस्टला इतर अनेक लोकांचा पाठिंबा असल्यामुळें त्याचें कार्य सिद्धीस गेलें. गॅलिशियाच्या पोल लोकांशीं तह करून ब्यूस्टनें त्यांनां आपल्या बाजूला वळविलें.

गॅलिशियाला स्वतंत्र प्रधान देण्याचें त्यानें ठरविलें, गॅलिशियासाठीं एक निराळें मंडळ स्थापण्याचें ठरवून जर्मनच्याऐवजीं पोलिश भाषेचा प्रसार करण्याचें ठरलें. या अटीवर गॅलिशियाच्या पोल लोकांनीं व्हिएन्ना येथें जाऊन हंगेरीशीं तह करण्याबद्दल मत देण्याचें कबूल केलें.

पार्लमेंटची बैठक भरल्यावर हंगेरीशीं केलेला तह मंजूर करण्यांत आला. नंतर कित्येक महत्त्वाचे कायदे करण्यांत आले, त्या कायद्यांच्या योगानें पार्लमेंटची सत्ता प्रस्थापित करण्यांत आली; इतर देशांप्रमाणेंच लोकांनां देण्यांत येणाऱ्या हक्कांचा व सवलतींचा विचार करण्यांत आला. पोल लोकांच्या वजनामुळें संयुक्तशासनपद्धतीच्या पुरस्कर्त्यांच्या इच्छेप्रमाणें त्यांस सवलती मिळाल्या. आस्ट्रियामध्यें राज्यनियमन करणाऱ्या सभेकडून प्रतिनिधींची निवडणूक होत नसून प्रत्येक देशांतील प्रतिनिधींकडून ती निवडणूक होत असे; परंतु हंगेरीमध्यें राज्यनियमन करणाऱ्या सभेकडूनच ही निवडणूक होत असे. या भेदामुळें हंगेरीपेक्षां आस्ट्रिया दुर्बल होता. इतकें झाल्यानंतर ब्यूस्टनें मुख्य प्रधानपदाचा राजीनामा दिला. नंतर बरगर व त्याच्या प्रधानमंडळाची नेमणूक झाली.

या प्रधानमंडळानें चर्चच्या अंमलापासून आस्ट्रियाची सुटका केली. १८५५ सालीं पोपशीं झालेल्या ठरावाच्या योगानें धर्मविषयक सर्वसत्ता चर्चकडे सोंपविलेली होती, परंतु नवीन प्रधानमंडळानें इ. स. १८६८ त चर्चचें वर्चस्व नाहींसें केलें.

या सुमारास बोहेमियन लोकांमध्यें आपापसांत कलह चालू होते. त्यांच्यामधील एका तरुणपक्षाला उमराववर्गाचें प्रभुत्व पसंत नव्हतें, प्रत्येकाला मताधिकार असावा, अशी त्याची इच्छा होती, मंत्रिमंडळांत आपला समावेश व्हावा व राजकीय सुधारणा करण्याचें कामीं जर्मन लोकांनां जाऊन आपण मिळावें अशी त्याची इच्छा होती. बोहेमियन लोकांचे

आणखी दोन पक्ष आपापसांत भांडत होते. या परिस्थितीमुळें उदारमतवाद्यांचें वर्चस्व झालें असतें; परंतु सरकारनें फेडरॅलिस्ट व क्लेरिकल या पक्षाच्या लोकांची मदत मागितल्यामुळें जर्मन उदारमतवाद्यांची सत्ता नष्ट झाली. १८७३ सालांतील व्यापारी क्रांतीचाहि त्यांच्यावर बराच परिणाम झाला.

काउंट टाफी या नांवाच्या प्रधानानें इ. स. १८७८ त बोहेमियन लोकांशीं सलोखा केला व त्यांनीं व्हिएन्ना येथें पार्लमेंटांत हजर रहाण्याचें कबूल केलें. सर्व पक्षांतील मवाळांच्या मदतीनें राज्यकारभार करण्याचें टाफी यानें ठरविलें. त्यानें सर्व पक्षांतील लोकांच्या प्रतिनिधींचा मंत्रिमंडळांत समावेश केला. तो कोणत्याहि विशिष्ट पक्षाचा नव्हता. ठरीव नियमाप्रमाणें त्यानें राज्यकारभार केला. वादविवादोत्पादक असे कायदे त्यानें विशेषतः केले नाहींत.

मोरॅव्हियाच्या कारखान्यांतील व गॅलिशिया येथील तेलाच्या खाणींतील मजुरांची स्थिति फार वाईट होती. त्यांनां फार वेळ काम करावें लागे; तेथील एकंदर परिस्थिति आरोग्याला हानिकारक असून अपघातांविरुद्ध कांहीं एक तरतूद केलेली नव्हती. इ. स. १८८३ मध्यें, कारखाने, खाणी वगैरे ठिकाणची पहाणी करण्यांत यावी असा कायदा करण्यांत आला; नंतर इ. स. १८८४ व १८८५ त पास झालेल्या कायद्याच्या योगानें, कामाच्या वेळां कमी करण्यांत आल्या; रविवारी सुटी देण्याबद्दल ठराव करण्यांत आला व स्त्रिया व मुलें यांनीं किती तास काम करावयाचें तेंहि ठरविण्यांत आलें. प्रत्येकानें आपल्या आयुष्याचा विमा उतरलाच पाहिजे असा कायदा इ. स. १८८७–१८८८ त करण्यांत आला. सरकारनें रेल्वे आपल्या ताब्यांत घ्याव्या असें ठरविण्यांत आलें. या सुधारणांमुळें व आयात मालावरील बसविलेल्या नवीन करामुळें, इ. स. १८८९ त आस्ट्रियाची सांपत्तिक स्थिति बरीच सुधारली.

दुसऱ्या जोसेफच्या वेळेपासून जर्मन ही सरकारी भाषा झालेली होती. सैन्यांत, कचेऱ्यांत वगैरे तीच भाषा चालत असून, कायदेहि त्याच भाषेंत लिहिलेले होते, यामुळें जर्मन भाषा फार महत्त्वाची झाली होती; फक्त इटालीमध्यें इटालियन भाषा चालत असे; परंतु इ. स. १८६९ त सर्व गॅलिशियांत पोलिश भाषेचा प्रसार करण्यांत आला; व त्या वेळेपासून जर्मन भाषा नाहींशीं होऊं लागली. इ. स. १८८० त असा ठराव झाला कीं, ज्या भाषेंत एखादें प्रकरण निकालासाठीं सरकारांत आलें असेल त्याच भाषेंत त्याचा निकाल सांगण्यांत यावा; चेक ( बोहेमियन ) भाषेचें महत्त्व वाढविणें हा या ठरावाचा उद्देश होता. चेक भाषा शिकविण्यासाठीं कित्येक शाळा स्थापन करण्यांत आल्या; १८८२ त प्रागच्या विश्वविद्यालयांतहि त्या भाषेचा शिरकाव झाल्यामुळें, जर्मन लोकांचें जुनें विश्वविद्यालय भ्रष्ट झालें असें जर्मन लोकांनां वाटलें. आपल्या भाषेचें वर्चस्व राखण्याचा त्यांनीं पुष्कळ प्रयत्न केला; पण त्यांत त्यांनां यश आलें नाहीं. प्रागला जर्मन युनिव्हर्सिटी स्वतंत्र आहे.

संयुक्त प्रधानमंडळ १८९५ त मोडल्यावर गॅलिशियाचा प्रसिद्ध गव्हर्नर बेदनी यास मुख्य प्रधान नेमण्यांत आलें; हें मंडळ कोणत्याहि विशिष्ट पक्षाचें नव्हतें. हंगेरीशीं तडजोड करणें हा त्याचा मुख्य उद्देश होता.

मत देण्याचा अधिकार अगदीं थोड्या लोकांनां असल्यामुळें, आस्ट्रियांतील समाजसत्तावाद्यांचा राजकीय बाबतींत फारसा प्रवेश झाला नाहीं. परंतु इ. स. १८८७ पासून ह्यांनां चांगले दिवस येऊं लागले; सर्व लोकांनां मताधिकार असावा अशी ते मागणी करूं लागले; मे महिन्याच्या पहिल्या तारखेस आस्ट्रियामध्यें मजूरपक्षाचा मोठा उत्सव करण्यांत येत असतो.

इ. स १८९७ त बेदनीनें असें प्रसिद्ध केलें कीं, एखादें प्रकरण ज्या भाषेंत सरकारांत आलें असेल त्याच भाषेंत त्याचा निकाल सांगितला जावा. सरकारी कचेऱ्यांतून चेक ( बोहेमियन ) भाषा सुरू करणें हा या कायद्याचा उद्देश होता; चेक भाषेंतून परिक्षा दिल्याशिवाय कोणालाहि सरकारी नोकरींत १९०३ च्या नंतर घेऊं नये असेंहि प्रसिद्ध करण्यांत आलें; परंतु जर्मन लोकांनीं या कायद्याचा जोरानें निषेध करून, तो कायदा रद्द होईपर्यंत स्वस्थ बसावयाचें नाहीं असें ठरविलें; यामुळें जिकडे तिकडे बंडाळी चालू झाली. बेदनीनें आपल्या जागेचा राजीनामा दिला. नंतर नवीन प्रधानानें जर्मनांची समजूत करण्याचा प्रयत्न केला, परंतु त्यांत त्याला यश आलें नाहीं;यामुळें त्यानेंहि राजीनामा दिला.नंतर थन हा प्रधान झाल्यावर त्यानें बोहेमियांत लष्करी कायदा अंमलांत आणिला. काउंट क्लेरी यानें भाषेसंबंधाचा कायदा रद्द करून तंटा मिटविण्याचा प्रयत्न केला; जर्मनांची इच्छा सफल झाली; परंतु चेक लोक त्यामुळें असंतुष्ट झाले. अखेरीस चेक व जर्मन या दोन्ही लोकांचा ज्यांत हितसंबंध आहे अशीं सार्वजनिक कामें करून त्या लोकांचा डॉ. व्हान कोर्बर या प्रधानानें समेट करण्याचें ठरविलें. परंतु या योगानेंहि हें भांडण मिटलें नाहीं.

इ. स. १९०५ त समाजसत्तावादी व मजूरपक्षाच्या लोकांनीं सर्वांनां आस्ट्रियांत मताधिकार असावा अशाबद्दल चळवळ चालू केली; चोवीस वर्षांपेक्षां अधिक वयाच्या व एक वर्षपर्यंत तेथें राहिलेल्या मनुष्यास मताधिकार असावा अशा अर्थाचें सुधारणापत्रक त्यांनीं प्रसिद्ध केलें. परंतु कांहीं लोक या ठरावाविरुद्ध होते; परंतु प्रसिद्ध प्रधान, बॅरन बेक यानें कित्येक पुढाऱ्यांच्या गांठी घेऊन मोठ्या चातुर्यानें हें सुधारणापत्रक १९०६ त पास करून घेतलें.

वरिष्ठ सभेनें एका मनुष्याला अनेक मतें असावीं अशी खटपट केली; परंतु ती व्यर्थ झाल्यावर १९०७ त त्या सुधारणापत्रकाचें कायद्यामध्यें रूपांतर झालें. याच सालीं झालेल्या निवडणुकींत लोकसत्तावाद्यांची सरशी झाली.

सर्वांकडून निवडल्या गेलेल्या कायदेमंडळाचें काम एक वर्षपर्यंत सुरळीत चाललें. परंतु एक वर्षानंतर बोस्निया, व हर्झिगोविना हे प्रांत खालसा करण्याबद्दल जो प्रश्न निघाला त्या योगानें इतर अंतर्गत कारभारांत मोठा व्यत्यय आला.

आ स्ट्रि य न सा म्रा ज्य ( १९०८–१९१८ ).—आस्ट्रियाचें सरकारी कागदपत्रांत नांव'राईशराठमध्यें प्रतिनिधी पाठविणारीं राज्यें व प्रदेश' असें होतें, परंतु लोकांमध्यें देशाभिमान जागृत होण्यास हें नांव फारसें इष्ट नव्हतें. महायुद्धाच्या वेळीं या देशाचें स्वतंत्र नांव जाहीर करणें बादशहास भाग पडलें व त्यावेळीं त्याचें ' आस्ट्रियन साम्राज्य ' असें नामाभिधान निश्चित झालें. आसन्नमरण असतां एखादा मनुष्य बाप्तिस्मा घेतो त्याप्रमाणें हें झालें. अनेक स्वतंत्र लोकांच्या आपखुषीनें हें राज्य अस्तित्वांत आल्यामुळें त्या सर्व लोकांचे पूर्वेकडील रानटी जातीपासून संरक्षण करणें हें या साम्राज्याचें मुख्य कर्तव्य होतें. हें काम साम्राज्यानें उत्तम रीतीनें केलें, परंतु या सर्व राष्ट्रांचा एकजीव करून त्यांचें एक मोठें राष्ट्र बनविण्याचें त्यास साधलें नाहीं. त्यामुळें हें साम्राज्य शेवटपर्यंत विस्कळित राहिलें. मराया तेरीसा व दुसरा जोसेफ यांनीं एकराष्ट्र करण्याचा प्रयत्न केला परंतु तो विफल होऊन घटक राष्ट्रें हीं अधिकच तुटक झालीं. नंतर जर्मन लोकांनीं सर्व राष्ट्रास आपलें स्वामित्व कबूल करावयास लावण्याचा प्रयत्न केला पण तोहि फसला. त्यानंतर सर्वांस सारखेंच महत्त्व देऊन प्रत्येक राष्ट्रास स्थानिक स्वातंत्र्य देऊन हा प्रश्न सोडविला. परंतु यामुळें राष्ट्रीय भावनांस इतका ऊत आला कीं, देशांत एक आवश्यक असें जें शासनैक्य असतें तेंहि शिथिल झालें. हीं राष्ट्रें म्हणजे जर्मन,झेंक, पोल, रूथीनियन, दक्षिणस्लॅव्ह हीं होत. १९०७ मध्यें मताचा अधिकार प्रत्येक मनुष्यास दिल्यानें सार्वत्रिक हिताचा विचार जास्त होऊन संकुचित राष्ट्रीय भावना मागें पडतील अशी सर्वांस आशा वाटली. या पार्लमेंटांत एकंदर सभासद ५१६ असून त्यांची वांटणी अशी होती;२२१स्लॅव्ह, ११७ जर्मन, ८७ सोशल डेमोक्रॅट; परंतु कांहीं वेळानें हे डेमोक्रॅट भावनांनीं प्रेरित होऊन त्यांचे अनेक समूह झाले. हें पार्लमेंट फारच थोडें काम करीत असे. बजेट तीन किंवा सहा महिन्यापुरतेंच प्रतिनिधी पास करीत. त्यामुळें विशेष हक्कांचा उपयोग करून राज्यकारभार चालवावा लागे. सरकार व ' हाऊस ऑफ डेप्युटीज 'मध्यें नेहमीं विरोध असे. विशेष हक्कांचा उपयोग केल्यानंतर त्याबद्दल पुन्हां पार्लमेंट अथवा राईशराथची संमति घ्यावी लागे, परंतु १९१७ पर्यंत पार्लमेंटनें ही संमति कधींहि नाकारली नाहीं. पार्लमेंटांतील एका समूहानें एकसारखें अडवणुकीचें कार्य करण्याची पद्धति आस्ट्रियांत अगदीं पूर्णतेला गेली व याबद्दल त्या देशाची त्या वेळीं प्रसिद्धि झाली होती. पूर्वीचे काम करण्याचे नियम नवीन पार्लमेंटांत उपयोगी पडेतात. म्हणून १९०९ मध्यें नवीन नियम केले पण त्यानेंहि काम भागेना,म्हणून १९१७ मध्यें आणखी कडक असे नियम केले. या नियमानुसार सरकारी काम अगोदर घेण्याची व्यवस्था झाली. पार्लमेंटांत प्रथम जर्मन भाषा बोलण्याचा प्रघात असे. परंतु पुढें स्लाव्ह भाषेंतहि पुष्कळ डेप्युटी बोलूं लागले व १९१७ मध्यें कोणत्याहि भाषेंत भाषण असले तरी तें अंशतः उतरून घ्यावें असा ठराव पार्लमेंटांत पास झाला. बोहेमियांत स्थानिक पार्लमेंटांत जर्मन लोकांच्या अडवणुकीमुळें कामच बंद पडलें. त्यामुळें १९१३ सालीं एक कमिशन नेमलें. त्यांत जर्मन व चेक या दोन्ही राष्ट्रांतील प्रतिनिधी नेमले. चेक लोकांच्या मतें हें कमिशन बेकायदेशीर होतें. परंतु कोर्टांनीं हें कमिशन कायदेशीर ठरविलें व तें प्रजासत्ताक राज्य होईपर्यंत तसेंच चाललें. स्थानिक पार्लमेंटें असल्यामुळें सर्व साम्राज्यास सामान्य अशा हक्कांचा व हितसंबंधांचाच मुख्य पार्लमेंटास विचार करावा लागे. शिवाय प्रत्येक स्थानिक पार्लमेंट आपापल्या प्रश्नांचा विचार करी. याशिवाय प्रत्येक शहरांत व तालुक्यांत पूर्ण स्थानिक स्वराज्य असे. मुख्य साम्राज्यसरकारचे ७ मंत्री असत. या मंत्र्यांचा व स्थानिक पार्लमेंटांतील मंत्र्यांचा प्रांत कोणता व कार्यक्षेत्र कोणतें याचा घोंटाळा होऊन पुष्कळ वेळां कलह उत्पन्न होत. इंग्लंडांतील अनेक अधिकाऱ्यांच्या क्षेत्राचें जसें गौडबंगाल आहे तसेंच आस्ट्रियांत होतें.१९११मध्यें बीनार्थ या प्रधानमंत्र्यानें राज्यकारभारांत सुधारणा करण्यासाठीं एक कमिशन नेमलें, पण त्याचा फारसा फायदा झाला नाहीं. शिक्षणांत सक्तीचें प्राथमिक शिक्षण हा मूळाधार असून मुलाची जी मातृभाषा असेल तींत शिक्षण देण्याचा नियम असे. सरकारी शाळांशिवाय खाजगी शाळा असत व खाजगी शाळांत $\frac{1}{3}$ मुलें शिकत असत. शाळा बांधण्याचें काम प्रत्येक तालुक्याचें किंवा शहराचें असे व साम्राज्यसरकार फक्त इन्स्पेक्टर नेमीत असे. १९१३ सालीं २४७१३ शाळा होत्या. आस्ट्रियापेक्षां हंगेरींत शिक्षणाकडे ७ पट खर्च करीत असत. या शिक्षणामुळें अशिक्षित वर्ग अगदीं कमी झाला. १८९० त शेंकडा२८ अशिक्षित होते ते १९१०त शेंकडा१६ अशिक्षित राहिले. प्रथम फक्त जर्मन, चेक व पोल राष्ट्रीयांकरितांच विश्वविद्यालयें होतीं परंतु पुढें इतर राष्ट्रांच्या लोकांची मागणी सुरू झाली. परंतु महायुद्धामुळें या मागणी प्रमाणें करण्याचें राहून गेलें.

इतिहास.—१९०७ पासून प्रजासत्ताक राज्य होईपर्यंत एकंदर९मंत्रिमंडळें झालीं.या सर्वांत सरकारी अधिकारी होते. इंग्लंडांतील कॅबिनेट पद्धतीप्रमाणें बहुमताच्या पक्षाचें यांत प्राधान्य नव्हतें. त्यामुळें बहुमत मिळावयास सरकारी मंत्रिमंडळास खटपट करावी लागे. आपल्या मंत्रिमंडळांत चेक, पोल व जर्मन या राष्ट्रांचा कोणीतरी प्रतिनिधी घेण्याची मुख्य मंत्री व्यवस्था करी. परंतु बहुतेक मंत्री निःपक्षपाती राहण्याचा प्रयत्न करीत.

बेकचें मंडळ ( १९०६–१९०८ ):—१९०७ च्या पार्लमेंटांत सर्व राष्ट्रांचे हक्क संभाळण्याचें व यांच्या सरहद्दी कायम ठेवण्याचें बादशहानें आश्वासन दिलें, व इतर सर्व महत्वाच्या आधुनिक सुधारणा अमलांत आणण्याविषयीं वचन दिलें. त्याचप्रमाणें पार्लमेंटांत वापरणाऱ्या भाषेसंबंधानें बेकनें एकमत घडवून आणलें. परंतु यानंतर कांहीं अनिष्ट प्रकार घडल्यामुळें बेकला राजीनामा द्यावा लागला.

बीनार्थ मंडळ ( १९०८–१९११ ):—या मंडळांत सर्व सरकारी अधिकारी होते. बीनार्थचा उद्देश सर्व राष्ट्रांचा स्नेह संपादन करण्याचा होता. जर्मन लोकांची अशी तक्रार होती कीं बोहेमियांत जर्मन लोकांची संख्या $\frac{1}{3}$ असून त्यांनां सरकारी नोकरींत शेंकडा दहासुद्धां जागा मिळत नाहींत म्हणून मंत्रिमंडळाशीं जर्मन लोकांनीं सहकारिता करण्यापूर्वी हा प्रश्न जर्मन लोकांच्या इच्छेप्रमाणें सुटला पाहिजे अशी त्यांनीं भर घातली. शिवाय प्राग येथें जें पार्लमेंट होतें त्यांत जर्मन व चेक हे निराळे असावे अशी त्यांची इच्छा होती. या मागण्यामुळें चेक लोकांस अतिशय राग आला व त्यांनीं जर्मन लोकांवर अत्याचार सुरू केले. यानंतर तालुक्यांची व जिल्ह्यांची राष्ट्राप्रमाणें रचना करून जर्मन जिल्हे व चेक जिल्हे अलग करण्याकरितां मुख्य पार्लमेंटांत बिल आणलें, परंतु त्यास चेक लोकांनीं विरोध केल्यानंतर पार्लमेंट बरखास्त झालें. इटालियन विद्यार्थ्यांनीं आपलें स्वतंत्र विश्वविद्यालय स्थापण्याकरितां व्हिएन्ना येथें दंगे केले परंतु त्याचा उपयोग झाला नाहीं. व्हिएन्नांत जर्मन भाषेशिवाय इतर भाषा असाव्या व जर्मन जिल्ह्यांत सुद्धां आपल्या भाषेचा प्रवेश व्हावा अशी चेक लोकांची इच्छा होती. परंतु लोकांनीं याविरुद्ध कायदे पास केले व बोहेमियाच्या बाहेर चेक लोकांची प्रतिष्ठा चालूं न देण्याचा निश्चय जाहीर केला. इतर कांहीं कारणांनीं पोल लोकांचीहि मदत बीनार्थ यास न मिळाल्यामुळें त्यानें राजीनामा दिला. एकंदर या मंडळाच्या कारकीर्दींत कोणताहि प्रश्न उत्तम रीतीनें न सुटतां सारखी धुमश्चक्री चालू राहिली.

गौश मंडळ ( जून १९११ ते आक्टो. १९११ ):—चेक व जर्मन लोकांमध्यें समेट करण्याचा या मंत्रि-मंडळानें प्रयत्न केला, परंतु चेक लोकांनीं व्हिएन्नांत एक शाळा नियमांविरुद्ध उघडली व ती म्युनिसिपल अधिकाऱ्यांनीं बंद केल्यावर एक चेक बायकांचें निषेधप्रदर्शक मंडळ त्यांनीं पार्लमेंटांत नेलें. यामुळें व्हिएन्नांतील लोकमत क्षुब्ध होऊन चेक लोकांस मार देण्यापर्यंत प्रसंग आला. यावर कडक अंमल बजावून मंत्रिमंडळानें हे दंगे मोडून गुन्हेगारांस शासन केलें. चेक लोकांनीं आपल्या राष्ट्राचे दोन मंत्री नेमण्याविषयीं व इतर अनेक अधिकारी व कौन्सिलर चेक असावे अशाविषयीं आग्रह धरल्यामुळें गौशनें राजीनामा दिला.

स्टूर्ग मंडळ ( १९११—१९१६ ):—यानें सर्व राष्ट्रांचे मंत्री आपल्या मंडळांत सामील केले. चेक व जर्मन लोकांतील कलह काढून टाकावे व कालव्यावर पुष्कळ खर्च करून पोल लोकांनां राजी ठेवावें असा त्याचा उद्देश होता. कॅथॉलिक विवाह मरणाशिवाय रद्द होऊं शकत नाहीं, असा कायदा असल्यानें लक्षावधि घटस्फोट केलेल्या बायकांस पुन्हां विवाह करितां येईना. ही आपत्ति दूर करण्याकरितां कायदा बदलण्याविषयीं लोकांनीं जोराची चळवळ केली, परंतु कायदा न बदलतां मंत्रिमंडळानें फक्त कांहीं व्यक्तींनां सवलती दिल्या. याच मंडळाच्या अमदानींत महायुद्ध सुरू झालें. त्यावेळेस सर्व राष्ट्रांची सरकारविषयीं चांगली भावना होती, कारण आपलें साम्राज्य फोडण्याचा बाहेरून प्रयत्न चालला आहे हें पाहून सर्व ऑस्ट्रियांतील लोकांस तें रक्षण करण्याविषयीं अभिमान उत्पन्न झाला. सैन्य जमा करण्यांत व नांवें नोंदविण्यांत कोणीहि अडथळा केला नाहीं. विशेषतः प्रागमध्यें चेक लोकांनीं जर्मन लोकांविषयीं विलक्षण सहानुभूति दाखविली व जर्मन कैसरचा जयजयकार केला. त्याचप्रमाणें पोल लोकांनींहि साम्राज्याविषयीं राजनिष्ठा व्यक्त केली व सरकारास मदत करण्याचें वचन दिलें. तसेंच रूथिनियन व रूमेनियन लोकांनींहि साम्राज्याविषयीं अभिमान व्यक्त केला. मधून मधून कांहीं इटालियन व स्लाव्ह व्यक्तिशः शत्रूकडील आपल्या बांधवांशीं खलबतें करीत. परंतु हीं उदाहरणें अपवादक होतीं. या वेळेस पार्लमेंटची संमति घेण्याचा स्टूर्गनें प्रयत्न केला नाहीं. त्यामुळें सर्व अधिकार सैन्यांतील लोकांच्या हातीं गेले, त्यांनां जे जे लोक संशय घेण्यासारखे वाटले त्यांनां त्यांनीं कैद केलें व अशा रीतीनें अंदाधुंदी सुरू झाली. या सगळ्या अवधींत मुख्य मंत्र्याचें दुर्बलत्व स्पष्टपणें सर्वांस कळून आलें. १९१६ त पुन्हां राईशराठ भरविण्याविषयीं स्टूर्गनें खटपट चालविली होती; इतक्यांत डॉ. ॲडलर या सोशिएलिस्टानें स्टूर्ग यास गोळी घालून ठार मारिलें.

कोर्बर मंत्रिमंडळः—( १९१६ आक्टोबर पासून डिसेंबर ) स्टूर्गच्या मरणानेंहि पार्लमेंट भरविण्याचा उद्देश सफल झाला नाहीं व कोर्बर यानें दोन महिने पार्लमेंट शिवायच कारभार चालविला. याच सुमारास फ्रान्सिस जोसेफ बादशहा मरण पावला. त्याच्या मुलास म्हणजे पहिला चार्लस या बादशहास कोर्बनें राज्यघटना पाळण्याची शपथ घेण्यास लाविलें. त्यामुळें त्याचा कोर्बर यावर रोष झाला. १९१६ च्या डिसेंबर महिन्यांत चार्लस बादशहानें कोर्बर यांस काढून टाकिलें.

क्लॅम—मार्टिनीझ मंडळ–( १९१६–१९१७ ). या मुख्य मंत्र्यानें मिश्रमंडळ बनविलें. प्रेसिडेंट वुईल्सन याच्याकडून स्वयंनिर्णयासंबंधानें जो खलिता आला त्याला क्रोशियन प्रतिनिधींनीं असें उत्तर दिलें कीं, हॅप्सबर्गच्या घराण्याखालींच क्रोट लोकांची उन्नति होत असल्यामुळें त्यांनां स्वतंत्र होण्याची इच्छा नाहीं. चेक व रुमेनियन लोकांनींहि आपणास स्वयंनिर्णय नको असें जाहीर केलें. जर्मन लोकांनीं राज्यघटना पुन्हां बदलण्याविषयीं मागणी केली व स्लाव्ह

लोकांनीं कोणतीहि अट न घालतां पार्लमेंट बोलाविण्याविषयीं आग्रह धरला. नंतर मे ३१ ला पार्लमेंट भरलें, परंतु स्लाव्ह–चेक व जर्मन यांच्यांत कलह होऊन कांहींच करतां येईना. असें झाल्यानें निराश होऊन क्लॅम–मार्टिनीसनें राजीनामा दिला.

सीडलर मंडळः—(१९१७–१९१८) सीडलरनें राज्यघटनेचा प्रश्न बाजूस ठेवून राज्यकारभार चालू ठेवण्यापुरतें मंडळ नेमलें; परंतु १९१७ च्या आगष्टमध्यें हा प्रश्न हातीं घेणें त्यास भाग पडलें. परंतु कांहींच निश्चित न होतां पार्लमेंट मे महिन्यांत ( १९१८ ) तहकूब करावें लागलें. मध्यंतरी निरनिराळीं राष्ट्रें आपापले हक्क इतरांचा विचार न करतां पुढें करूं लागलीं. चेक लोकांनीं जून ५ ला आपलें स्वतंत्र राज्य करण्याकरितां एक कमेटी नेमली. म्हणून सीडलरला राजीनामा देणें भाग पडलें.

हुसारेक मंडळः—( जुलई १९१८ पासून आक्टोबर १९१८ ). इंग्लंडनें जेव्हां चेको–स्लोव्हेकिया स्वतंत्र आहे असें सरकारी रीतीनें कबूल केलें तेव्हां हुसारेकनें असें जाहीर केलें कीं, आस्ट्रियन साम्राज्य अद्यापि संयुक्त आहे व त्याचा नाश करणें हें अनिष्ट आहे असें त्यानें यूरोपांतील राष्ट्रांस बजाविलें. आक्टोबर महिन्यांत हुसारेकनें चेक, पोल व स्लॉव्ह या लोकांस पूर्ण स्थानिक स्वातंत्र्य देण्याचें कबूल केलें, परंतु हीं राष्ट्रें आतां अगदीं अलग होण्याविषयीं प्रयत्न करूं लागलीं. यानंतर बादशहानें लॅमास्क यास मंत्रिमंडल बनविण्यास सांगितलें.

लॅमास्क मंडळ ( आक्टोबर २७ ते आक्टोबर ३१ ):—हा अखेरचा प्रयत्न होता. बादशहास असें वाटलें कीं सर्व इतर राष्ट्रांशीं स्नेह होणें शक्य असल्यास पहावें; नाहीं तर फक्त जर्मन आस्ट्रियाचें राज्य निराळें करून आपण त्यावर राज्य करावें. ही गोष्ट शेवटीं साध्य झाली नाहीं. कारण लोकांनीं प्रजासत्ताक राज्य स्थापण्याचें ठरविलें. परंतु लॅमास्क याच्या प्रयत्नामुळें रक्तपात न होतां हें कार्य घडून आलें, याबद्दल त्याची स्तुति केली पाहिजे.

आर्थिक परिस्थिति.—युद्धाच्या पूर्वी एकंदर राजकीय स्थिति समाधानकारक नसल्यामुळें आस्ट्रियानें सैन्यावर जास्त खर्च करण्यास सुरवात केली. त्यामुळें कर्ज काढावें लागलें, व इतर देशांत पैशाची टंचाई असल्यामुळें लोकांच्या बँकेंतील रकमांवर फार ताण पडला. १९०७ पासून १९१३ पर्यंत व्यापाराची अशी स्थिति होती कीं, निर्यात मालापेक्षां आयात माल जास्त होता. निम्म्या लोकांचा शेतकीवर निर्वाह असे. गहूं, सातु, मका, साखर यांचें उत्पादन फार मोठ्या प्रमाणावर असे. कोळसा व लोखंड हीं अति विपुल होतीं. १९१० पासून १९१४ पर्यंत महागाई वाढत गेली. १९१४ त युद्ध सुरू झाल्यावर थोडक्याच दिवसांत व्यापार अगदींच शिथिल झाला. पूर्वी उत्पन्न झालेला माल खपेनासा झाला, व निर्यात व्यापार फार कमी झाल्यामुळें पुष्कळ लोक बेकार झाले. सरकारनें लोकांस काम देण्याची विशेष फिकीर केली नाहीं. कांहीं वेळानें लढाईची सामुग्री उत्पन्न करण्याकरितां मजुरांची जरूर लागली. त्यावेळेस पुष्कळ मजुरांस पुन्हां काम मिळालें, परंतु याच सुमारास इंग्लंड व फ्रान्स यांनीं आस्ट्रियांत कोणताहि माल येऊं न देण्याची व्यवस्था केल्यामुळें लढाईच्या सामुग्रीस लागणारा कच्चा मालहि मिळेनासा झाला. आस्ट्रियाची स्थिति जर्मनीपेक्षांहि वाईट झाली, कारण पूर्वीपासून आस्ट्रियांत जर्मनीपेक्षां कच्चा माल कमी होता. त्याचप्रमाणें आस्ट्रिया व हंगेरी यांमधील कलहामुळें जकात ठेवण्याच्या बाबतींत दोघांचें एकमत होत नसे. हंगेरींत अन्नाचा पुरवठा जास्त असल्यामुळें हंगेरीवर आस्ट्रिया अवलंबून असे. आस्ट्रियांत येणारा बहुतेक माल जर्मन बंदरांतून येत असे, त्यामुळें तो व्यवस्थित येण्याकरितां जर्मनसरकारशीं आस्ट्रियास तह करावा लागला. माल विकत घेण्याकरितां जर्मनीनें व आस्ट्रियानें बोर्डें नेमलीं व त्यांच्या द्वारें तटस्थ देशांत माल विकत घेऊन आणण्याची व्यवस्था केली, परंतु १९१५ त ही व्यवस्था बंद करावी लागली. पुढें याच बोर्डांना कोणास किती माल द्यावा याचें नियंत्रण करण्याचें काम दिलें. या कामाची देखरेख सरकारनें आपल्याकडे ठेवली. अन्नाच्या नियंत्रणाकरितां इंग्लंडांतील 'फूड कंट्रोलर'च्या धर्तीवर आणखी एक निराळें कमिशन नेमलें. हें कमिशन किंमती ठरवीत असें व अमुक पद्धतीची रोटी असावी व अमुक कुटुंबास अमुक रोट्या द्याव्या, इत्यादि गोष्टींवर त्याचा पूर्ण ताबा असे. जमीनीची लागवड करण्यासंबंधानेंही सक्ती करण्यांत आली व ठराविक किंमतीपेक्षां धान्याची जास्त किंमत घ्यावयाची नाहीं असा निर्बंध करण्यांत आला. इतकें करूनहि कांहीं वस्तूंचा पुरवठा कमी पडला तो पडलाच. महायुद्धाचे शेवटीं आस्ट्रियांत कांहीं महत्त्वाच्या वस्तूंचा पूर्ण अभाव होता. या सर्व कारणामुळें सामान्य जनतेंत व मजुरांमध्यें युद्धाच्या विरुद्ध भावना उत्पन्न झाल्या व त्यांच्या चळवळी थांबवितां थांबवितां सरकारास पुरेसें झालें. महायुद्धांत आस्ट्रो–हंगेरियन बँकनें नोटांचे पैसे देण्याचें बंद केलें व सोन्याचा सर्व सांठा महत्त्वाच्या कामाकरितां राखून ठेविला. महायुद्धाचे पूर्वी नुकताच आस्ट्रियामध्यें पैशाचा तोटा पडून बँकांची स्थिति अगदीं संकटाची होती. नोटांची संख्या अमर्याद वाढली. १९१४ मध्यें ५१३ कोटि क्रोननच्या नोटा होत्या त्या १९१८ मध्यें ३५५८ कोटि क्रोनन झाल्या. त्यामुळें किंमती वाढून क्रोननची हुंडणावळींत किंमतहि कमी झाली. एक अमेरिकन डॉलर १९१४ मध्यें ५ क्रोनन बरोबर होता तो १९१८ त १६ क्रोननबरोबर झाला. सरकारी जमा व खर्च दोन्हींहि फुगत चाललीं. युद्धाकरितां सरकारनें आस्ट्रो–हंगेरियन बँकेंकडून १९१९ पर्यंत २५०८ कोटि क्रोनन कर्ज काढलें. याशिवाय इतर मार्गांनीं बँकेनें सरकारला उसन्या रकमा दिल्याच

होत्या. याशिवाय ट्रेझरी बिलांच्या रूपानें सरकारनें लोकांपासून २६० कोटि क्रोनन इतकें कर्ज काढलें, व वॉरलोनच्या रूपानें सरकारनें ३५०६ कोटि क्रोनन कर्ज काढलें. १९१६ मध्यें नवीन कर बसविण्यांत आले.

कलाव वाङ्मयः—फ्रॅन्सिस जोसेफ बादशहाच्या वेळचे सर्व उत्तम कलाभिज्ञ १८९० च्या पूर्वीच मरण पावले. आस्ट्रियन साम्राज्याविषयीं अभिमान हें त्यांच्या कलेचें उद्गम होतें. ही परंपरा १८९० मध्यें परमावधीस जाऊन त्यानंतर अवनत होऊं लागली. या कलाभिज्ञांपैकीं कांहीं आस्ट्रियन साम्राज्यांत राहिले व कांहीं इतर देशांत गेले. व्हिएन्नांतील या लोकांचा अग्रणी गस्टव्ह क्लिट हा असून, तो चित्रकार होता. जोसेफ हॉफमन हा उत्तम शिल्पकार होता. महायुद्धानंतरच्या कारागिरांतील प्रमुख ओस्कर कोकोस्का हा होता.

१९१६ मध्यें मारी ईशनबाश ही प्रसिद्ध ग्रंथकर्त्री मरण पावली. १९१८ मध्यें पीटर रोसीजर हा मरण पावला. हे जुन्या परंपरे भोक्ते होते. यांच्या मरणानंतर अगदीं आधुनिक प्रवृत्तींच्या वाङ्मयाचे लेखक पुढें आले. या पिढीवर इबसन झोला, मॅटरलिंक, डॉस्टएफ्स्की, टॉलस्टॉय, शॉ व स्टाइंडबर्ग यांचें फार वजन पडलें होतें. यांपैकीं प्रमुख ग्रंथकार व नाटककार कार्ल शॉनिहर हा होता. याच्याच तोडीचा नाटककार श्नीटझर हा होता, परंतु याची विचाराची दिशा भिन्न होती. वीणाकाव्यें लिहिण्यांत डेह्मेल व रिल्क हे अग्रणी होते. फ्रान्झ वर्फेल हा आधुनिक कवींमध्यें अतिशय बुद्धिवान होता. कादंबरीकारांत गूटनब्रून, गूंथर; मॅक्षेटी, बॅरनेस हँडेल, बॅासरमन, कोल्बनहीयर हे प्रमुख होते. महायुद्धाच्या समाप्तीपर्यंत व्हिएन्नांतील मुख्य नाटकगृहाची पॅरिसमधील कॉमेदी या नाटकगृहाची बरोबरी करण्याची महत्त्वाकांक्षा होती व ती बऱ्याच अर्थानें सफल झाली होती. बोमिस्टर, केंझ व जिरार्डी हे आस्ट्रियांतील प्रमुख नट होते.

इतिहास वाङ्मय.—१९१० पासून १९२० पर्यंत थिओडर व्हॉन सिकल याच्या नेतृत्वाखालीं अनेक इतिहासकारांनीं आपले शोध जगापुढें आणले. यांपैकीं फिकर, मूलबाशर, ऑल्टनथॉल, हार्टमन रेडालिश हे प्रमुख होते. फ्रूर्नियर यानें लिहिलेलें नेपोलियनचें चरित्र सर्व देशांत प्रसिद्ध झालें. नवीन परंपरेपैकीं प्रसिद्ध इतिहासकार यूबर, बर्गर, बौअर हे होते. ईबनग्न्यूथ व ॲडलर यांनीं शासनसंस्थेच्या इतिहासांत अतिशय परिश्रम केले. ग्रूनबर्ग यानें 'अर्थशास्त्राचा इतिहास' या क्षेत्रांत प्रावीण्य मिळविलें. जोसेफ रीडलीश यानें आस्ट्रियन साम्राज्याच्या राजकीय धोरणाचा १८४८–१८६१ पर्यंतचा इतिहास लिहिला आहे तो फारच अप्रातिम आहे.

परराष्ट्रीय राजकीय धोरणः–(१९०८-१९१८) जर्मन साम्राज्य व संयुक्त इटलीचें राज्य स्थापन झाल्यापासून आस्ट्रियन साम्राज्यास पश्चिमेकडे जर्मन प्रदेश जिंकणें अशक्य झालें व पूर्वेकडे साम्राज्य वाढविल्यास रशियाचा विरोध अगदीं हटकून होणार या कारणानें जर्मनी व इंग्लंड यांच्याशीं स्नेह ठेवणें आस्ट्रियास भाग पडलें. रूसोजपानी युद्धानंतर रशियानें पूर्वेकडील आपली महत्त्वाकांक्षा सोडून देऊन पुन्हां कॉन्स्टांटिनोपल व दार्दानेल्सकडे आपला मोर्चा वळवला. मध्यंतरी इंग्लंड, फ्रान्स यांचा व जर्मनीचा अनेक बाबतींत मतभेद झाल्यामुळें इंग्लंड फ्रान्स, व रशिया यांनीं १९०८ मध्यें आपसांत स्नेह केला. तुर्कस्तानांत क्रांति झाल्यानंतर बोसनिया व हर्झगोव्हिना, हीं दोन आपल्या राज्यांत सामील करण्याचा आस्ट्रियानें निश्चय केला. परंतु दार्दानेल्स रशियानें आपल्या ताब्यांत घेतल्यास त्यास आस्ट्रियानें प्रतिबंध करूं नये असें रशियाचें धोरण दिसलें. हें धोरण अस्ट्रियानें कबूल केलें परंतु दार्दानेल्स घेतल्यास कॉन्स्टांटिनोपल रशियानें घेऊं नये असें आस्टियाचें म्हणणें होतें.

सेप्टेंबरमध्यें हें म्हणणें रशियानें कबूल केलें. त्यानंतर लगेच आस्ट्रियानें बोसनिया व हर्झगोव्हीना हीं गिळंकृत केलीं. हें वर्तमान कळतांच इंग्लंड व फ्रान्समध्यें खळबळ उडाली व सर्व राष्ट्रांच्या संमतीशिवाय असें करतां येणार नाहीं असें इंग्लंडनें जाहीर केलें. सर्व्हियानेंहि याविरुद्ध तक्रार करून लढाईची तयारी केली. तुर्कस्तान, इटली व बल्गेरिया हे सर्व आस्ट्रियाच्या विरुद्ध उठले. परंतु आस्ट्रियानें हे देश न सोडण्याचा निश्चय जाहीर केला. रशियानें आपली युद्ध करण्याची तयारी नाहीं असें पाहून माघार घेतली व तुर्कस्तानानें कांहीं रक्कम घेऊन आस्ट्रियाच्या कृत्यास संमति दिली व हें करण्यास इंग्लंडनें सल्ला दिला. सरते शेवटीं मार्च महिन्यांत इंग्लंड व रशिया या दोहोंनीं सरकारी रीतीनें आस्ट्रियास संमतीदर्शक खलिते पाठविले. परंतु सर्व्हिया संमति देण्यास कबूल होईना. अखेरीस रशियाच्या मध्यस्थीनें सर्व्हियानें आपली संमति दिली व आस्ट्रियाशीं मित्रत्वानें रहाण्याचें कबूल केलें. परंतु यामुळें रशिया व आस्ट्रिया यांमध्यें नेहमींचा विरोध स्थापित झाला. याच सुमारास बल्गेरिया व इटली हे रशियास अनुकूल झाले. आस्ट्रियानें इटलीशीं विरोध न करितां त्यास ट्रिपोलीमध्यें वाटेल तें करण्यास परवानगी दिली. परंतु याचा मोबदला म्हणून इटलीनें आस्ट्रियाच्या बाल्कनमधील धोरणाच्या आड येऊं नये असा करार झाला. १९१२ मार्चमध्यें सर्व्हिया व बल्गेरिया यांनीं 'बाल्कन लीग' स्थापित करून आस्ट्रियाच्या बाल्कनमधील धोरणास विरोध करण्याचा निश्चय केला व या लीगमध्यें ग्रीस सामील झाला. या लीगशीं सामना करण्याकरितां तुर्कस्तानानें इटलीशीं लॉसेनचा तह करून आपले हात मोकळे केले. ऑक्टोबर महिन्यांत बाल्कन युद्ध सुरू झालें. या युद्धांत सर्व्हिया, ग्रीस, व बल्गेरिया यांचा जय झाल्यामुळें आस्ट्रि-

याचें महत्त्व कमी झालें. परंतु रशियाशीं शत्रुत्व होऊं नये म्हणून आस्ट्रियानें तटस्थपणा स्वीकारला. अल्बेनिया व सर्व्हिया यांची प्रगति होण्यापासून इटलीचें नुकसान होतें. यास्तव इटली बाल्कन लीगच्या विरुद्ध होता. याचा फायदा घेऊन आस्ट्रियानें इटलीस वश करून पुन्हां बारा वर्षेपर्यंत जर्मनी, आस्ट्रिया व इटली यांचा स्नेहसंबंधाचा करारनामा पुनरुज्जीवित केला. याचा परिणाम असा झाला कीं, सर्व्हिया व रशिया हे आस्ट्रियाच्या विरुद्ध अधिकच कारवाई करूं लागले. एका वेळीं तर युद्धाचाच प्रसंग आला होता. परंतु इंग्लंड व जर्मनी यांच्या सल्ल्यानें आस्ट्रियानें सामाचा मार्ग स्वीकारला. आस्ट्रियानें लंडन येथें एक परिषद भरवून तेथें बाल्कन प्रश्नाचा खल करण्याचें कबूल केलें. या परिषदेचा कांहीं उपयोग न होता दुसरें बाल्कन युद्ध १९१३ फेब्रुवारी ३ ला सुरू झालें. या युद्धांत मॉंटिनिग्रोनें स्कुटारी घेतल्यामुळें इंग्लंड व आस्ट्रिया यांनीं लढाई करून तें परत घेण्याचा निश्चय जाहीर केला. त्या बरोबर मॉंटिनिग्रोनें स्कुटारींतून सैन्य काढून घेतलें. रुमानियांत आस्ट्रियाचा जो आब होता तो या बाल्कन युद्धानें कमी झाला. आस्ट्रियाच्या आग्रहास्तव रुमानिया बाल्कन युद्धांत सामील झाला नव्हता. परंतु त्याला पाहिजे असलेला प्रदेश देणें हें आस्ट्रियास आता प्राप्त झालें. परंतु आस्ट्रियाचें म्हणणें बल्गेरिया कबूल करीना. त्यामुळें रुमानियानें रशियाकडे धांव घेतली. यानंतर तिसरें बाल्कन युद्ध होऊन बल्गेरियाचा पुष्कळ प्रदेश रुमानिया व सर्व्हिया यांनीं घेतला. या युद्धांत आस्ट्रियानें मदत न केल्याबद्दल बल्गेरियाचें मन पूर्ण कलुषित झालें. शिवाय सर्व्हिया व मॉंटेनिग्रो यांची सत्ता वाढल्यामुळें ते आस्ट्रियाविषयीं बेफिकीर राहूं लागले. १९१३ जुलईमध्यें लंडनच्या परिषदेनें बल्गेरियाची दक्षिण सरहद्द ठरविली व त्याप्रमाणें सर्व्हियास तो प्रदेश सोडून देण्यास भाग पाडलें. तरीहि सर्व्हियानें आस्ट्रियांतील स्लाव्ह लोकांशीं खलबतें करून त्यांनां आपणांत सामील करून घेण्याचा प्रयत्न सोडला नाहीं. रुमानियानेंहि हंगेरींतील आपल्या लोकांस आस्ट्रियन साम्राज्यविरुद्ध बंड करण्यास प्रोत्साहन दिलें. व रशियाशीं स्नेहभाव वाढविला. असें झाल्यानें आस्ट्रियास रुमानियाविषयीं संशय वाटूं लागला. आस्ट्रियानें आतां बाल्कन संस्थानांत फूट पाडण्यास सुरुवात केली. या सुमारास आस्ट्रिया व जर्मनी यांमध्यें बाल्कन देशांपैकीं आपणांस कोण अनुकूल आहेत या मुद्यासंबंधानें तीव्र मतभेद झाला. यामध्यें अखेरीस बल्गेरियास वश करून बाकी इतर देशांस त्यांच्या इच्छेप्रमाणें करूं द्यावें असें ठरलें. या सुमारास इटली व आस्ट्रिया यांमध्यें बेबनाव झाला. इंग्लंड, फ्रान्स, रशिया व इटली यांचा बेत बाल्कन देशांचें जाळें आस्ट्रियाभोंवतीं करण्याचा आहे असें आस्ट्रियास दिसून आलें. यानंतर कडक उपाय अमलांत आणण्याचा आस्ट्रियानें निश्चय केला व त्याप्रमाणें जर्मन चॅन्सेलर यास त्यांनीं कळविलें. इतक्यांत आस्ट्रियांतील राजपुत्रास सर्व्हियांत मारल्याची बातमी आली. यावर आस्ट्रियानें सर्व्हियास निर्वाणीचा खलिता पाठवून असें कळविलें कीं, सर्व्हियन सरकारानें सर्व्हियांतील आस्ट्रियाविरुद्ध चळवळीस मदत केल्यामुळें असा अनर्थ घडला. याकरितां सर्व्हियानें सरकारीरीतीनें ही चळवळ मोडून टाकावी व त्यांत सामील असलेल्या लोकांस शिक्षा द्यावी.' जुलै २४ ला हा खलिता पाठविल्यानंतर दोन दिवसांचे आंत त्याचें उत्तर मागितलें. परंतु गुन्हेगारांची चौकशी केल्यास त्यांत आस्ट्रियाचा कांहीं संबंध असूं नये व हा प्रश्न हेग येथील कोर्टानें सोडविला असतां आमची हरकत नाहीं असें सर्व्हियानें कळविलें. वस्तुतः या उत्तरानें आस्ट्रियाचा मुख्य मुद्दा सर्व्हियानें कबूल केल्यामुळें युद्धाची आवश्यकता नव्हती असें असतां आस्ट्रियानें युद्ध पुकारलें. या युद्धांत आस्ट्रियानें कांहीं प्रदेश मिळविल्यास इटलीसहि तितका प्रदेश दिला पाहिजे या अटीवर इटलीनें युद्धांत सामील व्हावें असें आस्ट्रियाचें व जर्मनीचें म्हणणें होतें. परंतु इटलीनें तटस्थ राहण्याचें ठरविलें. रुमानियानें युद्धांत सामील होण्याचें नाकारलें. तुर्कस्ताननें आस्ट्रियाला मदत करण्याचें कबूल केलें परंतु बल्गेरियाचा पुष्कळ प्रदेश मिळून शिवाय तुर्कस्तानचें पूर्ण स्वातंत्र्य कायम राहिलें पाहिजे अशी त्यांत अट होती. बल्गेरियास वश करण्याचा प्रयत्न निष्फळ झाला. बल्गेरियानें अर्धवट उत्तरें देऊन हा प्रश्न लोंबत ठेविला. कारण जर्मनी व आस्ट्रिया यांस सामील झाल्यास आपला फायदा होईल अशी त्याची खात्री होईना. शिवाय इंग्लंड व फ्रान्स यांनीं बल्गेरियाकडे बोलणें सुरू केलें होतें व त्यांत बल्गेरियास अधिक प्रदेश मिळवून देण्याचें त्यांनीं आमिष दाखविलें.

डिसेंबरमध्यें आस्ट्रियानें पुन्हां इटलीशीं बोलणें सुरू केलें व १९१५ च्या मार्चमध्यें आस्ट्रियाचा कांहीं प्रदेश देण्याचेंहि कबूल केलें. इटलीनें अधिकाधिक प्रदेश मागण्यास सुरवात केली. दक्षिण टायरोल ट्रीस्ट आड्रियाटिक मधील बहुतेक बेटें व व्हॅलोना हीं सर्व तावडतोब इटलीस द्यावी असें इटलीचें म्हणणें होतें. हें आस्ट्रियानें कबूल केलें नाहीं व मध्यंतरीं इंग्लंड व फ्रान्स यांनीं इटलीस याही-पेक्षां जास्त कबूल केल्यानें मेच्या २० तारखेस इटलीनें आस्ट्रियाच्या विरुद्ध युद्ध पुकारलें. रुमानिया हा अद्यापि तटस्थ होता, जुलईनंतर आस्ट्रिया व जर्मनी यांची सरशी होते असें पाहून बल्गेरियानें आस्ट्रियाशीं तह केला. या तहाअन्वयें सर्व्हियांतील 'मॅसिडोनिया' हा प्रदेश बल्गेरियास मिळावा असें ठरलें व तुर्कस्ताननें मारित्सा नदीवर बल्गेरियानें मागितलेला प्रदेश त्याला देण्याचें कबूल केलें. या तहापासून जर्मनीचा तुर्कस्तानपर्यंत मार्ग खुला झाला, व १९१५ चे शेवटीं व सर्व्हिया मॉंटेनिग्रो हे आस्ट्रि-

याच्या ताब्यांत आले. पोलंड देशहि जर्मनी व आस्ट्रिया यांच्या ताब्यांत आला.परंतु त्याची व्यवस्था काय करावयाची याविषयीं जर्मनी व आस्ट्रिया यांचें एकमत होईना. परंतु युद्धानंतर पोलंड स्वतंत्र करून त्यावर कोणी तरी राजानें पार्लमेंटच्या मदतीनें राज्य करावें असें ठरलें. मध्यंतरी रुमानिया हा इंग्लंड व फ्रान्स यांच्या बाजूस गेला होता. असें करण्यांत आस्ट्रियाचा पुष्कळ प्रदेश आपणांस मिळेल अशी त्याला उमेद होती. १९१५ डिसेंबरमध्यें दोन तृतीयांश रुमानिया आस्ट्रियाच्या ताब्यांत आला. रुमानिया युद्धांत शिरल्यामुळें तुर्कस्तानच्या मनांत पूर्वीच्या तहाच्या अटींविषयीं संशय उत्पन्न झाला. त्यामुळें जर्मनी व आस्ट्रियानें स्वतंत्र तह न करण्याविषयीं पुन्हां करार केला,व परकीय राष्ट्रांचे हक्क संभाळण्याकरितां परकीय कोर्टें, तुर्कस्तानांत होतीं तीं काढून टाकण्याचें कबूल केलें. समुद्रावर इंग्लंड व फ्रान्सचें वर्चस्व असल्याकारणानें जर्मनी व आस्ट्रियांत माल येण्याचें बंद होऊन उपासमार होण्याचा प्रसंग आला. त्यामुळें इतके जय मिळूनहि आस्ट्रियास युद्धाचा कंटाळा आला व त्यानें तहाचें बोलणें शत्रुपक्षाशीं सुरू करावें असें जर्मनीस सुचविलें. त्याप्रमाणें वादविवाद होऊन जर्मनीनें असें करण्यास संमति दिली. १९१६ च्या डिसेंबर १२ तारखेस जर्मनीच्या पक्षानें आपल्या अटी जगासमोर मांडल्या. त्यांत आस्ट्रियाचें साम्राज्य पूर्ववत रहावें, रुमानियाची सरहद्द आस्ट्रियास अनुकूल अशी ठरवावी, सर्व्हियाचा कांहीं भाग आस्ट्रियांत यावा व इटलीचा काहीं भाग इटलीनें सोडावा व अल्बेनियावर आस्ट्रियाचें स्वामित्व असावें अशा आस्ट्रियाच्या तर्फे मागण्या होत्या. परंतु तहाचें बोलणें इंग्लंड व फ्रान्स यांस कबूल नव्हतें; व त्यांनीं युद्धांतील नुकसानीची भरपाई मागितल्यानंतर जर्मनीनें युद्ध चालू ठेवण्याचा संकल्प केला.

शिवाय सबमराईन बोटींच्या सहाय्यानें शत्रूचीं जहाजें बुडविण्याची कल्पना जर्मनीच्या मनांत आली व अशा रीतीनें शत्रूस जेर करून अखेरीस आपला पूर्ण जय होईल असें जर्मनीस निश्चित वाटलें. याप्रमाणें १९१७ मध्यें खरोखरीच घडून येऊन विजयश्री खरोखरीच जर्मन पक्षास माळ घालणार असें दिसूं लागलें. परंतु या पाणबुड्या बोटींचे प्रयोग अमेरिकेंतील संस्थानावर झाल्यामुळें त्यांनीं जर्मनीविरुद्ध एप्रिलमध्यें व आस्ट्रियाविरुद्ध डिसेंबरमध्यें युद्ध पुकारलें. या वेळेस आस्ट्रियाचा बादशहा चार्लस यानें अखेरच्या तहाविषयीं प्रयत्न केला व फ्रान्सचा प्रेसिडेंट पांकारे याशीं बोलणें सुरू केलें. परंतु आस्ट्रियाचा प्रदेश इटलीस देण्यास आस्ट्रिया तयार नसल्यामुळें विशेष प्रगति होईना. १९१७ मार्चमध्यें जर्मनी व आस्ट्रिया यांनीं आपल्या मागण्यासंबंधानें एक कार्यक्रम ( प्रोग्रॅम ) तयार केला. यांत जर्मनीनें पोलंड व गॅलीशिया घ्यावी व अॅलसेस लॉरेन फ्रान्सला द्यावा असें ठरविलें. परंतु इटलीनें लंडनच्यां तहाप्रमाणें आपल्यास प्रदेश मिळाल्याविना आपण तह करणार नाहीं असें जाहीर केल्यामुळें इंग्लंड व फ्रान्स यांनां स्वतंत्र रीतीनें कांहीं करतां येईना. यानंतर १९१७ मे मध्यें जर्मनी व आस्ट्रिया यांनीं एक निराळा कार्यक्रम तयार केला. यांत रुमेनियावर ऑस्ट्रियाचें वर्चस्व असावें, जर्मनीनें पोलंडवर सत्ता चालवावी व अॅलसेस लॅारेन फ्रान्सला देऊं नये असें ठरविलें. तथापि इंग्लंड व फ्रान्स तहास कबूल झाले नाहींत. त्यांनीं उलट नेटानें युद्धसामग्री जमविण्याची तयारी चालविली. शिवाय जर्मनी व आस्ट्रिया हीं अगदीं हतबल झालीं आहेत व कदाचित त्या देशांत राज्यक्रांति होईल अशी माहिती संयुक्त राष्ट्रांस लागलेली होती व अमेरिकन लोकांची मदत आपणांस सारखी मिळेल अशी त्यांनां खात्री होती. मध्यंतरीं रशियांत राज्यक्रांति होऊन रशियानें डिसेंबरच्या १५ तारखेस युद्धाची तहकुबी करून तहासंबंधींचें बोलणें सुरू केलें. रशियाचें मागणें इतकेंच होतें कीं, कोणाचा प्रदेश कोणी घेऊं नये, लढाईचा खर्च कोणी कोणास देऊं नये, हें इंग्लंड व फ्रान्स यांनीं नाकारलें. मध्यंतरी यूक्रेन प्रांतानें स्वतंत्र लोकसत्ताक राज्य स्थापन करून जर्मनपक्षाशीं स्वतंत्र तह केला. या तहान्वयें चोमचा लहान प्रांत आस्ट्रियास युक्रेनच्या राज्यास द्यावा लागला व पूर्व गॅलिशियास स्वातंत्र्य द्यावें लागलें. नंतर जर्मनी व आस्ट्रिया यांनीं रशियांत शिरून अनेक लढायांत रशियन सैन्याचा पराभव केला. नंतर १९१८ मार्च ३ तारखेस ब्रेस्ट लिटॉव्हसचा तह जर्मनी, आस्ट्रिया व दुसऱ्या बाजूस रशिया यांमध्यें, होऊन रशिया कायमचा युद्धांतून हटला. या तहाप्रमाणें पोलंड देश स्वतंत्र झाला. परंतु जर्मनी व आस्ट्रिया यांमध्यें पूर्वीचा विरोध कायम होता. पोलंडचा बराचसा भाग जर्मनींत सामील व्हावा असें जर्मनीचें म्हणणें होतें. आस्ट्रियाचें असें म्हणणें होतें कीं स्थानिक स्वराज्य देऊन पोलंड हा आस्ट्रियन साम्राज्याचा एक भाग राहिला पाहिजे. रशियानें तह केल्यानंतर रुमानियासहि तह करणें भाग पडलें. या तहाप्रमाणें कारपेथियन सरहद्द आस्ट्रियास अनुकूल अशी मिळाली व कांहीं आर्थिक सवलती मिळाल्या. यापेक्षां अधिक फायदा झाला नाहीं. हे पूर्वेकडील जय मिळाले तरीहि सैन्यांतील लोक अगदीं थकून गेले असल्यामुळें शांतता प्रस्थापित होणें आस्ट्रियाच्या दृष्टीनें फार आवश्यक होतें. जर्मन व मॅग्यार लोकांशिवाय इतर लोक राजद्रोहाचे विचार व्यक्त करूं लागले. यामुळें प्रेसिडेंट वुइल्सन यांच्या चौदा तत्त्वांचा स्वीकार करण्यास आस्ट्रिया तयार झाला. तथापि तहाचें लक्षण कांहीं दिसेना. जर्मनीची इच्छा युद्ध सुरू ठेवण्याची होती. या कारणाकरितां आस्ट्रियाच्या बादशहानें जर्मनबादशहा व त्याचे सेनापती यांस संतुष्ट ठेवण्याकरितां पुन्हां एक तह केला. आस्ट्रियानें इटलीवर आणखी एक स्वारी केली पण तींत त्याला यश

आलें नाहीं. आस्ट्रियांत जर्मन व मग्यार या लोकांशिवाय इतर लोक उघड उघड राज्य उलथून पाडण्याच्या गोष्टी बोलूं लागले. या सुमारास जर्मनांतहि लोकांची इच्छा तहाविषयीं अतिशय अनुकुल झाली होती. आस्ट्रियानें पुन्हां प्रेसिडेंट वुइलसनच्या मार्फत आग्रहाचें बोलणें लाविलें परंतु त्यानें चौदा तत्त्वांचाच पाढा वाचला. मध्यंतरीं बल्गेरियन सैन्यानें तहकुबी मागून शस्त्रें खालीं ठेवलीं व तेथील राजा फर्डिनंड यानें राज्य सोडून दिलें. १९१८ आक्टोबरांत तुर्कस्ताननेंहि तहकुबीचा तह मागितला व जर्मनी व आस्ट्रिया यांचा संबंध सोडून दिला.

प्रे. वुइल्सनच्या तत्त्वांच्या आधारें स्लाव्ह झेक व इतर सर्व लोक आस्ट्रियन सरकारजवळ स्वातंत्र्य मागूं लागले. तेव्हां निराश होऊन जर्मनी व आस्ट्रिया या दोघांनीं प्रे. वुइलसन यास तहकुबीविषयीं विनंति केली. तिचें उत्तर येण्यापूर्वीच आस्ट्रियन बादशहानें आपल्या राज्यांतील सर्व राष्ट्रांस स्वतंत्र राज्यें स्थापण्याची संमति दिली. परंतु यांत स्लाव्ह लोकांचा समावेश केला नाहीं. परंतु प्रे. वुइलसन याचें उत्तर आल्यानंतर असें स्पष्ट दिसलें कीं झेको-स्लोव्हेकिया हें स्वतंत्र राष्ट्र मानल्याशिवाय तह होणें शक्य नाहीं. निरनिराळ्या ठिकाणीं स्वतंत्र पार्लमेंटें भरून आस्ट्रियन साम्राज्याचे तुकडे झाले. व या पार्लमेंटांनीं आपापलें राष्ट्रीय सैन्य परत बोलाविलें. निदान स्वतःस राजा नेमून हे सर्व देश संयुक्तसंघपद्धतीनें एकत्र राहतील अशी चार्लस बादशहाला उमेद होती. आक्टोबरच्या शेवटीं हंगेरियांत राज्यक्रांति झाली. यामुळें इटलीशीं युद्धतहकुबीचा तह करावा लागला. या तहान्वयें आस्ट्रियाचा बराच प्रदेश इटलीस द्यावा लागला. या तहानें आस्ट्रियाचा पूर्ण नाश झाला. १९१८ नोव्हेंबर ११ तारखेस चार्लस बादशहानें आपलें राज्य सोडून दिलें. त्याच्या दुसऱ्या राष्ट्रीय असेंब्लीनें लोकसत्ताक राज्य जाहीर केलें.

आ स्ट्रि य न लो क स त्ता क रा ज्य—आस्ट्रियन लोकसत्ताक राज्याचें क्षेत्रफळ ३२४९१ चौरस मैल आहे. म्हणजे जवळ जवळ आयर्लंडच्या आकाराचें आहे. लोकवस्ती इंग्लंडच्या एक पंचमांश आहे. १९१८ त ४१०२ प्राथमिक शिक्षणाच्या सरकारी शाळा होत्या. व त्यांत ८ लक्ष विद्यार्थी होते. ३ विश्वविद्यालयें आहेत. शेंकडा ४० मनुष्यें शेतकीवर निर्वाह करतात. मुख्य पिकें राय, ओट, सातू, बटाटे, मका, कडधान्य व ताग हीं आहेत. कापसाचें व लोंकरीचें कापड, तागाचें कापड, रेशमी कापड, रासायनिक द्रव्यें बूट, हातमोजे, कांच यांचे कारखाने महत्त्वाचे आहेत.

साम्राज्यांतील रीशराथचे २१ ऑक्टोबर १९१८ ला जे सभासद होते त्यांपैकीं जर्मन सभासदांनीं आपलें नवीन पार्लमेंट स्थापलें, त्यांत बहुमतानें लोकसत्ताक पद्धतीची घटना पास झाली. या तात्पुरत्या नॅशनल असेंब्लीनें प्रथम सर्व हक्क आपल्या ताब्यांत घेतले व इंग्लंडमधील कॅबिनेटच्यासारखें एक असेंब्लीच्या सभासदांमधून निवडणूक करून कौन्सिल ऑफ स्टेट नेमलें. या कौन्सिलला सर्व अंमलबजावणीचे हक्क दिले. या पार्लमेंटशिवाय स्थानिक प्रांतांना निराळीं पार्लमेंटें दिलीं व एकंदर राज्यघटना युनायटेडस्टेट्स ( अमेरिका )च्या धर्तीवर (फेडरल) बनविली. कौन्सिल ऑफ स्टेटला कोणत्याहि कायद्याला इनकार करण्याचा हक्क दिला. असेंब्लीचे अध्यक्ष तीन असत व हे तीन मुख्य पक्षांनीं निवडलेले असत. हे आळीपाळीनें अध्यक्षाचें काम करीत. कौंसिल ऑफ स्टेट प्रत्यक्ष काम करण्याकरितां एक कॅबिनेट नेमीत असे. या कॅबिनेटमध्यें मंत्र्यांची व्यक्तिशः जबाबदारी असे. प्रांतिक पार्लमेंटें अगदीं स्वतंत्र असत. परंतु त्या सर्वांच्यावर एक प्रांतिक सरकार असे व ह्यांत सर्व स्थानिक पार्लमेंटांतून निवडलेले सभासद असत. हें प्रांतिक सरकार मुख्य पार्लमेंटला कनिष्ठ असून मुख्य पार्लमेंट त्याला हुकूम करूं शके. या नॅशनल असेंब्लीचें काम एक नवीन राज्यघटना करण्याकरितां दुसरी मुख्य असेंब्ली नेमण्याचें होतें. ही असेंब्ली एकंदर देशांत निवडणुकी होऊन अस्तित्वांत आणण्याकरितां नॅशनल असेंब्लीनें एक कायदा पास केला. त्या अन्वयें १७० सभासद निवडले गेले व नवीन कान्स्टियूअंट असेंब्ली तयार झाली. १९१९ मार्चला तिचें काम सुरू झालें, तिनें पूर्वीच्या तात्पुरत्या घटनेंत पुष्कळ फरक केले. प्रथम प्रांतिक सरकारावरचा व प्रांतिक पार्लमेंटावरचा ताबा मध्यवर्ती सरकारनें जास्त विस्तृत व कडक केला. कौन्सिल ऑफ स्टेट हें नांव काढून टाकून कॅबिनेटच्या हातांत अंमलबजावणीचें काम दिलें. परराष्ट्रीय राजकारण व तह करणें, परराष्ट्रांत वकील नेमणें इत्यादि अधिकार असेंब्लीच्या अध्यक्षास दिले. सेंट जर्मेनच्या तहामुळें जे आवश्यक फेरबदल करावे लागले ते असेंब्लीनें केले. सगळ्यांत महत्त्वाचें असेंब्लीचें काम राज्यघटनेस फेडरल तत्त्वावर स्थिर व चिरस्थायी करण्याचें होतें. प्रथम मध्यवर्ती सरकार व स्थानिक सरकारें यांच्या कक्षा निराळ्या केल्या. कांहीं महत्त्वाच्या गोष्टी फक्त मध्यवर्ती सरकारकडेच ठेवल्या व अगदीं स्थानिक गोष्टी व त्यांविषयीं कायदे करण्याचा हक्क स्थानिक पार्लमेंटांना दिला. मध्यवर्ती सत्तेचे कायदे करण्याचें काम नॅशनल कौन्सिल व फेडरल कौन्सिल हीं दोन्हीं करीत. फेडरल कौन्सिलमध्यें प्रांति क प्रतिनिधी प्रांतांतील लोकसंख्येच्या प्रमाणानें नव्हते. नॅशनल कौन्सिलची रचना पूर्वीच्या नॅशनल असेंब्लीप्रमाणेंच होती. फेडरल कौन्सिलला कायदा नापास करतां येतो परंतु पुन्हां तोच कायदा पास झाल्यास तो तहकूब करतां येत नसे. सरकारचें अंमलबजावणी करण्याचें काम फेडरल गव्हर्नमेंट 'कडे मध्यवर्ति असे. हें अगदीं इंग्लंडांतील कॅबिनेटप्रमाणें होतें. पूर्वीच्या तात्पुरत्या राज्यघटनेंत अध्यक्षास जे हक्क होते ते आतां फेडरल अध्यक्षास दिले. हा अध्यक्ष नॅशनल कौन्सिल व फेडरल कौन्सिल यांच्या एकत्र बैठकीमध्यें

सर्वांनीं मिळून निवडावयाचा असे. प्रांतिक सरकारमध्येंहि मध्यवर्ती सरकारच्या अंमलबजावणीच्या अधिकाऱ्यांचें मंडळ होतें. तें प्रांतांत अंमलबजावणी करीत व कांहीं बाबतींत प्रांतिक अंमलबजावणीचे अधिकारी मध्यवर्ती सरकारच्या तर्फे अंमलबजावणी करीत. प्रांतिक सरकारचे व त्यांचे अधिकारी यांनीं बेकायदेशीर वर्तन केल्यास एका विशिष्ट कोर्टापुढें त्यांस जबाब द्यावा लागे. या कोर्टाचें नांव 'कॉन्स्टिट्यूशल कोर्ट' असें होतें.

नवीन राज्यापुढें चलनाचा प्रश्नहि महत्त्वाचा होता. पूर्वीच्या आस्ट्रिया–हंगेरियन बँकांच्या ज्या नोटा नवीन राज्यांत प्रचलित होत्या त्यावर पुन्हां एक सरकारी छाप मारून त्या नोटा कायदेशीर केल्या. या शिवाय इतर राज्यांत गेलेल्या व दुसऱ्या कोणत्याहि पूर्वीच्या नोटा बेकायदेशीर आहेत असें ठरविलें. सोनें कमी असल्यानें सर्व खर्च नोटा काढून करण्याचें नवीन सरकारनें ठरविलें. १९२० मध्यें एकंदर नोटा १९१९ च्या तीनपट होत्या. त्यामुळें हुंडणावळीचा भाव खालीं जाऊन क्रोननची किंमत इतर देशांतील नाण्याच्या प्रमाणानें कमी झाली. परराष्ट्रीय हुंडणावळीचा धंदा कांहीं दिवस सरकारनें आपल्या ताब्यांत ठेवला. लढाईच्या नुकसानभरपाईचा ऑस्ट्रियन प्रजासत्ताक राज्यावर मोठा बोजा पडला व तो सर्व परराष्ट्रांस त्यांच्या चलनांत द्यावा लागे. त्यामुळें बजेटमध्यें फार तूट येऊं लागली. ही तूट भरून काढण्याकरितां सरकारानें इतर देशांत पुष्कळ कर्ज काढलें व इतकेंहि करून जी तूट राही ती नोटा काढून भरून काढवी लागली.

इतिहासः—१९१८ ऑक्टोबर मध्यें ऑस्ट्रियन साम्राज्य नामशेष झालें असें कळल्याबरोबर ऑस्ट्रियांतील जर्मन लोकांनीं स्वतंत्र होण्याचा निश्चय केला. त्याचें बरेचसें श्रेय 'स्पेशल डेमोक्रेट' पक्षाच्या सभासदांस दिलें पाहिजे. नवीन राज्यांत ख्रिश्चन सोशिआलिस्ट, जर्मन नॅशनल पक्ष, व स्पेशल डेमोक्रॅट या तीन पक्षांनीं राज्यकारभाराची जबाबदारी शिरावर घेतली. पैकीं शेवटचा पक्ष मजुरांशीं संलग्न असल्यामुळें त्याच्या हातांत सर्व सत्ता गेली. स्वयंनिर्णयाच्या तत्त्वाच्या आधारें युगो–स्लॅव्हिया, इटली, बोहेमिया या राज्यांनीं मूळच्या आस्ट्रियाचा पुष्कळ प्रदेश आपल्या राज्यांत सामील केला. पहिल्या कॉन्स्टिट्यूअंड असेंब्लींत १७० पैकीं ७२ जागा स्पेशल डेमोक्रॅट पक्षानें काबीज केल्या. त्यामुळें सर्व खात्यांचे सेक्रेटरी या पक्षांतील नेमले गेले. या पक्षाच्या आग्रहामुळें पूर्वीचें राजघराणें असेंब्लीनें काढून उमरावांची संस्था नष्ट करून टाकली. दुष्काळ व अराजकता यामुळें प्रांतांत बळी तो कान पिळी अशी स्थिति होऊं लागली व ती राज्यव्यवस्था सुस्थितीवर आणण्यास बाधक होऊं लागली. ब्युडापेस्ट व म्युनिक येथें सोव्हिएट पद्धतीचीं राज्यें लोकांनीं स्थापलीं. १९१९ जूनमध्यें व्हिएन्नांत दंगाली माजली. हींत बहुतेक भाग कम्यूनिस्ट लोकांचा होता. सेंट जर्मेनच्या तहामुळें ३० लक्ष जर्मन लोक आस्ट्रियाच्या नवीन राज्यांतून गळले. जर्मनी व आस्ट्रिया या दोघांचें एक राज्य होऊं नये अशी एक तहाची अट होती. यामुळें आपल्या राजकारणाचा अपजय झाला असें पाहून आस्ट्रियाचा वकील बौमेर यानें राजीनामा दिला. १७ आक्टोबरला असेंब्लीनें तह पास केला. डिसेंबर महिन्यांत डॉ. रेनरनें पॅरिस येथें तहाच्या कडक अटींसंबंधानें व आस्ट्रियांतील हालअपेष्टांसंबंधानें लिहून तहाच्या कांहीं अटी सौम्य करवून घेतल्या. परंतु सर्व राष्ट्रांचीं कमिशनें आस्ट्रियन सैन्य मोडून टाकण्याकरितां व्हिएन्नांत बसल्यामुळें आस्ट्रियाचें स्वातंत्र्य अद्याप नांवाचेंच होतें. रेनरनें नंतर जवळच्या राज्यांशीं स्नेह करण्याचा प्रयत्न केला. हंगेरीशीं स्नेह होणें जास्त कठिण झालें. तेथें सोव्हिएट पद्धति चालेनाशी होऊन घोटाळा झाला होता. युद्धाच्या वेळेपासून हंगेरियाचें शत्रुत्व झालें कारण तहांत आस्ट्रियाला हंगेरियाचा पश्चिम भाग मिळाला होता या व इतर कारणांनीं हंगेरीसारखा नवीन आस्ट्रियन राज्याविरुद्ध कारवाई करूं लागला.

याच सुमारास ख्रिश्चन सोशिआलिस्ट व सोशल डेमोक्रॅट यांजमध्यें कलह होऊं लागले त्यामुळें रेनर यानें राजीनामा दिला व दुसरी निवडणूक होऊन डॉ. व्हेनिस्क अध्यक्ष झाला. नवीन असेंब्लीत ख्रिश्चन सोशिआलिस्टचें बहुमत होतें व सोशल डेमोक्रॅट पक्ष खालीं गेला. यानंतर आस्ट्रियाची स्थिति जास्त वाईट होत गेली. अमेरिकेंत व इंग्लंड आणि फ्रान्स यांमध्यें एकमत न झाल्यामुळें आस्ट्रियास मदत करण्याची त्यांची इच्छा सफल झाली नाहीं. १९२१ मार्चमध्यें असें ठरलें कीं, आस्ट्रियाच्या पुनरुज्जीवनाचें कार्य 'राष्ट्रसंघा' कडे द्यावें. एप्रिलमध्यें टायरोल व इतर प्रांतांनीं जर्मन लोकसत्ताक राज्यांत सामील होण्याचें ठरविलें. ही घातक चळवळ थांबविणें कठिण झालें परंतु मे महिन्यांत सर्व पक्षांनीं सरकारास मदत करण्याचें ठरविलें व राष्ट्रसंघानें आर्थिक उन्नतीचा प्रश्न सोडविण्याचें आपल्या ताब्यांत घेतलें.

आस्ट्रियन साम्राज्य नष्ट झाल्यावर सगळ्यांत महत्त्वाचा प्रश्न अन्नाचा होता. नवीन राज्यांत उत्पन्न होणारें धान्य खाण्यास पुरेसें नव्हतें. त्याचप्रमाणें कोळसाहि पुरेसा नसल्यामुळें कारखान्यांची स्थिति फार वाईट झाली. प्रथम दोन वर्षें कच्चा मालहि पुरेसा नव्हता.

या सर्व आपत्तींचा प्रतिकार करण्याकरितां आवश्यक असे कायदे नवीन प्रजासत्ताक राज्यानें पास केले. विशेषतः बेकार लोकांनां काम न मिळाल्यास निर्वाहाकरितां आवश्यक अशी आर्थिक मदत देण्याची सरकारनें व्यवस्था केली. शिवाय प्रत्येक कारखानदारास पूर्वीच्या मजुराच्या एक पंचमांश मजूर ठेवण्यास कायद्यानें भाग पडलें. १९२० मे

नंतर आर्थिक स्थिति सुधारत चालली व १९२० च्या शेवटीं बेकार लोकांची संख्या १६००० पर्यंत खालीं गेली. सोशल डेमोक्रॅटचें प्राबल्य जोंपर्यंत होतें तोंपर्यंत त्यांनीं समाजसत्तावादाचा पुरस्कार करून खाजगी कारखाने व धंदे सरकारच्या ताब्यांत देण्याविषयीं अनेक कायदे पास केले. या सर्व कायद्यांचा हलके हलके परिणाम होऊन १९२१ च्या सुरवातीस एकंदर आर्थिक स्थिति लवकरच पूर्ववत होईल अशी उमेद वाटूं लागली. व्हिएन्ना शहर हें थोडक्याच वर्षांत यूरोपांतील व्यापाराचें एक मुख्य केंद्र होईल यांत संशय नाहीं.

१९२१ ते १९२३ म धी ल हं गे री ची स्थि ति.—जागतिक युद्धानंतरच्या तहानें बुरेनलंड ( पश्चिम हंगेरीचा एक जिल्हा ) आस्ट्रियाला देण्यांत आला. ह्या जिल्ह्यावर आस्ट्रिया व हंगेरी दोघेहि हक्क सांगत होते, व तो आस्ट्रियाला मिळाल्यानंतर परत मिळण्याकरितां हंगेरींत प्रयत्न सुरू झाले. १९२१ आगष्टमध्यें कर्नल हेज्रास नांवाच्या धाडसी इसमाच्या नेतृत्वाखालीं हा मुलूख आस्ट्रियाच्या ताब्यांत न जाऊं देण्याकरितां प्रयत्न करण्यांत आला. दोस्त राष्ट्रांचे निकाल अमान्य करण्याचें हें धाडस पाहून दोस्तांच्या मिशनला मोठें आश्चर्य वाटलें. १९२१ सप्टेंबरमध्यें हंगेरीच्या २५०० सैन्यानें आस्ट्रियांत शिरून आस्ट्रियन नॅशनल गार्डचा पराभव केला. या बंडाळीमुळें पदच्युत हॅब्सबर्ग घराण्याला पुन्हां राज्यप्राप्तीचा प्रयत्न करण्यास सवड मिळाली, आणि १९२१ आक्टोबरमध्यें माजी बादशहा कार्ल यानें स्वित्झर्लंडमधील वसतिस्थानाहून निघून विमानामधून बुर्गेनलंडचें मुख्य शहर ओल्डनबर्ग येथें प्रवेश केला. तेथें बादशहाच्या मदतीला एक चांगली फौज सज्ज होती. पण १९२० मध्यें असा कायदा पास झाला होता कीं, हॅब्सबर्ग घराण्यांतील कोणाहि इसमाला आस्ट्रिया किंवा हंगेरीच्या राज्यावर हक्क सांगूं द्यावयाचा नाहीं. कार्ल बादशहा तेथून ब्युडापेस्टला गेला व तेथें कार्लपक्षीयांची हंगेरियन सरकारच्या सैन्याशीं लढाई होऊन त्यांत कार्लला पकडण्यांत आलें. १९२१ नवंबरमध्यें कार्ल व माजी बादशाहीण झिटा यांनां हद्दपार करून मदीरा बेटांत ठेवण्यांत आलें. तेथें कार्ल १९२२ एप्रिलमध्यें मरण पावला. या बंडामुळें द्रव्यहानि होऊन अमेरिकेकडून मोठ्या मुदतीच्या कर्जाऊ रकमा मिळण्यास अडथळा मात्र उत्पन्न झाला. यानंतरहि राजपक्षीयांचे कट चालूच होते, व त्यांनीं कार्लच्या मरणानंतर त्याचा पुत्र ओटो याला राजा मान्य केलें. परंतु शेतकरी वर्गाचा कल लोकसत्ताक राज्यपद्धतीकडे अधिकाधिक वळत होता; आणि १९२२ मे च्या निवडणुकीमध्यें राजपक्षीयांचा पूर्ण पराभव झाला. व्हिएन्ना येथील सरकारी नोकरांची फाजील असलेली संख्या कमी करावी असा राष्ट्रसंघानें हुकूम केला. हंगेरीला २५०० लक्ष सोन्याचे क्राऊन कर्ज देऊन तें आयात निर्गतीवरील जकात, तंबाखू व मीठ यांच्या परवान्याचें उत्पन्न व साखरेवरील कर, या उत्पन्नांतून फेडून घ्यावी अशी योजना राष्ट्रसंघानें १९२३ नवंबरमध्यें तयार केली. या काळांत द्वंद्वयुद्धाची प्रवृत्ति हंगेरींत इतकी वाढली कीं, त्याविरुद्ध सरकारला जादा उपाय योजावे लागले तसेंच सार्वत्रिक दारिद्र्यामुळे पुरलेल्या प्रेतांवरील जिन्नस चोरणें, अशा प्रकारचे किळसवाणे गुन्हेहि होऊं लागले.

आ स्ट्रि या चीं सां प त्ति क व सा मा जि क स्थि ति (१९२१-२३):—१९२१ सप्टेंबरमध्यें आस्ट्रियांतील राहणीचा खर्च १९१४ मधील राहणीपेक्षां ९८ पटीनें वाढला होता. किंमती फार वाढल्यामुळें १९२१ डिसेंबरमध्यें व्हिएन्ना येथें मोठें बंड झालें, याच सालीं आस्ट्रियानें असा कायदा केला कीं, आस्ट्रियांतील सर्व रहिवाशांनीं परकी बँकनोटा, बिलें, व परकीयांनां दिलेलें कर्ज यांत गुंतविलेला सर्व पैसा आस्ट्रियन सरकारच्या बाँडमध्येंच घालावा. १९२२ फेब्रुवारीमध्यें ५००० लक्ष क्राऊन झेको—स्लोव्हाकियानें आस्ट्रियाला वीस वर्षांत परत फेडीच्या करारानें दिले. शिवाय ६५०० लक्ष सोन्याचे क्राऊन इतकें कर्ज आस्ट्रियाला मिळावें ही राष्ट्रसंघाची सूचना आस्ट्रियन पार्लमेंटनें मान्य केली. आस्ट्रियांतील या सांपत्तिक दुःस्थितीचा एक परिणाम असा झाला कीं, एका बाजूला झेको—स्लोव्हाकिया, युगोस्लाव्हिया, रुमानिया व पोलंड आणि दुसऱ्या बाजूला इटाली यांच्यामध्यें परस्परांबद्दल मत्सर उत्पन्न झाला. आस्ट्रियाच्या हलाखीचा फायदा घेऊन तेथें आर्थिक किंवा राजकीय सत्ता प्रतिपक्ष प्रस्थापित करील अशी भीति परस्परांनां वाटूं लागली.१९२३ मध्यें आस्ट्रियाची सांपत्तिक स्थिति कांहींशीं सुधारली. ब्रिटनमध्यें मिळालेल्या कर्जामुळें सरकारला येणारी तूट निम्म्यावर आली. त्याच सालीं आस्ट्रियांत फासिस्ट चळवळीच्या धर्तीवर उपक्रमिलेली समाजसत्ता वादाला विरोधी व राजसत्ताक पद्धतीला अनुकूल अशी चळवळ बरीच बळावली.

[ सं द र्भ ग्रं थ.—वुइल्यम कोक्से—हिस्टरी ऑफ दि हॉऊस ऑफ ऑस्ट्रिया १२१८—१७९२ (लंडन १८७३); वॅक्स–हिस्टरी ऑफ दि हॉऊस ऑफ ऑस्ट्रिया;व्हेसे–मेमॉयर्स ऑफ दि कोर्ट, ऑरिस्टॉक्रसी ॲंड डिप्लोमसी ऑफ ऑस्ट्रिया; मिट्रन—ऑस्ट्रिया हंगेरी; मीशिएल्स—सीक्रेट हिस्टरी ऑफ दि ऑस्ट्रियन गव्हर्मेंट; वर्मस—ऑस्ट्रो हंगेरियन एम्पायर, पोलिटिकल स्केच सिन्स ( १८६६ ); ॲन इंग्लिशमॅन—ऑस्ट्रो हंगेरियन एम्पायर ॲंड दि पॉलिसी ऑफ कौंट ब्यूस्ट पोलिटिकल स्केच १८६६—१८७० ( लंडन १८७० ); लेगर–हिस्टरी ऑफ हंगेरी; स्कॉटस व्हियेटर—दि फ्यूचर ऑफ ऑस्ट्रिया हंगेरी (लंडन १९०७) डब्ल्यू एच स्टाइल्स—ऑस्ट्रिया इन १८४८—४९ (न्यूयॉर्क १८५२ ) ].

**ऑस्ट्रेलिया**—दक्षिण गोलार्धांत आस्ट्रेलिया हें एकच खंड आहे. याची सर्वांत जास्त लांबी पूर्वपश्चिम २४०० मैल व सर्वांत जास्त रुंदी दक्षिणोत्तर १९७१ मैल आहे. टास्मानिया बेट धरून कॉमनवेल्थचें क्षेत्र १९२१ त २९७४५८ चौरस मैल भरलें. जागतिक युद्धानंतर जर्मन न्यू गिनी व इतर जर्मन ठाणीं जीं आस्ट्रेलियाच्या नियंत्रणाखालीं आलीं त्यांचें क्षेत्रफळ यांत येत नाहीं. या खंडाचा विशेष हा आहे कीं यात एकहि जिवंत ज्वालामुखी पर्वत नाहीं, अंतःप्रदेशाशीं दळणवळणास उपयोगी होईल अशी एकहि नाव्य नदी नाहीं व यांत एकहि हिमाच्छादित पर्वत नाहीं. आस्ट्रेलिया हें जगांतील सर्वांत मोठें बेट व सर्वांत लहान खंड आहे.

मर्यादा.—याच्या पूर्वेस पासिफिक महासागर, दक्षिणेस दक्षिण महासागर व बॉसची सामुद्रधुनी, पश्चिमेस हिंदी महासागर व उत्तरेस टायमर समुद्र आराफुरा समुद्र व टॉरस सामुद्रधुनि आहे.

पर्वत.—पूर्व किनाऱ्यावर एक पर्वतांची रांग आहे व या रांगेतील सर्वांत उंच शिखर बोगोंग हें ६५०८ फूट उंच असून तें व्हिक्टोरियामध्यें आहे. या रांगेतील दुसरीं उंच शिखरें माऊंट फेदर टॉप, माऊंट कॉबिरास हीं आहेत. आस्ट्रेलियातील सर्वांत उंच शिखरें माऊंट कॉस्क्रुस्को ७३२८ फूट व मॉऊंट टाऊनसेंड ७२६० फूट हीं होत.

नद्या.—क्विन्सलँडमध्यें पासिफिक महासागराला मिळणारी बर्डकिन नदी आहे. फिझरॉय व ब्रिसबेन ह्या क्विन्सलँड मधल्या दुसऱ्या नद्या आहेत. न्यू साऊथ वेल्समध्यें सर्वांत मोठी नदी "हंटर" ही आहे. आस्ट्रेलियातील सर्वांत मोठी नदी "मरे" या नावाची आहे. आस्ट्रेलियाच्या नैर्ऋत्य कोपऱ्यात स्वान नावाची नदी आहे. याशिवाय डॅलि, ॲडीलेड, रोपर वगैरे नद्या आहेत. जगांतील सर्वांत लांब नद्यात आस्ट्रेलियांतील डार्लिंग नदीची गणना होते. आस्ट्रेलियांतील बहुतेक नद्यांचे प्रवाह पावसाच्या पाण्यावर अवलंबून असतात.

सरोवरें.—आस्ट्रेलियांत टॉरेन्स सरोवर सर्वांत मोठें आहे. उत्तरेकडे आर व पश्चिमेस गेर्डनर हीं सरोवरें आहेत.

पाऊस व हवामान.—आस्ट्रेलियाच्या एकपंचमांश भागांत सबंध वर्षांत सरासरी १० इंच पाऊस पडतो. बाकीच्या भागांत चांगला पाऊस पडतो असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. कोठें कोठें तर वार्षिक पावसाचें मान सुमारें ७० इंच आहे.

उत्तर गोलार्धांत आस्ट्रेलिया इतक्याच अंतरावर असलेल्या भागांपेक्षां आस्ट्रेलियाची हवा कमी उष्ण आहे दक्षिण गोलार्धांत जुलई महिन्यांत थंडी असते व आस्ट्रेलियांत तेव्हां अर्ध्या भागांत उष्णता ४५° पासून ६१° पर्यंत असते. व दुसऱ्या अर्ध्या भागांत ६०° पासून ८०° पर्यंत असते. दिसेंबर महिन्यांत अर्ध्या भागांत उष्णतामान ६०° पासून ९५° पर्यंत व दुसऱ्या अर्धांत ६४° च्या खालीं असते.

लोकसंख्या.—आस्ट्रेलियांतील लोक मुख्यतः ब्रिटिशांचेच वंशज आहेत. इ० स० १९०१ च्या खानेसुमारीच्या वेळीं येथें ४८२४८ मूळचे रहिवाशी होते. इ. स. १९०६ त एकंदर लोकसंख्या सुमारें ४१,२०,००० होती यांत उत्तरेकडील प्रदेश (नार्दन टेरिटरी) व संयुक्त प्रदेश (फेडरल टेरिटरी) यांची लोकसंख्या मिळविली असतां एकंदर ४४,८०,५६५होती. यांतून मूळ रहिवाशांची संख्या सोडलेली आहे. १९१८ सालीं लोकसंख्या अंदाजी ४९८०५६५ असावी. हल्लीं या देशांत परदेशांतून फार थोडे लोक येतात व येथें जननसंख्येचें प्रमाण मृत्युसंख्येपेक्षां जास्त आहे.

आस्ट्रेलियाच्या गोऱ्या समाजांत बरींच वर्षें लोकसंख्येची वाढ होत नव्हती. त्याचीं कारणें ठरविण्याकरितां १९०३ मध्यें 'बर्थ रेट रॉयल कमिशन' नेमण्यांत आलें. कमिशनला दुसरें कोणतेंहि कारण आढळलें नाहीं, फक्त कुटुंबाच्या सुखस्वास्थ्यांत कमीपणा न यावा म्हणून कुटुंबाची वाढ कृत्रिम उपायांनीं खुंटावितात असें कमिशनचें मत पडलें. या कमिशनच्या अध्यक्षांनीं एके ठिकाणीं सांगितलें कीं, गर्भनाशक हत्यारें सिगारप्रमाणें घरोघर आहेत. कमिशन नेमल्यामुळें लोकांचें या प्रश्नाकडे लक्ष वेधलें व लोकसंख्या वाढली पाहिजे असें सार्वत्रिक मत बनलें. त्याचा परिणाम होऊन १९०६—१० या सालांत दरसाल हजारीं १५.९३ वाढ झाल्याचें आढळून आलें. पुढें युद्धकाळांत थोडक्या कमी प्रमाणांत पण वाढ चालूच राहिली. १९११ सालीं आस्ट्रेलियाची लोकसंख्या ४४५५००५ होती, ती १९२१ सालीं ५४१९७०२ भरली. येथील बहुतेक लोक म्हणजे दरशेंकडा ९७.५४ ब्रिटिश आहेत.

देशविभाग.—आस्ट्रेलियाचे पांच राजकीय विभाग आहेत. व याशिवाय टास्मेनिया बेट मिळून आस्ट्रेलियाचें लोकसत्ताक राज्य होतें. न्यू साऊथ वेल्स व्हिक्टोरिया, क्वीन्सलंड, दक्षिण आस्ट्रेलिया व पश्चिम आस्ट्रेलिया हे पांच राजकीय विभाग आहेत. याखेरीज नॉर्दन टेरिटरी व फेडरल टेरिटरी हे दोन विभाग आहेत.

संरक्षणः—एकोणिसाव्या शतकापर्यंत संरक्षणाच्या बाबतीत आस्ट्रेलिया इंग्लंडवर अवलंबून होतें. आस्ट्रेलियाच्या संरक्षणाची सर्व जबाबदारी ब्रिटननें संभाळावी व त्याबद्दल फक्त पैशाची मदत आस्ट्रेलियन सरकारनें द्यावी, असें धोरण स्वराज्य स्थापनेनंतरहि १९०७ पर्यंत चालू होतें; पण ह्युजेसनें प्रथमपासून सक्तीचें लष्करी शिक्षण व स्वराज्याचें सैन्य असावें असा पुरस्कार चालविला होता. १९०९ पासून १९१८ पर्यंत देश्य लष्कर उभारण्याबद्दलचे अनेक कायदे झाले. बाराव्या

वर्षापासून सव्विसाव्यापर्यंत हळूहळू सर्व लष्करी शिक्षण प्रत्येकाचें पुरें व्हावें, अशी योजना हल्लीं अमलांत आहे. आस्ट्रेलियानें स्वतःच्या स्वतंत्र आरमाराचाहि उपक्रम केला आहेच.

ट्रान्सवालच्या युद्धाकरितां ऑस्ट्रेलियानें कांहीं सैन्य पाठविलें व तेव्हां त्या लोकांत लष्करी वारें शिरलें त्यामुळें आस्ट्रेलियाचें रक्षण आस्ट्रेलियानेंच केलें पाहिजे ही भावना लोकांत जागृत झाली. इ. स. १९१७ मध्यें येथें एकंदर खडें सैन्य ३९२३, नागरिकसैन्य ८३,७९३, रायफल क्लब १०१७३४ व उमेदवार ( सीनियरकॅडेट ) ८९,७४२ व कांहीं किरकोळ आफिसरांची संख्या मिळून एकंदर सैन्य २८१९४२ होतें. १९०९ मध्यें सक्तीच्या लष्करी शिक्षणाचा प्रश्न उपस्थित झाला व १९१५ पर्यंत निरनिराळे कायदे पास करण्यांत आले. सध्या १२ ते १८ वयापर्यंत उमेदवारी ( कॅडेट जुनियर व सिनियर ), पुढें दोन वर्षें नागरिक सैन्यांत उमेदवारी( रिक्रूट ), नंतर सहा वर्षें नोकरी याप्रमाणें वयाचीं २६ वर्षें पुरीं होईपर्यंत लष्करी शिक्षण घ्यावें लागतें, व पुढें एखाद्या रायफल क्लबचें सभासद असावें लागतें. पण यात प्रत्यक्ष शिक्षण सुमारें दरवर्षीत सोळा दिवस पडतें.

आ र मा रः—१९०३ च्या तहाप्रमाणें कांहीं वार्षिक खंडणी घेऊन आस्ट्रेलियाला आरमार देण्याचें ब्रिटननें कबूल केलें व त्याप्रमाणें १९०८ पर्यंत ब्रिटिश आरमार आस्ट्रेलियन समुद्रांत होतें. इ. स. १९०८-०९ मध्यें आस्ट्रेलियाचें स्वतःचें मालकीचें आरमार असावें असा प्रश्न उपस्थित झाला. त्याप्रमाणें १९११ मध्यें रॉयल ऑस्ट्रेलियन नेव्हीची स्थापना झाली. यांत एक लढाऊ चिलखती जहाज, तीन साधीं लढाऊ जहाजें, सहा विनाशिका व २ पाणबुड्या असाव्या असें ठरलें. या आरमारावर शांततेच्या वेळीं लोकसत्तेचा ताबा रहावयाचा व युद्धकाळात तें ब्रिटनचे सत्तेखालीं रहावयाचें व पूर्व आरमाराचा तिसरा भाग म्हणून चिनी व ईस्ट इंडिया तुकडीबरोबर त्यानें एकाच्याच हुकमतीखालीं काम करावें असें ठरलें मात्र हें आरमार लोकसत्तेच्या परवानगीशिवाय आस्ट्रेलियन किनाऱ्यापासून हलवावयाचें नाहीं. गेल्या महायुद्धांत या आरमारांतील ऑस्ट्रेलिया या लढाऊ जहाजानें जर्मन आरमाराविरुद्ध व सिडने या हलक्या जहाजानें एमडन बुडवून चांगली कामगिरी केली. १९१५ मध्यें आस्ट्रेलियन आरमारावर एकंदर ९२४३ लोक होते.

सिंगापूरच्या आरमारी ठाण्याच्या योजनेला इ. स. १९२३ जुलैमध्यें आस्ट्रेलियाची सम्मति जाहीर झाली. ही गोष्ट आस्ट्रेलियाला अर्थातच पसंत होती. कारण संरक्षणाकरितां जपानपेक्षां ब्रिटिश आरमारावर अवलंबून राहणें त्यांच्या भावनांना परिपोषक होतें. मजूर मंत्रिमंडळानें सिंगापूरची योजना तहकूब केली व जपाननें याबद्दल आनंद प्रदर्शित केला या गोष्टीनें मात्र आस्ट्रेलियाला फारसा आनंद झाला नसेल.

प र रा ष्ट्री य धो र ण.—ब्रिटिशांचें धोरण हेंच सर्व ब्रिटिश साम्राज्याचें धोरण म्हणून जाहीर होण्यापूर्वी त्याला वसाहतींकडून संमति मिळविली पाहिजे असा आग्रह आस्ट्रेलियानें धरला होता. तसेंच साम्राज्याचें व्यापारी धोरण ‘ जशास तसें ’ या तत्वाचें असावें असें आस्ट्रेलियाचें म्हणणें आहे. आस्ट्रेलियानें बसविलेल्या जबर बंदरी जकातींविरुद्ध ब्रिटननें तक्रार केली, कारण या जकाती युद्धपूर्व जकातींपेक्षां १४८ टक्यांनीं वाढल्या होत्या. जर्मनीमधून येणाऱ्या मालावर या जकातींमुळें बरेंच नियंत्रण पडलें. १९२३ च्या आगष्ट, सप्टेंबर महिन्यांत पॅन-पॅसिफिक ( पासिफिक महासागरांतील सर्व देशांची ) कांग्रेस सीडने येथें भरली होती तिला मोठाले सुप्रसिद्ध शास्त्रज्ञ व राजकारणी पुरुष हजर होते. त्यांत चीन व जपान येथील प्रतिनिधीहि होते. जपानच्या प्रतिनिधीमंडळांत पुष्कळ उमराव व शास्त्रज्ञ होते त्यांचा हेतु जपान व आस्ट्रेलिया यांच्यामध्यें मैत्री व व्यापार वाढवावा हा होता. १९२३ सप्टेंबरमधील भूकंपाच्या अनर्थाच्या वेळीं जपानला न्यू साऊथ वेल्स सरकारनें १०००० पौंड रोख व ५०००० पौंड किंमतीची अन्नसामुग्री पाठवून मदत केली. आस्ट्रेलियाची कच्ची लोकर विकत घेणारें गिऱ्हाईक या नात्यानें जपानचें महत्त्व अधिकाधिक वाढत आहे.

शि क्ष ण.—आस्ट्रेलियांत एकंदर १२००० शाळा आहेत. प्रत्येक संस्थानांत शाळेंत जाण्याला योग्य अशा मुलांना शिक्षण मोफत व सक्तीचें आहे. शाळेंत जाण्याचें वय निरनिराळ्या संस्थानांतील कायद्यानें निरनिराळें ठरविलेलें आहे. याविषयीं माहिती प्रत्येक प्रांताच्या वर्णनांत दिली आहे.

या देशांतील मुख्य धंदा गुरेंढोरें पाळण्याचा आहे. जगांतील एकंदर मेंढरांच्या सुमारें ⅙ मेंढरें आस्ट्रेलियांत आहेत, व सन १९१६-१७ सालीं ५४ कोटी ७७ लक्ष पौंड म्हणजे साडेतीन कोटी पौंड किंमतीची लोकरीची पैदास झाली. १९१९ मध्यें मेंढ्या ८४० लक्ष होत्या. मेंढ्यांप्रमाणें गुरें व घोडेहि मोठ्या प्रमाणांत पाळतात. कारण याच सालीं १३० लक्ष गुरें व २५ लक्ष घोडे आस्ट्रेलियांत होते. वरील धंद्याच्या खालोखाल येथें शेतीचा धंदा चालतो व १६ लक्ष एकर जमीन लागवडीखालीं आहे. येथें गहूं, मका, ओट, बटाटे, ऊंस, द्राक्षें वगैरे होतात. कापसाचें उत्पन्नहि दांडगें आहे. याशिवाय इमारतीचें लांकूड व मासे परदेशांत जातात.

पापुआ बेटाची जमीन लागवडीस चांगली आहे; पण तेथें पापुअन लोक फार आहेत. फिजी बेटाप्रमाणें येथें हिंदुस्थानांतील मजूर आणून लागवड करावी, अशी सूचना पुढें आली होती; पण आस्ट्रेलियन सरकारनें पापुअन

करितांच तें क्षेत्र राखून ठेवण्याचें ठरविलें. १९१८ मध्यें पापुअन लोकांवर माणशीं एक पौंड कर बसविला, त्याचा उद्देश लोकांनीं उद्योग करून पैसा मिळवावा व कराचें उत्पन्न त्या लोकांच्या हिताच्या गोष्टी करण्यांत खर्च करावें हाच होता, त्यामुळें या लोकांची प्रवृत्ति शेतकी व इतर उद्योगधंदे करण्याकडे वाढत चालली आहे.

शे त की ला पा णी पु र व ठा.—आस्ट्रेलियन हायड्रालॉजिक सर्व्हिस ( पाणीखातें ) मधील मुख्य अधिकाऱ्यानें आस्ट्रेलियाच्या वाळवंट म्हणून गणलेल्या प्रदेशांत जमिनीखालीं मोठाले जलसंचय शोधून काढले आहेत. त्यांपैकीं उत्तर भागांतील एक सर्व फ्रान्स देशाच्या आकाराहूनहि मोठा आहे. अशा रीतीनें जलसंचयांच्या मोठाल्या विहिरी तयार करून व त्यांचे पाट काढून हल्लीं ओसाड असलेली बरीचशी जमीन चांगली सुपीक बनवितां येईल.

जंगल व मच्छीमार यांपासून ७०००००० पौंड उत्पन्न होतें. आस्ट्रेलियांत जगांतील सर्व देशांपेक्षां जास्त सोनें निघतें. इ. स. १९०५ मध्यें जगांत निघालेल्या सोन्याचा पाव हिस्सा आस्ट्रेलियांत निघाला. अलीकडे सोनें अगदींच कमी सांपडतें.याशिवाय आस्ट्रेलियांत चांदी तांबें,कथील व लोखंड हीं खनिज द्रव्यें सांपडतात.१९१७सालीं सोनें ६१ लक्ष पौंड, रुपें ५५ लक्ष, तांबें ४८ लक्ष,व कथील १० लक्ष पौंड किंमतीचें निघालें. १९१७ पर्यंत एकंदर सोन्याची पैदास ५८ कोटी ४१ लक्ष पौंड किंमतीची झाली. तेथून निर्गत होणाऱ्या मालांत लोंकर, गहूं, पीठ, लोणी, मांस, तांबें हे मुख्य जिन्नस असून आयात मालांत कापड, औषधें, यंत्रें, हत्यारें, तेल, चहा, मद्य हे जिन्नस आहेत. बहुतेक व्यापार इंग्लंड व ब्रिटिश साम्राज्यांतील भागाशीं चालतो. कॉमन वेल्थच्या आयात व निर्गत मालाचे आंकडे येणेंप्रमाणें:—

| सन | आयात पौंड | निर्गत पौंड |
|---|---|---|
| १९११ | ६६,९६८,००० | ७९,४८२००० |
| १९१३ | ७९,७४९,००० | ७८,५७२,००० |
| १९१९–२० | ९८,६०७,००० | १४८,५६५,००० |

दळणावळणाच्या साधनांत पुष्कळ वाढ झाली आहे. सन १९०१ सालीं १०१२३ मैल रेल्वेरस्ता होता, तो १९१९ मध्यें २५६५७ मैल झाला. येथील बहुतेक रेल्वे सरकारच्या मालकीच्या आहेत. व्यापारी जहाजेंहि सरकारी मालकीचीं ठेवण्याची पद्धति कॉमनवेल्थ सरकारनें स्वीकारली आहे; पण १९१६ सालीं बंदरी व्यापारच फक्त देशी बोटी करीत असत. शिवाय खाजगी नाविक कंपन्याहि होत्या व त्यांवर सरकारचें नियंत्रण बरेंच असे. परदेशी व्यापार परकी बोटींच्या ताब्यांत असल्यामुळें जागतिक युद्ध सुरू होतांच परदेशाबरोबरच्या व्यापारास अडथळा होऊं लागला, म्हणून त्या वेळचा मुख्य प्रधान ह्यूजेस यानें १५ बोटी विकत घेतल्या, शिवाय आस्ट्रेलियांत स्वतः सरकारनें बोटी बांधण्यास सुरवात केली. त्यांपैकीं १९२१ मध्यें सहा नव्या बोटी तयार होऊन चालू झाल्या. १९१७त शिपिंगबोर्ड स्थापन करण्यांत आलें.तथापि सरकारी मालकी व सरकारी कडक नियंत्रण हीं धोरणें फायदेशीर होत नाहींत, असा अनुभव येत आहे व त्यामुळें त्यांत बदल करण्यांत येईल असें वाटतें.

सं र क्ष क व्या पा र प द्ध ती चा आ स्ट्रे लि यां ती ल उ द्यो ग धं द्यां व र प रि णा म —सुमारें पंचवीस वर्षांपूर्वी संयुक्त सरकारची स्थापना होऊन संरक्षकपद्धति सुरू झाली, त्याचा परिणाम कच्चा माल उत्पन्न करणारांवर वाईट झाला आहे. लोंकरीचा व्यापार पूर्ववत् चालला आहे; पण गहूं पिकविणारे व मांसोत्पादनाचा धंदा करणारे यांचा तोटा झाला आहे. शेतकीच्या धंद्याला समाजसत्ताकपद्धतीचें ( जमिनींची मालकी व शेतकीसंबंधाचे श्रम यांची न्याय्य विभागणी ) स्वरूप देण्याचा पहिला निश्चित उपक्रम क्वीन्सलँडमध्यें करण्यांत आला. गव्हाचा व्यापार सरकारमार्फत करतां यावा म्हणून सर्व गहूं सक्तीनें गोळा करावा, अशी सूचना क्वीन्सलंडच्या शेतकीमंडळानें ( ॲग्रिकल्चर बोर्डनें ) केली. कापूस पिकविण्यासंबंधानें असाच उपाय क्वीन्सलंडमध्यें योजला आहे आणि दर पौंड कापसास साडे पांच पेन्स या भावानें सर्व कापूस तीन वर्षेंपर्यंत खरेदी करण्याची हमी सरकार घेणार आहे. तंबाखूचें पीक चांगल्या स्थितींत आहे; पण फलसंवर्धन व फलसंरक्षण ( कॅनिंग ) हीं भरभराटींत नाहींत. वर सांगितलेल्या उत्पन्नाच्या बाबा कमी होऊन त्याऐवजीं कारखाने वाढत आहेत व त्यामुळें लोकवस्ती खेड्यांतून कमी होऊन शहरांत गर्दी होत आहे.

' इंपीरियल प्रेफरन्स ' म्हणजे वस्तुतः संरक्षकपद्धतीच होय. ट्रेड यूनियन्स व मजूरपक्ष यांनीं संरक्षकपद्धति मान्य केली आहे; पण या बाबतींत आस्ट्रेलियांतील मजूरपक्ष व इंग्लंडांतील मजूरपक्ष यांच्यामध्यें पूर्ण मतभेद आहे. मजुरांना आपापल्या मूळ गांवीं परत पाठविण्याच्या योजनेमुळें आस्ट्रेलियाच्या सरकारचें कर्ज बरेंच वाढलें. कारण वसाहतवाल्यांना अगाऊ पैसे द्यावे लागले व सार्वजनिक इमारती वगैरेवर पैसे खर्चावे लागले. रेल्वे करण्यांतहि बराच तोटा आला. कारण जमिनींचे मालक स्वतः जमिनींचा उपयोग करीत नसत किंवा ज्यांना उपयोग कर्तव्य आहे, त्यांनाहि योग्य मोबदला घेऊन देत नसत. सरकारनें जमिनी विकत घेणें हितावह होईल कीं नाहीं याबद्दल मतभेद आहे. ५००० पौंड किंमतीपर्यंतच्या सर्व जमिनींच्या किंमतीवर संयुक्त सरकारला कर बसविण्याचा अधिकार नसल्यामुळें एक पौंडावर २ पेन्स इतका जमिनीबाबत कर बसविण्याचा विचार चालू आहे.

रा ज्य घ ट ना व हा य को र्ट.— संस्थानी सरकार ( स्टेट गव्हर्नमेंट ) व वरिष्ठ सरकार ( फेडरल गव्हर्नमेंट ) यांनीं एकमेकांच्या सत्तेचें मर्यादातिक्रमण करूं नये म्हणून राज्यघटनेच्या नियमानुसार कारभार

चालला आहे कीं नाहीं, हें ठरविण्याचा अधिकार आस्ट्रेलियाच्या हायकोर्टाला देण्यांत आलेला आहे. संस्थानी सरकार व वरिष्ठ सरकार यांनीं केलेले कायदे राज्यघटनेच्या नियमानुसार नसल्यास ते रद्द ठरविण्याचा अधिकार या कोर्टास आहे, व तदनुसार कित्येक कायदे या कोर्टानें रद्द ( अल्ट्रा व्हायरिस ) ठरविले, त्यामुळें मजूरमंत्रिमंडळानें राज्यघटना दुरुस्त करण्याचा प्रयत्नहि केला; पण तो फसला. १९०६ सालीं आस्ट्रेलियन पार्लमेंटनें पास केलेला जकातीचा कायदा 'एक्साइज ॲक्ट' गैरकायदा (इनव्हॅलिड) असल्याचें ठरविलें. संयुक्त व्यापारी पंच कायदा ( फेडरल इंडस्ट्रिअल आर्बिट्रेशन ॲक्ट ), व्यापारी चिन्ह ( ट्रेड मार्क्स ॲक्ट ) वगैरे कायद्यांतलाहि कांहीं कांहीं भाग हायकोर्टानें रद्द ठरविला. राज्यघटनेच्या नियमाबाबतचें आस्ट्रेलियन हायकोर्ट हेंच शेवटचें अपीलकोर्ट समजलें जातें. इतर खटल्यांच्या बाबतींत मात्र हें हायकोर्ट व इंग्लंडांतील प्रिव्ही कौन्सिल यांपैकीं कोठेंहि शेवटचें अपील करता येतें. मजूरपक्षाला समाजसत्तावाद्यांच्या तत्त्वानुसार कायदे करूं न देण्यास आस्ट्रेलियाच्या मूलभूत राज्यघटनेच्या कायद्याची फार मदत होते. ब्रिटिश साम्राज्यांतील इतर सर्व ठिकाणच्या राज्यघटनेपेक्षां आस्ट्रेलियाची राज्यघटना अत्यंत पुराणमतानुयायी ( कांझर्व्हेटिव्ह ) असल्याचें प्रत्ययास आलें आहे.

लोकसत्तेच्या उत्पन्नाच्या बाबी संस्थानांच्या बाबतीहून भिन्न आहेत. करापासून प्रत्येक रहिवाश्यापाठीमागें आठ पौंड सतरा शिलिंग नऊ पेन्स इतकें उत्पन्न आहे.

ऑ स्ट्रे लि यां ती ल मू ळ चे लो क.—१९११ मध्यें मूळ रहिवाशांची संख्या अंदाजी पाऊण लाख पासून लाखापर्यंत असावी. ऑस्ट्रेलियामध्यें तीन प्रकारचे भाषासमूह अस्तित्वांत आहेतः—( १ ) उत्तरेकडील भाषासमूह, ( २ ) पुराणभाषासमूह, व( ३ ) नवभाषासमूह. उत्तरेकडील भाषासमूह हा उत्तर ऑस्ट्रेलियात प्रचलित आहे. पुराणभाषासमूहाचा प्रसार व्हिक्टोरिया प्रांतात आढळून येतो व बाकीच्या सर्व ऑस्ट्रेलियाच्या भागांत नवभाषासमूहाचाच प्रचार असल्याचें दिसून येतें. या तीन भाषासमूहांच्या आधारें, ऑस्ट्रेलियांतील जनसमूहाचें वर्गीकरण विद्वानांनीं केलें आहे व तें ठोकळ मानानें बरोबरहि आहे. हें केल्यानंतर; त्या त्या जातिसमूहाचे आचारविचार कोणत्या प्रकारचे आहेत तें पहाणें जरूर आहे.

ध र्म.—ऑस्ट्रेलियांतील निरनिराळ्या जाती, निरनिराळ्या देवांची उपासना करितात. ऑस्ट्रेलियाच्या आग्नेय भागातील जातींचा देव बैंडाम हा होय. हा सकल जगाचा स्वामी असून तो त्रिकालाबाधित, सर्वज्ञ व सर्वशक्तिमान आहे अशी या जातींची समजूत आहे. प्रत्येक धर्म कृत्याच्या प्रसंगीं या देवाची प्रार्थना करण्याची वहिवाट आहे. मध्य ऑस्ट्रेलियांतील जातींचा प्रमुख देव आल्टजीरा हा आहे. व डीरी जातींचा मुरा नामक देव आहे. देवाप्रमाणेंच मुडदेगांग नांवाच्या एका सैतानाचीहि त्यांच्यामध्यें कल्पना आहे. हा मुडदेगांग, लोकांनां पापकर्माकडे वळविणारा आहे अशी त्याच्यासंबंधाची आख्यायिका आहे. आस्ट्रेलियांत स्त्रीदैवतांचा पूर्ण अभाव दिसून येतो.

ल ग्न री ति, विनिमय विवाह आणि राक्षसविवाह पद्धतिः— एखाद्या तरुण व शूर पुरुषास स्त्री मिळविण्याची इच्छा झाली, म्हणजे तो बहुतकरून कोणा अन्य तरुण पुरुषास आपली बहीण अथवा एखादी नातेवाईक तरुणी देतो, व तिच्या मोबदल्यांत त्यापासून स्वतःला बायको मिळवितो. परंतु, अशा रीतीनें विनिमय करण्याला आपल्या नातेवाईकांत अगर जातीमध्यें कोणी अविवाहित तरुणी नसेल, तर तो अन्य जातींच्या वसतीमध्यें फिरून त्यांच्यातील एखादी कुमारिका पाहून ठेवितो, व तिला धरून नेण्याकरितां तिच्या पाळतीवर असतो. तिला लग्नाचें मागणें घालण्याचा त्याचा प्रकार अगदीं साधा—धोपट मार्गाचा —परंतु काम फत्ते करणारा असतो. तो असा कीं, तो मनुष्य संधि साधून आपल्या प्रिय तरुणीला बडग्याचा असा एक तडाखा देतो कीं, त्यासरशीं ती एकदम बेसावधच होते ! नंतर चपळाई करून तो तिला तसल्या स्थितींत एखाद्या एकांत स्थळीं ओढून नेतो आणि तेथें ती कांहीं वेळानें शुद्धीवर आली म्हणजे तो तिला मोठ्या शेखीनें घरीं घेऊन येतो. अबला-कुमारिकांवर चाल करून त्यांनां आपल्या बायका करून आणण्याच्या कामीं, कधीं कधीं दोघे मर्द बहादुर एकमत करून असतात ! ते मोठ्या खुबीनें आपल्या येण्याचा सुगावा कोणासहि लागूं देत नाहींत; आणि लपून छपून आपल्या इष्ट तरुणींच्या हालचालीवर सारखी नजर ठेवितात. ज्या कुमारिकांस धरून न्यावयाचें त्यांच्यासंबंधीं जरूर असलेली सर्व माहिती मिळाली, म्हणजे ते आपला डाव साधण्यासाठीं एखाद्या काळोखाच्या तुफानाच्या रात्रीची वाट पहात असतात. तिचा योग आला म्हणजे ते उघडे बोडके होऊन हातांत फक्त लांब लांब भाले घेतात, आणि झाडांझुडपांतून दबकत दबकत वसाहतींमध्यें जाऊन आपल्या आवडत्या तरुणीच्या घरापुढें येऊन थडकतात. तेथें आंगणामध्यें आगट्या जळत ठेऊन त्यांच्या आसपास ह्यांनां पाहिजे असलेल्या कुमारिका निजलेल्या असतात. मग हे चकार शब्दहि न काढतां हळूहळू इतके पुढें सरकतात कीं, तेथून प्रत्येकास आपापली इष्ट तरुणी स्पष्ट ओळखितां येते. नंतर त्या दोघांतून एकजण आपला भाला पुढें करून त्याचें बांकदार टोंक त्या तरुणीच्या दाट आणि वाऱ्यानें हलणाऱ्या केसांमध्यें घालतो, व हातांतील भाला वाटोळा फिरवितो. त्यामुळें अर्थातच तिचे कांहीं केस भाल्याच्या टोंकास लपेटले जातात. नंतर तो एका हिसक्या सरशीं तिला सहज जागी करितो. ती आपले डोळे उघडून

पहाते, इतक्यांत हा चलाखी करून दुसरें एक तीक्ष्ण शस्त्र तिच्या कंठास लावितो ? अर्थात् दोन्हीं कडून अशा रीतीनें पेचांत आल्यावर तिला आपले डोळेहि लावितां येत नाहींत आणि ओरडतांहि येत नाहीं. कारण, आरोळी मारली, किंवा सुटून पळून जाण्याचा यत्किंचितहि प्रयत्न केला, तर आपणाला तत्काळ यमसदनीं जावें लागेल, हें ती पूर्णपणें जाणून असते. मग ती शहाणपणा करून मुकाट्यानें उठतें व आपलें हरण करूं इच्छिणाराच्या स्वाधीन होते. नंतर ते तिला दूर अंतरावर नेऊन एका झाडाशीं बांधून टाकितात. आणि पुन्हां वस्तींत जाऊन त्या प्रमाणें दुसऱ्या कुमारीलाहि पकडून आणितात. अशा रीतीनें उभयतांचे इष्ट हेतू सिद्धीस गेले, म्हणजे ते मोठ्या तांतडीनें आपल्या स्त्रिया घेऊन घरीं जातात, तेथें सर्वांकडून त्यांची वाहवा होते, व ह्या मर्दुमकीच्या कृत्याबद्दल त्यांचे मोठे मानपान होतात. कधीं कधीं अशा प्रकारें स्त्री–हरण करणारे वरील प्रकारचें चातुर्य लढवीत असतां, आसपासचे लोक जागे होऊन, एकदम गलबला करितात, व यांचें कार्य फिसकटतें. मग ते त्या धांदलींत सहज निसटून जातात. पण पुढें केव्हांना केव्हांतरी आपला मनोरथ पूर्ण केल्यावांचून रहात नाहींत. प्रसंगवशात एखादा प्रसिद्ध हिम्मतबहाद्दर आपली वधू अशा रितीनें मिळवून पलायन करीत असतां त्याचा आणि वधू पक्षांतील लोकांचा सामनाहि होतो. पण तो न डगमगतां, आणि आपल्यासाठीं आपल्या इष्टमित्रांस लढण्याची तसदी न देतां प्रतिपक्षाच्या भाल्यांचे आघात सहन करण्याची छाती दाखवितो. असें दिव्य केलें म्हणजे त्या जवान मर्दानें आपली कुब्रा–वायको नीतीनें मिळविली, व अपराधाचा प्रतिकार केला असें समजून उभयपक्षांत सलोखा होतो, व नंतर सर्व मिळून एक मेजवानी झोडतात, म्हणजे झालें. या विवाहास 'राक्षस विवाह' म्हणतां येईल [ अलोन लग्नविधी व सोहाळे ]

मृ तां चे सं स्का र.—दक्षिण आस्ट्रेलिया, न्यू साउथ वेल्स, व्हिक्टोरिया इत्यादि प्रदेशांत मृतांनां पुरण्याची चाल आहे. पण उत्तर आस्ट्रेलियांत, व क्वीन्सलंड प्रदेशांत मृतांनां पुरण्याची अथवा गिधाडासमोर टाकून देण्याची अगर जाळण्याचीहि वहिवाट आहे. मृताचा आत्मा हा मनुष्याच्या धडग्यांत रहातो अशी दक्षिण आस्ट्रेलियनांची समजूत आहे तर उत्तरेकडील जाती, आत्मा हा मृताच्या शरीराबरोबर व अस्थीबरोबरच असतो व अस्थींची व्यवस्था झाल्यानंतर, मग तो आपल्या स्वतःच्या निवासस्थानाकडे जातो असें मानितात. व्हिक्टोरिया व न्यू साउथवेल्सच्या दक्षिणेंतील जातींमध्यें, मृत माणसाच्या दफन स्थानावर मृतांच्या आप्तांनीं झोपडी बांधून सुतक संपेतों रहाण्याची पद्धत आहे.

पु न र्ज न्म.–पोर्ट लिंकनजवळील प्रदेशांत मृताचा आत्मा हा एका बेटांत जाऊन रहातो असें मानतात. अडीलेडच्या टापूंत मृताचा आत्मा हा दिवसां, झाडाझुडपांत रहातो व रात्रीं बेडूक, पाकोळ्या वगैरे खाण्याकरितां बाहेर पडतो अशी समजूत आहे. यूहलई जातींची अशी कल्पना आहे कीं मृतांचा आत्मा हा मृत मनुष्याच्या मृत आप्तांच्या जवळ रहाण्यासाठीं ऊवीऊवी पर्वतावर जातो. पुनर्जन्माची कल्पना सर्व आस्ट्रेलियन जातींत सारखी रूढ होती असें स्पेन्सर व जिलेन यांचें मत आहे. पण यासंबंधीं विद्वानांत अद्यापि मतभेद आहे.

मृ तां सं बं धीं क ल्प ना.—कांहीं जातींत पूर्वजांच्या दैवकांची पुजा करण्याची पद्धत आहे. मृतांच्या अंगीं, तुफान उत्पन्न करण्याची व पाऊस पाडण्याची शक्ति असते अशी आस्ट्रेलियनांची समजूत आहे. मनुष्याच्या दफनस्थानावर निजणें हें मांत्रिक होण्याचें एक साधन आहे, अशी विचित्र कल्पना या लोकांत आढळून येते. मृत मनुष्य श्वेतवर्णीयांच्या वंशांत पुन्हां उत्पन्न होतात अशी एक कल्पना बरीच रूढ असल्याचें दिसतें.

आ त्मा.—आत्म्यासंबंधींच्या आस्ट्रेलियांतील लोकांच्या काय कल्पना होत्या हें निश्चित सांगता येत नाहीं. युहलई लोकांत तीन आत्मतत्त्वें मानलेलीं दिसतात तीं (१) योवी–मरणाच्यावेळीं नाहींसा होणारा प्राण,(२) डोवी--स्वप्न सृष्टीवर ताबा चालविणारें तत्त्व व ( ३ ) मुल्विल–आभासाचें तत्त्व हीं होत. कांहीं जाती दोनच आत्मतत्त्वें मानतात तर कांहीं जाती आत्मा म्हणजे प्राणवायु आहे असें समजतात.

चे टू क.—मध्यआशियांत पुरुष व स्त्रिया या दोघांनाही चेटकाचा धंदा करितां येतो. अनुला जातींत चेटकाचा धंदा करण्यापूर्वी, दीक्षा घ्यावी लागते. आग्नेयीकडील जातींत वैद्य हा चेटकज्ञ असतो. ही विद्या परंपरागत आहे असें कित्येक जाती मानतात. दारू अगर मादक पेयें चेटक्यानें पितां कामा नये. कारण त्यामुळें चेटकी विद्येचा प्रभाव नाहींसा होतो अशी आस्ट्रेलियन चेटक्यांची कल्पना आहे. चेटक्यांचें एक विशिष्ट प्राणीदैवक आहे. त्या प्राण्याचें मांस या चेटक्यांनीं खातां कामा नये, अशी युहलई जातीची समजूत आहे. एखाद्यावर चेटूक करावयाचें असल्यास त्या व्यक्तीकडे बोट दाखविणें अगर केस फेंकणें इत्यादि गोष्टी रूढ आहेत. डेरी जातींत पाऊस पाडण्याचें कामहि चेटक्याकडे असतें.

दै व क पू जा.—नाग्युअल प्राण्याची पूजा फक्त चेटक्यांतच आढळून येते. आग्नेय आस्ट्रेलियांत, पुष्कळ प्रकारचीं प्राणिदैवकें मानलेलीं दिसतात. आग्नेय दिशेकडील लोकांत केवळ प्राणिदैवकें आहेत, तर दक्षिण व मध्यआस्ट्रेलियांत, प्राणिदैवकाप्रमाणेंच वनस्पतिदैवकें आहेत पण तीं थोडीं आहेत. असंटा जातींत या दोहोंतील प्रमाण सारखें आहे तर उत्तर आस्ट्रेलिया व न्यू ग्वायनामध्यें

वनस्पतिदैवकांचाच भरणा अधिक आहे. लिंगदैवकांचा प्रसार दक्षिण आस्ट्रेलिया, व्हिक्टोरिया, न्यू साउथवेल्स या भागांत आढळून येतो.

प्र थ म दी क्षा वि धि.—कांहीं आस्ट्रेलियन जातींत सुंता करण्याची वहिवाट आहे; तर कांहीं जातींत दंतच्छेदनाची पद्धत आढळते. कांहीं जातींत प्रथमदीक्षा विधीच्या वेळीं, मुलांनीं खरें द्वंद्वयुद्ध करून दाखविण्याची चाल आहे. या विधीबरोबरच, आस्ट्रेलियन जातींत अन्नासंबंधीचे कडक निर्बंध घातलेले आढळतात. बैलडुरकी नांवाचा, एक खेळ असून त्याचा या प्रथम दीक्षाविधीच्या वेळीं संबंध येतो. सुंता झाल्यानंतर मुलानें एका झाडींत जाऊन बैलडुरकी वाजविण्याची चाल कांहीं जातींत आढळते. ईश्वराचा आवाज म्हणजे मेघगर्जना असून त्या आवाजाचा निदर्शक हा बैलडुरकी आवाज आहे असें उत्तर व मध्य आस्ट्रेलियांतील लोक मानतात. या खेळाला आस्ट्रेलियांत एक विशिष्ट प्रकारचें धार्मिक स्वरूप प्राप्त झालेलें आहे.

इ ति हा स.—आस्ट्रेलियाचा इतिहास म्हणजे तेथील यूरोपीयांचाच इतिहास होय. कारण तेथील देश्य लोकांचा इतिहास समजून घेण्यास आपणांस आज कांहीं साधन नाहीं.

यूरोपीयांचा इतिहास म्हणजे तेथील निरनिराळ्या वसाहतींची स्थापना व वाढ हाच होय. जगांतील राजकीय घडामोडींवर अद्यापपर्यंत आस्ट्रेलियांतील वसाहतींनीं कांहींच परिणाम घडवून आणला नाहीं व आजहि त्यांचें सामर्थ्य इतकें वाढलें नाहीं. त्यांची संस्कृतीहि मातृदेशाप्रमाणेंच असल्यामुळें तींतहि कांहीं वैशिष्ट्य नाहीं. आस्ट्रेलियांतील सर्व संस्थानांत न्यू साउथवेल्स सर्वांत जुनें आहे. येथें इ. स. १७७८ त पहिल्यानें "कुक" नांवाचा कप्तान आला. इ. स. १८०३ मध्यें टॅस्मेनिया येथें वसाहत झाली व १८२५ मध्यें येथें निराळें सरकार स्थापन झालें. तोंपर्यंत न्यू साउथवेल्समध्यें गुन्हेगारांची वसाहत होती. १८५१ मध्यें व्हिक्टोरिया संस्थान अस्तित्वात आलें. इ. स. १८२७ व १८२९ याच्या दरम्यान पश्चिम आस्ट्रेलियाचें संस्थान अस्तित्वांत आलें इ. स. १८३५ पासून १८३७ पर्यंत दक्षिण आस्ट्रेलिया संस्थान अस्तित्वांत आलें. आस्ट्रेलियांत इ. स. १८५१ मध्यें सोन्याच्या खाणी सांपडल्या.

१७८८ पासून सिडने येथें ब्रिटिश गव्हर्नर अनियंत्रित राज्यकारभार करीत होता. हळू हळू वसाहतीचें हल्लींचें न्यू साउथ वेल्स हें संस्थान झालें. १८५९ त पूर्वीच्या न्यू साउथ वेल्सचे दोन भाग झाले व त्यांपैकीं एकाला क्विन्सलंड म्हणतात.

१८६० मध्यें पांच संस्थानांना जबाबदार राज्यपद्धति मिळाली व त्यांना आपला राज्यकारभार दुसऱ्याच्या मध्यस्थीशिवाय पहाण्याची परवानगी मिळाली. तथापि पश्चिम आस्ट्रेलिया १८९० पर्यंत या स्थितीस पोहोंचला नाहीं. जबाबदार राज्यपद्धति सुरू झाल्यावर २० वर्षांच्या अवधींत सर्व महत्त्वाच्या प्रश्नांचा निकाल लागला.

आस्ट्रेलियांतील संस्थानांच्या प्राचीन इतिहासांत शेतकीसंबंधाचें कायदे महत्त्वाचे आहेत. या कायद्यांचा उद्देश लोकांची वसाहत कायमची करावी हा होता.

आस्ट्रेलियाच्या इतिहासांतील दुसरा महत्त्वाचा प्रश्न म्हणजे यूरोपांतील लोकांशिवाय इतर लोकांना आस्ट्रेलियांत येण्यास बंदी हा होय. चीन देश आस्ट्रेलियाच्या जवळ असल्यामुळें चिनी मजूर सोन्याच्या खाणींवर जाऊं लागले. चिनी लोक काम करण्यास मजबूत असून त्यांना खाण्यापिण्यास खर्च थोडा लागत असे; म्हणून साहजिकच ते लोक पुष्कळ पैसा कमवीत असत. त्यामुळें यूरोपांतील लोकांच्या डोळ्यांत ते सलत असत. या प्रश्नासंबंधानें प्रत्येक संस्थानांत बराच वाद झाला. इ. स. १८८८ मध्यें सर्व संस्थानांतील प्रतिनिधींची सिडने येथें सभा झाली व तींत असें ठरलें की या लोकांना येऊं देण्यास पूर्ण प्रतिबंध करणें रास्त नाहीं, तरी येणाऱ्यांची संख्या अशा तऱ्हेनें नियंत्रित करावी कीं त्यांना समाजांत महत्त्व येऊं नये. या ठरावाप्रमाणें सर्व संस्थानांनीं कायदे केले व ते लोकसत्तेच्या कायद्यांपर्यंत तसेच चालू होते. प्रतिबंध केलेले लोक फक्त चिनीच नसून त्यांत ब्रिटिश प्रजा व जपानी लोकहि येत होते. साम्राज्य सरकार प्रत्यक्ष प्रतिबंध करणाऱ्या कोणत्याहि कायद्याला संमति देईना म्हणून अप्रत्यक्ष उपायांची योजना करावी लागली व असा कायदा करण्यांत आला कीं विशिष्ट भाषांपैकीं कोणत्याहि एका भाषेंत ज्याला लोकसत्तेच्या अधिकाऱ्यानें सांगितलेले ५० शब्द लिहितां येणार नाहीत, त्याला आस्ट्रेलियांत येण्यास प्रतिबंध असावा, व या भाषा अर्थात सर्व यूरोपियन होत्या.

आस्ट्रेलियाच्या प्राचीन इतिहासांतील महत्त्वाची गोष्ट म्हणजे १८९३ तील पेढ्यांचें दिवाळें होय. व याचा परिणाम विशेषतः क्वीन्सलँड, न्यू साऊथ वेल्स, व्हिक्टोरिया या संस्थानांस भासला. इ. स. १९०२ मध्यें आस्ट्रेलियांत आवर्षण पडलें, त्यामुळें मेंढ्या व ढोरें अन्नावांचून मेलीं.

१८५२ मध्यें न्यू साउथ वेल्सच्या शासनसंस्थेच्या घटनेकरितां नेमिलेल्या सभेनें असें विधान केलें होतें कीं "आस्ट्रेलियांतील वसाहतींची आपसांतील प्रश्नांचा निकाल करण्याकरितां एक सर्व वसाहतींच्या प्रतिनिधींची सभा असणें जरूर आहे." असल्या सभेची जरूरी ज्या प्रश्नामुळें भासली ते प्रश्न म्हणजेः—( १ ) वसाहतींतील परस्परांतील व्यापार, ( २ ) दोन अथवा जास्त वसाहतींतून जाणाऱ्या सडका, कालवे व आगगाडीचे रस्ते, ( ३ ) किनाऱ्यावरील दीपगृहें, ( ४ ) वसाहतींतील परस्परांतील डाकेची

ने आणि व ( ५ ) वसाहतींतील परस्परांतील सोन्यासंबंधाचे कायदे, हे होत.

या विधानानंतर जरी एकीकरणाचा प्रश्न अजीबात धाब्यावर बसविला गेला नाहीं, तरी प्रत्यक्ष सुरवात बऱ्याच काळानें झाली. मध्यंतरी साम्राज्य प्रतिनिधिसभेनें संयुक्तसभेला परवानगी देण्याचा कायदा पास केला. या संयुक्तसभेंत ज्या वसाहतीस वाटेल तिला सभासद पाठवितां येत असत. ही सभा फक्त वादविवाद करणारी होती. हिला कायदे करण्याचा अधिकार नव्हता. परंतु लवकरच सात वसाहतींपैकीं न्यू साउथ वेल्स व न्यूझीलंड या वसाहतींनीं या सभेंतून आपलें अंग काढून घेतलें. या सभेच्या आठ बैठकी झाल्या, त्यांतील शेवटची १८९९ त झाली.

इसवी सन १८८९ मध्यें मेलबोर्न येथें सात वसाहतींच्या प्रतिनिधींची सभा झाली. या सभेनें राजनिष्ठा दर्शवून कांहीं ठराव पास केले, त्यांत असें प्रतिपादण्यांत आलें कीं आस्ट्रेलेशियातील वसाहतींच्या एकीकरणाची जरूर आहे. या एकीकरणांचीं तत्त्वें सर्वांनां न्याय्य असावीं. इ. स. १८९१ मध्यें सिडने येथें एक राष्ट्रीय सभा भरली व तिला प्रत्येक वसाहतीनें आपले प्रतिनिधी पाठविले. या सभेचा अध्यक्ष सर हेनरी पार्कस् हा होता. या सभेनें पुढील प्रमाणें ठराव पास केले.—( १ ) संयुक्त सरकारास दिलेले अधिकार व हक्क या व्यतिरिक्त अस्तित्वांत असलेले वसाहतींचे हक्क व अधिकार अव्याहत राहतील. ( २ ) कोणत्याहि संस्थानांत त्या संस्थानच्या कायदे करणाऱ्या सभेच्या व संयुक्त प्रतिनिधिसभेच्या संमतीशिवाय फरक करतां येऊं नये. ( ३ ) संयुक्त वसाहतींतील परस्परांतील व्यापार पूर्णपणें अनियंत्रित असावा. ( ४ ) संयुक्त सरकार व प्रतिनिधिसभा यांजकडे आयात व निर्गत मालावर कर बसविण्याचा हक्क असावा. ( ५ ) संरक्षणाकरितां असलेल्या आरमारी व लष्करी पलटणींवर एकमुखी सत्ता असावी. ( ६ ) संयुक्तांच्या हिताकरितां आपल्या रचनेंत प्रत्येक संस्थानाला फरक करतां येण्याकरितां संयुक्तसभेनें सोय करावी.

मार्चच्या ३१ तारखेस सर साम्युअल ग्रिफिथ यानें "कान्स्टिटयूशन बिल"चा मसुदा पुढें आणला. व त्याला एप्रिलमध्यें प्रतिनिधिसभेनें अनुमति दिली व सभा बरखास्त झाली. हें बिल लोकांच्या उत्साहाच्या अभावामुळें मागें पडलें. पुन्हां इ. स. १८९५ मध्यें या चळवळीला सुरवात झाली व न्यूझीलंडशिवाय सर्व संस्थानांच्या प्रधानांची सभा भरून असें ठरविण्यांत आलें कीं, प्रत्येक संस्थानाच्या प्रतिनिधिसभेनें एकीकरणाच्या प्रश्नाचा खल करणाऱ्या सभेंत १० प्रतिनिधी पाठविण्याचा ठराव करावा. लोकांच्या अनुमती करितां संयुक्त रचनेचा मसुदा तयार करणें हा या सभेचा उद्देश होता. पश्चिम आस्ट्रेलियांत या सभेला पाठविलेले प्रतिनिधी पार्लमेंटनें निवडले व इतर संस्थानांचे प्रतिनिधी लोकांनीं निवडले. ही सभा ॲडीलेड येथें १८९७ त भरली. निरनिराळ्या प्रतिनिधिसभांच्या विचाराकरितां एक बिलाचा मसुदा तयार करून ही सभा तात्पुरती बरखास्त झाली. पुन्हां सप्टेंबरमध्यें ही सभा भरली व तींत संयुक्त होणाऱ्या अशा वसाहतींच्या प्रतिनिधिसभांनीं केलेल्या सूचनांवर वादविवाद झाला व १८९८ च्या मार्च महिन्यांत लोकांनां सादर करण्यांत येणारा मसुदा तयार झाला.

हा मसुदा व्हिक्टोरिया, टास्मानिया व दक्षिण आस्ट्रेलिया या ठिकाणीं मान्य करण्यांत आला. परंतु न्यू साउथ वेल्स मधील लोक बहुमतानें याला संमति देईनात व पश्चिम आस्ट्रेलियांत तर या मसुद्यावर मतेंच घेण्यांत आलीं नाहींत कारण न्यू साउथ वेल्स ज्या संयुक्त घटनेंत नाहीं तींत न जाण्याचा त्यांचा निश्चय होता.

इ. स. १८९९ च्या अखेरीस मेलबोर्न येथें सर्व प्रधानांची सभा भरली व तींत क्वीन्सलँडचाहि प्रधान आला होता. या सभेंत समेट झाला व तींत न्यू साउथ वेल्सच्या कांहीं मागण्या कबूल केल्या, व एक मसुदा तयार करण्यांत आला. तो लोकांपुढें अनुमतीकरितां मांडला असतां व्हिक्टोरिया, साउथ आस्ट्रेलिया व टास्मानिया येथें मान्य झाला. परंतु क्विन्सलँड व न्यू साउथ वेल्स येथें त्याला विरोध झाला तथापि तेथेंहि तो बहुमतानें मान्य झाला. न्यू साउथ वेल्सची अनुमति मिळतांच पश्चिम आस्ट्रेलियानेंहि आपली अनुमति दिली.

नंतर हा सर्वानुमतें पास झालेला मसुदा साम्राज्यप्रतिनिधि सभेकडे साम्राज्याच्या कायद्याचें रूप या बिलाला देण्याकरितां पाठविण्यांत आला.

आस्ट्रेलियांतील प्रतिनिधींनीं मान्य केलेले फेरफार करून ह्या मसुद्याला जुलईच्या ९ तारखेला कायद्याचें रूप प्राप्त झालें. या कायद्यान्वयें असें जाहीर करण्यांत आलें कीं, १९०१ च्या जानेवारीपासून पुढें न्यू साउथ वेल्स, व्हिक्टोरिया, दक्षिण आस्ट्रेलिया हे एका संयुक्त लोकसत्तेंत मोडले जातील. या लोकसत्तेला "आस्ट्रेलियाची लोकसत्ता" असें नांव देण्यांत आलें.

या कायद्यान्वयें संयुक्त प्रतिनिधिसभेला कायदे करण्याचा हक्क दिला. या सभेंत राजा, महा( मुख्य )सभा (सेनेट) व प्रतिनिधिसभा (हाऊस ऑफ रिप्रेझेंटेटिव्ह) असे भाग आहेत. गव्हर्नर जनरल हा या सभेंत राजाचें काम करतो. प्रत्येक संस्थानचे महासभेमध्यें सारखे सभासद असून त्यांची संख्या प्रत्येकीं ६ पेक्षां कमी नसे. महासभेच्या सभासदांची मुदत ६ वर्षे असे; प्रतिनिधिसभेंत प्रत्येक संस्थानानें लोकसंख्येच्या मानानें निवडलेले प्रतिनिधी असत. परंतु कोणत्याहि संस्थानचे प्रतिनिधी ५ पेक्षां कमी नसत. पहिल्या प्रतिनिधिसभेंत ७५ प्रतिनिधी निवडावयाचे होते. महासभेच्या निवडणुकीकरितां गव्हर्नर जनरलनें हुकूम काढावयाचा असतो. महासभेनें आपला अध्यक्ष निवडावा,

व प्रतिनिधिसभेनें आपला वक्ता( स्पीकर ) निवडावा. प्रत्येकांत ⅓ संख्येचा गण ( कोरम ) असतो. प्रत्येक सभेच्या सभासदास राजनिष्ठेची शपथ घ्यावी लागते. प्रत्येकाला वार्षिक ४०० पौंड मिळतात. या सभेचें कायदे करण्याचें क्षेत्र फार विस्तृत आहे. यांत व्यापार, जहाजें चालविणें आगगाड्या, डाक, तारा, कर बसविणें, कर्ज काढणें, संरक्षण, विवाह, घटस्फोट, परदेशगमन या सर्व बाबी येतात. कार्यकारी सत्ता गव्हर्नर व त्यानें नेमिलेले कार्यकारी सभासद यांचे हातीं आहे. गव्हर्नर जनरलचा अधिकार आरमार व लष्कर यांवर चालतो. व हाच संयुक्त प्रधान व न्यायाधीश नेमितो. प्रधान पार्लमेंटचा सभासद असतो.

पहिलो पार्लमेंट १९०१ मध्यें प्रिन्स ऑफ वेल्सच्या हस्तें उघडण्यांत आली. लार्ड लिन्लिथगो हा पहिला गव्हर्नर जनरल झाला व मि. ( नंतर सर ) एडमंड बार्टन हा पहिला प्रधान झाला.

आस्ट्रेलियांतील मजुरांची मजुरी हळू हळू वाढतां वाढतां साधारण मजुराची एक दिवसाची मजुरी ८ शि. झाली. इ. स. १८९० मध्यें मजुरी कमी झाली त्यामुळें आस्ट्रेलियांतील मजुरांनीं संप केला. मजूर लोकांच्या संघामुळें त्या संपांत मजुरांस जय मिळाला.

या संपामुळें आस्ट्रेलियांतील लोकांनीं अमेरिकेंत पारागवे नांवाची वसाहत स्थापिली. या संपामुळेंच प्रत्येक व्यक्तीला एक मत देण्याचा हक्क असावा हें तत्त्व अस्तित्वांत आलें.

इ. स. १९०८ पर्यंत असें गृहीत धरलें जात होतें कीं लोकसत्तेच्या खजिनदारानें दरवर्षी राहिलेली शिल्लक संस्थानांच्या स्वाधीन करावी. पण स. १९०८ मध्यें असा कायदा पास करण्यांत आला कीं शिल्लक राहिलेली रक्कम लोकसत्तेच्या रकमेंत भर घालण्यास उपयोगांत आणल्यास हरकत नाहीं.

१९१० नं त र चा इ ति हा स.—१९१० च्या निवडणुकींत मजूरपक्ष अधिकारारूढ होऊन फिशर हा मुख्य प्रधान झाला. पण मजूरपक्षाला आपलें धोरण तडीस नेण्याकरितां लोकसत्तेच्या ( कामनवेल्थच्या ) राज्यघटनेच्या नियमांत पुढील दुरुस्ती करणें जरूर होतें. ( १ ) कामनवेल्थ पार्लमेंटला व्यापाराबाबत कायदे करण्याचा पूर्ण अधिकार, (२) व्यापारी कंपन्यांवर पूर्ण सत्ता, (३) मजुरीचे दर आणि मालक व मजूर यांच्यामधील तंटे यासंबंधीं अधिकार, ( ४ ) सर्व प्रकारचे संघ व व्यापारी मक्ते(मोनॉपोली) यांवर सत्ता. या दुरुस्तीच्या प्रश्नांवर प्रत्यक्ष लोकांकडून मतें ( रेफरेंडमतें ) घेण्यांत आलीं, तेव्हां २५०००० इतक्या बहुमतानें दुरुस्तीची सूचना नापास झाली. तथापि मजूर मंत्रिमंडळानें कारभार तसाच चालविला. साम्राज्यसंरक्षणाच्या दृष्टीनें हें मंत्रिमंडळ मदत करणार नाहीं, अशी शंका होती, पण फिशरनें सक्तीच्या लष्करी शिक्षणास संमति देऊन तें अमलांत आणलें व संरक्षक आरमार तयार करण्याचें ठरवून १९१३ मध्यें ' आस्ट्रेलिया ', ' मेलबोर्न ' व ' सिडने ' अशा तीन क्रूझरांनीं आरमाराचा उपक्रम केला. १९१३ च्या निवडणुकींत मजूरपक्षाला बहुमत मिळालें नाहीं, पण १९१४ सालीं जागतिक युद्ध सुरू झाल्यावर पुन्हां झालेल्या निवडणुकींत मजूरपक्ष अधिकारावर आला. त्यावेळीं सर्व पक्षांचे मिळून ' राष्ट्रीय ' प्रधानमंडळ बनविण्याविषयीं सूचना होती, पण ती नापसंत होऊन फिशरनें चवथ्यांदा मजूरपक्षाचेंच मंत्रिमंडळ बनविलें. पण लवकरच फिशर लंडन येथें आस्ट्रेलियन हाय कमिशनरच्या जागीं गेला व ह्यूजेस मुख्य प्रधान झाला.

जागतिक युद्धाच्या वेळीं आस्ट्रेलियांतील आयरिश लोकांनीं आयर्लंडांतल्याप्रमाणेंच सक्तीच्या लष्करी नोकरीस विरोध करून बिल पास होऊं दिलें नाहीं. तथापि आपखुषीनेंच ३२९६८२ लोक लष्करांत शिरले, व ईजिप्त, गॅलिपोली,फ्रान्स वगैरे ठिकाणीं लढले; आणि २८८०००००० पौंड आस्ट्रेलियानें युद्धाकरितां खर्च केले. सर्व युद्धकाळांत ह्यूजेस हाच प्रधानपदावर कायम होता, व पुढेंहि १९२१ पर्यंत कायम राहिला. त्याला युद्धकाळीं बराच काळ लंडनमध्यें व नंतर तहपरिषदेकरितां पॅरिसमध्यें रहावें लागलें. जर्मनीकडून सर्व युद्धखर्च घ्यावा या मताचा तो असल्यामुळें विल्सन व लॉइड जॉर्ज यांना त्यानें जोराचा विरोध वेळोवेळीं केला.

१९२१ ते १९२३ म धी ल म ह त्वा च्या गो ष्टी.—नॅशनॅलिस्ट पक्ष ( राष्ट्रीय ), कोआलिशनिस्ट ( संमिश्र ) पक्ष, मजूरपक्ष, व ( शेतीपक्ष ) कंट्रीपार्टी असे चार राजकीय पक्ष आस्ट्रेलियांत आहेत, पैकीं राष्ट्रीय पक्ष संख्येच्या दृष्टीनें सर्वांत बलवान् असून मजूरपक्षहि बराच बलवान् आहे. ह्यूजेस हा राष्ट्रीय पक्षाचा पुढारी आहे. राष्ट्रीय पक्ष व कंट्रीपार्टी यांचें संमिश्र प्रधानमंडळ १९२३ फेब्रुवारीमध्यें बनविण्यांत आलें. परदेशगमनासंबंधीच्या आस्ट्रेलियाच्या धोरणावर तेथील मजूरपक्षाच्या मताचा परिणाम होत असतो व या धोरणावर आस्ट्रेलियाची ब्रिटिश साम्राज्याच्या परराष्ट्रीय धोरणाबाबत वृत्ति अवलंबून असते. मजूरपक्षानें मजुरीचे दर फार वाढविण्याचा प्रयत्न चालविला आहे व त्याकरितां आयात निर्गत जकाती पुष्कळ वाढवून घेतल्या आहेत. वस्तूंच्या किंमतीहि त्यामुळें फार वाढल्या आहेत. तरीहि उद्योगधंदे कित्येक वेळां चांगले चालत नाहींत, कारण मजुरीचे दर मजूर लोक फार मागतात. परकी मजूर आणल्यास हे दर बरेच हलके होतील पण आस्ट्रेलियन मजूरपक्ष परकी मजुरांच्या आगमनाला विरोध करणारा आहे. आशियांतील लोकांच्या आगमनावर नियंत्रण घालण्यांत आलें आहे; इतकेंच नव्हे तर यूरोपीयांच्या आगमनालाहि फारसें उत्तेजन देण्यांत येते असें नाहीं. मालाच्या भारी किंमती, आणि जबर आयातनिर्गत जकाती यांच्यामुळें परकी भांडवल आस्ट्रेलियांत बरेंच आलें आहे. पण यूरोपीय लोकांनीं आस्ट्रेलिया व्यापून टाकावा. या बाबतींत

मात्र आस्ट्रेलियन लोकांनां चांगलें यश आलें आहे असें म्हणतां येत नाहीं.

परकीयांच्या म्हणजे आशियांतील लोकांच्या आगमनास विरोधी वृत्ति असल्यामुळें आस्ट्रेलियननां आंग्लो-जपानी मैत्रीचा तह नको आहे. कारण अशा तहानें आस्ट्रेलियाला जपानी आरमारावर संरक्षणार्थ अंशतः अवलंबून रहावें लागणार, व त्या स्थितीमुळें जपानी मजुरांच्या आगमनाला सवलती द्याव्या लागणार ! ही सर्व आपत्ति टळावी म्हणून इंग्लंड व अमेरिका यांच्या संयुक्त आरमारानें पासिफिक महासागर व आस्ट्रेलिया यांचें संरक्षण करावें अशी योजना आस्ट्रेलियाला फार पसंत आहे.

ब्रिटिश साम्राज्यसरकाराबरोबरचा संबंध कमी करावा असा प्रयत्नहि चालू आहे, व त्याकरिता इंग्लंडमधून येणारे गव्हर्नरच नसावे अशी चळवळ करण्यांत आली. एका गव्ह-र्नरानें राजीनामा दिल्यावर ही चळवळ करण्यांत आली,पण त्याला विचारी लोकांचें फारसें उत्तेजन नव्हतें.तथापि चळवळी-वरून हें सिद्ध होतें कीं, लोकपक्ष क्षपाट्यानें प्रबल होत असून आस्ट्रेलियाचा एवढा मोठा किनारा असंरक्षित आहे तरी ब्रिटिश साम्राज्याचा संबंध तोडण्यास कांहीं लोक तयार आहेत.

आस्ट्रेलियांत कम्युनिस्ट ( सांधिक ) पक्षहि असून पासि-फिक महासागरांतील सर्व कम्युनिस्टांची परिषद सिडने येथील कम्युनिस्टपक्षानें बोलावली व त्या परिषदेला मास्को-हून प्रतिनिधी हजर राहणार होते.

मे ल बो र्न ये थी ल दं गे.—१९२३ नोव्हेंबरमध्यें मेल-बोर्न येथील ६५० पोलिसांनीं संप केला. त्याचें कारण हें होतें कीं,कमिशनरनें सुपरव्हायजर्स जे गुप्त हेरांचें काम कर-तात असा आरोप होता, त्यांना कमी करण्याचें नाकारिलें. हे दंगे लवकरच मोडण्यांत आले; तथापि त्यांचें स्वरूप भीतिप्रद होतें, कारण मेलबोर्नमधील एकंदर लोकच आड-दांड स्वभावाचे असून संपवाल्या पोलिसांना मजूरपक्षाचें सहाय्य होतें. व्हिक्टोरियाच्या कायदेमंडळांत लोकसंरक्षण ( पब्लिक सेफ्टी ) बिल पास होण्यालाहि त्यांचा विरोध होता.

आ स्ट्रे लि य न वा ङ्म य.— आस्ट्रेलिया ही गुन्हे-गारांची वसाहत म्हणजे 'काळें पाणी' असतांना फक्त एकच ग्रंथ 'फॉर दि टर्म ऑफ हिज नॅचरल लाईफ' ( १८७४ ) बाहेर पडला. त्यानंतर 'झुडपी' काळांत' म्हणजे जेव्हां शहरांची वाढ झाली नव्हती व लोक नागरिक या संज्ञेस पात्र झाले नसून खेड्यांत व झुडपांचा आश्रय करून रहात होते अशा काळांत 'रॉबरी अंडर आर्म्स' ( १८८८ ) हें पुस्तक जगापुढें आलें. हेच काय ते प्राचीन आस्ट्रेलियन वाङ्मयाचे अवशेष. या पुढच्या काळांत म्हणजे जेव्हां बरेचसे लोक इंग्लिश, स्कॉटिश व आयरिश रक्ताचे जमले व त्यांनां स्वतंत्र वातावरण मिळालें तेव्हां वाङ्मयाला कांहीं अंकूर फुटूं लागले. आयुष्यांतील इंद्रियोपभोगजन्य आनंद, अधिकाऱ्यांविषयीं अनादर, क्रूर-तेची झांक मारणारें भाषण, ज्यांत अतिशयोक्तीचा कडे-लोट असतो असा विनोद या गोष्टी आस्ट्रेलियन वाङ्म-याचें आलोडन करणारास आढळून येतील. याशिवाय गूढ उदासीनता व दुःखाची-प्रेमळ दुःखाची-जाणीव, या सारखे छुडपांत आयुष्य कंठण्यापासून उत्पन्न झालेले दोष वाङ्मयांत दिसतात.

जे. एफ् आर्चिबाल्ड ( १८५८—१९१९ ) हा या आधु-निक आस्ट्रेलियन वाङ्मयाचा जनक म्हणतां येईल. आर्चि-बाल्ड पावशतकपर्यंत प्रसिद्ध वर्तमानपत्राचा संपादक असून, तरुण आस्ट्रेलियन लेखकांना आस्ट्रेलियाच्या विशिष्ट आयुष्यक्रमावर लिहिण्याची त्यानें संवय लाविली. १९१०ते२० या दशकांत म्हणण्यासारखें असें आस्ट्रेलियांत विशिष्ट वाङ्मयाचें पीक आलेलें दिसत नाहीं. यापुढें कदाचित 'अरण्यें, डोंगर व मैदानें वगैरे पाहून, किंवा वसाहतवाल्यांचे राक्षसी प्रयत्न ऐकून, किंवा जुन्या संस्कृतीशीं आत्मविश्वासानें झगडणाऱ्या नवीन भूप्रदेशाची अस्थिर सामाजिक परिस्थिति न्याहाळून चांगल्या प्रतीचें वाङ्मय निर्माण होईल अशी मोठी आशा आहे.

न्यू साउथवेल्सचें सरकार आणि ब्रिटिश सरकार यांच्या मध्यें एक ठराव १९२३ च्या शेवटीं झाला. त्या ठरावांत १५० पासून १९० लाख पौंड न्यू साउथवेल्सच्या सर-कारनें साम्राज्य सरकारापासून कर्जाऊ घ्यावे आणि त्या रक-मेचा उपयोग ब्रिटिश माणसें आपल्या वसाहतींत येण्यास न्यू साउथवेल्सनें उत्तेजन द्यावें, असें आहे. या शिवाय पांचशें पौंड घेऊन वस्ती करण्यास येणारीं माणसें मिळवि-ण्याचाहि त्या संस्थानानें प्रयत्न केला, पण त्यास यश बेता-चेंच आलें. वस्ती वाढविण्यासाठीं आणखी एक प्रयत्न म्हणजे लढाईतून परत आलेल्या शिपायांस जमिनी द्याव-याच्या हा होय.

या योजनेप्रमाणें ८००० वसाहती करणारे शिपाई न्यू साउथ वेल्सनें आणले पण त्यापैकीं १३०० लोकांनीं जमीनी सोडून दिल्या. या प्रयत्नांत १७० लक्ष पौंड खर्च करण्यांत आले होतेच व १९२३ मध्यें ८० हजार पौंड आणखी खर्च झाले.

१९२३ मध्यें बादशाही लोंकरखरेदीची योजना म्हणून एक प्रसृत करण्यांत आली. या योजनेप्रमाणें आस्ट्रे-लियांतील शेतकऱ्यांस त्यांनीं उत्पन्न केलेल्या लोंकरीवर ताब-डतोब पैसा मिळावा ही होती. या योजनेनें वीस कोट पौंड किंमतीची लोंकर खरेदी केली. या योजनेमुळें शेतकऱ्यांचें बरेंच हित झालें. आस्ट्रेलियाचा जपानशीं लोंकरीचा व्यापार बराच वाढला. लढाईपूर्वी जपानकडे फक्त १६००० पौंड किंमतीची लोंकर जात असे तर १९२३ मध्यें सत्तर लाख पौंड किंमतीची लोंकर गेली.

जपानचा आस्ट्रेलियाशीं स्नेहभाव वाढावा म्हणून जपानांतील ३०० आरमारी उमेदवार असलेला जपानी आरमारी काफला आस्ट्रेलियास १९२३ च्या डिसेंबरमध्यें भेट देऊन गेला.

[ संदर्भ ग्रंथ.—बार्टन—आस्ट्रेलियन फिजिऑग्रफी ( ब्रिस्बेन १८९५ ). वॉल—फिजिकलजिऑग्रफी ऑफ आस्ट्रेलिया (मेलबोर्न, १८८३); अर्ल—फिजिकल जिऑग्रफी ऑफ आस्ट्रेलिया;जे डब्ल्यु ग्रेगरी-दि-डेडहार्ट ऑफ आस्ट्रेलिया मेडन—यूसफुल नेटव्हि प्लँटस् ऑफ आस्ट्रेलिया (सिडने १८८९); फिटजेराल्ड—आस्ट्रेलियन ऑर्चीड्स ( सिडने १८७०—१८९० ); ॲफॅलो—नॅचरल हिस्ट्री ऑफ आस्ट्रेलिया ( लंडन १८९६ ); टेनिस वुड्स—दि फिश अँड फिशरीज ऑफ दी न्यू साउथवेल्स ( सिडने १८८३ ); ऑजिल्व्हि—कॅटलॉग ऑफ आस्ट्रेलियन मॅमल्स ( सिडने १८९२ ); जी कॉलिंग्रिज—दि डिस्कव्हरी ऑफ आस्ट्रेलिया ( सिडने १८९५); डब्ल्यू एप्स—दी लँड सिस्टिम्स ऑफ आस्ट्रेलिया ( लंडन १८९४ ); स्पेन्सर अँड गिलेन—ॲक्रॉस आस्ट्रेलिया; हारग्रेव्हस—आस्ट्रेलिया अँड इटस् गोल्ड फील्डस; निस्बेट—ट्रॅव्हल्स अँड ॲडव्हेंचर्स इन आस्ट्रेलिया अँड न्यू ग्वायना; ट्रॊलोप—आस्ट्रेलिया अँड न्यूझीलंड; वॅलेस—रूरल एकॉनमी अँड ॲग्रीकल्चर ऑफ आस्ट्रेलिया अँड न्यूझीलंड, अंगस—सॅव्हेज लाइफ ॲन्ड सीन्स इन आस्ट्रेलिया ॲन्ड न्यूझीलंड, फिचेट आस्ट्रेलिया इन दि मेकिंग; थॉमस—किनशिप ऑर्गनायझेशन, ॲन्ड ग्रुप मॅरेजेस इन आस्ट्रेलिया; वुइल्यम रस्डेन—हिस्ट्री ऑफ आस्ट्रेलिया; वुइल्यम वेस्टगार्थ—हॉफ ए सेंचरी ऑफ आस्ट्रियन प्रोग्रेस ( लंडन १८९९ ); प्रिट्टेन—आस्ट्रेलिया इटस् हिस्ट्री ॲन्ड प्रेझेन्ट कंडिशन; फ्रेझर—आस्ट्रेलिया, दि मेकिंग ऑफ ए नेशन, कुघलन ॲन्ड एविंग—प्रोग्रेस ऑफ आस्ट्रेलिया इन दि नाइंटींथ सेंचरी; ट्रेगॉथन—कॉमन वेल्थ ऑफ आस्ट्रेलिया; इडली—अर्ली डेज, ऑफ आस्ट्रेलिया ]

**आस्ट्रेलेशिया.**—हिंदीमहासागर व पॅसिफिक महासागर यामध्यें असलेल्या जलवेष्टित अशा सर्व लहानमोठ्या भूभागांना मिळून हें खंडवाचक नांव आहे. यालाच ओशियानिया असें नांव आहे; पण भौगोलिकदृष्ट्या आशियाखंडाचाच हा दक्षिणेकडील विस्तार असल्यामुळें, आणि आस्ट्रेलिया हा या खंडांतील प्रमुख घटक असल्यामुळें या खंडाला आस्ट्रेलेशिया हें नांव भूगोलशास्त्रज्ञांनीं अधिक पसंत केलें आहे. या खंडांत भूभाग अन्तर्भूत होतात तेः—( १ ) आस्ट्रेलिया, टास्मानियासह; ( २ ) मलायाशिया; मलायाद्वीपकल्प, मोठीं सुंडा बेटें ( सुमात्रा व जाव्हा. ) धाकटीं सुंडा बेटें ( बली, लॉंबाक, सुंबावा, फ्लोरेस, सुम्बा, अल्लोर, तिमोर, वेत्त. सेरवुट्टी, ) बोर्निओ, सेलेबीस, मोलक्काबेटें, सुलु, फिलिपाइन बेटें, फोर्मोसा, अंदमान व निकोबार बेटें; ( ३ ) पापुआशियाः न्यूगिनी, व मेलानाशिया ( बिस्मार्क बेटें, सालोमन, सांटाक्रूझ, फिजी, न्यू हेब्रिडीज, न्यू कॅलेडोनिया, व लॉयल्टी बेटें ); ( ४ ) पालीनेशिया न्यूझीलंड टॉन्गा, ( फ्रेंडली ), कुक उर्फ हार्वे, आस्ट्रेल, सोसायटी ( ताहिती ), लो, मार्किसास, नॅव्हिगेटर ( सामोआ ), यूनियन, एलिस, सॅव्हेज सॅन्डविच ( हवाई ) व ईस्टर बेटें; ( ५ ) मायक्रोनेशिया, पेल्यू, लाड्रोनेस, करोलाईन, मार्शल, गिलबर्ट, फोनिक्स व पेनऱ्हिन बेटें, मादागास्कर बेटहि वास्तविक याच खंडाचा भाग होय.

या सर्व भूभागांत अत्यंत प्राचीन काळापासून मानववस्ती आहे; इतकेंच नव्हे तर आद्य मानवोत्पत्ति याच भागांत बहुधा मलायाशियां( जावा )त झाली व येथूनच मानवजात नंतर उत्तरेस आशियांत आणि पश्चिमेस आफ्रिकेंत पसरली असें एक मत आहे. ( ज्ञानकोश—प्रस्तावनाखंड. विभाग १. पृ. ४३; विभाग३ पृ. १९ पहा). पण वस्तु स्थिति अशी आहे कीं, या खंडांत सर्व लोक एकाच जातीचे नसून काकेशियन व मंगोलियन या दोन भिन्न मानववंशांचे लोकहि येथें आढळतात व ते प्राचीन काळींच आशियांतून येऊन येथें राहिले असावेत, असें दुसरें मत आहे. पण तें अग्राह्य ठरून हिंदुस्थानातून द्राविड लोक इकडे शिरले ( ज्ञानकोश वि. ४. पृ. ४६८ पहा ), हा सिद्धांत प्रस्थापित होऊं पहात आहे.

**आस्तीक**—भृगुकुलोत्पन्न जरत्कारु ऋषीस कश्यप कन्यामनसा, अथवा जरत्कारी हिच्या ठायीं झालेला पुत्र. ( जरत्कारु शब्द पहा. )जरत्कारु अरण्यांत निघून गेला तेव्हां त्याची स्त्री गर्भिणी होती. हा अरण्यांत गेल्यावर ती हिमालयाच्या कैलास नामक शिखरावर जाऊन, तेथें शिवपार्वतींची सेवा करीत राहिली. सेवेनें संतुष्ट होऊन शंकरानीं तिला ज्ञानोपदेश केला. तिचे दिवस पूर्ण होतांच ती पुत्रास प्रसवली. तिला केलेला उपदेश गर्भस्थ बालकानें ऐकलेला असल्यामुळें त्याचें आस्तीक नांव ठेविलें व शंकरांनीच त्यास वेदाध्ययन शिकविलें व मृत्युंजय मंत्र दिला. मंत्रसामर्थ्यानें तो तेजस्वी झाला ( देवीभा. नववा अ. ४७–४८ )

जनमेजयानें पित्याच्या वधाचा सूड उगविण्याकरितां सर्पसत्र आरंभिलें, त्यांत सर्पांचा संहार होऊं लागला. आस्तीकाची आई ही सर्पांची बहीण होती. म्हणून महाज्ञानी अशा तिच्या मुलाकडे ( आस्तीकाकडे ) सर्प गेले. व जनमेजयाचें सर्पसत्र थांबविण्याविषयीं त्यांनीं त्याची विनंति केली. त्याप्रमाणें आस्तीकानें सत्रामध्यें जाऊन जनमेजयाची फार स्तुति केली.

इकडे सर्पांतील श्रेष्ठ असा जो तक्षक त्यावर प्रसंग आल्यावर तो इंद्राच्या आड लपला, परंतु इंद्राचीच आहुति पडण्याची वेळ आल्यावर इंद्रानें त्याला सोडून दिलें. नंतर निरुपाय होऊन तक्षकाला अग्निकुंडासमीप येणें भाग पडलें. आतां तक्षकाची आहुति पडणार तोंच स्तुतीनें संतुष्ट झालेल्या जनमेजयाजवळ सत्र थांबविण्याबद्दल आस्तीकानें

वर मागून घेतला व तक्षकाचा मृत्यु वांचविला [ भारत आदि. अ. ५१-५३.]

ऋग्वेदाच्या पहिल्या मंडळाच्या शेवटीं कांहीं हस्तलिखित प्रतींत एक परिशिष्ट आहे त्यांत "जनमेजयस्य यज्ञांते अस्तीक वचनं स्मर। आस्तीकवचनं स्मृत्वा यःसर्पो न निवर्तते। शतधा भिद्यते मूर्ध्नि शिंशवृक्ष फलं यथा" अशीं वाक्यें आहेत. रात्रीं निजावयाच्या वेळीं सर्पाच्या भीतीच्या निवारणार्थ आस्तीकाचें स्मरण करण्याची वृद्ध लोकांत चाल आहे.

**आस्बोर्न**—इंग्लंड देशांतील वाईट (आइल ऑफ वाइट) बेटावरील जहागीर व महाल. हें ईस्टकोज शहराच्या आग्नेयीस आहे. पूर्वी याला ऑस्टरबोर्न अथवा ऑईस्बोर्न म्हणत ही इस्टेट व्हिक्टोरिया राणीनें १८४५ मध्यें लेडी इझाबेला ब्लॅकफोर्ड पासून विकत घेतली. नंतर येथें एक महाल बांधण्यांत आला. १९०१ मध्यें राणी ह्या ठिकाणीं मरण पावली. १९०२ सालीं राज्याभिषेकाच्या दिवशीं ७ व्या एडवर्डनें ही जहागीर राष्ट्राच्या उपयोगास अर्पण केली. त्याच्याच इच्छेवरून येथें दुखण्यांतून उठलेल्या लष्करी व आरमारी अधिकाऱ्यांसाठीं महाल्याचा कांहीं भाग दिला. १९०३ मध्यें ह्या जहागिरींवर एक आरमारी विद्यालय ( रॉयल नेव्हल कॉलेज ) सुरू करण्यांत आलें. येथील सेंट मिल्ड्रेड्च्या प्रार्थनालयांत राजघराण्यांतील मंडळींचीं स्मारकें आहेत.

**आस्रोनि**—आस्रोनि अथवा आस्ऱ्होनि हा वायव्य मेसापोटेमियांतील एक जिल्हा होता. याची राजधानी एडेसा ही पहिल्या सेल्युकसनें वसविली. इ. स. पूर्वी १३० त आर्होई नांवाच्या एका भटकणाऱ्या अरबी टोळीनें एडेसा येथें लहानसें राज्य स्थापिलें. यामुळें या जिल्ह्याला प्रथम आर्होइनि व नंतर पार्थियन आस्रोज अथवा कोस्रोज (खुश्रू) नांवावरून आस्रोइनि नांव पडलें.

थोडक्याच दिवसांत येथील राजे पार्थियनांचे मांडलिक झाले. पुढें आर्मिनियाचा तैग्रेनीस याचें नंतर रोमचें मांडलिकत्व यास प्राप्त झालें. पार्थियन लोकांचा पक्ष घेतल्याबद्दल रोमन व पार्थियन युद्धांत यांचें नांव आहे. ग्रीक संस्कृतीचा ऱ्हास होऊन येथील आरबांनीं अरेमियन लोकांची भाषा व संस्कृति उचलली. ख्रिस्ती धर्मप्रसारानें वरील सुधारणा फार लवकर झाली. राजा अबगारनें (९ वा अथवा ८ वा १७९-२१४) स्वतः ख्रिस्ती धर्म स्वीकारला. यामुळें एडेसा शहर अरेमाईक ख्रिश्चन भाषा व वाङ्मय यांचें पीठ बनलें. २१६ त कॅराकॅलानें आस्रोइनि राज्य खालसा करून तेथें रोमन वसाहत केली. ६०८ त दुसऱ्या कोसरोनें ६२५ त हेरॅक्लियसनें, व ६३८ त अरबांनीं एडेसा जिंकून घेतलें.

**आहवनीय**—अग्निहोत्री याच्या यज्ञशालेंत पूर्व दिशेकडील कुंडांत असणारा अग्नि. याचा ऋग्वेदांत उल्लेख आढळत नाहींत. परंतु कृष्णयजुर्वेदांत मात्र अनेक ठिकाणीं आढळतो. त्या वेदांत एके ठिकाणीं (३. ६, ७) त्यास देवांचें वसतिस्थान असें म्हटलें आहे. या अग्नीवर हवि तयार करण्याबद्दल उल्लेखहि (२. २, ५) आहे. सूत्रग्रंथांत हवि तयार करण्यासंबंधीं विकल्प आहे.परंतु प्रत्यक्ष क्रिया गार्हपत्याग्नीवरच हवि शिजविण्याची आढळते. ब्राह्मण ग्रंथांतून तर याचा उल्लेख अनेक ठिकाणीं येतो. तै. ब्राह्मणांत (१. १, ४) आहवनीयाचें आधान ऊर्ध्वां सूर्याचा उदय झाला असतां करावें असा उल्लेख आहे. देवतांना जो मुख्य हवि अर्पण करावयाचा तो सर्व या आहवनीयांतच केला जातो आणि त्यामुळें त्याला बरेंच श्रेष्ठत्व आहे. परंतु ऐतरेय ब्राह्मणांत (८. २५,) मात्र दक्षिणाग्नि हा पिता, गार्हपत्य त्याचा पुत्र व आहवनीय गार्हपत्याचा पुत्र म्हणजे दक्षिणाग्नीचा पौत्र असे म्हटलें आहे. चातुर्मास्यें, अग्निष्टोम इत्यादिकांत ज्यावेळीं आहवनीयांतील अग्नि उत्तर वेदीवर नेला जातो त्यावेळीं तो आहवनीय होतो व पूर्वीच्या आहवनीयास गार्हपत्यत्व येतें.

**आहवमल्ल**:—हें एका कल्याणी येथील कळचुर्य राजाचें बिरुद होतें. याचें खरें नांव काय होतें, हें अद्यापि कोठें आढळलें नाहीं. याला वीर नारायण असेंहि दुसरें एक बिरुद होतें. हा बिज्जलांचा तिसरा मुलगा असून त्याचे वडील भाऊ सोमेश्वर अथवा सोविदेव आणि संकम यांच्या नंतर इ. स. ११८१ मध्यें गादीवर आला. हा आपणाला कळचुर्य चक्रवर्ती आणि कळचुर्य भुजबलचक्रवर्ती, परमभट्टारक इत्यादि विशेषणें लावीत असे. याजबद्दलचा सर्वांत प्राचीन उल्लेख इ. स. ११८० ( शक ११०३ मधील शार्वरी संवत्सराचा कार्तिक महिना ) मध्यें आढळतो. यावरून व आहवमल्लाच्या कारकीर्दीचें पहिलें वर्ष इ. स. ११७९-८० ( शक ११०२ विकारी संवत्सर ) हें इतर लेखांवरून येत असल्यामुळें हा संकमाबरोबर राज्यकारभार पहात असावा व कदाचित या दोघा भावांत राज्याची विभागणी होऊन उत्तर व पूर्वेकडील भाग संकमाकडे असून दक्षिणेकडील भाग आहवमल्लाकडे असावा. आहवमल्लाची राजधानी कोणती होती याबद्दल उल्लेख आढळत नाहीं. तथापि संकमानंतर कल्याणी शहर त्याच्या ताब्यांत असणें शक्य आहे. शिलालेखांतून त्याच्या अधिकाऱ्यांचीं नांवें महाप्रधान,अंतःपुर वेर्गडे, महापसाइत, दंडनायक इत्यादि आढळतात. केशिमय्य दंडनायक हा इ. स. ११८१ मध्यें बेळगांवे येथें वनवासी द्वादशसहस्रीवर व आणखी कांहीं दक्षिणेकडील मुलखावर याच्या आज्ञेनें राज्य करीत होता. चेट्टुगिदेव यानें इ. स. ११८१ मध्यें गोवा येथील कदंब राजा विजयादित्य दुसरा यावर स्वारी करून त्याचा प्रदेश उध्वस्त केला, व चोळ आणि होयसळ यांचीं राज्यें घेतलीं असा उल्लेख त्याच शिलालेखांत आढळतो. याच लेखांत लक्ष्मण, रेचण आणि काणव या दंडनायकांचा; हिरिय, सोवणय्य या महाप्रधान बाह-

तरनियोगाधिपति दंडनायकाचा, वीर गोंकरस आणि मल्लिदेवरस या महामंडलेश्वरांचा आणि गुत्तवंशांतील जोयिदेव पहिला या महामंडलेश्वराचा त्याच शकांतील, व जोयिदेवाचा पुत्र वीरविक्रमादित्य दुसरा या महामंडलेश्वराचा इ. स. ११८२ मधील उल्लेख आढळतो. आहवमल्लाचा सर्वांत उत्तरकालीन उल्लेख भाद्रपद व॥ त्रयोदशी शोभकृत् संवत्सर शक ११०६ या मितीचा आढळतो. याची इंग्रजी तारीख १७ सप्टेंबर ११८३ येते. यानंतर त्याच्या कारकीर्दीचा अंत लवकरच झाला असावा असें त्याच्या मागून गादीवर बसलेल्या त्याचा धाकटा भाऊ सिंघण याच्या इतर शिलालेखांवरून दिसते. [ बेळगांवे येथील शिलालेख, म्हैसोर इनस्क्रिप्शन्स, हिस्टरी ऑफ कोंकण वगैरे, मुंबई गॅझेटिअर पु. १ भा. २ ]

**आहाव.**—यज्ञामध्यें होता नामक ऋत्विज ज्या वेळीं शस्त्र पठन करतो ( शंसन करतो ) त्या वेळीं आरंभीं शों३ सावों३ असा मंत्र पठन करतो याला आहाव अशी संज्ञा आहे. यांतील पदें ' शोंसावः ओं३ ' अशी असून शों ३ यांतील ओकार आर्ष व प्लुति आव्हानार्थ आहे. याचा अर्थ 'हे अध्वर्यु आम्ही शंसन करतों, आम्हास अनुज्ञा दे ' असा सायणांनीं ऐतरेय ब्राह्मणावरील ( २. ३३ ) भाष्यांत केला आहे. तेथें अलंकारिक भाषेंत या आहावास ' ब्रह्म ' ( ब्राह्मणजाति ) म्हटलें आहे. ऋग्वेदांत आहाव शब्द बऱ्याच ठिकाणीं आला आहे. परंतु तेथें त्याचा अर्थ एक पाणी काढण्याचें भांडें असा आहे.

**आहिताग्नि**—एकदां स्वीकार केल्यापासून आमरणांत अग्नींचें संरक्षण करणाऱ्या अग्निहोत्र्यास आहिताग्नी म्हटल्याचा उल्लेख तैत्तिरीय संहितेंत ( १. ५, ९; ७, १; ३. ४, १० ) आला आहे. या आहिताग्नीनें धारण केलेल्या अग्नींच्या संरक्षणाची मुख्य जबाबदारी त्याच्या पत्नीवर असते. आहिताग्नीस नित्य प्रातःकाळीं व सायंकाळीं अग्नींना होम द्यावयाचा असतो. त्या होमाच्या वेळीं पत्नी त्याच्या जवळ असावी लागते. आहिताग्नि कोठें प्रवासास गेल्यास होम देण्याचें काम अध्वर्यू करतो ( नित्य होमासहि अध्वर्यू असावा लागतो ) आहिताग्नीनें स्वतः रोज होमाच्या वेळीं पठण करावयाचे जे मंत्र असतात ते त्यानें प्रवासांतहि नित्य पठण करावे लागतात. आहिताग्नि परगांवीं असला तरी पत्नी घरीं असल्यामुळें दर्शपूर्णमास याग त्या त्या वेळीं केला जातो. मात्र आहिताग्नीनें यागाच्या वेळीं पठण करावयाचें मंत्र त्यानें प्रवासांतहि त्या दिवशीं पठण करावयाचे असतात. आहिताग्नीच्या पत्नीला कोठें परगावीं जावयाचें असल्यास मात्र अग्नी बरोबर घेतल्यावांचून जातां येत नाहीं. अशा वेळीं धातूंचीं कुंडें करून त्यांत ( अस्पृश्यांचा स्पर्श होऊं न देतां ) घालून अग्नी नेतात. अथवा अरणींमध्यें अग्नींचा समारोप ( अग्नींवर अरणी तापवून ) करून अरणी नेतात व इच्छित स्थलीं गेल्यावर मंथन करून अग्नी तयार करतात. अशावेळीं नित्याचा होम कांहीं दिवसांचा एकदमच देऊन ठेवतात. त्यास पक्षहोम म्हणतात. हा पक्षहोम पंधरा दिवसांपेक्षां ज्यास्त दिवसांचा देतां येत नाहीं. आहिताग्नीनें प्रवासास जातांना अग्नींचें उपस्थान करून जावयाचें असतें. घराच्या बाहेर पडल्यावर त्यानें बरेच दूर जाईपर्यंत कोणाशी बोलूं नये व पाठीमागें पाहूं नये असें सांगितलें आहे. गांवाहून परत आल्यावरहि प्रथम अग्नींचें उपस्थान करून नंतर गृहांत प्रवेश करावयाचा असतो. आहिताग्नि ग्रामांतराहून परत येईल त्या दिवशीं त्याला दुःखद अशा प्रकारची बातमी सांगूं नये असें सांगितलें आहे.

आहिताग्नि अथवा त्याची पत्नी यापैकीं कोणी मृत झाल्यास अग्निहोत्र तेथेंच थांबतें. विधुर आग्निहोत्र टेवण्याबद्दलहि कांहीं ग्रंथांत सांगितलें आहे ( ऐ. ब्रा. ७. ९) परंतु तशी रूढी विशेषशीं प्रचारांत नाहीं. आहिताग्नि अथवा त्याची पत्नी यांपैकीं कोणी मृत झाल्यास त्यांचें शव नेण्याच्या प्रसंगीं इष्टि केली जाते व अग्निहोत्रसंबंधीं सर्व पात्रें त्या प्रेताबरोबर दहन केलीं जातात. आहिताग्नी शुक्लपक्षांत मृत होईल तर तें शुभकारक समजलें जातें. कदाचित जर तो कृष्णपक्षांत मरण पावेल तर तो शुक्लपक्षांत मृत झाला असें ठरण्याकरितां शुक्ल पक्ष सुरू होण्यास जितक्या दिवसांचा अवधि असेल तितक्या दिवसांचा नित्याचा अग्निहोत्र द्यावा असें सांगितलें आहे. [ संहिता व सूत्रें हीं आधाराला घेतलीं आहेत. ]

**आहोम**—आसामदरींतील ही एक शान जात असून, १९ व्या शतकाच्या आरंभीं त्या देशांत ब्रह्मीलोक येईपावेतों हिचेंच वर्चस्व तेथें होतें. हे आहोम लोक व त्याचप्रमाणें ब्रह्मदेश व पूर्व चीन येथील शान लोक आणि सयामी लोक थाई वंशांतील होत. आहोम हें नांव " आसाम " या शब्दापासून बनलें आहे असें मानतात, व "शान" (शाम) आणि "सियाम" हे शब्द आसामधील ' साम' याशीं जुळतात. इ. स. १२२८ मध्यें सु-का-फा राजाच्या नेतृत्वाखालीं पूर्वेकडून येऊन त्यांनीं आसामवर चाल केली व त्या देशाला आपलें नांव दिलें. यानंतर दीड शतकापर्यंत सु-का-फाच्या वंशजांनीं लखिमपुर व सिबसागर या लहान जिल्ह्यांवर निर्वेधपणें राज्य केलेलें दिसतें. पश्चिमेकडे ब्रह्मपुत्रेच्या खोऱ्यांत त्यांची सत्ता थोडथोडी वाढत होती तरी त्यांना नेहमींच विजय प्राप्त होत असे, असें नाहीं. औरंगजेबाच्या काळीं सदियापासून गोलपारापर्यंत, आणि दक्षिणेकडील डोंगरांच्या पायथ्यापासून उत्तरेकडील भुतिया सरहद्दीपर्यंत. म्हणजे सबंध ब्रह्मपुत्रेच्या खोऱ्यांत आहोमराजांची सत्ता असे. या घराण्याच्या सत्तेचा कळस रुद्रसिंहाच्या कारकीर्दींत झाला( तो १६९५ त गादीवर बसला असें म्हणतात ). या नंतरच्या

शतकांत, अंतःकलहामुळें व बाहेरून होणाऱ्या शत्रूंच्या स्वाऱ्यामुळें आहोमांच्या सत्तेला उतरती कळा लागली. त्यांच्यातीलच एका भांडखोर पक्षानें इ. स. १८१० मध्यें ब्रह्मी लोकांना सहाय्यार्थ बोलाविलें. एकदां आंत पाऊल पडल्यावर त्यांनीं सर्वच खोरें आपल्या हस्तगत केलें व १८२४—२५ त ब्रिटिश त्यांना बाहेर पिटाळून लावीपर्यंत ब्रह्मी लोकांनीं तेथें फार अमानुषपणें राज्य केलें. १९०१ च्या खानेसुमारींत आसामांतील आहोमांची संख्या १७८०४९ होती व १९११ मध्यें ती १९७,४४४ भरली.

आहोमांनीं आसाममध्येंहि शान जातींतील राज्यकारभाराची पद्धत कायम ठेविली. ही शान पद्धत म्हणजे कर घेण्याऐवजीं वैयक्तिक चाकरी घेणें होय. त्यांचा बौद्ध धर्म नसून, एक निराळाच मूर्तिपूजाविशिष्ट धर्म होता; पण आसाममध्यें आल्यावर त्यांनीं हळू हळू हिंदुधर्म स्वीकारला, व त्यांच्या राजांनींहि आपणाला हिंदू नांवें व पदव्या घेतल्या. त्यांच्यांतली जगदुत्पत्तिविषयक कथा अशीः— मूळारंभीं आकाशस्थ ग्रहतारे, हवा किंवा पृथिवी यापैकीं कांहींहि नसून, सर्वत्र जलमय झालें होतें. फा नांवानें ओळखिला जाणारा निर्गुण परमात्मा वर घिरट्या घालीत होता. नंतर तो मोठ्या खेंकड्याचें रूप घेऊन वर तोंड करून पाण्यावर तरंगून राहिला. पुढें त्यानें एकामागून एक प्राण्यांचीं रूपें घेतलीं. सरतेशेवटीं दोन सोनेरी कोळी झाले व त्यांच्या विष्टेपासून पृथ्वी तयार होऊन ती भोंवताली असलेल्या महासागराच्या वर आली. नंतर फानें आपल्या शरीराचाच एक भाग स्त्रीरूप केला. तिनें चार अंडीं घातलीं व त्यांपासून चार पुत्र निघाले. एकाला पृथ्वीवर राज्य करण्याकरितां नेमिलें पण तो वारला व भूत झाला. त्याचा पुत्रहि वारला. आहोमलोक त्याची घरोघर पूजा करितात.एका जलप्रलयाच्या कथेशींहि मनुष्योत्पत्तीचा संबंध जोडण्यांत आला आहे.

आहोम धर्म व भाषा नष्ट झालेली आहे; कोठें तरी थोड्याशा जुन्या भिक्षुकांच्या घरीं हीं फक्त आढळून येतील. तथापि त्यांच्यांत सुद्धां उच्चाराची परंपरा अजीबात नष्ट झाली आहे. आहोम भाषा सयामी–चिनी भाषाकुळाच्या 'थई' शाखेंतील एक अतिशय जुनी भाषा आहे. लॅटिनचा इटालियनशीं जितका संबंध आहे, तितकाच आहोम भाषेचा सयामी आणि शान भाषांशीं संबंध आहे. अर्वाचीन सयामी भाषेशीं अर्वाचीन शान भाषेपेक्षां हिचा निकट संबंध आहे. ही प्रकृतिभाषा असून, त्यांतील प्रत्येक शब्द एकाक्षरी आहे व तो वाक्यांतील संदर्भानुसार नाम किंवा क्रियापद म्हणून योजतां येतो. शब्दांचा अनुक्रम पाहातां षष्ठी तद्विषयक नामाच्या पाठीमागून येते, व स्थान आणि काळ यांचे संबंध उपसर्गानें दर्शविले जातात. एकाक्षरी शब्दांचे भिन्न अर्थ, इतर थई भाषा व चिनी भाषा यांतल्याप्रमाणें विशिष्ट आवाजांच्या पद्धतीनें ओळखितां येतात. ते लिहून दाखवितां येत नसल्यानें, त्यांची परंपरा नष्ट झाली. या भाषेला स्वतःची वर्णमाला होती.

ई. ए. गेट याच्या दि हिस्टरी ऑफ आसाम (१९०६) या पुस्तकामध्यें आहोमी वाङ्मयासंबंधानें थोडेसें लिहिलें आहे. आहोमीमध्यें इतिहासलेखन होतें असा त्या वाङ्मयाचा विशेष गुण गेट सांगतो. तथापि त्याचा इतिहास चाळून पाहिला असतां गेटनें त्या वाङ्मयाचा कितपत उपयोग केला हें स्पष्ट होत नाहीं. तें वाङ्मय आज अर्धें मुर्धें भुईंत पुरल्यासारखें आहे. या वाङ्मयाचा फारसा शोध झाला नाहीं आणि जे ग्रंथ उपलब्ध झालेले असतील ते संशोधकाकडून फारसे वाचले गेले नाहींत.

**आळंद**–(हैद्राबाद संस्थान.) गुलबर्गा जिल्ह्यांतील याच नांवाच्या तालुक्याचें मुख्य ठिकाण. उ.अ.१७°३४' व पू.रे. ७६° ३५'. हा गांव गुलबर्ग्याच्या वायव्येस वीस मैलांवर आहे. लोकवस्ती ( १९२१ ) ११४३१. येथें व्यापार बराच असतो. ( इं. गॅ. )

**आळंदी**–(मुंबई) जिल्हा पुणें. खेडच्या दक्षिणेस बारा मैलांवर पुणें–नाशिक रस्त्यावर इंद्रायणी नदीच्या वामतीरावर हा एक लहानसा गांव आहे. उ. अ. १८° ४०' व पू. रे. ७३° ५४'. लोकसंख्या ( १९२१ )१७५०. येथें ज्ञानेश्वर महाराजांचा ( सन. १२७१–१३०० ) समाधि व देऊळ असल्यामुळें हें गांव प्रसिद्धीस आलें आहे.

आळंदीचें प्राचीन नांव अलकावती होतें असें अर्वाचीन कोशकार लिहितात. ज्ञानेश्वरांच्या वडलांच्या वेळीं व पेशवाईंतहि आळंदीस अलकापुर असें म्हणत (रा. खं. ६ १, ११७ ). आळंदी येथें इंद्रायणीवर इ. स. १८२० मध्यें पुण्याचे श्रीमंत पेढीवाले ठाकुरदास मोहनलाल आगरवाला यांनीं ऐंशीं हजार रुपये खर्चून एक दगडी पूल बांधलेला आहे पुलावरून गांव, देवळें, भिंती, बागा वगैरेंचा देखावा चांगला दिसतो. गांवात सुमारें तीनशें घरें आहेत. ज्ञानेश्वर महाराजांच्या देवळास तीन दरवाजे आहेत त्यांचीं नांवेंः—चंदुलाल, गायकवाड, आणि शिंदे; पैकीं शिंदे दरवाजाचें तोंड बाजाराकडे असून तेंच महाद्वार आहे. देवळाभोंवती कमानदार ओऱ्या असून त्यांचे हल्लीं लहान लहान भाग केले असून त्यांचा उपयोग राहण्याकडे करतात. मंडप कमानीचा असून मोठा आहे. सर्व काम दगडी आहे. मंडपाच्या भिंतीवर पुराणांतील चित्रें काढलेलीं आहेत. बाहेरच्या बाजूवरहि तशींच चित्रें काढलेलीं आहेत. ज्ञानोबांच्या समाधीवर त्यांची एक तीन फूट उंचीची व चांदीच्या मुखवट्याची मूर्ति स्थापिलेली असून मागें विठोबा रखमाईच्या मूर्ती आहेत; हें देउळ सुमारें तीनशें वर्षांपूर्वी कोणी आंबेकर देशपांड्यांनीं बांधलें असून मंडप सन १७६० च्या सुमारास शिंद्याचा दिवाण रामचंद्र मल्हार यानें बांधलेला आहे. पश्चिमेकडील भिंत व ओऱ्या ही इ. स. १७५० च्या सुमारास तिसरा पेशवा बाळाजी बाजीराव ( १७४०–

१७६१ ) यानें बांधलीं आहेत. बाळाजी बाजीराव पेशवे नेहमीं आळंदीस दर्शनास जात असे असें दिसतें(रा. खं. ६. १,५८;६, ९,९८ ). गायकवाड दरवाजा अथवा नगारखाना सुमारें १८४० सालीं गणपतराव गायकवाडांनीं दोनहजार रुपये खर्च करून बांधला. इ. स. १८२५ च्या सुमारास आंबेकर देशपांड्यांच्या एका वंशजानें पूर्वेकडील आणि दक्षिणेकडील भिंत बांधली आहे. चंदुलाल दरवाजा हा निजामचा प्रसिद्ध दिवाण चंदूलाल यानें बांधला असून उत्तरेकडील ओरी शिंदे आणि कोणी काशीराव यांनीं बांधली आहे. उत्तरेकडील दरवाज्यावरील नगारखाना हा इ. स. १८०० च्या सुमारास शिंद्यांच्या पक्षांतील बाळाजी गोविंद यानें बांधला आहे.

आळंदी येथें आणखी सहा देवळें आहेत. त्यांची नांवें:- बहिरोबा, मलप्पा, मारुती, पुंडलीक, राम, आणि विष्णु. पुंडलीकाचें देऊळ नदीच्या पात्रांत आहे. आळंदी येथें ज्ञानेश्वर महाराजांच्या समाधीखेरीज आणखी जीची लोक भक्तीनें पूजा करतात अशी वस्तु म्हटली म्हणजे तेथें असलेली एक दगडी भिंत होय, ज्या वेळीं चांगदेव आळंदीस आले होते त्यावेळीं त्यांनां भेटण्याकरतां ज्ञानेश्वर हिच्यावर बसून गेले अशी दंतकथा आहे. देवळाची सर्व व्यवस्था पंचकमिटीकडे आहे. त्यानीं गुरव नोकर ठेवले होते त्यांनीं दांडगाई केल्यावरून पंचकमिटीनें ताबा त्याखेरीज सरकाराकडून नक्त १०८० रुपयांची नेमणूक देवळास आहे, दर महिन्याच्या वद्य एकादशीस यात्रेकरू येथें दर्शनास येतात, परंतु कार्तिक वद्य एकादशीस (नवंबर-डिसेंबर) येथें मोठी यात्रा भरते; जमाव सुमारें पन्नास हजार माणसांचा असतो. यात्रेकरू गांवाबाहेरील ज्या सपाट मैदानांत उतरतात, त्या जागेला निचर चांगला आहे.

आळंदीजवळ बेटांत पांडुरंगाश्रम नांवाचे एक परमहंस राहात असत. त्यांस थोरले बाजीराव फार मानीत. आळंदीस बेटांत अद्याप त्यांची समाधि दृष्टीस पडते. वासकर दप्तर राजवाड्यांनीं कांहींसें ११ व्या खंडांत प्रसिद्ध केलें आहे, त्यांत पांडुरंगाश्रमाची माहिती मिळते. ( रा, खं. ११. पत्रें २७,२८, २९, ३३, ४४ पहा )

इ. स. १८६७ मध्यें येथें म्युनसिपालिटीची स्थापना झाली, हिचें मुख्य उत्पन्न म्हटलें म्हणजे येथें यात्रेकरूवर दर माणशीं दोन आणे कर घेतात तेंच होय. [ मु. ग्या. इं गॅ. ]

**आळवार.**—वैष्णव संत कवी. दक्षिण हिंदुस्थानांतील वैष्णवसंप्रदायाचे दोन कालविभाग पडतात; एक आळवारांचा व दुसरा आचार्यांचा. ' दैवी प्रेमसागरांत बुडून गेलेले ' हे आळवार योगी बारा असून ते निरनिराळ्या काळीं जन्मलेले व निरनिराळ्या ठिकाणीं रहाणारे असे होते. वैष्णव पंथांत गीतेप्रमाणें ज्याला महत्त्व आलें आहे त्या ' प्रबंधम् ' नांवाच्या ग्रंथांत आळवारांचीं गीतें गोविलीं आहेत. परंपरेनें चालत आलेल्या माहितीवरून आळवारांचे तीन गट पडतात.

पू र्व का ली न.—(ख्रि. पू. ४२०३) पोयगयी आळवार, भूतत्तार पेय आळवार, तिरुमळि शायी आळवार.

म ध्य का ली न.—( ख्रि. पू. ३१०२ ) नम्माळवार, मधुरकवि. (३०७५)कुलशेखर, पेरिय (३०५६) (आळवार,) आंदाळ, ३००५.

अं ति म का ली न.—( ख्रि. पू.२८१४) तोंडरडिप्पोडी, ( २७६० ) तिरुप्पाण (२७०६ ) तिरुमंगयी आळवार.

प्रत्येक आळवाराचे वर दिलेले नक्की जन्मकाळ धार्मिक तामिळ ग्रंथांतून घेतलेले आहेत. ते विश्वसनीय नसणार हें ठरलेलेंच पण आळवारांचा अनुक्रम कांहीं अशक्य दिसत नाहीं. पहिल्या गटांतील आळवारांची कोणालाच फारशी माहिती नाहीं. दुसऱ्यांतील कांहींशी सांपडते व तिसऱ्यांतील तर जिला ऐतिहासिक म्हणतां येईल अशीहि थोडी फार माहिती उपलब्ध आहे. महत्त्वाच्या दृष्टीनें या सर्व आळवारांत नम्माळवार पहिला येईल ( ' नम्माळवार ' पहा ).

इ. स. ४ थ्या किंवा ५ व्या शतकापासून ८ व्या शतकापर्यंत हे सर्व आळवार होऊन गेले असावेत. नंतर दोन शतकांनीं नाथमुनीपासून आचार्यांचा काळ सुरु झाला. आळवार हे खरेखुरे प्रवक्ते असून गूढ अंतर्ज्ञानांत निमग्न होऊन शांततेनें काळ कंठीत असत असें त्यांचें वर्णन आहे. त्यांच्यानंतर झालेले आचार्य हे स्वभावतःच अध्यापक व आचार्य असल्यानें त्यांनीं वैष्णवसंप्रदायाचें रहस्य विद्वानांनांहि पटेल अशा तऱ्हेनें प्रतिपादन केलें; शिवाय ते स्वतः मोठे पंडित व तत्त्ववेत्ते होते. रामानुजासारख्या आचार्यांनींहि आळवारांनां गुरुस्थानीं मानून त्यांचें कार्य नवीन जोमानें पुढें चालविलें; श्रीरंगम् व इतर प्रमुख ठिकाणच्या देवळांतून आळवारांच्या मूर्ती दिसतात. त्या रामानुजाच्या सांगण्यावरूनच बसविलेल्या आहेत. असा समज आहे. या आळवारांत स्त्रीशूद्रहि होते. या द्वादश आळवारांपैकीं आंदाळ ही पेरिय आळवाराला लहानपणीं सांपडलेली स्त्री, तिरुप्पाण पंचमजातीचा, तिरुमंगयी शूद्र, नम्माळवार वेल्लाळ व बाकीचे ब्राह्मण होते. या कवींचीं गीतें म्हणजे निर्भेळ हिंदु-वातावरणांतील एका प्रांताच्या लोकांचे पहिले अमोल्य बोल म्हणतां येईल. तोंडरडिपोड्डीच्या शोकपूर्ण गीतांपासुन ते नम्माळवाराच्या विचारपरिप्लुत स्तोत्रापर्यंत, तसेंच कुळशेखराच्या सुसंस्कृत पद्यांपासून ते आंदाळच्या गूढ प्रेम-गीतांपर्यंत या आळवारकाव्याची मोठी व्याप्ति आहे. हे वैष्णव-गायक व यांच्याच काळचे आणि यांच्याच तोडीचे ६३ शैव गायक ' अडियार ' घेतल्यास इतक्या प्राचीनकाळीं कोणत्याहि हिंदुस्थानीय देशी भाषेंत सांपडणार नाहींत अशीं परमधार्मिक गीतें आपणांस अभ्यासण्यास मिळतील.

[ सं द र्भ ग्रं थ—कृष्णस्वामी अयंगार-एन्शंट इंडिया. नेटसन मालेंतील नम्माळवार, अप्पर व वैष्णवाईट रिफॉर्मर्स ऑफ इंडिया हे ग्रंथ. गोविंदचार्यस्वामी—दि होली विस्डम ऑफ दि द्रविडियन सेंट्स. ]

# महाराष्ट्रीय ज्ञानकोश.

## इ



इ.—देवनागरी वर्णमालेंतील तिसरें अक्षर. याला हल्लींचें स्वरूप येण्याला कोणकोणत्या स्थितींतून जावें लागलें तें खालील आकृतीवरून स्पष्ट होईल

इ = ⁘ ∴ ○○ ... पहिली अवस्था इ. स. पू. ३ ऱ्या शतकांतील अशोकाच्या गिरनार येथील शिलालेखांत दिसते, तर दुसरी इ. स. ४९३ मधील जयनाथच्या दानपत्रावरून कळते. तिसरें रूप हैहयवंशी राजा जाजल्लदेव याच्या वेळच्या लेखांतून घेतलें आहे. या पुढील रूप चीरवा गांवीं सांपडलेल्या मेवाडचा गुहिलवंशी रावळ अमरसिंह याच्या काळच्या ( इ. स. १२७३ ) लेखांत आढळतें. सध्यां असलेलें इचें रूप त्यानंतरच्या काळांत सौंदर्याच्या दृष्टीनें थोडा फेरफार होऊन बनलें. [ भारतीय प्राचीन लिपीमाला. ]

**इकबालखान**—तघ्लख घराण्यांतील एक बादशहा फिरोजशहाच्या मृत्यूनंतर राज्यांत अंधाधुंदी झाली व चार सुलतान दहा वर्षांच्या आंतच होऊन गेले. फिरोजशहाचा नातु जेव्हां सुलतान झाला तेव्हां त्याचा चुलतभाऊ म्हणजे फिरोज जाफर नांवाच्या मुलाचा मुलगा इकबालखान बादशहाच्या तर्फेनें त्याच्या प्रतिस्पर्ध्यांशीं लढला व राज्यांत थोडाबहुत त्यानें बंदोबस्त केला. पण इतक्यांत हिंदुस्थानावर तयमूरलंगाची धाड आली. तिला तोंड देण्याकरितां बादशहा व इकबालखान यांनीं तयारी केली. लढण्याची शिकस्त केली पण शेवटीं पराभव झालाच. इकबाल पळून गेला. तयमूर गेल्यानंतर इकबालखान दिल्लीस आला. महंमद बादशहा त्यावेळीं तयमूरच्या भीतीनें गुजराथेंत पळून गेला. इकबालनें दिल्ली व त्या भोंवतालचा प्रदेश काबीज करून घेतला; व बादशाहीपद बळकावण्याचा यत्न केला. बादशहाला इकबालच्या ताबेदारींत राहणें न आवडून तो कनोजला जाऊन राहिला होता.

तयमूरनें हिंदुस्थानावर स्वारी केली असतांना नरसिंघ अथवा नरसिंह यानें महंमदापासून हिसकावून घेतलेलें ग्वाल्हेर शहर परत मिळविण्यासाठीं, इकबालखान त्यावर चाल करून गेला ( १४०२ ). परंतु नरसिंहाच्या मागून गादीवर बसलेल्या त्याच्या मुलानें ग्वाल्हेरचें मोठ्या शौर्यानें रक्षण केल्यानें इकबाल तो प्रदेश लुटून दिल्लीला परत गेला.

पुढें इकबालखानानें, दुसऱ्या महंमूदशहाला कनोज येथें वेढलें परंतु त्याला इटावा घेतां न आल्यामुळें तो दिल्लीला परत गेला. १४०५ मध्यें इकबालखान सामानच्या बहरामखानावर चाल करून गेला; तेव्हां बहराम डोंगराळ प्रदेशांत पळून गेला, व इकबाल त्याचा पाठलाग करीत त्याच्या मागोमाग गेला. परंतु शेख अलमुद्दीन यानें त्या दोघांत तडजोड केल्यामुळें इकबाल मुलतानकडे गेला. वाटेंत त्यानें बहरामला ठार मारिलें, असें " तारिख-इ-मुबारकशाही " नांवाच्या ग्रंथांत लिहिलें आहे. अजोधन येथें त्याची मुलतानचा सुभेदार खिझरखान याच्याशीं गांठ पडली. तेव्हां त्यांच्यामध्यें लढाई होऊन तिच्यांत इकबाल पराभव पावून ठार मारला गेला. महंमुदाची पुन्हां दिल्लीच्या तख्तावर स्थापना झाली. [ मुसलमानी रियासत. माबेल डफ—इंडियन क्रॉनॉलॉजी. बील. ]

**इक्केरी**—हें खेडेंगांव म्हैसूर संस्थानांत शिमोगा जिल्ह्यांत सागर तालुक्यांत आहे. हें ठिकाण सन १५६० पासून १६४० पर्यंत केळदी राजांचें राजधानीचें ठिकाण होतें. पुढें हें गांव नांवाला राजधानीचें गांव होतें व तेथल्या राजांना इक्केरी नांवानें संबोधूं लागले. ह्या गांवांत मोठा किल्ला होता व त्या किल्ल्यांत एक सुंदर राजवाडा होता. पण आतां त्याचा मागमूसहि सांपडत नाहीं. हल्लीं एकच इमारत उपलब्ध आहे व तिचें नांव अघोरेश्वर हें आहे. हें एक देऊळ आहे व देवाच्या मूर्तीसमोर नमस्कार घालणाऱ्या तीन राजांचे पुतळे आहेत.

**इक्वेडोर**—हें दक्षिण अमेरिकेंतील एक प्रजासत्ताक राज्य आहे. याच्या उत्तरेस व ईशान्येस कोलंबिया, आग्नेय व दक्षिणेस पेरू, आणि पश्चिमेस पासिफिक महासागर आहे. या देशाची पेरूकडील सरहद्द बराच काल अनिश्चित होती.

नै स र्गि क व र्ण न.—या देशाच्या पृष्ठ भागाचे तीन निरनिराळे विभाग करतां येतील. पहिला पश्चिम कॉर्डिलेरा व समुद्रकिनारा यांच्यामधील सिस-अँडियन, दुसरा इंटर अँडियन हा पर्वतमय आहे व तिसरा ट्रॅन्स अँडियन म्हणजे अँडीज पर्वताच्यापलीकडील.

प र्व त.—अँडीज पर्वताची पूर्वेकडील व पश्चिमेकडील रांग या दोन पर्वतांच्या ओळी या देशांत आहेत. यांनां पूर्व व पश्चिम कॉर्डिलेरा म्हणतात. यांतील सर्वांत उंच शिखरें कायांबे ( १९१८६ ) अँटिसावा ( १९३३५ )-यांत कांहीं ज्वालामुखीहि आहेत, कोटोपॅक्सी ( १९६१३ ) व चिंबोरॅझो ( २०४९८ ) हीं आहेत.

न द्या.—मॅरॅनॉन अथवा अॅमेझॉनला मिळणाऱ्या नद्या व पॅसिफिक महासागराला मिळणाऱ्या नद्या अशा, या देशांतील नद्यांच्या दोन प्रणाली आहेत. पूर्ववाहिनी नद्यांत मुख्य नॅपो ही आहे. हिला कोका, अॅग्वारिको व कुरारे या नद्या

मिळतात. टायम्रे, पॅस्टाझा, मोरोना व सँटिआगो या नद्या मॅरॅनॉनला मिळतात.

अँडीजच्या पश्चिम भागांतील नद्या. मिरा, इस्मेरॅल्डास व ग्वायास या आहेत. सॅनपेड्रो, पॅरॅम्बा, कॅचियाकु, चॅचाव्हि, कॅनुम्बि, सॅनज्वान, कैकेर व नुल्पे या नद्या मिराला मिळतात. ग्वेलाबंबा, रिओ पेड्रेगाल, टोचो व क्विनिन्डे, याग्वाचो, बाबाहोयो या इतर नद्या आहेत.

स रो व रें.—याग्वारकोचा, कुइकोचा, सॅनपेब्लो, क्विरोटोआ, कोल्टा, कोले हीं मुख्य आहेत. बेनेमॉस, सॅनपेड्रो-डेल टिंगो, कॅचिलॅक्या, टिंबुरगोयो, बॅनॉस, टुंगुरागवा येथें व रुमिनाग्वी व चिंबोरॅझो यांच्या उतरणीवर उष्ण झरे आहेत.

स मु द्र कि ना रा.—इक्केडोरचा समुद्रकिनारा उत्तरेस १°२' अक्षांशापासून बोका, जॅम्बेलीपर्यंत पसरलेला आहे. यांतील मुख्य भूशिरें पुंटा गॅलेरा, कॅबो पॅसाडो, कॅबो डि सॅन लोरेंझो व ला पुंटिला हीं आहेत. उत्तरेकडे अँकोन डि सार्डिनास नांवाचा उपसागर आहे. याच्याच कांठावर सँटिआगो नदीचें मुख, पोझा बंदर, सॅन लोरेंझो बे, पैलोन बेसिन, ला टोला व पैलोन हीं लहान बंदरें आहेत. एस्मेरॅल्डीज नदीमुखावर एस्मेरॅल्डीज बंदर आहे. याखेरीज मँटा बे व त्याच नांवाचें बंदर, बॅव्हिया डि कॅरॅकेझचें बंदर, सँटा एलेना बे व याच नांवाचें बंदर, ग्वायाक्विलचें आखात, जॅंबेली चॅनल हीं आहेत.

बे टें.—या देशाच्या किनाऱ्याजवळ फार थोडीं बेटें आहेत. मोटें बेट पुना हें आहे. ग्वायाक्विलच्या आखातांत अॅमोर्टा जॅडाचें बेट आहे. ग्वायाक्विल आखाताच्या उत्तरेस सॅलँगो व लाप्लाटा हीं बेटें आहेत. गॅलॅपॅगॉस बेटें इक्केडोरच्या सत्तेखालीं आहेत.

भू स्त र व र्ण न —पूर्व कॉर्डिलेरा नीस, मायका व 'कोराइटाशिस्ट' खडकांचा बनलेला आहे. पश्चिम कॉर्डिलेरा मध्ययुगीन ( मेसोझॉइक ) काळांतील खडकांचा बनलेला आहे.

ह वा.—या देशांतील हवामान बहुतेक उंचीवर अवलंबून आहे. क्विटोच्या उत्तरेस पंधरा मैलांवरून जरी भूमध्य रेषा गेलेली आहे, तरी बहुतेक भागाची हवा उष्ण कटिबंधांतील हवेसारखी आहे. स्थानिक रुक्षपणा, ज्वालामुखी पर्वतांचे परिणाम व पर्वत यांचा परिणाम कांहीं जिल्ह्यांची हवा व पर्जन्य यांच्यावर होतो.

व न स्प ति.—येथें कोको, कापूस, साखर,तंबाकू,तांदूळ, मका, युक्का, वाटाणा, रताळें, याम, अॅराकाचा, नीळ, रबर, हस्तीदंती नट, सिंकोना, केळीं, भाकरीचीं फळें या वनस्पति होतात. कोको, बुंद, नारळ, अननस, नारिंगें, लिंबें, ग्वायाव्हा, पेरु, शॅडॉक, डाळिंबें, जरदाळू, चिरीया, ग्रॅना, पॅटा, आंबे, वगैरे फळें होतात. रबर, व्हॅनिला रंगाचीं झाडें होतात. रेडवूड, ब्राझिलवूड, देवदार, अक्रोड वगैरे इमारती लांकडाचीं झाडें येथें होतात.

प्रा णी.—पक्षी व किडे येथें असंख्य आहेत.प्युमा,जॅग्वार, ऑसेलॉट, आस्वल, खोकड, वीझेल व ओटर, लहान हरीण, लामा, अल्पाका, ग्वानो व व्हकूना येथें असतात. गुरें, घोडे, शेळया, डुकरें व खेचरें यूरोपांतून आणून येथें स्पॅनिश लोकांनीं वाढविले. गरुड, गिधाड, ससाणे, घुबड व गुणगुणणारे पक्षी येथें सांपडतात. सार्डिनास वगैरे मासे येथील नद्यांत सांपडतात.

लो क व स्ती.— या देशाचे मूळचे लोक क्वि? व कारा या दोन जातींचे आहेत. यांतील क्विट हे प्रथम असून कारा हे नंतर समुद्रकिनाऱ्यावरून आले. नंतर लवकरच इंकांचा राजा तुपान युपानकी व त्याचा मुलगा व्हानाकपाक यांनीं या देशावर स्वारी केली. यांची भाषा व रीतीभाती कारा लोकांच्या सारखीच असल्यामुळें त्यांस हा देश जिंकणें सोपें गेलें. सध्यांचे इक्केडोरमधील रहिवासी याच दोन जातींचे वंशज आहेत. स्पॅनिश लोकांनीं या देशांत आपल्या वसाहती स्थापन केल्यानंतर त्यांनीं या लोकांस फारच त्रास दिला व त्यांचा अतोनात छळ केला. हल्लींहि त्यांनां गुलामांपेक्षां चांगल्या तऱ्हेनें वागविलें जात नाहीं. तथापि त्यांची संख्या एकंदर लोकसंख्येच्या जवळ जवळ पाऊणपट आहे. अँडीस पर्वताच्या पूर्वेस यापेक्षांहि असंस्कृत लोकांची वस्ती आहे. मूळच्या लोकांतील मुख्य जाति क्विजोस अथवा कॅनेलॉस, जिव्हेरॉस, झापेरोस, पिओजेस. इक्विटोस व मॅक्सनेस या होत.

या देशाची अद्यापि पद्धतशीर खानेसुमारी झालेली नाहीं. लोकसंख्या सुमारें वीस लक्ष आहे. शुद्ध यूरोपीय रक्ताचे लोक फारच थोडे आहेत. मिश्र लोकांची संख्या सुमारें चार लक्ष आहे. परकी लोकांची संख्या सुमारें सहा हजार आहे. यूरोपीयांच्या हातीं सर्व सत्ता आहे. यांपैकींच कांहीं थोड्यांच्या हातांत सर्व जमीन आहे. मिश्र लोकांपैकीं कांहीं कारागीर वगैरे आहेत व इंडियन शेतकी करतात. या राज्याचे पंधरा प्रांत व एक विभाग ( टेरिटरी ) पाडलेले आहेत.

श ह रें.—टुल्कन, इबारा,क्विटो, ( ७०,००० ) लॅटाकुंगा, अॅम्बाटो, रिओबम्बा ( १८,००० ) ग्वारांडा, अॅझोग्वेस, केंका, ( ५०,००० )लोजा,माचाला, ग्वायाक्विल,( १०५,००० ) बाबाहोयो,पोर्टोव्हिजो,एस्मेरॅल्डस, हीं या प्रांतांच्या राजधानीचीं शहरें आहेत. जिपिजॅपा हें लहानसें शहर आहे. येथें पानामाटोप्यांचा धंदा चालतो. वस्ती सहा हजार आहे.

द ळ ण व ळ णा चे मा र्ग.–१९०८मध्यें ग्वायाक्विल क्विटो रेल्वे सुरू करण्यांत आली. प्यूर्टो बोलिव्हारपासून मॅचाला पर्यंत व बॅव्हिया कॅरॉकेझपासून चोनपर्यंत या दोन रेल्वे १९०८ मध्यें बांधल्या जात होत्या. आणखी क्विटोहून रेल्वे बांधण्याचें ठरलें होतें. क्विटो, इबारा, टलकन, या शहरावरून जाणारी रेल्वे बांधण्याचें ठरून १९१७ पासून

कामास सुरवात झाली आहे. १९१३ मध्यें अँबेटो करारे यामधील रेल्वे बांधावयास सुरुवात झाली. १९१४ मध्यें हुइग्रा ते क्यूडांकाव, ग्वायाक्विल ते सॅलिनेस या रेल्वे बांधण्याचें काम सुरू झालें. तसेंच १९२० मध्यें बबवाहोयो ते ग्वारंड यामधील रेल्वेचें कामहि सुरू झालें आहे. गाड्या जाऊं शकतील अशी एकच सडक आहे. साधारण रस्त्यावरून खेचरें जाऊं शकतात. ग्वायास, डॅलें, व्हिन्सेस यागवाची व इतर नद्या पावसाळ्यांत नाव्य असतात. देशांतील बऱ्याच भागांत खेचरें, लहान नद्यांतील उतार व पूल हीं दळणवळणाचीं साधनें आहेत. १९१५ मध्यें ४३६० मैल तारायंत्र सुरू होतें. क्विटो मुख्य शहराशीं व कोलंबिया व पेरु यांशीं जोडलेलें होतें. राजधानीचा संबंध सँटा एलेना व कोलंबियांतील टुमाको येथें पाण्याखालील तारेशीं जोडलेला आहे. टेलिफोन, बिनतारीसंदेशयंत्रें वगैरे सुरू झालीं आहेत. किनाऱ्यावर दळणवळण समुद्रांतून होतें.

व्या पा र.—किनाऱ्यावर व्यापार करणाऱ्या १८ किंवा २० बोटी व इतर नदीतील लहान होडकीं याशिवाय येथें व्यापारी जहाजें नाहींत. परदेशाशीं व्यापार परकी जहाजांनीं चालतो. हीं जहाजें नेमानें ग्वायाक्विल बंदरांत येत असतात. लोकांच्या अतिशय दारिद्र्यामुळें व्यापाराची भरभराट होत नाहीं. तेथून कोको, किंवा तग्वा हस्तीदंती फळें, टोप्या, कॉफी, कातडी, रबर वगैरे जिन्नस बाहेर जातात, आणि कापड, खाद्य पदार्थ, भांडीं, कपडे, वगैरे जिन्नस देशांत येतात. एकंदर निर्गत ( १९१७ ) ३२६७५७६ पौंड व आयात २०३८९५८ पौंड किंमतीची झाली.

शे त की.—येथें कोको, धुंद, कापूस, साखर, तंबाकू, तांदूळ युक्का, व रताळीं उत्पन्न होतात. उंचवट्याच्या प्रदेशांत गहूं, इंडियन कॉर्न, ओट, जव, बटाटे व पुष्कळ प्रकारच्या भाज्या पिकवितात. उष्ण खोऱ्यांत द्राक्षें होतात. घोडे, खेचरें व मेंढ्या वाढवितात.

जं ग लां तील प दा र्थ.—रबर, सिंकोना, हस्तीदंती नट, मोकारा, टोक्विला व काबाया फायबर, कोचीनील, ( प्राणिजन्य रासबेरीचा रंग) कॅबिनेट लाकूड, फळें व मनुका हे पदार्थ येथील जंगलांत उत्पन्न होतात.

ख नि ज प दा र्थ.—सोनें, पारा, अशुद्ध लोखंड व शिसें, पाच, उत्तम प्रतीचा कोळसा, पेट्रोलियम व मीठ हीं द्रव्यें येथील खाणींत सांपडतात.

का र खा ने.—कांहीं कापसांच्या व साखरेच्या गिरण्या आहेत. देशांतील उपयोगाकरितां जाडें भरडें कापसाचें व लोकरीचें कापड जुन्या पद्धतीनें तयार करतात. टोप्या व दोरीचे झोंपाळे व जोडे तयार करतात. उत्कृष्ट हातानें बनवलेली किनार क्विटोजवळ बनते. पिठाच्या चक्क्या, साखरेचे कारखाने, दारू गाळण्याच्या व कलालीं भट्ट्या, चॉकोलेट, मेणबत्त्या बनविण्याचे, लांकूड कापण्याचे व कातडें कमावण्याचे कारखाने येथें स्थानिक उपयोगापुरते आहेत.

रा ज्य व्य व स्था.—येथील राज्यव्यवस्था अतिकेंद्रित प्रजासत्ताकासारखी आहे. यांची लेखनिविष्ट शासनघटना आहे. कार्यकारी सत्ता अध्यक्ष उपाध्यक्ष, व [ वरिष्ठ सभा ( सीनेट ) व प्रतिनिधिसभा (डेप्युटी चेंबर) यांचीं बनलेली ] कांग्रेस या तिघांच्या ताब्यांत आहे. येथें बऱ्याच राज्यक्रांत्या होऊन १८३० पासून १९०९ पर्यंत अकरा वेळां शासनपद्धति बदलली. अध्यक्षाचे मदतीस पांच मंत्र्यांचें एक मंडळ असतें व पंधरा सभासदांचें एक सल्लागार मंडळ असतें, याची सल्ला अध्यक्षास प्रत्येक महत्त्वाच्या बाबतींत घ्यावी लागते. राष्ट्रीय कार्यकारी मंडळानें नेमिलेले गव्हर्नर प्रांतांचा कारभार पाहतात. म्युनिसिपालिट्यावर सरकारी लेफ्टेनन्ट असतात.

कांग्रेसची रचना व व्यवस्था दक्षिण अमेरिकेंतील बहुतेक संस्थानांतील कांग्रेसप्रमाणें आहे. क्विटो येथें एक मुख्य कोर्ट, सहा वरीष्ठ कोर्टें, व मुख्य शहरीं कित्येक स्थानिक कोर्टें आहेत. अव्वल व दुय्यम प्रतीचीं दिवाणी कोर्टें मोठ्या शहरीं व क्विटो, ग्वायाक्विल व क्वेंका येथें कॉन्सुलर कोर्टें आहेत. पोलिस कमिशनर व जस्टिस ऑफ धि पीस प्रांतांच्या मुख्य ठिकाणीं आहेत. येथील कायदे जुन्या स्पॅनिश पद्धतीचे असून त्याचे दिवाणी फौजदारी व व्यापारी असे तीन विभाग आहेत. इ. स. १९१४ सालीं प्रेसिडेंट प्लाझा यानें १९०६ सालीं ठरलेल्या शासनपद्धतींत इष्ट त्या सुधारणा घडवून आणण्यासाठीं प्रयत्न केला. पार्लमेंटरी शासनपद्धतीच्या धर्तीवर ईक्वेडोर येथील शासनपद्धति असावी असें यानें प्रतिपादन करण्याचें काम चालविलें पण कांग्रेसमधील सभासदांनीं तें अमान्य केलें १९१९ च्या जाहीरनाम्यानें, ओरिएंट व गलॅपॅगॉस बेटें हीं परराष्ट्रीय मंत्र्याच्या ताब्यांत सोंपविली गेली आहेत.

सैन्य.—३६९० माणसांचीं चार पायदळ पलटणें, १३६२ इसमांच्या तीन तोफखान्याच्या ब्रिग्रेड, ४६८ शिपायांचीं दोन घोडदळ पलटणें, एकूण ५५२० शिपाई व हफीसर अशी संख्या १९०० मध्यें होती. १९०८ मध्यें ही संख्या ४३५० झाली. १९१७ मध्यें खडें सैन्य व अधिकारी मिळून ५२०० सैनिकांची संख्या होती. राष्ट्रीय संरक्षक ( गार्ड ) ॲक्टिव्ह म्हणजे २० ते ३८ वर्षें वयाचे नोंदलेले नागरिक ऑक्झिलियरिज म्हणजे ३८ ते ४४ वयाचे नोंदलेले नागरिक; व पॅसिव्ह्स म्हणजे ४४ ते ५० वयाचे नोंदलेले नागरिक यांचे बनलेले असतात. यांची संख्या ९५३२९ होती. सध्यां ( १९१७ ) खडें सैन्य ४८५५ सैनिक व ५९७ अधिकारी असें आहे. क्विटो येथें एक लष्करी व ग्वायाक्विल येथें एक आरमारी अशा शाळा आहेत. इ. स. १९१७ मध्यें इक्वेडोरच्या आरमारांत १ बिनशिका

१ क्रूझर, १ जहाज, १ पाणबुडी, एक लाँच आणि एक टेंडर इतक्यांचा भरणा होता.

शिक्षण—सहा ते बारा वर्षे वयाच्या मुलांकरितां प्राथमिक शिक्षण सक्तीचें, व मोफत असूनहि बऱ्याच लोकांनां शाळेची सोय नाहीं व त्यांनां आस्था नाहीं. ५ ते १४ वर्षांच्या मुलांपैकीं शेंकडा ७० मुलें अशिक्षित होती असें इक्वेडोरमधील एका लेखकानें १९१४ सालीं म्हटलें आहे. सन १९१५ सालीं, इक्वेडोरमध्यें १०५४ प्राथमिक शाळा असून त्यांत९५०१९ विद्यार्थी शिकत होते. दुय्यम शिक्षणाच्या तेरा शाळा असून त्यांत शिकणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या १७७८ होती. कैंका क्विटो, ग्वायाक्विल या ठिकाणीं विश्वविद्यालयें असून क्विटो येथील विश्वविद्यालयांत शास्त्रें वैद्यकी व कायदा या विषयांचा अभ्यास करून घेतला जातो. १९१७ सालीं, क्विटो येथें प्राच्यवस्तुमंदिर, चित्रकला व कला यांचें पीठ स्थापण्यांत आलें आहे. क्विटो व ग्वायाक्विल येथें धंदेशाळा व व्यापारी शाळा आहेत. क्विटो येथें शेतकी शाळा, वेधशाळा, वनस्पती बाग, पदार्थसंग्रहालय व राष्ट्रीय छापखाना आहेत.

धर्म—रोमन कॅथोलिक पंथ हा सरकारी धर्म मानला होता, इतर धर्मांस बहिष्कार होता. धर्मसंबंधी व्यवस्था सरकारचे ताब्यांत होती. १९०४ नंतर फ्राझानें जी या बाबतींत क्रांति घडवून आणली ती पुढें वर्णिली आहे.

जमाबंदी—आयात व निर्गत मालावरील कर, दारु तंबाखू, व स्टांप यांवरील कर,वारसांचा कर, मीठ, बंदुकीची दारु व खेळण्याचे पत्ते यांच्या मक्त्यांचें उत्पन्न, कॉन्सुलर खर्च, पोष्ट, तार व रेल्वे यांचें उत्पन्न या वसुलाच्या बाबी आहेत.

नाणें व वजनें—१८९८ च्या कायद्यान्वयें सोन्याचें नाणें व रुप्याचें दहा सुक्रेपर्यंत कायदेशीर चलन ठरविण्यांत आलें. सोन्याचें नाणें कॉंडोर नांवाचें व रुप्याचें सुक्रे नावाचें चालू आहे. नोटा काढणाऱ्या पेढ्यांना निम्मी ठेव सोन्यांत ठेवावी लागे. सोन्याचें कोंडोर इंग्लिश पौंडच्या किंमतीच्या १० सुक्रेबरोबर असतो. रुप्याचा सुक्रे = १००सेंटव्हो = २४ पेन्स, रुपें,निकल व तांबें यांचीं हलकीं नाणीं आहेत.१८५६ मध्यें मेट्रिक पद्धति योजण्यांत आली, तरी जुनीं स्पॅनिश वजनें व मापें—क्विंटल, लिब्रा, व्हारा, व फॅनेगा प्रचारांत आहेत. क्विंटल म्हणजे सुमारें १०१ पौंड होतात.

पु रा ण व स्तु—इक्वेडोरमध्यें सर्वत्र यूरोपियन कालाच्या पूर्वीच्या शिल्पकामाचे अवशेष अद्याप बरेच सांपडतात. कँकाचे ईशान्येस कॅनार येथें इनकोपिर्का नांवाची उत्तम तऱ्हेनें कापलेल्या दगडांची वर्तुळाकार भिंत आहे.हिचे मध्यभागीं छप्पर नसलेली इमारत आहे; येथून जवळच "इंका चुंग्वाना" लहानसें वर्तुळ आहे; जवळच एका खडकावर सूर्याची मूर्ति व एक लहानशी खोली कोरलेली आहेत. पिचिंचापासून एस्मेरॅल्डीजकडे जाणाऱ्या एका टेकडीवर पेल्टाटॅम्बा येथें एक देऊळ, कोनाकृती मनोरा, पूल, कमानी रस्ता, व असंख्य थडगीं यांचे अवशेष भाग आहेत. ईटन् टॅकी येथें असलींच थडगीं आहेत. कोटोपॅक्सी जवळ कॅलोच्या मैदानांत इंकांच्या राजवाड्याचा पडका भाग व कृत्रिम कोणाकृति टेकडी आहेत, पोमॅलॅक्टा येथें राजवाडा व किल्ला यांचे अवशेष भाग, व सूर्याचें जुनें देऊळ आहे.

इतिहास—अमेरिकेच्या इतिहासांत या देशाची माहिती झाल्यापासून या देशांत पन्नासांवेवर स्वतंत्र जातींची वस्ती होती, यामध्यें क्विट लोक फार महत्त्वाचे होते. इ. स. २८० चे सुमारास एका परक्या लोकांची जात एस्मेरॅल्डासच्या खोऱ्यांत आली, व यांनीं स्थापलेलें राज्य १२०० वर्षें टिकलें. १४६० मध्यें चौदाव्या कॅरान शिरीच्या कारकीर्दीत पेरूचा इंका तुपान युपान्कि यानें क्विटो काबीज करण्याचें काम हातीं घेतलें; व क्विटोनियन लोकांचा व्हेनाकॅपॅरुनें हॅटुन्टाकी येथें पराभव करून हे बेत तडीस नेले व यानें शिरी राजाची मुलगी पॅचा हिच्याशीं लग्न करून आपलें पद बळकट केलें, आपल्या मृत्युपत्रानें या राजानें क्विटोचें राज्य पॅचापासून झालेला मुलगा ॲटाहुअल्पापा याला, व पेरुचें राज्य पेरुच्या राणीपासून झालेल्या हुआस्कारला दिलें. परंतु हुआस्कारनें आपल्या भावावर वर्चस्व जाहीर केल्यामुळें लवकरच लढाई जुंपली परंतु ॲटाहुअल्पाचा विजय होऊन तो दोन्ही राज्यांचा मालक झाला.परंतु १५३३ मध्यें पिझारो व त्याचे स्पॅनिश लोक आले व या देशाला पेरुच्या स्पॅनिश व्हाइसरायाचे हाताखालचा प्रांत बनविण्यांत आलें, व १७१० पर्यंत कांहींच घडामोड झाली नाहीं. याच वर्षी या देशाला सँटाफेचा प्रांत करण्यांत आलें. परंतु १७२२ मध्यें तो पेरुला परत करण्यांत आला. या शतकाच्या अखेरीस सर्व स्पॅनिश वसाहतींत स्वतंत्रतेची लाट उसळली तेव्हां क्विटोहि बिलकूल स्वस्थ राहिलें नाहीं. क्विटोनियन डॉ. युजेनिओ एस्पेजो व त्याचे नागरीक सोबती यांनीं सँटाफे येथील राजक्रांतिकार नॅरिनो व झी यांशीं संघ केला. तथापि १८०९ पर्यंत स्पॅनिश लोकांचें जूं झुगारून देण्याचा क्विटोनियन लोकांनीं मनापासून प्रयत्न केला नाहीं. याचा आरंभ १८२० मध्यें ग्वायाक्विलच्या लोकांनीं केला. त्यांचा प्रथम पराभव झाला; अखेरीस बोलिव्हारनें सँटाक्रुझ याच्या हाताखालीं पेरुव्हियन सैन्यासह सुक्रेला त्यांच्या मदतीस पाठविलें. यांनीं १८२२ मध्यें माउंट पिचिंचावर एका लढाईत जय मिळविला. दोन दिवसांनीं क्विटोचा स्पॅनिश प्रेसिडेंट शरण आला व देशाचें स्वातंत्र्य प्रस्थापित झालें. न्यू ग्रॅनाडा व व्हेनेझुएलाशीं १८२१ मध्यें संधि करण्यांत आला.

१८२८ मध्यें पेरुशीं भांडण झालें, परंतु टार्कि येथें जय मिळविल्यावर तह करण्यांत आला. १८३० मध्यें कोलंबियन संघांतून अलग होऊन या देशाचें स्वतंत्र प्रजासत्ताक राज्य जाहीर करण्यांत आलें.जनरल फ्लोरेस पहिला प्रेसिडेंट झाला. याची सत्ता पंधरा वर्षे टिकली. याचे कारकीर्दीत स्पेनशीं

दोस्तीचा व शांततेचा तह झाला. याच्या मागून रोका प्रेसिडेंट झाला. यानें कोलंबियाशीं तात्पुरता संधि केला, इंग्लंडशीं गुलामगिरीविरुद्ध तह केला व बेल्जियमशीं व्यापारी तह केला. १८५० मध्यें डायेगो नोबोआ प्रेसिडेंट निवडला गेला. यानें जेसुइट लोकांनां परत बोलाविलें व न्यू ग्रेनाडांतील कॉन्झरव्हेटिव्ह लोकांस आश्रय देऊन त्या देशाशीं भांडण उपस्थित केलें. यामुळें त्याला आपला अधिकार सोडून जावें लागलें. नंतर उर्बिना डिक्टेटर झाला. याच्या मागून १८५६ मध्यें जनरल रोबल्स प्रेसिडेंट झाला. यानें फ्रेंच पद्धतीचीं नाणीं, वजनें व मापें सुरू केलीं. १८५९ त हा आपलें पद सोडून गेला. १८६१ मध्यें डॉ. गॅब्रिएल मोरेनो निवडून आला. परंतु याच्या कांहीं पत्रांवरून याबद्दल अविश्वास उत्पन्न झाला, व त्याच्या जुलमी कृत्यांमुळें १८६५ मध्यें त्यास जावें लागलें. याच्यामागून कॅरियन प्रेसिडेंट झाला यानें स्पेनविरुद्ध चिली व पेरूशीं तह करून सर्व स्पॅनिश प्रजेला हद्दपार केलें. यानें १८६७ त राजीनामा दिला. कांग्रेसनें सार्वजनिक शांततेला घातुक अशीं सर्व माणसें कैद करण्याचा प्रेसिडेंटाचा अधिकार रद्द केला. बोलिव्हियन, चिली, व पेरुव्हियन व कोलंबियन लोकांनां नागरिकत्वाचे हक्क तावडतोब देण्यांत आले. १८६८ मध्यें एस्पिनोझा प्रेसिडेंट झाला. याच वर्षी धरणीकंप झाला. दुसऱ्या वर्षी क्विटो येथें मोरेनोचें बंड झालें व १८७० मध्यें मोरेनो प्रेसिडेंट झाला. यानें धार्मिक जुलूम प्रस्थापित करण्याचा फिरून प्रयत्न केला, व १८७५ मध्यें मोरेनोचा क्विटो येथें खून झाला. नंतर डॉ. बोरेरो प्रेसिडेंट झाला. परंतु लवकरच १८७६ मध्यें जनरल व्हिन्टेमिलाचें बंड झालें. व्हिन्टेमिला १८७८ प्रेसिडेंट निवडून आला. यानें उदारमतवादी शासनपद्धति सुरू केली व धर्माधिकाऱ्यांची सत्ता कमी केली. हा डिक्टेटर झाला. यामुळें सर्व देशांत बंड झालें. व्हिंटेमिलाचा पराभव झाला व १८८३ मध्यें पेरूला तो पळून गेला.

डॉ. कामानो १८८४ ते १८८८ पर्यंत प्रेसिडेंट होता. कित्येक राज्यक्रांतिकारक बंडें झालीं परंतु तीं मोडण्यांत आलीं. याच्या मागून डॉ० फ्लोरेस प्रेसिडेंट झाला. याच्या कारकिर्दीत शांतता राहिली. १८९२ मध्यें डॉ० कॉर्डेरो प्रेसिडेंट निवडला गेला. याच्या वेळीं अंतस्थ कलह लागले.

जपानी-चिनी लढाईच्या वेळीं १८९४ मध्यें जपान सरकारला एस्मेरॅल्डा क्रूझर विकण्याच्या कामीं इक्वेडोरनें चिलीला मदत केली, हें कलहाचें कारण होतें. जनरल अल्फॅरो याच्या आधिपत्याखालीं बंड झालें, व एक वर्षभर चकमकी होऊन सरकारी सैन्याचा पराभव झाला, व प्रेसिडेंट कॉर्डेरोला आपलें पद सोडून देशत्याग करावा लागला.

जनरल अल्फॅरोनें राष्ट्राच्या डिक्टेटरचे अधिकार धारण करून ते १८९७ पर्यंत चालविले; यानंतर त्याला प्रेसिडेंट निवडण्यांत आलें. धर्माधिकाऱ्यांच्या कारस्थानामुळे कांहीं बंडें झालीं. अल्फॅरोनें धर्माधिकाऱ्यांचें वजन कमी केलें. १९०१ मध्यें त्यानें जनरल प्लाझाला प्रेसिडेंटच्या जागेचा ताबा दिला.

प्लाझानें धर्माधिकाऱ्यांच्या विरुद्ध धोरण स्वीकारलें. लग्नांची व घटस्फोटांची नोंदणीपद्धति सुरू केली, व १९०४ मध्यें सर्व धर्म समतेच्या पायावर ठेवण्यांत आले, नवीन मठ वगैरे स्थापन करण्याची बंदी करण्यांत आली. धार्मिक मालमत्ता राष्ट्रीय ठरविण्यांत येऊन जास्त पैसे देणारांस पट्ट्यानें दिली जात असे. १९०५ मध्यें लिझॅरो गार्सियाला प्रतिपक्षानें प्रेसिडेंट बनविलें परंतु अल्फॅरोनें गार्सियाला हांकून देऊन आपण स्वतः डिक्टेटर झाला.

या देशाचा अर्वाचीन इतिहास मि० आर्चर हार्मन अमेरिकन रेल्वे बांधणार याच्या कामाचा उल्लेख केल्याशिवाय पूर्ण होणार नाहीं. याच्या कर्तबगारीमुळें ग्वायाक्विल क्विटो-रेल्वेचें काम सुरू झालें. यानें इक्वेडोरची जमाबंदी पूर्णपणें सुधारली व देशाच्या अंतर्गत समृद्धीवर याचा बराच इष्ट परिणाम झाला.

अल्फॅरो याची मुदत १९११ सालीं संपली. त्याच्या मागून एमिलियो इस्ट्राडा याची निवडणूक झाली. पण थोडक्याच दिवसांत तो मरण पावला. पुन्हां निवडणूक होईपावेतों, कार्यकारी मंडळाचा अध्यक्ष डॉ. कॅर्लोस फ्रील यानें अध्यक्षपद स्वीकारिलें. या अवधींत, पुन्हां अलफॅरो हा निवडून यावा यासाठीं लोकांनीं बंड केलें पण त्याचा मोड झाला. पण या बंडांत फ्रील हा मारला गेला. त्याच्या मृत्यूनंतर, डॉ. फ्रॅन्सिस्को अँड्रेड मॅरिन हा अध्यक्ष झाला. पण तोहि फार दिवस टिकला नाहीं. पुढें पुन्हां खास निवडणूक होऊन, जनरल लिओनिडस प्लाझा हा दुसऱ्यांदा अध्यक्ष म्हणून निवडला गेला. याच्या कारकिर्दीतील पहिलें वर्ष फार धामधुमीचे गेलें. पुढें तीन वर्षांनंतर पुन्हां निवडणूक होऊन, १९१६ मध्यें आलफ्रेडो बॅक्वेरिझो हा अध्यक्षपदावर विराजमान झाला. महायुद्धामुळें आर्थिक दृष्ट्या ज्या अडचणी उद्भवल्या होत्या त्या कमी करण्याचा बॅक्वेरिझो यानें प्रयत्न केला. ऑगस्ट १९२० मध्यें बॅक्वेरिझो याची मुदत संपल्यामुळें त्यानें राजीनामा दिला, व त्याच्या जागीं डॉ. जोसे टॅमायो याची निवडणूक झाली.

महायुद्ध सुरू झाल्याबरोबर, इक्वेडोरियन सरकारनें, आपण या युद्धांत अगदीं तटस्थ रहावयाचें ठरविलें आहे, अशा अर्थाचा जाहीरनामा प्रसिद्ध केला. पण जर्मनांचीं जहाजें इक्वेडोरनें आपल्या बंदरांत येऊं दिलीं व तटस्थपणाचा भंग केला अशी इंग्रज व फ्रेंच यांनीं कुरकूर केली. तेव्हां एलिझाल्डे या प्रधानानें, आपल्या कृत्याचें समर्थनपर असें पत्र अमेरिकेकडे रवाना केलें. त्यानंतर प्लाझा यानें इक्वेडोर येथें येणाऱ्या, जहाजांतील लोकांनीं कशा प्रकारें वागलें पाहिजे याबद्दल नियम प्रसिद्ध केले. पेरु येथें

असलेला जर्मन परराष्ट्रमंत्री व्हॉन् पर्ल यानें लिमाहून क्विटो येथें जाण्याचें ठरविलें. अर्थात आपलें स्वागत इक्वेडोर सरकारला करावें लागेल अशी त्याची कल्पना होती, पण या महायुद्धाच्या वेळीं, तटस्थ वृत्तीला अनुसरून आपलें स्वागत करितां येणार नाहीं, असें इक्वेडोर सरकारनें त्याला कळविलें, यामुळें जर्मनीला राग येऊन, तिनें इक्वेडोरशीं असलेला स्नेहसंबंध तोडून टाकला.

[ संदर्भग्रंथः—एन्सायक्लोपिडिया ब्रिटानिका; अॅन्युअल रिपोर्ट ऑफ दि कौन्सिल ऑफ कॉर्पोरेशन, ऑफ फॉरिन बॉंड होल्डर्स ( लंडन १९१० ). मंथली बुलेटिन ऑफ दि इंटरनॅशनल ब्यूरो ऑफ दि अमेरिकन रिपब्लिक्स ( वॉशिंगटन १९१० ). पॅन अमेरिकन यूनियन, इक्वेडोर जनरल डिस्क्रिप्टिव्ह डेटा ( वॉशिंग्टन १९०९ ); प्रोसीडिंग्स ऑफ दि फर्स्ट पॅन् अमेरिकन फायनॅन्शिअल कॉन्फरन्स ( वॉशिंग्टन १९१५ ). दि रॉकेफेलर फॉऊंडेशन अन्युअल रिपोर्ट ( न्यूयॉर्क १९१६ ) ]

**इगतपुरी**, तालुका.—( मुंबई इलाखा ) ह्या इगतपुरी तालुका नाशिक जिल्ह्यांत आहे व त्याचें क्षेत्रफळ ३९३ चौ. मैल आहे. ह्या तालुक्यांत इगतपुरी मुख्य शहर व इतर १२८ खेडीं आहेत. सन १९११ सालीं ह्या तालुक्याची लोकसंख्या ७८८१४ होती. दक्षिणेकडील व वायव्येकडील भाग डोंगराळ मुलुख आहे. इशान्य व दक्षिण ह्या भागांत झाडी बरीच कमी आहे. व एकंदरींत जमीन नापीक व पोकळ आहे. ह्या जिल्ह्यांतील हवा थंड व निरोगी आहे. व सगळ्या वर्षांत पाऊस १३३ इंच पडतो.

शहर.—हें शहर इगतपुरी तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. व तें नाशिक पासून ३५ मैलांवर व मुंबईपासून ८५ मैलांवर आहे. हें शहर थळ घाटाच्या टोकांवर असून समुद्राच्या सपाटीपासून १९९२ फूट उंच आहे. व हें शहर लष्करी फौजेचें ठिकाण आहे. लोकसंख्या ( १९११ ) ८३८०. ह्या शहराजवळ पिंप्री येथें सादुद्दिन बोवाचें थडगें आहे. व ह्या थडग्याचें दर्शन घेण्यास पुष्कळ लोक जातात. तीन मैलांवर असलेल्या त्रिंगलवाडी येथें एक किल्ला, लेणी व श्रीब्रह्मदेवाचें मोडकें देऊळ आहे. ह्या शहराला म्युनिसिपालिटी असून तिचें उत्पन्न सन १९०३ सालीं ९००० रुपये होतें. ह्या शहरांत ५ इंग्रजी शाळा आहेत व दोन दवाखानें आहेत.

**इंगर**—( मध्यप्रांत ) जिल्हा चांदा. रांगी जमीनदारींत रांगीच्या उत्तरेस सुमारें चार मैलांवर आहे. येथें एक प्राचीन देऊळ असून त्यांत महादेव, राधा, कृष्ण, गणपती आणि अन्नपूर्णा यांच्या मूर्ति आहेत. सुमारें ३० वर्षांपूर्वी हें देऊळ पडलें तथापि देवळाचे खांब बहुतेक उभे आहेत. [ चांदा डि. गॅ. ]

**इंगरसॉल, रॉबर्टग्रीन**—( १८३३–१८९९ ) हा अमेरिकन कायदेपंडित व वक्ता ड्रेस्डेन येथें ता. ११ ऑगस्ट १८३३ इ. रोजीं जन्मला. याचें शिक्षण झाल्यावर इंगरसॉलनें कायद्याचा अभ्यास केला व तो यशस्वीपणें आपला धंदा करूं लागला. या नंतर कांहीं काल त्यानें लष्करी नोकरींत घालविला. पुढें तो इलिनॉइस येथील अटर्नी–जनरल झाला. १८७६ सालीं जेम्स जी. ब्लेन याचें नांव अध्यक्षपदाकरितां सुचवितांना त्यानें लोकसत्ताक राष्ट्रीय परिषदेपुढें जे भाषण केलें त्या भाषणानें उत्कृष्ट वक्ता म्हणून त्याची सर्वत्र ख्याती झाली. कायदेपंडित म्हणूनहि इंगरसॉलची प्रसिद्धि होती. त्याचीं मतें ख्रिस्ती धर्माच्या विरुद्ध असल्यामुळें तो राजकारणांत यावा तितका पुढें आला नाहीं. त्याच्या भाषणांत तर्कशुद्ध विचारसरणी नसून वक्तृत्वपूर्ण भाषासौंदर्य मात्र भरपूर आढळतें. इंगरसॉल ता. २१ जुलै १८९९ इ. रोजीं डॉब्स येथें मरण पावला. दि गॉड्स अँड अदर लेक्चर्स, ग्रेट स्पिचेस, वगैरे पुस्तकांत त्याचीं भाषणें संकलित केलीं आहेत.

**इंगलगुंडी**—(मुंबईइलाखा) धारवाड जिल्हा. कोडच्या दक्षिणेस सुमारें ८ मैलांवर ५४९ लोकवस्तीचें (इ.स.१८८१) खेडें असून येथील कालेश्वराच्या देवळाजवळील तळ्याच्या कांठावर इ. स. १०४९ सालचा एक शिलालेख असून एक मस्तिकल अथवा सतीचा दगड आहे. त्यावरील साल कोणतें आहे हें वाचतां येत नाहीं.

**इगलास**—इगलास ही एक संयुक्त प्रांतांत अलिगड जिल्ह्यांत पश्चिमेस तहशील आहे. लोकसंख्या(१९०१ सालीं) १,१८,८०३ होती. ह्या तहशिलींत लाफण व रेताड जमीन ह्या दोहींचें मिश्रण आहे. ह्या तहशिलींत पाटबंधारे बिलकुल नाहींत व विहिरींच्या पाण्यानें जमीन फार थोडी भिजूं शकते त्यामुळें शेतीचें फार नुकसान होतें.

**इंगलेश्वरः**—(मुंबई)विजापूर जिल्हा.बागेवाडीच्या ईशान्येस ६ मैलांवर हें एक मोठें खेडें आहे. येथील लोकसंख्या ( १८८१ सालीं ) २४६१ होती.

या खेड्यांत तीन जैन देवळें आहेत. सर्वांत मोठें देऊळ सोमेश्वर देवाचें असून बाकीचीं दोन नारायण व कमलेश्वर यांचीं आहेत. पूर्वी या देवळांतील मूर्ती निराळ्या होत्या असें म्हणतात. सर्व देवळांतून अत्युत्कृष्ट पाषाणशिल्प दृष्टीस पडतें. यांतील शिलालेखांवरून पाहतां हीं शके १०५० त नीळकंठ नाईक यानें बांधलीं असें दिसतें. येथून अर्ध्या मैलावर असणाऱ्या डोंगरांत दोन लेणीं आहेत,त्यांपैकीं एक अक्कानागमनेचें व दुसरें सिद्धेश्वराचें. येथील नारायणाच्या देवळांत दोन व सोमेश्वराच्या देवळांत एक, असे तीन शिलालेख आहेत व ते जुन्या कानडी भाषेंतले असून स्वच्छ वाचतां येण्यासारखे आहेत. यांत देऊळ बांधणाऱ्याचें नांव, तारीख व इनामें लिहून ठेवलीं आहेत. ( मुं. गॅ. विजापूर जिल्हा ).

**इंग्रजी वाङ्मय**—एकंदर इंग्रजी वाङ्मयाचा विचार करण्यास त्याचें खंडशः परीक्षण करणें अधिक सोयीचें असल्यामुळें त्याचे पुढीलप्रमाणें विभाग केले आहेतः—

( १ ) वाङ्मयाच्या उपक्रमापासून चॉसरपर्यंत, ( २ ) चॉसरपासून मध्ययुगाच्या शेवटपर्यंत, ( ३ ) इलिझाबेदन युग, ( ४ ) राजपुनरागमन युग, ( ५ ) अठरावें शतक. ( इंग्रजी वाङ्मय, आणि ) अमेरिकन वाङ्मय ( ६ ) एकोणिसावें शतक, इंग्लंडी, अमेरिकन, अँग्लोइंडियन.

वा ङ्म या च्या उ प क्र मा पा सू न चॉ स र प र्यं त.—ख्रिस्ती काळापूर्वी इंग्रजी वाङ्मय अस्तित्वांत नव्हतें. ख्रिस्ती धर्माचा स्वीकार करण्यापूर्वी इंग्रज लोकांत रोमन वर्णमाला प्रचलित होती कीं, ते आपल्या मूळ भाषेंतील एखादी लिपी वापरीत होते, याचा निर्णय करण्याइतका पुरावा उपलब्ध नाहीं.

वाङ्मयाचा उपक्रम होण्यापूर्वी एका प्रकारच्या काव्यकलेचा बराच विकास झाला होता आणि पुष्कळशी कविता पिढ्यानुपिढ्या चालत आली होती, ही गोष्ट निर्विवाद आहे. ही अलिखित कविता निर्माण करण्याचें श्रेय राजे व सरदार यांस गाऊन दाखविणाऱ्या शाहीरांकडे आहे. जर्मन राजघराण्यांतील धीरवीर पुरुषांचे पराक्रम त्यांत वर्णिले असत. त्या कविता कशा प्रकारच्या होत्या हें आपणांस ' बीवूल्फ ' यांतील उपलब्ध असलेल्या उताऱ्यावरून समजण्यासारखें आहे.

लोकांनीं ख्रिस्ती धर्माचा स्वीकार केल्यानंतर तत्पूर्वीचें वैभव वर्णन करणाऱ्या शाहीरकृतींचा ऱ्हास होत गेला, तथापि पूर्णपणें ख्रिस्तभक्त झाल्यावरहि वोडनच्या वंशजांचा आपल्या पूर्वजांच्या पराक्रमाविषयींचा सर्व अभिमान नष्ट व्हावा, ही गोष्ट शक्य नव्हती. चॉसर यास ' वेडचें गाणें ' माहीत होतें, यावरून जर्मन वीर पुरुषांच्या पराक्रमाचीं वर्णनपर गाणीं गाण्याचा प्रघात चवदाव्या शतकापर्यंत नाहींसा झाला नव्हता हें उघड होतें. तीं गाणीं आज उपलब्ध नाहींत याचें आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. कारण परंपरागत गाणीं किंवा स्वतः रचलेलीं गाणीं कोणी उतरून घेऊं नयेत याविषयीं तत्कालीन शाहीर अगदीं मत्सरपूर्वक काळजी घेत होते, ही गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे. शिवाय प्राचीन हस्तलिखित लिखाण उतरून ठेवण्याचें व जतन करण्याचें काम ज्या ख्रिस्ती पुरोहितांकडे होतें, त्यांच्याकडून ऐहिक विषयपर कवितांचें नीट जतन होणें जवळजवळ अशक्य होतें. वीरश्रीच्या आख्यायिका ज्यांत आहेत अशा चार वर्णनपर काव्यांचे विभाग हल्लीं उपलब्ध आहेतः ( १ ) बिवूल्फ, ( २ ) विडसिथ, ( ३ ) फिनेसबर्ग आणि ( ४ ) वाल्डेर. विडसिथ यांत विशेष काव्यगुण नाहींत परंतु प्राचीन ज्ञानाच्या दृष्टीनें याचें महत्व फार आहे. जर्मन आख्यायिकांत असलेल्या सुप्रसिद्ध राजांचा त्यांत नामनिर्देश असून तें सर्व काव्य ' विडसिथ ' नांवाच्या शाहीराकडून वदविलें आहे. सदर ' विडसिथ 'हा त्या सुप्रसिद्ध राजांच्या दरबारीं गेलेला असून त्यानें आपल्या गायनकलेंतील नैपुण्याबद्दल त्यांजकडून बरींच बक्षिसें मिळविलीं, असाहि त्यांत मजकूर आहे. त्या सुप्रसिद्ध राजांच्या यादींत अर्मनरिक व अल्बॉइन यासारख्या ऐतिहासिक पुरुषांचीं नांवें आहेत. सदर ऐतिहासिक पुरुष अनेक शतकांच्या अंतरानें होऊन गेलेले असून प्रस्तुत काव्यांत ते समकालीन असल्याबद्दल उल्लेख आहे. ' फिनेसबर्ग ' या काव्याच्या हल्लीं उपलब्ध असलेल्या भागांत युद्धाचें सुंदर वर्णन आहे. ' वाल्डेर ' काव्य पांचव्या शतकांत प्रचलित असलेल्या फ्रँकिश व बरगन्डियन आख्यायिकांवर रचलेलें आहे.

जे शाहीर प्राचीन वीरश्रीच्या आख्यायिकांचें वर्णन करीत म्हणून वर सांगितलें आहे, ते आपल्या आश्रयदात्यांच्या व त्यांच्या पूर्वजांच्या पराक्रमांचेंहि वर्णन करीत असत. यावरून ब्रिटनच्या स्वारींतील व डेन्स लोकांच्या झगड्यांतील अनेक प्रसंगांवर त्या काळीं पुष्कळसा काव्यसंग्रह निर्माण झाला असावा. यांपैकीं सांप्रत दोनच नमुने उपलब्ध आहेत आणि ते दोन्ही दहाव्या शतकांतले आहेत. एक ' ब्रुननबूरची लढाई ' व दुसरी ' माल्डनची लढाई '.

इंग्लिश लोकांनीं किती जलद व पूर्णत्वानें ख्रिस्ती संस्कृतीचें ग्रहण केलें, ही एक आश्चर्य करण्यासारखी ऐतिहासिक गोष्ट आहे. ऑगस्टाईन इ. स. ५९७ त इंग्लंडच्या किनाऱ्यावर उतरला व नंतर चाळीस वर्षांतच अल्डेल्म नांवाचा अत्यंत विद्वान आणि त्या काळांतील उत्कृष्ट लॅटिन लिहिणारा एक इंग्लिशमन निर्माण झाला. पुढच्या पिढींत आंग्ल भूमीनें बीड यास जन्म दिला. ज्ञानाच्या भरींवपणांत व विविधतेंत आणि वाङ्मयप्रभुत्वाच्या दृष्टीनें बीडला अनेक शतकेंपर्यंत यूरोपमध्यें कोणी प्रतिस्पर्धी नव्हता. अल्डेल्म व बीड हे त्यांच्या लॅटिन ग्रंथाबद्दल प्रसिद्ध आहेत. परंतु अल्डेल्म यानें देशी भाषेंतहि उत्तम कविता लिहिल्या होत्या असें म्हणतात. सांप्रत उपलब्ध असलेलें प्राचीन इंग्रजी वाङ्मय हें बहुतेक ख्रिस्ती धर्मविषयक आहे. यावरून इंग्लंडांत ख्रिस्ती धर्मावांचून इतर कोणता धर्म कधींच नव्हता असा समज होण्याचा संभव आहे. इतिहासकार या नात्यानें बीड यास मात्र ख्रिस्ती धर्म स्वीकारल्याबद्दलची हकीकत देणें भाग पडलें आहे. ख्रिस्ती धर्मापूर्वीच्या वेडगळ चालीरीति बऱ्याच दीर्घकाळपर्यंत प्रचारांत होत्या, असें तत्कालीन धर्मखात्याच्या कृत्यांवरून आणि अद्याप उपलब्ध असलेल्या त्या वेळच्या कांहीं जादू मंत्रांवरून दिसून येतें. परंतु प्राचीन देवतांची पूजा करण्याचा प्रघात मात्र लवकर नाहींसा झाला. याप्रमाणें ख्रिस्ती धर्मापूर्वीचा इंग्लंडांतील मूळचा धर्म कांहीं एक हकीकत मागें न ठेवतां नष्ट झाला.

प्राचीन इंग्रजी धार्मिक कविता बहुतेक मठामध्यें आणि ख्रिस्ती धर्माशीं व लॅटिन भक्तिविषयक वाङ्मयाशीं परिचित असलेल्या लेखकांनीं लिहिलेली आहे. ' ड्रीम ऑफ दि रूड'

हें काव्य बाजूस ठेवलें तर तत्कालीन काव्यांत कविप्रतिभा दिसून येत नाहीं; तथापि तो काळ लक्षांत घेतला तर आपल्या अपेक्षेपेक्षांहि त्यांत अधिक संस्कृति व सदभिरुचि दिसून येते. त्या काव्यांतील साहित्य व विचार मुख्यतः लॅटिन मूळांतून घेतलेले असून शब्दयोजनेच्या बाबतींत मूळच्या वीरश्रीच्या काव्याचें अनुकरण केलें आहे.

विद्वानांनीं लिहिलेलीं या दृष्टीनें ' एक्झिटर बुकांतील ' कोड्यांचें धार्मिक कवितेशीं बरेंच साम्य आहे, परंतु सदहू कोड्यांवर मूळ इंग्रजी चारित्र्याचा छाप अधिक स्पष्टपणें दिसून येतो. त्यांतील कांहीं कोडीं तर पुराण इंग्रजी काव्यांचे उत्कृष्ट नमुने आहेत. कांहीं कोडीं सूत्रस्वरूपाचीं असून नैतिक व व्यवहारोपयोगी ज्ञान देणारीं आहेत. त्यांतील नीति ख्रिस्ती धर्मांतील आहे परंतु कांहीं शहाणपणाच्या म्हणी ख्रिस्ती धर्माच्या पूर्वकाळापासून परंपरेनें चालत आल्या असाव्यात, असें म्हणण्यास हरकत नाहीं. ' सॉलोमन व सॅटर्न यांच्यांतील संवाद ' हें एक त्याचें उदाहरण आहे. ' हद्‌पार स्त्रीची कहाणी ' पतिसंदेश, प्रवासी हा नाट्यांतील एकपात्री भाषणांचा समुच्चय, हा पुराणइंग्रजी काव्याचा एक विशिष्ट व मनोवेधक भाग आहे. सदरहु समुच्चय कधीं रचण्यांत आला असावा, हें निश्चयानें सांगतां येत नाहीं, तरी ज्याअर्थी तो एक्झिटर बुकांत दिलेला सांपडतो, त्याअर्थी त्याची रचना दहाव्या शतकाच्या पूर्वी झालेली असावी.

जरी इंग्रजी काव्याचा उगम इंग्लंडांत ख्रिस्तीधर्माचा प्रवेश होण्यापूर्वी बराच दूर काळपर्यंत नेतां येतो, तरी इंग्रजी गद्याचा खरोखरीचा उपक्रम ऑल्फ्रेडच्या कारकीर्दींत झाला असें म्हटलें पाहिजे. यावरून यापूर्वी कोणत्याच प्रकारचें गद्य नव्हतें असें नाहीं; परंतु बाराव्या शतकांत उतरून ठेवलेलें लिखाण पाहिलें तरी, त्याच्या अप्रगल्भ व त्रुटित लेखन पद्धतीवरून त्याच्या अतिप्राचीनत्वाची साक्ष पटते. अशा रीतीनें सातव्या शतकाच्या प्रारंभापासून नवव्या शतकाच्या गद्यापर्यंत जरी बरेंच इंग्रजी गद्य प्रसिद्ध झालें असलें तरी वाङ्मय या सदरांत पडण्यासारखे ग्रंथ लिहिण्यास लॅटिन हीच एक योग्य भाषा आहे, अशी त्या वेळीं लोकांची समजूत होती आणि अल्डेल्म व बीड यांच्या वेळीं जसे लेखक विद्वान होते, तसेच ते पुढें होत जाते तर, इंग्रजी गद्य ग्रंथ निर्माण होण्याचा काळ आणखी लांबला असता.

ज्या ग्रंथाचीं आल्फ्रेडनें व त्यानें नेमलेल्या लेखकांनीं भाषांतरें केलीं त्यांपैकीं " सेंट ग्रेगरीचें पॅस्टोरल केअर " व ' डॉयलॉग्ज ' हे ग्रंथ उघड उघड उपाध्येमंडळीस उद्देशून लिहिले आहेत. इतर भाषांतरें जरी सर्वसामान्य वाचकांकरितां केलीं असलीं तरी तीं सर्व धार्मिक स्वरूपाचीं आहेत. आल्फ्रेडनें भाषांतरांखेरीज अगदीं स्वतंत्र ग्रंथरचनाहि केलेली आहे.

आल्फ्रेडची वाङ्मयविषयक अन्य कामगिरी म्हटली म्हणजे त्याचे कायदे आणि त्यानें सुरू केलेली अँग्लोसॅक्सन बखर ही होय. आल्फ्रेडनंतरची पुराण इंग्रजी गद्य ग्रंथरचना सर्वस्वी पुरोहितवर्गानें केलेली आहे. वर सांगितलेल्या बखरीव्यतिरिक्त त्या वेळचें इतर सर्व वाङ्मय लॅटिनची भाषांतरें, धार्मिक प्रवचनें आणि संतचरित्रें यांनीं भरलेलें आहे. शब्देतिहास दृष्टीनेंच काय तें त्याचें महत्त्व आहे. हेंच म्हणणें ऑल्फ्रेडच्या ग्रंथरचनेसहि लागू आहे.

फ्यूरीचा ॲबो याचा शिष्य बिर्टफर्थ मठाधिपति यानें अकराव्या शतकाच्या प्रारंभीं एक विश्वज्ञानात्मक लहानसें पुस्तक लिहिलें. त्यांत कालगणनाशास्त्र, ज्योतिष्शास्त्र, गणितशास्त्र, छंदःशास्त्र, साहित्यशास्त्र व नीतिशास्त्र या सर्वांचा सारांशच दिलेला आहे;परंतु पुस्तकाच्या एकंदर रचनेवरून ग्रंथकर्त्याची बुद्धिमत्ता दिसून येते. औषधी वनस्पतींचे गुणधर्म इत्यादि विषयांवरचे त्या वेळचे ग्रंथ लॅटिन ग्रंथांतील उताऱ्यावरून तयार केलेले आहेत. या ग्रंथांतून जे स्वतंत्र विचार प्रदर्शित केले आहेत, त्यावरून शास्त्रीय माहितीपेक्षां त्या वेळच्या समजुती किती वेडगळ होत्या याची माहिती मिळते.

ज्यांचा यूरोपच्या वाङ्मयावर बराच परिणाम घडला होता, त्या अपोलियस ऑफ टायर ( टायरचा आपोलिअस ) आणि लेटर ऑफ अलेक्झांडर ( अलेक्झांडरचें पत्र ) या नांवाच्या दोन लॅटिन कादंबऱ्यांचें अकराव्या शतकांत इंग्रजींत भाषांतर झालें. त्याच वेळेस "दि वंडर्स ऑफ दि ईस्ट" (पूर्वेकडील चमत्कार) या नांवाचें एक चोपडेंहि प्रसिद्ध झालें. या सर्व ग्रंथरचनेवरून इंग्रज लोकांचीं मनें आतां धार्मिक विषय सोडून इतर विषयाकडे वळलीं होतीं, असें दिसून येतें.

नॉर्मन लोकांच्या स्वारीनंतर इंग्रजी मठांत परदेशीय लोकांची गर्दी झाल्यामुळें मूळच्या इंग्रजी वाङ्मयाच्या विकासास बराच मोठा अडथळा उपस्थित झाला. थोड्याच वेळांत मठांच्या शाळेंत शिकणाऱ्या मुलांनीं मूळ भाषेंतून लेखनवाचन शिकण्याचें सोडून दिलें,व तीं फ्रेंच भाषेंतून लेखनवाचन शिकूं लागलीं. बारावें शतक हा अँग्लो लॅटिन वाङ्मयाच्या इतिहासांतला मोठा उज्ज्वल काळ असून त्यांत फ्रेंच भाषेंत लिहिलेली बरीच महत्त्वाची ग्रंथरचना झाली; परंतु मूळ देशी भाषेंतील ग्रंथरचना फारच अल्प होती आणि स्वतंत्र विचाराची तर मुळींच नव्हती, असें म्हटलें तरी चालेल. ह्या वेळेपासून चॉसरच्या वेळेपर्यंत लोकांस धार्मिक शिक्षण देण्यापलीकडे देशी भाषेचा दुसरा कांहीं उपयोग झाला नव्हता. या काळांत राष्ट्राचा बौद्धिक विकास कसा झाला, हें समजून घ्यावयाचें असेल, तर लॅटिन भाषेंत झालेल्या ग्रंथरचनेकडे पाहिलें पाहिजे. तेराव्या शतकाच्या प्रारंभीं प्रसिद्ध झालेल्या ॲक्रेनरिवले नांवाच्या पुस्तकांत भिक्षुणींस उपदेश केलेला आहे. सदरहु पुस्तकांत ग्रंथकर्त्याच्या ठिकाणची प्रतिभा चांगल्याच रीतीनें दृष्टीस पडते व तें त्यांतील मजकुराच्या धोरणाच्या दृष्टीनेंहि फार मनो-

वेधक आहे. ग्रंथकर्त्याचें भाषाप्रभुत्व जरी इतक्या उच्च दर्जाचें होतें, तरी त्याची संस्कृति इंग्लिश पद्धतीची नसून फ्रेंच पद्धतीची होती. चवदाव्या शतकाच्या प्रारंभीं रिचर्ड रॉलेचे आणि त्याच्या सांप्रदायिकांचे ग्रंथ बरेच लोकप्रिय झाले. पुढील काळांतील धर्मविचार व गद्यलेखनपद्धति यांच्यावर त्या ग्रंथांचा जितका परिणाम झाला तितका दुसऱ्या कशानेंहि झाला नाहीं.

नार्मन लोकांच्या स्वारीमुळें मूळ भाषेंतील गद्यलेखनाच्या विकासांत जसा खंड पडला तसा तो पद्यरचनेच्या विकासांतहि पडला. जुन्या कवींची जुनी भाषा समजेनाशी झाल्यामुळें बाराव्या शतकाच्या उत्तरार्धांतील व तेराव्या शतकांतील कवींवर त्यांच्या काव्यांचा कांहीं एक परिणाम झाला नाहीं. तेराव्या शतकांतील कवितेवर फ्रेंच काव्यांचा परिणाम झाल्याशिवाय राहिला नाहीं. इ. स. १३०० च्या सुमारास इंग्लंडच्या निरनिराळ्या विभागांत बरीच संतचरित्रात्मक व धर्मप्रवचनपर कविता निर्माण झाली. बाराव्या शतकाच्या प्रारंभापासून ज्या फ्रेंच अद्भुत रसात्मक काव्य पद्धतीचा अंमल सर्व यूरोपखंडभर चालू होता त्याचा इ. स. १२५० पर्यंत इंग्लंडच्या काव्यरचनेवर कांहीं परिणाम झाला नाहीं. त्या पुढील शंभर वर्षांत मात्र इंग्लंडमध्यें त्या काव्यपद्धतीचा प्रसार विलक्षण जोरानें झाला.

चवदाव्या शतकाच्या पूर्वार्धांत इंग्लंडमध्यें जो वाङ्मयाचा विस्तार झाला व त्याचें जें स्वरूप दृष्टीस पडलें, त्यावरून देशी भाषेची अनास्था कमी होऊन तिच्यांत पुष्कळसें वाङ्मय उत्पन्न होण्याची चिन्हें स्पष्टपणें दिसूं लागलीं. मध्यम व उच्च वर्गांतील लोकांच्या व्यवहारांत फ्रेंच भाषेचा अनुपयोग सुरू झाल्यापासून आणि शाळांतून फ्रेंचच्या जागीं इंग्रजी भाषेची प्रस्थापना झाल्यापासून इंग्रजी ग्रंथसमूहाची उणीव भासूं लागली. ही उणीव भरून काढण्याकरितां जरी केवळ परभाषेंतील ग्रंथांचीं भाषांतरें व रूपांतरें निर्माण झालीं तरी त्या योगानें देशांत रसिकता व या पुढील काव्यनिर्मिति यांची भूमिका तयार झाली.

( २ ) चॉसरपासून यूरोपांतील विद्या व कला यांच्या पुनरुज्जीवनापर्यंत—चॉसरच्या वेळेस जी उत्तम व विस्तृत ग्रंथरचना झाली तिच्यामुळें निकट काळावरच केवळ नव्हे तर भविष्यकाळच्या वाङ्मयावर जो परिणाम झाला त्यामुळें चॉसरचें युग अत्यंत महत्त्वाचें आहे. चॉसर ( इ. स. १३४० –१४०० ) हा प्रथम कांहीं काळपर्यंत फ्रेंच काव्यांचें अनुकरण करणारा, व केवळ कुशल पद्यरचना करणारा कवि होता. त्याच्या पद्यरचनेचीं तींच तींच ठराविक साधनें असून तिची तऱ्हाहि तितक्याच ठराविक स्वरूपाची होती. शेकडों वर्षें राजदरबारी कवींनीं सूर्यास्त, गाणारे पक्षी, सुंदर ललना व त्यांचे प्रियकर यांचीं मधुरमीलनें यांविषयीं ज्या पद्धतीनें व ज्या भाषेंत वर्णनें केलीं आहेत, त्याच पद्धतीनें व त्याच भाषेंत चॉसर कवीनेंहि केलीं. यावेळींहि त्याच्या कवितेंत सत्यसृष्टींतील जिवंत प्राण्यांच्या सूक्ष्म व सप्रेम निरीक्षणाची, लंडनच्या सभोंवार असलेल्या उद्यानांतील व शेतांतील रंगीबेरंगी व सुगंधित पुष्पांच्या वर्णनांची आणि रानावनांत सुस्वर आलाप काढणाऱ्या पक्ष्यांची कल्पना देणाऱ्या पद्यरचनेची उणीव नव्हती. तथापि त्याची काव्यरचना व त्या काळची फ्रेंच काव्यरचना यांत फारसा फरक दिसून येत नाहीं. परंतु ज्यावेळीं तो तसल्या प्रकारच्या काव्यरचनेंत निष्णात होण्याची खटपट करीत होता, त्यावेळीं इटलींतील नवीन पद्धतीच्या गद्यात्मक व पद्यात्मक वाङ्मयाशीं त्याचा परिचय झाला. या नवीन पद्धतीच्या काव्यरचनेंत फ्रेंच काव्यांत दृष्टीस पडणारी अद्भुतरसाची व असत्य सृष्टीची ठराविक रीतच जरी प्रचलित होती तरी ती नवीन पद्धत अधिक व्यापक स्वरूपाची, अधिक जोमदार व अधिक भावनाप्रचुर होती. काव्याप्रमाणेंच नवीन पद्धतीचें गद्यहि पूर्वीच्या गद्याहून अगदीं भिन्न स्वरूपाचें होतें. या नवीन पद्धतीच्या गद्याशीं बोकॅशिओच्या लेखांवरून चॉसरचा परिचय झाला. त्याच्या लेखनपद्धतीवर या सर्वांचा परिणाम झाला आणि त्यामुळें त्याची वर्णन करण्याची शैली सर्वस्वी नवीन वळणावर गेली. चॉसरच्या लेखनपद्धतीवर जो हा परिणाम झाला तो फ्रेंच पद्धतीपेक्षां इटॅलिअन पद्धत अधिक चांगली होती म्हणुन नव्हे तर त्या दोन पद्धतींत जो फरक होता त्यायोगानें चॉसरच्या विचारास जी चालना मिळाली त्यामुळें घडून आला. चॉसर हा कसातरी यदृच्छेनें झालेला निष्काळजी कवि नसून सुंदर शब्दयोजना, उदात्त कल्पना, निरनिराळ्या प्रसंगांची व्यवस्थित जुळणी इत्यादि गोष्टींकडे विचारपूर्वक लक्ष देणारा होता. यामुळें त्याचा सर्वोत्कृष्ट ग्रंथ जो ' कँटरबरी टेल्स ' (कँटरबरी कथा) त्यांत इतके उत्तमोत्तम गुण दिसून येतात कीं, त्याची लेखनपद्धति अगदीं निर्दोष वाटूं लागते. सुबकपणा, साधेपणा, भारदस्तपणा इत्यादि गुणांनीं युक्त व विषयाला साजणारी त्याची भाषापद्धति केवळ नमुनेदार आहे. त्याची पद्यरचना बिनचुक आहे. इतकेंच नव्हे तर ती सुश्राव्य व विविध आहे.

आपल्या कलेंत निष्णात असलेला असा त्या काळचा चॉसर हा एकटाच लेखक नव्हता. गॉवर हा बराच विद्वान व बुद्धिवान होता तरी, त्याच्या ठिकाणीं पहिल्या प्रतीची काव्यप्रतिभा व कौशल्य या दोहोंचाहि अभाव होता. सुबकपणा व सुबोधपणा हे अत्युत्तम गुण जरी त्याच्या ग्रंथांत प्रामुख्यानें दृष्टीस पडतात तरी वाच्यार्थापलीकडचा व्यंगार्थ सुचविणारी व त्यामुळें वाचकांच्या मनांतील भावना प्रदीप्त करणारी शब्दयोजना जी महाकवींच्या कृतींत दिसून येते, तिचा त्याच्या ग्रंथांत अभाव आहे.

याशिवाय त्यावेळीं अनेक कुशल कवि होऊन गेले. परंतु आपणांस विशेष विचार करण्यासारखा मुद्दा म्हटला

म्हणजे कोणत्या कवींत किती काव्यप्रतिभा होती हा नसून कोणत्या ग्रंथकारांनीं आपल्या कलेंत क्रांति घडवून आणण्यासारखे शोध लावले हा आहे. कारण काव्यप्रतिभा ही ज्याच्या त्याच्या बरोबर निघून जाते, परंतु लेखन कलेंतील क्रांतिकारक नवीन शोध मागून होणाऱ्या सर्व ग्रंथकारांस उपयोगी पडण्यासारखे असतात. जसे मार्लोनें शोधून काढलेली निर्यमक काव्यपद्धति, पोपनें उपयोगांत आणलेली यमकप्रचुर काव्यपद्धति, ग्रेची संबोधनात्मक लघुकाव्यपद्धति आणि पोनें जिचा प्रघात पाडला ती संक्षिप्तकथापद्धति या सर्वांचा उपयोग मागून झालेल्या कवींस करतां आला अशा तऱ्हेचे शोध चॉसरनें किंवा त्याच्या समकालीन कवींनीं लावले नाहींत.

तथापि चॉसरच्या लेखनाचा परिणाम बराच व्यापक व दीर्घकाळ टिकणारा झाला. दरबारी किंवा उच्च प्रतीच्या कवींच्याच केवळ नव्हे तर अगदीं हलक्यासलक्या कवींच्या कृतींतहि त्याच्या लेखनाचें अनुकरण केलेलें आढळून येतें. लिडगेट, हाक्लीव्ह व हावीस हे चॉसरचे मुख्य अनुयायी होते. हाक्लीव्हची लेखनशैली लिडगेट इतकी आवेशाची नव्हती. तो स्वभावानें शांत परंतु अधिक विनोदी व अधिक कल्पक होता.

लिडगेटचें ग्रंथकर्तृत्व बरेंच विस्तृत आहे. कवी या नात्यानें त्याची ख्याति मोठी असल्यानें अनेक निनांवी कविता त्याच्या नांवावर विकल्या जात होत्या. त्या सर्व वजा केल्या तरी त्याची काव्यसंख्या आश्चर्य करण्याइतकी मोठी आहे. त्याच्या काव्यासंबंधानें साधारणपणें असें म्हणतां येईल कीं त्याची भाषांतर स्वरूपाची कविता वीररसप्रधान असून स्वतंत्र कविता प्रेमविषयक व उपदेशपर आहे. त्याच्या ग्रंथांतील किंवा त्या काळच्या एकंदर वाङ्मयांतील मोठा दोष म्हटला म्हणजे ग्रंथकारानें जें जें कांहीं पाहिलें, ऐकलें किंवा वाचलें असेल, त्याचा त्याच्या मनावर काय परिणाम झाला; व त्यापासून त्याच्या मनांत काय विचारलहरी उत्पन्न झाल्या, त्या आपल्या काव्यांत न आणतां केवळ पाहिलेल्या, ऐकलेल्या किंवा वाचलेल्या गोष्टी उगीच थोड्या फरकानें आपल्या काव्यांत मांडणें हा होय.

या दोन लेखकांनंतर स्टीफेन हावीस उदयास आला, पण त्याचें लेखन त्यांच्या इतक्याहि दर्जाचें नाहीं. तो चॉसरचा अनुयायी होता असें म्हणण्यापेक्षां लिडगेटचा होता असें म्हटलें तर अधिक शोभेल. परंतु लिडगेटच्या लिहिण्यांतून जो कुठें आवेश व कुठें करुणरस दृष्टीस पडतो तोहि त्याच्या लेखनांत नसून लिडगेटचे दोष मात्र अधिक प्रमाणांत दिसून येतात.

आतांपर्यंतच्या कवींत कल्पनाशक्ति व काव्यप्रतिभा यांचा अभाव दिसून येतो. यामुळें त्यांच्याकडून चांगली कविता निर्माण होऊं नये हें साहजिक आहे. परंतु या काळांत चांगलीं व बुद्धिवान माणसें वाङ्मयाकडे कां लक्ष देत नव्हतीं हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे. कदाचित् त्यावेळीं चालू असलेल्या युद्धामुळें किंवा लोकांचें लक्ष औद्योगिक प्रगतीकडे लागल्यामुळें देशांतील तरुणांचें लक्ष वाङ्मयाकडे जात नसावें हें संभवनीय दिसतें. परंतु वरील प्रश्नाचा खात्रीपूर्वक निर्णय करतां येण्यासारखा नाहीं.

चॉसरचे अनुयायी प्रतिभावान नव्हते हें जरी मान्य केलें तरी त्यांनां चॉसरचें अनुकरणहि नीटपणें करितां येऊं नये ही आश्चर्याची गोष्ट आहे. लेखक या नात्यानें चॉसरच्या अंगीं काय काय गुण होते व त्या गुणांचा त्याच्या पुढच्या पुढच्या ग्रंथांत कसकसा विकास होत गेला, हें त्याच्या लक्षांत आलें नाहीं, इतकेंच नव्हे तर त्यानीं त्याचे पहिले पहिलेच ग्रंथ पसंत केले व त्यांचेंच अनुकरण केलें.

मध्ययुगामध्यें इंग्लंडांत कांहीं स्त्रीलेखिका होऊन गेल्या. इ. स. १४०० च्या पूर्वी नॉरविचच्या ज्युलिआनानें "रिव्हेलेशन्स ऑफ डिव्हाईन लव्ह" या नांवाचें पुस्तक लिहिलें. त्याचप्रमाणें डेम ज्युलिआना बर्नरस इनें "बुक ऑफ सेन्ट आल्बान्स" नांवाच्या ग्रंथांत मृगयेवर निबंध लिहिला. शेवटीं सातव्या हेन्रीची आई मारगरेट ही विद्वान लोकांस व लेखकांस मदत करीत असे. इतकेंच नव्हे तर, तिनें स्वतः "इमिटेशिओ ख्रिस्ती" या ग्रंथाच्या चवथ्या पुस्तकाचें भाषांतर केलें. मारगरेट नांवाच्या दुसऱ्या एका बाईनें कॅक्स्टन यास त्याच्या भाषांतराच्या व छापण्याच्या कामीं उत्तेजन दिलें. यावरून त्याकाळच्या स्त्रिया पुस्तकांच्या चहात्या व लेखकांच्या आश्रयदात्या होत्या असें दिसतें आणि स्केल्टन याच्या 'गार्लेंड ऑफ लॉरेल' या ग्रंथावरून त्याच्या भोंवती स्त्रियांचा घोळका जमत असे, असें दिसून येते. मध्ययुगांतील स्त्रिया या शिवायहि अनेक गोष्टींत निष्णात होत्या. वैद्यक, न्याय व धर्म या बाबतींतहि त्या भाग घेत होत्या.

पंधराव्या शतकांतील अगदीं स्वतंत्र व जोरदार कविताहि सामान्य स्वरूपाची व सामान्य लोकांकरितां लिहिलेली असून तिच्यांत विशेष कौशल्याचा भाग नाहीं. ही कविता तीन प्रकारची आहे. (१) गीतें (२) पोवाडे आणि (३) नाटकें. कांहीं गीतें व्यावहारिक विषयावर आहेत. तर कांहीं धार्मिक विषयावर आहेत. पंधराव्या शतकांत रचल्या गेलेल्या गीतांपैकीं शेंकडों गीतें नष्ट झालीं असतील. कांहीं गीतें कांहीं काळ प्रचलित राहून तीं लिहून ठेवण्याइतकीहि कोणी काळजी घेतली नाहीं. परंतु सुदैवानें थोडीं गीतें अजून उपलब्ध आहेत आणि तीं पाहिलीं म्हणजे त्याकाळीं इतकी सुंदर गीतरचना झाली याचें कौतुक वाटतें.

गीतांप्रमाणें पोवाडेहि फार प्राचीन काळापासून प्रचलित आहेत. परंतु समाजाच्या एखाद्या अवस्थेंतील त्याच्या व्यक्तींचें सर्व साधारण ज्ञान, त्यांच्यांतील आख्यायिका व त्यांच्या भावना हीं सर्व व्यक्त करणारे पोवाडे मागाहून

शिल्लक रहातात असें समजणें चुकीचें आहे. तसेंच पोवाडे म्हणजे अवनत स्थितींतील अद्भुतरसात्मक गीतें असा अर्थ करणेंहि चुकीचें होईल. कारण पंधराव्या शतकांतील कांहीं पोवाड्यांत अतिप्राचीन आख्यायिका व सामाजिक गीतनृत्यांचे ठराविक भाग आणि विशिष्ट पद्धति दिलेल्या आढळतात. पंधराव्या शतकानंतर पोवाड्यांचें सामाजिक स्वरूप जाऊन त्याच्या जागीं आख्यायिका आणि ठराविक व विशिष्ट पद्धति यांच्या अनुरोधानें पोवाड्यांची रचना होऊं लागल्यानें त्याला वैयक्तिक स्वरूप प्राप्त झालें. याप्रमाणें फार प्राचीन काळच्या युद्धांचें, विश्वासघातांचें व आकस्मिक दुःखांचें वर्णन त्यांत येत गेल्यानें श्रोत्यांच्या भावना उद्दीपित करण्यास पोवाडा हें एक उत्तम साधन झालें. ज्याच्या योगानें पोवाडा रचणाऱ्या शाहीराच्या कल्पना व भावना प्रदीप्त होतील, अशा तऱ्हेचें कथानक शोधून काटलें म्हणजे तें कथानक पद्यरचनेंत गोवण्या पलिकडे त्या शाहीराचें कार्य शिल्लक रहात नसे. तथापि एकंदर इंग्रजी वाङ्मयाच्या इतिहासाचा विचार करितां पंधराव्या शतकांत उत्तम पोवाडे रचले गेले असें म्हटलें पाहिजे.

पंधराव्या शतकांत साधे, वीरश्रीचे व वर्णनात्मक पोवाडे निर्माण झाले इतकेंच नव्हे तर कांहीं वीरश्रीच्या पोवाड्यांचें नाटकांत रूपांतर करण्यांत आलें. अशा रीतीनें किती पोवाड्यांचें नाटकांत रूपांतर झालें, हें नक्की सांगतां येण्यासारखें नाहीं. परंतु उपलब्ध असलेल्या माहितीवरून त्यावेळीं असा सर्व साधारण प्रघात होता, असा तर्क करण्यास जागा आहे. अशा प्रकारचीं तीनच नाटकें हल्लीं उपलब्ध आहेत व तीं तिन्ही रॉबिन हुडसंबंधानें आहेत. या नाटकांखेरीज नाताळच्या सणांत ज्यांचे प्रयोग करण्यांत येत असत, अशीं नाटकें पंधराव्या शतकांत उदयास आलीं. त्यानंतर धार्मिक नाटकें किंवा पौराणिक खेळ करण्याची पद्धत सुरू झाली. त्याचप्रमाणें नैतिक नाटकें करण्याचा उगमहि पंधराव्या शतकांत झाला.

धार्मिक व नैतिक नाटकांखेरीज पंधराव्या शतकांत कांहीं अद्भुत नाटकेंहि रचण्यांत आलीं. अद्भुत नाटकांत साधुसंतांचीं चरित्रें धर्माच्या बाबतींत त्यांनीं सोसलेले छळ आणि त्यांनीं केलेले चमत्कार यांचें वर्णन असे.

पंधराव्या शतकांत जर चांगलें पद्यहि निर्माण झालें नाहीं, तर चांगलें गद्य झालें नाहीं यांत आश्चर्य करण्यासारखें काय आहे? चॉसरनें गद्याकडे विशेष लक्ष दिलें नाहीं. विक्लिफची लेखनपद्धति अवजड होती आणि मँडेव्हिलेचे भाषांतरकार–लेखक यांनीं उत्तम भाषांतर करण्यापलीकडे कांहीं केलें नाहीं. पंधराव्या शतकांत बरेंच गद्य लिहून झालें, परंतु तें मुख्यत्वेंकरून धार्मिक व शैक्षणिक विषयासंबंधीं होतें. जॉन कॅप्ग्रेव्ह, रेजिनॉल्ड पीकॉक, सर जॉन फॉर्टेस्क्यू, कॅक्स्टन व मलोरी हे त्यावेळचे प्रमुख गद्यलेखक होते. कॅप्ग्रेव्ह हा पहिला इंग्रजी गद्यलेखक होता, परंतु त्याचा सर्व कल लॅटिनमध्यें लिहिण्याकडे होता. लॅटिन न समजणाऱ्याकरितां तो कधीं इंग्रजींत लिहित असे. तथापि त्याचें लिहिणें अगदींच साधारण प्रतीचें होतें. पीकॉक व फॉर्टेस्क्यू हे त्याच्याहून अधिक उच्च दर्जाचे लेखक होते. पीकॉक (इ. स. १३९५–१४६०) याची तर्कबुद्धि फार तीव्र होती. इतकेंच नव्हे तर वाद करण्यांत आपला हात धरणारा कोणी नाहीं आणि वादविवाद करतांना जे मुद्दे इतरांस सुचत नाहींत, ते आपणांस सुचतात अशा प्रकारचा त्याला मोठा अभिमान वाटत असे. रचनेच्या व व्यवस्थितपणाच्या दृष्टीनें त्याचे ग्रंथ फार उत्तम आहेत. त्याच्या कल्पना अगदीं सोप्या व विशद, रीतीनें मांडलेल्या असतात आणि त्याचीं वाक्यें जरी कुठे कुठे लांबलचक असलीं तरी तीं त्या वेळच्या दुसऱ्या कोणत्याहि लेखकापेक्षां अधिक आधुनिक पद्धतीचीं आहेत. त्याची भाषापद्धति अलंकारिक असून त्याच्या लेखनांत समजूतदारपणाचा भाग बराच असल्यामुळें त्याच्या ग्रंथाच्या वाचनानें वाचकांचें मनोरंजन झाल्याशिवाय रहात नाहीं. फॉर्टेस्क्यू हा कॅप्ग्रेव्हप्रमाणें बहुधा लॅटिनमध्यें लिहित असे आणि पीकॉकप्रमाणें त्याचे लेख तत्त्वज्ञानाच्या व वादविवादाच्या स्वरूपाचे होते.

भाषांतरकार व ग्रंथप्रकाशक या नात्यानें कॅक्सटन यानें जें लेखनकार्य केलें त्यामुळें वाङ्मयांत नवीन युग उत्पन्न झालें नाहीं. परंतु त्यानें स्थापन केलेल्या छापखान्यामुळें एकंदर देशांतील संस्कृतीच्या संरक्षणास व प्रसारास उत्तेजन मिळून वाङ्मयाची बरीच वाढ झाली. कॅक्स्टननें व ज्यांचे ग्रंथ त्यानें छापले त्या लेखकांपैकीं कोणींहि वाङ्मयाची नवी तऱ्हा किंवा नवा प्रकार उत्पन्न केला नाहीं. तथापि ग्रंथ प्रकाशनाचें काम करीत असतां लोकांच्या अभिरुचीस चांगलें वळण लावण्याची तो खटपट करीत असे. त्यानें प्रकाशित केलेल्या ग्रंथांमध्यें सर थॉमस मॅलोरीचा, मॉर्टे डि आर्थर या नांवाचा ग्रंथ हा एकच अत्यंत महत्त्वाचा ग्रंथ आहे. इतकेंच काय पण पंधराव्या शतकांतील सर्व वाङ्मयांतहि तो एकटाच महत्त्वाचा ग्रंथ आहे.

त्या वेळेच्या इंग्लंडांतील युद्धजन्य परिस्थितीमुळें आणि उद्योगधंद्यांच्या वाढीमुळें जरी उच्च बुद्धिमत्तेचीं माणसें वाङ्मयापासून परावृत्त झालीं असलीं तरी साधारण प्रतीच्या लेखकांच्या कार्यांत त्यामुळें कांहीं अडथळा उत्पन्न झाला नाहीं. त्या काळची ग्रंथसंख्या मोठी असून त्यांतील विषय विविध आहेत. त्या वेळचे तीनशें निरनिराळे स्वतंत्र ग्रंथ प्रसिद्ध झाले असून तितकेच अद्याप अप्रसिद्ध स्थितींत आहेत. त्यांत प्रणयविषयक, रूपकात्मक, रूपकविहीन, वर्णनात्मक व बोधपर कविता, वीणाकाव्यें व अर्धवट वीणाकाव्यें, आत्मचरित्रपर व पापप्रक्षालक कविता, स्तुतिपर व भिक्षांदेहीच्या कविता, गद्यात्मक व पद्यात्मक करमणुकीच्या व उपदेशाच्या गोष्टी, प्राचीन व अर्वाचीन इतिहास

इत्यादि इत्यादि अनेक विषयावर त्या वेळीं ग्रंथरचना झाली. या ग्रंथरचनेशिवाय त्या वेळीं लॅटिन भाषेंतहि बरीच ग्रंथरचना झाली आणि त्या काळाचे व मागील काळचे लॅटिन व फ्रेंच भाषेंतील ग्रंथ त्या काळाचे सुशिक्षित लोक वाचीत असत.

चवदाव्या व पंधराव्या शतकांत जरी इटॅलियन पुनरुज्जीवनाची चळवळ इंग्लंडांतील लोकांस माहीत होती तरी चॉसर खेरीज करून कोणावर त्या चळवळीचा कांहीं परिणाम झाला नाहीं. कारण सोळाव्या शतकापूर्वी इटॅलियन वाङ्मय जाणणारा चॉसर हा एकटाच लेखक होता. त्या वेळीं इटालियन इंग्लंडला जात व जे इंग्रज इटालीला जात ते वाङ्मयाकरितां जात नसून विद्वत्ता संपादन करण्याकरितां जात असत. फ्री, ग्रे, फ्लेमिंग, टिली गन्थोर्प इत्यादि गृहस्थानीं इटालीत जाऊन जें अध्ययन केलें त्यामुळें ते व्याकरण व साहित्य या शास्त्रांत निष्णात झाले परंतु ते इंग्लंडांत परत आल्यावर त्यांनीं आपलें लक्ष राज्यकारभारांत घातल्यामुळें त्यांच्याकडून वाङ्मयविषयक कांहीं कार्य झालें नाहीं. परंतु त्यांच्यामुळें इंग्लंडांत लिनेकर, कॉलेट, मोर इत्यादि गृहस्थांनीं जी बौद्धिक जागृति केली तिचा रस्ता मोकळा झाला आणि त्यांतूनच अखेर स्पेन्सर, बेकन, शेक्सपिअर, जॉन्सन, गिल्बर्ट, हार्वे, व हॅरिअट यांचें युग निर्माण झालें.

इंग्लंडांतील मध्ययुग केव्हां संपलें हें नक्की सांगता येण्यासारखें नाहीं. पुनरुज्जीवन युगांतील संस्कृति व नवीन ज्ञान यांचा इंग्लंडांत प्रवेश झाल्यानंतर आणि अभियुक्त व इटालियन नमुनेदार वाङ्मयाचें अनुकरण करण्याचा इंग्लंडांत प्रघात सुरू झाल्यानंतरहि बराच काळ मध्ययुगांतील वीररसप्रधान काव्यें व वीणाकाव्यें (लिरिक्स) यांचा चहा व अनुकरण चालू होतें. त्याचप्रमाणें शेक्सपिअरचा उदय होईपर्यंत नाट्यकलेचीं जुनें नवें अशीं दोन्हीहि स्वरूपें एकाच वेळीं अस्तित्वांत होतीं.

एकंदरींत पंधराव्या शतकाच्या वाङ्मयांत कांहीं जोरदार परंतु ग्राम्य भाषेंत लिहिलेल्या ग्रंथांखेरीज वाङ्मय प्रेमीजनांचे लक्ष वेधील असें कांहीं नाहीं. परंतु गुणांच्या दृष्टीनें जरी चवदाव्या शतकांतील वाङ्मयापेक्षां पंधराव्या शतकांतील वाङ्मय फार कमी दर्जाचें आहे तरी त्याचा एकंदर विस्तीर्णपणा व त्यांतील विषयांची विविधता पाहिली म्हणजे त्यावरून त्या वेळीं वाचकांची संख्या किती झपाट्यानें वाढली होती हें कळून येतें. वाचकांच्या संख्येची वाढ वाङ्मयाची वाढ होण्यास कारणीभूत झाली आणि नाटकांचे अनेक प्रयोग होत गेल्यानें मॉर्लो व शेक्सपिअर आणि बोमंट व फ्लेचर यांच्या सारख्या नाटककारांची कृति पहाण्यास योग्य असा श्रोतृवर्ग तयार झाला.

**इलिझाबेथन युग.**—मोरच्या "युटोपिया" (१५१६) पासून तों मिल्टनच्या "सॅम्सन ॲगोनिस्ट" (१६७१) पर्यंत इंग्रजी वाङ्मयाचा इतिहास एकसारखा व अखंडित आहे. त्या काळाच्या वाङ्मयास त्याचें स्वरूप प्राप्त होण्यास तीन गोष्टी कारणीभूत झाल्या. त्यांपैकीं दोन वाङ्मयकक्षेच्या बाहेरच्या आहेत. एक इलिझाबेथ राणीच्या कारकीर्दीच्या उत्तरार्धांत राजकीय बाबतींतला लढा मिटून शांतता प्रस्थापित झाली. ही व दुसरी धर्मसुधारणेच्या चळवळीनें धार्मिक बाबतींला प्रश्न निकालांत निघाला ही. तिसरी गोष्ट म्हटली म्हणजे पुनरुज्जीवनाच्या चळवळीनें संस्कृति व शिक्षण यांचा इंग्लंडांत जारीनें प्रसार झाला. या राजकीय व धार्मिक शैक्षणिक स्वरूपाच्या तीन गोष्टी जरी इलिझाबेथन युगांतील वाङ्मयास कारणीभूत झाल्या तरी त्यांची कालमर्यादा व किंमत निरनिराळी होती. येथें या तीन गोष्टी वाङ्मयप्रसारास कशा कारणीभूत झाल्या याचा थोडक्यांत विचार करणें जरूर आहे.

**राजकीय कारण.**—इ. स. १५७९ पर्यंत ट्यूडर घराण्याची कारकीर्द ग्रंथकारांस उत्तेजन देण्यासारखी नव्हती सातव्या हेन्रीच्या कारकीर्दीची हकीकत प्रथम बेकननें लिहिली व आठव्या हेन्रीच्या कारकीर्दीचें नाटक पहिल्या जेम्सच्या कारकीर्दींत शेक्सपिअर व फ्लेचर यांनीं लिहिलें. आठव्या हेन्रीच्या कारकीर्दीतील उत्तरार्ध इतक्या कांहीं क्रूर कृत्यांनीं भरलेला होता कीं, त्याच्या वंशजांच्या हयातींत त्या कृत्यांचें चित्र रेखाटणें सुरक्षित नव्हतें. त्याच्यानंतर गादीवर येणाऱ्या दोन राजांच्या कारकीर्दींत देशांत चहूंकडे धार्मिक युद्ध चालू होतें व इलिझाबेथ राणीच्या कारकीर्दीच्या पहिल्या वीस वर्षांत काव्यस्फूर्ति उत्पन्न होण्यासारख्या गोष्टी घडून आल्या नाहींत. परंतु इ. स. १५८० पासून इलिझाबेथ राणीच्या, मोठेपणाची, यशस्वी कारकीर्दीची व वाढत्या उत्कर्षाची देशांत चहूंकडे जाणीव उत्पन्न झाली व त्या योगानें काव्यें व नाटकें उत्पन्न झालीं. इंग्लंडविषयीं अभिमान, इंग्लंडचा आत्मविश्वास इत्यादि भावनांनीं इ. स. १६२२ त पूर्ण झालेला ड्रेटनचा 'पोलिओल्बिअन' हा ग्रंथ ओतप्रोत भरलेला आहे.

**धर्मक्रांतिः**—धर्मसुधारणेच्या चळवळीमुळें बरेंच वाङ्मय निर्माण झालें सर थॉमस मूर, टिंडाल व त्याचे मित्र यांनीं त्या वादविषयक वाङ्मयांत भाग घेतला. धार्मिक विचार व्यक्त करणें, भाषांतर व वक्तृत्व इत्यादि कामाकडे गद्याचा उपयोग होत गेल्यानें त्याची बरीच वाढ झाली. प्रथम हे धार्मिक लेखक निर्माण होण्यास फार विलंब लागला व हुकरपर्यंत कोणी नाणावलेला धार्मिक लेखक झाला नाहीं. परंतु त्याच्यामागून शंभर वर्षेपर्यंत अनेक धार्मिक वक्ते उत्पन्न झाले.

**अभियुक्त संस्कृति.**—ही संस्कृति इंग्लंडांत उत्पन्न होण्यापूर्वी प्रथम ग्रीक व लॅटिन भाषांचें ज्ञान, त्या भाषांतील वाङ्मयाचें अध्ययन, व प्राचीनकाळच्या चालीरीतींची व मनःस्थितींची यथार्थ कल्पना यांचा प्रसार सुरू झाला.

तथापि बराच काळपर्यंत इंग्लंडांत कोणी विद्वान लेखक निर्माण झाला नाहीं. स्वतंत्र विचारांचा उगम या दृष्टीनें ग्रीक संस्कृतीचें अनुकरण करण्याची प्रवृत्ति प्रथम "यूरोपीय ग्रंथांत दिसून येते. परंतु पुढें लॅटिन व ग्रीक ग्रंथांची गद्यात्मक व पद्यात्मक भाषांतरें अधिकाधिक होऊं लागलीं.

इ ट ली व फ्रा न्स.—रोम व अथेन्स येथील विचार व कला यांचें ज्ञान इंग्लंडच्या लोकांस नेहमीं इटली व फ्रान्स या देशांकडून प्राप्त होत असल्यामुळें तें ज्ञान पुष्कळ वेळां त्या देशाच्या विशिष्ट गुणधर्मांनीं युक्त असे. त्या वेळचे नाटककार सेनेकाचीं नाटकें लॅटिन व इंग्लिश या भाषेंतून तर वाचीत असतच, परंतु ते इतर देशांतील लेखकांनीं त्याच्या नाटकांचीं केलेलीं भाषांतरेंहि वाचीत असत. हीच पद्धत इतर सर्व विषयांवरील लेखकांची होती. यामुळें इटलीची बुद्धिमत्ता इंग्लंडच्या बुद्धिमत्तेस तीन रीतींनीं उपयोगी पडली. ( १ ) नष्टप्राय झालेल्या संगीतशास्त्राचें व छंदःशास्त्राचें पुनरुज्जीवन झालें; ( २ ) काव्याचे निरनिराळे प्रकार निर्माण झाले; व ( ३ ) शासनशास्त्र व आचारशास्त्र यांतील उत्तमोत्तम विचार निर्माण झाले. इटालियन लेखक मॅकिॲव्हिली याच्या ग्रंथांच्या वाचनानें बेकनचीं मतें निश्चित झालीं. त्याचप्रमाणें इतर विषयावरील अन्यदेशीय ग्रंथकारांच्या लेखनाचाहि इंग्रजी लेखकांवर परिणाम झाला.

आतां आपण इ. स. १५८० पर्यंत इंग्रजी गद्य, पद्य व नाट्य यांचा कसकसा विकास होत गेला याचें अवलोकन करूं.

इ. स. १५८० प र्यं त चें ग द्य.—इंग्रजी गद्याचा विकास फार सावकाशपणें झाला. बराच काळपर्यंत लॅटिनभाषा व इंग्रजी भाषेच्या मूळ भाषा यांचा मधून मधून लढा व संयोग होत होत अखेर पूर्ण मिलाफ झाला. या पुढें विकास कसा होत गेला हें आपणांस सरकारी कागदपत्रें, इलिझाबेथ राणी, स्कॉटलंडची मेरी व त्यावेळचे पुढारी यांचीं लिहून ठेवलेलीं भाषणें, प्रवासवर्णनें व चरित्रें, सिसरो व बेथिअस यांच्या ग्रंथांचीं त्यावेळीं झालेलीं भाषांतरें इत्यादि साधनांवरून कळण्यासारखें आहे. शेक्सपियर याच्या वेळेपर्यंत इंग्रजी भाषेचा विकास बहुतेक ख्रिस्ती उपाध्याय, भाषांतरकार व बखरकार यांनींच केलेला आहे.

इ. स. १५८० प र्यं त चें प द्य.—आठव्या हेन्रीच्या कारकीर्दींत वीणाकाव्याच्या धर्तीची काव्यरचना करण्याची प्रवृत्ति उदयास आली. सर थॉमस वॅटच्या गीतांमधून चॉसरच्या वेळेपासून दृष्टीस न पडणारी अशी शृंगारिक कविता आणि नियमबद्ध पद्यरचना दृष्टीस पडते. त्याच्या मागून हेन्री हावर्ड, अर्ल ऑफ सरे यानें त्याचें कार्य पुढें चालविलें आणि चॉसर व इटालियन पद्धतीची काव्यरचना निर्माण करण्याचें श्रेय संपादन केलें. त्यानंतर काव्यरचनेंत बराच खंड पडला. जवळ जवळ वीसवर्षेंपर्यंत सॅकव्हिलच्या 'इन्डक्शन' नांवाच्या काव्याखेरीज नांव घेण्यासारखें दुसरें काव्य निर्माण झालें नाहीं आणि त्यापुढेंहि स्पेन्सरचा उदय होईपर्यंत जॉर्ज गॅस्कॉईने याशिवाय दुसरा काव्यलेखक झाला नाहीं.

इ. स. १५८० प र्यं त चें ना ट्य.—प्राचीनकाळच्या नाटयाचा अंमल किती होता हें प्रस्तुत काळच्या नाटयावरून कळून येतें. हा अंमल दोन प्रकारचा होता. एक हुबेहूब त्या सारखी नाटयरचना उत्पन्न करणारा आणि दुसरा, त्यापासून अत्यन्त भिन्न अशी नाटयरचना उत्पन्न करणारा. पूर्वीच्या "नैतिक नाटकांतून" सातव्या हेनरीच्या कारकीर्दींत 'इन्टरल्यूड' नाटकांत निरनिराळ्या नमुनेदार व्यवसायांचें किंवा धंद्यांचें संभाषण असतें, जॉन हेवूड हा प्रमुख इंटरल्यूड लेखक होता. इ. स. १५८०पर्यंत झालेल्या नाटकांत लेखकांची बुद्धिमत्ता फारच थोडी दिसून येते. परंतु त्यांतील मजकूर ऐतिहासिकदृष्ट्या महत्त्वाचा आहे. प्रथम शिक्षक मंडळींनीं इंटरल्यूडपासून आनंदपर्यवसायी नाट्यरचना निर्माण केली. प्लाटसच्या आधारानें निरनिराळीं संविधानकें रचून आणि मधूनमधून विनोदपूर्ण अंक व प्रवेश असें त्यांचे विभाग पाडून ते आपल्या विद्यार्थ्यांस नाटकें रचून देत असत व त्यांच्याकडून त्यांचे प्रयोग करवीत असत. परंतु या नाटकांतुन लेखनशैली, संवाद व छंदोबद्ध रचना यांचा अभाव असे. आनंदपर्यवसायी नाटकांतील पद्यरचनेस ग्रीन यानें व त्यांतील गद्यास लिली यानें व्यवस्थित स्वरूप दिलें. इंग्लंडांतील प्रारंभींचीं शोकपर्यवसायी नाटकें सेनेकाच्या नाटकांच्या नमुन्यावर रचलेलीं आहेत. सेनेकाचें अनुकरण करून केलेली नाट्यरचना चांगली होत नसे असें नाहीं. निदान फ्रान्समध्यें तरी सेनेकाच्या अनुकरणानें उत्तमोत्तम नाटकें निर्माण झालीं. परंतु इंग्लंडमध्यें मात्र त्याच्या अनुकरणाचा फारसा उपयोग झाला नाहीं. तथापि सेनेकाच्या नाटकांतील अल्पसा भाग इंग्रजी नाट्यांत कायमचा प्रविष्ट होऊन राहिला. उदाहरणार्थ नमुनेदार शोकपर्यवसायी नाटक कसें असावें, त्यांत सुडाची मूळ कल्पना असावी; दैवगति व परमेश्वरी न्याय यासारख्या भव्य कल्पना त्यांत असाव्यात, त्यांतील कविता वृत्तबद्ध नसावी,त्यांत एखादा भुताचा प्रवेश असावा, अनेक नटांनीं मिळून म्हणावयाचें गीत ( कोरस ) असावें, नाटकांतलें नाटक असावें व बरींचशीं बोधपर वचनें असावींत इत्यादि कल्पना इंग्रजी नाट्याला कायमच्या चिकटून बसल्या. अशा रीतीनें इ. स. १५८० पर्यंत इंग्रजी नाट्याचा सांगाडा तयार झाला होता. तथापि त्यांत अद्याप व्यवस्थितपणा व निर्दोष पद्यरचना उत्पन्न झाली नव्हती. अभियुक्त वाङ्मयाच्या तावडींतून सुटल्यानंतर हे गुण त्यांत उत्पन्न व्हावयाचे होते. ऐतिहासिक नाटकांसहि नुकताच प्रारंभ

होऊन जॉन व पांचवा हेनरी यांच्याबद्दलचीं नाटकें रंगभूमीवर दिसूं लागलीं होतीं.

स्पे न्स र पा सू न ड न प र्यं त ची प द्य र च ना.— नवीन तऱ्हेची पद्यरचना करण्याचें श्रेय सर फिलिप सिडने व एडमंड स्पेन्सर यांजकडे आहे. 'दि शेफर्ड्स कॅलेंडर' या काव्याच्या कांहीं भागांतच जरी स्पेन्सरचें कौशल्य दिसून येतें तरी गोपगीत, औपरोधिक आणि गौरवपर इत्यादि लेखनपद्धतींचे व निरनिराळ्या वृत्तांचे नवीन प्रयोग सुरू केल्याबद्दल त्या काव्याचा जिकडे तिकडे बोलबाला झाला. सदर काव्यांतील खेडवळ आणि जुन्या पद्धतीच्या शब्द-प्रयोगाबद्दल जरी त्यांवर टीका झाली तरी इंग्लंडांतील मूळ भाषापेक्षांहि त्या शब्दप्रयोगांचा काव्यावर अधिक परिणाम झाला. स्पेन्सरनें आपल्या 'ऑक्टोबर' नामक काव्यांत प्रदर्शित केलेला शोकपर्यवसायी नाटक लिहिण्याचा बेत तडीस गेला नाहीं. त्यानें लिहिलेल्या आनंदपर्यवसायी नाटकांचा पत्ता नाहीं. या कारणास्तव त्याचें नांव नाटक-कारांच्या सदरात न पडतां कवींच्या सामान्य सदरांत पडतें. त्याचें सर्वोत्कृष्ट काव्य 'दि फेअरी क्वीन' हें होय. तें एक अन्योक्तिरूप महाकाव्य असून त्यांत नैतिक चांगुलपणाचा जयजयकार केलेला आहे. या काव्याचे पहिले तीन भाग इ. स. १५९० मध्यें व त्यापुढचे तीन भाग इ. स.१५९६त प्रसिद्ध झाले. त्यांच्या पुढचा 'ऑफ कॉन्स्टन्सी' नांवाचा भाग स्पेन्सरच्या मृत्यूनंतर इ. स. १६०९ मध्यें जी त्याच्या काव्याची आवृत्ति निघाली तींत प्रथम आढळतो.या काव्यांत त्या काळची समाजस्थिति व आकांक्षा पूर्णपणें प्रतिबिंबित झाल्या आहेत. या काव्यांतील सृष्टिशोभावर्णनपर भाग व संवि-धानक हीं ॲरिओस्टोच्या 'ऑरलँडो फ्युरिओसो' या मूळ ग्रंथा-वरून घेतली. दोन्ही काव्यांत शूर शिलेदारांच्या धाडसांच्या कथा एकमेकांत गुंफलेल्या आहेत. दोन्ही काव्यांत दैत्यांचा वध, मजबूत जागा हस्तगत करणें, निरपराधी लोकांची सुटका, त्यांत चेटुक, जादूटोणा करणाऱ्या लोकांनीं अडथळे उप-स्थित करणें किंवा जादूच्या तरवारीनें शिंगानें व आरशानें त्या सुटकेस मदत करणें इत्यादि गोष्टी सर्वसाधारण आहेत. या सर्व गोष्टींच्या गोंधळास नैतिक व मधून मधून राजकीय स्वरूप देण्याचा स्पेन्सरनें प्रयत्न केलेला आहे. त्यानें ख्रिस्ताच्या कबरस्थानाकरितां केलेलें युद्ध हा टॅसोच्या ग्रंथां-तील विषय घेऊन त्यावरून विश्वांत नेहमीं दृष्टीस पडणारा सत् व असत् यांतील झगडा विस्तृत रीतीनें वर्णन केला आहे. या झगड्यांतच पातिव्रत्य व व्यभिचार, राजनिष्ठा व राजद्रोह, इंग्लंड व स्पेन, इंग्लंड व रोम, इलिझाबेथ व तिचे विरोधी राज्यापहारक, आयरिश सुभेदार व आयरिश बंडखोर, न्याय व अन्याय यांतील सर्व झगड्यांचा समावेश केला आहे. त्याच्या काव्याच्या हल्लीं उपलब्ध असलेल्या सहा विभागांस ज्या सद्गुणांचीं नांवें दिलेलीं आहेत ते सद्गुण आपण ॲरिस्टॉटलनें दिलेल्या सद्गुणांच्या यादीं-तून घेतले असें तो म्हणतो; परंतु पवित्रपणा, नेमस्तपणा, पातिव्रत्य, न्याय, मैत्री व शिष्टपणा हे सद्गुण म्हणजे मध्य-युगीन, प्युरिटन लोकांच्या व ग्रीक लोकांच्या कल्पनांचें मिश्रण आहे.

पुनःप्रस्थापनेच्या काळापर्यंत स्पेन्सरचें व्रत पुढें अनेक पंथांच्या कवींनीं चालविलें. स्पेन्सरच्या काव्यरचनेची हातोटी व त्यांतील माधुर्य हे गुण एडवर्ड फेअरफॅक्स यास प्राप्त झाले. त्याची अन्योक्तिरूप लिहिण्याची तऱ्हा जाइल्स फ्लेचर यानें उचलली. त्याची सांकेतिक लेखनकला कांहीं अंशानें फिनिअस फ्लेचरकडे आली. त्याचे इतर कांहीं गुण हेनरी मोर व जोसेफ बोमंट यांच्या वाट्यास आले. याच प्रमाणें त्याचे इतर अनेक गुण अनेक कवींमध्यें विभागले गेले.

ड्रेटन व डॅनिअल.—इलिझाबेथन युगांतील नमुनेदार कवि म्हटला म्हणजे मायकेल ड्रेटन हा होय.त्यानें गोपगीत लिहि-ण्यांत स्पेन्सरचें; सॉनेट लिहिण्यांत डॅनिअल, सिडने, स्पेन्सर व शेक्सपियर यांचें; ऐतिहासिक व संतकथात्मक काव्यें रचण्यांत डॅनिअलचें आणि पौराणिक कविता करण्यांत मार्लोचें अनुकरण केलें; तथापि कांहीं गोष्टींत त्यानें वैशिष्टय दिसून येतें. सॅम्युअल डॅनिअल हा त्याच्याहून अधिक एकान्तवासप्रिय व चिन्ताग्रस्त मनाचा असल्यामुळें त्याच्या त्या मनःस्थितीचा परिणाम त्याच्या ऐतिहासिक काव्यावर झाल्याशिवाय राहिला नाहीं. त्याच्या सर्व देशाभिमानपर व ऐतिहासिक कविता इलि-झाबेथ राणीच्या कारकीर्दींत शेवटल्या वीस वर्षांत लिहिल्या होत्या.

सॉनेट्स —शृंगारिक चतुर्दशक ही काव्यरचना वॅटनें प्रथम इंग्रजी वाङमयांत आणली आणि इ. स. १५९० पासून इ. स. १६०० पर्यंत तिचा बराच प्रसार झाला. त्यानंतर वॅट-सन यानें तिला फिरून चालना दिली. परंतु जेव्हां सिडने यानें चतुर्दशक रचण्यास प्रारंभ केला तेव्हां त्यानें त्यास बरेंच भावनाप्रधान केलें. त्यामुळें त्यांत नाटयांतील कल्पना व जगाचा खराखरा अनुभव ग्रथित केलेला दृष्टीस पडूं लागला. सिडनेची ॲस्ट्रोफेल अँड स्टेला, ड्रेटनची आय-डिया, स्पेन्सरची अमोरेटी आणि शेक्सपिअरचीं चतुर्दशकें यांत खरोखरीची काव्यप्रतिभा दृष्टीस पडते.

पौ रा णि क क था वि ष य क का व्यें:—शृंगारिक पौरा-णिक कथाकाव्यें करण्याची पद्धत इंग्लंडच्या कवींनीं तत्कालीन इटालियन कवींपासून घेतली हें खरें. तथापि प्रारंभीं ती त्यांनीं ओव्हिडपासून घेतली. इ. स. १५८८ पासून इ. स. १५९८ पर्यंतच्या दहा वर्षांच्या काळांत लॉज याचें "सिलिस मेटामॉर-फोसिस", शेक्सपीअरचें "व्हीनस अँड ॲडोनीस" व "रेप ऑफ ल्युक्रीस",मार्लोचें "हीरो अँड लिअांडर" व ड्रेटनचें "एंडि मिअन ॲन्ड फीबि" इतकी पौराणिक काव्यें उत्पन्न झालीं.

वीणाकाव्यें.—इलिझाबेथच्या वेळच्या चतुर्दशकांमध्यें पौराणिक काव्यांत किंवा वीणाकाव्यांत जर आपण मोलिअर, बर्न्स, किंवा शेले यांच्या ग्रंथांतून आढळणाऱ्या भावना शोधूं लागलों तर आपली निराशा होऊन आपण त्या कवितेस निरस म्हणूं. त्या काळीं वीणाकाव्याचा फारच जोरानें प्रसार झाला. वॅट यानें प्रथम या काव्यरचनेचा शोध लावला. परंतु त्याच्या वेळेपासून स्पेन्सरच्या वेळेपर्यंत विशेष नांवाजण्यासारखें वीणाकाव्य निर्माण झालें नाहीं. इतर प्रकारच्या वाङ्मयाप्रमाणें वीणाकाव्यरचनेंतहि शेक्सपिअर अग्रगण्य होता. परंतु वीणाकाव्यासारख्या किरकोळ काव्यरचनेंत ग्रीन व डेक्कर यांच्यासारख्या साधारण कवींस जितकें यश आलें, तितकें चॅपमन व जॉन्सन या सारख्या थोर कवींस आलें नाहीं. लॉज व ब्रेटन, ड्रेटन व डॅनिअल, ऑक्सफर्ड, रॅले आणि साउथवेल या सर्वांच्या वीणाकाव्यांवरूनहि काव्यरचना निरनिराळ्या प्रकारच्या व वर्गाच्या लोकांत प्रचलित होती असें दिसून येतें.

डनपासून मिल्टनपर्यंत चें पद्य.—इलिझाबेथन युग पालटल्यानंतर पद्यविषयांत बदल झाला. इंग्लंडच्या प्रमुख कवींपैकीं जॉन्सन व जॉन डन ( १५७३–१६३१ ) आणि डनच्या मागून झालेले अनेक कवी यांच्या पद्यांत, नैसर्गिक मनुष्य व त्याचा ऐहिक सुख भोगण्याचा हक्क यांच्या विरुद्ध प्रतिपादन केलेलें आढळतें. त्यामुळें त्या काळची कविता विशेष वैराग्यपर व गूढवादविषयक झालेली आहे. जॉर्ज हर्बर्ट, क्रॅशॉ, हेन्री व्हॉघान आणि थॉमस ट्रॅहर्न हे त्यावेळचे धर्मविचारप्रधान कवी होते. कल्पनाप्रचुर कवींच्या पंथांतील या कवींमध्यें धर्मश्रद्धा विशेष होती. डन, कॅर्‍यू, कार्टराइट व क्लीव्हलंड आणि अॅब्राहाम कावले हे त्याच पंथांतील इतर कवि होते. डॉ. जॉनसन यानें आपल्या कावलेच्या चरित्रांत या कल्पनाप्रचुर पंथावर व त्यांतील कवींच्या दोषांवर बरीच खरमरीत टीका केली आहे, आणि त्याच्या त्या टीकेंतील बराचसा भाग बरोबरहि आहे. जॉनसनची जर कोठें चूक झाली असेल तर ती येवढीच कीं, त्यानें त्या कवींचे गुण मुळींच लक्षांत घेतले नाहींत, आणि इतिहासाच्या दृष्टीनें त्यांचें किती महत्त्व होतें त्याचाहि त्यानें विचार केला नाहीं.

डनच्या कवितेंत बराच बौद्धिक भाग असून ती विवेचनात्मक व आत्मपरीक्षणपर होती. त्याच्या कवितेवरून त्याच्या भावना त्याच्या अंतःकरणांत खळबळ उडवून देत असाव्यात, असें दिसून येतें. स्पेन्सर व मिल्टन यांच्या दरम्यानच्या काळांत वीणाकाव्य व काव्याचे इतर प्रकार यांच्यांत बरेच फरक घडून आले.

डनच्या मागून प्रसिद्धीस आलेल्या कवींमध्यें रॉबर्ट हेरिक हा प्रमुख होता. त्याची एकंदर वीणाकाव्यधर्तीची व सूत्रस्वरूपाची मिळून दोन हजार कविता असून ती "हेस्पेराइडस अँड नोबल नंबर्स" या नांवानें संगृहीत केली आहे. फुलें व कुमारिका यांच्यांतील साम्य, त्यांच्या सौंदर्याचा त्वरित होणारा नाश, त्याच्या नाशाकडे पाहून कवीस होणारा खेद, त्याची स्वतःची नश्वरता, विषयसुखाची क्षणभंगुरता,त्याच्या मित्रांचे सद्गुण, ग्रामस्थांचे खेळ व विद्या इत्यादि विषयावर त्याची कविता आहे.

मिल्टनः— जॉन मिल्टन ( इ. स. १६०८–इ. स. १६७४ ) प्रमाणें अगदीं अल्पवयांत कोणत्याहि कवीनें काव्य रचनेची निर्दोष पद्धति शोधून काढली नाहीं. त्याच्या तारुण्यांतील कविता कांहींशी स्पेन्सरच्या वळणावर गेली होती, परंतु त्याच्या विस्तृत वाचनामुळें त्याच्या काव्यरचनेंत लवकरच सुधारणा घडून आली. त्यानें आपल्या विसावे वर्षी लिहिलेल्या "नेटिव्हिटि ओड" या काव्यांत त्याची कल्पकता व शब्दयोजना अगदीं स्वतंत्र होती; शिवाय त्यांतील काव्यरचनाहि एखाद्या निष्णात लेखकाच्या कवितेप्रमाणें रेखीव व ठराविक पद्धतीची होती. ल अलेग्रो, इल पेन्सेरोसो, कोमस, लिसिडस या काव्यांतून एक प्रकारची ठराविक, अलंकारिक व पुनरुज्जीवनकाळास अनुरूप अशी रचनापद्धति दिसून येते असें इतिहासज्ञांचें म्हणणें आहे. त्याच्या कवितेंत वीणाकाव्यात्मक व स्वाभाविकपणाचा भाग फार कमी आहे, असें जरी टीकाकारांचें म्हणणें पडतें तरी त्याच्या काव्यरचनेंतील चातुर्य व सौंदर्य पाहून त्यांची मति थक्क होते. त्याच्या चतुर्दशकांमध्येंहि त्याची तीच लेखनकरामत दिसून येते.

तरुणपणापासून ज्या वीरश्रीयुक्त विषयावर काव्य रचण्याचा त्यानें संकल्प केला होता तो शेवटीं "मानवाचें अधःपतन" हा त्यानें ठरविला. हा विषय त्याच्या समजुतीप्रमाणें सर्वांत मोठा आहे. या काव्यविषयाचें स्थळ म्हणजे स्वर्गपातालादि मिळून सारें विश्व होतें आणि त्याचा काळ ख्रिस्तजन्मापासून अखेरच्या न्यायाच्या दिवसापर्यंत इतका अनंत होता. या काव्यविषयावर नाटक लिहिण्याचा प्रथम मिल्टनचा बेत होता व त्याप्रमाणें त्यानें "स्वर्गच्युति" ( पॅरॅडाइझ लॉस्ट ) नांवाच्या नाटकाची योजनाहि केली होती. परंतु पुढें त्यास त्या विषयावर नाट्यापेक्षां महाकाव्यच लिहिणें अधिक श्रेयस्कर असें वाटून त्यानें त्यास महाकाव्याचें स्वरूप दिलें. त्याच्या काव्यांत सैतान व त्याचे अनुयायी यांचें अलौकिक धैर्य दिसून येतें. पराभव झाला असतांहि ते खचत नाहीं आणि जेत्याविषयींचा त्यांचा अनादर कमी होत नाहीं. या त्यांच्या अजिंक्य निश्चयामुळें त्यांच्या पुढें देव, देवदूत आणि आद्य मानवी जोडपें हे सर्व फिके दिसतात. याच्या पुढच्या म्हणजे "पुनः स्वर्गप्राप्ति" ( पॅरॅडाइझ रीगेन्ड ) काव्यांत संविधानक फार थोडें आहे. देवाशीं विरोध करणाऱ्या सैतानाचा आवेश, बराच कमी झाला आहे. आणि ख्रिस्ताचें वर्तन एखाद्या पंडितंमन्य पंतोजीप्रमाणें दिसून येतें. सॅम्सन ॲगोनिस्ट यांतील नैतिक विवेचन

व त्याची एकंदर रचना ही सोफोक्लीसच्या धर्तीवर आहे, व त्यांतील धार्मिक भाग सर्वस्वी ख्रिस्ती नाहीं. सॅम्सनच्या ठिकाणीं असलेले दोष त्याच्या हालअपेष्टेमुळें विसरले जातात व या नवीन उत्पन्न होणाऱ्या सहानुभूतीमुळें त्या नाट्यकाव्यावरचें वाचकांचें प्रेम कमी होत नाहीं.

मिल्टनच्या उत्तरवयांतील त्याची लेखनशैली व काव्यरचनारीति यांमध्यें त्याच्या मनोव्यापाराची एकाग्रता दिसून येते. इ. स. १६५८ च्या सुमारास ज्यावेळीं मिल्टननें काव्यरचनेस सुरवात केली, त्यावेळीं वीरश्रीची भाषा लिहिण्याच्या कलेंत त्याला कसलीहि मदत नव्हती. नुकत्याच अस्तित्वांत आलेल्या नाट्यकलेंतील अनुभव अगदींच निरुपयोगी होते. काउले व डॅव्हेनंट यांनीं लिहिलेल्या काव्याचे नमुने अनुकरणाच्या दृष्टीनें कुचकामाचे होते. यामुळें ग्रीक आणि लॅटिन यांचा स्मृति ताजी असल्यामुळें मिल्टननें मॉर्ले शेक्सपिअर इत्यादिकांचें अनुकरण करण्यास सुरवात केली आणि त्यांची भाषाशैली व काव्यरचना पद्धति यांच्याच पायावर त्यानें आपली काव्यरचना केलेली आहे. संबोधनात्मक भाषणें वक्तृत्वपूर्ण भाषणें, वर्णनात्मक भाग इत्यादि बाबतींत तो किती वाक्चगार होता हें त्याच्या " स्वर्गच्युति " काव्यावरून प्रामुख्यानें दिसून येतें. आत्मगत व सामुदायिक भाषणें रचण्याच्या कामीं तर डान्टच्या वेळेपासून त्याच्या इतका पटाईत कविकोणीच झाला नाहीं.

इ. स. १५८० पासून इ. स. १६४२ पर्यंत ची नाट्य रचना–इ. स. १५८० पासून इ. स. १५९५ पर्यंत होऊन गेलेल्या विश्व विद्यालयीन विद्वानांनीं नाट्यकलेची स्थापना केली. त्यांपैकीं मुख्यनाट्यलेखक म्हटले म्हणजे लिली, किड, पील, ग्रीन व मार्लोवे हे होत. जॉन लिली यानें दरबारी सोंगाड्यांचीं विनोदी व खोंचदार भाषणें गद्यांत प्रथम आणलीं. लीली यानें इ स. १५८० पासून इ. स. १५९१ पर्यंत कॅंपसपे, सॅफो अँड फॅओ, मिडस व इतर आनंदपर्यवसायी नाटकें लिहिलीं. त्यांत अभिनंदनपर भाग, पौराणिक कथाविषयक रूपकें, कोणत्या तरी विषयास धरून लिहिलेलीं औपरोधिक प्रकरणें, गीतगीतात्मक विष्कंभक व गीतें इत्यादि भाग आहेत. थॉमस किडनें लिहिलेल्या नाटकांत व विशेषेंकरून " दि स्पॅनिश ट्रॅजेडी " या नाटकांत त्यानें पूर्वीच्या नाट्यरचनेस नवीन स्वरूप दिलें. शेक्सपिअरच्या पूर्वी लिहिलेल्या परंतु हल्लीं उपलब्ध नसलेल्या हॅमलेट नाटकाचा तो कर्ता असावा. त्यानें आपल्या मागून झालेल्या नाटककारितां सद्धेतुमूलक परंतु घातकी सूडाचा विषय तयार करून ठेवला, व त्याचा चॅपमन, मार्स्टन वेब्स्टर इत्यादि नाटककारांनीं उपयोग करून घेतला. त्याच्या मुख्य नाटकाचें भाषांतर करून त्याचे प्रयोगहि जर्मनींत बरेच दिवस होत होते. किडच्या लिहिण्यांत सुसंगतपणाचा अभाव आहे परंतु त्यानें ठिकाणीं नाट्यरचनाचातुर्य बऱ्याच मोठ्या प्रमाणांत होतें.

टॅम्बरलेनचे दोन भाग," दि लाइफ ॲन्ड डेथ ऑफ डॉक्टर फॉस्टस," 'दि ज्यू ऑफ माल्टा', 'एडवर्ड दुसरा' आणि 'हीरो ॲन्ड लिॲंडर' हें अपूर्ण काव्य इतके ख्रिस्टोफर मार्लोवेचे ग्रंथ आहेत. मार्लोवेनें ( १५६४–१५९३ ) शोकपर्यवसायी नाटकें लिहिण्यास प्रारंभ करून त्यांस अनुरूप अशी भाषासरणी व पद्यरचना उत्पन्न केली. वीरश्रीयुक्त भाषणें लिहिण्यांत जरी त्याचा हात खंडा असे तरी " हेलनचें अवतरण " " मॉर्टिमरचें प्रयाण " " हीरो व लिॲन्डर यांचें मिलिन " इत्यादि लांब लांब उताऱ्यांतहि त्याच्या लिहिण्यांत कोठें क्लिष्टता किंवा दुर्बोधता उत्पन्न झाली नाहीं. आत्यंतिक सौन्दर्य, अनंत साम्राज्य व गूढ ज्ञान या विषयींची तृष्णा त्याच्या इतक्या चांगल्या रीतीनें कोणीच व्यक्त केली नाहीं. त्याच्या इतर गुणांच्या मानानें त्याच्यांत रचनाचातुर्य कमी प्रतीचें होतें. तथापि गॉएटेनें फॉस्टसच्या संविधानकाबद्दल त्याची स्तुति केलेली आहे. असुरांचें दुःख व निराशा व्यक्त करण्यांत मिल्टननें मार्लोवेचेंच अनुकरण केलें. ज्या बाबतींत मार्लोवेच्या ठिकाणीं अत्युत्कृष्ट गुण होते, त्याबाबतींत शेक्सपिअरला त्याच्यावर सरशी करतां आली नाहीं.

शेक्सपिअरः—मध्ययुग पालटल्यावर भूतलावरील, मानवी चरित्र सर्वांस माहीत होऊन त्यानें सर्वांचें चित्त वेधलें होतें आणि हा चित्तवेधकपणा पूर्णपणें व खुबीदार रीतीनें व्यक्त करणें हाच नाटक लिहिण्याचा उद्देश असतो. शेक्सपिअर हा सर्वांत श्रेष्ठ इंग्रजी नाटककार होता, इतकेंच नव्हे तर त्यानें सर्वांच्या आधीं मानवी स्वभाववर्णनपर नाटकें लिहिण्याचा उपक्रम केला; परंतु त्यानें हा उपक्रम सुरवातीपासूनच केला नाहीं. प्रथम त्याच्यावर दुसऱ्या लेखकांचा अम्मल चालत होता. त्याचें " टायटस ॲंड्रोनिकस " हें नाटक किडच्या धर्तीवर लिहिलें आहे. " हेनरी सहावा " या एकच नांवाखालीं मोडणारीं तीन ऐतिहासिक नाटकें लिहिण्यांत त्यानें मार्लोवेचें अनुकरण केलें होतें. 'रिचर्ड तिसरा' हें नाटक जरी मार्लोवेचें संविधानक व भाषासरणी यांचें अनुकरण करून लिहिलें तरी त्यांत शेक्सपिअरनें आपल्या अंगीं किती लेखननैपुण्य आहे, हें प्रत्ययास आणून दिलें आहे. कांहीं काळानें शेक्सपिअरवरील अन्य लेखकांचा अम्मल नाहींसा झाला, व त्याचें लेखनकार्य स्वतंत्र रीतीनें चालू लागलें. "किंग जॉन" या नाटकांत आत्मनिवेदनकाव्यपर, वीररसपर, उपरोधपर व भावनापर इतके गुण एकत्रित झाले आहेत. यानंतर शेक्सपिअरनें निर्यमक कविता करण्यांत प्राविण्य संपादन केलें. " रिचर्ड दुसरा ", " ए मिडसमर नाइट्स ड्रीम", "दि मर्चंट ऑफ व्हेनीस", व "रोमिओ ॲंड जुलिअट" या नाटकांतून तें प्राविण्य दिसून येतें. सदर नाटकें व "दि कॉमेडी ऑफ एरर्स", "लव्हज लेबर लॉस्ट", व "दि

टू जंटलमेन ऑफ व्हेरोना" हीं नाटकें लिहितांना शेक्सपिअरच्या लिहिण्यांत निर्यमक व सयमक कविता यांची एक सारखी चढाओढ लागली होती. अखेर विशेष कारणावांचून सयमक कविता लिहावयाची नाहीं असें त्यानें ठरविलें असावें.

यापुढें लिहिलेल्या ऐतिहासिक, अद्भुतरसात्मक व विनोदपर नाटकांत शोकपर्यवसानाचा अभाव दिसून येतो. शेक्सपिअरच्या सर्व विनोदी पात्रांत फॉलस्टाफचा विनोद फार बहारीचा आहे. त्याचें वर्णन लोकमान्याच्या (१९२४) हिंदुस्थान अंकांत प्रो. राजवाडे यांनीं केलें आहे. हें पात्र ज्या नाटकांत आहे त्या "हेनरी पांचवा" या दृश्य काव्यास नाटक म्हणण्यापेक्षां प्रहसन म्हणणें अधिक शोभेल. सदर नाटकांत जोरदार भाषणें, आल्हाददजनक विनोद व इंग्लंडविषयक शेक्सपिअरचें प्रेम यावांचून दुसरें कांहीं आढळत नाहीं. ऐतिहासिक नाटकांतील पात्रें शूरवीर आहेत, तर "ॲज यू लाइक इट", "मच ॲडो अबाउट नथींग", व "ट्वेल्थ नाइट" या सारख्या आनंदपर्यवसायी नाटकांत स्त्रियांचें प्राबल्य आहे. या स्त्री पात्रांच्या तोंडीं गद्यात्मक भाषणें घालावीं लागल्यामुळें या नाटकांतील गद्य सुंदर व विनोदपर असें दिसून येतें.

शेक्सपिअरच्या दुःखपर्यवसायी नाटकांमध्यें ज्याप्रमाणें मनुष्यस्वभावाचें आविष्करण झालेलें आहे, तसें ल्युक्रीशिअसच्या वेळेपासून झालेलें नव्हतें. ज्या गुप्त कटांच्या व धामधुमीच्या काळांत सदर नाटकें लिहिलीं गेलीं त्या काळाचा व त्या नाटकांतील संविधानकांचा बराच मेळ दिसून येतो. त्याच दहा वर्षांच्या काळांत जॉनसन, चॅपमन, डेकर, मार्स्टन यांनीं आपलीं दुःखपर्यवसायी नाटकें लिहिलीं. शेक्सपिअरचें व या नाटककारांचें जरी पुष्कळ बाबतींत सादृश्य असलें तरी शेक्सपिअरच्या "हॅम्लेट", "मॅकबेथ" "किंगलिअर" "ऑथेल्लो" तीन रोमन नाटकें आणि "ट्रॉइलस आणि क्रेसीडा" व "टायमन ऑफ अथेन्स" या नाटकांशीं इतर कोणत्याहि नाटकांची तुलना करतां येणार नाहीं. या नाटकांतून नवीन दुःखपर्यवसानात्मक तत्त्वज्ञान, नवीन काव्यविवेचनरीति, नवीन नाट्यरचनापद्धति व मानवीस्वभावाचें आविष्करण करण्याची नवीन तऱ्हा दिसून येतात. शेक्सपिअरच्या चतुर्दशकांमध्यें सत्य व सौंदर्य, सत् व असत् यावर प्रदर्शित केलेले विचार पहावयास सांपडतात.

सुखदुःखात्मक नाटकें लिहिणें हा शेक्सपीअरच्या नाट्य लेखनाचा शेवटचा भाग होय. हा भाग तो "पेरिक्लिस प्रिन्स ऑफ टायर" हें नाटक लिहूं लागल्यापासून म्हणजे इ. स. १६०८ पासून सुरू झाला. कधीं कधीं जगामध्यें दुःखाअंतीं सुख प्राप्त होतें हें पाहून त्यानें आपल्या आयुष्याच्या शेवटल्या भागांत सुखदुःखात्मक नाटकें लिहिण्याचा विचार केला असावा. पेरीक्लीस, दि वुइंटर्स टेल, सिंबेलाइन व दि टॅंपेस्ट या नाटकांतून अनेक गुन्ह्यांचे, लोकापवादाचे व वियोगाचे प्रसंग दाखविल्यानंतर त्या सर्वांचें मधुर पर्यवसान झालेलें दाखविलें आहे. या पर्यवसान भागांत वियोग झालेल्यांचा संयोग झालेला दाखवून बिनसलेल्या प्रेमाची पुनः प्रस्थापना केलेली आहे.

शेक्सपिअरचा मोठेपणा त्याच्या ठिकाणीं असलेल्या तीन अत्युत्कृष्ट गुणांवर अधिष्ठित झालेला आहे. एक काव्यरचनाचातुर्य, दुसरा, मनुष्यस्वभावाचें संपूर्ण ज्ञान व त्याचें यथार्थ चित्र रेखाटणें, आणि तिसरा, नाट्यकला नैपुण्य. शेक्सपिअर व डांटे यांची तुलना केली तर डांटेच्या लेखनांत आपणांस अधिक प्रगल्भता व संपूर्णता दिसून येते. त्याचें कारण उघड आहे. शेक्सपिअरला ज्याप्रमाणें शेकडों जणांच्या तोंडीं शोभणारी भाषा घालावी लागली तशी घालण्याचें डांटेला कारण नव्हतें. शेक्सपियर हा श्रेष्ठ प्रकारचा कवि असून त्याला विविध प्रकारचें कार्य करावें लागलें. "सानेट्स" लिहितांना त्याला आपले मनोगतविचार व्यक्त करण्यापलिकडे कांहीं करावयाचें नव्हतें; परंतु नाट्यलेखनांत मात्र त्याला आपल्या हजारों श्रोत्यांचा विचार करावा लागे. शेक्सपीअरचें नाट्यनैपुण्य आतां प्रत्येक राष्ट्राला संमत झालें आहे. त्याप्रमाणें त्याचीं नाटकें सर्व ठिकाणीं करण्यासारखीं आहेत, हें तर उघड आहे; परंतु याहूनहि त्याच्यांत अधिक गुण आहे, तो असा कीं, श्रोत्यामध्यें उत्कंठा उत्पन्न करणें, ती कांहीं काळ तशीच तरंगत ठेवणें व शेवटीं तिला दूर करणें व ती श्रोत्यांना पटेल अशा रीतीनें दूर करणें, या त्याच्या गुणामुळे त्याचें लेखन श्रोत्यांच्या मनावर फारच परिणामकारक होतें. त्याचें लिहिणें इतकें उघड असे कीं, त्यामुळें त्यानें आपल्यावर इस्रायल लोकांचा, पोपचा आणि फ्रान्सचा द्वेष ओढवून घेतला. त्यानें इलिझाबेथ राणीवर स्तुतीचा वर्षाव केला, इंग्लंड व स्कॉटलंड यांच्या राजकीय संयोगाचा जयजयकार केला, पांचव्या हेन्रीच्या पराक्रमाचे गोडवे गाइले आणि इंग्लंडच्या वैभवाचें चटकदार वर्णन केलें. परंतु सर्व नाटककारांत त्यास अग्रपूजेचा मान देण्याचीं दुसरीं अनेक महत्त्वाचीं कारणें आहेत. त्याच्या नाटकांतील कोणतीं पात्रें केव्हां आपल्या प्रेमास व कोणतीं केव्हां आपल्या तिरस्कारास पात्र व्हावींत हें तो आपणांस स्पष्टपणें न सांगतां त्या त्या पात्रांच्या तोंडच्या उद्गारांवरून व त्यांच्या वर्तनावरून समजावून देतो आणि याकामीं नॉरवेचा सुप्रसिद्ध नाटककार इब्सेन याहूनहि त्याची श्रेष्ठता अधिक आहे. असें जरी आहे तरी ज्याप्रमाणें, ऐहिक व्यवहारांत कसल्याहि न्यायपात्र माणसास अगदीं निर्मळ न्याय मिळत नाहीं त्या प्रमाणें तो आपल्या कोणत्याहि पात्रास तसल्या प्रकारचा न्याय मिळाल्याचें दाखवीत नाहीं. त्याच्या चटकदार व सुपीक लेखनशैलीस त्याच्या नाट्यनियमांस धरून केलेल्या मानवीचरित्रनिरूपणाची जोड मिळाल्यामुळें नाटककारांत त्याला इतकें श्रेष्ठतम स्थान प्राप्त झालें आहे.

जॉनसन.—शेक्सपिअरची नाट्यलेखनपद्धति अनुकरणानें प्राप्त होण्यासारखी नसल्याकारणानें जरी बोमंट, फ्लेचर, वेब्स्टर व इतर नाटककारांच्या नाटकांत त्याची नक्कल पहावयास सांपडते तरी त्याच्या मागें त्याचा स्वतंत्र संप्रदाय असा कांहीं शिल्लक राहिला नाहीं. शेक्सपिअरचा मित्र बेन जॉनसन याच्या ठिकाणीं जरी त्याची काव्यप्रतिभा नव्हती तरी बुद्धिमत्तेच्या कामांत जॉनसन हा जवळ जवळ शेक्सपिअरच्या बरोबरीचा होता. इ. स. १६४२ त नाटकगृहें बंद होईपर्यंत जॉनसनचीं नाटकें बरींच लोकादरास पात्र झालीं होतीं, आणि इ. स. १६६० नंतर देखील त्याच्या आनंदपर्यवसायी नाटकांचें अनुकरण करणारे नाटककार झाले. रोमच्या इतिहासांतील एखाद्या गुंतागुंतीच्या व लांबलचक प्रसंगावर नाटक रचणें किंवा लंडनच्या रस्त्यांत त्याच्या डोळ्यादेखत घडलेल्या एखाद्या प्रकारचें चित्र रेखाटणें असो, त्याला दोन्हीहि गोष्टी सारख्याच यशस्वी रीतीनें करितां येत होत्या. त्याजपाशीं तात्त्विक सिद्धांतांचा बराच मोठा भरणा होता. त्याचप्रमाणें वर्णनचातुर्य व रचनाकौशल्य हे गुण जरी त्याच्या ठिकाणीं प्रामुख्यानें वास करीत होते, तरी त्याच्या लिहिण्यांत सरळपणा व मोकळेपणा नाहीं. मानवजातीचें हिडिस चित्र दाखवून आपण तिला सुधारूं असा विचार करणाऱ्या एखाद्या औपरोधिक लेखकाप्रमाणें त्याचें लिहिणें होतें. त्याची पद्यरचना मोठी नेटनेटकी व ठाकठिकाची होती. तो गद्यलेखनांतहि निष्णात होता. बेन जानसनचीं प्रसिद्ध नाटकें येणेंप्रमाणें:—"एव्हरीमन इन् हिज ह्यूमर," "व्होलपोन ऑर दि फाक्स," दि अल केमिस्ट सेजॅनस कॅटिलाइन वगैरे.

चॅपमन.—जॉर्ज चॅपमन हा तीव्र भावना व्यक्त करणें व शृंगारिक नाटकांतहि गांभीर्य कायम ठेवणें, या विशिष्ट गुणामध्यें सर्व नाटककारांत श्रेष्ठ होता. परंतु त्याच्या क्षोभप्रधान नाटकांत प्रयोगाच्या दृष्टीनें बरेंच वैगुण्य दिसून येतें. त्याचीं महत्त्वाचीं नाटकें, "दिब्लाइंड बेगर ऑफ अलेक्झांड्रिया," 'ऑल फूल्स' 'दि जंटलमन अशर' वगैरे होत. त्याच्या होमरच्या भाषांतराबद्दल जॉनसन व किट्स यांनींहि त्याची प्रशंसा केली आहे. आणि हें भाषांतराचें कार्य म्हणजे त्याच्या आयुष्यांतील मोठेंच कार्य होय.

डेकर आणि हेवुड.—थॉमस डेकर व थॉमस हेवूड यांनीं निरनिराळ्या प्रकारचे ग्रंथ लिहिले आहेत. डेकर याच्यांत काव्यकल्पना उत्तम प्रकारची होती तर हेवुड हा त्याच्या वेळचें समाजचित्र उत्तम रीतीनें रेखाटण्यांत कुशल होता. 'ओल्ड फॉर्च्युनेटस' व 'दि ऑनेस्ट व्होअर' हे डेकरचे व 'इंग्लिश ट्रॅव्हलर' व 'वुमन किल्ड वुइथ काइंडनेस' हे हेवूडचे प्रसिद्ध ग्रंथ होते.

मिडल्टन व वेब्स्टर.—मिडल्टन हा जोरदार व वर्णनात्मक नाटकें व दुष्ट व प्रबळ मनोविकारांचीं प्रहसनें लिहिण्यांत निष्णात होता. त्याचप्रमाणें वेब्स्टरच्या लेखनपद्धतीनें दया व दहशत, राग व तिरस्कार इत्यादि मनोविकार चांगल्या रीतीनें व्यक्त झाले असून ती पुष्कळशी काव्यमय आहे. 'दि ओल्ड लॉ', 'दि चेंजलिंग', 'वुइमेन बिवेअर वुइमेन' हीं मिडल्टनचीं आणि "डचेस ऑफ मॉल्फि" व्हिटोरिया कोरोंबोना ऑर दि व्हाइट डेव्हिल इत्यादि वेब्स्टरचीं नाटकें होत.

बोमंट व फ्लेचर.—बोमंट फ्लेचर व मॅसिन्जर यांनीं सुखमय, दुःखमय व सुखदुःखमय अशीं तिन्ही प्रकारचीं बरींचशीं नाटकें लिहिलीं आहेत. त्या तिघांमध्यें बोमंटच्या लिहिण्यांतील विनोद व शुद्ध आणि मनोहर पद्यरचना लक्षांत घेऊन त्यासच अग्रस्थान द्यावें लागेल. फ्लेचरच्या नाटकांत पहिल्या जेम्सच्या वेळच्या ऐषआरामाचें व छानछुकीचें समाजचित्र आपणांस पहावयास मिळतें. त्याला विनोद उत्तम साधला असून नाटकांतील संभाषणें अगदीं स्वाभाविकपणें घालण्याचीहि कला साध्य झालीं होतीसें दिसतें. त्याच्या नाटकांतील पात्रें अगदीं ऐनवेळीं आपले स्वभाव पालटतात. यांचीं नाटकें—'फिलॅस्टर' 'दि मेड्स ट्रॅजेडी' 'बॉन्डुका' वगैरे.

मॅसिन्जर.—मॅसिन्जरच्या नाटकांत रचनाकौशल्य विशेष दिसून येतें व त्यांतील वक्तृत्वाचा प्रवाहहि संथ व एकसारखा आहे. त्याचप्रमाणें त्याच्या नाटकांत तात्त्विक व राजकीय विचार फारच कौशल्यानें गोवलेले आहेत. 'एन्यु वे टु पे ओल्ड डेट्स', 'दि बॉंडमन', 'दि रोमन ॲक्टर' वगैरे नाटकें यानें लिहिलीं आहेत.

फोर्ड व शर्ले.—यापुढें प्युरिटन लोकांनीं इ. स. १६४२ त नाटकगृहें बंद करीपर्यंत जॉन फोर्ड, व जेम्स शर्ले या दोन नाटककारांनीं नाट्यलेखनांतील उच्च संप्रदाय कायम ठेवला. 'दि ब्रोकन हॉर्ट' हें फोर्डचें नाटक प्रसिद्ध आहे 'मेड्स रिव्हेंज' 'ट्रेटर' इत्यादि पुष्कळ नाटकें शर्ले यानें लिहिलीं आहेत.

ग द्य र च ना—इ. स. १५७९ ते इ. स. १६६० पर्यंतचीकादंबऱ्या.—इलिझाबेथच्या वेळच्या कादंबऱ्यांची लेखनपद्धति चांगली नसल्याकारणानें त्या बहुतेक लुप्त झाल्या आहेत. परंतु त्यांचा उपयोग नाट्यलेखनाचें पोषण होण्याकडे झाला. लिलीच्या "यूफस" व "यूफस अँड हिज इंग्लंड" या प्रथम प्रसिद्धीस आलेल्या कादंबऱ्या होत. त्यांत सूक्ष्म अवलोकन व विनोदी भाषणपद्धति दृष्टीस पडते परंतु त्यांत खरें सौन्दर्य व तीव्र भावना दृष्टीस पडत नाहींत. लिलीच्या ग्रंथांतील नारिकेलपाक लेखन पद्धति त्याच्या ग्रीन व लॉज या सारख्या अनुयायास बरींच वर्षे अनुकरणीय झाली होती. या नंतर प्रख्यातीस आलेल्या नॅशची कादंबरी "जॅक हिल्टन" किंवा "दि अनफॉर्च्युनेट ट्रॅव्हलर" ही अगदीं स्वतंत्र पद्धतीची होती. याप्रमाणें या काळचें कादंबरीवाङ्मय अगदीं अल्पस्वरूपाचें होतें. पुढील शतकांत फ्रेंच कादंबरीकारांच्या उदाहरणानें व

अनुकरणानें इंग्लंडांत अद्‌भुत व शृंगारिक कादंबऱ्या निर्माण झाल्या.

टी का त्म क वा ङ्‌ म य.–सिडने यानें आपल्या "डिफेन्स ऑफ पोएसी" या पुस्तकांत व जॉन्सन यानें आपल्या "डिस्कव्हरीज" या पुस्तकांत प्रचलित प्रश्नांचीं प्रचलित उत्तरें नमूद करून ठेवलेलीं आहेत परंतु त्यावरून त्या काळच्या उत्पादित वाङ्‌मयाची कल्पना होत नाहीं. काव्यांत सत्य असतें हें ठरविण्याकरितां कवींवर ज्ञान संगृहित करण्याचें व लोकशिक्षणाचें काम अशीं दोन प्रकारचीं कामें सोंपविण्यांत आलीं होतीं. काव्याची उपयुक्तता प्रस्थापित करण्याकरितां काव्य हें आनंदानें व सद्धेतूनें सन्मार्गास लावतें, असें त्याचें समर्थन करण्यांत येत होतें. परंतु हें विधान फार झालें तर अन्योक्तिरूप व उपदेशपर काव्यासच लागू पडण्यासारखें आहे. शेक्सपिअरच्या नाटकांत दुःखपर्यवसानाचा अध्यात्मिक तत्त्वांशीं कसा मेळ घालण्यांत आला आहे हें टीकाकारांच्या बराच काळपर्यंत लक्षांत आलें नाहीं.

भा षा न्त रा त्म क वा ङ्म य.–या काळांतील टीकाकारांपेक्षां भाषांतरकारांची कामगिरी अधिक किंमतीची आहे. बर्नरच्या फ्रॉइसार्ट (इ. स. १५२३–१५२५) या ग्रंथापासून तें उर्क्‌हार्टच्या रॅबेले ( इ. स. १६५३ ) या ग्रंथापर्यंत या भाषांतरकारांच्या कार्यपरंपरेस दीर्घकालीन असा खंड कधींच पडला नाहीं. या भाषांतरकारांपैकीं जरी बरेच जण अप्रसिद्ध होते, तरी त्यांच्या एकंदर संख्येवरून किती लोकांचें गद्यलेखनाकडे लक्ष लागलें होतें, हें दिसून येतें. फायलेमन हालंड नांवाच्या भाषांतरकारानें लिव्ही, प्लिनी, सुटोनिअस यांच्या ग्रंथांचें व प्लूटार्कच्या नीतिशास्त्रविषयक ग्रंथांचें आणि कॅम्डनच्या "ब्रिटानिआ" या ग्रंथाचें भाषांतर केलें आणि त्याची इंग्रजी भाषाहि अत्यंत प्रशस्त व शुद्ध आहे. नार्थ यानें प्लूटार्कच्या चरित्रांचें, फ्लोरिओ यानें मान्टेनच्या निबंधाचें आणि शेल्टन यानें डॉन क्विक्झोट या पुस्तकाचें अशा रीतीनें भाषांतर केलें आहे. हीं भाषांतरें जरी अगदीं शब्दशः बरोबर नसलीं तरी त्यांतील मतलबाच्या व शैलीच्या दृष्टीनें मूळाबरहुकूम आहेत.

हूकरः—रिचर्ड हूकरचा "लॅाज ऑफ इक्लेझिआस्टिक पॉलिटि" हा इंग्रजी भाषेंतील विशेष नांव घेण्यासारखा, निदान विक्लिफ नंतर, इंग्रजानें लिहिलेला असा पहिलाच धर्मशास्त्रविषयक ग्रंथ आहे. त्याची भाषा बरीच क्लिष्ट असून त्यांतील वाक्यें लांबलचक व गुंतागुंतीचीं आहेत. हूकरच्या मागून झालेल्या जेरेमी टेलरसारख्या धार्मिक लेखकांस ही गुंतागुंतीची भाषासरणी न साधल्यामुळें त्यांनीं तुटक तुटक व साधीं वाक्यें लिहिण्याची पद्धति उपयोगांत आणली.

बेकनः—फ्रॅन्सिस बेकन (इ. स. १५६१–१६२६ ) पासून इंग्रजी तत्त्वज्ञानास प्रारंभ झाला. तो कायदेपंडित व वक्ता होता. त्याचा निरनिराळ्या व्यवहारांत हात होता, त्याची बुद्धि फार तरतरीत होती, आणि त्याचा लॅटिन वाङ्मयाशीं चांगला परिचय होता. या सर्व गोष्टींची झांक त्याच्या भाषासरणीवर उमटल्याशिवाय राहिली नाहीं. आपल्या धंद्यांतील नैपुण्याची जाणीव, आपल्या बौद्धिक बलाविषयीं आत्मविश्वास, शास्त्राच्या भावी उन्नतीवरील निष्ठा, निसर्ग व अनुभव यांच्या अनुरोधानें वागण्याचा दृढनिश्चय, जगाचा यच्चयावत् अनुभव सांठवून ठेवण्याची संवय, जगाचें सूक्ष्म अवलोकन आणि तें सर्व सूत्ररूपानें नमूद करून ठेवण्याची लकब, या सर्व गुणांमुळें जरी त्याच्यांत कवित्व नव्हतें तरी तो सुप्रसिद्ध गॉएटेच्या बरोबरीचा होता, असें म्हणण्यास हरकत नाहीं. नकाशांत पाहिल्याप्रमाणें त्याला सर्व जगाचें यथार्थज्ञान होतें. आणि मानवी बुद्धींतील नैसर्गिक दोष काढून टाकून जगाचे सर्व व्यवहार आपल्या पूर्णपणें ताब्यांत ठेवण्याची त्याची आकांक्षा होती. त्या आकांक्षेला धरून त्यानें अनेक पुस्तकें लिहिण्याचें योजिलें होतें, परंतु तीं सर्व त्याचे हातून पुरीं झालीं नाहीत. "ॲडव्हान्समेंट ऑफ लर्निंग" या पुस्तकांत त्यानें आपल्या योजनेचा नकाशा काढला, "दि नोव्हम ऑर्गनम" या ग्रंथांत त्यानें "स्कूलमेन" च्या तत्त्वज्ञानपद्धतींतील दोष दाखवून तर्कशास्त्रांतील प्रत्यक्ष संकलन पद्धतीची मांडणी केली; आणि "दि न्यू ॲटलॅंटिस" या ग्रंथांत त्यानें ज्याचे आचारविचार पूर्ण शास्त्रीय पद्धतीनें रचलेले आहेत आणि ज्याची उभारणी नैतिक पायावर केलेली आहे अशा समाजाचें काल्पनिक वर्णन केलें आहे. कोणत्याहि देशी भाषेपेक्षां लॅटिन ही अधिक चिरायु होईल अशी त्यावेळच्या बऱ्या मंडळींची समजूत होती. आणि बेकनचीहि तशीच समजूत असल्यामुळें त्यानें आपले मुख्य शास्त्रीय ग्रंथ लॅटिन भाषेंतच लिहिले आहेत. त्याच्या "निबंधांत" त्यानें मानवी आयुष्य व व्यवहार यावर जन्मभर संकलित केलेली मतें नमूद केलेलीं आहेत. या नमूद केलेल्या मतांवरून तो फार व्यवहारदक्ष व मुत्सद्दी, कोणास न भाळणारा, न्याय–अन्याय यांपेक्षां कार्यकारणावर जास्त नजर देणारा, स्त्रीपुरुषांवर फारसा भरंवसा न ठेवणारा, उदास परंतु सत्यास चिकटून राहणारा, आणि मधून मधून रुक्ष व संकुचित तर मधून मधून उदात्त व शहाणपणाचीं तत्त्वें प्रतिपादन करणारा, दिसून येतो. त्याची लेखनशैली विशेष परिणामकारक आहे. ती कारणपरत्वें संकुचित किंवा विस्तृत होते. अधिकारभ्रष्ट झाल्यानंतर त्यानें लिहिलेला सातव्या हेन्रीच्या कारकीर्दीचा इतिहास ( इ. स. १६२२ ) हा क्लॅरेन्डनच्या पूर्वीचा पहिलाच इंग्रजी ऐतिहासिक ग्रंथ होय. परंतु त्या काळचा मुख्य गद्यलेखक म्हटला म्हणजे शेक्सपिअर हा होय. शिवाय बेकन व

शेक्सपिअर यांच्या बरोबर बेन जॉन्सन याचेंहि नांव गद्यलेखकांच्या यादींत प्रामुख्यानें नमूद केलें पाहिजे.

स्टुअर्ट घराण्यांतील राजांची कारकीर्द संपण्याच्या सुमारास गद्य ग्रंथांत पांच निरनिराळ्या प्रकारची भर पडली. ( १ ) तत्त्वज्ञान ( २ ) धर्मशास्त्र (३) मृत्यूवरील काव्य कल्पनां ( ४ ) मनुष्यांचें व चालीरीतींचें अवलोकन, आणि ( ५ ) प्राचीन इतिहास. तो काळ नाणावलेल्या वैयक्तिक गद्यलेखकांचा असून अमुक एका विशिष्ट प्रकारचें किंवा ठशाचें गद्य निर्माण होण्याचा नव्हता. अद्याप लॅटिन भाषेचा लोकांच्या मनावर इतका पगडा होता कीं, त्यामुळें पुष्कळ वेळां बुद्धिवान लेखक आपले ग्रंथ इंग्रजींत लिहिण्याच्या ऐवजीं लॅटिनमध्यें लिहीत असत. "समाजरचनेचा मूळ करार" राजाची अनियंत्रित सत्ता, धर्मखात्यावर राजाचा ताबा, आणि मानवी प्राणी इत्यादि विषयांवरील हॉबचे विचार वाचून सर्व पक्षांतील लोकांस राग आला. आणि त्याचा ठसा तत्कालीन विचारावर आणि वादविषयक वाङ्मयावर उमटला.

जेरेमी टेलर हा इंग्लंडांतील धरतेशेवटचा दोषादोष विवेचक व स्कूलमन होता. त्यानेंच प्रथम धर्मसहिष्णुतेचा पुरस्कार केला. ग्रीक व लॅटिन ग्रंथांतून, पौरस्त्य ग्रंथातून, प्राणिवर्गांतून, थोरांच्या व पोरांच्या चरित्रांतून, घेतलेले निरनिराळे दृष्टांत त्याच्या ग्रंथांत सांपडतात. याचे ग्रंथ 'लिबर्टी ऑफ प्रॉफेसिइंग' व "लाइफ ॲण्ड डेथ ऑफ जीजस क्राइस्ट" हे आहेत.

या काळांत जे अनेक ऐतिहासिक माहितीनें भरलेले वादविषयक लेख व मासिक पुस्तकें प्रसिद्ध झालीं, त्यात क्लॅरेन्डनचा "हिस्टरी ऑफ रिबेलिअन" हा ग्रंथ विशेष महत्त्वाचा होता. बेकनचा "हेनरी दि सेव्हंथ" हा ग्रंथ बाजूस ठेविला तर त्या काळचें ऐतिहासिक लेखन केवळ प्रयोग स्थितींतलें होतें. रॅलेचा "दि हिस्टरी ऑफ दि वर्ल्ड" हा ग्रंथ फक्त त्यातील कांहीं उताऱ्यावरून प्रसिद्ध आहे. क्लॅरेन्डनच्या नंतर मिल्टननें आपले वादविवादात्मक गद्य ग्रंथ इ. स. १६४३ पासून इ. स. १६६० पर्यंत लिहिले.

"पुनः प्र स्था प ना," का ल,इ. स. १६६० तेंइ. स.१७०० प र्यं त चें वा ङ्म यः—सतराव्या शतकाच्या तिसऱ्या पादात इंग्लंडांतील वाङ्मयाच्या पुनरुज्जीवनास नवीनच दिशा लागली. इ. स. १५८० पासून यूरोपच्या "बुद्धि व कला" या क्षेत्रांत बरीच खळबळ उडून गेली होती. अंतःप्रेरणा म्हणून जिला म्हणतात ती इटलीमधून लयास गेली होती आणि ग्रीक व लॅटिन या जुन्या भाषांपासून कोणास प्रोत्साहन मिळेनासें झालें होतें. स्पेन देशांत नाट्यकलेची भरभराट होती,परंतु तिचा प्रभाव चहूंकडे विखुरलेला असून अप्रत्यक्ष होता. जर्मन देशांत वाङ्मयाचा नुकताच कोठें उदय झाला होता. परंतु त्याचा इंग्लंडवर कांहीं परिणाम झाला नव्हता. फ्रान्सच्या दक्षिण व उत्तर या दोन्ही दिशांस मात्र वाङ्मयाचें वर्चस्व प्रस्थापित झालें आणि अर्ध्या शतकांत त्यास चांगलेंच चिरस्थायित्व आलें. या फ्रान्सच्या वाङ्मयविषयक प्रभावापुढें इंग्लंडच्या बौद्धिक बळास हार खावी लागली, परंतु थोड्याच वेळांत त्यानें आपली जागा परत मिळविली आणि इ. स. १७२० पर्यंत तर इंग्लंडनें सर्व पारडें उलट फिरवून फ्रान्सवर वाङ्मयाच्या बाबतींत आपली सरशी करून दाखवली. ड्रायडनच्या वेळेस मात्र इंग्लंडच्या वाङ्मयास फ्रेंच वाङ्मयापासून बरीचशी मदत प्राप्त झाली.

फ्रें च वा ङ्म या चा प रि णा मः—फ्रान्समधील प्रॉटेस्टंट लोक इंग्लंडच्या आश्रयाला येऊन राहिले होते. त्यांनीं बऱ्याच फ्रेंच ग्रंथांचीं भाषांतरें केलीं. त्यांचा परिणाम गद्यपद्यात्मक वाङ्मय ,नाट्य व औपरोधिक वाङ्मय,टीकात्मक व सूत्ररूपी वाङ्मय आणि धार्मिक व सर्वसामान्य तात्विक विचार यांजवर झाल्याशिवाय राहिला नाहीं. प्लेटो, होमर व ग्रीक नाटककार यांच्या वाङ्मयाचा अंमल कमी होऊन ज्युव्हेनल, होरेस इत्यादि लॅटिन ग्रंथकारांचें वजन वाढत गेलें. या लॅटिन ग्रंथांचा इंग्रजी वाङ्मयावर बराच परिणाम झाला हें,त्यांचें ड्रायडन यानें भाषांतर केलें या गोष्टीवरूनच स्पष्ट होतें. कॉर्नेली व रॅसीन या फ्रेंच नाटककारांनीं आपली शोकमय नाट्याची पद्धत सेनेकापासून घेतली होती आणि इंग्लंडमध्यें या वेळीं त्यांचें वजन अधिकाधिक पडत असल्यामुळें शेक्सपिअर, फ्लेचर इत्यादिकांचें अनुकरण करण्याची प्रवृत्ति कमी होत चालली. फ्रेंच टीकाकारांच्याहि लेखनपद्धतीचें ड्रायडन यानें अनुकरण केलें. या अनुकरणेच्छेमुळें काव्यस्फूर्तीचा लय झाला. वीररसप्रधान काव्य, वीणाकाव्य व शोकमयनाट्य इत्यादि लेखनपद्धतीचा ऱ्हास झाला आणि अशा रीतीनें उत्पादकशक्ति नाहींशी झाल्यामुळें लेखकांचें लक्ष जुन्या ग्रंथांचें भाषांतर किंवा रूपांतर करण्यांतच गुंतून गेलें. याचा परिणाम असा झाला कीं, इंग्लंडमध्यें हा काळ म्हणजे दुय्यम प्रतीच्या पद्यरचनेचा आणि नवीन व कधीं कधीं कडक टीकात्मक ग्रंथरचनेचा काळ होऊन बसला.

शा स्त्र व वा ङ्म य.—तीच संशोधनबुद्धि शास्त्र व तात्त्विक विचार या क्षेत्रात विशेष तीव्रपणानें दिसूं लागली. नवीन स्थापन झालेल्या 'रॉयल सोसायटी' या संस्थेच्या कार्याचा वाङ्मयावर प्रत्यक्ष परिणाम झाला. अगदीं शुद्ध, सरळ व स्वाभाविक बोलण्याच्या पद्धतीप्रमाणें लेखन पद्धति असावी असा त्या संस्थेचा इतिहासकार स्प्रॅट यानें त्या संस्थेच्या कार्यक्रमांत निर्बंध घातला होता. ही वेळ शास्त्रीय संशोधनास अनुकूल होती. जॉन लॉक याचा 'एसे कन्सर्निंग ह्यूमन अंडरस्टँडिंग' हा ग्रंथ याच वेळेस बाहेर पडला. त्याच्या ग्रंथावरून हॉबच्या वेळेपासून तत्वज्ञानविषयक लेखनांत किती फरक पडला हें दिसून येतें.

द र बा री व सा मा जि क प रि स्थि ती चा प रि णा म—पुनः प्रस्थापनेपूर्वी मिल्टन व मार्व्हेल यांच्यासारखे अपवाद बाजूस ठेवले तर सर्व ग्रंथकार राजाश्रयानें व दरबारी छत्राखालीं रहात असत. परंतु "सिव्हिल वॉर"पासून हा त्यांचा

आश्रय सुटला होता; तो नवीन राजाची गादीवर प्रस्थापना झाल्यानंतर त्यांस फिरून प्राप्त झाला. दुसरा चार्लस ग्रंथकारांस मदत करी, त्यांच्याशीं आनंदानें संभाषण करी, शास्त्राला उत्तेजन देई व नाटकमंडळ्यांसहि आश्रय देत असे. त्यामुळें ग्रंथलेखनास चांगलेंच उत्तेजन मिळालें.

ग द्य म य व टी का त्म क वा ङ्म य—गद्यलेखनपद्धतींत जो फरक पडत गेला त्याचें श्रेय कोणत्याहि एका वैयक्तिक लेखकाकडे देतां येणार नाहीं. आपण जर प्रथम ऑटवेची किंवा लेडी रेचेल रसेल हिचीं पत्रें किंवा पेपीची रोजनिशी किंवा पूर्वींच्या राजकीय खटल्यांतील जबान्या किंवा नाटकांतील संभाषणें वाचलीं; नंतर एल' एट्रेंजचीं पत्रकें किंवा बर्नेटचा 'हिस्टरी ऑफ माय ओन टाइम' हा ग्रंथ वाचला आणि अशा रीतीनें वाचीत वाचीत अखेर ड्रायडनचा 'प्रिफेस टु हिज फेबल्स' हा ग्रंथ वाचला तर गद्याचा ओघ कसकसा वहात जाऊन शेवटीं आपण जिला आधुनिक भाषासरणी किंवा लेखनपद्धति म्हणतों ती कशी निर्माण झाली हें कळून येईल. ड्रायडनच्या सफाईदार लेखन पद्धतीचा विचार केला म्हणजे त्यानें नाट्यग्रंथ लिहिण्यापेक्षां सर्व गद्यात्मक ग्रंथच कां लिहिले नाहींत, याबद्दल खेद वाटतो. ड्रायडनचे गद्यग्रंथ म्हणजे त्यानें आपल्या नाटकांस जोडलेल्या प्रस्तावना होत; तथापि त्याच्या या टीकात्मक ग्रंथाच्या दर्जाचे गद्यग्रंथ पुढील शंभर वर्षांतहि पहावयास मिळत नाहींत. या काळच्या गद्यास वळण देण्याच्या कामीं ड्रायडनच्या बरोबर आणखी चार गद्य लेखकांच्या नांवांचा उल्लेख करण्यांत येतो. ते गद्यलेखक म्हणजे स्प्रॅट, टिलटसन, सर वुइल्यम टेंपल व हॅलिफॅक्स हे होत. या सर्वांत हॉलिफॅक्सचे राजकीय विषयावरील निबंध व म्हणी आधुनिक गद्याच्या तोडीच्या असून ड्रायडन व स्विफ्ट यांच्या दरम्यानच्या काळांत अत्यंत लोकादरास पात्र झाल्या होत्या.

प्यू रि ट न पं था चे ग द्य ग्रं थ का र—बॅक्स्टर व होवे, फॉक्स व बनिअन हे प्यूरिटन पंथाचे गद्य ग्रंथकार होते व त्यांच्या लेखनास ख्रिस्ती धर्मग्रंथांपासून स्फूर्ति मिळाली होती. यापैकीं पहिल्या दोन ग्रंथकारात विद्वत्तेचाहि भाग बराच होता. बॅक्स्टर याचा ग्रंथलेखनाचा व्याप बराच मोठा होता. आणि त्याचे 'सेंट्स एव्हरलॉस्टिंग रेस्ट' व "आत्मचरित्र' हे ग्रंथ त्यावेळीं बरेच लोकप्रिय झाले होते होवेच्या 'दि लिव्हिंग टेंपल ऑफ गॉड' या ग्रंथाची आणि फॉक्सच्या 'जर्नलची'ची त्या वेळेस बरीच ख्याति होती. बनिअनचें शिक्षण जरी या सर्वांत कमी प्रतीचें होतें तरी त्याला स्वभावतःच लेखनकला चांगली साधली होती. त्याच्या धार्मिक मतांप्रमाणेंच त्या काळच्या जवळजवळ अर्ध्याअधिक राष्ट्राचीं मतें होतीं. त्यानें नुसता ख्रिस्ती धर्मग्रंथच वाचला नसून त्या वेळच्या इतर लोकांप्रमाणें राक्षसांच्या, यात्रेकरूंच्या व धाडसांच्या अन्योक्तिरूप गोष्टीहि वाचल्या होत्या. त्यानें लिहिलेलें 'दि पिलग्रिम्स प्रोग्रेस' हें पुस्तक तज्जातीय ग्रंथांच्या रुक्ष अरण्यांतील एक रमणीय फुलझाड होतें असें म्हणण्यास हरकत नाहीं.'दि प्रोग्रेस' हें बनिअनला पडलेलें स्वप्न आहे तथापि त्यानें सांगितलेलें तें स्वप्न वाचीत असतां तें जितकें त्याला स्पष्टपणें दिसत असावेंसें वाटतें, तितकें पुष्कळ जणांस त्यांच्या जागृतींतले विचारहि कळत नसतील. त्यांतील प्रस्तुत व अप्रस्तुत हे एकमेकांत इतके मिसळले आहेत कीं तें पुस्तक वाचतांना आपण एखादा अन्योक्तिरूप ग्रंथ वाचीत आहोंत असें देखील वाटत नाहीं. "ग्रेस आबाउंडिंग दि होली वॉर", "दि लाइफ अँड डेथ ऑफ मि. बॅड मन" हे बनिअनचे इतर ग्रंथ होत. पारमार्थिक विचारसरणी, विनोदी लेखनशैली, खुबीदार परंतु साधी व जोरदार भाषा हे गुण तत्कालीन इतर ग्रंथकारांपेक्षां बनिअनमध्यें विशेष प्रमाणांत वास करीत होते.

जुन्या व नव्या पद्यरचनेंत फरक घडून आला, तो अगदीं अनपेक्षित रीतीनें घडला असें नाहीं. जुने विषय मागें पडून मागें पडलेले उदयास आले, आणि कांहीं कांहीं पद्यांत तर अगदींच नवीन विषय दृष्टीस पडूं लागले. जॉन ओल्डहॅम व अँड्रयु मार्व्हेल यांच्या लेखनांत दोन्ही प्रकारची पद्यरचना पहावयास सांपडते. दोघांनींहि प्रथम कल्पनात्मक पद्यें व विलापगीतें रचून शेवटीं औपरोधिक काव्यरचना केली. याच सुमारास सॅम्युअल बटलरनें प्रसिद्ध केलेल्या "ह्यूडिब्रास" (१६६३-१६७८) काव्यांत आपणास निराळ्याच प्रकारचें औपरोधिक काव्य पहावयास सांपडतें.

ड्रायडन.—गद्यांत, पद्यांत व कांहीं अंशीं नाट्यांतहि जॉन ड्रायडन हा त्या काळीं अग्रगण्य होता. त्यानें प्रथम क्रॉमवेलवर आणि नंतर चार्लसवर प्रशंसापर काव्यें लिहिलीं. त्यांतील कविता उत्तम आहेत परंतु प्रशंसा मिथ्या आहे. त्याच्या ॲनस मिरॅबिलिस या काव्यांत ग्रंथिक सान्निपात, आग व दर्यावरील युद्धांतील विजय यांचें सविस्तर वर्णन आहे. नियमक व सयमक कविता यांच्यांतील व इलिझाबेथन युगांतील नाट्य व फ्रेंच नाट्य यांच्यांतील संवादस्वरूपाचा त्यानें लिहिलेला ड्रॅमॅटिक पोएसी या विषयावरील निबंध जवळ जवळ आधुनिक भाषापद्धतीचा आहे. ही गद्यलेखन पद्धति ड्रायडनला अचानक रीतीनें साध्य झाली. पद्य लेखनकला साध्य करून घेण्यास मात्र त्याला कांहीं विलंब लागला. इ. स. १६८० पर्यंत नाटकें लिहून तो आपला निर्वाह करीत असे. परंतु त्याचीं तीं नाटकें त्यांच्या गद्य प्रस्तावनाइतकींहि टिकलीं नाहींत. त्याच्या विरोधपर ग्रंथांत वादविवादात्मक पद्यांत, अर्पणपत्रिकांत आणि भाषांतर स्वरूपी लेखांत मात्र, त्याची भाषासरणी व पद्यरचनापद्धति पूर्णत्वास पोहोंचली होती, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

शो क म य ना ट कें.—पुनः प्रस्थापना काळांतील व राज्यक्रांतीच्या वेळचीं शोकमय नाटकें बहुतेक रुक्ष आहेत. मौजेनें वाचण्यास तर तीं सर्वथैव निरुपयोगी आहेत. परंतु त्यांत कल्पनेच्या भराऱ्या बऱ्याच उंच असून तीं ऐतिहासिक

माहितीच्या दृष्टीनें महत्त्वाची आहेत. थॉमस ऑटवे व नॅथॅनील ली हेहि त्या वेळचे शोकमय नाटकें लिहिणारे होते. दोघांनींहि नियमक कवितेचा उपयोग केला आहे. ऑटवेचें 'व्हेनिस प्रिझर्व्हड्' हें नाटक वीररसप्राधान्याच्या दृष्टीनें शेक्सपिअरच्या तोडीचें आहे. परंतु त्याची हलक्या प्रतीची लेखनशैली आणि पद्यरचना इतर वेळीं ग्राह्य होणें शक्य नाहीं. ली हा कवि या दृष्टीनें अधिक सरस होता परंतु त्याला नाट्यकला चांगलीशी साधली नाहीं.

आ नं द म य ना ट कें.––जॉनसनचें अनुकरण करणें सोपें असल्यामुळें "पुनःप्रस्थापना" युगांतील नाटककारांनीं प्रथम त्याचेंच अनुकरण केलें. शाडवेल व वुइल्सन यांच्या नाटकांत तत्कालीन समाजस्थिति उत्तम रीतीनें प्रतिबिंबित झालेली पहावयास सांपडते. ड्रायडनच्या आनंदमय नाटकांत त्याचे उत्तम गुण दृष्टीस पडत नाहींत. इतर नाटककारांप्रमाणें त्यानें फ्रेंच नाटकांतील बऱ्याचशा कल्पना घेतल्या असून मोलिअरचें अनुकरण करतांना त्याच्या कृतीला अगदीं हिडिस स्वरूप दिलें आहे. सर जॉर्ज एथरेज यानें आपल्या नाटकांत त्या काळच्या समाजांत दिसून येणारा चैनीपणा व उद्धटपणा उत्तम रीतीनें रेखाटला आहे. मॅसिंजर व कॉंग्रीव्ह यांच्या मधल्या काळांत वायचरले हा एकटाच आनंदमय नाटकें लिहिणारा सुप्रसिद्ध नाटककार झाला. त्यानें आपलीं नाटकें गद्यांत लिहिलीं आहेत आणि तें गद्य अतिशय उत्तम असून अगदीं आधुनिक स्वरूपाचें आहे.

अ ठ रा वें श त क.—इ. स. १६६० च्या 'पुनःप्रस्थापना' काळांत ज्या सामाजिक स्थित्यंतरांस प्रारंभ झाला.त्यांचा अंमल ॲन राणीच्या कारकीर्दींत(१७०२-१७१४)चांगलाच बसलेला दिसून आला. समाजांतील सर्व दर्जाच्या लोकांत पुस्तकी ज्ञानाचा प्रवेश झाला.त्यामुळें हा काळ वर्गीकरणाचा व विस्ताराचा होता. देशांत ग्रंथवाचनाचा प्रसार जसजसा अधिक होत गेला, तसतसा इंग्रजी ग्रंथकारांचा एककल्लीपणा व त्यांच्या लिहिण्यांतील दुर्बोधपणा नाहींसा होत गेला. अठरावें शतक हें विशेषकरून गद्यलेखनाचें युग होतें, आणि जरी या काळांत अतिशय उत्कृष्ट गद्य दाखवितां येणार नाहीं, तरी गद्याचे निरनिराळे प्रकार पहावयास सांपडतात. बोलिंगब्रोक, ॲडिसन व बर्कले यांची सरदारी बाण्याची लेखनपद्धति फील्डिंगची सभ्यपणाची, बटलर, मिडलटन, स्मिथ व बेन्थॅम यांची तार्किक व वादविवादाची, जॉनसन व त्याच्या चहात्यांची समगतिक व समतोलाची; ह्यूम व मॅकिनटॉश यांची शुद्ध व प्रवाही; वॉलपोलची हलकी, सोपी, व विनोदी, कौपरची दैवी संभाषणाची, ग्रे व बर्कले यांची रंगेलपणाची, बर्कची गंभीरपणाची, स्विफ्ट व डिफो यांची निबंधलेखकांस शोभण्यासारखी, स्टर्नची लबाडीच्या सलगीची, शेरिडानची नाटकी व नटवेपणाची, गिबनची डामडौलाची आणि गोल्डस्मिथची झुळझुळ वाहणारी इतक्या तऱ्हेची भाषापद्धति जी आपणास अठराव्या शतकाच्या इंग्रजी वाङ्मयांत दृष्टीस पडते तितक्या तऱ्हेची दुसऱ्या कोठेंहि दृष्टीस पडत नाहीं. परंतु वाङ्मयाचें ऐतिहासिक पर्यालोचन करणारास त्याच्या गुणांची कशी वाढ झाली हें पाहण्यापेक्षां त्यांतील निरनिराळ्या प्रकारांचा विकास झाला हें पाहणें अधिक श्रेयस्कर आहे. अठराव्या शतकांत गद्य वाङ्मयाच्या निरनिराळ्या प्रकारांचा विकास अतिशय उत्तम रीतीनें झाला. वाङ्मयाच्या बहिरंगाचाच तेवढा विचार केला तर असें दिसून येतें कीं अठराव्या शतकांतील गद्य व पद्य हीं दोन्हीं ड्रायडनच्या नमुन्यावर विकास पावत गेलीं. वाङ्मयाच्या अंतरंगाचा म्हणजे त्यांत येणाऱ्या विषयांचा विकास शहरवासीयांच्या रहाणीवर अवलंबून असल्यामुळें आणि ती रहाणी व्यापाराच्या वाढीबरोबर बदलत जात असल्यामुळें अठराव्या शतकांतील इंग्रजी व्यापार जसा झपाट्यानें वाढत गेला तसा वाङ्मयाच्या अंतरंगालाहि नानाविधपणा प्राप्त होत गेला. लोकांची अभिरुचीहि झपाट्यानें बदलत गेली. वाचकांची संख्या दरदिवशीं वाढत गेली. वृत्तपत्रांबरोबर पुस्तकांच्या जाहिराती देण्याचा प्रघात सुरू झाला आणि आतां विद्वान ग्रंथकारांनीं काय लिहावें हा मुख्य प्रश्न नसून अनेकविध वाचकांस वाचावयास काय पाहिजे हा मुख्य प्रश्न होता. या शतकांत भरभराटीस आलेले वाङ्मयाचे प्रकार म्हटले म्हणजे निबंधलेखन व औपरोधिक वाङ्मय, आणि त्याचे प्रमुख लेखक ॲडिसन व स्टील, स्विफ्ट व गोल्डस्मिथ आणि पोप व चर्चिल हे होत. पोप व त्याच्यामागून लेडी मेरी वार्टले मॉन्टेग्यू या दोघा लेखकांनीं प्रथम पत्रलेखनाचें कला या दृष्टीनें सविस्तर विवेचन केलें. व्यक्तिविषयक टीका व चरित्रें यांपासून वाचकांस पुष्कळशी ऐतिहासिक माहिती मिळते परंतु या वाङ्मयाच्या प्रकाराचा हा वेळ पर्यंत इंग्रजींत अभाव दिसून येतो. ॲडिसनचे कल्पनामय निबंध आणि डीफोचीं साधीं चरित्रें यांच्या योगानें इंग्रजी कादंबरीवाङ्मयाचा मार्ग खुला करून दिला. त्याचप्रमाणें स्थलवर्णनपर, नियतकालिक व टीकात्मक ग्रंथांचीहि या शतकांतील वाङ्मयांत बरीच भर पडली.

अठराव्या शतकाच्या सुरवातीस जॉन लॉक व जोसेफ ॲडिसन हेच बहुजनसमाजास वळण देणारे ग्रंथकार होते. इ. स. १७०४ च्या आक्टोबर महिन्यांत जेव्हां लॉकनें आपल्या वयाच्या बहात्तराव्या वर्षी इहलोक सोडला, तेव्हां त्यानें गेल्या शतकांत कोणीहि केलें नाहीं, इतकें जनमत तयार केलें होतें. सामाजिक कर्तव्य व सामाजिक जबाबदारी हीं त्याचीं दोन मुख्य तत्त्वें होतीं. या दोन तत्त्वांची आवश्यकता प्रतिपादन करतांना तो आपल्या "ह्यूमन अंडरस्टँडिंग" या ग्रंथांत म्हणतोः—ज्ञानाच्या कोणत्याहि भागांत सारासार विचारावांचून चालावयाचें नाहीं. परंतु जोसेफ ॲडिसन ( १६७२—१७१९ ) हा त्या काळीं नव्याचा विशेष अभि-

मानी होता. त्यानें प्रथम सतराव्या शतकाच्या भाषेंतील कठिण शब्दांचे प्रयोग, तिच्यांतील खुशामतीचे प्रकार, तिचा डामडौल व अवडंबर आणि तिच्यांतील शब्दार्थविरोध वगैरे सर्व दूर झुगारून दिले. इंग्रजी कादंबरी वाङ्मयाचा उदय होण्यापूर्वीच्या शतकार्धास "स्पेक्टेटरचें" शतकार्ध म्हटलें तर अतिशयोक्ति होणार नाहीं.

स्विफ्टच्या अधिक कल्पकबुद्धीच्या आणि स्टीलच्या अधिक शोधक व आनंदी स्वभावाच्या संसर्गानें ॲडिसनचें मन विकसित झालें होतें. लांबलचक प्रवचनें व अघळपघळ भाषणें यांच्याऐवजीं जर सद्बुद्धि सदभिरुचि व सद्भावयुक्त नीति यांचे धडे वाचकांस दिले व तेहि अगदीं सोप्या व सफाईदार भाषेंत दिले तर ते त्या नागरिक युगांत जास्त ग्राह्य होतील हें रिचर्ड स्टीलनें ( १६७२–१७२९ ) प्रथम ओळखलें आणि त्याप्रमाणें करण्याचा त्यानें "टॅटलर" नांवाच्या मासिक पुस्तकांत ( १७०९–१७१० ) प्रारंभहि केला. सद्गुणाच्या स्तुतिपर व मूर्खपणाच्या निंदापर असा एखादा निबंध आपल्या मित्राच्या नियित कालिकांत मधून मधून प्रसिद्ध करणें हें काम ॲडिसनच्या लायकीचें असून तसें करण्यास त्याला आयतीच संधि मिळाली. इ. स. १७११त जेव्हां टॅटलर बंद पडून त्याची जागा स्पेक्टेटरनें घेतली तेव्हां ॲडिसन तें चालविण्याच्या कामीं विशेष उत्साहानें भाग घेऊं लागला. ॲडिसनच्या लेखन शैलीवर विचार केला म्हणजे असें म्हणावें लागतें कीं, कंटाळवाण्या तत्कालीन इंग्रजी लेखनपद्धतीच्या जागीं कॉफीपानगृहांत वाङ्मयाचा प्रसार करण्याकरितां, सुबक, चटकदार व थाटामाटाची फ्रेंचपद्धतीची भाषा वापरणारा असा योग्य लेखक पाहिजे होता तसा तो योग्य वेळीं पुढें आला. स्टील हा लोकांच्या मर्जीतून उतरला. स्विफ्टच्या लेखांकडेहि कोणी पाहीनासें झालें व तो पुढें वेडा झाला परंतु ॲडिसनचें महत्त्व इतकें वाढलें कीं, त्या काळच्या प्रत्येक सद्गृहस्थास त्याचे निबंध वाचणें अत्यावश्यक होऊन बसलें. इ. स. १७१७ पासून इ. स. १७७५ पर्यंत लोकमतास वळण देण्याच्या कामीं तर ॲडिसन लॉकच्या तोडीचा लेखक होता.

स्विफ्टः—समाजाचा घटकावयव अशा रीतीनें मनुष्यमात्राचा विचार न करितां, मनुष्याच्या खाजगी व राजकीय चारित्र्याची दुसरी बाजू जोनेथन स्विफ्ट यानें लोकांपुढें मांडली. विनोद, तर्कशास्त्र, जोरकसपणा, आटोपशीरपणा व सोपेपणा इत्यादि गुणांत त्याच्या लेखनशैलीची बरोबरी कोणत्याहि लेखकास येणार नाहीं.

बोलिंगब्रोक.—बोलिंगब्रोकच्या ग्रंथांतील मजकुराच्या किंवा त्याच्या लेखनपद्धतीच्या अशा कोणत्याहि दृष्टीनें विचार केला तरी त्याच्या लेखनाचें आतां विशेष महत्त्व वाटत नाहीं. त्याच्या कल्पना जरी परोच्छिष्ट होत्या तरी ऐतिहासिक दृष्ट्या त्याच्या ग्रंथांचें महत्त्व आहे. त्याची भारदस्त, समतोल आणि अलंकारिक भाषासरणी राजकारणी पुरुषांस आदर्शभूत होती.

डीफो.—डीफोनें आपला रॉबिन्सन क्रूसो नांवाचा ग्रंथ आपल्या वयाच्या साठाव्या वर्षी लिहिला. हुबेहूबपणा हा त्याच्या वर्णनांतील विशिष्ट गुण होता. डीफोचें कथानक, ॲडिसनचें मानवी स्वभाववर्णन, फील्डिंगचें समाजस्थितिचित्र आणि रिचर्डसन व स्टर्न यांचें भावना वर्णन हे सर्व गुणधर्म एकवटले म्हणजे आपणांस अठराव्या शतकांत कादंबरी वाङ्मयाचे सर्व गुणधर्म पहावयास मिळतात. पोपपंथी कवींनीं फक्त सयमक पद्यरचनेचा एक प्रकार शोधून काढला. परंतु ॲडिसन स्टील, स्विफ्ट व डीफो यांनीं गद्यांतील कादंबरीचा एक स्वतंत्र भाग शोधून काढला. यामुळें १७ व्या शतकांतील पद्यलेखकांपेक्षां गद्यलेखकांची कामगिरी अधिक महत्त्वाची आहे.

पोप —तीव्र मनोविकार, कल्पना व गायनाभिरुचि इत्यादि प्रतिभासंपन्न कवींत लागणाऱ्या गुणांचा अलेक्झांडर पोपमध्यें (१६८८–१७४४) अभाव होता. त्याचें अत्युत्कृष्ट काव्य म्हटलें म्हणजे "सटायर्स ॲंड एपिसल्स", परंतु तें पद्यात्मक गद्य या स्वरूपाचें आहे. खुबीदार, जोरदार व खोंचदार शब्दप्रयोगांमध्यें मात्र त्याचा हात धरणारा कोणी नाहीं. त्याच्या ठराविक कल्पना, त्याच्या लिहिण्यांतील विषारी खोंचा आणि त्याचा खुबीदार वाग्विस्तार या गुणांमुळें त्या नागर युगांतील लोकांनीं त्याचे देव्हारे माजविले होते. सुप्रसिद्ध ग्रंथकार व्हाल्टेर यानें तर सर्वोत्कृष्ट कवि म्हणून पोपची शिफारस केली होती आणि पोपच्या अंतकालीं त्याच्या लेखनपद्धतीचें वर्चस्व सर्व सुधारलेल्या राष्ट्रांत प्रस्थापित झालें होतें. काव्यलेखनानें द्रव्यार्जन करणारा पोप हा पहिलाच इंग्रज–कवि होता. त्याच्या काव्यपद्धतीचें जिकडे तिकडे इतकें अनुकरण झालें व त्यामुळें त्याचें इतकें स्तोम माजलें कीं, त्याचा काव्यसंप्रदाय कायमचा होतो कीं काय, अशी एकवेळ भीति वाटूं लागली होती. प्रायर, गे, पार्नेल, अकेन्साइड, पाम्फ्रेट, गार्थ, यंग, जॉन्सन, गोल्डस्मिथ, फॉकनेर, ग्लोव्हर, ग्रेन्जर, डार्विन, रॉजर्स, हेले आणि इतर शेंकडो कवी काव्यलेखनाच्या बाबतींत पोपला आपला गुरु मानीत असत. याप्रमाणें इ स. १७१४ पासून इ. स. १७९८ पर्यंत जरी पोपच्या काव्य पद्धतीचा बहुतेक सार्वत्रिक प्रसार झाला होता तरी त्यावेळीं त्याच्याहून निराळ्या व स्वतंत्र पद्धतीनें काव्य लिहिणारे कवी होतेच.

टॉम्सन.—जेम्स टॉम्सन यानें आपलें 'दि विंटर' हें काव्य लिहून इंग्रजी काव्यवाङ्मयांत नवीनच प्रघात सुरू केला. लेडी विंचिल्सी, "सायडर" काव्याचा लेखक जॉन फिलिप्स, आणि "ग्रॉंगर हिल" काव्याचा कर्ता

जॉन डायर यांनीं काव्यांत सृष्टींचें सत्यपूर्ण व अकृत्रिम आणि त्याजबरोबर अद्‌भुत रसात्मकहि वर्णन असावें असें प्रतिपादन केलें होतें. परंतु वॉलर व कौले यांच्या वेळेपासून काव्यामध्यें जो कृत्रिमपणा व भाषेचा रूक्षपणा शिरला होता त्याच्या विरुद्ध टॉम्सन यानें प्रथम विरोध करण्यास सुरुवात केली. ज्यावेळीं पोपची पद्यरचना सर्वमान्य झाली होती, त्यावेळीं टॉमसननें उत्कृष्ट काव्यास नियमक पद्यरचना सोयीची आहे असें म्हणून पोपच्या पद्यरचनेचें अनुकरण केलें नाहीं. त्यानें आपली निसर्गसौन्दर्याची कल्पना त्याचे अनुयायी सॅन्ड्स, आर्मस्ट्रांग, सामर्व्हिली, लँगहॉर्न, मिकल व शेन्स्टोन यांच्यापर्यंतच नव्हे तर शोकगीत रचणारे कोलिन्स, ग्रे व कौपर यांच्यापर्यंत आणि अप्रत्यक्षपणें इ. स. १७९८ च्या वीणाकाव्य लेखकांपर्यंत पोहोंचविली.

यावरून अठराव्या शतकांत सर्व काव्यरचना पोपच्या धर्तीची होती असें म्हणणें वाजवी होणार नाहीं. ज्या वेळीं लोकांची अभिरुचि पोपच्या काव्यरचनेची चहाती होती त्यावेळीं जर कोणी तद्‌भिन्न काव्यरचना करूं लागला तर त्याची नाउमेद होणार हें उघड होतें. तथापि तशा स्थितींतहि तसलें काम करण्यास जे कवी पुढें आले त्यांत कोलेन्स, स्मार्ट, कौपर, ब्लेक हे चार कवी मनानें दुर्बल होते ग्रे हा एकान्तवास प्रिय होता आणि शेन्टोन व टाम्सन हे एकान्तवासप्रिय असून शिवाय आळशी होते.

कादंबरी.—अठराव्या शतकांत जे गद्य लेखक झाले त्यांत रिचर्डसन, फील्डिंग, स्मालेट व स्टर्न हे आद्य कादंबरीकार बरेच सुप्रसिद्ध व स्वतंत्रबुद्धीचे होते. या सुमारास इंग्लंडमध्यें मध्यमवर्ग उदयास आला होता. त्यांतील लोकांस बरीच फुरसत असल्यामुळें त्यांस त्यांच्या फावल्या वेळीं करमणुकीचीं पुस्तकें वाचण्याची आवश्यकता भासूं लागली होती. शिवाय जेरेमी कोलिअर यानें नाट्यावर कोरडे ओढल्यापासून नाट्यावरून लोकांचें मन उतरलें होतें. आणि तीहि गोष्ट लोकांस कादंबरीची आवश्यकता भासविण्यास कारणीभूत झाली. टॅट्लर व स्पेक्टेटर या साप्ताहिकांनीं कादंबरीची भूमिका तयार केली होती. फ्रान्समध्यें या सुमारास कादंबरीवाङ्मयाचा बराच प्रसार झाला होता, आणि त्यामुळें जेव्हां सॅम्युएल रिचर्डसन ( इ. स. १६८९–१७६२ ) यानें आपल्या पामेला व क्लॅरिसा या सुप्रसिद्ध कादंबऱ्या लिहिल्या, तेव्हां त्यानें कादंबरीलेखनाची कला नवीन शोधून काढली असें म्हणण्यापेक्षां त्यानें ती इंग्लंडामध्यें नवीन आणली असें म्हणणें अधिक सयुक्तिक होईल.

फील्डिंगः—रिचर्डसन [illegible]री फील्डिंग ( इ. स. १७०७–१७५४ ) यांच्या परस्परविरोधी झुंजेमुळें इंग्लंडांतील कादंबरीवाङ्मयाची बऱ्याच जोरानें भरभराट झाली. पातिव्रत्य व सद्‌गुण यांच्यावर विशेष कटाक्ष असल्यामुळें रिचर्डसनच्या कादंबऱ्यांतून नीतीचें विशेष स्तोम माजविण्यांत आलें होतें. त्यानंतर जेव्हां फील्डिंगच्या लिहिण्यांत नैतिक बाबींसंबंधीं बेपर्वाई दिसूं लागली, तेव्हां तत्कालीन वाचकांस ती एक प्रकारचा सुधारणाच झाली असें वाटूं लागलें. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे रिचर्डसन व फील्डिंग यांच्या लिहिण्याच्या दिशा अगदीं विरुद्ध असल्यामुळें त्यांच्या कादंबऱ्यांतून इंग्रज लोकांच्या चारित्र्यांतील अगदीं परस्परविरुद्ध बाजू वाचकांच्या नजरेस पडतात. फील्डिंग हा राजपक्षीय तर रिचर्डसन प्रजापक्षीय होता. फील्डिंग हा साधा सद्‌गृहस्थ, तर रिचर्डसन व्यापारी होता. फील्डिंग हा नागरिकांचा, तर रिचर्डसन हा खेडवळ लोकांचा प्रतिनिधि होता. रिचर्डसनच्या ठिकाणीं अवलोकनाची उत्कृष्ट कला व बुद्धिमत्तेची तीव्रता होती परंतु फील्डिंगच्या ग्रंथांतून जी विनोदाची रेलचेल व जें लेखनचातुर्य दिसून येतें ते रिचर्डसनमध्यें नव्हतें. साधारणपणें इंग्रज लेखकांत दिसून न येणारा दृष्टीचा व्यापकपणा व सूक्ष्मपणा, प्राचीन पद्धतीची संस्कृति आणि फ्रेंच तऱ्हेची औपरोधिक लेखनपद्धति हे सर्व गुण फील्डिंगमध्यें एकवटलेले दृष्टीस पडतात. स्त्रीचरित्राचें यथार्थ वर्णन करण्याची हातोटी ज्याप्रमाणें रिचर्डसनला किंवा विदूषकी विनोद करण्याची कला ज्याप्रमाणें स्मॉलेटला साधली होती, त्याप्रमाणें ती फील्डिंगला साधली नव्हती. फील्डिंगच्या ठिकाणीं काव्यस्फूर्तीचा अभाव होता. परंतु सदभिरुचि, सुसंस्कृति, व्यवस्थितपणा, उल्हसितपणा, विनोद, मर्मभेदक उपरोध आणि सार्वत्रिक तारतम्यभाव इत्यादि जे गुण नाणावलेल्या गद्यलेखकांत अवश्य दृष्टीस पडतात ते सर्व फील्डिंगमध्यें होते. त्याची "टॉम जोन्स" नांवाची उत्कृष्ट कादंबरी सुरुवातीच्या इंग्रजी कादंबरी वाङ्मयांत अग्रगण्य होती.

स्मॉलेटः—फील्डिंगपेक्षांहि स्मॉलेटनें प्रपंचांतील पुष्कळ वादळें पाहिलीं होतीं. त्यानें आपल्या " रॉडरिक रँडम " नांवाच्या कादंबरींत खालच्या वर्गाची स्थिति वर्णिली आहे.

स्टर्नः—लॉरेन्स स्टर्न हा, चवथा आद्य कादंबरीकार होऊन गेला. तो जुन्या पद्धतीचा व विनोदी होता. फील्डिंग व स्मॉलेट यांनीं जरी डॉन क्विक्झोट व फ्रेंच कादंबरीकार यांची बरीच मदत घेतली होती तरी त्याचबरोबर त्यांनीं प्रत्यक्ष व्यवहाराचेंहि बरेंच अवलोकन केलें होतें. परंतु स्टर्नची गोष्ट निराळी होती. त्याची लेखनपद्धति कृत्रिम होती. त्याचें पुष्कळसें ज्ञान पुस्तकी होतें आणि त्याच्या लिहिण्यांत तऱ्हेवाईकपणाचा बराच भाग होता.

येणेंप्रमाणें रिचर्डसन, फील्डिंग, स्मॉलेट व स्टर्न या चार लेखकांनीं प्रथम कादंबरीवाङ्मयाची जमीन उत्तम रीतीनें सुपीक करून ठेवली. रिचर्डसनच्या हयातींतच उत्तम कादंबरीकार म्हणून त्याची सर्व यूरोपभर ख्याती झाली होती. स्टर्न यानें पुढें झालेल्या कादंबरीकारांस एका नवीन लेखनपद्धतीचा धडा घालून दिला.

जॉनसन.—अठराव्या शतकाच्या मध्यकालांत कादंबरीकारोव्यतिरिक्त इतरहि अनेक गद्य ग्रंथकार होऊन गेले. या इतर लेखकांत डॉ. जॉनसन, ऑलिव्हर गोल्डस्मिथ, लॉर्ड चेस्टरफील्ड, व हॉरेस वॉलपोल हे प्रमुख होते. या लेखकांपैकीं एक डॉ. जानसन वजा करून बाकीच्या लेखकांच्या ग्रंथांत तत्कालीन फ्रेंच लेखनशैलीचा सुबोधपणा उतरला होता. चेस्टरफील्ड व वॉलपोल हे दोघे तर यूरोपखंडाचें त्यावेळचें ज्ञान व भावना यांच्याशीं परिचित असलेले व अमीरउमरावांच्या राहाणीचा अनुभव असलेले लेखक होते. जॉनसन हा एकटाच केवळ इंग्रजी पद्धतीनें विचार करणारा व लिहिणारा होता. त्याचें इंग्लंडाबाहेरील जगाचें ज्ञान पुस्तकांतून मिळविलेलें होतें. तो जाडा विद्वान असून नीतीचें व धर्माचें उत्तम विवेचन करणाराहि होता. त्याची लेखनशैली टेलर, बॅरो व साउदे यांच्या पद्धतीची होती. तीतील वाक्यरचना क्लिष्ट असून, जागोजाग भाषेचे चढउतार आहेत. शिवाय इंग्लिश व लॅटिन भाषेंतील समतोल मिश्रणहि तिच्यांत आहे. ॲडिसन व बोलिंगब्रोक यांच्याहि लेखनाचा परिणाम कोठें कोठें दृष्टीस पडतो. जॉनसनला निबंध, औपरोधिक कविता व नीतिपर गोष्टी ( उ. रासेलस) यांची फार आवड होती परंतु त्या कामाला जी कल्पकता लागते ती त्याच्यांत नसल्याकारणानें तो उत्कृष्ट चरित्रकार व टीकाकार म्हणूनच प्रसिद्ध आहे. टीकाकार या दृष्टीनेंहि त्याचे ठिकाणीं स्वतंत्र कल्पनेचा अभाव दृष्टीस पडतो. तो अधिकारी लेखकांचाच बहुधा अनुवाद करतो. उदाहरणार्थ टीका कशी असावी या विषयीं ड्रायडन, रॅपिन, बॉइल्, ली बॉसू, रायमर, डेनिस, पोप इत्यादि टीकाकारानीं प्राचीन ग्रंथकारांपासून जे नियम काढले ते प्रमाण मानून ते सर्वथैव योग्य होत असें तो मानीत असे. त्याची टीका नेहमीं व्यवस्थित होती परंतु टीका करतांना वाचकांची खात्री पटवून देण्याऐवजीं तो आपलीं मतें फक्त ठांसून प्रतिपादन करीत असे. त्याचे टीकात्मक ग्रंथ वाचतांना त्यानें त्यांत काढलेल्या अनुमानांचा आपल्यावर परिणाम होत नसून आपलें सारें लक्ष मानवी जीवनचरित्रावरील त्याच्या सयुक्तिक कोटिक्रमानें व वाङ्मयप्रदेशांतील त्याच्या मार्मिक विचारसरणीनें वेधलें जातें. जॉनसनचे लेख उत्कृष्ट असत व त्याच्या कल्पनाहि मननीय होत्या. परंतु चारित्र्य व संभाषणपद्धति, अगाध ज्ञान व अचाट स्मरणशक्ति हे त्याचे गुण लोकोत्तर होते. या लोकोत्तर गुणामुळें त्या काळीं लोक त्याला अद्वितीय मानीत असतच, परंतु त्यामुळेंच त्याला जेम्स बॉसवेल सारखा चतुर, चाणाक्ष व दीर्घोद्योगी चरित्रकार मिळाला. बॉसवेलनें जॉनसनचें स्वभावाचित्र इतकें साद्यंत व हुबेहूब रेखाटलें आहे कीं, तसें आजपर्यंत कोणत्याहि इतर देशांत व काळांत पाहावयास सांपडत नाहीं. जॉनसननें कादंबरी किंवा गोष्ट लिहिण्याचा एकवेळच प्रयत्न करून रासेलस हा ग्रंथ प्रसिद्ध केला. रासेलसमध्यें विनोदाचा, पात्रांच्या विविधतेचा किंवा मनोरंजकपणाचा भाग नसल्याकारणानें त्यांतील संविधानक म्हणजे मानवी आशा व आकांक्षा यांच्या फोलपणावर रचलेलें एक लांबलचक पुराणच झालें आहे. तथापि त्या पुस्तकांत कांहीं निराळेपणा असल्यामुळें त्यास वाङ्मयांत कायमचें स्थान आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. याचें मराठींत चिपळोणकरांनीं केलेलें भाषांतर फारच सुंदर आहे.

गोल्डस्मिथ.—डॉ. जान्सनमध्यें ज्या गुणांचा पूर्ण अभाव होता ते ऑलिव्हर गोल्डस्मिथच्या ठिकाणीं पूर्णत्वानें वास करीत होते. त्याच्या लेखनपद्धतींत अठराव्या शतकाच्या वाङ्मयांतील विशदपणा, साधेपणा व सुबक आणि अस्खलित प्रवाह इत्यादि गुणांचा संपूर्ण विकास झालेला होता. नाटककार, कादंबरीकार व निबंधकार यांपैकीं कोणत्याहि दृष्टीनें जरी गोल्डस्मिथच्या ग्रंथाकडे पाहिलें तरी त्यांतील मजकूर अगदींच किरकोळ व नेहमीच्या व्यवहारांतला आहे. तो मजकूर घेऊन जर दुसऱ्या कोणी ग्रंथरचना केली असती तर ती कवडीमोल व कुचकामाची झाली असती यांत तिळप्राय शंका नाहीं. जेव्हां जेव्हां गोल्डस्मिथ मानवी जीवनक्रमाविषयीं लिहितो तेव्हां तेव्हां त्याच्या अल्पस्वल्प वर्णनांतहि विनोद व संगतवार नैतिक विचारसरणी दृष्टीस पडते. गोल्डस्मिथचीं संविधानकें आयरिश आहेत. टीका करण्याची पद्धत जरी त्यानें फ्रेंचांपासून घेतली होती तरी तिच्यांत जॉनसन, रेनॉल्ड्स व बर्क यांच्या धाटणीचीहि छटा दिसून येते. त्याची गद्यलेखनपद्धति म्हणजे पूर्णावस्थेस गेलेली ॲडिसनची लेखनपद्धतीच होय. त्याची ग्रंथरचना विविधप्रकारची आहे. त्याच्या व जॉनसनच्या विविध ग्रंथरचनेचा व इतर गुणांचा विचार केला म्हणजे ते प्रतिकूल परिस्थितींत आपल्या उदरनिर्वाहाकरितां लेखनव्यवसाय करणारे लेखक होते या गोष्टीची आठवण झाल्यावांचून रहात नाहीं.

इ. स. १७४० पासून इ. स. १७६० पर्यंत पूर्वीच्यापेक्षां निराळ्या परिस्थितींत गद्यग्रंथरचनेचें काम झालें. इ. स. १७१८ मध्यें लेडी मेरी वार्टले मॉंटेग्यू हिचीं पत्रें प्रसिद्ध झालीं. त्यानंतर दहा वर्षांनीं लॉर्ड हार्वेनें लिहिलेली दुसऱ्या जॉर्जच्या कारकीर्दीची हकीकत बाहेर पडली. इ. स. १७४० मध्यें लॉर्ड चेस्टरफील्ड व हॉरेस वॉलपोल या दोघांनीं आपलीं अप्रतिम पत्रमाला रचण्याचें काम सुरू केलें. हे सर्व लेख जरी मूळ प्रसिद्ध करण्याच्या हेतूनें लिहिले नव्हते तरी त्यांवरून चटकदार वर्णन करण्याच्या बाबतींत इंग्रजी गद्यलेखनपद्धतीची वाढ किती झपाट्यानें होत चालली होती हें दिसून येतें. सदर पत्रांच्या वाचनानें वाचकांचें मनोरंजन होऊन त्यांस व्यापकज्ञान व जगाच्या व्यवहारांची सार्वत्रिक माहिती होण्यासारखी आहे. त्यांत काव्यात्मक किंवा कल्पनात्मक भाग कमी असला तरी लौकिक व्यवहारांची संपूर्ण बाजू दिलेली आहे. लॉर्ड चेस्टरफील्डनें आपल्या मुलाला

व नातवाला लिहिलेल्या पत्रांतील सफाईदार लेखनशैली, उपरोध व विनोद हे इंग्रजी गद्यवाङ्मयांत प्रथमच पहावयास सांपडतात. चालीरीती व सामाजिक सौजन्य हे चेस्टरफील्डच्या लेखनाचे विषय असल्यामुळे त्याच्या भाषेंत ठाकठीकपणा, व्यवस्थितपणा, नीटनेटकेपणा, खुबीदारपणा वगैरे प्रामुख्यानें दिसून येतात. हॉरेस वॉलपोलची लेखनपद्धति अतिशय व्यावहारिक, तऱ्हेवाईक व झोंबणारी अशी आहे.

ग्रं थ क र्तृ त्वा ची वा ढ.—जॉनसनच्या वेळीं ग्रंथरचनेचे अनेक प्रकार अस्तित्वांत आले. चरित्रकार या दृष्टीनें बॉसवेलनें आपलें नांव अजरामर करून ठेवलें. ॲडॅमस्मिथनें " दि वेल्थ ऑफ नेशन्स " हा ग्रंथ लिहून अर्थशास्त्राचा पाया घातला. सर जोशिया रेनॉल्डस यानें आपल्या " फिफ्टीन डिस्कोर्सेस " या ग्रंथांत कलेसंबंधीं तात्त्विक विचार प्रथमच प्रसिद्ध केले. रॉबर्टसन व गिबन यांनीं ऐतिहासिक तत्त्वज्ञानाच्या ग्रंथरचनेचा नवीन प्रकार शोधून काढला यावरून हल्लीं प्रचारांत असलेलीं वाङ्मयाचीं सर्व अंगें जॉनसनच्या वेळीं उगम पावलीं असें म्हणावयास हरकत नाहीं.

इ ति हा स का र—क्लॅरेन्डन व बर्नेट यांनीं आपल्या वेळचे इतिहास लिहून ठेवले आहेत. हे दोघे लोकप्रिय आहेत; तथापि क्लॅरेन्डनचा इतिहास गद्यभाषापद्धतीच्या दृष्टीनेंहि वाखाणण्यासारखा आहे. इ. स. १७३५ त बोलिंगब्रोक यानें इतिहास या विषयाचें नैतिक, राजकीय व तात्त्विक दृष्टीनें जें विवेचन केलें तें संस्मरणीय आहे. तथापि अठरावें शतक अर्धे अधिक उलटून जाईपर्यंत ऐतिहासिक पुनर्रचनेच्या दृष्टीनें इंग्लंडचें वाङ्मय फ्रान्स, इटली व जर्मनी या देशांतील वाङ्मयाच्या मागें होतें. ह्यूमनें आपल्या " हिस्टरी ऑफ इंग्लंड " या ग्रंथाचा पहिला खंड इ. स. १७५४ मध्यें प्रसिद्ध केला. रॉबर्टसनचा " हिस्टरी ऑफ इंग्लंड " हा ग्रंथ इ. स. १७५९ त व " चार्लस पांचवा " हा इ. स. १७६९ त बाहेर पडला. गिबनचा " डिक्लाइन अँड फॉल ऑफ दि रोमन एंपायर " हा इ. स. १७७६ त प्रसिद्ध झाला. एडवर्ड गिबन हा इतिहासकार या दृष्टीनें जरी ह्यूम व रॉबर्टसन यांप्रमाणेंच आशावादी होता तरी त्याची भारदस्त भाषासरणी आपल्या विषयावरील एकाग्र भक्ति, दीर्घ परिश्रम व चिकित्सक बुद्धि या सद्गुणांनीं त्याची कृति संस्मरणीय झाली आहे.

धर्म विचारांतहि क्रांति होऊन स्वतंत्र विचाराचे लेखक मूळ धर्मशास्त्र ग्रंथांवर हल्ले चढवूं लागले होते. परंतु या सुमारास धार्मिक व राजकीय विषयांत पुराणमताचा अभिमानी, पूर्वीपासून चालत आलेल्या अलिखित शासन घटनेचा चहाता व भावनाप्रधान गद्यलेखनांत निष्णात असलेला एडमंड बर्क हा उदयास आला.

कौपर, वुइल्यम ब्लेक व रॉबर्ट बर्न्स.—या सुमारास लोकांचा दृष्टिकोन बदलला होता. त्यांस कृत्रिमपणाचा वीट येऊन नैसर्गिक व साहजिकपणा विशेष आवडूं लागला. पोपच्या निधनानंतर थोड्याच दिवसांत ग्रे, वार्टन हर्ड इत्यादि कवि त्याचा श्रेष्ठपणा नाकबूल करून अठराव्या शतकाच्या वाङ्मयांत दृष्टीस पडणारी सदभिरुचि व प्रबुद्ध विचारसरणी यांच्यापेक्षां कल्पना व प्रतिभा यांची किंमत अधिक मानूं लागले. वुइल्यम कौपर, वुइल्यम ब्लेक व रॉबर्ट बर्न्स हे या वेळचे इंग्लंडांतले प्रमुख पण परस्पर भिन्न कवि होते. कौपरच्या काव्यांत स्पष्ट व आनंदी कल्पनांनें मान फार कमी आहे. काव्यस्फूर्ति व कल्पनेच्या भराऱ्या यांचा तर त्याच्या काव्यांत मागमूसहि नाहीं. त्याची उत्कृष्ट कविता बहुतेक प्रासंगिक आहे व प्रासंगिक कवितेस लागणारे सारे गुण त्याच्या काव्यांत दृष्टीस पडतात. त्याच्या ग्रंथांत तात्कालीन संस्कृतीची त्वरित गति, सर्व भूतविषयक अनुकंपा, निसर्गसौंदर्याची आवड, गृहसौख्य, पशूंचे हक्क व ललितवाङ्मयांत सांपडणारे मोहक गुण इत्यादि गोष्टी दृष्टीस पडतात. अद्भुतरसात्मक काव्य पद्धतीचें पुनरुज्जीवन करणाऱ्या कवींमध्यें वुइल्यम ब्लेक यास आद्यस्थान दिलें पाहिजे. इलिझाबेथन युगांत प्रचलित असलेली वीणाकाव्यपद्धति कोलरिजच्या पूर्वी प्रथम त्यानेंच उचलली. त्याचीं "सॉंग्ज ऑफ इनोसन्स" व "सॉंग्ज ऑफ एक्सपीरिअन्स" हीं गाण्याला फारच सोयीचीं आहेत. परंतु या काळचा पहिल्या प्रतीचा प्रतिभासंपन्न कवि म्हटला म्हणजे रॉबर्ट बर्न्स हा होय. फिरत्या किनरीवाल्यास गाणीं रचून देणाऱ्या व राष्ट्रगीतें व देशभक्तिपर कवनें रचणाऱ्या त्याच्या देशांतील इतर सर्व कवींमध्यें बर्न्स हा श्रेष्ठ होता. तथापि बर्न्सची एकंदर अवस्था अनुकंपनीय होती. त्याची काव्यप्रतिभा त्याच्या ग्रंथांतून मधून मधून डोकावते. परंतु तिचें पूर्ण आविष्करण होण्यास अवसर मिळाला नाहीं. संपूर्ण शिक्षण, योग्य फुरसत, दीर्घ परिश्रम व दीर्घायुष्य यांपैकीं एकहि त्याच्या वांट्यास आलें नाहीं. त्याच्या कविता जरी प्रासंगिक, खंडमय व शीघ्र कवितेच्या जातीच्या आहेत तरी त्यांत काव्यप्रतिभेचें खरें नाणें आहे. त्याचें अवलोकन बिनचूक आहे, त्याचा विनोद प्रगल्भ आहे व त्याची बुद्धि कुशाग्र व विपुल आहे. स्वातंत्र्य व राज्यक्रांति याविषयींच्या तात्त्विक विचारांची तो फारशी पर्वा करीत नाहीं. तथापि तो देशभक्त होता व सामाजिक प्रतिष्ठेचा व श्रीमंतीचा मनापासून तिटकारा करणारा होता.

ए को णि सा वें श त क.—वरील विवेचनावरून वाचकांच्या लक्षांत आलें असेल कीं अठराव्या शतकांत निरनिराळ्या प्रकारच्या काव्यरचनेचे प्रयोग करण्यांत आले असून त्यांत निसर्गाच्या अध्ययनाचा व वर्णनाचाहि भाग

आला होता. तथापि त्या काळच्या कवितेचें मुख्य स्वरूप म्हटलें म्हणजे औपरोधिक व वर्णनपर होतें.

एकोणिसाव्या शतकांतील काव्यरचनेला मुख्य वळण वर्ड्स्वर्थादि कविमंडळानें लावलें. प्रचारांतील साधी व सरळ भाषा वापरणें हें वर्ड्स्वर्थचें ध्येय होतें. शिवाय निसर्गानें मनुष्याचा विकास होतो अशी त्याची कल्पना असल्यामुळें पर्वताची विविक्तता, धबधब्याची मुखरता व मेघ आणि वायु यांचें उच्च स्थान आपणांस प्राप्त व्हावें असें त्यास वाटूं लागलें आणि अशा रीतीनें तो अखेर ईश्वरमयत्व वाद प्रतिपादन करूं लागला. मोठाल्या शहरांच्या कोंदट वातावरणांत राहणाऱ्या सुशिक्षित लोकांस हे वर्ड्स्वर्थचे निसर्गविषयक विचार पूर्वीच्या कृत्रिम गोपगतांपेक्षां अधिक पसंत पडूं लागले. अनेक प्रसंगांनीं नटवलेल्या व अतिशयोक्तीनें भरलेल्या ठराविक पद्धतीच्या काव्यरचनेपेक्षां मानवी विकारांच्या साध्या कहाणीचें यथावद्वस्तुवर्णन करणारी कविता अधिक श्रेष्ठ होय असें वर्ड्स्वर्थचें म्हणणें होतें. परंतु त्याचें म्हणणें उचलून धरण्याला व त्याचा पुरस्कार करण्याला जर कोलरिज सारखा प्रतिभासंपन्न जोडीदार पुढें आला नसता तर तें जागच्या जागींच राहिलें असतें.

कोलरिज.—भावनाप्राधान्य, कल्पकता, साधेपणा व गूढार्थप्रतिपादन इत्यादि जे गुण उत्तम कवीमध्यें असावयास पाहिजेत ते सर्व कोलरिजमध्यें होते. "दि राइम ऑफ दि एन्शन्ट मरीनर," "क्रिस्टाबेल", "कुब्लाखान" हीं त्याचीं तीन स्फुट काव्यें उत्तम काव्यांत गणण्यासारखीं आहेत असें तज्ज्ञाचें मत आहे. ड्रायडन व पोप यांच्या पूर्वकालीन कवींचा जो कोलरिजवर इतका पगडा बसला तो त्याचा मित्र जो चार्लस लँब याच्या संगतीचा परिणाम होय. त्या पूर्वकालीन कवींच्या कल्पनासौंदर्याविषयीं लँबनें जी गुणग्राहकता दाखविली आहे त्यावरूनच त्याच्या ठिकाणीं काव्यप्रतिभा किती उच्च दर्जाची होती हें कळून येतें, आणि काव्यांत कल्पना व संगीत यांचें किती महत्त्व आहे हें संभाषणांनीं, पत्रांनीं, ग्रंथांतील निवडक वेंच्यांनीं आणि निबंधांनीं त्यानें इ. स. १८००या वर्षी कल्पक बुद्धीच्या लेखकांवर इतकें उत्कृष्ट बिंबविलें आहे कीं, त्या योगानें त्यानें त्यावेळच्या काव्याच्या सौन्दर्यकल्पनेंत जवळ जवळ क्रान्ति घडवून आणली. लँबच्या वाङ्मयविषयक कल्पना काय होत्या हें त्याच्या "एसेज ऑफ एलिआ" या ग्रंथावरून कळून येण्यासारखें आहे. लँब व त्याचा मोठा प्रतिस्पर्धी वुइल्यम हॅझलिट या दोघां लेखकांच्या मतानें टीका करणें हें विद्वत्तेचें किंवा तुलनात्मक विचारसरणीचें किंवा न्यायबुद्धीचें काम नसून कल्पनेचें आहे.

हॅझलिट.—हॅझलिट हा उत्तम निबंधकार व टीकाकार होता. त्याला कृत्रिमपणाचा तिटकारा होता. त्याची लेखन पद्धति जवळ जवळ बर्कच्या वक्तृत्वपूर्ण भाषणपद्धतीप्रमाणें आहे.

लीहंट व डिक्विन्से.—ली हंट हा स्वतः कांहीं मोठा लेखक नव्हता. परंतु दुसऱ्यांस मोठे ग्रंथकार करण्याला तो कारणभूत झाला. मिल्टनची उदात्त व गंभीर भाषासरणी डिक्विन्सेच्या ग्रंथांतून सांपडते.

कीट्स.—जॉन कीट्स ( इ. स. १७९५—१८२१ ) हा शेलेपेक्षा तीन वर्षांनीं लहान होता. तो तत्कालीन कवींमध्यें अत्यंत काव्यरचनाकुशल होता आणि पंचवीसाव्या वर्षी जर त्याच्या आयुष्याची दोरी एकाएकीं तुटली नसती तर तो सर्व कवींमध्यें अग्रगण्य झाला असता. बायरनचें काव्य नेहमीं आत्मपर असे, वर्ड्स्वर्थ हा आत्ममहत्त्वाच्या दृष्टीनें विश्वाकडे पहाणारा होता, कोलरिज तत्त्वज्ञानी होता व शेले हा बौद्धिक सौंदर्याची महती गाणारा होता; परंतु ज्याचें काव्य वाचीत असतां वाचकांचें लक्ष कवीकडे न जातां काव्यविषयांत गुंतून रहातें असा कीट्स हा एकच कवि होऊन गेला. त्याच्या अकाली मरणानें इंग्रजी वाङ्मयाचें फार नुकसान झालें.

शेले.—पी. बी. शेले हा बायरनचा सहचारी होता, परंतु त्या दोघांच्या अध्यात्म विचारांत महदंतर होतें. बुद्धिप्रामाण्यवादी त्याचा तिरस्कार करीत आणि तत्कालीन कवी त्याचा मत्सर करण्याऐवजीं कीव करीत असत. आतां ज्याप्रमाणें त्याचे ग्रंथ वाचणारा व ते वाचून उत्कृष्ट कृति म्हणून त्यास मान देणारा सामान्य वाचक वर्ग आहे तसा त्याच्या वेळेस तयार झालेला नसल्यामुळें तो आपलीं काव्यें फक्त कवीकरतांच लिहीत असे. त्याच्या काव्यांतील कल्पनांचें सौंदर्य अप्रतिम आहे. त्याच्या काव्यांत मानवी स्वभाव वर्णनपर भाग नसतो ही मोठी उणीव आहे. तो नेहमीं कल्पनासृष्टींत संचार करणारा कवि होता.

लॉर्ड बायरनः—लॉर्ड बायरन हा जितका प्रथम लोकप्रिय तितकाच पुढें अप्रिय झाला. बायरनचीं काव्यें मुख्यत्वेंकरून ऐतिहासिक व टीकात्मक आहेत. त्याच्या काव्यांत कीट्सच्या सुन्दर भावना, शेलेचे पारमार्थिक विचार किंवा वर्ड्स्वर्थच्या निसर्गविषयक कल्पना दृष्टीस पडत नाहींत. त्याच्या काव्यांतील शीघ्रकवित्वाचे दोष पाहून कांहीं वेळां वाचकांच्या मनाचा विरस होतो. एकदां लिहिलेल्या कविता सफाईदार करण्याचा तो प्रयत्न करीत नसे. मी " वाघासारखा आहे, माझी पहिली झांप चुकली तर मी गुरगुरत जंगलांत निघून जाईन " अशा प्रकारची त्याच्या मनाची ठेवण होती. त्याची काव्यरचना जोरदार व तेजस्वी आहे. परंतु त्याला गूढ विचारांची जोड नाहीं. इंग्लंडपेक्षां यूरोपांतील इतर देशांत बायरनला मोठा मान देत असत.

स्कॉटः—सर वाल्टर स्कॉटची कविता अगदीं पहिल्या प्रतीची नाहीं. मनन व निदिध्यास करण्यासारखी ती नसून

पाठ करण्यास सोयीची आहे. त्याचे गद्यग्रंथहि मोठेसे नांवाजण्यासारखे नाहींत. त्याच्या अवाढव्य ग्रंथविस्ताराच व त्याच्या बुद्धिमत्तेच्या विविधतेचा विचार केला म्हणजे मात्र वाङ्मयक्षेत्रांत त्याला अगदीं शेक्सपिअरच्या शेजारींच न बसविलें तरी तो आपल्या काळांत सर्वांत श्रेष्ठ होता असें म्हणणें प्राप्त होतें. पूर्ण वीस वर्षे अहोरात्र परिश्रम करून त्यानें आपल्या मस्तकांत सर्व साधनसामुग्रीचा संचय करून ठेवला असल्यामुळें त्याला इतकें जलद लिहितां येत असे. स्कॉटच्या ग्रंथांत पुराणमतांचें व अद्भुत विचारांचें मिश्रण झालेलें दृष्टीस पडतें. त्याला इतिहासाची फार आवड असल्यामुळें त्याच्या मनाचा ओढा पुराणमताकडे होता.

जेन ऑस्टीन वगैरेः—कादंबरीकार या दृष्टीनें जेन ऑस्टीनची योग्यता फार मोठी आहे. औपरोधिक भाष वापरण्याच्या बाबतींत तर तिचा हातखंडा होता आणि तिचीं संविधानकें हीं ठाकठिकीचीं व मनोरंजक आहेत. तिच्या नंतर थॉमस लव्ह पीकॉक ( १७८५—१८६६ ) हा प्रख्यात कादंबरीकार होऊन गेला. तो जाडा विद्वान होता व त्याच्या लेखनपद्धतीचा त्याचा जांवई जॉर्ज मेरिडिथ ( १८२८—१९०९ ) याच्यावर बराच परिणाम झाला.

व्हि क्टो रि अ न वा ङ्म य यु ग.—सर्व इंग्रजी वाङ्मयांत हें व्हिक्टोरिया राणीचें युग बौद्धिक संपत्तीच्या बाबतींत अधिक विविध स्वरूपाच आहे. वाङ्मयाच्या अभिवृद्धीला सर्वस्वी अनुकूल अशी सदर राणीच्याकारकीर्दीतील परिस्थिति कोणत्याहि काळांत कोणत्याहि देशाच्या वांट्याला आली नसेल. या युगांत मानवी ज्ञानाचें व सामर्थ्याचें क्षेत्र जसजसें वाढत गेलें तसतसें तें वाङ्मयाला परिपोषकच होत गेलें. या युगांतील लेखकांचें प्रचंड ग्रंथलेखन पाहून मन गोंधळून जातें. दोन तीन पुस्तकें लिहून त्याच्या मनाची शांति होत नसल्यामुळें प्रत्येकानें आपला एक भला मोठा ग्रंथसमूहच लिहून ठेवलेला आहे. "ख्रिस्ती धर्म ग्रंथ" किंवा "शेक्सपिअरचे समग्र ग्रंथ" याच्या वीसपट तरी कार्लाइल, रस्किन, फ्रौडे, डिकन्स, थॅकरे, न्यूमन, स्पेन्सर, ट्रोलोप यांपैकीं प्रत्येकाचा ग्रंथविस्तार आहे. इतके ग्रंथ वाचण्याला वाचक वर्गहि तितक्याच प्रमाणांत वाढत गेला. कारण मध्यम वर्गांतील लोकांमध्यें या काळीं वाचनाची इच्छा बऱ्याच झपाट्यानें वाढली.

डिकन्सः—चार्लस डिकन्स ( इ. स. १८१२–१८७० ) हा एका गरीब कारकुनाचा मुलगा होता. तो स्वयंशिक्षित असूनहि त्यानें आपल्या स्वतःस तत्कालीन वाङ्मयेतिहासांत अग्रस्थान मिळविलें. डिकन्सनें ग्रंथरचनेचे नियम मोडले, त्याच्या ग्रंथांत कांहीं ठिकाणीं असंबद्धता दृष्टीस पडते व कांहीं बाबतींत योग्य मर्यादेचें अतिक्रमणहि केलेलें आहे, तथापि, त्याचे विनोदी ग्रंथ वाचून वाचकांचें मनोरंजन झाल्यावांचून रहात नाहीं.

थॅकरेः—वुइल्यम मेकपीस थॅकरे ( १८११–१८६३ ) याच्या कादंबऱ्या डिकन्सपेक्षांहि अधिक ऐतिहासिक आहेत आणि त्यांतील बहुतेक प्रमुख पात्रांच्या वंशावळीहि त्यानें दिलेल्या आहेत. इ. स. १८४८ त जेव्हां थॅकरेनें "व्हॅनिटी फेअर"ही आपली कादंबरी लिहिली आणि त्या योगानें त्याची चहूंकडे कीर्ति झाली, तेव्हां "डेव्हिड कॉपरफील्ड"व "ग्रेट एक्स्पेक्टेशन्स" या दोन कादंबऱ्यांखेरीज करून डिकन्सच्या बहुतेक मोठाल्या कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या होत्या. थॅकरेनें बहुतेक डिकन्सचेच धार्मिक, नैतिक व राजकीय विचार उचलले होते. परंतु त्यानें डिकन्सचा नाटकीपणाचा दुर्गुण मात्र आपल्या कृतींत येऊं दिला नाहीं. त्याची लेखनपद्धतीहि प्रशंसनीय आहे. थॅकरे हा वसुधैव. कुटुंबवृत्तीचा होता, परंतु डिकन्सची दृष्टि लंडनच्या चतुःसीमेपलीकडे गेली नाहीं. एखाद्या विषयावर टीका, त्याचें स्पष्टीकरण किंवा त्याचें विवेचन करण्यास लागणारा संथपणा व गंभीरपणा थॅकरेच्या ठिकाणीं होता परंतु डिकन्सचा स्वभाव अत्यंत विनोदी असल्यामुळें त्याजकडून असलीं कामें होणें शक्य नव्हतें. शिवाय डिकन्सपेक्षां थॅकरेमध्यें विविधगुणसंपन्नता अधिक होती. कारण तो केवळ कादंबरीकार नसून प्रबंधकार, निबंधकार, इतिहासकार व टीकाकारहि होता.

शार्लट ब्रॉंटी.—( इ. स. १८१६ ते १८५५ ) शार्लट ब्रॉंटीचो मुख्य कल्पना अशी होती कीं, स्त्रीपुरुषांचें परस्परांसंबंधी उत्कट प्रेम हें फार पवित्र असून जगांतील अतिशय श्रेष्ठ दर्जाचा आयुष्यक्रम, जोम व आनंद यांस तें कारणीभूत होतें. जॉर्ज इलिअट हिचें ( इ. स. १८१९ ते १८८० ) मत याच्या अगदीं उलट होतें. तिच्या मतानें तसल्या उत्कट प्रेमांत अंध व कठोर स्वार्थीपणाशिवाय दुसरें कांहीं नसतें. या दोन स्त्री–कादंबरीकारानंतर मिसेस गॅसकिल, किंग्सले, ट्रोलोप, रीड, मेरिडिथ, हार्डी इत्यादि अनेक कादंबरीकार झाले.

टेनिसनः—ज्याप्रमाणें व्हिक्टोरिअन युगामध्यें डिकन्स सारखा उत्कृष्ट कादंबरीकार झाला, त्याचप्रमाणें टेनिसन सारखा उत्कृष्ट कवीहि निर्माण झाला. डौलदार व हुबेहुब वर्णनाच्या गुणाला काव्यरचनाचातुर्याच्या इतर गुणांची जोड देऊन टेनिसननें वीणाकाव्य व लघुकाव्य या जातींचीं उत्कृष्ट काव्यें लिहिण्यास सुरवात केली. आणि आरंभींच्या काव्यांवर झालेल्या टीकेच्या सहाय्यानें आपल्या पुढल्या कृतींत सुधारणा करतां करतां "दि लोटस ईटर्स", "दि ड्रीम ऑफ फेअर वुमेन" व "मॉर्ट ड आर्थर" या सारखीं सर्वोत्कृष्ट काव्यें त्यानें निर्माण केलीं. शिवाय तत्कालीन लोकांचीं मनें अस्वस्थ करण्यासारखे जे प्रश्न होते ते हातीं घेऊन त्यानें ते आपल्या "इन मेमोरिअम", "दि प्रिन्सेस" व "मॉड" या काव्यांतून उत्तम रीतीनें सोडविले आहेत.

ब्राउनिंगः—परमार्थाच्या बाबतींत पंगु असलेल्या वाचकांना त्यांचा पंगूपणा घालविण्याच्या कामीं उपयोगी पडण्यासारखे ब्राउनिंगचे विचार होते. ब्राउनिंगचा मुख्य दोष इतकाच आहे कीं, त्याच्या अत्युत्कृष्ट कल्पनाहि पूर्णपणें विशद केलेल्या नाहींत. त्याचा जडवादी मतावर मोठा कटाक्ष आहे आणि विविध अडचणींतूनहि आपण आपला जीवनक्रम यशस्वी कसा करावा हें सांगण्याचा त्यानें प्रयत्न केला आहे. त्यानें मानवी चारित्र्य व हेतु यांचें जें विवेचन केलें आहे त्याचें बुद्धिवान लोकहि विचार व मनन करितात. ब्राउनिंगच्या कल्पना पुढें रस्किन, मॉरिस, सिमॉन्डस व पेटर या लेखकांच्या ग्रंथांतून प्रसार पावल्या.

आर्नोल्डः–टेनिसन व ब्राउनिंगनंतर तितक्याच योग्यतेचा असा कवि म्हणजे आर्नोल्ड हा होय. तो वर्डस्वर्थ संप्रदायाचा होता. मनुष्यांच्या इच्छा इहलोकीं तृप्त होत नसल्यामुळें जी त्यांच्या मनाला एकप्रकारची रुखरुख वाटते तीस निसर्गासारखें दुसरें उपशामक औषध नाहीं असें त्यानें प्रतिपादन केलें आहे. त्याच्या काव्यांत एकप्रकारची उदासीनतेची झांक दृष्टीस पडते. आर्नोल्डच्या पश्चात् रॉझेटी, त्याची बहीण ख्रिस्तिना, वुइल्यम मॉरिस व स्विन्बर्न हे कवी होऊन गेले.

मेकॉलेः—अचाट स्मरणशक्ति, विलक्षण आत्मविश्वास आणि अप्रतीम भाषाप्रभुत्व इतक्या गोष्टींची अनुकूलता मेकॉलेस असल्यामुळें त्याचा इतिहासग्रंथ इतका अमूल्य असा झाला आहे. मेकालेमध्यें दोष इतकाच होता कीं तो आपलीं राजकीय मतें प्रस्थापित करण्याकडे इतिहासाचा उपयोग करून घेत असे आणि त्यामुळें त्याची इतिहासकार या दृष्टीनें किंमत बेताचीच आहे.

कार्लाईल व मेकॉलेः—आधिभौतिक ज्ञान व आधिभौतिक सामर्थ्य यांची त्या काळीं झालेली वाढ पाहून मेकालेस आनंदाच्या उकळ्या फुटत असत. आपल्या देशाचें वैभव, यांत्रिक कलेचें ज्ञान, विद्युत् व स्थलांतर करण्याचीं साधनें यांचें ज्ञान इत्यादिकांची प्रगति झालेली पाहून त्याचा आनंद गगनांत मावेनासा होई. पण कार्लाईल यास असल्या आधिभौतिक सामर्थ्याच्या वाढीचा तिटकारा होता. त्यानें सुधारलेल्या काळाची स्तुति करण्याऐवजीं कडक टीका केली आहे. कायदेकानू, सुधारणाकायदे व राजकीय प्रतिनिधिसभा वगैरेवर मेकाले याची फार फार भिस्त होती. परंतु कार्लाईल त्या सर्वांस सैतानी डाव म्हणत असे. बेन्थॅम व कॉब्डेन, मिल्ल व मेकॉले यांनीं त्यावेळीं आपल्या देशाचें वैभव व सुखसंपत्ति वाढविण्याचे जे प्रयत्न केले ते सर्व चुकीचे होते असें कार्लाईलचें मत होतें. त्याच्या मतानें त्यावेळीं सुधारणेचा अतिरेक झालेला होता, व त्याविरुद्ध प्रतिक्रिया सुरू करणें त्यास अत्यंत अवश्य झालें होतें. इतिहासकार म्हणून कार्लाईलची आणि गिबन व मेकॉले यांची बरोबरीच्या नात्यानें तुलना करितां येणार नाहीं, परंतु त्याच्या भेदक दृष्टीमुळें चरित्रकार व आत्मचरित्रकार या नात्यानें त्याची कृति सरस वठली आहे.

वा ङ्म या ची न वी न दि शा.—इ. स. १८८१ मध्यें कार्लाइल व जॉर्ज इलिअट निवर्तल्यावर नवीन पद्धतीचे इतिहासकार, कादंबरीकार, टीकाकार व चरित्रकार निर्माण झाले.

इ ति हा स.—हा वेळपर्यंत मेकॉले, बकल व कार्लाईल यांनीं बदललेल्या परिस्थितीला अनुसरून आपले इतिहास लिहिले; परंतु यापुढील इतिहासकार देशाच्या इतिहासांत कोणकोणत्या क्रमानीं बदल होत गेले हे पाहून त्या क्रमांचा इतिहास ते लिहीत गेले. लेके, लॉर्ड ॲक्टन, क्रेटन, मोर्ले, ब्राइस यांनीं फक्त ऐतिहासिक निबंध लिहिले. परंतु थोरोल्ड, रॉजर्स, स्टब्स, गार्डिनर व मेटलंड यांनीं देशाच्या इतिहासांत ज्या क्रमांनीं बदल होत गेले तसे त्यांचे इतिहास लिहिले. इ. स. १९०३ मध्यें प्रो. बेरी यांनीं आपल्या केंब्रिज येथील प्रास्ताविक भाषणांत इतिहास शास्त्रीय पद्धतीनेंच लिहिला गेला पाहिजे असें प्रतिपादन केलें आणि तेव्हांपासून इतिहाससंशोधनाच्या कामास बराच जोर मिळाला.

का दं ब री.–इ. स. १८८१ पासून कादंबरीच्या लेखन पद्धतींतहि क्रांति घडून आली. या क्रांतीच्या पूर्वी मेरिडिथ व हार्डी, विल्की कोलिन्स, अँटनी ट्रोलोप, बेझंट व राइस ब्लॅकमोर, वुइल्यम ब्लॅक आणि मिसेस लिन लिंटन, ऱ्होडा ब्रौटन, मिसेस हेनरीवुड, मिस ब्रॅडन, मिसेस हंफ्रे वार्ड इत्यादि स्त्रीकादंबरीकार यांनीं कादंबरीलेखन पद्धतीचा एक कायमचा ठसा बसवून टाकला होता. हा ठसा हार्डीच्या कादंबऱ्यांतून तर दृष्टीस पडतोच परंतु तो जॉर्ज गिसिंग, जॉर्ज मूर, मार्क रुदरफोर्ड, एच. जी. वेल्स, आर्नोल्ड बेनेट व जॉन गोल्डस्वर्दी यांच्या कादंबऱ्यांतून विशेष स्पष्ट रीतीनें आढळून येतो. यानंतर स्टिव्हेन्सन प्रभृति कादंबरीकार उदयास येऊन त्यांनीं त्या पद्धतींत बदल घडवून आणला. स्टिव्हेन्सननें अलीकडील फ्रेंच पद्धतीच्या लहान लहान गोष्टी इंग्रजींत लिहिण्यास सुरवात केली. या कामीं रुडियार्ड किप्लिंग यानें स्टिव्हेन्सनवर सरशी केली. याप्रमाणें कादंबरीलेखनपद्धतींत दुसऱ्याहि अनेक प्रकारचे बदल घडून आले.

टी का.–वाङ्मयाच्या इतर अंगांबरोबर टीका करण्याच्या पद्धतींतहि या काळीं बराच बदल घडून आला. लेस्ली स्टीफेन, सेन्टसबरी, स्टॉफोर्ड ब्रुक, ऑस्टिन डॉब्सन, कोर्ट होप, सिडने कॉल्व्हिन, वॅट्स डन्टन हे अलीकडचे परंतु जुन्या पद्धतीचे टीकाकार सर्व वाङ्मयावर आपलें टीकास्त्र सरसकट चालवीत. त्यांच्याहून नवीन पद्धतीच्या टीकाकारांची टीका करण्याची रीत निराळी आहे. पूर्वीच्या टीकाकारांप्रमाणें हे टीकाकार वाङ्मयाच्या निरुपयोगी भागांवर आपलें सामर्थ्य खर्ची न घालतां त्यांतील जेवढा भाग उपयुक्त व ज्ञानाला पोषक असेल तेवढ्याकडे वाचकांचें लक्ष लावून देण्याची खटपट करतात. या नवीन पद्धतीच्या

टीकाकारांच्या श्रेणींत पॅटिसन व जेब, मायर्स, हटन, डौडन ए. सी. ब्रॅडले, वुइल्यम आर्चर, रिचर्ड गार्नेट,, इ. गॉस व अँड्र्यू लँग यांचा प्रमुखत्वानें निर्देश केला पाहिजे.

क वि ता.–टेनिसन व ब्राउनिंग नंतर इंग्लंडांत कवितेचा जवळ जवळ अस्तच झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं. तथापि विसाव्या शतकाच्या प्रारंभी सी. एम्. डौटी, ऑल्फ्रेड नॉईज, हरबर्ट ट्रेंच व लॅरेन्स बिनिअन हे कवी उदयास आले. परंतु ए. ई. हुस्मन व डब्ल्यू. ई. हेन्ले यांनीं आपल्या उत्तम काव्यरचनाचातुर्यानें कविमालिकेंत त्यांच्यापेक्षां अधिक श्रेष्ठ स्थान प्राप्त करून घेतलें. हेनरी न्यूबोल्ट, मिसेस मेनेल व स्टिफेन फिलिप्स यांच्या काव्यांत कवित्वाचें खरें नाणें दृष्टीस पडतें. परंतु या सर्व कवींत जॉर्ज मेरिडिथ व थॉमस हार्डी यांच्या कविता सर्वोत्कृष्ट होत असें पुष्कळांचें मत आहे. हल्लीं यीट्सची कविता बरेंच प्रामुख्य पावली आहे.

ना ट कें.–हल्लीं प्रचलित असलेल्या नव्या पद्धतीच्या नाटकांस गेल्या शतकाच्या शेवटल्या वीस वर्षांतच सुरवात झाली. त्या काळांत झालेल्या टॉम रॉबर्टसन या नाटककाराचीं नाटकें यथार्थ व सत्यस्वरूपाच्या दृष्टीनें अंधुक व अस्पष्ट छायाचित्रें आहेत. यापुढें ऑगीर, डयुमास व सार्डो या फ्रेंच नाटककारांच्या अतिशय श्रेष्ठ प्रतीच्या नाटकांचा इंग्रजी नाटककारांच्या मनावर हळूहळू परिणाम होऊं लागला. त्यामुळें इब्सेन, ऑस्कर वाइल्ड, व ए. डब्ल्यू पिनरो हे इंग्रजी नाटककार त्या पद्धतीचा इंग्रजी नाटकांत कसा उपक्रम करावा याचा विचार करूं लागले. गिलबर्ट मरे यानें या प्रचारांत येऊं पहाणाऱ्या नव्या नाटकपद्धतीस अधिक चालना दिली. बर्नार्ड शॉ व त्याचे ग्रॅन्व्हिल, बार्कर प्रभृति अनुयायी यांनीं तींत विनोदाची भर घातली.

वि सा व्या श त कां त झा ले ले फे र ब द ल.–विसाव्या शतकाच्या वाङ्मयांत कांहीं कांहीं बाबतींत पूर्वीचीच व्यवस्था कायम राहिली आहे. इ. स. १८९५ पासून इंग्लंड अमेरिका येथील विश्वविद्यालय यांच्या परिक्षेंत इंग्रजी वाङ्मय हा एक स्वतंत्र अभ्यासाचा विषय म्हणून नेमण्यांत येऊं लागला. त्यामुळें वाङ्मयाचें तुलनात्मक व ऐतिहासिक दृष्टीनें विवेचन सुरू झालें व पुस्तकें व वाचनाचीं साधनें झपाट्यानें वाढूं लागलीं आहेत.

अ र्वा ची न वा ङ्म य.—१९२१ च्या मागील कांहीं वर्षांचें सिंहावलोकन करितां असें आढळून येईल कीं, वाङ्मयाच्या गुणधर्मांत फारसा फरक झालेला नाहीं; पण जागतिक वाङ्मयाच्या दृष्टीनें पाहतां या काळांतील इंग्रज लेखक फारसे वर आलेले आढळणार नाहींत. १९२१ सालीं हयात असलेल्या कादंबरीकारांत थॉमस हार्डीला उच्च स्थान द्यावें लागेल. 'दि डिन्यास्टस' हें शोकपर्यवसायी महाकाव्य त्याच्या एकंदर शोकरसप्रधान कादंबऱ्यांमध्यें अति सरस ठरेल. हार्डीच्या तोडीचा ग्रंथकार सर जे. एम. बॅरी होय. त्याचें 'फेरी' हें नाटक इंग्लिश रंगभूमीवर अति लोकप्रिय म्हणून ठरलें आहे. हार्डी आणि बॅरी या दोघांनीं रंगभूमीवर असें एक वातावरण निर्माण केलें आहे कीं, इंग्रजी वाङ्मयाला साजेसा कोणताहि कवि त्यांत स्वैर संचार करूं शकेल. १९२१ चा वाङ्मयीन आढावा घेतल्यास एच्. जी. वेल्स आणि बर्नार्ड शॉ यांची रचना प्रथम नजरेंत भरेल. एच. जी. वेल्स हा आपल्या काळचा समाजशास्त्रीय आत्मचरित्रकार व शॉ स्वीफ्टसारखा औपरोधिक लेखक म्हणून प्रसिद्ध आहे. वेल्सचे 'जोआन' आणि 'पिटर', 'दि टाईम मशीन', 'डॉक्टर मारेडस आयलंड', 'दि व्हील्स ऑफ चान्स', 'वॉर ऑफ दि वर्ल्ड', 'किप्स' इत्यादि ग्रंथ व शॉचे 'कान्फरेन्सीयर', 'कॉमन सेन्स अँड दि वॉर', 'बुइडोअर्स हाउसेस', 'आर्म्स अँड दि मॅन' 'कँडिडा', 'प्लेज, प्लेझंट अँड अन प्लेझंट', 'सीझर अँड क्लिओपॅट्रा', 'जॉन बुल्स अँड अदर आयलंड' इत्यादि ग्रंथ प्रसिद्ध आहेत. हार्डी, बॅरी, वेल्स आणि शॉ या चौघांखेरीज मोर्ले, फ्रेडरिक, हॅरिसन, ब्राईस, ट्रेव्हेलिअनसारखे सन्मान्य पंडित, सेंटसबरी, गॉसे, सिडने, कॉलव्हिन, डब्ल्यू. पी. कर यांच्यासारखे प्रसिद्ध टीकाकार, पिनेरो आणि हेनरी अर्थर जोन्स हे नाटककार, रूडियर्ड किप्लिंग, वुइल्यम वाटसन, डब्ल्यू. बी यीटस, ॲलिस मे. येल आणि रॉबर्ट ब्रिजेस यांच्यासारखे १९०० च्या पूर्वींच लोकांपुढें आलेले ग्रंथकार, हे सर्व मिळून सुमारें पन्नासांची भरती होईल. इतरहि पुष्कळ लेखक निघतील.

१९१० ते २१ या काळांतील अगदीं निराळ्या वळणाचे कादंबरीकार म्हणजे वेल्स, आर्नोल्ड, बेनेट, गाल्सवर्दी, कॉम्पटन, मॅकेन्झी, स्टिफन, मॅकेना, इ. ल्युकस, डब्ल्यू. जे. लॉक, डब्ल्यु. एल. जॉर्ज, ह्युगेस वालपोल, गिलबर्ट कॅनॉन आणि मे. सिन्क्लेअर, इत्यादि होत. व्हिक्टोरिअन काळांतल्यापेक्षां हल्लीं कादंबऱ्यांच्या अंतरंगांत बराच फरक पडलेला आहे. 'मानसिक पृथक्करण' हें त्याचें वैशिष्ट्य होय. गाल्सवर्दीच्या 'डार्क फ्लावर' आणि 'बियाँड' या काव्यांतुन स्त्रीपुरुषामधील परस्पर आकर्षणाची उपपत्ति दिली आहे. वेल्स आणि शॉ यांचा जीवशास्त्रावर मोठा जोर आहे.

कादंबरी क्षेत्राबाहेरचें पण त्याच्यासारखेंच रम्य वाङ्मय म्हणजे ऐतिहासिक चरित्रें होय. इंग्लंडमध्यें 'डिक्शनरी ऑफ नॅशनल बायॉग्राफी' नांवाचा एक राष्ट्रीय पुरुषांच्या चरित्रांचा कोश तयार झाला आहे. 'लाईफ ऑफ डिझरायीली' हा जी. इ. बकलेचा ग्रंथ व लिटन स्ट्रॅचेकृत 'एमिनंट व्हिक्टोरिअन्स' आणि 'क्विन व्हिक्टोरिया' हीं चरित्रें नवीन आहेत.

या काळच्या इंग्रजी काव्याकडे पाहतां असें दिसून येईल कीं, टेनिसन, ब्राउनिंग, रॉझेटी आणि मॉरिस यांच्या गैरहजिरीमुळें पडलेला खड्डा सौंदर्यशास्त्रीय चळवळीनें थोडा

फार भरून निघाला आहे. नवीन कवींत रॉसेलस अबरक्रॉम्बी, सी. एम. टाउटी, स्टर्ज मूर, बेलॉक, चेस्टरटन, डब्ल्यू. एच. डेव्हीज, ए. नॉयेस, एल. बिनियन, जेम्स इ. फ्लेकर, एडवर्ड थॉमस, रूपर्ट ब्रुक, डब्ल्यू. डब्ल्यू. गिबसन, रॉल्फ हॉडसन, जॉन मॅसेफील्ड, जॉन फ्रीमन, सीज फ्रीड ससून इत्यादि प्रसिद्ध आहेत. गेल्या युद्धकाळांत इहलोक सोडून गेलेले प्रसिद्ध कवी म्हणजे रूपर्ट ब्रुक (१८८७–१९१५) व एडवर्ड थॉमस (१८७८–१९१७) हे होत.

१९ व्या शतकाच्या प्रारंभीं ॲंग्लो-आयरिश वाङ्मयाचा जन्म झाला असला तरी इंग्रजी भाषेंत आयरिश संस्कृतीचे ग्रंथ निर्माण करण्याचा प्रयत्न १८४० पर्यंत झाला नाहीं. हा प्रयत्न थॉमस डेव्हीसनें आपल्या 'नेशन' नांवाच्या वर्तमानपत्रद्वारें केला. तेव्हांपासून पुष्कळ आयरिश गद्यपद्यलेखक निर्माण झाले, त्या शतकाच्या अखेरीस आयर्लंडमध्यें जी सामाजिक व राजकीय चळवळीची लाट उसळली तींतून गालिकसंघ बाहेर पडून नवीन तऱ्हेचें आयरिश वाङ्मय निर्माण होऊं लागलें. हा गालिकसंप्रदाय राष्ट्रीय नसून प्रांतविशिष्ट आहे असें इंग्रज पंडित म्हणतात. सिनफेनांचें वाङ्मय तात्पुरतें सुंदर दिसलें तरी फारसें टिकाऊ नाहीं, तें स्वतंत्र म्हणून कदाचित् पुढें येईल; पण इंग्रजी वाङ्मयाला मागें सारणार नाहीं असें हेच पंडित सांगतात; तथापि या नूतनवाङ्मयीन चळवळीमुळें प्राचीन आयर्लंडची माहिती जगापुढें येऊन इतक्या दिवस तुटलेली आयरिश परंपरा पुन्हां जोडली गेली आहे. डब्ल्यू. बी. यट्स, जॉर्ज डब्ल्यू रसेल, डगलस हैड, स्टँडिश ओ ग्रार्डी, जे एम. सिंज आणि जॉर्ज मूर हे प्रख्यात आयरिश लेखक होत.

**इंग्रजी वाङ्मयाचे जगावर परिणाम.**— इंग्रज राष्ट्र हें ज्याप्रमाणें जगांतील अत्यंत यशस्वी राष्ट्र आहे, त्याप्रमाणें इंग्रजी वाङ्मय हें जगांतील अत्यंत यशस्वी वाङ्मय आहे. इंग्लंडचा ख्रिस्ती संप्रदाय स्वतंत्र झाला, त्याचा परिणाम असा झाला कीं, धार्मिक वाङ्मयाची भाषा इंग्लंडची लॅटिन न राहतां इंग्रजीच बनली. इंग्लंडचें कायद्याचें वाङ्मय रोमन कायद्याचें वृत्तिरूप न राहतां स्वतंत्र आहे. यामुळें राष्ट्राच्या सर्व अंगास व सर्व क्रियास उपयोगी पडणाऱ्या वाङ्मयाची वाहक भाषा इंग्रजीच बनली. सर्व जगावर इंग्रजांचा प्रवेश झाला, त्यामुळें जगांतील प्रत्येक भागावर इंग्रजी वाङ्मय आहेच. ऑस्ट्रेलेशिया, उत्तरअमेरिका, आफ्रिकेचा वृहद्भाग यांचें वाङ्मय इंग्रजीच आहे. त्याचें स्वरूप प्रत्येक देशाचें वर्णन करतांना दिलेलें सांपडेल. आतांपर्यंत वर दिलेलें जें वाङ्मय आहे तें इंग्लंडचें राष्ट्रीय वाङ्मय होय. परंतु इंग्रजी भाषेंतील सर्व वाङ्मय इंग्लंडचें राष्ट्रीय वाङ्मय नव्हे. इंग्रजी वाङ्मय आतां सांकृतिक झालें आहे. इंग्रजी वाङ्मयाचा परिणाम शेजारच्या देशांवर झालाच; इंग्रजी राजकीय कल्पनांचा प्रसार सर्व जगभर झाला आहे. हिंदुस्थानसारख्या देशाशीं जेव्हां इंग्लंडचा संबंध आला, तेव्हां इंग्रजी सत्तेनें देशी भाषांच्या विकासास गळफांस लावला. आणि देशी भाषांची राज्यव्यवहार व शिक्षण यांमधून हकालपट्टी केली. तथापि इंग्रजी वाङ्मयाचा इष्ट परिणाम देशी भाषांवर झाला नाहीं, असें मात्र नाहीं.

हिंदुस्थानांत इंग्रजी राज्य सुरू होऊन इंग्रजी भाषेचा अभ्यास जेव्हां होऊं लागला तेव्हां साहाजिकच इंग्रजी वाङ्मयाचें अनुकरण करण्याची आपल्या लोकांस बुद्धि झाली. एकोणिसावें शतक हें हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागांतील देश्य वाङ्मयाचें नूतन युग म्हणतां येईल. या काळांत इंग्रजी ग्रंथांचीं भाषांतरें व रूपांतरें होऊं लागलीं व भाषेला नवचेतना मिळाली. प्रत्येक भारतीय भाषेंतलें हल्लींचें वाङ्मय इंग्रजी धर्तीवर आहे हें नाकबूल करतां यावयाचें नाहीं. कोणतेंहि नवीन पुस्तक लिहावयाचें झालें कीं त्याची सामुग्री व साहित्य इंग्रजी ग्रंथांतच पहावयाचें. शास्त्रीय वाङ्मय तर सर्वस्वी यूरोपीय भाषांतून आणि विशेषें करूनइंग्रजींतून घ्यावें लागतें. तेव्हां कोणतेंहि भारतीय वाङ्मय इंग्रजी वाङ्मयाशीं फटकून राहूं शकत नाहीं हें निर्दय सत्य आहे; त्यास इलाज नाहीं.

महाराष्ट्रीय आणि इतर भारतीय वाङ्मयावर जो परिणाम झाला तो सविस्तर देण्याचें हें स्थळ नव्हे. तो मराठी, बंगाली वगैरे वाङ्मयावरील लेखांत दृष्टीस पडेल. येथें एवढेंच सांगतां येईल कीं पूर्वीची अध्यात्मपर व निवृत्तिपर दृष्टि लोपून तिच्या जागीं नवीन प्रवृत्तिपर व व्यावहारिक दृष्टि आली. पूर्वीची संकुचित कल्पना जाऊन मनश्चक्षुंपुढें अफाट सृष्टिक्षेत्र खेळूं लागलें. नवीन मराठी गद्याला सुरवात झाली व जुनें वळण बदललें. मागचें महाराष्ट्रीय वाङ्मय बहुतेक पद्यमय होतें. आतां इंग्रजी अनुकरणानें गद्यांत जास्त भर पडूं लागली. मागील वाङ्मयाला जी लोकांची अविवेचक धार्मिकबुद्धि कारणीभूत होती, ती इंग्रजी शिक्षणानें लोपत जाऊन नूतन वाङ्मयाचे विषय पूर्ण प्रापंचिक बनले. मराठी गद्यग्रंथांची मोठ्या प्रमाणावर जी पैदास झाली, ती इंग्रजी वाङ्मय समुच्चयाचा आश्रय केल्यामुळेंच होय. चिपळूणकर, आगरकर, विनायक कोंडदेव ओक, महाजनी, यांसारख्या सुशिक्षित लेखकांनींहि इंग्रजी ग्रंथांचीं भाषांतरें करून मराठी वाङ्मयांत भर घातली.

ख्रिस्ती मिशनऱ्यांनीं स्वमतप्रसारार्थ बायबल व इतर ख्रिस्ती संप्रदायांतील ग्रंथ मराठी भाषेचा अभ्यास करून तींत भाषांतरिले आहेत. हे मराठींतील ख्रिस्ती वाङ्मय किती व्यापक व विविध आहे हे 'महाराष्ट्रीय वाङ्मयसूचि' चाळल्यास दिसून येईल.

शास्त्रें व इतिहास या ज्ञानांगांवरच्या इंग्रजी वाङ्मयाधारें रचिलेल्या ग्रंथांपेक्षां नाटकें कादंबऱ्यांचीं अशीं पुस्तकें फार दिसतील. जेन आस्टीन, गोल्डस्मिथ, चार्लस गारव्हिस, सॅम्युअल जानसन, रेनॉल्डस, स्कॉट,

स्विफ्ट, मिसेस हेनरी वुड, शार्लोटी ब्रॉंटी, कॉनन डॉईल, मेरी कॉरली इत्यादि अनेक इंग्रजी, ग्रंथकारांच्या कादंबऱ्या मराठींत झपाट्यानें आल्या. इल्लींच्या मनोरंजक नियतकालिकांतून व सरस-सुरस सारख्या ग्रंथमालांतूनहि इंग्रजी गोष्टींची भाषांतरें-रूपांतरें या पलीकडे कांहीं सांपडणार नाहीं. आपले लेखक इंग्रजी वाङ्मयाचे इतके एकनिष्ठ सेवक बनले आहेत.

इंग्रजी वाङ्मयाचा अभ्यास सुरू झाल्यावर साहाजिकच शेक्सपियरची गांठ पडली व त्याचीं नाटकें मराठींत आणावींत असें वाटूं लागून त्या दिशेनें प्रयत्न झाला. शेक्सपियरच्या बहुतेक नाटकांचीं भाषांतरें झालेलीं आहेत; हॅमलेटसारख्या कांहीं नाटकांचीं तीन निरनिराळीं रूपांतरें झालीं. पुढें पुढें इंग्रजी नाटकांच्या धर्तीवर स्वतंत्र नाट्यरचना होऊं लागली; त्याप्रमाणें कांहीं आधुनिक मराठी नाटकें तर संस्कृत नाटकाहून सरस वठलीं आहेत.

आतां मराठी काव्याकडे वळूं. इंग्रजी राज्यास सुरुवात झाल्यानंतर प्रथम आपल्याकडील विद्वानांचा कल संस्कृतकाव्यें मराठींत आणण्याकडे होता. नंतर लवकरच इंग्रजी तर्‍हेवर कविता सुरू झाली. पूर्वीचे कवितेचे विषय पुराणें व वेदांत यांपैकीं असत. ते आतां पार बदलले; विषयमर्यादाहि वाढली. स्काट वगैरे सारख्या मोठ्या कवींचें अनुकरण फारसें झालें नाहीं तथापि मिल्टन, बायरन, कीट्स, शेले, वर्ड्स्वर्थ, यांसारख्या दुर्बल आणि कच्च्या दमाच्या कवींचें अनुकरण मात्र सपाटून झालें. जुनी काल्पनिक एकछापी सृष्टिवर्णनें बाजूला सारून पाश्चात्त्य पद्धतीवर प्रत्यक्ष ज्ञानाचीं वर्णनें ते करूं लागले. कविताभाषा व रचना या बाबतींतहि त्यांनीं रूढि सोडली. तेव्हां प्रथम प्रथम ते अप्रिय झाले असल्यास नवल नाहीं.

[ संदर्भ वाङ्मय—दि केंब्रिज हिस्टरी ऑफ इंग्लिश लिटरेचर. एच्. मोर्ले—इंग्लिश रायटर्स. सेंट्सबरी—एलिझाबेथन लिटरेचर. हॅने—दि लेटर रिनायसन्स. ओ. एल्टन—दि आगस्टन एज. टेने—हिस्टरी ऑफ इंग्लिश लिटरेचर. थॉम्पसन-स्टूडंट्स हिस्टरी ऑफ इंग्लिश लिटरेचर. बेन—हिस्टरी ऑफ इंग्लिश थॉट इन दि नाईन्टीन्थ सेंचरी. ए. ब्रि. ए. रि.; ए. इत्यादि ]

**इंग्लंड**—ग्रेटब्रिटन नांवाच्या बेटाच्या दक्षिण भागाला हें नांव असून ग्रेटब्रिटनच्या संयुक्त राज्याचा इंग्लंड हा प्रमुख घटक आहे. कारण या संयुक्त राज्याची नव्हे तर जगांतील साम्राज्याची राजधानी या विभागांत असून क्षेत्रफळ, लोकसंख्या व संपत्ति या तिन्ही बाबतींत इंग्लंड हें जगांतील बहुतेक देशांपेक्षां श्रेष्ठ आहे. इंग्लंड हें उत्तर अक्षांश ४९°५७' ते ५५°४६' आणि पूर्व रेखांश १°४६' ते पश्चिम रे. ५°४३' यांच्यामध्यें आहे. इंग्लंडांत एकंदर ४० परगणे ( कौंटी ) आहेत. इंग्लंड व वेल्स मिळून क्षेत्रफळ ५८३२४ चौरस मैल व लोकसंख्या येणेंप्रमाणें आहेः—इंग्लंड (१९२१)३,५६,७८'५३० व वेल्स ( १९२१ )२२,०६,७१२.

इंग्लंडच्या किनाऱ्यावर जागजागीं खाड्या व आखातें आहेत, आणि कोणतेंहि शहर समुद्रापासून ७५ मैलांहून अधिक दूर नाहीं. इंग्लंडांत एकंदर लहानमोठ्या मिळून २७ नद्या असून त्यांपैकीं सर्वांत लांब सेव्हर्न २१० मैल व थेम्स २०९ मैल आहे. इंग्लंडांत मोठाल्या उंच पर्वतांच्या रांगा मुळींच नाहींत; साधारण उंचीचे डोंगर आहेत त्यांत चेव्हिअट ( फूट २६७६ ), पेनाइन ( फूट २९३० ), स्नोडन ( ३५६० ), एक्समूर ( १७०७ ), डार्टमूर ( २०३९ ) हे डोंगर प्रमुख आहेत. इंग्लंडचे प्रादेशिक विभाग चार पडतात तेः—उत्तरेकडील लेक डिस्ट्रिक्ट ( सरोवरांचा प्रदेश ), मध्यवर्ती पेनाइन प्रदेश, पश्चिमेकडील वेल्स व दक्षिणेकडील कार्नवाल व डेव्हन द्वीपकल्प. इंग्लंडांतील बऱ्याच नद्या जहाजें जाण्यासारख्या आहेत व जहाजें जाण्यासारखे कालवेहि पुष्कळ ठिकाणीं आहेत. मोठालीं बंदरें, लंडन व त्याच्या आसपासचा प्रदेश, कोळशाच्या खाणी व कारखाने असलेलीं ठिकाणें, या भागांत अत्यंत दाट वस्ती आहे. शेतकीच्या प्रदेशांत बरीच पातळ वस्ती असून १००० फुटांहून अधिक उंचीच्या प्रदेशांत तर वस्ती फार क्वचित् आढळते. इंग्लंडांत उष्णतेचें वार्षिक सरासरी मान ५०°, हिवाळ्यांत उष्णतेचें सरासरी मान ४०° आणि उन्हाळ्यांत ६१°.५' असतें. पर्जन्यवृष्टि पश्चिम भागांत ३५ इंच, उत्तरेकडे ६० इंच, आणि पूर्व व दक्षिणेकडील प्रदेशांत ३० इंचांहूनहि कमी असते. पाऊस थोडा पडतो तरी आकाश मात्र बहुतेक मेघाच्छादित असतें. सूर्याचें स्वच्छ ऊन वर्षांतून सरासरी १३७५ तास असतें. हें प्रमाण इटालींत २६०० तास आणि नार्वेमध्यें १२०० तास इतकें असतें.

इंग्लंडांतील ग्रामवाचक, नदीवाचक व पर्वतवाचक नांवांच्या उत्पत्तीसंबंधानें पहातां केल्टिक लोकांच्या भाषेचा परिणाम सर्वत्र आढळतो. रोमन भाषेचा परिणाम सर्वत्र पण बऱ्याच कमी प्रमाणांत झालेला आहे. त्याशिवाय इंग्लिश, स्कांडिनेव्हियन व नार्मन या भाषांतील नांवेंहि कांहीं कांहीं आढळतात. ब्रौघॅम, कॅटरिक, यॉर्क, लिंकन वगैरे नांवें केल्टिक; एक्चेस्टर, सिलचेस्टर, ग्रँटचेस्टर वगैरे रोमन; ॲश, बोर्न, शेरबोर्न, सॅकबर्न वगैरे सॅक्सन; आणि ब्यूचीफ, ब्यूडेसर्ट, ब्यूफोर्ट, ब्यूमॉंट वगैरे नांवें नॉर्मन उत्पत्तीचीं आहेत.

**धर्म**—इंग्लंडांतील मुख्य धर्म प्रॉटेस्टंट. हा ख्रिस्ती पंथ आहे. १६८९ मधील ' ॲक्ट ऑफ सेटलमेंट ' या कायद्यानें असें ठरविलें आहे कीं, इंग्लंडचा राजा प्रॉटेस्टंट असला पाहिजे, त्यानें पोपची सत्ता मान्य केल्यास किंवा ' रोमिश धर्म ' स्वीकारल्यास किंवा रोमन कॅथालिकपंथी माणसाबरोबर लग्न केल्यास तो पदच्युत झाला असें समजावें. रोमन कॅथालिकपंथी सामान्य जनतेलाहि कित्येक राजकीय व सामा-

जिक हक्क नव्हते; पण १८२९ पासून मतदानाचे व इतर हक्क त्यांनां देण्यांत आले.याशिवाय बाप्टिस्ट, कांग्रिगेशनिस्ट, प्रेस्बिटेरियन, सोसायटी ऑफ फ्रेंड्स, मोरेव्हियन्स, वेस्लेयन, मेथॉडिस्ट, प्रिमिटिव्ह मेथॉडिस्ट, युनैटेड मेथॉडिस्ट, वेस्लेयन रिफॉर्म यूनियन, इंडिपेंडंट मेथॉडिस्ट, वेल्स कॅल्व्हिनिस्टिक मेथॉडिस्ट, कौंटेस ऑफ हंटिंगडन्स कनेक्शन, रिफॉर्म्ड एपिस्कोपल चर्च, फ्री चर्च ऑफ इंग्लंड, असे चौदा निरनिराळया ख्रिस्ती पंथांचे अनुयायी इंग्लंडांत आहेत, पण हल्लीं या सर्वांनां समान राजकीय हक्क असून हे धार्मिक पंथ-भेद इंग्रजांच्या एकराष्ट्रीयत्वाच्या मुळींच आड येत नाहींत. इंग्लंडांत ज्यू लोकांची वस्ती लंडन व इतर कांहीं मोठाल्या शहरांतच फक्त असून त्यांची एकंदर संख्या ( १९०७ ) १९६००० होती. आणखी एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे लिव्हरपूल व लंडन येथील कित्येक लोकांनीं अलीकडे इस्लामी धर्म स्वीकारला आहे व लिव्हरपूलला त्यांची एक मशीद आहे.

द ळ ण व ळ णा चीं सा ध नें.—मोठाल्या व सामान्य अशा दोन प्रकारच्या सडका सुमारें अनुक्रमें २२००० व ९६००० मैल आहेत. अशा सडका बांधून त्यांवरील जकातींचें उत्पन्न घेण्याचा अधिकार खाजगी इसमांस १६६३ मधील कायद्यानें देण्यांत आला. ही पद्धति दीडदोन शतकें चालू होती; पण त्या काळांत सडकांची स्थिति अत्यंत वाईट असे. १८२७ पासून हायवे बोर्ड ( सडकांची व्यवस्था ठेवणारें मंडळ ) व कौन्टी कौन्सिलें अशा स्थानिक स्वराज्याच्या संस्थांकडे सडकांची व्यवस्था देण्यांत आली.

आगगाड्यांची जन्मभूमीच इंग्लंड आहे.पहिली आगगाडी स्टॉकटन ते डार्लिंगटन यांच्यामध्यें १४ मैल १८२५ सप्टेंबर २७ रोजीं सुरू झाली; तथापि मोठ्या प्रमाणांत रेल्वे बांधण्याची पार्लमेंटकडून परवानगी मिळण्यास प्रथम मोठा त्रास पडला. पहिली परवानगी १८३३ मध्यें देण्यांत आली व आगगाड्यांची पुढील वाढ फार झपाट्यानें झाली. (आगगाडी पहा. ) १९१५ सालीं एकंदर २३७०९ मैल लांबीची रेल्वे तयार होती. मुख्य रेल्वे कंपन्या ग्रेट नॉर्दर्न, मिडलंड, ग्रेट सेंट्रल, ग्रेट ईस्टर्न, ग्रेट वेस्टर्न वगैरे असून त्यांशिवाय लहान लहान कंपन्या अनेक आहेत. लंडनमध्यें जमीनीखालून जाणारीहि रेल्वे आहे.

इंग्लंडच्या अंतःप्रदेशांत नौकानयनाची सोय मुख्यतः यॉर्कशायर, लँकाशायर, बर्मिंगहॅम वगैरे परगण्यामध्यें कालवे बांधून केलेली आहे. लिंकनशायरमधील फॉसडाइक हा कालवा फार पुरातन म्हणजे रोमन अमलाच्या वेळीं ( इ. स. ४१० च्यापूर्वी ) बांधलेला आहे; तथापि जहाजांच्या सोयीचे मोठाले कालवे बांधण्यास सुरुवात १७६० पासून झाली व आगगाड्यांची युक्ति निघण्यापूर्वी पन्नासपाऊणशें वर्षें इंग्रजांनीं कालवे बांधण्यावर विशेष भर दिला होता. आगगाड्या वाढल्यापासून कालव्यांचें महत्त्व कमी झालें आहे व काल व्यांच्या एकंदर लांबीपैकीं शेंकडा तीस मैल, रेल्वे कंपन्यांनीं आपल्या सोयीकरितां आपल्या ताब्यांत घेतले आहेत.

उ द्यो ग धं दे.—शेतकीच्या दृष्टीनें पाहतां इंग्लंडांतील पश्चिम व उत्तर भागांतले मिळून १८ परगणे निवळ गवताचे, व पूर्व व दक्षिण भागांतले २२ परगणे पिकांचे आहेत. गहूं, बार्ली व ओट हीं मुख्य धान्यें असून बटाटे, बाटाणे, राय वगैरे पिकें आणि फळफळावळ व भाजीपाला पुष्कळ ठिकाणीं करतात. गवताच्या परगण्यांतील लोक मेंढ्या, गुरें, डुकरें यांचे कळप पाळतात. हॅम्पशायर, सरे, ससेक्स, केंट, बर्कशायर, बकिंगहॅमशायर या परगण्यांत जंगल फार आहे.

इंग्लंडभोंवतालच्या समुद्रांत सर्वत्र मासे पुष्कळ असल्यामुळें या देशांत मासे मारण्याचा धंदा फार मोठ्या प्रमाणांत चालतो. ग्रिम्सबी ( लिंकनशायर ), हल, यारमथ, लोमथ, कार्डिफ, स्वानसी, लिव्हरपूल इत्यादि बंदरें या धंद्यांत प्रमुख असून पूर्व किनाऱ्यावरील बंदरांत मासे सर्वांत अधिक सांपडतात. १८९४–१९०३ या दहा वर्षांच्या सरासरीवरून पाहतां पूर्व किनाऱ्यावर ६९८५५८८ हंड्रेडवेट ( किंमत अजमासे ४०००००० पौंड ), दक्षिण किनाऱ्यावर ६६९७५९ हंड्रेडवेट आणि पश्चिम किनाऱ्यावर ८८४९३२ हंड्रेडवेट मासे दरसाल पकडले गेले आणि १९०३ सालीं या धंद्यांत ९०२१ जहाजें व ४१५३९ मनुष्यें गुंतलेलीं होतीं. १९२१ सालीं इंग्लंड आणि वेल्स मिळून १६५५६९९७ पौंड किंमतीचे मासे धरण्यांत आले. याशिवाय नद्यांमध्यें गोड्या पाण्यांतील मासे पकडण्याचा धंदा पुष्कळ ठिकाणीं चालतो. त्यांत सालमन व ट्राऊट ह्या महत्त्वाच्या जातीचे मासे सांपडतात.

ख नि ज.—खाणींतून खनिज पदार्थ काढण्याचा धंदा इंग्लंडांत अगदीं अलीकडे वाढला हें खरें; तथापि जस्त ही धातु प्राचीन काळापासून सांपडत असल्याचा पुरावा मिळतो. १३ व्या शतकांत ही धातु यूरोपमध्यें पाठवीत असत. त्यानंतर जस्त व शिसें या दोन धातूंचा व्यापार सर्वांत अधिक चालत असे, पण हल्लीं शिसें फार कमी सांपडतें. अठराव्या शतकाच्या अखेरीपासून लोखंड पुष्कळ सांपडूं लागलें, पण दगडी कोळसा, सर्वांत अधिक सांपडतो. हल्लीं दगडी कोळसा लोखंड वालुकामय दगड (सँडस्टोन ), चुनखडीचा दगड,( लाईमस्टोन ), मीठ, जस्त हे खनिज पदार्थ इंग्लंडांत सांपडतात.

का र खा नें.—हे कारखाने विणकाम व धातुकाम असे दोन प्रकारचे आहेत. विणकाम व इतर धंदे फ्रान्स, नेदर्लंड वगैरे देशांत पुष्कळ वाढल्यानंतरहि बराच काळ इंग्लंड हा शेतकीप्रधानच देश होता. तो स्वदेशांत उत्पन्न होणारी उत्तम लोंकर यूरोपांत पाठवीत असे व तिकडून लोंकरीचें कापड आणीत असे. नॉर्मन राजांच्या वेळेपासून लोंकरीच्या विणकामाचा धंदा इंग्लंडांत सुरू झाला, व पुढें धर्मच्छळाच्या काळांत यूरोपांतील पुष्कळ विणकरी इंग्लंडांत येऊन राहिले.

अशा रीतीनें धर्मसहिष्णुतेमुळें विणकामाच्या धंद्यास उत्तेजन मिळालें व पुढें वाफेच्या यंत्राच्या शोधामुळें व विणकामाचीं यंत्रें प्रथम इंग्लंडांतच शोधून काढल्यामुळें, इंग्लंड विणकामाच्या धंद्यांत पहिल्या प्रतीचें राष्ट्र बनलें. इंग्लंडांत कापूस पिकत नाहीं, तरी कापसाचें कापड करण्याचीं यंत्रें इंग्रज शोधकांनीं तयार केल्यामुळें हा धंदाहि इंग्लंडांत फार वाढला. कापसाची आयात १८१५ मध्यें ९९० लक्ष पौंडांची, १८२० मध्यें १५२० लक्ष आणि १८२५ मध्यें ३२९० लक्ष पौंडांची म्हणजे दहा वर्षांत दुप्पट झाली, हा धंदा मँचेस्टर व त्याच्या आसपासचीं शहरें येथें मुख्यतः चालतो. दगडी कोळसा जेथें सांपडतो त्या भागांतच हे कारखाने आहेत. धातुकामाचे कारखानेहि याच भागांत विशेष आहेत. मातीच्या भांड्यांचे कारखाने विशेषतः स्टॅफोर्डशायरमध्यें, कांचेचे कारखाने डर्बीशायरमध्यें, बुटांचे कारखाने नार्दम्पटनशायरमध्यें आहेत. इंग्लंडांतील लोकांची धंदेवारी ( खानेसुमारी १९०१ ) येणेंप्रमाणें आहेः—

विणकाम ९९४६६८, शेतकी ११,९२,१६७, धातुकाम ११.१६,२०२, खाणींतील काम ८,०५११८५, बूट वगैरे २२९२५७, व्यापार ६०२८८१, मातींचीं भांडीं व कांच काम ९०१९३, अध्यापन १७२८७३, सरकारी नोकरी १७१६८७.

शि क्ष ण.–कायद्यानें आईबाप मुलांनां चांगलें प्राथमिक शिक्षण देण्याला किंवा ५ ते १४ वयापर्यंत शाळेंत पाठविण्याला बांधले गेले असतात. याकरितां स्थानिक सरकारें मोफत शाळांची तजवीज करितात, व राष्ट्राकडून अशा शाळांना खर्चाच्या ½ पर्यंत ग्रँट मिळते. स्थानिक सरकारनें काढलेल्या शाळांखेरीज खासगी शाळाहि पुष्कळ असतात, त्यांची संख्या जवळ जवळ २३००० आहे दोन लाख शिक्षकांमध्यें बायका बऱ्याचशा आहेत. 'ट्रेन्ड' शिक्षक प्राथमिक शाळांतून कमी आहेत. १९१८ च्या शिक्षणविषयक कायद्यान्वयें दुय्यम शिक्षणहि मोफत व सक्तीचें करण्याची सत्ता सरकारला प्राप्त झाली आहे. शिक्षण खात्यानें मान्यता दिलेल्या दुय्यम शाळा १०७३ आहेत; त्यांतून २४३००० विद्यार्थी शिकतात. या शाळांतूनहि अध्यापनशास्त्रांत प्रवीण असे शिक्षक कमीच आहेत. शिक्षकांनां पेन्शन देण्याचा नुकताच ठराव पास झाल्यामुळें या धंद्यांत चांगले लोक पडतील अशी सरकारला आशा वाटते.

इंग्लंड व वेल्स मिळून धंदेशिक्षणाच्या ३१४३ शाळा आहेत. त्यांत ४१७१४८ विद्यार्थी शिकतात; विद्यार्थ्यांपैकीं अजमासें निम्मे १७वर्षांच्या आंतील वयाचे आहेत. हें शिक्षण बहुधां संध्याकाळच्या शाळांतून दिलें जातें. प्राथमिक शिक्षकांनां शिकविण्याची सोय सरकारनें केलेली आहे. इंग्लंडांत एकंदर १० विश्वविद्यालयें आहेत; त्यांत ३२०८० विद्यार्थी पदवीकरितां अभ्यास करीत आहेत.

भौ गो लि क वि भा ग.—इंग्लंडचे निरनिराळ्या कारणांकरितां विभाग पाडले आहेत ते येणेंप्रमाणेंः–(१) पार्लमेंटच्या निवडणुकीसंबंधीं विभागः–यांत डिव्हिजन, बरो यांचा समावेश होतो. ( २ ) राज्याकारभारासंबंधीं विभागः—यांत अॅडमिनिस्ट्रेटिव्ह कौंटी, कौंटी बरो, म्युनिसिपल बरो, अर्बन डिस्ट्रिक्ट, रूरल डिस्ट्रिक्ट, सिव्हिल पॅरिश यांचा समावेश होतो. ( ३ ) न्यायाधिकारासंबंधीं विभागः—यांत पुअर लॉ यूनियन, कौंटी कोर्ट सर्किट, कौंटी कोर्ट डिस्ट्रिक्ट पेटी सेशनल डिव्हिजन यांचा समावेश होतो. (४) "चर्च"च्या शासनपद्धतीसाठीं विभागः—यांत प्रॉव्हिन्स, डायोसीस, पॅरिश यांचा समावेश होतो (५) रजिस्ट्रेशनसंबंधीं विभागः–यांत डिव्हिजन, कौंटी, डिस्ट्रिक्ट, सबडिस्ट्रिक्ट यांचा समावेश होतो.

पार्लमेंटच्या निवडणुकीकरतां रटलंडखेरीज सर्व कौंटींचे प्रत्येकी दोन किंवा अधिक विभाग ( डिव्हिजन ) पाडलेले असून प्रत्येक विभागातर्फे एकेक प्रतिनिधि पाठविण्याचा हक्क असतो.

स्था नि क स्व रा ज्या चा का र भा र.—१८३२ च्या रिफॉर्म अॅक्ट ( सुधारणांचा कायदा ) पासून इंग्लंडांतील स्थानिक स्वराज्याच्या कारभारास नवें वळण देण्याचा खरा प्रयत्न सुरू झाला. तत्पूर्वी तिसऱ्या एडवर्डच्या कारकीर्दीनंतरचीं कित्येक शतकें कौंटीची स्थानिक व्यवस्था, खेडेगांवांतील सद्गृहस्थ ( कंट्री जंटलमेन ) व पाद्री ( क्लर्गी ) यांच्या हातीं असे. क्षुल्लक प्रतीच्या फौजदारी खटल्यांत तेच न्यायाधीश असत. 'पुअर लॉ ( गरीबांचा कायदा) च्या अमलाखालील खेडगांवांचा कारभार रेक्टर व चर्चवार्डन यांच्यामार्फत चालत असे. १७८२ च्या गिलबर्ट अॅक्टनें 'पुअर लॉ' खालीं येणारीं अनेक गांवें एकत्र करून त्यांची व्यवस्था पालकमंडळें ( बोर्डस ऑफ गार्डीयन्स ) स्थापून त्यांच्याकडे देण्यांत आली. १८३४ पासून या मंडळांनां निवडणुकीचें तत्त्व लागू करण्यांत आलें, आणि लंडन येथें मध्यवर्ती मंडळ ( सेंट्रल बोर्ड ) स्थापण्यांत आलें. १८३५ मध्यें म्युनिसिपालिट्यांचा कायदा पास होऊन सर्व स्थानिक कर भरणाऱ्यांनां ( रेटपेयर्स ) मतदारीचा हक्क देण्यांत आला. १८८८ मध्यें लोकल गव्हर्नमेंट अॅक्ट ( स्थानिक स्वराज्य कायदा ) पास होऊन परगण्यामधील शहरांखेरीज इतर सर्व गांवांचा कारभार पाहण्याकरितां परगणामंडळें उर्फ कौंटी कौन्सिलें स्थापण्यांत आलीं. ५०००० हून अधिक लोकसंख्येचीं शहरें ( बरो ) स्वतंत्र असून त्यांचा सर्व कारभार नगरमंडळें ( बरो कौन्सिलें ) पाहतात. याशिवाय शहरांचे दहा हजारांहून अधिक लोकसंख्येचा, व त्याहून कमी लोकसंख्येचा असे आणखी दोन वर्ग असून दुसऱ्या वर्गांतील शहरांचा

कारभार अंशतः नगरमंडळें ( बरो कौन्सिलें, ) व अंशतः परगणामंडळें ( कौंटी कौन्सिलें ) पाहतात; व तिसऱ्या वर्गांतील शहरांचा बहुतेक कारभार परगणामंडळें ( कौंटी कौन्सिलें ) च पाहतात. शिक्षण, पाणी पुरवठा, आरोग्य, मिडवाइफचा ( सुईणींचा ) धंदा, वेड्यांची व्यवस्था, पडित जमिनींची लागवड, माणसांचे व जनावरांचे दवाखाने,लहान रेल्वे रस्ते, वगैरे अनेक कामें परगणामंडळें ( कौंटी कौन्सिलें ) पाहतात. नगरमंडळा ( बरो कौन्सिला ) कडे वरच्याप्रमाणेंच कामें असतात. शिवाय स्मशानस्थानें, सार्वजनिक बागा, बाजाराच्या जागा, कत्तलखाने, भाडेकरी गाड्या, स्नानगृहें व धुण्याच्या जागा, ट्रामवे, विजेचे दिवे, सार्वजनिक वाचनालयें, वगैरे अनेक कामें या स्थानिक संस्था पाहतात.

**आं ग्ल भा षे चें मू ळ, घ ट ना, व उ त्प त्ति या वि ष यीं.**–जगाच्या पाठीवरील बऱ्याच मोठ्या प्रदेशांत कोट्यावधि लोकांच्या बोलण्यांत येणारी इंग्रजी भाषा मूलतः जर्मनीच्या उत्तरेकडील प्रदेशांत रहाणाऱ्या लहान टोळ्यांनीं इंग्लंडांत आणलेल्या भाषेपासून उत्पन्न झाली आहे. या टोळ्या इ. स. च्या ५ व ६ व्या शतकांत तेथें जाऊन राहिल्या. त्यांच्यापैकीं ज्यूट, सॅक्सन, व अँगल ह्या मुख्य होत. यांनीं इंग्लंड देशावर स्वारी करून आस्ते आस्ते तेथील केल्टिक जातीच्या मूळच्या बहुतेक रहिवाशांना पश्चिमेकडे व वेल्समधील डोंगराळ प्रदेशांत घालवून दिलें. त्यांचे वंशज आजतागायत तेथें रहात असून त्यांची मूळची भाषा अद्याप तेथें चालू आहे. हे वसाहतवाले तेथें जाऊन राहिल्यानंतर लवकरच त्यांच्यातील मुख्य जे अँगल त्यांच्या नांवावरून ब्रिटनदेशाच्या दक्षिण भागास " अँगल लॅन्ड " ( अँगल लोकांचा देश) अथवा इंग्लंड म्हणूं लागले व त्यांच्या अनेक भाषांच्या सरमिसळीनें झालेली जी भाषा ते बोलत असत, तिला अँग्लोसॅक्सन असें म्हणूं लागले ही भाषा टयूटॉनिक भाषेची एक शाखा आहे; व टयुटॉनिक ही इंण्डो यूरोपीयन भाषाशृंखलेंतील एक असल्यामुळें त्या भाषांशीं या भाषेचा नात्याचा संबंध लागतो.

सध्यां यूरोपांत बोलल्या जाणाऱ्या भाषांचे केल्टिक, लॅटिन, स्लॅव्होनिक व टयुटॉनिक असे चार समुच्चय आपणांस आढळून येतात. वेल्समधील लोकांची वेल्श भाषा-स्कॉटलंडच्या उंचवट्याच्या प्रदेशांत चालणारी गॅलिक भाषा, आयर्लंडमधील आयरिश भाषा, आइल आफ मॅन् मधील मॅनॅक्स् व ब्रिटनी मधील ब्रेटन भाषा, या केल्टिक भाषा होत. लॅटिन भाषेत अनेक प्रकारचे फेरफार होऊन बनलेल्या इटालियन, स्पॅनिअर्ड, फ्रेंच व पोर्तुगीज या लोकांच्या बोलण्यांत येणाऱ्या ज्या भाषा त्या लॅटिन या वर्गांत मोडतात; रशिया, पोलंड, क्रोशिया व आस्ट्रियाचा कांहीं भाग यांत बोलली जाणारी ती स्लॅव्होनिक भाषा होय. बाकी राहिलेल्या यूरोपच्या भागांतील रहिवाशी गॉथिक भाषा बोलतात.त्यांनां हल्लीं सामान्यतः टयूटॉनिक हें नांव देण्यांत येतें. या टयूटॉनिक वर्गांत जर्मन, डच, फ्लेमिश्, डॅनिश, स्वीडिश् आणि नार्वेजियन या भाषांचा समावेश होतो; व ओघानेंच इंग्रजी ही त्यांच्याशीं पूर्ण सादृश्य दाखविते.

आज प्रचलित असलेल्या इंग्रजी शब्दांची बहुसंख्या व निवळ इंग्रजी असे सर्व शब्द आंग्लो सॅक्सन भाषेंतले असून त्यांतच कम, गो, कॅन, वुइल, गूड, सी,हिअर, आवोव्ह, होम, बॅड, अशा विशेष प्रचारांत असलेल्या, अगदीं सोप्या व पूर्ण परिचित अशा सर्व शब्दांचा समावेश होतो. दुसरे कांहीं बहुधा,प्राचीन रोमन लोकांच्या लॅटिन भाषेंतून प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्षरीतीनें आलेले आहेत. बाकीचे केल्टिक, फ्रेंच, जर्मन व स्कॅंडिनेव्हियन मधून आलेले आहेत. तसेंच ग्रीक भाषेंतूनहि जवळ जवळ सर्व शास्त्रीय पारिभाषिक शब्दांचा पुरवठा या भाषेस झाला आहे. लॅटिन शब्दांपैकीं कांहीं रोमन लोकांनीं स्वतः आणले, परंतु मुख्यतः ख्रिस्ती धर्माची स्थापना झाल्यानंतर रोमनचर्चच्या पाद्र्यांनीं व १५ व्या व १६ व्या शतकांत प्राचीन भाषांच्या अभ्यासाचें पुनरुज्जीवन झाल्यानंतरच्या विद्वानांनीं त्यांची जोड करून दिली फ्रेंच शब्द नार्मन लोकांनीं नार्मन विजयानंतर मिसळले, व ते विशेषतः सरंजामी पद्धति, कायदा, चर्च, खेळ व पाकशास्त्र या गोष्टींशीं निगडित झाले आहेत. ग्रीक शब्दांच्या उपयोगाचा संबंध शास्त्रीय शोधांच्या वाढीशीं व भरभराटीशीं आहे. सतराव्या शतकाच्या प्रारंभाच्या सुमारास पहिल्या जेम्सच्या कारकीर्दींत इंग्रजी भाषेनें प्रस्तुतचें आपलें स्वरूप धारण करण्यास सुरवात केली व त्या वेळेपासून इंग्रजी भाषा या नामाभिधानास ती पात्र झाली.

बायबलचें इंग्रजींत भाषांतर होऊन तें छापलें गेल्यामुळें त्याचा लोकांत प्रसार झाला. सार्वजनिक प्रार्थनेचें पुस्तक तयार होऊन बायबलच्या बरोबर चर्चमधून लोकांपुढें वाचलें जाऊं लागलें, व स्पेन्सर, शेक्सपियर, जॉन्सन, बेकन, मिल्टन यांच्यासारखे दांडगे लेखक आपले चिरस्थायी ग्रंथ व्यावहारिक भाषेंत प्रसिद्ध करूं लागले. अशा वेळीं भाषेला निश्चित स्वरूप आलें असें म्हणावयास हरकत नाहीं. यावेळेस इंग्रजी पुस्तकांत सुमारें दहा हजार शब्द उपयोगिले जात. यापुढें जरी शास्त्रांच्या व कलाकौशल्याच्या झपाट्यानें होणाऱ्या वाढीबरोबर त्यांना लागणाऱ्या नवीन पारिभाषिक शब्दांचा पुरवठा करण्याकरितां ग्रीक व लॅटिन शब्दांची तींत बेसुमार भर पडत गेली तरी, तिची स्वाभाविक मोडणी अगर तिचें मूळचें स्वरूप यांत वस्तुतः कांहीं फरक झाला नाहीं. तर इलिझाबेथ राणीच्या व तिच्या पाठीमागून गादीवर आलेल्या जेम्सच्या वेळीं पहिल्यानेंच जो आकार तिला मिळाला तोच बहुतेक सर्व प्रमुख बाबतींत आज कायम आहे.

इंग्रजी भाषेच्या ऐतिहासिक अवलोकनांत चार अवस्था दिसून येतात.

( १ ) आंग्लोसॅक्सन अथवा जुनें इंग्लिश (इ. स. ४५० पासून इ. स. ११००पर्यंत) यावेळीं शब्दसंभार सॅक्सन असून बहुतेक शब्द अपभ्रंश पावले होते.

( २ )११०० पासून १२५० पर्यंतचें 'बाल इंग्रजी'. या वेळीं फ्रेंच शब्द दिसूं लागले व शब्दोच्चारांत अस्पष्टता व गोंधळ उडूं लागला.

( ३ ) मध्यकाळचें इंग्रजी (१२५० पासून १४८५ पर्यंत) या काळांत अपभ्रष्टता अजीबात नाहींशी झाली. व फ्रेंच शब्दांनां देखील संसर्गामुळें या क्रियेस बळी पडणें भाग पडलें.

( ४ )अर्वाचीन इंग्रजी (१४८५ पासून आजपर्यंत) कायम आहे.

इं ग्लं ड चा इ ति हा स.—इ. स. ४०० पर्यंतचा इंग्लंडचा इतिहास ' ब्रिटन ' या सदराखालीं दिला आहे.

इं ग्लं ड दे श व इं ग्र ज जा त.—इंग्लंड हें एक लहानसें बेट आहे व तें पूर्वी अनेकांकडून जिंकलें गेलें होतें, ही गोष्ट आजचा ब्रिटिश साम्राज्याचा अफाट विस्तार व त्याचें अजिंक्य सामर्थ्य पहाणाराला खरेंहि वाटणार नाहीं. पण लहान बीजापासून विस्तीर्ण वृक्ष वाढावा तशी इंग्लंडची स्पृहणीय स्थिति झाली आहे. इंग्लंडचें सामर्थ्य व वैभव यांच्या वाढीचा इतिहास फक्त गेल्या एक हजार वर्षांतला आहे. हिंदुस्थान, व चीन हे देश इंग्लंड बेटाहून अनेक पटीनें मोठे आहेत व त्यांची ऐतिहासिक परंपरा चार हजारांहून अधिक वर्षांची आहे; पण राजकीय सामर्थ्य व सत्ता या बाबतींत ते आज हतबल आहेत. लोकसंख्येच्या बाबतींत पृथ्वीवरील सर्व देशापेक्षां हेच दोन देश अधिक मोठे आहेत, पण इंग्लंड देश लहान असून त्याचें वैभव जगातील इतर देशांपेक्षां फारच मोठें आहे.

इंग्लंडच्या इतिहासावरून त्याच्या वैभवाचीं कारणें दिसतात तीं ( १ ) एकधर्मीपणा ( ख्रिस्तीधर्म ), ( २ ) एकजातपणा ( रोटीबेटीव्यवहार ), ( ३ ) पार्लमेंट, कौन्सिल वगैरेसारख्या प्रातिनिधिक संस्थांचा उदय व वाढ, ( ४ ) धर्मच्छलास प्रतिबंध व धर्ममतसहिष्णुता, ( ५ ) लष्करी आरमारी व वैमानिक युद्धसामर्थ्याची वाढ, ( ६ ) फ्युडल सिस्टिमचा इतरांच्या अगोदर नाश व पुढें कालांतरानें एकतंत्री राज्यपद्धतीचा नाश व लोकनियंत्रित राज्यपद्धतीचा इतरांच्या अगोदर प्रसार, ( ७ ) शास्त्रीय शोध व उद्योगधंद्याची वाढ,(८) सक्तीचें प्राथमिक शिक्षण व उच्च शिक्षणाचा प्रसार, ( ९ ) शास्त्रीय प्रयोगशाला, युनिव्हर्सिट्या वगैरे चिरस्थायी शिक्षणसंस्था, ( १० ) युद्धाचा व साम्राज्यकारभाराचा सतत अनुभव, ( ११ ) स्थानिक व प्रांतिक स्वायत्ततेची आणि साम्राज्यान्तर्गत स्वराज्याची योजना. या सर्व गोष्टी इतर देशांत नव्हत्या असें नाहीं. कांहीं बाबतींत इंग्लंडला फायदा झाला तो विशिष्ट विकासक्रम इतर देशांपेक्षां त्या देशांत अगोदर सुरू झाला यामुळें होय. या कारणाला जर पारिभाषिक नांव द्यावयाचें झाल्यास 'वैकासिक आयत्व' असें देतां येईल.

ख्रि स्ती ध र्म प्र सा र;—ख्रिस्तीधर्मप्रवेशापासून नॉर्मन स्वारीपर्यंत ( ६००–१०६६ ) रोमन लोक इंग्लंड सोडून गेले तेव्हांपासून आगस्टाईनचें केंटमध्यें आगमन होईपर्यंतचीं दोन शतकें इतिहासदृष्ट्या अज्ञानांधकारव्याप्त आहेत. या दोन शतकांत इंग्लंडची स्थिति काय होती याची माहिती मुळींच मिळत नाहीं. इ. स. ५९७ मध्यें पोप पहिला ग्रेगरी यानें रोमहून आगस्टाईनला इंग्लंडांत ख्रिस्ती धर्माचा प्रसार करण्याकरितां पाठविलें. सर्व इंग्लंड ख्रिस्तानुयायी बनण्यास सुमारें नव्वद वर्षे ( इ. स. ५९७ ते ६८६ ) लागलीं. ख्रिस्तीधर्मप्रसाराचें काम रोमच्या मिशनऱ्यांपेक्षां आयर्लंडांतील मिशनऱ्यांनीं अधिक केलें. नार्दंब्रिया, इसेक्स, मार्सिया वगैरे राज्यांत स्थापन झालेल्या चर्चांची ( प्रार्थना मंदिरांची ) एकसूत्री व्यवस्था करण्याचें काम मात्र रोमहून आलेल्या आर्चबिशप थिओडोर यानें केलें. सर्व ठिकाणच्या बिशप वगैरे धर्माधिकाऱ्यांवर सत्ता चालविणारा एक आर्चबिशप कँटरबरी येथें स्थायिक केला, व त्यामुळें हें शहर धार्मिक राजधानी बनलें. अनेक मठ स्थापन झाले, व मठवासी भिक्षु हे लोकांना धर्मतत्त्वांचा उपदेश, गरीब व दुःखग्रस्तांस मदत, ग्रंथरचना व शिक्षणप्रसार हीं सत्कार्यें करीत असत. त्यामुळें राजकीय एकी होण्याच्या पूर्वी पुष्कळ वर्षे इंग्लंड देश धार्मिकदृष्ट्या एक बनला, व या दीडशें वर्षांत इंग्लंडची स्थिति फार सुधारून यूरोपांतील प्रमुख सुधारलेल्या देशांत त्याची गणना होऊं लागली.

इंग्लंडची राजकीय एकी होण्याचें काम फार मंदगतीनें चाललें होतें. सर्व लोक ख्रिस्ती झाल्याचा एक सुपरिणाम असा झाला कीं, आपापसांतील युद्धांत पराभवानंतर एकमेकांच्या भयंकर कत्तली करण्याची प्रवृत्ति कमी झाली. शिवाय राजवंश नष्ट होऊन सर्व लोक समानधर्मी बनल्यामुळें संयुक्त राज्यें बनविण्याची प्रवृत्ति अधिकाधिक वाढली. सातव्या शतकांत नार्दंब्रियाचें राज्य सर्वांत वरिष्ठ होतें. पण ही श्रेष्ठता प्रत्येक राजाला तरवारीच्या जोरावर प्रस्थापित करावी लागत असे. अशा झगड्यांत ८ व्या शतकभर ( इ. स. ७१६–७९६ ) नार्दंब्रियन राजांऐवजीं मार्सीयाचे राजे यशस्वी होत जाऊन सर्वश्रेष्ठ बनले; आणि पुढें ८२९ मध्यें वेसेक्सचा राजा एगबर्ट यानें विजयी होऊन स्वतःची सत्ता सर्वश्रेष्ठ बनविली.

डे न लो कां च्या स्वा ऱ्या.—वरीलप्रमाणें अंतर्गत लढायांनीं एकसूत्री राज्यस्थापनेपर्यंत परिणति होत असतां डेन्स या परकीयांनीं इंग्लंडवर स्वाऱ्या सुरू केल्या. तेव्हां इंग्लंडांतील निरनिराळ्या

राजांनां बचावार्थ एक होण्याची अवश्यकता भासून इंग्लंडची राजकीय एकी होण्यास या स्वाऱ्यांची चांगली मदत झाली. डेन्स लोकांनीं इ. स. ७९३ च्या सुमारास स्वाऱ्यास सुरवात करून ८३६ पर्यंत बहुतेक इंग्लिश किनारा पादाक्रांत केला. इंग्लिश लाकांचे पूर्वज समुद्रावर लुटालूट करण्यांत मोठे धाडसी होते, पण ८०० च्या सुमारास दर्यावर्दीपणाचा गुण त्यांच्यामधून बहुतेक नष्ट झाला होता; त्यामुळें परकीयांच्या या आरमारी हल्लयांनां तोंड देणें अशक्य झालें. प्रथम डेन्स लोक दहापांच जहाजांनिशीं हल्ला करून लुटालूट करीत व परत जात. पण पुढें शेंपन्नास जहाजांचे मोठाले तांडे येऊन त्यावरील लढाऊ लोक देशांत दूरवर शिरून मोठाल्या लढाया करूं लागले व किनाऱ्यावर कायमच्या वसाहती स्थापून राहूं लागले. प्रथम टेम्स नदीच्या उत्तरेकडील सर्व प्रदेश जिंकून नंतर इ स. ८६४ च्या सुमारास वेसेक्स जिंकण्याचा उपक्रम त्यांनीं केला. येथेंच आल्फ्रेड दि ग्रेट ( इ. स. ८७१–९०० ) या इंग्लिश राजानें स्वदेशरक्षणार्थ डेन्स लोकांशीं दीर्घकाल संस्मरणीय सामना दिला. त्यानें डेन्स लोकांचें आरमारी बल लक्षांत घेऊन स्वतःचें आरमार तयार केलें. इंग्लंडच्या राष्ट्रीय आरमाराचा हाच आद्यारंभ होय. अनेक सामन्यांत यशस्वी झाल्यावर आल्फ्रेडनें डॅनिश लोकांशीं ८७८ मध्यें तह करून उभयतांच्या राज्याच्या हद्दी ठरविल्या, त्यांत लंडन, मिडलसेक्स, हर्टफर्डशायर, बेडफर्डशायर व मर्शियाचा अर्धा भाग आल्फ्रेडकडे राहिला व त्यामुळें वेसेक्सच्या राज्याची मर्यादा बरीच वाढली. या तहानंतरच्या शांतताकालांत ( ८७८ ते ८९२ ) आल्फ्रेडनें पुष्कळ सुधारणा केल्या. त्यानें ६० व त्याहूनहि अधिक वल्ह्यांचीं मोठालीं जहाजें बांधलीं. लष्करी सामर्थ्याचा एक आधार जीं तटबंदीचीं ठिकाणें त्यांच्याकडेहि त्यानें लक्ष पुरविलें. शिवाय शिक्षणप्रसारण व राष्ट्रीय वाङ्मयसंवर्धन या कामीं त्यानें अनेक प्रयत्न केले. ( 'आल्फ्रेड दि ग्रेट' पहा ) डॅनिश लोकांबरोबरच्या झगड्याच्या वेळीं आंग्लो–सॅक्सनांच्या सामाजिक व्यवस्थेंत असा एक फरक झाला कीं, गरीब शेतकऱ्यांनां स्वतंत्रतेनें राहणें धोक्याचें वाटून ते कोणत्या तरी सरदाराच्या आश्रयानें राहूं लागले आणि राजा युद्धांत पराक्रम करणारांनां मोठाल्या जमीनी देऊं लागला. त्यामुळें एक बलिष्ठ सरदारांचा वर्ग निर्माण झाला.

आल्फ्रेडनंतर त्याचा मुलगा एडवर्ड दि एल्डर ( ९००ते ९२५ आणि तिघे नातू एथेस्टन ( ९२५–९४० ) व एडमंड व एड्रेड ( ९४०–९९५ ) यांनीं डेन्स लोकांपासून आपलें राज्य सुरक्षित राखलें. त्यानंतरचा वारस एडगर ( ९५९–९७५ ) याची कारकीर्द चांगली शांततेंत गेली. याचा मुख्य सल्लागार सुप्रसिद्ध आर्चबिशप डन्स्टन हा होता. त्यानंतरचा राजा एथेलरेड दि अनरेडी (९७८–१०१३ ) हा नालायक राजा असल्यामुळें डेन्स लोकांनीं प्रथम लहान लहान व ९९१ पासून मोठाले हल्ले केले. एथलरेडनें सहा वेळां तरी १०००० ते ४८००० चांदीचे पौंड लांच देऊन त्यांनां परत फिरविलें. अखेर १०१३ मध्यें हा भित्रा व बेवकूब राजा नार्मंडीला पळून गेला. तेव्हां इंग्रजांनीं युद्ध बंद करून डेन्स राजा स्वेन याची सत्ता कबूल केली. स्वेननंतर सुप्रसिद्ध डेनिश राजा कॅन्यूट यानें १०१४–१०३५ पर्यंत राज्य केलें, व इंग्रज व डेन्स यांनां समानतेनें व न्यायानें वागविलें. सर्व इंग्लंड देश त्याच्या अमलाखालीं होता इतकेंच नव्हे तर डेन्मार्क व नॉर्वे या देशांवरहि त्यानें सत्ता चालविली. कॅन्यूटनंतर त्याचें हें साम्राज्य नष्ट झालें, कारण त्याचे दोघेहि मुलगे नालायक निघाले व लवकरच वारले. तेव्हां जुन्या वेसेक्स राजघराण्यांतील एक वारस एडवर्ड दि कन्फेसर इंग्लंडचा राजा झाला. पण तोहि नालायकच होता. हॅरोल्ड नांवाचा एक कर्तृत्ववान् व महत्त्वाकांक्षी इसम एडवर्डचा नातेवाईक होता, त्यानें सर्व सूत्रें हातीं घेतलीं होतीं. व १०६६ मध्यें एडवर्ड मरण पावल्यावर हॅरोल्ड राजा झाला. याच सुमारास नार्मंडीचा ड्यूक विल्यम यानें बरेंच सैन्य व आरमार जमवून इंग्लंडवर स्वारी केली आणि हॅरोल्डचा हेस्टिंगच्या लढाईंत पराभव केला. लढाईंत हॅरोल्ड मारला गेला आणि विल्यम दि कॉंकरर ( ड्यूक ऑफ नॉर्मंडी ) इंग्लडचा राजा झाला.

१०६६ पर्यंतहि सर्व इंग्रजांची राजकीयदृष्ट्या एकी झाली नव्हती. आल्फ्रेड दि ग्रेटनें कांहीं काळ डेन्स लोकांची सत्ता कुंठित केली, पण लवकरच कॅन्यूट या डॅनिश राजानें सर्व इंग्लंड स्वसत्तेखालीं आणलें. नॉर्मंडीचा ड्यूक विल्यम याच्या स्वारीलाहि सर्व इंग्रजांनीं एक होऊन विरोध केला नाहीं. तात्पर्य, इंग्लंडमध्यें ख्रिस्तोत्तर ११ व्या शतकांत एकराष्ट्रीयत्वाची भावना उत्पन्न झाली नव्हती; सर्व इंग्रजांनां लागू होणारे कायदे तयार झाले नव्हते, ज्यूरीची न्यायपद्धति अस्तित्वांत आली नव्हती, पार्लमेंट नव्हतें, राज्यघटना नव्हती, स्वदेशरक्षणक्षम असें लष्कर किंवा आरमार नव्हतें, युनिव्हर्सिट्या नव्हत्या; कांहीं थोड्या शाळा होत्या. इंग्रजी वाङ्मय म्हणण्यासारखें नव्हतें व कलाकौशल्यहि नांव घेण्यासारखें नव्हतें. अशा विस्खलित लोकांत एकराष्ट्रीयत्वाची भावना उत्पन्न होण्यास त्यांनां यापुढें अनेक राजांच्या कडक शिस्तीखालून जावें लागलें. मात्र सर्व इंग्रज लोक एक धर्माचे व एक जातीचे आणि सर्व इंग्लंड देशावर अनेक राजांऐवजीं एक राजा इतकी अनुकूल स्थिति १०६६ च्या सुमारास इंग्लंडांत उत्पन्न झाली.

इं ग्र जां चें पू र्ण पा र तं त्र्य ( इसवी सन १०६६ ते ११९९ )—नार्मन लोकांनीं इंग्लंड जिंकल्यापासून पुढें दीड शतक इंग्रजांचा असा बिलकुल इतिहास नाहीं. ते परकी अमलाखालीं पूर्णपणें विलीन झाले होते. "विल्यम दि कांकरची", "फ्यूडल सिस्टिम"(सरंजामी पद्धति)व डूम्स डे बुक (सार्वत्रिक नोंदणीचें पुस्तक) दुसऱ्या हेनरीचें साम्राज्य,

पहिल्या रिचर्डचे क्रूसेडमधील (धर्मयुद्ध) विजय, वगैरे गोष्टी इंग्रज आपलेपणाच्या कौतुकानें वर्णन करीत, पण त्या सर्व परकी राज्यकर्त्यांच्या होत्या. हिंदुस्थानच्या राज्यकारभारांत १९ व्या शतकांत हिंदूंचें जितपत अंग होतें तितपतच इंग्रजांचें अंग या दीड शतकांत इंग्लंडच्या राज्यकारभारांत होतें. इंग्रजी भाषा व वाङ्मय पादाहत होऊन लॅटिन व फ्रेंच भाषांचें महात्म्य वाढलें. परंतु या परकी अमलामुळेंच सर्व इंग्रजांत एकीची व एकराष्ट्रीयत्वाची भावना उत्पन्न झाली. परकी राज्यकारभार जितका कडक व सार्वत्रिक असेल तितक्याच प्रमाणांत झपाट्यानें तो स्वतःचें मरण जवळ ओढून आणतो. इंग्रजांच्या सर्वस्वीं विदेशी व कडक अमलामुळें हिंदी लोकांत एकराष्ट्रीयत्वाची भावना जितकी जलद फैलावली तितकी पूर्वी कधींहि पसरली नव्हती तद्वतच इंग्रजांची नॉर्मन अमलाखालीं स्थिति झाली.

नॉ र्म न घ रा णें.—परिणामांच्या दृष्टीनें पाहतां डॅनिश राजा कॅन्यूट व नॉर्मन राजा विल्यम ( १०६६–१०८७ ) यांच्यामध्यें फार फरक होता. कॅन्यूट इंग्लंडांतच वाढलेला व इंग्रजांच्या चालीरीतींचा होता. त्याच्या मंत्रिवर्गांत इंग्रज इसम होते व लहानपणींच राज्यावर आल्यामुळें तो बऱ्याचशा इंग्रज मंत्र्यांच्या तंत्रानें चालत असे. विल्यमची स्थिति सर्वच बाबतींत निराळी होती. अर्धेअधिक आयुष्य नार्मंडींत गेल्यावर तो इंग्लंडचा राजा झाला, त्यामुळें सर्व फ्रेंच चालीरीती त्याच्या अंगीं मुरल्या होत्या. इंग्रजी भाषाहि त्याला येत नव्हती. शिवाय नॉर्मन लोक स्वतःस अधिक सुधारलेले व जित इंग्रजांस रानटी व गांवढळ समजत असत. विल्यमच्या बरोबर पुष्कळसे नॉर्मन लोक इंग्लंडांत येऊन राहिले. दरबारांत व राज्यकारभारांत त्यांचें व फ्रेंच भाषेचें वर्चस्व झालें. अनेक इंग्रजांच्या जमीनी बंडबंडाळीचें निमित्त सांगून जप्त करण्यात आल्या, व त्या नॉर्मन लोकांत सरंजामी पद्धतीनें (फ्यूडल सिस्टिमप्रमाणें)वांटण्यांत आल्या. इ. स.१०७४ पर्यंत चारपंचमांश जमीन राजाच्या हातीं गेली. कांहीं अंशीं सरंजामी पद्धति ( फ्यूडल सिस्टिम ) पूर्वीहि इंग्लंडांत होती. पण विल्यमनें मुख्य तत्त्वाचा फरक हा केला कीं, जमीनदाराऐवजीं राजाची मालकी सर्व जमीनीवर तो सांगूं लागला. ज्येष्ठवारसापद्धति ( प्रायमॉजेनिचर ) याच वेळीं इंग्लंडमध्यें शिरली. त्यामुळें लवकरच पूर्वीचा स्वतंत्र इंग्रज जमीनदारांचा वर्ग नष्ट होऊन सर्वांनां हंगामी कुळांचें स्वरूप प्राप्त झालें. जमीनीचा कबजा लष्करी नोकरीच्या अटींवर दिलेला असल्यामुळें सर्व प्रजाजन नृपाश्रयावलंबी बनले. आपल्या लष्करी अनुयायांची संपूर्ण यादी व माहिती जवळ पाहिजे म्हणून विल्यमनें 'डूम्सडेबुक' नांवाचें नोंदणीपुस्तक तयार करवून त्यांत प्रत्येक कुळाचें नांवगांव, मालमत्ता, गुरेंढोरें, वगैरे सर्व गोष्टी लिहून ठेविल्या. तत्कालीन इंग्लंडच्या इतिहासाचें हें एक अप्रतिम साधन आहे. राजकीय बाबींतल्याप्रमाणें धार्मिक बाबतींतहि बराचसा अधिकार त्यानें आपल्या हातीं ठेविला, व त्याकरिता पुढील नियम त्यानें केले—( १ ) रोमच्या नियोजित पोपला राजानें मान्यता दर्शविल्याशिवाय कोणाहि प्रजाजनानें मान्यता देऊं नये, ( २ ) धार्मिक बाबींतले धर्माधिकाऱ्यांचे निकाल राजानें मान्यता दिल्याशिवाय कोणीहि मानूं नयेत, ( ३ ) धार्मिक बहिष्काराची शिक्षा राजाच्या संमतीशिवाय अमलांत येऊं नये, ( ४ ) राजाच्या परवानगीशिवाय पोपचीं पत्रें राज्यांत कोणीहि आणूं नयेत. याप्रमाणें विल्यमनें इंग्लंडच्या सर्व कारभाराची व्यवस्था नीट लावली. पण त्याच्या सरंजामी पद्धती (फ्यूडल सिस्टिम)मधील महत्त्वाचा दोष त्याच्याच कारकीर्दींत प्रादुर्भूत झाला. हा दोष म्हणजे सरंजामी सरदारांचीं राजाविरुद्ध बंडें. त्यापासून अनेक नार्मन राजांनां त्रास भोगावा लागला; व असलेंच एक लहानसें बंड १०७५ मध्यें उद्भवलें, पण तें विल्यमनें तावडतोब मोडलें.

विल्यमनंतरचे नार्मन राजे विशेष महत्वाचे नाहींत.दुसरा नार्मन राजा विल्यम रूफस ( १०८७–११०० )याची कारकीर्द सरंजामदारांचीं बंडें मोडण्यांत व कँटरबरीचा आर्चबिशप ॲनसेल्म याच्या बरोबर भांडण्यात गेली.हा राजा शिकार करीत असतां स्वतःच्याच इसमाकडून चुकीनें ठार मारला गेला, व त्याचा भाऊ पहिला हेनरी राज्यावर आला. त्यानें परंपरागत कायद्याप्रमाणें राज्य करण्याचें अभिवचन देणारी सनद लोकांनां दिली, आणि मागील कारकीर्दींतील भांडणें मिटवून बऱ्याच धूर्तपणानें व न्यायीपणानें राज्य केलें ( ११०० ते ११३५ ). स्वदेशांत शांतता राखून भाऊबंदांचा देश म्हणजे नार्मंडी जिंकून आपल्या अमलाखालीं आणला. नार्मन घराण्यांतला चवथा व शेवटला राजा स्टीफन (११३५ ते ११५४ ) हा अगदींच नालायक होता; पण खरा वारस नसूनहि त्यानें धर्माधिकारी व सरदार यांनां अधिकार व जहागिऱ्या देऊन सिंहासन बळकाविलें. पहिल्या हेनरीची मुलगी मॅटिल्डा व तिचा मुलगा दुसरा हेनरी या नजीकच्या वारसांनीं स्टीफनबरोबर अनेक वर्षें युद्ध केलें; व त्यांत विजयी होऊन दुसरा हेनरी ११५४ मध्यें राज्यावर आला.

अँ जे व्हि न घ रा णें.—दुसरा हेनरी हा ॲन्जू घराण्याचा पहिला राजा होय. त्याचा बाप व बायको यांच्याकडून फ्रान्समधील अनेक प्रांत त्याला मिळाले होते; आणि तो हुषार व कर्तृत्ववान असल्यामुळें त्यानें इंग्लंड व फ्रान्समधील प्रदेश याचा राज्यकारभार चांगल्या प्रकारें केला. त्यानें इंग्लंडांतील बंडखोर सरदारांचे किल्ले जमीनदोस्त करून त्यांनां आपल्या कह्यांत आणलें व जमीनदारांनां लष्करी नोकरीऐवजीं जमीनीवर कर(स्कुटेज) देण्यास उत्तेजन दिलें व त्या पैशानें पगारी लष्कर ठेवण्याचा उपक्रम केला. यामुळें सरंजामदारांचें प्राबल्य बरेंच कमी झालें. हेनरीनें स्कॉटलंडचा राजा चवथा मालकम याचा पराभव केला व स्कॉटिश राजानें बळकावलेले इंग्लंडचे प्रांत परत मिळविले. स्टीफननें धर्माधिकाऱ्यांनां बरेच स्वतंत्र अधिकार दिले

होते, ते परत घेण्याकरितां हेनरीला कँटरबरीचा आर्चबिशप थॉमस बेकेट याच्याबरोबर झगडावें लागलें; व तें भांडण विकोपास जाऊन त्यांत बेकेट हेनरीच्या सरदारांकडून मारला गेला. या खुनामुळें संतापलेल्या धर्माधिकाऱ्यांशीं अखेर हेनरीला तडजोड करावी लागली. हेनरीला स्वतःचें साम्राज्य वाढविण्याची महत्त्वाकांक्षा असल्यामुळें त्याचा बराच काळ इंग्लंडाबाहेर गेला. त्यानें प्रथम (११५७) उत्तर वेल्स व नंतर (११६३) दक्षिण वेल्स जिंकला; ११७१ मध्यें आयर्लंडहि त्यानें जिंकला; पण कोठेंहि इंग्रज राजाचा कायम अंमल बसला नाहीं. हेनरीच्या उतार वयांत त्याच्या मुलांनीं राज्यप्राप्तीकरितां दोन वेळां बंडें केलीं. पहिल्या वेळीं (११७३) बंड मोडल्यानंतर हेनरीनें मुलांनां शिक्षा न करतां राज्यकारभाराचे स्वतंत्र अधिकार दिले. पण तेवढ्यानें संतुष्ट न होतां त्यांनीं पुन्हां ११८२ मध्यें बंड केलें व तें हेनरीला मोडतां आलें नाहीं; आणि शहाजहान या मोंगल बादशहाप्रमाणें कृतघ्न पुत्रांबद्दल दुःखी अंतकरणानें तो अखेर ११८९ मध्यें मरण पावला.

हेनरीनंतर त्याचा मुलगा पहिला रिचर्ड राज्यावर आला. तो मोठा शूर लढवय्या होता. त्या काळांत ख्रिस्ती लोकांची यरुशलेम परत घेण्याकरितां मुसुलमानांबरोबर धर्मयुद्धें (क्रुसेड) चालू होतीं, त्यांपैकीं एका युद्धांत रिचर्डनें प्रमुख भाग घेतल्यामुळें त्याची बहुतेक कारकीर्द दूरदेशीं गेली. इंग्लंडच्या लोकांकडून क्रूसेडच्या खर्चाकरितां त्यानें अनेक प्रकारें पैसे मात्र उकळिले. त्यानें राजवैभावाच्या कित्येक वस्तू विकल्या; नोकऱ्या, पदव्या व प्रांतहि विकून पैसे गोळा केले. क्रूसेडवरून परत येतांना तो आस्ट्रियाच्या राजाच्या कैदेंत पडला, व मोठी खंडणी देण्याचें कबूल करून इंग्लंडला परत आला. रिचर्डच्या गैरहजेरींत जॉननें राज्य बळकावण्याचा प्रयत्न केला होता, पण त्याबद्दल रिचर्डनें जॉनला क्षमा केली. नंतर रिचर्डनें पुन्हां हरएक उपायांनीं पैसा जमा केला, व अखेरचीं पांच वर्षे फ्रेंच राजाबरोबर लढण्यांत घालविलीं. पण त्यापासून कांहीं फायदा झाला नाहीं व ११९९ मध्यें तो मरण पावला.

**राजकीय हक्क प्राप्तीस सुरवात.**—इंग्लंडचा राज्यकारभार स्थानिक नोकरवर्गावर सोंपविणारा दुसरा हेनरी, व पहिला रिचर्ड यांच्या सारखे राजे इंग्लंडचे एका अर्थानें उपकारकर्तेच होत. राजानें आपल्या गैरहजेरींत कारभार करण्याकरितां नेमलेले प्रधान, व अधिकारी ठराविक नियमाप्रमाणें वागत असत. याच काळांत करांची आकारणी करण्याचें काम स्थानिक कमिट्यांकडे देण्याची पद्धत पडली; गुन्ह्यांची पूर्व चौकशी शेरीफ ऐवजीं कॉरोनर ' कडून होऊं लागली; व लंडन, वगैरे शहरांनां स्वतःचा मेयर निवडण्याचा हक्क मिळाला. याप्रमाणें इंग्लंडच्या लोकांनां राजाच्या वैयक्तिक मर्जीऐवजीं स्वतःचा कारभार स्वतः पाहण्याची संधि मिळून, परंपरागत नियमांनीं कारभार चालविण्याचा पाया घातला गेला.

**जॉन राजा, व मॅग्ना चार्टा.**—रिचर्ड नंतर त्याचा भाऊ जॉन हा खरा वारस नसतांनाहि राजा होऊन सर्व कारभार स्वमतानुसार चालवूं लागला. जॉन कावेबाज होता, पण दूरदर्शीपणा व आत्मसंयमन हे गुण त्याच्या अंगीं मुळींच नव्हते, व सदसद्विचारांची सामान्य कल्पनाहि त्याला नव्हती. त्यानें प्रथमपासून चुका करण्यास आरंभ केला. पहिली बायको टाकून योग्य कारण नसतां दुसरी केली. नंतर थोरल्या भावाचा मुलगा आर्थर या कायदेशीर वारसास पकडून त्याचा खून केला. आर्थरचा पक्ष घेऊन फ्रेंच राजानें जॉन राजाचे फ्रान्समधील सर्व प्रांत जिंकून घेतले, कँटरबरीचा आर्चबिशप नेमण्याच्या बाबतींत पोपबरोबर भांडण करून पोपच्या रोपास व बहिष्कारास जॉन कारण झाला. आणि पोपबरोबरच्या भांडणांत प्रजेनें पोपची बाजू घेतली म्हणून भाडोत्री फौज जमवून त्यानें स्वतःच्या इंग्रज प्रजाजनांबरोबर युद्ध करण्याची तयारी केली. इंग्रजांनां जॉनच्या प्रत्येक कृत्याची चीड वाटल्यामुळें राजाविरुद्ध लोकपक्षहि प्रबल बनत चालला होता. त्यांत धर्माधिकारी, सरदार, व सामान्य जनता एकत्र होऊन त्यांनीं पहिल्या हेनरीच्या चार्टर (प्रजेच्या हक्कांची सनद) प्रमाणें वागण्याचें अभिवचन जॉनकडून घेण्याचा निश्चय करून त्याप्रमाणें राजाकडे मागणी केली. जॉननें प्रथम टाळाटाळ चालविली, पण अखेर लोकांच्या सशस्त्र पुढाऱ्यांनीं त्याला विंडसरनजीक रनीमीडच्या मैदानावर गांठून १५ जून १२१५ रोजीं प्रजाजनांच्या हक्कांसंबंधाच्या नवीन तयार केलेल्या मोठ्या सनदे( मॅग्ना कार्टा )वर त्याची सही घेतली. या सनदेंत एकंदर ६३ कलमें असून व्यक्तिविषयक सवलतीपासून राज्यघटनाविषयक महत्त्वाच्या बाबीपर्यंत पुष्कळशा बाबी नमूद केलेल्या आहेत. त्यांपैकीं विशेष महत्त्वाचीं कलमें येणेंप्रमाणें; (१) राज्यांतील महामंत्रिसभेच्या (ग्रेट कौन्सिल) संमतीशिवाय राजानें कोणताहि कर बसवूं नये. (२) एका अपराधाबद्दल एकाहून अधिक वेळां चौकशी किंवा शिक्षा होऊं नये. (३) न्यायकोर्टांत खटला चालविल्याशिवाय कोणालाहि कैद करून तुरुंगांत टाकूं नये. (४) गुन्ह्याच्या संशयावरून पकडलेल्या इसमास योग्य मुदतींत कोर्टापुढें आणून ज्यूरीमार्फत त्याची योग्य चौकशी व्हावी. (५) इंग्रजी कायदे माहीत नसलेल्या कोणाहि परकी इसमाला न्यायाच्या किंवा इतर राजकारभाराच्या कामावर नेमूं नये; याशिवाय धर्माधिकाऱ्यांनां, सरदारांनां, व्यापाऱ्यांनां, लंडन शहराला वगैरे अनेकांनां सवलती व हक्क देणारीं कलमें त्यांत होतीं. सर्वांत आश्चर्यकारक एक कलम असें होतें कीं, राजा सदरहू सनदेप्रमाणें वागेल अशी खात्री नसल्यामुळें पंचवीस इसमांची कमेटी नेमावी व त्या कमेटीनें, जरूर तर लष्करी

मदतीनें, सनदेप्रमाणें अंमलबजावणी राजाकडून करून घ्यावी. पुढें पुढाऱ्यांचाच संशय खरा ठरून सनदेप्रमाणें न वागतां जॉननें प्रजेशीं युद्ध सुरू केलें, पण त्याच्या पक्षाला फारसें कोणी न मिळाल्यामुळें लोकपक्ष फ्रेंचांच्या मदतीनें विजयी झाला; आणि हें आपसांतील युद्ध चालू असतांनाच जॉन १२१६ मध्यें मरण पावला.

तिसरा हेनरी व पार्लमेंटची स्थापनाः—जॉनचा अल्पवयी मुलगा हेनरी गादीवर येतांच लोकपक्षीय पुढारी पेमब्रोकचा अर्ल विल्यम मार्शल यानें फ्रेंच सैन्याला परत लावून देऊन देशांत शांतता प्रस्थापित केली. इ. स. १२३२ पासुन हेनरी स्वतः राज्यकारभार पाहूं लागला. तो उधळ्या व स्वैरवृत्तीचा होता, तथापि जुलमी किंवा क्रूर नव्हता. लवकरच सायमन डी मॉटफर्ड या परकी फ्रेंच इसमानें राजाची मर्जी संपादून सर्व कारभाराचीं सूत्रें आपल्या हातांत घेतलीं; पण पुढे त्याची राजाबरोबर तेढ येऊन तो लोकपक्षाचा पुढारी बनला. न्यायी व सनदशीर राज्यकारभाराचा तो पुरस्कर्ता असल्यामुळें इंग्रजांच्या विश्वासास तो पात्र झाला. हेनरीनें वरचेवर बसविलेले कर लोकांना त्रासदायक झाल्यामुळें ग्रेट कौन्सिलच्या सभा वरचेवर भरूं लागल्या. या कौन्सिललाच मॉटफर्डनें पार्लमेंटचें विस्तृत स्वरूप दिलें. प्रत्येक कौंटीमधून चारचार प्रतिनिधी त्यानें १२५३ मध्यें बोलाविले व तेव्हांपासून राज्यकारभाराला खरें पार्लमेंटरी उर्फ प्रातिनिधिक स्वरूप प्राप्त झालें. तथापि हे प्रतिनिधी उच्च वर्गांतले सरदारच होते, आणि लवकरच ते आपसांत भांडूं लागले. विशेषतः त्यांपैकीं बरेचजण मॉटफर्डचा हेवा करूं लागले. या दुफळीचा फायदा घेऊन हेनरीनें मॉटफर्डबरोवर लढण्याची तयारी केली, प : लेवेस येथील लढाईंत ( १२६४ ) मॉटफर्डलाच जय मिळाला व त्यानें राजा युवराज एडवर्ड व तत्पक्षीय बरेच सरदार यांनां कैदेंत टाकलें; आणि राज्यकारभार आपल्या हातीं घेतला. त्यानें १२६४ मध्यें प्रत्येक शायरनें निवडलेले चार चार सरदार ( नाईट ) बोलावून पार्लमेंट भरविलें. पुढील सालीं ( १२६५ ) प्रत्येक शहरातर्फे दोन दोन व नगरातर्फे ( बरो ) दोनदोन प्रतिनिधी अधिक बोलावून त्यानें पूर्ण प्रातिनिधिक असें पहिलें पार्लमेंट बोलावलें. तथापि मॉटफर्डविरुद्ध असलेले बरेचसे सरदार या पार्लमेंटपासून अलिप्त राहिले. त्याच सालीं युवराज एडवर्ड कैदेंतून पळून गेला, व त्यानें सैन्य जमवून मॉटफर्डचा इव्हशॅम येथे पराभव केला. कैदेंतून मुक्त झाल्यावर हेनरी सात वर्षांनीं (१२७२ मध्यें ) मरण पावला.

पहिला व दुसरा एडवर्ड.—मध्ययुगांतील सर्वांत महत्त्वाचा राजा पहिला एडवर्ड होय. यानें श्रीमंत व चैनी बनलेले धर्मोपदेशक पुन्हां सदाचरणी व्हावे म्हणून ख्रिस्ती मठांनां राजाच्या परवानगीशिवाय जमीनी देऊं नयेत असा कायदा केला, व सैन्याची सुधारणा केली. व्याजबट्ट्याच्या व्यापारामुळें लोकांत अप्रिय बनलेल्या ज्यु लोकांनां राज्यांतून हाकून दिलें. नंतर वेल्स देश जिंकून राजपुत्राला 'प्रिंस ऑफ वेल्स' अशी पदवी सुरू केली. स्कॉटिश राज्याच्या वारसा प्रकरणांत हात घालून तेथें स्वतःचें वर्चस्व युद्धविजयानें स्थापलें; आणि इंग्लंडचें सामर्थ्य व वैभव वाढविलें. त्याच्यानंतरचा दुसरा एडवर्ड (१३०७-१३२७) हा सर्वस्वीं नालायक राजा होता. स्कॉटलंडचा देशभक्त रॉबर्ट ब्रूस यानें बॅनॉकबर्न येथें इंग्रजांचा पराभव केला. पुढें खुद्द त्याची बायको इसाबेला हिनें लॉर्ड मॉर्टिमर या सरदाराच्या मदतीनें ( या दोघांचा अनीतिसंबंधहि होता. ) राजाविरुद्ध लढाई करून त्याला तुरुंगांत टाकलें व अखेर ठार मारलें, आणि स्वतःच्या अल्पवयी मुलाच्या नांवानें स्वतःच्या हातीं राज्यकारभार घेतला; व अशा रीतीनें पेशवाईतील आनंदीबाईवर ताण केली.

शतवार्षिक युद्ध ( इसवी सन १३३७—१४५३ ), तिसरा एडवर्ड.—तिसऱ्या एडवर्डनें वयांत येतांच मार्टिमरला खुनाच्या आरोपावरून फांशीं दिलें आणि स्वतःच्या हातीं राजसत्ता घेतली, तो धाडसी व युद्धकुशल होता. त्यानें स्कॉटलंडमधील तंट्यांत पुन्हां पडून १३३३ ते १३४१ पर्यंत युद्ध चालू ठेवलें व बराच मुलूख हस्तगत केला. मध्यंतरीं १३३७ मध्यें त्यानें फ्रान्सच्या गादीवर वारसाहक्क सांगून युद्ध सुरू केलें; तें हप्त्याहप्त्यानें एकंदर शंभर वर्षें चाललें. एडवर्डनें स्लुइस येथें समुद्रावरील लढाईत ( १३४० ) आणि क्रेसी व पॉइटीअर्स या जमीनीवरील दोन लढायांत फ्रेंचांचा पराभव केला. यांत त्याच्या "ब्लाक प्रिन्स" हें टोपण नांव असलेल्या मुलानें प्रामुख्यानें भाग घेतला. ब्रिटिनीच्या तहानें ( १३६० ) एडवर्डला फ्रान्सचा बराच भाग व तीस लक्ष सोन्याचे क्राऊन मिळून तात्पुरतें युद्ध थांबलें. मध्यंतरीं १३४८ मध्यें 'ब्लॅक डेथ' नांवाच्या सांथीचा रोग होऊन बरीच प्राणहानि झाली व त्यामुळें मजुरीचे दर वाढूं लागले, तेव्हां मुद्दाम कायदा करून एडवर्डनें ते दर पूर्वीइतके कायम ठेविले. याच कारकीर्दीत फ्लाडर्समधील बरेच विणकरी इंग्लंडमध्यें येऊन राहिले व लोकरीचें कापड विणण्याचा धंदा इंग्लंडांत मोठ्या प्रमाणावर सुरू झाला. याच कारकीर्दीत विक्लीफनें धर्मसुधारणेची म्हणजे विशेषतः धर्मोपदेशकांचें चैनीचें व अनीतीचें वर्तन सुधारण्याची चळवळ सुरू केली, व भावी लूथरकृत धर्मसुधारणेपैकीं बरींच तत्त्वें प्रतिपादन केलीं. जान विक्लीफ याला "धर्म सुधारणेचा सकाळचा तारा" असें यामुळेंच म्हणतात. राजा युद्धांत गुंतलेला असतांना राज्यकारभार पाहणारे त्याचे बरेच प्रियमित्र ( फेव्हरिटस ) लांच खाऊन गबर बनले होते, त्यांची चौकशी पार्लमेंटनें करून त्यांनां कैदेच्या शिक्षा दिल्या. १३६९ मध्यें शतवार्षिक युद्ध पुन्हां चालू झालें पण एडवर्डच्या वार्धक्यामुळें त्याला फ्रेंचांविरुद्ध

विजय मिळवितां आले नाहींत, व निराश स्थितींतच तो १३७७ मध्यें मरण पावला.

तिसऱ्या एडवर्डचा नातु दुसरा रिचर्ड (१३७७–१३९९) याच्या कारकीर्दीत शतवार्षिक युद्धांत इंग्रजांनां विजय मिळाले नाहींत; व त्यामुळें प्रजा नाखूष होऊन १३८१ मध्यें वॅट टायलर या पुढाऱ्यानें बंड केलें. विक्लीफच्या 'लोलर्डस' नांवाच्या अनुयायांनीं आपली धर्मसुधारणेची चळवळ जोरानें चालविली. त्यामुळें सर्व कारकीर्द असंतोष व अस्वस्थता यांत गेली. अखेर चवथा हेनरी या दूरच्या वारसानें बंड करून राज्य बळकावलें व रिचर्डला तुरुंगांत उपासमार करून ठार मारलें.

लँ कॅ स्ट र घ रा णें.—चवथा हेनरी (१३९९–१४१३) हा धोरणी व मेहनती राजा होता. त्यानें वेल्स देशांत झालेलें बंड मोडलें व स्कॉटलंड व फ्रान्स या देशांबरोबरचें युद्ध बंद पाडलें. पुढें हा राजा रक्तपितीचा रोग होऊन तो मरण पावला. त्याचा मुलगा पांचवा हेनरी (१४१३–१४२२) हा लहानपणीं मोठा व्रात्य होता, पण राज्यावर आल्यावर त्यानें स्वतःवरील जबाबदारी नीट ओळखून राज्य केलें. विशेषतः फ्रान्सबरोबरचें युद्ध पुन्हां चालू करून एजिंकूरच्या लढाईंत (१४१५) मोठा जय मिळविला, व बऱ्याच अनुकूल अटींवर ट्रॉयचा तह केला, त्यांत हेनरीला फ्रेंच राजकन्या कॅथराईन ही बायको मिळून त्याला तहहयात फ्रेंच राजाचा वारस म्हणून मान्य करण्यांत आलें. पण फ्रेंच राजाच्या पूर्वींच तो मरण पावला. त्याचा मुलगा सहावा हेनरी याच्या वारसहक्काकरितां फ्रान्सबरोबर युद्ध चालू ठेवण्यांत आलें. पण या वेळीं जोन ऑफ आर्क नांवाच्या स्त्रीनें फ्रेंच सैन्याचें अधिपत्य स्वीकारून इंग्रज सैन्याचा पराभव केला. पण ती लवकरच शत्रूकडून पकडली जाऊन चेटकी असल्याच्या आरोपावरून जाळली गेली. पण सहावा हेनरी हा नालायक राजा असल्यामुळें फ्रान्सबरोबरचें शतवार्षिक युद्ध कायमचें बंद पडलें; इतकेंच नव्हे तर खुद्द इंग्लंडमध्यें आपापसांतील युद्ध (वॉर्स आफ रोझेस) सुरू झालें.

रो झे स चें यु द्ध (१४५३–१४८५).—लँकस्टर घराण्याचा दुर्बल राजा सहावा हेनरी याच्याबरोबर यॉर्क घराण्यांतील रिचर्ड नांवाच्या इसमानें युद्ध सुरू केलें. ह्या दोन घराण्यांतील युद्ध त्यांच्या निशाणावरील तांबड्या व पांढऱ्या गुलाबांच्या चिन्हांवरून 'वॉर्स ऑफ दि रोझेस' या नांवानें प्रसिद्ध आहे. यांत यॉर्कघराणें यशस्वी होऊन त्याचे चवथा एडवर्ड (१२६१–१४८३), पांचवा एडवर्ड (१४८३) व तिसरा रिचर्ड असे तीन राजे झाले. तिसऱ्या रिचर्डनें अल्पवयी पांचवा एडवर्ड याचा खून करून राज्य बळकावल्यामुळें इंग्रज प्रजेनें रिचर्डविरुद्ध बंड केलें. त्यांत रिचर्ड मारला जाऊन टयूडर घराण्याचा सातवा हेनरी हा इंग्लंडचा राजा झाला. नॉर्मन ते टयूडर घराण्यापर्यंतच्या काळालाच मध्ययुग म्हणतात. इंग्रजांच्या राहणींत बराच फरक झाला. धर्मयुद्धांच्या प्रसंगानें प्राच्य देशांची माहिती होऊन सुरेख लाकडी सामान, सतरंज्या व मसाल्याचे पदार्थ लोक वापरूं लागले; नाणीं अधिक प्रचारांत आलीं.

टयू ड र रा जां चा अ नि यं त्रि त रा ज्य का र भा र–(१४८५–१६०३) सातवा हेनरी (१४८५—१५०९):—सातव्या हेनरीचा गादीवर कायदेशीर वारसा हक्क फारच अल्प होता. पण मध्ययुगांतील ब्रिटिश पार्लमेंटनें कायदेशीर हक्कांकडे न बघतां "बळी तो कानपिळी" या न्यायानें बलवानांनांच राजपद देऊन आनुवंशिक राजशाहीऐवजीं लोकनियुक्त राजशाहीच्या तत्त्वाचा पुरस्कार केला होता; किंवा बलिष्ठ राज्यापहारी इसमांपुढें पार्लमेंट मुकाटयानें मान वांकवीत असे, असेंहि म्हणतां येईल. हेनरीच्या राज्यारोहणानें "रोझेसचें युद्ध" पूर्ण बंद पडलें नाहीं, तर पुढील दहा बारा वर्षं देशांत राजाविरुद्ध अनेक बंडें झालीं तीं मोडण्यांत हेनरीला पूर्ण यश आल्यामुळें १४९७ पासून देशाला शांतता लाभली. फ्रान्स, स्पेन व स्कॉटलंड या परदेशांबरोबरहि युद्धप्रसंग न येऊं देतां त्यानें स्वतःच्या कारस्थानकुशलतेनें इंग्लंडला फायदेशीर अशा गोष्टी घडवून आणल्या. इंग्रज व्यापाऱ्यांच्या जहाजांनां डेन्मार्क व नार्वे या देशांतील बंदरांशीं व भूमध्यसमुद्रांतील व्हेनिस, फ्लॉरेन्स वगैरे बंदरांशीं व्यापार करण्याची परवानगी त्यानें मिळविली. शिवाय कोलंबसच्या उदाहरणानें उत्तेजित होऊन अमेरिकेकडे जाण्यास व उत्तर समुद्रांतून जपान वगैरे प्राच्य देशांकडे जाण्याचा मार्ग शोधून काढण्यास धाडसी इंग्रज खलाशांनां मदत केली. स्पेनच्या राजाची मुलगी स्वतःच्या मुलाला करून व स्काटलंडच्या राजाला मुलगी देऊन त्यांच्यांशीं हेनरीनें स्नेह जोडला. पण सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे हेनरीनें आपल्या कारकीर्दीच्या उत्तरार्धांत युद्धप्रसंग टाळून, बिनवारसी जमीन सरकारजमा करून, "स्टार चेंबर" नांवाच्या नूतननिर्मित वरिष्ठ कोर्टामार्फत बेकायदा वर्तन करणारांनां गुन्ह्याच्या स्वरूपाऐवजी श्रीमंतीच्या प्रमाणानुसार जबर द्रव्य दंड करून,व इतर युक्त्यांनीं त्यानें सरकारी खजिना भरलेला राखला. व पैशाच्या मागणीकरितां पार्लमेंट भरविण्याचे आणि विरोध करण्यास पार्लमेंटला संधि देण्याचे प्रसंग शक्य तितके टाळून सर्व राज्यकारभार एकतंत्री सुलतानाप्रमाणें चालवला, व तोच मार्ग त्याच्या वारसांनीं अवलंबिला. हा टयूडर घराण्याचा एक विशेष होय. सातव्या हेनरीचा आणखी एक विशेष म्हणजे त्यानें प्रिय मित्रांनां वरिष्ठ नोकऱ्या देण्याचें साफ बंद करून श्रेष्ठ अधिकाराच्या सर्व जागांवर चांगलीं लायक माणसें नेमलीं. कारकीर्दीच्या अखेर अखेरीस त्याचा द्रव्यसंचयलोभ इतका वाढला कीं, मरणसमयीं १८ लाख पौंड त्याच्या खजिन्यांत शिल्लक होते.

हेनरी हा द्रव्यलोभी व कसलीहि दिक्कत न बाळगणारा पण सावध, हुषार व काटकसरी राजा होता.

आठवा हेनरी (१५०९–१५४७).—आठवा हेनरी हा इंग्लंडच्या इतिहासांतील सुलतानी अमलाचा आदर्श होय. राज्यावर आला तेव्हां हेनरी केवळ अठरा वर्षांचा असून, देखणा, हुशार, विद्यासंपन्न, संगीतादिकलाप्रिय, महत्त्वाकांक्षी होता. पण तो पुढें स्वार्थी, क्रूर, कृतघ्न अतिद्वेषी व विषयी बनला; तथापि कावेबाजपणा, बहुविषयग्रहिष्णुता; शांत विचार करण्याची पात्रता व संकटप्रसंग व लोकमत ओळखण्याची कुशलता हे गुणहि त्याच्या अंगीं असल्यामुळें त्यानें धाडसीपणानें अनेक जुलमी कृत्यें केलीं, तरीहि चाळीस वर्षांच्या दीर्घकालीन लोकक्षोभाग्नीला बळी न पडतां तो मरेपर्यंत गादीवर राहिला; व हेंच त्याच्या विलक्षण बुद्धिमत्तेचें मोठें द्योतक आहे. बापाचें शांततेचें धोरण सोडून देऊन त्यानें फ्रान्स व स्काटलंड य देशांबरोबर युद्ध केलें, पण त्यांत फायदा झाला नाहीं. थॉमस वूल्से या राजनिष्ठ, निर्भय, युक्तिबाज पण उद्धट, डौली व अघोरणी आर्चबिशपला हेनरीनें प्रधान नेमलें, पण त्याच्या तंत्रानें न वागतां स्वदेश व परदेश दोहोंकडील कारभाराचें धोरण तो स्वतः ठरवीत असे व तें वूलसेच्या हातून पार पाडीत असे; व त्यामुळें लोक चुकांबद्दल व दोषांबद्दल वूलसेला जबाबदार धरीत, परराष्ट्रीय राजकारणांत तर या दोघांच्याहि अक्कलहुषारीला चकवून फ्रान्सचा राजा पहिला फ्रान्सिस व स्पेनचा पांचवा चार्लस यांनीं सुमारें बारा वर्षें परस्परांतील चुरशींत हेनरीकडून द्रव्य व सैन्य यांचें साहाय्य थापा देऊन मिळविलें, आणि अखेर हेनरीला मोबदला मुलूख कांहींच दिला नाहीं. या ठकांच्या नादीं लागल्यामुळें हेनरीचा खजीना मात्र रिता झाला. पण यापेक्षांहि भयंकर दोषास्पद गोष्टी हेनरीनें इंग्लंडांत केल्या. पुत्रसंततीच्या व सुंदर स्त्रियांच्या लोभास बळी पडून त्यानें एका मागून एक सहा बायका केल्या, व नवी बायको करण्याकरितां जुनीचा अनत्याचरणाच्या आरोपावरून वध करण्याच्या अत्यंत क्रूर व उलट्या काळजाचा मार्ग स्वीकारला. तसेंच पहिल्याच बायकोच्या घटस्फोटाला पोपची परवानगी मिळेना म्हणून नूतनोत्पन्न प्रॉटेस्टंट पंथ स्वीकारून त्यानें पोपची सत्ता अमान्य केली, व स्वतःच्या हातीं धर्मसत्ता घेतली. याच विवाहप्रकरणांत वूलसे या प्रधानाला त्यानें बडतर्फ केलें; व चवथ्या विवाहप्रकरणांत थॉमस क्रामवेल या प्रधानाला राजद्रोहाच्या आरोपावरून फांशी दिलें. कारकीर्दीच्या अखेरीस (१५४२) आयर्लंड व स्कॉटलंड यांजबरोबर युद्ध सुरू झालें, व त्यांचा नीट निकाल लागण्यापूर्वींच तो मरण पावला. बापाच्या पुंजीवांनीं व शिवाय ख्रिस्ती मठांची संपत्ति जप्त करून त्यानें खर्चाला पैसा मिळविला व पार्लमेंट भरविण्याचें शक्य तितकें टाळलें आणि अनियंत्रित कारभार केला.

धर्मच्छळ.—आठव्या हेनरीचा मुलगा सहावा एडवर्ड (१५४७–१५५३) व थोरली मुलगी मेरी (१५५३–१५५८) या दोन कारकीर्दी प्रॉटेस्टंट व कॅथॉलिक या दोन ख्रिस्तीधर्मपंथांतील झगड्यांकरितां प्रसिद्ध आहेत. धर्मच्छळ हाहि टयूडर घराण्याचा एक विशेष आहे. सहावा एडवर्ड अल्पवयी असल्यामुळें राज्यकारभार पहाण्याकरितां सोळा इसमांच्या कौन्सिलनें प्रॉटेस्टंट पंथ इंग्लंडांत दृढमूल करण्याकरितां रोमन कॅथोलिकांचा छळ केला. पण ही कारकीर्द लवकरच संपून कॅथॉलिकपंथी मेरी ही इंग्लंडची राणी झाल्यावर तिनें प्रॉटेस्टंटपंथीयांचें निर्मूलन करण्याकरितां त्यांनां जिवंत जाळण्याचा सपाटा चालविला. या कार्यांत मदत मिळावी म्हणून तिनें स्पेनचा कॅथॉलिक राजा दुसरा फिलिप याच्याशीं विवाह केला. त्यामुळें इंग्रज प्रजा फार असंतुष्ट झाली आणि मेरीहि पुत्रप्राप्ति न झाल्यामुळें निराश होऊन मरण पावली.

एलिझाबेथ (१५५८—१६०३).—मागील तीन कारकीर्दींतील उच्छृंखलपणामुळें स्वदेशांतील व परदेशांतील विस्कटलेली राजकारणाची घडी नीट बसविण्याचें अत्यंत अवघड काम एलिझाबेथनें आपल्या दीर्घकालीन कारकीर्दींत धिम्मेपणानें व दूरदर्शीपणानें केल्यामुळें इंग्लंडच्या इतिहासांतील हा एक अत्यंत बोधप्रद काळ आहे. ती स्वतः प्रॉटेस्टंट असल्यामुळें तिनें हाच पंथ इंग्लंडांत कायम केला आणि रोमन क्याथॉलिक लोकांच्या हत्या पुष्कळ केल्या. पण प्राटेस्टंट इतिहासकार ही गोष्ट लपविण्याचा प्रयत्न करितात. तिनें पोपची धर्मसत्ता कायमची नष्ट केली. त्याचप्रमाणें स्पेनची किंवा इतर कोणत्याहि परराष्ट्राची सत्ता इंग्लंडवर चालू नये म्हणून विवाहार्थ आलेल्या अनेक मागण्या तिनें नाकारल्या. नीतिबंधनें पाळावयाचीं नाहींत, वाटेल ते वार मिळवावयाचे, कंटाळा आला म्हणजे टाकून द्यावयाचे आणि पुन्हां नीतिमत्तेचा टेंभा मिरवावयाचा व लोकांस धाकानें गप्प करावयाचें असलें कौशल्य इलिझाबेथप्रमाणें दुसऱ्या कोणत्याहि राणीस साधलें नसेल. हाकिन्स ड्रेक, फ्रोबिशर, रॅले वगैरे धाडशी खलाशांनां नवें जग (अमेरिका, आस्ट्रेलिया वगैरे भूभाग) स्पेन व पोर्तुगालच्या मालकीचे ठरविणारी पोपची आज्ञा मोडण्यास उत्तेजन दिलें. प्रत्यक्ष युद्ध न पुकारतां ह्या खलाशी वीरांनीं स्पॅनिश जहाजांची लुटालूट करून सोन्यानें इलिझाबेथचा खजिना भरला. एलिझाबेथ अविवाहित राहिल्यामुळें इंग्लंडच्या गादीची पुढील वारस स्काटलंडची राणी मेरी हिनें कॅथालिकांच्या मदतीनें केलेले गुप्त कट तिनें युक्तीयुक्तीनें मोडले. पण सर्वांत मोठें संकट म्हणजे स्पेनच्या राजानें इंग्रजांमधील धार्मिक दुफळीची संधि साधून इंग्लंड जिंकण्याकरितां पाठविलेलें 'अजिंक्य आरमार' हें होय. यावेळीं धार्मिक मतभेद विसरून एकजुटीनें या स्पॅनिश

स्वारीला तोंड देण्यांत इंग्रजांनीं दाखविलेली राष्ट्रस्वातंत्र्य-भक्ति अत्यंत वाखाणण्यासारखी आहे. स्पॅनिश आरमार जय न मिळतां बरेंच नष्ट होऊन थोडकीं जहाजें स्पेनला परत आलीं ( १५८८ ). पण पुढेंहि १६०३ पर्यंत उभय पक्षांत समुद्रावर अनेक चकमकी झाल्या व १५९९ मध्यें आणखी एक " अजिंक्य आरमार " चालून येण्याची भीति इंग्लंडला उत्पन्न झाली होती पण त्यांतून कांहीं निष्पन्न झालें नाहीं. याप्रमाणें इंग्लंडला प्राटेस्टंट देशस्वातंत्र्य राखण्यांत उत्तम मदत करून इलिझाबेथ १६०३ मध्यें मरण पावली. प्युरिटन लोकांना केलेला विरोध, व्यापारी परवानें ( मोनापोली ), आयर्लंडांतील बंडाळी, वगैरे कारणांमुळें तिचीं अखेरचीं वर्षें अप्रिय वाटूं लागलीं होतीं.

टयूडर घराण्याच्या काळांत इंग्लंडांत बरेच फेरफार झाले. इंग्लंडांत लोंकरीचें कापड करण्याचा धंदा वाढला. राहत्या घरात सुधारणा होऊन तावदानें प्रचारांत आलीं. लोकांमध्यें चित्रांची, पुस्तकांची व नाटयाची आवड वाढली. आफ्रिका, अमेरिका, आशिया वगैरे खंडांतील दूरच्या देशांशीं लोक व्यापार करूं लागले.

स्टु अ र्ट रा जे व पा र्ल में ट या च्या म धी ल झ ग डा, पहिला जेम्स. ( १६०३–१६२५ ).—जेम्सचें राज्यारोहण हा इंग्लंडच्या मुत्सद्देगिरीचा एक मोठाच डाव आहे. इंग्रजांनीं स्काटलंडचा राजा मान्य केला पण राजधानी लंडन कायम राखिली; त्यामुळें विनयुद्धानें स्काटलंड बहुवशीं जिंकलें गेलें. शिवाय परकी म्हणजे इंग्रजी कायद्यांचा व राज्यपद्धतीचा बिनमाहितगार राजा आल्यानें पार्लमेंटचें वर्चस्व होण्यास अनुकूल संधि आली. जेम्स राज्यावर येताच कॅथॉलिक व प्युरिटन दोन्ही धर्मपंथांनीं सवलती मागितल्या. प्युरिटन लोकांच्या सौम्य मागण्यांना सुप्रसिद्ध विद्वान फ्रॅन्सिस बेकन व पार्लमेंट अनुकूल होतें; पण जेम्सनें निश्चित धोरण कोणतेंहि न स्वीकारल्यामुळें पार्लमेंटच्या व लोकांच्या नाखुषीस सुरवात झाली. आयात व निर्गत मालावर जेम्स पार्लमेंटच्या संमतीशिवाय जकाती बसवूं लागला. त्याला पार्लमेंटनें विरोध करून राजाची पैशाची मागणी (सब्सिडीज) पार्लमेंटनें फेटाळली, तेव्हां १६११ मध्यें पार्लमेंट मोडून जेम्स राज्यकारभार चालवूं लागला. १६१४ मध्यें त्यानें पार्लमेंट बोलावलें, पण विरोध कायम असल्यामुळें पुन्हां मोडलें. बरोबरच्या झगड्यांत आधार म्हणून जेम्सनें स्पेनशीं स्नेह जोडण्याकरितां स्वतःचा मुलगा चार्लस याच्याकरितां स्पेनच्या राजकन्येला मागणी घातली. पण त्यामुळें इंग्रज राष्ट्र अधिक चिडलें. स्पॅनिश राजाला खूष करण्याकरितां रॅलेला त्यानें फांशीं दिलें, व रोमन कॅथॉलिक लोकांनां सवलती देण्याचें धोरण स्वीकारलें, १६२१ मध्यें जेम्सनें तिसरें पार्लमेंट बोलाविलें पण स्पेनबरोबरचा दोस्तीचा व्यापारी हक्का( मोनॉपोली ) चा निषेध आणि बकिंगहॅम, बेकन वगैरे राजाच्या मर्जीतल्या अधिकाऱ्यांवर टीका व बेकनची लांच खाण्याच्या आरोपावरून चौकशी व शिक्षा या गोष्टीमुळें हें पार्लमेंटहि पुन्हा मोडलें. पुढें स्पेनच्या राजकन्येबद्दलची मागणी नाकारली गेल्यामुळें फ्रेंच राजाच्या बहिणीशीं चार्लसचा विवाह झाला पण तोहि पार्लमेंटला पसंत पडला नाही.

प हि ला चा र्ल स(१६२५–१६४९).-१६२५ मध्यें जेम्स मरण पावला व त्याचा मुलगा पहिला चार्लस राज्यावर आला त्याच वेळीं लोकांनां तो अप्रिय वाटत होता.पार्लमेंटनें प्रथमच अशी मागणी केली कीं, पार्लमेंटच्या विश्वासांतले इसम प्रधान नेमले जावे. पण प्रधानमंडळ पार्लमेंटला जबाबदार करण्याबद्दलची मागणी राजानें अर्थातच अमान्य केली, व बकिंगहॅमलाच प्रधानपदावर कायम केलें. चार्लस व बकिंगहॅम यांनीं राष्ट्राला संतुष्ट करण्याकरितां प्रॉटेस्टंट देशांशीं दोस्ती आणि स्पेन व फ्रान्स या कॅथोलिक देशाबरोबर युद्ध करण्याचा प्रयत्न केला पण तो फसला. १६२६ मध्यें भरलेल्या पार्लमेंटनें बकिंगहॅमवर देशद्रोहाचा आरोप शाबीत केला, पण राजानें बकिंगहॅमला बडतर्फ न करितां पार्लमेंटच मोडलें. खर्च भागविण्याकरितां जुलमानें पैसा गोळा करण्यास सुरवात केली; तेव्हां पैसे देण्याचें नाकारल्यावरून अनेकजण कैदेंत पडले. पैसे मिळेनात म्हणून चार्लसनें १६२८ मध्यें तिसरें पार्लमेंट बोलावलें, तेव्हां पार्लमेंटनें प्रजेच्या " हक्कांचा अर्ज " (पिटिशन ऑफ राइट्स)तयार करून राजाला सादर केला व चार्लसनें त्याला मान्यता देऊन पैसे मिळविले. सर्व ख्रिस्ती पंथांनां सारखे हक्क देण्याचें चार्लसचें धोरण पार्लमेंटला पसंत न पडल्यामुळें जकातीचें उत्पन्न ( टनेज व पौंडेज )नामंजूर केलें. चार्लसनें पार्लमेंट सोडलें ( १६२९ ) व पुढें अकरा वर्षें पार्लमेंट शिवाय राज्यकारभार चालविला. या काळांत नौकाकर ( शिप मनी ) नांवाचा कर पार्लमेंटच्या संमतीशिवाय राजानें बसविला, तो हॅम्पडननें देण्याचें नाकारून तुरुंग पत्करला, व त्यामुळें राजा अधिक अप्रिय झाला. त्या वेळीं जज्ज नेमणें व बडतर्फ करणें राजाच्या हातीं असल्यामुळें राजाच्या मर्जीनुरूप निकाल होत असत. धार्मिक बाबतींत चार्लसचा सल्लागार विल्यम लॅाड हा होता, व त्या दोघांनीं रोमनकॅथालिक पंथ इंग्लंड देशांत स्थापण्याचा प्रयत्न सुरू केला व स्काटलंडमध्यें प्युरिटन पंथाला विरोध सुरू केला. त्यामुळें स्काटलंडांत बंडाळी माजली, ती मोडण्याकरितां १६४० मध्यें चार्लसनें पार्लमेंट बोलावून पैसे मागितले. पण पार्लमेंटनें प्रथम गाऱ्हाणीं पुढें मांडलीं;त्यामुळें तें पार्लमेंट राजानें मोडलें. पण पुन्हां त्याच सालीं बोलावलें व तें दीर्घकाल टिकलें. कारण पार्लमेंटच्या संमतीवांचून तें मोडलें जाऊं नये असा कायदा या पार्लमेंटनें केला. या पार्लमेंटनें राजाचा सल्लागार स्ट्रॅफर्ड याला गुन्हेगार ठरवून फांशीं दिलें; कांहीं जज्जांनां वाईट निकाल दिल्याबद्दल दोषी ठरवून जज्ज

हे अधिकारी राजाप्रमाणें पार्लमेंटलाहि जबाबदार आहेत असें प्रस्थापित केलें स्टारचेंबर व हाय कमिशन हीं दोन्हीं कोर्टें रद्द केलीं व प्रजेच्या गाऱ्हाण्यांची याद(ग्रँट रेमान्स्ट्रन्स) तयार केली. तेव्हां चार्लसनें पार्लमेंटच्या पांच प्रमुख इसमांनां कैद करण्याचा प्रयत्न केला पण तो फसला. व त्यामुळें तडजोड होणें अशक्य ठरून राजपक्ष व पार्लमेंटपक्ष यांच्यांत युद्ध सुरू झालें, आणि १६४२ ते १६४६ पर्यंत अनेक लढाया होऊन अखेर राजाचा पराभव होऊन तो पार्लमेंटच्या हातीं सांपडला व देशद्रोहाच्या आरोपावरून फांशीं गेला ( १६४९ ).

कॉमनवेल्थ व क्रामवेल ( १६४९ –१६६० ).— पार्लमेंट पक्षाचा युद्धांतील पुढारी क्रामवेल लॉर्ड प्रोटेक्टर ही पदवी घेऊन नवीन स्थापित झालेल्या कॉमनवेल्थ(लोकसत्ताक राज्या)चा अधिकारी बनला. पण राजाला फांशी देणें वगैरे बाबतींत क्रॉमवेलशीं मतभेद झाल्यामुळें पार्लमेंटांत बरेच सभासद हजर रहात नसत. उरलेल्या थोड्या सभासदांच्या संमतीनें क्रॉमवेल राज्यकारभार चालवूं लागला. त्याच्या सत्तेविरुद्ध स्काटलंडनें व आयर्लंडनें बंड केलें पण तें त्यानें मोडलें. नंतर त्यानें पार्लमेंटच्या मदतीनें नीटपणें राज्यकारभार करण्याचा प्रयत्न केला. पण त्याला राष्ट्राचा पाठिंबा फारसा न मिळतां क्रॉमवेलच्या कारभाराचें लष्करी सत्तेचें स्वरूप कायम राहिलें. त्यानें नौकानयनाचा कायदा ( नॅव्हिगेशन ॲक्ट ) करून स्वदेशी नौकाबंधनाला उत्तेजन दिलें, व त्यामुळें उद्भवलेल्या युद्धांत डच लोकांचा पराभव केला. लायक लोकांनां त्यानें राज्यकारभारांत वरिष्ठ जागा दिल्या, पण परंपरागत बड्या लोकांचा वर्ग वगळला गेल्यामुळें देशाचें बहुमत त्याच्या विरुद्ध होतें. अशा स्थितींत तो १६५८ मध्यें मरण पावल्यावर त्याचा मुलगा नालायक असल्यामुळें देशांत अराजकता अठरा महिने चालून अखेर पहिल्या चार्लसचा मुलगा दुसरा चार्लस राजा झाला.

राजशाहीचें आगमन व दुसरा चार्लस (१६६० १६८५ )—क्रामवेलच्या लष्करशाहीस कंटाळून इंग्लंडनें पुन्हां राजसत्ताक पद्धतीचा अंगीकार केला, व १६६१ मध्यें पूर्ववत पार्लमेंट भरून राज्यकारभार पाहूं लागलें. धार्मिक बाबतींत एक पद्धतीचा कायदा ( युनिफॉर्मिटी ॲक्ट ) पास करून सर्वत्र सामान्य प्रार्थनापुस्तक ( कॉमन प्रेअर बुक ) चालावें असें ठरविलें; आणि तद्विरोधी ख्रिस्ती संप्रदायांचा बंदोबस्त करण्याकरितां कानव्हेंटिकल फाइव्ह फाइव्ह माईल ॲक्ट वगैरे कायदे केले. चार्लसनें कॉमन्स सभेला विरोध केला नाहीं; किंवा शिप–मनी कर पुन्हां वसूल केला नाहीं. डच लोकांबरोबर पुन्हां युद्ध उपस्थित झालें त्यावेळीं पार्लमेंटनें पैशाला मंजुरी दिली. पण चार्लस हा चैनी व व्यसनी असल्यामुळें युद्धखर्चाचा पैसा खाजगी खर्चास लावूं लागला. तेव्हां पार्लमेंटनें खर्चावरहि देखरेख ठेवण्याचा उपक्रम केला, व निरनिराळ्या बाबींकरितां खर्चाच्या रकमा नमूद करून देण्यास सुरवात केली. या प्रमाणें करवसुलीवरील नियंत्रणाच्या जोडीला खर्चाच्या बाबींवर नियंत्रण घालण्याचा अधिकार पार्लमेंटनें साध्य करून सर्व प्रजेवर आपला ताबा बसविला. पण राजाच्या खर्चाकरितां मोठी रकम ठरलेली असल्यामुळें या गोष्टीला चार्लसनें विरोध केला नाहीं. शिवाय चार्लसचा प्रधान क्लॅरेन्डान याला चौकशी करून शिक्षा ( इंपीचमेंट ) पार्लमेंटनें दिली, तरी चार्लसला तो अप्रिय वाटूं लागल्यामुळें राजानें पार्लमेंटला विरोध केला नाहीं.

तथापि व्यापारी स्पर्धेमुळें डच लोकांशीं युद्धाचा प्रसंग पुन्हां उद्भवला; आणि चार्लसचा खाजगी खर्च फाजील असल्यामुळें त्यानें फ्रान्सचा राजा चवदावा लुई याच्या बरोबर दोस्ती करून इंग्लंडांतील रोमन कॅथॉलिक पंथाचा पुरस्कार करण्याच्या आणि लुईला इतर यूरोपीय राष्ट्राबरोबर लढण्यास सैन्याची मदत करण्याच्या अटीवर सालीना दोन लक्ष पौंड फ्रेंच राजाकडून मिळावे, असा गुप्त तह केला. त्याप्रमाणें त्यानें रोमन कॅथॉलिक व सर्व इतर पंथीय लोकांनां स्वधर्ममत आचरण्याचा परवाना ( डिक्लरेशन ऑफ इंडलजन्स ) देऊन त्यांच्याविरुद्ध असलेले प्रतिबंधक कायदे ( पीनल लॉज ) रद्द ठरविले. यामुळें लोकमत राजाविरुद्ध पुष्कळ खवळलें. शिवाय पुढील वारस जेम्स हा तर स्वतःच रोमन कॅथॉलिक होता, त्यामुळें व्हिग पक्षानें मन्मौथ नांवाच्या अनौरस पुत्राला राज्य देण्याची तयारी केली. पण अधर्मसंततीला वारसा आपसांत युद्ध करून देण्यास देश तयार नसल्यामुळें टोरीपक्षाचें बहुमत होऊन दुसरा चार्लस वारला तेव्हां त्याचा भाऊ दुसरा जेम्स हा रोमन कॅथालिक असूनहि त्याला राजपद मिळालें.

दुसरा जेम्स व बिनरक्तपाती राज्यक्रांति ( १६८५–१६८८ ).—जेम्स गादीवर येतांच मन्मौथनें बंड केलें पण तें लवकरच मोडलें गेलें. नंतर जेम्सनें कामन्स सभेंत व न्यायकोर्टांत स्वपक्षीय इसम भरण्यास व रोमन कॅथॉलिक लोकांनां सरकारी नोकरींत, सैन्यांत, व शिक्षण संस्थानांत अधिकाराच्या जागा देण्यास सुरवात केली. पुढें सर्व ख्रिस्तीधर्मपंथीयांनीं धर्मस्वातंत्र्य देणारा जाहीरनामा ( डिक्लरेशन ऑफ इंडलजन्स ) सर्व ख्रिस्तालयांत वाचून दाखविण्याबद्दल धर्माधिकाऱ्यांस हुकूम केला, तो अमान्य केल्याबद्दल सात बिशपांवर खटला केला पण न्यायाधिशांनीं त्यांस दोषमुक्त ठरवून सोडून दिलें. या निकालानें राजाच्या सत्तेस मोठा धक्का बसला. पुढें लवकरच राणीला मुलगा झाला. तेव्हां पुढील वारसहि रोमनकॅथॉलिक पंथी होणार, यामुळें निराश होऊन अखेर कॉमन्ससभेंतील व्हिग व टोरी या दोन्हीं पक्षांच्या लोकांनीं जेम्सचा जावई विल्यम ( ऑरेंज प्रांताचा राजा ) या प्रॉटेस्टंड वारसास इंग्लंडचें राजपद स्वीकारण्यास बोलाविलें. सर्व राष्ट्रानें ही निवड मान्य केली. सैन्यानें सुद्धां जेम्सचा पक्ष सोडला.

तेव्हां जेम्स फ्रेंच राजाच्या आश्रयास गेला. हें पलायन म्हणजे राज्यत्याग असें ठरवून पार्लमेंटनें विल्यम व मेरी यांनां राजमुकुट अर्पण केला, आणि रक्ताचा एक बिंदूहि न सांडतां ही राज्यक्रांति घडून आली. त्यावेळीं प्रजेच्या हक्कांच्या सनदेला नव्या राजाची मान्यता पार्लमेंटनें घेतली.

प्र ग ति.—स्टुअर्ट घराण्याच्या काळीं इंग्लंडांत अस्वस्थता व लढाया बऱ्याच झाल्या तरी इंग्लंडची औद्योगिक प्रगतीहि झाली. लोंकरीच्या कापडाप्रमाणें रेशमी कापड तयार होऊं लागलें, तसेंच कागद, कांच, सुऱ्या व इतर जिन्नस तयार होऊं लागले. प्युरिटन लोकांच्या उपदेशामुळें लोक साध्या पोषाखाचे चहाते बनले. स्त्रिया मात्र वस्त्रालंकार अधिक सुंदर वापरूं लागल्या. बऱ्याच सार्वजनिक शाळा स्थापन होऊन मुलांनां लॅटिन, ग्रीक, व इतर अनेक विषयांचें शिक्षण मिळूं लागलें. हार्वे, न्यूटन वगैरे आधुनिक शास्त्रज्ञ उदयास येऊन विद्वानांनां उत्तेजन देणारी रॉयल सोसायटी स्थापन झाली.

ति स रा वि ल्य म व मे री.—( १६८९–१७०२ ). १६८८ च्या इंग्लंडांतील राज्यक्रांतीनें केवळ एक राजा जाऊन दुसरा आला, इतकेंच नव्हे तर, राज्यकारभारपद्धतींत महत्त्वाचा फेरफार झाला. कॉमन्ससभेचें वर्चस्व राजा व लार्डांची सभा यांच्यावर प्रस्थापित झालें. मतदारीचा हक्क फारसा विस्तृत नसल्यामुळें कॉमन्ससभेमध्यें मोठाले जमीनदार व श्रीमंत इसमच प्रतिनिधी निवडून येत असत. तथापि लार्डांच्या सभेपेक्षां ही कामन्ससभा पुष्कळ अधिक प्रातिनिधिक स्वरूपाची होती. या कामन्ससभेनें राजाच्या अधिकारावर अनेक बाबतींत नियंत्रण घातलें तें येणेंप्रमाणें. ( १ ) शांततेच्या काळांत पार्लमेंटच्या संमतीशिवाय राजानें खडें सैन्य ठेवूं नये; ( २ ) राजा प्रॉटेस्टंट पंथाचाच असावा; ( ३ ) राजानें कोणतेंहि धर्ममत लोकांवर लादूं नये; (४) सर्व धर्मसंप्रदायांना स्वातंत्र्य असावें. ( ५ ) छापखान्यावरील नियंत्रणाचा कायदा रद्द समजावा. सर्वांत अत्यंत महत्त्वाचें नियंत्रण विल्यमनें 'संडरलंडच्या अर्लच्या' सल्ल्यावरून घालून घेतलें, तें असें कीं, पार्लमेंटांत ज्यांनां बहुसंख्याक सभासदांचें पाठबळ असेल अशा लॉर्ड्स व कॉमन्स सभांमधील पुढारी इसमांनां प्रधान नेमणें, या पद्धतीला ' कॅबिनेट गव्हर्नमेंट ' म्हणजे बहुसंख्याकपक्षीय प्रधानमंडळपद्धति असें म्हणतात. विल्यमनें ही पद्धति स्वतःच्या सोयीकरितां म्हणजे स्वतःच्या परराष्ट्रीय धोरणास व युद्धास पार्लमेंटचा अडथळा येऊं नये या दृष्टीनें स्वीकारली. परंतु तीच पद्धति पुढें कायम होऊन राजावर मोठें नियंत्रण पडलें; आणि राष्ट्र ज्या पक्षाचे सभासद अधिक निवडून देईल त्यापक्षाचे प्रधान नेमून त्यांच्या हातीं राज्यकारभार राजानें दिलाच पाहिजे, अशा प्रकारचा अत्यंत महत्त्वाचा राजकीय हक्क लोकांनां प्राप्त झाला. याशिवाय ' बँक ऑफ इंग्लंड ' ची स्थापना व राष्ट्रीय कर्जपद्धतीची सुरवात याच कारकीर्दींत झाली ( ' बँका ' व ' राष्ट्रीय कर्ज ' लेख पहा. ). परराष्ट्रीय राजकारणांत महत्त्वाचा प्रश्न स्पेनच्या गादीच्या वारसाबद्दल होता. स्पेनचें साम्राज्य मोठें असून स्पेनच्या राजाला मुलगा नसल्यामुळें जवळचे नातलग या नात्यानें सर्व स्पॅनिश साम्राज्य फ्रान्सच्या राजघराण्याला मिळण्याचा संभव होता. म्हणून आस्ट्रिया व फ्रान्स या दोन देशांच्या राजघराण्यांनां स्पेनचें साम्राज्य वांटून मिळालें. असे वांटणीचे करार विल्यमनें घडवून आणले होते. पण फ्रान्सचा राजा चवदावा लुई यानें ते करार न पाळतां सर्व स्पॅनिश साम्राज्य बळकावण्याचा हेतु धरल्यामुळें इंग्लंडनें आस्ट्रियाला मिळून युद्ध जाहीर केलें. पण इतक्यांत १७०२ मध्यें विल्यम मरण पावला.

ॲ न रा णी ( १७०२–१७१४ ) —हें ' स्पॅनिश सक्सेशन ' युद्ध ॲनराणीच्या कारकीर्दींत चालू होऊन सुप्रसिद्ध इंग्रज सेनापति मार्लबरो यानें फ्रेंचाविरुद्ध चार लढायांत मोठे जय मिळविले ( ' मार्लबरो ' पहा ). हें युद्ध चालू ठेवण्यासंबंधानें व्हिग व टोरी पक्षांत मतभेद होता. त्यामुळें प्रधानमंडळांत उलटापालटी झाल्या. हें युद्ध चालू असतांनाच१७०८मध्यें राज्यघटनेच्या दृष्टीनें फार महत्त्वाची गोष्ट झाली ती स्कॉटलंडतर्फे स्वतंत्र पार्लमेंट नष्ट होऊन इंग्लंडच्या पार्लमेंटांत स्कॉटलंडचे सभासद घेऊन ' संयुक्त पार्लमेंट ' संबंधाचा कायदा ( ॲक्ट ऑफ यूनियन ) पास करण्यांत आला. १७१० मध्यें टोरी पक्षाचें प्रधानमंडळ बनून त्यानें १७१३ मध्यें ' युट्रेक्ट ' चा तह घडवून आणून स्पॅनिश–वारसा–युद्ध बंद केलें. टोरी पक्षाचा पुढारी सेंट जॉन व्हायकौंट बोलिंगब्रोक होता. त्यानें जेम्स प्रिटेंडर ( दुसऱ्या जेम्सचा वंशज)ॲनच्या नंतर गादीवर आणण्याची गुप्त खटपट चालविली. पण ती राष्ट्रास पसंत नसल्यामुळें कांहीं टोरी इसम व्हिग पक्षास मिळाले आणि ॲन राणी १७१४ मध्यें मरण पावतांच, पहिला जॉर्ज, राजा होऊन व्हिग पक्षाचें प्रधानमंडळ बनलें.

हॅ नो व्हे रि य न घ रा णें, पहिला जॉर्ज राजा व वॉलपोल मुख्य प्रधानः—पहिला जॉर्ज ( १७१४–१७२७ ) राज्यावर आल्यावर लवकरच ( १७१५ ) स्टुअर्ट घराण्यांतील प्रिटेंडर ( बढाणेबाज)नें बंड केलें, पण तें लवकरच मोडलें. व्हिग पक्षानें सत्ता अधिक काळ हातीं राहावी म्हणून त्रैवार्षिक निवडणूकी ( ट्रायेनियल ॲक्ट )च्या ऐवजीं सप्तवार्षिक पार्लमेंटरी निवकडणुकीचा कायदा (सेप्टेनियल ॲक्ट) पास करून १७१६ सालीं व्हावयाची निवडणूक १७१९ सालावर ढकलली. दुसरें महत्त्वाचे ' पियरेज बिल ' ( नवे लॉर्ड बनविण्याच्या राजांच्या अधिकारावर नियंत्रण घालणारें बिल ) नापास करण्यांत आलें. त्या काळांतील लार्डांची सभा कामन्स सभेपेक्षां अधिक श्रीमंत

व शहाण्या सभासदांनीं भरलेली असे. नवे लॉर्ड बनविण्याचा राजाचा अधिकार मर्यादित केल्यानें ही लॉर्डांची सभा शिरजोर बनून कामन्स सभेशीं तिचा विरोध तीव्र होत गेला असता. या सुमारास वालपोल प्रमुख झाला होता. जुनें प्रमुख प्रधान मेल्यामुळें किंवा हतप्रभ झाल्यामुळें आणि "साउथ सी कंपनी"च्या दिवाळ्याच्या प्रकरणांत गरीबांची योग्य दाद लावल्यामुळें वॉलपोल नांवाचा व्यवहारकुशल इसम प्रधानमंडळांत प्रमुख बनला. सामान्य मतदारवर्ग राज्यकारभारांत बारकाईनें लक्ष घालण्यास असमर्थ असल्यामुळें वरिष्ठ वर्गाच्या हातीं राज्यकारभाराची सत्ता राहणार, हें मर्म तो ओळखून होता. आणि मतदारसंघाला पार्लमेंटचे सभासद तितके जबाबदार नसल्यामुळें सभासदांची मतें नोकऱ्या, पदव्या व पैसा देऊन, वळवून घेण्याचा मार्ग वॉलपोलनें अवलंबून अनेक वर्षे पार्लमेंटचें बहुमत त्यानें स्वतःस अनुकूल असें ठेविलें. पार्लमेंटांतील बिलांवर सभासदांनीं अनुकूल कशीं मतें दिलीं. भाषणें काय केली, हें त्यावेळीं प्रसिद्ध होत नसे, त्यामुळें प्रतिनिधींनां मतदारांचा धाक वाटत नसे. यामुळें धार्मिक व करविषयक किंवा युद्धविषयक सामान्य जनतेला महत्त्वाचे वाटणारे प्रश्न उपस्थित करण्याचें टाळून वॉलपोलनें मतखरेदी ( पार्लमेंटच्या सभासदांस लांचलुचपत ) चा मार्ग अवलंबून १७२१ ते १७४२ पर्यंत मुख्य प्रधानपद आपल्या हातीं ठेविलें. मुख्य प्रधान ( प्राईम मिनिस्टर ) ही पदवी वॉलपोलपासून सुरू झाली. तिसरा विल्यम सर्व राजकारण स्वतः चालवीत असे व प्रधानमंडळ फक्त सल्ला देत असे; पण पहिला व दुसरा हे दोन्ही जॉर्ज राजे ब्रिटिश राज्यपद्धतीशीं अपरिचित व बिनमहत्त्वाकांक्षी असल्यामुळें ते राज्यकारभाराची सर्व जबाबदारी प्रधानमंडळांतील मुख्यावर सोंपवूं लागले, व त्यामुळें प्रधानमंडळावरील जबाबदारीचें 'कॅबिनेट रिस्पॉन्सिबिलिटी' चें तत्त्व पूर्णपणें अमलांत आलें.

दु स रा जॉ र्ज रा जा ( १७२७–१७६० ).—या कारकीर्दींतहि वॉलपोलच मुख्य प्रधान कायम राहिला; तथापि त्याच्या लांचलुचपतीचा द्वेष करणारा नवा तरुण सभासदांचा पक्ष पार्लमेंटांत उदय पावला. १७३९ मध्यें स्पेनशीं युद्ध करण्यास कारण उद्भवून स्वमताविरुद्ध युद्ध सुरू करावें लागलें, व त्यांत यश न आल्यामुळें प्रधानपदाचा राजीनामा १७४२ मध्यें द्यावा लागला. त्यानंतर हेनरी पेलहॅमच्या प्रधानमंडळानें वॉलपोलचें लांचलुचपतीचे गर्ह्य प्रकार चालू ठेवलेच, व शिवाय स्वतः महत्त्वाच्या कांहींहि गोष्टी न करतां जोरदार प्रतिपक्षाच्या सर्व गोष्टी निमूटपणें मान्य करण्याचें नामर्दपणाचें धोरण चालू केलें. असला नालायक मुख्य प्रधान राज्यकारभारांत असल्यामुळें राज्यकारणांत व लष्करांत सर्व अव्यवस्था होती. इतक्यांत १७४५ मध्यें आणखी एका प्रिटेंडरनें ( स्टुअर्ट घराण्यांतील बहाणेबाज वारसानें ) इंग्लंडचें राज्य हातीं घेण्याकरितां स्कॉटिश लोकांच्या मदतीनें बंड केलें व प्रथम कांहीं जयहि मिळविले; पण इंग्लंडचे लोक विरुद्ध असल्यामुळें प्रिटेंडरचा लवकरच पराभव झाला, आणि पेलहॅमचें कमकुवत प्रधानमंडळहि १७५४ पर्यंत अधिकारावर कायम राहिलें. याच सुमारास वेस्ले व व्हाईटफील्ड यांनीं 'मेथॉडिझम' नांवाची लोकांनां व्यवस्थित धार्मिक आयुष्यक्रम शिकविणारी ख्रिस्तीधर्मसुधारणेची चळवळ सुरू केली.

स प्त वा र्षि क यु द्ध.—पेलहॅमनंतर न्यूकॅसल मुख्य प्रधान झाला; पण १७५६ मध्यें 'सेव्हन इयर्स वॉर' ( सप्तवार्षिक युद्ध १७५६–१७६३ ) फ्रान्सबरोबर सुरू झालें, त्याची जबाबदारी संभाळण्याकरितां न्यूकॅसलनें विल्यम पिट नांवाच्या इसमास प्रधानमंडळांत घेतलें. या पिटला स्वतःच्या व राष्ट्राच्या कर्तृत्वाबद्दल दांडगा विश्वास वाटत असे. हें युद्ध इंग्लंडच्या इतिहासांतील एक अत्यंत महत्त्वाचें आहे. हें एकाच वेळीं यूरोप अमेरिका, व हिंदुस्थान अशा तीन ठिकाणीं चालू होतें व त्यांतच इंग्लंडच्या महासागरापलीकडील साम्राज्याचा पाया घातला गेला. या युद्धांत केवळ मुलूख जिंकण्याचा उद्देश इंग्लंडपुढें होता. हिंदुस्थानांत क्लाइव्हनें प्लासीची लढाई ( १७५७ )व कानडांत वुल्फनें क्विबेकची लढाई जिंकून पिटचा आत्मविश्वास व युद्धनीति यशस्वी करून दाखविली.

ति स रा जॉ र्ज (१७६०–१८२०).—हें युद्ध चालू असतांनाच दुसरा जॉर्ज मरण पावून तिसरा जॉर्ज गादीवर आला. 'काव्येषु नाटकं रम्यं तत्रापि च शकुंतला' या सुभाषिताप्रमाणें जगांतील अनेक देशांच्या इतिहासांत इंग्लंडचा इतिहास सर्वांहून अधिक बोधप्रद आहे व त्यांतहि चार कारकीर्दी–एलिझाबेथ, क्रॉमवेल, तिसरा जॉर्ज व व्हिक्टोरिया–विशेष बोधप्रद आहेत, आणि त्यांतल्या त्यांत तिसऱ्या जॉर्जची कारकीर्द अत्यंत मनोरंजक आहे. खुद्द तिसऱ्या जॉर्जचा स्वभाव, त्याच्या ग्रेनव्हिल, रॉकिंगहॅम, लॉर्ड नॉर्थ, धाकटा पिट वगैरे अनेक मुख्य प्रधानांचें वर्तन, ब्यूटप्रकरण, विल्क्सप्रकरण, बोस्टन-टीप्रकरण, अमेरिकेचें स्वातंत्र्ययुद्ध, जॉनसन, बर्क वगैरेंचें विद्वन्मंडळ, फ्रेंच राज्यक्रांति नेपोलियन, फ्रान्सबरोबरचीं युद्धें, आयरिश यूनियन, गुलामांच्या व्यापारास बंदी, वगैरे अनेक बाबींपासून राजकारणविषयक व युद्धकारणविषयक अत्यंत बोधप्रद धडे वाचकांस या एकाच कारकीर्दीच्या मार्मिक निरीक्षणानें मिळण्यासारखे आहेत. तिसऱ्या जॉर्जला लहानपणापासून वजनदार व्हिग घराण्यांचें वर्चस्व कमी करून राजाची सत्ता वाढविण्याचा उपदेश मिळाला होता. थोरल्या पिटचा उद्देश तोच होता, आणि जॉर्ज व पिट यांचें एकमेकांशीं जमलें असतें तर बऱ्याच अनिष्ट गोष्टी टळल्या असत्या. पण पिटचें धाडस, राष्ट्रविश्वास, लांचलुचपत व गुप्त कट यांचा तिरस्कार इत्यादि उच्च गुणांची किंमत राजाला कळली नव्हती. जॉर्जचे हेतू चांगले होते, पण बुद्धि कोती असल्यामुळें वागणूक क्षुद्रपणाची होत असे. आरंभींच त्याचा पिटशीं मतभेद झाला व त्यांत

जॉर्जचें मत बरोबर होतें. फ्रान्सबरोबर युद्ध चालू असतां त्यांतच स्पेनबरोबर युद्ध पुकारूं नये असें जॉर्जचें मत होतें. आणि पिट केवळ युद्धाचा शोकी होता, फ्रान्सचा पूर्ण नाश करणें हा त्याचा उद्देश होता. पण त्या नादीं न लागतां पिटला राजीनामा देण्यास लावून जॉर्जनें १७६३ मध्यें युद्ध बंद केलें, हेंच कृत्य योग्य झालें. नाहींतर पिटच्या युद्धकुशलतेमुळें इंग्लंड विजयी होऊन शिरजोर बनलें असतें, आणि फ्रान्सच्या १४ व्या लुईचा किंवा नेपोलियनचा द्वेष सर्व यूरोप करूं लागलें, तशीच आपात्ति इंग्लंडवर ओढवली असती. असो; जॉर्जच्या नोकऱ्या, पेन्शनें, वगैरे लालुचीनें पार्लमेंटचें बहुमत कह्यांत ठेवण्याच्या व स्वतःच्या मर्जीतला इसम मुख्य प्रधान नेमण्याच्या धोरणाबद्दलहि गवगवा फार झाला. लॉर्ड ब्यूट ( जॉर्जचा शिक्षक ) याला मिळालेलें प्रधानपद प्रतिकूल लोकमतामुळें लवकरच सोडावें लागलें.

अ मे रि के चें स्वा तं त्र्य यु द्ध.—पुढला मुख्यप्रधान ग्रेनाव्हिल यानें सप्तवार्षिक युद्धाचा खर्च अमेरिकन वसाहतींनीं सोसला पाहिजे, या कारणास्तव स्टँप ॲक्ट वसाहतींस लागू केला. पण ब्रिटिश पार्लमेंटांत वसाहतींतर्फे प्रतिनिधी घेतल्याशिवाय कर बसविण्याचा अधिकार नाहीं ( नो रिप्रिझेंटेशन, नो टॅक्सेशन ) या सबबीवर वसाहतींनीं इंग्लंडला विरोध केला. मायदेश व वसाहती यांच्या परस्पर राजकीय हक्कसंबंधाचा मोठा वाद त्यावेळीं माजला, त्यांत बर्क व पिट हे प्रमुख होते. बर्कनें राजकारणांत पुष्कळ नवीं मतें पुढें मांडलीं, पण वसाहती व इंग्लंड यांच्यामध्यें अधिकाराची विभागणी करण्याचें आधुनिक तत्त्व त्याला मुळींच मान्य नव्हतें. पिटनें व्यापारी मालावर कर बसविण्याचा इंग्लंडचा हक्क असल्याचें प्रतिपादून अधिकार विभागणीची योग्य दिशा सुचविली. परंतु १९ व्या शतकांत संमत झालेली वसाहतींच्या स्वराज्याचीं तत्त्वें स्पष्टपणें पुढें मांडण्याची राजकीय दूरदृष्टि कोणीच दाखविली नाहीं. त्यामुळें ग्रेनव्हिल नंतरच्याहि रॉकिंगहॅम, चॅथॅम ( थोरला पिट ), नॉर्थ, वगैरे सर्व प्रधानमंडळांनीं विशेषतः जॉर्जच्या आग्रहामुळें अमेरिकेचें प्रकरण विकोपास नेलें, आणि १७७५ मध्यें अमेरिकेनें पूर्ण स्वातंत्र्याप्रीत्यर्थ इंग्लडबरोबर युद्ध सुरू केलें, तें १७८३ पर्यंत चालून त्यांत अखेर फ्रान्सच्या मदतीमुळें वसाहतींना यश मिळालें व इंग्लंडला अमेरिकन वसाहतींचें ( युनायटेड स्टेट्स ) स्वातंत्र्य मान्य करावें लागलें

याच सुमारास इंग्रज मतदारांनीं विल्क्स या पार्लमेंतील सभासदाच्या प्रकरणांत प्रतिनिधि निवडून देण्याचा स्वतःचा अधिकार राजाच्या बेसनदशीर विरोधास न जुमानतां प्रस्थापित केला. हिंदुस्थानचें राज्य चालविण्याचा प्रश्नहि याच वेळीं निघाला आणि गव्हर्नर–जनरल वॉरन हेस्टिंग्ज याच्या अपकृत्यांची चौकशी करून व ' रेग्युलेटिंग ॲक्ट ' व पिटचा ' इंडिया ॲक्ट ' पास होऊन त्या कारभाराची योग्य व्यवस्था करण्यांत आली. १७८४ पासून धाकटा पिट मुख्य प्रधान झाला. तेव्हांपासून सेहेचाळीस वर्षें सतत टोरीपक्ष अधिकारारूढ होता पण तो जुन्या टोरी पक्षापेक्षां पुष्कळ सुधारलेला होता. व तो राजाच्या मर्जीनें चालणारा नसून राष्ट्राच्या पाठबळावर राज्यकारभार हांकीत होता. राष्ट्रांतहि धनवानांपेक्षां बुद्धिवानांनां अधिक मान देण्याची प्रवृत्ति वाढत चालली होती. ॲडॅम स्मिथचें " वेल्थ ऑफ नेशन्स " हा ग्रंथ ( १७७६ ), ब्रिंडलेचा ब्रिजवॉटर कॅनॉल ( १७६२ ), हारग्रीव्हजचें स्पिनिंग–जेनी ( १७६७ ), आर्कराईटचें विणण्याचें यंत्र ( १७६८ ), क्रॉम्प्टनचें म्यूल ( १७७९ ), कार्टराईटचा पावरलूम ( वाफेच्या शक्तीनें चालणारा माग, १७८४ ), वॅटचें स्टीम एंजिन ( १७६८ ), वगैरे अनेक गोष्टींमुळें कल्पक व संशोधक बुद्धीच्या लोकांची छाप राष्ट्रावर अधिक पडत चालली होती. पिट स्वतः अशा सर्व सुधारणांचा पूर्ण चहाता व पुरस्कर्ता होता. त्यानें पार्लमेंटांत आर्थिक व औद्योगिक सुधारणांना पोषक असे अनेक कायदे केले व खुल्या व्यापारास उत्तेजन दिलें.

फ्रें च रा ज्य क्रां ति व ने पो लि य न ब रो ब र चीं यु द्धें.—पिटच्या मार्फत चाललेला तिसऱ्या जॉर्जचा कारभार लोकांनां पूर्ण पसंत असतांना १७८९ मध्यें एकाएकीं फ्रान्समधील राज्यक्रांतीमुळें इंग्लंडचें चित्त तिकडे वेधलें. फ्रान्स राज्यक्रांति म्हणजे वास्तविक अनियंत्रित एकतंत्री राज्य सत्तेविरुद्ध बंड नसून देशांतील धार्मिक व राजकारणी वरिष्ठ वर्ग जुलमी बनला होता त्याला सुधारण्याकरितां सर्व समाजरचना बदलण्याचा प्रयत्न होता. परंतु इंग्रजांना फ्रेंच क्रांतिकारकांची परिस्थिति नीट न समजल्यामुळें त्यांच्या अघोर कृत्यांबद्दल इंग्लडला विलक्षण तिटकारा वाटूं लागला. फ्रेंच राज्यक्रांतीबद्दल बोलणारे प्रमुख इंग्रज फॉक्स, बर्क, व पिट हे होते. फॉक्सनें फ्रेंचांचें स्वातंत्र्य व समता प्रस्थापित करण्याच्या प्रयत्नाबद्दल अभिनंदन केलें; बर्कनें क्रांतिकारकांच्या परंपरागत संस्थांचें समूळ उच्चाटन करण्याच्या प्रयत्नांबद्दल निषेध केला; आणि पिटनें केवळ तटस्थ राहण्याचा उपदेश इंग्लंडला केला. पण फ्रेंच राजाला व राणीला फांशी दिल्यामुळें व इतर देशांतहि रिपब्लिकें स्थापन करण्याचा उद्देश फ्रेंच लोकांनीं जाहीर केल्यामुळें इंग्लंडनें फ्रान्सबरोबर १७९३ मध्यें युद्ध पुकारलें. शिवाय इंग्लंडांत क्रांतिकारक मतांचा फैलाव बंद करण्याकरितां भाषणलेखनसंघस्वातंत्र्याला सरकारनें नवे कायदे करून आळा घातला आणि " हेबियस कॉर्पस ॲक्ट " ( आरोपीच्या चौकशीच्या हक्काचा कायदा ) कांहीं काळ रद्द केला.

त्यामुळें पिटचें प्रधानमंडळ अप्रिय झालें. शिवाय फ्रान्सबरोबरच्या युद्धांतहि जमीनीवर इंग्लंडच्या बाजूला सर्व पराजयच येत गेले. फ्रांसनें हॉलंड, आस्ट्रिया व प्रशिया यांविरुद्ध जय मिळविल्यावर इंग्लंडविरुद्ध आयर्लंडला मदत केली; पण समुद्रावरच्या सेंट व्हिन्सेंट, कँपरडाऊन, कोपन

ट्रेगन, वगैरे लढायांत इंग्लंडला जय मिळाल्यामुळें तें संकट टळलें. शिवाय नेपोलियनच्या सर्वदेशभक्षक धोरणामुळें व खुद्द इंग्लंडवर स्वारी करण्याच्या बेतामुळें इंग्लंडचें लोकमत फ्रान्सविरुद्ध विशेष खवळलें व युद्ध चालू ठेवण्यास पूर्ण अनुकूल बनलें. आयर्लंडची भीति दूर करण्याकरितां पिटनें मोठी कारवाई करून आयरिश पार्लमेंट मोडून व ब्रिटिश पार्लमेंटांतच आयरिश प्रतिनिधी घेऊन संयुक्त पार्लमेंट बनविलें (१८००). १८०२ मध्यें आमीन्सचा तह झाला, पण पुन्हां लवकरच नेपोलियननें युद्ध सुरू केलें. नेपोलियनचा इंग्लंडवर स्वारी करण्याचा बेत ट्राफल्गार येथें नेल्सननें मिळविलेल्या जयामुळें फसला;पण रशिया, आस्ट्रिया वगैरे राष्ट्रांस पराभवानें अंकित करून घेऊन नेपोलियननें इंग्लंडबरोबरचा व्यापार बंद करण्याचें धोरण यूरोपीय राजांवर लादलें तथापि हें धोरणहि ब्रिटिशांची सत्ता समुद्रावर पूर्ण असल्यामुळें फसलें व उलट यूरोपीय लोक मात्र नेपोलियनवर नाखूष झाले. लोकशाहीच्या तत्त्वांचा पुरस्कार केल्यामुळें नेपोलियनची सत्ता सामान्य लोकांनां प्रिय होत गेली होती; पण १८०७ पासून व्यापारास बंदी केल्यामुळें सर्व लोक नेपोलियनच्या व्यापारविषयक जुलमी धोरणाला विरोध करण्यास सिद्ध झाले. स्पेन व पोर्तुगालला (पेनिनशुलर वॉर) युद्धांत मदत करून इंग्लंडनें नेपोलियनच्या सैन्यास मागें हटविलें; आणि तिकडे रशियावरील स्वारी यशस्वी झाल्यामुळें नेपोलियनची सत्ता डळमळली आणि १८१५ मध्यें वॉटरलूच्या लढाईंत इंग्रज सेनापति वेलिंगटन यानें नेपोलियनचा पराभव केल्यावर ती पूर्ण नष्ट झाली, आणि फ्रान्सबरोबरच्या युद्धांतून इंग्लंड मुक्त झालें. तथापि महागाई, राजकीय हक्कांकरितां गुप्त कट, व त्याविरुद्ध स्वातंत्र्यापहारक कायदे वगैरे युद्धोत्तर परिणाम इंग्लंडला चारपांच वर्षें भोगावे लागले. १८२० मध्यें तिसरा जॉर्ज मरण पावला.

**औद्योगिक क्रांति व राजकीय हक्कांची चळवळ.**— १७७० ते १८३० पर्यंतच्या काळांत इंग्लंड शेतकी ऐवजीं कारखानेप्रधान देश बनला. वाफेच्या यंत्रांची युक्ति, विणकामाचीं यंत्रें, लोखंड व दगडी कोळसा यांच्या खाणी, रेल्वे व आगबोटी या जलद वाहनांची सोय, या अनेक कारणामुळें इंग्लंडची परिस्थिति पार बदलून गेली. या गोष्टींलाच औद्योगिक क्रांति असें नांव आहे. या काळांत धनिक कारखानदारांचा एक मोठा वर्ग तयार झाला. पण पूर्वीच्या पद्धतीप्रमाणें या कारखान्यामुळें मोठ्या बनलेल्या शहरांना पार्लमेंटांत प्रतिनिधी पाठविण्याचा हक्क नव्हता. शिवाय रोमन कॅथोलिक पंथी लोकांनां पार्लमेंटच्या मतदारीचा हक्क नव्हता, तो मिळविण्याची युद्धकालीं मंदावलेली चळवळ जोरानें सुरू झाली. तिला प्रथम यश येऊन १८२९ मध्यें 'कॅथोलिक इमॅन्सीपेशन' चा (कॅथोलिक धर्मपंथी लोकांनां राजकीय हक्क देण्याचा) कायदा पास झाला. नंतर १८३२ मध्यें पार्लमेंटची सुधारणा करण्याचा 'रिफार्म ॲक्ट' पास झाला व नवीन वस्ती वाढलेल्या अशा अनेक शहरांना पार्लमेंटांत प्रतिनिधी निवडून पाठविण्याचा हक्क मिळाला. शिवाय जॉन हॉवर्ड या इसमानें यूरोपमधील अनेक ठिकाणच्या तुरुंगांची व्यवस्था पाहून इंग्लंडांतील तुरुंगांची सुधारणा करण्यास सरकारला प्रवृत्त केलें. तसेंच सरकारनें कित्येक गुन्हेगाराकडून आस्ट्रेलियांत वसाहत करविली. विल्यम विल्बर-फोर्स या इसमाच्या खटपटीनें इंग्लंडांत गुलामांच्या व्यापाराच्या बंदीचा कायदा झाला. तिसऱ्या जॉर्ज नंतरचे चवथा जॉर्ज (१८२०-१८३०) व चवथा विल्यम (१८३०-१८३७) हे दोन्ही राजे वैयक्तिक दृष्ट्या महत्त्वाचे नव्हते.

**ब्रिटिश साम्राज्याची भरभराट व वसाहतींच्या स्वराज्याची योजना, व्हिक्टोरिया महाराणी (१८३७-१९०१)**—व्हिक्टोरिया राणी राज्यावर आली तेव्हां ती केवळ अठरा वर्षांची होती; पण तिची वागणूक मोठेपणाची व भलेपणाची असे. त्या वेळीं मुख्य प्रधान मेलबोर्न असून व्हिग (लिबरल) पक्ष अधिकारारूढ होता; पण त्यांनीं मागील सातआठ वर्षें चालविलेला कारभार आतां अप्रिय होत चालला होता. या पक्षाचें आयर्लंड, कानडा व जमेका यांनां वागविण्याचें धोरण व खुल्या व्यापारपद्धतीचा पुरस्कार या गोष्टी राष्ट्राला पसंत नव्हत्या. १८४१ च्या निवडणुकींत टोरी (कॉन्झर्व्हेटिव्ह) पक्षाचें मताधिक्य झाल्यामुळें सर रॉबर्ट पीलचें प्रधानमंडळ बनलें. सरकारी जमाखर्चांत २०-२२ लाख पौंडपर्यंत तूट येत असे ती पीलनें उत्पन्नावरील कर (इनकमटॅक्स) बसवून व खर्चांत काटकसर करून भरून काढली. शिवाय हिंदुस्थान सरकारला अफगाणयुद्धांत जय मिळाल्यामुळें आणि युनैटेड स्टेटस व फ्रान्स यांच्या बरोबरचीं भांडणें मिटवून मैत्री जोडल्यामुळें पीलचें परराष्ट्रीय धोरण यशस्वी ठरलें होतें; तथापि कांझर्व्हेटिव्ह पक्षाची संरक्षक व्यापारपद्धति त्यानें सोडल्यामुळें त्याचे अनुयायी फुटूं लागले म्हणून पीलनें १८४६ मध्यें राजीनामा दिला व लॉर्ड जॉन रसेल मुख्य प्रधान व पामरस्टन परराष्ट्रमंत्री झाला. पामरस्टननें स्पॅनिश राजघराण्यांतील विवाहांचे बाबतींत आणि आस्ट्रिया रशिया, तुर्कस्तान, ग्रीस वगैरे देशांच्या बाबतींत शिरजोरपणाचें वर्तन केलें व तें आरमाराच्या बळामुळें यशस्वी झालें; पण याच सुमारास आयर्लंडांत दुष्काळ व नंतर बंड झालें. इंग्लंडांत 'चार्टिस्ट' लोकांनीं राजकीय हक्कांच्या मागण्या जोरानें केल्या. १८४८ मध्यें यूरोपांत राज्यक्रांत्यांची लाट उसळल्यामुळें व तसल्या धोरणानें यूरोपांत शांतताभंगास अधिक उत्तेजन मिळण्याचा संभव असल्यामुळें व विशेषतः पामरस्टन हा पुष्कळशा गोष्टी प्रधानमंडळ, मुख्य प्रधान व प्रत्यक्ष व्हिक्टोरिया राणी यांनां न कळवितांच करूं लागल्यामुळें त्याला १८५१ मध्यें कामावरून बडतर्फ करण्यांत आलें. रसेलच्या प्रधानमंडळानें १८४७ मध्यें मजुरांच्या

कामासंबंधीं दहा तासांचा कायदा व १७४९ मध्यें नॅव्हिगेशन अक्ट रद्द करून खुल्या व्यापारास उत्तेजन या दोन महत्त्वाच्या सुधारणा केल्या. पामरस्टन गेल्यावर रसेलनें लवकरच राजीनामा दिला व लॉर्ड डर्बीचें कांझर्व्हेटिव प्रधानमंडळ कारभार पाहूं लागलें; पण डिझरायली या प्रधानाला बजेट नीट तयार करतां न आल्यामुळें १८५३ मध्यें डर्बीनें राजीनामा दिला. व लॉर्ड आबर्डीन, ग्लॅडस्टन, पामरस्टन, रसेल वगैरेंचें मिश्र प्रधानमंडळ व्हिक्टोरिया राणीनें बनविलें. ग्लॅडस्टननें १८५३ मध्यें तयार केलेलें बजेट विशेष महत्त्वाचें होतें. त्यांत साबण व इतर १२३ जिनसांवरच्या जकाती पूर्णपणें उठवून १३३ जिनसांवरील कमी केल्या होत्या, शिवाय इन्कमटॅक्स हळू हळू कमी करून अखेर अगदीं बंद करण्याची योजना ठरविली होती. मागील सर्व बजेटांपेक्षां ग्लॅडस्टनचें हें बजेट फारच नांवाजण्यासारखें होतें यांत शंका नाहीं.

पण १५८३ मध्यें रशिया व तुर्कस्तान यांच्यामध्यें क्रिमियन युद्ध सुरू झालें. मुसुलमानांच्या मुलुखांतील ख्रिस्ती पवित्र ठिकाणांचा तावा मागण्याच्या निमित्तानें भूमध्यसमुद्राकडे सत्ता वाढविण्याचा रशियाचा हेतु दिसल्यामुळें इंग्लंड व फ्रान्स यांनीं तुर्कांची बाजू घेतली व त्या युद्धांत रशियाचा अखेर पराभव केला; पण आबर्डीन मुख्य प्रधानाच्या हातून युद्धव्यवस्था नीट न झाल्यामुळें १८५५ मध्यें पामरस्टन मुख्य प्रधान झाला आणि ब्रिटिशांची बाजू यशस्वी होऊन १८५६ मध्यें पॅरिसच्या तहानें युद्ध संपलें. १८५७ मध्यें हिंदुस्थानांत झालेलें बंडहि लवकरच मोडून हिंदुस्थानचा राज्यकारभार कंपनीपासून ब्रिटिश पार्लमेंट व व्हिक्टोरिया राणी यांनीं हातीं घेतला.

१८५८ मध्यें ज्यू लोकांनां पार्लमेंटांत प्रतिनिधी होण्याचा हक्क देण्यांत आला. १८५९ च्या रिफार्म अॅक्टानें पार्लमेंटच्या मतदारीचा हक्क अधिक विस्तृत करण्यांत आला. याच सुमारास इटलीनें आस्ट्रियन साम्राज्यांतून स्वतंत्र होऊन १८६१ मध्यें अखिल इटलीचें स्वतंत्र संयुक्त राज्य स्थापलें. त्यास इंग्लंडनें मदत केली व ह्याचें श्रेय पामरस्टनला आहे. १८६२ मध्यें गुलामांचा व्यापार बंद करण्याकरितां युनायटेड स्टेट्समधील उत्तरेकडील संस्थानांनीं दक्षिणेकडील संस्थानांबरोबर युद्ध करून यश मिळविलें. त्यावेळीं इंग्लंड व यूरोपीय राष्ट्रें तटस्थ राहिलीं. इंग्लंडची अमेरिकेविषयीं मत्सरबुद्धि असल्यामुळें दक्षिणेकडील संस्थानांस इंग्लंड चोरून मारून मदत करी असा अमेरिकेचा इंग्लंडवर आरोप आहे व त्यास जागाहि आहे. १८६७ मधील तिसऱ्या रिफॉर्म अॅक्टानें मतदारीचा हक्क विस्तृत करून मजूर पक्षातर्फे प्रतिनिधी अधिक येतील अशी व्यवस्था केली. १८६८ पासून कांझर्व्हेटिव्ह पक्षातर्फे डिझरायली व लिबरल पक्षातर्फे ग्लॅडस्टन हे प्रतिस्पर्धी जोडीदार पुढील तेरा वर्षें पार्लमेंटचे नेते बनले. त्यांत आश्चर्याची गोष्ट ही कीं, ग्लॅडस्टन कांझर्व्हेटिव्हचा पुढें लिबरल आणि डिझरायली लिबरलचा कांझर्व्हेटिव बनला. या काळांत आयरिश होमरूल, प्राथमिक शिक्षण, तुर्कस्तानच्या अमलाखालील ख्रिस्ती बाल्कन राष्ट्रांचा प्रश्न आणि आशिया व आफ्रिका या खंडांत ब्रिटिश साम्राज्य वाढविणें हे प्रश्न प्रमुख विषय होते. डिझरायली साम्राज्यवृद्धीच्या, आणि ग्लॅडस्टन आयर्लंडला होमरूल देण्याच्या मताचा होता. आलटूनपालटून डिझरायली तीनवेळां व ग्लॅडस्टन चारवेळां मुख्य प्रधान झाला.

१८८६ मध्यें ग्लॅडस्टननें आयरिश होमरूल बिल पार्लमेंटपुढें मांडलें. त्याला मोठा विरोध होऊन लार्ड सॅलिसबरीचें यूनिअनिस्ट ( संयुक्त पार्लमेंटचा पुरस्कार करणारें ) प्रधानमंडळ १८८६ तें १८९२ पर्यंत अधिकारावर राहिलें. १८९३ मध्यें ग्लॅडस्टन चवथ्यांदा मुख्य प्रधान होऊन त्यानें पुन्हां होमरूल बिल हातीं घेतलें; पण अतिवृद्धपणामुळें त्यानें पुढारीपण १८९४ मध्यें सोडलें. त्यामुळें लिबरल पक्ष कमकुवत होऊन यूनिअनिस्ट पक्ष १८९५ तें १९०५ पर्यंत अधिकारारूढ राहिला. १८९९ मध्यें दक्षिण आफ्रिकेंत बोअर युद्ध (डच वसाहतवाल्यांबरोबर ) सुरू होऊन १९०२ मध्यें अखेर त्यांत ब्रिटनला जय मिळाला (ट्रान्सव्हाल पहा). मध्यंतरीं १९०१ जानेवारी २२ रोजीं व्हिक्टोरिया राणी मरण पावली. एकंदरीनें ही कारकीर्द ग्रेट ब्रिटनला फार भरभराटीची जाऊन तींत लोकसंख्या दुप्पट, संपत्ति तिप्पट आणि व्यापार सहापट वाढला. आगगाड्या, आगबोटी, तारायंत्रें, समुद्रांतील तारायंत्रें ( मरीन केबल ) वगैरे दळणवळणाचीं साधनें ग्रेटब्रिटन व ब्रिटिश साम्राज्य यांत पुष्कळ वाढलीं.

सा त वा ए ड व र्ड ( १९०१–१९१० )—ही कारकीर्द शांततेंत गेली, इतकेंच नव्हे तर एडवर्डनें यूरोपांत ' शांतता प्रस्थापक ' ( पीसमेकर ) अशी पदवी मिळविली. १९०५ मध्यें लिबरल पक्ष अधिकारावर येऊन १९०८ पर्यंत कॅंबेल–बॅनरमन व पुढें आस्किथ मुख्य प्रधान झाला. १९०९ मध्यें जमीनीवरील कर वाढविणाऱ्या लॉईड जॉर्जच्या बजेटनें विशेष खळबळ उडविली व लॉर्डांच्या सभेचे हक्क मर्यादित करण्याची चळवळ लॉईड जॉर्जच्या सल्ल्यामुळें लिबरल पक्षानें सुरू केली. इतक्यांत एडवर्ड मरण पावला.

व सा ह तीं चें स्व रा ज्य.—१८१५ ते १९१० पर्यंतच्या काळांत इंग्लंड यूरोपच्या राजकारणांत फारसें लक्ष न घालतां यूरोपेतर खंडांतील ब्रिटिश साम्राज्याची वाढ व स्थैर्य या प्रश्नांत विशेष गुंतलें होतें. प्राचीन बलाढ्य रोमन साम्राज्याचा नाश, व युनायटेड स्टेट्सनें नुकतेंच मिळविलेलें पूर्ण स्वातंत्र्य, या गोष्टीमुळें साम्राज्य संरक्षणाचा प्रश्न सोडवण्याचा ब्रिटिश मुत्सद्दी विशेष धूर्तपणानें प्रयत्न करीत राहिले; व आतांपर्यंत वसाहतींनां साम्राज्यांतर्गत स्वराज्याचे संपूर्ण हक्क देण्याचें धोरण मनःपूर्वक स्वीकारून त्यांनीं साम्राज्यसंरक्षणाच्या कार्यांत चांगलें यश मिळविलें आहे. या धोरणानुसार प्रथम निरनिराळ्या वसाहतींनां प्रांतिक

स्वायत्ततेचे अधिकार देऊन नंतर कानडांतील संयुक्त सरकारला (डोमिनियन गव्हर्नमेंट) १८६७ मध्यें; आस्ट्रेलियांतील कॉमनवेल्थ सरकारला १९०० मध्यें आणि दक्षिण आफ्रिकेंतील युनियन सरकारला १९०९ मध्यें संपूर्ण स्वराज्याचे हक्क देण्यांत आले.

इ. स. १९१०—१९२१ पर्यंतचा इंग्लंचा इतिहास.—सातव्या एडवर्ड बादशहाच्या मरणानंतर पंचम जॉर्ज हा इंग्लंडच्या सिंहासनावर बसला. राज्यसूत्रें हातीं घेतल्यानंतर जॉर्ज बादशहानें हिंदुस्थानाला भेट दिली. कलकत्ता हें राजधानीचें शहर बदलून दिल्ली हें राजधानीचें शहर ठरविण्यांत आलें. तसेंच बंगालफाळणीहि रद्द करण्यांत आल्याचें दिल्लीदरबारांत जाहीर करण्यांत आलें. इंग्लंडमध्यें नवीन निवडणुकींत, उदारमतवादी–लिबरल–पक्ष विजयी होऊन त्याच्या हातांत राज्यकारभाराचीं सूत्रें आलीं होतीं. या पक्षाचा मुख्य ॲस्क्विथ असून तो इंग्लंडचा प्रधान झाला होता. १९११ मध्यें जी पार्लमेंटची बैठक भरली तींमध्यें ॲस्क्विथ यानें पार्लमेंटबिल पुढें मांडलें. या बिलाचीं तिन्ही वाचनें होऊन तें बिल हॉउस ऑफ कॉमन्समध्यें पसार झालें. हॉऊस ऑफ लॉर्ड्समध्यें मात्र या बिलाला आडकाठी करण्यांत आली; पण त्याचा कांहींच उपयोग झाला नाहीं. हॉउस ऑफ लॉर्ड्समध्यें जर पार्लमेंट बिल मंजूर होणार नसेल तर राजाकडून जरूर तितके पीअर्स निर्माण करण्यांत येऊन हें बिल मंजूर करून घेण्यांत येईल अशी ॲस्क्विथनें धमकी घातली, त्या वेळीं हें बिल पास झालें. या बिलाच्या योगानें हॉउस ऑफ कॉमन्सचें जमाबंदी व कायदे करणें, या बाबतींत वर्चस्व प्रस्थापित झालें असें म्हणावयास हरकत नाहीं.

पण हें बिल मंजूर होतें न होतें तोंच दुसरें एक बिल लॉईड जॉर्ज यानें पुढें आणलें. तें बिल म्हणजे हॉउस ऑफ कॉमन्समधील सभासदांनां दरवर्षी ४०० पौंड पगार देण्यासंबंधींचें होय. या बिलावरहि खूप झगडा होऊन शेवटीं तें पसार झालें; पण याच सुमारास कामकरी वर्गामध्यें पगार व कामाचे तास या बाबतींत असंतोष माजून रेल्वेच्या मजुरांनीं अश्रुतपूर्व संप केला. या मजुराबद्दल आपली सहानुभूति प्रदर्शित करण्याकरितां गोदीच्या मजुरांनींहि संप पुकारला. रेल्वे कंपन्यांच्या मालकांनीं तडजोड करण्याचा प्रयत्न केला. प्रत्यक्ष प्रधानानेंही कामकरी वर्गाच्या पुढाऱ्यांच्या मुलाखती घेऊन तंटयाच्या कारणांची चौकशी करण्याकरितां रॉयल कमिशन नेमितों असें सांगितलें;पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. शेवटीं एक स्वतंत्र कमिटी नेमून तिनें तावडतोब या संबंधीनें चवकशी करावी असें ठरून हा संप बंद करण्यांत आला. मध्यंतरीं आणखी एक महत्त्वाचें बिल पार्लमेंटमध्यें लॉईड जॉर्ज यानें आणलें. तें बिल म्हणजे 'नॅशनल इन्शुअरन्स बिल' होय. राष्ट्रीय आरोग्यासंबंधीं व बेकारीसंबंधींची तरतूद करण्यासंबंधींचें हें बिल होतें. या बिलाचीं पहिलीं दोन वाचनें निर्विघ्न पार पडलीं; पण तिसऱ्या वाचनाच्या वेळीं या बिलाला यूनिअनिस्ट पक्षानें विरोध केला; पण त्या विरोधाला न जुमानतां तें बिल पास झालें.

पण याच सुमारास स्त्रियांच्या मतदानाच्या हक्कासंबंधीं इंग्लंडमध्यें मोठी चळवळ सुरू होती. ॲस्क्विथ हा स्वतः स्त्रियांनां मतदानाचा हक्क देण्याविरुद्ध होता, तर लॉईड जॉर्ज हा कांहीं अटींवर अनुकूल होता. स्त्रियांनां कांहीं अटींवर मत देण्याचा हक्क असावा, यासंबंधीं एका पार्लमेंटमधील सभासदानें एक ठराव आणला होता व याला लॉईड जॉर्जनें पाठिंबा दिला होता; पण हा ठराव मंजूर झाला नाहीं.

१९१२ सालांत पार्लमेंटपुढें जो महत्त्वाचा प्रश्न चर्चेला निघावयाचा होता, तो आयर्लंडला होमरूल देण्यासंबंधींचा होय. आयर्लंडला होमरूल देण्याला लिबरल पक्ष तयार होता. त्याप्रमाणें हॉउस ऑफ कॉमन्समध्यें 'गव्हर्नमेंट ऑफ आयर्लंड बिल' ॲस्क्विथनें पुढें मांडलें. या बिलान्वयें आयर्लंडला स्वतंत्र पार्लमेंट देण्यांत आलेलें असून कांहीं साम्राज्याच्या हिताबद्दलच्या बाबी वगळून बाकीच्या सर्व गोष्टींवर या पार्लमेंटला ताबा दिला होता; पण या बिलाच्या विरुद्ध अल्स्टरमधील लोक होते. त्यांचा पुढारी एडवर्ड कार्सन हा होता. या पक्षाचीच तळी यूनिअनिस्ट पक्षानें उचलून धरली. त्यामुळें होमरूल बिलाला विरुद्ध असा चांगला प्रबल पक्ष पार्लमेंटमध्यें तयार झाला; पण अशा रीतीनें होमरूल बिलाची चमत्कारिक स्थिति असतांना खुद्द इंग्लंडमध्यें खाणींतील मजुरांच्या पगारनियमनाबद्दलचा प्रश्न प्रामुख्यानें पुढें आला होता. मजुरांनीं आपल्या मागण्या खाणीवाल्यांपुढें मांडल्या; पण खाणीच्या मालकांनीं दाद घेण्याचें नाकारलें, त्यामुळें मजुरांनां संप करणें भाग पडलें. शेवटीं ही विकट परिस्थिति पाहून ॲस्क्विथनें पार्लमेंटमध्यें 'किमानपगाराचें बिल' आणलें, या बिलामध्यें निरनिराळ्या व्यापारी संघांनां आपापल्या हद्दींतल्या खाणीवाल्या मजुरांचा किमान पगार ठरविण्याची परवानगी देण्यांत आली होती. या बिलाला यूनिअनिस्ट पक्षानें विरोध केला; पण शेवटीं हें बिल मंजूर झालें; पण ही भानगड जों संपते तोंच बंदरावरील हमालांचा मोठा संप झाला. हा संप मिटविण्यासाठीं पुष्कळ प्रयत्न झाले पण कांहीं यश आलें नाहीं. पार्लमेंटहि या बाबतींत तटस्थच राहिलें. शेवटीं आपोआपच कांहीं दिवसांनीं तो संप मोडला.

पार्लमेंटची बैठक पुनः हेमंतऋतूंत भरली. आयर्लंडला देण्यांत येणाऱ्या पार्लमेंटच्या घटनेवर चर्चा सुरू झाली. त्यावर वादविवाद झाल्यावर उत्पन्नाच्या कलमावर वादविवाद झाला. व शेवटीं तें बिल हॉउस ऑफ कॉमन्समध्यें पास झालें. बाल्कन प्रदेशासंबंधीं व्यवस्था लावण्यांत थोडीशी भानगड उपस्थित झाली होती. त्या बाबतींत ॲस्क्विथ व परराष्ट्रमंत्री ग्रे यांनीं पडून ब्रिटिश धोरणाचें समर्थन

करण्याच्या बाबतींत त्यांनीं यश मिळविलें. सर्वराष्ट्रीय राजकारणांत इंग्लंडला प्रमुख स्थान मिळालें होतें, त्यामुळें लिबरल पक्षावर इंग्लिश जनतेचा विश्वास बसूं लागला होता.

१९१३ साल सुरू झालें तरी स्त्रियांना मतदानाचा हक्क देण्यासंबंधीं अगर होमरूल आयर्लंडला देण्यासंबंधीं अद्यापि कांहींच निकाल लागला नव्हता. उद्योगधंद्यांच्या संबंधींहि अनेक कठिण प्रश्न उद्भवले होते. लिबरलपक्षानें मतदानासंबधीं एक बिल पुढें आणलें होतें व त्याचा, एकापेक्षां अधिक मत देण्याची पद्धत मोडून टाकण्याचा व स्त्रियांच्या मतदानाच्या हक्कासंबधीं पार्लमेंटमधील सभासदांचें मत अजमावण्याचा असा दुहेरी उद्देश होता. पण स्त्रियांच्या मतदानाच्या हक्काच्या कैवाऱ्यांनां कोणतीहि उपसूचना न आणून देण्यांत आल्यानें, पार्लमेंटला आपलें बिल मागें घ्यावें लागलें. पण असा प्रकार घडल्यामुळें स्त्रीवर्गांत मात्र विलक्षण असंतोष पसरला; स्त्रियांनीं दंगेधोपे करण्यास सुरवात केली. घरें प्रार्थनामंदिरें, रेल्वेलाइनीं या सर्वांचा विध्वंस करण्यास त्यांनीं सुरवात केली. पुष्कळ स्त्रियांना तुरुंगांत टाकण्यांत आलें. तेथें त्यांनीं उपवास करण्यास सुरवात केली. पण त्यांच्या घशांत अन्न कोंबण्यांत आलें. शेवटीं जामिनावर स्त्रियांना सोडण्यांत आलें. पण नवीन दंगेधोपे करून त्या पुन्हां तुरुंगांत गेल्या. बंडखोर स्त्रियांनीं, सार्वजनिक इमारती वगैरे सारख्या ठिकाणीं, बांबगोळे, वगैरेंचा स्फोट करण्यास कमी केलें नाहीं. पण या सर्व दंगाधोप्याचा विशेष परिणाम न होता, महायुद्ध सुरू झाल्यामुळें, ती चळवळ आपोआपच थंडावली. आयर्लंडच्या बाबतींत, जें होमरूल बिल पुढें आणलें गेलें होतें, त्या बिलांतून अल्स्टरचें नांव गाळण्याची उपसूचना कार्सननें पुढें आणली, पण ती उपसूचना नापास होऊन हें बिल पास झालें, पण हाउस ऑफ लॉर्डसमध्यें, त्याला गचांडी मिळाली. पण हें बिल कांहींहि करून पास करून घ्यावयाचें असा अधिकारारूढ पक्षाचा निश्चय होता. तर या बिलाला एकजात विरोध करण्याचा यूनियन पक्षानें म्हणजे (अल्स्टरपक्षानें)चंग बांधला होता. लिबरल पक्षानें, व अल्स्टर पक्षानें व युनियानिस्ट पक्षानें आपापलीं मतें समाजाच्या गळीं उतरविण्याचा प्रयत्न चालविला होता. युनियानिस्ट पक्षाला इंग्लंडमधील जनता अधिक अनुकूल होत चालली होती. अधिकारारूढ पक्षानें एक दोन उपसूचना आणल्या पण त्याला अल्स्टर पक्षानें संमति दिली नाहीं. अर्थात वादळ होण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. आयर्लंड येथील दारुगोळ्याचें संरक्षण करण्यासाठीं व अशांतता मोडण्यासाठीं, आयर्लंडमध्यें सैन्य पाठविण्यांत आलें. त्यामुळें इंग्लिश जनता अधिकच चिडून गेली व त्यामुळें, अल्स्टरला लोकमत अधिक अनुकूल झालें. पण पार्लमेंटमध्यें अधिकारारूढ पक्षानें आपलें बिल शेवटीं मंजूर करून घेतलेंच. पुन्हां 'आपसांतील युद्ध' माजण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. इंग्लंडच्या राजानें, दोन्ही पक्षाचे प्रमुख पुढारी बोलावून सलोखा करण्याचा शक्य तो प्रयत्न केला पण त्यांत यश आलें नाहीं. दोन्हीहि पक्ष हट्टाला पेटले होते व आपापलें म्हणणें, मागें घेण्यास बिलकुल तयार नव्हते. त्यामुळें गोष्टी कोणत्या थराला जातील याचा नेमच नव्हता. पण इतक्यांत यूरोपमध्यें, महायुद्धाचा प्रचंड वणवा पेटण्याचीं चिन्हें दिसूं लागल्यानें, सर्वांचें लक्ष तिकडेच वेधलें गेलें.

इ. स. १९१४ च्या जूनच्या २८ व्या तारखेस आस्ट्रियन राजपुत्र फ्रॉन्सिस फर्डिनंड याचा एका सर्व्हियन तरुणानें खून केला. पण या खुनाचा परिणाम, जगांतलि अत्यंत मोठें असें युद्ध सुरू होण्यांत होईल असें फारच थोड्या मुत्सद्यांनां वाटलें असेल. आस्ट्रियानें सर्व्हियाजवळ खुलासा मागितला व सर्व्हियाच्या खुलाश्यानें आस्ट्रियाचें समाधान न होतां, आस्ट्रियानें सर्व्हियाविरुद्ध लढाई पुकारली. तरी पण याचाहि इंग्लिश लोकांवर विशेष परिणाम झाला नाहीं. पण आस्ट्रियानें सर्व्हियाविरुद्ध युद्ध पुकारतांच रशिया सर्व्हियाच्या मदतीला धांवला; व जर्मनी आस्ट्रियाच्या बाजूला गेला. रशियाला मदत करण्यसाठीं फ्रान्सनें तयारी चालविली व त्या बाबतींत इंग्लंडची मदत मागितली. आतां मात्र परिस्थितीची खरी जाणीव इंग्लिश मुत्सद्यांनां झाली. फ्रान्सला इंग्लंडनें मदत केलीच पाहिजे, व या युद्धांत भाग घेतलाच पाहिजे असें लंडन टॉइम्स व इंग्लंडच्या इतर नांवाजलेल्या मुत्सद्यांचें मत होतें, तर या युद्धांत इंग्लंडनें तटस्थवृत्ति धारण करावी असें, मँचेस्टर, गार्डियन वगैरे पत्रांचें म्हणणें होतें; पण इंग्लंडचें लोकमत, युद्धाला अनुकूल असेंच होतें. फार काय, लिबरल प्रधानमंडळाला सतावून टाकणारा यूनियनिस्ट पक्ष हा देखील इंग्लंडनें युद्धांत पडावें अशा मतांचा होता व गृहकलहांनां मनांत थारा न देतां त्या पक्षाच्या बोनरलॉ वगैरे पुढाऱ्यांनीं युद्धाच्या बाबतींत लिबरल पक्षाला आम्हीं लागेल तें साहाय्य करूं असें अभिवचन दिलें. अशा रीतीनें इंग्लंडांतलि जनतेची व प्रमुख पुढाऱ्यांची युद्धाला अनुकूल अशी प्रवृत्ति दिसतांच सर एडवर्ड ग्रे यानें पार्लमेंटमध्यें अत्यंत महत्त्वाचें भाषण करून, इंग्लंडनें या युद्धांत फ्रान्सची बाजू कां घेतली पाहिजे याचें स्पष्टीकरण केलें. इंग्लंडशीं ज्याचें हाडवैर त्या आयर्लंडनेंहि या युद्धांत इंग्लंडच्या बाजूनें भाग घेण्याचें ठरविलें. लगेच इंग्लंडनें जर्मनीकडे बेल्जमच्या तटस्थवृत्तीचा भंग न करण्याबद्दल निर्वाणीचा खलिता पाठविला. पण जर्मनीनें, त्या खलित्याकडे दुर्लक्ष्य केलें. इंग्लंडनें जर्मनीविरुद्ध युद्ध पुकारलें.

लगेच इंग्लंडनें आपलें आरमार व सैन्य यांची तयारी करण्यांस सुरवात केली. सर जॉन गेलिको याच्या नेतृत्वाखालीं, उत्तर समुद्राकडे आरमार पाठविण्यांत आलें. आखिल इंग्लिश सैन्याचें स्वामित्व लॉर्ड किचनेर याला देण्यांत आलें. लॉर्ड किचनेर यानें तावडतोब नवीन सैन्य उभारण्यास

सुरवात केली. युद्धाच्या वेळीं जे जे उपाय योजावे लागतात त्या त्या उपायांचा अवलंब करावयाचें ठरून, सरकारनें सर्व रेल्वे आपल्या ताब्यांत घेतल्या, राष्ट्ररक्षणासाठीं नवीन कायदा मंजूर करून घेण्यांत आला. सरकारनें ही जी तयारी चालविली होती तिला इंग्लंडांतील जनतेनेंहि मनापासून मदत केली. जखमी लोकांच्या शुश्रूषेसाठीं कित्येकांनीं आपलीं घरें दिलीं. युद्धांतील शिपायांच्या मदतीखातर मोठमोठे फंड उभारण्यात आले. जर्मन हेरांच्यावर टेहेळणी करण्यासाठीं, बालचर मंडळ तयार झालें. युद्धाची व्यवस्था व देखरेख करण्याकरतां, एक युद्धमंडळ नेमण्यांत आलें.

युद्धाच्या सुरवातीस, कधीं जर्मनीला जय तर कधीं दोस्तराष्ट्रांनां जय अशी स्थिति चालली होती. रशियाच्या सैन्याचा हिंडेनबुर्गनें केलेला पराभव, पॅरिसवर चाल करून येण्याची जर्मनांनीं घातलेली धमकी, बेल्जिअन लोकांनीं दाखविलेलें अचाट शौर्य, या सर्व गोष्टींनीं इंग्लंडचा निश्चय अधिकच बळावत चालला. सर्व मोठमोठ्या पुढाऱ्यांनीं, इंग्लंडभर दौरा काढून युद्धासंबंधीची परिस्थिति इंग्लिश लोकांना समजावून सांगितली. इतक्यांत अँटवर्पचा किल्ला जर्मनीच्या ताब्यांत गेला व बेल्जमची राखरागोळी झाली. त्यामुळें पुष्कळ बेल्जम कुटुंबें इंग्लंडमध्यें आश्रयार्थ आलीं. त्याच्यासाठीं धर्मार्थ फंड उभारण्यांत आले. पण पार्लमेंटमध्यें सर्वांत महत्त्वाचा प्रश्न म्हणजे युद्धाला लागणारा खर्च मंजूर करणें हा होय. त्यानिमित्त, दारू, साखर वगैरेवर दुप्पट कर वाढवावयाचे व इन्कमटॅक्सहि दुप्पट करण्याचें ठरविण्यांत आलें. शिवाय युद्धकर्ज काढावयाचेंहि या बैठकींत मंजूर झाले.

ता. ४ फेब्रुवारी सन १९१५ रोजीं जर्मनीनें जाहीरनामा काढून, इंग्लंडचा कोंडमारा करावयाचा व युद्धक्षेत्रांत जीं जहाजें येतील त्या सर्वांचा नाश करावयाचा नक्की बेत केला. त्याला अनुसरून लुशियाना बोट बुडविण्यांत आली. याचा प्रतिकार म्हणून, दोस्तराष्ट्रांतील जर्मन लोकांनां कैदेंत टाकावयाचें ठरलें, व अशा तऱ्हेनें 'जशास तसें' या तत्त्वाचा अवलंब करण्यांत आला. या सालीं मजुरांचे संप झाल्यामुळें युद्धाला लागणारा दारूगोळा भरपूर मिळेनासा झाला. यास्तव इंग्लंडमधील निरनिराळ्या व्यापारी संघांची लाइड जार्जनें मुलाखत घेऊन, दारूगोळ्यांत तूट पडूं न देण्याबद्दल व संप न करण्याबद्दल त्यांच्याकडून करार करून घेतला. दारूगोळ्याचें खातें त्यानें आपल्या स्वतःच्या ताब्यांत घेतलें व हरतऱ्हेनें त्याची निपज करण्याचा त्यानें उपक्रम केला.याच सुमारास इटलीहि जर्मनीशीं विश्वासघात करून दोस्तराष्ट्राला येऊन मिळाला लढाईला जरूर तेवढें सैन्य इंग्लंडमधून न मिळाल्यामुळें, सक्तीचा लष्करभरतीचा प्रश्न पुढें येऊन त्याच्यावर रणें माजून सक्तीनें लष्करभरती करण्याचा ठराव पास झाला. त्याचप्रमाणें, पूर्वीचे युद्धमंडळ मोडून अगदीं प्रमुख अशा ४ । ५ गृहस्थांचें युद्धमंडळ बनविण्यांत आलें. प्रधानमंडळाची मुदत संपली होती ती वाढविण्यांत आली. युद्धासाठीं अधिक खर्चाची मंजुरी देण्यांत आली. वैमानिक दळांची पुनर्घटना करून तीं अधिक उपयुक्त करण्यासाठीं एक स्वतंत्र कमीटी नेमण्यांत आली. त्याचप्रमाण जर्मनीचा व्यापार बुडवून त्याला जेरीस आणण्याचे उपायहि अंमलांत आणण्याचें ठरलें व त्यानिमित्त पॅरिसमध्यें दोस्तराष्ट्रांची मजलस भरून त्याची योजना मुकर करण्यांत आली.

सन १९१६ मध्यें लॉर्ड किचनेर हा रशियांत जाण्यास निघाला असतांना वाटेंत बोट खडकावर आदळून मरण पावला, त्यामुळें इंग्लंडला धक्का बसल्यासारखें झालें. त्याच्या जागीं लॉइडजार्जची नेमणूक झाली. दॉर्दोनेल्स आणि मेसापोटेमिया या ठिकाणीं ब्रिटिशांचा पराजय झाल्यामुळें तेथील परिस्थिती पाहून येण्यासाठीं, दोन कमिशनें पाठवण्यांत आलीं. जटलंड येथें आरमारी लढाई होऊन अतिशय प्राणहानि व नुकसान होऊन शेवटीं कसाबसा ब्रिटिशांनां जय मिळाला, जर्मनांचा व्हर्डूनवरील हल्ला फ्रेंचांनीं मोठ्या शिकस्तीनें परतविला.

महायुद्धाचें तिसरें वर्ष सुरू झालें. वाटेल ते हाल सोसून युद्ध शेवटपर्यंत चालवावयाचेंच असा इंग्लंडनें निर्धार केला. पुन्हां या वर्षी आणखी कर्ज काढावयाचें ठरलें, भरती जोरांत करण्यांत आली. याच सुमारास जर्मनांनीं रुमानिया जिंकला, बुखारेस्ट काबीज केलें. या बातमीनें इंग्लंडमध्यें खळबळ उडून गेली, 'प्रधान मंडळानें अधिक धडाडीचें धोरण पत्करावें त्याशिवाय गत्यंतर नाहीं' असें 'लंडन टाइम्स' वगैरे वजनदार पत्रांनीं प्रतिपादन करण्यात सुरवात केली. यासंबंधीचा फायदा घेऊन लॉइडजॉर्जनें अॅस्क्विथ यास पत्र लिहून, युद्धमंडळाच्या सभासदांची संख्या अगदीं आटोपशीर करून त्या मंडळाची बैठक दररोज भरविण्याची शिफारस केली. या छोट्या युद्धमंडळांत त्यानें अॅस्क्विथचें नांव घातलें नाहीं. यामुळें अॅस्क्विथनें राजीनामा दिला. अर्थातच लाइड जार्ज हा मुख्य प्रधानाच्या पदावर आरूढ झाला. यावेळीं, लाइड जॉर्ज सारख्या धडाडीच्या माणसाचीच आवश्यकता होती.

लॉइडजॉर्ज यानें लगेच, लॉर्ड कर्झन, लॉर्ड मिल्नर हेंडरसन व स्वतः आपण अशा चौघांचें युद्धमंडळ बनविलें व दररोज त्यांच्या बैठकी भरवावयाचें ठरविलें. अॅस्क्विथच्या राजीनाम्यामुळें व्हायकाउंट ग्रे या परराष्ट्रमंत्र्यानें राजीनामा दिला. त्याच्या जागीं बालफोरची नेमणूक झाली. लॉइडजॉर्जनें सर्व जहाजें व खाणींतील उद्योगधंदे सरकारच्या ताब्यांत घ्यावयाचें ठरविलें व अत्यंत आवश्यक असे. उद्योगधंदेच चालू ठेवावयाचें ठरविलें. तसेंच वसाहतीच्या प्रधानांना, त्यानें आपल्या युद्धमंडळाचे सभासद करून घेतले.अशा रीतीनें


इटली.
इंग्रजी मैल.
जिनोवाचें आरवात.
पीसा
लेघॉर्न
एल्बा
कार्सिका
सार्डिनिया
राव्हेना
अंकोना
आ ड्रि या टि क स मु द्र
रोम
बारलेटा
गीटाचें आरवात
नेपल्स
टि र्हे नि य न स मु द्र
नेपल्सचें उपसागर
सालेर्नोचें आरवात
टारांटोचें आरवात.
लिपारी.
मेसिना
आयोनियन समुद्र
पालेर्मो
सि सि ली
कॅटॉनिया
सिरॅकूज
भू म ध्य स मु द्र
Poona Litho Works 689 Sadashiv, Peth.

वसाहतींनां आपल्या विश्वासांत घेतलें. याच सुमारास, जर्मनीनें युद्ध थांबविण्याची सूचना पुढें आणली. पण जर्मनीची ही शक्कल होती. या सूचनेच्या नांवाखालीं, दोस्तराष्ट्राला झुलवीत ठेवून, एकदम पाणबुड्यांच्या सहाय्यानें, आरमारी वर्चस्व मिळविण्याचा त्यांचा प्रयत्न होता पण इंग्लिश प्रधानमंडळानेंहि त्यांचा बेत ओळखून त्यांची डाळ शिजूं दिली नाहीं. युद्ध ऐन रंगांत आलें होतें व या पायीं जितका स्वार्थत्याग शक्य होईल तितका हवाच होता. अन्नाचें दरमाणशीं प्रमाण ठरविण्यांत आलें, पडीक जमीनी शेतकीला उपयुक्त करण्यांत आल्या.

१९१७ सालीं, जर्मन सैन्याला फ्रान्समधून हटावें लागलें. ब्रिटिश सैन्यानें, आरास, मेसाइनीस, थर्ड यिप्रेस या ठिकाणीं जर्मन सैन्याचा पराजय केला, मॉड सेनापतीनें बगदाद शहर ताब्यांत घेतलें पण सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे, दोस्तांच्या वतीनें अमेरिका युद्धांत पडली ही होय अमेरिका पडल्यामुळें दोस्तांच्या बाजूचें पारडें पुष्कळच जड झालें. पुन्हां युद्धाला रंग चढला. दार्दानेल्स व मेसापोटेमियांतील पराभवासंबंधीं चौकशी करण्याकरितां जें कमिशन बसलें होतें त्याचा रिपोर्ट बाहेर पडला. त्यामध्यें, कित्येक अधिकाऱ्यांची गैरव्यवस्था दिसून आली. त्यामुळें ऑस्टिन चेंबर्लेन साहेबांना हिंदुस्थानच्या सेक्रेटरी ऑफ स्टेटच्या जागेचा राजिनामा द्यावा लागला. इतर अधिकाऱ्यांमध्येंहि बरीच बदलाबदल झाली. मांटेग्यू हे हिंदुस्थानचे स्टेट सेक्रेटरी झाले व त्यांनीं हिंदुस्थानांत येऊन तेथील परिस्थितीची चौकशी करून सुधारणेचा हप्ता हिंदुस्थानला देऊं केला. राष्ट्रसेवेचें खातें, आरमारी खातें, जहाज बांधकामाचें खातें इत्यादि खात्यांवरील अधिकारी बदलून त्यांत निरनिराळ्या सुधारणा करण्यांत आल्या. त्याचप्रमाणें, मतदारासंबंधींचा कायदा विस्तृत करण्यांत आला. महायुद्धांत बायकांनीं महत्त्वाची कामगिरी बजावल्यामुळें स्त्रियांनाहि मताधिकार १९१८ मध्यें देण्यांत आला. फिशरसाहेबांनीं जें शिक्षणाचें नवीन बिल तयार केलें होतें तेंहि मंजूर करण्यांत आलें. या कायद्यानें, १४ वर्षांखालील मुलांनां सक्तीनें शिक्षण देण्यांत यावयाचें ठरलें. शिक्षण मोफत व्हावयाचें ठरलें. शारीरिक शिक्षणाची योग्य तरतूद करण्यांत आली. आयर्लंडला होमरूल देण्यासंबंधीचा विचार करण्याकरतां आयरिश प्रमुख पुढाऱ्यांशीं लॉईड जॉर्जनें खलबत केलें. पण त्याचा पाहिजे तसा इष्ट परिणाम घडून आला नाहीं. सिनफिनची चळवळ आयर्लंडमध्यें जोरांत चालू होती. याच सुमारास जर्मनी व आयर्लंडमधील सिनफिनर यांच्यामधील गुप्त कट उघडकीस आला. त्यामुळें होमरूल संबंधींची घटना करण्याचें इंग्लिश पार्लमेंटनें लांबणीवर टाकलें.

१९१७ सालाचे अखेरचे महिने दोस्त राष्ट्रांना मोठ्या काळजींत गेले. इटालीच्या सैन्याचा जर्मन सैन्यानें पराभव केला. जर्मनी व रशिया यांच्यामध्यें तह होऊन रशियान युद्धांतून अंग काढून घेतलें. अर्थातच इंग्लंड, फ्रान्स व अमेरिका या तिघांवरच युद्धाचा बोजा येऊन पडला. त्यामुळें इंग्लंडला पुन्हां सैन्याची वाढ करणें जरूर पडलें. पुन्हां १९१८ सालीं पार्लमेंटनें मोठें कर्ज काढावयाचें ठरविलें. दर माणशीं, मांसाचें प्रमाण ठरविण्यांत आलें. युद्धाच्या धडाडीनें पुरस्कार करण्यासाठीं, दोस्तराष्ट्रांचें एक संयुक्त युद्धमंडळ निर्माण करण्यांत आलें. तसेंच दोस्तराष्ट्रांचें सैन्य कोणातरी एकाच सेनापतीच्या हाताखालीं देण्याचें ठरून, जनरल फॉक याला प्रमुख सेनापति निवडण्यांत आलें. या व्यवस्थेचा इष्ट तो परिणाम झाला. दोस्तराष्ट्रांना जिकडे तिकडे जय मिळूं लागले. बल्गेरिया व तुर्कस्तान हीं राष्ट्रें दोस्तराष्ट्रांच्या पुढें दांतीं तृण धरून शरण आलीं. पण अशा रीतीनें रणांगणावर दोस्तराष्ट्रांना जय मिळत असतां खुद्द इंग्लंडमध्यें संपाची मोहीम जोरांत सुरू होती. स्त्रीकामकऱ्यांनीं, व पोलिसांनीं पगार वाढीबद्दल संप केला. त्यामुळें जिकडे तिकडे अंदाधुंदी माजली. शेवटीं लॉईड जॉर्जनें पगारवाढ देण्याचें कबूल करून कसा बसा संप मिटविला. इकडे रणांगणावर तर दोस्तराष्ट्रांना विजयावर विजय मिळूं लागले. सरतेशेवटीं, युद्धतहकुबीची सूचना जर्मनीकडून येऊन, सोमवार ता. ११ नोव्हेंबर १९१८ रोजीं युद्ध तहकूब झाल्याचें जाहीर करण्यांत आलें व जिकडे तिकडे आनंदीआनंद झाला. सर्व पार्लमेंटांतील सभासदांनीं सेंटमार्गारेटच्या चर्चमध्यें जाऊन, सार्वजनिक प्रार्थना केल्या. युद्धतहकुबीनंतर एक महिन्याच्या आंत सर्व जर्मन आरमार ब्रिटिश आरमाराला शरण आलें.

युद्धतहकुबी झाल्यानंतर, प्रधानमंडळाची नवी निवडणूक व्हावयाची असल्यानें जुनें पार्लमेंट बरखास्त झालें. वास्तवीक हें जुनें पार्लमेंट १९१५ सालींच बरखास्त व्हावयाचें पण लढाई चालू असतांना निवडणुकीची धांदल श्रेयस्कर नसल्यानें, हें जुनें पार्लमेंटच, कायम रहावें असें राष्ट्रानें ठरविलें होतें. पण आतां नवीन निवडणुकी होण्याला कांहींच हरकत उरली नाहीं. शिवाय मतदारांचा हक्क विस्तृत करण्यांत आला असल्यामुळें या नवीन मतदारांची संमति घेणें जरूर होतें. अर्थातच नवीन निवडणूक करणें, हाच एक मार्ग होता व त्याप्रमाणें निवडणुकीची धामधूम सुरू झाली. लॉईड जॉर्ज व बोनर लॉ या दोघांनीं मिळून मतदारांनां उद्देशून एक जाहीरनामा काढला व त्यांत पूर्वींचेच संयुक्त प्रधानमंडळ कायम ठेवण्याची अवश्यकता प्रतिपादन केली. याशिवाय, शस्त्रसन्यास व राष्ट्रसंघ या दोन गोष्टी घडवून आणण्याचें त्यांनीं कबूल केलें. त्याचप्रमाणें, उद्योगधंद्यांची पुनर्घटना, हिंदुस्थानांत जबाबदारीची राज्यपद्धति सुरू करणें वगैरे गोष्टीहि करण्याचें त्यांनीं अश्वासन दिलें. पण सर्वांत महत्त्वाच्या गोष्टी म्हणजे, कैसरची चौकशी व जर्मनीकडून नुकसानभरपाई करून घेणें या होत्या. त्यांचाहि अंतर्भाव

त्यांनीं आपल्या जाहीरनाम्यांत केला. या सर्व गोष्टींचा इष्ट तो परिणाम होऊन पुन्हां जुनें संयुक्त प्रधानमंडळ, व जुना संयुक्तपक्ष यांचीच निवडणुकींत सरशी झाली. लॉईडजॉर्ज हा पुन्हां प्रधानपदावर आरूढ झाला. बोनर लॉ याजकडे हौऊस ऑफ कॉमन्समधील पुढारीपण राहिलें.

१९१८ साल अखेर ब्रिटिशांचें विजयी सैन्य, विजयी सेनापति फील्ड मार्शल हेग, हाम, क्लेमंको, प्रेसिडेंट वुइल्सन, इत्यादिकांचें अपूर्व स्वागत लंडनमध्यें करण्यांत आलें. नंतर युद्धोत्तर स्थितीची चर्चा करण्याकरितां लॉईड जॉर्ज व वुइल्सन हे पॅरिस येथें गेले. लॉईड जॉर्ज हा कित्येक महिने पॅरिस येथें होता. पण तेवढ्या काळांत इंग्लंडमध्यें पुष्कळ महत्त्वाच्या गोष्टी घडून येत होत्या. सर्व इंग्लंडभर, कामकरी लोकांमध्यें असंतोष पसरला असल्यानें संपांची वावटळ उठली. या मजूर लोकांच्या पगारवाढ व दररोज सहा तास काम अशा प्रमुख मागण्या होत्या. निरनिराळ्या धंद्यांतील मजुरांनीं संप केले व कांहींनीं संपाची धमकी घातली. खाणींतील मजुरांनीं तर याहि पुढें जाऊन, खाणी या राष्ट्रीय मालकीच्या करण्याचा हट्ट धरला. अशी आणीबाणीची वेळ येऊन ठेपल्यामुळें, प्रधानमंडळानें सांकी याच्या अध्यक्षतेखालीं एक कमीशन बसवून, कामकरी लोकांच्या गाऱ्हाण्यांची पूर्ण चौकशी करण्यास सांगितलें. दररोजच्या पगारांत दोन शिलिंग वाढ, व कामाचे ७ तास, या प्रकारच्या सूचना कमीशननें केल्या व तसेंच, कोणत्या ना कोणत्या तरी स्वरूपांत, उद्योगधंदे राष्ट्रीय मालकीचे करावेत असा आपला अभिप्राय प्रसिद्ध केला. पण लॉईड जॉर्जनें राष्ट्रीय मालकीचा प्रश्न सर्व राष्ट्राच्या संमतीनेंच सोडविला पाहिजे असें सांगून त्याची वासलात लावली. या नंतर रेल्वेच्याहि लोकांनीं संप केला, पण तो आठ दहा दिवसांतच मोडण्यांत आला.

पण इंग्लंडमध्यें जरी ही धामधूम सुरू होती तरी दुसऱ्या कांहीं महत्त्वाच्या गोष्टी यूरोपीय राजकारणांत घडून येत होत्या. जून २८ सन १९१९ या दिवशीं, दोस्तराष्ट्रें व जर्मनी यामध्यें व्हर्सेलिस येथें तह घडून आला. त्या तहाला पार्लमेंटतर्फे लॉईड जॉर्ज यानें संमति दिली. साम्राज्यांतील सैन्याची व दोस्तराष्ट्रांतील सैन्याची लंडन येथें जुलै महिन्यांत प्रचंड मिरवणूक निघाली. व्हर्सेलिसच्या तहानुसार जो राष्ट्रसंघ निर्माण करण्यांत आला होता., त्याच्या संबंधींची माहिती लोकांनां व्हावी या निमित्त इंग्लंडभर मोठमोठ्या सभा भरल्या. युद्धमंडळ मोडून पुन्हां कॅबिनेट पद्धत अस्तित्वांत आली. आरोग्य व वाहतुक अशीं दोन स्वतंत्र खातीं उत्पन्न करण्यांत आलीं; स्त्रियांनां कोणताहि धंदा करण्याची परवानगी देण्यांत आली; व त्याप्रमाणें लेडी ॲस्टर नांवाची बाई पार्लमेंटात निवडून आली. या वर्षांतील विशेष महत्त्वाची गोष्ट म्हणजे चेंबरलेन साहेबांनीं पार्लमेंटपुढें आणलेलें वार्षिक अंदाजपत्रक होय. लढाई संपली तरी त्यानें कर वाढवण्याची सूचना या पत्रकांत मांडली होती. यामुळें पुष्कळ सभासदांनीं त्याविरुद्ध तक्रार केली पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं.

पॅरीस येथें वुइल्सन साहेबांनीं जें स्वयंनिर्णयाचें तत्त्व जगापुढें मांडलें त्यामुळें हिंदुस्थान, ईजिप्त, आयर्लंड, साऊथ आफ्रिका या देशांत मोठी खळबळ उडाली. हिंदुस्थानांतील चळवळ शांत करण्यासाठीं मॉंटेग्यूचेम्सफर्ड सुधारणावर भिस्त ठेवण्यांत आली. इजिप्तमधील स्वातंत्र्य चळवळीचें निदान ठरविण्यासाठीं लॉर्ड मिल्नरची कमिटी नेमावी लागली. आयर्लंडमध्यें तर स्वातंत्र्यचळवळीला उग्र स्वरूप प्राप्त झालें. सिनफिनवाल्यांच्या चळवळीला लोकांचें पाठबळ उत्तरोत्तर अधिक मिळूं लागलें. ब्रिटिशांचे खून, बंडाळी वगैरे प्रकार सुरू झाले.

१९२० साल उजाडलें. या वर्षांतील महत्त्वाच्या गोष्टी म्हणजे, कामकरी लोकांतील असंतोष, आयर्लंडचा प्रश्न व सरकारची उधळपट्टी या होत. या सालच्या अंदाजपत्रकांत चेंबर्लेननें मागील सालापेक्षां जरी कमी खर्च दाखविला होता तरी देखील कित्येक खात्यांत सरकारची उधळपट्टी नजरेस येत होती. त्याविरुद्ध चळवळ सुरू करण्यांत आली. त्याचप्रमाणें दिवसेंदिवस धान्याची महागाई झाल्यामुळें, अधिक वेतन मिळावें याबद्दल खाणींतील मजुरांनीं चळवळ सुरू केली. खाणीच्या मालकांनी, कोळशाची निपज पगारवाढीच्या प्रमाणांत अधिक होत नाहीं या सबबीवर, वेतन वाढवावयाचें नाकारलें. त्यामुळें खाणींतील मजुरांनीं संप केला. शेवटीं तात्पुरती पगारवाढ व्हावयाचें ठरून तो संप मोडण्यांत आला. आयर्लंडमध्यें तर असंतोषाचा वणवाच पेटलेला होता. दंगेधोपे, खून हे प्रकार राजरोज सुरू झाले. ह्यांनां आळा घालण्यासाठीं पार्लमेंटकडून कडक उपाय योजण्यांत आले पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. उलट ठिकठिकाणीं बंडें होऊं लागून इंग्लिशांच्यावर सूड घेण्याची बुद्धि दृग्गोचर होऊं लागली. सरतेशेवटीं, पार्लमेंटनें, या प्रश्नावर खूप चर्चा करून आयर्लंडला होमरूल देण्यासंबंधीचें बिल पुढें आणलें. या बिलान्वयें, दक्षिण आयर्लंड व उत्तर आयर्लंड यांनां दोन निरनिराळीं पार्लमेंटें दिलीं असून त्या दोन्ही पार्लमेंटवर इंग्लंडच्या पार्लमेंटची सत्ता ठेवलेली होती. हें बिल उत्तर आयर्लंडला जरी पसंत पडलें, तरी दक्षिण आयर्लंडला तें मुळींच पसंत पडलें नाहीं. आयर्लंडमध्यें फूट पाडून त्याच्यावर चरण्यासाठीं हें बिल तयार केलें आहे,असें फ्रीमेन्स जर्नल नांवाच्या एका वर्तमानपत्रवाल्यानें उद्गार काढले. याच मुद्यावर मजूरपक्षानें व ॲस्क्विथसारख्या इंग्लिश उदारमतवादी मुत्सद्यांनीं व आयरिश सभासदांनीं या बिलाला विरोध केला; पण तें बिल मंजूर होऊन त्याचें कायद्यांत रूपांतर झालें. बिलाप्रमाणें आयर्लंडच्या कारभाराची घटना करण्यांत आली. दक्षिण पार्लमेंटच्या निवडणुकींत सिनफीनर्स लोक बहुमतानें

निवडून आले, तर उत्तरेच्या पार्लमेंटमध्यें यूनियनिस्ट लोकांचा भरणा अधिक झाला. उत्तरपार्लमेंटचा मुख्य प्रधान सर जेम्स क्रेग हा झाला. हें उत्तरेकडील पार्लमेंट जॉर्ज बादशहाच्या हस्तें उघडण्यांत आलें. पुढें लॉईड जॉर्ज यानें क्रेग व डी व्हॅलेरा यांस आयर्लंडच्या प्रश्नावर खल करण्यास बोलाविलें व अशा रीतीनें तात्पुरती शांतता झाली.

सन १९२१ मध्यें प्रधानमंडळांत बऱ्याच अदलाबदली झाल्या. लॉर्ड मिलनरच्या वसाहतमंत्र्याच्या जागेवर चर्चिलची नेमणूक झाली. बोनर लॉ यांच्या प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें चेंबरलेन यांनां यूनिअनिस्ट पक्षाचे पुढारी निवडण्यांत आले. या वर्षीच्या पार्लमेंटमध्यें काटकसरीचा प्रश्न प्रामुख्यानें पुढें आला. महायुद्धानंतर थोड्याच दिवसांनीं व्यापाराची मंदी झाली, त्यामुळें मजुरांचा पगार कमी करणें भाग पडलें. पुष्कळ मजुरांच्या नोकऱ्या सुटल्या, बेकारी वाढली. अर्थातच पार्लमेंटलाहि आपल्या खर्चाची काटकसर करणें भाग पडलें. बेकारी वाढल्यामुळें व मजुरांचा रोज कमी झाल्यामुळें पुनः १९२१ सालीं फार मोठा कोळशांच्या खाणींतील मजुरांचा संप झाला, तो तीन महिने टिकला. त्यामुळें पुष्कळसे कोळशावर चालणारे धंदे बसले. व्यापाराला फारच मंदी आली. याच सालांत ब्रिटिश साम्राज्यांतील सर्व राष्ट्रांच्या प्रधानांची लंडन येथें परिषद भरली. परिषदेचे मुख्य हेतु दोन होते. पहिला हेतु, परराष्ट्रविषयक धोरण कोणतें ठेवावें यासंबंधींचा व दुसरा हेतु आंग्लो जपानीज तहाला पुनर्मान्यता देण्याचा होता.

१९२१ सालांत पार्लमेंटमध्यें यूनिअनिस्ट, संयुक्तपक्ष, लिबरल व मजूरपक्ष असे चार पक्ष अस्तित्वांत होते व या चारी पक्षांची आपापसांत चढाओढ चालू होती. लॉईड जॉर्ज हा या वेळच्या पार्लमेंटमध्यें प्रामुख्यानें झळकत होता. डी व्हॅलेरा व क्रेग यांच्याशीं खल होऊन लॉईड जॉर्जनें आयर्लंड फ्रीस्टेटच्या दर्जाचें करावयाचें ठरविलें. आयर्लंडच्या बाबतींत उपस्थित झालेल्या प्रश्नामुळें त्याला शस्त्रसंन्यासाच्या परिषदेला वाशिंग्टन येथें जातां आलें नाहीं. त्यानें बॅलफोरला तिकडे पाठविलें. या परिषदेपासुन इंग्लंडला पुष्कळ फायदा झाला. अशा रीतीनें लॉईड जॉर्जची कारकीर्द पुष्कळच यशस्वी झाली असें म्हणावयास हरकत नाहीं. या वेळीं तो कीर्तीच्या शिखरावर गेला होता; पण याच वेळेपासून त्याच्या यशाला ओहोटी लागण्यास सुरवात झाली. ऑस्टिन चेंबर्लेन, बोनर लॉ वगैरे मंडळी त्याच्यापासून फुटण्याचा बेत करूं लागली, मजूर पक्षाचेंहि प्राबल्य वाढण्याचा रंग दिसूं लागला. लॉईड जॉर्ज पक्षांतहि फूट पडण्यास सुरवात झाली व नवीन निवडणूक होण्याचीं चिन्हें दृग्गोचर होऊं लागलीं.

१९२१ च्या मेच्या सुमारास जरी लाइड जॉर्ज यास मुख्यमंत्रिपद सोडावें लागेल असें भविष्य करण्यांत आलें तरी लाईड जॉर्जनें अधिकारी या नात्यानें आपलें आयुष्य १९२२ च्या आक्टोबर अखेरपर्यंत वाढविलें. आपले दुय्यम मंत्री बदलावे, ज्या पक्षांतील कांहीं माणसें घेतलीं असतां आपले अधिकार चालू राहतील असें वाटेल त्या पक्षांतील कांहीं माणसें घ्यावीं असें करून त्यानें आपलें पद कायम राखण्याची तडफड केली. हिंदुस्थानचे स्टेट सेक्रेटरी मि. मॉंटेग्यू यास त्यानें याच हेतूनें बळी दिले असा त्यावर आक्षेप आहे. लॉईड जॉर्जनंतर बोनर लॉ हा कांहीं काळपर्यंत ( २४ आक्टो. १९२२–२० मे १९२३ ) मुख्य प्रधान झाला आणि त्यानंतर स्टानले बाल्डविन हा मुख्य प्रधान झाला. (२०मे १९२३–२२ जानेवारी१९२४) पण पुढें यूनिअनिस्ट पक्ष दुर्बल होऊन मजूर पक्ष पुढें सरसावला आणि पहिलें मजूर पक्षाचें प्रधानमंडळ अधिकारारूढ झालें. या पक्षाचा पुढारी मि. रामसे माक्डोनाल्ड हा मुख्यप्रधान झाला.

लाईड जॉर्जनें अधिकारसंन्यास करीपर्यंत कांहीं महत्त्वाच्या गोष्टी केल्या. मात्र कांहीं बाबतींत पिछेहाटीचें धोरण त्यास पत्करावें लागलें. लाखों लोकांस घरें बांधून द्यावयाची ही डॉ. आडिसन यांची योजना पैशाच्या अभावीं संपुष्टांत आणावी लागली ( जुलै १९२१ ); आक्टोबर १९२१ मध्यें सर रॉबर्ट हार्ने यांनीं उधारीनें निर्गत वाढविण्याची योजना पुढें आणली. त्या योजनेचा सारांश असा कीं जे देश (किंवा वसाहती) मोठमोठ्या इंजनिअरिंगच्या योजना करूं इच्छीत असतील पण ज्यांच्यापाशीं पैसा नसेल त्यास अशा अटींवर पैसा पुरवावयाचा कीं, त्या पैशाचा उपयोग इंग्लंडमध्यें माल खरेदी करण्यांत व्हावा. ही योजना अंशतः अमलांत येऊं लागली आहे पण हिचा फायदा हिंदुस्थानास मिळाला नाहीं. १९२१ च्या अंतास जे लोक युद्धांत कामावर होते आणि ज्यांस युद्ध बंद झाल्यामुळें कमी करण्यांत आलें त्यांस परदेशीं जाऊन वसाहत करण्यास उत्तेजन देण्याची योजना करण्यांत आली. या योजनेनें कानडांत २५,०००, आस्ट्रेलियांत २०,०००, न्यू झीलंडमध्यें १०,००० व दक्षिण आफ्रिकेमध्यें ५,००० लोक पाठविण्यांत आले. ३५,००० लोकांस सरकारी खर्चानें पाठविण्यांत आलें. प्रत्येकास पाठविण्याचा खर्च सरकारास २६ पौंड आला. १९२२ च्या फेब्रुवारीमध्यें सर एरिक गेड्डेसची खर्चाच्या काटाकाटीची योजना पुढें आली त्या योजनेंत आरमार, सैन्य, वैमानिक दळ घरें बांधणें आणि शिक्षण या सर्व बाबतींत काटाकाट करण्यांत आली. फौज आणि आरमार यांची काटकसर करण्यांत आली व दीड कोट पौंडांची बचत करण्यांत आली. तथापि इतर देशांत वैमानिक चळवळ जोरानें सुरू असल्यामुळें वैमानिक मंत्रिपद बंद करूं नये असें ठरलें. लॉर्डांच्या सभेंत सुधारणा करण्याचें या सालांत घाटत होतें पण कांहीं झालें नाहीं. राजाच्या खानगीमध्यें ४५००० पौंड तूट आली व राजानें आपला इतमाम कमी करण्याची तयारी दर्शविली पण पार्लमेंटनें तो इतमाम कमी करूं नये असा आग्रह

धरला. याच वर्षी वर्तमानपत्राच्या धंद्याशीं संबद्ध अशा दोन गोष्टी झाल्या. त्यांपैकीं एक म्हटली म्हणजे लंडनच्या टाईम्सच्या मालकींत बदल होय. नार्थक्लिफच्या एस्टेटमधून टाईम्स विकलें गेलें आणि जान वाल्टर नांवाच्या मनुष्यानें खरेदी केलें. त्यामुळें स्वतंत्रपणें पण सरकारी बाजूनें लिहिण्याची पत्रनीति बंद पडेल अशी अपेक्षा व्यक्त केली गेली. दुसरी गोष्ट म्हटली म्हणजे " जान बुल " पत्राचा संपादक होरेशिओ बाटमले यास लफंगेपणा करून दीड लक्ष पौंड लांबविल्याबद्दल सात वर्षें शिक्षा झाली.

ज्या देशांचे म्यांडेट ग्रेटब्रिटनला मिळालें त्यांचा दर्जा याच वर्षी निश्चित झाला. त्यांस प्रजाजन न म्हणतां ' संरक्षित व्यक्ति' असें म्हणावें असें राष्ट्रसंघाच्या सूचनेवरून ब्रिटननें ठरविलें. १९२१ आक्टोबरमध्यें एडन हिंदुस्थानसरकारच्या ताब्यांतून काढून वसाहत मंत्र्याच्या ताब्यांत दिलें.

मि. चर्चिल यांनीं ब्रिटिश सैन्यास सोमालिलँड येथें पांच हजार फूट उंचीचें हवा खाण्याचें ठिकाण मिळवून देऊन तीन लक्ष पौंडांची बचत करावी अशी एक योजना पुढें आणिली. परंतु असें करण्यांत तेथें रेल्वेची सोय करणें भाग पडत असल्यामुळें आर्थिक काटकसरीच्या दृष्टीनें ही आटोक्याच्या बाहेरची म्हणून रहित करण्यांत आली.

सन १९२२ च्या जानेवारींत केनेस येथें अँग्लो फ्रेंच कराराबद्दल वाटाघाट चालू होती पण त्यास खरें महत्त्व नाहीं यदाकदाचित जर्मनीनें फ्रान्सवर चढाई करूं नये ब्रिटिश सैन्याच्या धुडगावण्याचा जर्मनीस वचक बसावा हाच त्यांतील उद्देश होता.

याच वर्षी एप्रिलपासून मेपर्यंत जिनोवा येथें राष्ट्राराष्ट्रांची कॉन्फरन्स भरली होती. तींत बऱ्याच महत्त्वाच्या गोष्टी झाल्या. रशियन व जर्मन प्रतिनिधींनां समान दर्जानें वागविणें सहन करण्याविषयीं इंग्लंडनें फ्रान्सला वळविलें. लाइड जार्जनें कोणाच्याहि वाटेस न जाण्याचा शांतता–करार ( नान अग्रेशन पीस ॲक्ट ) तयार करून तो दहा वर्षें अमलांत असावा व कोणी तो मोडल्यास त्यावर बाकीच्या राष्ट्रांनीं आर्थिक बहिष्कार घालावा अशी योजना केली. खंडणीच्या बाकीबद्दल व्यवस्था ठरविण्याच्या विचारास जर्मनीनें संतुष्ट न केल्यामुळें फ्रान्स व बेलजम येथील सरकारें चिडलीं व त्यांनीं मेमध्यें स्वारी करण्याचा धाक घातला. रशियांतील बोल्शेविकांनींहि या कान्फरन्समध्यें मुत्सद्दीपणा दाखविला. एप्रिलमध्यें आकस्मिकपणें त्यांनीं स्वतंत्र रूसो–जर्मन तह घडवून आणला. यामुळें इंग्लंडला विषाद वाटला, व सर्व दोस्तराष्ट्रांनीं रशियासंबंधींच्या कोणत्याहि प्रश्नाच्या वादविवादांत जर्मनीला घ्यावयाचें नाहीं असें ठरविलें. फ्रान्सनें तर तो तहच मोडून टाकण्याचा हट्ट धरला होता. इकडे बेलजमनें रशियन करारांतील 'रेस्टोरेशन ऑफ प्रायव्हेट प्रॉपर्टी' च्या कलमाला जुमानलें नाहीं व तसें करण्यांत फ्रान्सनें बेलजमला पाठिंबा दिला याबद्दल इंग्लंड फ्रान्सवर रागावलें. परकीय सत्तांनीं 'सोव्हिएट लोन' देईपर्यंत आपणहि युद्धापूर्वींचीं कर्जें नाकारावयाचीं असा रशियानें निश्चय केला. बाह्यसत्तेखालील खाजगी मालमत्ता परत मिळण्याचें तत्व अशक्य म्हणून रद्द करण्यांत आलें. पब्लिक डेट्स ( लायाबिलिटी )ची जबाबदारी स्वीकारण्याबद्दलच्या अटींतून युद्धकर्ज वगळण्यांत आलें. या सर्व गोष्टींमुळें फ्रान्सनें सोव्हिएट सरकारशीं आणखी व्यवहार करण्याचें नाकारलें. परंतु लाइड जार्जनें चतुराईनें हेग कान्फरन्समध्यें तज्ज्ञांच्या एका ' संयुक्त मंडळा'कडे तो प्रश्न सोंपवावा असें ठरवून प्रत्यक्ष खटका उडण्याचें तात्पुरतें टाळलें. रशियाला समान दर्जा देण्याचें वचन देऊन 'संयुक्तमंडळां'त भाग घेण्याविषयीं कबूल करून घेतलें.

हेग कान्फरन्स जून जुलैमध्यें भरली. परंतु सोव्हिएट सरकारच्या मागण्या फार वरचढ असल्यामुळें ती परिषद मोडली.

ज र्म न खं ड णी व अ मे रि के चें लो न.—लाइड जॉर्ज यानें युद्धकर्जाची फेड करण्याच्या वेळेची सवलत जर्मनीला देण्यांत यावी म्हणून खटपट केली. १९२२ च्या आगस्टमध्यें अर्ल आफ बाल्फोर यांनीं पत्र पाठवून दोस्तराष्ट्रें व अमेरिका यांनां कळविलें कीं अमेरिकेनें ब्रिटनचें कर्ज रद्द केल्याखेरीज ब्रिटनला यूरोपांतील युद्धकर्जाचा भार सोसणें शक्य नाहीं. परंतु अमेरिका कर्ज रद्द करण्याच्या अगदीं साफ विरुद्ध होती. म्हणून या पत्रामुळें इंग्लंड व अमेरिका यांच्या मित्रत्वाला थोडी ओढ बसली. पण लवकरच ती दूर करण्यांत आली (संयुक्त संस्थानें पहा.). १९२२ च्या आगस्टमध्यें इंग्लंडनें जर्मनखंडणीविषयीं फ्रान्सच्या जुलमी योजनेबद्दल आपली नापसंती व्यक्त केली.

जुलै सन १९२२ मध्यें सर चॉर्लस टाउनशेंड खासगी नात्यानें अंगोरा येथें गेला होता. तेथें त्यानें मुस्ताफा केमाल याची तुमच्या कृत्यास आमचा पाठिंबा आहे अशी खातरजमा केली. नंतर लवकरच फ्रान्स व इटली यांच्यासह इंग्लंडनें ग्रीस व तुर्कस्तान यांच्या युद्धांत मध्यस्थ म्हणून खटपट करण्याचें ठरविलें. लिबरल पार्टीनें तुर्कस्तान विषयक या प्रतिकूल धोरणास सडकून विरोध केला व तुर्कस्तानशीं सलोख्याचा तह करण्याच्या विरुद्ध असलेल्या सरकारी धोरणाचा पुरस्कार केल्यामुळें लाइड जार्ज यास आक्टोबरमध्यें आपल्या प्रधानपदाचा राजीनामा द्यावा लागला.

१९२१ सालीं शिरोगणती झाली त्यावेळेस असें दिसून आलें कीं, ग्रेटब्रिटनची लोकसंख्या चार कोटी पंचवीस लक्षांवर होती. यापैकीं स्काटलंडची लोकसंख्या सुमारें पन्नास लाख होती. लंडन शहराची लोकसंख्या ४५ लाख होती व ग्रेटर लंडन ( लंडन व आसमंतांतील उपनगर भाग ) ची वस्ती ७५ लाख होती. लंडन व ब्राडफोर्ड खेरीज इतर शहरांची लोकवस्ती वाढलेली दिसून आली. इंग्लंड व स्काटलंड

यामध्यें स्त्रियांचें पुरुषांपेक्षां वीस लाखांनीं आधिक्य आढळून आलें. जरी महायुद्ध झालें तरी इंग्लंडची लोकसंख्या वाढलेली दिसून आली, आणि मृत्यूचें प्रमाण पूर्वीच्या सर्व वर्षांपेक्षां १९२१ मध्यें कमी आढळून आलें.

सामाजिक गोष्टींपैकीं कांहीं गोष्टी विशेष लक्षांत ठेवण्याजोग्या झाल्या. विधवेला दिरापाशीं लग्न लावण्यास परवानगी देण्यांत आली. अधर्मसंततीस धर्मसंततीचें स्वरूप देण्याचा कायदा झाला. जर संतति झाल्यानंतर आईबापांनीं लग्न केलें तर तें मूल धर्मसंतति म्हणून इतःपर धरलें जाईल. घटस्फोटाच्या कायद्यांत सुधारणा होऊन स्त्रियांस व पुरुषांस, समता देण्यांत आली. स्त्रीनें व्यभिचार केला तर नवरा तिला तेवढ्याच कारणावर काडी मोडून देऊं शकत असे. पण स्त्रीला नवऱ्यास काडी मोडून द्यावयाची असेल तर स्त्रीनें नवऱ्याच्या व्यभिचाराशिवाय, नवऱ्याचा त्याग किंवा नवऱ्याचा दुष्टपणा सिद्ध करावा लागे. इतःपर तसें नको. केवळ नवऱ्याच्या व्यभिचाराबद्दल स्त्रीनें काडी मोडून देण्याला हरकत नाहीं. याशिवाय आणखी एक सामाजिक महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे मद्यपानविषयक कायदा होय. हा पास करून घेण्याचें श्रेय पार्लमेंटमधील पहिली स्त्रीसदस्य लेडी आस्टर इजला आहे. हा कायदा जुलै १९२३ मध्यें पास करण्यांत आला. या कायद्याप्रमाणें जर कोणा १८ वर्षांच्या आंतील मुलास दारू विकली तर तें कृत्य बेकायदा होय. या कायद्यास दोन सोडवणुकींनीं दुर्बलत्व आलें आहे. एक सोडवणूक म्हटली म्हणजे गुत्तेवाल्यानें "जाणूनबुजून" हें केलें असें सिद्ध झालें पाहिजे आणि दुसरी सोडवणूक म्हणजे १६ वर्षांच्या वरच्या मुलांस जेवणाबरोबर दारू देण्यास हरकत नाहीं.

**युनियनिस्ट प्रधान मंडळें:**—लाईड जार्ज नंतर दोन युनिअनिस्ट प्रधान मंडळें झालीं एक बोनर लॉ याच्या नेतृत्वाखालीं झालें व दुसरें, स्टॅनले वाल्ड्वीन हा मुख्य प्रधान असतां वेळचें होय.

**बोनर लॉ स्वराष्ट्रीय कामकाजः**—हे मुख्य प्रधान व स्टॅन्ले बाल्ड्वीन हे फडनवीस असतांना कान्झरव्हेटिव्ह ३४६, मजूर पक्ष १४२ उदारमतवादी ५८ आणि "राष्ट्रीय उदारमतवादी" ५७ येणेंप्रमाणें अनुक्रमें निरनिराळ्या राजकीय पक्षांतील लोकांची संख्या होती.

**जमाबंदी.**—नोव्हेंबर १९२२ मध्यें राष्ट्रीय कर्ज अजमासें ७७४२० लाख पौंडांचें होतें. १९२३ सालच्या एप्रिल महिन्यांत जें अंदाजपत्रक करण्यांत आलें त्यांत रोकड ३६० लक्ष पौंड अधिक कर्ज झाल्याचें आढळून आलें. याच वेळीं देशांत असंतोष असण्याचें एक कारण म्हणजे चहा व साखर यांजवरील करांत कांहींच फेरफार केलेला नव्हता हें होय. प्राप्तीवरील कर दर पौंडास सहा पेन्स प्रमाणें कमी करण्यांत आलेला होता. आणि बीर दारूवरील कर व कार्पोरेशनचा कर कमी झालेला होता. या सालचें अंदाज पत्रक सर्वानुमतें पास झालें.

**इ. स. १९२३ सालची परदेशीय वसाहतींची योजना आणि मजूर पक्षाचें वजन.**—१९२२ सालच्या अखेरीस देशांत बेकारी वाढली त्या योगानें मजूर पक्ष बराच प्रबल झाला. बेकार मजुरांना रोजगार मिळावा म्हणून उगीच कांहीं तरी निरुपयोगी दुष्काळी कामें सुरू करण्याच्या योजनेविरुद्ध बोनर लॉ हे होते. कारण अशा प्रकारचीं कामें सुरू करणें म्हणजे सरकारास उगीच खर्चाच्या गोत्यांत पाडणें आहे असें त्यांचें मत होतें. परदेशीं जाऊन वसाहत करण्याची व ब्रिटिश बाजार वाढविण्याची सरकारी योजना पुढें आली; पण त्या योगानें कुटुंबाची पांगापांग होते अशा सबबीवर मजूर पक्षानें तिला अडथळा आणिला.

**मादक पदार्थांच्या व्यापारास आळा.**—प्राणघातक औषधीं संबंधीं १९२० च्या कायद्यांत कांहीं फेरफार करण्यांत आले. त्या योगानें असला औषधींचा व्यापार करणाऱ्या गुन्हेगारांना जास्तींत जास्ती ३००० पौंड दंड व जास्तींत जास्ती १० वर्षांची शिक्षा अथवा दोन्ही करण्याचें ठरलें.

**वैमानिक धोरण.**—इ. स. १९२२ सालीं फ्रान्सच्या तोडीचें, आणि प्रसंगविशेषीं रूसो जर्मनांचा वैमानिक हल्ला आल्यास त्यास तोंड देण्यास तयार असण्याचें इंग्लंडचें वैमानिक धोरण होतें. हिंदुस्थानांत आठवड्यांतून दोन वेळां व ऑस्ट्रेलियांत आठवड्यांतून एक वेळ डांकेची व उतारूंची नेआण करण्याची बर्नें याची आकाशयान योजना इ. स. १९२२ सालीं पसंत पडली होती. व सरकारनें तत्संबंधीं मदतीस रकम देण्याचें अश्वासनहि दिलेलें होतेंच. ती योजना जुलई १९२३ सालीं प्राप्त झाली. युरोपांतल्या युरोपांत वैमानिक दळणवळणासाठीं प्राग हें अत्यंत सोइस्कर ठाणें व्हावयाचें होतें.

**"इंपिरियल" बिनतारी संदेश मार्ग.**—ही योजना होऊन एक तप लोटलें होतें. ती सरकारनें तावडतोब हातांत घेतली एक संदेशप्रसारकस्थान ब्रिटन मध्येंच करावयाचें, त्याजवर सर्वस्वी सरकारी ताबा रहावयाचा, संदेश पाठविण्याचें कामहि सरकारनें करावयाचें, मात्र खासगी धंद्यास सवड ठेवावयाची असें ठरलें.

लंडनच्या आसमंतांत पांच मोठी शक्तिस्थानें वसाहतींशीं दळणवळण करण्याकरितां उभारावयाचीं, व संदेश पाठविण्याचीं मुख्य स्थानें दक्षिण आफ्रिकेंत, हिंदुस्थानांत, ऑस्ट्रेलियांत व कानड्यांत तीन करावयाचीं व कित्येक लहान लहान संदेश घेण्याचीं स्थानें त्यांस जोडावयाचीं; वेस्ट इंडीज सारख्या लहान वसाहतींचा संबंध त्या त्या वसाहतीनजीक असणाऱ्या मुख्य स्थानांशीं जोडावयाचा या मार्कोनीच्या योजनेस २० लक्ष पौंड ऐन खर्च येत होता.

बा ल्ड् वि न.—बोनर लॉ यानें प्रधानपद सोडल्यामुळें ( मृत्यू १९२३ ) नवीन प्रधान नेमणें अवश्य झालें. मजूर पक्षाचें सामर्थ्य लक्षांत आणून या वेळीं एखाद्या उमरावानें प्रधानपदावर असण्यांत शहाणपणा नाहीं असें जाणून लॉर्ड कर्झन यांनीं मोठ्या नाइलाजानें का होईना प्रधानपद नाकारिलें. अर्थातच स्टॅन्ले बाल्डविन या व्यापारपटु मनुष्याकडे मुख्य प्रधानपद आलें.

स्टॅन्ले बाल्ड्विन यांच्या कारकीर्दीतच आयर्लंडांत ज्यांनीं आयरिश लोकांना हद्दपारीच्या शिक्षा दिल्या होत्या त्यांचा बचाव करण्यासाठीं स्पेशल इंडेम्निटी बील पास झालें. या बिलानें मंत्र्याच्या अधिकारास निश्चित नियंत्रण बसलें आणि त्याबरोबरच आयरिश लोकांची जी नुकसानी झाली ती भरून देण्यासंबंधीं विचार करण्यास एक ट्रायब्युन बसविण्यांत आलें.

मु ल की धो र ण.—स्टॅन्ले बाल्ड्विन याचें धोरण देश मजूरीकरितां सर्व अंतर्गत व्यापार राखून ठेवण्याचें व साम्राज्यांत उत्पन्नाच्या बाबी वाढविण्याचें होतें.त्यांनीं चहा व साखर यांजवरील कर कमी करावयाचा व कच्च्या कापसावरील कर अजिबात माफ करावयाचा असें आश्वासन दिलें होतें.५००० पौंडावरील खाजगी मालमत्तेवर कर बसविण्याची मजूर वर्गाची इच्छा होती.१९२३सालीं आस्क्विथसाहेबांच्या नेतृत्वाखालीं जो "स्वतंत्र उदारमतवादी पक्ष"(इंडिपेंडंट लिबरल्स) निर्माण झाला होता तो व लॉ. एल. जॉर्ज यांच्या नेतृत्वाखालील राष्ट्रीय उदारमतवादी पक्ष या उभय पक्षांचें ऐक्य १९२३ च्या नोव्हेंबरांत झालें. त्या वेळीं या व्यापारी धोरणास आस्क्विथसाहेबांनीं प्रतिकार केला. सरकारास बेकारीचा प्रश्न सोडविण्यांत जें अपयश आलें त्याजबद्दल मजूरपक्षानें सरकारची निंदा केली होती तथापि निंदाव्यंजक ठरावास मात्र त्यानें अनुमति दिली नाहीं.

प र रा ष्ट्री य धो र ण.—या वेळची एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे लॉसेन येथील सभा होय. सभेपुढें डार्डानेल्समध्यें लढाईच्या वेळीं व शांततेच्या वेळींहि व्यापारी जहाजें स्वतंत्र रहावीत, त्यांना कोणत्याहि प्रकारचा अडथळा पोहोंचूं नये, अशासंबंधीं एक योजना लॉर्ड कर्झन यांनीं सभेपुढें मांडली होती. या वेळीं तुर्कस्तान तटस्थ होतें व रशिया काळ्या समुद्रावरील सत्तासूत्रें सर्वस्वी आपल्या हातांत असावी अशी मागणी करीत होता.

याच वेळीं सोव्हिएट सरकारशीं व्यापारी दळणवळण सुरू करावें म्हणून एण ब्रिटिश व्यापारी मंडळ रशियांत गेलें होतें; तथापि त्यांत त्यांची निराशा झाली.

इ.स.१९२३च्या आक्टोबरमध्यें एक "इंपीरियल कान्फरन्स" झाली होती.त्यावेळीं र्‍हूअरप्रांताविषयीं इंग्लंडनें निश्चित धोरण स्पष्टपणें प्रगट केलें नव्हतें त्यामुळें फ्रान्स इंग्लंडवर चिडला होता. तुर्कस्थानच्या तहाच्या अटीस लार्ड कर्झन यांचा कल अनुकूल होता. या सभेंत सर्वानुमतें अमेरिकेशीं स्नेह संपादन करून तिच्या मध्यस्थीनें युरोपांतील अव्यवस्था मोडणें भाग आहे असें ठरलें.

म जू र प क्षी य प्र धा न मं ड ळः-(राम्से मॅकडोनल्ड ) इ.स.१९२४मध्यें जान्युआरींत राम्से मॅकडोनल्ड यांना प्रधान पदाचीं वस्त्रें मिळालीं. लॉर्ड हाल्डेन फडणवीस झाले. व सर सिडने ऑलिव्हर यास हिंदुस्थानचे स्टेट सेक्रेटरी नेमण्यांत आलें.

सर्व राष्ट्रांचा पूर्ण पाठिंबा मिळवून एक सर्व राष्ट्रांची महा सभा भरवावी व तद्वारें सर्व शांतता राखावी, गुप्त तह करूं नयेत, तुर्कस्थानशीं शांततेचा तह मंजुर करावा, सिंगापुरास आरमारी ठाणें करू नये अशा प्रकारचें राजकीय सर्वसाधारण धोरण १९२४ च्या मार्च महिन्यांत ठरविण्यांत आलें आहे.

मु ल की व्य व हा र.—घर भाड्यासंबंधीं कायद्याची मुदत माजी प्रधानमंडळानें १९२५ पर्यंत वाढविली होती ती नवीन प्रधानमंडळानें १९२८ पर्यंत वाढविली आहे. लहान लहान घरें बांधावयास उत्तेजन मिळावें म्हणून वीस वर्षेपर्यंत पांच खोल्या असलेल्या नव्या लहान घरास सरकारांतून मदत म्हणून सालीना ६ पौंड देण्याचें पूर्वींच ठरलेलें आहे.

केवळ बेकारीमुळें घरभाडें देतां आलें नाहीं तर भाडेकऱ्यांना घरांतून घालवून देण्याचा निकाल न्यायकोर्टांनीं देऊं नये असें एक बिल सरकारनें पुढें आणिलें होतें, परंतु घराच्या मालकावर हें एक भयंकर ओझें होणार आहे असें जाहीर करून कान्झर्वेटिव्ह् व उदारमतवादी या उभयतांनीं एकमतानें सदर बिल फेंटाळून लाविलें. या कामीं सरकारचा पूर्ण पराभव झाला, तथापि तत्संबंधीं कायद्याची अत्यंत जरूरी आहे असें वाटल्यावरून जवळ जवळ पूर्वीच्या बिलाच्या स्वरूपाच्याच एका खासगी बिलाचा सरकारनें उपक्रम केला.

इ. स. १९२४ च्या व्यापारीविषयक सवलतीः—इतर डोमीनियन व वसाहती यांनीं इंग्लंडमध्यें कर्ज उभारण्यासाठीं सवलत देण्याचें धोरण निश्चित झालें.

सिं गा पू र ये थी ल आ र मा री त ळा चें उ च्चा ट ण.—आरमारी सैन्याची वाढ करण्याविरुद्ध मजूर वर्गानें तीव्र निषेध व्यक्त केला. त्यांचें म्हणणें असें कीं, अरमारी सैन्य वाढवणें म्हणजे एक नवीन लष्करी जात उत्पन्न होण्यास उत्तेजन देणेंच आहे. कित्येक विरुद्ध बाजूच्या लोकांनीं असें सुद्धां व्यक्त केलें कीं, ' जपान आस्ट्रेलियास केव्हां उपद्रव देईल याचा नियम नाहीं, तेव्हां सिंगापुरास आरमारी तळ असणें आवश्यक आहे. पण भवतिनभवति होऊन त्या तळाचें उच्चाटण झालें. ऑस्ट्रेलियांत यासंबंधीं बराच असंतोष उत्पन्न झाला पण जपानांत संतोष व्यक्त करण्यांत आला.

सा म्रा ज्या चें जं गी प्र द र्श न.—लंडन संनिध "वेंबले" येथें एक जंगी सामाज्यप्रदर्शन १९२४ च्या एप्रिलमध्यें उघडण्यांत आलें. यावेळीं लॉर्ड पारमूर यांच्या पत्रानें बरीच खळबळ उडविली होती त्यांचें म्हणणें असें कीं, हें प्रदर्शन म्हणजे 'आपणांस जगाची जरूरी नाहीं ब्रिटन सर्व जगांत श्रेष्ठ आहे असा टेंभा मिरविण्यासारखें आहे. या योगानें ब्रिटनच्या इतर राष्ट्रांशीं असलेल्या स्नेहसंबंधास गोता येणार आहे. त्यांच्या या म्हणण्याचा उपयोग मात्र झाला नाहीं. पार्लमेंटानें या प्रदर्शनास ११८००० पौंड खर्च करावयाची मंजुरी दिली. व ती पुढें वाढविली.

सै न्यां ती ल मृ त्यू ची शि क्षा.—एप्रिल १९२४ मध्यें सैनिकांनां मरणाची शिक्षा देऊं नये हा एक प्रश्न उहापोहासाठीं मजूर सरकारनें इतर सुधारणाबरोबर आणिला होता.

प र रा ष्ट्री य का म का ज.—इंग्लंड रशियावरील जर आपला हक्क गमावूं पाहील तर इतर यूरोपांतील कर्ज गोळा करण्यास फार कठिण जाणार आहे अशी स्टॅनले बाल्डवीन यांनीं मजूर सरकारास सूचना दिली होती.

इं ग्लं ड च्या इ ति हा सा चें प र्या लो च न—इंग्लंडच्या इतिहासाचें महत्त्व केवळ त्या देशांतील होणाऱ्या घडामोडी वरून ठरवावयाचें नाहीं. तर त्या देशाचा जगाच्या प्रत्येक भूभागावर जो परिणाम झाला आहे आणि जागतिक संस्कृतीच्या घटनेमध्यें इंग्लंडनें जी कामगिरी केली त्यावरून ठरविलें पाहिजे. इंग्लंडचा इतिहास म्हणजे केवळ राजकीय कारभाराची जंत्री नव्हे. राष्ट्रांत ज्या नैतिक, व्यापारविषयक, आणि अभ्युदयविषयक महत्त्वाकांक्षा उत्पन्न झाल्या त्यांचें राष्ट्रीय इतिहासांत प्रतिबिंब पडलें आहे. आणि त्यामुळें आपण जर सामाजिक कायद्यांचा इतिहास पाहूं लागलों किंवा आर्थिक संस्था विषयींचे कायदे पाहूं लागलों म्हणजे इंग्लंडची आरम सुधारणेची जोराची खटपट दिसून येते. शास्त्रीय पद्धतीनें सर्व आयुष्याचें अवलोकन करून तींत पद्धतशीर सुधारणा करण्याकडे प्रवृत्ति जर्मनीनें युद्धपूर्व पंचवीस तीस वर्षें जशी दाखविली तशी इंग्लंडनें दाखविली नसेल तथापि स्वकीय उन्नतीसाठीं शासन संस्थांचा अत्यंत मोठ्या प्रमाणावर उपयोग करावयाचा, देश्य कारभारांत अत्यंत श्रेष्ठ नैतिक तत्त्वें पाळावयाचीं इत्यादि गोष्टींत जितकी दक्षता इंग्लंडनें दाखविली तितकी दुसऱ्या कोणीहि दाखविली नसेल. फ्रान्समध्यें लोकसत्ताक राज्यपद्धति आहे इंग्लंडांतील राज्यपद्धति जरी वरवर पहातां नृपाधिष्ठित आहे तरी वैयक्तिक स्वातंत्र्य आणि लोकहितानुवर्ती सरकार, नोकरशाहीचे मर्यादित अधिकार या दृष्टीनें पहातां इंग्लंड हें फ्रान्स पेक्षांहि अधिक अंशानें लोकराज्य आहे असें म्हणावें लागेल.

वसाहती स्थापन करून वसाहतींची उन्नति करण्याच्या मार्गांत इंग्लंड आधीं पडलें त्यांत चुका इंग्लंडनें आधीं केल्या आणि त्या इंग्लंडनें अगोदर सुधारल्या, व शिस्तवार राज्यघटनेची तत्त्वें अगोदर उदयास आणिलीं यामुळें इंग्लंडचें वैभव वाढलेंच. याशिवाय इंग्लंडच्या इतिहासावर अत्यंत परिणामकारक झालेली गोष्ट म्हटली म्हणजे इंग्लंडनें युद्धें जरी अनेक वेळां केलीं तरी युद्धाचें रणक्षेत्र इंग्लंड होऊं दिलें नाहीं ही होय. या अंतःस्वास्थ्यामुळें इंग्लंडची संपत्ति एक सारखी वाढतच गेली. गेल्या महायुद्धांत बेलजम जर्मनीनें पादाक्रांत केलें व लंडनशीं स्पर्धा करणारें ॲंटवर्प जर्मनीनें जाळून टाकलें व फ्रान्सचा मुलूखहि जर्मनीनें बराच उध्वस्त केला तरी इंग्लंडचा मात्र कोणताहि भाग उध्वस्त झाला नाहीं. यामुळें इतर देशांतील भांडवल जरी वारंवार कमी झालें तरी इंग्लंडांतील भांडवल कमी झालें नाहीं. तेथील आगगाड्या, कारखाने, इमारती हीं सर्व अबाधित राहिलीं आणि याचा परिणाम असा दिसून येत आहे कीं, इतर यूरोपखंड जरी धुळीस मिळालें तरी इंग्लंडचा आर्थिक व्यवहार अव्याहत चालू राहिला आणि जागतिक स्पर्धेमध्यें यश मिळविण्यास इंग्लंड अधिक योग्य राहिलें. या यशस्वी तेचें श्रेय पुष्कळअंशीं इंग्लंडच्या आरमार खात्यास दिलें पाहिजे हें उघड आहे. युद्धोत्तर कालामध्यें फ्रान्सनें वैमानिक बलाकडे अधिक लक्ष दिलें आहे तथापि वैमानिक दळें वाढविण्यास जो खर्च लागावयाचा तो खर्च करण्यास यूरोपांतील इतर राष्ट्रें इंग्लंडची बरोबरी केव्हां करतील हा प्रश्नच आहे, तथापि हेंहि येथें कबूल केलें पाहिजे कीं, वैमानिक विद्येचा जसजसा विकास होईल तसतसें इंग्लंडचें स्वतः अस्पृष्ट राहून दुसऱ्याच्या मुलुखांत लढाई चालविण्याचें कौशल्य आजच्या इतकेंच राहील किंवा नाहीं याची शंका आहे

साम्राज्यांतील निरनिराळ्या घटकास योग्य प्रमाणांत स्वातंत्र्य देऊन एकंदर साम्राज्य घटनेस निराळें स्वरूप देण्याचा उपक्रम इंग्लडनें केला आहे आणि साम्राज्याच्या इतर भागांची इंग्लंडावर आसक्ति वांशिक संबंधामुळें आणि अभ्युदयेच्छु वसाहतीचे सावकार बनून इंग्लंड वाढवीत आहे आणि यामुळें राष्ट्रसंघात्मक साम्राज्याच्या कल्पनेचा अधिकाधिक विकास जगाच्या इतिहासांत प्रथमच इंग्लंड घडवून आणील असें दिसतें. हिंदुस्थानसारख्या देशाचा इंग्लंडशीं वांशिक संबंध नाहीं असें असतां हिंदुस्थानास अंतर्गत स्वातंत्र्य देऊन व अभ्युदयेच्छु करून पुन्हां साम्राज्याचा अवयव म्हणून रहावें, अशी इच्छा हिंदुस्थानांत प्रादुर्भूत करण्यांत इंग्लंडला कसें काय यश येईल हें इंग्रजी मुत्सद्यांच्या शासनकौशल्यावर बरेंच अवलंबून आहे.

इंग्लंडच्या यशस्वितेची दुसरी बाजू म्हटली म्हणजे इंग्रजी भाषेचें महत्त्व होय. अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें जरी इंग्लंडच्या शासनतंत्राच्याबाहेर पडलीं तरी त्यांनीं इंग्रजी भाषेचें महत्त्व वाढविलेंच. एवढेंच नव्हे तर आज इंग्रजी वर्तमानपत्रें, इंग्रजी पुस्तकें यांचें उत्पादन अमेरिकेंत जेवढें

होत आहे तितकें प्रत्यक्ष इंग्लंडमध्येंहि होत नाहीं. गेल्या शतका दीड शतकांपूर्वी जेव्हां यूरोप हेंच राजकारणाचें क्षेत्र होतें, तेव्हां फ्रेंच भाषेस राजकीयदृष्ट्या महत्त्व होतें. आज शोभेकरितां तेंच महत्त्व फ्रेंच भाषेस चालू ठेवलें आहे, तरी जागतिक व्यवहारामध्यें आज फ्रेंच भाषा तर अगदींच मागें पडली आहे व इंग्रजी भाषेइतकी महत्त्वाची भाषा दुसरी कोणतीच नाहीं, हा सर्व इंग्लंडचा फारच मोठ्या प्रकारचा विजय होय. इंग्रज लोकांवरील परक्या भाषेचें दडपण काढून टाकण्यामध्यें महत्त्वाचें यश इंग्लंडच्या चर्चनें संपादन केलें.त्यामुळें इंग्रजी जगाची धार्मिक भाषा लॅटिन नसून इंग्रजी आहे. आज जगांतील कोणत्याहि राष्ट्रास स्वतःच्या भाषेशिवाय दुसरी भाषा शिकावयाची झाल्यास इंग्रजी भाषेइतकी शिकली असतां फायदेशीर होणारी भाषा दुसरी कोणतीहि सांपडावयाची नाहीं. आज इंग्लंड राष्ट्रीय भाषा व संस्कृति व राष्ट्रीय आयुष्य यास फारसा विरोध करीत नाहीं. परंतु दुसऱ्यांची भाषा मारून टाकण्याचे प्रयत्न इंग्लंडनें केले नाहींत असें मात्र नाहीं. यास आयर्लंड, वेल्स व हिंदुस्थान हे साक्ष देतील. या प्रकारच्या प्रयत्नांत इंग्लंडसारख्या बलाढ्य राष्ट्रासहि यशस्विता आली नाहीं, पण येथें हेंहि कबूल केलें पाहिजे कीं दुसऱ्याच्या भाषांस गळफास लावण्याचे प्रयत्न रशिया व जर्मनी यांनीं जसे केले तसे इंग्लंडनें केले नाहींत. कांहीं अंशीं तसें करण्याची जरूरीहि नव्हती. कारण जो परिणाम घडवून आणावयाचा तो घडविण्यास इंग्रजी भाषेच्या ज्ञानाची उपयुक्तता अधिक सहाय्यक झाली. आतां राष्ट्रांचें वैशिष्ट्य कायम ठेवूनहि संयुक्त प्रयत्नानें राज्यशासन चालविण्याचें धोरण अधिक वाढलें असल्यामुळें व तें वैशिष्ट्य घालविण्याच्या प्रयत्नास आलेली अयशस्विता स्पष्ट झाल्यामुळें तसल्या प्रकारच्या बेवकूब फंदांत इंग्लंड पुन्हां पडेल असें वाटत नाहीं.

इंग्लंडच्या एकंदर राष्ट्रीय अयुष्यक्रमावर परिणाम कोणी केला आणि इंग्लंडच्या आयुष्यक्रमानें इतर कोणत्या राष्ट्रावर काय परिणाम केला याचा हिशोब देणें म्हणजे स्वतंत्र ग्रंथ लिहिणें होय. तथापि थोडक्यांत असें सांगतां येईल कीं, संगीत, नृत्य, चित्रकला इत्यादि कलांमध्यें फ्रान्स, जर्मनी, इटली यांच्याइतकें महत्त्वाचें स्थान इंग्लंडला नाहीं; शास्त्रीय बाबतींत इंग्लंड जर्मनीच्या निःसंशय महायुद्धपूर्वकालापर्यंत मागेंच होतें. इंग्लंडला प्राधान्यानें कलेचें किंवा शास्त्राचें राष्ट्र म्हणतां येणार नाहीं. त्यास रोमन लोकांप्रमाणें व्यावहारिक राष्ट्र म्हणतां येईल. मात्र फरक एवढाच कीं, प्राचीन जगांत रोमन राष्ट्रानें आपली व्यवहारबुद्धि, कायदेपद्धति निर्माण करण्यांत आणि व्यापक शासनपद्धति निर्माण करण्यांत दाखविली, व्यापार आणि उद्यम यांत दाखविली नाहीं. इंग्लंडनें मात्र शासन, व्यापार व उद्यम या तिहींमध्यें दाखविली; इंग्लंडच्या सहकार्याचें आणखी एक वैशिष्ट्य म्हटलें म्हणजे सुखकर अयुष्यक्रमविषयक होय. इंग्लंडनें मनुष्याचा आयुष्यक्रम अधिक सुखकर करण्याकडे जी दक्षता दाखविली ती यूरोपांतील दुसऱ्या कोणत्याहि राष्ट्रानें दाखविली नाहीं. कायद्याच्या बाबतींत इंग्रजी कायदा हा रोमन कायद्याचें विस्तरण आहे असें म्हणतां येणार नाहीं. फ्रान्स, इटली, जर्मनी, स्पेन यांच्या कायदेपद्धती मात्र रोमन कायद्याचें विस्तारण आहेत. या गोष्टीमुळें स्वानुभवानें योग्या योग्य नियम निर्माण करावयाचे व परंपरागत नियमांचे दास बनावयाचें नाहीं. असें करणें इंग्लंडला अधिक सोपें झालें आणि त्याचा इंग्रजी आयुष्यावर इष्ट परिणाम घडून आला. आणि या बाबतींमध्यें अमेरिकेशिवाय दुसऱ्या कोणत्याहि राष्ट्राची इंग्लंडशीं तुलना करितां यावयाची नाहीं.

[इंग्लंडचा हिंदुस्थानशीं किंबहुना जगाच्या सर्व भूभागाशीं संबंध येत असल्यामुळें आणि प्रत्येक खंडांत इंग्लंडचें राज्य असल्यामुळें इंग्लंडच्या कार्यपरंपरेची सविस्तर हकीकत देणें अशक्य आहे दिलेल्या माहितीच्या पूरणार्थ माहिती ग्रेटब्रिटन, आफ्रिका, इजिप्त, हिंदुस्थान, कानडा ट्रॅन्सव्हाल इत्यादि सदराखालीं सांपडेल.]

[ सं द र्भ ग्रं थः—प्राचीनतम इंग्लंडची माहिती ब्रिटिश थडगीं आणि लेणीं, रोमन रस्ते, भिंती आणि इमारती,नाणीं, स्थाननामें आणि अंकितलेख यांवरून मिळते. सीझर, टॅसिटस वगैरेंचे ग्रंथहि याकामीं उपयुक्त आहेत. सहाव्या शतकांत ख्रिस्ती मिशनरी या देशांत लेखनकला आणी पावेतों आंग्लो-सॅक्सनांनीं लिहिलेला इतिहास नाहीं. पहिला इतिहासकार बेडे होय. नार्मन विजयापासून बरेंच इतिहासकार पुढें आले त्यांनीं इतिहासाला वाङ्मयाचें स्वरूप दिलें. या पुढें मठवासी इतिहासकारांची परंपरा मध्ययुगाच्या अंतापर्यंत चालली. पुढें पुढें हें मठांतील लिखाण कमी महत्त्वाचें होऊन गृहस्थाश्रमी लोकांनीं लिहिलेली पत्रें, सरकारी दप्तरें, वकीलांची कागदपत्रें, वगैरे साधनें इतिहासलेखनाला आधारभूत झालीं. इंग्लंडचे व ब्रिटिश साम्राज्याचे अनेक इतिहास उपलब्ध आहेत यासाठीं येथें विशेष ग्रंथ देण्याचें प्रयोजन नाहीं. तथापि कांहीं महत्त्वाचे ग्रंथ पुढें निर्दिष्ट केलें आहेत. ए. ब्रि. स्टेट्मन्स ईयर बुक यामध्यें इंग्लंडवरचें वाङ्मय सविस्तर दिलेलें आढळेल. महत्त्वाचे ग्रंथ म्हणजे, ग्रीन— शॉर्ट हिस्टरी ऑफ दि इंग्लिश पीपल ( मॅकमिलन ). फ्लेचर—इंट्रोडक्टरी हिस्टरी ऑफ दि इंग्लंड ( मुरे ), ४ पुस्तकें. लॅांगमन—पोलिटिकल हिस्टरी ऑफ इंग्लंड १२ पुस्तकें. मेथ्युएन—हिस्टरी ऑफ इंग्लंड, ७ पुस्तकें. मेड्ले—कॉन्स्टिटयूशनल हिस्टरी ऑफ इंग्लंड. फ्रूड, गार्डिनर, मेकाले, लेके वगैरे इतिहासकारांचे निरनिराळ्या कालखंडांवरचें ग्रंथ प्रसिद्ध आहेत. सीली—एक्सपॅन्शन ऑफ इंग्लंड. कनिंगहॅम—ग्रोथ ऑफ इंडस्ट्री अँड कॉमर्स. ॲश्ले—एकॉनॉमिक हिस्टरी, २ पु. पोलर्ड—हिस्टरी ऑफ इंग्लंड. ]

**इंग्लिश कायदेपद्धति**—इंग्रजी न्याय तत्त्वशास्त्राच्या दृष्टीनें पहिल्या रिचर्डच्या कारकीर्दीच्या पूर्वीची म्ह० ११८९ पूर्वीची कायद्यासंबंधीं माहिती मिळणें शक्य नाहीं. चालू शतकाच्या पूर्वी सात शतकें इंग्लंडांत जो कायदा प्रचलित होता व हल्लीं ज्याची छाप जगांतील बऱ्याचशा भागांवर बसत चालली आहे, त्या संबंधींची ऐतिहासिक माहिती तुटक नसून फारच सप्रमाण आहे. ११९४ त न्यायसभांचीं जीं रोज कामें होत त्यांची एक बिनचूक यादी तयार करण्यांत आली व त्या वेळेपासून कायद्यासंबंधीं साहित्यसमूह ज्यास्तच वाढत गेला. त्यामुळें प्राचीन सिद्धांतांचें मूळचें स्वरूप बदलत जाऊन त्यापासून नवीन सिद्धांत कसकसे बाहेर पडले हें सांगणें फार कठिण झालें. तरी पण ब्लॅकस्टोन (इ. १७८०) नें लिहिलेले कायद्याचे ग्रंथ व ग्लॅनव्हिल (११९०) नें लिहिलेलीं कायद्याचीं पुस्तकें वाचल्यास असें दिसून येईल कीं ह्यांत कायद्याचें सामान्य तत्त्व एकच असून केवळ कायद्याचें प्रमाण कायतें पूर्वीपेक्षां पुष्कळ विस्तृत होत चाललें आहे.

ह्या सात शतकांच्या पूर्वीचा काळ अज्ञानमय आहे. नॉर्मन लोकांच्या स्वारीचा काळ म्हणजे दोन कायदेपद्धतींच्या संयोगाचा काळ असें आपण समजूं. त्या दोन कायदेपद्धती म्हणजे एक फ्रेंच व दुसरी अँग्लोसॅक्सन. फ्रेंच कायदेपद्धतींचें मूळ पाहूं गेल्यास आपणास कारलोव्हिनजिअन राजाचा नियमसंग्रह शोधावा लागेल.

ट्युटॉनिक कायदेपद्धतीचा अभ्यास केल्यास आंग्लोसॅक्सन कायदेपद्धतीचें विशेष स्पष्टीकरण होऊं शकतें. सातव्या शतकांत केंट व वेसेक्समधून जे कायदे पसार झाले त्यांचा यूरोपखंडांत प्रचलित असलेल्या परंपरागत लौकिक नियम संग्रहाशीं निकट संबंध होता. आठव्या व नवव्या शतकांत कायद्यामध्यें महत्त्वाची अशी कांहींच वाढ झाली नाहीं. ९०० सालापासून आल्फ्रेड व त्या पुढील राजे गादीवर आले. त्यांच्या शासनप्रणालींत व फ्रान्समधील नियमसंग्रहांत बरेंच साम्य दिसून येतें. ह्या शासनप्रणालीमुळेंच आल्फ्रेडच्या कालापासून तों सध्यांच्या कालापर्यंत कायद्याची ऐतिहासिक परंपरा कायम राखली गेली आहे.

जर्मन कायदेपद्धतींत देखील आंग्लोसॅक्सन शासनांना योग्य महत्व दिलेलें दृष्टीस पडतें. केल्टमधील कायद्यांचीं तत्त्वें आंग्लोसॅक्सन कायदेपद्धतींत मुळींच दिसून येत नाहींत. जर्मनी, स्कॅन्डिनेव्हिया व डेनमार्क यांमधून इंग्लंडमध्यें आलेल्या जनसमूहांत परस्पर जरी वैमनस्य होतें तथापि भाषा व कायदेपद्धति ह्यांतील भेद नष्ट होऊन त्यांची एकरूपता होत चालली होती. स्थानिक चाली रीती जरी भिन्न होत्या तथापि त्यांत सादृश्य बरेंचसें होतें. इंग्लंडांत सर्वत्र एकच कायदा प्रचलित रहाणार असें दिसत होतें.

इंग्लंडमध्यें व इतर ठिकाणीं जर्मन कायदेपद्धतीची वाढ प्राचीन काळांतच झाली. पण हल्लींच्या कायदेशास्त्रांतील प्रगतीचें कारण रोमनसंस्कृति होय. रोमनसंस्कृति जर नसती तर जुन्या चालीरीती मोडल्या जाऊन त्यांऐवजीं एक ठराविक कायदेपद्धति कधींहि बनली नसती. कायदे बनविण्यांत जरी रोमन संस्कृतीचा बराच परिणाम झाला तथापि चौकसबुद्धीनें शोध केल्यावर असे आढळून येतें कीं, आंग्लोसॅक्सन कायदेपद्धतींत धर्मग्रंथ खेरीज करून एकहि रोमन नियम सांपडत नाहीं. इंग्लंडांतील कायदे इंग्लिश भाषेंत होते. इंग्लंडांत रोमन लोकांना आपल्या कायदेपद्धतीप्रमाणें वागतां आलें नाहीं, कारण ट्युटानिक लोकांनीं त्यांस तसें करूं दिलें नाहीं. यूरोपखंडात प्रचलित असलेल्या रोमन व इतर असंस्कृत लोकांच्या कायदेपद्धतीचा एकमेकांवर परिणाम झाल्याशिवाय राहिला नाहीं. कांहीं ठिकाणीं रोमन कायदा नंतरच्या जेतृ वर्गांत रूढ होता तर कांहीं ठिकाणीं तो नष्ट होत होता. कांहीं काळ असें वाटूं लागलें कीं रोमनपद्धतीस अनुसरून वागणारे फ्रेंच राजे आपल्याच कायदेकानूंप्रमाणें यूरोपखंडांतील ख्रिस्ती बनलेल्या पश्चिमेकडील भागावर अंमल चालवितील. परंतु तसें घडून आलें नाहीं. वैय्यक्तिक कायद्याचें रूपांतर स्थानिक रूढीमूलक कायद्यांत झालें व जेथें रोमन लोकांचा जास्त भरणा होता त्या जागींच रोमन चालीरीती विशेषेंकरून दिसूं लागल्या. इतक्यांत नार्मन लोक चाल करून आले व त्यांनीं फ्रान्समधील कांहीं भाग काबीज केला. त्यांची उत्साहशक्ति बराच काल टिकली, त्यांचा विशेष गुण असा असे कीं त्यांचा कोणत्याहि परकीय संस्कृतीशीं संबंध आला कीं त्या संस्कृतीस ते आपलीशी करीत. इंग्लंड पादाक्रांत करण्यापूर्वी बरेच दिवस ते आपल्या भाषेंत, धर्मांत व कायदेपद्धतींत निव्वळ फ्रेंच बनले होते.

हल्लीं देखील जर्मन इतिहासकार असें म्हणतात कीं इंग्रजी कायदेपद्धतीची उत्पत्ति फ्रेंच कायदेपद्धतीपासून आहे. ह्या मताला एच्. ब्रुमरचा आधार आहे. त्याचें मत असें आहे कीं ज्यूरीनें खटला चालविण्याची पद्धति फ्रेंच राजांच्या कायद्यांत सांपडते, पण ती आंग्लोसॅक्सन कायद्यांत दिलेली नाहीं. शिवाय कायद्यांतील बऱ्याचशा पारिभाषिक शब्दांची विशेषतः खासगी कायद्यांतील शब्दांची व्युत्पत्ति फ्रेंच शब्दांपासून आहे. १०६६ व ११८९ मधील शैथिल्याच्या काळांत वरील कांहीं गोष्टी घडून आल्या. रूफसचा करडा अंमल नाहींसा झाल्यानंतर पहिल्या हेनरीनें एडवर्ड राजाची कायदेपद्धति सुरू करण्याचें अभिवचन दिलें. अर्थातच ही एडवर्डची कायदेपद्धति थोडक्यांत एका जागीं आणण्यासाठीं फ्रेंच विद्वानांनीं प्रयत्न केले असावेत असें दिसून येतें. डॉ. लायबरमननें जो शोध लावला आहे त्यावरून त्यावेळची

एडवर्डची कायदेपद्धति म्हणजे कांहीं कायद्यातील गोष्टी एकत्र केलेलें टांचण होय असें आढळून येतें. या कायदेपद्धतीवरील त्या वेळचा उत्तम ग्रंथ म्हणजे लेगेस हेनरिकी प्रिमि हा होय. या ग्रंथांतील बराचसा भाग. कॅन्यूटच्या कोडमधून व इंग्रजी फैसल्यांतून घेतला आहे. नार्मन लोकांचा कायदा लेखनिविष्ट नव्हता व त्यांनीं फारसे कायदेहि अंमलांत आणले नाहींत. पहिल्या विल्यमनें इंग्लिश कायदेपद्धतींतील जमीन व शेतकरी ह्यांवर लादण्यासंबंधीचा बराचसा भाग कायम ठेविला व त्याचा विचार इंग्रज लोकांवर इंग्रजी कायदेपद्धतीप्रमाणें अंमल चालविण्याचा होता. नार्मन सत्तेचें अत्यंत महत्त्वाचें कृत्य म्हणजे "डूमस्डे" बुक तयार करणें हें होय. ह्या पुस्तकाचा उद्देश प्रत्येक शेतकऱ्यापासून ठराविक नियमांप्रमाणें खंडणी घेण्याचा होता.

दुसऱ्या हेनरीच्या वेळच्या राज्यपद्धतीसंबंधीं माहिती रॅनफ ग्लॅनव्हिलनें केलेल्या पुस्तकांत दिली आहे. ग्लॅनव्हिल हा दुसऱ्या हेनरीच्या वेळचा मुख्य न्यायाधीश होता. ह्यानें दरबारांतील न्यायपद्धतीचें स्पष्टीकरण केलें आहे तें असें:—नामांकित न्यायाधिशांची निवडणूक होऊन त्यांची बैठक कांहीं ठराविक काल चालावी असें ठरलें. प्रजेस दरबारांत जाण्याची बंदी नव्हती. फिरत्या न्यायाधिशांचीहि नेमणूक झाली. पुष्कळशा खटल्यांत काम चालविण्याची रीत पक्षकारांच्या मनावर अवलंबून असे. ह्या खटल्यांतील निकालांचा एकमेकांशीं कांहीं एक संबंध नसे. कारण प्रत्येक निकाल प्रयोगात्मक असे. खटल्याचा निकाल देण्याची साधारणपणें प्रचलित असलेली पद्धत दिव्य, द्वंद्व, शपथ असल्या प्रकारचीच होती, पण विशिष्ट बाबतींत पक्षकारास सरकारची मदत मिळे. मात्र अशा पक्षकारानें आपला खटला मोजक्या बिनचूक शब्दांत मांडावा म्हणजे झालें. इंग्रजी कायदेपद्धतींत ह्या विशिष्ट नियमपद्धतीचा ( फार्म्युलेटरी सिस्टिम ) चा पगडा अजून कायम आहे. प्रत्येक खटल्याचा विधिक्रम वेगळा व त्याचा कार्यक्रमहि वेगळा. पक्षकारानें विधिक्रमाची निवडणूक करावी. त्यांत आपला खटला तंतोतंत मांडावा व ज्याप्रमाणें त्यानें निवड केली असेल त्याप्रमाणें तो खटला जिंकेल अगर हरेल. ह्यावरून वरील पुस्तक म्हणजे मूळ दाखल्यावरील टीकासंग्रह असें म्हणण्यास हरकत नाहीं.

ग्लॅनव्हिलच्या पुस्तकांत इंग्रजी कायदेपद्धतीस एक प्रकारचें सुसंबद्ध स्वरूप प्राप्त झालें आहे. ह्याचें कारण रोममधील न्यायतत्त्वशास्त्राचें पुनरुज्जीवन होय. रोममधून बऱ्याच विद्वानांनीं इंग्लंडांत येऊन रोमन कायद्यांतील तत्त्वांचा उपदेश केला. त्याचा परिणाम असा झाला कीं, धर्मसभेनें केलेले कायदे धर्मविषयक खटल्यांत लागू पडावे असें ठरलें. दुसरा हेनरी व थामस ऑफ कॅन्टरबरी ह्या दोघांमधील भांडणामुळें लौकिक कायद्याच्या आड धर्मसभेनें केलेले कायदे बरेचसे येत. राजसचिवांना धार्मिक अधिकाऱ्याकडून बराचसा उपदेश घेतां आला. रिचर्ड फिट्झ निगेल ह्यांनीं वसुलाच्या पद्धतीचें विस्तृत विवेचन करणारा असा "डॉयलाग ऑफ दि एक्सचेकर" नांवाचा ग्रंथ लिहिला. हा लंडनमधील बिशप होता.

पुढील शतकाचा उदय फार महत्त्वाचा होता. ह्या शतकांत एक विस्तृत व माननीय ग्रंथ पुढें आला. ह्या ग्रंथाचा कर्ता हेनरी आफ ब्रॅटन हा होय. ब्रॅटन शब्दाचा अपभ्रंश पुढें ब्रॅकटन असा झाला. हा तिसऱ्या हेनरीच्या कारकीर्दीत एक न्यायाधीश होता. "आझो आफ बोलोग्ना" अथवा ज्याला एका इंग्रजी ग्रंथकारानें कायदेपंडितांतील रत्न असें नांव दिलें आहे ह्याचा ग्रंथ हा ब्रॅकटननें आदर्श म्हणून ठेविलेला होता. ह्यामधून न्यायतत्त्वशास्त्रांतील बरींच सामान्य तत्त्वें व सर्वसामान्य सिद्धांत घेतले होते. पण ग्रंथांतील मुख्य भागांत त्यानें इंग्लंडमधील न्यायासनाच्या पद्धतीविषयीं माहिती दिली आहे. पन्नास वर्षांपूर्वी इंग्लिश न्यायासनासमोर झालेल्या कार्यक्रमाची यादी चर्मपत्रावर काळजीपूर्वक लिहून ठेविली होती. त्यांतून मागील दाखले म्हणून बरेच निकाल ब्रॅकटननें आपल्या ग्रंथांत दिले आहेत. मार्टिन पाटेशल व बुलीअम रॅले ह्यांच्या फैसल्यास त्यानें विशेष महत्त्व दिलें आहे. ह्यावरून इंग्लंडांतील "कॉमनलॉ" नामक कायद्यास "केस लॉ" चें म्हणजे निवाड्यांच्या समुच्चयावरून निर्माण होणाऱ्या कायद्याचें स्वरूप प्राप्त होणार असें अनुमान निघूं शकतें. इंग्लंडांतील वकील "कॉमन लॉ" म्हणजे सर्वत्र लागूं पडणारा कायदा असें मानीत. स्थानिक कायदा, राजांनीं दिलेल्या सवलती, व खासगी हक्क ह्यांत व "कॉमन लॉ" मध्यें तो भेद मानीत. लिहून ठेविलेल्या कायद्यास इंग्लंडांतील वकील कामनला समजत नसत. कायदे व ठराव क्वचितच दृष्टीस पडत. १२१५ मधील "ग्रेट चार्टर" मध्यें "सवलती व हक्क" लिहून ठेविले होते. ह्यापुढें १२३६ मध्यें मर्टन चीं "कलमें" प्रसिद्ध झालीं. एकंदर तिसऱ्या हेनरीच्या अंमलांत कायद्याची वाढ झपाट्यानें झाली व असें होण्याचें कारण त्यानें काढलेले 'नवीन हुकूम' व चान्सरीनें प्रसिद्ध केलेले "खटल्याचे नवीन प्रकार" हे होत. ब्रॅकटननें ग्लॅनव्हिलला माहीत नसलेल्या बऱ्याच कायद्यांविषयीं बरेंच लिहिलें. ते त्यांनीं पुस्तकरूपानें प्रसिद्ध केलें. त्यावेळीं चान्सरीचे नवीन कायदे करण्याचे अधिकार मर्यादित केले जावेत असें लोकांना वाटूं लागलें; कारण यानें "कामनलॉची" वाढ खुंटत चालली.

पहिल्या एडवर्डच्या अमदानींत ( १२७२–१३०७ ) इंग्रजी संस्थांना एकप्रकारचें निश्चित स्वरूप प्राप्त झालें व हेंच पुढेंहि टिकलें. याच्या कारकीर्दीतच पार्लमेंटची स्थापना

झाली. पार्लमेंटमध्यें धर्मोपदेशकांचें मंडळ, राजाचें मंत्रिमंडळ, व चान्सरी खातें होतें. एडवर्डच्या पहिल्या १८ वर्षांच्या कारकीर्दीत जे कायदे पसार झाले ते संख्येंत जरी कमी होते तथापि ते फार महत्त्वाचे होते. तेव्हांपासून "कायद्यासंबंधीचे अहवाल" प्रसिद्ध होऊं लागले. वकील लोक विवादात्मक मुद्दे टिपून घेऊं लागले. पोपच्या आज्ञापत्रामुळें धर्मोपदेशकांनां हुद्याच्या जागा मिळण्याविषयीं प्रतिबंध झाला. त्याच्या जागीं कायद्याचा अभ्यास करणाऱ्या मंडळींच्या नेमणुका झाल्या. वकीलीच्या धंद्यासंबंधाची माहिती फारशी मिळूं शकत नाहीं तथापि वकीलीच्या धंद्यास एकप्रकारचें वैशिष्टय प्राप्त झालें असावें व वकिलांच्या मताला कायद्याच्या दृष्टीनें बरेंच महत्त्व प्राप्त झालें असावें.

ब्रॅ टा, ब्रि ट न व हिं घ म चीं पु स्त कें.—कायद्याचीं पुस्तकें निराळीं बनल्यामुळें कायद्याचा अभ्यासहि वेगळा करणें भाग पडलें.

पहिल्या एडवर्डच्या अमलांत "ब्रेटा" व "ब्रिटन" नांवाचीं दोन कायद्याचीं पुस्तकें बाहेर पडलीं. ह्या दोन्हींहि पुस्तकांत ब्रॅक्टनच्या पुस्तकांतील भाग आला आहे. त्याचप्रमाणें न्यायकोर्टांतील कामकाजपद्धतीसंबंधानें विशिष्ट न्यायाधीश हिंघम यानें केलेलीं दोन पुस्तकें आहेत. पहिल्या एडवर्डपासून तों चवथ्या एडवर्डपर्यंत नांव घेण्यासारखें एकहि कायद्यावरील पुस्तक प्रसिद्ध झालें नाहीं. त्या काळांत कायद्याचीहि वाढ फार झपाट्यानें होत नव्हती. पार्लमेंट महत्त्वाच्या मुद्यांत हात घालीत असे व तिचा उद्देश राजाचा व पार्लमेंटचा कायदेकानू करण्याचा अधिकार अमर्याद आहे असें दाखविण्याचा होता. राजानें अगर पार्लमेंटनें केलेल्या कायद्याच्या खरेपणाविषयीं चर्चा न्यायाधीश क्वचितच करीत. अशा रीतीनें पार्लमेंट जें कांहीं करील तें सर्वच योग्य असा समज होण्यास सुरवात झाली.

च व दा वें व पं ध रा वें श त क.—मध्ययुगीन कालांतील इंग्रजी संस्थांपैकीं "इयर बुक्स" व "इन्स ऑफ कोर्ट" ह्या दोन प्रसिद्ध संस्था होत. खटल्याचे निवाडे कसे केले गेले हें आपल्या साथीदारास समजावें म्हणून वकील लोक खटल्यांचे अहवाल प्रसिद्ध करीत. इंग्लंडमधील कायद्याची माहिती करून घेण्यास हे अहवाल म्हणजे एक साधन होतें. पार्लमेंटच्या परवानगीवांचून कामकाजपद्धतींत कोणचाहि नवीन फेरफार करितां येत नसे. तो काल उदारमतवाद्यांचा होता. त्याचप्रमाणें पुरातन मतांनां चिटकून राहणारांचाहि होता. कोक ह्या तिसऱ्या एडवर्डच्या कारकीर्दीला उत्तम कायदेपंडितांचें युग असें मानीत असे. पण "वार्स ऑफ रोझेस" च्या काळींहि थोडेफार नामांकित वकील झाले व कांहीं नवीन कायद्याचीं तत्त्वेंहि उदयास आलीं. ह्याच वेळेस जमीनधारण करण्याच्या पद्धतीसंबंधीचा ग्रंथ सर थॉमस लिटलटननें तयार केला. हा ग्रंथ फारच सुबोध असून यांत कायद्याचें विवेचन उत्तम रीतीनें केलेलें आहे.

का य द्या चें शि क्ष ण.—ह्याच सुमारास इंग्रजी कायदा शाळेंतून शिकविला जाऊं लागला. कायद्याचे विद्यार्थी आपले संघ स्थापन करून रहात असत. भव्य दिवाणखान्यांत ते सर्व एकेच ठिकाणीं भोजन करीत. पुस्तकसंग्रहालय हें एक प्रकारचें केंद्रस्थान होतें. त्यांनां राहण्याकरितां निरनिराळ्या खोल्या असत अभ्यासक्रम संपेपर्यंत त्यांनीं ब्रह्मचारी वृत्ति धारण केलेली असे. अशा रीतीनें धंद्यांत अयोग्य माणसाचा शिरकाव होत नसे. कांहीं कालानें अभ्यासक्रम बराचसा लांबलचक व त्रासदायक करण्यांत आला. जो कोणी तो संपवील त्यास ब्यारिस्टरची पदवी मिळत असे. हा पदवीधर इतर विद्यार्थ्यांनां शिक्षण देण्याला योग्य असे. पुढें वकीलीचा धंदा चालविण्याकरितां पदवीची अवश्यकता लागूं लागली. १७४० मध्यें सर जान फार्टेस्क्यूनें इंग्रजी कायदेपद्धतीवर एक प्रशंसात्मक पुस्तक लिहिलें.

हें पुस्तक प्रसिद्ध होण्यापूर्वी एक शतक जॉन वायाक्लिफच्या योग्यतेच्या एका गृहस्थानें एक पुस्तक लिहिलें आहे. रोमन कायद्यापेक्षांहि इंग्रजी कायद्यांत अतिशय सूक्ष्म रीतीनें विचार केलेला असतो असें या पुस्तकांत म्हटलें आहे. ऑक्सफोर्ड व केंब्रिजमधील कायदेपंडितांनीं जी कामगिरी बजाविली तिच्यापेक्षांहि ह्या कायद्याच्या शाळांनीं केलेली कामगिरी फार महत्त्वाची होती.

पण याच सुमारास 'कॉमन लॉ' वर नवीन प्रकारचें संकट येण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. कमकुवत असलेली "कामन लॉ" ची कायदेपद्धति मोडली जाऊन तिच्या जागीं राजाची स्वतंत्रबुद्धीची चान्सरी कायदेपद्धति येतें कीं काय असा भास होऊं लागला. सर्व प्रकारच्या खटल्याकरितां न्यायासनें स्थापन करण्यांत आलीं होतीं. तरी पण ह्या कोर्टांत अनेक कारणांनीं योग्य न्याय न दिला गेल्यास त्याला राजानें योग्य तो न्याय देणें हें इष्ट होतें. हीच गोष्ट फौजदारीच्या बाबतींत होती. अर्थातच अशा तऱ्हेच्या खटल्यांचा निकाल राजा व त्यानें नेमलेला एक न्यायमंत्री हे देत असत. आरंभीं चान्सेलरचें काम, अंमलांत असलेला कायदा रद्द करण्याचें अथवा त्यांत भर घालण्याचें नव्हतें; तर त्याचें काम अडचणीच्या ठिकाणीं सुरळीत कायदेशीर मार्ग आंखून देण्याचें होतें. चान्सेलरकडे बहुतेक खटले हल्ले, कायद्याविरुद्ध दुसऱ्यास स्पर्श करणें व जबरदस्तीनें माल हिसकावून घेणें ह्या संबंधीचे असत. पण पार्लमेंटनें वरील गुन्ह्याच्या बाबतींत चॅन्सेलरला फैसला देण्याचा अधिकार नाहीं असें ठरविलें. त्यामुळें चॅन्सेलरच्या कामाचीहि दिशा बदलली इतक्यात १४ व्या शतकापासून 'ट्रस्ट' ची पद्धत सुरू झाली व ट्रस्टीचीं योग्य कर्तव्यें ओळखून तीं ट्रस्टीवर लादण्याचें चॅन्सेलरकडे सोंपविण्यांत आलें.

पुढील शतकांत चान्सरी कोर्टाची स्थापना झाली. चॅन्सेलरचे अधिकार मर्यादित केले गेले व ज्या गुन्ह्यावर

' कामन लॉ ' नें उपाय सुचविला असेल त्या बाबतींत चॅन्सेलरला पडतां येत नसे. कपटाच्या, आरिष्टांच्या व विश्वासघाताच्या बाबतींत स्वतःच्या सदसद्विवेकबुद्धीला जें पटेल त्याप्रमाणें निकाल देण्याचें काम चॅन्सेलरकडे आलें. पुष्कळ गोष्टींवरून आपणांस असें अनुमान काढतां येतें कीं ट्रस्टसंबंधीच्या बाबतींत साधारणतः तो "कामन लॉ " चें धोरण स्वीकारी. पुष्कळ दिवसानंतर त्याचें निकाल वकील लोक प्रसिद्ध करूं लागले. पूर्वी दिलेल्या निकालाप्रमाणेंच त्यानें निकाल द्यावा असें नव्हतें. चॅन्सेलरच्या न्यायपद्धतीचें मुख्य तत्त्व परिस्थितीस लागू पडेल अशा धोरणावर न्याय देण्याचें होतें.

ट्युडर राजांचा अंमल जेव्हां सुरू झाला तेव्हांचा काल फार चढाओढीचा होता. स्टार चेम्बर, चान्सरी या प्रकारचीं पुष्कळशीं नवीन कोर्टें स्थापन झालीं. हीं कोर्टें संक्षिप्त रीतीनें चौकशी करून निकाल देत. आठव्या हेनरीच्या कारकीर्दीत कायद्यासंबधींचे अहवाल तुटक तुटक बाहेर पडूं लागले. ह्याच्या कारकीर्दीत नावाजलेले असे कोणतेच न्यायाधीश झाले नाहींत. ह्याच वेळेस जर्मनीवर रोमन कायद्याची लाट जाऊन आदळली. जर्मनींत ह्या नवीन कायदेपद्धतीचें मोठें स्वागत करण्यांत आलें. इंग्लंडनेंहि रोमन कायदेपद्धतीचा स्वीकार करावा असें रेजिनाल्ड पोलला वाटूं लागलें. हा पुढें धर्माध्यक्ष झाला. याचें असें मत होतें कीं इंग्रजी कायदेपद्धतीहि अगदीं रानटी आहे. व रोमनी कायदेपद्धति सौजन्यानें अगदीं भरलेली आहे. पोपचें मत आठव्या हेनरीला कदाचित मान्य झालें असतें. पण त्यावेळची वस्तुस्थिती जशी पाहिजे होती तशी नव्हती. धर्मसभेनें केलेले कायदे पाठशाळांतून शिकविण्याचें बंद झालें. धर्माच्या कोर्टांत दिवाणी कायद्यांत प्रवीण असलेल्या न्यायाधिशांची नेमणूक झाली. कांहीं दिवसांनीं प्रोटेक्टर सोमरसेटनें सिव्हिलियन लोकांना तरवेज करण्याकरितां केंब्रिजमध्यें कायद्याच्या शाळा स्थापन केल्या. इंग्रजी कायद्याची फारशी उलथापालथ न करतानांच हेनरीला जें पाहिजे होतें तें साध्य करितां आलें. पार्लमेंट ' कामन लॉ ' चीं न्यायासनें मागें पडलीं. राज्यासंबंधीं गोष्टींत स्टार चेंबर निकाल देत असे. कायद्याचीं विद्यालयें मात्र कायम ठेविलीं गेलीं; त्यांपासून फायदा अगर नुकसान असें कांहींच झालें नाहीं.

अशा रीतीनें आठव्या हेनरीच्या कारकीर्दीत जरी रोमन कायद्याची छाप पडली नाहीं. तरी पण इंग्लंडांतील कायद्याचें पुनरुज्जीवन मात्र झालें यांत शंका नाहीं. एडवर्ड प्लौडेन (१५८५) नें कायद्यावरील टीकात्मक ग्रंथ प्रसिद्ध केले. त्यांत निरनिराळ्या खटल्यांचें विवेचन विस्तृत रीतीनें केलें होतें ब्रेकटनचे ग्रंथ छापून प्रसिद्ध करण्यांत आले. लवकरच अँग्लो सॅक्सन ठरावहि नजरेस पडूं लागले. त्यांत इंग्लंडांतील चर्चविषयीं माहिती होती. एलिझाबेथच्या वेळीं इंग्लंडांतील लोकांच्या अंगांत राष्ट्रीय वारें भरलें असल्यामुळें जिकडे तिकडे पुरातन शोध, कायद्याचें पुजरुज्जीवन, व उदार मतांचा प्रसार होतांना दिसूं लागला. सर थामस स्मिथनें " कामनवेल्थ ऑफ इंग्लड " संबंधीं एक पुस्तक लिहिलें ह्यांत कायद्याचें व राज्यव्यवस्थेचें उत्तम विवेचन असल्यामुळें ह्यानें परदेशस्थ लोकांचें बरेचसें चित्त वेधलें. पुढें एडवर्ड कोक (१५५२–१६३४)च्या वेळीं "कामन ला"ला कायद्याचें मूर्त स्वरूप दिलें गेलें. ह्याचें इंग्लंडांतील परंपरागत गोष्टींविषयीं अत्यन्त प्रेम होतें. ह्यानें कायद्यावरील बहुतेक सर्व ग्रंथ धुंडाळून त्यावर पुष्कळसा उहापोह केला. ह्याच्या नवीन तत्त्वानें प्रेरित होऊन वकील लोक जेम्स व चार्लस यांच्याशीं राज्यघटनेसंबंधीं भांडले. एडवर्ड कोक, जान सेल्डन व विलियम प्रीन सारख्या नामांकित लोकांशीं स्टुअर्ट राजांनीं वैमनस्य आरंभिलें. व म्हणूनच त्यांना हार खावी लागली. मध्ययुगीन कालांतील कायद्याचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांस स्टुअर्ट राजांच्या वेळीं प्रसिद्ध झालेले अहवाल हे अतिशय महत्त्वाचे आहेत. कारण त्यावेळच्या वकीलांनीं जुने दाखले शोधून काढण्याविषयीं फारच खटपट केली. प्रीन (१६६९) हा एक प्युरिटन होता. त्याच्या अंगांत धर्मवेड शिरलें होतें. त्यानें कळकळीनें जुने दाखले शोधून प्रसिद्ध केले. आपणांस आज पार्लमेंटचा पूर्वीचा इतिहास लाभण्याचें श्रेय ह्याच गृहस्थाकडे आहे. यूरोपांत पहिल्या प्रथम जर कोणी संगतवार व यथायोग्य कायद्याचा इतिहास लिहिला असेल, तर तो सेल्डननें(१६५४)लिहिला.त्यानें 'टाइथ'(दहावा हिस्सा घेणें ) वर लिहिलेलें पुस्तक तर अप्रतिम साधलें आहे. राजाच्या मुठींत असलेले न्यायाधीशसुद्धां निकाल देतांना पूर्वींच्या फैसल्याचा आधार घेऊं लागले.

त्या वेळीं कायदेसिद्धांतांचा प्रवाह एवढा प्रबळ व दांडगा होता कीं, यादवी, राज्याची पुनःस्थापना, किंवा राज्यक्रांति ह्यामुळें त्याची गति मुळींच कुंठित झाली नाहीं. कामवेलच्या कायद्यांतील कांहीं उतारे घेऊन चार्लसच्या वेळचे कायदेकानू बरेच वाढविले.

हेलः—मॅथ्यूहेल(१६७६)हा जुने दाखले शोधणारांमध्यें शेवटला न्यायधीश होता. ह्यानें इंग्रजी कायद्याचें एक उत्तम चित्र रेखाटलें व त्यांत रंग भरण्याचें काम मात्र ब्लॅकस्टोननें केलें. ह्यावेळीं इंग्रजी कायद्यास अल्पसंतुष्टतेची स्थिति प्राप्त झाली. अठराव्या शतकांत हुकमी कायद्याला म्हणजे " स्टॅट्यूट लॉ " ला फार विस्तृत स्वरूप प्राप्त झालें. पार्लमेंट प्रत्यक्ष रीतीनें राज्यसूत्रें आपल्या हातांत घेऊं पहात होती. सार्वजनिक कायद्याच्या कांहीं ठळक ठळक भागांकडे यूरोपांतील विद्वानांचें लक्ष लागत चाललें होतें.

" कामन लॉ " चीहि वाढ खुंटली नव्हती. इलिझाबेथचा अंमल सुरू होईपर्यंत इंग्लंडांतील व्यापार केवळ परदेशस्थ लोकांच्या हातांत होता. मध्यकालीन काळांत देखील व्यापारी

लोकांनीं सभा भरवून "व्यापाऱ्याचा कायदा" ठरवून टाकला होता. कायद्यांत ज्या कांहीं उणीवा असूं भासूं लागल्या होत्या त्या भरून काढण्याकरितां निरनिराळे उपाय सुचविले जात होते कामकाजपद्धति फारच घोंटाळयाची बनली होती, व तिचा उलगडा फारच थोड्या विद्वानांनां होत असे. "कमिशन ऑफ पीस" नांवाच्या संस्थेनें न्यायदानाच्या बाबतींत बरेचसें महत्त्वाचें काम केलें. ज्यूरर्स आतां साक्षीदार समजले जात नसून ते न्यायाधीश बनले. प्रत्येकाला असें वाटूं लागलें कीं जर इंग्लिश लोकांच्या सवलती कायम ठेवावयाच्या असतील तर ज्यूरीनेंच खटल्याचा निकाल लावणें जरूर आहे.

इक्विटी.—ह्या काळीं इंग्रजी न्यायतत्त्वशास्त्राला एक महत्त्वाची जोड म्हणजे "इक्विटी" ची होय. १७ व्या शतकांत स्टार चेम्बरवर जो आघात कोसळला, त्या आघाताला चान्सरी कोर्टहि बळी पडत होतें, पण थोडक्यानें निभावलें. निरनिराळया प्रसंगांतून बचावल्यावर चान्सरीनें इक्विटीच्या नांवाखालीं न्याय देणें सुरू केलें. इक्विटी म्हणजे कायद्याची पुरवणी. धर्मशास्त्राच्या चालू नियमापासून न्यायबुद्धीचा स्वतंत्र कायदा म्हणजे इक्विटी. हींत निरनिराळे नियम एकत्र केले होते. हिची सारखी वाढ होत होती. नाटिंगहॅम (१६७३–७५) व हार्डविक (१७३७–५६) हे चॅन्सेलर असतांना इक्विटीची प्रगति होत होती. हळू हळू इक्विटीचे अहवाल प्रसिद्ध होऊं लागले, व "इक्विटी" मंडळाचीहि स्थापना होऊं लागली. "कामन लॉ" मध्यें निष्णात असलेल्या लोकांनीं इक्विटीच्या तटाची दिशा आंखून दिली. रोमन कायद्याचा परिणाम इंग्रजी इक्विटीवर ज्या प्रमाणांत झाला असा समज होता तितका तो खरोखर झाला नव्हता. पार्लमेंटची व जुन्या न्यायासनांची रचना जशीच्यातशीच होती. नवीन झालेल्या कायद्यांची चर्चा नवीन कोर्टांतच होत असे; म्हणून जसा पाहिजे होता तसा परिणाम घडून आला नाहीं. चान्सेलर जूररच्या कचाट्यांतून सुटल्यामुळें जितका कायदा सुलभ तितका चांगला ह्या गोष्टीचें त्याला स्मरण राहिलें नाहीं. त्यामुळें चॉन्सेलरचें कोर्ट हें गरीब लोकांचें न्याय मिळविण्याचें कोर्ट होण्याऐवजीं केवळ श्रीमंत लोकांच्याच कामाचें कोर्ट बनलें.

१८ वें शतक जवळ जवळ अर्धें संपत आलें. त्यासुमारास विल्यम ब्लॅकस्टोन नांवाच्या ब्यरिस्टरनें ऑक्सफोर्डमध्यें (१७५८) इंग्रजी कायद्यावर व्याख्यान देण्यास सुरवात केली, व लवकरच टीकात्मक ग्रंथ छापून प्रसिद्ध केलें (१७६५). ह्या ग्रंथांतील कायद्याचा इतिहास व सिद्धांत अगदीं बिनचूक होते म्हणून ते विद्यार्थ्यांनां व धंदे चालविणाऱ्यांनां फार महत्त्वाचे होते. ह्यांत इंग्लंडांतील कायद्याचें चित्र अत्यंत उत्तम रीतीनें रेखाटलें होतें. ब्लॅकस्टोनच्या पुस्तकासारखें कायद्यावरील चित्तवेधक पुस्तक इतर कोणत्याच राष्ट्रांत तयार झालें नाहीं असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं. सरासरी एक शतकभर इंग्लंडांतील कायदेपंडितांच्या मनांवर यांतील विचारांची छाप बसली होती. अमेरिकेंत देखील त्याच्या ग्रंथांचा मोठा आदर झाला व ते महत्त्वाचे गणले जाऊं लागले. मध्ययुगीन कालांतील कायद्यांची अमेरिकेंत बरीच चर्चा होऊं लागली. कायद्यांच्या शाळेंत इयरबुकचा कोनाकोपरा धुंडाळला जाऊं लागला. अमेरिकेंतील नामांकित न्यायाधिशांचीं नांवें इंग्लंडांत ऐकूं येऊं लागलीं. अशा रीतीनें ब्लॅकस्टोननें केलेल्या उपकाराची फेड होऊं लागली.

अर्थशास्त्रांतील फेरफार, निरनिराळया लढाया व "फ्रेंच रिव्होल्यूशन" मुळें जुन्या मतांस चिकटून रहाण्याचा लोकांचा कल यामुळें इंग्रजी कायद्याचें काम सांचून राहिलें. याच वेळेस बेंथमनें ब्लॅकस्टोनचीं मतें हाणून पाडण्याचा प्रयत्न चालविला, पण त्याचा कांहींच परिणाम झाला नाहीं. लोकमत सहज वळवितां येतें हें बेन्थॅमला पक्कें ठाऊक होतें म्हणून इंग्लंड, स्पेन अगर रशियाकरितां कोड बनविण्यास तो अगदीं तयार होता; पण जुन्या ऐतिहासिक साहित्याचा हा द्वेष्टा असल्यामुळें त्याचें जरी कोड तयार असतें तरी तें अगदीं नापसंत ठरलें असतें. ब्लॅकस्टोनचा टीकाकार ह्या नात्यानें त्यानें बरेंच काम बजाविलें. कायद्यांत सुधारणा तर अवश्य पाहिजे होती व तीहि मूळापासून पाहिजे होती. कायद्यांत निरुपयोगी पुष्कळ सांठा झाला होता म्हणून त्यांत सुधारणा होणें जरूर होतें. बेन्थॅमनें लोकांच्या मनांत कायद्यांत सुधारणा होण्याविषयीं एक प्रकारची जागृति उत्पन्न केली. रोमिली व ब्रोघामला बेन्थॅमनें उत्तेजन दिलें. १८३२ च्या रिफार्म ॲक्टमुळें राज्यघटनेंत बरीच अदलाबदल घडून आली व त्याच वेळेस खाजगी व फौजदारी कार्यक्रमांत सुधारणा करण्याकरितां बरेच उपाय योजले गेले. अशा रीतीनें मध्ययुगीन काळांतील ज्या गैर महत्त्वाच्या गोष्टी कायद्यांत मिसळल्या होत्या त्या काढून टाकतां आल्या. कायद्यांतील कांहीं शब्दांच्या व्याख्या करण्यासंबंधींची लोकांच्या मनांत आवड उत्पन्न करण्याचें श्रेय जॉन ऑस्टिन (पृ. १८५९) याजकडे आहे. हा गृहस्थ जरी अत्यंत चिकित्सक होता तथापि त्यास इंग्रजी, रोमन अथवा इतर कायदेपद्धतींची अगदीं माहिती नव्हती. ब्लॅकस्टोननें लिहून ठेविलेल्या कायदेपद्धतीचा हळू हळू लोप होत चालला. त्यामुळें इंग्रजी कायदेपंडितांची सुद्धां दिशाभूल होऊं लागली.

१९ वें शतक अर्धें संपल्यानंतर कायदेकानूंत महत्त्वाचे योग्य ते फेरफार करण्यांत आले. १८७५ सालीं नवीन स्थापन झालेल्या वरिष्ठ न्यायकोर्टांतच जुन्या कोर्टांचा अंतर्भाव केला गेला. जुन्या "स्टयाच्यूट लॉ" चें प्रमाण कमी करण्याची खटपट सुरू झाली. त्याचप्रमाणें पार्लमेंटच्या ॲक्टांचें स्वरूप बदलण्याविषयीं प्रयत्न सुरू झाले. पण

"समाज सत्ता" कीं "राजसत्ता" असे प्रश्न जेव्हां उपस्थित झाले तेव्हां पार्लमेंटचें कायद्याच्या बाबतींत दुर्लक्ष होऊं लागलें. 'कामन लॉ' चे कांहीं भाग कोडच्या रूपानें बद्ध झाले. फौजदारी कोडचाहि एक मसुदा तयार करण्यांत आला, पण त्यांत बरींच व्यंगें असल्यामुळें तो लवकरच नामशेष झाला. ब्रिटिश लोकांच्या अंमलाखालीं असलेल्या हिंदुस्थानांतील भागांत व त्याचप्रमाणें अमेरिकेंत कायदेकानूसंबंधीं बराच खटाटोप सुरू झाला. इंग्लंडांतहि कायद्यांतील बराच भाग तसाच पडून होता. तो स्टयाचूट रूपानें बद्ध करण्याचें कोणीहि मनांत आणीत नसे दिवसें दिवस कायदा पार्लमेंटच्या इच्छेवर अवलंबून राहूं लागला. कायद्याच्या ग्रंथांत पुष्कळ सुधारणा झाली. त्यांपैकीं कांहींची रचना तर फारच सुसंबद्ध होती. पण कोणाहि ग्रंथकारास आधुनिक ब्लॅकस्टोन मात्र बनतां आलें नाहीं.

१८६३ सालीं कायद्याचे अहवाल प्रसिद्ध करणारें एक मंडळ (दि कौन्सिल ऑफ रिपोर्टिंग) स्थापन झालें. ह्यांत तीन एक्स ऑफिसिओमेम्बर्स होते व दुसरे दहा मेंबर्स होते. वकिलीचा धंदा करणाऱ्याला व कायद्याच्या विद्यार्थ्याला वर्षाची चार गिनी वर्गणी दिली असतां हाउस ऑफ लार्ड्समधील व इतर वरिष्ठ न्यायकोर्टांतील अहवाल मिळत असत. प्रिव्ही कौन्सिलमधील न्यायकमिटीहि दर महिन्यास एक प्रत प्रसिद्ध करी. हींत साप्ताहिक सूचना, नवीन तऱ्हेचे फैसले व नवीनच जाहीर झालेले नियम दिले असत. ह्याखेरीज वर्गणीदारांनां स्टयाचूटचें एक सूचीपत्र व फैसल्यांचा संग्रह केलेलें एक पुस्तक मिळत असे. १८९२ मध्यें २५ वर्षांत (१८६५—१८९०) झालेल्या खटल्यांचे व स्टयाचूटचें एक डायजेस्ट ( वर्गीकृत—संग्रह ) तयार झालें. १८९१—१९००० पर्यंतचें दुसरेंहि डायजेस्ट तयार झालें व ही पद्धति पुढें अशीच चालू ठेविली गेली.

सोळाव्या व सतराव्या शतकांत लंडनमधील कायद्याच्या विद्यालयांचे उद्योग शिथिल होत चालले. राष्ट्राच्या उत्कर्षामुळें नामांकित ब्यारिस्टरहि सुसंपन्न बनलें व त्यामुळें त्यांचें धंद्याकडे कमी लक्ष लागूं लागलें. विद्यालयांतील जुन्या वकिलांनीं पद्धतवार शिक्षण देण्याचें सोडून दिलें. कायद्याचें शिक्षण देण्याची अलीकडील पद्धत १८५२ सालापासून सुरू होते. त्या सालीं २० न्यायाधिशांचें व कांहीं ब्यारिस्टरांचें एक मंडळ स्थापन झालें. ह्या मंडळाचें काम कायद्याचें शिक्षण देण्याची कोणची पद्धत असावी हें पाहण्याचें होतें. परीक्षेंत पसार झाल्याशिवाय कोणासहि ब्यारिस्टर होतां येत नसे. परीक्षेचा उपयोग दोन प्रकारचा होता; एक तर तीमुळें अभ्यासाचें सामान्य प्रमाण ठरलें गेलें. व दुसरें ज्यांची इच्छा ठरलेल्या अभ्यासापेक्षां जास्त अभ्यास करण्याची होती त्यांनांहि शिक्षण मिळूं लागलें. परीक्षेचे विषय येणेंप्रमाणेंः-(१) रोमन लॉ. (२) कान्स्टिटयूशनल लॉ, व कायद्याचा इतिहास. ( ३ ) पुरावा, काम चालविण्याची पद्धति, एव्हिडेन्स, प्रोसिजर, व फौजदारी कायदा. (४) स्थावर व खाजगी मालमत्ता.(५) इक्विटी व (६) कामन लॉ. कायद्याचें शिक्षण देण्याकरितां ब्यारिस्टर अध्यापकांचीहि नेमणूक करण्यांत आली.

तरी पण एखाद्या धंदा चालविणाऱ्या ब्यारिस्टरचें शिष्यत्व पत्करून त्याच्यापाशीं अभ्यास करण्याची पद्धत कायम होतीच. हल्लींची परीक्षेची पद्धत अंमलांत येण्यापूर्वी विद्यार्थ्यास ज्या ब्यारिस्टरपाशीं अभ्यास केला असेल त्या ब्यारिस्टरचें सर्टिफिकेट घ्यावें लागे. जुन्या पद्धतींपैकीं हल्लीं जर कांहीं अवशिष्ट राहिलें असेल तर तें "मेजवानी झोडणें" हें होय. तीन वर्षांचे चार भाग केले आहेत. त्या प्रत्येक भागांत सहा मेजवान्या असतात. त्यांपैकीं तीन विश्वविद्यालयांतील माणसाकरितां आहेत.

१८२५ त कायद्याचें शिक्षण देणारें मंडळ स्थापन झालें. तोंपर्यंत शिक्षण देणाऱ्या संस्थांना व्यवस्थित स्वरूप नसल्यामुळें सॉलिसिटर लोकांच्या शिक्षणास बराच धक्का पोहोंचला. ह्या मंडळाच्या प्रयत्नामुळें सालिसिटरच्या शिक्षणास बरीच मदत मिळाली. १७२९ सालापासून असें ठरलें होतें कीं सॉलिसिटर होऊं इच्छिणारानीं एखाद्या न्यायाधिशापाशीं परीक्षा दिली पाहिजे. त्या न्यायाधिशाला विद्यार्थ्याची योग्यता ठरविण्याकरितां एक शिलिंग मिळे. त्याचप्रमाणें पांच वर्षेंपर्यंत पहिल्या प्रथम नोकरी करावी लागे. पण लवकरच परीक्षा म्हणजे निव्वळ थोतांड बनलें. शेवटीं ह्या मंडळीच्या अंतःकरणांत सालिसिटरच्या शिक्षणाविषयीं विशेष कळकळ असल्यामुळें लवकरच ( १८३३ मध्यें ) व्याख्यान देणाऱ्या संस्थांची स्थापना झाली. १८३६ मध्यें पद्धतशीर परीक्षा होण्यास सुरवात झाली, व १८६० मध्यें हल्लींची परीक्षेची पद्धत–म्हणजे प्राथमिक परीक्षा, मध्यम परीक्षा व शेवटची परीक्षा--सुरू झाली. ह्यापैकीं शेवटच्या दोन परीक्षा निव्वळ कायद्यासंबंधींच आहेत. शेवटच्या परीक्षेंत साधारणपणें इंग्रजी कायद्याच्या सर्व शाखांचें ज्ञान असावें लागतें.

१८५० पासून आक्सफोर्ड व केंब्रिजमधील विद्यापीठांत कायद्याच्या शिक्षणास उत्तेजन देण्याचा प्रयत्न सुरू आहे. कायद्याच्या विषयांवर व्याख्यान देण्याचा ठरलेला क्रम कायद्याच्या सामान्य तत्त्वांचें उत्तम ज्ञान करून देण्याकरितां व त्याचप्रमाणें अर्वाचीन इंग्रजी कायद्याची माहिती करून देण्याकरितां फार उपयुक्त आहे असें मानितात. ह्या व्याख्यानांत ज्युरिस प्रूडेन्स, रोमनलॉ, कान्स्टिटयूशनल लॉ, त्याचप्रमाणें स्थावर व खासगी मालमत्तेसंबंधींचा कायदा, कराराचा कायदा, अपकृत्यांचा कायदा, पुराव्याचा व काम चालविण्याच्या पद्धतीचा फौजदारी कायदा, हे शिकविले जातात; पण कायद्यांच्या शाळांत निव्वळ पाठशालोपयोगी शिक्षण मिळाल्यामुळें व व्यवहारास अनुलक्षून असलेल्या गोष्टी न शिकविल्या गेल्यामुळें व त्याचप्रमाणें विद्यालयें

न्यायकोर्टापासून बरेंच लांब असल्यामुळें विद्यालयास बरेंच नुकसान पोहोंचलें आहे. मँचेस्टर व लिव्हरपूलमध्येंहि थोडक्या प्रमाणावर कायद्याचें शिक्षण दिलें जातें. लंडनमधील विश्वविद्यालयांनीं कायद्याच्या शिक्षणास बरेंच उत्तेजन दिलें आहे. त्या युनिव्हर्सिटींतून पदवी मिळविण्यास कायद्याचें ज्ञान अधिक मोठ्या प्रमाणांत लागतें.

[सं द र्भ ग्रं थ—डिग्बी–हिस्ट्री ऑफ दि लॉ ऑफ रीयल प्रॉपर्टी; होल्म्स– दि कॉमन लॉ ( बोस्टन १८८१); हॅलम –कॉन्स्टिटयूशनल हिस्ट्री ऑफ दि इंग्लिश लॉ,(१९०३ -९); हाल्डस्वर्थ—हिस्ट्री ऑफ दि इंग्लिश लॉ. १९०३–१९०९; रीव्हज–हिस्ट्री ऑफ इंग्लिश लॉ (१८६९); मॅडॅक्स–हिस्ट्री अँड अँटिक्विटीज ऑफ दि एक्सचेकर (१७६९ ) मेटलंड हिस्ट्री ऑफ इंग्लिश लॉ, २ भाग(१८९८); ब्रूनर दि सोर्सेस ऑफ लॉ ऑफ इंग्लंड (१८८८) भाषांतरकार, डब्ल्यू हेस्ट्री; सर विल्सन–हिस्ट्री ऑफ मॉडर्न इंग्लिश लॉ ( १८६५ ); डायसी लॉ अँड पब्लिक ओपीनियन इन इंग्लंड (१९०५); स्टीफन हिस्ट्री ऑफ दि क्रिमिनल लॉ ऑफ इंग्लंड ( तीन भाग १८८३), स्टब्स सिलेक्ट–चार्टर्स, कान्स्टिटयूशनल हिस्ट्री;]

**इंग्लिश बाजार**--बंगाल मधील माल्डा जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. ह्यांत बऱ्याच व्यापारी खेड्यांचा समावेश होतो. हें ईस्टर्न बेंगॉल रेल्वेवरच्या माल्डा स्टेशनापासून दीड मैलावर आहे. लो. सं.१९०१ मध्यें. १३६६७ होती. १६७६ मध्यें येथें ईस्ट इंडिया कंपनीनें रेशमाची वखार उघडली होती. तसेंच येथें डच व फ्रेंच लोकांच्याहि वसाहती होत्या. ह्या गांवास अद्याप अंग्रेजाबाद म्हणतात. येथें धान्याचा मोठा व्यापार चालतो. म्युनिसिपालिटी १८६९ त स्थापना झाली. [इं. गॅ.]

**इचलकरंजी**, सं स्था न.—हें संस्थान उ. अ. १६°४१, आणि १६° ५०' व पू. रे. ७४° ३१' आणि ७४° ५०' यांमध्यें वसलेलें आहे. हें कोल्हापूरच्या राजाच्या ताब्यांतील एक मांडलिक संस्थान आहे. या संस्थानची राजधानी इचलकरंजी हें गांव असून या राजधानीच्या नांवापासूनच ' इचलकरंजी ' हें नांव संस्थानाला प्राप्त झालें आहे. संस्थानचें क्षेत्रफळ २४० चौ. मैल. लोकसंख्या सुमारें ६०००० व उत्पन्न सवातीन लाखांचें आहे.

इतिहास—इचलकरंजी संस्थानचा मूळ संस्थापक नारो महादेव हा होय. सतराव्या शतकाच्या उत्तरार्धांत जीं कित्येक कोंकणस्थांचीं घराणीं, आपलें नशीब काढण्याकरितां घांटावर आलीं, त्यांतच रत्नागिरी जिल्ह्यांतील वरवडेकर जोशांच्या घराण्याचा समावेश होतो. नारो महादेवांचे वडील महादेवपंत हे सावंतवाडी संस्थानांतील म्हापण गांवच्या कुलकर्णीपणाचें काम करीत होते. नारोपंत हे अवघे चार पांच वर्षांचे असतांना, महादजीपंत निवर्तले. त्यामुळें महादजीपंतांची बायको गंगाबाई ही आपल्या मुलाला घेऊन उदरनिर्वाह करण्याकरितां घाटावर बहिरेवाडी येथें आली. प्रसिद्ध मराठा सेनापति संताजी घोरपडे याचें हें रहाण्याचें ठिकाण होतें. या ठिकाणीं असतांना नारोपंतांच्या अंगचे विलक्षण गुण संताजीच्या नजरेस पडल्यामुळें संताजीनें त्यास आपल्या दिमतीस ठेवलें व लिहिणें वाचणें, घोड्यावर बसणें, निशाण मारणें इत्यादि त्या काळची सर्व विद्या शिकविण्याची व्यवस्था लावून दिली.

राजारामाच्या कारकीर्दीत संताजीराव हे सेनापति असल्यानें त्यांना नेहमीं स्वारीवर असणें भाग पडे. संताजीरावांनीं राजाराम महाराजांच्या कारकीर्दीत महाराष्ट्राचें स्वातंत्र्य राखण्यासाठीं जे असाधारण पराक्रम केले, ज्या अचाट मसलती केल्या त्यांत नारोपंतांनीं बहुमोल मदत केली. नारोपंतावर संताजीची बहाल मर्जी होती व नारोपंताचीहि संताजीवर अतिशय भक्ति असे; ती इतकी कीं, नारोपंतांनीं आपलें मूळचें जोशी हें आडनांव बदललें व आपल्या धन्याचें–संताजीचें–घोरपडे हें आडनांव धारण केलें. अद्यापिहि, नारोपंताचे वंशज ' घोरपडे ' हेंच आडनांव अभिमानपूर्वक आपल्या पुढें लावतात.

संताजीराव घोरपडे यांनीं नारोपंत यास मिरजप्रांताच्या देशमुखीसरदेशमुखीची वहिवाट दिली होती; व इचलकरंजी व अजरें हे गांव इनाम दिले होते. पुढें संताजीराव घोरपडे १६९८ सालीं वारले. त्यानंतर दहा पंधरा वर्षे निरनिराळ्या मसलतींत नारोपंत यांनीं आपलें लक्ष घालून चांगलेंच नांव कमावलें. नारोपंतांचा मुलगा व्यंकटराव याला बाळाजी विश्वनाथ यांनीं आपली मुलगी अनुबाई दिली; त्यामुळें खुद्द पेशव्यांच्या घराण्याशीं नारोपंताच्या घराण्याचा शरीरसंबंध जडला, व त्यामुळें नारोपंतांनीं स्थापलेल्या इचलकरंजी संस्थानाला चांगले भाग्याचे दिवस प्राप्त झाले ('अनुबाई घोरपडे' पहा ).

नारोपंताच्या मागाहून त्यांचे चिरंजीव व्यंकटराव घोरपडे यांनाहि संताजीराव घोरपडे यांच्या वंशजांनीं, मिरजेची देशमुखी सरदेशमुखी वगैरे सर्व हक्क देऊं केले. पण व्यंकटराव एवढ्यावर संतुष्ट राहिले नाहींत. पोर्तुगीज लोकाशीं मराठ्यांच्या ज्या लढाया झाल्या त्यांत व्यंकटरावांनीं चांगलें नांव मिळविलें व पुष्कळ मुलूख काबीज केला, त्यामुळें शाहूमहाराज खूष होऊन त्यांनीं व्यंकटरावांनां ' स्वतंत्र' सरदारी दिली. व्यंकटरावांनींच इचलकरंजीचा किल्ला आपल्या कारकीर्दीत बांधला व तें आपल्या राजधानीचें गांव ठरविलें.

व्यंकटरावानंतर त्यांचे चिरंजीव नारायणराव यांची कारकीर्द झाली. या कारकीर्दीत इचलकरंजी संस्थानची अतिशयच भरभराट झाली. नानासाहेब पेशव्यांनीं व भाऊसाहेबांनीं दाक्षिणेंत ज्या मुलुखगिऱ्या केल्या त्या सर्व प्रसंगी, नारायणराव हे जातीनें हजर होते, त्यांत त्यांनीं चांगला पराक्रम गाजविल्यामुळें धारवाडची सुभेदारी त्यांनां मिळाली. हे १७७० सालीं वारले.

नारायणरावाच्या मागून त्यांचे ज्येष्ठ पुत्र व्यंकटराव यांनीं संस्थानचा राज्यकारभार हांकण्याला सुरवात केली. हे शूर असल्याकारणानें, हरिपंत फडके यांच्या गुजराथवरील स्वारींत व इतर अनेक स्वाऱ्यांत त्यांनीं प्रामुख्यानें भाग घेतला. पण हे परमुलुखांत स्वारीवर असतांना इचलकरंजी संस्थानला कोल्हापूरकरांकडून उपद्रव होऊं लागला. करवीरकरांनी इचलकरंजी संस्थानावर स्वारी केली पण शेवटीं पेशवे व करवीरकर यांच्या दरम्यान पुरंदर येथें तह होऊन,इचलकरंजीकरांचे सर्व गाव त्यांनां परत मिळाले. व्यंकटराव हे फार दुर्व्यसनी होते. त्यांनीं आपल्या कारकीर्दींत संस्थान अगदीं कर्जबाजारी करून टाकिलें. हे १७९५ सालीं वारले. यांनां पुत्रसंतान नसल्यामुळें त्यांच्या मृत्यूनंतर त्यांची बायको रमाबाई हिनें, पेशव्यांच्या संमतीनें नारायणराव बाबासाहेब यास दत्तक घेतलें.

नारायणराव बाबासाहेब ज्या वेळीं गादीवर बसले त्या वेळीं इचलकरंजी संस्थानची स्थिति समाधानकारक नव्हती. करवीरकरांचें व इचलकरंजीकरांचें वैमनस्य असल्यामुळें करवीरकर, इचलकरंजीकरांनां नेहमीं त्रास देत असत. पण पुढें १८२७ मध्यें ब्रिटिश सरकारच्या मध्यस्थीनें या दोन्ही संस्थानांत तह घडून आला व इचलकरंजीकरांनां पूर्वीचा सर्व मुलुख मिळाला. नारायणराव हे चांगले लढवय्ये होते. त्यांनीं खर्ड्यांच्या लढाईत पेशवे सरकारला चांगली मदत केली होती. ते दृढनिश्चयी व धोरणी होते. विपत्तीच्या स्थितींतहि त्यांनीं आपल्या कर्तबगारीची पराकाष्ठा करून इचलकरंजी संस्थानाचें रक्षण केलें, ही गोष्ट सर्वसंमत आहे. हे सन १८२७ सालीं वारले. त्यांनां दोन मुलगे व पांच मुली अशीं एकंदर सात अपत्यें होतीं.

नारायणरावांच्या मागून त्यांचे ज्येष्ठ पुत्र व्यंकटराव गादीवर बसले. त्यांनां पुत्रसंतान नव्हतें. हे इ. स. १८३८ त निवर्तले. त्यांच्या मागून त्यांचे धाकटे बंधु केशवराव तात्या हे संस्थानचे मालक झाले. यांच्या अमदानींत, इचलकरंजी संस्थानचा दर्जा खरोखर काय आहे याचा निकाल लागला. इचलकरंजी संस्थान हें करवीरकर छत्रपतींच्या ताब्यांतलें आहे असें इंग्रजसरकारनें ठरविलें. अशा रीतीनें करवीरकरांचे ताबेदार होऊन राहण्यापेक्षां, संस्थानच्या उत्पन्नास रामराम ठोकून काशीस जाण्याचें तात्यासाहेबांनीं ठरविलें. पण सरकारचे त्यावेळचे पोलिटिकल खात्याचे अधिकारी यांनीं ' कोल्हापूरकर महाराजांची ताबेदारी नुसती नांवाची आहे त्यामुळें महाराजांचा व तुमचा प्रत्यक्ष संबंध येत नाहीं व तुमचा दर्जाहि कमी होत नाहीं' असें सांगितल्यावरून शेवटीं तात्यासाहेब पुन्हां संस्थानचा कारभार पाहूं लागले. याचेवेळीं सरकारकडून असेंहि आश्वासन देण्यांत आलें होतें कीं ' इचलकरंजीकर यांस कारणपरत्वें दत्तकाविषयीं तजवीज करणें झाल्यास, सरकार त्याचा विचार करील आणि हुकूम देणें तो कोल्हापूर प्रांताची तशीच दक्षिण महाराष्ट्रदेशाची अशा प्रकारणीं जी वहिवाट असेल तीस अनुसरून सरकारास वाजवी वाटेल तेंच करील. केशवराव तात्या हे इ. स १८५२ मध्यें वारले. त्यांना पुत्रसंतान नसल्यामुळें, तात्यासाहेबाच्या मातोश्री गंगाबाई व पत्नी यशोदाबाई यांनीं दत्तक घेण्याबद्दलची परवानगी सरकारकडे मागितली व सरकारच्या परवानगीनें १८५३ सालीं यशोदाबाईनी, विसाजीपंत हुपरीकर यांचा मुलगा दत्तक घेतला व त्याचें नाव व्यंकटराव ठेवलें. पण व्यंकटराव हे एकदोन वर्षांतच वारले. आणि पुन्हा दुसरा दत्तक देण्याची पाळी आली. यावेळीं सरकारनें पुष्कळ अडचणी आणल्या. पण सरतेशेवटीं दत्तक घेण्याची परवानगी देण्यात आली. नंतर विश्वनाथराव हुपरीकर (तासगांवकर) याचा मुलगा दत्तक घेण्यात आला. पण १६।१७ महिनें या दत्तक मुलानें (गोविंदराव आबासाहेबानीं) राज्यकारभार पाहिला नाहीं तोंच त्याचें आकस्मिक देहावसान झालें. पुढें थोड्या दिवसांनीं आबासाहेबाची बायको पद्मावतीबाई यानीं हल्लीचे संस्थानाधिपति नारायणराव बाबासाहेब यास दत्तक घेतलें. यांचें प्रवेशपरीक्षेपर्यंतचें शिक्षण राजाराम हायस्कुलांत होऊन नारायणराव हे १८८८ त प्रवेशपरीक्षा पसार झाले. पुढें त्यांनीं राजाराम कॉलेजमध्यें व विल्सन कॉलेजमध्यें, एलएल् बी पर्यंतचा अभ्यास केला. १८९२ सालीं याना संस्थानची अखत्यारी देण्यात आली. यांचा विवाह १८८६ सालीं झाला. हे विद्यासंपन्न व जिज्ञासू असल्यामुळें, संस्थानांत चांगल्या सुधारणा घडवून आणण्याकडे यांचें नेहमीं लक्ष असतें. यांना सार्वजनिक कामाची फार हौस आहे. दक्षिणेंतील इनामदार व सरदार यांच्या तर्फेनें हे १४।१५ वर्षे कायदेकौन्सिलमध्यें. निवडून आले होते. यांनां प्रवासाचा नाद असून त्यांनीं जगाच्या निरनिराळ्या भागांत प्रवास केला आहे. हे स्वभावानें उत्साही असून यांची राहणी अगदीं साधी आहे. महायुद्धामध्यें यांनीं सरकारास शक्य तितकी मदत केली. यांनां पुत्रसंतान नसल्यामुळें यांनीं आपल्या पुतण्यास दत्तक घेतलें आहे.

इचलकरंजीकरांचा सविस्तर इतिहास 'घोरपडे–इचलकरंजीकर' या लेखांत पहा.

श ह र.— इचलकरंजी संस्थानचें हें राजधानीचें शहर आहे. सदर्नमराठा रेल्वेच्या मिरज–कोल्हापूर या फांट्यावर असलेल्या हातकलंगडे स्टेशनवर उतरून इचलकरंजीला जावें लागतें. ह्या शहराची लोकसंख्या सन १९०१ सालीं १२९२० होती. ह्या शहरचा राज्यकारभार एखाद्या म्युनिसिपालिटीच्या कारभाराप्रमाणें चालतो व त्याचें उत्पन्न ४५९० रुपये सन १९०३–०४ सालीं होतें. ह्या शहराची हवा निरोगी आहे पण येथील पाणी मचूळ आहे. पिण्याचें पाणी पंचगंगा नदीपासून लोखंडी नळ बांधून आणलें आहे. दरवर्षी नवरात्रांत

संस्थानची कुलदेवता श्री व्यंकटेश ह्याच्या नांवानें मोठी जत्रा भरते व त्या जत्रेला सुमारें २००० लोक येतात. गांवांत शाळा, लायब्ररी, क्लब, इस्पितळ, नाटकगृह व गिरण्या आहेत. मुसुलमानी पद्धतीचे मनोरे असलेला राजवाडा प्रेक्षणीय आहे. याच्या सभोंवार रुंद मातीचा तट आहे.

[संदर्भ ग्रंथः—वासुदेवशास्त्री खरे यांनीं इचलकरंजी संस्थानचा इतिहास जो निवडक पत्रांसहित प्रसिद्ध केला आहे ( पुणें आर्यभूषण प्रेस, १९१३ ) तो सविस्तर व विश्वसनीय आहे. याखेरीज ऐ. ले. सं., रा. खं, काव्येतिहाससंग्रह, इतिहाससंग्रह, भारतवर्ष, हे ग्रंथ मराठ्यांच्या वास्तविक इतिहासावर प्रकाश पाडतात. डफ, फॉरेस्ट ग्रॅहाम, वेस्ट यांसारख्या इंग्रजी इतिहासकारांची प्रकाशितेंहि उपयुक्त आहेत.]

**इच्छापुरम्**, त ह शी ल.—मद्रास इलाख्यांत गंजम जिल्ह्यांत ही जमीनदारी ( तहशील ) आहे. हिचें क्षेत्रफळ ३०० चौरस मैल आहे व लोकसंख्या १९११ सालीं ९०८४९होती. ह्या तहशिलीचें मुख्य ठिकाण इच्छापुरम् शहर आहे. त्या शहराची लो. सं. ( १९११) ९२५२ शहरांत कांहीं मोडक्या मशिदी आहेत व ह्यांपैकीं एका मशिदींत प्रार्थना करण्याकरितां महंमद पैगंबराचे अनुयायी दूर देशांहून येतात [ इं. गॅ. ].

**इच्छामतीः**—( १ ) बंगालमध्यें असलेल्या पावना जिल्ह्यामध्यें ही नदी आहे. ह्या नदीस गंगेपासून पाणी मिळतें. ही पबना शहरांतून वाहत जाते व हुरासागर नदीला मिळते. ही नदी ८ महिने कोरडी असते पण वर्षा ऋतूंमध्यें हिचा प्रवाह रुंद व प्रेक्षणीय असतो [ इं. गॅ. ].

( २ ) ह्याच नावाची दुसरी नदी बंगालमध्यें नडियाद जिल्ह्यामध्यें आहे. ह्या जिल्ह्यात ही नदी माताभांग ह्या नदीची शाखा आहे. ही दक्षिण बाजूला वहात जाऊन चोवीस परगण्यांत शिरते व तेथें तिला यमुना हें नांव मिळतें. ह्या नदीचें पाणी फार खोल असून सर्व वर्षभर तिच्यांतून मोठमोठ्या जहाजांनां मोकळेपणें जातां येतें. [ इं. गॅ. ].

( ३ ) ह्याच नांवाची तिसरी नदी डाका मधून जाते व मुनशीगंजाजवळ मेघना नदीला जाऊन मिळते. ऐतिहासिक कालापासून ह्या नदीला महत्त्व आहे व तिच्या तीरांवर पांच पवित्र घांट आहेत. कार्तिकी पौर्णिमेला ह्या नदीवर स्नान करण्यास पुष्कळ लोक येतात [ इं. गॅ ].

**इच्छावर**.—हें शहर भोपाळ संस्थानांत आहे. याच ठिकाणीं पूर्वी लक्ष्मीपूर होतें. या ठिकाणीं मराठे लोकांनीं एक मोठा किल्ला बांधिला होता. १८१८ सालीं हें शहर भोपाल संस्थानांत सामील केलें गेलें. इच्छावर नांवाची पूर्वी एक तहशील होती व त्या ठिकाणीं फ्रान्समधील चवथ्या हेनरीचा चुलत भाऊ जांन फिलिपी राज्य करीत होता. हा प्रथम हिंदुस्थानांत आल्यावर अकबर बादशहाच्या नोकरीस राहिला व त्याच्या ख्रिस्ती बायकोच्या जूलिआनी नांवाच्या बहीणीशीं त्यानें लग्न लावलें व इच्छापूर तहशीलीचा नवाब झाला. याच्या वंशजांवर पुढें अनेक वाईट प्रसंग आले. नादिरशहाच्या स्वारीमुळें त्याच्या वंशजांनां हें शहर सोडावें लागलें व शेरगडला जावें लागलें. तेथेंहि नरवारच्या राजानें फार त्रास दिल्यामुळें शेवटीं ग्वाल्हेरला त्या मंडळीला जावें लागलें. पण मेजर पोफॅमनें जेव्हां ग्वाल्हेर घेतलें तेव्हां इंग्रज सरकारनें थोडा मुलूख या घराण्यास दिला. या घराण्याचे वंशज अजून हयात आहेत [ इं. गॅ. ].

**इंजाराम**—( मद्रास ) गोदावरी जिल्हा. कोकोनाडा तालुक्यांतील एक खेडेगांव. सन १७०८ सालीं ईस्ट इंडिया कंपनीनें येथें एक वखार उघडलेली होती. पुढें हें शहर तलम कापडाबद्दल प्रसिद्धीला आलें. हें १७५७ मध्यें फ्रेंच लोकांनीं काबीज केलें पण दोन वर्षांनीं इंग्रज लोकांनीं पुन्हां तें परत मिळविलें. १८२९ सालापर्यंत तें व्यापारी शहर म्हणून प्रसिद्ध होतें [ इं. गॅ. ].

**इंझवार**—भंडारा व बालाघाट जिल्ह्यांतील एक जात. वैन गंगेच्या खोऱ्यांत राहून शेतकी कामावर व मासे मारून उपजीविका करणारी ही जात आहे. यांची संख्या ११००० आहे.

विंझवार याचें नामांतर इंझवार असें होऊन ही निराळी जात बनली. यांनीं आतां मराठी चालीरिती उचलल्या आहेत. तथापि हे इंझा म्हणजे विंध्यावासिनी देवी हिची पूजा करतात. हे गोवाऱ्यास आपले दूधभाई म्हणतात. कारण इंझवारीण एकदां गोवाऱ्यास दूध पाजणारी दाई होती. पण या कथेचा अर्थ बहुतेक यांच्यांत गोवारी रक्ताचें मिश्रण झालें असावें असाच करतां येईल. इंझवार लोक गोवाऱ्यांस श्रेष्ठ समजतात. त्याच्या हातचें जेवतात, व पाणी पितात. पण गोवारी यांच्याकडे जेवीत नाहींत. यांची जात गोंड, गोवारी व बैगा लोकांच्या मिश्रणानें तयार झाली आहे.

यांच्यांत लांजीवार, कोंर्द, व चंदेवार अशा उपजाती आहेत. झोनझार लोकांपैकीं कांहींचीं कुलनांवें गोंड लोकांतुन घेतलीं आहेत जसेंः—मेसराम, टेकाम, मरइ डक्या. पीठवल्या नांवाचीं जीं कुळें आहेत त्यांनीं दुसऱ्याच्या शेतांतून थोडे तरी तांदूळ चोरून आणून शिजवून देवास नैवेद्य दाखवून स्वतः खाईपर्यंत कोणाशीं बोलतां कामा नये. पौनपत लोक कमळें उगवतात त्या तळ्याचें पाणी पीत नाहींत. दोवकरिया लोक देवास बकरीं बळी देतात. सोनवाणी कुळाचे मूगफाटिया व गुढीवाल असे दोन वर्ग आहेत. यांच्यांत परस्पर विवाह सध्यां बंद आहेत. यांच्या विवाहपद्धती मराठी चालीच्या आहेत. दोघा भावांचीं लग्नें दोन बहिणीबरोबर होत नाहींत. लग्नें बहुधां प्रौढपणीं करतात. मागणी करण्याकरितां आलेल्या माणसाचे पाय धुवून मुलीचा

बाप वाग्निश्चय करतो. वधूशुल्क २० रुपये आहे पण जर वर विधुर असला तर जास्त शुल्क घेतात. रंगीत अक्षता टाकून लग्नें होतात. जर विधवेबरोबर कुमाराचा विवाह होत असला तर प्रथम त्याचा विवाह रुईच्या झाडा बरोबर करतात. हे लोक बहुधां प्रेतें पुरतात. व रात्रीं कणीक पसरून त्यावर ज्या प्राण्याचा काल्पनिक किंवा खरा पाय उमटला असेल त्यावरून त्याचा जन्म ठरल्यावर मग उत्तरकार्य करितात. अक्षय्यतृतीयेला व कार्तिकांत पितृतर्पण करितात. पुरुषांकरितां मोठें व बायकाकरितां लहान पाण्याचें मडकें भरून ठेवतात. व त्याच्या समोर एक दिवा ठेवतात व पुरुष पूर्वजांकरितां माळी व स्त्रियाकरितां माळीण जेऊं घालतात.

यांचा धंदा शेतावर मजुरी करण्याचा आहे. चंदेवार स्त्रिया सुइणीचा धंदा करितात. यांचा दर्जा फार नीच आहे. हे मगर, सर्प वगैरे (गाईचें सोडून) वाटेल त्याचें मांस खातात. ब्राह्मण माळी व गोवारी यांस हे जातींत घेतात; मग तो पुरुष असो अथवा स्त्री असो सर्वांचा क्षौर करून त्याच्याकडून जातीभोजन घेऊन जातींत सामील करतात [ इं. गॅ. ]

**इझावा**—त्रावणकोर संस्थानांतील एक जात. लो. सं. (१९११) ५४६२६५. संस्थानच्या दुसऱ्या कांहीं भागांत यांना चोवा असें म्हणतात. तामिळी बोलणारे शानार व ब्रिटिश मलबारांतील तिया यांच्यांशीं या जातीचा संबंध असावा असें मानतात. ही जात सिंहलद्वीपांतून इकडे आली असावी. इझाम हा सिंहलम् शब्दाचा अपभ्रंश असून इझाम बेटांतील लोक ते इझावा असें कांहीं भाषाशास्त्रज्ञ मानितात. डॉ. काल्डवेलहि ही जात बाह्य देशांतली असेंच मानतो. मध्ययुगांत त्रावणकोरचे राजे नायरप्रमाणें इझावांनांहि लष्करी कामें सांगत. यांचे तीन वर्ग पाडतां येतील. (१) पांडी किंवा तामिळी जिल्ह्यांतील इझावा, (२) मलयालम इझावा किंवा चोवा व (३) ब्रिटिश मलबारचे तिया. श्रीमंत व मध्यम स्थितींतील इझावा पुरुष नीटनेटके व सुस्वरूप असून जवळ जवळ नायरांसारखेच दिसतात. बायका मात्र वेगळ्या दिसतात. इतर मलबारांतील मूळ रहिवाशांप्रमाणें इझावांत वारसा मरुमक्कत्तायमप्रमाणें स्त्रीवंशाकडे येतो. नारळीचीं व ताडीचीं झाडें लावणें व दारू गाळणें हा यांचा मुख्य धंदा आहे. बायका पुरुषांच्या बरोबरीनें कामें करितात. मास्तरकी, वैद्यकी व जोसकी पेशाचेहि इझावा आहेत. संस्कृत भाषेचें अध्ययन करणारेहि बरेच आहेत.

त्रावणकोरमधील अति पुराणप्रिय हिंदुसमाजापैकीं इझावा ही एक जात आहे. पुष्कळ ठिकाणीं यांचीं स्वतःचीं देवळें असून तेथील उपाध्यायहि इझावाच असतात. यांची उपास्य देवता बहुधा भद्रकाली असते. शास्ता, वीरभद्र व माता यांनांहि नैवेद्य दाखविला जातो. भद्रकालीला प्राणिबली द्यावा लागतो अशा समजुतीनें कित्येक देवळांतून तिच्या ऐवजीं सुब्रह्मण्याची स्थापना करण्यांत येते.

मुलगी वयांत आली म्हणजे मंगळसूत्र (तालि) बांधण्याचा समारंभ नायर लोकांतल्या प्रमाणेंच होतो. ज्यांनीं ताली बांधिली असेल तोच नवरा करावयाचा असें बहुधां होत नाहीं. खरें लग्न वस्त्रदानसमारंभ झाला म्हणजे होतें. इझावती ही इझावांच्या न्हाव्यांची जात असून धार्मिक संस्कारांत त्यांचा भाग असतो. उदाहरणार्थ इझावती स्त्री इझावांच्या लग्नांत नवरीच्या मनगटाभोंवती 'प्रतिसरम्' बांधते व नवऱ्याच्या हातीं ताली देते. वस्त्रदानाच्या (लग्नाच्या) वेळीं नवरीकडच्या मंडळीनां ऐपतीप्रमाणें हुंडा द्यावा लागतो. नायरांप्रमाणें इझावांत घटस्फोट वाटेल तेव्हां करितां येतो, यांच्यांत मृतांनां जाळतात व कधीं कधीं पुरतातहि.

[ संदर्भ ग्रंथ.—रिस्ले—एथ्नॉग्रॉफिक ॲपेन्डायसेस (सेन्सस ऑफ इंडिया १९०१ पु. १), त्रावणकोर सेन्सस रिपोर्ट १९११ ].

**इंटर्लेकन**—(१) (यूरोप–स्वित्झर्लंड) बर्न विभागांत आर नदीच्या काठीं सपाट मैदानावर हें शहर वसलें असून समुद्रसपाटीपासून याची उंची १८६४ फूट आहे. हें ११३० मध्यें अस्तित्वांत आलें. येथें अलीकडे बांधलेला एक किल्ला आहे. या किल्ल्यांत स्थानिक सरकारची कचेरी भरते. या शहरीं उन्हाळ्यांत पुष्कळ सुखवस्तू प्रवासी सहल करण्याच्या उद्देशानें जमतात, कारण येथून ग्रँट व ग्रींडेलवाल्ड वगैरे गांवास जाण्याकरितां फांटे फुटले आहेत. १९०० सालीं येथील लोकसंख्या २९६२ होती. येथील बहुतेक लोक प्रॉटेस्टंट पंथाचे असून जर्मन भाषा बोलतात [ ए. ब्रि. ].

(२) अमेरिकेंत न्यूयार्क संस्थानांत इथका व जिनीव्हा रस्त्यावरील एक गांव. याचें जुनें नांव फारमर, पण चालू पिढींतील तरुणांनीं गांवठी नांव काढून टाकून इंटरलेकन हें नांव दिलें. सेनका व केयूगा या दोन सरोवरांच्या मध्यें हें असल्यामुळें या नांवास सार्थकता आहे.

**इटली**—इटली द्वीपकल्पाच्या पूर्वेस ॲड्रिआटिक समुद्र, पश्चिमेस व दक्षिणेस तिऱ्हेनिअन समुद्र आणि उत्तरेस आल्प्स पर्वत असून हें उत्तर अ. ४६° ४०' ते ३८° ३८' आणि ६° ३०' ते १८°३० पूर्वरेखांशांच्या मध्यावर आहे. या द्वीपकल्पाचें क्षेत्रफळ १,१०,६६४ चौरस मैल आहे. ॲपेनाइन पर्वतानें इटलीचे उत्तर व दक्षिण असे दोन भाग केले आहेत.

**उत्तर इटली.**—या भागांतील प्रसिद्ध पो नदी ४५० मैल लांब व ४०० ते ६०० यार्ड रुंद असून तिला पुष्कळ उपनद्या मिळतात. याखेरीज या भागांत नऊ नद्या आहेत. नदीचा गाळ व रेती समुद्रसपाटीवर आल्यानें मधून मधून खाऱ्या पाण्याचे लहान लहान तलाव झाले आहेत व अशाच

एका तला ंत व्हेनिस शहर वसलें आहे.मॅरेटाइम, आल्पस्, ॲपेनाइन आणि समुद्र यांच्यामधील रिव्हीएरा नांवाचा प्रदेश सुपीक आहे व येथें हिंवाळ्यांत श्रीमंत लोक येऊन रहातात. जिनोआ व स्पेटझच्या आखातामधील प्रदेशांत असणाऱ्या सर्व नद्यांत शिआव्हेरा नदी मोठी आहे. ॲपेनाइन पर्वताचें या भागांतील सर्वांत उंच शिखर ७१०३ फूट असून यावर चेस्टनट व ओक या झाडांचीं जंगलें आहेत.

मध्य इटली.—ॲपेनाइन पर्वताचा सर्वांत उंच भाग ९५६० फूट आहे. आल्टरनी आणि गिझीओ या नद्यांच्या कांठावर व मुख्य पर्वतापासून निराळ्या असणाऱ्या दोन पर्वतांवर नोव्हेंबरपासून मेपर्यंत बर्फ असतें. या पर्वताचा पश्चिमेकडील भाग जरी सुंदर आहे तरी उत्तरइटलीइतका सुपीक नाहीं. करारा पर्वताजवळ संगमरवरी दगडाच्या खाणी आहेत. या भागांतील बहुतेक प्रदेश डोंगराळ असून त्यांत ज्वालामुखी पर्वत, तलाव आणि अर्जिन्टेरो व सरसेली नांवाचे दोन मोठे पर्वत आहेत. या प्रांतांतील प्रसिद्ध नद्या म्हणजे टायबर व आर्नोझा होत. यांना पुष्कळ उपनद्या मिळतात. यांशिवाय अकरा नद्या या भागांत आहेत. ट्रिमो नदी मध्यइटलीच्या सरहद्दीवर आहे. या भागांत द्राक्षें, आलीव्ह व इतर फळझाडें होतात. या प्रांताची मुख्य गैरसोय म्हटली म्हणजे बंदराचा अभाव ही होय.

दक्षिण इटाली.—या प्रांतांत ६० फूट रुंदीचें एक डोंगराळ मैदान, व्हेसुव्हिअस ज्वालामुखी, गारग्यानो नांवाची चुनखडीची टेंकडी, आणि लीरी, व्हटलरनों, व सीली, नांवाच्या तीन प्रमुख नद्या असून शिवाय पांच लहान नद्या आहेत.

सरोवरें.—लॅगो-मॅजीआरी, लॅगो-डीओर्टा, लॅगो-डी कोमो, लॅगो-डीएसीओ, लॅगो-डीइड्रो, आणि लॅगो डी गार्डा हीं प्रसिद्ध सात सरोवरें येथें आहेत. गार्डाचें क्षेत्रफळ १४३ चौरस मैल आहे. कोमो १३६५ फूट खोल आहे. मध्यइटलींत लॅगो-डी तारसीमेनो आणि दक्षिण इटलींत लॅगो-डी मॅटेसी नांवाचीं सरोवरें आहेत.

बेटें.—कॉर्सिका, सार्डिनिया आणि सिसीली या तीन मुख्य बेटांशिवाय एल्बा, कप्रिआ, जिग्लीओ आणि ज्वालामुखीच्या स्फोटामुळें उत्पन्न झालेलीं इतर बेटें येथें आहेत. येथें ज्वालामुखीचे ४ प्रदेश आहेत त्यांपैकीं तीन प्रदेशांतील ज्वालामुखी चालू नाहींत.

हवामान.—इटाली देश ४६° आणि ३८° उत्तर अक्षांशामध्यें असल्यामुळें जरी येथें उष्णता फार आहे तरी दोन्ही बाजूच्या समुद्रामुळें आणि आल्प्सवरील बर्फामुळें ती इतकी भासत नाहीं. येथील हवा अनियमित आहे. उत्तर आणि दक्षिण इटलींतील हवेंत पुष्कळ फरक आहे.

वृक्ष.—नारिंगें, लिंबु, आणि आलिव्ह झाडें येथें होतात. कांटेनिवडुंगाचीं आणि ताडाचीं झाडें येथें होतात. मध्य इटलीची हवा फार थंड असते. बर्फ इतका विपुल पडतो कीं कित्येक खेडीं त्याखालीं बुजलीं जातात आणि वादळें इतक्या जोराचीं असतात कीं कित्येक महिने शेजाऱ्यांना एकमेकाची भेट घेणें शक्य नसतें. ऊंस, नारिंगें, अंजीर, डाळिंब आणि खजूर वगैरे येथें होतात.

प्राणी.—शमाय, बॉकेटीन आणि मारमॉट नांवाच्या एक उंदराच्या जातीचें जनावर हीं हिंदुस्थानांत न आढळणारीं जनावरें येथें दिसतात.

क्षेत्रफळ व लोकसंख्या.—इटली देशाचें क्षेत्रफळ ११०६२३ चौरस मैल असून येथील लोकसंख्या १९२१ सालीं ३ कोटी ८५ लक्ष होती. मिलान, नेपल्स, रोम, पालेर्मो ट्युरिन, जिनोआ, फ्लोरन्स, व्हेनिस वॅकॅटेनिया हीं मुख्य शहरें आहेत. इटालींतील निरनिराळ्या प्रांतांच्या चालीरीती, राहणी वगैरे भिन्न भिन्न आहेत. येथें सक्तीचें लष्करी शिक्षण आहे. येथील लोक खुजे असून त्यांचे केस व डोळे काळे असतात. ते दिसण्यांत फार सुरेख आहेत. येथील स्त्रिया आणि पुरुष लवकर वयांत येण्याचें कारण त्यांना करावें लागणारें शेतकीचे कामें हें होग असें कित्येक समजतात. पण उष्ण हवा हेंच असणें अधिक शक्य आहे. लोकस्थितिदर्शक आंकड्यांवरून असें स्पष्ट दिसतें कीं, जनन आणि विवाहाची संख्या मध्य व दक्षिण इटलींत जास्त असून उत्तर इटलींत फार कमी आहे. मृत्यूचें प्रमाणहि तसेंच आहे. शेतकी, व्यापार कारखाने, खासगी आणि सार्वजनिक नोकऱ्या हे येथील मुख्य धंदे आहेत. यांपैकीं शेतकीचा धंदा करणारे लोक सर्वांत जास्त आहेत. तांदूळ, राई, जवार, कडधान्य, बटाटे आणि सलगम हीं येथें होतात.

तंबाखू, ताग, अंबाडी, कापूस, द्राक्षें, द्राक्षाची दारू, आलिव्ह, आलिव्हतेल, नारिंगें, लिंबू आणि सफरचंद हीं येथें होतात. द्राक्षाची दारू विशेष चांगली नसते. सन १९१९ मध्यें६३८००० हेक्टल द्राक्षाची दारू, ८७०००००० बाटल्यांतून परदेशांत पाठवण्यांत आली. आलिव्ह तेलाचा खप देशांतच फार होतो. सन १९१९ मध्यें जवळ जवळ ८६०० हेक्टल आलिव्ह तेल परदेशांत रवाना करण्यांत आलें. इटलीमध्यें फळाची लागवड फार होण्यासारखी आहे. पण तिकडे अद्यापि लोकांचें लक्ष गेलेलें दिसत नाहीं. सन १९१९ मध्यें नारिंग व लिंबें यांचें पीक ६६२५००० क्विंटाल झालें. सफरचंद डाळिंबें वगैरेंचें पीक तयार ४९००००० क्विंटाल झालें. रेशमी कोशांची निपज सन १९२० मध्यें ५०००००० किलोग्रॅम्स झाली. तागाची निपज, ९६०००० क्विंटाल व लोंकरीची निपज ३००००० क्विंटाल झाली. चेस्टनट, ओक, बीच, पाइन, आणि फर झाडांचीं लांकडें इमारतीकरितां उपयोगांत आणलीं जातात. घोडा, गाढव, खेचर, ढोरें, मेंढ्या आणि बकरीं हे पाळीव प्राणी आहेत. पाँडोलिना व्हॉलडिशिना

आणि टायबरीना जातीचीं ढोरें येथें आहेत. येथून गुरें, मेंढ्या, डुकरें परदेशी रवाना होतात.

उत्तरइटलींत पुष्कळ गोरसशाळा ( डेरी ) असून तेथें चक्कादही फार उत्तम तयार होतें. शेतकी संस्थांनीं शेतकीसंबंधीं सुधारणा करण्याकरितां शाळा काढल्या. धान्याच्या आयातीवर कर बसविल्यांमुळें धान्याचें उत्पन्न वाढलें.

रयतवारी अथवा खुद्दकास्तपद्धति ( पेझंट प्रोप्रायटरशिप) येथें बरीच अमलांत आली असून अर्धेल, तिर्धेल वगैरे इतरहि जमीनीचे मालक आणि कुळें यांमध्यें निरनिराळ्या प्रकारचे करार होतात.

धान्यानें व बटाईनें शेती करण्याची पद्धत या देशांत आहे. सिसीलींतील गंधकाच्या; सार्डीनियांतील जस्ताच्या आणि शिशाच्या; एल्बांतील लोखंडाच्या; टस्कनींतील कथिलाच्या, तांब्याच्या, सुरमाधातूच्या आणि पाऱ्याच्या मिळून १८८१ सालीं येथें १५८० खाणी होत्या. १९१७ सालीं ८५८ खाणी चालू असून तीस कोटी लीरी किंमतीचे खनिज पदार्थ काढण्यांत आले. इटलीमध्यें कोळशाच्या खाणी अजीबात नसल्यानें सर्व कोळसा बाहेरून आणावा लागतो. सर्वांत अधिक कोळसा इंग्लंडमधून येतो. १९२० सालामध्यें अठ्ठावीस लक्ष टन कोळसा इटलींत आला. लोखंडाची निपज देखील इटलींत फारच कमी होते; तरी पण लोखंडाची व पोलादाची निपज वाढवण्याचे इटलीनें पुष्कळ प्रयत्न केले. सन १९१९ मध्यें लोखंड व पोलादाची निपज ७३२००० टन झाली.

१९१५ सालीं येथील मासे पकडण्याच्या कामीं २६७२५ नावा होत्या व त्या सालीं२२लाख लायर किंमतीचे मासे पकडले गेले. सिसीली आणि सार्डीनिया येथें पोंवळीं सांपडतात. म्युनिशिआ आणि सिसीली स्पंजाकरितां प्रसिद्ध आहेत, सार्डीनिआ, सिसीली आणि एल्बा मासे पकडण्याच्या ठिकाणाकरितां प्रसिद्ध आहेत.

का र खा ने.—येथील कारखाने जलशक्तीनें चालतात. वर निर्दिष्ट केलेल्या खाणींशिवाय येथें मिठाचे कारखाने आहेत. सर्व प्रकारचीं यंत्रें येथें तयार होतात. लॉंबर्डी, पिडमॉंट आणि व्हेनेशिआ यंत्रानें विणलेल्या रेशमी कापडाकरितां प्रसिद्ध आहेत. लॉंबर्डी, पिडमॉन्ट आणि लिगुरिआ कापसाच्या कारखान्याकरितां प्रसिद्ध आहेत. १९०६ सालीं विणकाम शिकविण्याकरितां येथें एक शाळा उघडण्यांत आली. रसायनद्रव्यांच्या कारखान्याशिवाय मेणबत्त्या आणि साबूचे कारखाने येथें आहेत. येथें आगपेट्यांचेहि कारखाने आहेत. १९०५ सालीं येथील साखरेच्या वखारींत ९३९१६ टन साखर तयार झाली. अलकोहोल आणि सर्व प्रकारचें लांकडी सामान येथें होतें. येथील कागदांच्या कारखान्यांपैकीं एब्रिआनो येथील हातानें कागद तयार करण्याचा कारखाना फार चांगला आहे. येथील तंबाखूचा मक्ता सरकारकडेच आहे. टस्कनी आणि व्हेनिया येथें उत्तम प्रकारचें कांचेचें सामान तयार होतें. हा देश कुलालकलेच्या सामानाकरितां प्रसिद्ध असून हिऱ्यामोत्यांचीं आणि इतर कारागिरीचीं कामें करणारे लोक येथें आहेत. सन १९१९ मध्यें इटलींत १३६७७१६२४५ लीरी इतकी आयात झाली व ६२१९५८५०८८ लीरी निर्गत झाली.

म जु रां ची स्थि ति.—हिंवतापाच्या रोगामुळें आणि गरीबीमुळें येथील शेतकरी मजुरांची स्थिति फार शोचनीय आहे. शहरांतील केलेल्या आरोग्यकारक सुधारणामुळें आणि संघामुळें येथील मजूरांची स्थिति सुधारून १८९३ सालीं समाजसत्तावादी मजूरपक्ष अस्तित्वांत आला. १८९९ मध्यें मजूरमंडळें ( लॉबर्स ऑफ चेंबर ) स्थापन करण्याची चळवळ सुरू झाली. यांचा उद्देश कामगारास शिक्षण देणें, संपाच्या वेळीं मध्यस्थी करणें, मजूरांस काम मिळवून देणें वगैरे असे. अशीं मजूरमंडळें सध्यां इटलींत अनेक शहरांत आढळतात. १८९८ सालीं वृद्ध आणि आजारी मजुरांचा विमा उतरण्याबद्दल कायदा करण्यांत आला व एक फंड गोळा करण्यांत आला. व्यापारधंद्यांतील भानगडी मिटविण्याकरितां लवादसंस्था नेमलेल्या असतात. लॉंबर्डी, व्हेनेशिआ आणि पिडमांट हे प्रांत पेढ्यांकरितां प्रसिद्ध आहेत. मध्य इटलींत सहकारी पतपेढ्या पुष्कळ आहेत. महायुद्ध संपल्यानंतर मजूर लोकांना कामाचा कंटाळा फार वाटूं लागला, व धान्याची महागाई झाल्यामुळें मजूर लोक पगार मागूं लागले. पगार मिळाला नाहीं म्हणून मजुरांनीं संप करण्यास सुरुवात केली. १९२० मध्यें १७८१२३० लोकांनीं संप केला; पण व्यापाराची मंदी झाल्यामुळें मजुरांना सरसहा संपाचा फोलपणा कळून येऊं लागला.

द ळ ण व ळ ण.—१८४० सालीं येथें रेल्वे सुरू होऊन १९२१ सालीं तिचा ११८९५ मैल फैलाव झाला. मिलान हें सर्वांत मुख्य रेल्वेस्टेशन असून टयुरीन, जिनोवा, व्हेरोना, रोम आणि नेपल्स हीं दुसरीं महत्त्वाचीं स्टेशनें आहेत. वाफेच्या आणि विजेच्या ट्रामगाड्या या देशांत आहेत. मध्य आणि उत्तर इटलींत सडका पुष्कळ असून चांगल्या आहेत. लॉंबर्डी, पिडमॉंट आणि व्हेनेशिआ प्रांतांत नाव्य कालवे आहेत. १९१७ सालीं येथें ११२२८ पोस्ट ऑफिसें आणि ८९८० तारआफिसें होतीं. या देशांत टेलिफोन पुष्कळ आहेत. १९०७ पासून ते सरकारी नियंत्रणाखालीं आहेत. १९१७ मध्यें वाफेनें चालणारीं ८४४ व शिडानें चालणारीं ४४६४ जहाजें होतीं.

व्या पा र.—जिनोआ, नेपल्स, पालेर्मो, लेगहॉर्न, मेसिना, व्हेनिस आणि कॅटेनिआ हीं येथील मुख्य बंदरें असून येथील दर्यावरील व्यापार परकीय जहाजांतुन होतो. १९१८सालीं येथील आयात व्यापार ५६४०६५७५७ व निर्यात व्यापार, ९९३४५०२१ पौंड किंमतीचा होता. रेशीम, कापूस व रेशमाचीं वस्त्रें, मद्य, मोटारी, ताग, फळें, टोमॅटोचे पदार्थ, टोप्या गंधक, रबर हे जिन्नस येथून बाहेर जातात व गहूं, कापूस, लोखंड, कातडीं, पेट्रोलिअम, धातू वगैरे जिन्नस बाहेरून येतात.

शि क्ष ण.—दोन दर्जाच्या प्राथमिक शिक्षणाच्या शाळा काम्यूनचे ताब्यांत असून शिक्षण मोफत असतें. दुय्यम शिक्षणाकरितां, उच्च शिक्षणाकरितां व धंदेशिक्षणाकरितां शाळा आणि विद्यापीठें आहेत. शिशुशाळा आणि अर्भकालयें येथें आहेत. या देशांत शेंकडा ४८ लोक अशिक्षित आहेत. १८७७ सालीं ६ वर्षांपासून ९ वर्षांपर्यंतच्या मुलांकरितां सक्तीचें शिक्षण करण्यांत आलें. संध्याकाळच्या आणि सुट्टींत भरणाऱ्या शाळा येथें असून अशिक्षित शिपाई लोकांकरितां येथें शाळा आहेत. व्हेनिस, जिनोआ आणि बारी येथें व्यापारी लोकांकरितां शाळा आहेत. फ्लारेन्स आणि लॉन येथें स्त्रियांकरितां धंदेशिक्षणाच्या शाळा आहेत. शेतकीच्या, शिल्पकलेच्या आणि पशुवैद्यकांच्या शाळा आहेत.

येथें १८३१ वाचनालयें असून बॉरबेरिना वाचनालयांत ३४००० हस्तलेख आहेत. व्हॅटिकन वाचनालयांत सरकारी जुने लेख आहेत. अनाथ, गरीब आणि आजारी लोकांनां मदत करण्याकरितां येथें मोठमोठ्या धर्मादायसंस्था आहेत. याशिवाय प्रांताचे आणि काम्यूनचे अधिकारी धर्मार्थ बराच खर्च करितात.

या देशांतील बहुतेक लोक रोमन कॅथॉलिक पंथाचे आहेत. ग्रीक आणि लॅटिन पंथ येथें प्रचारांत आहेत. रोम हें ख्रिस्ती धर्माचें केंद्रस्थान आहे. १९११ सालीं या देशांत १२३२५३ प्रॉटेस्टन्ट पंथाचे लोक व रोमन कॅथॉलिक ३२९८३६६४ होते. १८५५ सालच्या कायद्यानें इटालीचे धार्मिक दृष्ट्या १३ प्रांत पाडले आहेत. त्याच कायद्यामुळें येथील बरेच मठ उध्वस्त होऊन पुष्कळ महन्तांनां खो मिळाला.

रा ज्य प द्ध ति.—येथें कायद्यानें नियंत्रित अशी राजसत्ता आहे. अंमलबजावणीचा अधिकार केवळ राजाकडे असून तो तो मंत्रिमंडळामार्फत बजावतो. कायदेकानू करण्याचा अधिकार राजा व लोकप्रतिनिधिसभा सहकारितेनें बजावतात. लोकप्रतिनिधिसभा बरखास्त करण्याचा व फिरून बोलावण्याचा अधिकार राजाला आहे. परराष्ट्रांशीं तह करण्याकरितां मात्र लोकप्रतिनिधिसभेची मंजुरी लागते लोकप्रतिनिधिसभेचीं दोन गृहें (चेंबर्स) आहेत.; एक वरिष्ठ सभा, (सीनेट) व दुसरें प्रतिनिधिगृह(चेंबर ऑफ डेप्युटीज) वरिष्ठ सभेचे सभासद तहहयात असून त्यांची नेमणूक राजा स्वतः करतो. २१ वर्षांवरील सर्व साधारण शिकलेल्या व कांहीं विशिष्ट मर्यादेपर्यंत भाडें भरणाऱ्या नागरिकांनां मताधिकार असतो. कांहीं विशिष्ट दर्जाचे सरकारी नोकर खेरीजकरून सरकारी नोकरांनां निवडणुकीला उभें राहतां येत नाहीं. पैशासंबंधीं सारीं बिलें प्रतिनिधिगृहा( चेंबर ऑफ डेप्युटीज ) च्या सभासदांनीं पुढें मांडलीं पाहिजेत. पण दोन्हीं सभागृहें व राजा यांच्या अनुमतीशिवाय तीं पास होऊं शकत नाहींत. प्रत्येक देशांत नोकरशाहीचें धोरण नेहमींच प्रतिगामी स्वरूपाचें असतें, येथील नोकरशाहीवरहि तोच आरोप येत असला तर कांहीं नवल नाहीं. सन १९१९ मध्यें मतदारासंबंधींच्या कायद्यांत दुरुस्ती झाली. इटलींतील लोकांचे ५४ नियोजित समूह पाडून त्यांतर्फे एकंदर ५३५ प्रतिनिधी निवडून येण्याचें ठरविण्यांत आलें.

न्या य खा तें.—येथील न्यायपद्धति फ्रेंच न्यायपद्धतीच्या धर्तीवर आहे. रोम, नेपल्स, पालेर्मो, ट्युरिन आणि फ्लोरेन्स या ठिकाणीं सेशन कोर्टें आहेत. याशिवाय २० अपील-कोर्टें, १६२ ट्रायब्युनल कोर्टें आणि १५३५ मन्डामेन्टि नांवाचीं मॅजिस्ट्रेटांचीं कोर्टें आहेत. १३ मुख्य शहरांतून प्रिटोरी कोर्टें आहेत व त्यांनां फौजदारी न्यायाचा पूर्ण अधिकार आहे.

सै न्य—येथील लष्करी शिक्षणाची पद्धत १८७५ सालीं केलेल्या नियमाप्रमाणेंच चालू आहे, परंतु त्यांत १९०७–१९०८सालीं थोडा महत्त्वाचा फेरबदल करण्यांत आला. लष्करी शिक्षण व नोकरी सक्तीची असून त्याचा एकंदर काल १९वर्षांचा आहे व आरंभ २०वर्षांपासून होतो. लष्करी नोकरीस नवीन लोकांचे तीन भाग करून कांहींस कायम सैन्यांत, कांहींस कायम पण अमर्याद रजेच्या सैन्यांत, व कांहींस, प्रत्यक्ष नोकरीपासून माफी मिळालेल्यास प्रादेशिक संरक्षक सैन्यांत दाखल करतात. ही १९वर्षांची मुदत, २ वर्षें कायम सैन्यांत, पुढें ६ वर्षें अमर्याद रजेच्या सैन्यांत, नंतर ४ वर्षें फिरत्या संरक्षक सैन्यांत ( मोबाइल मिलिशिया ) व अखेरीस ७ वर्षें प्रादेशिक संरक्षक सैन्यांत ( टेरिटोरियल मिलिशिया ) याप्रमाणें वांटलेली आहे. यांतील दुसऱ्या वर्गास २ ते ६ महिने प्रत्यक्ष शिक्षण मिळतें. तिसऱ्या वर्गाच्या लोकांस ३० दिवस मिळतें.

आ र मा र—आरमार ठेवण्यासाठीं समुद्रकिनाऱ्याचे चार भाग केले आहेत. या चार भागांचीं स्पेझिआ नेपल्स, आणि व्हेनिस, व टारेंटो हीं मुख्य ठाणीं आहेत. याखेरीज अनेक ठिकाणीं टार्पेडोठाणीं आहेत.त्यांत जिनोआ, स्पेझिआ,मडालेन, गेइटा, मेसिना, टारेंटो. ब्रिंडिसी,अँकोना व व्हेनिस हीं मुख्य आहेत. १९१९ सालीं आरमारांत ५ ड्रेडनॉट, ६ प्रिड्रेडनॉट, ५ चिखलतीं जहाजें ( आर्मर्ड क्रूझर्स ), २३ संरक्षित जहाजें वगैरे, ४ टार्पेडो गनबोट, ४८ विनाशिका बोटी, टार्पेडोबोटी ७३ पाणबुड्या याप्रमाणें जहाजें होतीं.

ज मा ख र्च.—मुख्य उत्पन्नाच्या बाबी म्हणजे जमिनी घरें, व उत्पन्न यांवरील प्रत्यक्ष कर व समुद्रावरील व खुष्कीवरील जकाती, कारखान्यावरील कर, मीठ व तंबाखू यांचे मक्ते हे अप्रत्यक्ष कर आहेत.

१८९८ पासून १९०६ पर्यंत जमेपेक्षां खर्च कमी होऊन दरवर्षी शिल्लक राहात असे. शिल्लक राहाण्याचें कारण असें होतें कीं, बाहेरून आंत येणाऱ्या मालावर जबर कर बसविला जात असे, आणि तंबाखू व मीठ यांच्या मक्त्यामुळें बरेंच उत्पन्न होत असे, या शिलकेचा विनियोग सरकारी

नोकरांच्या विश्वविद्यालयांतील प्रोफेसरांचे पगार वाढविण्याकडे करण्यांत येत असे.

खर्चापैकीं बराच मोठा आंकडा सरकारी कर्जावरील व्याजाचा होता. १८९९–१९०० सालीं व्याजाचा आंकडा २७५६०००० पौंड होता, तो १९०६ सालीं २३१००४०९ पौंड पर्यंत आला. १९१८–१९ सालचे एकंदर उत्पन्नाचे व खर्चाचे अंदाजी आंकडे अनुक्रमें पांच अब्ज व चार अब्ज ऐशीं कोटी लिरी ( २५ लीरी = १ पौंड ) असे होते.

दे शां ती ल रा ज्य का र भा र.—सर्व देशाचे ६९ प्रांत आणि ८३४५ कॉम्युन केलेले आहेत. स्थानिक कारभार कॉम्युनल कौंसिल व प्रांतिक कौंसिल यांच्या ताब्यांत असतो. १९१५ च्या कायद्याप्रमाणें प्रत्येक कॉम्युनला एक कॉम्युनल कौंसिल, एक म्युनिसिपल कौंसिल व एक सिंडिक असतो. म्युनिसिपल कौंसिलमधले सभासद काम्युनल कौंसिलांतील सभासदांतून निवडून घेतलेले असतात व सिंडिक हा सरकारी अधिकारी असतो. याची नेमणूक पूर्वी राजा करीत असे परंतु आतां काम्युनच्या कौंसिलच्या गुप्त निवडणुकीनें (सीक्रेट बॅलट) त्याची निवडणूक होते. प्रत्येक प्रांताचा कारभार पहाण्यासाठीं प्रिफेक्ट असतो व त्याची नेमणूक अन्तर्गत राज्यकारभार पहाणाऱ्या मंत्र्यांकडून झालेली असते. व तो आपल्या कामाबद्दल या मंत्र्याला जबाबदार असतो. प्रत्येक भागाला एक सबप्रिफेक्ट असतो. हा पूर्वी प्रांतिकसभेच्या कार्यकारी सभेचा अध्यक्ष असे, परंतु आतां प्रांतिक कारभारांत फक्त त्याचें अंग असतें व कार्यकारी सभेच्या अध्यक्षाच्या जागेसाठीं त्या सभेच्या सभासदांपैकीं कोणाचीहि त्या सभेच्या सभासदांकडून निवडणूक होते. कॉम्युनचा कारभार पाहाण्यासाठीं एक सभा (जंटा) असते व या सभेची जमाखर्चाच्या कामांत संमति घ्यावी लागते. प्रांतिक राज्यकारभाराच्या सभेच्या निकालाविरुद्ध कॉम्युनची सभा आणि प्रिफेक्ट यांनां वाटल्यास राजाकडे अपील करण्याचा अधिकार असतो. व या वेळीं राजाला कौंसिल ऑफ स्टेटचें मत घ्यावें लागतें. कॉम्यूनच्या आणि प्रांतिक राज्यकारभार यांच्या विरुद्ध खासगी लोकांचें अपील ऐकण्याचा आणि राज्यकारभाराच्या बाबतींत न्यायाधिशाचें काम करण्याचा प्रांतिक राज्यकारभाराच्या सभेस अधिकार आहे.

इ टा ली दे शां ती ल पृ थ क् भा गां चें ए की क र ण.–इटाली हें नांव पूर्वी फक्त द्वीपकल्पाच्या एका विवक्षित भागांस दिलें होतें, पण जसजसें सबंध द्वीपकल्प रोमनलोकांच्या अमलाखालीं येत चाललें तसतसें त्याला एकच नांव असण्याची आवश्यकता भासूं लागली. आगस्टस यानें पहिल्यानें इटली देशाच्या राज्यकारभारास शिस्त लावून दिली व सर्वत्र प्रचलित असलेल्या इटली नांवाचाच सरकारी रीत्या उल्लेख करण्याचें ठरविलें. यानें राज्यकारभार चालविण्याकरितां इटली देशाचे एकंदर अकरा विभाग केले होते; व हेच विभाग कान्स्टंटाइनच्या कारकीर्दीपर्यंत कायम होते. रोमन अमदानींत लष्कर एका भागांतुन दुसऱ्या भागांत सुलभ रीतीनें नेतां यावें म्हणून इटली देशांत पुष्कळ रस्ते बांधले होते.

इ ति हा स.—इटलीमधील प्राचीन लोक, भाषा व आगस्टसनें सर्व इटालीचें एकीकरण करून त्याचे पाडलेले ११ विभाग यासंबंधीं विवेचन ज्ञानकोश विभाग चवथा बुद्धोत्तर जग ( पृ. ३८३ ) यांत केलेंच आहे. इटालीचा प्राचीन इतिहास रोम या लेखांत येईल. येथें रोमन सत्तेच्या विनाशापासून पुढील अर्वाचीन कालापर्यंतचा इतिहास दिला आहे.

इ. स. ४७६—१७९६ पर्यंतचा इतिहासः—४७६ त हेरूलियन लोकांचा नायक ओडोआकर यानें रोम्यूलस बादशहास पदच्युत केलें व इटलीस बायझॅन्शियमचें मांडलिक राज्य बनविलें. पुढें या इटली देश जिंकणाऱ्या रानटी लोकांनीं त्याला केव्हिआ येथें आपला राजा केलें व ग्रीक बादशहा झेनो यानें याला रोमन उमरावा ( पॅट्रिशिन ) च्या पदवीस चढविलें. याप्रमाणें हा देश परकीय राजांच्या अंमलाखालीं गेला व यापुढें झालेल्या अनेक परकीय राजांनीं या देशाच्या कारभार अव्यवस्थित रीतीनें चालविला.

इ ट ली व री ल गॉ थ व लों बॅ र्ड लो कां ची स त्ता.—४८८त थिओडोरिक या पूर्वेकडील गॉथलोकांच्या राजानें ग्रीक बादशहा झेनो याच्यापासून इटाली देशाचा राज्यकारभार चालविण्याची परवानगी घेतली व ४९३ त इटाली देश काबीज केला. गॉथ लोकांनीं इटालियन लोकांत न मिसळतां इटली देशावर आपली लष्करी सत्ता गाजविली. पुढें ५५३ त शेवटचा गॉथ राजा टियस याचा जस्टीनियन यानें आपल्या बेलिसारियस व नर्सस या दोघां सेनानायकांस पाठवून व्हेसुव्हियस येथें पराभव केला. व इटाली देशावरील गॉथिक सत्ता नष्ट केली, व ग्रीक सुभेदारामार्फत इटलीचा कारभार चालविला, यानंतर ५६५ त नार्सिस याला परत बोलाविल्यावर ५६८ त लॉंबार्ड लोकांचा राजा अलबॉईन यानें इटाली देशावर आपलें राज्य स्थापिलें. यानें ५७३ पर्यंत राज्य केल्यावर याचा खून झाला. याच्यानंतर लॉंबार्ड सरदारांनीं आपआपल्या प्रांतांत स्वतंत्र राज्यें स्थापन केलीं. लॉंबार्ड लोकांनीं इटली देशावर आपलें राज्य स्थापतांना, रोम, व्हेनिस, जिनोवा, राव्हेना हीं शहरें, दोन्हीहि समुद्रकिनारे व कार्सिका, सार्डिनिया वगैरे बेटें वगळलीं होतीं. यामुळें त्यांनीं उभारलेल्या राज्यरूपी इमारतीचा पाया अगदीं कच्चा होता. रोम शहरीं पोपचा अंमल चालत होता. व व्हेनिस व जिनोवा या शहरांतील रोमन लोक अजून अगदीं

निर्धास्त होते. रान्हेना येथें अवशेष राहिलेली ग्रीक सत्ता अजून कायम होती व परशत्रूस हल्ला करण्याकरितां दोन्हीहि किनारे मोकळे होते.

७२६त दुसरा ग्रेगरी या पोपनें लोंबार्ड राजा लिउइप्रँड याच्याशीं सलोखा करून रोमवरील ग्रीक सत्ता झुगारून दिली व तेथें स्वराज्य स्थापिलें. लिउइप्रँन्ड व त्याच्यानंतर झालेले राजे राशिस व एस्टॉल्फ यांचा ग्रीक राज्यावरोबर रोमचेंहि राज्य बळकाविण्याचा विचार होता परंतु तिसरा ग्रेगरी, झकारी, व दुसरा स्टीफन या पोपांनीं आपल्या मदतीस फ्रँक लोकांना बोलाविलें. पिप्पीन या फ्रँक राजानें इटालींत प्रवेश करून लोंबार्ड राजाचा पराभव केला व व त्यापासून जिंकलेले प्रांत पोपला अर्पण केले, व तेव्हां-पासून पोप या प्रांतांचा राज्यकारभार पाहूं लागला. पिप्पीन-नंतर शार्लेमान यानें शेवटच्या लोंबार्ड राजास पदच्युत केल्यावर ८०० त ३ ऱ्या लिओनें त्याला रोम शहरीं राज्या-भिषेक केला. यानें ८४३ पर्यंत राज्य केल्यावर याच्या मागून याचा नातू लोथेर हा ली देशाच्या गादीवर बसला. याचें राज्य आल्प्स पर्वतापासून टेरासिनापर्यंत पसरलें होतें. शार्लेमानच्या वंशांतील एकंदर ८ राजांनीं इटलीवर राज्य केलें. यापैकीं शेवटचा राजा चार्लस ( लह ) या नांवाचा होता. हा ८८८ त पदच्युत झाल्यावर इट-लीच्या गादीवर १० राजे बसले. यांच्या कारकीर्दी इटलीस फार वाईट गेल्या. याच काळांत सारासेन लोकांनीं सिसिली कॅलेब्रिआ, अप्युलिया वगैरे घेऊन रोमलाहि दहशत बस-विली. याच काळांत इटली देशांत ग्रीक सत्ता पुन्हां स्थापन झाली. रोम येथील राज्यकारभारांत अव्यवस्था उत्पन्न झाली. या काळांत पोपची गादी टस्क्यूलमच्या काउंट घराण्याच्या हातांत जाऊन दोन स्त्रियांनींहि अंमल चाल-विला. मग्यार लोक उत्तरेकडून इटली देशावर स्वाऱ्या करूं लागले. वरील राजांपैकीं दुसरा बेरेंगार यानें ९५१–९६१ पर्यंत राज्य केलें. पुढें ओटो या जर्मन बादशहानें याला पदच्युत करून इटलीचें राज्य आपण बळकाविलें व १२ व्या जॉनकडून रोम येथें आपणांस बादशहा म्हणून जाहीर करविलें. याच्या वेळेपासून इटली देश जर्मन बादशहांच्या ताब्यांत गेला व त्याची राष्ट्रीय ऐक्य होण्याची कायमची निराशा झाली. याच्या नंतर दुसरा व तिसरा ओटो असे दोन राजे झाले. यांच्या कारकिर्दींत रोम शहरांत स्वसत्ताक राज्य होतें. तिसरा ओटो हा १००२ मध्यें मरण पावल्यावर अर्व्हाईन गादीवर आला. त्याची व त्यानंतरचा अर्डाइन याची बव्हेरियाचा हेनरी यांजबरोवर रोमचें राज्य संपादन करण्याकरितां चढाओढ सुरू झाली. यांत हेनरीला यश येऊन त्यांस रोम शहरीं राज्याभिषेक झाला. हा १०२४ त मेल्यावर मिलानचा आर्चबिशप हेरीबर्ट यानें जर्मन राजा कोन्राड याला बोलावून त्याला मिलान येथें लोहमुकुटानें राज्याभि-षेक केला. या कालापासून इटलीच्या अंतर्गत व्यवस्थेंत या शहराचें महत्त्व वाढलें व त्यामुळें आपसांतील फूटहि वाढली.

कोन्राड नंतर दुसरा कोन्राड तिसरा हेनरी, व चवथा हेनरी या राजांच्या कारकीर्दी झाल्या. तिसरा हेनरी हा १०४६ मध्यें इटालींत आला त्यावेळीं रोम शहरीं तीन पोप होते. यानें या तिघांसहि काढून टाकून इतःपर जर्मन पोप नेमण्याचें ठरविलें.

द क्षि ण इ ट ली चा वृ त्तां तः—१०१७ त नार्मन लोक ग्रीक लोकांविरुद्ध लोंबार्ड लोकांस मदत करण्याकरितां आपुलियांत आले होते. पुढें बारा वर्षांनीं त्यांनीं अव्हरसा येथें वसाहत केली; व यानंतर कांहीं दिवसांनीं त्यांनीं दक्षिण इटलींत आपली सत्ता स्थापन केली. १०५३ त्यांनीं पोपच्या फौजेचा पराभव केला, व त्यापासून आपुलिया, कॅलाब्रिया, व सिसीली या प्रांतांत नवीन प्रदेश काबीज करण्याची परवानगी मिळविली. इ. स. १०६०मध्यें त्यांच्यातील रॉबर्ट गिसकार्ड यानें सिसीली बेट काबीज केलें. याचा भाऊ काऊंट रॉजर हा ११०१ मध्यें मरण पावल्यावर त्याचा मुलगा रॉजर हा कॅलाब्रिया व सिसीली यांचा राजा झाला. पुढें ११२७ त आपुलियाचा ड्यूक मरण पावल्यावर रॉजर यानें आपुलिया प्रांत आपल्या राज्यास जोडला. ११३० त यानें सिसीलीचा राजा ही पदवी धारण केली.

१०७३ त हिल्डेब्रँड हा पोप झाला. यानें एक सभा भरवून धर्मोपदेशकांनीं ब्रह्मचर्य पाळावें, राजानें धर्मोपदे-शकांच्या नेमणुका करूं नयेत व पोपची निवडणूक धर्मोपदेशक (कार्डिनल)यांनीं करावी. या तत्त्वांचा पुरस्कार केला. यामुळें याचा चवथ्या हेनरीशीं बेबनाव झाला; व पोप व हेनरी या दोघांमध्यें युद्ध सुरू झालें. हें युद्ध त्यांच्या मरणानंतर ११२२ पर्यंत चाललें होतें. या युद्धांत पोपला काऊंटेस मॅटिल्डा इनें बरीच मदत केली व शेवटीं आपली सर्व जहागीर पोपच्या स्वाधीन केली. यायोगानें पोपची ऐहिक सत्ता बरीच वाढली. हिल्डेब्रँड उर्फ ७ वा ग्रेगरी हा १०८५ त मरण पावला.

ग्रेगरीच्या नंतर त्याच्या मागून आलेला तिसरा व्हिक्टर, दुसरा अरबन व दुसरा पास्कल या पोपांनीं ११०६ त चवथा हेनरी मेल्यावरहि त्याचा मुलगा पांचवा हेनरी या जर्मन बादशहाशीं युद्ध चालू ठेऊन ११२२ त त्यास तह करावयास लाविलें. या तहान्वयें, हेनरीनें ज्या हक्कासाठीं युद्ध सुरू झालें होतें ते सर्व हक्क सोडून देऊन पोपचें म्हणणें कबूल केलें. या युद्धाचा वास्तविक परिणाम असा झाला कीं, पोपच्या स्वतंत्रतेस धक्का न पोंहोचतां जर्मन बादशहास मात्र राज्या-भिषेकाचे संस्कार करवून घेण्याकरितां पोपच्या तोंडाकडे पाहण्याची पाळी आली.

का म्यू न चा का ल—स्वतंत्र शहरांचा उदय--वरील बादशहा व पोप यांच्यामधील युद्धांत दोघांचा तंटा व

तिसऱ्याचा लाभ या न्यायानें झाला. स्वतंत्र शहरास आपला बराच फायदा करून घेतां आला. दोन्हीहि पक्ष त्यांची कुमक मिळविण्याकरितां त्यांनां सवलती देत. या योगानें त्यांचें सामर्थ्य वाढून त्यांची स्वातंत्र्याची इच्छा अधिक बळावली व ती स्वावलंबी बनली. या शहरांची घटना पुढें दिल्याप्रमाणें होती. एकंदर राज्यकारभार चालविण्याकरितां कान्सल नांवाच्या अधिकाऱ्यांची योजना केलेली असून त्यांच्या मदतीकरितां एक सल्लागारमंडळ ( डेलिबरेटिव्ह असेंब्ली ) असे, कान्सल अधिकारी न्याय देणें व जवळच्या राज्यांशीं व्यवहार ठेवणें हीं कामें करीत असत. याशिवाय थोर लोकांची व सर्वसाधारण लोकांची अशा आणखी दोन सभा होत्या. पीसा, मिलान हीं यावेळीं प्रसिद्धीस आलेल्या स्वतंत्र शहरांपैकीं होत. याच सुमारास रोम येथेहि स्वसत्ताक राज्याची स्थापना झाली होती.

इटली देशांत जिकडे तिकडे स्वसत्ताक शहरें अस्तित्वांत आल्यामुळें सर्व देशभर दुही माजली होती (११२५–११३७ ) व कोन्राड ( ११३८–५२ ) यांच्या कारकीर्दींत फारच अंदाधुंदी माजून अंतस्थ यादवीस विशेष जोर आला होता. पुढें फ्रेडरिक बारबरोसा गादीवर आल्यावर त्यानें १५५४ मध्यें इटली देशावर स्वारी करून या आपसांत भांडणाऱ्या स्वतंत्र शहरांचा चांगला समाचार घेतला. यानंतर पोप व बादशहा यांच्या मध्यें माटिल्डानें दिलेल्या जहागिरीविषयीं वाद उपस्थित होऊन त्यांच्यांत युद्ध सुरू झालें. स्वतंत्र शहरांनीं पोपचा पक्ष उचलून धरून बादशहास मोठ्या शौर्यानें हांकून लावण्याचा प्रयत्न केला, पण शेवटीं त्यानांच हार खावी लागली. ११५९ त तिसरा अलेक्झांडर पोप झाल्यावर फ्रेडरिक बारबरोसा यानें ११६३ त इटली देशावर पुन्हां स्वारी केली. यावेळेस स्वतंत्र शहरांनीं एक संघ स्थापन करून मोठ्या धैर्यानें बादशाही फौजेस तोंड दिलें. या दुसऱ्या स्वारींत फ्रेडरिक बारबरोसा याचा पराभव होऊन ११७६ त त्याला पोपशीं सहा वर्षांचा तह करावा लागला. या तहांत विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हटली म्हणजे जरी स्वतंत्र शहरांनीं परशत्रू जर्मन बादशहा याचा पूर्ण पराभव केला, तरी इटली देशाचें एक स्वतंत्र राष्ट्र न होतां तो देश तसाच पारतंत्र्यांत राहिला. ११८३ त कॉन्स्टन्स येथें दुसरा तह होऊन त्यांत स्वतंत्र शहरांच्या स्वसत्ताक राज्यांत बादशहानें ढवळाढवळ करूं नये, व त्यांनां लढाई वगैरे करण्याचा हक्क असावा. बादशहाच्या ताब्यांत वरिष्ठ न्यायकचेऱ्या राहून तो इटलींत आला असतां त्याचा खर्च स्वतंत्र शहरांनी चालवावा, असें ठरलें.

यानंतर स्वतंत्र शहरांनीं सरंजाम सरदारां ( फ्युडल लॉर्डस)चा पराभव करून त्यांस आपल्या बरोबर शहरांत रहावयास लाविलें. सरदार लोकांचा पाडाव झाल्यामुळें इटली देशांतील शेतकऱ्यांचें दास्य नष्ट होऊन त्यांनां स्वतंत्रता प्राप्त झाली व त्या देशांतील लोक फ्रँक जर्मन वगैरे लोकांत मिसळून गेले. याप्रमाणें इटली देशांतून सरंजामी अंमल नाहींसा झाला. स्वतंत्र शहरांनीं जरी सरंजामी सरदारांचा पाडाव करून त्यांस शहरांत रहावयास लाविलें होतें, तरी त्यांचा भांडखोर स्वभाव अजून गेला नव्हता. हे लोक शहरांत राहून शहराचा शांतताभंग करूं लागले. तेव्हां यांनां ताळ्यावर आणण्याकरितां स्वतंत्र शहरांनीं पुढील युक्ति योजिली. एक वर्षपर्यंत कोणी तरी परकीय जबाबदार मनुष्य निवडून त्याच्या हातांत मुलकी व लष्करी सत्ता देऊन त्याच्या आज्ञेंत वागण्याचें कबूल केलें.

इ. स. ११९० त फ्रेडरिक बारबरोसा मरण पावला. त्याच्या नंतर त्याचा मुलगा दुसरा फ्रेडरिक हा गादीवर बसला. यानें आपला मुलगा सहावा हेनरी याचें सिसिलीचा रॉजर याची मुलगी कॉन्स्टन्स इच्याशीं लग्न लाविलें. पुढें हॉटेव्हाईल घराण्यांतील शेवटचा बादशहा दुसरा विल्यम हा मरण पावल्यावर त्याला वारस नसल्यामुळें ११९४त सिसिलीचें राज्य सहाव्या हेनरीस मिळालें. ११९८ त हेनरी मेल्यावर त्याचा मुलगा फ्रेडरिक हा गादीवर बसला. हा लहान असल्यामुळें याला तिसरा इनोसंट या पोपच्या देखरेखीखालीं ठेविलें होतें. याच सुमारास फ्रॅन्सिस्कन व डोमिनिकन हे पंथ निर्माण झाले.

इ.स.१२२० त होनोरियस या पोपनें दुसरा फ्रेडरिक यास रोम येथें राज्याभिषेक करून साम्राज्यपदावर बसविलें. १२२५ त यानें योलँड डी ब्राइन इच्याशीं लग्न करून जेरूशेलम आपल्या ताब्यांत घेतलें. हा तत्कालीन पृथ्वीवरील सर्व सम्राटांत श्रेष्ठ होता. १२२७ त नववा ग्रेगरी या पोपनें कबूल केल्याप्रमाणें फ्रेडरिक धार्मिक युद्धास न गेल्यावरून त्याला धार्मिक बहिष्कार घातला, व याच्याबद्दल पोपचा चांगला समाचार घेण्याकरितां फ्रेडरिकनें त्यांच्याशीं युद्ध सुरू केलें. या युद्धांत पहिल्यानें फ्रेडरिक बादशहास जय मिळेल असा रंग दिसत होता, पण शेवटीं त्यालाच हार खावी लागली. हा इ. स. १२५० त मरण पावला. याच्या नंतरहि पोपनें १८ वर्षें युद्ध चालू ठेवलें व जर्मन बदशहाचा पूर्ण पराभव केला. या युद्धांत पोपला फ्रान्समधील आँज्यूच्या चार्लसनें मदत केली होती; पुढें इटलींत हाच बलिष्ट होऊन बसला. १८७८ त रूडॉल्फ या जर्मन बादशहानें विशिष्ट प्रदेशावरील सत्ता मान्य केली.

अकराव्या बेनेडिक्टनें थोडे दिवस पोपचें काम केल्यावर पांचवा क्लेमेंट हा फ्रेंच गृहस्थ पोप झाला, व यामुळें पोपवर फ्रान्सच्या राजाचें वर्चस्व प्रस्थापित झालें.

पोप व जर्मन बादशहा यांच्या युद्धांत त्यांपैकीं कोणाचा विजय होतो हेंच केवळ महत्त्वाचें नसून यशस्वी पक्षाबरोबर इटली देशांत कोणत्या सामाजिक तत्त्वांचा प्रवेश होऊन तीं

सर्वमान्य होतात ही गोष्ट महत्त्वाची होती. त्या देशांतील नागरिक (सिव्हिल) संस्था तशाच कायम राहतात कीं, त्यांच्या जागीं सरंजामी जहागिरी संस्था अधिष्ठान पावतात, सर्व लोकांस व्यापार महत्त्वाचा वाटतो कीं, शिपाईगिरी त्यांच्या मनावर आपला पगडा बसविते, प्रगतीची वाढ तशीच कायम राहते कीं, ती खुंटून पुराणप्रियतेचा जिकडे तिकडे प्रसार होतो, वगैरे गोष्टी विशेष महत्त्वाच्या होत्या.

अनियंत्रित सत्ताधिकाऱ्यांचा काळ.—या युद्धामुळें स्वतंत्र शहरांतील सरदार वगैरे लोकांनां 'कप्तान' करून युद्ध करण्याकरितां पाठवीत, व या योगानें त्यांचें प्राबल्य जास्त वाढत जाऊन ते मोठे सत्ताधारी झाले; यावेळीं म्हणजे फ्रेडरिक मेल्यानंतर व्हेरोना, राव्हेन्ना वगैरे ठिकाणीं वर सांगितलेल्या लष्करी कप्तानांनीं मोठमोठीं घराणीं स्थापन केलीं होतीं. १३०९ मध्यें रॉबर्ट हा नेपल्सच्या गादीवर बसला. १३१० मध्यें लक्झेंबर्गचा सातवा हेनरी हा आल्प्सपर्वत ओलांडून इटाली देशांत आला. त्यानें अगोदरच सत्ताधारी झालेल्या घराण्यांचें त्यांच्या विशिष्ट प्रदेशावरील वर्चस्व कबूल केलें. पुढें हा १३१३ त मरण पावल्यावर हीं घराणीं अधिकच जोरावलीं. १३१३–१३३३ पर्यंत इटली देशांत गुल्फ्स व घिबेलाईन या दोन पक्षांमध्यें यादवी माजली होती. घिबेलाईन पक्षांत वर सांगितलेल्या सत्ता बळकावणाऱ्या सरदार घराण्यांचा समावेश होत होता, व गुल्फ्स पक्षाचे अनुयायी स्वातंत्र्यप्रिय लोक होते. शेवटीं हे दोन्हीहि पक्ष अगदीं कंटाळून जाऊन त्यांनीं आपसांत तडजोड करण्यास प्रारंभ केला, स्वतंत्र शहरें तर देशांत शांतता राखण्याकरितां कांहीं दिवस पारतंत्र्य स्वीकारण्यास कबूल झालीं. इ. स. १३०५ते१४४७ च्या दरम्यान इटालियन लोक जवळ जवळ स्वराज्य भोगीत होते. १४४७ साल अखेर इटली देशांत नेपल्स मिलान, फ्लोरेन्सचें प्रजासत्ताक राज्य, व्हेनिसचें प्रजासत्ताक राज्य, व पोपचें राज्य, अशीं पांच राज्यें नांदत होतीं. १४४७–९२ च्या दरम्यान इटली देशांत जिकडे तिकडे शांतता नांदत असून त्याची चांगली भरभराट झाली.

दोन सिसिलींची हकीकतः—नेपल्स इ. स. १३४३ त आजूचा रॉबर्ट मेल्यावर त्याची मुलगी जोन ही गादीवर बसली. १३८२ त ड्यूराझोच्या चार्लसनें जोनचा खून केला व आपण गादी बळकाविली. १३८७ त हा मेल्यावर याचा मुलगा लॅडिस्लस हा गादीवर बसला. तो १४१४ त मरण पावल्यावर याची बहीण दुसरी जोन ही गादीवर बसली. इनें प्रोव्हेन्सचा ३ रा लुई, याचा भाऊ रेने, व ॲरेगॉनचा पांचवा आलफांझो, या तिघांस दत्तक घेतलें. पुढें १४३५ त ही मेल्यावर रेने व आलफांझो यांमध्यें लढाई होऊन शेवटीं आलफांझोचा जय झाला. १४५८ त हा मरण पावल्यावर नेपल्सचें राज्य याचा दासीपुत्र फर्डिनंड याच्या हातीं लागलें व ॲरेगॉन व सिसीली यांचें राज्य याचा भाऊ जॉन व त्याच्या नंतर कॅथोलिक फर्डिनंड यांस मिळालें.

मिलानची हकीगत.—व्हिस्कॉंटी घराण्यांतील शेवटचा पुरुष अझो यानें बव्हेरियाच्या लुईपासून १३२८ त मिलान विकत घेतलें. याच्यानंतर याचा चुलता लुशीनो हा मिलानच्या गादीवर बसला. इ. स. १३४९ त याचा त्याच्या बायकोनें खून केल्यावर याचा भाऊ जॉन हा राजा झाला. यानें मिलानच्या राज्याचा विस्तार बराच वाढवून बहुतेक उत्तर इटलीवर आपलें स्वामित्व स्थापन केलें होतें. हा १३५४ त मरण पावल्यावर याचें राज्य याच्या माटेओ, बर्नाबो व गॅलेओझो या तीन मुलांनीं वांटून घेतलें. पुढें माटेओ मारला गेल्यावर बर्नाबो व गॅलिओझो या दोघांनीं तें वांटून घेतलें. १३७८ त गॅलिओझो मेल्यावर त्याचा मुलगा गायन गॅलिओझो हा याच्या गादीवर बसला. यानें आपल्या चुलत्यास मारवून मिलानचें राज्य पुन्हां एकछत्राखालीं आणलें. यानें आपल्या राज्याची सरहद्द व्हेनिसच्या राज्यास नेऊन भिडवली, व लॉंबर्डी काबीज करून टस्कनी वरहि चाल केली. यानें आपणांस ड्यूक ही पदवी मिळविली होती. हा १४०२ मध्यें प्लेगनें मरण पावला. याला गायओव्हानी मराया, व फिलिप्पो–मराया असे दोन मुलगे होते. १४१२ त गायओव्हानी याचा खून झाल्यावर फिलिप्पो हा गादीवर बसला. फिलिपोचा विचार सर्व इटली देश काबीज करण्याचा होता व त्याप्रमाणें त्यानें व्हेनिस व फ्लोरेन्स यावर स्वारी केली होती पण त्यांत त्याला यश आलें नाहीं. याच्या कारकीर्दीत फ्रान्सिस्को, स्फोर्झा वगैरे नामांकित सेनापती उदयास आले. इ. स. १४४७ त फिलिप्पो मरण पावल्यावर १४५० त फ्रान्सिस्कोनें मिलानचा अधिकार बळकाविला.

फ्लोरेन्सचा इतिहास.—इ. स. १३४३ त अथेन्सच्या ड्यूकला[1] काढून दिल्यावर फ्लोरेन्समधील कनिष्ठ दर्जाच्या लोकांनी मोठमोठ्या व्यापाऱ्याविरुद्ध बंड करून १३७८त कांहीं काळपर्यंत फ्लोरेन्सची सत्ता आपल्या हातांत घेतली, पण त्यांनां युद्ध व परदेशीय व्यवहार चालवितां न आल्यामुळें त्यांच्या हातांतील सत्ता जाऊन फ्लोरेन्स प्रदेशांत अलबीझी घराण्यानें आपलें वर्चस्व स्थापिलें. यांच्या कारकीर्दीत व्हिस्कॉन्टी घराण्याचा पराजय होऊन फ्लोरेन्सनें टस्कनीच्या कांहीं शहरांवर आपला अम्मल बसविला, व पिसा शहर काबीज करून समुद्रकिनारा गांठला. पुढें मेडिसी घराण्यांतील कोसिमोनें कनिष्ठ लोकांचा पक्ष उचलून धरून १४३३ त तर अलबीझी घराण्याशीं उघड उघड प्रतिस्पर्धा सुरू केली. कांहीं दिवस हद्दपार होऊन परत आल्यावर यानें बरीच सवंग लोकप्रियता संपादन करून जनसमुहाचें धुरीणत्व स्वीकारलें व राज्यसूत्रें आपल्या हातांत घेतलीं.

व्हेनिस.—या प्रजासत्ताक राज्याचा राज्यकारभार चालविण्याकरितां लोकांतर्फे लोकपक्षीय मंडळास जबाबदार

असा एक 'डोज' निवडण्यांत येत असे. १०३२ मध्यें या डोजनें प्रत्येक कारभारांत 'प्रेगाडी' नांवाच्या सेनेट सभेची अनुमति घ्यावी असें ठरलें. ११७२ त ग्रँड कौन्सिलची ( मोठ्या मंडळाची ) स्थापना झाली. पुढें याच मंडळाच्या ताब्यांत सर्व राज्यकारभार आला. १२९७ मध्यें हें मंडळ बंद करण्यांत आलें. नंतर व्हेनिसचीं राज्यसूत्रें कांहीं विवक्षित घराण्यांच्या हातीं लागून तीं त्यांच्याकडे वंशपरंपरा राहत गेलीं. १३११ त शासनार्थ एक दहाजणांचें मंडळ स्थापन करण्यांत आलें. पुढें १७९७ पर्यंत व्हेनिसच्या राज्यव्यवस्थेंत कांहीं फरक झाला नाहीं. मध्ययुगांत व्हेनिसनें आपला पौरस्त्य व्यापार वाढविण्याचें धोरण स्वीकारलें होतें. इ. स. १३३६ त इटली देशाच्या राजकारणांत व्हेनिसनें ढवळाढवळ करण्याचा पहिल्यानेंच प्रयत्न केला. १३५२–१३८१ पर्यंत व्हेनिस व जिनोवा यांच्यामध्यें युद्ध होऊन त्यांत शेवटीं जिनोवाचा पराभव झाला. १४०६ मध्यें व्हेनिसनें आपल्या राज्यांत व्हेरोना, व्हिसेंझा व पादुआ वगैरे शहरें सामील केलीं. १४२३ त व्हेनिसचा राज्यकारभार फ्रान्सिस्को फोस्कारी या डोजच्या हातीं येऊन त्यानें तो १४५७ पर्यंत चालविला.

पो प चें रा ज्य.—ॲव्हिग्नॉनला आल्यापासून पोपनें इटलीच्या स्वातंत्र्यसंरक्षकाचें काम सोडून दिलें होतें. रेंझीच्या क्रांतीनंतर रोम शहरीं एका लोकसत्ताक राज्याची स्थापना झाली होती. याच सुमारास निरनिराळीं घराणीं अस्तित्वांत येऊन तीं आपणास पोपचे व्हिकार उर्फ प्रतिनिधी म्हणवून घेऊन स्वार्थ साधीत होतीं. पुढें अकरावा ग्रेगरी हा पोप झाल्यावर यानें रोम शहर पुन्हां परत घेतलें. याच्यानंतर सहावा अरबन हा पोप झाला. पाचवा मार्टिन ( १४१७–१४३१ ) व चवथा एजिनियन ( १४३१–१४४७ ) याच्या कारकीर्दींत यांना ऐहिक सत्तेकडे लक्ष देण्यास फुरसत व सामर्थ्य नसल्यामुळें पोपपदाचें महत्त्व विशेष वाढलें नाहीं. १४४७ त पांचवा निकोलस पोप झाल्यावर यानें पोपची ऐहिक सत्ता स्थापन केली. हा १४५५ त मरण पावला.

इटली देशांत वर दिल्याप्रमाणें पांच मोठीं व कांहीं लहान राज्यें स्थापन झाल्यावर त्या देशांतील राजकारणाचा कल एकतंत्री सत्ता स्थापन होण्याकडे झुकत होता. ही एकतंत्री राज्यपद्धति जाचक नव्हती, कारण ज्यांच्या हातांत सत्ता असे ते बहुधा इटलियन असून ते कला, वाङ्मय, शास्त्र वगैरे विषयांतील लोकांच्या प्रचलित अभिरुचीबद्दल आपली सहानुभूति दाखवीत असत. इ. स. १४५३–१४९२ च्या दरम्यान इटाली देशांत सर्वत्र शांतता नांदत होती.

प र की य स्वा ऱ्यां चा का ळ.—१४९२ त मिलनच्या गायन गॅलिॲझोनें आपला चुलता लुडोव्हिचो याच्या हातून राज्यकारभार हिसकावून घेऊन त्याला राज्यांतून हांकून देण्याकरितां फ्रान्स देशाच्या आठव्या चार्लसला इटली देशावर स्वारी करण्याची विनंती केली; व त्याला नेपल्सची लालुच दाखविली. याप्रमाणें १४९५ त चार्लसनें आल्प्स पर्वत ओलांडून नेपल्स येथें प्रवेश केला. या ठिकाणीं त्याला राज्याभिषेक करण्यांत आला होता. इकडे हा प्रकार होत असतांना लुडोव्हिचोनें आपल्या पुतण्यास मारवून चार्लसविरुद्ध एक संघ स्थापन केला होता. पुढें या दोघांचें युद्ध होऊन लुडोव्हिकोनें चार्लसला इटली देशांतून पिटाळून लाविलें. या स्वारीनें इटली देशाचा समतोलपणा नष्ट झाला व त्या देशांत राष्ट्रीय ऐक्य नाहीं व तो सधन असूनहि लष्करी दृष्ट्या फार दुर्बल आहे असें यूरोपांतील इतर द्रव्यलोलुप व बलवान राष्ट्रांच्या नजरेस आलें.

चार्लस परत गेल्यावर पहिल्या फर्डिनंडचा मुलगा फ्रेडरिक हा नेपल्सवर राज्य करूं लागला, व फ्लोरेन्सनें लोकसत्ताक राज्य स्थापिलें. या वेळेस फ्लोरेन्समध्यें गायरोलामो साव्होनारोला याचें विशेष वर्चस्व होतें. यानें लोकांत स्वातंत्र्याची आकांक्षा उत्पन्न करून त्यांना पंधराव्या शतकांत यूरोपमध्यें झालेल्या विद्येच्या पुनरुज्जीवनाची जाणीव करून दिली. यालाच १४९८ त सहाव्या अलेक्झांडरनें फाशीं दिलें. १४९९ त चार्लस नंतर फ्रान्स देशाच्या गादीवर बसणाऱ्या बाराव्या लुईनें मिलानवर हक्क सांगून स्वारी केली. यानें मिलान काबीज करून फर्डिनंडनें कॅथोलिकाच्या मदतीनें नेपल्सवरहि ताबा मिळविला. पुढें फर्डिनंड व लुई यांच्यांत तंटा उपस्थित होऊन नेपल्स व सिसीली यांचें राज्य स्पेनच्या ताब्यांत गेलें. १५०४ मध्यें लुईनें व्हेनिस घेण्याकरितां मॅक्सिमिलियन बादशहाची मदत मागितली.

याप्रमाणें इटली देशांत फ्रान्स, स्पेन, जर्मनी वगैरे राष्ट्रांच्या फौजा धुमाकूळ घालीत असतां सहावा अलेक्झांडर या पोपनें रोमनगा व मार्च काबीज करून मध्यइटलींत स्वतःच्या वंशजाकरितां एक नवीन राज्य स्थापन करण्याचा घाट घातला; पण पुढें १५०३ मध्यें हा मरण पावल्यामुळें याचे बेत निष्फळ ठरले. याच्या नंतर दुसरा जूलियस पोप झाला. पोपपदाचें महत्त्व वाढवून आपण इटली देशाचें संरक्षक व्हावें अशी याची उत्कट इच्छा होती. १५०८ मध्यें व्हेनिस शहर धुळीस मिळविल्यावर १५१० त यानें परकीयांस इटली देशांतून हांकून लावण्याचा निश्चय केला, व हेंच धोरण अनुसरून स्पेन व फ्रान्स यांच्यांत लढाई जुंपवून दिली. या लढाईंत फ्रेंच लोकांस लॉंबर्डीतून हाकून लावण्यांत आलें इ. स. १५१२ त फ्लोरेन्सवर मेडिसी घराण्यानें पुन्हां आपला पगडा बसविला.

१५१३त दहावा लिओ पोप झाला व१५१५ मध्यें पहिला फ्रान्सिस हा फ्रान्सच्या गादीवर बसला.यानें मिलानवर चाल करून तेथील स्विस सत्तेचा नाश केला. पांचवा चार्लस हा दक्षिण इटली व स्पेन या दोन देशांचा राजा होऊन १५१९ त बादशाहीं सिंहासनावर आरूढ झाल्यावर याचें सामर्थ्य द्विगुणित झालें, व याचा सर्व यूरोपखंडाला धाक वाटूं लागला. अशा स्थितींत लिओ हा फ्रेंच राजास अनुकूल

झाला होता, पण १५२१ त हा आपलें धोरण बदलून चार्लसच्या पक्षास जाऊन मिळाला. पुढें बादशाही फौजेनें फ्रेंचांस मिलानमधून हांकून लाविलें, व १५२५ त पेव्ही-याच्या लढाईत फ्रॅन्सिस याला कैद केल्यावर इटली देशांत स्पॅनिश फौजेस कोणतीहि आडकाठी राहिली नाहीं. लिओ नंतर सहावा एड्रियस व सातवा क्लेमेंट या दोन पोपांच्या कारकीर्दी झाल्या. १५२६ त म्हणजे क्लेमेंटच्या कारकीर्दीत फ्रॅन्सिस राजास बंधमुक्त करण्यांत आलें इ. स. १५२७त एका जर्मन–स्पॅनिश लोकांच्या मिश्र फौजेनें बादशहाच्या वतीनें रोम शहर लुटलें. यानंतर क्लेमेंटनें बादशहाशीं तह करून १५३० त रोम शहर लुटणाऱ्या फौजेच्याच मदतीनें आपलें फ्लोरेन्सवरील नष्ट झालेलें वर्चस्व पुन्हां स्थापित केलें.

इ ट ली दे शा व री ल स्पे न व आ स्ट्रि या यां चा अं म ल.—१५२९ त चार्लस व पोप यांच्यांत तह होऊन त्यांनीं इटली देशाची पुढें दिल्याप्रमाणें व्यवस्था लाविली. मिलान फ्रॅन्सिस्को स्फोर्झा याच्या ताब्यांत आलें. व्हेनीस हें पूर्वीप्रमाणेंच लोकसत्ताक कायम राहून त्याची लॉंबर्डी प्रांतावरील सत्ता कबूल करण्यांत आली. एस्ट घराण्यानें मोडेनावर आपलें वर्चस्व स्थापिलें, व पोपनें एका मोठ्या भागावर आपला हक्क कायम केला.

१५३४ त तिसरा पाल हा पोप झाला यानें आपल्या मुलास पार्मा व पाइसेंझा यांचा ड्यूक बनविलें. याचेंच वंशज १७३१ पर्यंत तेथें राज्य करीत होते. १५४० त पालनें लायोला यास 'जेसुइट' पंथ स्थापन करण्याची परवानगी दिली. याच सुमारास इटाली देशांत ' इंक्विझीशन ' नांवाच्या धार्मिक न्यायकचेऱ्यांची स्थापना करण्यांत आली. १५४५ त ट्रेंट येथें एक सभा भरवून कॅथोलिक पंथाच्या धार्मिक तत्त्वांचें स्पष्टीकरण करण्यांत आलें. १५५५त चवथा पोल हा पोप झाला. यानें फ्रान्समधील गाइजच्या ड्यूकला नेपल्सवर स्वारी करण्यास उत्तेजन दिलें, परंतु स्पेनचा राजा दुसरा फिलिप यानें फ्रेंच सैन्याचा पाडाव केला व १५५९ त त्यांना कॅटोकँब्रेसिस येथें तह करावयास लाविलें. १५७३ त व्हेनिस व स्पेन या दोघांनीं लेपांटो येथें तुर्कांचा पराभव केला.

१५५३ त सॅव्हॉयचा ड्यूक तिसरा चार्लस हा मरण पावल्यावर त्याच्या मागून त्याचा मुलगा एमॅन्युअल फिलबर्ट हा गादीवर बसला. आपल्या बापानें गमावलेलें राज्य यानें पुन्हां कमावलें; व टयूरीन येथें आपली राजधानी बदलून आपल्या राज्याचा इटालींत अंतर्भाव करून घेतला.

एमॅन्युअल फिलबर्ट नंतर पहिला चार्लस एमॅन्युअल हा गादीवर बसला. यानें सालूझो काबीज करून तें आपल्या राज्यास जोडलें. फ्रॅन्सिस्को गोंझागा मरण पावल्यावर त्याच्या ताब्यांत असलेलें मॉन्टफेराट संस्थान हस्तगत करण्याचा याचा विचार होता, पण तो पूर्णपणें सिद्धीस गेला नाहीं. या वेळेस इटली देशांतील कांहीं सत्ताधारी राजघराणीं नष्ट झालीं, व पोपनें ही संधि साधून एका संघटित भागावर आपली सत्ता स्थापन केली. पांचवा पाल पोप झाल्यावर त्यानें व्हेनिस येथील लोकसत्ताक राज्यास पोपची धार्मिक सत्ता कबूल करावयास लाविली. पुढें सतराव्या शतकांत व्हेनिसच्या भरभराटीस उतरती कळा लागून तें नामशेष होत चाललें.

१७०० मध्यें स्पेनचा राजा दुसरा चार्लस मरण पावला, व स्पेनच्या गादीवर कोणी बसावें याबद्दल तंटा उपस्थित झाला. फ्रान्सचा राजा चवदावा लुई हा आंजूचा ड्यूक फिलिप याचा हक्क दाखवूं लागला व आस्ट्रियाचा आर्चड्यूक चार्लस हा यास विरोध करूं लागला. सॅव्हॉयच्या एजननें फ्रेंच सैन्याचा अनेक ठिकाणीं पाडाव करून इ. स. १७०७ मध्यें फ्रेंच सैन्य इटलींतून घालवून दिलें. एजनच्या या कामगिरीबद्दल दुसरा व्हिटर अमेडस यांच्या राज्यास १७१३ च्या युट्रेक्टच्या तहांत सिसीली बेट, मांटफेरांट व अलसांड्रिया हे प्रांत जोडण्यांत येऊन त्याला राजा ही पदवी देण्यांत आली. या वेळेपासून त्याची स्वतंत्र राजांत गणना होऊं लागली. आस्ट्रियाच्या चार्लसनें मिलान मांतुआ, नेपल्स व सार्डीनिया हे प्रांत बळकाविले. यानंतर पांचव्या फिलीपनें पुन्हा इटलीपैकीं कांहीं प्रांत हस्तगत करण्याचा प्रयत्न केला, पण त्यांत त्याला यश आलें नाहीं. याच सुमारास सॅव्हायच्या राजानें सिसीली बेटाबद्दल सार्डीनिया बेट घेतलें इ. स. १३७० मध्यें अमॅडसनें सॅव्हॉयचें राज्य आपला मुलगा तिसरा चार्लस एमॅन्युअल याच्या स्वाधीन केलें.

१७३७ त डॉन कार्लोस याच्याकडे नेपल्सचा राज्यकारभार येऊन मराया थेरेसचा नवरा लोरेनचा ड्युक फ्रान्सिस याच्या ताब्यांत टस्कनी व पार्मा ही दोन संस्थानें आलीं. याच सुमारास चार्लस एम्यान्युअलनें टारांटो व नोव्हारा हे प्रांत हस्तगत केले. ऑस्ट्रियाच्या गादीवर वारसासंबंधीं युद्ध झाल्यावर १७४८ त आकेन उर्फ एलाचापेल येथें तह झाला. या तहान्वयें पामा, पासेंझा व गुस्तल्ला यांचें राज्य फिलीपचा मुलगा डॉन फिलीप याला देण्यांत आलें. तिसऱ्या चार्लसकडे नेपल्सचें राज्य तसेंच कायम राहिलें. मिलान व टस्कनी हीं दोन संस्थानें आस्ट्रियाच्याच सत्तेखालीं राहिलीं. मोडेना व जिनोवा हे दोन प्रांत फ्रान्सच्या छत्राखालीं गेले. पुढें १७४८–९२ पर्यंत इटली देशांत सर्वत्र शांतता नांदत होती.

१७९६–१८१४ प र्यं त—इ. स.१७९७ त नेपोलियननें इटली देशांत येऊन सिसलपाइन व लिगुराईन अशा दोन लोकसत्ताक राज्याची स्थापन केली. सिसलपाइन प्रजासत्ताक राज्याची मर्यादा उत्तरेस कोमो व व्हेरोना पर्यंत असून दक्षिणेस रीमीनीपर्यंत होती. लिगुराईन प्रजासत्ताक राज्य जिनोवाच्या जागेवर वसलें होतें. १७९८ त कॅंपो फोर्मि-

योच्या तहान्वयें आस्ट्रियानें व्हेनिस घेतलें. याच सुमारास रोम येथील लोकसत्तावाद्यांनी फ्रेंच सैन्याच्या मदतीनें सहावा पायस या पोपला हांकून देऊन तेथें एक नवीन प्रजासत्ताक राज्याची स्थापना केली. १७९९त नेपल्समधील लोकसत्तावाद्यांनी चवथ्या फर्डिनंडची सत्ता झुगारून देऊन पार्थेनोपियन नांवाचे लोकसत्ताक राज्य स्थापिलें, परंतु हें फार दिवस टिकलें नाहीं. याच सुमारास फ्रान्स देशांतील नियामक मंडळानें ( डिरेक्टरी ) सार्डीनियाच्या चवथ्या चार्लस एमॅन्युअलास आपलें राज्य सोडावयास लाविलें.

ने पो लि य न चा का ळ—(इ. स. १७९६-१८१४): फ्रेंच राज्यक्रांतींतील (१७८९)तत्त्वें व नेपोलियनचा प्रत्यक्ष अम्मल यांमुळें इटलीमध्यें राष्ट्रीय ऐक्य व सामर्थ्य यांची नवी जागृति झाली. ( नेपोलियन हा लेख पहा ) आतां प्रथम १७९६ च्या सुमारास इटलींत काय स्थिति होती ती पाहूं. गेल्या कित्येक पिढ्या इटलींत कधीं हॅप्सबर्ग घराण्याची तर कधीं बोर्बोनघराण्याची सत्ता चालू होती. सत्तेची विभागणी ( १ ) हॅप्सबर्ग ( आस्ट्रियन ) घराण्याची मिलान, टस्कनी, पीडमॉंट या प्रदेशावर ( २ ) बार्बोन ( स्पॅनिश घराण्याचा ) नेपल्स सिसिली. पार्माची डची यांवर व ( ३ ) स्वतंत्र सार्डिनिया, पोपचा मुलूख, याप्रमाणें होती. परकीय अम्मल नाहींसा करून इटालीला स्वतंत्र करण्याचा प्रयत्न प्रथम १७९४ मध्यें करण्यांत आला, तो निष्फळ झाला. पुढें नेपोलियननें आपल्या स्वारींत ह्या प्रवृत्तीचा फायदा घेऊन इटलींत सिस-आल्पाईन लोकसत्ताक, जिनोईज लोकसत्ताक, रोमचें लोकसत्ताक ( रिपब्लिक ) निर्माण करून फ्रान्सचें वर्चस्व हळूहळू इटालीभर स्थापित केलें. सहाव्या पायसला हांकून देऊन पोपची सत्ता नष्ट केली. १८०२ मध्यें नेपोलियन फ्रेंच लोकसत्तेचा पहिला कॉन्सल असतां त्यानें प्राचीन रोमनपद्धतीवर लष्करी वसाहती इटलीभर स्थापून निरनिराळे प्रांत सडका बांधून जोडून टाकले; उद्योगधंद्यांना उत्तेजन दिलें; पेव्हिया व बोलोना येथील युनिव्हर्सिटया चालू करून देशाला शांतता व भरभराट यांचा लाभ करून दिला. राज्यव्यवस्थेकरितां एक मंत्रिमंडळ ( कनव्हल्टा ) व जमीनदार, विद्वान व व्यापारी यांनीं मताधिकार देऊन त्यांनीं निवडलेल्या १५० प्रतिनिधींचें एक कायदेमंडळ बनविलें. पुढें नेपोलिअननें आपल्या महत्त्वाकांक्षेनुरूप फ्रान्सचा बादशहा झाल्यावर (मे, १८ १८०४ ) इटालीचें राज्य फ्रेंच साम्राज्यास जोडून तेथें आपला भाऊ जोसेफ याला राजा नेमिलें. जुने लष्करी जमीनदारींतील कायदेकानू नाहींसे करून आपल्या 'कोड नेपोलियन'च्या पद्धतिवर कायदे सुरू केले. त्यानें सातव्या पायस या पोपचा अधिकार पुन्हां सुरू केला, परंतु हें दोघांचें सख्य फार दिवस टिकलें नाहीं.

एकंदरीनें नेपोलियनच्या सत्तेमुळें राज्यकारभार, कायदे, न्यायपद्धति, शिक्षण, सडका व लोकोपयोगी गोष्टी या बाबतींत इटालीला फार फायदा झाला, ही गोष्ट खरी असली तरी त्याच्या साम्राज्यतृष्णेमुळें व स्वार्थी राज्यकारभारामुळें इटालियन लोकांना नेपोलियनचा अम्मल नकोसा होऊन त्यांना स्वातंत्र्य व लोकशाही यांची उत्कंठा अधिक लागली. १८१५ मध्यें इंग्लंड, प्रशिया, रशिया, आस्ट्रिया या दोस्तराष्ट्रांच्या सैन्यानें नेपोलियनची सत्ता कायमची नष्ट केली. तथापि व्हिएन्नाच्या तहानें ( १८१५ जून ९ ) इटालींतील प्रांतांच्या सरहद्दी पूर्ववत कायम होऊन सर्व इटाली पूर्ववत ऑस्ट्रियाच्या साम्राज्यसत्तेखालीं गेला. लॉबार्डी, व्हेनेशिया, मोडेना, पार्मा, टस्कनी वगैरे प्रांतांत आस्ट्रियन अम्मल सुरू होऊन जर्मन किंवा स्लाव्ह अधिकारी नेमले जाऊं लागले. पोलीसखात्याचा जाच सुरू झाला, व सर्व सूत्रें व्हिएन्ना येथून हालूं लागलीं. तात्पर्य इटालीचें पारतंत्र्य पूर्ववत कायम राहिलें.

न वी न वि चा र क्रां ति.—( १८१५–१८७० ) सार्डीनियाचा राजा पहिला व्हिक्टर एम्यॅान्युल हा एकटाच कायतो तद्देशीय सत्ताधारी इटालींत होता, परंतु त्यानेंहि फ्रेंच राज्यक्रांतींतील नव्या तत्त्वांचा स्वीकार न करतां जुनीं राज्यपद्धतीच पुन्हां स्थापन केली. यामुळें इटालींत सुशिक्षित जनतेस समाधान न वाटतां इटालीचें एकराष्ट्र बनवून स्वातंत्र्य मिळविण्याची इच्छा जोरानें वाढूं लागली. आणि वरील कार्याकरतां अनेक गुप्तमंडळें स्थापन होऊं लागलीं. त्यांत कार्बोनरीच्या संस्था प्रमुख होत्या (कार्बोनरी पहा ) सार्डीनियाच्या राजाला औरस वारस नव्हता. तेव्हां आस्ट्रियाचा प्रधान मेटर्निक यानें तो प्रदेश ऑस्ट्रियन सत्तेखालीं आणण्याचा घाट घातला. तेव्हां प्रिन्स आलबर्ट या स्वातंत्र्यवादी राजघराण्यांतील पुरुषानें कार्बोनरिस्ट पक्षाच्या मदतीनें बंड उभारलें. परंतु ऑस्ट्रियन सैन्यानें तें पूर्ण मोडून टाकलें. तथापि पुढें कार्बोनरिस्ट चळवळ लॉंबार्डींत पसरून मिलान येथें कांऊट कांफलोनेरी, कवि पेलिको वगैरे पुढाऱ्यांनीं बंडाचा दुसरा एक प्रयत्न केला, पण तोहि मोडला गेला. पोपच्या मुलखांतहि सातवा पायस व बारावा लियो यांच्या जुलमी अम्मलामुळें स्वातंत्र्यवादी पक्षाची वाढ होत होती.

१८३० मध्यें यूरोपभर राज्यक्रांत्या झाल्या. फ्रान्सच्या लुई. फिलिप राजानें इतर देशांच्या अंतःकारभारांत न पडण्याचें व इतर देशांना न पडूं देण्याचें धोरण जाहीर केलें. त्यामुळें इटलींत स्वातंत्र्यवादी पक्षाला जोर आला, आणि रोमाग्ना, पार्मा, मोडेना येथें बंडें झाली; परंतु त्यांत फारसा जोर नव्हता; लवकरच फ्रेंच राजानें आपलें धोरण बदललें, आणि आस्ट्रियानें सर्व बंडें मोडून टाकलीं; व त्यावरून इटलींतील सामान्य जनता स्वातंत्र्य व एकराष्ट्रीयत्व मिळविण्यास खरी लायक झालेली नव्हती हें सिद्ध झालें.

मॅ झि नी व त रु ण इ ट ली.—१८३१ एप्रिल २७ रोजीं सार्डीनियाच्या राज्यांतील पीडमॉंट येथें प्रिन्स आल-

बर्ट राजा झाला. लवकरच त्याला एक पत्र मिळालें; त्यांत स्वातंत्र्यवादी पक्षाचा पुढाकार घेण्यास त्याला अत्यंत नम्र भाषेंत आग्रह केला होता. हा लेखक म्हणजे प्रसिद्ध मॅझिनी होय; तो त्यावेळीं केवळ सव्वीस वर्षांचा होता. त्याला कार्बोनारिझममधील गुप्तता व इतर कांहीं वेडगळ गोष्टी पसंत नसल्यामुळें त्यानें स्वातंत्र्य, एकी, व सुधारणावादी असा एक नवीन "तरुण इटली" नांवाचा पक्ष तयार करण्यास सुरवात केली त्यानें प्रथम फ्रान्समधून व नंतर लंडनमधून लेखनद्वारा आपली चळवळ चालविली होती. तेव्हांहि कित्येक लहानसहान बंडें झालीं, पण तीं सर्व मोडून आस्ट्रियानें कडक अम्मल ठेवला होता. मॅझिनीचा भर गुप्त कट, गुप्त मंडळ्या यांवर विशेष होता; त्यामुळें त्याच वेळीं दुसरा एक सुधारणावादी पक्ष निघाला होता; त्या पक्षानें राज्यक्रांतीपूर्वी लोकांनां शाळा, पुस्तकें, मासिकें यांच्याद्वारें सुशिक्षित करणें, रेल्वे, शेतकी, उद्योगधंदे यांची वाढ करणें ह्या गोष्टी हातीं घेतल्या. गिओबर्टी, काऊंट बाल्बो यांनीं या मार्गासंबंधानें पुस्तकें लिहून पीडमाँटच्या आलबर्टलाच या बाबतींत पुढाकार घेण्यास आग्रह केला. शिवाय या सुमारास स्पेन, ग्रीस, पोलंड, दक्षिणअमेरिका येथें राहून कित्येक इटालियन तरुण कलेचें शिक्षण घेत होते, तर कित्येक लंडन व पॅरिसमध्यें राहून विद्वत्तेच्या जोरावर तेथील राजकारणी पुरुषांची इटालीच्या स्वातंत्र्यप्राप्तीच्या कामांत मदत मिळविण्याच्या प्रयत्नांत होते. या चारी प्रकारच्या चळवळी बरूरच होत्या. क्रांतिकारक बंडखोरांमुळें आस्ट्रियाची केवळ तरवारीच्या जोरावर राज्य करण्याची घमेंड जिरत असे; सौम्य सुधारणावादी पक्षामुळें बरच्यासारख्या क्रांतिकारकांवरहि सात्विक तेजाचा दाब असे; परदेशांतील स्वयंसैनिक इटालियनांनां युद्धकलेचा अनुभव मिळत होता. व शांतताप्रिय विद्वान इटालियनामुळें परराष्ट्रीयांमध्यें इटालीबद्दल आदर उत्पन्न होत होता.

**१८४८ मधील राजकारण.**—१८४६ मध्यें पोप १६ वा ग्रेगरी मरण पावून ९ वा पायस पोप झाला. हा उदार धोरणी असून त्यानें राजकीय कैद्यांनां माफी दिली, सामान्य लोकांनां उच्च जागा दिल्या, व राजकीय वर्तमानपत्रें चालविण्यासहि परवानगी दिली. एवढ्यानें लोक संतुष्ट व्हावे, ही त्याची अपेक्षा होती, पण ती खोटी ठरून उलट लोक नियंत्रित राज्यकारभार पद्धतीबद्दल मागणी करूं लागले, व सर्व इटालीभर नीच लाट उसळली. मेटरनिकला या पोपच्या धोरणाचा राग आला व त्यानें दडपशाही सुरू केली; तेव्हां पोपच्या पक्षाला चार्लस आलबर्ट व सर्व सुधारणावादी इटालियन लोक मिळाले; व निरनिराळ्या संस्थानांत लोकांनां थोडथोडे हक्क मिळत चालले. परंतु त्यावेळचा सिसिलीचा राजा दुसरा फर्डिनांड याच्या हट्टी व मूर्खपणाच्या धोरणामुळें १८४८ मध्यें राज्यक्रांतीस प्रथम तेथें सुरुवात झाली, व त्या सालांत सर्व यूरोपभर राज्यक्रांत्या घडून आल्या. पीडमाँट येथें काऊंट काव्हूर याच्या अत्यंत जोरदार चळवळीमुळें तेथील राजानें नियंत्रित राज्यपद्धतीची सनद लोकांस दिली. व भावी इटालियन राज्यांत तीच राज्यपद्धती कायम झाली. त्याअन्वयें एक सरकारनियुक्त सेनेट व लोकप्रतिनिधिसभा यांना कायदे करण्याचा अधिकार मिळून राजाकडे मनाईचा (व्हेटो) अधिकार मात्र राहिला शिवाय मुद्रणस्वातंत्र्य, सभास्वातंत्र्य व भाषणस्वातंत्र्यहि मिळाले. लवकरच टस्कनीमध्यें अशीच पद्धति सुरू झाली. पुढें खुद्द व्हिएन्ना येथें राज्यक्रांति होऊन मेटरनिकला पळून जावें लागलें. तेव्हां लॉंबर्डी, व्हेनेशिया या आस्ट्रियन मुलुखांतहि प्रजेला थोडेसे हक्क मिळाले. तथापि तेवढ्यानें समाधान न होऊन तेथें आस्ट्रियन फौजेविरुद्ध मॅनराच्या नेतृत्त्वाखालीं मोठें बंड उभारलें गेले; त्याबरोबर व्हेनिस, मिलान, मोडेना, पार्मा वगैरे ठिकाणीं बंडें झालीं व पोपनें प्रसंगावधानें या प्रयत्नांस शुद्ध आशिर्वाद देऊन आस्ट्रियाविरुद्ध उघड लढाईची तयारी करण्यास आपली संमति दिली.

**इटालीचें पहिलें स्वातंत्र्य युद्ध.**—आतां मात्र सर्व इटालियनांमध्यें आस्ट्रियाविरुद्ध युद्धाचें वारें संचारलें; आणि पीडमाँटचा राजाच पुढाकार घेण्यास लायक असल्यामुळें काव्हूरनें आपल्या 'रिसोर्जिमेंटो'मधील लेखांनीं तसेंच करण्यास त्याचें मन वळविलें; आणि १८४८ मार्च २३ रोजीं त्यानें युद्ध पुकारलें. पोपच्या व टस्कनी, नेपल्स वगैरे ठिकाणच्या राजांच्या फौजा मागोमाग त्याच्या सैन्यास मिळाल्या, व त्यांनीं आस्ट्रियाचे लॉंबर्डी व व्हेनेशिया हे प्रांत घेतले; पण आस्ट्रियाचा सेनापति रॅडेझ्की यानें इटालियनांचा मोड करून ते प्रांत परत घेतले. पोपची सत्ता कमी कमी होत जाऊन खुद्द रोममध्यें बंडाळी माजली, तेव्हां पोप रोम सोडून पळून गेला; व त्यानें फ्रान्स, आस्ट्रिया, स्पेन यांची मदत मागितली. तथापि तूर्त रोम मॅझिनीच्या फारा दिवसांच्या इच्छेनुरूप लोकपक्षाच्या हातीं आलें, व पोप आणि इतर पदच्युत अरेरावी राजे गाएटा येथें पळून जाऊन राहिले. पीडमाँट येथें नियंत्रित राजशाही शाबूत होती. तेथील आलबर्ट राजावर आतां युद्धाची सर्व जबाबदारी पडून तो मोठ्या पेंचांत सांपडला. व्हिएन्ना येथें क्रांतिकारक पक्षाचा पूर्ण मोड होऊन पूर्ववत् बादशाही सुरू झाली; व नवा बादशहा फ्रॅंसिस जोसेफ याच्या सैन्यानें पोपच्या इच्छेनुरूप व आपल्या साम्राज्यसत्तेच्या संरक्षणार्थ पीडमाँटच्या राजावर चाल करून त्याचा नोव्हारा येथें पूर्ण मोड केला. तेव्हां आलबर्टनें राज्यत्याग करून आपला मुलगा व्हिक्टर इमॅन्यूअल याचे हातीं राज्य दिलें. तथापि त्यालाहि नाइलाजानें आस्ट्रियन सेनापति रॅडेझ्की याच्या अपमानास्पद अटी मान्य करून तह करावा लागला. शिवाय या तहानें नेपल्स टस्कनी वगैरे ठिकाणीं अरेरावी राजांनां पूर्ववत् राज्य सुरू करण्याचा मार्ग मोकळा झाला. रोम येथें मॅझिनी

गॅरिबॉल्डी यांच्या नेतृत्वाखालीं लोकपक्षानें शेवटपर्यंत नेट धरला; पण आस्ट्रियाच्या मदतीला फ्रान्स येऊन दोघांनीं जेव्हां रोमवर हल्ले चढविले तेव्हां पराभूत होऊन मॅझिनी व गॅरिबॉल्डी दोघांनां पळून जावें लागलें. याप्रमाणें रोम-शहर पडल्यावर व्हेनीसला सर्व इटालियन वीरांनीं जमून शेवटला झगडा केला पण अखेर तेंहि शहर आस्ट्रियनांनीं घेतलें. याप्रमाणें या पहिल्या युद्धांत इटलीचा पूर्ण पराभव होऊन पुन्हां आस्ट्रियाचा व पूर्वीच्या अनियंत्रित मांडलिक राजांचा अम्मल इटलीभर सुरू झाला. तथापि या युद्धानें एकराष्ट्रीयत्वाची भावना अधिक दृढ झाली, व आस्ट्रिया व अरेरावी मांडलिक यांच्याबद्दल अधिकच लोकमत प्रक्षुब्ध झालें; व पीडमांटची पुढारी होण्याची लायकी अधिकाधिक सिद्ध झाली.

काव्हूर.—पीडमांटनें प्रथम तहाच्या अटी कडक म्हणून अमान्य केल्या. परंतु इम्यान्युअलनें त्यांनां बेतलेल्या प्रसंगाची जाणीव करून दिल्यावर व आस्ट्रियानेंहि थोड्या अधिक सवलती दिल्यावर तह कायम झाला. तेव्हां लगेच पार्लमेंटनें दुसऱ्या स्वातंत्र्ययुद्धाच्या तयारीच्या दृष्टीनें काय-देकानू करून सुधारणा सुरू केल्या. प्रसिद्ध मुत्सद्दी काव्हूर हा १८५० मध्यें शेतकीखात्याचा दिवाण झाला; १८५१ त जमाखर्चाचें खातें त्याचेकडे आलें; व १८५९ मध्यें राजानें त्याला मुख्य प्रधान नेमिलें; व त्यापदावर तो मरेपर्यंत कायम होता. १८४९–१८५९ या काळांत आस्ट्रियानें आपली इटालियन प्रजा निशस्त्र करून राजद्रोहाच्या व्यापक कायद्याखालीं भयंकर दडपशाही चालविली असल्यामुळें पीडमांटच्या राज्याची व तद्द्वारा इटलींतील राष्ट्रीय चळव-ळीचीं सूत्रें हालविण्याचें अत्यंत बिकट झालेलें काम काव्हू-रला करावयाचें होतें. मॅझिनीनें लोकमताचा व परिस्थि-तीचा बरोबर ठाव न घेतां गुप्तकटांच्या द्वारें चालविलेल्या बंडखोरीमुळें काव्हूरच्या अडचणींत अधिकच भर पडली. अशा परिस्थितींतहि आस्ट्रियाला हाकलून देणें व इटालीचें एकराज्य बनविणें हे दोन्ही उद्देश सतत डोळ्यापुढें ठेवून त्या दृष्टीनें सुधारणा करण्याकरितां जादा कर बसविणें वगैरे कित्येक अप्रिय गोष्टी कराव्या लागून लोकांची अप्रियता व विरोध सहन करावा लागला. इतक्यांत क्रिमियन-युद्धाचा प्रश्न निघून इमॅन्युअल राजानें व काव्हूरनें दूरदृष्टीनें विरोधपक्षाची समजूत घालून पीडमॉटचें १५००० सैन्य लढाईस पाठविलें. त्या सैन्यानें चांगला पराक्रम गाजवून युद्धाचा अनुभव मिळविला, इतकेंच नव्हे तर या साहाय्याचा मोबदला म्हणून काव्हूरच्या अपेक्षेप्रमाणें पॅरिसला भरलेल्या ( १८५६ )तहपरिषदेंत खुद्द काव्हूरनें प्रतिनिधि या नात्यानें पुढें मांडलेल्या इटालीच्या स्वातंत्र्यांच्या व नियंत्रित राज्य-पद्धतीच्या प्रश्नांचा मोठ्या सहानुभूतीपूर्वक विचार करण्यांत आला. या बनावामुळें धास्ती वाटून आस्ट्रियानें पूर्वीची दडपशाही कमी करून इटालियनामध्यें कांहीं कर कमी करून थोडे फार मुद्रणस्वातंत्र्य देऊन व राजकीय कैदी मुक्त करून साम्राज्यनिष्ठा वाढविण्याचा प्रयत्न चालविला; रॅडोझ्कीच्या मागून चांगला दयाळू व्हॉइसराय नेमला; तथापिहि इटालीयनांनीं स्वातंत्र्याच्या ध्येयावरील आपली दृष्टी ढळूं दिली नाहीं.

इटालियन संस्थानिकांनीं मात्र वरील गोष्टींपासून कोण-ताहि धडा न घेतां, मोडेना येथें ५ व्या फ्रांसिसनें, पार्माच्या ३ ऱ्या चार्लसनें टस्कनिच्या लिओपोल्डनें जरा बेतानें रोमच्या पोपनें, व नेपल्सच्या राजानें पूर्ववत अरेरावी व दडपशाही जोरांत चालविली होती. इकडे मॉझिनीचें वजन कमी झालें, व नवा एकराष्ट्रीयत्वावादीपक्ष बळावत होता. काव्हूर व इम्यान्युअल राजा दोघे गुप्तपणें त्या पक्षाशीं संबंध ठेवून बाह्यतः क्रान्तिकारक उपायाबद्दल पूर्ण नापसंती दाखवून परराष्ट्राची सहानुभूती संपादन करीत होते; कारण परराष्ट्रांच्या मदतीवांचून आस्ट्रियाचें जूं झुगारून देण्याचें सामर्थ्य इटालीच्या अंगांत नव्हतें, हें ते पूर्ण जाणून होते. व काव्हूरनें या धोरणानें मोठे प्रयत्न चालविले. ग्रेटब्रिटनची मदत मिळणें अधिक इष्ट होतें, पण इंग्लंडचें धोरण अनुकूल दिसेना; तेव्हां फ्रान्सच्या तिसऱ्या नेपोलियन बादशहाची मदत मिळविण्याचा काव्हूरनें दृढ प्रयत्न चालविला; नेपो-लियनचेंहि अन्तःकरण इटालीकडे फार ओढत असे, पण १८५८ जानेवारी १४ रोजीं नेपोलियनाला ठार मारण्याचा एका मॉझिनियन पक्षाच्या फेलिस ऑर्सिनी नांवांच्या तरुणानें गैरसमजुतीनें प्रयत्न केला; सुदैवानें प्रयत्न फसून ऑर्सिनी फांशींहि गेला; परंतु फांशी जाण्यापूर्वी त्या तरुणानें पत्रद्वारा आपली चूक कबूल करून बादशहाला इटलीच्या स्वातंत्र्याचा कैवारी होण्याची मोठ्या कळवळ्यानें विनंति केली. बादशहानें आपलें मन न डळमळूं देतां इटालि-यानांचें दृढ स्वातंत्र्यप्रेम ओळखून अखेर काव्हूरला पुढील अटींवर ऑस्ट्रियाविरुद्ध मदत करण्याचें कबूल केलें. पीडमॉटच्या १ लक्ष सैन्यास फ्रान्सनें २ लक्ष सैन्य मदत द्यावें; इटालींत उत्तरेस पीडमॉटचें, मध्यवर्ती रोमचें व दक्षि-णेंत नेपल्सचें अशीं तीन राज्यें स्थापावीं; पोपला इटालियन राज्यसंघाचा प्रेसिडेंट करावा. फ्रान्सला मदतीबद्दल सॅव्हाय प्रांत द्यावा; व इमॅन्युअलची कन्या फ्रान्सच्या जेरोम नेपोलियनला द्यावी. या अटी कायम होऊन १८५९ च्या जानेवारींत काव्हूर व नेपोलियन यांनीं त्या जाहीरहि केल्या, तेव्हां सर्व युरोप आश्चर्यचकित होऊन आस्ट्रिया इटालीच्या प्रश्नांत पडले; व तो प्रश्न युरोपियन राष्ट्रांनीं आपली कॉंग्रेस भरवून त्यांत सोडवावा अशी सूचना आली; व ऑस्ट्रियानें पीडमॉटला त्यांतून वगळण्याच्या अटीवर आपली संमतीहि दिली; पण काव्हूरनें मात्र त्या अपमाना-स्पद गोष्टीचा पूर्ण निषेध केला. आणखीहि कांहीं रदबदलीचे प्रयत्न झाले, पण आस्ट्रियांत युद्ध पक्ष प्रबल होऊन एकदम १८५९ एप्रिल २९ रोजीं आस्ट्रियानें युद्ध सुरू केलें.

इटालीचें दुसरें स्वातंत्र्य युद्ध.—फ्रान्सनें ठरल्याप्रमाणें इटलीस मदत केली. गॅरिबाल्डी आपल्या स्वयंसैनिकांसह येऊन मिळाला; व आरंभीं मॅगेंटा, सोल्फेरिनो वगैरे लढायांत हार खावी लागली. याप्रमाणें शुभारंभ झाला. इतक्यांत नेपोलियननें युद्धांतून आंग काढून ऑस्ट्रियाशीं तहाचें बोलणें लावलें. तेव्हां सर्व आश्चर्यचकित झाले; कोणालाच हें कोडें उकलेना; पण फ्रान्सचीं अंतस्थ कारणें होतीं तीं अशीं कीं, फ्रेंच सैन्याची युद्धाची तयारी चांगली नव्हती, आस्ट्रियाला प्रशिया मिळण्याचा संभव होता, इटली स्वतंत्र झाल्यास त्याचें बलिष्ठ राष्ट्र बनण्याची भीति होती व खुद्द बरेच फ्रेंच लोकमत या युद्धाविरुद्ध होतें. या कारणामुळें लॅंबार्डी प्रांत पीडमॉंटला जोडून फक्त व्हेनेशिया ऑस्ट्रियाकडे रहाण्याचें व इटालीचा राज्यसंघ पोपच्या अध्यक्षत्वाखालीं करण्याचें ठरलें. आस्ट्रियाचें पूर्ण उच्चाटण झालें नाहीं म्हणून काव्हूर नाखूष झाला, पण इमॅन्यूअलनें अधिक मुत्सद्दीपणा दाखवून तह केला, व काव्हूरचा प्रधानपदाचा राजीनामा मंजूर केला.

एकराष्ट्रीकरण.—वास्तविक पाहतां वरील युद्धाचा व तहाचाहि मुख्य फायदा असा झाला कीं, व्हेनिशिया खेरीज करून इटालीवरील ऑस्ट्रियानें सार्वभौमत्व नष्ट झालें व यूरोपनें इटालीचें स्वातंत्र्य कबूल केलें. आतां प्रश्न एवढाच राहिला कीं इटालीला राज्यसंघाचें दिलेलें स्वरूप मोडून त्याचें एकराष्ट्र बनवावयाचें. कारण पोपला फ्रान्सची मदत असल्यामुळें इटालींत अन्तःकलह व अरेरावी राज्यकारभार पोपचें राज्यांत व इतर संस्थानांत चालूच होते. इटालीचें बलिष्ठ राष्ट्र बनण्यास प्रथम वरील अव्यवस्था मोडून त्याचें एकराष्ट्र करणें अत्यंत जरूर होतें; हें जाणून इमॅन्युअलनें आतां तिकडे लक्ष वळविलें. टस्कनीच्या ग्रँडड्यूक लिओपोल्डनें गेल्या स्वातंत्र्य–युद्धांत भाग न घेतल्यामुळें त्याच्या प्रजेनें बंड उभारलें, व त्याला पदच्युत केलें, तेव्हां इमॅन्युअलनें मध्यें पडून हळूहळू तो सर्व प्रांत पीडमॉंटच्या राज्यास जोडून टाकला. नंतर मध्यइटालींतील पोपच्या राज्यांत बंडाळी माजली, व गॅरिबाल्डीनें रोम व्यतिरिक्त प्रांतांत पोपची सत्ता नाहींशी करून तेथें एक स्वतंत्र राज्य उभारलें. इमॅन्युअल राजा फ्रान्सला भिऊन मध्यें पडण्यास कचरत होता. पण सॅव्हॉय व निसे हे प्रांत अद्याप फ्रान्सला मिळाले नव्हते; निसे ही गॅरिबाल्डीची जन्मभूमी असल्यानें काव्हूर अद्यापहि त्या विरूद्धच होता; तेव्हां ते वरील प्रांत घेऊन मध्यवर्ती राज्य, पोपची रोमपुरती सत्ता कायम ठेवून, पीडमॉंटच्या राज्यास जोडण्यास फ्रान्सनें संमती दिली त्याबरोबर काव्हूरनें प्रधानपद स्वीकारून वरील तह फ्रान्सबरोबर कायम केला.

गॅरिबॉल्डी.—१८५९ पासून सुरू झालेले इटालियन पार्लमेंट जेव्हां १८६० मध्यें भरलें तेव्हां गॅरिबाल्डीच्या पक्षानें वरील तहास जोराचा विरोध केला, तरीहि अखेर पार्लमेंटनें त्यास संमती दिली, त्या सुमारास खालीं नेपल्सच्या राज्यांतहि दुसऱ्या फ्रँसिस राजाविरुद्ध सुधारणावादी पक्षानें बंड उभारलें होतें. गॅरिबाल्डीनें तर जेथें तेथें क्रांतिकारक पक्षास सैन्यासह जाऊन मदत करण्याचा धंदाच चालविला होता. इकडे इमॅन्युअल राजा व काव्हूर यांनीं एकमतानें सर्व इटालियन प्रांत आपल्या पीडमॉंटचें राज्यास जोडून शेवटीं इटालीचें एक बलिष्ठ राष्ट्र बनविण्याचें धोरण कायम चालविलें होतें. त्यामुळें गॅरिबाल्डीशीं त्यांचे खटके उडत असत, परंतु तिघेहि पूर्ण निःस्वार्थी व निस्सीम देशभक्तीनें प्रेरित झाले असल्यामुळें त्यांच्यातील तात्पुरते मतविरोध त्वरित लयाला जात असत, ही पण जाणीव असल्यामुळें इमॅन्युअल राजा व काव्हूर यांनीं नेपल्सच्या भानगडींत पडण्याचें व दिसण्यात गॅरिबाल्डीच्या विरुद्ध असें कारस्थान सुरू केलें; शिवाय त्यांचेजवळ सैन्याची बळकटी चांगली असेच. तिकडे गॅरिबोल्डीनें सिसिली बेटांत मॅझिनीच्या पक्षानें चालविलेल्या राज्यक्रांतीस प्रथम मदत केली, व कॅलटॅफिमी येथें निआपोलिटन सैन्याचा तो पराभव करून आपण स्वतः सिसिलीचा डिक्टेटर झाला; व लवकरच त्यानें सर्व बेट काबीज केलें. पुढें तावडतोब सैन्यासह तो नेपल्सवर चालून आला. तेथील राजा अगोदरच पळून गेला होता, त्यामुळें लढाईवांचूनच नेपल्सचें राज्य ताब्यांत घेऊन तो त्याचाहि डिक्टेटर झाला. नंतर रोम येथील पोपच्या राज्यावर गॅरिबाल्डी स्वारी करील अशी भीति वाटूं लागली. पोपवर स्वारीमुळें फ्रान्स मध्यें पडून सर्वच बिघाड झाला असतां; तेव्हां रोमच्या वाटेस न जाण्याबद्दल इमान्युअल राजा व काव्हूर यांनीं त्याला लिहून कळविलें; पण तें तो जुमानीना–तेव्हां गॅरिबॉल्डिशीं सामना देण्याकरतां स्वतः इमान्युअल राजा ३५००० सैन्यासह निघाला, दोघांची नेपल्स येथें गांठ पडली, पण चमत्कार असा झाला कीं, लढाई करण्याच्या ऐवजीं गॅरिबाल्डीनें आपलें सर्व सैन्य इमॅन्युअलच्या स्वाधीन केलें. राज्याचा आजन्म व्हाइसरॉय स्वतःला नेमण्याबद्दल त्यानें राजाजवळ राजाला विनंति केली; पण राजानें अत्यंत दूरदृष्टीनें ती अमान्य केली; तेव्हां तो कॅमेरी येथील आपल्या घरीं जाऊन स्वस्थ राहिला. इमॅन्युअलनें नेपल्सचें राज्य ताब्यांत घेतलें. १८६१ फेब्रुवारी १८ रोजीं ट्यूरीन राजधानींत इटालियन पार्लमेंट भरलें, व त्यांत इमॅन्युअल इटाली राष्ट्राचा राजा असें जाहीर करण्यांत आलें. या नव्या इटालियन राष्ट्राला ग्रेटब्रिटननें आपली मान्यता एका पंधरवड्याचें आंत दिली; आणि रोम व व्हेनेशिया हे दोन खेरीज करून सर्व इटली एक छत्राखालीं आला.

व्हेनेशिया.—या नव्या इटालियन सरकारला माजी राजांनीं दक्षिणेंत उभारलेली बंडाळी साफ मोडण्यास पहिली पांचचार वर्षे कडक उपाय योजावे लागले. शिवाय गॅरिबा-

ल्डींच्या स्वयंसेवकांनां बक्षीस काय द्यावयाचें व यांची पुढें व्यवस्था काय लावावयाची हा प्रश्न निघून काव्हूर खुद्द गॅरीबाल्डी, नेपल्सचा प्रतिनिधी, यांच्यामध्यें पार्लमेंटांत अत्यंत कडाक्याचा वाद झाला; पण राजाच्या मध्यस्तीनें तोहि तंटा मिटला. नंतर रोमचा प्रश्न निघाला. रोम शहर इटलीची राजधानी करण्याबद्दल काव्हूरचें ठाम मत असल्यामुळें त्यानें पोपबरोबर तत्संबंधीं सर्व योजना ठरविली. पण त्यानें चालविलेल्या एकंदर उलाढालींचा शरीरावर व गॅरिबाल्डीच्या शाब्दिक भडिमाराचा मनावर परिणाम होऊन, १८६१ जून ६ रोजीं तो अकालीं व एकाएकीं मरण पावला. त्याचे मागून राजानें रिकासोली यांस मुख्यप्रधान नेमलें. नंतर १८६२मध्यें रॅटेझी यांस नेमलें, दोन वर्षांत तीनचारदां मुख्य प्रधान पालटले, पण रोमचा प्रश्न कोणालाच नीटपणें सुटेना. मध्यंतरीं १८६२ मध्यें गॅरिबाल्डीनें उतावीळपणानें ससैन्य रोमवर चाल केली, पण सरकारी सैन्यानें तो प्रयत्न हाणून पाडला. गॅरिबाल्डी जखमी होऊन कैदेंत पडला, तथापि लवकरच माफी मिळून सुटला. इटालियन सरकारनें फ्रान्सशीं तडजोड करून रोमच्या ऐवजीं फ्लॉरेन्सला राजधानी नेली. तेव्हां रोममधून फ्रेंच सैन्य काढून नेण्याचें नेपोलियननें कबूल केलें, इतकेंच नव्हे तर व्हेनेशिया प्रांत इटलीला मिळवून देण्यांत मदत केली. १८६५ च्या सुमारास प्रशियांत बिस्मार्क आस्ट्रियाविरुद्ध जर्मन राष्ट्र बनविण्याच्या तयारींत होता. ह्या संधीचा फायदा घेऊन नेपोलियननें प्रशिया व इटली यांच्यामध्यें युद्धांत एकमेकांस मदत करण्याचा दोस्तीचा करार जमवून दिला. १८६६ मध्यें आस्ट्रियाबरोबर युद्ध सुरू झालें; त्यात प्रशियानें मोठाले जय मिळविले, पण इटलीचे मात्र पराजय होत होते. नेपोलियनच्या मध्यस्तीनें शेवटीं तह होऊन व्हेनेशिया फ्रान्सनें मिळविला, पण लवकरच बहुमतानें केलेल्या स्वयंनिर्णयानुसार तो प्रांत इटलीच्या राज्यांत सामील केला. आतां फक्त रोमचा प्रश्न राहिला. रोम शहर घेऊन तेथें राजधानी स्थापण्याची इमॅन्युअल राजाला अगदीं अंतःकरणापासून इच्छा असुनहि कांहीं अंशीं फ्रान्सच्या भीतीनें व कांहीं अंशीं नेपोलियन बद्दल कृतज्ञताबुद्धि असल्यानें तो दिरंगाई करीत होता. पण हातीं घेतलेलें राष्ट्रीय काम संपूर्ण तडीस नेण्याच्या इच्छेनें मॅझिनीनें रोममध्यें अंतस्थ बंडें उभारण्याचा व गॅरिबॉल्डीनें बाहेरून ससैन्य हल्ला करण्याचें काम सुरू केलें. फ्रान्समध्यें पडतें, पण त्याचवेळीं बिस्मार्कनें फ्रान्सविरुद्ध युद्धांत इटालीची मदत मिळविण्याकरतां बोलणें सुरू केलें; तेव्हां रोमच्या भानगडींत न पडण्याचें फ्रान्सनें कबूल केल्यास फ्रान्सला मदत करण्याची इच्छा इटलीनें नेपोलियनला कळविली. पण कोणताच निर्णय न होतां १८७० मध्यें फ्रान्सचें जर्मनांबरोबर युद्ध सुरू झालें; व इटलीनें तटस्थवृत्ति जाहीर केली. वरील युद्धानंतर नेपोलियनची सत्ताच नष्ट झाली; तेव्हां इमॅन्युअलचा मार्ग मोकळा होऊन त्यानें पोप नववा पायस याला रोमसह इटली राष्ट्रांत सामील होण्यास विनंति केली. व ती अमान्य होतांच ससैन्य हल्ला करून रोम शहर हस्तगत केलें; व तेथें इटलीची राजधानी स्थापली. याप्रमाणें मॅझिनी, गॅरिबाल्डी काव्हूर व इमॅन्युअल राजा यांनीं आजन्म ज्या उच्च ध्येयाकरितां भगीरथ प्रयत्न चालविले होते त्या ध्येयाच्या प्राप्तीचा सोन्याचा दिवस उगवून इटालीला पूर्ण स्वातंत्र्याचा व एकराष्ट्रीयत्वाचा लाभ १८७२ जुलैमध्यें झाला.

रा ष्ट्री य सा म र्थ्या ची वा ढ १८७०—१९०२.— इटालीच्या या विजयाबद्दल फ्रान्समध्यें नुकतेंच स्थापन झालेल्या रिपब्लिकचा प्रेसिडेंट या नात्यानें थेमिक्सनें इटलीचें अभिनंदन करून आपली संमती दर्शविली. इटलीनें दोघांसहि न दुखवितां जर्मनी व फ्रान्स यांचे बरोबर समवृत्तीनें वागणूक ठेविली. पोपबरोबरचे प्रश्नहि तडजोडीनें व उदार बुद्धीनें सोडविले; पोपची कॅथॉलिक लोकांवरील धार्मिक सत्ता मान्य करण्यांत आली. १७ कलमांचा एक 'लॉ ऑफ गॅरंटीज' नांवाचा कायदा करून पोपचे हक्क व अधिकार सर्व ठरवून टाकले; परंतु त्यांतील कांहीं कलमांनां पोपची संमती मिळाली नाहीं. पोप बद्दलचा अवघड प्रश्न साधारण मिटल्यावर दुसरा अवघड प्रश्न जमाखर्चाच्या खात्यांतील होता. उत्पन्नापेक्षां खर्चाची बाजू नेहमीं जास्त होऊन दरसाल तूट येत असे. १८६४ सालीं १४६ लक्ष पौंड तूट होती. त्यावेळीं सर्व व्यापारी मालावर व मीठ कणीक व इतर आवश्यक पदार्थांवरहि कर होते त्यामुळें कर वाढविण्याला बिलकुल जागा नव्हती. तेव्हां चर्चच्या जमीनी व सरकारी रेल्वे विकून राजाचा तनखा (सिव्हिल लिस्ट एकपंचमांश कमी ) करून दिवाणांचे व बड्या अधिकाऱ्यांचे पगारहि कमी केले, तरी तोंडमिळवणी होईना; तेव्हां सर्व दळणाचे जिन्नसावर कर बसविला. शिवाय मक्ते (मोनापली,) निर्गतमाल, तार व रेल्वे खातें यांचें उत्पन्न वाढत होतें; आणि स्टँप व रजिस्ट्रेशन यां वरील कर वगैरे अनेक उपायांनीं शेवटीं १८७२ मध्यें सेला नांवाच्या मंत्र्यानें जमाखर्चाची तोंडमिळवणी घालून दिली. विरुद्ध पक्षाचा कसून विरोध चालू असतांहि वरील कामगिरी पार पाडण्यांत सेलानें दाखविलेल्या मुत्सद्दीपणाबद्दल त्याची वाखाणणी करणें जरूर आहे. १८७३ जुलैमध्यें मोठें कर्तृत्ववान लान्झा—सेला प्रधानमंडळ ( १८६९—१८७३ ) मोडून मिंघटी–व्हिस्कोंटी–व्हेनोस्टा प्रधानमंडळ आलें. पोपमार्फत चाललेल्या शाळांत सरकारी तपासणी व परीक्षा मान्य करीनात म्हणून त्या बंद पाडण्यांत आल्या. नंतर मिंघटीनें लष्करी आरमारी सुधारणा करण्याची योजना ठरवून टाकली. व्हिस्कोंटी–व्हेनोस्टानें परराष्ट्रमंत्र्याचें काम उत्तम केलें. आपल्या नव्या

स्वतंत्र राष्ट्राचा मोठेपणा कायम राखून फ्रान्स, आस्ट्रिया व जर्मनी यांचेबरोबर दोस्ती राखण्याचें अत्यंत बिकट काम त्यानें पार पाडलें. इमॅन्युअल राजानें व्हिएन्ना व बर्लिन येथील दरबारांनां त्यांच्या बोलावण्यावरून स्वतः भेट दिली. बिस्मार्कनें पोप व इटालियन सरकारचा झगडा चालू ठेवण्याचा इमॅन्युअल राजाला आग्रह केला, पण इटालियन मुत्सद्यांनीं तें साफ नाकारलें. तथापि एकंदरींत वरील भेटींमुळें परस्पर सलोखा अधिक वाढला.

परराष्ट्रीय धोरण.— १८७६ मध्यें नवे डेप्रेटिसचें प्रधानमंडळ आलें. त्यावेळीं राजशाही मोडून लोकशाही स्थापण्याकडे कित्येकांची प्रवृत्ति दिसत होती; परंतु इमॅन्युअलनें अत्यंत धोरणानें या नव्या व अननुभवी डाव्या पक्षाच्या प्रधानमंडळाशीं वर्तन ठेविलें होतें. शिवाय मंडळांत आपसांत मतभेद बरेच असल्यामुळें राजाचें वजन कायम राहिलें. राजाचा तनखा कायद्यानें वाढविला. डेप्रेटीस प्रधानमंडळावर बिस्मार्कचें वजनहि बरेंच असून पोपबरोबर तंटा वाढणार व फ्रान्सचा हात मध्यें शिरकणार असा रंग दिसूं लागला, पण त्यावेळीं अंतःकारभाराचें खातें क्रिस्पी नांवाच्या अत्यंत धोरणी व जोरदार मुत्सद्याच्या हातीं होतें. तेवढ्यांत १८७८ जानेवारी ९ रोजीं इमॅन्युअल राजाहि वारला. गेलीं ३० वर्षें राष्ट्रीय अभ्युदयाच्या सर्व चळवळींचें तो केंद्रस्थान होता, हा उदार अन्तःकरणाचा, मोठा धैर्यवान् व अनुभवी राजा गेल्यामुळें क्रिस्पीचा मार्ग फारच बिकट झाला. पुढें फेब्रुवारींत पोप नववा पायसहि परलोकवासी झाला. हाहि इटलीच्या इतिहासांतील एक बडें प्रस्थ असून राष्ट्रीय स्वातंत्र्यप्राप्तीच्या ऐन आणीबाणीच्या काळांत त्यानें शक्य तितका विरोध, व राष्ट्रघातकी उपद्याप चालवून इमॅन्युअल वगैरे राष्ट्रपुरुषांच्या कामांत अडथळे आणण्याचें काम केलें होतें. तथापि क्रिस्पीनें समतोल बुद्धीनें रोम येथें १३ वा लिओ या पोपची गादी व सत्ता कायम राखण्यास मदत केली; व सार्डिनियाच्या राजाला पहिला हंबर्ट इटलीचा राजा म्हणून गादीवर बसविण्याचें काम मोठ्या चतुराईनें पीडमॉन्टच्या लोकांचा विरोध दूर करून पार पडलें. पण लवकरच नवें कैरोलीचें प्रधानमंडळ आलें, व त्यातर्फे १८७८ च्या बार्लीन-कॉंग्रेसमध्यें कोर्टी हा हजर राहिला. आंग्लो—ऑटोमन दोस्तीचा तह होऊन सैप्रस बेट इंग्लिशानां मिळालें; ट्रेंट व ट्रिस्ट बंदर घेऊन ॲड्रियाटिक समुद्रावर इटलीचें वर्चस्व स्थापण्याकरतां ' इरेडेंटिझम ' नांवाची चळवळ सुरू होऊन उत्तर इटलींत गुप्त कट होऊं लागले. डेप्रेटिस कैरोलीच्या प्रधानमंडळांत शिरला. रेल्वे व म्युनिसिपालट्या यांच्यावरील खर्च वाढून बजेटांत पुन्हां तूट पडूं लागली. परराष्ट्रांबरोबर मोठ्या धूर्तपणानें आपण वागत आहों, अशी इटालियन राजकारणी पुरुषांस मोठी घमेंड वाटत असे; उलट मध्यवर्ती राष्ट्रें ( आस्ट्रिया जर्मनी ) व ग्रेट ब्रिटन यांचा इटालीवरील विश्वास उडत चालला होता. फ्रान्सनें टयुनिशिया घेण्याची तयारी केली, तेव्हां त्याकरितां फ्रान्सबरोबर व ॲड्रियाटिक समुद्रावरील वर्चस्वाचे बाबतींत आस्ट्रियाबरोबर युद्धाचा प्रसंग ठेपला; पण इटलीची युद्धाची तयारी बिलकुल नव्हती. अशा निकराच्या प्रसंगीं पार्लमेंटमधील पक्षांनीं मतभेद बाजूस ठेऊन परराष्ट्रास एकमतानें तोंड देण्याचें काम केलें नाहीं ही मोठी खेदाची गोष्ट आहे. फ्रान्सनें टयुनिशिया घेतला, व रोममध्यें कांहीं दंगे झाले पण कशाचाच प्रतिकार न करतां सेला, डेप्रेटिस कैरोली सारख्यांनीं आपसांत भांडत बसून राष्ट्राची बेअब्रु मात्र केली.

त्रिराष्ट्रकूट.— अशा प्रसंगीं आस्ट्रिया व जर्मनी यांच्याशीं अधिक दृढ मैत्री करून त्रिराष्ट्रकूट स्थापन करावें असें मत इटालींत बळावलें. तथापि आस्ट्रिया जर्मनीचा तसा कल दिसेना. शिवाय अशा दोस्तीनें फ्रान्सचें शत्रुत्व व पोपकडून त्रास होण्याचा संभव होता. इतक्यांत बाल्कन प्रांतावरून रशिया व ऑस्ट्रिया यांत वितुष्ट उद्भवलें. तेव्हां बिस्मार्कनें ऑस्ट्रियाच्या बादशहास इटाली बरोबर दोस्ती करण्याची सल्ला दिला. लवकरच १८८१ आक्टोबरमध्यें हंबर्ट राजानें व्हिएन्नास जाऊन फ्रांसिस जोसेफ बादशहाला भेट दिली; तथापि इरेडेंटिझमच्या चळवळीमुळें आस्ट्रिया व इटली यांचीं मनें साफ नव्हतीं, व इटालियन मंत्री दोस्तीच्या तहास तितके तयार नव्हते. तें पाहून बिस्मार्कनें निमसरकारी वृत्तपत्रद्वारें पोपचा पक्ष घेऊन इटलीबरोबर भांडण उकरून काढण्याचा धाक घातला, व टयुनिशियासंबंधाच्या फ्रान्सच्या धोरणास मान्यता दिली. तेव्हां कोठें तहाचें बोलणें सुरू झालें; पण ट्रेंटट्रीस्टसंबंधानें व भूमध्य समुद्रासंबंधानें आस्ट्रियन प्रधान काल्नोकी व इटालियन प्रधान मॅंकिनी यांचें एकमत होईना. मध्यंतरीं इटालियन पार्लमेंटांत लष्करसुधारणा बिल पास झालें, व टयुनिशियांत फ्रान्सला विरोध करण्याकरितां गॅरिबॉल्डीनें स्वतः सैन्याची जमवाजमव चालविली होती; परंतु १८८२ जून २ रोजीं गॅरिबॉल्डी मरण पावला. त्याला इटालींत केवळ राष्ट्रदेव व पौराणिक योद्धा मानीत असत, व त्याच्या मरणानें राजापासून शेतकऱ्यापर्यंत सर्वांना अत्यंत दुःख झालें. तत्पूर्वीच १८८२ मेमध्यें फ्रँको-इटालियन व्यापारी तह होऊन लवकरच तीन राष्ट्रांचा दोस्तीचा तहहि ठरला, व फ्रान्स, रशिया यांनीं हल्ला केल्यास तिघांनीं एकदम लढाईत पडावयाचें असें ठरलें. पुढें १८८४ मार्चमध्यें आस्ट्रिया, जर्मनी व रशिया या तीन बादशाहींचा दोस्तीचा करार ठरून इटलीचें महत्त्व कमी झालें. तें जाणून इटलीनें ग्रेटब्रिटनबरोबर ईजिप्तचे बाबतींत तह केला. १८८७ पर्यंत वरील त्रिराष्ट्रकूटाच्या दोस्तींत फारसा राम नव्हता. १८८५मध्यें रोबिलंट मुख्य प्रधान झाला.त्यानें स्वतंत्र बाण्यानें वागून व मध्यंतरींच्या परिस्थितीचा व आपल्या वाढत्या लष्करी सामर्थ्याचा फायदा घेऊन १८८७ मध्यें अधिक

फायदेशीर अटींवर वरील त्रिराष्ट्रकूटाचे तहास पुनः संमति दिली.

अंतःसुधारणा.—१८८१ ते १८८७ च्या काळांत त्रिराष्ट्रीय तह, बल्गेरियांतील धामधूम व इटालीच्या वसाहती धोरणास सुरवात या महत्त्वाच्या गोष्टी चालू असतां इटालींत अन्तःसुधारणांचेंहि काम सुरू होतेंच. १९.८० लीरी इतका कर देणाऱ्या व लिहितां वाचतां येतें इतकें शिक्षण झालेल्या प्रत्येक व्यक्तीस ( स्त्री–पुरुष ) मताधिकाराचा हक्क देण्यांत आला. या सुधारणेचा तावडतोब असा परिणाम झाला कीं, खेड्यांपेक्षां शहरांमध्यें साक्षरतेचें प्रमाण जास्त असल्याकारणानें शहरांतील उद्योगधंदेवाल्या लोकांस राजकीय हक्क जास्त प्रमाणांत मिळून या लोकांपेक्षां सांपत्तिक दृष्ट्या अधिक सुस्थितींत असलेल्या शेतकरी व लहानसहान जमीनदार लोकांस निरक्षरतेच्या अडचणींमुळें मतदारीच्या हक्कास मुकावें लागलें. सरकारला स्वतः रेल्वे चालविण्यांत तूट आल्याकारणानें पुनः तीन खाजगी कंपन्यांकडे त्यांची व्यवस्था सोंपविण्यांत आली; पण कंपन्यांचे डायरेक्टर इटालियन लोकच असले पाहिजेत, अशी अट घालून राष्ट्रीय सत्ता रेल्वेवर राहील अशी व्यवस्था केली. तथापि देशांत उद्योगधंदे व व्यापारी दळणवळण फारसें नसल्यामुळें रेल्वे कंपन्यांचा धंदा १९०५ पर्यंतहि फारसा किफायतशीर न चालल्यामुळें पुनः सरकारला रेल्वे आपल्या ताब्यांत घ्याव्य लागल्या. शिवाय नव्या रेल्वे व इतर लोकोपयोगी कामें यांवर खर्च अधिकाधिक वाढत गेल्यामुळें नवें नवें कर्ज काढावें लागलें. स्वतःच्या हातची सत्ता जाऊं नये या हेतूनें डेप्रेटिसचें प्रधानमंडळ अम्मलबजावणीचें काम यथायोग्य बजावीत नसे; तथापि दळणवळणावरील कर बंद करणें, रेल्वे लाईन्स वाढविणें, मताधिकार विस्तृत करणें वगैरे कित्येक उपयुक्त गोष्टी या प्रधानमंडळानें केल्या यांत शंका नाहीं. मजुरांनां अपघातांबद्दल नुकसानभरपाई देवविण्याचा कायदा १८८५ मध्यें पास झाला. १८८४ मधील कॉलऱ्याच्या सांथीमुळें सरकारी आरोग्यखात्यानेंहि शहरसुधराईच्या अनेक गोष्टी केल्या

वसाहती धोरण.—मध्यंतरीं राजकीय पक्षांत घडामोडी चालू होत्याच. १८८४ मार्च १४ रोजीं प्रसिद्ध मुत्सद्दी सेला मरण पावला. डेप्रेटिसनें स्वतःचें प्रधानमंडळ बलिष्ठ राखण्याकरितां कांझरव्हेटिव्ह व इतर पक्षांतील लोक प्रधानमंडळांत ओढण्याचा क्रम सुरू ठेवला होता; पण त्यामुळें पार्लमेंटमध्यें राजकीय पक्षांत घोंटाळा माजून पक्षभेदाला घाणेरडें स्वरूप येत चाललें होतें. याच वेळीं वसाहतीविषयक धोरणाचा बिकट प्रश्न इटलीपुढें होताच. १८६९ पासून इटालियन व्यापाऱ्यांनीं तांबड्या समुद्रावर एक व्यापारी ठाणें स्थापल्याबद्दल सरकारकडे तगादा लावला होता. तेव्हां राहीटाच्या बेहेरान नांवाच्या सुलतानापासून असाब बे इटालीनें विकत घेतलें; पण इजिप्शियन सरकारनें त्या गोष्टीला अडथळा केल्यामुळें लष्करी सामर्थ्याच्या जोरावर तेथें १८८२ मार्च १० ला इटालीनें आपली क्राऊन कॉलनी स्थापन केली व एका अँग्लो-इटालियन करारनाम्यानें त्याला इंग्लंडची मान्यताहि मिळविली. इतक्यांत ईजिप्तमध्यें अरबी पाशानें बंड उभारलें व तें मोडण्याकरितां ग्रेटब्रिटननें आपलें आरमार रवाना करून इटलीलाहि मदतीस बोलाविलें; परंतु सांपत्तिक अडचणी, आरमाराची उणीव, फ्रान्सचें भय वगैरे अनेक कारणांस्तव डेप्रेटिसनें वसाहती वाढविण्याच्या या धाडसी मार्गांत उडी घालण्याचें नाकारिलें. तथापि १८८४ मध्यें पुनः इंग्लंडनें सुदनप्रकरणांत इटलीस साहाय्यार्थ बोलाविलें; तेव्हां मात्र इटलीनें आपलें सैन्य मदतीस दिलें व मॅसावा व बेलूल हीं ठाणीं घेऊन आपलें सत्ताक्षेत्र वाढविण्यास सुरवात केली. तेव्हां शेजारच्या ॲबिसीनियन सरकारशीं शत्रुत्व उद्भवलें.या युद्धांत १८८७ मध्यें इटालियन सैन्याची ५२४लोकांची एक तुकडी योग्य मदतीच्या अभावीं अत्यंत क्रूरपणें कापली गेली. त्याबद्दल पदरीं दोष येऊन डेप्रेटिस–रॉबिलंट प्रधानमंडळाला राजीनामा द्यावा लागला. नंतरच्या क्रिस्पी प्रधानमंडळानें मागील प्रकरणाचा सूड उगविण्याकरतां वीस हजार सैन्य रवाना केलें. त्याचवेळीं महादीच्या पक्षानें ॲबिसीनियावर हल्ला केला त्यांत ॲबिसिनियन राजा मारला जाऊन त्याच्या मुलांत गादीबद्दल तंटा लागला. या दुहीचा फायदा घेऊन इटालीनें यूकीली येथें १८८९ मे २ रोजीं राजपौत्र मेनेलेक याच्या बरोबर तह करून ॲबिसीनियावर आपली प्रोटेक्टरेट सत्ता स्थापन करून मेनेलेकला इथिओपियाचा बादशाहा म्हणून मान्य केलें. तथापि युरोपांतील राष्ट्रांनीं याला संमती दिली नाहीं. उलट ब्रुसेल्सला भरलेल्या गुलामगिरीप्रतिबंधक परिषदेमध्यें जर्मनीनें मेनेलेकला बादशाहा न म्हणतां नुसतें " हायनेस " असें उपपद लावून त्याचा अपमान केला. त्याचा सूड म्हणून मेनेलेकनें इटलीच्या सत्तेसच विरोध आरंभिला. इतक्यांत १८९१ त क्रिस्पीच्या ऐवजीं रुडिनी-प्रधानमंडळ आलें व त्यानें या प्रकरणाकडे तात्पुरता कानाडोळा करण्याचें ठरविलें

अंतःस्थितिः—१८८७–१८९० पर्यंतच्या क्रिस्पिच्या कारकीर्दींत मोठ्या महत्त्वाच्या गोष्टी झाल्या. क्रिस्पी स्वतः मोठा शीघ्रनिर्णयी व तडफदार मनुष्य होता. प्रथमच त्याच्यापुढें पोपचा प्रश्न आला. पोपच्यातर्फे कार्डिनल टोस्टीनें पोप व इटाली यांच्या सख्यानें होणाऱ्या फायद्यांच्या वर्णनपर एक निबंध प्रसिद्ध केला. पुढें इटालियन सरकारबरोबर पत्रव्यवहारहि सुरू झाला. पोपसारख्या सर्वश्रेष्ठ धर्माधिकाऱ्याच्या अधिकाराची जोड इटालियन सरकारला हवी होतीच; पण उलट पोपनें आपल्या पूर्वीच्या प्रांतिक सत्तेची मागणी केली, ती मात्र कबूल करण्यास इटालियन लोक तयार नव्हते. उलटपक्षीं पोपला हा आपला सांपत्तिक आधार सोडवेना. तेव्हां हा सलोख्याचा

प्रयत्न निष्फळ ठरून पुन्हां दोन्ही पक्षांनीं परस्परांस त्रास देण्यास सुरवात केली. मध्यंतरीं पीनल कोडचें सुधारणा, स्थानिक हक्कांची वाढ या चांगल्या गोष्टी झाल्या खऱ्या, परंतु उलट रेल्वे व सार्वजनिक कामें यांवरील बेसुमार खर्च व लष्करी व आरमारी वाढींची मागणी यांमुळें राज्यकारभाराची स्थिती बिकट झाली होती. अशा स्थितींतहि क्रिस्पीनें राज्यकारभार यशस्वी रीतीनें चालवून देशांत शांतता राखून उतावळ्या चळवळ्यांना नीट दाबांत ठेविलें होतें. पण १८९० मध्यें एका क्षुल्लक प्रसंगीं उजव्या पक्षसंबंधानें रागानें कडक भाषा वापरल्यामुळें तो तत्काळ अप्रिय होऊन रुडिनी मुख्य प्रधान झाला.

रुडिनीनें आस्ट्रिया, जर्मनी व इंग्लंड यांचेबरोबर निकट स्नेह ठेवून फ्रान्सबरोबर बाह्यतः शत्रुत्व चालविलें. हा फ्रान्सबरोबरचा बेबनाव डेप्रेटिस व क्रिस्पी यांचे कारकार्दीपासून चालत आलेला होता. बिस्मार्कनें इटलीला त्रिराष्ट्रकूटांत कायम ठेवण्याचें धोरण स्वीकारलें होतें, व इटलीच्या बचावाकरतां फ्रान्सविरूद्ध शस्त्र उचलण्यास जर्मनीची नेहमी तयारी होती. फ्रान्सनें या शत्रुत्वामुळें पूर्वीचे व्यापारी तहहि मोडले व दोन्ही देशांनीं भेदभावाच्या जकाती आयातनिर्गतमालावर बसविल्या. १८९१ मध्यें रुडिनीनें त्रिराष्ट्रकूटाला आणखी बारा वर्षांची संमती दिली. तथापि रुडिनी स्वतः दृढनिश्चयी नसल्यामुळें त्याचा पक्ष कमजोर होऊन गिओलिटी प्रधान झाला. याच्या वेळीं सरकारी बँकांमध्यें हिशेबांत घोटाळे माजून पैशाची अफरातफर झाली. तेव्हां सरकारी कमिशन नेमलें जाऊन त्यानें माजी व चालू प्रधान मंडळाला दोष देऊन बऱ्याच जणांवर फौजदाऱ्या करण्यास सुचविलें. गिओलिटीला देशांत व फ्रान्सबरोबर वजन व शांतता राखतां येईना. फ्रान्समध्यें इटालियन मजूर मारले गेले; सिसिलीमध्यें सोशालिस्टांच्या चवळवळींमुळें दंगेधोपे सुरू झाले. त्यांचा बंदोबस्त गिओलिटीकडून होईना तेव्हां क्रिस्पीचें प्रधानमंडळ पुन्हां अधिकारारूढ झालें; व त्यानें लष्करीसामर्थ्यानें लवकरच सर्वत्र शांतता स्थापिली; मिलटरी कोर्टांकडून बंडखोरांना कडक शिक्षा देवविल्या; पण नंतर राजाच्या हुकुमानें त्या कमी करविल्या.

क्रि स्पी ची दु स री प्र धा न की:—१८८९–१८९३ या सालांत इटलीची सांपत्तिक स्थिति अत्यंत कठीण झाली होती. ती सुधारण्यास्तव एक सर्वश्रेष्ठ इटलीची बँक काढण्यांत येऊन बँकांचा कायदा दुरुस्त करून जमीन, गहाणावरील देवघेव, कागदी नोटा वगैरे गोष्टींवर अधिक बंधनें घालण्यांत आलीं. अनेक बाबतींत काटकसर करून व जमीनमिळकत, मीठ व धान्य यांवर कर बसवून उत्पन्न वाढविण्यांत आलें. याप्रमाणें योग्य धोरणानें पण कडकपणानें कारभार चालविल्यामुळें क्रिस्पीला अनेक शत्रू उत्पन्न होऊन त्याला ठार मारण्याचे कांहीं प्रयत्न झाले. त्याचे दुष्ट प्रतिस्पर्धी गिओलिटी व कॅव्हेलिटी यांनीं कांहीं खाजगी पत्रांच्या वगैरे आधारावरून लांचलुचपतीचे वगैरे आरोप क्रिस्पीवर करून त्याचा बदलौकिक करण्याचे प्रयत्न केले, पण ते सर्व फसले. परंतु या प्रकरणामुळें लोकांचा राजकारणी पुरुषावरचा विश्वास उडाला व गुप्त कटांना अधिकच ऊत आला. परराष्ट्रीय धोरण पूर्वींचेंच, म्हणजे आस्ट्रिया जर्मनी व ग्रेटब्रिटन यांच्याबरोबर सख्याचें होतें. ॲबिसिनियाशीं रुडिनीनें १८९१ मध्यें तह केल्यानंतर कांहीं दिवस शांतता होती. परंतु १८९३ च्या सुमारास गिओलिटीच्या बेशिस्त कारभाराचा फायदा घेऊन मेनेलेकनें पुन्हां फ्रान्स व रशियाच्या मदतीनें इथिओपिया स्वतंत्र करण्याचा उद्योग आरंभिला. त्यांत मंगशा या टायग्रे प्रांताच्या राजाचें अंग असल्यामुळें इटालियन जनरल बॅरेटीरी यानें प्रथम मंगशाचा पराभव केला, व टायग्रे प्रांत हस्तगत केला. परंतु लवकरच एक लक्ष ॲबिसिनियन सैन्य इटालीच्या २५ हजार सैन्यावर चालून आलें. बरेच दिवस लढाईला दिरंगाई लावल्यामुळें इटालियन सरकारनें बॅरेटीरीला दोष दिला. तेव्हां १८९६ मार्चमध्यें आडोवा येथील शत्रुसैन्यावर बॅरेटीरीनें निकराचा हल्ला केला. परंतु त्याचाच पूर्ण पराभव होऊन माघार घेण्यासहि अवसर न मिळाल्यामुळें सहा हजार सैन्य मारलें जाऊन चार हजार कैद झालें. बॅरेटीरी सैन्य सोडून पळाला व त्यानें इटालियन सरकारकडे झालेला पराभव सैन्याच्या माथीं मारणाऱ्या मजकूराची तार केली. पण या निंद्य प्रकाराबद्दल कोर्ट–मार्शलच्या चौकशींतून बॅरेटीरीवर बराच दोष आला. क्रिस्पीचें प्रधानमंडळ अधिकारच्युत होऊन नवीन प्रधान झालेल्या रुडिनीनें जनरल बाल्डिसेरा यास तह घडवून आणण्यास लिहिलें. १८९७ मध्यें तह होऊन इथिओपिया स्वतंत्र झाला. एरिस्ट्रिया इटालीकडे राहिला, व ४ लक्ष पौंड युद्धखंडणी मेनेलेकला मिळाल्यावर कैदी सुटले. लवकरच अँग्लो–इटालियन करार होऊन त्यास मान्यता मिळाली. १८९६ मध्येंच मार्क्किस व्हिस्कोंटी व्हेनेस्टा हा अत्यंत अनुभवी पुरुष परराष्ट्रीय प्रधान होऊन त्यानें फ्रान्सबरोबर ट्युनिशियासंबंधानें तह केला. १८९७ सालीं त्यानें ग्रीको–टर्किश युद्धामध्यें ग्रीसला मदत करून संकटांतून सोडविलें; व फ्रान्सचा स्नेह न गमावतां दोस्तांचा विश्वास कायम राखला. अन्तःकारभार मात्र नीट चालला नव्हता क्रिस्पीची कमिशनमार्फत चौकशी होऊन त्याच्या विरुद्ध निंदाव्यंजक ठराव चेंबरमध्यें पास झाला. धान्यावरील करामुळें दक्षिण इटलींत नेपल्स, फोगिया, मोल्फेटा, क्रेमोना, पेव्हिया, मिलान वगैरे ठिकाणीं दंगेधोपे व बंडें झालीं. तीं कडक लष्करी अम्मलानें मोडून कडक शिक्षा ठोठावण्यांत आल्या. १८९८–१९०० पेलॉक्स प्रधानमंडळ अधिकारावर होतें, व त्यावेळीं सार्वजनिक संरक्षण बिल पास करून घेण्याचा प्रयत्न झाला, पण तो फसला, व पेलॉक्सला राजी-

नामा द्यावा लागला. २९ जुलै १९०० रोजीं हंबर्ट राजा मारला गेला. हा मोठा दयाळु, धैर्यवान व लोकप्रिय राजा होता. कॉलरा, धरणीकंप वगैरे संकटांतून अनेक जीवांना त्यानें मदत करून वांचविलें होतें.

व्हि क्ट र इ मॅ न्यु अ ल ति स रा.--हंबर्ट राजाचा एकुलता एक मुलगा तिसरा व्हिक्टर इमॅन्युअल राज्यावर आला. त्याचा मॅटेनिग्रोच्या एलेनारबरोबर १८९० मध्यें विवाह झाला होता.पेलॉक्सच्या कारकीर्दीतील परराष्ट्रमंत्री ॲडामिरल केनेव्हेरो यानें फ्रान्सबरोबर व्यापारी तह घडवून आणला. १८९८ मध्यें आस्ट्रियन महाराणीचा अराजक लोकांकडून खून झाला तेव्हां त्याच्या बंदोबस्ताचे उपाय ठरविण्याकरतां कारस्थानी पुरुषांची एक परिषद रोमला भरविली;पण त्याचा फारसा उपयोग झाला नाहीं. स.१९०० मध्यें झारनें हेगला तहपरिषद बोलाविली तींत पोपचा प्रतिनिधि न घेण्याचा ठराव त्यानें करविला. त्याच्या मागून १८९९–१९०१ या सालांत व्हेनेस्टा परराष्ट्रमंत्री होता. त्यानें फ्रान्सबरोबर ट्रिपोली प्रकरण व आस्ट्रियाबरोबरचें ॲड्रियाटिक किनाऱ्याचें प्रकरण योग्य तऱ्हेनें मिटविलें. १८९९–१९०० मध्यें सॅरेक्को प्रधानमंडळ होतें; पण जिनोवा येथील गोदीमधील संपासंबंधानें कोणतेंच ठाम धोरण न दाखविल्यामुळें तें अधिकारभ्रष्ट होऊन झनार्डेली मुख्य प्रधान झाला.

सं पां ची ला ट.—यावेळीं मजूरसंघ व संप यांच्या जोरावर मजूरवर्ग बराच वळावला होता. मजुरीची वाढ, कामाचे कमी तास, व मजूरांच्या स्थितीची सुधारणा करण्याकरितां १९०१–१९०२ सालीं बरेच संप झाले. सोशालिस्ट पक्षानें त्यांचा फायदा घेऊन सरकारच्या कामांत अनेक अडचणी आणल्या, व स्वपक्षाचें बळ वाढविलें. शेतकऱ्यांनीं जमीनदारांविरुद्ध संप केला. सर्वांत रेल्वेच्या नोकरांचा संप फार विकोपास जाऊन इटालीभर पसरला. सरकारनें लष्करामार्फत आगगाड्या चालवून, लवकरच नोकरांची समजूत घालून संप मोडला. शेतकी कामांत मात्र यांत्रिक साधनांच्या वाढत्या उपयोगामुळें अधिकाधिक शेतमजूर बेकार होऊन त्या मजूरवर्गाची स्थिति उत्तरोत्तर अधिक निकृष्ट झाली. यामुळें सोशालिस्ट पक्ष वाढत चालला खरा, पण लवकरच त्यांत दुफळी झाली. १९०३ व १९०४ या सालींहि संपांची गडबड चालू होती. समाजसत्तावादी पक्षानें संप मिटवून शांतता करण्यास मदत न करतां उलट भांडवलवाले व मजूर यांच्यामधील तंट्यांत पोलीस व लष्कर यांनीं शस्त्रें वापरूं नयेत असें बिल पार्लमेंटांत आणण्याचें ठरविलें. तथापि हें बिल वादविवाद न होतांच नापास होऊन लोकांमध्यें समाजसत्तावादाबद्दल अप्रियता मात्र अधिक वाढली. इ. स. १९०५ मध्यें रेल्वेवर मोठा संप झाला; आणि लष्करमध्यें सरकारी हुकूम पाळले न जातील अशा तऱ्हेच्याहि शिकवणुकीचा प्रयत्न झाला; पण तो फसला, व लष्कराच्या मदतीनें संपांचा बंदोबस्त करण्यांत आला. १९०७ मध्यें फेरार, रोव्हिगो येथें शेतमजुरांनीं संप केले. मिलनकडे रेल्वे नोकरांत संप झाला. १९०८ मध्यें पार्मातील शेतमजूरांनीं संप केला.जमिनदारांनीं आपला संघ बनविला व शेवटीं संपवाल्यांना हार खावी लागली. तथापि त्या सालीं पिकांची फार नुकसानी झाली. पुढें शिक्षण, पोष्ट व तारखात्यांतील लोकांनीं संप केले; पण सरकारनें त्यांच्या योग्य तक्रारी दूर करून ते मिटविले.

१९०२ मध्यें घटस्फोटाचें बिल पार्लमेंटपुढें आलें होतें. देशांतील लोकमताची याबद्दल फारशी मागणी नव्हती; पण पार्लमेंटांत त्याला मताधिक्य होतें. लोकांकडून एक ३५ लाख सह्यांचा बिलाविरुद्ध अर्ज आला. तेव्हां प्रधानमंडळानें तें बिल काढून टाकलें. १९०२ च्या आक्टोबरमध्यें मुख्य प्रधान झेनार्डेलीनें प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें राजीनामा दिला. तेव्हां गिओलिटीचें प्रधानमंडळ पुनः आलें. टिटोनीनें परराष्ट्रमंत्रीपद पत्करलें. लवकरच टिटोनीसह इटलीच्या राजाराणींनीं फ्रान्स व इंग्लंडला भेट दिली. त्यांत अनेक आंतरराष्ट्रीय प्रश्नांचा ऊहापोह होऊन परस्परांची स्नेहवृद्धि झाली. गिओलिटीनें १९०५ मार्चमध्यें राजीनामा दिला. कारण त्याचें स्वतःचें देशांत फारसें वजन नव्हतें. फ्लोर्टिसचें प्रधानमंडळ अधिकारारूढ झालें; पण विशेष महत्त्वाच्या गोष्टी न होतां तें १९०६ च्या जानेवारींत मोडलें व सोनिनोनें आपलें प्रधानमंडळ बनविलें. सोनिनो स्वतः मोठा प्रामाणिक व करडा मुत्सद्दी होता, त्यामुळें त्याच्या हातून चांगली कामगिरी होईल अशी फार आशा होती. गुकिर्डीनी परराष्ट्रमंत्री, लुझाटी खजिनदार, सॅची न्यायमंत्री, पँटेनो कृषिव्यापारमंत्री अशा नेमणुका झाल्या. सोनिनोनें प्रथम वृत्तपत्रकारांना देणग्या देण्याची रीत मोडून टाकली. १९०६ एप्रिलमध्यें एटना येथील ज्वालामुखीचा स्फोट झाला, तेव्हां विपद्ग्रस्तांना सरकारी मदत योग्य प्रकारें करण्यांत आली; पण लवकरच १९०६ मेमध्यें एक बिल नापास झाल्यामुळें सोनिनोनें राजीनामा दिला. गिओलिटी प्रधानमंडळ आलें. त्यानें प्रथम राष्ट्रीय कर्जावरील व्याजाचा दर चार टक्केचा साडेतीन टक्के कमी करून बजेटांत६५०लक्ष लीरीची शिल्लक दाखविली. त्या वेळीं टिटोनी परराष्ट्रमंत्री, मैआरेनो खजिनामंत्री, ओर्ट्ट कृषिमंत्री, गैंट्टुर्को न्यायमंत्री, मॅसिमिनी बजेटमंत्री, स्वेंझर पोष्ट–टेलेग्राफमंत्री, फुसिनेटो शिक्षणमंत्री, स्पिगार्डी युद्धमंत्री याप्रमाणें नेमणुका झाल्या होत्या.

१९०१ मार्चमध्यें रोमनचर्चचें प्रकरण पुनः उपस्थित झालें. पोपच्या प्रांतिकसत्तेच्या मागणीला फ्रान्स व ऑस्ट्रिया दोघांची अनुकूलता होती; परंतु फ्रान्सकडून इटलीविरुद्ध पोपला मदत मिळण्याची आतां आशा नसल्यामुळें इटालियन सरकारबरोबर तडजोडीनें सख्य करण्याची आवश्यकता पोपला विशेष भासूं लागली. इटालींत कॅथॉलिकांना राजकीय हक्क असत. तथापि सक्तीच्या धार्मिक शिक्षणासंबंधानें

व प्रांतिकसत्ता व चर्चमधील कित्येक सुधारणा या बाबतींत कॅथॉलिक सभासद व पोप यांच्यांतच तंटे माजले होते.

१९०८ मध्यें मोठा धरणीकंप व अफाट समुद्रभरती या आपत्तींत दीड लाख लोक मृत्युमुखीं पडले व जखमी लोकांची तर गणनाच करतां आली नाहीं.

परराष्ट्र संबंध.—या सुमारास त्रैराष्ट्रकूटांतील ऑस्ट्रियाजर्मनीबरोबरची मैत्री कमी होऊन फ्रान्स व इंग्लंडबरोबरचा स्नेह दृढावला. १९०४ मध्यें फ्रान्सच्या प्रेसिडेंटनें रोमला परत भेट दिली. यामुळें इटलीची पत वाढली. ट्रिपोली व बेंगाझीवर इटलीचें वर्चस्व कायम झालें आस्ट्रियांत इटालियन प्रजाजनांचा क्वचित् छळहि होऊं लागला, त्याच्याकरितां स्वतंत्र इटालियन युनिव्हर्सिटी काढण्याचें ठाका रण्यांत आलें; पण तडजोडीनें इटालियन कायद्याची परीक्षा मात्र जोडण्यांत आली; पण ह्याबद्दल तेथील जर्मनप्रजा व विद्यार्थी यांनीं इटालियनांबरोबर मारामाऱ्या केल्या. आल्बिनियाबद्दलहि तंटा होण्याचा रंग आला; परंतु लवकरच मोनास्टिर प्रांत ग्रेटब्रिटन, फ्रान्स व रशियाच्या संमतीनें इटालीस मिळाला. १९०८ आक्टोबरमध्यें आस्ट्रियानें बोस्निया स्वराज्यास जोडल्याचें जाहीर झालें. तेव्हां इटालींत मोठीच खळबळ उडाली; तथापि लवकरच नोव्हिबझार येथील लष्करी ठाणीं आस्ट्रियानें उठविलीं, तेव्हां मॅसेडोनियांत शिरण्याची भीति कमी झाली. मॉंटेनिग्रोच्या किनाऱ्यावर पोलीस ठेवण्याची गोष्टहि आस्ट्रियानें सोडून दिली. यामुळें इटालीची भिती बरीच दूर झाली; तथापि या आस्ट्रियाच्या एकंदर वर्तनानें इटालीला स्वतःचें लष्करी व आरमारी सामर्थ्य वाढविण्याची अत्यंत आवश्यकता वाटूं लागली, जादा रक्कम मंजूर झाली. नवीं लढाऊ जहाजें बांधण्यास सुरवात झाली, लष्करांत वाढ झाली व पूर्व सरहद्दीवर बचावाचीं साधनें अधिक मजबूत करण्यांत आलीं. कारण जोंपर्यंत बाल्कन प्रदेशांतील इटालीचे हितसंबंधांस विरोध आस्ट्रियाकडून होत होता, तोंपर्यंत त्रिराष्ट्रकूटाची तहमैत्री म्हणजे केवळ दिखाऊ फार्स होता हें इटालियन राष्ट्र जाणून होतें.

१९०९ मध्यें जी निवडणूक झाली त्या निवडणुकींमध्यें सत्ताधारी गिओलिटीपक्षाचा जय झाला. त्यानें गलबतांस सरकारी मदत द्यावयाची योजना केली होती; पण तिला सभेंतील मत फार विरुद्ध असल्यामुळें ती तहकूब करावी लागली, आणि पार्लमेंट पुन्हां जेव्हां डिसेंबरमध्यें भरली तेव्हां सरकारचा पराजय होऊन बॅरन सोनिनो यांचें मंत्रिमंडळ अधिकारारूढ झालें. या नवीन मंत्रिमंडळांत गिओलिटीच्या मताचेच लोक होते; पण त्यास सभेंत किंवा देशांत बहुमताचा पाठिंबा नव्हता. १९१० च्या मार्चमध्यें या नवीन मंत्रिमंडळाचा देखील पराजय झाला.

१९११ सालीं इटलीस स्वतंत्रदेशत्व प्राप्त झाल्यास ५० वर्षें झालीं म्हणून एक प्रदर्शन रोम, ट्यूरिन व फ्लारेन्स या ठिकाणीं भरविण्यांत आलें. या सालांत सरकारचें लक्ष मताधिकार अधिक व्यापक करण्याकडे आणि सरकारला विमा उतरण्याचा मक्ता देण्याकडे होतें. सरकारला विमा उतरण्याचा मक्ता देण्यांत आला, सरकारचें उत्पन्न वाढलें.

इ. स. १९११ सालच्या अंत्य भागांत इटली व तुर्कस्तान यांमध्यें जी लढाई सुरू झाली, त्या लढाईमुळें सर्व राष्ट्रांचें तुर्कस्थानाकडे लक्ष वेधलें. जवळ जवळ कांहीं कारण नसतां केवळ इटालीनें स्वार्थासाठीं ही लढाई सुरू केली, असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं. त्रिपोली हा प्रदेश केवळ इटली सरकारनें हुकूम काढून जोडला. इटलीनें आपली बाजू इंग्रज व फ्रेंच यांच्याशीं तहनामे करून बळकट करून घेतली होती. युद्ध अन्यायाचें होतेंच; पण यूरोपांतील इतर राष्ट्रांची मत्सरबुद्धि जागृत होती त्यामुळें फ्रान्स व इटाली यांमध्यें थोडीशी तेढ उत्पन्न झाली होती. ( तुर्कों–इटालियन युद्ध पहा). हें युद्ध थोडा वेळ टिकलें आणि १९१२ च्या आक्टोबर महिन्यांत औची येथें तह झाला. या तहानें तुर्कस्थानानें “ लिबिया” (त्रिपोली) इटलीस दिला व तेथून आपली फौज नेण्याचें कबूल केलें आणि खलीफाचा लिबियांतील मुसुलमानावरचा आध्यात्मिक अधिकार इटालीनें मान्य केला आणि इजिअन समुद्रांतील इटालीनें युद्धांत घेतलेली ऱ्होडस व इतर दहा बेटें तुर्कांनीं आपल्या अटी पुऱ्या केल्या म्हणजे इटालीनें तुर्कांनां परत करण्याचें मान्य केलें. १९१२ च्या नोव्हेंबरमध्यें इटलीनें वसाहतींचा प्रधान हें नवीन पद स्थापन केलें आणि त्याच्या हातीं त्रिपोलीचा कारभार सोंपविला. औचीचा तह झाला तरी त्रिपोलीमधील चकमकी संपल्या नव्हत्या. सुलेमान एल बारुणी याच्या नेतृत्वाखालीं बंडाळी चालूच होती; पण शेवटीं ती मोडून देशांत स्वस्थता उत्पन्न झाली.

राष्ट्रत्रिकूटाचा संधि १९१२ च्या अखेरीस पुन्हां दृढ करण्यांत आला. परंतु आस्ट्रियाशीं मात्र फारसा सलोखा नव्हता. क्वचित मधून मधून कांहीं कुरापती निघत असत. पण अखेरीस सर्व स्थिरस्थावर झालें. १९१३ च्या आक्टोबरमध्यें इटालींत पुनः निवडणुकी होऊन सोशलिस्ट पक्षाचे अधिक लोक निवडून आले व गिओलिटीच्या जागीं सॅलेंड्रा मुख्य प्रधान झाला. या प्रधानमंडळाला रेल्वेनोकरांच्या संपांस व क्रांतिकारक अंतस्थ चळवळींना तोंड द्यावें लागलें. अंतस्थ उलाढालींतून मोकळे होतात न होतात तोंच जागतिक युद्धास सुरुवात होऊन आंतरराष्ट्रीय प्रश्न उपस्थित झाले. परंतु आगस्टच्या तिसऱ्या तारखेस इटलीनें आपलें तटस्थपणाचें धोरण जाहीर केलें.

पण इटलीनें जरी प्रत्यक्ष युद्धांत भाग घेतला नाहीं, तरी युद्धामुळें उत्पन्न झालेल्या परिस्थितीच्या भोंवऱ्यांतून इटली सुटला नाहीं. धान्याची निर्गत अतिशय होऊन महर्घता वाढली. पैशाच्या अभावीं कारखाने बंद पडल्यामुळें बेकारी वाढली.

याच सुमारास तुर्कस्तान हें जर्मनीच्या वतीनें युद्धांत पडल्यामुळें युद्धविषयक योग्य अशा मर्यादा पाळल्या

जातील किंवा नाहीं याबद्दल इटलीला धास्ती वाटूं लागली. इटलीची ही साशंक वृत्ति पाहून, जर्मनीनें इटलीची समजूत घालण्याचा प्रयत्न करून इटली तटस्थ राहील अशा तऱ्हेची खटपट केली. पण खुद्द इटलीमधील लोकच आतां लढाईमध्यें पडण्याच्या मताचे झाले होते. प्रधानमंडळानें मात्र संधि साधून युद्धांत भाग घेण्याचा निश्चय केला होता. आस्ट्रियानें सर्व्हियावर स्वारी केल्यामुळें बाल्कन प्रदेशांतील तुल्यबलत्वाच्या तत्त्वाला बाध येतो आहे अशा प्रकारची तक्रार इटालियन सरकारनें पूर्वीच केली होती. आतां सॉनीनो यानें पुन्हां आस्ट्रियाच्या पाठीमागें ऑस्ट्रियाच्या ताब्यांत असलेला इटलीचा मुलूख देण्याचा तगादा सुरू केला. आस्ट्रियानें याकडे प्रथम दुर्लक्ष करण्याचें निमित्त केलें पण नंतर थोडासा भाग देण्याचें कबूल केलें. पण एवढ्यानें इटलीचें कसें समाधान होणार? शेवटीं आस्ट्रियाशीं समेट होणें अशक्य दिसून आल्यामुळें इटलीला युद्धांत पडणें जवळ जवळ आवश्यक वाटूं लागलें. अर्थातच इटलीनें दोस्त राष्ट्रांशीं यासंबंधीं कारस्थान सुरू केलें व लंडन येथें दोस्तराष्ट्रांच्या व इटलीच्यामध्यें करारनामा होऊन इटलीनें दोस्तराष्ट्रांच्या वतीनें युद्धांत पडण्याचें कबूल केलें. या करारनाम्यान्वयें इटलीला बऱ्याच प्रदेशाची मिळकत व्हावयाची होती. मे १९१५ मध्यें इटलीच्या चेंबरची बैठक होऊन, तींत इटलीनें युद्धांत पडण्यासंबंधीचा ठराव बहुमतानें मंजूर झाला.

१९१६ सालांत प्रथम प्रथम, ऑस्ट्रियन लोकांची सरशी होत चालल्यामुळें इटलीच्या सैन्याचा चार पांच ठिकाणीं पराजय होत गेला. पण पुढें, इटलीनें गमावलेला मुलूख लवकरच परत मिळविला.

आक्टोबर १९१७ मध्यें ऑस्ट्रिया व जर्मनी यांनीं मिळून, इटालियन सैन्याला ऑस्ट्रियन मुलुखांतून हांकलून लावण्याचा निश्चय केला व कॅपोरेटो येथें चढाईचें धोरण सुरू केलें. इटलीला सारखे पराजय मिळूं लागले. त्यामुळें इटलीमध्यें इटलीनें कांहींहि करून जर्मनी व आस्ट्रियाविरुद्ध चंग बांधण्याचा निश्चय केला. राजानें देखील जाहीरनामा काढून लोकांनां धैर्यानें परिस्थितीशीं टक्कर देण्याचा उपदेश केला. याचा इष्ट तोच परिणाम झाला. इटालियन सैन्यानें आसियागो ग्रॅपा येथें शत्रूंनां चांगलेंच तोंड दिलें. दोस्त राष्ट्रांनींहि इटलीला या कामांत मदत केली.

सन १९१८ च्या एप्रिलमध्यें, ऑस्ट्रिया हंगेरीच्या जुलमाला त्रासलेल्या छोट्या राष्ट्रांची मजलस रोम येथें भरून, त्या राष्ट्रांनीं, आपलें स्वातंत्र्य जाहीर केलें. जून १९१८ मध्यें ऑस्ट्रियानें पिएव्ह येथें चढाईचें धोरण स्वीकारल्याची बातमी लागली. त्यामुळें पुन्हां इटालियन सैन्याला कंबर बांधावी लागली. शेवटीं आठ दिवसाच्या घनघोर लढाईनंतर, आस्ट्रियनांचा पुरा मोड झाला. याचाच फायदा घेऊन कांहीं महिन्यांनंतर ऑस्ट्रियनांची हकालपट्टी करण्याचा इटालीनें निश्चय केला. व्हिटोरिया व्हेनेटो येथें दोन्ही पक्षांची मोठी लढाई होऊन आस्ट्रियावर इटालियन सैन्यानें फार मोठा जय मिळविला. या पराजयामुळें ऑस्ट्रियाला इटलीशीं तह करणें भाग पडलें. या तहान्वयें, लंडनच्या मजलशींत ठरलेला सर्व प्रदेश इटलीला मिळावयाचा व आस्ट्रियाच्या सत्तेचें इटलींतून पूर्णपणें उच्चाटण व्हावयाचें ठरलें. पण एवढ्यावरच इटलींतील लोकांचें समाधान होईना. इटलींतील राष्ट्रीय पक्षानें फ्यूम व डालमेशिया हे मुलुख आपल्याला अधिक मिळावेत याबद्दल चळवळ सुरू केली. पण युगोस्लाव लोकांनीं याला विरोध करावयाचें ठरविलें. कारण त्यांत त्यांचें नुकसान होऊं लागलें. त्यामुळें त्यांनीं महायुद्ध थांबलें असतांनासुद्धां आपापलीं सैन्यें वाढविण्यास सुरवात केली. व सरहद्दीवर त्यांचा तळ ठेवला. अर्थातच इटलीलाहि आपलें सैन्य वाढविणें भाग पडलें. पुढें शांततापरिषदेच्या पूर्व बैठकीला हजर राहण्यासाठीं इटालियन प्रधान व परराष्ट्रमंत्रि लंडन येथें गेले. १९१९ च्या जानेवारी महिन्यांत प्रेसिडेंट विल्सन यांनीं इटलीस भेट दिली. लोकांनी त्यांचें अपूर्व थाटानें स्वागत केलें. पण प्रधानमंडळाशीं विल्सन साहेबांचें जें खलबत झालें त्यावरून इटलीच्या हक्काला विल्सनसाहेब विशेष अनुकूल आहेत असें दिसलें नाहीं व तेंच पुढें खरें ठरलें.

युगोस्लाव लोकांनीं इटलीमधील व आपल्यामधील लढा पंचामार्फत मिटविण्याची विल्सनपाशीं विनंति केली. पण सोनिनो यानें त्या वादाचा निकाल परिषदेच्या मार्फतच लागावा असें आपलें मत जाहीर केलें. पुढें हा सरहद्दीचा तंटा मिटविण्याकरितां, एक दोस्तराष्ट्रतर्फे मिश्रकमीटि नेमण्यांत आली. याच परिषदेंत फ्यूमसंबंधीं प्रश्न उपस्थित झाला. विल्सननें फ्यूम हें यूगोस्लाव राष्ट्राकडे असणें जरूर आहे असा स्पष्ट अभिप्राय दिला. यामुळें, इटलींतील लोकमत प्रक्षुब्ध झालें.

अशा रीतीनें परराष्ट्रीय राजकारणांत अशी बिकट परिस्थिति उत्पन्न झाली असतां खुद्द इटलींतील अंतःस्थ परिस्थितीहि फारच अवघड झाली होती. मजूरवर्ग अधिक पगाराबद्दल चळवळ करीत होता व समाजसत्तावादी पक्षानें त्यांच्या मागण्याला उचलून धरलें होतें. याचवेळीं इटलीमध्यें आणखी एक नवीन पक्ष अस्तित्वांत आला होता व त्यानें बरीच चळवळ चालविली होती. या पक्षाचें नांव 'पॉप्यूलर कॅथॉलिक पक्ष' असें असून, त्यानें मजूरपक्ष व भांडवलवाले यांच्यामध्यें समेट उत्पन्न होईल अशा प्रकारचीं मतें प्रतिपादन करण्यास सुरुवात केली.

अशा रीतीनें इटलीमध्यें असंतोष माजून राहिला होता व त्याचा परिणाम सर्व धंद्यांच्या मजुरांनीं संप पुकारण्यांत झाला. या संपाच्या योगानें रशियांतील क्रांतिप्रमाणें या ठिकाणीं क्रांति घडून येईल अशी कट्टर समाजसत्ता

वाद्यांनां आशा वाटत होती. याच सुमारास फ्यूम बंदरासंबंधीं पुन्हां वादविवाद उपस्थित होऊन, दंगे धोपेहि क्वचित् ठिकाणीं झाले. त्यासंबंधीं चौकशी करण्याकरितां एक मिश्र कमिटी नेमण्यांत येऊन तिनें फ्यूमचा कारभार, मिश्र कमिटीनें निवडून दिलेल्या लोकांनीं करावा असा अभिप्राय दिला. पण या कमिटीनें निकाल देण्यापूर्वी एका इटालियन शूर नागरीकानें आपल्या भोंवतीं सैन्य गोळा करून त्या बंदरांतून इतर राष्ट्रांच्या लोकांनां हांकून लावलें व तें जबरदस्तीनें आपल्या ताब्यांत घेतलें. इकडे खुद्द इटलीमध्यें, संपाची वावटळ समासत्तावाद्यांनीं उठविली होती; व तिला थोडें फार प्रथम यश आलें. पण या समाजसत्तावादी पक्षाला विरोध करणारा एक 'बोर्गाई' पक्ष उपस्थित झाला. त्यांत पुष्कळ नागरिक लोकांनीं भाग घेतला; व या समाजसत्तावाद्यांच्या प्रयत्नाला चांगलाच खो घातला. १९१९ च्या सप्टेंबरमध्यें, आस्ट्रियाशीं इटलीचा तह झाला. या तहामुळें इटलीला लंडनच्या करारांत ठरल्याप्रमाणें सर्व मुलूख मिळाला. यामुळें इटलीचा बराच फायदा झाला. पण अद्यापि फ्यूम प्रश्नाचा निकाल लागला नव्हता. यामुळें लोकांचें लक्ष त्याकडे वेधून राहिलें होतें.

सन १९१९ च्या आक्टोबर मध्यें नवीन निवडणुकीची धांदल सुरू झाली. यावेळीं इटलींत दोनच प्रबळ पक्ष होते,ते म्हणजे समाजसत्तावादी व कॅथॉलिक हे होत. या निवडणुकीचा निकाल होऊन, समाजसत्तावाद्यांतर्फे १५६ व कॅथॉलिक पक्षाचे १०१ सभासद निवडून आले. पार्लमेंट उघडण्याच्या दिवशीं राजाचें स्वागत या समाजसत्तावाद्यांनीं केलें नाहीं. त्यामुळें त्यांच्या निषेधार्थ चहूंकडे सभा भरल्या. अशा रीतीनें इटलीमध्यें सावळागोंधळ माजून राहिला होता.

फ्यूमसंबंधाचें भांडण अद्यापि मिटलें नव्हतेंच व तें लवकर मिटण्याचा रंगहि दिसेना. लाईडजार्ज, क्लेमेंको, व सायनॉर निट्टी यांची लंडन येथें बैठक भरून, त्यांत फ्यूम शहर इटलीच्या देखरेखीखालीं असावें, सुसाक हें युगोस्लावियाकडे व फ्यूमचें बंदर व रेल्वे हीं राष्ट्रसंघाच्या ताब्यांत असावीं असें ठरलें. पण युगोस्लाव्हिया व वुड्रुसन या दोघांनींहि या बेतांस विरोध केला. इकडे घरगुती राजकारणांत समाजसत्तावाद्यांनीं धुडगूस घालण्यास सुरुवात केली होती; संपावर संप होत होते. एप्रिल १७ सन १९२० मध्यें राष्ट्रसंघाच्या सुप्रीम कौन्सिलची बैठक सॅनरेमो येथें भरली. त्या बैठकीला लाईडजार्ज, कर्झन, मिलरँड, निट्टी इत्यादि प्रमुख लोक हजर होते. त्या सभेंत तुर्कांबरोबर करावयाच्या तहाचा मसुदा तयार झाला. याच सुमारास फ्यूमसबंधाचें भांडण आपापसांत मिटवण्यासाठीं, युगोस्लावियानें इटलीकडे बोलणें सुरू केलें, व हें भांडण मिटण्याचा रंग दिसूं लागला.

अंतस्थ कारभाराचें धोरण प्रधानमंत्री निट्टी याला चांगलें राखतां न आल्यामुळें त्याचा पराजय होऊन त्याच्या जागीं पुन्हां गियोलिट्टी हा प्रधान झाला. याच सुमारास इटलीचें संरक्षित संस्थान जें अल्बेनिया, तेथील लोकांमध्यें इटालीयन अधिकाऱ्यांमध्यें वांकडे येऊन त्या लोकांनीं इटलीचें वर्चस्व झुगारून द्यावयाचें ठरविलें. पुढें इटालीयन सैन्यामध्यें व आल्बेनियन सैन्यामध्यें झटापटी होऊन शेवटीं आल्बेनियांतून इटालियन सैन्य काढून घेण्याचें गियोलिटीनें जाहीर केलें. प्रेसिडेंट विल्सन याची अध्यक्षत्वाची मुदत संपल्यामुळें त्याच्या जागीं दुसऱ्याची निवड झाली. विल्सन अधिकारभ्रष्ट झाल्यामुळें आतां युगोस्लाव व इटलीमध्यें फ्यूमसंबंधीं सलोखा होण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. शेवटीं युगोस्लावियाच्या प्रतिनिधींमध्यें बरीच भवति न भवति होऊन दोघांमध्यें १९२१ च्या फेब्रुवारींत तह झाला. या तहान्वयें इटलीनें डालमेशियावरील, व युगोस्लाव्हियानें ट्रीस्ट, गोरिया वगैरे देशांवरील आपला हक्क सोडला; फ्यूम हें स्वतंत्र ठरलें. अशा रीतीनें तंटा मिटल्यामुळें इटालियन लोकांचा जीव एकदांचा खालीं पडला.

पण अंतस्थ राजकारणांत समाजसत्तावाद्यांनीं चांगलीच बंडखोरी माजविली होती. निरनिराळ्या मजूर संघांनीं मोठमोठे संप पुकारले. पण इटालियन लोकांनां या समाजसत्तावाद्यांचा पुरा वीट आला होता. त्यांनां विरोध करण्यासाठीं आतां मध्यम वर्गानें कंबर बांधली. या पक्षाचें नांव फॅसिस्टीपक्ष असें होतें व या पक्षाला भराभर लोक येऊन मिळूं लागले. या पक्षामध्यें अनुभवलेले मुत्सद्दी, अधिकारी, व विश्वविद्यालयांतील विद्यार्थी, सुशिक्षित कामकरी वगैरेंचा भरणा होता. या पक्षानें समाजसत्तावादीपक्षाला चांगलेंच तोंड द्यावयाचें ठरविलें. लवकरच पुन्हां निवडणुकीचा प्रसंग प्राप्त झाला व या निवडणुकींत फॅसिस्टी पक्षाचे लोक सर्वांत अधिक निवडून आले. १९२१ च्या जूनमध्यें राजानें नवीन पार्लमेंट उघडलें. त्या बैठकींतच अंतःस्थ राजकारणाच्या धोरणावर वादविवाद होऊन, गियोलिटीला राजीनामा द्यावा लागला; व बोनॉमी यानें राजसूत्रें आपल्या ताब्यांत घेतलीं.

**मे १९२१ ते मे १९२४ पर्यंतचा इतिहास.**— समाजसत्तावादी पक्ष व त्यांच्या चळवळींनां व तत्वांनां विरोध करणारा फॅसिस्टपक्ष यांच्यामध्यें नेहमीं चुरस व भांडणें होत होतीं. त्यामुळें आज हा पक्ष तर उद्यां तो पक्ष अधिकारारूढ होत असे. १९२२ मध्यें सायनॉर मुसोलिनि या फॅसिस्ट पक्षाच्या पुढाऱ्यानें राजाच्या विनंतीवरून प्रधानमंडळ बनवलें. याच्या राज्यकारभाराचें धोरण आर्थिक बाबतींत,उदार व धाडसी उपायांचा अवलंब करणें, सरकारी अधिकाऱ्यांपासून चोपून काम घेणें; कच्चा माल ज्या राष्ट्रांत अधिक मिळूं शकेल अशा राष्ट्राशीं दोस्ती करणें, आस्ट्रेलिया, दक्षिण अमेरिका, एशियामायनर वगैरेसारख्या ठिकाणीं इटालियन लोकांनां, वसाहत करण्यास पाठविणें, व राजपद अढळ राखणें असें पंचरंगी होतें. तुर्क

स्तानाशीं त्यानें कडक धोरण ठेवलें होतें. इ. स. १९२२साली मुसोलिनी हाच इटालीचा राजा होता म्हटलें तरी चालेल. त्यानें नवीन नाणें पाडलें व स्वयंसेवकांचीं पथकें तयार केलीं. त्याच्या पक्षाचे त्यावेळीं जवळ जवळ दहा लक्ष लोक होते. कम्युनिस्ट पक्षांतील पोटपक्षांत भांडणें झाल्यामुळें हा पक्ष थोडासा निर्बल झाला होता, व त्यामुळें फॅसिस्टी पक्षाला जोर चढला होता. मे १९२२ मध्यें इटली व तुर्कस्तान यांच्यामध्यें त्या तहान्वयें आशियामायनरमध्यें रेल्वे बांधण्याला, बंदरें बांधण्याला, व खाणी शोधण्याला इटलीला परवानगी मिळाली.

१९२३ एप्रिलमध्यें, फॅसिस्ट प्रधानमंडळामध्यें संस्थानचें साम्राज्यवादी धोरण व वैचारिक प्रमाणशीर प्रतिनिधित्व इत्यादि बाबतींत मतभेद झाला व त्यामुळें प्रधान मंडळापैकीं कांहींनीं राजीनामा दिला. फॅसिस्ट चळवळ हाणून पाडण्याकरितां, एक नवीन पक्ष उभारण्यांत आला. दक्षिण इटलीमध्यें व सिसिलीमध्यें, मूळपासूनच फॅसिस्ट चळवळ जोरांत नव्हतीच, तेव्हां त्याच ठिकाणीं हा विरुद्ध पक्ष काढण्यांत आला. पण इटालियन चेंबरनें, मुसोलिनीनें मांडलेल्या ' मतदान सुधारणेच्या ' ठरावाला संमति देऊन मुसोलिनीवरचा आपला विश्वास व्यक्त केला. आगष्ट १९२३ मध्यें, कामाचे तास दर दिवशीं ८ असावेत यासंबंधींचा ठराव मंजूर झाला. कम्युनिस्ट लोकांचीं कारस्थानें फसविण्यांत आलीं. मजूरपक्षानें आपण कोणत्याहि पक्षाचे नव्हे अशा प्रकारचें धोरण जाहीर केलें. त्यामुळें कम्युनिस्टांवर आकाश कोसळल्यासारखेंच झालें. खर्चाच्या सबबीवर मुसोलिनीनें, भारुड भरतीचीं विश्वविद्यालयें बंद करण्याचें ठरविलें. युरोपियन राजकारणांत देखील मुसोलिनीनें आपलें चांगलेंच वजन ठेवलें होतें. याच्या चळवळीनेंच इटलीमध्यें, साम्राज्यवादाचा उगम झाला.

आगस्ट १९२३ मध्यें, ग्रीक लोकांनीं इटालियन वकीलमंडळापैकीं पांच मंडळींचा अल्बेनियाच्या सरहद्दीवर खून केल्यामुळें इटालियन लोक पळून गेले. या कृत्याबद्दल २० लाख लीरांची ग्रीकांनीं भरपाई करावी, तसेंच झालेल्या गोष्टीची क्षमा मागावी व ग्रीक आरमारावर इटालियन निशाण फडकवावें, अशा तऱ्हेचा निर्वाणीचा खलिता ग्रीकांकडे पाठविण्यांत आला यांतील इटलीचा अंतःस्थ हेतु भूमध्य समुद्राचें स्वामित्व मिळविण्याचा होता. ग्रीसला सगळ्या अटींनां संमति देणें शक्य नव्हतें. कांहीं अटीच त्यानें मान्य केल्या व बाकीच्या अटींचा निकाल लावण्याकरतां राष्ट्रसंघाकडे त्यानें याचना केली. पण तिकडे लक्ष न देतां इटलीनें ग्रीकांवर स्वारी करून कोर्फू, पॅक्सॉस, आणि अँटी पॅक्सॉस हीं बेटें जिंकली. इटलीच्या या अरेरावी वर्तनाबद्दल सर्व यूरोपभर तिरस्कार उत्पन्न झाला. ग्रीसनें नुकसानभरपाईची अट कबूल केली. पुढें पॅरिस येथें ब्रिटिश, फ्रेंच, व इटालियन वकीलांची सभा भरून, त्यामध्यें इटलीनें कोर्फू ग्रीकांस परत द्यावा असें ठरलें. त्याप्रमाणें नुकसानभरपाई केल्यावर इटलीनें कोर्फू बेटांतून आपलें आरमार काढून घेतलें.

सप्टेंबर १९२३ मध्यें युगोस्लाविया व इटालीमध्यें तंटा उपस्थित झाला. रॅपॅलोच्या तहाप्रमाणें फ्यूम हें बेट स्वतंत्र संस्थान ठरलें होतें. या फ्यूममध्यें बरेच घोटाळे माजले होते. त्यामुळें या तंट्याचा निकाल लावण्याकरतां म्हणून इटलीनें आपला एक लष्करी अधिकारी त्याच्यावर नेमला पण या तंट्याचा निकाल लागून फ्यूम हें बेट कांहीं अटीवर, इटलीच्या ताब्यांत देण्यांत आलें. याच सालांत वैमानिक दळ मुसोलिनीनें वाढविण्याचा जारीनें प्रयत्न केला. १९२३ च्या अखेरीस एक हजार विमानें इटालीजवळ होतीं.

१९२३ च्या नोंव्हेंबरमध्यें स्पेनच्या राजानें इटालीला भेट दिली, आणि स्पेन व इटली दक्षिण अमेरिकन संस्थानें यांचा एक संघ बनवून राष्ट्रसंघापासून अलग राहण्याच्या बाबतींत चर्चा झाली यामुळें स्पेनमध्यें व इटालीमध्यें आरमारी दळण वळणासंबंधीं कांहीं गुप्त कट झाला असावा अशी फ्रान्सला शंका आली. पण इटलीनें राष्ट्रसंघांतून न फुटण्याचा आपला निश्चय जाहीर केल्यामुळें व रुहरसंबंधींचें फ्रेंचांचें धोरण उचलून धरल्यामुळें फ्रान्सला इटलीबद्दल उपस्थित झालेली शंका दूर झाली.

सन १९२४ च्या जानेवारींत व्यापारीसंबंधाचा व राजकीय स्वरूपाचा तह झाला. या तहानें, रशियानें इटलीला बरेचसें धान्य, जकातीची सवलत वगैरे सवलती देऊं केल्या. त्याचप्रमाणें इटलीला सवलतीनें पेट्रोलियम व कोळसा रशियानें देण्याचें कबूल केलें. तरी पण, ब्रिटिश सरकारनें रशियांतील सोव्हिएट सरकारला मान्यता दिल्याचें इटलीला समजतांच, इटलीनें रशियाशीं केलेल्या तहनाम्यावर सही करण्याचें लांबणीवर टाकिलें. फ्यूमसंबंधींच्या प्रश्नांवर इटली व यूगोस्लाविया यामध्यें सलोखा घडून आला. फ्यूम हे इटलीला जोडण्यांत आलें, व इटलीनें युगोस्लावियाला, भाडेपट्टीनें, फ्यूम दिलें.

१९२४ च्या एप्रिलमध्यें, नवीन चेंबरची निवडणूक होऊन सरकार पक्षाचे ३७५ सभासद निवडून आले. या संबंधांत फॅसिस्ट लोकांनीं भलते सलते उपाय योजले, असें पुष्कळांचें मत आहे. चर्चमध्यें व सरकारमध्यें थोडेसें बिनसलें होतें पण त्यांच्यामधील गैरसमज दूर होऊन आतां उभयतांत सलोखा नांदूं लागला आहे.

[ सं द र्भ ग्रं थ.—हॉड्किन—इटली अँड हर इनव्हेडर्स ( आक्सफर्ड १८९२–१८९९ );जॉन्स्टन—दि नेपोलियॉनिक एम्पायर इन सदर्न इटली— ( २ भाग लंडन १९०४ ); बोल्टन किंग—हिस्टरी ऑफ इटालियन यूनिटी ( १८९९ ); बोल्टनकिंग अँड थॉमस ओके—इटली टुडे ( १९०१ ); रँके–हिस्टरी ऑफ दि पोप्स(इंग्लिश आवृत्ति लंडन १८७०); सिमॉड्से–रेनाइसन्स इन इटली (पांच भाग लंडन १८७५.]

**इटालियन वाङ्मय**—पांचव्या शतकाच्या अखेरीस उत्तरयूरोपीय लोकांनीं इटलीवर स्वारी केली व रोमचें अति प्रख्यात साम्राज्य एकदम धुळीस मिळविलें. इटलीमध्यें नवें राज्य स्थापन झालें, तथापि प्राचीन सर्व विद्या व कला रोमन साम्राज्याबरोबर लयास गेल्या नाहींत. विशेषतः ललितकला तर नंतरहि भरभराटींतच होत्या. गॉथिक राजांच्या दरबारांत मोठमोठे वक्ते व वैय्याकरण पंडित असत. इटली मध्यें पूर्वपरंपरेंतील सामान्य लोकांची बरींच विद्यालयेंहि होतीं, व त्यांत विद्या संपादन करून अनेक पंडित बाहेर पडत असत. याप्रमाणें रानटी गॉथ लोकांच्या अमलाखालींहि इटालीमध्यें जुन्या वाङ्मयाची आवड व अभिमान असलेले विद्वान् लोक तयार होत असत. तथापि इटालियन लोकांचा धार्मिक ग्रंथांच्यापेक्षां रोमन कायदेग्रंथांचा अभ्यास करण्याकडेच साहजिक जास्त ओढा असे, व या प्रवृत्तीस अनुसरून मध्ययुगामध्यें बोलोना पादुआ, नेपल्स, मॉडेना, पार्मा वगैरे ठिकाणीं युनिव्हर्सिट्या स्थापन झाल्या, व त्यांच्यामुळेंच पुढें मातृभाषेंतील वाङ्मयवृद्धीस मदत झाली; तथापि लॅटिन व जर्मन जातींच्या लोकांमध्यें दिसून येणारी मनाची व हृदयाची बाल्यावस्था, जिच्या योगानें मनुष्यामध्यें काव्यस्फुर्ति प्रादुर्भूत होते ती अवस्था, या काळच्या इटालियन लोकांमध्यें नव्हती. त्यामुळें इतर लोकांत दंतकथा, महाकाव्यें उपरोधिक काव्यें निर्माण होत असतां इटालियन लोक त्यांपासून बहुतेक अलिप्त होते. उदाहरणार्थ, आर्थर राजाची कथा सर्व यूरोपभर पसरली असतां इटालियन लोकांनां त्यांत कांहींच स्वारस्य वाटेना. मध्ययुगांतील मठवासीयांच्या व शूरवीरांच्या अद्भुतकथांमध्येंहि त्यांनां गोडी लागेना. त्यांचा शास्त्रीय विषयांकडे सर्व ओढा असे. रोमन कायदेग्रंथ, इतिहास, अरिस्टाटलचें तत्त्वज्ञान इत्यादि विषयांत ते लोक गढलेले असून त्यांच्यापुढें एक बाजूस रोमचें प्राचीन वाङ्मय, तर दुसरें बाजूस प्राचीनविद्यापुनरुज्जीवन हे मोठाले प्रश्न होते.

अर्थात इटालीमध्यें लॅटीन भाषाच फार दृढमूल होती. खरी इटालियन भाषा बनण्याची क्रिया फार सावकाश चालली होती, व १३ व्या शतकापर्यंत खुद्द इटालियन भाषेमध्यें एकहि ग्रंथ लिहिला गेलेला नव्हता ही गोष्ट इतिहासासिद्ध आहे, आणि पांचव्या शतकांतील रोमनसाम्राज्याचा नाश व तेराव्या शतकांतील इटालियन भाषेचा उदय यांच्या दरम्यानच्या कालांत इटालियन लोकच स्वतःच्या भाषेच्या अभावीं इटलीमधील इतर भाषांमध्यें म्हणजे इटालो–लाटिन किंवा फ्रांको--इटालियन असलेल्या भाषांमध्यें ग्रंथरचना करीत असत.

इ. स १२५० पासून इटालियन वाङ्मयाला खरी सुरवात झाली, व ती सुरवात व वाढ सर्व इटली द्वीपकल्पभर एकदम झाली. लेखनविषयामध्यें स्थानानुरूप भिन्नता होती. उत्तर इटलीमध्यें कवींचा भर धार्मिक काव्यावर होता, तर दक्षिण इटलीमध्यें प्रणय–काव्यावर भर अधिक होता.

तेराव्या शतकांत इटालीमध्यें फार मोठी धार्मिक चळवळ सुरू होऊन तींतूनच सेंट फ्रॉन्सिस व सेंट डॉमिनिक या दोन संस्था नांवारूपास आल्या. अंब्रियांत राहणाऱ्या त्या वेळच्या जॅकोपोन नांवाच्या प्रसिद्ध कवीनें प्रियपत्नीच्या निधनदुःखानें प्रेरित होऊन जें काव्य लिहिलें तें फारच रसभरित व धार्मिकविचारपरिप्लुत असल्यामुळें या कवीची प्रमुख इटालियन लेखकांमध्यें गणना करतात. त्याच वेळीं धार्मिक काव्याबरोबर धार्मिक नाटकेंहि तयार होऊं लागलीं.

इ.स.१२७५ च्या सुमारास टस्कनीमध्यें बऱ्याच राजकीय उलाढाली होऊन शेवट तेथें पूर्ण लोकसत्ताक राज्यपद्धति सुरू झाली. अर्थात् त्या चळवळीमुळें लेखकांनां व कवींनां चांगलें उत्तेजन व स्फुरण मिळालें, व मध्ययुगांतील गूढात्मक व वीररसात्मक पद्धति मागें पडून नवीन राष्ट्रीय व राजकीय वळणावर ग्रंथ व काव्यें निर्माण होऊं लागलीं. त्या वेळचा गिरोन डी अरेझो हा फार प्रसिद्ध कवी आहे; व त्याच्या वळणावर पुढें डांटे या श्रेष्ठ कवीनें आपलें महाकाव्य लिहिलें. तथापि डांटेच्यापूर्वी १३ व्या शतकांत रूपकात्मक काव्यें लिहिण्याचा प्रकार सुरू झालेला होता.

तेराव्या शतकांत म्हणजे सुमारें १२३१ पासुन इटालियन भाषेंत गद्यग्रंथ लिहिण्यास आरंभ झाला. पण काव्यग्रंथाच्या मानानें तो प्रयत्न फारच अल्प प्रमाणावर होता. गद्यलेखनासहि पद्यलेखनाप्रमाणें प्रथम उपरिनिर्दिष्ट केलेल्या तद्देशीय अवान्तर भाषांमध्यें सुरवात झाली. प्रथम आर्थर राजाबद्दलच्या अद्भुत कथा, नंतर नीतिविषयक व धार्मिक गोष्टी, नंतर लॅटिनमधून नीतिशास्त्र, इतिहास, वक्तृत्व वगैरे विषयावरील ग्रंथ यांचीं भाषांतरें झालीं. एकंदरींत गोष्टींची पुस्तकेंच सर्वांत अधिक झालीं. पौरस्त्य, ग्रीक,व ट्रोजन पौराणिक कथांवर, फ्रांसच्या वाङ्मयांतील कादंबऱ्यांची भाषांतरें, व इतर जुन्या लॅटीन भाषेच्या पद्धतीवर ग्रंथ होऊं लागले.

इ.स १२८२पासून वर उल्लेखिल्याप्रमाणें भाषान्तरें, रूपांतरें-अनुकरणात्मक ग्रंथ वगैरे प्रकार गौण ठरून स्वतःच्या अन्तःस्फूर्तीनें व निर्भयपणें मोठमोठे कवी आपले मनोविकार काव्यरूपानें प्रगट करूं लागले. अशा कवींपैकीं गीडो कॅव्हल्कँटी हा मोठा विद्वान असून काव्यकलेबद्दल त्याच्या कल्पना उच्च होत्या. त्यामुळें काव्यग्रंथांना त्यानें अगदीं नवीन वळण लावलें. त्याच्या काव्यांत उच्च विचार व सुलभमनोहर रचना यांचा सुंदर मिलाफ दृष्टीस पडतो.

सर्व इटालियन कवींमधील श्रेष्ठ म्हणजे डांटे ( १२६५–१३४१ ) हा होय. त्यानें आपल्या "व्हिटा नुव्हा" काव्यामध्यें प्रेमरसाचें अत्युच्च स्वरूप वर्णन केलें आहे. त्याची बिॲट्रिस नांवाची कोणी प्रणयिनी होती तिच्या प्रथमदर्शनाबरोबर कवीच्या जीवनक्रमास कांहीं नवीनच व अत्युच्च वळण लागलें असें त्यानें वर्णन केलें आहे. तें वर्णन कर-

तांना कवी इतका रंगून गेला आहे कीं त्यानें त्या वर्णनांत आपल्या प्रणयिनीला मानवी कोटींतून उचलून उच्च स्वर्गीय दैवी कोटींत बसविलें आहे.

तथापि इटालियममधील सर्व बुद्धिमान लोकांत डांटेला श्रेष्ठ ठरवून त्याचें नांव जगांत अजरामर करण्याचें श्रेय त्याच्या 'डिव्हिना कॉमेडीआ' या काव्याला आहे. या सर्व काव्यामध्यें शब्दार्थाखालीं स्वतंत्र व्यंग्यार्थ भरलेला आहे. यमलोक, नरक व स्वर्ग यांमधून प्रवास करणारा डांटे म्हणजेच ऐहिक व शाश्वत सुखांच्या पाठीमागें लागलेली मानवजाती होय. कवि वाट चुकला तें अरण्य म्हणजे समाजांतील सामाजिक व धार्मिक मतांचा गोंधळ होय, व त्याचे वाटाड्ये म्हणजे सम्राट व पोप. सूर्यकिरणांनीं प्रकाशित झालेला पर्वत म्हणजे सार्वभौम साम्राज्यसत्ता. डांटेच्या मार्गांतील तीन हिंस्र पशू म्हणजे मत्सर, गर्व व लोभ हे दुर्गुण. व्हर्जिल कवि म्हणजे बुद्धि व साम्राज्य; बिॲट्रिस म्हणजे दैविक सहाय्य, आणि परमसाध्य म्हणजेच ईश्वर होय.

डान्टेचा मुख्य गुण म्हणजे त्याचें काव्यकौशल्य, त्याची वर्णनशैली कांहीं अजब आहे. त्यानें धर्मशास्त्र, तत्त्वज्ञान, इतिहास, पुराणें प्रेमद्वेषादि मानवी मनोविकार इत्यादि सामुग्रीवर आपलें काव्य रचलें आहे. त्या आपल्या काव्यांत डांटेनें त्यावेळची सामाजिक स्थिति, व स्वतःची मनस्थिति वर्णन केली आहे. या काव्यानें डांटेनें विद्यापुनरुज्जीवनाला आरंभच केला[''डांटे पहा''.]

पुढला कवि पेट्रार्क ( १३०४–१३७४ ) यानें बहुतेक यूरोपभर प्रवास केला होता, व मोठमोठ्या राजांशीं व पोपशीं त्याचा पत्रव्यवहार असे. त्याच्या काव्यांत मुख्य प्रेमरस असून मनुष्यहृदयांतील शंका, शोक, भय, सुखदुःख सर्व विकार वर्णन केले आहेत.

बोकेचिओ हा मोठा कवि, टीकाकार व कादंबरीकार होता. त्याचा मुख्य ग्रंथ ''कथादशक'' (डेकॅमेरोन) हा होय. तो डांटेचा चहाता असून त्यानें त्याचें चरित्रहि लिहिलें आहे. याच्याशिवाय डांटेच्या कॉमेडीचें अनुकरण करून काव्यें लिहिणारेहि कित्येक निघाले. डेकॉमेरान हा चावट गोष्टींचा संग्रह असल्यामुळें फार लोकप्रिय आहे, व याचीं भाषांतरें सर्व भाषांत झालीं आहेत.

याच सुमारास बखरी लिहिणारे कॉंपेनी व व्हिलनी हे होत. कॉंपेनीच्या बखरींत १२८०–१३१२ पर्यंतची हकीगत असून त्यानें इतिहासकाराप्रमाणें कार्यकारणभावना व खोल विचारहि नमूद केले आहेत. व्हिलनीनें इ. स. १३४७ पर्यंतची हकीगत दिली आहे. हास्यविनोदात्मक काव्यें लिहिणारे पुष्कळ निघाले त्यांतील मुख्य ए. पुसी यानें व्हिलनीच्या बखरीचें एक ऐतिहासिक काव्य बनविलें आहे. असा काव्यमय इतिहास लिहिण्याचा प्रकार बराच रूढ होता. शिवाय पेट्रार्कप्रमाणें राष्ट्रीय विचारपरिप्लुत काव्यें लिहिणारे पुष्कळ निघाले. चौदाव्या शतकांतील 'एक्सेरिमस' हें फक्त एकच नाटक उपलब्ध आहे. सीनाची सेंट कॅथराईन ही ख्रिस्ती संन्यासमार्गावरील मुख्य टीकापर लेखक होय.

**वि द्या पु न रु ज्जी व न.**—बरेच दिवस धुमसत असलेली बौद्धिक चळवळ शेवटीं १५ व्या शतकांत इटालीमध्यें प्रादुर्भूत झाली. या चळवळीच्या विद्वान, उद्योगी पुढाऱ्यापैकीं मॅनेट्टी हा रात्रंदिवस खपून ग्रीकग्रंथाचें भाषान्तर, हिब्रूचा अभ्यास व आरिस्टाटलवर टीका करीत होता. स्ट्रोशिनें प्लुटार्क व प्लेटो यांच्या ग्रंथाचें संशोधन केलें. ब्रॅकिओलिनीनें सिसरोचीं भाषणें शोधून काढलीं. आरिस्पानें शेकडें हस्तलेख मिळवले. आता यांची ही धडपड कशाकरता चालली होती म्हणाल तर रोमच्या प्राचीन वैभवानें यांच्या विचारात खळबळ उडवून दिली होती. गेल्या शेंदोडशें वर्षे डांटे, पेट्रार्क, बोकाचिओ यांच्या मनात जी कल्पना अस्पष्टपणें वावरत होती तीच कल्पना पूर्ण जोरात येऊन रोमचें व ग्रीसचें प्राचीन वाङ्मय व संस्था यांचें पुनरुज्जीवन करण्याचें काम या विद्वानांनीं हातीं घेतलें. या प्राचीन उच्च विचाराच्या नवजीवनानें सृष्टीबद्दलची यथार्थ कल्पना आली. जग दुःखमय अतएव त्याज्य असें वाटेनासें झालें. सत्य व सौंदर्य यांचा मिलाफ झाला, व व्यक्तिविषयक व सामाजिक अशा प्रत्येक गोष्टीला पालटलेलें नवें स्वरूप प्राप्त झालें. येणेंप्रमाणें नव्या युगालाच प्रारंभ झाला.

या युगांत व्यक्तीला महत्त्व अधिक येऊं लागलें. तें महत्त्व जन्मकुलावरून नव्हे तर आंगच्या गुणावरून ठरूं लागलें. ऐहिक जीवनक्रम अधिकाधिक सुखमय करण्याची प्रवृत्ति वाढली. मध्ययुगांतील स्वर्गविषयक व दैवी हक्काच्या कल्पना मागें पडून ऐहिक सुखोपभोग व मानवी समान हक्क या कल्पनांचें प्राबल्य वाढलें. ही एकंदर मोठी प्रगति झाली खरी; पण त्याबरोबर दुष्परिणाम असे दिसू लागले कीं नीतिबंधनें शिथिल होऊं लागलीं, धार्मिक विचार व आचार बदलत चालले, व कामक्रोधादिक बळावून भ्रष्टाचार माजत चालला असें कित्येक म्हणतात.

असो; या नव्या चळवळीमुळें इटालीमध्यें फ्लॉरेन्स, नेपल्स व रोम येथें तीन विद्यापीठें स्थापन झाली. यांपैकीं फ्लॉरेन्स विद्यापीठांत प्लेटो–पद्धतीचा शिक्षणक्रम असून त्यांत विद्यार्थी वक्तृत्वादि कलांचें, मोठे लोक कुटुंब–पद्धति व लोकसत्ताक राज्यपद्धति यांचें, व वृद्ध लोक मरणोत्तरच्या स्वर्गादि लोकांविषयींचें ज्ञान संपादन करीत असत.

त्यावेळीं अद्भुतरम्य काव्यें होऊं लागून त्यांत प्रेम, आदर, शौर्य, औदार्य या गुणांचें वर्णन असे. नाट्यकलेची वाढ बरीच झाली. काव्यांत गोप व शेतकरी यांच्या जीवनक्रमाचे देखावे येऊं लागले. शृंगारिक व बीभत्स पदें व तमाशे होऊं लागले. त्यांत लॉरेंझोचा पुढाकार असे. उलट असल्या धर्मभ्रष्ट व शृंगारिक गोष्टींना विरोध करणारा व लॉरेंझो व त्याचे दरबारी लोक यांच्या जुलमी व चैनी राज्य-

पद्धतीवर टीका करणारा सान्व्होनरोला हा ग्रंथकार फ्लॉरेंसमध्यें १४८९ मध्यें उत्पन्न झाला. धर्माचार सुधारावे म्हणूनहि त्यानें फार ओरड केली, व पुढें येणाऱ्या धर्मक्रांतीची पूर्व तयारी केली. तथापि त्याचा ओढा नवीन सुधारणांकडे नसून जुन्या ख्रिस्तप्रणीत धर्माकडे होता; त्यामुळें त्याला धर्मवेडा समजत.

इतिहासलेखनाकडे पंधराव्या शतकांत फारसें लक्ष नव्हतें पण त्या वेळचे व्हिओनार्डो व्हिन्सी व आल्बर्टी यांनीं शिल्प, काव्य, चित्रकला, यंत्रकला, गणित, संगीत, कायदा इ. विविध विषयांचें अध्ययन करून अनेकांगी विद्वत्ता संपादन केली, व याच वळणानें पुढें १६ व्या शतकांत अनेक विद्वान तयार होऊन त्या शतकाला इटालियन वाङ्मयाचें सुवर्णयुग असें नांव पडलें.

पु न रु ज्जी व क च ळ व ळी चीं वा ढः—हें सुवर्णयुग म्हणजे १४९४ ते १५६० हा काल होय. पण त्याचवेळीं ८व्या चार्लसच्या स्वारीमुळें इटालींत परकीय अम्मल सुरू झाला या सुवर्णयुगांतील इतिहासशास्त्री मॅकीआव्हेली व गिसिआर्डिनी हे होत. मॅकीआव्हेलीचा मुख्य गुण म्हणजे तो प्रयोगसिद्ध राजनीतिशास्त्राचा कर्ता होता. तो राजनीतीशास्त्रांतील चालू गोष्टीपेक्षां शाश्वत गोष्टीकडे लक्ष देऊन लिहिणारा होता.त्याचा प्रिन्स हा ग्रंथ प्रत्येक अभ्यासकाला अवश्य आहे. दुसऱ्या नंबरचा लेखक गिसिआर्डीनी यानें लॉरेंझोच्या मरणापासून १५३४ पर्यंतचा इतिहास लिहिला. स्वानुभवानें लिहिलेल्या त्याच्या हकीगतीला महत्त्व फार आहे. त्याचे राजकीय विचारहि खोल आहेत.

ॲरिओस्टोचें ऑर्लॅंडो हें अद्भुतरम्य काव्य, ट्रिसिनोचें ऐतिहासिक काव्य अनेक स्त्रीपुरुषलेखकांचीं वीणाकाव्यें, टॅसोचें ॲरिस्मांडो व इतरांचीं दुःखपर्यवसायी नाटकें मॅकेआव्हेली, ॲरिओस्टो इत्यादिकांचीं आनंदपर्यवसायी नाटकें, बर्नी वगैरेंचीं हास्यविनोदी काव्यें, ॲरिओस्टो इत्यादिकांचीं औपरोधिक काव्यें कॅस्टिग्लोनचें कॉर्टिजीआनो हें उपदेशात्मक काव्य, व बॅंडेलो वगैरेंच्या कादंबऱ्या हे सोळाव्या शतकांतील इटालियन वाङ्मयांतले प्रसिद्ध ग्रंथ होत. या शतकांत भाषा-पद्धतीला उत्तम वळण लावण्याकडे लेखकांचें लक्ष फार होतें, व त्यामुळें जुन्या भाषांतील उत्कृष्ट नमुने म्हणून प्राचीन अनेक ग्रीक व लॅटिन ग्रंथांचीं भाषांतरें करण्यांत आलीं.

टॅसो ( १५४४-१५९५ ) हा १६ व्या शतकांतील सर्वांत श्रेष्ठ व डांटेच्या तोडीचा कवि होय. त्यानें अठराव्या वर्षीच रिनाल्डो नामक महाकाव्य, नंतर ॲमिंटा नामक रम्य नाटक लिहीलें तथापि प्रथमपासून त्याचा हेतु एक मोठें वीरकाव्य लिहिण्याचा होता. म्हणून त्यानें विषय जेरुसलेम येथील ख्रिस्ताच्या देवळाची गॉडफ्रेनें ११ व्या शतकांत केलेली मुक्तता हा त्यानें घेतला; आणि "जेरुसलेम लिबर्टा" हें इटलींतील सर्वोत्कृष्ट महाकाव्य त्यानें निर्माण केलें. त्यांत ऐतिहासिक प्रसंगांची निवड फार चांगली झाली आहे. रसपरिपोष पूर्ण आहे, व भाषापद्धति शक्य तितकी प्राचीन वळणावर आहे.

अ व न ती चा का ळः—१५५९ पासून १७ व्या शतकाच्या अखेरपर्यंतचा दीडशें वर्षांचा काल इटालियन वाङ्मयाच्या अवनतीचा होय. याचें कारण राजकीय पारतंत्र्य हें होय. या काळांत स्पॅनिश अम्मलाखालीं इटली द्वीपकल्प चिरडलें, व भ्रष्ट केलें गेलें. संशयी अधिकारीवर्गानें विचारस्वातंत्र्य व भाषणस्वातंत्र्य यांवर पूर्ण नियंत्रण घातलें; अधिकाऱ्यांनीं कँपेनेलाचे हालहाल केलें, ब्रुनोला तर जाळून टाकलें. सर्व उच्च विचार व सर्व सदिच्छा गाडून टाकल्या त्यामुळें माणसांचीं मनें दिवसानुदिवस दुबळ होत चाललीं. सर्व उच्च आकांक्षा जळून खाक झाल्या. बाल्बोनें त्या स्थितीचें पुढीलप्रमाणें वर्णन केलें आहे. जर सामान्य लोकांचें सुख समाधान त्यांनीं उद्योगविरहित, स्वस्थ व शांत बसण्यांत असेल, जर श्रीमंत सरदारांनां अधिकार कांहींचाहि नसतां पोकळ पदव्यांतच सुख वाटत असेल, जर राजे रजवाड्यांना खरें स्वातंत्र्य खरी राजसत्ता नसतां केवळनामधारी राज्यकारभार पाहण्यांत समाधान वाटत असेल, जर सरस्वतीच्या भक्तांनां व कलानिपुणांना आपल्या लेखांबद्दल चित्रांबद्दल, शिल्पकामाबद्दल समकालीनांकडून वाहवा पण भावी पिढ्यांकडून शिव्याशाप मिळविण्यांत आनंद वाटत असेल, आणि जर सर्वच राष्ट्र अभिमानयोग्य व राष्ट्रीय सर्व कल्पना विसरून जाऊन केवळ ख्यालीखुशालींत राहण्यास खुष असेल तर—तर मात्र इटालीच्या इतिहासांत या १५० वर्षाइतका सुखाचा काल दुसरा कोणताहि खास नव्हता. इटलीच्या वाङ्मयेतिहासांतील या कालाला "सेंटिस्मो" असें म्हणतात. या काळांतील नीरस विचारविकारशून्य लेखकांनीं कृत्रिमपणा, शब्दावडंबर, विलक्षणरूपकादि अलंकार इत्यादि युक्तायुक्तयांनीं आपले पोकळ तत्त्वरसशून्य लेख लिहिण्यास सुरवात केली. या पद्धतीनें लिहिणारा मुख्य मारिनि म्हणून कवि होता, व त्याच्याच पद्धतीवर लिहिणाऱ्या त्याच्या अनुयायांच्या पद्धतीला शेवटीं 'मारिनिझम' असें नांव पडलें.

याप्रमाणें पोकळ डामडौली भाषेंत लिहिणारे बरेच लेख निघाल्यानंतर पुन्हां उलट खाऊन सोपी सरळ साधी भाषा लिहिण्याचें सुरू झालें, व सामान्य गोपचरित्रात्मक क्षुल्लक खेडेगांवी विषयांना महत्त्व मिळूं लागलें. पण हिलाहि योग्य सुधारणा किंवा वळण म्हणतां येत नाहीं, कारण पूर्वीचा डोमडौल गेला तर त्या जागीं दुबळेपणा व नेभळेपणा आला, त्यामुळें वाङ्मयाबद्दल खरी गोडी व कळकळ कमी होत जाऊन तें मृत्युपंथाला लागलें. या प्रमाणें इटालीच्या राजकीय व सामाजिक गुलामगिरीमुळें सर्व बुद्धितेज व स्वातंत्र्यप्रेम लयास गेलें होतें. पण अशा स्थितींतूनहि एका निराळ्या दिशेनेंच लोकजागृतीला सुरवात झाली. इटालीच्या बुद्धीचा

शोध तत्वज्ञानाच्या मार्गांत अडथळा आल्यामुळें तिकडून वळून शास्त्रीय शोधांच्या दिशेनें वाहूं लागला. त्यावेळच्या शास्त्रज्ञांपैकीं श्रेष्ठ ग्यालिलीओ हा बेकन, डेकार्टे, यांचा समकालीन होय. तो दांडगा लेखकहि असून आपले विचार निर्भयपणें सुलभ व सुंदर भाषेमध्यें मांडण्यांत त्याचा हात खंडा होता.

शास्त्रीय लेखकांच्या प्रादुर्भावाबरोबर औपरोधिक लेखकवर्गहि पुढें सरसावला. त्यांपैकीं रोझा नामक कवीनें आपल्या राष्ट्राच्या दैन्यावस्थेचें व इटालियन बांधवांच्या नेभळटपणाचें मोठें करुणाजनक व लज्जास्पद चित्र रेखाटून राष्ट्रीय भावना जागृत करणारें वाङ्मय लिहिण्याबद्दल आपल्या कवि बंधूनां विनविलें आहे. टॅसोनी हा रोझापेक्षांहि उच्च दर्जाचा कवि झाला. त्यानें "सॅकिआ रापिंटा" नांवाचें वीररसात्मक विनोदात्मक महाकाव्य लिहून त्यांत त्यानें सव्हॉयच्या ड्यूकला स्पानिअर्ड लोकांविरुद्ध युद्ध चालू ठेवण्यास उत्तेजन दिलें आहे.

**१८ व्या श त कां ती ल पु न र्जा गृ तिः**—१८ व्या शतकांत स्पॅनिश सत्ता झुगारून देऊन स्वातंत्र्य मिळाल्यामुळें इटालीची राजकीय स्थिति पुन्हां सुधारत चालली. या सुधारणेचे पुरस्कर्ते २ रा जोसेफ,१ ला लिओपोल्ड व १ला चार्लस हे होते.

या पुनर्जागृतीच्या काळांत व्हिचो, मुरेटोरी, मॅफी झेनो वगैरे इतिहासकार, गॅलिनी वगैरे अर्थशास्त्री व कायदेपंडीत, ओर्डी व डेल गिओनों हीं औपरोधिक व समाजनीतीवरील अत्यंत परिणामकारक काव्यें लिहिण्यास पॅरिनी व गोझी, बॅवेटी वगैरे कविकादंबरीकार, व गोल्डोनी हा प्रसिद्ध नाटककार असे प्रसिद्ध होऊन गेले.

अठराव्या शतकांत फ्रेंच लोकांच्या हृदयांत खळबळ उडवून देऊन १७८९ मध्यें भयंकर राज्यक्रांति ज्या विचारांनीं घडवून आणली तेच स्वातंत्र्यप्रीति, समताबुद्धि व जुलुमाबद्दलची चीड इत्यादि विचार इटालियन वाङ्मयांत चमकूं लागले आणि राजकीय व धार्मिक जुलुमांतून राष्ट्राची मुक्तता करण्याची भावना इटालियन लोकांत उत्पन्न करूं लागले. तेव्हां राष्ट्रीय विमोचनाबरोबर बौद्धिक जागृतीहि व्हावी म्हणून प्राचीन ग्रीक व लॅटिन वाङ्मयाचा अभ्यास पुन्हां जारीनें सुरू झाला. ही पंधराव्या शतकांतील चळवळीचीच पुनरावृत्ति होय. मधलें. सतरावें शतक इटालीला मध्ययुगाप्रमाणेंच गेलें; त्यांत मागील सुधारणा झाली. तेव्हां पुन्हा सुधारणेची चळवळ करणें भाग पडलें व त्याच चळवळीचा उपःकालांतील पॅरिनी हा मुख्य लेखक होय.

या पुनर्जागृतीच्या कालांतील राष्ट्रभक्ति व प्राचीन अभियुक्तवाङ्मयप्रीति हा महामंत्र होय. त्या वेळचा प्रमुख शोकपर्यवसायी नाटकें लिहिणारा आल्फेरी यानें सर्व कथानकें प्राचीन ग्रीक व रोमन इतिहासांतून घेतली, व आपल्या पात्रांच्या द्वारा तत्कालीन इटालियन राष्ट्रभक्तांच्या अन्तकरणांतील राज्यक्रांतिविषयक विचार वदविले, व राष्ट्रीय जागृतीची उत्तम कामगिरी बजावली. दुसरा एक फॉस्कोलो नामक कवि व कादंबरीकार होऊन गेला. त्याच्या लेखनांत प्रेमरस व राष्ट्रभक्ति या दोहोंचें मिश्रण असे, व विशेषतः तत्कालीन फ्रेंच महावीर नेपोलियन याच्या पराक्रमाचें प्रतिबिंब उमटत असे. त्यांची ऑर्टिस, सेपोलक्री वगैरे अनेक पुस्तकें प्रसिद्ध आहेत. त्याच्याच लेखांनीं १८४८ मधील राज्यक्रान्तिकारक लोकांना उत्तेजन मिळालें असें म्हणतां येईल.

यांशिवाय मॉंटि निकोलीनी वगैरे कवि नाटककार फ्रेंच राज्यक्रान्ति व नेपोलियन यांचे विरुद्ध लिहिणारे, व राष्ट्रीय विचार जागृत करणारे त्यावेळीं होऊन गेले. बोट्टा व कोलेट्टा या इतिहासकारांनीं १७३४—१८२५ पर्यंतचा इतिहास लिहून नेपोलियनच्या इटलीवरील स्वाऱ्या व सत्ता यांचा पूर्ण निषेध व राष्ट्रीय स्वातंत्र्याचा पुरस्कार केला आहे. या राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या चळवळीबरोबर भाषेमध्यें फ्रेंच शब्द फार होते ते काढून टाकून भाषा शुद्ध बनविणारे कांहीं लेखक, निघाले हें लक्षांत घेण्यासारखें आहे.

**१९ वें श त क व त्या नं त रः** या काळांत जर्मनी वगैरे देशांत अद्भुतरसाचें प्राबल्य फार होतें, तथापि इटलीमध्यें "वास्तविकते" कडे लेखकांचें लक्ष होतें. या पद्धतीनें लिहिणारांमध्यें मॅंझोनी हा कवि व कादंबरीकार फार प्रसिद्ध आहे. मानवी अन्तःकरणांतील अत्यंत गूढ विकार मानसशास्त्रसुसंगत रीतीनें वर्णन करण्यांत तो फार चतुर असे. त्याच काळांतील लिओपार्डि हा गद्य व पद्य या दोहोंचा उत्तम लेखक होता. त्याच्या काव्यांत सर्वत्र भयंकर व भव्य गोष्टींचें वर्णन आहे. डॅंटेच्या बरोबरीनें याची कीर्ति आहे.

या वेळीं संशोधनपूर्वक व पूर्ण विश्वसनीय असे इतिहासग्रंथ लिहिणारेहि पुष्कळ निघाले. १८४४ मध्यें झालेल्या राज्यक्रांतीच्या सुमारास व त्या काळीं प्रसिद्ध असलेले मुख्य लेखक गुस्टी, गुरेझी, जिओबर्टि व बाल्बो हे चौघेजण होत. गूस्टीचे इटालीच्या शत्रूसंबंधानें औपरोधिक लेख अत्यंत परिणामकारक झाले. गुरेझीच्या ऐतिहासिक कादंबऱ्या अत्यंत लोकप्रिय झाल्या होत्या. जिओबर्टी हा तत्त्ववेत्ता व बाल्बो हा इतिहासकार होता. १८५० पासून राजकीय वाङ्मयाचें महत्त्व कमी झालें. अलीकडील अनझो कवि, नाटककार व कादंबरीकार म्हणून बराच प्रसिद्ध आहे.

[ **सं द र्भ ग्रं थ.**—इटालियन वाङ्मयाचे अनेक इतिहास उपलब्ध आहेत. गिउडिचि ( १८५५ फ्लारेन्स ) आणि सांक्टिस् ( नेपल्स १८७० ) हे दोन इतिहासग्रंथ वाङ्मयाच्या अभिरुचीच्या मनुष्यानीं लिहिलेले आहेत. तथापि शास्त्रीय तऱ्हेनें वाङ्मयेतिहास पाहिजे असल्यास बारटोली ( फ्लारेन्स ) आणि ग्यास्पारी ( बर्लिन ) यांचे ग्रंथ पहावेत. प्रस्तुत लेख बारटोलीच्या लेखांवरून तयार केला आहे. ग्यास्पारीच्या ग्रंथाचें इंग्रजींत अर्धवट भाषांतर प्रसिद्ध झालें आहे. ]

**इटा** जिल्हा-संयुक्त प्रान्ताच्या आग्रा विभागांतील एक जिल्हा. क्षेत्रफळ १७३७चौ.मै. चतुःसीमा.-उत्तरेस गंगानदी, पश्चिमेस अलीगड, मथुरा व आग्रा. दक्षिणेस आग्रा व मैनपुरी पूर्वेस फरुकाबाद.

गंगाथडीवर तराईचा प्रदेश आहे. ह्या खालील प्रवाहास बुर्न्हि गंगा म्हणतात.इतर जिल्हा दोआबचे उंच प्रदेशांत आहे.

न द्याः—कालीनदी ही एक मोठी नदी आहे. लहान नद्याहि येथें आहेत त्या इसन, अरिंद, सेनगर, ह्या होत.

श्वा प दें:—रानडुकरें, काळवीट, लांडगे, कोल्हे, वगैरे. येथील हवा कोरडी व आरोग्यदायक आहे. उन्हाळ्यांत वावटळें सुटतात. हिवाळ्यांत अत्यंत थंड असतें. वार्षिक पाऊस सुमारें २९ इंच असतो.

इ ति हा सः—ह्या जिल्ह्याचा पूर्वेतिहास अनिश्चित आहे. काली नदीच्या बाजूंनीं असलेल्या उंचवट्यावरून ख्रिस्ती शकाचे सुरवातीस येथें महत्त्वाचीं गांवें अस्तित्वांत असावीं असें दिसून येतें. अहीर व भार व त्यानंतर रजपूत आले. हा जिल्हा कनौजचे राज्यांत खात्रीनें मोडत असावा. सातव्या शतकांत हुएन संग हा या जिल्ह्यांत आला होता, असा तर्क आहे. बिलसर येथें कुमारगुप्ताचे लेख असलेले दोन स्तंभ सांपडले आहेत. ( गुप्त इन्स्क्रिप्शन्स, फ्लीट प्रकाशित, पा. ४२ ).

बौद्धकालीन अवशेष असलेले नुहखेर खेड्याजवळ बरेच उंचवटे आहेत. पतिआली, सरईआघाट, व सोरोन हीं गांवें फार जुन्या कालापासून अस्तित्वांत आहेत.—मुख्य मुसलमानी इमारती म्हणजे मारहर व सकीत या होत. जेव्हां हें राज्य मुसुलमानांनीं काबीज केलें तेव्हां इटा अर्थांत मुसुलमानांचे ताब्यांत गेला, तरी पण ह्याची व्यवस्था कोईल बियाना अथवा कनोजहूनच पहात असत. त्यावेळीं ह्या जिल्ह्याच्या उत्तरभागीं असलेलें पतिआली शहर मुख्य होतें. ह्या गांवीं १२७० मध्यें घियासउद्दीन बलबनची स्वारी आली होती. दिल्ली व जानपुरचे झगड्यांत ह्या जिल्ह्यास बराच त्रास पोहोंचला. १४८९ मध्यें बहलोल लोधी हा सकीत येथें मरण पावला. १८ चे शतकांत हा जिल्हा फरुकाबादचे बंगशदा नबाबांचे हातीं गेला. नंतर फरुकाबादचा नबाब व अयोध्येचा नबाब ह्यांची जोड मालकी ह्यावर होती. १८०१-२ सालीं हा ब्रिटिशांकडे आला तेव्हां त्यांनीं ह्या जिल्ह्याचे वेगळे भाग पाडून त्यांची व्यवस्था भोंवतालच्या जिल्ह्याकडे सोंपवून दिली. १८४५ मध्यें ह्यांचा एक वेगळा पोट विभाग पाडण्यांत येऊन १८५६ मध्यें एक वेगळा जिल्हा तयार करण्यांत आला. १८५७ सालचें बंडाचे वेळीं येथील अधिकारी लोक हा जिल्हा सोडून सुरक्षितपणें आग्र्यास जाऊन पोहोंचले. कासगंज हातीं ठेवण्याचा त्यांचा प्रयत्न सिद्धीस गेला नाहीं. इटाचा राजा दमारसिंग ह्यानें ह्या जिल्ह्याचे दक्षिण भागांत स्वातंत्र्य पुकारलें. जुलै अखेरीस तर फरुकाबादचे बंडखोर नबाबानें हा बहुतेक जिल्हा आपले ताब्यांत घेतला. पण जनरल ग्रेथेट हा दिल्लीहून सैन्य घेऊन आला असतां बंडखोर लोक पळून गेले. तेव्हां काक्स याला इटा व अलिगड यांवर ' स्पेशल कमिशनर, नेमण्यांत आलें. कासगंज कांहीं काळपर्यंत बंडखोरांचेच ताब्यांत राहिलें. अलिगड जिल्ह्यांत गंगिरी येथें बंडखोरांचा पुरा बिमोड करण्यांत आला व कासगंज घेण्यांत आलें. १८५८ चे जुलैमध्यें सर्वत्र शांतता झाली.

लो क व स्ती—इटा जिल्ह्यांत वस्ती असलेलीं गांवें १५३८ आहेत. लो. सं. ८२९७६० आहे ( १९२१ ) तहसिलीं चार-इटा, कासगंज, अलिगंज व जलेसर; म्युनिसीपालिट्या असलेलीं गांवें-कासगंज, जलेसर सोरन व इटा ( मुख्य ठिकाण ) व मारहर ( नोटिफाईड एरिआ ). शेंकडा ८८ लोक हिंदु असून, शेंकडा ११ लोक मुसलमान आहेत. भाषा—पश्चिम हिंदीची व्रज पोटभाषा, ह्या जिल्ह्यांत असणाऱ्या हिंदुंच्या पोटजातीः—चांभार, अहीर, लोध, रजपूत ब्राह्मण, कच्छी, हाबुरा, नत. ह्या आहेत. मुसलमानांच्या पोट जातीः-शेख, पठाण, फकीर. रजपूत. या आहेत.

शे त की.—तराईचे दक्षिण भागाची म्हणजे बुर्न्हि गंगेच्या दक्षिणेकडील भागाची जमीन सुपीक आहे. बुर्न्हि गंगा व काली नदीमधील जमीन साधारण सुपीक आहे. कालीनदीच्या दक्षिणेकडील भाग रेताड असून त्यापलीकडील जमीन चांगल्यापैकीं सुपीक आहे. धाराबंदी पद्धति संयुक्त प्रान्तांतील इतर भागांप्रमाणेंच आहे. महाल, जमीनदारी व पट्टीदारी असे तीन प्रकार आहेत. मुख्य पिकें:—गहूं, जव, बाजरी, ज्वारी, मका, व चणे, हीं होत. इतर पिकें:—कापूस, ऊंस, नीळ, व अफू. गेल्या पन्नास वर्षांत शेतकींत बरीच सुधारणा झाली आहे. गव्हाचें व मक्याचें पीक सर्वांत अधिक होते. 'लोअर गँजीस्' कालव्याच्या फत्तेगड व बेवर शाखा व ' अपर गँजीस' कालव्याच्या कानपूर आणि इटावा शाखा ह्या जिल्ह्यांत आहेत. उच्च भागांत चुनखडी सांपडते.

व्या पा र उ दी म.—मुख्य उद्योगधंदेः—सुती विणकाम, साखर शुद्ध करणें, कांच तयार करणें वगैरे आहेत. निर्गत-कापूस, गहूं, जव, कडधान्यें बाजरी, अफू व साखर, आयात —विलायती कापडचोपड, खनिजधातू, व मीठ. यांत व्यापाराचीं गांवें:—कासगंज व जलेसर हीं असून सोरोन हें यात्रेचें ठिकाण आहे. ह्या जिल्ह्यांतून कानपूर-अच्छनेरारेल्वे जाते. १७८३-८४ चा व १८०३ चा हे दोन दुष्काळ लोकांचे बरेच दिवस आठवणींत राहिले.तसेंच १७३७-३८ चा दुष्काळहि बराच उग्र स्वरूपाचा होता. तदनंतरचा मोठा दुष्काळ म्हणजे १८६०-६१ चा होय.

रा ज्य का र भा र.—जिल्ह्याचा मुख्याधिकारी कलेक्टर असून त्याच्या मदतीस चार डेप्युटीकलेक्टर आहेत. प्रत्येक

तहशीलीवर एका तहशीलदाराची नेमणूक असते. पहिली जमाबंदी जमीनीची मोजणी वगैरे कांहीं न करितां नुसती अंदाजानें ठरविण्यांत आली. खरी जमाबंदी १८६३ व १८७३ च्या दरम्यान करण्यांत आली. १८७९ मध्यें २'९ लाख उत्पन्नाची जलेसर तहशील आग्रा जिल्ह्यांतून ह्या जिल्ह्यांत घेण्यांत आली. अगदीं नवीन जमाबंदी म्हणजे १९०२ व १९०५ च्या दरम्यान करण्यांत आली. सारावसुली (१९०३—४) १०९३ हजार; एकंदर उत्पन्न (१९०३–०४) १६६७ हजार; सुमारें शेंकडा ३ लोकांस लिहितां वाचतां येतें.

त ह शी ल.—(संयुक्त प्रांत) इटा जिल्ह्याच्या मध्यभागीं असलेली एक तहसील. ह्यांत इटा–सकीत, सोनहार, व मारहर तालुक्यांचा समावेश होतो. क्षेत्रफळ ४८० चौ. मैल लोकसंख्या ( १९११ ) २४६८३०. बहुतेक जमीन सुपीक आहे. शिवाय लोअर गँजीज कालवा व त्याची बेवर शाखा, तसेंच अपर गँजीज कालवा व त्याच्या कानपूर व एटावा शाखा, यामुळें बरेंच पाणी मिळतें.

गां व.—( संयुक्त प्रांत ) इटा जिल्ह्याचें व तहसिलीचें मुख्य ठिकाण. कानपूर अच्छनेरा रेल्वेच्या कासगांव स्टेशनापासून १९ मैल. लो. सं. ( १९११ ) ७२९५. दिल्लीच्या पृथ्वीराजाचा वंशज चव्हाण रजपूत संग्रामसिंग ह्यानें हा गांव १४व्या शतकांत स्थापिला म्हणतात. ह्याच्या वंशजाकडे भोंवतालचा प्रदेश बंडाच्या सालापावेतों होता. पण त्यासालीं धमारसिंगानें बंड पुकारलें. म्युनिसिपालिटीची स्थापना १८६५ सालीं झाली. येथें एक सरकारी जिल्हा शाळा व मिशनशाळा आहे. येथें अमेरिकन प्रेसबिटेरियन मिशनची शाखा आहे. कांहीं कापसाची सरकी काढण्याच्या व कापूस दाबण्याच्या गिरण्या गांवांत आहेत.

[ इं. गॅ. १२. सेटलमेंट रिपोर्ट ( १८७४ ). जिल्हा गॅझीटियर ( १८७६ ). सेन्सस रिपोर्ट ]

**इटारसी.**—(मध्यप्रांत) हुशंगाबाद जिल्हा, हुशंगाबाद तहशिलींत हें शहर असून मुंबईपासून ४६४ मैल आहे. येथूनच जबलपुरास जाणाऱ्या जी. आय पी. रेल्वेवरचें स्टेशन असून कानपूर व आग्राकडे जाणाऱ्या फांट्यांचें जंक्शन आहे. ह्या शहरची लोकसंख्या सन १९०१ सालीं ५७६९ होती व हल्लीं येथील लोकसंख्या सारखी वाढत आहे. बैतुल जिल्हा व हुशंगाबाद जिल्हा या ठिकाणच्या मालाचें हें आगर म्हणतां येईल. ह्या ठिकाणीं गुरांचा मोठा बाजार दर आठवड्यास भरतो. ( इं. गॅ. )

**इटावा जि ल्हा.**—संयुक्त प्रांत. अलाहाबाद विभागांतील एक जिल्हा. क्षेत्रफळ ४६९१ चौ. मै. लो. सं. ( १९२१ ) ७३३५३२. उत्तरेसः—मैनपुरी व फरुक्काबाद. पूर्वेसः—कानपूर. दक्षिणेस—जालौन. पश्चिमेस—ग्वाल्हेर संस्थान व आग्रा जिल्हा.

न द्याः—यमुना, ( ही जिल्ह्याच्या पश्चिम व दक्षिण सरहद्दीवरून वहात जाते ), पांडु, अरिंद, अहनेय व पुरह, सेनगर, सिर्सा. पश्चिम सरहद्दीवरून कांहीं कालपर्यंत चम्बला नदीहि वहाते. यमुना व चम्बला यांच्या संगमापाशीं भरेहचा किल्ला आहे. यांत काळवीट, निळगाई वगैरे आढळतात. हवा बहुतेक दुआबसारखीच असते. पाऊस सुमारें ३२ इंच पडतो. ह्या जिल्ह्यांत बऱ्याच प्राचीन काळच्या अवशेषांसारखें दिसणारें वरेच असलेले उंचवटे आहेत त्यावरून येथें प्राचीनकालीं किल्ले असावेत असें वाटतें. महमद गझनवी व कुतबुद्दीन ह्या दोघांनींहि इटावावर स्वाऱ्या केल्या असाव्यात. इटावाच्या हिंदु राजाचें स्वातंत्र्य नष्ट झालें नाहीं एवढें मात्र खरें. ह्या जिल्ह्यांत शेख किंवा सय्यद लोक फार थोडे आहेत. रजपुतांनीं १२ व्या शतकांत हा जिल्हा घेतला होता.

त ह शी ल—(संयुक्त प्रांत) इटावा जिल्ह्याची एक वायव्येकडील तहशील. हिचें क्षेत्रफळ ४२६ चौ. मै. व लोकसंख्या ( १९११ ) २२०१६३ आहे. या तहशिलींत ३५ खेडीं व २ शहरें आहेत. जमीन सुपीक आहे. लोअर गँजीज कालव्याच्या इटावा व भोग्निपूर शाखांमुळें ह्या तहशिलींची अर्ध्याहून अधिक जमीन भिजते.

पेशवाईच्या काळीं हा एक परगणा असे, व परगण्यांत पेशव्यांचा कमाविसदार असे. या परगण्यांतील पादशाही कारकीर्दींतील नेमणुका पुढें चालू ठेवण्याबद्दल राघोबादादाच्या पत्रांत (रा. खं. १ पत्र १२३) उल्लेख आहे. तसेंच प्रांत इटावें, फफुंद व सकुराबाद येथील ४ लक्ष ५० हजार रसदेची मागणी बाळाजी बाजीराव यांच्या बाळाजी गोविंद यास लिहिलेल्या पत्रांत ( २ जुलै १७५८ ) करण्यांत आली आहे ( रा. खं. १ प. १३२ ). इ. स. १७५९–६० मधील गोविंद बल्लाळच्या पांच सहा पत्रांत लष्करी हालचालींसंबंधीं इटाव्याचा उल्लेख आला आहे. ( २७ जून १७६१ ) बाळाजी गोविंद व गंगाधर गोविंद यांच्या पत्रांत इटावा वगैरे ठाणीं सोडून राहिले, निघून गेल्याबद्दल व १७६१ तारीख २५ आगस्टच्या लक्ष्मण आबाजी व अंताजी कृष्ण यांच्या पत्रांत इटावा येथें रोहिल्यांचें ठाणें पुनः बसल्याचा उल्लेख आहे. वजीर गाजुद्दीखान इटावें, फफुंद वगैरे ठिकाणीं घालमेल करतात, असा उल्लेख (रा. खं. ६ प. ४८१ मध्यें) आहे. इटावें येथील चौधरीस रुपयाविषयीं विचारतांच तो पळून जाऊन गढींत दडून राहिला असा उल्लेख दामोदरपंत दादा यांनां गोविंद बल्लाळनें पाठविलेल्या पत्रांत आहे. इटावें येथील सावकारांच्या घरावर वजिराकडील सज्यावल बसले आहेत, त्यांजला उठवून नेऊन सावकारास मुक्त करण्याबद्दल उल्लेख आहे. ( खं. ६ प. ५४४ ).

श ह र—संयुक्त प्रांत इटावा जिल्ह्याचें व तहसिलीचें मुख्य ठिकाण. लो. सं. ४५ ३५० ( १९११) पैकीं २८५४४ लोक हिंदु आहेत. मुसुलमान कालाच्या अगोदरपासून हा गांव अस्तित्वांत आहे पण ह्याचा पूर्वेतिहास उपलब्ध नाहीं. फिरोजशहाच्या मृत्यूनंतर धामधुमीच्या काळांत हा गांव बरेच वेळां लुटला गेला. ह्याच वेळीं येथील हिंदुसंस्थानिकांनीं

बंडावा केला. अकबराच्या कारकीर्दीत हें एका परगण्याचें मुख्य ठिकाण होतें, व येथें एक किल्ला होता असें आयनी–अकबरींत लिहिलेलें आहे. पुढें एक शतकपर्यंत हा मोठा सव्याचा व व्यापाराचा गांव म्हणून प्रसिद्धीस आला. पण १८ व्या शतकांत रोहिल्यांच्या स्वाऱ्यापासून व तदनंतर मराठ्यांच्या स्वाऱ्यांपासून ह्या गांवास मोठा त्रास पोहोंचला. जुमामशीद ही फार सुंदर व भव्य इमारत आहे. तसेंच येथें कांहीं हिंदु देवालयें, स्नानाकरितां घाट, व किल्ल्याचा अवशेष आहे. ल्यूमगंज नांवाच्या चौकांत सार्वजनिक इमारती असून तो गांवाच्या मध्यभागीं आहे. येथें हायस्कूलें व कांहीं म्यु. शाळा आहेत. म्यु. स्थापना १८६४ सालीं झाली. येथें उत्तमपैकीं मिठाई होते. निर्गत मालः— तूप, चणे, कापूस, गळीताचीं धान्यें. सात आठ सरकी-काढण्याच्या व कापूस दाबण्याच्या गिरण्या आहेत. [ इं. गॅ. ]

**इटावा**–मध्यप्रांत सागर जिल्ह्याच्या खुरई तहशिलमधील एक गांव. लोकसंख्या ( १९११ ) ८९६८. बिनारो या रेल्वे जंक्शनपासून २ मैलांवर आहे. जवळ आगगाडी झाल्यामुळें हें भरभराटीस लागलें आहे.

**इटैयापुरम, इस्टेट**—( मद्रास इलाखा ) तिन्नेवेल्ली जिल्ह्यांतील एक जमीनदारी. जिल्ह्याच्या ईशान्य भागांत असलेल्या ओट्टप्पीदारम् तालुक्यांत ही आहे. क्षेत्रफळ ५७० चौ. मैल. खेडीं ३७४ व लोकसंख्या ( १९०१ ) १५४०००.येथील लोक-तेलगू आहेत.जमीनदाराचे पूर्वज उत्तर अर्काट जिल्ह्यांतील चंद्रगिरी घराण्यांतील होत. अलाउद्दीन खिलजीच्या स्वारीमुळें झालेल्या गडबडींत कुमार मुत्तुनाईक मदुऱ्यास गेला. तेथें पांड्य राजानें त्याचा आदरसत्कार करून बरीच जमीन त्यास दिली. पुढें तिन्नेवेल्लीमध्यें शांतता करण्याकरितां कुमार मुत्तु गेला. त्यानें जातां जातां सात्तूर येथें एक सात्तूर नदीच्या दक्षिण तीरावर किल्ला बांधला. इस्टेटीचें मुख्य ठिकाण म्हणजे इटैयापुरम् गांव १५६७ मध्यें स्थापिला गेला. ३१ वा जमीनदार मुत्तुजग वीर रामनाईक ह्यानें पाळीगार युद्धांत ( १७९९–१८०१ ) ब्रिटिशांस चांगलीच मदत केली.तेव्हां त्यास पाळीगाराच्या हस्तगत झालेल्या जमीनींपैकीं सहा हिस्स्यांतले चार हिस्से देण्यांत आले. जमीन काळी कापसाची आहे. पाऊसपाणी ३३ इंच. १००० एकर जंगल जमीन शिकारीकरितां राखून ठेवलेली आहे. ताडाच्या झाडापासून साखर तयार करितात. कापूस बराच पिकतो. उत्पन्न ३। लाख व कायमची जमीनदारी-पद्धती आहे. वार्षिक पेशकाश ( सरकारास देऊं केलेली रक्कम)१६००० रु. आहे.

**शहर.**—इटैयापुरम् जमीनदारीचें मुख्य ठिकाण. साऊथ इंडियन रेल्वेच्या कोइलपट्टी स्टेशनपासून हें दहा मैल आहे. लोकसंख्या ( १९११ ) ८६३६. स्थानिक व्यवस्था पंचायतीकडे आहे.

**इटो, हिरोबुमी प्रिन्स,** ( १८४१–१९०९ )—हा जपानी मुत्सद्दी १८४१ मध्यें जन्मला. याचा बाप इटो जूझो हा चोशूच्या जमीनदाराचा आश्रित होता,आणि बापानंतर मुलालाहि प्रथम तोच पेशा पत्करावा लागला.चोशूच्या जमिनदाराचें घराणें हें जपानमधील सरदारवर्गापैकीं एक बडें घराणें होतें. या डैम्यो ऊर्फ सरदारमंडळींपैकीं बरेचसे तत्कालीन सत्ताधीश असलेल्या शोगुनांच्या सत्तेला अत्यंत तीव्र विरोध करणारे होते, आणि विशेषतः १८५४ मध्यें कामोडोर एम. सी. पेरी याच्याबरोबर शोगुनांनीं तह केला तेव्हांपासून या दोन पक्षांमध्यें उघड शत्रुत्व सुरू झालें. या कलहांत इटो पूर्णपणें आपल्या मालकाच्या पक्षाचा होता आणि त्यामुळें येदोमध्यें जाऊन तेथील सरकारच्या हालचालीसंबंधीं गुप्त रीतीनें बातमी काढण्याकरितां पाठविलेल्या मंडळांत त्याचा समावेश करण्यांत आला. या कामगिरीवर असतां इटोचें लक्ष ब्रिटिश व इतर सुधारलेल्या राष्ट्रांच्या लष्करी पद्धतीचा अभ्यास करण्याकडे गेलें. हें ज्ञान मिळविल्यावर स्वतःच्या सैन्यांत सुधारणा करून जुन्या धनुष्यबाणांऐवजीं नव्या तोफा, बंदुकांचा उपयोग करण्याबद्दल त्यानें चोशूचें मन वळविलें. शिवाय, पाश्चात्य लोकांचा व त्यांच्या विद्याकलांचा पूर्ण परिचय करून घेण्याकरितां इटो दुसऱ्या दोनतीन तरुण जपान्याबरोबर जपान सोडून लंडनला गेला. त्यावेळीं जपान सोडून परदेशीं जाणाराला जपानी कायद्यानें फांशीची शिक्षा ठेवलेली होती. तथापि हा कायदा मोडून परदेशीं जाण्याचें इटोनें धाडस केलें. लंडन येथें तो एकच वर्ष होता. इतक्यांत चोशू संस्थानचा अधिपति व शोगून सरकार यांच्यामध्यें उघड सामना होण्याचा प्रसंग उद्भवला. शोगून सरकारनें परराष्ट्रांशीं तह करून त्यांनां शिमोनो सेकी आखातांत जहाजांची ने आण करण्याची परवानगी दिली.या आखाताचा कांहीं भाग चोशू संस्थानच्या अमलाखालीं असल्यामुळें या संस्थानिकानें परकीयांनां मज्जाव करण्याचें ठरविलें. त्यामुळें परराष्ट्रांबरोबर लढाईचा प्रसंग उद्भवला. ही बातमी इटोला कळतांच जपान व यूरोपिअन राष्ट्रें यांच्या लष्करी सामर्थ्यांतलें अंतर पूर्ण माहीत असल्यामुळें हा प्रसंग टाळण्याकरितां इटोनें आपल्या मालकाजवळ मध्यस्थी करण्याकरितां जपान सरकारजवळ मुदत मागून घेतली. व त्याकरितां तो ताबडतोब जपानला परत आला. परंतु मध्यस्थीचे त्याचे सर्व प्रयत्न व्यर्थ गेले. कारण चोशूनें इटोचें म्हणणें नाकारलें,आणि लढाईस सुरवात केली त्यांत चोशूच्याच पक्षाचा अखेर पराभव होऊन बराच युद्धदंड भरावा लागला. या एकंदर प्रकरणामुळें इटोविषयीं त्याच्याच पक्षाच्या कांहीं लोकांच्या मनांत फार द्वेष वाढला व त्यांनीं इटोचा खून करण्याचा बरेच वेळां प्रयत्न केला, अशाच एका प्रसंगीं इटोचे शत्रू त्याचा पाठलाग करीत असतां इटो एका चहाच्या दुकानांत शिरला आणि तेथें एका तरुण जपानी स्त्रीनें आपल्या खोलींत त्याला लपवून

त्याचा बचाव केला. या आकस्मिक प्रसंगानें सदर्हू स्त्रियेशीं झालेल्या परिचयाचें रूपांतर अखेर प्रीतींत होऊन तिचें पाणिग्रहण इटोनें पुढें केलें. १८६८ मध्यें इटोला ह्योगोचा गव्हर्नर नेमण्यांत आलें, आणि त्याच्या पुढल्या वर्षी सरकारी जमाखर्चखात्याचा दुय्यम फडणीस झाला. १८७१ मध्यें इवाकुरा याच्याबरोबर एका महत्त्वाच्या कामाकरितां तो यूरोपांत गेला.या सफरींतील राजकारणी हेतु जरी सिद्धीस गेला नाहीं, तरी तिचा एक महत्त्वाचा परिणाम असा झाला कीं, जपान सरकारनें लष्करी आरमार आणि शिक्षणखात्यांत यूरोपीय तज्ज्ञांची नेमणूक करण्यास सुरुवात केली.

यूरोपमधून परत आल्यावर इटोनें अनेक वेळां इंजिनियरिंग व खाणी या सरकारी खात्यांचा मुख्य अधिकारी म्हणून काम केलें. इ. स.१८८६ मध्यें त्यानें मुख्य प्रधानाची जागा पत्करिली. ही जागा त्याला पुन्हां चार वेळां मिळाली.१८८२ मध्यें त्याला यूरोपमध्यें निरनिराळ्या प्रकारच्या राज्यघटनांचा अभ्यास करण्यास पाठविण्यांत आले. यूरोपमध्यें असतांना रशियाचा झार तिसरा अलेक्झांडर याच्या राज्यारोहण समारंभाला हजर राहण्याची संधि इटोला मिळाली. पुन्हां जपानमध्यें परत आल्यावर जपानच्या नवीन राज्यघटनेचा मसुदा करण्याचें काम त्याच्यावर सोंपविण्यांत आलें.१८९० मध्यें त्यानें या कामीं केलल्या परिश्रमांचें चीज झालें, आणि तेव्हांपासून ९ वर्षांनीं जपानचे इतर राष्ट्रांबरोबर जुने तह व करारमदार बदलून टाकून यूरोपीय राष्ट्राच्या बरोबरीनें जपानचा दर्जा मान्य करणारे नवे तह अस्तित्वांत आले. शिवाय जपानमध्यें ज्या अनेक प्रकारच्या सुधारणा करण्यांत आल्या त्यांत इटोनें प्रमुखपणानें भाग घेतला. लष्करी व आरमारी व्यवस्थेमध्यें इटोनें पूर्ण लक्ष घालून जी सुधारणा केली, त्याचेंच मुख्यतः फळ म्हणून चिनी जपानी युद्धाच्या शेवटीं ( १८९५ ) विजयी जपानी राष्ट्राचा प्रतिनिधी म्हणून ली हुंग-चंग याच्याबरोबर वाटाघाट करण्याचा मान त्याला मिळाला. तसेंच जपान हें सुधारलेल्या राष्ट्रांमध्यें पहिल्या प्रतीचें राष्ट्र आहे. ही गोष्ट मान्य करणारा १९०२ मधला इंग्लंड व जपान यांच्यामधला मैत्रीचा तह हाहि इटोच्या यशस्वी धोरणाचेंच फळ होय. चीनबरोबरच्या युद्धांत जी अत्यंत महत्त्वाची कामगिरी बजावली त्याबद्दल त्याला जपान सरकारकडून 'मार्क्विस' ही पदवी देण्यांत आली, आणि १८९७ मध्यें व्हिक्टोरिया राणीच्या डायमंड ज्युबिली समारंभाला मिक्याडो राजाचा प्रतिनिधि म्हणून प्रिन्स अरी सुगावा यांच्याबरोबर हजर राहण्याचा मान इटोला मिळाला. १९०१ मध्यें त्यानें सरकारी नोकरीचा राजीनामा दिला. त्याच वर्षी बिन सरकारी नात्यानें यूरोप आणि युनायटेड स्टेटस यांनां त्याला भेट द्यावी लागली,व यावेळीं इंग्लंडमध्यें 'जी. सी. बी.' ही पदवी त्याला अर्पण करण्यांत आली. १९०५ मध्यें रुसो–जपानी युद्ध संपल्यानंतर इटोला कोरियाचा रेसिडेंट–जनरल नेमण्यांत आलें, आणि या अधिकारावर असतां कोरियामध्यें जपानचें महत्त्व वाढविण्याकरतां ज्या बऱ्या वाईट गोष्टी करण्यांत आल्या त्यांची जबाबदारी त्याच्यावर आहे. १९०७ मध्यें त्याला प्रिन्स या पदवीचा दर्जा देण्यांत आला, कोरियामधली नोकरी १९०९ जुलैमध्यें सोडून तो परत आला. व जपानांत प्रीव्ही कौन्सिलचा अध्यक्ष बनला, परंतु आक्टोबर २६ रोजीं हारबिन येथें गेला असतां त्याचा एका कोरियन मारेकऱ्यानें गोळी झाडून प्राण घेतला.

**इडमिडे**—( इडिमिडे ) मुंबई इलाखा सातारा-जिल्हा, प्रांत वांई, संस्थान निंबपैकीं गांव. हा सदानंद गोसावी यांचे समाधीकडे व अन्नछत्राकडे इनाम दिलेला असून त्यास सरदार, किल्लेदार व प्रांताचे अधिकारी उपद्रव देत होते. त्यास प्रतिबंध करणारीं निरनिराळीं १०–१२ आज्ञापत्रें असून गोसावी यास उपद्रव बंद करण्यांत येत आहे अशी आश्वासनपत्रेंहि ( शिवकालीन पत्र रा. खं; १५ ) आहेत. छत्रपति राजाराम महाराजांनीं चंदी येथें असतांनां भगवानगीर गोसावी यास दिलेली इडमिडे गांवाची सनद शाहू महाराजांनीं पाहून नवीन इनाम करार करून दिल्याचा उल्लेख (रा. खं. १५ प. २०८ शके १६२९ पौष वद्य १२) आहे. पत्रावरून मूळचे अधिकारी व नवीन अधिकारी यांवर प्रकाश पडतो. इडमिडे गांवाचा साहोत्री याचा ऐवज पंताजी गोसावी यांस देवविला आहे तो त्यांची सनद असली तरी पुनः देऊं नये असें आज्ञापत्र (खं. १५ प. २१२ शके १६३० ) आहे. इडमिडे गांवाकडे पांच वर्षांची १८ खंडी बाकी टाकली होती. तिची मागणी भवानगीर गोसावी यांनीं केल्यावरून व्यवस्था लावलेले एक अर्धवट पत्र ( खंड १५ प. २४१ ) आहे. आनंदगीर गोसावी महंत यांनीं व भवानगीर गोसावी यांनीं इडमिडे गांवाकडे काढलेली बाकी चूक आहे असें कळविल्यावरून चौकशी करण्यासाठीं लिहिलेलें एक पत्र ( खंड १५ प. २५२ ) आहे. हा गांव पूर्वी श्रीकडे होता तसा चालवावा अशी व्यवस्था करण्याबद्दलचें आश्वासनपत्र श्रीमत् महाराज मातुश्री आईसाहेब यांचें आहे ( खं. १५ प. २५४ )

**इडा किंवा इला**—ऋग्वेदामध्यें ' इडा ' चा अन्न, श्रमपरिहारक द्रव्य किंवा दुग्ध निषेध असा मूळचा अर्थ असून नंतर स्तवन–स्रोत असा अर्थ झाला. तिलाच वाग्देवी असें म्हटलें आहे. मनूची अध्यापिका व यज्ञविधींचे नियम आंखून देणारी, असा तिचा कांहीं ठिकाणीं उल्लेख आला आहे. ही पृथ्वीची अधिष्ठात्री देवता आहे, असें सायण म्हणतो ( ऋ. १ ४१–१९ ) मनु संततीकरितां यज्ञ करीत असतां ही कुंडांतून वर आली अशी एक कथा शतपथ ब्राह्मणांत आहे. मित्रावरुणांचा तिजवर हक्क असतांहि आपल्या पित्याला तिनें सोडलें नाहीं. मनु तिच्या समवेत राहिला, व तिनें मनूची वंशवृद्धि केली (श. ब्रा. १. ६, ३१ ते ११ ). पुराणांत ती वैवस्वत मनूची

मुलगी, बुद्धाची बायको व पुरूरव्याची आई असल्याचें लिहिलें आहे. वैवस्वत मनूनें पुत्र होण्यापूर्वी मित्रावरुण देवतांना उद्देशून पुत्र व्हावा ह्या इच्छेनें एक इष्टि केली. पण चुकून भलताच हवि पडल्यानें त्या इष्टींतून इला नांवाची स्त्री उत्पन्न झाली व मित्रावरुणांच्या कृपेनें तिला पुरुषत्व प्राप्त होऊन सुधुम्न नांवानें ती मनूचा मुलगा बनली. स्त्री असतांना तिला बुधापासून पुरूरवा नांवाचा पुत्र झाला व सुधुम्न नांवानें पुरुषत्वांत असतांनां तिला तीन पुत्र झाले ( महाभारत हरिवंशपर्व अध्याय १० व भागवत नवमस्कंध अध्याय १ ला). सुधुम्नाचीं पुरुष असतांनां इल व स्त्री असतांनां इला अशीं नांवें आहेत इल राजा एकदां दण्डकारण्यांत (शरवण वनांत ) गेला असतां, पार्वतीच्या शापानें पुनः स्त्री झाला. पण पुढें शिवाच्या कृपेनें एक महिना स्त्री व एक महिना पुरूष अशा स्थितींत राहिला. इडेसंबंधीं निरनिराळ्या कथा आढळून येतात. एके ठिकाणीं ( महाभा. आदि पर्व अध्याय ७५ ). इला ही मनूची आठवी संतति असून तिनें रेत व शोणित यांचें आधान करून पुरुषसंयोगाशिवाय पुरूरव्याची उत्पत्ति केली अशी चमत्कारिक कथा सांगितली आहे.

२. शरीराच्या उजव्या भागांत असणाऱ्या एका नाडीला इडा म्हणतात.

३. पंचसंवत्सरामध्यें इडासंवत्सर हें एक गणिलें जातें.

[ महाभारत. शत ब्रा. संहिता. वाजसेनीय सं. डौसेन हिंदु क्लासिकल डिक्शनरी, वेदिक इंडेक्स. ]

**इडास**—ग्रीक पौराणिक व्यक्ति, मेसेनेच्या राजघराण्यांतील ॲफेरिअसचा मुलगा व लिन्सेअसचा भाऊ. होमरनें फक्त एके ठिकाणीं ( इलियड ९ ५५६ ) याचा पृथ्वीवरील माणसांत बलिष्ठ, असा उल्लेख केला आहे. इडोलियाच्या इव्हनसची मुलगी मार्पेसा हिला आपली बायको म्हणून यानें हरण केली व आपला प्रतिस्पर्धी अपोलो याशीं धनुष्यबाणांनीं युद्ध केलें. इडास व त्याचा भाऊ लिन्सेअस यांनीं पोलक्स व कॅस्टर यांशीं संगनमत करून एका गुरांच्या कळपाची चोरी केली; पण वांटणीच्या वेळीं भांडणें उपस्थित झालीं. इडासनें सर्व मालावर आपला हक्क दाखवून तीं गुरें मेसेनेला हांकून नेलीं. तेव्हां लढाई सुरू होऊन कॅस्टरच्या हातून लिन्सेअस, इडासच्या हातून कॅस्टर, व पोलॅक्सच्या हातून इडास हे मृत्युमुखीं पडले असा अपोलोडोरसमध्यें वृत्तांत आढळतो. इडास व लिन्सेअस हे सूर्य, चंद्र व गुरें म्हणजे आकाशस्थ तारका यांसंबंधीचें हें रूपक आहे असें हल्लीं मानतात. ग्रीक चित्रकलेंत या प्रसंगावरचीं चित्रें पहावयास सांपडतात.

**इडाहो**—अमेरिकेच्या संयुक्त संस्थानांतील एक संस्थान. हें १८९० सालीं संयुक्त संस्थानांत सदस्य करण्यांत आलें. सेनेटमध्यें ३७ सभासद, व प्रतिनिधिगृहांत ६५ सभासद असतात. दोन वर्षांनीं निवडणूक होते. नागरिकास मत देण्यास अधिकार प्राप्त होण्यासाठीं त्यानें सहा महिने संस्थानांत राहिलें असलें पाहिजे. स्त्रियांस मतदानाचा अधिकार आहे. क्षेत्रफळ सुमारें ८४००० हजार चौरस मैल आहे आणि इंडियन लोकांकरितां राखून ठेवलेली जागा फक्त ८६ चौरस मैल आहे. लोकसंख्या सुमारें ५ लक्ष आहे. यामध्यें मॉर्मनांची संख्या बरीच आहे. येथें इडाहोचें कॉलेज व युनिव्हर्सिटी ऑफ इडाहो या दोन उच्च शिक्षणाच्या संस्था आहेत. या संस्थानांतील उत्पादनाविषयीं येणेंप्रमाणें थोडक्यांत सांगतां येईल. संस्थानचा बराचसा भाग निर्जल आहे; तथापि पाटबंधाऱ्यांकडे फार जोराचें लक्ष पुरविल्यामुळें सुमारें तेहेतीस लक्ष एकर जमिनींत पाणीपुरवठा करण्यांत आला आहे. आणखी पांच लक्ष एकर जमिनीस पाणीपुरवठा करण्याची योजना चालू असून दोन कोट डालर खर्च करण्यांत येत आहेत. १९१० सालीं ३१ हजार शेतें होतीं. त्या शेतांमध्यें ५३ लक्ष एकर जमिनीचा अंतर्भाव होई.

संस्थानांत सोनें, रुपें व इतर धातू यांचे भूगत संचय आहेत. इ.स. १९१५ सालीं ५७ हजार औंस सोनें, ११७लक्ष औंस रुपें, व सत्तर लाख पौंड तांबें निघालें. व १७३ हजार टन शिसें हातीं लागलें. थोडासा कोळसाहि सांपडतो. शेतकी व खाणी यांशिवाय संस्थानांतील दुसरें महत्त्वाचें उत्पादन म्हणजे कारखानी माल होत. १९१० मध्यें ७२५ मोठे कारखाने होते. या संस्थानाच्या उद्योगांतील महत्त्वाचा उद्योग म्हणजे लांकूड कटाईचे कारखाने होत. यांत १ कोटी ८० लक्ष डॉलर भांडवल गुंतलें आहे व ५२०० कामकऱ्यांस काम मिळतें. पिठाच्या गिरण्या त्यांच्या खालोखाल येतील. यांत २० लाख डॉलर भांडवल अडकलें आहे. संस्थानांत २६० लांकूड कटाईचें कारखाने आहेत, त्यांपैकीं पोटलाच येथील कारखाना जगांत मोठा आहे आणि येथें साडेसात लाख फूट लांकूड दररोज कापलें जातें. संस्थानांतील रेल्वेची लांबी २८७२ मैल आहे.

इ ति हा स.—इडाहो येथें गोऱ्या प्रवाशांचा प्रथम प्रवेश म्हणजे लुइ व क्लार्क यांचा स्नेक नदीच्या मार्गानें झालेला होय. १८०५ मध्यें फोर्ट लेम्ही हें उभयतांचें संकेतस्थान होतें. १८१० मध्यें मिसूरी फर कंपनीनें स्नेक नदीवर फोर्ट हेनरी किल्ला बांधला व १८३४ मध्यें पूर्व इडाहोमध्यें फोर्ट हॉल वसविला गेला. परंतु १८६० मध्यें कॅपटन पर्से यास तेथें सोनें असल्याचें समजल्यापासून कायम वसाहती होण्यास सुरवात झाली. १८४८ ते १८५९ पर्यंत या प्रदेशाचा दक्षिण भाग आरेगॉन प्रांतांत व उत्तर भाग वाशिंग्टन प्रांतांत मोडत होता; व १८५९ ते १८६३ पर्यंत सर्व प्रदेश वाशिंग्टन प्रांतांत समाविष्ट होत होता. १८६३ मध्यें इडाहो प्रांताची स्वतंत्र घटना झाली. १८९० मध्यें स्टेट या नात्यानें इडाहोचा युनियनमध्यें प्रवेश झाला.

मधून मधून तेथील इंडियन लोकांनीं स्वातंत्र्यप्राप्तीचे कांहीं प्रयत्न केले तसेंच कूर डि अलेन प्रांतांत मजुरांच्या

बाबतींत बिकट प्रसंग उपस्थित झाले होते पण ते सर्व शमविण्यांत आले. १८९७ पूर्वी हे संस्थान रिपब्लिकन पक्षांच्या ताब्यांत होतें. १९०२ पर्यंत डेमोक्रॅट, पापुलिस व चांदीचें निष्प्रतिबद्ध चलन मान्य करणारे रिपब्लिकन यांचा संयुक्त पक्ष अधिकारारूढ होता व तेथून पुढें १९०८ पर्यंत रिपब्लिकन पक्षाची निवडणूक होत गेली.

**इंडियन—अमेरिकन**–उत्तर अमेरिकेंतील मूळ रहिवाशी. यांच्याबद्दलची सविस्तर माहिती 'युद्धोत्तर जग' ( ज्ञानकोश प्रस्तावनाखंड विभाग ४ था प्र. २३, पा. ४५८—६२ ) यांत दिलीच आहे. "संयुक्त संस्थानें" या सदराखालीं कांहीं येईलच या ठिकाणीं या लोकांची सध्यांची स्थिति देतों

इंडियन स्वावलंबी नागरिक बनण्याकरितां आरोग्य, शिक्षण व उद्योग यांची सोय त्यांनां धरून देणें आवश्यक आहे असें संयुक्त सरकार धरून चालतें. तेव्हां या दिशेनें सरकारनें धोरण आंखून, त्याच्या सिद्ध्यर्थ "ब्यूरो ऑफ इंडियन अफेअर्स " स्थापण्यांत आला. या ब्यूरोतर्फे आरोग्याचे तपासनीस, शाळा व पेटे यांवरील वैद्य, देखरेख करणाऱ्या स्त्रिया, परिचारिका, फिरते दंतवैद्य व रुग्णालयें हीं निर्माण करण्याची व्यवस्था करण्यांत आली. मुलें व गर्भार बायका यांची विशेष काळजी घेण्यांत येते. इंडियनांच्या स्वभावाला धरून वाङ्मयीन व औद्योगिक शाळा स्थापण्यांत आल्या असून, प्रथम घरकामाला व लहान मुलांनां योग्य शिक्षण देण्याला लायक अशा बायका तयार करण्याची खटपट जोरानें चालू आहे.

या अमेरिकन सरकारने आंखलेल्या धोरणामुळें संयुक्तसंस्थानें आणि कानडा यांमधील इंडियन लोकांची १९१० ते १९२० या दशकांत मोठीच प्रगति झालेली आहे. मागील अर्धशतकांत्य कोणत्याहि सालापेक्षां १९२० मधील त्यांची संख्या जास्त आहे. डॉक्टरावर ते आतां फारसे विसंबून राहत नाहींत, तर वैद्यक आणि आरोग्यशास्त्र यांची त्यांनां बरीच माहिती झालेली आहे. पाठीमागील काळापेक्षां आतां ते कायमच्या घरांदारांकडे ज्यास्त लक्ष पुरवूं लागले आहेत. तसेच तें स्थायिक व सुधारक होऊं लागले आहेत. इंडियन बायका घरांतली व्यवस्था चांगली ठेवूं लागल्या आहेत; व मुलांच्या मृत्युसंख्येचें प्रमाणहि ओसरत आहे. पंखांचे व रंगांचे दिवस जात चालले आहेत. एकंदर संख्येपैकीं दोन तृतीयांश लोक अमेरिकन नागरिकांचा पेहराव करीत असतात. शिक्षण संस्थांतून शिकून तयार झालेले तरुण जुन्या चालीरीती बदलण्यांत व औद्योगिक आणि सामाजिक चळवळींत पडण्यास पुढें सरसावत आहेत. जातिरूढीप्रमाणें पूर्वी होणारे विवाह जाऊन ते आतां अर्वाचीन दृष्टीनें कायदेशीर विधीप्रमाणें होत आहेत; व गुन्हेगारी कमी प्रमाणांत आहे. संयुक्त संस्थानांतील इंडियन मुलांपैकीं तीन चतुर्थांश मुलें कोठल्याना कोठल्या तरी शाळांतून शिकत आहेत. इंग्रजी लिहितां वाचतां व बोलतां येणारे लोक संख्येनें हळू हळू फुगत आहेत. शेतकी कामांत अर्वाचीन यंत्रसाहित्य उपयोजण्यांत व वैयक्तिक संपत्तींत भर घालण्यांत चांगली प्रगति दिसून येत आहे. औद्योगिक प्रदर्शनांत आपला माल ठेवून गोऱ्या लोकांशीं स्पर्धा करण्यास ते पुढें येत आहेत.

गेल्या जागतिक युद्धांत त्यांचें जें वर्तन दिसून आलें त्यावरून संस्कृति व राज्यघटना यांचीं तत्त्वें त्यांनां मान्य आहेत, असें कळून आलें. संयुक्त संस्थानांत १० हजारांवर इंडियन त्यावेळीं लष्करी नोकरींत होते. कानडांत ४ हजारांवर होते. त्यांनी शिस्त पाळून जे मोठ्या शौर्यानें काम बजावलें त्याबद्दल गोरे लोकहि त्यांची वाखाणणी करितात. युद्धाच्या कामीं त्यांनीं पैशाचीहि मदत केली होती. १९२० सालीं अलास्का सोडून बाकीच्या संयुक्त संस्थानांतून एकंदर ३३६३३७ व कानडांत १०९००० इंडियन होते.

**इंडियन टेरिटरी**—संयुक्त संस्थानें पहा.

**इंडियन रिझरव्हेशन.**—इंडियन लोकांसाठीं राखलेली जागा. हिचा निर्देश प्रत्येक संस्थानाचें वर्णन करतांना केला आहे.

**इंडियाना.**—या संस्थानाचा प्रवेश संयुक्त संस्थानामध्यें १८१६ सालीं झाला. सेनेटमध्यें ५० सभासद व प्रतिनिधिगृहांत १०० सभासद असतात. या संस्थानचें क्षेत्रफळ ३६३५४ चौ. मै. आहे व १९२१ सालची लो. सं. जवळजवळ ३० लक्ष आहे. यांतील सर्वांत मोठें शहर इंडियानापोलीस हें आहे. याची लोकसंख्या सुमारे पावणेतीन लाख आहे. हें शहर या संस्थानची राजधानी आहे. दुसरीं महत्त्वाचीं शहरें व त्यांची लोकसंख्या येणेंप्रमाणेंः–फोर्ट वायने आणि व्हन्सव्हिल प्रत्येकीं पाऊण लाख, साऊथबेंड ६५०००, टेरहॉटे ७१०००, ईस्टशिकागो २८०००, मुनसी २५०००, हॅमंड २६०००, रिचमंड २४०००, अँडरसन २३०००, एल्कहार्ट २१०००, लाफाएट २१००० मिशगनसिटी २१०००, न्यू आल्बनी २००००, लूगन्सपार्ट २००००, कोकोमो २००००, मेरियन २००००.

इंडियाना संस्थान शिक्षणांत बरेंच प्रगत झालें आहे. येथें चार महत्त्वाच्या युनिव्हर्सिटया आहेत. त्या इंडियाना युनिव्हर्सिटी ( ब्लूमिंगटन ), डी पॉ युनिव्हर्सिटी ( ग्रीनं कासल ), युनिव्हर्सिटी आफ नाटूदाम, व परड्यु युनिव्हर्सिटी (लाफाएट)आहेत. या सर्व युनिव्हर्सिटया मिळून येथें सुमारें साडेसात हजार विद्यार्थी उच्च शिक्षणाचा लाभ घेतात. सार्वजनिक दानगृहांत ३११४ लोक होते.

उ त्पा द न.—हें संस्थान मुख्यत्वेंकरून कृषिकर्मप्रधान आहे. व या संस्थानाच्या एकंदर क्षेत्रापैकीं शेंकडा ९४ जागा शेतकीकडे उपयोगांत आली आहे. सर्व शेतांची किंमत १८१ कोट डालर होईल. शेतकी सर्व प्रकारची आहे, पण मका व गहूं हीं मुख्य पिकें होत. ६५०० चौरस मैल जागा कोळशांच्या खाणींनीं व्यापली आहे. १९१५ साला सु कोळसा निघाला.

तेल सुमारें आठ लक्ष डालर किंमतीचें निघालें. व सात लक्ष डालर किंमतीचा ' स्वाभाविक ग्यास ' निघाला. ४२ लक्ष डालर किंमतीचा सांडस्टोन व चुनखडी निघाली.

पोर्टलॅंड सिमेंट येथें फार मोठ्या प्रमाणावर तयार होतें मातीचीं भांडीं करण्याचें कामहि पुष्कळच आहे. या संस्थानांतील खनिज पदार्थांचें उत्पादन १९१५ मध्यें ४ कोट डालर किंमतीचें झालें. या संस्थानांतील कारखाने महत्त्वाचे आहेत. आणि त्यांपासून अडीच लक्ष माणसांस काम मिळतें. इंडिआनापोलीस हें आगगाड्यांमार्फत एकमेकांशीं दळणवळणाचें संयुक्तसंस्थानांत अत्यंत महत्त्वाचें ठिकाण आहे.

**इडुमिया**—हे पालेस्टाइनमधील हिब्रू वाङ्मयांत "एडोम" नांवानें प्रसिद्ध असलेल्या प्रदेशास ग्रीक नांव आहे. हा प्रदेश मृतसमुद्राचे आग्नेयीस मोआब देश व आकाबाचें आखात यांमध्यें आहे. एडोमच्या प्राचीन इतिहासाची कांहींच माहिती नाहीं. पेन्टाटयूकच्या प्राचीन लेखांत या देशाला सेइर नांव आहे. हेंच नांव मृतसमुद्राचे दक्षिणेस असलेल्या पर्वताच्या ओळीस लावितात. याच पर्वतांत 'होराईट' नांवाची गुहांतून राहणारी जात असे. या लोकांनां इसविंशीय सेमाईट लोकांनीं हांकून दिलें.

बायबलांत दिलेल्या ऐतिहासिक काळीं येथें बेडुइन लोक रहात असत. हे लोक इसाकडून आपण आब्राहमचे वंशज आहों असें म्हणवीत असत. शेख नांवाचा अधिकारी वर्ग यांच्यांत सर्वसत्ताधिकारी गणला जाई. एडोमच्या एका राजानें इस्रायली लोकांस आपल्या राज्यामधून जाण्याला प्रतिबंध केला होता.

इस्रालाईट व एडोमाईट यांचा परस्परसंबंध पुढील इतिहासावरून कळून येईल. सौलनें एडोमाईट लोकांस जिंकिलें होतें. डेव्हिडनें एडोमला फौज ठेवून तें कायमचें आपल्या स्वाधीन ठेविलें होतें.हदादनें सालोमनच्या वेळीं इस्रायलांच्या राज्यास बराच त्रास दिला. जेहोरमचे वेळेस येथील लोकांनीं बंड केलें. त्यावेळीं हा देश जुडाचा अंकित होऊन येथें एक सुभेदार नेमिला. अमेझियानें येथील बंड मोडलें. परंतु अहाझच्या वेळेस येथें स्वतंत्र राज्य स्थापन झालें. हें राज्य फार दिवस टिकलें नाहीं. लवकरच असुरियांत याचा समावेश झाला.

यानंतर अरबांचा लोंढा पश्चिमेकडे येऊं लागल्यामुळें एडोमाईट लोकांना आर्हन–अराबा ओलांडून पश्चिम पॅलेस्टाईनच्या दक्षिणेकडे जाणें भाग पडलें. हे लोक हेब्रानला होतें, असें मक्काबीज ( १,५ ,६५ ) वरून दिसतें.

जोसेफसहा इडुमिया हा बराच व्यापक भाग समजतो.

ज्युलियस सीझरनें इडुमियन ॲंटिपेटरला आपल्याला त्यानें पॉंपेविरुद्ध मदत केल्याचें बक्षीस म्हणून जुडीया, समेरिया, व गॅलिली या प्रांताचा प्रतिनिधी नेमिलें होतें. ॲंटिपेपर हा हेरॉड दि ग्रेटचा बाप होता.

**इंडोचीन ( फ्रेंच )**—आनाम टांगकिंग, व कांबोज, हीं संरक्षित संस्थानें ( प्रोटेक्टोरेट्स ) कोचीन चीनची वसाहत व लेआसचा कांहीं भाग हे प्रदेश फ्रेंच इंडो–चीनमध्यें येतात. इ. स. १९०० सालीं चीन देशच्या कांठावरील क्वँग–चौ–वे इंडो–चीनच्या गव्हर्नराच्या अधिपत्याखालीं ठेवण्यांत आलें. फ्रेंच इंडो चीन हा इंडो–चिनी द्वीपकल्पाचा पूर्व भाग आहे. याच्या उत्तरेस चीन; पूर्वेस टॉंकिंगचें आखात व चीनचा समुद्र; पश्चिमेस सयामचें आखात व सयाम; व वायव्येस ब्रह्मदेश आहे. फ्रेंच इंडोचीनचें क्षेत्रफळ सुमारें २९०००० चौरस मैल असून लोकसंख्या १९१४ सालीं १६९९०२२९ होती. तिच्यापैकीं शेंकडा ७५ तें ८० आनामी लोक आहेत.

फ्रेंच इंडो–चीनमध्यें मेकांग ही सर्वांत लांब नदी असून तिची लांबी १९०० मैल आहे;तिला सहा मुखें आहेत. एका मोठ्या कालव्यानें ही नदी सैगान नदीला जोडली आहे.सैगान नदींत अतिशय मोठें लढाऊ जहाजहि येऊं शकतें त्यामुळें सैगान हें इंडोचायनाचें महत्त्वाचें नैसर्गिक बंदर झालें आहे.

ह वा मा न—फ्रेंच इंडो–चीनची हवा सर्द व उष्ण आहे. १५ आक्टोबर ते १५ एप्रिलपर्यंत पाऊस पडत नाहीं, व त्या अवधींत उष्णतामान दिवसां सुमारें ७९° व रात्रीं ६८° असतें. १५ एप्रिल ते १५ आक्टोबर पावसाळ्याचे दिवस असून तेव्हां दिवसां व रात्रीं उष्णतामान ८०.६° व ८३.१ यांच्या दरम्यान असतें. इंडो चायनांत जपान व चीनमध्यें सांपडणाऱ्या सर्व जातीचीं झाडें आहेत.

लो क सं ख्या—आनाम टांगकिंग व कोचीन–चीन या ठिकाणीं आनामी लोक असून त्यांची संख्या एकंदर लोकसंख्येच्या एकपंचमांश आहे. या शिवाय येथील लोकांचे कांबोजी, चामघटक थेस, व मोइ ( रानटी) हे मुख्य आहेत.

हल्लीं इन्डोचीन देशांत वसाहत करणारीं तीन निरनिराळीं राष्ट्रें आहेत. तीं म्हटलीं म्हणजे पहिलें ब्रह्मी, दुसरें सयामी, व तिसरें आनामी हीं होत. तीं हिंदुस्थानच्या पूर्वेस आणि चीनच्या दाक्षिणेस आहेत. ब्रह्मी राष्ट्राला लागूनच हिमालयांत तिबेटी लोकांचें राष्ट्र आहे. त्यांचाहि इन्डोचीन राष्ट्रांत समावेश करण्यास हरकत नाहीं. इन्डोचीनमध्यें मान नांवाची आणखी एक जात आढळून येते. आतांपर्यंत पेगूचें तलैंग, कांबोजाचे ख्मेर व चम्पाचे चाम ह्या निरनिराळ्या नांवाखालीं स्वतंत्र इतिहासप्रसिद्ध राज्यकर्ती राष्ट्रें या देशांत झालीं.

ह्या सर्व लोकांचे मुख्य तीन सारखे गुणधर्म आहेत. ते चिनी लोकांचे वंशज असून त्यांच्या चालीरिती देखील एक आहेत.त्यांनां भारतीय(हिंदु व बौद्ध धर्माचें) शिक्षण असून ते सर्व प्राचीन संस्कृतीचे आहेत. हें आशियाच्या आग्नेयकडील एका कोंपऱ्यांत असल्यामुळें आजपर्यंत युरोपला माहित नव्हते. परंतु मानवजातीच्या शास्त्राच्या व इतिहासाच्या दृष्टीनें हें फार महत्त्वाचें आहे. मंगोलियापासून जपान

पर्यंत सर्व लोकांवर तिबेटी लोकांनीं कांहीं शतकापर्यंत आपल्या धर्माची मोठी छाप बसविली होती.

हिंदुस्थानच्या पूर्वेकडील खरे मूळचे रहिवासी म्हणजे निग्रिटो हे होत. त्यांचे मागून पश्चिमेकडील अथवा बहुतकरून दक्षिणेकडील लोक आले, व हे पश्चिम चीनमधून आलेल्या पिंवळ्या मंगोलियन लोकांशीं एकरूप झाले.वस्तुतः मूळच्या रहिवाशांच्या व बाहेरून आलेल्या लोकांच्या झालेल्या मिश्रणाचे मुख्य चार वर्ग करितां येतील. पहिला वर्ग.–तिबेट व ब्रह्मीदेश यांमधील तिबेटो–ब्रह्मी जातीचा, दुसरा वर्ग.–टायानी-शान जातीचा.तिसरा वर्ग.–दक्षिण ब्रह्मदेश, काम्बोज, आणि कोचिन चिन यांमधील मुन जातीचा. चवथा वर्ग —आनाम आणि टांगकिंगमधील आनामी जातीचा.

ब्रह्मी राज्यकारभारांत इंग्रजांनीं व आनामी राज्य कारभारांत फ्रेंचांनीं हात घालण्या पूर्वी हीं राष्ट्रें मुन लोकांवर व एकमेकांवर सत्ता गाजविण्यासाठीं लढत असत, व हें भांडण राजकीय दृष्टया चीन देशा करितांच असे.

रा न टी जा ती— टांगकिंग, आनाम, कोचीनचीन, कांबोज आणि लाओस यां मधील मुआँग, मुई, पेनॉग किंवा खा, या जातींनां रानटी असें नांव देण्यांत येतें. वरील जातिनामांचा अर्थहि तोच आहे. उत्तर अक्षांश २२ ते १२ पर्यंतच्या प्रदेशांत १३०००० चौरस मैलभर या जाती पसरलेल्या आहेत. त्यांचे आचरण शुद्ध असून ते विनयशील असतात असें तिकडून जाऊन आलेले सर्व लोक सांगतात. एकाच गांवांत एकाच कुटुंबांतहि लग्नव्यवहार होतो. मुलींचें लग्न १४।१५ व्या वर्षी होतें. कांहीं जातींत लवकर लग्नें होतात पण नहाण येईपावेतों मुली आईबापाजवळ राहातात. स्त्रियांना विशेष आदरानें वागविलें जातें. बहुधां स्त्रियाच आपले नवरे पसंत करितात. वरपक्षाला वधूकरितां हुंडा द्यावा लागतो किंवा त्याबद्दल जांवयाला सासऱ्याची कांहीं दिवस नोकरी करावी लागते. एकपत्नीत्व रूढ आहे. घटस्फोट व जारकर्म अतिशय कमी प्रमाणांत आढळून येतें. कोणी मृत झाल्यास त्याचें कुटुंब मोठमोठ्यानें रडून आकांड तांडव करितें. व बहनार जातीसारख्या कांहीं जातींत खिळे किंवा शस्त्रें यांनीं अंगातोंडावर शोकप्रदर्शनार्थ जखमा करून घेण्याची चाल आहे. श्राद्धाची कल्पना फारशी रूढ नाहीं. मृत्युनंतर व्यक्तित्व कायम राहून तें पृथ्वीवर इतर रूपांत पुन्हां अवतरतें अशी या लोकांत कल्पना आहे. भुताखेतांची भीति यांनां असतें.

इन्डोचिनी देशांतील जंगली लोकांचा वन्यधर्म असून दुष्ट देवतांचे सांत्वन करण्याकरितां व आपल्या मनःकामनांच्या पूर्तीसाठीं ते अनेक गोष्टी करीत असतात. यज्ञयाग व बलिदान हे मुख्य उपासनेचे प्रकार होत. पुढाऱ्यांच्या अत्यंविधींत नरबली देण्याची पूर्वी चाल असे. सेदांग लोकांत एखादी सार्वजनिक इमारत बांधतांना पहिल्या खांबाखालीं एखादा लढाईंत धरलेल्या कैदी जिवंत गाडीत असत. जगदुत्पत्तीच्या वेळीं मोठा जलप्रलय होऊन 'आजा आजी' आणि 'मोठी पेटी' मात्र शाबूत राहिली व त्यापासून हल्लींच्या जगाची उत्पत्ति झाली अशी समजूत आहे. यांत चमत्कारिक आकाराच्या किंवा रंगाच्या गारगोट्या व कांहीं प्राचीन वस्तू यांच्या ठिकाणीं औषधी गुण असतो असें समजतात. यांच्यांत दैवकें फारशीं दिसत नाहींत. दरवर्षी भात पिकलें म्हणजे मोठा सण करण्यांत येतो.

ध र्म—आनामी लोकांचा धर्म अनिश्चित स्वरूपाचा असून तो कांहींसा बौद्धधर्मासारखा आहे. त्यांतील कांहीं विधी कांहींसे वैदिकधर्मासारखे आहेत. मिशनरी लोकांनीं रोमन कॅथोलिक धर्माचाहि येथें प्रसार केला आहे.

रा ज्य व्य व स्था.—१८८७ पर्यंत आनाम, टांगकिंग, व कांबोज यांचा कारभार निरनिराळा होता. परंतु १८८७च्या ठरावान्वयें या तीन्ही संस्थानाचा राज्यकारभार एक करून आनामला एक लेफ्टनंट गव्हरनर व दुसऱ्या दोन संस्थानांस प्रत्येकीं एक रेसिडेंट जनरल ठेवला व त्यांच्यावर गव्हर्नरजनरल नेमण्यांत आला. या गव्हर्नर जनरलच्या अधिकारांत वेळोवेळीं फेरफार झाले. हल्लीं गव्हर्नरजनरल हा "इंडोचायनीज युनिअन" व फ्रेंच सरकार यांमधील मध्यस्थ असून त्याला फ्रेंच सरकारनें तसे अधिकार दिलेले आहेत. तो राज्यकारभार व लष्कर यावर मुख्य असतो. त्याला सैन्यावर अधिकार चालवितां येत नाहीं तरी समुद्रावर व जमीनीवर सैन्याची वांटणी करण्याचा अधिकार आहे. त्यानें परराष्ट्रीय कारभार फ्रेंच सरकारच्या अनुमतीनें केला पाहिजे. गव्हर्नरजनरलला मदत करणारें वरिष्ठ मंत्रिमंडळ असतें. त्याचा गव्हर्नर हा अध्यक्ष असून निरनिराळ्या खात्यांचे मुख्य अधिकारी या मंडळाचे सभासद असतात. याशिवाय ४ वजनदार रहिवाशी व आणखी कांहीं लोकहि असतात. ही सभा फक्त हानोइ येथेंच भरते असें नाहीं तर सैगान, ह्यु व नामपेन याहि ठिकाणीं ती भरते. ही सभा आपले अधिकार एका "कायम सभेस" ( पर्मनंट् कमिशन् ) देते. या कायम सभेंत १३ सभासद असतात. गव्हर्नर जनरलला मदत करणारें दुसरें "संरक्षक मंत्रिमंडळ" असून त्यांत लष्करी व आरमारी अधिकारी असतात. पोष्ट व तारखातें यांच्या सोईकरितां फ्रेंच इंडोचीनचे दोन भाग केले आहेत.

शि क्ष ण.—आनामी लोक बुद्धिमान आहेत. १९०६ सालीं कोचीन चीनमध्यें ४५००० पौंड इतका शिक्षणाकरितां खर्च झाला, व त्यामुळें २२५००० मुलांनां फ्रेंच शिक्षण मिळालें.

उ त्प न्न व ख र्च.—१९०४ सालीं २८०९८५१ पौंड जमा झाले, व २७९७०३१ पौंड खर्च झाले. १९१८ सालीं उत्पन्न व खर्च ७१६६०५० पिआस्ट्रो इतका होता. सबंध इंडोचीनला मिळून एक बजेट, व प्रत्येक प्रांताला निरनिराळे बजेट असतें.

व्या पा र.—कोचीन-चीन, कांबोज, दक्षिण लाओस व केप व्हेरेलाच्या दक्षिणेकडील आनाम या प्रदेशांत मच्छीमारी खेरीज, शेतकीचा मोठा धंदा चालतो व तांदुळ फार पिकतो. टॉंकिन व आनामचे उत्तरेकडील तीन जिल्हे यांत शेतकी, खनिखोदन व इतर कारखानदारी चालते. मध्यआनाम शेतकीप्रधान आहे. येथून बाहेर दालचिनी, चहा, व साखर जाते. इंडोचीनमधील खनीज म्हणजे कोळसा, अँटिमनी, जस्त वगैरे होत. इंडोचीनच्या निर्गत मालापैकीं शेंकडा ७० तांदूळ व बाकीचे मासे, मिरीं, कातडीं, कोळसा कापूस, रबर व साखर हे जिनसा होत. फ्रेंच इंडोचीनांत आयात मालावर जबर जकात बसविली असून फ्रेंच माल मात्र या करांतुन वगळला जातो. निर्गत मालावरहि कर बसविला आहे पण फ्रान्सला जाणारा माल मात्र या करांतून वगळला जातो. येथें येणाऱ्या मालापैकीं शेंकडा ५३ फ्रान्सहून येतो. चीन, जपान व सिंगापूर येथूनहि कांहीं माल येतो. १९१८ सालीं इंडोचीनी बंदरांत ४६००००० टन जहाजांची जा ये होती. १९१९ मध्यें ७९१०७३००० फ्रँक किंमतीची आयात व १०५०८९३००० फ्रँक किंमतीची निर्गत झाली. इंडोचीन बँकेचे भांडवल चार कोटी ऐशीं लक्ष फ्रांक असून तिला नोटा काढण्याचा व तारणावर रक्कम देण्याचा अधिकार आहे.

द ळ ण व ळ ण.—टॉंकिन व कोचीनचीन यांच्यांत समुद्रमार्गानें दळणवळण आहे. खुद्द फ्रेंच इंडो चीनांत बरेच लोहमार्ग आहेत. १९१४ सालीं १२७३ मैल इतकी यांची लांबी होती.

इ ति हा स.— इ. स. १७८७ मध्यें आनामाच्या राजानें फ्रेंचांनां तुरेन व पुलो कॉंडोर बेट दिलें. परंतु त्यानंतर झालेल्या राजांनीं ख्रिश्चन लोकांचा छळ केला. तेव्हां इ. स. १८५९ मध्यें फ्रेंच व स्पॅनिश आरमार आलें. त्या सालीं फ्रेंचांनीं सैगान घेतलें. नंतर १८६२ सालीं कोचीनचीनचे तीन जिल्हे व कांहीं सवलती त्यांनां मिळाल्या. १८६३ सालीं कांबोडिया संस्थान फ्रेंचांच्या संरक्षणाखालीं आलें. १८६७ सालीं कोचीनचीनचे राहिलेले जिल्हे त्यांनां मिळाले. इ. स. १८७३ सालीं फ्रेंचांनीं टॉंगकिंगच्या कारभारांत हात घातला, व १८८४ सालीं टॉंकिंग व आनाम फ्रेंचांच्या संरक्षणाखालीं आले. इ. स. १८९१ पर्यंत फ्रेंचांनीं आनाम व टॉंगकिंग हे जिंकले. १८९३ सालीं तेथील चांचे लोकांचें बंड मोडण्यांत आलें. त्याच सालीं फ्रेंच व सयामी लोक यांच्यांत मेकांगच्या डाव्या तीराच्या ताब्याबद्दल बेबनाव होऊन फ्रेंचांनीं सयामच्या राजाला निर्वाणीचा खलिता पाठविला. सयामी लोक मेकांगचा डावा तीर सोडून जाईपर्यंत " चंताबुन " चा ताबा फ्रेंचांना यावा; मेकांगच्या उजव्या तीराच्या १५½ मैल टापूंत तटबंदीचीं ठाणीं करण्याचा सयामी लोकांना मज्जाव असावा. व टोन्ले—सॅप सरोवरांत लष्करी बोटी ठेवण्याची सयामला बंदी असावी. ह्या तीन अटी त्या खलित्यांत होत्या. लवकरच फ्रेंच व सयामी लोक यांच्यांत वरील प्रकारचा ठराव झाला.

१९०४ सालीं फ्रान्को—सयामी तह झाला. त्या तहान्वयें फ्रेंचांनीं चंताबुन खाली करून दिलें, व मेकांगच्या उजव्या तीरासंबंधीं असलेलें बंधन काढून, घेऊन त्याबद्दल फ्रेंचांना बसॅक व मेलुप्रे प्रांत व दनसै जिल्हा व समुद्र कांठचा क्राट जिल्हा कायमचा देण्यांत आला. १९०७ सालच्या ठरावान्वयें सयामनें बत्तमबंग सायेम-पीक सिसोफोन हे प्रांत फ्रेंचांना देऊन त्याबद्दल क्राट प्रांत व दनसै जिल्हा परत घेतला.व सयामच्या मुलुखांत फ्रेंचांनी आगगाडींची केलेली योजना रद्द केली. ' हिंदुस्थान आणि जग ' ज्ञानकोश विभाग१ ला प्र. ५ वें यांत आनाम, टॉंकिन कॅंबोज व कोचीनचीन या देशांचा इतिहास, लोकांची राहणी भाषा वगैरे माहिती दिली आहे. ) शिवाय त्या देशनामाखालीं स्वतंत्र माहिती सांपडेल.

[सं द र्भ ग्रं थ.–निरनिराळ्या वसाहतींचे वार्षिक रिपोर्ट. सॉंडेसॉन—इंडोचायना अँड इट्स प्रिमिटिव्ह पीपल्स, लंडन १९१९. बर्नार्ड—इंडोचायना. कोविक—बिब्लिओथिका इंडोसिनिका. आयर्लंड—दि फार ईस्टर्न ट्रॉपिक्स ]

**इतखेड**.–(वऱ्हाड) जिल्हा बुलढाणा तालुका जळगांव. पूर्णा नदीतीरीं जळगांवच्या आग्नेयीस १२ मैलांवर हें लहानसें खेडें आहे. या ठिकाणीं दत्तात्रेयाचें एक देवालय असून तेथें दर गुरुवारीं पुष्कळ लोक दर्शनास येतात. ज्यांनां भुताखेतांची बाधा झालेली असते त्यांनां येथें बरें वाटतें म्हणतात. असे लोक येथें कापूर जाळतात, देवाभोंवतीं ओरडत, नाचत फिरतात, आणि जवळच असलेल्या खोल डबक्यांत तीनदां बुडी मारतात. वर आल्यानंतर त्यांचीं ती व्याधी नाहींशीं झालेली असते, असें सांगतात. येथें येणाऱ्या लोकांच्या सोयीकरतां तीन धर्मशाळा बांधलेल्या आहेत. चैत्र महिन्याच्या शुद्धपक्षांत येथें जत्रा भरत असते. त्यावेळीं तेथें कापूर सुमारें ५०० रुपयांचा जळतो. ( बुलढाणा जिल्हा गॅ. १९१० )

**इतवाद**.—( मुंबई इलाखा. ) रेवाकांठा एजन्सीमधील एक छोटेसें संस्थान आहे. पश्चिमेस महीनदी, पूर्वेस व उत्तरेस गायकवाडी खेडीं आणि दक्षिणेस नानामोटी वर्णोली संस्थानें आहेत. ही राठोड इस्टेट चार भागीदारांत विभागली असून हिचें एकंदर क्षेत्रफळ अदमासें ६ चौरस मैल आहे, व वार्षिक उत्पन्न दीड हजार आहे. या संस्थानाकडून गायकवाडाला ६०१ रुपये खंडणी जाते. येथील जमीन चांगली असून भांडवलाच्या अभावीं बरीचशी पडून राहिलेली आहे. ( मुं. गॅ. ६ )

**इतिमादपूर** त ह शी ल.— संयुक्त प्रांत, आग्रा जिल्हा उ. अ. २७° ५' आणि २७° २४' व पू. रे. ७७° ५८' आणि ७८° २२' यामध्यें ही वसलेली आहे. क्षे. फ. २७७ चौ. मै. लोकसंख्या सन १९११ सालीं १४९३१७

होती. ह्या तहशिलींत १७५ खेडीं व दोन शहरें एक इतिमादपूर व दुसरें तुंदला ही आहेत. ही तहशील सबंध यमुनेच्या उत्तरेस असून हींतून झिरणा नदी वहाते. तहशिलीचा बहुतेक भाग सपाट उंचवट्याचा असून जमीन उत्तम चिकण मातीची आहे.

शहर.–इतिमादपूर तहशिलीच्या मुख्य ठिकाणी उ. अ. २७° १४' व पू. रे. ७८° १२'. आग्रा ते मैनपुरी या मोठ्या रस्त्यावर हें लागतें. ई. आय. रेल्वेच्या तुंडला जंक्शनपासून २½ मैलांवर आहे. १९०१ सालीं येथील लोकसंख्या ५३३२ होती पण १९११ त ती ३७५८ भरली. इतिमादखान नांवाचा एक खोजा अकबर बादशहाचें पदरीं होता. त्याच्यावरून या गांवाला हें नांव पडलें. त्यानें या ठिकाणीं एक मोठा तलाव बांधला. ( इ. गॅ. )

**इतिहासशास्त्र.**—या विषयावर अनेक प्रकारचें विवेचन करणें प्राप्त होतें. प्राचीन भारतांत "इतिहास" या शब्दाचा अर्थ व प्राचीन इतिहासवाङ्मय हा एक महत्त्वाचा विषय आहे. याशिवाय आज आपण ज्यास इतिहासशास्त्र म्हणतों त्याची प्राचीनांस कितपत कल्पना होती, आणि ती कल्पना पुढें मुसुलमान व इंग्रज यांच्या संपर्कानें विकसित होत होत आजचें इतिहास स्वरूप कसें तयार होत गेलें हें सांगितलें पाहिजे. आणि इतिहास शास्त्राचें आजचें स्वरूप काय हेंहि सांगितलें पाहिजे. प्राचीनांच्या इतिहासशास्त्राची कल्पना "बुद्धपूर्वजग" याच्या पहिल्या प्रकरणांत स्पष्टपणें मांडलीच आहे.

शब्दाचा प्राचीन अर्थ—इतिहास शब्दाची व्युत्पत्ति 'इति ह आस' 'असें हें होतें' अशी आहे. त्याचा अर्थ पुरावृत्त (अमरकोश १. ४. ६.) म्हणजे मागें घडलेली गोष्ट असा आहे. उत्तरकालीन संस्कृत वाङ्मयांत इतिहास याचा "दंतकथा" "गोष्ट" असा साधा अर्थ होऊं लागला. आणि आख्यान, आख्यायिका, कथा इत्यादि प्रतिशब्द त्याबद्दल वापरण्यांत येऊं लागले. परंतु इतिहास म्हणजे ज्यामध्यें धर्म, अर्थ, काम, व मोक्ष हे चतुर्विध पुरुषार्थ कसे साधावे याबद्दलचा उपदेश केलेला असून तत्संबद्ध गोष्ट सांगितली आहे असा प्राचीन काळचा वृत्तांत होय; ही सविस्तर व्याख्या मान्य केली तर इतिहास हा कथेच्या रूपानें केलेला उपदेशच होय असें म्हटलें पाहिजे. आणि हाच अर्थ खरा असल्याचें मानण्यास संस्कृत वाङ्मयांत भरपूर पुरावा मिळतो. आश्वलायन गृह्यसुत्रांत (४. ६. ६) असें सांगितलें आहे कीं, जेव्हां एखादा इसम मरण पावतो, तेव्हां त्याचे इष्टमित्र एकत्र बसून प्रसिद्ध पुरुषांच्या गोष्टी सांगतात, व त्याच वेळीं मनावर चांगला परिणाम करणारे इतिहास आणि पुराणें त्यांनां सांगण्यांत येतात. कौटिल्याच्या अर्थशास्त्रांत (अर्थशास्त्र १. ५, १०. १४. पासून पुढें असें सांगितलें आहे कीं, राजानें आपला नित्याचा कार्यक्रम म्हणून रोज इतिहास ऐकत जावा म्हणजे त्या योगानें त्याचें शिक्षण पुरें होतें. तसेंच इतिवृत्त आणि पुराण यांचा उपयोग करून प्रधानानें राजाला चुकीच्या मार्गापासून परावृत्त करून चांगल्या मार्गाला लावावें. (अर्थशास्त्र ५. ६. २५५ ).

महाभारत ह्या ग्रंथाला इतिहास महापुण्य ( मोठ्या महत्वाचा इतिहास ) असें म्हटलें आहे. आणि त्यामधील पुण्य कथांचा वारंवार उल्लेख करण्यांत येतो. महाभारतांत पुष्कळ इतिहास सांगितलेले आहेत' त्यांमध्यें ऐतिहासिक माहितीपेक्षां उपदेशात्मक भागालाच विशेष महत्त्व असतें. महाभारतांत "हे ऋषीहो, हा संशय माझ्या हृदयांत शल्याप्रमाणें रुतून बसला आहे तो इतिहासकथनानें काढून टाका; एवढीच माझी सर्वांत मोठी इच्छा आहे." अशा प्रकारचे उल्लेख वारंवार येतात. कौटिल्यानें इतिहास हा एक समुदायवाचक अर्थानें वापरला आहे व त्यांत पुराण, इतिवृत्त, आख्यायिका, उदाहरण, धर्मशास्त्र व अर्थशास्त्र इतक्यांचा समावेश केला आहे. परंतु या सहा प्रकारच्या निरनिराळ्या ग्रंथांपैकीं प्रत्येकाचा अर्थ काय हें नक्की समजणें कठीण आहे. पुराण म्हणजे दंतकथांचा संग्रह व इतिहास म्हणजे ऐतिहासिक गोष्टींचा संग्रह असें याकोबी सारख्या पंडितांचें मत आहे. तसेंच आख्यायिका म्हणजे गद्य कथानक आणि उदाहरण म्हणजे नैतिक उपदेशपर भाग होय.

वरील उदाहरणांवरून असें दिसून येईल कीं, इतिहास हा संस्कृत वाङ्मयांमध्यें एक ग्रंथप्रकार होता. खुद्द महाभारताला सर्व इतिहासांतील अत्यंत श्रेष्ठ इतिहास असें म्हटलें आहे. तात्पर्य इतिहास अथवा इतिहासवेद या नांवाचा ग्रंथसमुदाय प्राचीन हिंदुस्थानांत अस्तित्वांत होता असें मानण्यास सबळ पुरावा आहे. अश्वमेध यज्ञाच्या वर्णनांत असें सांगितलेलें आहे कीं, हा यज्ञ चालू असतां होत्याच्या समोर रोज एकएक विशिष्ट जीवकोटी आणून उभी केली आहे असें धरीत व तो तिला उद्देशून निरनिराळ्या ग्रंथांतले उपदेशपर भाग म्हणून दाखवी. या क्रमानुसार पहिल्या दिवशीं वैवस्वत मनु हा राजा आणि मानव प्राणी हीं त्याची प्रजा यांनां होत्यापुढें आणण्यांत आलें व होत्यानें त्यांनां उद्देशून ऋग्वेदांत कांहीं ऋचा म्हटल्या. दुसऱ्या दिवशीं वैवस्वत यम आणि पितर हे होत्यापुढें आले आणि यजुर्वेदांतला कांहीं भाग त्यांच्यापुढें म्हणण्यांत आला. तिसऱ्या दिवशीं वरुण आदित्य व गंधर्व आणि अथर्वण वेदाचा कांहीं भाग; चौथ्या दिवशीं सोम, वैष्णव आणि अप्सरा आणि अंगिरसाचा कांहीं भाग; पांचव्या दिवशीं अर्बुद काद्रवेय व सर्प, आणि सर्पविद्येचा कांहीं भाग; सहाव्या दिवशीं कुबेर, वैश्रवण व रक्षस, आणि देवजनविद्येचा ( रक्षोविद्या किंवा पिशाचविद्या हिचा ) कांहीं भाग; सातव्या दिवशीं असित, धान्व व असुर आणि माया ( असुरविद्या ) आठव्या दिवशीं मत्स्य समद व

जलचर प्राणी, आणि इतिहासवेदापैकीं एक इतिहास, नवव्या दिवशीं तार्क्ष्य, वैपश्यत व पक्षी, आणि पुराणवेदांपैकीं एक पुराण; आणि दहाव्या दिवशीं धर्म, इंद्र व देव आणि सामवेदांतला कांहीं भाग; या प्रमाणें अनुक्रम सांगितलेली आहे. सदहू वर्णनांत ऋक, यजुष, अथर्वण' अंगिरस, सर्पविद्या, देवजनविद्या, माया ( असुरविद्या ), इतिहास पुराण आणि सामवेद इतक्या निरनिराळ्या प्रकारच्या ग्रंथाचा उल्लेख आढळतो. अशाच प्रकारच्या याद्या वैदिक वाङमयांत निरनिराळ्या ठिकाणीं आढळतात. ( उदा. अथर्ववेद १५. ६.३ बृहदारण्यक उपनिषद. २ ४. १० = ४. १. ) २; तैतिरीय आरण्यक २. ९ आश्वालायन गृह्यसूत्र ३. ३.१ या सर्व प्राचीन याद्यांमध्यें ' इतिहास ' हा शब्द ' पुराण ' या शब्दाच्या बरोबर आलेला आढळतो. इतकेंच नव्हे तर कांहीं ठिकाणीं त्यांचा द्वंद्व समास केलेला असतो. अशा याद्यांमध्यें इतिहासपुराण हे शब्द चार वेदांच्या नावानंतर लगेच दिलेले असतात. हें त्याचें स्थानहि लक्षांत घेण्यासारखें आहे; शिवाय छांदोग्य उपनिषदांत ( ५. १' २ व ४; २; ७. १ " इतिहासपुराणः पंचमो वेदानां वेदः " म्हणजे इतिहास-पुराण हा पांचवा वेद आहे असें म्हटलें आहे.

या वैदिक वाङ्मयांतल्या उल्लेखावरून इतिहास व पुराण या नांवाचे स्वतंत्र ग्रंथ अस्तित्वांत होते हे निर्विवाद सिद्ध होतें. शिवाय कौटिल्याच्या अर्थशास्त्रांतील उल्लेखावरून ख्रि. पू. तिसऱ्यां शतकांत हा इतिहासवेद अस्तित्वांत होता. असें ठरतें ( अर्थशास्त्र १. ३ ७ ९ )

महाभारतांत इतिहासवेद किंवा पुराणवेद असे शब्द पुष्कळ ठिकाणीं आलेले आहेत. यावरून महाभारत ग्रंथ रचनेच्या कालीं इतिहासपुराण नामक ग्रंथांना महत्व होतें हें स्पष्ट दिसतें.

या प्राचीन इतिहासपुराण नामक ग्रंथाचे अवशेष संस्कृत वाङ्मयांतल्या दुसऱ्या एका भागांत ब्राह्मण ग्रंथांतल्या दंतकथा आणि कल्पित गोष्टी या रूपानें उरलेले आहेत. आणि विशेषतः अर्थवाद म्हणजे टीपात्मक भाग या सदराखालीं ते येतात असें इ. सीग या पाश्चात्य विद्वानाचें मत आहे. यास्काचार्याच्या निरुक्तावरून असें दिसून येतें कीं, ऐतिहासिक या नांवाच्या वैदिक ग्रंथाचा अर्थ सांगणारा एक पंडित वर्ग होता. हा वर्ग वेदमंत्रांचा अर्थ लावण्याच्या कामीं इतिहासग्रंथाचा उपयोग करीत असे. शिवाय यास्कार्यानेंहि कित्येक मंत्रांना लहान लहान कथात्मक भाग जोडून दिले आहेत; त्यांना तो इतिहास किंवा आख्यान असें नांव देतो. या यास्कार्याच्या कथात्मक भागांचें ब्राह्मण ग्रंथांशीं बरेंच सादृश्य आहे. शिवाय अशा प्रकारचे इतिहास गृहदेवता; ऋग्वेदाच्या अनुक्रमणी आणि मध्ययुगांतील देवराज दुर्ग, सद्गुरुशिष्य आणि विशेषतः सायण यांच्या भाष्यग्रंथांत आढळतात; कारण या अलीकडल्या काळांत सुद्धां वेदमंत्रांचा अर्थ देतांना निदान असेल तर प्रथम यावें व नंतर नेहमींचें शाब्दिक विवरण यावें, असा प्रचार पडलेला होता. ( उदा. निरुक्त ९. ५. यावरील दुर्गाची टीका )

इतिहास वाङ्मय आणि वेदार्थ.—ब्राह्मणग्रंथांमध्यें आणि वेदांवर भाष्य लिहितांना इतिहासाचा उपयोग करणें योग्य आहे काय असा प्रश्न उद्भवतो. या प्रश्नाचें उत्तर जेथें जेथें इतिहासग्रंथाचा उपयोग करण्यांत आलेला आहे तें प्रत्येक स्थळ तपासून दिलें पाहिजे. वैदिक मंत्रांचे कर्ते आणि इतिहासग्रंथाचे कर्ते यांची दंतकथाविषयक व कल्पितकथाविषयक मतें व कल्पना जरी बहुतांशीं सारख्याच होत्या तरी इतिहासपुराण ग्रंथाच्या गाथा आणि वैदिक मंत्राच्या गाथा यांच्यामध्यें बराच महत्त्वाचा फरक असला पाहिजे. आणि असा महत्त्वाचा फरक जेथें असेल त्या ठिकाणीं वैदिक मंत्रांचा अर्थ सांगतांना इतिहासग्रंथांतला उतारा देणें धोक्याचें होय असें इ. सीज याचें मत आहे. उदाहरणार्थ, राजसूयांत होता राजाला जी शुनःशेपाची कथा सांगत असे ती ऋग्वेदाच्या ब्राह्मणांत योग्य रीतीनेंच योजिली आहे. कारण ती राजसूयांत सामान्यतः येणाऱ्या अंजस्डवाचा अर्थवाद म्हणून असे. पण ब्राह्मणकारांनीं ही गोष्ट ऋग्वेदाच्या सर्व शुनःशेपीय सूक्तांतून जी ओंविलेली आहे, ती निःसंशय चुकीची म्हणतां येईल, कारण शुनःशेपाला यूपाला बांधून पुढें सोडून दिल्याची कथा ऋग्वेदांत ( १ २४·१२–१३; ५·२·७ ) फारच त्रोटक आलेली आहे. तसेंच पुरुरवस आणि उर्वशी यांची ब्राह्मणांतून ( शतपथ ११· ५·१; काठक १·८·१० मैत्रेयी १·६·१२ ) आलेली कथा अति योग्य आहे असें म्हणतां येईल. कारण अग्निमंथनकालीं विशिष्ट समिधांचा उपयोग करण्यावेळचा तो अर्थवाद आहे. पण ही कथा आनंदपर्यवसायी असेल तरच ठीक. कारण ऋग्वेदांत ( १०·९५ ) ती शोकपर्यवसायी दिसते. तेव्हां ब्राह्मण कारांनीं आपल्या इतिहासाला पाहिजे तेवढाच कथेचा भाग घेऊन बाकीचा टाकून दिला आहे.

शेवटीं या ठिकाणीं असें सांगितलें पाहिजे कीं, वैदिक सूक्त आणि इतिहास यांच्यामधील संबंध हा अद्यापि वैदिक भाषाशास्त्रामध्यें वादाचा विषय म्हणून शिल्लक आहे. ई. विंडिशनें असें अनुमान केलें आहे कीं, पुरुरवा आणि उर्वशी हें काव्य(ऋग्वेद१०·९५) मूळ कथानकापासून तुटकलेला पद्यखंड आहे. ओल्डनबर्गनें ही कल्पना उचलून आणखी अशी जोड दिली कीं, अनेक ऋग्वेदसूक्तांतून पद्यभागामध्यें संदर्भाकरितां व मजकूर एकजीव करण्याकरितां गद्यकथानकें निःसंशय घातलीं असलीं पाहिजेत. गद्यामध्यें उत्तम उत्तम भागांतून विशेषतः भाषणें आणि संवाद असलेल्या ठिकाणीं पदें घालण्याची चाल प्राचीन हिंदुस्थानांत रूढ होती. अशा सुंदर मांडणीच्या कथानकाला आख्यान असें नांव ओल्डनबर्ग

देतो. उदाहरणार्थ, शुनःशेप-आख्यान, ओल्डनबर्गचें असेंहि म्हणणें आहे कीं, केवळ पद्यभाग शिकण्याकडे व शिकविण्याकडे लोकांचा ओढा असल्याकारणानें कथानकांचा गर्भ जो गद्यभाग त्यांत कथेकऱ्यांच्या एकामागून एक झालेल्या पिढ्यांतून पुष्कळशी ढवळाढवळ झाली असावी किंवा तो अजिबात नष्ट झाला. असावा सारांश ओल्डनबर्गच्या मतें ऋग्वेदाच्या आख्यानसूक्तांनीं पुढील काळीं जोडलेला गद्यसंदर्भ जुन्या परंपरेचा नसून थोडासाच खरा अतएव टाकाऊ असा आहे. हा ओल्डनबर्गचा सिद्धांत पिशेल, गेल्डनर, सीग इत्यादि बहुतेक सर्व पंडितांनां पटला; वरील तीन पंडितांचें इतकेंच म्हणणें होतें कीं, ऋग्वेदाला भारतीय इतिहासपरंपरेचें असणारें बरेचसें महत्त्व विसरून चालावयाचें नाहीं.

याच्या उलट सिल्हांलेव्ही असें प्रतिपादितो कीं, ऋग्वेदांतील बहुतेक संवादसूक्तें काव्याच्या दृष्टीनें इतकीं सुंदर व सुबोध आहेत कीं, त्यानां जोडण्याकरितां एखादें कथानक आवश्यक आहे असें नाहीं. नुसतें वाचूनहि एक प्रकारचा नाट्यालोक दृष्टीपुढें उभा राहतो. म्याक्समुल्लरलाहि ऋग्वेदांतील १.१६५ वें सूक्त हें नाट्यमय आहे असें वाटलें.

जेव्हर्टेल यानेंहि स्वतंत्रपणें ओल्डनबर्गचें वरील आख्यानमत खोडून काढलें आहे. त्याच्या मतें ऋग्वेदांतील सर्व संवादसूक्तें नाट्यगीतें आहेत; त्यांचे प्रयोग कधीं कधीं यज्ञोत्सवांतून केले जात. भारतीय नाटयाचें आद्य स्वरूप त्यांत आपल्याला पहावयास मिळतें. व्हॉनश्रोडर याच्याहि पुढें जाऊन असें विवरण करतो कीं, हीं सर्व सूक्तें विधिविषयक नाट्यें होत.

विंटरनीज या दोन्हींमधला मार्ग आक्रमून असा सिद्धांत मांडतो कीं, ऋग्वेदांतील संवादसूक्तें सर्वच एकसारखीं नाहींत. त्यांतील कांहीं लावण्यासारखीं असून त्यांतील गोष्टी पद्यात्मक संभाषणांत सांगितलेल्या आहेत व कांहीं ठिकाणींच फक्त गद्यसंदर्भाची जरूरी लागते. कांहीं गद्यपद्यकथानकांचा गद्य भाग नाहींसा होऊन अवशिष्ट राहिलेलीं पद्यखंडें आहेत, तर कांहीं विधिविषयक नाट्यांतील कोरससदृश भाग म्हणतां येईल.

ए. बी. कीथ असा निर्णय देतो कीं, वरील दोन्ही सिद्धांत खरे मानण्याला लायक पुरावे नाहींत. प्राचीन वैदिक वाङ्मयांत ओल्डनबर्ग म्हणतो त्याप्रमाणें गद्यपद्यात्मक आख्यानाचा कोठेंहि मागमूस नाहीं. त्याचप्रमाणें यज्ञोत्सवाच्या वेळचीं उत्तरात्मक नाट्यगीतें किंवा विधिविषयक नाट्यें यांचाहि पत्ता लागत नाहीं व हर्टेल आणि व्हॉन श्रोडर यांचीं अनुमानें बरोबर आहेत, असें धरून चाललें तरी वेदांच्या विधिवाङ्मयांत त्यांचा ठाव ठिकाण नाहीं याची वाट काय ? तेव्हां कीथचें म्हणणें असें कीं, अद्याप वादाचा निकाल लागण्यासाठीं समाधानकारक तोड पुढें आलेली नाहीं. या विषयावर आतांपर्यंत वर सांगितलेलीं अनुमानें झालीं. पुढचें व शेवटचें गेल्डनरच अनुमान असें आहे कीं, "ब्यालड" या शब्दाचा गोएटे ज्याप्रमाणें व्यापक अर्थ करतो तसा केल्यास प्रस्तुत सूक्तें त्याखालीं येतील. अशा लावण्यांनां संयोजक गद्यभागाची जरूरी नसून त्या स्वतःच सुबोध असतात. कारण कवीनें उपयोजिलेला विषय स्वतंत्र त्याच्या डोक्यांतला नसून एखाद्या सुप्रसिद्ध कथानकांतील असतो. गेल्डनेरची ही कल्पना फार सुंदर आहे. कारण अस्तित्वांत नसलेल्या संयोजक गद्याची मदत न घेतां सूक्तांचें विवरण तिनें होतें. तथापि वरील कल्पनेनें मुख्य प्रश्नाला फारच थोडी मदत झालेली आहे व तो प्रश्न म्हणजे अशा सूक्तांचा अर्थ समजण्याचा होय. कारण ज्यांनां प्राचीन कथानकें म्हणजे प्राचीन इतिहास माहीत आहेत, त्यांनांच काय तो अशा ऋग्वेदमंत्राचा अर्थ लागेल.

येथपर्यंत इतिहासाच्या प्राचीन कल्पनेसंबंधानें विवरण झालें. प्राचीनांचा इतिहासापासून कांहीं बोध व्हावा असा जरी आग्रह असला तरी त्यांची इतिहासाची खरी शास्त्रीय कल्पना पुसट झाली नव्हती हें "बुद्धपूर्व जग"च्या पहिल्या प्रकरणावरून स्पष्ट होईल. व त्यांत असेंहि दिसून येईल कीं स्मृती कोणत्याप्रकारची जतन करावी, जगद्विवर्तापासून कोणते नियम निघतात, घडामोडींचा कार्यकारण संबंध काय हें प्राचीन इतिहासकारांचे महत्वाचे विचारविषय होते.

प्राचीनांच्या इतिहासशास्त्रापासून हल्लींच्या इतिहासशास्त्रापर्यंत वैचारिक प्रगति दाखविण्यासाठीं आधुनिक इतिहास शास्त्र प्रथम दिलें पाहिजे.

**अर्वाचीन इतिहास शास्त्र इतिहाससाधनांचा शोध संग्रह व सूचि, स्मारक शोधः**—गतकालीन माणसांच्या कृत्यांचें व विचारांचे जे अवशेष त्यांस स्मारक म्हणावें. हीं स्मारकेंच इतिहासाचीं साधनें आहेत. यांची जागा दुसऱ्या कशानेंहि भरून काढणें शक्य नाहीं. जेथें स्मारकांचा अभाव तेथें इतिहासाचाहि अभावच असावयाचा म्हणूनच स्मारकांचा शोध व त्यांचा संग्रह हा इतिहासशास्त्राचा ओनामा आहे. गतकालचीं स्मारकें, मग ते ग्रंथ अगर चिरजीवि उर्फ अंकित लेख असोत, अगर चित्रें असोत, तीं हुडकून काढणें ही एक कला आहे. तीस आपण स्मारकशोधन म्हणूं.

**स्मारक संग्रह.**—शक्य तितका प्रयत्न करून सर्व स्मारकांचा संग्रह प्रथम केला पाहिजे. एखादें जरी स्मारक सुटलें तरी इतिहासकाराचें तितकेंच काम लंगडें झालें असें समजावें. जें आपणांस सांपडलें असेल तें महत्त्वाचें आणि सांपडलें नसेल तें कमी महत्त्वाचें असलें पाहिजे अशी मनाची फसवणूक करून घेऊं नये. स्मारकांस अलीकडे 'साधनें' हा शब्द महाराष्ट्रात प्रचारांत आला आहे.

**प्रत्यक्ष स्मृति संग्रह व स्मारक संग्रहः**—ऐतिहासिक महत्त्वाचा वृत्तांत जर कोणी डोळ्यांनीं पाहिला

असला तर त्यांस प्रत्यक्ष भेटून तो लिहून ठेवणें अवश्य आहे. एक दोन पिढ्यांतील वृत्तांतांचीं साधनें मिळविण्यास ही पद्धति लावतां येईल. इतिहासलेखनास घेतलेला काल जर फार प्राचीन असला, आणि त्यासंबंधीं दंतकथाहि उपलब्ध नसल्या, तर उपलब्ध होतील तितकीं सर्व स्मारकें जमा केलीं पाहिजेत. होतां होईतों असा संग्रह सार्वजनिक असला पाहिजे. हें काम सार्वजनिक संस्थांनीं केलें असलें म्हणजे सर्व स्मारकें एके ठिकाणीं सांपडतील व कोणासहि त्यांचा उपयोग करून घेतां येईल, व अप्रासिद्ध अशा लेखांचा निर्भयपणें आधार देतां येईल.

सू चीक र ण.— हीं साधनें एकत्र केल्यानंतर शास्त्रीय पद्धतीनें त्यांची तपशीलवार सूचि करावी. सूची तयार करणें हें काम सोपें नव्हें. साधनांची यादी करावी, तींत प्रत्येक लेखाचें अगर इतिहाससाधनाचें सूचक वर्णन असावें व तें सहज सांपडण्यासारख्या अनुक्रमानें व्यवस्थित रीतीनें मांडून ठेवावें हें सूचीकाराचें काम होय. हें काम कसलेल्या सूचीकारांपासूनच व्हावें. सूचीकार बनण्यास योग्य पूर्व तयारी म्हणजे बऱ्याचशा साधनांच्या अंतरंगाची माहिती आगाऊ मिळविणें व लक्षांत ठेवणें. साधनांचा देशभर जर व्यवस्थित शोध मोठ्या प्रमाणावर केला तर थोडक्या अवकाशांत पुष्कळ लेखांचा पत्ता लागेल. 'इतिहास व ऐतिहासिक' ( धुळें ) याच्या पहिल्याच अंकांत रा. राजवाडे यांनीं भारतीय इतिहास संशोधनाचें क्षेत्र किती मोठें आहे, आणि प्रत्येक जिल्ह्यांत काय करतां येण्यासारखें आहे व किती काम अजून व्हावयाचें आहे याची मोजदाद दिली आहे. हिंदुस्थानसरकारनें प्राचीन वस्तुविषयक पहाणी (आर्किऑलॉजिकल सर्व्हे) केली तिच्या योगानें साधनसंशोधनाचें पुष्कळ चांगलें कार्य झालें. पण झालेलें कार्य, आपलें पुढें काम राहिलें आहे किती, याचीच साक्ष देईल. साधनसंग्रह होऊन सूचीकारानें निरनिराळ्या दृष्टीनें साधनांचीं निरनिराळीं वर्गीकरणें करावयास हवींत. साहित्य जमा झालें आणि तें उपयोग करण्याची पूर्वतयारी झाली म्हणजे इतिहाससंशोधनशास्त्रांतील अभ्यासकास आपलें कार्यक्षेत्र ठरवून टाकणें सोपें पडेल.

स ह का री शा स्त्रें.—एकदां विषय हातीं घेतला म्हणजे मग एखाद्या संशोधकानें पूर्व साहित्याची जुळवाजुळव केली असली तर ती तपासून पाहणें हें पहिलें काम आहे. जर चिकित्सक पद्धतीनें जुळवाजुळव झाली नसली तर ती अभ्यासकानें स्वतः केली पाहिजे. जुळवाजुळव करण्याचें काम इतकें कठीण आहे कीं तें चोख रीतीनें करण्यास इतिहासोपयोगी विचारपद्धति व इतिहासविषयाच्या क्षेत्राची कल्पना या सदोष असतां कामा नयेत. इतिहास लेखनाला उपयोगी पडणारीं ज्ञानें कोणतीं याचा विचार करूं.

( १ ) प्रथमतः इतिहासकारास प्राचीन लिपिविद्या चांगली आली पाहिजे, व चिरंजीवि लिखाणें ( शिलालेख व ताम्रपट ) वाचण्याची संवय लागली पाहिजे. प्राचीन लिपींतील लेख व शिलालेख ताम्रपट इ. चिरजीवि लिखाणें प्राचीन लिपिशास्त्राच्या साहाय्यानें वाचतां येऊं लागल्यावर जुन्या भाषांचा उत्तम परिचय अवश्य आहे. नाहींतर लिखाणांचा अर्थ समजणार नाहीं किंवा त्यांत ढोबळ चुका तरी होतील. उदाहरणार्थ "कर्तया कुंतलः शातकर्णिः शातवाहनो महादेवीं मलयवतीं जघान " हें वात्स्यायनाच्या कामसूत्रांतील विधान घ्या. डॉ. सर रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांनीं यांतील " कर्तरी " शब्दाचा कातरी असा अर्थ केला आहे. त्यांतील चूक रा. राजवाडे यांनी दाखविली आहे. पुष्कळ लिखाणें धड संस्कृतहि नाहींत, व प्राकृतहि नाहींत. भाषांच्या अपभ्रष्ट स्वरूपांत लिहिलीं आहेत, व त्यांतहि अनेक प्रकारच्या लिपी आढळतात. तीं वाचण्यास लिपीच्या निरनिराळ्या काळीं झालेल्या फेरबदलाची माहिती म्हणजे भाषाविषयक, लिपिविषयक, ऐतिहासिक ज्ञान उर्फ भाषाशास्त्राचे नियम हे अवगत पाहिजेत. कारण जुन्या लेखांतल्या शब्दांचा सरळ अर्थ लावण्याची पूर्व तयारी या दोन शास्त्रांच्या अभ्यासानें होते. लिखाणें वाचतां जरीं आलीं तरी त्यांत लिहिलेल्या मजकुराची सत्यता तोलून पहाणें अवश्य आहे, म्हणून लिखाणांची उत्पत्ति कशी झाली व ती अस्तित्वांत आणणारावर कितीसा विश्वास ठेवणें योग्य आहे, हें ठरवावयास हवें. हें न ठरविल्यामुळें घोटाळे होतात उदाहरणार्थ रावबहादुर वाड यांनीं जी रोजनिशी प्रसिद्ध केली तींत तिच्या उत्पत्तिसंबंधानें चौकशी करावयास दुर्लक्ष करून तिच्या विश्वसनीयतेसंबंधानें स्वतःस व वाचकांस फसविलें आणि त्यामुळें ते रा. राजवाडे यांच्या प्रखरटीकेस [रा. खं. ८ उ. प. प्रस्तावना ) पात्र झाले.

लिखाणांची सत्यता ठरविण्यास विचारशक्तीस पुराव्याची तपासणी करण्याची तालीम मिळाली असली पाहिजे व पुष्कळशी माहितीहि पाहिजे. कांहीं माहिती सूचक होते. पुष्कळशी माहिती नसली तर आजच्या पुराव्यावरून प्राचीन काळासंबधानें अनेक संभवनीय गोष्टींची कल्पना करून, त्यानंतर त्यांपैकीं प्रत्येकीच्या शक्याशक्यतेविषयीं विचार करतां येतो, तसें करण्यास मुद्दे मनांतच येणार नाहींत. मागें झालेल्या संशोधनासंबंधीं सर्व शोध पुराव्यासकट ठाऊक हवेत. निरनिराळ्या काळीं समाजाच्या शासनसंस्थेंत व चालीरीतींत कसकसे फरक होत गेले, यांची खडान्खडा माहिती हवी, व पूर्वीच्या संशोधनांनीं ज्या लिखाणांवरून आपलीं पुस्तकें लिहिलीं, त्या लिखाणांचे परीक्षण करण्यांतच प्रथम कौशल्य प्राप्त करावयास हवें.

या मानसिक प्रक्रियेंतून इतिहाससंशोधक गेला तरच त्याला खरी अगर बनावट लिखाणें तात्काळ शोधून काढण्याचें काम करतां येईल.

( २ ) अभ्यासकानें संशोधनविषयक उपयुक्त अनुभवाचा संचय झाला आहे त्यांशीं परिचय करून घेतला पाहिजे. पूर्वी या विषयांत परिश्रम होऊन परीक्षणाचे जे सूक्ष्म नियम ठरवून टाकले गेले आहेत व त्यांपासून अवश्यमेव निघणारे निष्कर्षहि नमूद करून ठेवले गेले आहेत, त्यांशीं परिचय असल्याशिवाय कसे चालणार.या नियमसंग्रहास "गतलेखबोधशास्त्र" (डिप्लोमॅटिक्स) म्हणतात. लिखाणें किंवा शिलालेख यांचें वाचन भाषाशास्त्र, म्हणजे प्राचीन भाषेला आधुनिक भाषेचें स्वरूप येईपर्यंत तिचीं होत गेलेलीं स्थित्यंतरें, बक्षिसपत्रें, परवाने, सनदा इत्यादिकांचा अर्थ लावण्याकरितां तयार झालेले लेखबोधशास्त्र, या सर्वांचा इतिहासकारास प्रथम परिचय पाहिजे.

( ३ ) कालमापन विद्या—इतिहासकारास निरनिराळ्या शकांचा इतिहास आणि त्या त्या शकाप्रमाणें तिथिवार काढतां येईल इतकें तरी ज्योतिषाचें ज्ञान असणें अवश्य आहे. यानंतर ( ४ ) वाङ्मयाच्या इतिहासाची माहिती देखील अवश्य आहे. तसेंच ( ५ ) पुराणवस्तुसंशोधन व त्यालाच आनुषंगिक असें ( ६ ) वास्तुसौंदर्यशास्त्र ( ७ ) शिल्पकला, ( ८ ) चित्रकला, ( ९ ) शस्त्रें, ( १० ) पोषाक, ( ११ ) भांडीं, ( १२ ) नाणीं, ( १३ ) पदकें ( १४ ) कुलचिन्हें, यांची कालानुक्रमानें माहिती अवश्य आहे.

परंतु वर सांगितलेल्या सर्व ज्ञानास " सहकारी शास्त्रें " हें नांव बरोबर लागू पडत नाहीं. कारण त्यांत असें एकहि शास्त्र नाहीं कीं जें प्रत्येक इतिहाससंशोधकास सारखेंच उपयोगी पडेल. इतिहाससंशोधकानें आपलें कार्यक्षेत्र रेखलें म्हणजे त्यास वरच्यापैकीं कोणतें ज्ञान आपणांस पूर्णपणें अवगत हवें, कोणतें साधारणपणें ठाऊक हवें व कोणतें पुस्तकांच्या द्वारानें वेळेवर मिळवितां येईल हें ठरविण्यास सोपें जाईल. कोणत्या ज्ञानाची कोठें किती जरूर लागेल यविषयीं ठराविक नियम घालून देतां येणार नाहींत.

तथापि एवढें मात्र निर्विवाद आहे कीं नवशिक्या इतिहाससंशोधकाची बुद्धि सुसंस्कृत असली पाहिजे, व लिखाणांचा अर्थ समजण्यास व त्यांचें सूक्ष्म परीक्षण करण्यास लागणारें ज्ञानहि त्यानें संपादन केलें असलें पाहिजे. इतिहाससंबद्ध विषयांचें अज्ञान त्यास अगदीं अक्षम्य आहे. कारण ज्यांनीं आपलें बरेंच आयुष्य लिखाणें वाचून त्यांचा अर्थ लावण्यांत घालविलें असल्यामुळें, स्वानुभवानें दुसऱ्यास न देतां येण्यासारखें ज्ञान परिश्रमपूर्वक प्राप्त करून घेतलें असतें, त्यांस कोणत्याहि नव्या लिखाणांचा अर्थ इतरांपेक्षां फारच जलद लावतां येत असला तरी देखील त्यांच्या हातून चुका होतातच. कित्येक लोकांच्या दृष्टींतून महत्त्वाचीं लिखाणें वगळलीं जातात. तर कित्येक भाषाशास्त्रज्ञांच्या लाडक्या कल्पना त्यांच्या संशोधनांत शिरतात. म्हणून प्राचीन इतिहाससंशोधकास आपली पूर्व तयारी जितकी करून करावी लागेल तितकी अर्वाचीन इतिहासाच्या अभ्यासकास करावी लागणार नाहीं. अलीकडे संशोधनविषयक त्याच प्रश्नाचा अभ्यास निरनिराळ्या देशांतील तज्ज्ञ पंडित करूं लागल्यामुळें इंग्लिश, जर्मन, इटालियन, व फ्रेंच या प्रमुख भाषांचें ज्ञान मात्र प्रत्येक इतिहाससंशोधकास अवश्यक होत चाललें आहे.

ऐ ति हा सि क ज्ञा ना चें सा मा न्य स्व रू प.—लिखाणें हीं पूर्वी घडलेल्या हकीकतींचे अवशेष आहेत. जुन्या हकीकती दोन प्रकारें जाणतां येतात. त्या घडत असतांना ज्यांनीं त्यांना प्रत्यक्ष पाहिलें असेल त्यांच्या कथनानें, किंवा त्या हकीकतींच्या अवशेषांच्या अभ्यासानें. ऐतिहासिक वृत्तांताचें ज्ञान नेहमीं अप्रत्यक्ष पुराव्यानेंच होत असल्यामुळें, " ऐतिहासिक भूशास्त्र" खेरीज करून इतर भौतिक शास्त्रांत स्वीकारलेली प्रत्यक्ष निरीक्षणात्मक पद्धति इतिहासांत उपयोगी पडत नाहीं.

प्राचीन वृत्तान्तांचीं स्मारकें दोन प्रकारचीं असतात. लेण्याप्रमाणें जुन्या हकीकतींचे वास्तुविषयक अवशेष, व वर्णनांच्या किंवा बखरींच्या रूपांत असलेले लेखात्मक अवशेष, या दोनप्रकारांपैकीं पहिल्या प्रकारच्या अवशेषांवरून ऐतिहासिक सत्य शोधून काढणें कांहीं अंशीं सोपें असतें. कारण जगांतील घडामोडी व कार्यक्रम या विषयींचे नियम ठाऊक असले म्हणजे इमारती वगैरेंचें अस्तित्व प्रयोजन स्पष्ट करतां येतें. परंतु लिखाणामध्यें दिलेल्या माहितीच्या सत्यासत्यतेविषयीं प्रश्न उद्भुत होतो, याशिवाय लिखाणाच्या उत्पादकाच्या मनावर झालेल्या तात्कालिक परिणामांची नोंद तें नसून तें त्या परिणामाचें फक्त व्यंजक चिन्ह असल्यामुळें त्याचा अर्थ लावतांना लेखकाच्या मनाची परिस्थिति व धोरण हीं सर्व उपलब्ध असलेल्या फारच थोडक्या साहित्यापासून काढावीं लागतात, व म्हणून हे सांकेतिक अवशेष ऐतिहासिक सत्य चाळून काढण्यास मूर्त अवशेषापेक्षां बरेच कठीण असतात. या अवशेषाचा व त्यांत उद्दोशिलेल्या ऐतिहासिक वृत्तांचा बिनचुक संबंध ताडण्याकरितां त्यांचा मूळ कर्ता कोणकोणत्या मानसिक परिस्थितींतून गेला होता हें आपल्या कल्पनाशक्तीनें काढून त्यावरून अनुमानाच्या सहाय्यानें मूळ वृत्तान्तापर्यंत उडी घ्यावयास हवी. या प्रकारच्या अडचणीमुळें लिखाणांचा अर्थ लावणें हा इतिहाससंशोधनशास्त्रांतील महत्त्वाचा भाग झाला आहे.

बा ह्य चि कि त्सा व अं त रं ग प री क्ष ण.—एखादा जुना ग्रंथ हातीं घेतला म्हणजे(१) तो निर्माण झाल्यापासून आतांपर्यंत त्याच्या स्वरूपांत काय फरक झाला, व त्यांत बदल झाला असल्यास त्याचें मूळ स्वरूप काय होतें, हें ठरवून त्या पत्रास मूळ स्वरूपांत आणावयास हवें व ( २ ) तो निर्माण कसा झाला हेंहि शोधावयास हवें. या प्रक्रियेस " बाह्य चिकित्सा " म्हणतात. " अंतरंगपरीक्षण " ही बाह्यचिकित्सेच्या पुढची पायरी आहे. लेखाचा कर्ता कोण-

कोणत्या मानसिक परिस्थितींतून खात्रीनें गेला असला पाहिजे हें मानसशास्त्राच्या व्यावहारिक अनुभवानें ठरवावें. शिवाय त्या लेखावरून (१) लिहिणाराचा उद्देश काय होता ? ( २ ) लिहिलेल्या हकीकतीवर त्याचा विश्वास होता काय? आणि ( ३ ) त्यानें ज्या गोष्टींवर विश्वास ठेवला त्यांवर विश्वास ठेवणें त्यास योग्य होतें काय ? या तीन प्रश्नांचीं उत्तरें मिळवावयाचीं, व त्या लिखाणाच्या मूळ लेखकाच्या प्रत्यक्ष ज्ञानाची मीमांसा करावयाची, हें अंतरंग परीक्षणाचें प्रयोजन आहे. लेखकाचें अवलोकन जितकें सूक्ष्म व तंतोतंत असेल त्यावरच त्याचें ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्व अवलंबून राहतें. अंतरंगपरीक्षण करणें म्हणजे एक तऱ्हेनें अन्यावलोकन-मूलक दोष काढून टाकणें होय.

प रा व लं बी अ व लो क ना मु ळें उ त्प न्न हो णा ऱ्या अ ड च णी.—रसायनशास्त्रांतील संशोधकास ज्या प्रमाणें आपल्या विषयांतील चमत्कार प्रत्यक्ष पाहतां येतात त्या प्रमाणें इतिहाससंशोधकास येत नाहींत. ज्या लिखाणांचा उपयोग करावयाचा त्यांचे कर्ते बहुधा सूक्ष्म परीक्षक किंवा निरीक्षक नसल्यामुळें, लेखकाच्या ( १ ) योग्यतेबद्दल ( २ ) परिस्थितीबद्दल व ( ३ ) सत्यप्रेमाबद्दल म्हणजे लेखक अडाणी होता काय, सत्य ज्ञात होण्यास अशक्य अशा कालीं अगर स्थलीं होता काय, आणि सत्य लिहिण्याचा त्याचा उद्देश होता काय याविषयीं यथायोग्य कल्पना बसवून लिखाणांतील ग्राह्य भाग कोणता व त्याज्य कोणता हें इतिहास संशोधकास ठरवावें लागतें. भौतिक शास्त्रांमध्यें पद्धतशीर अवलोकन करून तें काळजीपूर्वक लिहून ठेवलें जात असल्या कारणानें त्यांतील संशोधकांस ज्याप्रमाणें इतर मंडळींच्या सामुग्रीचा प्रत्यक्ष निरीक्षणाऐवजीं उपयोग करितां येतो, त्याप्रमाणें इतिहासकारास करितां येत नाहीं, प्रयोगशाळा झाडणाऱ्या माणसाकडून रसायनसंशोधकास जी माहिती मिळणें शक्य आहे तितकीच व त्याच किंमतीची माहिती इतिहासकारास उपलब्ध लिखाणांपासून मिळते. व याच उकिरड्यांतून त्याला आपलीं रत्नें निवडून काढावीं लागतात म्हणून इतिहाससंशोधकानें लिखाणांतून सत्याची निवड फारच काळजीपूर्वक केली पाहिजे.

चिकित्सकपणा, शंकेखोरपणा व परीक्षणाची सूक्ष्मता या गोष्टी मनुष्यास स्वभावतःच नको असतात. दुसरा जें सांगेल तें ऐकून स्वतःच्या चिकित्सकपणानें त्यास ताडून न पाहतां प्रसंगविशेषीं जाणून किंवा न जाणून त्यास तिखटमीठ लावून, आपणच ती गोष्ट स्वतः प्रत्यक्ष पाहिली आहे असें स्वरूप देऊन तें पसरावयाचें असें अनेक लोक करितात. आपणच स्वतः रोज कर्णोपकर्णी ऐकलेल्या कितीतरी गोष्टींच्या सत्यासत्यतेचा विचार न करितां त्या खऱ्या मानीत नाहीं काय? म्हणून इतिहाससंशोधकानें प्रथम आपल्या मनाची ही विश्वास ठेवण्याची प्रवृत्ति निर्दयपणानें मोडून चिकित्सक झालें पाहिजे. एखादा लेख ज्या व्यक्तीचा म्हणून समजला जातो त्या व्यक्तीचा तो असला तरी जशाचा तसाच तो आपल्या हातीं आला असेल काय, ज्याचा तो लेख म्हटविला जातो त्यानेंच तो लिहिला असेल काय, कीं त्याच्या नांवानें दुसऱ्यानें कोणी दडपून दिला, त्या लेखांत केलेलीं विधानें बरोबर आहेत काय, त्या लेखकास त्या विधानासंबंधीं सत्य माहीत असणें शक्य होतें काय, त्यास सत्य ठाऊक असलें तरी तें सांगण्याची त्याची इच्छा होती काय, पक्षवृत्तीमुळें किंवा आत्महितार्थ तो सांगत आहे काय ? या सर्व गोष्टींचा विचार करून विश्वास ठेवण्याच्या प्रवृत्तीस आळा घातला पाहिजे.

मू ल पा ठ सं शो ध न—लिखाणास आद्यलेखकाच्या प्रत्यक्षावलोकनास नोंदीचें स्वरूप देण्याकरितां प्रथम त्या लिखाणाचें मूलस्वरूप काय होतें हें शोधून काढलें पाहिजे. कालिदास, भवभूति इत्यादि प्राचीन कवींचे ग्रंथ किंवा दुसरें कोणतेंहि जुनें लिखाण घेतलें तर आपणांस असें आढळून येईल कीं हे लेख मूल हस्तलिखित प्रतींच्या नकला करून व या नकलांच्याहि पुढें वारंवार नकला करीत जाऊन आजपावेतों जतन करून ठेवतां आले. जीं लिखाणें शतकेंच्या शतकें निरनिराळ्या नकला करणारांकडून हातोहात लिहिलीं गेलीं त्यांत व लिखाणकर्त्यांच्या मूळ हस्तलिखितांत फरक पडल्यास नवल तें काय ? कारण आज खुद्द लेखकाची हस्तलिखित प्रत उपलब्ध असली तरी देखील तिजवरून छापलेला ग्रंथ तिच्या बरहुकूम कधींच होत नाहीं. म्हणून कोणत्याहि लिखाणाचा उपयोग करून घेण्यापूर्वी, त्याच्या निरनिराळ्या प्रतींचा अभ्यास करून त्याला त्याचें मूलस्वरूप आणून देण्याचा प्रयत्न केला पाहिजे. असें केलें नाहीं तर नकला करणाऱ्यांच्या चुकांमुळें किंवा लबाडीमुळें लिखाणाचा अर्थ-विपर्यास होऊन मूळ लेखकाचा उद्देश आपल्या ध्यानांत येणार नाहीं.

पाठशुद्धीकरितां हातीं घेतलेलें लिखाण आद्यलेखकाची हस्तलिखित प्रतच असली तर मग कांहींच भानगड नसते. अशा वेळीं मूळ लिखाण जसेंच्या तसेंच लिहून काढणें एवढेंच काय तें आपलें काम असतें. परंतु कसलेल्या संशोधकांच्या हातून देखील बिनचूक नक्कल होत नाहीं हें लक्षांत ठेऊन नक्कल करण्याचें काम मोठ्या दक्षतेनें केलें पाहिजे.

मूळ हरवलें असून त्याच्या प्रती उपलब्ध असल्या तर त्यांचें पाठसंशोधन कसें करावें हें पाहण्यापूर्वी पाठांत फरक होण्याचीं कारणें काय असतात याचा विचार करूं. [ अ ] कित्येक नकला करणारे कांहीं स्वार्थमूलक उद्देश साधण्याकरितां लबाडीनें मूळ पाठ बदलतात. [ आ ] पुष्कळ वेळां हे पाठभेद नक्कल करणाऱ्याच्या बुद्धिदोषांमुळें होत असतात. ऐतिहासिक दृष्ट्या शुद्ध पाठ म्हणजे व्याकरणदृष्ट्या शुद्ध पाठ नव्हे. कोणाचींहि पत्रें प्रसिद्ध करतांना संपादकाकडून व्याकरणदृष्ट्या शुद्धिकरण म्हणजे ऐतिहासिक दृष्ट्या अशुद्धिकरण होतें. अर्धवट शिकलेल्या लोकांकडे नक्कल करण्याची पाळी

आली म्हणजे ते अपरिचित दिसणारा पाठ चुकीचा समजून त्याची दुरुस्ती करतात, किंवा एकनाथानें ज्ञानेश्वरीसंबंधांत केलें त्याप्रमाणें कांहीं लेखक जुन्या लेखांस प्रचलित भाषेचें स्वरूप देण्याकरितां त्यांचे मूळ पाठ बिघडवितात. [इ]कधीं कधीं मूळ बिनचुक न वाचल्यामुळें किंवा न ऐकल्यामुळें आकस्मिक चुका घडून येतात. यांपैकीं लबाडीनें व बुद्धिदोषानें झालेले पाठभेद दुरुस्त करणें व कित्येक वेळां तर शोधून काढणें देखील फार कठिण असतें. ओळीच्या ओळीच गळाल्या असल्या तर ती आकस्मिक चूक सुधारणें देखील आटोक्याबाहेरचें असतें. परंतु आकस्मिक चुकांची साधारण उदाहरणें म्हटलीं म्हणजे अर्थाचा, शब्दाचा किंवा अक्षराचा घोंटाळा होणें, मागचे शब्द पुढें किंवा मागचीं अक्षरें पुढें लिहिलीं जाणें, अक्षरांची किंवा शब्दांची द्विरुक्ति होणें, जो शब्द दोनदां लिहावयाचा तो एकदांच लिहिणें, विरामाच्या चुका करणें, हीं किंवा असल्याच प्रकारचीं दुसरीं असतात. या चुका दुरुस्त करण्याकरितां त्या त्या भाषांचें व लिपींचें ज्ञान, आणि अर्थांत, अक्षरांत, व शब्दांत कसकसे घोंटाळे होतात व त्याचप्रमाणें विशिष्ट काळांतील विशिष्ट वर्गाचे लेखक प्रती तयार करतांना कोणकोणत्या चुका करीत असत या गोष्टी अवगत असल्या पाहिजेत. आज "आपण मेल्याशिवाय स्वर्ग दिसत नाहीं" अशी स्थिति आहे. कांकीं, भारतीय पाठसंशोधकांनीं आपले अनुभव लिहून ठेवले नाहींत व तद्विषयक ज्ञानसंचय झाला नाहीं. लिखाणांची पाठशुद्धि करीत असतांना दुसरी एक गोष्ट लक्षांत ठेवावी कीं, कधीं कधीं ज्यांचा सहज अर्थ लागू शकतो अशा पाठांविषयीं देखील आपणांस शंका येते किंवा लिखाणांतील दुर्बोध पाठांच्या ऐवजीं एखादा धाडसाचा पाठ घालण्याचा मोह होतो; म्हणून प्रत्येक वेळीं मूळांतील पाठ नमूद करण्यास कधींहि विसरूं नये.

मूळ हस्तलिखित हरवलें असून त्याच्या अनेक परस्परभिन्न प्रती उपलब्ध असल्यास त्यांवरून लिखाण कसें तयार करावयाचें तें पाहूं. अशा स्थितींत जी प्रत प्रथम हातीं लागेल तिच्या अनुरोधानें चालणें तर वाईटच, परंतु सर्वांत जुन्या प्रतीला विश्वसनीय मानणें देखील तितकेंच अविचाराचें आहे हें विसरतां कामा नये. कारण जुनी प्रत मूळ हस्तलिखित हरवल्यामुळें त्याच्या नकलेवरून केली असून नवी प्रत मात्र तें सांपडल्यामुळें खास त्यावरूनच केली नसेल कशावरून? त्याचप्रमाणें सर्व उपलब्ध प्रतींची योग्यता सारखीच नसल्याकारणानें, अधिक प्रतींत सांपडणारा पाठ खरा मानणें देखील सर्वथैव चुकीचें आहे. उपलब्ध असलेल्या वीस प्रतींपैकीं एकोणवीस जर बाकी राहिलेल्या विसाव्या प्रतीवरूनच उतरविलेल्या असल्या तर त्या एकोणवीसहि प्रतींस ऐतिहासिक दृष्ट्या कांहींच महत्त्व नाहीं. म्हणून स्वतंत्र प्रती शोधून काढण्याकरितां सारख्या चुका कोणत्या प्रतींत झाल्या आहेत हें पहावें. या सर्व प्रती तशाच चुका असणाऱ्या दुसऱ्या एका प्रतीवरून केलेल्या असल्या पाहिजेत; यास्तव संशोधकानें ती अनेक प्रतींस मूळ झालेली नकलेची प्रत ठेऊन तिजवरून केलेल्या सर्व प्रती टाकून द्याव्यात. अशा प्रकारें छाननी केल्यावर आपल्याजवळ मूळ हस्तलिखिताच्या प्रती किंवा हरवलेल्या प्रतींवरून तयार केलेल्या दुय्यम प्रकारच्या प्रतीच शिल्लक राहतील. या दुय्यम प्रकारच्या प्रतींपैकीं कोणत्या एकाच वर्गांतील आहेत हें ठरविण्याकरितां पुन्हां आपणांस चुकांची तुलना करण्याच्या पद्धतीचाच अवलंब केला पाहिजे. या रीतीनें सर्व प्रतींचा वंशवृक्ष तयार केला असतां आपणांस त्यांचें सापेक्ष महत्त्व कळून येईल, व निरनिराळ्या वर्गांतील प्रतींच्या पाठांची तुलना करून मूळ पाठ काढतां येईल. त्यांच्या पाठांमध्यें फरक असल्यास त्यांपैकीं कोणता चांगला हें विचार करून ठरवावें, व त्या सर्वांवरून एखादा विचित्रच पाठ निघत असला तर तेथें कोणता पाठ जमतो हें अंदाजानें काढून तो घालावा. मूळ हस्तलिखितावरून केलेल्या जितक्या स्वतंत्र प्रती उपलब्ध असतील तितकें हें काम बरेंच कठीण असल्यामुळें त्यांत चुका होण्याचा पुष्कळ संभव असतो. म्हणून पाठसंशोधकानें निरनिराळ्या प्रकारचे सर्व पाठ आपल्या टिपणांत देत जावे, म्हणजे एखाद्या वेळीं वाचकांकडून चुकीची दुरुस्ती होऊं शकते.

अशा प्रकारच्या पाठशोधनानें प्रत्येक ठिकाणीं उत्कृष्ट पाठ मिळाला नाहीं तरी अपभ्रष्ट पाठ निराळे काढून लिखाणांतील कोणता भाग संशयास्पद आहे हें ठरवितां येतें. या योगानें नवीन अशी कांहींच माहिती मिळवितां येणार नाहीं हें उघड आहे. मूळ हस्तलिखित सुरक्षित असल्यास या खटाटोपाची गरजच पडणार नाहीं. परंतु तें उपलब्ध नसल्यास मात्र याशिवाय दुसरा तरणोपाय नसतो.

पाठविषयक संशोधनाकडे आपल्या देशांत पद्धतशीर लक्ष लागण्यास सुरूवात अलीकडेच झाली आहे. हस्तलिखितांचा शोध करून मूळ पाठ शोधण्याकडे होणारा आपल्याकडील मोठा प्रयत्न म्हणजे महाभारतासंबंधानें होय. पाठसंशोधनासंबंधानें कार्य काय झालें आहे हें महत्त्वाच्या ग्रंथावर जेव्हां लेख येतील तेव्हां त्यांत स्पष्ट केलेलें असेल.

क र्तृ त्व सं शो ध न.—लिखाणाचें आद्य स्वरूप समजल्यानंतर त्याचें अंतरंगपरीक्षण ही पुढची पायरी होय. लिखाणांतील हकीकत कितपत विश्वसनीय आहे हें ठरविण्याकरितां, त्यांतील वृत्तांत (१) लेखकाच्या आयुष्यांतच घडला होता किंवा नाहीं, (२) त्याचें वसतिस्थान जेथें ती गोष्ट घडली त्या स्थळांपासून फार लांब तर नव्हतें, व (३) लेखकास त्या गोष्टीचें निरीक्षण करण्यास कांहीं अडचणी तर नव्हत्या ना; या तीन गोष्टींसंबंधीं माहिती असणें अवश्य आहे. यावरून हें स्पष्ट होतें कीं लिखाणाचा कर्ता ठाऊक नसल्यास तें अगदीं निरुपयोगी होईल. म्हणून

पाठशोधनानंतर लिखाणाच्या कर्त्याचा, स्थळाचा व काळाचा शोध केला पाहिजे. जुन्या लिखाणांवर पुष्कळ वेळां कर्त्याचें नांव दिलेलें नसतें, किंवा असलें तरी तें खरें असण्याचा संभव नसतो.कारण टाकाऊ पुस्तकास महत्त्व आणण्याकरितां त्यावर प्रसिद्ध ग्रंथकाराचें नांव घालतात. आपल्या अनेक स्मृतींची कथा याच प्रकारची आहे. एखाद्या व्यक्तीची कीर्ति वाढविण्यासाठीं उत्तम ग्रंथ तिच्या नांवानें प्रसिद्ध करणें, या व यासारख्याच दुसऱ्या कित्येक उद्देशानें प्रेरित होऊन खऱ्या लेखकाशिवाय दुसऱ्या कोणाचें तरी नांव लिखाणावर घातलेलें असतें. म्हणून लिखाणावर कर्त्याचें नांव असो किंवा नसो तत्संबंधीं शंका येण्यास जागा असल्यास त्याचा वास्तविक लेखक कोण होता हें अगोदर निश्चित केलें पाहिजे.

परंतु ज्या लिखाणांचे कर्ते खात्रीपूर्वक ठाऊक असतील त्यांविषयींहि शंका काढून कर्तृत्वशोधनपद्धतीचा दुरुपयोग कसा करावा हें कर्तृत्वशोधनानें कळत नसून त्या योगानें खोटी माहिती देऊन फसविणारे अविश्वसनीय लेखक काय ते निवडून काढतां येतात. पाठशोधनाप्रमाणेंच कर्तृत्वशोधन हें इतिहासकाराचें मुख्य कार्य नसून ती त्याची ध्येयसंपादनाची प्रथम पायरी व अवश्य साधन मात्र आहे.

**कर्तृत्वसंशोधनाचें एक उदाहरण.**—‘ ज्योतिर्विदाभरण ’ नामक पुस्तकाचा कर्ता कालिदास नामक ज्योतिषी आपल्या पुस्तकाच्या २२ व्या अध्यायांत आपण विक्रमाचे समकालीन आहों व विक्रमाच्या नऊ रत्नांतील कविकुलशिरोमणि कालिदास ते आपणच असें दाखविण्याचा प्रयत्न करितो. (अध्याय २२ श्लोक, ८, ९, १२, १३, १७, १९, २०, हा ग्रंथ कलियुग संवत् ३०६८ ( वि. सं २४) मध्यें रचिला. ( अध्याय २२, श्लोक २१ ) असें या ग्रंथांत म्हटलें आहे. परंतु शालिवाहन शकांतून ४४५ वजा करून बाकीस ६० नें भागिलें कीं अयनांश निघतात. असें यांत म्हटलें असल्यामुळें त्यानें दिलेला काल चूक ठरतो. ( १९ । १८ ) ऐंद्रयोगाचा तिसरा अंश गत असतां रविचंद्र क्रांतिसाम्य होतें असें यांत आहे. यावरून त्याचा काल सुमारें इ. स. १२४२ ठरतो, ( शं. बा. दीक्षितकृत भारतीय ज्योतिः शास्त्र पा. ४७६ ) [ प्राचीन लिपिमाला पान १६९ ( द्वितीयावृत्ति ) ] असें काढलें आहे.

**कालशोधन.**—ग्रंथकर्त्याचा निश्चय करण्याकरितां लिखाणांतील मजकुराचें पृथःकरण करून ( १ ) त्यांतील अक्षर, ( २ ) शब्दांचीं रूपें, व सरकारी कागद असल्यास ( ३ ) मायन्याची पद्धति, कोणत्या काळांतील आहे हें पहावें. ह्यांत वर्णन केलेल्या कांहीं गोष्टींचा काळ कर्त्याच्या हातीं न पडलेल्या लिखाणांवरून आपणांस समजला असल्यास ( ४ ) कर्त्यानें आपल्या लिखाणांत उल्लेखिलेल्या गोष्टींपैकीं सर्वांत अलीकडची गोष्ट कोणती आहे व ( ५ ) तिच्यानंतर लागलीच घडलेल्या कोणत्या गोष्टीचा त्यानें उल्लेख करावयास हवा असून तो केला नाहीं, हें पाहून आपणांस तें लिखाण केव्हां लिहिलें गेलें हें स्थूलमानानें काढतां येईल.

लिखाणांतील मतांचें काळजीपूर्वक परिक्षण केलें असतां कर्त्याचा स्वभाव, परिस्थिति, समाजांतील दर्जा इत्यादि गोष्टींसंबंधीं अनुमान बांधतां येईल. कित्येक वेळां ज्यांचे लेखक आपणांस माहीत आहेत अशा लिखाणांतील वाक्यांची परीक्षणास घेतलेल्या लिखाणांतील वाक्यांशीं तुलना केली असतां बनावट लिखाण तात्काळ ओळखून काढतां येतें. व या परीक्षित लिखाणांमध्यें आलेल्या आपल्या लिखाणांतील अवतरणांवरून, तत्संबंधीं व त्याच्या कर्त्यासंबंधीं उल्लेखांवरून व कधीं कधीं तर अशा उल्लेखाच्या अभावावरून आपलीं अनुमानें बरोबर आहेत किंवा नाहीं हें ठरवितां येतें.

**कर्तृत्वशोधनांत उत्तरकालीन क्षेपांचें अवगमन.**—कित्येक वेळां असें घडून येतें कीं, लिखाणांतील वाक्यांच्या अर्थपूर्णतेकरितां, किंवा त्याच्या भाषेस सौंदर्य आणण्यासाठीं किंवा विशिष्ट भागावर जोर देण्यास्तव, इतरांकडून मुळामध्यें कांहीं नवीन भाग घालण्यांत येतो, तर कधीं कधीं पुराणांसारख्या कांहीं लिखाणांतील हकीकत निरनिराळ्या कर्त्यांकडून पुढें चालविण्यांत येते. अशा ठिकाणीं या प्रक्षिप्त भागांचें व जोड पुरवण्यांचें कर्तृत्व मूळ लिखाणाच्या कर्त्यावरच न लादण्याची खबरदारी घेतली पाहिजे. लिखाणांतील मूळपाठ शोधून काढीत असतांनाच यांपैकीं बरेचसे प्रक्षिप्त भाग व जोड पुरवण्या उघडकीस येतात. पण उपलब्ध असलेल्या सर्व प्रती एखाद्या प्रक्षेपित प्रतीवरूनच केल्या असल्या तर मात्र, लिखाणामध्यें अथपासून इतिपावेतों भाषासादृश्य, विचारसादृश्य, आणि परस्परविरोधी विधानांचा व असंबद्ध कल्पनांचा अभाव, या गोष्टी आहेत किंवा नाहींत याचा शोध करून प्रक्षिप्त भाग निवडून काढले पाहिजेत.

**कर्तृत्व आणि चौर्य यांचें पृथक्करण.**—एखाद्या लिखाणाचा कर्ता, स्थळ व काळ यांसंबंधीं माहिती मिळविली म्हणजे कर्तृत्वविषयक सर्व शोध पूर्ण होत नाहीं. प्राचीनकाळच्या ग्रंथकर्त्यांनां मूळ पुस्तकाचा नामनिर्देशहि न करितां दुसऱ्याच्या ग्रंथांतील माहिती चोरून घेऊन आपल्या लेखांत देण्याची संवय होती म्हणून लिखाणाच्या कर्त्यानें कोणकोणत्या पुस्तकाचा उपयोग केला होता हें याच ठिकाणीं निश्चित करणें अवश्य आहे. कारण ‘ अ ’ व ‘ ब ’ या दोन लिखाणांत ‘ क ’ तून कांहीं माहिती घेतली असल्यास या तीनहि लिखाणांतील विधानांचा कर्ता एकच असल्यामुळें तदंतर्गत विधानें तीन ठिकाणीं सांपडलीं एवढ्याच कारणावरून विश्वसनीय मानलीं तर तें साफ चुकीचें होईल. याकरितां एकाच गोष्टीचीं दोन लिखाणांतील वर्णनें जशींच्या तशींच व सारख्याच भाषेंत असलीं तर, त्यांपैकीं एकांतील

वर्णन दुसऱ्यांतून घेतलेलें, किंवा त्या दोहोंतीलहि वर्णनें तिसऱ्याच एखाद्या लिखाणांतून घेतलेलीं असलीं पाहिजेत असें समजावें. एका लेखकाच्या नेहमीं होणाऱ्या चुका दुसऱ्याच्या लेखनांत आढळून आल्यास त्या दोघांपैकीं कोणीं कोणाची चोरी केली हें देखील सहज काढतां येतें.

तथापि हें काम नेहमींच दिसतें तितकें सोपें मात्र नसतें. समजा 'अ' लिखाणांत 'ब' मधून माहिती घेतली असून 'क' मध्यें पहिल्या दोन्हीहि लिखाणांचा उपयोग केलेला आहे. तीन किंवा अधिक लिखाणांची याप्रमाणें गुंतागुंत झाली असते तेव्हां मूळ माहिती कोणत्या लिखाणांतील होती हें ठरविणें बरेंच कठिण जातें. परंतु बहुतेक सर्व लिखाणें उपलब्ध असल्यास, काळजीपूर्वक परीक्षणानें उपलब्ध नसलेल्या लिखाणांतील मजकुराचें अनुमान ज्यांतील माहिती अनुपलब्ध लिखाणांवरून घेतली असेल, त्या उपलब्ध लिखाणांवरून काढून आपणांस त्या सर्वांची एक वंशावळ तयार करितां येते. उदाहरणार्थ 'ल्यूक व म्याथ्यू' यांची शुभवर्तमानांत एका अज्ञात ग्रंथावरून मजकूर घेतला आहे हें त्या ग्रंथांची आज चिकित्सा करतां त्याचें स्वरूप सहज समजण्याजोगें आहे.

अशा रीतीनें कर्तृत्वसंशोधन करीत असतां, जीं लिखाणें उपलब्ध असलेल्या दुसऱ्या एखाद्या लिखाणावरून लिहिलेलीं असतात, त्यांची योग्यता मूळ लिखाणाइतकीच किंबहुना थोडी कमीच असल्यामुळें त्यांनां बाजूस सारतां येतें, व ज्यांनीं मूळामध्यें काल्पनिक तपशीलाची भर घातली असेल तीं अगदींच अविश्वनीय म्हणून टाकून देतां येतात. लिखाणांचें वर सांगितल्याप्रमाणें संशोधन करून व त्यांत घेतलेलीं दुसऱ्या लेखांतील अवतरणें मोठ्या अक्षरांत देऊन जर कोणी तीं लिखाणें छापवून काढील तर त्यांचा इतिहासकारास बराच उपयोग होईल.

उपलब्ध सामुग्रीचें वर्गीकरण करण्याची पद्धति.–उपलब्ध असलेलीं सर्व लिखाणें गोळा करून त्यांचें मूलपाठसंशोधन व कर्तृत्वसंशोधन संपविल्यावर त्यावरून इतिहास रचण्यापूर्वी त्याचें पद्धतशीर वर्गीकरण केल्याशिवाय आपणांस थोड्या श्रमांत उत्तम काम करितां येणार नाहीं. ऐतिहासिक साधनांचें वर्गीकरण करण्याच्या आज पावेतों उपयोगांत आणलेल्या निरनिराळ्या पद्धती म्हटल्या म्हणजेः—(१) लिखाणें वांचून काढीत असतांना केवळ स्मरणशक्तीवर भरंवसा ठेवून टिपणें वगैरे कांहीं न घेतां मागाहून इतिहास लिहून काढावयाचा. चांगली स्मरणशक्ति असलेल्या विद्वानांच्या हातून देखील या पद्धतीनें केलेल्या कामांत अनेक चुका रहातात असा अनुभव असल्यामुळें तिचा संशोधकानें अवलंब करूं नये, (२) लिखाणें वाचीत असतांनां स्मरणवहींत एका मागून एक टिपणें घेत जावयाची ही दुसरी पद्धति आहे. परंतु या स्मरणवहींतून कोणत्याहि एका विषयासंबंधीं माहिती गोळा करावयाची झाल्यास प्रत्येक वेळीं सर्व वही वाचून काढावी लागत असल्याकारणानें या पद्धतीनें वेळेचा बराच अपव्यय होतो. (३) प्रत्येक विषयाकरितां आपल्या स्मरणवहींत वेगवेगळें खातें उघडून, वाचतांनां ज्या त्या विषयासंबंधीं ज्याच्या त्याच्या खात्यांत लिहावयाची ही तिसरी पद्धति कांहीं अंशीं बरी आहे. पण याप्रमाणें होत गेलेल्या प्रत्येक लिखाणांतील नोंदींचा क्रम आपणांस हवा तसा असणार नाहीं, व एकदां केलेलें वर्गीकरण निराळ्याच रीतीनें करावयाचें झाल्यास फार त्रास पडेल. (४) या सर्वांपेक्षां उत्तम पद्धति म्हटली "चिठ्ठीपद्धति" होय. चिठ्ठीपद्धति म्हणजे प्रत्येक लिखाणाचीं टिप्पणें वेगवेगळ्या कागदाच्या तुकड्यावर लिहून त्यावर त्याच्या मूळासंबंधीं संपूर्ण माहिती द्यावयाची ही होय. या योगानें एका विषयासंबंधीं सर्व माहिती एकेठिकाणीं आणतां येते. व मागाहून मिळालेली माहिती योग्य ठिकाणीं अंतर्भूत करितां येते इतकेंच नव्हे, तर उपलब्ध लिखाणांचें निरनिराळ्या रीतीनें वर्गीकरण करणें सुलभ होतें किंवा एकदां केलेलें वर्गीकरण बदलावयाचें असल्यास फारसा त्रास पडत नाहीं. जेव्हां एकच लिखाण अनेक दृष्टीनें महत्त्वाचें असल्यामुळें निरनिराळ्या वर्गांत जाऊं शकतें तेव्हां त्यांतील माहिती अलग चिठ्ठ्यांवर लिहून प्रत्येक वर्गांत घालतां येते. अशा प्रकारच्या प्रत्येक चिठ्ठीवर मूळासंबंधीं तोच तोच तपशील लिहावा लागत असल्यामुळें आरंभीं काम थोडेंसें वाढेल खरें; परंतु त्या योगें पुढें बरीच सोय व्हावयाची असल्याकारणानें हा त्रास सोसला पाहिजे. या पद्धतींतील दुसरा दोष म्हटला म्हणजे लिहिलेल्या चिठ्ठ्यांपैकीं एखादी चिठ्ठी हरवल्यास बराच घोंटाळा होण्याचा संभव असतो. परंतु तो टाळण्याकरितां सर्व चिठ्ठ्या जाड कागदाच्या व सारख्या करून वर्गीकरण झाल्याबरोबर त्या मुद्दाम तयार केलेल्या लिफाफ्यांत किंवा खणांत आवरून ठेवल्या म्हणजे झाले. वर्गीकरणाचें हें काम अगदीं क्षुल्लक दिसतें तरी तें व्यवस्थेशीर रीतीनें करण्याची संवय ठेवल्यास तिचा इतिहासरचनेच्या कामावर बराच चांगला परिणाम होऊं शकतो.

वर्गीकरणतत्त्वान्वेषण, प्राचीन लेखसंग्रह.—आतां पावेतों सांगितल्याप्रमाणें उपलब्ध लिखाणांचें संशोधन करून त्यांचा एके ठिकाणीं संग्रह केला तर तो इतिहासरचनेच्या कामास फार उपयोगी पडेल. अशा प्रकारच्या प्राचीन लेखसंग्रहामध्यें कालानुक्रमानें सर्व लिखाणें लाऊन ठेवणें हा उत्तम पक्ष आहे. परंतु कित्येक वेळां लिखाणांवर त्यांचा काळ दिलेला नसतो, किंवा तत्संबंधीं नीट शोधहि लागत नाहीं. अशा वेळीं, ताम्रपट, शिलालेख इ. एके ठिकाणचीं लिखाणें परस्परावर प्रकाश पाडण्यास फार उपयोगी पडत असल्यामुळें तीं स्थलानुक्रमानें लाऊन ठेवावीं. उपरोक्त दोन्हींपैकीं एकाहि रीतीनें लिखाणें लाऊन ठेवतां येत नसल्यास तीं त्याच्या आद्याक्षरांच्या वर्णानुक्रमानें लाऊन

ठेविली पाहिजेत. पोवाडे, आख्यानें व यांसारख्याच दुसऱ्या लिखाणांकरितां ही योजना उपयोगी पडते. लिखाणांची विषयवार वर्गवारी प्राचीनलेखसंग्रहासारख्या पुस्तकांमध्यें कधींहि सोयीची होत नाहीं. कारण तिच्याविषयीं कांहीं ठराविक नियम घालून देणें शक्य नसल्यामुळें अमुक एक लिखाण कोणत्या वर्गांत घालावें हें निश्चित ठरवितां येत नाहीं, व त्यामुळें वर्गवारीची ही पद्धति ज्या ग्रंथामध्यें स्वीकारलेली असते, त्यामध्यें विशिष्ट लिखाण शोधून काढण्यास फार त्रास पडेल. याशिवाय एकच लिखाण निरनिराळ्या वर्गांत जाऊं शकत असल्याकारणानें त्याची अनेकवेळां पुनरावृत्ति होण्याचाहि संभव असतो. म्हणून आरंभीं दिलेल्या तिहींपैकीं कोणत्या तरी एका रीतीनें लिखाणें लाऊन शेवटीं निरनिराळ्या प्रकारचीं सूचिपत्रें जोडावीं म्हणजे झालें. अशा रीतीनें ग्रंथ तयार झाला म्हणजे त्यावरून ( होळकरासंबंधीं लिखाणें, मुसलमानांच्या कारकीर्दीतील माळव्याचीं लिखाणें, मराठ्यांची जमाबंदी पद्धति, इत्यादि ) वाटेल त्या प्रकारानें लिखाणाचें वर्गीकरण करून इष्ट विषयासंबंधीं माहिती प्रसिद्ध करितां येईल.

लिखाणांची विषयवार रचना प्राचीनलेखसंग्रहास जरी अगदीं निरुपयोगी असली, तरी विशिष्ट विषयावर लेख लिहूं इच्छिणाऱ्या माणसास तिच्याहून अधिक सोयीची व उपयुक्त अशी कोणतीहि वर्गीकरणपद्धति नाहीं. हिचें स्वरूप लेखकानें निवडलेल्या विषयावर व तत्संबंधीं त्यानें तयार केलेल्या योजनेवरच सर्वस्वी अवलंबून असल्यामुळें तिच्यासंबंधीं कांहीं ठराविक असे सामान्य नियम घालून देतां येत नाहींत. तथापि प्रत्येक इतिहाससंशोधकानें वर्गीकरण करीत असतांना आपल्या चिट्ठीवर शक्य असेल तेथें लिखाणाच्या काळाचा उल्लेख करणें व प्रत्येक चिठ्ठीस कांहीं तरी ठराविक मथळा योजणें अवश्य आहे, आणि त्याचप्रमाणें सर्व मूळ लिखाणांची यादी करून निरनिराळ्या प्रकारच्या सूची तयार करण्याचीहि त्यानें संवय ठेविली पाहिजे, हे नियम मात्र सर्वांस सारखेच लागू पडतील.

**बाह्यांगचिकित्सा व इतिहाससंशोधन.**— मूल पाठ संशोधन, कर्तृत्वशोधन, लेखसंग्रहण व वर्गीकरण या निरनिराळ्या क्रियांचा बाह्यांगचिकित्सेंत समावेश होतो. बाह्यांगचिकित्सा केल्याशिवाय लिखाणांवरून ' इतिहास ' लिहिणेंच शक्य नाहीं, परंतु बाह्यांगचिकित्सा हें कांहीं इतिहासकारांचें ध्येय नसून त्यांचें खरें काय यापुढेंच आहे उपरिनिर्दिष्ट संशोधन करून बाह्यांगचिकित्सकांनीं प्राचीन लेखसंग्रह अगोदरच करून ठेवला असला तर या गोष्टी पुन्हां करण्याची कांहींच आवश्यकता नाहीं. लिखाणाचा अर्थ लाऊन कर्त्यानें दिलेली हकीकत कितपत विश्वसनीय व यथार्थ आहे हें काढण्याकरितां करावें लागणारें मानसिक परीक्षणच इतिहासकाराचें मुख्य काम आहे. मूळ लेख तपासल्याशिवाय खरा इतिहास लिहितां येत नाहीं. या म्हणण्यांत जरी कांहीं तथ्य असलें तरी बाह्यांग चिकित्सेंत सर्व बाह्यांगचिकित्सेंतील सर्व क्रिया आमूलांत स्वतःकरून जर कोणी इतिहास लिहूं म्हणेल तर त्याजकडून तें काम नव्याण्णव हिश्यांनीं शेवटास जाणार नाहीं म्हणून समजावें. म्हणून इतिहासशास्त्रांत श्रमविभागणी होऊन बाह्यपरीक्षणाचें काम बाह्यांगचिकित्सकांनीं, व अंतःपरीक्षण करून इतिहासरचनेचें काम इतिहासकारांनीं आपल्याकडे घेतलें पाहिजे.

परंतु येथें एक गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे कीं, बाह्यचिकित्सेचें काम केवळ इतिहासरचनेकरितांच करावयाचें असल्यामुळें, बाह्यांगचिकित्सक व इतिहासकार यांनीं आपसांत सहकारित्व ठेऊन, पहिल्यानें आपल्या मेहनतीचा दुसऱ्यास चांगल्या रीतीनें उपयोग करून घेतां येईल अशा रीतीनें काम केलें पाहिजे, व दुसऱ्यानें पहिल्याच्या परिश्रमाचा पूर्ण उपयोग करून घेण्यांत हयगय न केली पाहिजे; दोन्हींहि कामें एकानेंच करण्यांत तत्त्वतः जरी कांहीं हरकत नसली तरी, बाह्यांगचिकित्सकानें इतिहासरचनेचें काम केलें तर तें चांगलें साधतें असें कांहीं नसल्यामुळें अशा रीतीनें श्रमविभागणी केल्यापासुन कांहीं तंटा होत नाहीं. उलटपक्षीं तसें करणें व्यवहारात फार सोयीचें पडतें; कारण बाह्यांगचिकित्सेस लागणारी मेहनत हातीं घेतलेल्या विषयाच्या प्रमाणांत केव्हांच नसते, व त्यामुळें इष्ट विषयावर लिहावयास लागणारीं ऐतिहासीक साधनें अगदीं वाईट स्थितींत असलीं तर मनुष्यास आपल्या अल्प वयोमर्यादेंत तें काम शेवटास नेतां येत नाहीं. शिवाय बाह्यचिकित्सेचें काम एकदां करूं लागलें म्हणजे कांहीं मंडळींस त्यांतच गोडी लागते, व मग ते पुढच्या भानगडींत पडत नाहींत. इतिहासरचनेच्या भानगडींत न पडतां बाह्यांगचिकित्सकांनीं आपलें सर्वस्व बाह्यचिकित्सेसच वाहून घेतलें तर त्यापासूनच फार फायदा होईल. एकाच प्रकारचें काम पुष्कळ दिवस करीत राहिल्यानें मनुष्यास त्या कामांत बरेंच कौशल्य प्राप्त होतें. मूलपाठसंशोधनाचें काम ज्यानें कित्येक दिवसपर्यंत केलें आहे त्यास शुद्ध पाठ आपोआप सुचूं लागतात, व प्राचीन लेखसंग्रहाच्या कामास वाहिलेल्या लोकांस त्यांचें काम जितकें अल्पावकाशांत व चांगल्या रीतीनें करितां येईल तितकें एखाद्या त्रयस्थ माणसास करितां येणार नाहीं. फार तर काय बाह्यचिकित्सेच्या कामांतच आणखी श्रम विभागणी होऊन त्यांतील निरनिराळ्या भागांत निरनिराळ्या विद्वानांनीं नैपुण्य संपादन करणें अवश्य आहे. कारण इतिहासाची रूपरेखा एकदां आंखली गेल्यावर त्यामध्यें जी प्रगति व्हावयाची ती तपशीलाची अधिकाधीक सूक्ष्म माहिती मिळवूनच होणें शक्य आहे, व हें काम विशेष व्यासंगी माणसांशिवाय इतरांकडून होणें शक्य नाहीं. परंतु विद्वानांनीं विशेष व्यासंगच ठेवण्याचें महत्त्वाचें कारण म्हटलें म्हणजे माणसांतील रुचिवैचित्र्य होय. मनुष्याच्या प्रवृत्ती एखाद्या विषयाच्या अध्ययनाच्या प्रतिकूल असल्यास त्याला आपल्या

अभ्यासांत अपयश हें ठरलेलेंच. याकरितांच मनुष्यानें आपल्या आवडीनावडीप्रमाणें विषयाची निवड करावी म्हणजे त्याच्या हातून काम चांगलें होईल.

आतां आपण बाह्यांगचिकित्सकाच्या अंगीं कोणते गुण असले पाहिजेत याचा विचार करूं. बाह्यांगचिकित्सक होऊं इच्छिणारास प्रथमतः त्या कामाची आवड असली पाहिजे हें उघड आहे. कुशाग्र बुद्धीच्या माणसास बाह्यांगचिकित्सेचें हमाली काम आवडत नसलें तरी, मनुष्यास निसर्गतःच असलेल्या संग्रह करण्याच्या व कोडीं सोडविण्याच्या आवडींचा विकास होण्यास या कामांत पूर्ण अवकाश असल्यामुळें, अलौकिक बुद्धीचे थोडे लोक खेरीज करून बहुधां प्रत्येकास अभ्यासानें हें काम आवडूं लागतें. चंचल बुद्धीच्या माणसापासून दीर्घोद्योगी माणसापर्यंत प्रत्येकास बाह्यचिकित्सेंत आपल्या योग्यतेप्रमाणें कोडीं सांपडून, आत्मपरिश्रमानें लावलेल्या शोधामुळें होणारा आनंद कोणालाहि अनुभवितां येत असल्या कारणानें एकदां मनुष्य या कामांत पडला कीं त्यास त्याची गोडी लागूं लागते. साधारणतः असें होतें कीं अंतःपरीक्षण, इतिहासरचना इत्यादि कठीण कामें करण्यास लागणारी अलौकिक बुद्धि नसली, परंतु इतिहासविषयक अभ्यास करण्याची तर इच्छा असली, म्हणजे मनुष्य बाह्यचिकित्सेचें यांत्रिक काम हातीं घेतो. पण उत्तम बाह्यांगचिकित्सक होण्याकरितां केवळ आवड असूनच काम भागत नाहीं. कारण कांहीं माणसांस आपलें मन एकाग्र करितां येत नसल्यामुळें ज्या गोष्टींचें त्यांना स्मरण नसतें त्या ते कल्पनाशक्तीनें भरून काढण्याचा प्रयत्न करीत असतां अनेक चुका करितात. व त्यामुळें आवश्यक बुद्धिमत्ता, शिक्षण व आवड असूनहि ते या कामास नालायक ठरतात. बुद्धीच्या समतोलपणाबरोबरच धिम्मेपणा हाहि गुण बाह्यांगचिकित्सकांत असला पाहिजे. नाहींतर घाईमुळें त्याच्या शोधांत अनेक चुका राहून दुसऱ्या कोणास ते फिरून तपासून पाहण्याचे परिश्रम करावे लागतील. वर सांगितलेल्या गुणांशिवाय, निश्चय, दीर्घोद्योग, पूर्वग्रहाभाव, दूरदर्शीपणा, व्यवस्थितपणा व यथार्थ अनुमानें काढतां येण्याजोगी कल्पनाशक्ति हे गुण ज्या प्रमाणात त्याच्या अंगीं असतील त्याच प्रमाणांत त्याला आपल्या उद्योगांत यश येईल.

बा ह्य चि कि त्स का च्या अं गीं ये णा रे दु र्गु ण.—बाह्य चिकित्सेच्या कामांत पडलेल्या माणसामध्यें मुख्यतः तीन दुर्गुण शिरण्याचा संभव असतो. ( १ ) बाह्य चिकित्सकास चुका न होऊं देण्याबद्दल जी खबरदारी घ्यावी लागते तिचा परिणाम पुढें असा होतो कीं, एवढी काळजी घेऊन देखील आपल्या कामांत चुका राहिल्याचें त्याला मागाहून आढळून आलें म्हणजे त्याच्या मनास धक्का बसतो व तो आपल्या कामांत इतकी फाजील दक्षता घेऊं लागतो कीं, पुढें पुढें त्याच्या हातून जवळ जवळ कांहींच काम होत नाहीं. (२) संवयीनें बाह्य चिकित्सकाचा स्वभाव इतका संशयी होऊं लागतो कीं, मग त्याला जेथें शंका घ्यावयास नको तेथें देखील शंका येऊं लागते. पाठसंशोधनकार्याच्या प्रगतीबरोबरच या दुर्गुणाचाहि विकास होण्याचा पुष्कळ संभव असतो. कारण लवकरच असा काळ येईल कीं, जेव्हां जुनीं सर्व लिखाणें तपासून झाल्यामुळें पाठसंशोधनाचें काम संपुष्टांत येईल; पण हे पाठसंशोधक त्या वेळीं देखील आपली लेखणी खालीं न ठेवतां शुद्ध पाठांवरच आपली कुऱ्हाड चालवून पाहूं लागतील. ( ३ ) या कामामुळें मनुष्याच्या अंगीं येणारा तिसरा दोष म्हटला म्हणजे कामाच्या गोडीमुळें लिखाणाच्या उपयुक्ततेचा विचार देखील न करतां तो त्याच्या संशोधनांत त्याच्या उपयुक्ततेच्या प्रमाणाबाहेर काळाचा व वेळेचा अपव्यय करूं लागतो. कोणत्या लिखाणाचा केव्हां कसा उपयोग होईल, हें अगोदर निश्चित करतां येत नाहीं, ही गोष्ट जरी खरी असली तरी बाह्यांगपरीक्षकाचें काम केवळ इतिहासाकरितांच असल्यामुळें त्यानें आज इतिहासकारांना कोणत्या लिखाणांची आवश्यकता आहे, याचा नीट विचार करूनच आपलें काम केलें पाहिजे. आपल्या अंतिम ध्येयावर लक्ष ठेवून जर संशोधक आपलें काम करतील तर आज प्रत्येक शास्त्रांत हल्लींपेक्षां किती तरी अधिक काम होत जाईल. हा दोष घालविण्याकरितां अवश्य असलेली इतिहासकोविदांची अद्यापपर्यंत चांगलीशी संघटना पाश्चात्य देशांतहि झालेली नाहीं.

एकमेकांचें दोषाविष्करण करीत असतांना तीव्र भाषा वापरून बाह्यांगचिकित्सक आपला मत्सरीपणा प्रगट करतात, असा त्यावर आणखी एक आरोप आहे; परंतु येथें हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, सौम्य किंवा कडक भाषा वापरणें हें केवळ मनुष्यस्वभावावरच अवलंबून असून तो बाह्यचिकित्सेचें काम केल्यामुळें उत्पन्न होणारा दोष आहे,असें बिलकूल म्हणतां येत नाहीं. शिवाय बहुतेक बाह्यचिकित्सकांच्या वादविवादांत कडक भाषा वापरली जात असते. याचें कारण ते एकमेकांचा मत्सर करतात हें नसून, केवळ सत्याच्या चाडीमुळेंच ते तसें करण्यास प्रवृत्त होतात. याचा परिणामहि इष्ट तोच झाला आहे व आतां काळजीपूर्वक अभ्यास न करतां चुकीचें विधान प्रसिद्ध करण्यास कोणीहि सहसा धजत नाहीं.

लि खा णां चा अ र्थ ला व ण्या चें प्र यो ज न व पृथ क्क र ण प द्ध ति.—लेखकांनीं आपली माहिती कसकशी मिळविली व लिखाणांतील शब्द त्यांनीं कोणत्या अर्थी वापरले हें आपणांस ठाऊक नसल्यामुळें संशोधित लिखाणांतील कांहींहि माहिती स्वीकारण्यापूर्वी अंतःपरीक्षण नांवाच्या दुसऱ्याच एका क्रियेतून आपणांस जावें लागतें. एखाद्या गोष्टीचें निरीक्षण झाल्यापासून ती लिखाणांत नमूद केली जाईपर्यंत कर्त्याच्या ज्या ज्या कांहीं मानसिक क्रिया झाल्या असतील त्यांचा अभ्यास करून लिखाणांतील विधानांची

यथार्थता निश्चित करणें हें अंतःपरीक्षणाचें काम आहे. याकरितां (१) प्रथमतः लिखाणांतील मजकुरांचें पृथक्करण करून लेखकाच्या मनांत लिखाणांत कोणत्या गोष्टी व्यक्त करावयाच्या होत्या हें ठरविलें पाहिजे व नंतर (२) लिखाणाच्या परिस्थितीचें पृथक्करण करून त्यांतील विधानें कितपत यथार्थ आहेत हें शोधून काढलें पाहिजे. लेखकाच्या मताप्रमाणें होणारा लिखाणाचा अर्थ काढण्यापूर्वीच त्यांतील विधानांच्या सत्यासत्यतेचा विचार करणें केव्हांहि इष्ट होणार नाहीं आणि तो अर्थ काढणें सोपें नाहीं. कारण लेख जुन्या काळचा असला म्हणजे त्या वेळच्या व हल्लींच्या भाषेंत,विचारांत फरक पडला असल्याकारणानें लेखकाच्या मनांतील अर्थ आपल्या अर्थापेक्षां पुष्कळ अंशीं भिन्न असण्याचा संभव असतो जेव्हां एखाद्या शब्दापासून किंवा वाक्यापासून अनेक अर्थ निघूं शकतात, तेव्हां तर अर्वाचीन लेखांच्या बाबतींत देखील कित्येक वेळां कर्त्याच्या मनांतील अर्थ ठरविणें तितकेंच कठीण होतें. शिवाय मनुष्य थोडा जरी बेसावध राहिला कीं, त्याला आपले स्वतःचेच विचार त्या लेखांत दिसूं लागतात व मग तो पुढचा मागचा संदर्भ न पाहतां इष्ट तेवढेच शब्द किंवा वाक्यें घेऊन लेखाचा भलताच अर्थ करितो.

यासाठीं इतिहासरचनेकरितां लिखाणांतील कोणती माहिती घ्यावयाची हें ठरविण्यापूर्वी त्या लिखाणाचा अर्थच नीट समजून घेतला पाहिजे म्हणून प्रत्येक लिखाणांत व्यक्त केलेल्या लेखकाच्या सर्व कल्पना कागदावर अशा रीतीनें लिहून काढाव्या कीं, त्यांवरून सर्व लिखाणाचा मतलब ध्यानांत येऊन लेखकाचा उद्देश व मतेंहि समजूं शकतील. एखाद्या वेळीं लिखाणांतील पृथःकृत सर्व कल्पना चिठ्ठीवर न लिहितां त्यांपैकीं अवश्य तेवढेच मुद्दे फक्त घेतले तरी चालतें; परंतु आपल्याच विचाराचें प्रतिबिंब आपणांस लिखाणांत दिसूं नये म्हणून अगोदर सर्व लिखाणाचें निदान मनांत तरी पृथक्करण करून मग त्यांतील निवडक मुद्दे चिठ्ठीवर लिहावे;

**शब्दार्थ निश्चय करून लिखाणांचा शब्दशः अर्थ लावणें.**—प्रत्यासत्तिन्याय, लिखाणांतील कल्पनांचें पृथक्करण करतांना आधीं त्यांतील वाक्यांचा शब्दशः अर्थ काय होतो तें पाहून नंतर त्यांच्या खऱ्या अर्थाकडे वळावें. (१) भाषेंत नेहमीं एकसारखा बदल होत असल्यामुळें त्याच शब्दाचा निरनिराळ्या काळीं निरनिराळा अर्थ होतो, म्हणून लिखाणांतील प्रत्येक शब्दास व्यवहारांतील ठराविक अर्थ देणें कधींहि युक्त होणार नाहीं.उदाहरणार्थ, "कल्पना" या शब्दाचा संस्कृतमध्यें अर्थ योजना व कृति असा आहे; पण मराठींत समजूत आणि प्रसंगीं असत्य समजूत असाहि आहे. विशिष्ट काळामध्यें एखाद्या शब्दाचा किंवा वाक्प्रचाराचा काय अर्थ होत होता, हें काढण्याकरितां ज्या वाक्यांत तो शब्द किंवा वाक्प्रचार वापरला असेल तीं सर्व गोळा करावीं म्हणजे त्यांत निदान एक तरी वाक्य असें आढळून येईल कीं, ज्यांत मागच्या पुढच्या संदर्भावरून त्या शब्दाचा किंवा वाक्प्रचाराचा अर्थ अगदीं उघड होईल. लिखाण मृत भाषेंत लिहिलेलें असल्यास त्यांतील भाषासौंदर्याकरितां किंवा विशिष्ट अर्थी योजलेले शब्द ओळखून काढण्याविषयीं खबरदारी घेतली पाहिजे. (२) याशिवाय स्थलभेदाप्रमाणेंहि भाषेंत बदल होत असल्यामुळें त्या त्या देशाच्या भाषेचें ज्ञान करून घेणें अवश्य आहे. निरनिराळ्या ग्रंथकारांनीं (३) एकच शब्द निरनिराळ्या अर्थी वापरला असतो, इतकेंच नव्हे तर (४) एकाच ग्रंथकाराच्या पुस्तकांत देखील त्याच शब्दाचा भिन्न भिन्न अर्थी उपयोग केलेला असतो, म्हणून प्रत्येक ग्रंथकर्त्याच्या भाषेशीं परिचय करून घेतला पाहिजे व मागचापुढचा संदर्भ पाहूनच प्रत्येक शब्दाचा अर्थ ठरविला पाहिजे. व्यवहारांत जुन्या लिखाणांतील सर्वच शब्दांचा वर सांगितलेल्या रीतीनें अर्थ ठरवावा लागत नाहीं. कारण ज्यांच्या अर्थात बदल होऊं शकत नाहीं असे भाषेंत कित्येक शब्द असतात आणि वाक्प्रचारांतील घटक शब्दांचा अर्थ कालांतरानें बदलला तरी त्यांच्या स्वतःच्या अर्थांत फेरफार होत नाहीं. म्हणून ज्यांचें अर्थांतर होऊं शकतें असे जे सामाजिक वर्ग, संस्था, चालरीति आणि रोजच्या व्यवहारांतील वस्तु यांचे वाचक शब्द तेच फक्त विशिष्ट देशांत, विशिष्ट काळीं, विशिष्ट ग्रंथकारांच्या लेखनांत, कोणत्या अर्थी वापरले जात होते, हें काढलें म्हणजे झालें.

**सत्यार्थान्वेषण (लेखकाभिप्रीयग्रहण).**—वर सांगितल्याप्रमाणें लिखाणांचा शब्दशः अर्थ लावला तरी लेखकाच्या मनांतील विचारांचा आपणांस बोध होत नाहीं. भाषेमध्यें व्याजोक्ति, अन्योक्ति, ध्वनि, लक्षणा, इत्यादि अनेक अलंकारांचा उपयोग केला जात असल्याकारणानें मूलार्थ दुर्बोध करणाऱ्या या सर्व कवचीं फोडून खरा अर्थ काढावा लागतो. सरकारी कागदपत्र, सनदा, ऐतिहासिक गोष्टी व दुसरीं जीं जीं कांहीं लिखाणें मुख्यतः लोकांनां समजण्याकरितांच लिहिलेलीं असतात त्यांमध्यें असले अलंकार घालून लेखक स्वतःस दुर्बोध करून घेणार नाहीं. परंतु इतिहाससंशोधकास ज्या सामुग्रीचा उपयोग करून घ्यावयाचा असतो तींत, खासगी पत्रें, धार्मिक ग्रंथ इत्यादि मर्म जाणणाऱ्या विशिष्ट व्यक्तींकरितांच लिहिलेल्या लिखाणांचा पुष्कळसा भरणा असल्यामुळें असल्या कागदपत्रांत ज्या ज्या ठिकाणीं शब्दशः अर्थ बरोबर जुळत नाहीं त्या त्या ठिकाणीं कांहीं तरी अलंकारिक उपयोग आहे असें समजावें. लिखाणांतील शब्दांचे अर्थ काढण्याकरितां स्वीकारलेल्या पद्धतीचेंच येथेंहि अवलंबन करावें, व त्याच प्रकारचीं निरनिराळीं वाक्यें गोळा करून त्यांपैकीं एखाद्या वाक्यांत केवळ संदर्भावरून त्या अलंकाराचा अर्थ स्पष्ट होत असल्यास पहावें. परंतु अशा रीतीनें झालेली अर्थ

निष्पत्ति निश्चित स्वरूपाची नसल्यामुळें या अनुमित अर्थावरून कोणतेहि सिद्धांत काढूं नयेत.

लिखाणांतील प्रत्येक विधानाचें यथार्थत्व तपासण्याचें प्रयोजन.—लेखकार्थबोध झाला म्हणजे ऐतिहासिक गोष्टींचें वास्तविक ज्ञान होत नसून, त्या योगें फक्त लेखकाच्या मनांत त्या गोष्टी वाचकांस कोणत्या स्वरूपांत दाखवावयाच्या होत्या एवढेंच काय तें कळतें. कारण स्वार्थ साधण्याच्या उद्देशानें किंवा कांहीं अन्य परीस्थितीमुळें निरीक्षणानें एखाद्या लेखकास जें ज्ञान प्राप्त झालें असेल तेंच लिखाणांत व्यक्त न करितां त्यानें लबाडी करून त्यास कांहीं निराळेंच स्वरूप दिलें असेल; किंवा त्याची निरीक्षण पद्धतीच सदोष असल्यामुळें त्याच्या निरक्षिणांत चुका राहून त्यास वास्तविक गोष्टीचा यथार्थ बोधच झाला नसेल शिवाय उपरोक्त परिस्थितींचा एका लिखाणांतील सर्वच विधानावर सारखाच परिणाम होणें संभवनीय नसल्यामुळें व तसेंच सर्वच निरीक्षणांत त्याच चुका होणेंहि तितकेंच असंभवनीय असल्याकारणानें, लेखकांचे किंवा लिखाणांचें विश्वसनीय व अश्वसनीय असे दोन वर्ग न करितां किंवा बाह्यांग परीक्षणांत अस्सल म्हणून ठरलेल्या लिखाणांतील सर्वच विधानें खरीं न मानतां, लिखाणांतील प्रत्येक विधानाची यथार्थता तपासून पाहिली पाहिजे.

परस्परविरोधी विधानें जुन्या कागदपत्रांत पदोपदीं आढळून येत असल्यामुळें उपरिनिर्दिष्ट परीक्षणाची आवश्यकता कोणासहि सहज दिसून येईल. पण मनुष्य स्वभावतःच इतका श्रद्धाळू असतो कीं केवळ भाषेच्या शैलीमुळें एखाद्या लिखाणावर त्याचा पूर्ण विश्वास बसतो, किंवा एखाद्या गोष्टीचा बारिक सारिक तपशील दिला असला म्हणजे तसलीं विधानें काल्पनिक असणें असंभवनीय आहे असें त्यास वाटूं लागतें. परंतु उत्तम वक्ते, सुप्रसिद्ध नट, किंवा ज्यांचा जन्मच खोटें बोलण्यांत गेला; अशा माणसांच्या खोट्या गोष्टी खऱ्याप्रमाणें वर्णन करण्यांत हातखंडा असतो, व बारिक सारिक तपशील कल्पनेनें लिहितां येणें शक्य नसलें तरी एका गोष्टीचा तपशील दुसरीला लावणें अगदीं सोपें असतें; म्हणून अशा स्थितींत देखील लिखाणांच्या प्रत्येक वाक्यांतील विधानांचें पृथक्करण करून त्यांतील प्रत्येकास आपल्या तत्त्वीनकपप्रावाच्या कसोटीस लाऊन पाहण्याचें काम संशोधकानें टाळणें त्यास अगदीं अक्षम्य होईल. त्यासाठीं प्रत्येक विधानाच्या यथार्थतेविषयीं कांहीं पुरावा मिळाल्याशिवाय तें विश्वसनीय मानावयाचेंच नाहीं अशी त्यानें आपल्या मनाची प्रवृत्ति ठेवावी. नवशिक्या संशोधकास या सर्व क्रिया पृथक पृथक कराव्या लागणार असल्यामुळें आरंभीं आरंभीं त्याचें काम फार सावकाश होईल; पण एकदां संवय झाली म्हणजे पृथक्करणाच्या व परीक्षणाच्या क्रिया एकसमयावच्छेदें करून होऊं लागतील इतकेंच नव्हेतर, लिखाणाची भाषा दुर्बोध नसल्यास या दोन्हीहि क्रिया लेखकार्थ ग्रहणाबरोबरच करितां येतील.

लेखकाच्या निरीक्षण निवेदनांतील सत्यालापाचें संशोधन.—वर सांगितलेंच आहे कीं वास्तविक गोष्टींचा बोध होण्याकरितां ( १ ) लेखकानें स्वतःस निरीक्षणानें जें ज्ञान प्राप्त झालें होतें, तें जसेंच्या तसेंच लिखाणांत व्यक्त केलें किंवा नाहीं, आणि ( २ ) लेखकांस वास्तविक गोष्टींचें यथार्थ ज्ञानच झालें होतें किंवा नाहीं, या दोन गोष्टी आपणांस निश्चित केल्या पाहिजेत. कर्तृत्व शोधन करीत असतां, लेखकाच्या परिस्थितींविषयीं व त्याच्या स्वभावाविषयीं जी कांहीं माहिती आपणांस मिळाली असेल तींत अभ्यासानें तत्संबंधीं आणखी माहितीची व मनुष्य स्वभावाच्या सामान्य ज्ञानाची भर घालून, तिच्या मदतीनें (१) प्रस्तुत लेखांत लबाडी करण्यास लेखकांस कांहीं प्रयोजन होतें काय हें अगोदर पहावें, व मग ( २ ) प्रत्येक विधान घेऊन त्यामध्यें लेखकाकडून वस्तुविपर्यास करून दाखविण्यास लेखक ज्या कारणामुळें प्रवृत्त होतो तीं पुढें दिलीं आहेत.

( १ ) ज्या गोष्टीमध्यें लेखकाचे हितसंबंध गुंतलेले असतात, तत्संबंधीं विधानांत वस्तुविपर्यास केला जाण्याचा संभवअसतो. अशीं विधानें निवडून काढतांना खुद्द लेखकाच्याआवडी व ध्येयें शोधून त्याला स्वतःला कोणत्या गोष्टींत आपले हितसंबंध असल्याचें वाटत होतें हें ठरविलें पाहिजे. एखाद्या गोष्टींत लेखकाचें व्यक्तिविषयक हित नसलें तरी, तो आपल्या इष्टमित्रांकरितां देखील खोटें लिहिण्यास प्रवृत्त होईल हेंहि येथें विसरतां कामा नये. ( २ ) जेव्हां लेखकांस आपला लेख चालत आलेल्या रूढीप्रमाणें किंवा ठराविक नियमांस धरून लिहावा लागतो, तेव्हां आनुषंगिक गोष्टीसंबंधानें खोटीं विधानें केलीं जाण्याचा संभव असतो. असल्या प्रकारचा वस्तुविपर्यास सरकारी अहवालांत नेहमीं दृष्टोत्पत्तीस येतो. ( ३ ) राष्ट्रें, पक्ष, संस्था, कुटुंबें व माणसें इत्यादिकांविषयीं प्रत्येक लेखकाचे कांहींना कांहीं तरी अनुकूल किंवा प्रतिकूल ग्रह झालेले असतात व त्यामुळें त्याचीं तत्संबंधीं विधानें कधीं कधीं तर त्याला न कळत देखील पूर्वग्रहानें दूषित होतात. ( ४ ) केवळ प्रौढी मिरविण्याकरितां देखील लेखकाच्या हातून खोटीं विधानें होतात, व म्हणून लेखकांस कोणत्या गोष्टींत प्रौढी वाटत होती हें शोधून काढावें. आपण आहोंत त्यापेक्षां मोठें दिसावें ही इच्छा मात्र मनुष्यमात्रांत असल्यामुळें, लेखकानें ज्यांत स्वतःची किंवा इष्टमित्रांची फाजिल बढाई केली असेल त्या विधानांवर विश्वास ठेऊं नये. ( ५ ) शिष्टाचारादि कित्येक गोष्टी मनुष्य समाजास संतुष्ट ठेवण्याकरितां किंवा त्याचें मन न दुखविण्याकरितांच करीत असल्याकारणानें, लेखकानें कोणत्या समाजाकरितां तो लेख लिहिला होता व त्या समाजाचे शिष्टाचार व नीति-

विषयक मतें काय होतीं हें ठरविलें म्हणजे लिखाणांतील शिष्टाचारमूलक व त्यासारख्या अन्य विधानांनीं आपली फसवणूक होणार नाहीं. (६) बहुतेक लेखक लोकरंजनाच्या हेतूनें प्रेरित होऊन, भाषेस सौष्ठव आणण्याकरितां वस्तुविपर्यास करीत असल्याकारणानें, नांवाजलेल्या लेखकाच्या किंवा उत्तम भाषेंत लिहिलेल्या लेखावर विश्वास ठेवण्याची प्रवृत्ति सोडून नाटकी किंवा हृदयंगम वर्णनें अविश्वसनीय समजलीं पाहिजेत. हा दोष दप्तरी लेखांत बहुधा आढळून येत नाहीं; परंतु इतिहासकारांचे लेख बहुशः वाङ्मयस्वरूपीच असल्याकारणानें इतर वाङ्मयात्मक ग्रंथांप्रमाणें ते देखील या दोषापासून सुटलेले नसतात. या दोषाचें स्वरूप लेखकाच्या व तत्कालीन समाजाच्या रुचीवर अवलंबून असल्यामुळें त्यांचा अभ्यास करणें अवश्य असतें.

लेखकाच्या निरीक्षणजन्य ज्ञानाच्या यथार्थतेविषयीं चिकित्सा.—यापुढें दुसरें काम म्हटलें म्हणजे प्रत्येक विधानाच्या बाबतींत लेखकाचें निरीक्षण बरोबर होऊन त्यास स्वतःसच वर्णित गोष्टीचें यथार्थ ज्ञान झालें होतें किंवा नाहीं हें लेखकासंबंधीं व लिखाणांसंबंधीं आपणांस असलेल्या माहितीवरून निश्चित करावयाचें हें आहे. या ठिकाणींहि पूर्वीप्रमाणेंच अगोदर लिखाणांसंबंधीं समुच्चयात्मक विचार करून, नंतर प्रत्येक विधानाचें यथार्थत्व तपासलें पाहिजे, या परिस्थितीमध्यें लेखकाकडून निरीक्षणाच्या कामांत कशा चुका होऊं शकतात हें पाहूं.

(१) प्रत्यक्ष निरीक्षणावांचून लिहिलेली कोणतीहि माहिती विश्वसनीय समजावयाची नाहीं हा एक सर्वसामान्य नियम प्रत्येक संशोधकानें लक्षांत ठेवला पाहिजे. परंतु कित्येक वेळां बाह्य परिस्थिति निरीक्षणास अनुकूल असूनहि दृष्टिभ्रम, चुका व पूर्वग्रह यासारख्या अंतःस्थकारणांमुळें लेखकाचें निरीक्षण सदोष राहतें, म्हणून पहिले दोन दोष लेखकाच्या प्रत्येक निरीक्षणांत आढळून येतात काय याचा शोध करावा, व त्याचप्रमाणें त्याचे कोणकोणत्या गोष्टींसंबंधीं कसे कसे पूर्वग्रह झाले होते हें निश्चित करावें. याशिवाय उत्तराचें स्वरूप बहुशः प्रश्नावरूनच ठरत असल्याकारणानें लिखाणांतील माहिती एखाद्या प्रश्नाच्या जबाबादाखल लिहिलेली असल्यास, लेखकानें कोणत्या प्रश्नाचें उत्तर म्हणून ती माहिती लिहिली होती,व त्या प्रश्नानें त्याच्या मनांत कोणत्या भावना उत्पन्न झाल्या होत्या याचा देखील विचार करावा.(२) लेखकाची परिस्थितीच यथार्थ निरीक्षणास अनुकूल नसली तर तशा स्थितींत झालेल्या निरीक्षणामध्यें अनेक चुका राहण्याचा संभव असल्यामुळें, जेथून नीट दिसूं शकेल अशा ठिकाणीं तो होता किंवा नाहीं, अन्य कार्यांत गुंतल्याकारणानें त्याच्या निरीक्षणांत व्यत्यय तर येत नव्हता ना, निरीक्षण करावयाच्या गोष्टीविषयीं लेखकास गोडी नसल्यानें त्याचें दुर्लक्ष झालें होतें काय, निरीक्षणीय गोष्टी समजण्याइतका अनुभव किंवा बुद्धि त्यांत होती किंवा नाहीं, निरनिराळ्या निरीक्षित गोष्टींत त्यानें घोटाळा तर केला नाहींना, व सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे निरीक्षण झाल्याबरोबर त्यानें त्याचें टांचण केलें किंवा नाहीं, या सर्व बाबींचा नीट विचार केला पाहिजे. (३) प्रत्यक्ष निरीक्षण करतां येणें शक्य असूनहि आळसानें किंवा निष्काळजीपणानें, केवळ पूर्वज्ञात कार्यक्रमावरूनच कित्येक वेळां लेखकांकडून सभावर्गेरेंचा अहवाल कल्पनेनें लिहिला जात असल्याकारणानें, अगदींच ठराविक पद्धतीप्रमाणें व ठराविक भाषेंत लिहिलेले लेख अविश्वसनीय समजावे. (४) खासगी गोष्टीसंबंधीं माहिती, निरीक्षणजन्य असूं शकत नसल्यामुळें ती विश्वसनीय नसते. त्याचप्रमाणें चालीरीतींचें, मनुष्यस्वभावाचें, महायुद्धाचें किंवा यासारखें दुसरें कोणतेंहि समुच्चयात्मक वर्णन घेतलें तरी तें फार झालें तर निरनिराळ्या निरीक्षणजन्य माहितीवरून सिद्धांत काढूनच केलेलें असावयाचें; याकरितां अशावेळीं लेखकाजवळ सिद्धांत काढण्यास पुरेशी सामुग्री होती किंवा नाहीं, व त्याला उपलब्ध सामुग्रीवरून यथार्थ सिद्धांत काढतां येत होते किंवा नाहीं या दोन गोष्टींचा शोध केला पाहिजे.

उसन्या विधानांची ग्राह्याग्राह्य चिकित्सा.—एखाद्या विधानांतील माहिती लेखकानें स्वतःच्या निरीक्षणावरून लिहिली नसल्यास, ज्यानें आत्मनिरीक्षणानें ती प्रथम प्रसिद्ध केली असेल त्याचें निरीक्षण दोषरहित होतें किंवा नव्हतें, व त्यापासून प्रस्तुत लेखकापर्यंत ती ज्या ज्या मध्यस्थांच्या द्वारांनीं आली त्यांनीं तिच्या स्वरूपांत बदल करण्याचा संभव होता काय, हें ठरविलें पाहिजे. परंतु लिखाणांच्या अभावामुळें व्यवहारांत इतिहाससंशोधकांस मूळ निरीक्षकापर्यंत क्वचितच पोहोंचतां येत असल्या कारणानें, अनेक विधानें निनांवींच राहतात, व म्हणून अशा वेळीं असलें निनांवी विधान ज्या काळांत केलें गेलें असेल त्या काळांत तद्विधानांतर्गत गोष्टींच्या निरीक्षणांत चुका होत असत काय, व तत्कालीन तसलीं विधानें पूर्वग्रहानें दूषित होण्याचा संभव होता काय हें पाहण्याशिवाय अधिक असें कांहींच करतां येत नाहीं. या निनांवी विधानांचा बराच मोठा भाग परंपरागत गोष्टींनीं भरलेला असतो. या गोष्टी लेखनाच्या द्वारानें पिढ्यानुपिढ्या चालत येतात, किंवा केवळ आख्यायिकादि दंतकथांच्या रूपानेंच अस्तित्वांत असतात.

यांपैकीं दंतकथास्वरूपी परंपरागत विधानें तत्कालीन लोकांत तसलीं विधानें लिहून ठेवण्याची रीत होती किंवा नाहीं याच्या परीक्षणानें ओळखून काढून, तीं अविश्वसनीय म्हणून टाकून दिलीं पाहिजेत. कारण कोणत्याहि माहितीची विश्वसनीयता ती मूळ निरीक्षकाचें निरीक्षण जितकें तंतोतंत व्यक्त करीत असेल त्यावरच अवलंबून असते. परंतु दंतकथांतील माहिती कित्येक मध्यस्थांच्या द्वारांनीं चालत आली असल्यामुळें तींत पुष्कळ बदल झाला असण्याचा

संभव असतो, व मध्यस्थविषयक आपल्या अज्ञानामुळें त्या फेरफाराचें स्वरूप निश्चित करण्यास आपणांजवळ साधन नसतें. या दंतकथांपासून ऐतिहासिक गोष्टींचा बोध होत नसला तरी तत्कालीन लोकांच्या कल्पनांचें ज्ञान त्यांवरून आपणांस होऊं शकतें.

जी परंपरागत विधानें लेखनद्वारा आलेलीं असतात तीं मूळास कितपत धरून आहेत हें पाहिलें म्हणजे त्यांची विश्वसनीयता ठरवितां येते. मूळ उपलब्ध असल्यास याचा शोध कर्तृत्वसंशोधनांतच लागतो. परंतु तें गहाळ झालें असेल तेव्हां लेखकांस विशिष्ट विधानांतील माहिती असणें शक्य होतें काय, आणि त्याला मूळांत बदल करण्याची खोड होती काय, व असल्यास तो कोणत्या प्रकारचा फेरफार करीत असे याचा शोध केला पाहिजे. एखादें विधान भाषादृष्टीनें एकंदर लिखाणांशीं विसंगत असल्यामुळें जितकें मूळावरून जसेंच्या तसेंच घेतलेलें दिसेल तितकी त्याची विश्वसनीयता अधिक समजावी.

परंतु विश्वसनीयता तपासतांनां प्रत्येक पुराव्यांतील दोष पाहून सर्व व पुरावा बाजूला वगळणें हेंच इतिहासचिकित्सकांचें प्रधान कर्तव्य नाहीं. तर असत्यांतूनहि सत्य काढून माहितीच्या अभावानें अंकित असलेलें क्षेत्र माहितीनें युक्त करणें हे त्याचें प्रधान कर्तव्य आहे, नाहींतर प्रत्येक पुराव्यांतील सदोषता दाखवून तो पुरावा वगळण्यास उपदेशिणें अगदीं सोपें आहे, हें इतिहास चिकित्सकानें लक्षांत ठेवलें पाहिजे. पुष्कळ वेळां लिखाणांतील अनेक विधानांच्या मूळ निरीक्षकांच्या स्थलकालपरिस्थितीचा कांहींच पत्ता लागत नाहीं. असलीं विधानें भौतिकशास्त्रज्ञ कवडीमोल समजून टाकून देत असले तरी इतिहासकारास त्यांचा उपयोग करून घेतां येतो. कारण इतिहासाच्या वाचकांची जिज्ञासा ढोबळ ढोबळ गोष्टींनींच तृप्त होऊं शकत असल्यामुळें सूक्ष्म गोष्टींच्यां ज्ञानास आवश्यक असणारे निरीक्षणविषयक कडक नियम निरीक्षकानें पाळले नसले तरी त्याच्या निरीक्षणनिवेदनावरून उपरोक्त ठळक ठळक गोष्टींचा बोध सहज होऊं शकतो. म्हणून निनांवी विधानांपैकीं देखील जीं चुकीचीं किंवा असत्य असण्याचा संभव नसतो तीं इतिहासकारास आपल्या उपयोगासाठीं निवडून घेतां येतात. या सदरांत कोणतीं विधानें येऊं शकतात याचें दिग्दर्शन खालीं केलें आहे. (१) पुढें दिलेल्या तीन प्रकारच्या विधानाच्या बाबतींत वस्तुविपर्यास करून लेखकाचा कांहीं फायदा होत नसल्यामुळें, किंवा तसें केलें असतां लबाडी उघडकीस येऊं शकत असल्यामुळें तीं खोटीं असण्याचा संभव नसतो. [अ] एखादें विधान, लेखकाचीं मतें, हितसंबंध, वृथाभिमान व वाङ्मयविषयक अभिरुचि यांनां प्रतिकूल असल्यास त्यांत लबाडी असणें संभवनीय नसतें. परंतु या ठिकाणीं लेखकाच्या हितसंबंधादि गोष्टींविषयीं आपल्या स्वतःवरून अनुमान काढल्यास आपले सिद्धांत सदोष राहण्याची भीति असते. [ब] जिच्या सत्यासत्यतेची चौकशी तत्कालीन लोकांकडून केली जाण्याचा संभव असून जिची शहानिशा त्यांना सहज करून घेतां आली असती अशा माहितीसंबंधीं असत्य विधान करण्यास लबाडी उघडकीस येण्याच्या भीतीनें लेखक सहसा प्रवृत्त होणार नाहीं. परंतु या भीतीचा आपल्या वाचकवर्गास ओळखणाऱ्या सुसंस्कृत आत्मसंयमी माणसावर जितका परिणाम होतो, तितका असंस्कृत मनाच्या विकारवश माणसावर होत नाहीं हें लक्षांत ठेवलें पाहिजे. [ई] वर्णित गोष्ट लेखकाच्या दृष्टीनें बिनमहत्त्वाची असते तेव्हां तत्संबंधीं असत्य विधान करण्याचा त्याला मोह होण्यास कांहींच कारण नसतें. अगदीं काल्पनिक कथा लिहिणाऱ्या लेखकास सुद्धां आपलें कथानक कांहीं वास्तविक गोष्टींच्या चौकटींत बसवूनच तयार करावें लागतें. त्या गोष्टी लेखकास व त्याच्या वाचकवर्गास परिचित असल्यामुळें महत्त्वाच्या नसल्या तरी, आपणांस त्यांपासून उपयुक्त माहिती गोळा करितां येते. ( २ ) जी गोष्ट बराच काळ अस्तित्वांत असते, जी अनेक माणसांच्या निदर्शनास येऊं शकते, व जिचें वरवर पाहणाऱ्याच्यांहि सहज ध्यानांत येण्याइतकें स्थूलवर्णन दिलें असतें अशा ढळढळीत दिसणऱ्या गोष्टीसंबंधीं माहितींत चुका होणें शक्य नसतें. ( ३ ) ज्या गोष्टींत लेखकाचा विश्वास नसतो, ज्या त्याला दुर्बोध असतात किंवा ज्या त्याच्या मताविरुद्ध असतात त्या लिहिणें भाग झाल्याशिवाय तो लिहिणार नाहीं.

सूक्ष्म परीक्षणाच्या पूर्वोक्त विविध क्रियांचा व्यवहारांत संक्षेपतः उपयोग करण्याची रीति.—आतां आपण येथपर्यंत वर्णन केलेल्या विविध क्रियाचा व्यवहारांत उपयोग करण्याची संक्षिप्त पद्धति काय आहे तें पाहूं. प्रथमतः बाह्यपरीक्षण करीत असतांनाच लेखक व लिखाण यासंबंधीं शक्य तितकी माहिती गोळा करावी, व आतांच सांगितलेल्या रीतीनें तिच्या सत्यासत्यतेच्या कसोट्या मनांत आणून ती मनांत नीट बिंबवून ठेवावी. यानंतर लिखाण परीक्षणार्थ हातीं घ्यावें. त्याची भाषा दुर्बोध असल्यास प्रथम तें लेखकार्यावबोध करून घेण्यासाठीं वाचून नंतर मग तदंतर्गत विधानांचें सत्यान्वेषण करण्याकरितां त्याचें परीक्षण करावें. परंतु लिखाणाचा अर्थ सुगम असला तर पहिल्याच वाचनांत त्यांतील विधानांचें परीक्षण करून, त्यांतील फक्त वादग्रस्त वाक्येंच मागून अभ्यास करण्यास्तव वेगळीं काढून ठेवावीं. या परीक्षणांत लिखाणांतील प्रत्येक विधान घेऊन, लेखक व लिखाण याविषयीं मिळविलेल्या आपल्या पूर्व माहितीवरून चुका व लबाडी होण्याच्या पूर्वोक्त कारणांच्या अनुरोधानें त्याची यथार्थता निश्चित करावी.

अशा रीतीनें आपणांस उपलब्ध लिखाणांपासून पूर्वकालीन कित्येक वास्तविक गोष्टी व कल्पना हातीं लागतील, व त्यांपैकीं प्रत्येक कितपत संभवनीय आहे याचेंहि ज्ञान होईल.

इतिहाससंघटनेकरितां संशोधित कल्पनांची निवड.—सूक्ष्म परीक्षणापासून काढलेल्या कल्पनांचा इतिहास संघटनेकडे उपयोग करून घेण्याकरितां त्यांतील उपयुक्त कल्पनांची निवड कशी करावी हें आपण पाहूं. या कल्पनांचा उद्‌भव कोणच्याना कोणाच्या तरी मनांतून झालेला असतो. परंतु मनुष्याच्या मनांतील सर्व कल्पना नेहमीं वस्तुस्थितीवरूनच घेतल्या जात असल्यामुळें, त्यांच्या मुळाशीं असलेल्या गोष्टींना अस्तित्व असलें पाहिजे हें उघड आहे, म्हणून नाटकें, कादंबऱ्या, काव्यें, इत्यादि वाङ्मयात्मक ग्रंथांतील कल्पनांचा अभ्यास करून देखील त्यांचा पुढें दिलेल्या विशिष्ट मर्यादेच्या आंत प्राचीन कालासंबंधीं माहिती गोळा करण्याच्या कामीं उपयोग करून घेतला असतां तें वावगें होणार नाहीं. (१) नीति, ललितकला इत्यादि गोष्टींसंबंधीं कल्पना कर्त्याच्या समकालीन सर्व समाजास लागू करणें केव्हांहि रास्त होणार नाहीं. असल्या प्रकारच्या सामाजिक बाबतींतील कल्पनाविषयीं लिखाणांतील कल्पना फार झालें तर कर्त्याचे तत्संबंधी विचार प्रगट करीत असतील. (२) भौतिक पदार्थांचीं वर्णनें देखील कल्पनेनेंच केलीं असण्याचा संभव असल्यामुळें, त्या कल्पनांचीं मूलभूत तत्त्वें हुडकून काढून केवळ त्यांचें अस्तित्व गृहीत धरलें पाहिजे. एखाद्या कवीनें सुवर्णकपाटांचें वर्णन केलें असलें तर त्यावरून सुवर्ण व कपाटें यांचेंच अस्तित्व फक्त सिद्ध होतें. (३) याप्रमाणें एखाद्या कल्पनेचें किंवा पदार्थाचें अस्तित्व सिद्ध झालें तरी त्याची व्याप्ति सर्वसामान्य होती असें म्हणतां येणार नाहीं. (४) पुन्हां या पदार्थांचें किंवा कल्पनांचें अस्तित्व कोणत्या काळीं व कोणत्या देशांत होतें हेंहि नक्की ठरवितां येत नाहीं. कारण प्राचीन काळांतील किंवा परदेशांतील लोकांपासून कल्पना घेऊन कर्त्यानें तिचा स्वतः उपयोग करणें ही कांहीं संभवनीय गोष्ट नाहीं.

तुटपुंजी माहिती उपलब्ध असलेल्या काळासंबंधीं विचार करीत असतांना ज्या उघड शिक्षणाच्या साध्या गोष्टींचें कर्त्यानें विचार न करतां वर्णन केलें असेल तीहि व्यवहारांत खरी मानून चालावयास कांहीं हरकत नाहीं. अगदीं उघड उघड दिसणाऱ्या साध्या गोष्टींचीं वर्णनें कर्त्याला न कळत त्याच्या लेखणींतून यथातथ्य उतरत असतात.

संशोधित विधानांची यथार्थता.—सूक्ष्म परीक्षणानें लिखाणांतून काढलेल्या विधानांची यथार्थता नेहमीं डळमळीतच असते. यांपैकीं प्रत्येक विधानांची सत्यता कमीअधिक प्रमाणांत संभवनीय आहे, एवढेंच काय तें आपणांस बिनधोक सांगतां येईल.लिखाणांतील विधानें प्रत्यक्ष निरीक्षण करून ताबडतोब असंदिग्ध भाषेंत लिहून ठेवलीं जात नसल्यामुळें त्यांचें यथार्थत्व सिद्ध करण्याकरितां दुसऱ्या समर्थनपर विधानांची फार जरूरी असते. म्हणून लहान लहान चिठ्यांचा उपयोग करून एकच प्रकारचीं सर्व विधानें एके ठिकाणीं येतील असें त्यांचें वर्गीकरण करावें. तें झाल्यानंतर (१) एखाद्या गोष्टीविषयीं एकच विधान उपलब्ध असल्यास त्याचा कोणत्याहि प्रकारें उपयोग करून घेऊं नये; फार झालें तर निरीक्षकाच्या नांवासह त्याचा उल्लेख मात्र करावा. (२) दोन किंवा अधिक विधानें परस्परविरोधी आहेत असें आढळून येऊन तीं एकाच गोष्टीसंबंधीं आहेत अशी आपली पूर्ण खात्री झाली तर, [अ] त्यांपैकीं सर्वच संशयात्मक असल्यास किंवा [आ] अनेक संशयात्मक विधानें एकमेकांशीं जुळत असून, तीं ज्याविषयीं संशय घ्यावयास जागा नाहीं अशा एकाच विधानाविरुद्ध असल्यास, तीं सर्व त्याज्य समजावीं; परंतु [इ] परस्परविरोधी दोन विधानांपैकीं एक संशयात्मक, व दुसरें यथार्थ असणें पुष्कळ अंशीं संभवनीय असल्यास दुसरें ग्रहण करावें.

इतिहाससंशोधकानें विधानांच्या साम्याचें परीक्षण करीत असतांना फक्त स्वतंत्र निरीक्षणानें केलेलीं विधानेंच जमेस धरावीं.सामाजिक हकीकतींतील तपशिलाच्या विविधत्वामुळें, व त्याचें निरीक्षण करण्याचा दृष्टिकोन माणसागणिक भिन्न असल्यामुळें, दोन विधानांचा तपशील अनुक्रमानें जुळला तर तीं स्वतंत्र निरीक्षणानें केलेलीं नाहींत असें साफ समजावें. भिन्न भिन्न प्रकारच्या, भिन्न भिन्न लेखकांनीं, भिन्न भिन्न परिस्थितींत, भिन्न भिन्न लिखाणांत, नमूद केलेलीं निरीक्षणेंच स्वतंत्रपणें केलीं गेलीं होतीं असें खात्रीपूर्वक म्हणतां येतें. म्हणून इतिहाससंशोधकानें हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, प्राचीन काळासंबंधीं एकमेकांशीं तपशीलवार जुळणाऱ्या हकीकती खऱ्या विश्वसनीय नसून, थोडक्याच बाबींत मधून मधून दिसून येणारें साम्य विधानांची विश्वसनीयता प्रगट करतें.

सुसंगति आणि सत्यता.—या अनुमानांपासून सुसंगत हकीकत तयार करितां आली तर त्यांच्यासंबंधीं वाटत असलेला व्यक्तिविषयक संशय पार मावळून जाऊन; सुसंबद्धतेमुळें येणारा निश्चितपणा त्या हकीकतीला प्राप्त होतो. एखाद्या राजाच्या प्रवासवर्णनांतील तारखा व स्थळें परस्पराशीं विसंगत नसलीं व त्यापासून प्रवास वर्णनाची सुसंगत हकीकत आपणांस तयार करितां आली तर, प्रत्येक स्थळाच्या तारखेच्या सत्यतेबद्दल आपणांस खात्री वाटूं लागते. किंवा एखाद्या संस्थेच्या अथवा रूढीच्या वर्णनांतील सर्व विधानें सुसंगत असलीं तर त्यांवरून तयार केलेल्या हकीकतीच्या सत्यतेबद्दल आपणांस संशय येणार नाहीं.

ऐतिहासिक विधानांचा इतर शास्त्रांतील सिद्धांतांशीं विरोध दिसून आल्यास काय करावें.—भौतिक शास्त्रांच्या सिद्धांतांविरुद्ध असलेल्या लिखाणांतील गोष्टींवर कोणीहि इतिहाससंशोधकानें विश्वास ठेऊं नये. चमत्कारांवर विश्वास ठेवण्याकडे माणसाची इतकी प्रवृत्ति असते कीं, जुन्या कागदपत्रांत भुताखेतांच्या अस्तित्वाबद्दल

जितका पुरावा सांपडतो तितका समुद्रगुप्तासारख्या एखाद्या ऐतिहासिक पुरुषाच्या अस्तित्वाबद्दलहि सांपडणार नाहीं. असें असलें तरी इतिहाससंशोधकानें भुताखेतांसंबंधीं गोष्टी टाकून देऊन समुद्रगुप्ताचेंच अस्तित्व कबूल केलें पाहिजे. त्यानें आपल्या शोधामुळें भौतिकशास्त्रांत क्रांति घडवून आणण्याच्या भरीस पडूं नये. कारण भौतिक शास्त्रांतील ज्ञान प्रत्यक्ष अनुभवानें मिळविलेलें असते; परंतु इतिहासांतील माहिती अप्रत्यक्ष ज्ञानानें मिळविली जात असल्यामुळें त्याचा दर्जा नेहमीं कमीच रहाणार. भौतिक शास्त्रांमध्यें क्रान्ति घडून येणें असंभवनीय आहे असें नाहीं; परंतु तज्ज्ञांनींच अडवून आणली पाहिजे. इतिहाससंशोधकास या बाबतींत हात घालतां येत नाहीं. उलटपक्षीं त्यानेंच पूर्वीं झालेल्या शास्त्रीय शोधांचा, आपल्या लिखाणांचा अर्थ लावण्याकडे व आपल्या शोधांची यथार्थतातपासून पाहण्याकडे उपयोग करून घेतला पाहिजे. इतिहास, मानसशास्त्र, समाजशास्त्र, इत्यादि अपूर्णावस्थेंत असलेल्या शास्त्रांच्या सिद्धांताविरुद्ध जर ऐतिहासिक परीक्षणांत कांहीं आढळून आलें, तर या शास्त्रांतील संस्थापित झालेलीं जुनीं तत्वें चूक ठरविण्यास आपल्याजवळ सबळ पुरावा असल्याखेरीज इतिहाससंशोधकानें तें मान्य करूं नये.

**इतिहासरचनेच्या सामुग्रीचें स्वरूप.**— इतिहाससंशोधकानें इतिहासरचनेकरितां निवडून काढलेल्या वस्तुस्थितिदर्शक पृथक्कृत विधानांपासून सुसंगत इतिहास तयार करणें हें इतिहासकाराचें काम आहे. परंतु इतिहासरचनेचें काम सर्वस्वी उपलब्ध सामुग्रीवरच अवलंबून असल्यामुळें तें ठराविक नमुन्यावरहुकूम करणें शक्य नसतें ही गोष्ट इतिहासमीमांसकांनीं ध्यानांत ठेवावी. ऐतिहासिक प्राचीन वस्तु क्रिया व हेतु व अर्वाचिन वस्तुक्रिया हे परस्पर भिन्न नाहींत असें गृहीत धरून आपण त्याची कल्पना करीत असतो. या गृहीत सादृश्याच्या अभावीं प्राचीन लिखाणांचा बोध होणें केवळ अशक्य आहे. परंतु आपणांस ज्या प्राचीन गोष्टींची कल्पना करावयाची असते त्याचें आधुनिक गोष्टींशीं पूर्ण सादृश्य नसल्यामुळें इतिहासांत अनेक चुका होण्यास जागा राहते. भौतिक शास्त्रांच्या परिभाषेंतील प्रत्येक शब्दाची पूर्ण व्याख्या केली असल्याकारणानें त्यांत चुका होण्याचा संभव नसतो; परंतु हा नियम व्यावहारिक भाषेच्या शब्दासंबंधीं पाळला जात नसल्यामुळें व विशेषतः एखादा शब्द जितका अदृश्य अशा मानसिक कल्पनांचें ज्ञान करून देण्यास योजिला असेल तितका त्याचा अर्थ अनिश्चित राहात असल्यामुळें कल्पनामूलक ऐतिहासिक ज्ञानांत चुका होण्याची भीति विशेष असते.

परंतु इतिहासरकारास तर अशी कल्पना केल्याशिवाय दुसरा तरणोपायच नसतो. व म्हणून कोणत्याहि गोष्टींची सामुग्री लिखाणांतील वाक्यांचें पृथक्करण करून मिळविली असल्याकारणानें इतिहासकाराच्या हातीं शेंकडो तुटक तुटक, लहान लहान विधानेंच काय तीं येत असतात, व तींहि अगदीं अस्ताव्यस्त स्थितींत असतात. या ऐतिहासिक विधानांतील विशेषत्व म्हटलें म्हणजेः–(१) एकाच लिखाणांतून हस्ताक्षर, भाषा, लिपी, व्यक्तिविषयक मतें, ऐतिहासिक प्रसंग, इत्यादि परस्परभिन्न गोष्टींविषयीं माहिती मिळत असल्यामुळें या विधानास विविधत्व आलें असतें; (२) सामाजिक चालीसारख्या सामान्य विधानापासून तों एखाद्या व्यक्तीच्या तोंडून निघालेल्या शब्दासारख्या तुटक विधानापर्यंत निरनिराळ्या दर्जाचीं सामान्य विधानें या सामुग्रींत आढळून येतात; (३) प्रत्येक विधान विशिष्ट स्थल व काल यांनीं मर्यादित असल्यामुळें इतिहासकारास भिन्न भिन्न ठिकाणच्या व भिन्न भिन्न काळांतील विधानांचा पृथक् पृथक् अभ्यास करावा लागतो; आणि यांपैकीं प्रत्येक विधानाची सत्यता कमी अधिक प्रमाणांत निश्चित झालेली असते. याप्रमाणें भिन्न भिन्न ठिकाणच्या भिन्न भिन्न काळांतील कमीअधिक प्रमाणांत व सामान्य असलेल्या विजातीय विधानांच्या असंबद्ध अणुरेणूंचा इतिहासकारास उपयोग करून घ्यावयाचा असल्याकारणानें नमुन्याबर हुकूम काम होणें शक्य नाहीं पण या कामास पद्धत नाहीं असेंहि नाहीं. सजातीय विधानें वेगळीं काढून त्यांचें सोइस्कर वर्गीकरण कसें करावयाचें हे निश्चित करणें अवश्य आहे. संशोधित विधानांपासून (१) प्राणी, भौतिक पदार्थ,(२) मानवी कृत्यें,आणि (३) त्यांचे हेतू व पूर्व कल्पना या तीन प्रकारच्या वास्तविक गोष्टींचें ज्ञान होऊं शकतें. यांपैकीं भौतिक वस्तु व प्राणी यांचें ज्ञान मूळ लेखकास जरी निरीक्षणानें झालें असलें तरी, आपणांस तर त्याच्या अनुभवाची कल्पना स्वानुभवांतील वस्तूवरून करावी लागते. त्याचप्रमाणें प्राक्कालीन मानवी कृत्यांचेंहि लेखकांचे ज्ञान नीरिक्षणजन्य असतें तरी आपणांस ऐतिहासिक कृत्यांची व्यवहारांतील तत्सम माणसांच्या कृत्यावरून कल्पना करण्याशिवाय गत्यंतर नसतें. मानवी कृत्यांचे हेतु व कृत्यें करणाऱ्यांच्या त्याविषयीं पूर्वकल्पना या दोन्हीहि गोष्टींचें ज्ञान प्रत्यक्ष तत्कालीन निरीक्षणावरून करतां येत नसून त्याची कल्पना मनुष्यस्वभावाच्या ज्ञानावरूनच करावी लागते. लिखाणांपासून यासंबंधीं मिळविण्याची माहिती तीन प्रकारची असते. (१) लेखकानें दिलेले स्वतःचेच हेतु अथवा पूर्व कल्पना, (२) लेखकानें दिलेले स्वतःच्या समकालीन माणसाचे हेतु अथवा पूर्वकल्पना, आणि (३) लिखाणांतील कृत्यांचे आपणच आपल्या स्वतःवरून काढलेले हेतु अथवा पूर्व कल्पना.

यावरून एक गोष्ट उघड होते कीं, बहुतेक प्राचीन गोष्टींविषयीं आपलें ज्ञान भौतिक शास्त्रांतील गोष्टींप्रमाणें निरीक्षणात्मक नसून केवळ कल्पनामूलच असतें.

चित्र काढीत असतां त्यांत पुष्कळशा काल्पनिक भागाचा समावेश होतोच. याकरितां इतिहासकारानें इतिहासाची जुळवणी करीत असतां या चित्रांतील लिखाणांतून घेतलेल्या सत्यांशाचेंच फक्त ग्रहण केलें पाहिजे. उदाहरणार्थ, श्रीहर्षाच्या कारकीर्दीच्या उत्तरार्धांतील बुद्धाच्या मूर्तीच्या मिरवणुकीचें चित्र डोळ्यापुढें आणतांना चिनी प्रवाशाच्या वर्णनांतून यथार्थ म्हणून घेतलेल्या भागाशिवाय दुसऱ्या कित्येक गोष्टी त्यांत घालाव्या लागतील. परंतु इतिहासांत हा भाग घालतांना केवळ सत्यांशाचाच उपयोग केला पाहिजे. चित्राच्या पूर्णतेसाठीं उसन्या घेतलेल्या दुसऱ्या कोणत्याहि गोष्टीस इतिहासांत थारा देतां कामा नये.

इ ति हा स र च ने च्या का मां ती ल मु ख्य अ ड च णी व त्यां व र उ पा य—यावरून असें दिसून येईल कीं, भौतिक वस्तूंचे थोडेसे अवशेष खेरीज करून बाकीच्या कोणत्याहि प्राक्कालीन गोष्टींचें जें कल्पनाचित्र लिखाण वाचीत असतांनाच त्यांतील तुटपुंज्या माहितीवरून आपल्या अंतश्चक्षूंपुढें नकळत उभें राहतें तें बहुतांशीं अर्वाचीन कल्पनांनीं रेखाटलेलें असतें. पण प्रत्येक प्राचीन गोष्ट अर्वाचीन गोष्टीप्रमाणें नव्हती इतकेंच नव्हे तर या दोहोंतील वैषम्याच्या अभ्यासानेंच इतिहासास मनोरंजकता येत असल्यामुळें, लिखाणांत दृश्य होणाऱ्या एखाद्या गोष्टीच्या वर्णनपर माहितींतील निरनिराळ्या मुद्यांच्या स्वानुभावावरून केलेल्या कल्पनांचें एकीकरण करून, आपण मूळ गोष्टीचें शक्य तितकें हुबेहूब चित्र आपल्या डोळ्यासमोर आणण्याचा प्रयत्न करावा.

व्यवहारांतील आपलें निरीक्षण नेहमीं व्यक्तिविषयकच असल्या कारणानें लिखाणांतील निरीक्षणात्मक माहितीहि व्यक्तिविषयकच असते; व म्हणून परस्परसंबंध कळण्याकरितां जी परिस्थित्यात्मक व समुच्चयात्मक कल्पना मनुष्यास असावी लागते ती आपणांस झालेली नसते. यामुळें आपल्या अनुभवावरून समाजाचें किंवा त्याच्या विकासाचें किंवा अंशात्मक अवस्थेचें एक कल्पनाचित्र तयार करून त्याच्या चौकटींत लिखाणांतील संशोधित माहिती अंतर्भूत करण्याशिवाय गत्यंतर नसतें. प्राचीन काळची वस्तुस्थिति आपणांस प्रत्यक्ष पाहतां येणें शक्य नसल्यामुळें त्या काळांतील विवक्षित गोष्टी कोणत्या परिस्थितींत घडल्या होत्या याविषयीं बरोबर कल्पना येण्याकरितां आपणांस हल्लींच्या समाजाचें किंवा विकासाचें किंवा कार्यक्रमाचें निरीक्षण करून त्यासारख्या गोष्टी आज कोणत्या परिस्थितींत घडत आहेत हें पाहिलें पाहिजे. प्राचीन व अर्वाचीन गोष्टी यांमध्यें वैषम्य असण्याचा पुष्कळ संभव असला तरी मनुष्याची शरीरघटना व मनोरचना निश्चित असल्यानें हे सर्व फरक कांहीं विशिष्ट मर्यादेच्या आंतच घडून येत असतात म्हणून मनुष्याच्या जीवनक्रमांत ज्या सर्वसामान्य गोष्टींची आपण अपेक्षा करतो त्यांची एक यादी तयार केली असतां ती संशोधित विधानांची स्वाभाविक वर्गवारी करण्यास उपयोगी पडेल.

प्रत्येक समाजाच्या किंवा व्यक्तीच्या आयुष्यांत अनपेक्षित असे जे शेंकडों प्रसंग येतात त्यांचा पूर्वोक्त सर्वसामान्य गोष्टींमध्यें समावेश होऊं शकत नाहीं तरी त्यांचा अभ्यास केल्याशिवाय इतिहासकारास प्राचीन काळचें चित्र रंगवितां येणें शक्य नसल्यामुळें लिखाणाचें वाचन चाललें असतांनाच त्या गोष्टींचें पूर्ण ज्ञान होण्यास जे मुद्दे आवश्यक म्हणून सुचतील ते टिपून ठेऊन व आपल्या अनुभवांतील तत्सदृश गोष्टींच्या विवेचनांत जे मुद्दे देण्यांत येतात. त्यांचाहि अभ्यास करून आपणांस आणखी कोणते मुद्दे देण्याची आवश्यकता आहे तें ठरवून त्यांची यादी केली म्हणजे त्या वास्तविक गोष्टींचें वर्गीकरण कसें करावयाचें याची योजना तयार होईल.

याप्रमाणें इतिहासरचनेकरितां आपणांस कोणकोणत्या गोष्टींसंबंधीं माहिती अवश्य आहे हें प्रस्तुत समाजाच्या अवलोकनानें ठरवून व त्यांची यादी करून प्रत्येक गोष्टीविषयीं लिखाणांतील संशोधित विधानांतून काय माहिती मिळूं शकते असा प्रश्न विचारीत गेले म्हणजे सजातीय विधानें एके ठिकाणीं येऊन सर्व संशोधित विधानांचें संगतवार वर्गीकरण होईल.

इ ति हा स र च ने च्या का र्या ची रू प रे खा—पूर्वोक्त विवेचनावरून इतिहासरचनेच्या कार्याची रूपरेखा साधारणतः पुढें दिल्याप्रमाणें आपणांस आखतां येईलः—

१ प्रथमतः प्रत्येक संशोधित गोष्टीचें तिच्या निरनिराळ्या भागाशीं साम्य असणाऱ्या ज्या ज्या कांहीं गोष्टी आपणांस आपल्या सभोंवताली दिसतील त्या सर्वांचें एकीकरण करून हुबेहुब कल्पनाचित्र तयार करावें. हें काम लिखाण वाचीत असतांनाच नकळत माणसाकडून होत असल्यामुळें त्यांत चुका होऊं न देण्याकरितां कोणती काळजी घेतली पाहिजे याचें पूर्वीच दिग्दर्शन केलें आहे.

२ यानंतर प्रस्तुत समाजाच्या अवलोकनावरून ज्या सामान्य गोष्टींची आपण प्राचीन समाजांतहि अपेक्षा करितो त्यापैकीं प्रत्येकीसंबंधीं आपणांस जी काय माहिती मिळूं शकते ती वेगळी काढली असतां सजातीय गोष्टींचें निरनिराळे विभाग होऊन सर्व संशोधित विधानें पद्धतशीर रचलीं जातील.

३ याप्रमाणें रचलेल्या संशोधित विधानांत ऐतिहासिक माहितीच्या अभावामुळें बरीच लहानमोठीं खिंडारें राहिलेलीं आढळून येतील; त्यांपैकीं कांहीं ज्ञात गोष्टीवरून अनुमानानें भरून काढून तर्कशास्त्राच्या मदतीनें ऐतिहासिक माहितींत भर टाकण्याचा प्रयत्न करावा.

४ यानंतरचें कार्य म्हटलें म्हणजे आपण जुळविलेली सर्व माहिती बीजगणितांतील सूत्रवत् सिद्धांताप्रमाणें संकलित करून निरनिराळ्या गोष्टींचे परस्पर संबंध व सामान्य गुण-

धर्म दाखवावयाचें हें आहे. एवढें झालें म्हणजे इतिहास-रचनेचें काम पूर्ण होतें.

५ परंतु ऐतिहासिक ज्ञान स्वभावतःच क्लिष्ट व अफाट असल्यामुळें आपला ग्रंथ वाचकवर्गास सुबोध करण्याकरितां चांगलीशी विवरणपद्धति शोधून काढली पाहिजे.

मागें सांगितलेल्या सर्व क्रियांची मीमांसा जरी इतक्या स्पष्टपणें करितां येते तरी व्यवहारांत ऐतिहासिक ग्रंथ बहुधः सदोष राहिलेले आढळून येतात.. याचें कारण असें आहे कीं, ऐतिहासिक साधनांच्या शोधापासून इतिहासरचना संपूर्ण होईपर्यंत इतकें काम असतें कीं एका माणसाच्या हातून तें चांगल्या रीतीनें पार पडणें अशक्यच असतें. परंतु इतिहासशास्त्रांत बाह्यचिकित्सेच्या कामाशिवाय इतरत्र कोठेंहि श्रमविभागणी होऊन प्रत्येकाचें कार्यक्षेत्र आंखलें गेलें नसल्यानें ऐतिहासिक विषयावर पुस्तक लिहिणाऱ्यास दुसऱ्याच्या ग्रंथांतील कोणती माहिती विश्वसनीय समजून गृहीत धरावयाची हें कळत नाहीं, व त्यामुळें त्याच्या ग्रंथांत अनेक दोष राहतात. या करितां असें करावें कीं दुसऱ्या ग्रंथांतील कोणतेंहि सिद्धांत गृहीत धरून न चालतां एखाद्या लिखाणाप्रमाणेंच त्याचेंहि संशोधन करून, मूळ माहिती वरून ग्रंथकर्त्यानें प्रत्येक वेळीं बरोबर सिद्धांत काढले आहेत किंवा नाहीं हें पहात जावें. असें केल्यानें आमूलांत संशोधन करून ग्रंथ लिहिण्यास लागणाऱ्या बऱ्याच वेळाची काटकसर होऊन आपल्या ग्रंथांत दोष राहण्याचा संभवहि पुष्कळ कमी असतो.

सं शो धि त वि धा नां च्या व र्गी क र णा ची यो ज ना.– लिखाणांतून काढलेलीं सर्व विधानें मनुष्यासंबंधींच असल्यानें त्याच्या सर्वसामान्य व्यापारांची पुढें दिल्याप्रमाणें एक यादी तयार करून प्रत्येक व्यापारासंबंधीं सामुग्रींतील माहिती वेगळी काढली असतां सर्व सजातीय विधानें एके-ठिकाणीं येतील.

( अ ) भौतिक परिस्थितिः—( १ ) शरीर विषयक माहिती-शरीर वर्णन, तत्संबंधीं आंकडे; ( २ ) भूगोलविषयक परिस्थिति-नैसर्गिक, कृत्रिम. ( आ ) बौद्धिक चालीः—( १ ) भाषा, ( २ ) कला, ( ३ ) शास्त्रें, ( ४ ) तत्त्वज्ञान व नीति, ( ५ ) परमार्थ विषयक समजुती; ( इ ) व्यावहारिक चालीः—( १ ) भौतिक जीवनक्रम-अन्न, पोषाख व भूषणें, वसतिगृहें; ( २ ) खासगी आयुष्यक्रम-कालक्रमण, सामाजिक समारंभ, करमणुकीचीं साधनें; ( ई ) आर्थिक चालीः—( १ ) अर्थोत्पादन-शेतकी, खनीजद्रव्यें, ( २ )उद्योगधंदे, ( ३ ) व्यापार, ( ४ ) अर्थ विभागणी; समाज संस्था ( १ ) कुटुंब-( रचना व आर्थिक संघटना ) ( २ ) शिक्षण, ( ३ ) सामाजिक वर्ग; ( उ ) सार्वजनिकसंस्थाः—( १ ) राजकीय संस्था-सत्ताधीश, राज्यकारभार, लोकांनीं निवडलेल्या अधिकाऱ्यांच्या संस्था; ( २ ) सांप्रदायिक संस्था, ( ३ ) आंतर्राष्ट्रीय संस्था-राजकारण, युद्ध, व्यापार, खासगी कायदे.

वरील यादीप्रमाणें वर्गीकरण झाल्यावर प्रत्येक सदरांतील गोष्टींचें स्थलविषयक व कालविषयक वर्गीकरणें केली असतां त्यावरून आपणांस निरनिराळ्यां देशांतील अथवा काळांतील त्या त्या मानवी व्यापारांचा इतिहास लिहिण्यास साधनें मिळून, निरनिराळ्या प्रकारची माहिती प्रसिद्ध करितां येईल.

याप्रमाणें वर्गीकरण झालेल्या गोष्टी कोणत्या क्रमानें कथन करावयाच्या हें आपल्या विवरणपद्धतीवर अवलंबून राहील. एका काळांतील सर्व गोष्टी एकेठिकाणीं द्यावयाच्या किंवा एका देशाविषयीं सर्व माहिती एकत्र द्यावयाची किंवा गोष्टींच्या स्वरूपावरून त्यांचा ऐतिहासिक क्रम ठरवावयाचा, यांपैकीं कोणत्या तरी एकाच पद्धतीचा स्वीकार करून इतिहासांत चालत नाहीं. म्हणून, यांतील एकीस प्रमुखत्व देऊन दुसऱ्या दोन्हींचा सोयीप्रमाणें उपयोग करावा.

सा मा न्य वै य क्ति क कृ त्यें.—कांहीं वैयक्तिक कृत्यांचें परस्परांशीं इतकें सादृश्य दिसून येतें कीं, त्यांच्या समुच्चयास आपण "संस्था" असें नांव देतों. राजकीय इतिहासाखेरीज-करून इतिहासाच्या बहुतेक सर्व विशेष अंगांतील कृत्यांत असें सामान्य स्वरूप दृष्टोत्पत्तीस येतें; परंतु राजकीय इतिहासांतील राजकर्त्यांच्या परस्पर भिन्न कृत्यांत मात्र असें सामान्य तत्व शोधून काढणें फार कठिण असतें. मानवी संस्कृतीचा अभ्यास करणें, हें जरी इतिहासाचें मुख्य ध्येय असलें तरी सर्व वैयक्तिक कृत्यें एकत्र करून त्यांतील सामान्यत्व पथक् केल्यावरहि पूर्वोक्त रायकीय इतिहासांतील जीं कांहीं कृत्यें शिल्लक राहतील त्यांनां वगळलें असतां बाकीचा इतिहास नीट समजूं शकत नसल्यानें इतिहासकारांस तीं टाकतां येत नाहींत व म्हणूनच मानवी संस्कृतीच्या इतिहासाबरोबरच लढाया वगैरे राजे लोकांच्या वैयक्तिक कृत्यांचीहि आपणास गरज असते.

मा न वी सं व यी, चा ली व सं स्था.— मागें दिलेल्या कोष्टकावरून आपणांस कोणत्या मानवी संस्थाचा सवयींचा चालींचा व रीतीभातींचा इतिहास लिहितां येतो हें उघड दिसून येईल. अशा प्रकारचा एखादा इतिहास लिहिण्याकरितां ती संस्था कोणत्या व्यक्तींमध्यें रूढ होती हें अगोदर नीट ध्यानांत आणावें. कारण एखाद्या भाषेचा अभ्यास करण्याकरितां जर आपण कांहीं विशिष्ट व्यक्तींचा समूह घेतला, तर कलेच्या अभ्यासार्थ आपणांस तोच समूह घेतां येणार नाहीं. मराठी भाषा बोलणारांचा समाज घेतला कीं त्यांतील कांहीं व्यक्तींवरून सर्वांची राजकीय मतें पारमार्थिक कल्पना इत्यादि निरनिराळ्या गोष्टींसंबंधीं सिद्धांत काढण्याकडे जी माणसाची नैसर्गिक प्रवृत्ति असते तिला आपण बळी न पडलें पाहिजे. दुसरी महत्वाची गोष्ट म्हटली म्हणजेः—समजा आपण मराठी भाषेचा इतिहास लिहिण्याकरितां ती भाषा बोलणाऱ्यांचा समाज घेतला, तरी देखील

त्यांतील सर्व व्यक्तींच्या भाषेंत आपणांस पूर्ण सादृश्य आढळून येणार नाहीं. नागपूर, खानदेश व कोंकण या ठिकाणीं बोलल्या जाणाऱ्या मराठी भाषांमध्यें आपसांत थोडाबहुत फरक आढळून येईलच. उलटपक्षीं हिंदी, बंगाली वगैरे कांहीं भाषांचें परस्परांशीं कमी अधिक प्रमाणांत सादृश्यहि आढळून आल्यावांचून राहणार नाहीं.

याकरितां कोणताहि समूह घेतला कीं त्याचे पोटविभाग कोणते आहेत, व तो स्वतः कोणत्या मोठ्या समूहाचा पोटभाग आहे याचाहि विचार करणें प्राप्त आहे.

अशा रीतीनें भाषा, कला इत्यादि संस्थांचा म्हणजे आचरणपरंपरेचा व कर्तृत्वपरंपरेचा अभ्यास करण्यास फारसा त्रास पडत नाहीं. विशिष्ट चाल काय होती, तिला प्रचारांत कोणी आणलें व तिचा पुढें स्वीकार करणारे कोण होते किंवा पूर्वगत सदृश चालीची ही विकृति होय इतक्या गोष्टी निश्चित केल्या म्हणजे काम भागतें. परंतु सामाजिक किंवा राजकीय संस्थांची गोष्ट अगदीं निराळी असते. या जरी संवयीनें मनुष्यास परिपाठांतल्या वाटूं लागतात तरी त्या केवळ स्वेच्छेनें होत नसतात. यांतलि सामाजिक किंवा आर्थिक संस्थांचा अभ्यास करतांना त्यांच्या श्रमविभागणीचें व वर्गविभागाचें तत्त्व काय होतें, ते विभाग कोणते होते, त्यांत कोणत्या व्यक्तींनां घेण्यांत येत असे व त्यांचे परस्पर संबंध काय होते, हें शोधून काढावें लागतें. राजकीय संस्थांच्या बाबतींत पुढें दिल्याप्रमाणें आणखी दोन प्रकारची माहिती पाहिजे. ( १ ) प्रथमतः सत्ता कोणाच्या हातीं होती, व ती विभागली गेली असल्यास, या अधिकार विभागणीचा अभ्यास करून, स्थानिक, मध्यवर्ति व वरिष्ठ सरकाराविषयीं आपणांस काय माहिती मिळूं शकते हें पाहून नंतर प्रत्येक अधिकारीवर्गातील जागा कोणाला दिल्या असत, त्यांचे नेमून दिलेले अधिकार काय होते व त्यांच्या हातांत वास्तविक सत्ता किती होती याचा शोध करावा. ( २ ) त्याचप्रमाणें त्यांच्या कामकाजाचे नियम कोणत्या स्वरूपांत होते, व काय होते; नियमांचा व्यवहारांत उपयोग करण्याची वहिवाट काय होती, आणि त्यांचा दुरुपयोग कितपत केला जात असें हें देखील शोधून काढावें.

एका समाजासंबंधीं सर्व माहिती मिळविली म्हणजे त्याचा इतर समकालीन समाजांत दर्जा काय होता हें ठरविण्यासाठीं सार्वराष्ट्रीय संस्थांचा अभ्यास करून या सर्व समाजांत कोणकोणत्या रीती अगर संस्था सामान्य होत्या व त्यांचे आपसांतील दळणवळणासंबंधीं खासगी नियम काय होते हेंहि पहावें.

मा न वी सं स्थां च्या उ त्क्रां तीं चा अ भ्या स व त्यांत वै य क्ति क कृ त्यां चें स्था न.—वर दर्शविल्याप्रमाणें अभ्यास केला असतां अमुक एक वेळीं एखाद्या समाजाची स्थिति काय होती हें ध्यानांत येईल; परंतु मनुष्याच्या संस्था हळूहळू बदलत जाऊन शेवटीं त्यांचें इतकें रूपांतर होतें कीं, त्या मूळ संस्थांहून अगदीं भिन्न वाटूं लागतात.प्रत्येक मानवी संस्थांची याप्रमाणें विकास अगर उत्क्रांति होते व याचाच इतिहासांत अभ्यास करावयाचा असतो. याकरितां मागें दिलेल्या कोष्टकांतील प्रत्येक बाबींत उत्क्रांति काय झाली हें पहात गेलें पाहिजे. असें करतांना अगोदर कोणत्या गोष्टीच्या उत्क्रांतीचा आपणांस अभ्यास करावयाचा आहे हें नीट ठरवून मग ती किती काळांत झाली, तिच्यांतील निरनिराळ्या अवस्था काय होत्या व ती कोणत्या साधनांनीं घडून आली या सर्वांविषयीं विचार केला पाहिजे.

शास्त्रीयदृष्ट्या पाहिलें तर समाजांमध्यें प्रत्येक रीतीची, पद्धतीची किंवा संस्थेची नेहमीं एकाच दिशेनें उत्क्रांति व्हावयास पाहिजे व असें झालें असतें, तर निरनिराळ्या समाजांचा पृथक् इतिहास लिहिण्याची गरजच पडली नसती; परंतु समाजाच्या आयुष्यांत यदृच्छेनें जे कांहीं विविध प्रसंग येत असतात त्यावरून या उत्क्रांत्यांनां भिन्न भिन्न वळण लागत असल्यामुळें आपणांस समाजाच्या आयुष्यांत वैचित्र्य आढळून येतें व म्हणूनच या प्रसंगांचा अभ्यास केला नाहीं, तर समाजाचा इतिहास दुर्बोध होईल. हिंदुस्थानच्या इतिहासांत मुसुलमानांच्या स्वारीचा नामनिर्देशहि केला नाहीं, तर भाषा, रूढी इत्यादि गोष्टींनां आज जें निराळें वळण लागलें आहे त्याचा खुलासा कसा होईल ?

एखाद्या अनुकरणीय किंवा सत्ताधारी व्यक्तीच्या क्षुद्र कृत्यांचाहि सामाजिक उत्क्रांतीवर परिणाम होऊं शकत असल्याकारणानें कोणत्याहि ऐतिहासिक कृत्यांचें महत्त्व त्यायोगें सामाजिक उत्क्रांतीवर जितक्या कमीअधिक प्रमाणांत परिणाम झाला असेल त्यावरूनच ठरवावें. अशीं महत्त्वाचीं सर्व कृत्यें निवडून घेतलीं म्हणजे तीं कालानुक्रमानें लावून ज्या ज्या ठिकाणीं त्यांचा परिणाम घडून आला असेल त्या त्या ठिकाणीं घालावीं.

याप्रमाणें इतिहासाच्या निरनिराळ्या अंगांची रचना झाल्यावर त्यावरून आपणांस सामान्य इतिहास लिहितां येईल. मागें आपणांस मनुष्याच्या भिन्न भिन्न रीतींमध्यें जी उत्क्रांति झालेली आढळून आली याचें कारण खास मनुष्यांतच उत्क्रांति होत होती हें होय. ज्या प्रसंगामुळें मनुष्याच्या उत्क्रांतीस चालन मिळत असतें, त्याचा परिणाम कमीअधिक प्रमाणांत त्याच्या प्रत्येक संस्थेवर झाल्याशिवाय रहात नाहीं. याकरितां ज्या प्रसंगाचा सर्व संस्थांच्या उत्क्रांतीवर प्रामुख्यानें परिणाम झाला असेल, तें शोधून काढून त्यांचा सामान्य इतिहासांत समावेश करण्यांत यावा व त्यायोगें मनुष्याची सर्वांगांमध्यें उत्क्रांति कसकशी होत गेली हें दाखविण्यांत यावें.

उपरोक्त विवेचनावरून मानवी संस्कृतीच्या इतिहासांत वैयक्तिक कृत्यांचा परिणाम किती व कसा होतो व म्हणून

या वैयक्तिक कृत्यांची देखील इतिहासांत कशी आवश्यकता असते हें दिसून येईल.

ऐ ति हा सि क ग्रं था चे भा ग पा ड ण्या ची प द्ध ति.— ऐतिहासिक गोष्टींचा अभ्यास करीत असतांना त्याचे निरनिराळे भाग पाडण्याची चाल बरीच पुरातन असून ती उपयुक्तहि आहे. जेव्हां इतिहासाच्या एखाद्या विशिष्ट अंगावर ग्रंथ लिहावयाचा असेल तेव्हां ज्या प्रसंगांमुळें ती संवय अस्तित्वांत आली असेल किंवा तींत दृश्य रूपांतर झालें असेल त्यावरून प्रत्येक काळाचा आदि किंवा अंत ठरवावा. सामान्य इतिहास लिहीत असतांना ज्या प्रसंगामुळें इतिहासाच्या निरनिराळ्या शाखांतील उत्क्रांतीवर दृश्य परिणाम घडून आला असेल त्यावरून ही कालमर्यादा निश्चित करावी. याच पद्धतीनें आपणांस या भागाचेंहि पुनः पोटभाग पाडतां येतील.

अ नु प ल ब्ध मा हि ती वि ष यीं अ नु मा न.—संशोधित विधानावरून मागें दर्शविलेली सर्व माहिती मिळूं शकत नसल्यामुळें कित्येक प्रकारची माहिती आपणांस विदित विधानावरून अनुमानानें काढावी लागते. ही क्रिया करीत असतांना पुढें सांगितल्याप्रमाणें सावधगिरी ठेवून अनुमानें काढलीं तर अशा रीतीनें आपणांस ठाऊक असलेल्या माहितींत आणखी भर टाकतां येईल. (१) लिखाणाचें पृथक्करण करीत असतांना हीं अनुमानें काढूं नयेत. (२) अनुमित माहिती कोणती व लिखाणांतून काढलेली माहिती कोणती याचा आपल्या लेखकांत स्पष्ट उल्लेख असावा. (३) नकळत निघणाऱ्या अनुमानांत चुका होत असतात म्हणून आपण कोणत्या गोष्टींवरून अनुमान काढतों व तें काय काढतों, हें प्रत्येक वेळीं स्पष्ट ध्यानांत आणीत जावें. (४) एखादें अनुमान खात्रीलायक नसल्यास त्याचा इतर निश्चित अनुमानांत समावेश करूं नये. (५) चुकीच्या अनुमानशृंखलेवर आपण पुन्हां पुन्हां विचार करूं लागलों म्हणजे परिचयानें आपणांस ती अधिकाधिक बरोबर वाटूं लागते ही गोष्ट ध्यानांत ठेवावी.

अनुमान काढण्याच्या दोन तऱ्हा आहेत. (१) उपलब्ध लिखाणांत एखाद्या गोष्टीचा उल्लेख सांपडला नाहीं म्हणजे त्यावरून ती गोष्ट घडली नव्हती, असें अनुमान काढावयाचें ही पहिली तऱ्हा आहे; परंतु लेखकानें कदाचित ती गोष्ट पाहिली नसेल किंवा पाहूनहि त्याला ती लिहून ठेवण्याइतकी महत्त्वाची वाटली नसेल किंवा त्यानें ती लिहून ठेवली असूनहि तें लिखाणच गहाळ झालें असेल. एवढ्या गोष्टी संभवनीय असल्यानें ज्या लिखाणांत त्या गोष्टीचा उल्लेख साहजिकपणें व्हावयास हवा त्यांत ती सांपडली नाहीं तरच तेथें या अनुमानपद्धतीचा उपयोग करतां येतो. (२) दुसऱ्या पद्धतीनें अनुमान काढतांना आधुनिक मानवसमाज व प्राचीन मानवसमाज यांतील सामान्य सादृश्य गृहीत धरून हल्लींप्रमाणेंच प्राचीन काळींहि प्रत्येक गोष्ट कार्यकारणभावाशिवाय घडत नव्हती असें आपण समजतों व आज एखाद्या कार्यास जें कारण लागतें तेंच प्राचीन काळींहि लागत होतें, असें लिखाणांतील कित्येक उदाहरणांतून आढळून येत असल्यानें ठाऊक नसलेल्या गोष्टींविषयीं सादृश्यमूलक अनुमानानें तर्क करण्यात आपणांस गैरवाजवी असें कांहीं दिसत नाहीं; परंतु अशा रीतीनें अनुमान काढतेवेळीं आपणास हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, एखादें कार्य घडवून आणण्यास अवश्य असणारीं सर्व कारणें आपणास अनेकदा ठाऊक नसल्यामुळें किंवा माहीत असूनहि तीं सर्व नेहमीं दृष्टीसमोर ठेवतां येत असल्यामुळें अपुऱ्या पूर्वपक्षावरून सिद्धांत काढले जाऊन ते सदोष राहण्याची फार भीति असते. याकरितां एखादा सिद्धांत काढण्याकरितां पूर्वपक्षांत कोणकोणत्या गोष्टी लागतात, याचा नीट विचार करून व तत्संबंधीं सर्व माहिती आपणांस लिखाणावरून मिळूं शकते किंवा नाहीं, हें पाहून मग जो काय सिद्धांत काढावयाचा तो काढावा.

समाजशास्त्रांतील नियमांच्या आपल्या अज्ञानामुळें इतकी काळजी घेऊन काढलेलीं अनुमानेंहि पुष्कळदां चुकीचींच असण्याचा संभव असतो हें ध्यानांत ठेवावें; परंतु अशीं बरीच अनुमानें साचल्यावर अनेक गोष्टींवरून तेच सिद्धांत निघूं लागले म्हणजे मात्र त्याना निश्चित स्वरूप येतें.

उ प ल ब्ध मा हि ती च्या सं क ल ना ची आ व श्य क ता व ति चें सा मा न्य स्व रू प.— एखादें शास्त्रांतर्गत ज्ञान उपयुक्त असूनहि अवजडपणामुळें तें मनुष्यास आपलेंसें करून घेतां येत नसलें तर त्या शास्त्रापासून आपणास कांहींच फायदा नाहीं; ही गोष्ट लक्षांत ठेवून, रसायन शास्त्रांत ज्याप्रमाणें पुष्कळशा गोष्टी संकलित करून सूत्रवत सिद्धांत काढलेले असतात त्याचप्रमाणें आपणांसहि ऐतिहासिक माहिती सूत्ररूपानें लिहिली पाहिजे.

ही सूत्रात्मक माहिती थोड्याच शब्दांत द्यावयाची असली तरी ती दुर्बोध किंवा रूपभ्रष्ट होऊं नये म्हणून काळजी घ्यावयाची झाल्यास एखाद्या गोष्टीच्या स्वरूपाचे निदर्शक असे जे तपशील गाळले असतां आपणांस तिचा यथार्थ बोध होणार नाहीं तेवढे ठेवून बाकीचे सर्व वगळण्यांत यावे, व संशोधित विधानांची वर्गवारी करीत असतांना ज्या ज्या बाबींविषयीं विधानें आपण आपल्या सामुग्रींत शोधीत होतों त्याच बाबींविषयीं आपणांस जी कांहीं माहिती मिळाली असेल ती भाववाचक अथवा अलंकारिक शब्द न वापरतां अगदीं थोड्या पण सोप्या शब्दांत देण्याचा प्रयत्न करावा.

आतां आपण संस्था व उत्क्रांति या सारख्या सामान्य गोष्टींसंबंधीं व विशिष्ट ऐतिहासिक प्रसंगासारख्या गोष्टींसंबंधीं माहिती संकलित कशी करावी याचा पृथक् पृथक् विचार करूं.

सा मा न्य गो ष्टीं चे स्व रू प स्थ ळ व का ल म र्या दा या वि ष यीं मा हि ती चें सं क ल न.— प्रत्येक सामान्य

गोष्टींचें स्वरूप, क्षेत्र,व कालमर्यादा इतक्या गोष्टींचा निश्चय करणें अवश्य असतें म्हणून प्रथमतः (१) एखाद्या गोष्टीचे निर्णायक स्वरूपांश ठरवून मग तेवढ्या बाबींत ज्या गोष्टींमध्यें सादृश्य दिसेल त्या सर्व, किरकोळ भेद बाजूस सारून, एकत्र कराव्या व त्यांनां कांहीं व्यापक नांव द्यावें भाषा किंवा कायदेकानूसारख्या संवयींच्या इतिहासामध्यें अशा सूत्रांचें स्वरूप बहुधा अगोदरच निश्चित झालेलें असतें व म्हणून तेथें हें काम सुकर होतें. परंतु या संस्थांच्या, म्हणजे सातत्यपूर्ण क्रियांच्या म्हणजे विधी, रीती, यांच्या, तशाच मनुष्य घटनारूपी संस्थांच्या इतिहासांत मनुष्याच्या वास्तविक कृत्यांकडे किंवा विचाराकडे लक्ष दिलें जात नाहीं. ही गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. उदाहरणार्थ भाषेच्या इतिहासांत मनुष्याकडून एखाद्या शब्दाचा उच्चार कसा केला जात असे,इकडे लक्ष न देतां त्या शब्दाच्या रूपाचाच फक्त विचार करण्यांत येत असतो. परंतु आर्थिक किंवा व्यावहारिक चालींच्या इतिहासांत केवळ कृत्यांचाच विचार करावा लागत असल्यानें तेथें अशीं व्यापक वाक्यें काढणें बरेंच कठिण जातें; तीं लिखाणांत अगोदरच काढून ठेवलीं असलीं तरी तत्संबंधीं चिकित्सा करून त्यांची यथार्थता ठरवावी लागते. समूहवाचक संज्ञास्वरूपी नांव शोधून काढतांना देखील हीच अडचण येते; व म्हणून कोणते सामान्य गुण असलेल्या व्यक्तींच्या समूहाकरितां आपणांस संज्ञा करावयाची आहे हें विचारपूर्वक ठरवून त्यांनां लागू पडणारें यथार्थ नांव शोधून काढलें पाहिजे. (२) संस्थेचें क्षेत्र ठरविण्यासाठीं कोणकोणत्या समूहांत ती रूढ होती व कोणत्या समूहांत तिचा विशेष प्रसार होता हें यावें. कधीं कधीं हें नकाशाच्या रूपानें दाखविलें असतां अधिक बोधप्रद होतें. (३) कालमर्यादा निश्चित करण्यासाठीं ती संस्था ( मत, संस्था, चाल किंवा समूह ) केव्हां प्रथम उदयास आली व केव्हां नष्ट झाली हें शोधून कोणत्या काळांत तिचा विशेष प्रसार होता हें पाहिलें पाहिजे.

संस्थेच्या उत्क्रांतीची सामान्यतः पुढें दिल्याप्रमाणें अवस्थांतरें आढळून येतातः—एखादी गोष्ट एक किंवा अधिक व्यक्ति प्रथम स्वयंप्रेरणेनें करूं लागतात व मागाहून इतर लोकांकडून त्यांचें अनुकरण केलें गेल्यामुळें तिला सामान्यत्व येतें. कालांतरानें ही सवय त्या समूहांत बंधनात्मक होते व पुष्कळदां शेवटपावेतों ती याच स्थितींत राहून समाजाबरोबर विलयास जाते. कधीं कधीं तिचीं बंधनें शिथिल होऊं लागून तिचा ऱ्हास होतो, किंवा समाजांतील कांहीं व्यक्तींकडून तींत सुधारणा घडवून आणली जाते. उत्क्रांतिविषयक माहिती संकलित करीत असतांना उपरिनिर्दिष्ट प्रत्येक अवस्थेचें क्षेत्र व कालमर्यादा देऊन तिचीं निरनिराळीं स्थित्यंतरें दाखविलीं पाहिजे व त्यावरून त्या उत्क्रांतीस सुरवात कोठें व केव्हां झाली, तिचा शेवट कोठें व केव्हां झाला व ती कसकशी होत गेली याचें विवेचन केलें पाहिजे.

**अनन्यसाधारण गोष्टींची निवड व तत्संबंधीं माहितीचें संकलन.**—ज्या गोष्टी आपणांस विशेष वाटतील त्या गोष्टींपैकीं सर्वच इतिहासांत समाविष्ट करणें शक्य नसल्यानें मानवी व्यापारांच्या उत्क्रांतीमध्यें ज्यांनीं प्रमुखत्वेंकरून भाग घेतला असेल अशाच गोष्टी फक्त घेतल्या पाहिजेत, व म्हणून समाजाच्या स्थितींत ज्या व्यक्तींच्या कृत्यामुळें बदल घडून आला त्या व्यक्ती व त्यांचीं तीं कृत्येंच फक्त ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाचीं समजून त्यांची निवड करावी. इतिहाससंक्षेपाचीं कांहीं तत्त्वें "बुद्धोत्तर जग" या भागांत प्रारंभीं दिलींच आहेत. ऐतिहासिक पुरुषांचा संक्षिप्त इतिहास देतांना देखील हेंच तत्त्व ध्यानांत ठेवावें. या पुरुषांचें स्वभाववर्णन देतांना एक गोष्ट लक्षांत ठेवावी कीं जिवंतपणीं देखील मनुष्याच्या स्वभावाची पूर्ण परीक्षा करणें दुरापास्त असल्याकारणानें लिखाणांतील त्रोटक माहितीवरून स्वभावाचें वर्णन करणें हें फार धोक्याचें काम आहे. परंतु तें द्यावयाचें असल्यास, कोणत्याहि मनुष्याच्या स्वतःविषयींच्या विधानांवरून त्याचा स्वभाव न ठरविण्याची आणि काव्यांतील किंवा नाटकांतील पात्रांच्या स्वभावाप्रमाणें या खऱ्या माणसाच्या स्वभावांत सुसंगति न दाखविण्याची खबरदारी घ्यावी. ऐतिहासिक प्रसंगांची निवडहि त्यांच्या परिणामावरूनच करावयाची असते. ज्या गोष्टींचा कांहीं दृश्य परिणाम झाला नसेल त्या गाळून टाकाव्या व तोच परिणाम घडवून आणणाऱ्या सर्व गोष्टी एके ठिकाणीं कराव्या. ऐतिहासिक प्रसंगाचें वर्णन देतांना तो कोठें व केव्हां घडला, व त्याचा परिणाम कोठें व केव्हां दिसून आला एवढें सांगून कोणकोणत्या माणसांनीं कोणत्या भौतिक परिस्थितींत कोणत्या उद्देशांनीं व पूर्व कल्पनांनीं कोणकोणत्या गोष्टी केल्या व त्याचा परिणाम काय झाला इतक्या माहितीचा त्यांत समावेश केला पाहिजे.

**ऐतिहासिक गोष्टींची परिमाणात्मक माहिती.**—ऐतिहासिक गोष्टींचें स्वरूप दिलें तरी तिचे परिमाण दिल्यावांचून तिच्या महत्त्वाची कल्पना होणार नाहींत. लांबी, क्षेत्र, वजन इत्यादि भौतिक चमत्कार व काल यांच्या मापनासाठीं सर्वसाधारण मूलमान म्हणजे यूनिट असल्यांनें त्यांचें मापन शास्त्रोक्त होऊं शकतें. परंतु याप्रमाणें मानसिक गोष्टींचें परिमाण देतां येत नाहीं. विशिष्ट गुण असलेल्या एकूणएक गोष्टी किंवा व्यक्ति जर लिखाणांवरून अवगत झाल्या असल्या तर आपणांस गणनेचा उपयोग करितां येतो. परंतु तिच्या योगें महत्त्वमापन होत नाहीं हें विसरतां कामा नये. एखाद्या सैन्यांतील किंवा देशांतील लोकांचा आंकडा कळल्यानें आपणांस त्या सैन्याच्या किंवा देशाच्या महत्त्वाची कल्पना होऊं शकत नाहीं. माहितीच्या अभावामुळें इतिहासामध्यें एकांगाच्या गणनेवरून सर्वांगाची कल्पना कर-

ण्याचा पुष्कळदां प्रसंग येतो. परंतु गणनेसाठीं निवडलेल्या भागाचें सर्वांगाशीं सादृश्य असलें तरच या पद्धतीचा उपयोग करितां येतो. गणनेचा आणखी एक प्रकार म्हटला म्हणजे ज्या क्षेत्राचें संशोधन करावयाचें असेल त्यांतील एखाद्या ठिकाणच्या कांहीं व्यक्ति किंवा गोष्टी घेऊन त्यांत विशिष्ट गुणाचें प्रमाण किंवा शेंकडेवारी काढावयाची. नमुन्यादाखल घेतलेला अंश अपवादात्मक नसून जर सर्व भागांचा निदर्शक असेल, किंवा भिन्न भिन्न परिस्थितींतील निरनिराळे अंश निवडून जर त्यांच्या शेंकडेवारीदर्शक अंक त्यांची सरासरी काढिली तर या रीतीपासुन कांहीं फायदा होऊं शकतो.

आपल्या नजरेस आलेल्या थोडक्या गोष्टींवरून व्यापक सिद्धांत काढण्याकडे मनुष्याची नैसर्गिक प्रवृत्ति असते. परंतु याप्रमाणें घेतलेल्या गोष्टींचें सर्व भागाशीं सादृश्य असल्याशिवाय आपणांस असें करितां येत नाहीं. लेखकाचा कल आश्चर्यकारक गोष्टी नमूद करण्याकडे साधारणतः असल्या कारणानें लिखाणांतील बहुतेक गोष्टी अपवादात्मक असतात, व त्यामुळें त्यावरून व्यापक सिद्धांत काढणें धोक्याचें असतें. याकरितां सर्व भागांच्या निदर्शक अशा पुरेशा गोष्टी सांपडल्यावांचून व्यापक सिद्धांत काढूं नयेत.

ऐतिहासिक माहितीच्या योग्यतेविषयीं करावयाचा उल्लेख, संकलित माहितीवरून व्यापक सिद्धांत व व्यापक वर्गीकरण.—अशा रीतीनें वर्णनात्मक सूत्रें तयार झाल्यावर त्यांतील निरनिराळ्या गोष्टींचा परस्पर संबंध दाखवून त्यावरून समुच्चयात्मक अर्थ काढण्यापूर्वी, निरनिराळ्या वर्गांतील गोष्टींविषयीं आवश्यक असलेल्या माहितींपैकीं आपणास किती मिळवितां आली आहे, व मिळालेली माहिती कोणत्या योग्यतेची आहे, याचें थोडक्यांत सिंहावलोकन केलें पाहिजे. याकरितां मानवी व्यापाराविषयीं जी जी माहिती आपण संशोधित विधानांत शोधीत होतों त्यांतील किती माहिती आपण मिळऊं शकलों आहोंत हें प्रथम पहावें, व नंतर प्रत्येक वर्गांतील निरनिराळ्या विधानांच्या यथार्थतेविषयीं केलेल्या निश्चयावरून एकंदर माहिती निरीक्षणात्मक आहे किंवा ऐकीव आहे, ती लिखाणद्वारें चालत आली आहे, किंवा तिचें ज्ञान दंतकथामूलक आहे, ती एकाच वर्गाच्या लेखकाकडून प्राप्त झाली असल्यानें पूर्वग्रहदूषित आहे किंवा काय, इत्यादि गोष्टींचें थोडक्यांत विवेचन केलें पाहिजे.

वर्णनात्मक सूत्रांवरून वास्तविक गोष्टींच्या लहान लहान समूहांपैकीं प्रत्येकाचा विशेष गुण कळतो. सर्वसामान्य सिद्धांत काढण्याकरितां यांचें पुन्हां एकीकरण करून अधिक व्यापक सूत्रें आपणास काढलीं पाहिजेत. म्हणून ज्या लहान लहान समूहांचें सर्वांशीं एकमेकांशीं सादृश्य असेल त्यांनां एकत्र करून संस्था, समाज इत्यादिकांचे व्यापक समूह करावे, व पूर्वी सांगितल्याप्रमाणेंच त्यांचे निर्णायक गुणधर्म, क्षेत्र, कालमर्यादा व महत्त्व ठरवावें. जसजसें आपण अधिकाधिक सामान्यीकरण करीत जाऊं तसतसें आपल्या व्यापक समूहाच्या सर्व घटकांमध्यें आढळून न येणारे गुणधर्म वगळत जाऊन प्रत्येक घटकांत असलेले सामान्य गुणच तेवढे राखले पाहिजेत. असें करीत गेलें असतां आपणांस सर्व मनुष्यजातीच्या भाषा, शासनपद्धति इत्यादि व्यापारांतील सामान्य गुण सांपडून मग त्यांची उत्क्रांति कशी होत गेली हे काढतां येईल.

परंतु इतकें सामान्यीकरण करणें व्यवहारांत जवळ जवळ अशक्यच असल्यानें निरनिराळ्या समूहांची एकमेकांशीं तुलना करून त्यांचें व्यापक वर्गीकरण करावें लागतें. हें आपणांस दोन रीतीनें करितां येईल. भाषादि निरनिराळ्या मानवी व्यापारांपैकीं प्रत्येकांतील समूहांचे सादृश्यावरून सजातीय असे वर्ग पाडावयाचे ही पहिली पद्धत आहे. दुसरी रीत म्हटली म्हणजे इतिहासांत नेहमीं एकत्र आढळून येणाऱ्या निरनिराळ्या मानवी समाजांचे सादृश्यानुरोधानें वर्ग पाडून त्यांचा अभ्यास करावयाचा. हें व्यापक वर्गीकरण कसें करावयाचें याविषयीं इतिहासज्ञ अजूनपर्यंत कांहीं ठरवूं शकले नाहींत.

कार्यकारणभावसंशोधन.—मागें एकदां म्हटलेंच होतें कीं एकाच समाजाच्या ( कला, राजकीय संस्था, पारमार्थिक कल्पना इ.)निरनिराळ्या संवयींमध्यें कांहीं तरी परस्परसंबंध असतो,व त्यामुळें ज्या कारणांच्या योगानें त्यांपैकीं एकीवर परिणाम घडून येतो त्यांचाच परिणाम थोड्या अधिक प्रमाणानें इतर संवयींवर देखील झाल्याशिवाय रहात नाहीं. या परस्परसंबंधाचा उलगडा करण्यासाठीं ज्यामुळें हा परस्परसंबंध उत्पन्न होतो त्या निरनिराळ्या संवयींना कारणीभूत होणाऱ्या सामान्य गोष्टींचा आपणांस विचार केला पाहिजे.

यावरून दिसून येईल कीं इतर शास्त्रांप्रमाणेंच इतिहासांत देखील कार्यकारणभाव काढल्याशिवाय चालत नाहीं. हा कार्यकारणभाव शोधण्याचा प्रयत्न आजपावेतों निरनिराळ्या दिशेनें करण्यांत आला आहे. ईश्वरेच्छा हें प्रत्येक गोष्टीचें कारण देण्याकडे मनुष्याची प्रवृत्ति असते; परंतु शास्त्रीयदृष्टीनें प्रत्येक गोष्टीकडे पाहण्याची संवय झाल्यामुळें आतां कोणीहि ग्रंथकार इतिहासांत वेदांताची चर्चा करीत नाहीं. तथापि या अध्यात्मिक कल्पनांचे अवशेष आपणांस थोड्या निराळ्या स्वरूपांत मात्र अजूनहि दृष्टोत्पत्तीस येतात. उदाहरणार्थ प्रत्येक सामाजिक गोष्ट समाजाच्या हितासच कारणीभूत होते, असें गृहीत धरून कार्यकारणभाव शोधणारे इतिहासकार, व ईश्वर प्रत्येक गोष्ट मनुष्याच्या कल्याणार्थच करीत असतो असें म्हणणारा वेदांती यांत फरक काय ? याच्याच जोडीची दुसरी रीत म्हटली म्हणजे अमुक एक समाज किंवा मनुष्य विशिष्ट कल्पनांच्या प्रसारार्थ उदयास येतात असें धरून चालून त्यावरून कारणें शोधून काढावयाची ही आहे. मानव

जातीची दिवसेंदिवस प्रगति होत चालली आहे ही कल्पना देखील तितकीच चुकीची आहे. कारण एक तर प्रगति शब्दास निश्चित असा कांहींच अर्थ नाहीं, व दुसरें सर्व मानवजातीची एकाच दिशेनें सुधारणा होत आहे असें म्हणण्यास कांहीं आधार नाहीं.

शास्त्रशुद्ध पद्धतीनें कार्यकारणभाव शोधण्याचे आजपर्यंत पर्यत्न झाले नाहींत असें नाहीं. संशोधकांनीं एकाच जातीच्या ऐतिहासिक गोष्टींच्या क्रमाचा अभ्यास करून त्यावरून त्यांच्या क्रमाबद्दल कांहीं नियम काढले आहेत व त्यामुळें अमुक एक गोष्ट घडल्यानंतर दुसरी कोणती घडेल याविषयीं अनुमान करितां येतें. परंतु या नियमांचा उपयोग करतांना उदय, वाढ, नाश इत्यादि अलंकारिक शब्द वापरले जाऊं लागल्यामुळें या चालींची वाढ जणूं काय सेंद्रिय वनस्पतींच्या किंवा प्राण्यांच्या उत्क्रांतीप्रमाणेंच आहे, अशी भावना होऊन एकाचे नियम आपण दुसऱ्यास लाऊं लागतों. यासाठीं कोणत्याहि ऐतिहासिक गोष्टीचें कारण शोधतांना या अलंकारिक प्रयोगाबद्दल फार सावधगिरी ठेवावी लागते; व पार्लमेंटचें मत समाजाचे अधिकार, इत्यादि प्रयोग व्यवहारांत बरोबर असले तरी ऐतिहासिक विवेचनांत त्यामुळें फार चुका होतात. एकाच समाजांतील निरनिराळ्या संवयींच्या उत्क्रांतीच्या तुलनेनें त्यांमध्यें कांहीं तरी परस्परसंबंध असतो ही गोष्ट प्रथम ध्यानांत आली. परंतु कार्यकारणभावांविषयीं कांहीं नियम काढण्याकरितां, तुलनात्मक पद्धतीनें कोणत्या दोन गोष्टी एकत्र आढळून येतात हें शोधणें, किंवा निरनिराळ्या समाजांतील एखाद्या संवयीची कोणत्या गोष्टीमुळें एका ठराविक दिशेनें उत्क्रांति झाली हें पाहणें, या दोन्हींहि पद्धती, प्रत्येक वेळीं त्या ऐतिहासिक गोष्टीची पूर्ण परिस्थिति आपण ध्यानांत घेत नसल्याकारणानें सदोष आहेत. बरें एका सबंध समाजाची दुसऱ्या सबंध समाजाशीं तुलना करावी तर त्यायोगानें, कोणत्या दोन गोष्टी एकत्र आढळून येत नसल्यानें एक दुसरीचें कारण असूं शकत नाहीं. एवढेंच काय तें कळतें; व प्रत्येक गोष्टीच्या पूर्ण परिस्थितीचा विचार करावयास तर पाहिजे तितकी साविस्तर माहिती उपलब्ध नसते.

परंतु संकलन व इतिहासाचे विभाग करण्यासाठीं कार्यकारण भावाचें ज्ञान अत्यावश्यक असल्यानें इतिहासकारास तें काम केल्याशिवाय गत्यंतर नसतें. लिखाणकर्त्यांनीं दिलेलीं आपल्या समकालीन वैयक्तिक गोष्टींचीं कारणें पुष्कळ वेळां लिखाणांत आपणांस आयतींच सांपडत असल्या कारणानें तत्संबंधीं आपणांस खात्रीयुक्त माहिती मिळूं शकते. परंतु उत्क्रांतीसारख्या सर्वसाधारण गोष्टींसंबंधीं कार्यकारणभाव शोधतांना मात्र आपणांस आधुनिक समाजाच्या अभ्यासानें प्राचीन समाजाच्या उत्क्रांतीचा उलगडा करणारीं कारणें शोधून काढावीं लागतात. या कार्याची दिशा अद्यापपावेतों निश्चित झाली नसल्यानें येथें त्याच्या दिग्दर्शनार्थ कांहीं सूचना देण्यापलीकडे अधिक कांहीं करितां येत नाहीं.

भावपृथक्करणानें मनुष्यापासून वेगळ्या काढल्यामुळें भाषेमध्यें जरी निरनिराळ्या संवयी भिन्न भिन्न शब्दांनीं संबोधल्या जातात तरी त्या सर्वांचा आद्यप्रवर्तक मनुष्यच असतो; व म्हणून मनुष्याच्या परिस्थितींतील ज्या विशेष भागाचा त्याच्या सर्व व्यापारांवर थोडाबहुत परिणाम घडून येतो त्यांतच या परस्परसंबंधाचें कारण दृष्टोत्पत्तीस येतें. मनुष्याच्या सर्वप्रकारच्या व्यापारांमध्यें सारख्याच दृढसंबंधाची अपेक्षा करणें उचित नाहीं. आर्थिक व्यापारांपेक्षां बौद्धिक व्यापारांत त्याचीं बंधनें साहजिकच शिथील असतील. व म्हणून लिखाणांत विशिष्ट संवयीचा एखाद्या समाजाच्या ठिकाणीं आरोप केला असला तरी या व्यक्तिवैचित्र्याचा विचार करण्यास विसरूं नये.

उत्क्रांतीविषयीं विचार करितांना एवढें लक्षांत ठेवावें कीं, उत्क्रांति फक्त सजीव माणसाचीच होऊं शकते, व म्हणून तत्संबंधीं कारणें शोधतांना त्या त्या संवयींच्या मुळाशीं असलेल्या माणसांचाच विचार केला पाहिजे. प्रत्येक उत्क्रांतीच्या मुळाशीं मनुष्यांच्या भौतिक परिस्थितींतील किंवा संवयींतील बदल हेंच कारण असतें. संवयींत बदल होण्याचीं दोन कारणें आढळून येतात. कधीं कधीं माणसें तींच राहून स्वेच्छेनें, अनुकरणानें किंवा बळजबरीनें त्यांच्या व्यापारांत फरक पडतो; तर कधीं कधीं नवीन पिढीच्या किंवा परक्या लोकांच्या आगमनानें त्यांचें रूपांतर होतें. सर्व मानवी जात सारखी असून ती भिन्न भिन्न परिस्थितींत विभागली गेल्यानें निरनिराळ्या प्रकारच्या उत्क्रांत्या घडून येतात; किंवा निरनिराळ्या लोकांत भिन्न भिन्न आनुवंशिक गुण असल्याकारणानें समाजांच्या मिश्रणानें उत्क्रांतीस निरनिराळीं रूपें येतात, या प्रश्नाचा उलगडा अद्याप झालेला नाहीं.

ऐ ति हा सि क ग्रं थां ती ल प्रा ची न वि व र ण प द्ध ति.—आतां ऐतिहासिक ग्रंथ कोणत्या स्वरूपांत लिहिले जावेत त्यांतील विवरणपद्धति काय असावी एवढाच प्रश्न काय तो शिल्लक राहिला आहे. यूरोपमध्यें देखील १९ व्या शतकाच्या मध्यापर्यंत ऐतिहासिक ग्रंथ वाङ्मयस्वरूपीच होते, हें या ग्रंथांच्या नव्या आवृत्त्या जुन्यांमध्यें कांहींच फेरबदल न करितां छापल्या जात होत्या यावरून उघड दिसतें. कारण कोणताहि शास्त्रीय विषयावरील ग्रंथ घेतला तरी त्याची नवी आवृत्ति काढतांना मध्यंतरींच्या काळांत जे कांहीं नूतन शोध लागले असतील त्यांचा त्यांत समावेश करावा लागत असल्यामुळें, नवी आवृत्ति जुन्या आवृत्तीप्रमाणेंच सहसा निघत नाहीं. वाचकांचें मनोरंजन करणें किंवा हितोपदेशाकरितां कांहीं सिद्धांत काढून देणें हें इतिहासाचें ध्येय नसून तें काम केवळ प्राचीन गोष्टींचें ज्ञान प्राप्त करून घेण्यासाठींच करावयाचें असतें ही जाणीव

यूरोपांत १९ व्या शतकाच्या उत्तरार्धात प्रथम झाली; व त्यानंतर इतिहासास शास्त्रीय स्वरूप देण्याचा प्रयत्न सुरू झाला. ऐतिहासिक वाङ्मयाचे मुख्यत्वेंकरून स्फुट निबंध व ऐतिहासिक ग्रंथ असे दोन भाग करितां येतील. यांपैकीं प्रत्येक प्रकारच्या पुस्तकांतील विवरणपद्धति कशी असावी याचा आपण विचार करूं.

इतिहासांतील एखाद्या प्रश्नाची किंवा कांहीं परिमित प्रश्नांची चर्चा करावयाची असली म्हणजे मनुष्य स्फुटनिबंध लिहावयास उद्युक्त होतो. अशा प्रकारच्या अगणित विषयांवर स्फुटनिबंध लिहिण्यास इतिहासांत वाव असला तरी, बिनमहत्त्वाच्या विषयावर स्फुटनिबंध लिहिण्यांत केवळ कालापव्ययच होत असल्यानें या निबंधाकरितां जो विषय निवडावयाचा तो मोठ्या दूरदर्शीपणानें निवडला पाहिजे. निबंध उपयुक्त करण्याकरितां पुढें दिलेल्या तीन नियमांकडे विशेषतः लक्ष देण्यांत यावें:—( १ ) निबंधांतील प्रत्येक ऐतिहासिक गोष्टीच्या बाबतींत ती कोणत्या लिखाणांतून घेतली आहे, व ती कितपत विश्वसनीय आहे, या दोन मुद्यांचा उल्लेख केलेला असावा. ( २ ) निरनिराळ्या गोष्टींचा कार्यकारणभाव कळण्यास सुलभ जावें म्हणून आपल्या निबंधांतील हकीकत कालानुक्रमानें दिलेली असावी. ( ३ ) प्रत्येक निबंधास असा मथळा देण्यांत यावा कीं, त्यावरून त्यांतील विषयाची बरोबर कल्पना करितां येईल. याशिवाय लक्षांत ठेवण्यासारखी एक गोष्ट म्हटली म्हणजे निबंधांतील विषयाचा सर्व बाजूंनीं विचार केला जावा ही गोष्ट निर्विवाद असली तरी देखील, ज्या गोष्टी आपणांस त्यांतून सहज वगळतां आल्या असत्या त्यांचा केवळ आमच्या विद्वत्तेच्या प्रदर्शनार्थ त्यांत समावेश करणें केव्हांहि इष्ट नसतें.

सामान्यस्वरूपाचे ऐतिहासिक ग्रंथ विशेषतः विद्यार्थी व तज्ज्ञ वर्गाकरितां लिहिलेले असतात. यूरोपियन भाषांमध्यें अशा प्रकारचीं जीं पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत त्यांमध्यें सर्व संशोधित वास्तविक गोष्टी कालानुक्रमानें थोड्या शब्दांत दिलेल्या असतात इतकेंच नव्हे तर मूळांतील वाक्यें खालीं देऊन पुढें मूळ लिखाणांची व त्याच्या संशोधकांची संपूर्ण माहितीहि दिलेली असते. जेव्हां ऐतिहासिक गोष्टींचा काळ उपलब्ध नसतो किंवा जेव्हां त्या समकालीन असतात तेव्हां वर्णानुक्रमरचना स्वीकारण्यांत येते. या ग्रंथाचा उद्देश आपल्या पदरचें कांहीं न घालतां संशोधित माहितीचें यथार्थ ज्ञान करून द्यावयाचें एवढाच असतो. यांपैकीं कांहीं ग्रंथांतील वर्णनें संक्षिप्त असूनहि इतकीं उत्तम आहेत कीं, तीं वाचून एखाद्या ऐतिहासिक गोष्टीविषयीं माहिती मिळविली कीं मग तत्संबंधीं दुसरे सविस्तर ग्रंथ वाचण्याची गरज रहात नाहीं. असले ग्रंथ अनेक तज्ज्ञांच्या सहकारित्वाशिवाय तयार होऊं शकत नाहींत. तथापि ही श्रमविभागणी करण्यापूर्वी हातीं घेतलेल्या ग्रंथाचे स्वतंत्र पण सुसंगत असे भाग पाडून, स्वतःच्या जबाबदारीची जाणीव करून देण्याइतके मोठे भाग प्रत्येकाकडे सोंपवितां येतात किंवा नाहीं हें पाहिले पाहिजे. अशा प्रकारचे ग्रंथ प्रसिद्ध झाले तरी मनुष्याच्या सर्वांगीण उत्क्रांतीची माहिती देणाऱ्या ग्रंथाची आवश्यकता असतेच. या पुस्तकांमध्यें मनुष्याच्या सामान्य उत्क्रांतीचें ज्ञान करून देण्यास अवश्य असणारी त्याच्या निरनिराळ्या व्यापारांतील उत्क्रांत्यांची त्रोटक माहिती, व ती सुबोध होण्यासाठीं लागणाऱ्या प्रसंगांचीं वर्णनें दिलीं पाहिजेत. सर्व मनुष्यजातीची उत्क्रांति एकसमयावच्छेदेंकरून होत आहे असें मानण्यास आधार नसल्यानें व विशेषतः एवढ्या माहितीचा अभ्यास करणें व्यवहार्य नसल्याकारणानें जगाच्या इतिहासासारखे व्यापक ग्रंथ न लिहितां राष्ट्रांचे किंवा विशिष्ट काळांचेच इतिहास या धर्तीवर लिहिण्यास घ्यावे; परंतु ग्रंथाचें शास्त्रीय स्वरूप नष्ट होऊं नये म्हणून पूर्वोक्त शास्त्रीय ग्रंथाप्रमाणें त्यांतहि अलंकारिक भाषा किंवा पुराव्यांवाचून विधानें बिलकुल राहूं देऊं नयेत.

सामान्य लोकांकरितां जे ऐतिहासिक ग्रंथ लिहिले जातात त्यांमध्यें वर सांगितलेले कडक नियम पाळण्यांत येत नाहींत. याचें कारण असें आहे कीं तज्ज्ञ पंडित सामान्य जनतेकरितां ग्रंथ लिहिण्याची पर्वा करीत नाहींत; परंतु अशीं पुस्तकें लिहून पुष्कळ पैसे मिळवितां येत असल्यामुळें, अर्धेकच्चे लोक, सामान्यजनता आपल्या ग्रंथांतील दोष ओळखण्याइतकी सुशिक्षित नसते हें पूर्णपणें जाणून, ग्रंथलेखनाचें काम हातीं घेतात. याचा परिणाम असा होतो कीं, या ग्रंथांच्या लेखकांस स्वतःलाच ज्या गोष्टी नीट समजल्या नसतात. त्या इतरांना समजावून सांगण्याची पाळी आल्या कारणानें, विषय सुबोध करून लोकरंजन करण्याची आपली असमर्थता झांकण्यासाठीं त्यांना अलंकारिक भाषा वगैरे शास्त्रनिषिद्ध साधनांचा उपयोग करावा लागतो. हा दोष सुधारण्याकरितां या लोकांनीं हातीं घेतलेल्या विषयावरील इतिहासपंडितांचे सर्व लेख वाचून आपण स्वतःच अगोदर परिश्रमपूर्वक त्या विषयाचें ज्ञान चांगलें संपादन केलें पाहिजे. असें केलें असतां त्यांनां आपल्या प्रत्येक विधानास पुरावा देतां येईल. व अलंकारिक भाषा न वापरतांहि इतिहासविषयक शास्त्रीय ग्रंथांतील अनवश्यक भाग गाळून व कठिण भागाचें शास्त्रोक्त पण थोडक्यांत विवरण करून आपलें पुस्तक चित्ताकर्षक करितां येईल. याचा अर्थ असा घ्यावयाचा नाहीं कीं, विषय सुबोध करण्याची हमी घेतली कीं इतिहासकारास अशुद्ध, असंस्कृत, बोजड किंवा फाटकीतुटकी भाषा लिहिण्याची पूर्ण मुभा असते. उलटपक्षीं इतिहासविषय हा अगोदरच बराच घोंटाळ्याचा असल्यामुळें त्यानें वाईट भाषेंत ग्रंथ लिहिला असतां तें अगदीं अक्षम्य होईल.

उ प सं हा र.—प्राचीन लिखाणें विनाशस्वरूपी असल्यामुळें इतिहासाची सुसंबद्ध रचना केवळ यदृच्छेवरच अवलंबून

असते. आधींच प्राचीन लिखाणांची संख्या परिमित व त्यांतहि त्यांचा झपाट्यानें नाश होत असल्यानें इतिहाससंशोधनानें समाजाच्या उत्पत्तीविषयीं व मानवी उत्क्रांतीच्या मूळाविषयीं ज्ञान प्राप्त करून घेण्याच्या कांहीं लोकांच्या कल्पनेस कधींकाळींहि मूर्तस्वरूप येणें शक्य नाहीं. इतिहास हें निरीक्षणात्मक शास्त्र नसून त्यांतील ज्ञान सर्वस्वी अनुमानमूलक असतें. कारण प्राचीन व आधुनिक समाजांच्या सादृश्यात्मक अनुमानांनीं लिखाणांतील विधानांची चिकित्सा करून त्याच सादृश्याच्या जोरावर आपणास त्यांची संघटना करावी लागते. लिखाणें शोधून काढण्यापासून तों त्यावरून प्राचीन गोष्टींचें ज्ञान करून घेईपर्यंत शेंकडों गोष्टी कराव्या लागत असल्यानें इतिहासशास्त्रात सहकारित्वाची फार आवश्यकता आहे. प्रथमतः लेखसंग्रहण, मूलपाठसंशोधन व प्राथमिक वर्गीकरण, करणाऱ्या संशोधकांनीं एकजुटीनें काम करून थोडक्या काळांत व थोडक्या श्रमांत पूर्वतयारीचें काम उत्तम रीतीनें पार पाडलें पाहिजे. त्यानंतर ऐतिहासिक विषयावर स्फुटनिबंध लिहिणाऱ्या पंडितांनीं व्यापक संघटनेकरितां आपले लेख उपयोगी पडावे म्हणून कांहींतरी सर्वसंमत धर्तीवर काम केलें पाहिजे व पुढें अनुभविक इतिहासपंडितांनीं आपले वैयक्तिक शोध बाजूस ठेवून व्यापक संघटनेचें काम हातीं घेतलें पाहिजे. अशा रीतीनें काम झालें तरच सामाजिक उत्क्रांतीच्या स्वरूपाविषयीं व कारणाविषयीं यथार्थ सिद्धांत निघून आदर्शभूत इतिहासमीमांसा तयार होईल. अस्तित्वांत असलेल्या सर्व लिखाणांचें संशोधन होऊन इतिहासरचनेचें काम एके दिवशीं संपूर्ण झालें तरी इतिहासास निश्चित स्वरूप येणार नाहीं. समाजशास्त्राच्या आपल्या ज्ञानांत जसजशी अधिकाधिक भर पडत जाईल, तसतसा त्यांतील नियमावरून तयार केलेल्या इतिहासांतहि फरक होत जातील.

इतिहासाच्या अभ्यासानें व्यवहारांत उपयोगी पडेल असें ज्ञान प्राप्त होतें अशी जी कांहीं लोकांची समजूत आहे, ती केवळ भ्रममूलक आहे. आजची परिस्थिति प्राचीन परिस्थितीहून भिन्न असल्यामुळें जुन्या गोष्टीवरून सद्यःकालांत आपण कसें वागावयास पाहिजे याचा कांहीं बोध होत नाहीं. तथापि इतिहासाच्या ज्ञानानें आपणांस दिसतात त्या गोष्टी तशा कां आहेत, हें कळूं शकत असल्यानें सद्यःपरिस्थिति चांगली समजूं शकते. यावरून इतिहास व समाजशास्त्रें यांचा परस्परावलंबीपणा सहज व्यक्त होईल. इतिहासाचा चांगला बोध होण्यासाठीं समाजशास्त्राची जितकी आवश्यकता असते, तितकीच त्या शास्त्राच्या पूर्ततेसाठीं इतिहासाचीहि असते; परंतु इतिहासापासून मुख्य फायदा म्हटला म्हणजे त्यायोगें बौद्धिकसंस्कृतीस उत्तेजन मिळूं शकतें हा होय. इतिहासाच्या अध्ययनानें मनुष्याचा श्रद्धाळू स्वभाव नाहींसा होऊन तो चौकस होतो. त्याचप्रमाणें इतिहासवाचनानें मनुष्यास दुसऱ्याच्या चालीरीति चांगल्या समजूं लागून त्याविषयीं सहिष्णुता प्राप्त होते व मानवी जातीचीं रूपांतरें संवयी बदलत जाऊन कशीं घडून येतात, हें नीट समजलें म्हणजे प्राणिशास्त्राच्या उत्क्रांतीच्या नियमांचा सामाजिक उत्क्रांतीचें स्पष्टीकरण करण्याकडे उपयोग करण्याचा त्यास मोह होत नाहीं. [ लांग्वा आणि सिनेबो यांच्या पुस्तकांच्या आधारानें हा लेखभाग लिहिला आहे. ]

भा र ती यां चें इ ति हा स शा स्त्र.—वैदिक इतिहासशास्त्रापासून अर्वाचीन इतिहासशास्त्रापर्यंत प्रगति हिंदुस्थानांत कोणत्या अनुक्रमानें झाली याविषयीं थोडेसें विवेचन अप्रस्तुत होणार नाहीं. पुराणामध्यें इतिहासविषय कसा मांडला जात असे याची कल्पना "बुद्धपूर्वजग" या पुस्तकांत दिलीच आहे, तर त्या कालापासून खरे राजवाड्यांच्या कालापर्यंत इतिहासलेखनशास्त्रांतील भारतीय विकास आपण पाहिला पाहिजे. इतिहासलेखन आपल्याकडे काय झालें याची जंत्री येथें अप्रस्तुत होय. आपणास वाङ्मयस्वरूपविकास अथवा इतिहासलेखनपद्धतिविकास तेवढा पहावयाचा आहे.

संस्कृतमधील मुख्य इतिहासग्रंथ म्हणजे काश्मीरची राजतरंगिणी होय. तिचा कर्ता कल्हण यानें ऐतिहासिक सत्याची आवड बरीच दाखविली आहे यांत शंका नाहीं. राजतरंगिणीच्या उत्पादनाचें श्रेय काश्मीरमध्यें बौद्धांचें वैचारिक आणि वैज्ञानिक वर्चस्व होतें त्यास देण्यांत येतें आणि बौद्धधर्म, क्षत्रियमहत्त्व आणि इतिहासाविषयीं आस्था यांची संगति जोडण्यांत येते आणि त्या प्रकारच्या विधानास सहाय्यक म्हणून असा वाद मांडला जातो कीं, जेथें ब्राह्मणांचें महत्त्व कमी होतें, अशा हिंदुस्थानाच्या सरहद्दीवर म्हणजे आसाम, आराकान, ब्रह्मदेश, काश्मीर व सिंहलद्वीप यांसारख्या ठिकाणीं बौद्धधर्म आणि ऐतिहासिक लेखनाचें अस्तित्व आहे. या प्रकारच्या विधानांत तथ्य नाहीं असें नाहीं; तथापि सिलोनच्या महावंसो दीपवंसो इत्यादि बखरी आपण सूक्ष्मपणें पाहिल्यास त्या पुस्तकास इतिहास म्हणण्याऐवजीं भिक्षुवाङ्मय म्हणणें अधिक योग्य होईल. ब्राह्मणांमध्यें संप्रदायसातत्य अथवा पीठसातत्य नसल्यामुळें आणि बौद्धांमध्यें तें असल्यामुळें ब्राह्मणांचें वाङ्मय निराळ्या प्रकारचें झालें आणि बौद्धांचें निराळ्या प्रकारचें झालें. सिंहली बखरींमध्यें धर्मप्रसाराचा इतिहास आणि राजांनीं मठांना दिलेलीं दानें यांचाच प्रामुख्यानें निर्देश आहे आणि पुष्कळशा प्रचलित पौराणिक कथांचें आश्रयस्थान ब्राह्मणी वाङ्मयांतील व्यक्तींच्या ऐवजीं बौद्ध व्यक्ती केल्या आहेत. इतिहासकारास ज्या राज्याच्या जमाबंदीच्या, करांच्या, राजनीतीच्या किंवा दुसऱ्या कोणत्याहि सामुच्चयिक संसाराच्या गोष्टीस महत्त्व वाटतें तशा प्रकारच्या गोष्टींविषयीं आस्था जितकी कल्हण दाखवितो तितकी वंसोकार दाखवीत नाहीत असें दिसून येईल.

हिंदुस्थानांत खरी इतिहासलेखनाची आस्था मुसुलमानांनीं उत्पन्न केली. फेरिस्ता, काफीखान, अबुलफजल यांसारखे ग्रंथकार भारतीय इतिहासशास्त्राचे महत्त्वाचे नमुने म्हणण्यास हरकत नाहीं. त्यांच्या अनुषंगानें इतिहासलेखनाची कला हिंदूंमध्येंहि आली. पुष्कळ ठिकाणीं दैनंदिन कृत्याचे गोषवारे किंवा रोजनिशा लिहिणारे अधिकारी होते. ते प्रसंगीं मुसुलमान तसेच प्रसंगीं हिंदूहि असण्याचा संभव आहे आणि त्यामुळें मुसुलमानी इतिहासशास्त्र, हिंदूंत शिरल्यास नवल नाहीं. मराठी राज्यांत बखरी ( पद्य ) निर्माण झाल्या. याशिवाय रोजनिशा वगैरे लिखाण चालू होतेंच.

इंग्रजी राज्य स्थापन झाल्यानंतर मराठ्यांचा इतिहास ग्रांटडफनें लिहिला तो असमाधानकारक वाटल्यामुळें मराठ्यांचा सशास्त्र आणि साग्र इतिहास लिहिला जावा म्हणून प्रयत्न झाला. रा. कीर्तने याचा ग्रँट डफवर एक टीकात्मक निबंध प्रसिद्ध झाला. विष्णुशास्त्री चिपळुणकर यांनीं इतिहासविषयाची व्यापक कल्पना आपल्या निबंधमालेंतील " इतिहास " या निबंधानें करून दिली; पण इतिहासाचें अत्यंत व्यापक स्वरूप आणि इतिहाससंशोधनाची सक्रिय ओळख करून देण्याचें श्रेय रा. राजवाडे यांस आहे. रा. राजवाडे, खरे, पारसनीस आणि त्याचप्रमाणें रा. विनायकराव भावे यांनीं इतिहासविषयक साहित्य पुष्कळच प्रसिद्ध केलें आणि रा. राजवाडे यांच्या प्रोत्साहनानें भारत इतिहाससंशोधकमंडळाची स्थापना झाली. रा. रा. राजवाडे यांनीं पत्रांचें महत्त्व पुढें मांडलें आणि इतिहासाला बखरी कशा कमी महत्त्वाच्या आहेत हें दाखविलें. उपलब्ध साहित्य पाहून त्याची व्यवस्थेशीर मांडणी करून कथासूत्र पद्यण्याचें काम रा. खरे व रा. सरदेसाई यांनीं चांगल्या तऱ्हेनें केलें आहे. महाराष्ट्राबाहेरहि काम झालें नाहीं असें नाहीं प्रो. यदुनाथ सरकार यांनीं मोंगल आणि मराठी इतिहासाकडे लक्ष पुरविलें आहे आणि त्यांनीं शिवाजी आणि औरंगजेब यांचीं चरित्रें प्रसिद्ध केलीं. सध्यां इतिहासाकडे लक्ष चागलें लागलें आहे आणि अधिकारी लेखक जरी थोडे आहेत, तरी पाश्चात्य संशोधकांच्या कसास उतरेल इतकें इतिहासपांडित्य आपल्या देशांत स्थापित झालें आहे हें खास.

महाराष्ट्राच्या दक्षिणेस हिंदुसंस्कृतीचें एक तऱ्हेचें सातत्य होतें त्यामुळें प्राच्यवस्तुसंशोधनशास्त्र आणि अर्वाचीन इतिहास यांचे धागे एकमेकांत अडकतात आणि यामुळें मद्रासकडे इतिहास आणि प्राच्यवस्तुसंशोधनशास्त्र यांवर एकच मनुष्य परिश्रम करीत आहे असें दिसून येईल. दक्षिणेंकडे महत्त्वाचें संशोधक म्हणजे आंध्रचरिताचे कर्ते कोमुरि वीरभद्र राव, प्रो. रंगास्वामी आय्यंगार, टी. गोपीनाथराव, मि. कनकसभे इत्यादि होत.

हिंदुस्थानच्या इतिहासावर परिश्रम करणारे जे यूरोपीय संशोधक झाले व आहेत, त्यांची माहिती विशिष्ट विषयांवर लेख येतील तेव्हां दिली जाईल.

**इत्रिया-गधाला**—काठेवाड. बाब्रा ठाण्यांतील स्वतंत्र खंडणी देणारा तालुका. येथील ग्रासिया काचरकाठी आहेत. यांत इत्रिया व गधाल अशी दोन खेडीं आहेत. भाडलीच्या नैऋत्येस तीन मैलांवर घेलो नदीच्या दक्षिण तीरावर इत्रिया वसला आहे व धासा स्टेशनापासून १४ मैल आंत आहे.

**इत्सिंग**—चिनी प्रवासी. या बौद्ध श्रमणानें हिंदुस्थानला जाण्याकरितां इ. स.६७१ त चीन देश सोडला व जावा मलाक्का या मार्गानें हुगळीच्या मुखाशीं असलेल्या ताम्रलिप्तीमध्यें तो ६७३ त जाऊन पोंचला. कांहीं कालपर्यंत त्यानें नालंद येथें अभ्यास केला व बुद्धगया, वाराणशी, श्रावस्ती, कुब्ज, राजगृह, वैशाली, कुशिनगर या ठिकाणीं तो फिरला ६९२ मध्यें त्यावेळीं चीनला जात असलेल्या तत्सइन् नामक चिनी उपाध्याबरोबर त्यानें आपला ग्रंथसंग्रह चीनला पाठविला. ६९५ मध्यें इत्सिंग स्वतः चीनला परत गेला त्यावेळीं तेथें राज्य करीत असलेल्या वु-हाऊ राणीनें त्याचें चांगलें स्वागत केलें. ७०० व ७१२ या मधील कालांत त्यानें ५६ ग्रंथांचें भाषांतर केलें आणि ७१३ मध्यें ७९ व्या वर्षी वारला.

**इंथ लोक**.—हे लोक ब्रह्मदेशांत दक्षिणेकडल्या शान संस्थानच्या पश्चिम व नैऋत्य या दिशांकडील मुलुखांत पसरले आहेत. पोषाक व चेहरा ह्यांत हे शान लोकांसारखे दिसतात व त्यांचा जन्म ह्या शान लोकांतच जातो पण त्यांची भाषा वेगळी असल्यामुळें त्यांना चटकन् ओळखतां येतें. त्यांच्या भाषेचें आराकानी किंवा तेव्हॉयन भाषेशीं बरेंच साम्य आहे. ह्या साम्यावरून हे लोक आराकान मुलुखांतून आले असावे असा कांहीं लोकांचा तर्क आहे. पण खरी गोष्ट अशी दिसते कीं, हे लोक व आराकानी लोक दोघेहि मूळ ब्रह्मी लोकांपासून आले असावे. ह्या लोकाचा धर्म बौद्ध आहे. सन १९०१ सालीं ह्या लोकांची संख्या ५०४७८ होती. ह्या लोकांची एक लक्षांत ठेवण्यासारखी चाल अशी आहे कीं, हे उभे राहून वल्हें वल्हवितात व वल्हें टेंकण्याच्या खुंटीऐवजीं गुडघ्याच्या वाटीचा उपयोग करतात. ( इं. गॅ )

**इथिओपिया**—हें आफ्रिकेच्या ईशान्य भागांतील एका प्रांताचें प्राचीन नांव. याच्या उत्तरेस इजिप्त व पूर्वेस तांबडा समुद्र आहे या नांवाखालीं निरनिराळ्या काळीं वेगवेगळाले भाग येत असत. होमरनें इथिओप लोक पूर्वेस व पश्चिमेस मनुष्य वस्तीच्या पलीकडे रहात असें म्हटलें आहे. शास्त्रीय ज्ञान वाढल्यानंतर या लोकांसंबंधीं साधारण बरी माहिती मिळूं लागली.

होमरनें उल्लेख केल्यामुळें बऱ्याच ग्रीक शोधकांनीं यांच्या संबंधीं हकीकत लिहिली आहे. हिरोडोटसच्या मतें यांचे एक सरळ केस असलेले आणि दुसरा लोंकरीसारखे केस असलेले असे दोन वंश असून ते अनुक्रमें पूर्वेस व पश्चिमेस रहात. नंतर बऱ्याच जातींचीं नांवें प्रचारांत आलीं. इजिप्शियन

शिलालेखांत बरीच माहिती दिली आहे. तीवरून असें दिसतें कीं, येथें स्वतंत्र जाती हळू हळू इजिप्शियन अंमलाखालीं आल्या. १८ व्या घराण्याच्या वेळीं इथिओपिया हा इजिप्तचा प्रांत होता. यावरील सुभेदाराला केशचा राजा ही पदवी असे व तो निग्रो, बैल, सोनें, हस्तिदंत, दुर्मिळ मणी, कातडीं व घरगुती कामासाठीं लागणारें सामान खंडणी म्हणून देत असे. येथील लोकांत नेहमीं बंडें होत असून तीं मोडल्याबद्दल मंदिरें व स्तंभ उभारीत असत. ख्रि. पू. ११ व्या शतकांत इथिओपिआ स्वतंत्र झाला. याची राजधानी नेपाटा ( आधुनिक मेरवी ) असून तें शहर जेबेलबर्इल 'पवित्र डोंगर' ( सेक्रेड मौंउटन )च्या पायथ्याशीं होतें. ८ व्या शतकाच्या अर्ध्यांत इथिओपियानें इजिप्त जिंकून घेतलें. ख्रि. पू. ६६० च्या सुमारास इजिप्तनें इथिओपियाचें स्वामित्व झुगारून दिलें. इथिओपिया हें पुढें स्वतंत्र राहिलें. येथील काहीं राजांचीं नांवें येणेंप्रमाणेः—तिरहाकपुत्र तांडमाने (६६७–६५०,) ॲस्पेटी ६३०–६०० पॅंखारेर (६००–५६०), हसिओतफ (५६०–५२५), नस्तसेन (५२५–५००), वरील राजांपैकीं दुसऱ्या व पांचव्या राजांच्या स्तंभावरून पहातां या काळीं सुद्धां राजा निवडण्याची पद्धति होती असें दिसतें. गादी रिकामी झाली म्हणजे येथील देव अमॉन हा राजघराण्यांतील एखाद्या पुरुषास निवडीत असे. हाच राजा झाला म्हणजे त्याला ' देवपुत्र ' म्हणत. यापूर्वी व नंतर येथील उपाध्याय वर्गाचें बरेंच प्राबल्य असे. हर्सिओतफच्या स्तंभावर राजानें नऊ स्वाऱ्या करून मेरोईच्या दक्षिणेकडील जातींना वठणीवर आणलें व कांहीं मंदिरें बांधलीं असा मजकूर आहे. शेवटच्या राजाच्या स्तंभावर इथिओपियन राज्यासंबंधीं बरीच हकीकत दिली आहे. हा राज्यावर बसल्यानंतर कॅम्बायसीसनें आपल्या इराणी लष्करासह इजिप्त जिंकून इथिओपीयावर सैन्य पाठविलें; परंतु नील नदीमार्गानें पाठविलेल्या आरमाराचा नाश झाला व हिरोडोटसच्या हकीकतीवरून जमीनीवरील सैन्यांत अन्नाचा दुष्काळ पडून त्याचाहि नाश झाला. त्याचप्रमाणें त्याच्या व त्याच्यापूर्वीच्या राजाच्या वेळेपासून राजधानी मेरोई येथें नेण्यांत आली; परंतु नेपात येथील धार्मिक महत्त्व कायम राहिलें. तेथेंच राज्याभिषेक होत असून प्रमुख देव भविष्य सांगत असे. या इथिओपियन राजांनीं इजिप्त जिंकण्याचा बिलकूल प्रयत्न केला नाहीं; परंतु सुदानमधील जंगली जाती ताब्यांत आणण्याचा त्यांनीं बराच यत्न केला. ख्रि. पू. ४ व ५ शतकांतील इतिहासाची कांहींच माहिती नाहीं. टॉलेमी फिलाडेल्फस याचा समकालीन एर्गमेनीझ यानें नेपाटा येथील उपाध्यायांची कत्तल करून त्यांची सत्ता नाहींशी केली. त्यापूर्वी त्यांची सत्ता इतकी होती कीं, त्यांच्या हुकुमावरून राजास स्वतःचा नाश देखील करून घ्यावा लागत असे. एर्गमेनीझ राजानें ग्रीक संस्कृतीचा प्रचार इथिओपियांत केला असे डिओडोरस म्हणतो. यानंतर या देशासंबंधीं थोडीबहुत माहिती ग्रीक व लॅटीन लेखकांच्या ग्रंथांत येऊं लागली. कांहींच्या मतें येथें कॅन्डेस नांवाच्या राण्यांची सत्ता होती. त्यांच्यापैकीं एका राणीला ख्रि. पू. २२ व २३ त रोमन लोकांशीं युद्ध करावें लागलें. रोमन सेनापतीनें राजधानी व प्रांत सर केला;परंतु ऑगस्टस बादशहानें खंडणी सुद्धां न घेतां सर्व प्रदेश मोकळा केला. स्मृतिस्तंभावरूनसुद्धां येथें फक्त राण्यांचें राज्य असे असें दिसतें. राजा व राणी यांच्याकरितां पिरॅमिड उभारीत असत. नेतेकमेननें बऱ्याच इमारती बांधल्या असून तो व त्याची राणी या दोघांचें चित्र बऱ्याच ठिकाणीं आहे. इमारतींवरील चित्रें व विशेषतः स्त्रियांचीं चित्रें दिसण्यांत बोजड असून त्यांचे चेहरे निग्रोप्रमाणें आहेत व राजपुरुषांच्या अंगावर सोन्याचे पुष्कळ दागिने दाखविले आहेत. इ. स. ४ थ्या शतकांत नुबास व ॲबिसिनियन लोकांनीं मेरोई राष्ट्र धुळीस मिळविलें व ६ व्या शतकांत नुबियांचें ख्रिस्ती राज्य या ठिकाणीं स्थापन झालें.

इथिओपियनांनीं परमार्थसाधनाची कल्पना व संस्कृति हीं इजिप्शियन लोकांपासून घेतलीं. राजांचे लेख चित्रलिपींत लिहिले आहेत. एर्गमेनीसच्या वेळीं शिलालेखांत देशी भाषेचा उपयोग करण्यास सुरवात झाली. ही लिपी अद्याप कोणासहि वाचतां आली नाहीं.

आ क्सु मा ई ट रा ज्य.—पहिल्या शतकांत ( ख्रिस्ती ) आक्सुम येथें नवीन राज्य उदयास आलें. या राज्याची माहिती सहा शिलालेखांवरून लागते एइथेनिस व त्यानंतरचे राजे स्वतःस आक्सुमाइट, होमेराईट, रेडान,इथिओपीयन, सेबीयन, सायली, टिआमो, ब्युगेटी व कासू यांचे अधिपति म्हणवीत. यावरून त्यांनीं दक्षिण अरबस्तानाचा बराच भाग जिंकला असून तो सर्व प्रांत इ. स. ३७८ त त्यांच्या हातांतून गेला असावा. १८३३ त रुपेला सांपडलेल्या शिलालेखांत नुबा व कासू या लोकांवर स्वारी केल्याचा उल्लेख आहे. यानंतरचा इतिहास ज्ञात नाहीं. ६ व्या शतकांत मात्र येथील राजानें दक्षिण अरबस्तानांतील ज्यू राज्य मोडून तो प्रांत आपल्या ताब्यांत आणला, अशी माहिती लागते. या राजाला इथिओपीअन लेखांत कॅलेब, ग्रीक व अरबी कागदपत्रांत एलसबहा ह्या पदव्या लावल्या आहेत. याचा मुलगा अबाहा अथवा अब्राहाम यानें ७ व्या शतकांत पळून आलेल्या महमदाच्या अनुयायांस आश्रय दिला. इ.स.७०० पर्यंत ग्रीक भाषा होती;परंतु त्यानंतर इथिओपिक अथवा गीझ भाषा पुढें आली. इस्लाम धर्माच्या उदयापासून ॲबिसिनीयाच्या आधुनिक इतिहासापर्यंतच्या काळांत अरबी लेखकांनीं कांहीं थोड्या गोष्टी दिल्या आहेत. इथिओपिया व नुब्रिया या प्रांतांमध्यें ६८७ सालीं युद्ध झाल्याचा उल्लेख सांपडतो.

अबिसिनीयन इतिहासकारांच्या मतें हें राज्य मेनलक ( इबन एल–हकीम ) म्हणजे सालोमन व शेवटची राणी

यांचा पुत्र, यानें स्थापिलें. अक्सुमाइट अथवा मेनलक घराण्याला उत्तर ॲबिसिनीयांतून जुडीथ या यहुदी राणीनें हांकून दिलें; परंतु लवकरच तेथें एक ख्रिस्ती घराणें स्थापन झालें. १२६८ त या घराण्यांतील राजानें येकूनो अमलाक नांवाच्या (हा जूडिथनें हांकून दिलेल्या राजाचा एक वंशज) राजपुत्राला आपलें राज्य दिलें.

इ थि ओ पि क वा ङ्म य.—अबिसिनीयांत ख्रिस्ती धर्माचा प्रारंभ होण्याच्या सुमारास गीझ अथवा इथिओपिक भाषेचा वाङ्मयांत उपयोग होऊं लागला. या भाषेंतील हस्तलिखीत ग्रंथांची यादी ( सुमारें १२०० ग्रंथ ) रॉसिनी यांनीं १८९९ सालीं प्रसिद्ध केली. यांपैकीं सर्वांत जास्त संग्रह ब्रिटिश म्युझियममध्यें असून बाकींचा यूरोपांतील मोठाल्या ग्रंथसंग्रहालयांत आहे. कांहीं हस्तलिखित प्रती अबिसीनियांत आहे व पुष्कळसे खाजगी दप्तरांतून आहेत. बायबलांतील कांहीं भागखेरीज बरींच पुस्तकें ( १८९३ त ४० पुस्तकें ) यूरोपांत प्रसिद्ध झालीं आहेत.

कालमानानें गीझ वाङ्मयाचे दोन भाग करतां येतात. पहिला काल ख्रिस्ती मताच्या प्रसारापासून म्हणजे ५ व्या शतकापासून सुरू होतो व ७ व्या शतकांत संपतो. दुसरा काळ मॅलोननीक घराण्याच्या कारकीर्दीपासून ( १२६८ ) तो आजतागाईतपर्यंतचा होय. पहिल्या काळांत ग्रीक ग्रंथांचीं व दुसऱ्यांत अरबी ग्रंथांचीं भाषांतरें झालीं. यांत पहिल्या अथवा दुसऱ्या प्रतीचे सुद्धां ग्रंथकार निर्माण झाले नाहींत. बायबलाच्या भाषांतरामुळें या भाषेचें पावित्र्य व महत्त्व आहे. पहिल्या काळांत जुना करार, नवा करार व इतर ख्रिस्ती पारमार्थिक ग्रंथांचीं रूपांतरें झालीं. याशिवाय शेर अतामखवार, केरोलोस व फीजिअलोगस ( सृष्टीशास्त्रासंबंधीं काल्पनिक ग्रंथ ) वगैरे पुस्तकें झालीं. दुसऱ्या काळांत महत्त्वाचे ग्रंथ म्हटले म्हणजे अबिसिनियाच्या इतिहासासंबंधीं होत. सहेफेटे एक्षेझीनीत ( सेक्रेटरी ) नांवाच्या एका दरबारी अधिकाऱ्याच्या हाताखालीं बरेच लेखक असून तो दर वर्षाची सर्व हकीकत लिहून ठेवी. या माहितीवरूनच सर्व इतिहास लिहिले आहेत. सर्वांत जुना इतिहास म्हणजे अमदा सिऑन ( १३१४–४४ ) मुसुलमानाविरुद्ध युद्धाचा. फक्त याच इतिहासकाराची भाषा व पद्धति वाङ्मयास साजेशी होती.

इतर वाङ्मयाला वरील इतिहासांपेक्षां लवकर सुरवात झाली. राजा येकूनो अमलाक ( १२६८–८३) याच्या वेळेस केब्रा नागासिट नांवाची ऐतिहासिक कादंबरी झाली असावी. यागबीसिआनच्या काळीं ( १२९४ ) एथिओपियन वाङ्मयजागृतीचा आद्य प्रवर्तक अब्बा सलाम याचे ग्रंथ झाले आहेत. शर्साडेंगेल ( १५९५ ) याच्या कारकीर्दींत बरीच ग्रंथरचना झाली. या भाषेंतील काव्यरचना म्हणजे प्रार्थनागीतें होत.

कायद्याच्या ग्रंथांत 'फादा नागा सेंट' हें फार महत्त्वाचे पुस्तक असून हें इब्न आसळच्या अरबी कायद्याच्या ग्रंथाचे १६ व्या शतकांतलें रूपांतर असावें. हा ग्रंथ मूळ मुसुलमानी अंमलांतील ख्रिस्ती लोकांसाठीं होता. हा ग्रंथ स्वतंत्र ख्रिस्ती राष्ट्राला निरुपयोगी होता, तरी अबिसीनियाला असला ग्रंथ आवश्यक असल्यामुळें हा लोकप्रिय झाला.

या भाषेंत शास्त्रीय वाङ्मय मुळींच नाहीं म्हटलें तरी चालेल.ब्रिटिश म्युझियममध्यें फक्त वैद्यकीवर एक ग्रंथ आहे. तत्त्वज्ञानाचें वाङ्मय म्हणजे बायबलावरील टीका व इतर कांहीं पुस्तकें होत. याशिवाय पत्रव्यवहार सवासेव नांवाचा राष्ट्रकोश वगैरे कांहीं लिखाण आहे. छापला गेलेला पहिला एथिओपिक ग्रंथ म्हणजे साल्टर ( रोम १५१३ ) होय.

[ सं द र्भ ग्रंथ—फ्युमागली—बिब्लिओग्राफिआ एटिओपिका ( १८९३ ) ब्रिटिश म्युझिअम, पॅरिस, आक्सफोर्ड, बर्लिन, फ्रँकपोर्ट वगैरे ग्रंथसंग्रहालयाचे कॅटलॉग रॉसिनी—'नोट परला स्टोरिआ लेटेरारिया ॲबिसिना'रेंडिकाँटी डेला आर. अकॅड. डी लिन्सी. ( १८९९ मध्यें ) ए. ब्रि. ].

**इथिल ( एथिल ).**—सामान्य अल्कहल ( एथिल अल्कहल ), सामान्य इथ्र (ईथर) आणि दार्वम्ल ( असेटिक ॲसिड) यांतील मूलकास इथिल असें रासायनिक नांव आहे इंग्रजी नांव एथिल असें आहे. एथिल हे ईथर + इल याचें संक्षिप्त रूप आहे व ईथर याची व्युत्पत्ति ग्रीक शब्द एइथो म्हणजे पेटणें, जळणें, प्रकाशणें यापासून आहे व एइथो यांतील धातु संस्कृत इथ्–इन्ध् यांशीं सगोत्र आहे म्हणून इथिल असें नांव दिलें आहे.

ज्या संयुक्त पदार्थांत इथिल हा मूलक आहे त्या संयुक्त पदार्थांचें विवरण अन्य स्थळीं दिलें आहे. या इथिल मूलकाचा उज्जिद ( हायड्राइड ) इथुन ( इथेन ) $क_2 उ_6$,अल्कहल ( इथिल अल्कहल ) $क_2 उ_5$ प्रउ आणि प्राणिद (ऑक्साइड ) $(क_2 उ_5)_2$ प्र हा सामान्य इथ्र होय.

**इथिल अल्कहल.**-(एथिल आल्कोहोल) इथिल अल्क $क_2 उ_5$ प्रउ यास व्यवहारांत मद्यार्क ( स्पिरिट्स् ऑफ वाइन ) असें म्हणतात हा पदार्थ फार प्राचीन काळापासून पाश्चात्यांस व भारतीयांस माहित आहे. लाव्हाझिए यानें याची जातिपरीक्षा ( क्वालिटेटिव्ह ) निश्चित केली व सॉसुरे यानें प्रथम याची परिमाण( क्वान्टिटेटिव्ह ) परीक्षा ठरविली.

सृष्टीमध्यें हा अल्कहल जरी अल्पप्रमाणांत आढळतो तरी त्याची व्याप्ति पुष्कळ आहे हा अल्कहल कित्येक फळांत आढळतो. तसेंच दगडी कोळशाच्या डांबरांत झाडाच्या तेलांत, लांकडाच्या पातन विधीनें (डिस्टिलेशन ) काढलेल्या अर्कांत बिस्कुट, पाव ( ब्रेड ) वगैरेमध्यें व मधुमेह झालेल्या माणसाच्या मूत्रांत देखील असतो.

संयोगीकरणः— इथिल अल्कहल हा संयोगीकरणानें ( सिंथेसिस ) पुढील रीतीनीं तयार करतां येतोः—

( १ ) कर्ब आणि उज्ज ( हायड्रोजन ) यांचा संयोग करून दारिलीन ( ॲसिटायलीन ) क$_{२}$उ$_{२}$ तयार होतो. दारिलीन क$_{२}$उ$_{२}$ वर नवजात ( नॅसंट )उज्जची क्रिया केली म्हणजे त्याचें रूपांतर इथिलिन क$_{२}$ उ$_{४}$ ( एथायलीन ) मध्यें होते. इथिलिन क$_{२}$उ$_{४}$ वर तीव्र गंधकाम्लाची उ$_{२}$ गप्र$_{४}$ क्रिया केली म्हणजे त्यापासून इथिल उज्ज गंधकित क$_{२}$गप्र$_{४}$ ( एथिल हायड्रोजन सल्फेट ) तयार होतो. याचें पातन ( डिस्टिलेशन ) केलें म्हणजे क$_{२}$उ$_{५}$प्रउ इथिल अल्कहल तयार होतो. ही रीत फॅरॅडे यानें शोधून काढिली व इ. स. १८५५ मध्यें बर्थेलॉट यानें तीस पुष्टि दिली.

(२)इथिलीन वायु क$_{२}$उ$_{४}$ उद् अदाम्ल(हायड्र् आयोडिक ॲसिड ) बरोबर उष्ण केला म्हणजे इथिल अदिद क$_{२}$उ$_{५}$द हा संयुक्त पदार्थ तयार होतो. त्याचें पृथक्करण पालाश उत्प्राणिद ( पा प्रउ ) नें केलें म्हणजे इथिल अल्कहल क$_{२}$उ$_{५}$प्रउ तयार होतो. या रासायनिक क्रिया खालील समीकरणांत दाखविल्या आहेत.

( १ ) इथिलीन क$_{२}$ उ$_{४}$ + उद्–अदाम्ल उद = इथिल अदिद क$_{२}$ उ$_{५}$ द

इथिल अदिद पालाश उत्पाणिद इथिल अल्कहल पा. अ.
क$_{२}$उ द + पा प्रउ = क$_{२}$ उ$_{५}$प्रउ + पाद

या क्रियेंत इथिल अदिदापासून इथिल अल्कहल तयार होतो यावरून इथिल अल्कहलाची सारणी कउ$_{३}$.कउ$_{२}$.प्रउ अशी साधार सारणी आहे हें ठरतें.

( ३ ) पाण्याच्या सान्निध्यांत सिंधुमेला ( अम्लगॅम ) च्या प्रायोज्विदाचा ( आल्डिहाइड ) योग केला म्हणजे नवजात ( नॅसंट ) उज्ज उद्भूत होतो. तो प्रायोज्विदाशीं क$_{२}$उ$_{४}$प्र संयुक्त होऊन त्याचें रूपांतर इथिल अल्कहलांत क$_{२}$उ$_{५}$प्रउ होतें जसेंः—

प्रायोज्विद उज्ज इथिल अल्कहल
क$_{२}$ उ$_{४}$ प्र + उ२ = क$_{२}$ उ$_{६}$ प्र = क$_{२}$ उ$_{५}$प्रउ

परंतु या केवळ शास्त्रीय रीती आहेत. व्यवहारांत शर्करायुक्त पदार्थांवर विपाकक्रिया ( फरमेन्टेशन ) करून हा अल्कहल तयार करितात. ज्यांत साखरेचा अंश आहे असा फळाचा किंवा व वनस्पतींचा रस हवेमध्यें तसाच कांहीं दिवस राहू दिला तर हलके हलके त्यांत विकृति होत जाते व त्याचा मूळचा गोडपणा नाहींसा होतो. ही विकृति म्हटली म्हणजे साखरेचें पृथक्करण होऊन तिचें कर्बाम्ल ( कर्बद्विप्राणिद ) व अल्कहल यांत रूपांतर होतें. ही क्रिया दाखविणारें समीकरण असेंः—

शर्करा अल्कहल( इथिल )कर्बद्विप्राणिद
क$_{६}$ उ$_{१२}$ प्र$_{६}$ = २ क$_{२}$ उ$_{६}$ प्र + २ क प्र$_{२}$

या क्रियेला विपाकक्रिया (फरमेंटेशन)म्हणतात या विषयीं जास्त विवरण अन्यत्र केलेलें आहे.

द्राक्षशर्करा, इक्षुशर्करा वगैरे केल्यावर मागें राहिलेली काकवी "बीटपासून साखर केल्यावर राहिलेला गाळ, इत्यादि शर्करायुक्त पदार्थांपासून विपाकक्रियेनें अल्कहल ( इथिल ) हल्लीं तयार करितात. फलशर्करा क$_{६}$उ$_{१२}$प्र$_{६}$आणि इक्षु शर्करायापासून परंपरेनें अल्कहल तयार होतो. तसेंच पिष्टसत्त्व (स्टार्च), कोंम आलेल्या यवाचा( जवाचा ) द्रव यांपासूनंहि अल्कहल तयार होतो. विपाकक्रिया चांगली चालण्यास द्रवांत त्याच्या एकअष्टमांश वजनाची तरी साखर असावी लागते आणि इतकी साखर असल्यावर त्या द्रवाचा चारपंचमांश भाग अल्कहलांत रूपांतर पावतो. अल्कहलाबरोबर विपाकक्रियेंत दुसरेहि पदार्थ तयार होतात. विपाकक्रिया चांगली चालण्याकरितां फलशर्करेशिवाय नत्रयुक्त पदार्थ द्रवांत असले पाहिजेत. हे पदार्थ फळाच्या दाबून काढलेल्या रसांत जात्याच असतात. यामुळें त्या रसाची विपाकक्रिया चांगली व ताबडतोब होते.

अल्कहल काढण्याच्या कामीं जे पदार्थ वापरण्यांत येतात ते व त्यांपासून अल्कहलकरितां द्रव तयार करण्याची कृतिः—अल्कहलाकरितां द्राक्षें सफरचंद, अननसपाती, केळीं, वगैरे बहुतेक गोड फळें चालतात. वरील रसभरित व गोड फळांचा रस काढून कांहीं वेळ ठेवला म्हणजे त्या रसांतल्या द्रव्यांत विपाकक्रिया सुरू होते. फळांच्या सालीवर विपाकक्रिया घडवून आणणारे अति सूक्ष्म जंतू असतात. यांस इंग्रजींत यीस्ट म्हणतात. मराठींत किण्व किंवा विपाकजंतु म्हणतात. फळांचा रस काढतांना हे जंतू रसांत जातात व तेथें त्यांची वाढ झपाट्यानें होते. हे जंतू गोलकांप्रमाणें असून त्यांस कोणतेहि अवयव नसतात. या विपाक जंतूच्या गोलकांत आपोआप कांहीं वेळानें एक रेघ दिसूं लागते व या रेघेच्या ठिकाणीं कांहीं वेळानें तो गोलक दुभंगून त्याचा प्रत्येक हिस्सा पुन्हां गोल होतो, व वाढत जातो. कांहीं वेळनें पुन्हां या नवीन गोलकांत रेघ दिसूं लागते. अशा तऱ्हेनें प्रत्येक गोलकाचे दोन दोन हिस्से होऊन त्यांपासून नवीन गोलक तयार होतात व या किण्वांची किंवा विपाकजंतूची वाढ झपाट्यानें होते. कांहीं विवक्षित बाबतींत या गोलकाला एका बाजूला प्रतिगोलक येतो व तो वाढत जाऊन त्याचा नवीन गोलक तयार होऊन तो मूळ गोलकापासून सुटा होतो. या विपाकजंतूच्या द्वारें फळाच्या रसांतलि साखरेचें वर सांगितल्याप्रमाणें रूपांतर होऊन अल्कहल व कर्बाम्ल तयार होतात. विपाकक्रिया सुरू झाली म्हणजे रसाला अल्कहलाची घाण येऊं लागते व कर्बाम्ल वायूचे बुडबुडे रसांतून वर येऊन रसाच्या पृष्ठभागावर फेंस येतो. ही विपाकक्रिया पुर्ण झाली म्हणजे तो द्रव अल्कहल काढण्यास तयार झाला.

( २ ) अल्कहल गहूं, जव, बाजरी, ज्वारी वगैरे एकदल व पिष्टसत्त्वमय धान्यांपासूनहि तयार करितात. हीं धान्यें पाण्यांत भिजवून जमीनीवर पसरलीं म्हणजे त्या धान्यांतून

मोड येतात. धान्य प्रथम पाण्यांत भिजत घालतात येणेंकरून कुजकेनासके व हलके दाणे असतील ते वर येतात. त्यांस झान्यानें काढून टाकावें, म्हणजे चांगले व जड दाणे तळीं जातात. सर्व दाणे फुगून मऊ होईपर्यंत ४०—६०तासपर्यंत भिजत ठेवितात. पाहिलें पाणी काढून दुसरें नवें पाणी दोन तीन वेळ घालावें. दाणे फुगून दिढीनें वजनांत वाढले म्हणजे ते धुऊन ढीग करून ठेवावेत. पाणी निचरून गेलें म्हणजे ढिगांतील दाणे एक दोन दिवसांत पुनः गरम होतात व एक दोन दिवसांत पुनः कुजून जाड कोम येऊं लागतात. कोम फुटतांच अंधार असलेल्या खोल्यांत दाणे सारखे पसरून वाळत घालावे. याप्रमाणें १२।१४ दिवस वाळत ठेवावेत. दररोज एक दोन वेळ खालवर करीत असावें. यामुळें दाण्यांस सारखें उष्णमान मिळून सर्व दाण्यांस सारखे कोम येतात खोलीचें उष्णमान ६०° किंवा ७०° ठेवावें हवा गरम असेल त्या मानानें कोम येण्याची क्रिया १०।१५ दिवसांत पूर्ण होते. अंकुरास पानें येण्यापूर्वीच ही क्रिया बंद करावी. सरासरी इंचभर लांब कोम फुटून त्यांस ढेळकीं फुटल्यावर पानें येण्यापूर्वीच दाण्यामध्यें बराच मंड ( डायास्टेस ) उत्पन्न होतो. नंतर पत्र्यास चाळणीप्रमाणें भोकें पाडून त्या पत्र्यावर २ इंच जाड दाण्यांचा थर पसरून हवेच्या गरम प्रवाहांत त्यांस वाळवावें. ही गरम हवा प्रथम ३०°-३१° उष्णमानाची असावी. कांहीं तास या उष्णमानावर वाळवून नंतर हलके हलके उष्णमान वाढवीत वाढवीत ५८°—५९° उष्णमान करावें व दाणे मधून मधून ढवळावे. नंतर दाणे चाळून त्यांपासून कोंबांचे तुकडे वगैरे निराळे करावे. जवापासून शेंकडा ८० भाग हे भाजलेले दाणे ( यवमांड ) तयार होतात. गहूं, रागी वगैरे पासूनहि हे "यवमांड" तयार करतां येते. ( यवमांड = माल्ट ) जवापासून जे "मांड" ( माल्ट ) याप्रमाणें तयार होतें त्यांत त्याच्या वजनाच्या $\frac{3}{5000}$ मात्र मंड ( डायास्टेस ) असतें व हें पिष्टसत्वाचें शर्करेंत रूपांतर करण्यास पुरेसें होते. ही मांड ( माल्ट ) करण्याची रीत जवास लागू आहे. इतर धान्यांपासून मांड करण्यास या रीतींत थोडाफार धान्याच्या स्वरूपाप्रमाणें फरक करावा लागेल.

हे मांड तयार झाले म्हणजे त्यांचे पीठ १८०° उष्णमानाच्या गरम पाण्यांत घालून पातळ द्रव करावा, व कांहीं तास तसाच ठेवावा. म्हणजे त्यांत असलेल्या 'मंड" ( डायास्टेस ) नें बहुतेक पिष्टसत्वाचें रूपांतर होऊन त्याची द्राक्षशर्करा होते. नंतर त्यांत थोडें किण्व ( यीस्ट ) घालून विपाकक्रिया करावी म्हणजे अल्कहल काढण्यास द्रव तयार होतो.

उंसाचा रस, साखर, गूळ काकवी, ताडीचा गूळ वगैरे सारखे पदार्थ असतात त्यांत साखरेचा अंश पुष्कळ असतो. यांपासून साखर तयार करतांना प्रथमतः रसांतला गाळ फुकट जातो. या गाळांत साखर असून ती निराळी करितां येत नाहीं, त्याचप्रमाणें उंसाच्या रसावरली मळी किंवा राब वगैरे पदार्थांत पाणी घालून पातळ मिश्रण तयार करितात त्यांत किण्व घालून त्याची विपाकक्रिया करितात. उंसाच्या साखरेवर विपाकक्रिया लवकर घडत नाहीं याकरितां तिचे गंधकाम्लाच्या योगानें द्राक्षशर्करा व फळशर्करा यांत रूपांतर करवून नंतर तिची विपाकक्रिया करितात.

बटाटे, रताळीं किंवा यांसारखे पिष्टसत्त्वयुक्त कंद किसून ते पाण्यांत घातले म्हणजे त्यांतील पिष्टसत्त्व पाण्यांत उतरतें हें निराळें काढून त्यांत "मांड" चें पीठ मिसळतात व पाण्यांत घालून त्यांत किण्व घालतात. मांडांतील मंड ( डायास्टेस )च्या योगानें पिष्टसत्त्वाचें रूपांतर होऊन मांड शर्करा ( माल्ट शुगर ) होते व नंतर या शर्करेवर विपाकक्रिया घडली म्हणजे त्यापासून अल्कहल तयार होतो.

आपल्याकडे मुख्यत्वें मोहाच्या फुलांपासून अल्कहल तयार करतात. या फुलांत साखरेचा अंश बराच असतो व यांत नैसर्गिक "किण्व" असल्यानें हीं फुलें पाण्यांत टाकल्यावरोबर विपाकक्रिया सुरू होते. ही क्रिया हवेच्या मानाप्रमाणें पांच दहा दिवसांत पूर्ण होते.

प्रमाण—फळापासून जो विपाकक्रियेनंतर द्रव तयार होतो. त्यांत शेंकडा १०—२० पर्यंत अल्कहलाचें प्रमाण असतें, धान्याच्या विपक्व ( फर्मेन्टेड लिकर ) द्रवांत शेंकडा ५—८ असतें. शर्करायुक्त द्रवांत व पिष्टसत्वयुक्त पदार्थांपासून तयार केलेल्या विपक्व द्रवांत अल्कहलाचें प्रमाण शर्करेच्या प्रमाणावर अवलंबून असतें.

अल्कहल तयार करणें:—या विपक्व झालेल्या द्रवाचें नंतर पातन यंत्रानें पातन करून सजल असा अल्कहल तयार होतो. या कामीं तांब्याचीं मोठमोठीं पातनपात्रें असून तीं निरनिराळ्या प्रकारचीं असतात. या पातन पात्रास इंग्रजींत पॉटस्टिल असें म्हणतात.

एका पातनयंत्रांत एक मोठें पात्र तापक म्हणून असून त्याच्या खालीं उष्णता लावतात. तापकावर एक दुसरें भांडें शीर्षासारखें जोडलेलें असतें या शीर्षांतून एक नळी काढून ती दुसऱ्या एका शोधक नांवाच्या भांड्यास जोडलेली असते. या शोधकावर पुन्हा एक दुसरा शोधक जोडलेला असतो व त्यांतून एक नळी अनेक वेढे घेऊन शीतकांतून नेऊन ग्राहकांत सोडलेली असते.

तापकांत विपक्व द्रव भरून त्याला विस्तवानें किंवा वाफेनें तापविण्याची व्यवस्था केलेली असते. तापकांतल्या द्रवाची वाफ शीर्षांत जाऊन नळीनें शोधकामध्यें येते. शीर्ष उंच असल्या

कारणानें त्यांतून वाफ वर चढत असतांना थोडी थंड होते व त्यामुळें त्यांत असलेल्या पाण्याच्या वाफेच्या बऱ्याचशा भागाचें प्रवाही रूप होतें. शोधकामध्यें वाफ आल्यावर जास्त थंड होते व येथें त्या वाफेंत असणाऱ्या बहुतेक पाण्याचा अंश द्रवरूप होऊन तळाशीं जातो व तेथून तो एका नळीनें परत तापकांत नेऊन सोडलेला असतो. शोधकामध्यें जी वाफ शिल्लक रहाते ती त्याच्या डोक्यावरील दुसऱ्या शोधकाभोंवती थंड पाणी खेळविलेलें असतें तेथें जाते. येथें वाफेंतले अल्कहलाव्यतिरिक्त सर्व पदार्थ द्रवरूप होतात. व त्याबरोबर कांहीं मद्यार्काचीहि वाफ द्रवरूप होते. हा द्रव या वरील शोधकांतून पुन्हा खालील शोधकामध्यें येतो व तेथून तापकांत जातो. वरील शोधकांत जी वाफ राहते ती बहुतेक शुद्ध अल्कहलाची असते. या दोन शोधकांमध्यें अल्कहलव्यतिरिक्त बहुतेक सर्व पदार्थ द्रवरूप होऊन निराळे होतात म्हणने अल्कहलाच्या वाफेचें शोधन होतें म्हणून यांस शोधक असें म्हणतात. इंग्रजींत खालच्याला ' डबलर ' म्हणने द्वितशोधक व वरच्याला रेक्टीफायर म्ह० शोधक असें म्हणतात. वरील शोधकांत राहिलेली अल्कहलाची वाफ एका नळींत जाऊन तेथून एका सर्पिल (वेढे असलेल्या) नळींत (वर्म) येते. ही सर्पिल नलिका एका हौदांत असून या हौदाचें पाणी सारखें थंड राहील अशी व्यवस्था केलेली असते. पाण्याच्या शीततेनें अल्कहलाच्या वाफेचा द्रव होऊन तो तोटीनें ग्राहकांत जमा होतो.

याप्रमाणें विपक्व द्रवाचें या पातनयंत्रांत पातन केलें असतां अल्कहल बराच शुद्ध असतो. परंतु या प्रकारचें पातन पात्र सर्वत्र ठिकाणीं वापरण्यांत येत नाहीं. सर्वत्र बहुधा सरफोस यंत्राचा अल्कहल तयार करण्यांत उपयोग करितात. यामुळें पाण्याशिवाय दुसऱ्याहि पदार्थांचा अंश अल्कहलांत येतो. याकरितां तो शुद्ध करण्याकरितां त्याचें आंशिक पातन ( फ्रॅक्शनल डिस्टिलेशन ) करावें लागतें. प्रथम जो भाग ग्राहकांत येतो त्यांत प्रायोज्जिद, दारन वगैरे बाष्पभावी पदार्थ असतात, यानंतर शुद्ध अल्कहल जमतो. यांत शेंकडा ९० पर्यंत अल्कहल असतो. यानंतर अखेरीस असरक तैल ( फ्युझेल ऑइल ) या नांवाचा एक अल्कहल निघतो. हा पूर्णपणें काढून टाकण्यासाठीं पातनविधि करण्यापूर्वी ताज्या लांकडी कोळशाच्या पुडींतून गाळल्यानें हें तेल त्यात शोषलें जातें. याप्रमाणें गाळून पुनः द्रव्याचें पातन १–२ वेळ केल्यानें बराच शुद्ध अल्कहल तयार होतो. यास शुद्ध अल्कहल ( रेक्टिफाइड स्पिरिट ) म्हणतात. विशेष प्रकारचीं सुधारलेलीं पातनपात्रें या कामीं घेतल्यास एकाच वेळीं बराच शुद्ध अल्कहल निघतो. तथापि त्यांत पाण्याचा थोडाबहुत अंश राहतो. हा पाण्याचा अंश समूळ काढून टाकून अगदीं निर्जल अल्कहल ( ॲबसोल्यूट आल्कोहोल ) तयार करण्यासाठीं आर्द्रताशोषक पदार्थांचा उपयोग करावा लागतो. पालाशकर्बिता ( पोट्याशिअम कार्बोनेट)च्या अंगीं आर्द्रता शोषून घेण्याचा धर्म असल्यानें तो प्रथम या कामीं वापरतात. पालाशकर्बित अल्कहलांतील पाण्यांत विद्रुत होऊन जो द्रव होतो तो अल्कहलाहून जड असल्यानें तळीं बसतो व तो अल्कहलांत मिसळत नाहीं. यामुळें अल्कहल शुद्ध करण्यास याचा उपयोग फार होतो. तथापि अल्कहलांत शेंकडा ४ किंवा ५ भाग पाणी राहतेंच. हा पाण्याचा अंश काढण्याकरितां भाजलेल्या चुनकळ्यांचा उपयोग करावा लागतो. भाजलेल्या चुनकळ्या पातनपात्रांत घालून त्यावर हा अल्कहल ओतावा आणि बराच वेळ त्यास मिश्र होऊं द्यावें म्हणजे चुनकळ्या पाणी शोषून घेतील नंतर त्या मिश्रणाचें जल तापा (वाटरबाथ)वर पातन करावें ही क्रिया १–२ वेळां केल्यावर अल्कहल पुष्कळ निर्जल होतो. हा पाण्याचा अंश काढण्यासाठीं सिंधु धातु ( सोडिअम ) किंवा भारप्राणीद त्यांत घालून जलतापावर त्याचें पुनः पातन करावें म्हणजे रसायनशास्त्रदृष्ट्या पूर्ण निर्जल अल्कहल तयार होतो.

अल्कहलांत पाण्याचा अंश आहे किंवा नाहीं हें पहाण्याकरितां त्यांत भाजलेल्या मोरचूदाची पूड घालावी. पूर्ण निर्जल असला तर त्या पुडीच्या पांढरेपणांत कांहीं फरक होणार नाहीं परंतु पाण्याचा अंश असल्यास त्या पुडीस निळसर झांक येईल. भारप्राणिद ( बेरियम आक्साइड ) घातल्यास तो विद्रुत होईल व द्रवास पिवळा रंग येईल. उदीन ( बेंझीन ) घातल्यास गढूळपणा येईल.

धर्मः—अल्कहल रंगहीन, बाष्पभावी, ज्वालाग्राही व द्रवरूपी असतो. यास मधुरसा दारूचा वास येतो. परंतु अगदीं शुद्ध व निर्जल अल्कहल असल्यास त्यास कोणत्याहि प्रकारचा वास येत नाहीं—तो निर्गंध असतो. अल्कहलास तिखट व दाहक अशी रुचि असते. याचा उत्क्वथनांक ( बायलिंग पाइंट ) ७८·३° आहे. हा ०° खालीं—१३०·५° ची शीतता होईपर्यंत द्रवरूप राहतो, व या शीतमानावर थिजतो. शुद्ध स्थितींत १५·६ उष्णमानावर याचें वि. गु. ०.७९४ असतें. ०° वर ०·८०६२५ असतें.

त्याच्या पृष्ठभागाच्या सान्निध्यांत बत्ती आली असतां तो पेटतो. त्याची ज्वाला निर्धूम, फिकट व निस्तेज, निळसर असते. हवेवर उघडा राहिल्यास हा उडून जातो व त्यावर प्राणवायूचा कांहीं परिणाम होत नाहीं.

विपाकक्रियेनें तयार केलेल्या सर्व प्रकारच्या दारूंत अल्कहल हा मुख्य घटक असतो. हा मादक आहे. पुष्कळ प्रमाणांत याचें सेवन केल्यास निशा येते व गुंगी येऊन घातक परिणामहि घडतात.

प्रयोगशाळेंत रसायनकार्यें करण्यास याचा दिवा फार उपयोगी पडतो. याच्या ज्वलनापासून फार तीव्र उष्णमान उत्पन्न होतें व याच्या ज्योतींत थंड पदार्थ धरल्यास त्यावर

काजळी धरत नाहीं यास हवेंत जाळिलें म्हणजे फार थोडा प्रकाश पडतो. कारण सर्व अल्कहलाचें रूपांतर होऊन कर्बाम्ल व पाणी हे पदार्थ तयार होतात. अल्कहलाच्या एका अणूचें पूर्ण ज्वलन होण्यास प्राणवायूचे तीन अणु लागतात जसेः—



$$\text{अल्कहल } क_2उ_6प्र + ३प्र_2 = \text{कर्बद्विप्राणिद } २कप्र_2 + \text{पाणी } ३उ_2प्र$$

अल्कहलाची वाफ आरक्तोष्ण केलेल्या नळींतून नेली तर तिचें पृथग्भवन होतें. उष्णतामानाप्रमाणें उत्पन्न होणारे पदार्थ भिन्न असतात. कमी उष्णमानावर पाणी $उ_2$ प्र, तैलवायु (इथिलीन $क_2उ_4$,) अनूप वायु (मार्शगयास) $कउ_4$, कर्ब एक प्राणिद कप्र, व दारिलीन $क_2उ_2$ ( असिटायलीन ) हे तयार होतात. आणि लाल भडक रक्तोष्णमानावर कर्ब ऊर्संयुक्त होऊन उज्ज निघतो.

तीव्र गंधकाम्लाप्रमाणें अल्कहलाच्या अंगीं आर्द्रता शोषण्याचा धर्म आहे. पाण्यांत मिसळला असतां उष्णता उत्पन्न होते व मिश्रण थोडें मूळच्याहून आकुंचन पावतें.

तोंडाशीं दोन फुगे असलेली व वरच्या फुग्यास कांचेचें बूच असलेली लांब नळी घेऊन दोन फुग्याचा जेथें संधि होतो तेथपर्यंत खालच्या फुग्यांत पाणी भरावें; आणि वरचा फुगा अल्कहलानें गच्च भरून बूच बसवावें व नळी उलटी करावी म्हणजे मिश्रण होऊन द्रव आकुंचित होतील व नळींत रिकामी जागा राहील तींत पाण्यांत विद्रुत असलेल्या हवेचे बुडबुडे चढूं लागतील. पाणी व अल्कहल यांचें जवळ जवळ समान आकारमान असल्यास फार आकुंचन होतें. उदारणार्थं °० उष्णमानावर ५३.९ मापें अल्कहल आणि ४९°.८ मापें पाणी मिसळल्यास त्यांचें आकारमान ( ४९·८ + ५३°·९ ) = १०३·७ न होतां मिश्रणाचें आकारमान फक्त १०० मापें होईल. अल्कहलाच्या अंगीं हा पाण्याचे ठायीं स्नेह आहे म्हणूनच अल्कहलांत उभ्दिज व प्राणिज पदार्थ न कुजतां राहूं शकतात, कारण कुजण्याची क्रिया चालण्यास पाणी आवश्यक असतें व ते अल्कहलानें शोषलें जातें.

अल्कहलांत पाणी मिश्रण करून त्यास नियमित प्रमाणांत पातळ करण्याची रीतः—ही खालील रीत या कामीं चांगली व बिनचूक आहेः—आ = तीव्र अल्कहलाचें शेंकडा आकारमान. अ = सौम्य अल्कहलाचें शेंकडा आकारमान तीव्र अल्कहलाचें अ आकारमान घेऊन त्यांत पाणी मिळवून आ इतकें आकारमान करावें. मिश्रण चांगलें मिश्र होऊन मिश्रणाचे आकारमान स्थिर होऊन त्याचें उष्णमान मूळ अल्कहल व पाणी यांच्या उष्णमाना-इतकें झाल्यावर त्यांत आलेली घट पाणी घालून बरोबर आ आकारमान करावें. उदाहरणार्थ–पातन करून आलेल्या अल्कहलांत शेंकडा ५० शुद्ध अल्कहलाचें प्रमाण असून तें शेंकडा ३० प्रमाणांत करण्याचें आहे तर शेंकडा ५० अल्कहलाचें ३० आकारमान घेऊन त्यांत पाणी घालून ५० आकारमान करावें, चांगलें मिश्रण करून थंड झाल्यावर आलेली घट पाण्यानें भरून काढावी.

द्रावक धर्म.—अल्कहलांत पुष्कळ पदार्थ विद्रुत होतात. अल्कहलांत दाहक सिंधु व दाहक पालाश शीघ्रविद्राव्य आहेत. त्याचप्रमाणें बहुतेक खनिज अम्लेंहि अल्कहलांत विद्रुत होतात. मूलद्रव्यांपैकीं अद ( आयोडिन ) अल्कहलांत विद्राव्य आहे.

अल्कहलांत पुष्कळ हरिद विद्रुत होतात जसेः—खटहरिद, खांतहरिद, जशदहरिद, काद्य हरिद, लोहहरिद, ( फेरिक क्लोराइड ), ताम्रहरिद ( क्युप्रिक क्लोराइड ), पारदहरिद ( मरक्युरिक क्लोराइड ), स्वर्णहरिद (ऑरिकक्लोराइड ) इत्यादि.

अल्कहलांत पुष्कळ वायू तत्काल विद्रुत होतात. उदाहरणार्थः—नत्रसप्राणिद $न_2$प्र किंवा हास्यकारक वायु; कर्बाम्ल, स्फुरित उज्ज ( फास्फुरेटेड हैड्रोजन ), कर्बनत्र किंवा कनवायु आणि बहुतेक उत्कर्ब ( हायड्रो कार्बन ) पाण्यापेक्षां अल्कहलांत जास्त लवकर विद्रुत होतात. १०० मापें अल्कहलांत ७ मापें उज्ज, २५ मापें प्राण, व १३ मापें नत्र विद्रुत होतात. अगदीं शुद्ध अल्कहलांत स्फुर आणि गंधक हे अल्पांशानें विद्रुत होतात. अम्नवायूहि अल्कहलांत शोषण होतो. दाहकसिंधु किंवा पालाश याप्रमाणें त्यांचे गंधकिद अल्कहलांत विद्राव्य असतात. परंतु यांचे कर्बित व गंधकित अविद्राव्य असतात तसेंच अल्कचें कर्बित व गंधकित हेहि अविद्राव्य असतात.

राळ, बाष्पभावी अस्थिर तेलें, उद्भिज अल्कोदें ( अल्कलॉइडस ) आणि पुष्कळ उद्भिज अम्लें वगैरे सेंद्रिय पदार्थ जे पाण्यांत अविद्राव्य असतात ते अल्कहलांत विद्रुत होतात. सिंधु व पालाश यांचे साबण व अमोनिचा साबण हेहि अल्कहलांत विद्रुत होतात. चरबी व एरंडेल तेल अल्कहलांत विद्राव्य आहेत. परंतु इतर स्थिर तेलें फारच थोडीं विद्रुत होतात. औषधी वनस्पति व इतर औषधें यांचें निष्कासन ( एक्स्ट्राक्शन ) अल्कहलानें करून तें औषधि ५.ामांत पुष्कळ वापरतात. या अल्कहल निष्कासित औषधि द्रवास इंग्रजींत टिंकचर्स असें म्हणतात व मराठींत रंजित अल्कहल किंवा नुसतें " रंजित " असें म्हणतात.

इथिल अल्कहलावर ज्या पदार्थांची रासायनिक क्रिया होते ते खालीं दिले आहेत व त्यापासून उत्पन्न होणारे पदार्थ यांचींहि नांवें दिलीं आहेत.

| क्रियाकारक ( रीएजंट ) | | उत्पन्न होणारे पदार्थ |
|---|---|---|
| १ हर आणि स्तंभ | = | हरल ( क्लोरल ) $कह_3$ कप्रउ |
| | = | स्तंभल ( ब्रोमल ) $कस्त_3$ कप्रउ |

| | | |
|---|---|---|
| २ विरंजन चूर्ण (ब्लीचींग पावडर ) आणि पाणी | = | हरपुत्तिक ( क्लोरोफॉर्म ) कउह$_3$ |
| ३ अद आणि अल्क | | अदपुत्तिक = कउ द$_3$ |
| क्रियाकारक ( री एजंट ) | | उद्‌भूत द्रव्यें |
| ४ हर संघाम्लें उह, उस्त. उद | = | इथिल हरिद क$_2$उ$_5$ह, इथिल स्तंभिद = क$_2$उ$_5$स्त, इथिल अदिद क$_2$उ$_5$द |
| ५ स्तंभ किंवा अद आणि रक्त स्फुर (रेड फॉस्फोरस) | = | इथिल स्तंभिद क$_2$उ$_5$स्त, इथिल अदिद क$_2$उ$_5$द |
| ६ तीव्र गंधकाम्ल | = | इथिल उज्ज गंधकित क$_2$ उ$_5$ उ ग प्र$_4$. इथि लीन क$_2$उ$_4$ किंवा इथ ( ईथर ) क$_4$उ$_{10}$प्र |
| ७ तीव्र नत्राम्ल | = | इथिल नात्रित क$_2$उ$_5$नप्र$_3$ |
| ८ पालाश द्विक्रुमित आणि गंधकाम्ल | = | दारिल प्रायोज्जिद कउ$_3$कउप्र |
| ९ क्रुम त्रिप्राणिद | = | इथिल अल्कहल पेट घेऊन जळूं लागतो, व कर्बद्विप्राणिद आणि पाणी उद्भूत होतात. |
| १० अल्कहलच्या वाफेंत, रक्तोष्ण असलेली प्लातिन तार धरली असतां | | दारिल प्रायोज्जिद कउ$_3$कउप्र |
| ११ कृष्ण प्लातिन आणि अल्कहल हे हवेंत ठेवलें तर | | दार्वाम्ल क$_2$उ$_4$प्र$_2$ |

इथिलितें अथवा इथ प्राणिदें:—धातूच्या योगें अल्कहलांतील उज्ज निःसार्य करून जे संयुक्त पदार्थ तयार होतात. त्यांस इथिलितें अथवा इथप्राणिदें म्हणतात. ते उत्प्राणिदांशी समघटक असतात. परंतु फरक इतकाच कीं उज्जच्या जागीं क$_2$उ$_5$ हा इथिल संयुक्त मूलक निविष्ट झालेला असतो. जसें:—सिंधु उत्प्राणिद धुप्रउ यांतील उच्याऐवजीं क$_2$उ$_5$ इथिल हा संयुक्त मूलक निविष्ट झाला म्हणजे धुप्रक$_2$उ$_5$ सिंधु इथ प्राणिद हा संयुक्त पदार्थ तयार होतो. शुद्ध इथिल अल्कहलावर सिंधु धातूची क्रिया केली म्हणजे क$_2$उ$_5$प्रउ यांतील उत्प्राणिल संघातील उज्जच्या परमाणूच्या ऐवजीं सिंधूचा धु परिमाणु जाऊन क$_2$ उ$_5$ प्र धु हा सिंधु इथिलित किंवा सिंधु इथ प्राणिद हा क्षार तयार होतो. सिंधु इथिलित हा रंगहीन स्फटिक रूप असून आर्द्रतादर्शक ( शोषक ) आहे. सिंधु इथिलिताचा उपयोग शस्त्रक्रियेंत दाहक या दृष्टीनें करतात. हा क्षार शुद्ध अल्कहलाशीं युक्त असला तर त्यास २००° पर्यंत उष्ण केल्याशिवाय त्यांतील अल्कहल उडून जात नाहीं. अल्कहल उडून गेल्यावर मागें क$_2$ उ$_5$ प्रधु हा सिंधु इथिलित पांढऱ्या शुभ्र पुडीच्या रूपानें मागें राहतो. त्यावर पाण्याची क्रिया केली असतां तावडतोब त्याचें पृथक्करण होऊन अल्कहल निराळा होतो जसें—

| सिंधु इथिलित | + | पाणी | = | अल्कहल | + | सिंधु उत्प्राणिद |
|---|---|---|---|---|---|---|
| क$_2$ उ$_5$ प्रधु | | उ प्र उ | | क$_2$ उ$_5$ प्रउ | | धु प्र उ |

पालाश धातूचीहि याचप्रमाणें क्रिया होऊन पालाश इथिलित क$_2$ उ$_5$ प्रपा क्षार तयार होतो.

सिंधु उत्प्राणिद किंवा पालाश उत्प्राणिद व इथिल अल्कहल हे अनार्द्र स्थितींत संयुक्त केले म्हणजे सिंधु इथिलित तयार होतो जसें.

| सिंधु उत्प्राणिद | + | इथिल अल्कहल | = | सिंधुइथिलित | + | पाणी |
|---|---|---|---|---|---|---|
| धुप्र उ | | क$_2$ उ$_5$ प्र उ | | क$_2$उ$_5$ प्रधु | | उ$_2$प्र |

सिंधु व पालाश इथिलितांचा उपयोग धातूंच्या द्रवांतून धातूंस वेगळे काढण्याकडे होतो.

अनार्द्र भार उत्प्राणिदाची ( बॅरिटा ) क्रिया शुद्ध अल्कहलावर केली म्हणजे क$_2$उ$_5$. प्रभा—भार इथ प्राणिद हा क्षार तयार होतो. पाण्याचा नुसता अंश असला तरी याच्या द्रवाचें पृथक्करण होऊन भार इथ उत्प्राणिद वेगळा होतो. भार प्राणिदाचा अल्कहलांत द्रव करून तो उष्ण केला असतां भार इथ प्राणिद द्रवांतून निपात पावतो. कारण उष्ण अल्कहलांत हा क्षार कमी विद्राव्य असतो.

स्फट इथ प्राणिद ( क$_2$ उ$_5$ प्र )$_6$ स्फ$_2$ हा क्षार तयार करण्याकरितां अल्कहलांत स्फट धातु घालून थोडासा अद घालावा व तें मिश्रण उष्ण करावें. या क्रियेमध्यें बहुतकरून प्रथम स्फ$_2$ द$_6$ हा स्फट अदिद. तयार होत असावा; हा तयार होतांच यावर अल्कहलाची क्रिया होऊन त्याचें पृथक्करण होऊन स्फट इथ प्राणिद व उज्ज अदिद हे तयार होतात. यावर ( उज्ज अदिदावर ) असंयुक्त स्फटची क्रिया होऊन त्यांतील उज्ज निःसृत होतो व पुनः स्फट अदिद स्फ$_2$ द$_6$ तयार होतो. यावर पुनः ( असंयुक्त ) अल्कहलाची क्रिया घडून स्फट इथ प्राणिद तयार होतो. याप्रमाणें अदचा अल्पांश असला तरी ही क्रिया सारखी चालू राहते.

थाल्ल इथ प्राणिद क$_2$उ$_5$ प्रथा हा रसरूप असून याचें विशिष्ट गुरुत्व, अतिशय गुरु: ३.६८ आहे यामुळें हा लक्षांत ठेवण्यासारखा क्षार आहे. या क्षाराचा प्रकाशावर वक्रीभवनाचा व प्रसरणशीलत्वाचा फार परिणाम होतो.

इथिल संयुक्त क्षार–इथिल अल्कहल कांहीं क्षारांशीं नियमित प्रमाणानें संयोग पावतो. जसें खटहरिद ( खह$_2$ ) व अल्कहल मिळून खह$_2$ + ४ क$_2$ उ$_5$ प्रउ ह्या घटनचा पदार्थ खटहरिदापासून तयार होतो. जशदहरिद जह$_2$ आणि अल्कहल क$_2$ उ$_5$ प्रउ हेहि याचप्रमाणें संयुक्त होऊन जह$_2$ + २ क$_2$ उ$_5$ प्रउ या घटनेचा पदार्थ तयार होतो.

परीक्षा—( १ ) एखादा पदार्थ अल्कहल ( इथिल आहे किंवा नाहीं हे पहाण्याकरितां परीक्ष्य द्रव्यांत उद-हराम्ल घालावें आणि नारिंगी ( ऑरेंज ) रंग येईपर्यंत पालाश द्विक्रुमित पुरेसें घालावें. तुलना करण्याकरितां या मिश्रणाचे दोन भाग करून परीक्षानळींत घालावेत. यापैकीं एक भाग उकळी येईपर्यंत कढवावा. परीक्ष्य द्रवांत जर अल्कहलाचें वास्तव्य असेल तर त्या उकळलेल्या द्रवाचा रंग हिरवा होऊन त्यास प्रायोज्जिदा ( आल्डिहाइड ) चा लाक्ष-

भिक गंध येईल. यांत जी रासायनिक क्रिया होते ती खालीं दाखविली आहे:—

पालाश द्विकुमित उद्–हराम्ल इथिल अल्कहल

पा$_२$ कु$_२$ प्र$_७$ + ८ उह + ३ क$_२$ उ$_६$ प्र =

पालाशहरिद, कुमहरिद, प्रायोज्जिद पाणी

२ पाह + कु ह$_६$ + ३ क$_२$ उ$_४$ प्र७ + उ$_२$ प्र

(२) परंतु बहुधा अल्कहलाचें वास्तव्य पाहण्यासाठीं अद पुत्तिकाची परीक्षा पाहतात. ही परीक्षा वरील परीक्षेपेक्षां फारच सूक्ष्म म्हणजे १०००० भाग पाण्यांत एक भाग अल्कहलाचें प्रमाण असल्यास तें सहज ओळखतां येतें. याकरितां परीक्ष्य द्रवांत थोडासा घनअद ( आयोडीन ) घालून तो उष्ण करावा. आणि नंतर सौम्य दाहक पालाशचा द्रव फार काळजीनें निर्वर्ण होईपर्यंतच घालावा. नंतर कांचकांडीनें तें मिश्रण ढवळल्यावर फिक्कट पिंवळ्या रंगाचा स्फटिकरूप अदपुत्तिकाचा निपात खालीं बसेल. याला केशरासारखा वास येतो. त्यावरून तो ओळखितां येईल. यांत होणारी रासायनिक क्रिया अशीः—

अल्कहल दाहकपालाश अद

क$_२$ उ$_६$ प्र + ६ पा प्रउ + द ८ =

अदपुत्तिक पालाशपुत्तिकित पालाशांदिद पाणी

कउद$_३$ + पाक प्र उं + ५ पाद + ५ उ$_२$ प्र

( ३ ) अल्कहलाच्या वाफेंत हवा मिश्र करून त्या मिश्रणाचें कार्य रजोरूप कृष्ण प्लातिन ( प्लातिनम ब्लॅक ) वर घडूं दिलें म्हणजे दार्वम्ल उद्भूत होतें त्यावरून अल्लहलाचें अस्तित्व ओळखतां येतें या क्रियेंत प्लातिन प्राणिलीकरणाला सहायक असतो जसें:—

अल्लहल प्राण दार्वम्ल पाणी

क$_२$ उ$_५$ प्रउ + प्र प्र$_२$ = क$_२$ उ$_४$ प्र$_२$ + उ$_२$ प्र

उपयोगः—जाळण्याच्या कामीं अल्कहलाचा उपयोग करण्यापेक्षां कलाकौशल्याच्या कामीं इथ्र (ईथर) व हरपुत्तिक ( क्लोरोफॉर्म ) यांचें उत्पादन करण्यासाठीं, तसेंच सौगंधिक कारखान्यांत ( परफ्युमरीज ) व रंजितें (टिंक्चर्स), निष्कासनें ( एक्स्ट्राक्ट्स ) व दुसरे पुष्कळ पदार्थ तयार करण्याकडे याचा उपयोग होतो. द्रावक या दृष्टीनें अल्कहलाचा उपयोग प्रयोगशाळेंत व औषधालयांत ( फार्मसी ) फार होतो.

जर्मनी, इंग्लंड, आणि फ्रान्स या देशांत औद्योगिक कामीं वापरण्यांत येणारा अल्कहल यावर जकातीची सूट मिळण्याकरितां त्यांत अशुद्ध दार्वल्कहल ( वुडस्पिरिट ) शेंकडा १० प्रमाणांत मिळवून शिवाय त्यांत उत्पलतैल— खनिजतेल ( मिनरल ऑइल ) राळ वगैरे मिसळतात. यामुळें अल्कहल पिण्यास अयोग्य होतो यामुळें तो ज्या कामाकरितां वापरण्याचा त्याकामीं निरुपयोगी होत नसून पिण्याच्या दारुवर जो जकात एका ग्यालनला २० शिलिंगप्रमाणें असते तिची सूट मिळते व हा अल्कहल जकातीशिवाय नेतां येतो. यास इंग्रजी नांव "मेथिलेटेड स्पिरिट," असें आहे. याचा उपयोग वारनिश देण्याच्या कामीं, तैल निष्कासन करण्याच्या कामीं ( एक्स्ट्राकशन ) अल्कोदें( अल्कलाईड्स् ) शुद्धीकरणाच्या कामीं वगैरे पुष्कळ धंद्याच्या कामीं उपयोगी येतो. बाजारी "मेथिलेटेड स्पिरिट" फार अशुद्ध असतें.

अल्कहल मापनः—अबकारी खात्याची शुद्ध अल्कहलावर जकात असल्यामुळें वरील प्रमाणें विषारी अल्कहलांत व पातन केलेल्या अल्कहलांत शुद्ध अल्कहलाचें प्रमाण काय आहे हें तत्काल समजण्यासाठीं फार सूक्ष्म साधनें शोधून काढण्यांत आलीं आहेत. याकरितां अल्कहलाचें विशिष्ट गुरुत्व काढण्याच्या दोन रीती आहेत त्या अशाः—

( १ ) एक कांचेच्या बुचाची हलकी कुपी घेऊन प्रथम तिचें वजन करावें नंतर तींत अल्कहल अंशांकित मापानें मोजून एक ठराविक प्रमाण घालावें व पुन्हां वजन करावें. यावरून एक शतांश घनमात्रा ( क्युबिक सेन्टिमिटर ) अल्कहलाचें विशिष्ट गुरुत्व काढतां येतें, व यावरून शुद्ध अल्कहलाचें प्रमाण ठरवितात.

( २ ) या रीतींत अल्कहलाचें विशिष्ट गुरुत्व एका सूक्ष्म द्रवगुरुत्वमापकानें ( हायड्रॉमिटर ) काढतात. आणि निरनिराळ्या विशिष्ट गुरुत्वाच्या मिश्रणांत शेंकडा अल्कहलाचें प्रमाण काय असतें हें काढण्याचीं कोष्टकें असतात त्यांवरून हिशोबानें प्रमाण काढितात. यावेळीं उष्णमान अवश्य पाहिलें पाहिजे, नाहींतर जास्त कमी उष्णमानानें घनतेंत तात्काल फरक पडतो. शुद्ध अल्कहलाचें वि. गु. ०° श उष्णमानावर ०·८०६ असतें आणि १५° उष्णमानावर वि. गु. ०·७९३ असतें. यावरून हिशोब करून कोष्टकें तयार केलेलीं असतात. ट्रॉल्स साहेबानें काळजीपूर्वक याचीं कोष्टकें तयार केलीं आहेत. त्यांत निरनिराळ्या घनतेंत असणाऱ्या शुद्ध अल्कहलाचें प्रमाण दिलेलें असतें. साइक्स साहेबाचें जें द्रवगुरुमापक असतें तें या कामीं फार चांगलें असल्यानें तेंच वि. गु. काढण्याच्या कामीं वापरतात. "प्रूफ स्पिरिट"वर जकात असते. "प्रूफ स्पिरिट" कशाला म्हणावें हें पार्लमेंटच्या कायद्यानें ठरलेलें आहे. "ज्या अल्कहल द्रवाचें उष्णमान ५१° असून त्याचें वजन तितक्याच बाष्पजलाच्या वजनाच्या $\frac{१२}{१३}$ इतकें असतें त्या अल्कहलास प्रूफ–स्पिरिट म्हणतात." या वि. गु. च्या अल्कहलांत वजनानें शेंकडा ४९. ३ भाग अल्कहल असतो, म्हणजे सरासरी अल्कहल आणि पाणी यांच्या वजनांचें सारखें प्रमाण असतें किंवा मापानें ५७.०९ मापें अल्कहल १०० मापांत असतो.

"प्रूफ स्पिरीट" हें नांव पडण्याचें कारण असें आहे कीं वरील पद्धत अस्तित्वांत येण्यापूर्वी परीक्ष्य अल्कहल द्रवाची परीक्षा उडविण्याच्या दारूनें पहात असत. याकरितां

पिण्याची दारू अल्कहल द्रवानें ओली करून पेटवीतात. दारूच्या पुडीनें पेट घेतला तर त्या अल्कहल द्रवास “ ओव्हर प्रुफ ” म्हणजे फाजील तीव्र असें समजतात. आणि जर अल्कहल मात्र जळून जाऊन दारू ओली राहिली तर त्यास अंडर प्रुफ असें समजतात. ०.९२ वि. गु.त्वाचा अल्कहल असला म्हणजे तो दारूस पेटवितो. याहून विशिष्ट गुरुत्व ०.५ प्रमाणें वाढत गेलें म्हणजे द.०.०५ वाढीस प्रूफपेक्षां एकेक अंश फाजील तीव्र असें समजतात.

परंतु ज्या अल्कहलांत इतर पदार्थ मिसळलेले असतात त्यांतील शुद्ध अल्कहलाचें प्रमाण द्रवगुरुत्वमापकानें बरोबर समजत नाहीं. याकरितां अशा अल्कहलाचें पातन करावें लागतें. याकरितां अल्कहल ( अशुद्ध ) काळजीपूर्वक मापानें मोजून घेऊन त्याचें कांच बकपात्रांत किंवा तापक बाटलींत जलतापावर पातन करितात. हें पात्र व ग्राहक शीतकानें जोडलेलें असतें. घेतलेल्या मापाच्या अर्धा हिस्सा सरासरीनें पातन होऊन आला म्हणजे या पातनांत पाणी घालून मूळच्या मापाइतकें करावें आणि नंतर वर सांगितल्या प्रमाणें वि. गु. काढून हिशेब करावा.

**इथिल क्षार**–इ थि ल गं ध का म्ल–( १ ) गंधकाम्ल उ$_2$ गप्र$_4$ यांतील दोन उज्जचे निःसार्य परमाणू आहेत. त्यांपैकीं एकच परमाणु इथिल क$_2$ उ$_5$ या संयुक्त मूलकानें निःसार्य केला असतां उ. क$_2$ उ$_5$ गप्र$_4$ या घटनेचा क्षार तयार होतो. यास इथिल गंधकाम्ल किंवा उज्ज इथिल गंधकित म्हणतात. वजनानें समभार इथिल अल्कहल व निर्जल गंधकाम्ल घेऊन हें मिश्रण जलतापावर उष्ण करावें, म्हणजे इथिल उज्ज गंधकित खालील समीकरणानें तयार होतोः—




इथिलचीं अम्ल ( उज्ज ) गंधकितें अतिशय अस्थिर असतात. हीं फाजील ( एक्सेस ) अल्कहल किंवा पाणी या बरोबर उष्ण केलीं असतां पृथग्भूत होतात. अल्कहलाचा फाजील अंश असल्यास इथ्र ( ईथर ) तयार होतें व पाण्याचा जास्त अंश असल्यास अल्कहल व गंधकाम्ल हीं पृथग्भूत होतात. या रासायनिक संयोग वियोगाच्या क्रिया खालील समीकरणानें दाखविल्या आहेत.




अम्ल गंधकितें धातूंच्या अनाम्लांशीं संयुक्त होतात व त्यांचे क्षार होतात. हे क्षार स्थिर असतात कारण ते पाण्याबरोबर किंवा अल्कहलाबरोबर उकळले असतां पृथग्भूत होत नाहींत; परंतु अम्लांच्या योगानें यांचें पृथक्करण होऊन इथिल उज्ज गंधकित असंयुक्त होतो.

इथिल गंधकाम्ल हा तेलासारखा पदार्थ असून त्याचे धर्म मिथिल उज्ज गंधकितासारखे असतात. धातूंचे इथिल गंधकित पाण्यांत विद्राव्य असून त्यांचे स्फटिक सुलभ होतात. खटइथिल गंधकिताचे सुंदर स्फटिक वर्णहीन असतात. त्यांची घटना ख ( क$_2$ उ$_5$ )$_2$ ( गप्र$_4$ )$_2$ उ$_2$ प्र$_2$ अशी असते. हे पाण्यांत विद्राव्य असून हवेंत फुलारतात. भार इथिल गंधकित भा ( क$_2$ उ$_5$ )$_2$ ( गप्र$_4$ )$_2$ २उ $_2$प्र पाण्यांत सहज विद्राव्य असून याचे सुंदर स्फटिक असतात. खटइथिल गंधकितावर पालाश कर्बिताची क्रिया केली म्हणजे पालाश इथिल गंधकित पाक$_2$ उ$_5$ गप्र$_4$ हा सहज तयार होतो. हा क्षार निर्जल असून पाण्यांत अतिविद्राव्य असतो. हा हवेंत स्थिर रहातो.

( २ ) इ थि ल गं ध कि त ( क$_2$ उ$_5$ )$_2$ गप्र$_4$ हा क्षार गंधकाम्ल उ$_2$ गप्र$_4$ च्या सारणींतिल उज्जच्या दोन्ही परमाणूंच्या ऐवजीं क$_2$ उ$_5$ या संयुक्त मूलकाचे २ परमाणू निविष्ट होऊन तयार होतो. रजत गंधकित व इथिल अदिद हे एकत्र उष्ण केले म्हणजे परस्पर संयोगवियोग होऊन हा क्षार तयार होतो जसें:—




इथिल गंधकित हा तेलासारखा असून सुगंधित असतो. याचें वि. गु. १.१८ असून त्याचा उत्क्वथन बिंदु २०८° आहे. इथिल गंधकित पाण्यांत आविद्राव्य असून सामान्य उष्णमानावर पाण्याच्या योगानें त्याचें पृथक्करण होत नाहीं. परंतु पाण्याबरोबर उष्ण केला असतां या क्षाराचें पृथक्करण होऊन अल्कहल व इथिल गंधकाम्ल असे पृथग्भूत होतात. पाण्याशिवाय त्यास उष्ण केलें असतां त्याचें पृथक्करण होऊन इथिलीन क$_2$ उ$_4$ व गंधकाम्ल उ$_2$गप्र$_4$ असें पृथक्करण होतें.

( ३ ) इथिल नत्रित क$_2$ उ$_5$. नप्र$_3$ यास नत्रइथ्र (नायट्रिकइथर ) असेंहि म्हणतात. इथिल अल्कहलावर नत्राम्लाचें साक्षात कार्य झालें म्हणजे इथिल नत्रित तयार होतो. या कामीं नत्राम्ल रासायनिक दृष्टीनें शुद्ध असेल तें घ्यावें. आणि फार मोठ्या प्रमाणावर करण्याचें टाळावें. कारण यांत स्फोट होण्याचा संभव असतो. विशिष्ट गुरुत्व १.४० चे शुद्ध नत्राम्ल ८० भार घेऊन त्यांत २ भार मौत्रक नात्रिताचे ( युरिआ नायट्रेट ) घालावे व तें मिश्रण बाष्पतापा- ( स्टीमबाथ ) वर उष्ण करावें. मौत्रकनात्रित घालण्याचा

मतलब हा आहे कीं नत्रसाम्ल ( नायट्रसअसिड ) चा कांहीं अंश असंयुक्त असल्यास त्याचें पृथक्करण व्हावें. हें मिश्रण पूर्णपणें थंड झालें म्हणजे त्यांत आणखी १५ भाग मौत्रक नत्रित घालून त्यांत वि. गु. ०.८१ चा अल्कहल ६० भार घालावा. या मिश्रणाचें पातन फारच काळजीपूर्वक जलतापावर करून येणारा पात ( डिस्टिलेट) जमा करावा. या पातांत पाणी घालून थोडासा दाहक पालाशचा द्रव घालून सर्व मिश्रण चांगलें हलवावें. नंतर स्थिर झाल्यावर तळाशीं जो थर निराळा झाला असेल तो काढून घ्यावा नंतर निर्जल खट हरिदावर कांहीं वेळ ठेऊन त्याचें जलतापावर पातन करावें. अल्कहल आणि नत्राम्ल यामध्यें जी परस्पर रासायनिक क्रिया घडते ती खालील समीकरणानें दाखविली आहे.

| इथिल अल्कहल | | नत्राम्ल | | इथिलनीत्रित | | पाणी |
|---|---|---|---|---|---|---|
| क$_2$ उ$_5$. प्रउ | + | उनप्र$_3$ | = | क$_2$उ$_5$. नप्र$_3$ | + | उ$_2$प्र |

मौत्रकाच्या योगानें नत्रसाम्लाचें पृथक्करण होतें तें खालील समीकरणांत दाखविलें आलें:—

| | नत्रसाम्ल | | मौत्रक | | |
|---|---|---|---|---|---|
| | २ उनप्र$_2$ | + | कप्र ( नउ$_2$ )$_2$ | | |
| = | कर्बद्विप्राणिद | | नत्र | | पाणी |
| | कप्र$_2$ | + | न$_4$ | + | ३उ$_2$ प्र |

सामान्य नत्राम्ल असतें त्यांत नत्रसाम्लाचा थोडा बहुत अंश असतोच. यामुळें नत्रसाम्लाची क्रिया अल्कहलावर होऊन त्याचें प्राणिदीकरण होतें व प्रायोज्जिद व दुसरे त्याचे पदार्थ तयार होतात. या पदार्थांचें नत्राम्लावर कार्य होऊन फारच जोराचें कार्य घडतें एवढेंच नाहीं तर कधींकधीं स्फोटहि होतो. परंतु मौत्रकाचें सांनिध्य असलें म्हणजे नत्रसाम्लाचें कार्य अल्कहलावर होण्याऐवजीं मौत्रकावर होतें. आणि यामुळें इथिल नत्रित सुरक्षितपणें तयार होतो.

इथिल नत्रित वर्णहीन मधुरवासाचा रसरूप पदार्थ आहे, याचा उत्क्वथनांक ८६° आहे. त्याचें वि. गु. १५° उष्णमानावर १. ११२ असतें. इथिलनत्रित बहुतेक पाण्यांत अविद्राव्य असतो. याची ज्वाला पांढरी असते. हा एकदम पुष्कळ उष्णतेवर उष्ण केल्यास त्याचा स्फोट होतो. दाहक पालाश अल्कहलांत विरवून त्याची क्रिया यावर केली असतां त्याचें पालाश नत्रित (पानप्र$_3$) आणि अल्कहल असें रूपांतर होतें.

( ४ ) इथिल नत्रायित:–इथिल नत्रायित क$_2$ उ$_5$ नप्र$_2$ हा पदार्थ नत्राम्लाची इथिल अल्कहलावर साक्षात क्रिया करून नत्रमूलक नप्र$_3$ याचें सोज्जिकरण करून नत्रसमूलकांत नप्र$_2$ रूपांतर केलें म्हणजे तयार होतो. हें रूपांतर करण्याकरितां अल्कहलाच्या कांहीं अंशाचें प्रायोज्जिदांत ( आल्डिहाइड ) परिवर्तन करावें लागतें. शुद्ध इथिल नत्रायित करण्याकरितां ५० अंश ( क्युबिक सेन्टिमिटर ) पाण्यांत २३ ग्राम पालाश नत्रायित विरवून जो द्रव तयार होईल तो २५ क्युबिक सेन्टिमिटर अल्कहलांत मिश्र करून हें मिश्रण तयार करावें. नंतर २५ क्यु. सें. मि. अल्कहल ५० क्यु. सें. मि. पाणी यांच्या थंड मिश्रणांत .३७॥ क्यु. सें. मि. गंधकाम्ल घालून दुसरें मिश्रण तयार करावें. हें दुसरें मिश्रण थंड झालें म्हणजे त्यांत पहिलें पालाश नत्रायिताचें मिश्रण सावकाश थोडें थोडें घालावें. ही योजना तापक बाटलींतच करावी व तिला शीतक लावून ग्राहकास जोडावी. बाह्य उष्णता लावण्याची जरूर नाहीं कारण पालाश नत्रायिताचा द्रव गंधकाम्लाच्या द्रवांत पडूं लागतांच इथिल नत्रायिताचें उद्भूत झालेल्या रासायनिक उष्णतेनें पातन होऊं लागतें. ग्राहक बर्फांत ठेऊन थंड केलेला असावा. क्रिया पूर्ण होऊन इथिल नत्रायिताचें पातन होण्याचें बंद झालें म्हणजे त्यांत थोडासा निर्जल पालाशकर्बित घालून हलवावा व पुनः पातन करून घ्यावा म्हणजे शुद्ध होतो. इथिल नत्रायित पाण्याप्रमाणें रसरूप असून त्याचा किंचित पिंवळट वर्ण असतो. याचा उत्क्वथनांक १६° असून १५°श उष्णमानावर याचें वि. गु. ०·९४७ असतें. हा पाण्यांत अविद्राव्य असतो. त्यास सफरचंदासारखा वास असतो. औषधांमध्यें "सोराखाराचा गोड अर्क" ( स्वीट स्पिरिट ऑफ नायटर ) = स्पिरिटस् इथीरिस नायट्रोसि नांवाचें जें द्रव्य उपयोगांत येतें त्यांतील इथिल नत्रायित हा मुख्य कार्यकारी घटक आहे. इथिल नत्रायित पाण्याच्या संसर्गांत बराच वेळ राहिलें म्हणजे हलके हलके त्याचें पृथक्करण होऊन नत्र एकप्राणिद न$_2$प्र निघूं लागतो. यास अनुकूल परिस्थिति असल्यास स्फोटहि होण्याचा संभव आहे. उज्जगंधकिदाची क्रिया इथिल नत्रायितावर केली असतां अम्न ( अमोनिया ) व अल्कहल पृथग्भुत होतात.

( ५ ) इथिल हरिद क$_2$ उ$_5$ ह.–इथिल हरिद ( एथिल क्लोराइड ) यास एकहरइथुन ( मोनोक्लोर इथेन ) असेंहि म्हणतात. कधीं कधीं उद्हर इथ्र ( हायड्रोक्लोरिक इथर ) असेंहि यास म्हणतात. इथिल हरिद तयार करण्याकरितां जशद हरिदाचा अल्कहलांत ( इथिल अल्कहल ) द्रव करून तो तापक बाटलींत ( बॉयलिंग फ्लास्क ) घालावा व तीवर शीतक उलटा लावावा. हा द्रव उकळूं लागला म्हणजे त्या उकळत्या द्रवांतून उद्हराम्ल वायुरूपानें घालवावा. यांत रासायनिक संयोग वियोग होतात ते खालीं दाखविले आहेत.—

| इथिल अल्कहल | | उद्हराम्ल | | इथिल हरिद | | पाणी |
|---|---|---|---|---|---|---|
| क$_2$ उ$_5$ प्रउ | + | उह | = | क$_2$ उ$_5$ ह | + | उ$_2$प्र |

तापक बाटलींत वजनानें तीन भार गंधकाम्ल, दोन भार इथिल अल्कहल, आणि चार भार साधें मीठ यांचे मिश्रण उष्ण करूनहि इथिलहरिद तयार करितां येतो.

कोणत्याही रीतीनें इथिल हरिद तयार केला तरी धुण्याच्या बाटलींत ( वॉशबॉटल ) थोडेसें कोमट पाणी ठेऊन त्यांतून इथिल हरिदाची वाफ घालवून नंतर ती ग्राहकांत न्यावी. ग्राहक मीठ व बर्फ यांच्या मिश्रणांत ठेऊन चांगलें शीत केलेलें असावें. इथिल हरिदाचा उत्क्कथनांक १२·५° असतो, यामुळें यापेक्षां कमी उष्णता असल्याशिवाय याची वाफ थिजून रसरूप होणार नाहीं. रसरूप इथिल हरिद पातळ, वर्णहीन असून तो अतिशय बाष्पभावी ( व्हालटाईल ) असतो. त्यास थोडासा लसणीसारखा वास असून नाकास झोंबणारा सुगंधिक वास असतो. हा दहा।दा पाण्यांत विद्राव्य असतो. तो जाळला असतां त्याच्या ज्वाळेची किनारी हिरवट असते.

( ३ ) इथिल अदिद ( क$_{२}$ उ$_{५}$ द ) यास उदद इथ्र ( हायड्रो ऑडिक इथर ) असेंहि दुसरें नांव आहे. रक्त स्फुर ( रेड फॉस्फोरस ) ५ भाग, इथिल अल्कइल ७० भाग आणि १०० भाग अद यांची एकमेकांवर रासायनिक क्रिया केल्यानें इथिल अदिद तयार होतो. तापकबाटलींत रक्त स्फुर प्रथम घालून त्यावर तो बुडे इतका अल्कहल घालावा. जलताप देऊन या मिश्रणास उकळी आणावी. शिल्लक राहिलेल्या अल्कहलांत अद घालून त्याचा द्रव करावा, आणि तो तापक बाटलींत कांचेच्या नसराळ्यांतून सावकाश थेंब थेंब पडेल अशी व्यवस्था करावी. रक्त-स्फुर आणि अल्कहल यांचा जो लाल द्रव झालेला असतो त्यावर अदच्या द्रवाचा थेंब पडतांच लाल रंग नाहिंसा होतो आणि इथिल अदिदाचें पातन होण्यास आरंभ होतो. तो चांगल्या थंड केलेल्या शीतकांतून न्यावा. ग्राहकांत जो पात ( डिस्टिलेट ) येतो त्यांत अल्कहल व इथिल अदिद यांचें मिश्रण असतें. तें शिल्लक राहिलेल्या अदवर टाकतांच अद विद्रुत होतो. नंतर हें मिश्रण तापक बाटलींत पुनः थेंब थेंब पाडावें, या प्रमाणें दोन तीन वेळ पुनरावृत्ति केल्यावर अल्कहलाचें इथिल अदिदांत पूर्णपणें रूपांतर होतें. यात राहिलेला अल्कहलाचा अंश थोड्या पाण्यानें धुऊन काढावा व नंतर खटहरिदावर खद्द्र बराच वेळ ठेऊन शुद्ध करून घ्यावा.

इथिल अदिदास मधुर वास असून तो वर्णहीन रसरूप असतो. त्याचें वि. गु. १. ९३° असतें. उत्क्कथनांक ९३° असतो. पुष्कळ वेळ ठेविला किंवा त्यास प्रकाश दर्शन झालें तर त्यापासून अद असंयुक्त होऊन ( ब्युटेन ) दधुन पृथग्भूत होतो जसें:—



| अदिद | | दधुन | | अद |
|---|---|---|---|---|
| २ क$_{२}$ उ$_{५}$ द | = | क$_{४}$ उ$_{१०}$ | + | द$_{२}$ |

इथिल अदिद पाण्यांत ईषत द्राव्य असतो. परंतु अल्कइल व इथ्र यांत अतिविद्राव्य आहे. सेंद्रिय रसायन शास्त्रांत संशोधनाच्या कामीं क्रियाकारक ( रीएजंट )या नात्यानें याचा वारंवार व महत्त्वाचा उपयोग होतो, कारण यामुळें दुसऱ्या मूलकाच्या ऐवजीं, इथिल मूलक क$_{२}$ उ$_{५}$ हा मूलक निविष्ट करतां येतो.

**इथिलिन** ( क$_{२}$ उ$_{४}$ )—हा वायु कोलगॅस वायुमध्यें असतो. हा दगडीकोळसा इत्यादींच्या उर्ध्वपातनांत इतर वायूंबरोबर मिळतो. परंतु यास वेगळा करण्याची कृति निराळी आहे. इथिल अल्कहल व गंधकाम्ल यांचें मिश्रण, उष्ण केलें असतां हा वायू निघतो पण त्याबरोबर दुसरेहि पदार्थ येतात. त्याकरितां दाहक पालाश ( कॉस्टिक पोटॅश ) द्रव्यांतून वायूस जाऊं दिल्यानें ते शोषिले जातात व हा शुद्ध स्वरूपांत मिळतो. यांतील क्रिया पुढील समीकरणानें दाखविल्या आहेत.—

क$_{२}$उ$_{५}$उप्र + उ$_{२}$गप्र$_{४}$ = क$_{२}$उ$_{५}$उगप्र$_{४}$ = उ$_{२}$प्रा

उष्णतेनंतर क$_{२}$उ$_{५}$उ ग प्र$_{४}$ = क$_{२}$ उ$_{४}$ = उ ग$_{२}$प्र$_{४}$

हा वायु तयार करण्याच्या आणखी कांहीं रीती आहेत. हा विद्युद्विश्लेषणानेंहि तयार करितां येतो.

गुणधर्म—हा तैलवायु रंगहीन व पारदर्शक असून त्यास किंचित मधुर पण लसणीसारखा वास येतो. हा पाण्यांत व अल्कहलमध्यें विद्रुत होतो. त्याचें द्रवरूप ०° वर साधारण हवेच्या ४२ पट दाब असतांना होतें. याचा उत्क्कथनांक १०५° अंश हा आहे. हा प्राणवायु संन्निध जळतो पण काजळी मात्र फार होते. कारण क उ$_{४}$ व क असें याचें पृथक्करण होतें. हा हर वायूशीं संयोग पावल्यावर गुळचट असा तेलकट पदार्थ मिळतो म्हणून त्यास तैलवायु असें म्हणतात. तसेंच स्तंभ व अद यांशीं देखील हा संयुक्त होतो. तसेंच तीव्र हराम्लाशीं याचा फार सावकाश संयोग होतो. परंतु रजोरूप प्लाटिनमशीं हा फार लवकर संयुक्त होतो. याचीं पुष्कळ धातूंची व हरितांचीं संयुक्त रसायनें माहित आहेत.

**इंद्रपत**-(पंजाब,)दिल्ली जिल्हा. हें खेडेंगांव दिल्लीजवळच ज्या ठिकाणीं पूर्वी इंद्रप्रस्थ होतें त्याच ठिकाणीं उ. अ. २८° ३६' व पू रे. ७७° १७' वसलेलें आहे. पूर्वीचें शहर यमुनेच्या तीरावर हुमायुनाची कबर व फिरोजशहाचा कोटीला यांमध्यें वसलें होतें व सध्यां सुद्धां जरी यमुनेच्या प्रवाहाची दिशा बदलली आहे तरी पूर्वीच्या शहराजवळ अजूनहि तिचा मागमूस सांपडतो. त्याच ठिकाणीं पांडवांनीं नाग राजांनां हांकून देऊन आपली राजधानी प्रस्थापित केली. [ इंद्रप्रस्थ पहा. ]

**इंदापूर**—( मुंबई इलाखा ) हा पुणें जिल्ह्यांतील एक तालुका उ. अ. १७°५४' आणि १८° २०' व पू. रे. ७४° ३९' आणि ७५° १०' यांमध्यें वसलेला असून ह्याचें क्षेत्रफळ ५६७ चौरस मैल आहे. ह्या तालुक्याचें मुख्य ठिकाण इंदापूर शहर. ह्या तालुक्याची लोकसंख्या १९११ सालीं ७८०५९ होती. वायव्य व मध्यभागीं तालुका डोंगराळ आहे. पण नद्यांच्या बाजूला सर्व प्रदेश उघडा व एक सारखा आहे. जमीन खालीं फार खोल

नसून त्यांत दगड फार असतात. ह्या तालुक्यांत पाऊस फारच कमी म्हणजे सरासरी २० इंच पडतो.

शहर.—(मुंबई इलाखा,) पुणें जिल्हा. इंदापूर तालुक्याचें मुख्य ठिकाण. उ. अ. १८°८' आणि पू. रे. ७५°५' पुणें–सोलापूर रस्त्यावर पुण्याच्या आग्नेयीस ८४ मैलांवर आहे. लोकसंख्या (१९११) ६६८८. इ. स. १८७६–७७ च्या भयंकर दुष्काळामुळें लोकसंख्या फार कमी झाली. तालुक्यांतील सर्व कचेऱ्या येथें असून इ. स. १८६५ सालापासून येथें म्युनिसिपालिटी आहे. येथें चांदखान नांवाच्या मुसुलमान फकिराप्रीत्यर्थ नवंबर–दिसेंबर महिन्यांत दरवर्षी उरूस भरतो.

इ. स. १४४८ मधील इंदापुरचा उल्लेख आढळतो. त्यावेळीं हा गांव विजापूरचा पहिला बादशहा युसफ अदीलशहा याजकडे होता. चाकणच्या किल्लेदारानें ज्यावेळीं बंड केलें त्यावेळीं त्यानें युसफची मदत मागितली होती व युसफनें ६००० घोडेस्वार पाठवून इंदापुराजवळ मुक्काम करण्यास हुकूम केला होता. इ. स. १६४० च्या सुमारास इंदापुर, बारामती हीं शहाजीच्या मुलुखास जोडण्यांत आलीं. इ. स. १७०७ सालीं अवरंगजेबानें इंदापूर व सुपें शाहूस दिलें. इ. स. १७९० सालीं इंदापुर गांव जुन्नर सरकारच्या परगण्याचें मुख्य ठिकाण होतें, व त्याचें उत्पन्न १०८९०० रुपये होतें. इ. स. १८२८ पर्यंत हा गांव महत्त्वाचा होता. परंतु अलीकडे व्यापार बराच खालावला आहे. फक्त ओबडधोबड कापडाचें विणकाम येथें होतें. [मुं. गॅ १८. ब्रिग-फेरिस्ता २ ग्रँट डफ. वेरिंग]

मराठी राज्यांतील इंदापूर.—अंबाजीपंत तात्या यांस दावलजीराव सोमवंशी सर लष्कर यांनीं पाठविलेल्या पत्रांत इंदापूर वगैरें महाल स्वामींनीं मुबादला करून ध्यावयाचें मान्य केलें आहे असा उल्लेख आहे (रा. खं. ५ प. ४०). मानाजी केसरकर सर देशमुख यांजकडे इंदापुर परगण्याबद्दल, सरकारचा ऐवज २००० येणें असल्याचा उल्लेख (रा. खं. ६ प. ९४) आहे. पुणें, इंदापूर-चाकण वगैरे अफजलखाना आदीपासून ज्याकडे इनाम असतील तसें चालविण्याबद्दल हुकूम (रा. खंड ८ प. ११) आहे. इंदापूरमहालाकडील ५००० होन खजाना करावयास आणावे अशी सन १६७१–७२ मधील आज्ञा (खंड ८ प. २१) आहे. इंदापूरच्या देशमुखीपैकीं ३५०० रुपये राजमंडळाच्या खर्चास येतात असा उल्लेख (रा. खं. १० प. २७८ मध्यें) आहे. याखेरीज रा. खं. १० मध्यें दोन ठिकाणीं खं. १५ मध्यें तीन ठिकाणीं किरकोळ उल्लेख आलेले आहेत.

थोरले माधवराव व नाना फडणीस यांच्या अमदानींत या तालुक्याची अत्यंत भरभराट होती. पागेदार व शिलेदार यांच्या खर्चास हा महाल लावून दिलेला असे. १७९४ पासून याला उतरती कळा लागली. १८०२ सालीं फत्तेसिंग माने नांवाच्या होळकर सरदारानें हा गांव उध्वस्त करून सोडला. पुढील सालीं मोठा दुष्काळ पडून लोक गांव सोडून गेले. ब्रिटिश अंमल सुरू झाला तेव्हां प्रथम अहमदनगरच्या कलेक्टराकडे हा तालुका होता पुढें पुणें जिल्ह्यांत याचा समावेश झाला.

**इंदाव**–(ब्रह्मदेश) कथा जिल्हा.हा तालुका उ.अ.२३°५७' व २४°२३' आणि पू. रे. ९५°५८' व ९६°१६' यांमध्यें बसला आहे. यामधून सगैंग–म्यित् क्यिना रेल्वे जाते. क्षेत्रफळ ४१६ चौ. मै. लो. सं. (१९११) १५५७२. इंदाव हें तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. मेझा नदी या तालुक्यांतून वहाते. कांहीं भागीं चांगलीं अफाट मैदानें असल्यानें लागवड करण्याला सोय आहे. (इं. गॅ.)

**इंदावग्यी**—(ब्रह्मदेश.) म्यिटक्यिना जिल्ह्याच्या नैर्ऋत्येस असणारें सरोवर. हें १६×६ चौरस मैल घेराचें आहे. याच्याभोंवतीं लहान लहान डोंगर असून याचें पाणी ईशान्येकडून वाहत जाऊन ईरावतीला मिळणाऱ्या मोगौंग नदीला मिळतें. सरोवरांत मासे पुष्कळ आहेत. याच्या भोंवतालचें खोरेंहि चांगलें सुपीक आहे. (इं. गॅ.)

**इंदिन** (इंडिन)—इंदिन $क_९ उ_८$ हा उत्कर्ब (हायड्रोकार्बन) असून तो दगडी कोळशाच्या डांबराचें आंशिक पातन (फ्रॅक्शनल डिस्टिलेशन) केलें म्हणजे १७६° ते १८२° उष्ण मानावर जो पात येतो, त्या पातांत (डिस्टिलेट-मध्यें) असतो. त्यांतून इंदिनचें निष्कासन (एक्स्ट्राक्शन) करण्याकरितां त्याचें परुषित (पिक्रेट) करावें. इंदिन हा तेलासारखा पदार्थ असून त्याचा उत्क्वथनांक १७९.५°—१८०.५° असतो आणि त्याचें वि. गु. १·०४ (१५° उष्ण मानावर) असतें. पातळ नत्राम्लाच्या योगानें इंदिनचें रूपांतर पथालिक अम्लामध्यें होतें आणि सिंधु (सोडियम) च्या योगानें त्याच्या अल्कहल द्रवांत उज्जिदीकरण होऊन त्याचें उज्ज इंदिन $क_९ उ_{१०}$ (हायड्र इंदिन) मध्यें रूपांतर होतें. इंदिनची वाफ रक्तोष्ण मानावरील नळींतून नेली असतां त्यापासून कांचनिन (क्रायसीन) तयार होतें. नत्रसिल (नायट्रोसिल) हरिदा (क्लोराइड) बरोबर इंदिनचा संयोग होऊन त्याचें इंदिन नत्रसित (नायट्रोसेट) होतें.

**इंदी तालुका**—(मुंबई.) विजापूर जिल्हा.उ. अ. १६° ५६' आणि १७°२९' व पूर्व रेखांश ७५°३३' आणि ७६° १२' यांमध्यें हा वसलेला आहे. ह्याचें क्षेत्रफळ ८३८ चौ. मैल व ह्या तालुक्यांत १२२ खेडीं आहेत; पण एकहि शहर नाहीं. खुद्द इंदीसुद्धां खेडेगांव आहे. लोकसंख्या १९११ सालीं ९८८२९ होती. दहा वर्षांपूर्वी ही संख्या सुमारें तेवीस हजारानें कमी होती; पण वीस वर्षांपूर्वी सारी सहा हजारानेंच कमी दिसते. ह्या तालुक्यांतील जमीन अगदीं भिकार आहे. ह्या तालुक्याचा जमीनसारा २·०३ लाख रुपये १०९३-४ सालीं होता. इंदी तालुक्यांत डोंगर व अरण्यें

नाहींत. आग्नेय व दक्षिणभागीं लोकवस्ती बरी असून जमीन चांगली लागवडींत आहे. येथें पाऊस सुमारें २५ इंच पडतो.

वर सांगितल्याप्रमाणें इंदी हें लहानसें खेडें आहे व त्याची लोकसंख्या सन १९०१ सालीं ४४२७ होती. भीमा माहात्म्य ह्या ग्रंथांत इंदीचें वर्णन पयक्षेत्र या नांवानें केलें आहे. इंदीचें हें नांव पडण्याचें कारण असें दिलें आहे कीं, ह्या ठिकाणीं एक पवित्र लिंग होतें व त्या लिंगाचा शोध एका गाईमुळें तिची धार काढीत असतांना लागला म्हणून त्या ठिकाणास पयक्षेत्र असें नांव पडलें. इंदी येथें शांतेश्वर ह्या नांवाची मूर्ति आहे ह्या गांवांत एक दवाखाना, दोन मुलांच्या शाळा व एक मुलींची शाळा आहे.

गां व.—इंदी तालुक्याचें मुख्य ठिकाण. उत्तर अक्षांश १७°११' व पूर्व रेखांश ७६° विजापूरच्या ईशान्येस ३० मैलांवर सदर्न मराठा रेल्वेचें एक स्टेशन आहे. लोकसंख्या ( १९०१ ) ४४२७. टॉलेमीनें ( इ. स. १५०)च्या सुमारास उल्लेखिलेलें इंदें हेंच असेल.

भीमामाहात्म्यांत यास पयःक्षेत्र म्हटलें आहे. याबद्दल एक दंतकथा आहे. अकराव्या शतकांत येथें एक जंगल होतें. एका गुराख्याच्या मुलानें एका गाईस आपलें दूध रोज एका जागीं टाकतांना पाहून घरीं जाऊन सांगितलें. मंडळींनीं ती जागा खोदून पाहतां एक लिंगाकृति दगड त्यांनां दिसला. त्यावर त्यांनीं देऊळ बांधिलें. पुढें कांहीं दिवसांनीं कांतेश्वरानें हिरेइंदी गांवाच्या मुख्य गुराख्याला दृष्टांत दिला. तेव्हां-पासून या स्थानाचें माहात्म्य वाढलें. लोकांनीं जुनें हिरा इंदीचें खेडें सोडून या ठिकाणीं वस्ती केली. देवळाजवळील एका दगडावर कानडी शिलालेख आहे. १८७२ त सलोटगी गांवाहून आणलेल्या एका दगडावर तिन्ही बाजूस देवनागरी व चौथ्या बाजूवर कानडी लेख आहेत.

१७९० सालच्या एका जमाबंदीच्या खर्ड्यावरून इंदी हें विजापूर सरकारांतील एका तालुक्याचें ठाणें असून त्याचें उत्पन्न ११४२७० रुपये होतें असें दिसतें. ( मुं. गॅ. २३ इं. गॅ. १३ ).

**इंदूर** रे सि डे न्सी—मध्य हिंदुस्थानांत सन १८१८ सालीं एका विशिष्ट भागास हें नांव मिळालें. सन १८५४ सालीं मध्य हिंदुस्थानाकरितां गव्हर्नर–जनरलनें नेमलेल्या एजंट-लाच इंदूरच्या रेसिडेंटचें काम पाहण्याचा अधिकार मिळाला पण १८९९ सालीं पुनः रेसिडेंटची निराळी नेमणूक झाली व ह्याचा अधिकार लवानी, चिकाल्डा व पेटलावद ( भोपावर रेसिडेन्सीतलेन व सुंदरसी ( भोपाळ रेसिडेन्सी ), नंदवाइ ( मेवाड ), व अलपूर ( बुंदेलखंड रे. ) या परगण्यां-खेरीज बाकीच्या सर्व इंदूर संस्थानावर त्याचा अधिकार चालतो. रेसिडेन्सीचें क्षेत्रफळ ८९६० चौरस मैल व लोकसंख्या(१९२१) ९७६३२० होती. इंदूर शहर, महूची छावणी, रामपूर, खारगांव, महेश्वर, मेहिदपूर, बरवाहा, भानपुरा व तराणा हीं मुख्य शहरें आहेत रेसिडेंट इंदुरला रहातो.

**इंदूर संस्थान**—या संस्थानचें क्षेत्रफळ ९५०० चौ. मैल असून त्यास होळकरांचें राज्य ( होळकर्स डोमिनियन् ) म्हणतात. ह्याचा अर्ध्यापेक्षां जास्त भाग डोंगराळ असून सुमारें ४३२० चौ. मैलांचा प्रदेश पठारावर आहे विंध्य व सातपुडा यांमधील प्रदेशास नेमाड व नेमावर, विंध्यापलीकडे रामपुरा, भानपुरा जिल्ह्यांतील डोंगरापर्यंत माळवा व त्यापलीकडे हरावती अशीं नांवें आहेत. जलमपुर परगणा बुंदेलखंडांत असून तो बराच सखल आहे. रामपूर व महत्पूरमध्यें लहान लहान डोंगर आहेत, पण विंध्य व सातपुडा या पर्वतांप्रमाणें मोठमोठीं झाडें त्यांवर नाहींत. तो विंध्या-पैकींच एक भाग आहे असें म्हणतात. महत्पुरापेक्षां रामपुऱ्याकडील भागांत झाडी विशेष आहे. डोंगर व पर्वत यांच्या रांगा विशेषतः पूर्वपश्चिम आहेत.

त ळीं—या राज्यांत लहान लहान बरींच तळीं असून त्यांत महेश्वरजवळ चोळी, देवाळपूर, हंसळपूर, यशवंतनगर येथील तळीं मुख्य आहेत.

भू ग र्भ वि प यीं.—नदीकांठची माती पिंवळी असून तेथून वरवर भरडी व काळी आहे. दगड बहुतेक काळा कठिण ( डेक्कन ट्रॅप ) असा सांपडतो. कित्येक ठिकाणीं चुनकळी, मॅंगनीज, व लोखंडहि सांपडतें. तांबड्या दगडाच्या व चुन्याच्या खाणी फार जुन्या आहेत. काटकूटच्या आजूबाजूस असलेल्या दगडास इन्फ्राट्रॅपन म्हणतात.

व न स्प ति—इंदूरच्या उत्तरेकडील भागांत लहान लहान टेंकड्या आहेत, त्यावर विशेषतः खैर, बाभूळ, पळस व किरकोळ झुडपें आहेत. त्यांत घाटबोर, धामण हीं झुडपें प्रसिद्ध आहेत.

ज ना व रें—उत्तर हिंदुस्थानांत सर्वत्र आढळणारीं रानटी जनावरें या राज्यांत आहेत. दक्षिणेकडे पूर्वीं हत्ती सांपडत, व सातपुड्यांत गवे, रानरेडे वगैरे तुरळक असत; पण अलीकडे तेहि दिसत नाहींत. मोंगलांच्या कारकीर्दींत बिजागड, सत्वासकडे हत्ती पकडीत असत. त्यासाठीं खड्डे, कड्या वगैरेंचा उपयोग करीत. वाघहि तुरळक आढळतात. पूर्वी रामपुऱ्याच्या जंगलांत पुष्कळ वाघ होते. चितळ मात्र ठिक-ठिकाणीं आढळतात. आस्वलें क्वचित् नेमावरांत आढळून येतात. लांडगे, रानटी कुत्रे, ठिकठिकाणीं क्वचित् दिसून येतात. सांबरें विंध्य व सातपुडा पर्वतांत पुष्कळ आहेत. रामपुऱ्यांत क्वचित् आढळतात. काळवीट सर्वत्र आहेत. हरणांच्या कळपांसाठीं सरकारनें मुद्दाम जागा राखून ठेविली आहे. त्यांत रानडुकरें, नीळगाईहि असतात.

वाघ, अस्वल व चित्ते मारणारांस संस्थानांतून इनाम मिळतें, पण दिवसेंदिवस ही रक्कम कमी कमी होत चालली आहे असें पुढील रकमेवरून दिसून येईल. सन १८८९ मध्यें १२०९ रुपये; १८९० मध्यें ११३५; १८९१ मध्यें ११४४; १९०२ मध्यें ५३४; १९०३ मध्यें २२४ रुपये इनाम दिले.

प क्षी.—हिंदुस्थानांतील बहुतेक जातीचे पक्षी येथें दिसून येतात. विशेषतः थंडींत रानकोंबडे, पाणकोंबड्या, काळीं बदकेंहि पुष्कळ आढळतात.

मा से.—माइसेर, रोहू, सांवळ इ. जातीचे मासे नद्यांतून व तळ्यांतून सांपडतात.

स र्प ट णा रे प्रा णी.—अनेक जातींचे सर्प, अजगर वगैरे विषारी प्राणी व धामण वगैरे निरुद्रवी प्राणी या राज्यांत पुष्कळ आढळतात. पाण्यामध्यें आंखूड व लांब तोंडाचे मगर व कांसवहि पुष्कळ असतात.

की ट क.—अनेक प्रकारचे पतंग दिसून येतात, त्यांवरून कीटकहि अनेक जातीचे आहेत, हें उघड आहे.

ह वा मा न.—भूपृष्ठाच्या स्थितीवरून हवा व पाऊस यांची स्थिति जाणतां येते. त्याप्रमाणें पहाडी, डोंगरसपाटीवरचा व नर्मदाव्हॅलींतील सखल प्रदेश असे भूपृष्ठाचे तीन भाग होतात.

इंदूर संस्थानाची खानेसुमारी १९२१ सालीं ११५१५७८ होती. राज्यकारभाराच्या सोयीसाठीं इंदूर संस्थानचे सहा भाग करण्यांत आले आहेत. ते खालील प्रमाणें:– (१) इंदूर जिल्हा, (२) महिदपूर जिल्हा, (३) नेमावर जिल्हा, (४) नेमाड, जिल्हा, (५) रामपुरा भानपुरा जिल्हा आणि (६) अलमपूर परगणा. इंदूर रेसिडेन्सी आणि महू कॅन्टोनमेंट हीं ब्रिटिश अधिकाराखालीं आहेत. या जिल्ह्यांची लोकसंख्या १९२१ सालीं अनुक्रमें (१) ३४३८२९. (२) ११४९३९ (३) ८५९३३, (४) ३७९४८५. (५) २०२७७३, (६) १४६१९. ह्या संस्थानांत इंदूर (९३०९१) रामपुरा (७७१९) सनावद (७६०७). महातपूर (७०६२) महेश्वर (६७८८). खरगोण (१०६१०) अशा प्रकारची तेवीस शहरें आहेत. शिवाय ४३४१ खेडीं आहेत.

ध र्म–संस्थानामध्यें एकंदर पांच धर्मांचे लोक आहेत. त्यापैकीं शेंकडा ८८ हिंदु आहेत, ७·९ मुसलमान, १ जैन, शीख, बौद्ध, सेमिटिक, पारशी यांची संख्या फारच थोडी आहे.

भा षा—संस्थानमध्यें १०, १२ भाषा प्रचलित असून त्यांमध्ये राजस्थानी, माळवी, रांगडी, मारवाडी, हिंदी, उर्दु, भिल्ल, मराठी, निमाडी, गोंडी इत्यादि प्रमुख आहेत. त्याचप्रमाणें हिंदु ब्राह्मण, शेणवी, कान्यकुब्ज, श्रीगौड, दसोरे, औदुंबर, नागर रजपूत, सोंधवडे रजपुत, शीखी, मोघे, गुजर, मराठे, चांभार, भाट, चारण, धनगर, जैन, मुसुलमान, मारवाडी, बहुरी, आगरवाले, गोंड इत्यादि प्रमुख जाती आहेत.

धं दे.—शेती, सरकारी नोकरी, खाजगी नोकरी, स्वतंत्र धंदे इत्यादि. केवळ शेतीवर पोट भरणारे निम्मे लोक आहेत. जमिनीच्या निरनिराळ्या प्रकारच्या जाती आहेत. पावसाच्या मानानें २, ३ पिकें शेतकरी काढून घेतो. संस्थानांतील मुख्य पिकें मका, मुद्दमूग, गहूं, चणे, ऊंस, अफु कापूस, काळी तंबाखू हीं होत. याशिवाय रामफळ, सिताफळ, नारिंग, जांभूळ, अंजिर, कवठ, केळी, डाळिंब, पेरू इत्यादि प्रसिद्ध बागायती पदार्थ आहेत. पाऊस नियमित व चारा मुबलक यामुळें या राज्यांत गुरांची पैदास चांगली होते. माळवी, उमतवाडा, नेमाडी, गोंडी वगैरे खिल्लारी बैलांच्या जाती प्रसिद्ध आहेत. गुरांचे बाजार अनेक ठिकाणीं भरतात त्यांपैकीं इंदूर, झारडा, महतपूर, तराणा, देपाळपूर, महेश्वर, इत्यादि ठिकाणचे बाजार प्रसिद्ध आहेत.

नेमावर, नेमाड, रामपूर वगैरे ठिकाणें जंगलासाठीं प्रसिद्ध आहेत. जंगलखात्याचें उत्पन्न २० तें २५ लाख होतें. जंगलामध्यें निरनिराळ्या प्रकारचीं झाडें असून इमारतीला उपयुक्त असें लाकूड पुष्कळ मिळतें. जंगलाचा कांहीं भाग शिकारीसाठीं राखून ठेवण्यांत आला आहे.

खा णी व ख नि ज द्र व्यें:—संस्थानभर सर्वत्र डेक्कन ट्रॅप नांवाचा दगड पसरलेला आहे. त्याशिवाय जमीनीमध्यें ॲल्युमिनम धातु पुष्कळ प्रमाणांत सांपडेल असें वाटतें. तसा सांपडल्यास त्याचें उत्पन्न बरेंच येईल. बडवायी नजीक लोखंडाच्या व रेतीच्या दगडाच्या खाणी असून तेथें १८६० सालीं कर्नल किटींग यानें एक कारखाना उभारला होता. परंतु त्याची विशेष प्रगति झालेली नाहीं.

क ला आ णि का र खा ने.—माळव्यामध्यें पूर्वी कलाकौशल्याचीं कामें उत्तम होत होतीं. खुद्द इंदूर संस्थानमध्यें तलम मलमल तयार होत असे, पण आतां त्यांपैकीं कांहींच उरलेलें नाहीं महेश्वर येथें रंगीत लुगडीं व धोतरजोडे उत्तम तयार होतात.

व्या पा र आ या त.—कापड, साखर, मीठ, धातु, केरोसीन तेल, लोकरीचें सूत, लोखंडाचें सामान इत्यादि जिन्नस बाहेरून इकडे येतात. निर्यातः—धान्य, तिळी, अफू, कापूस, कातडीं व हाडें येथून बाहेर जातात.

लो कां ची सां प त्ति क स्थि ति.—व्यापारामध्यें बहुतेक लोक श्रीमंत असतात, ते मोठमोठ्या इमारती, देवळें बांधून पैशांचा व्यय करतात यांमध्यें बहुतेक जैन असतात. हे जवाहिऱ्याचेंहि काम करतात. दुष्काळामुळें कित्येक भागांत बिघडलेली मजुरांची स्थितीहि आतां सुधारत आहे. लोकसंख्या कमी झाल्यामुळें मजूर कमी झाले आहेत. त्यामुळें शेतीच्या वेळीं व बाजारांच्या चणचणीच्या दिवसांत त्यांस दर येतो.

द ळ ण व ळ णा चीं मु ख्य सा ध नें:—राजपुताना माळवा रेल्वे ही १८७७ सालीं खांडव्याहून इंदूरपर्यंत आली. व पुढें अजमीरपर्यंत गेली आहे. या राज्यांत ही रेल्वे सुमारें ६२ मैल लांबवर गेली आहे. हिच्यासाठीं नर्मदेवर पूल बांधला आहे. या रेल्वेचा सुमारें १५मैल लांबीचा फांटा फत्तेहबादहून उज्जनीस जी. आय. पी. च्या रेल्वे स्टेशनापर्यंत गेला आहे. बी. बी. सी आय. ची रतलामकडे जाणारी

सडक पेटलाबाद परगण्यांतून ९ मैल जाते. येथें बामणीया हें स्टेशन आहे. हीच सडक पुढें नागदा मथुरा या नांवानें दिल्लीपर्यंत गेली आहे.

हल्लींचे रस्तेः—१ मुंबई-आग्रा रस्ता, २ इंदूर-सिमरोड-खांडवा रस्ता, ३ इंग्रज सरकारचा महू—निमच रस्ता ४ उज्जन-आगर, या खेरीज संस्थाननें तयार केलेले सुमारें १३ रस्ते आहेत.

रा ज्य व्य व स्था.—सुभेदार मल्हारराव व यशवंतराव यांच्या कारकीर्दीत लढाया व फौज यांसंबंधीं कामांतच जास्त काळ जात असे. यामुळें राज्यव्यवस्थेकडे तितकें लक्ष द्यावयास सवड नसे. तरी खंडेरावाच्या लग्नानंतर सुभेदार मल्हारराव हे राज्यकारभाराचें काम अहल्याबाई [ पहा ] वर सोंपवीत. त्यावेळीं त्यांची राज्यव्यवस्था उत्तम होती, असें दिसून येतें. पहिल्या तुकोजीरावाच्या मृत्यूनंतर राज्यकारभारांत जास्त घोंटाळा माजून फौजेकडे जास्त खर्च होऊं लागला. यामुळें इजारदारांकडून जितकें काढतां येईल तितकें काढूं लागले. इ. स. १८२० सालीं तात्या जोगानें या स्थितीस थोडेंसें नियमित स्वरूप दिलें. अलीकडे ब्रिटिश राज्यपद्धतीस अनुसरून व्यवस्था ठेविली आहे. श्रीमंत महाराज सरकार वयांत नव्हते, त्यावेळीं राज्यकारभार इंदूर येथील रेसिडेंटाच्या सल्लयानें कौन्सिल पाही. कौन्सिलांत निरनिराळया खात्यांचे अधिकारी ( मिनिस्टर्स ) असतात. मुख्य खातीं येणेंप्रमाणें:— १ फॉरेन खातें, २ फायनॅन्स खातें ३ इंजिनिअरींग खातें ( पी. डब्ल्यू. डी. ), ४ सेटलमेंट खातें ५ हाउसहोल्ड, खातें, ६ मिलिटरी खातें, ७ रेव्हेन्यू खातें ( खालसा व जंगल ), ८रेव्हिन्यू ( इनाम व सायर ) खातें, ९ जुडिशिअल खातें आणि १० जनरल खातें.

राजकीय विभागः—राज्यव्यवस्थेसाठीं राज्याचे ५ मुख्य विभाग—जिल्हे केले आहेत. जिल्ह्याचे आणखी ३७ पोट विभाग—परगणे केले आहेत. परगण्यामध्यें अनेक गांवें—मौजे असतात. प्रत्येक जिल्ह्यावर एक एक सुभा असून जमाबंदी व फौजदारीसंबंधींचे अधिकार त्यास असतात. आणि डिस्ट्रिक्ट व सेशनजज्य असतो त्यास न्यायसंबंधींचे अधिकार असतात. याशिवाय पोलिस खात्याचा डिस्ट्रिक्ट इन्स्पेक्टर व पब्लिकवर्क व जंगल या खात्याचे अधिकारीहि असतात.

का य दे व न्या य.— सुभेदार मल्हारराव, महाराणी अहल्याबाई व पहिले तुकोजीराव यांच्या कारकीर्दीत लिहून ठेवलेले असे कायदे नव्हते. पंचायतीपुढें किंवा प्रमुख लोकांच्या सभेपुढें कज्जे मांडून त्यांच्या मतानें निकाल लागे. त्यानंतर पक्षकाराची इच्छा असली तर ती फिर्याद तो सरकारपुढें नेई. धार्मिक गोष्टींसंबंधीच्या गुन्ह्यांत राजोपाध्याचें मत घेत व शास्त्राच्या अथवा कुराणाच्या आधारानें निकाल लागे. १८७५ सालीं ब्रिटिश पद्धतीचीं कोर्टें स्थापन झालीं. कायद्याच्या परीक्षेसाठीं इ. स. १९०२ सालीं कांहीं नियम करण्यांत आले. त्या नियमांप्रमाणें वकील लोक तयार होत असून सनद घेऊन - संस्थानांत वकीली करीत आहेत.

का य दे क र ण्या ची ह ल्ली चीं प द्ध ति.—कौन्सिलचा लेजिस्लेटिव्ह मेंबर हा कायदे करितो, व ते रेसिडेंट व कौन्सिल यांच्या हुकुमानें लागू होतात. बहुतेक कायदे ब्रिटिश सरकारच्या कायदेकानूंच्या आधारें तयार झाले आहेत.

न्या य खा तें.—संस्थानांतल्या सर्व फौजदारी व दिवाणी कोर्टांत वरिष्ठ आपेल कोर्ट श्री० महाराजांचें आहे. जन्मठेप व मृत्यूच्या शिक्षेस महाराजांची मंजूरी लागते.

ज मी न म ह सू ल.—श्री. कै. दुसरे तुकोजीराव महाराज यांच्या कारकीर्दीत इ. स. १८६५ त जमीनीची सर्वेमोजणी झाली, ती १५ वर्षांसाठीं होती. परगणा किंवा जिल्हा यांतील सर्व जमीन इजारदार किंवा मक्तेदार यांस मक्त्यानें देण्याची पूर्वी रीति असे. ब्रिटिश मुलुखांतल्या एका अधिकाऱ्याकडून अलीकडे चालू असलेली जमाबंदी ठरविण्यांत आली. व इजारदार पद्धति कमी झाली. आतां सर्व व्यवहार शेतकरी व दरबार यांमध्यें अन्य कोणत्याहि मध्यस्थाशिवाय केला जातो.

क रः—( १ ) सडक फंड, ( २ ) सर देशमुखी, ( ३ ) तुळाई,( ४ ) घरझोंपडी,( ५ ) तेलीकूठ,( ६ ) ताल सिंघाडी, ( ७ ) वनचराई वगैरे सामान्यतः १० कर आहेत.

कि र को ळ व सु ला ची बा ब.— १ सायर, २ आबकारी, ३ गांजा, भांग, वगैरे, ४ मीठ ५ स्टँप्स वगैरे किरकोळ वसुलाच्या बाबी आहेत.

फौ ज.—सुभेदार मल्हाररावांच्या कारकीर्दीत सैन्याची काय स्थिति होती हें निश्चयात्मक सांगतां येत नाहीं. तरी त्यांच्याकडे इ. स १७५० मध्यें विस्तृत सैन्याचें अधिपत्य असावें असें दिसतें. हरिरावांच्या कारकीर्दीत सैन्य बरेंच कमी झालें होतें. अवघ्या २६ पागा रिसाले होते. दुसऱ्या तुकोजीरावांच्या कारकीर्दीत सरनोबतच्या हाताखालीं ६ पागा होत्या. पुढें त्याच्या ९ झाल्या. त्यांतली यशवंत तबेला नांवाची विशेष होती.

१९०४ मध्यें दरबारनें फौजेसाठीं वृथा खर्च नसावा म्हणून आणखी सैन्य कमी केलें, तें पुढील कोष्टकांत दाखविलें आहे.

१९०४ पूर्वी

| | पटावर | कामावर | पलटणी |
|---|---|---|---|
| कॅव्हलरी घोडेस्वार | १४२५ | १४२५ | २ |
| तोफखाना | ४५८ | ४१० | १ |
| पायदळ | २८२० | १८०२ | २ |
| एकूण | ४७०३ | ३६७३ | ५ |

इ. स. १९०४ नंतर

| | किती लोक होते लढवय्ये | मदतगार | खर्च |
|---|---|---|---|
| कॅव्हलरी घोडेस्वार | ५००ची एक व | | |
| | ४०० ,, ,, | ९८ | २९८००० |
| | ——— | | |
| | ९०० | | |
| तोफखाना | २१० | १०३ | ३५००० |
| पायदळ | ३७४×२... ७४८ | ६८ | १०५००० |
| एकूण | १८५८ | २६९ | ४३८००० |

या व्यवस्थेमुळें २ लाख रुपयांची बचत होऊं लागली आहे. १८९२ साली ६०८ स्वारांची इंपीरियल फौज ठेविली गेली. १९०६ मध्यें आणखी सुधारणा करून त्यांत ट्रान्सपोर्ट गाड्यांची भर घातली. त्यांसाठीं ५०० तट्टू घेतले होते. या शिवाय २०० घोडेस्वार होते. त्यांचा सालीना खर्च २.४ लाख रुपये असे.

फौजेवर जनरल, अडज्यूटंट जनरल, ब्रिगेड मेजर, एडीकँप वगैरे आहेत. फौजेच्या दप्तरखर्चाकडे सुमारें २२००० रु. सालिना रक्कम लागते. याशिवाय इतर फौजेच खर्च धरितां या खात्याकडे सालीना ७ लाखाचा खर्च होतो.

पो ली स व तु रुं ग.—तुरुंगाची व्यवस्था सर टी.माधवराव यांच्या कारकीर्दीत झाली. त्यापूर्वी परगण्यांत असलेल्या चौकींत कैद्यांना कोंडून ठेवीत. फक्त इंदुरांत मोठ्या शिक्षेच्या लोकांसाठीं तुरुंगाची व्यवस्था असे. इंदोर येथील सेंट्रल जेल १८७५ सालीं स्थापन झाला. कैद्यांचें अन्न डॉक्टर तपासतो. पूर्वी जो तो आपल्यासाठीं स्वयंपाक करी. आतां सर्वांसाठीं एके ठिकाणीं तो होऊं लागला आहे. प्रत्येक तुरुंगावर जेलर असून त्यावर जिल्ह्याच्या जज्जाची व सेशन जज्जाची देखरेख असते. इंदूर येथील सेंट्रल जेलवर जेलरशिवाय एक सुपरिंटेंडेन्ट असतो.

इंदूर येथील तुरुंगांत खादी, चटया, पासोड्या वगैरे तयार करण्याचे कारखाने आहेत. रामपुऱ्यांतील कैदी बहुतकरून शेती करणारे असतात, त्यासाठीं शेतीची व्यवस्था केली आहे.

शि क्ष ण वि भा ग.—इ. स. १८६५ पूर्वी शहरांत सर्वत्र खासगी शाळा भरत. इ. स. १८९१ पर्यंत मॅट्रिकच्यापुढें अभ्यास करण्यास संस्थानांत मुळींच सोय नव्हती म्हणून महाराजा शिवाजीराव होळकरांनीं १८९१ च्या जून महिन्यांत होळकर कॉलेज उघडलें. हें कॉलेज १९०५ पावेतों कलकत्ता युनिव्हर्सिटीला सामील होतें. आतां तें अलाहाबाद युनिव्हर्सिटीकडे आहे.

संस्थानांतील लोकसंख्येपैकीं शेंकडा ६ लोक साक्षर आहेत. पैकीं पुरुषांचें प्रमाण शेंकडा १०·३ असून बायकांचें प्रमाण १.४ असें आहे.

| वय | एकूण लो. सं. पुरुष | एकूण लो. सं. बायका | साक्षर लो. सं. पुरुष | साक्षर लो. सं. बायका |
|---|---|---|---|---|
| ०–१० | १५४६०८ | १५८३२८ | २५७२ | ७७९ |
| १०–१५ | ७१७४३ | ५८१७३ | ७२७६ | १२४९ |
| १५–२० | ४५१२७ | ३९५९० | ७०२८ | १११६ |
| २०–वर | ३२९२२० | २९४७८९ | ४५१६९ | ४५९४ |
| एकूण | ६००६९८ | ५५०८८० | ६२०४५ | ७७३८ |

संस्थानामध्यें इंग्लिश जाणणारांची संख्या ११०२३ असून त्यापैकीं ९९८६ पुरुष व १०३७ स्त्रिया आहेत. संस्थानांत शिक्षण देणाऱ्या संस्था १९११ सालीं १५२ असून त्यांत शिकणाऱ्या मुलांची संख्या १११६९ होती. १९२१ सालीं शिक्षण संस्थाचा आंकडा १९५ वर गेला असून विद्यार्थ्यांची संख्या १८६९१ इतकी आहे. म्हणजे १० वर्षांमध्यें संस्थांची वाढ २८·३ या प्रमाणांत झाली असून विद्यार्थ्यांची संख्या ६७·३ या प्रमाणांत वाढली आहे.

द वा खा ना.—या संस्थानांत इ. स. १८५२ पर्यंत इंग्रजी तऱ्हेच्या दवाखान्याची व्यवस्था झाली नव्हती; त्यावेळीं कित्येक वैद्य व हकीम औषधें देत, त्यास सरकारची मदत असे. इ. स. १८५२ मध्यें शहरापासून १॥ मैलांवर धर्मार्थ दवाखाना स्थापन केला गेला. त्यानंतर लवकरच महेश्वर, खरगोण, कन्नोद व रामपुरा अशा चार ठिकाणीं दवाखाने उघडले. इ. स. १९०१ मध्यें महाराज तुकोजी हॉस्पिटल स्थापन झालें. इ. स. १९२१ मध्यें हॉस्पिटलें व दवाखाने यांची संख्या ५० होती.

लो क ल बो र्ड व म्यु नि सि पा लि ट्या.—ब्रिटिश हद्दींतल्या म्युनिसिपालिटीप्रमाणें येथील म्युनिसिपालिटीस स्थानिक स्वराज्याचे हक्क नाहींत. दिवाबत्ती, साफसफाई व शहराचें आरोग्य यांपलीकडे त्यांच्याकडे काम नसतें. हिची व्यवस्था दरबारनें नेमून दिलेल्या कांहीं सरकारी व कांहीं बिनसरकारी यांच्या कमिटीच्यामार्फत चालते. म्युनिसिपालिटीचा सुपरिंटेंडेन्ट हा कमिटीचा अध्यक्ष असतो. तो दरबारच्या हुकुमाप्रमाणें व्यवस्था ठेवितो. आरोग्य सुधारण्यासाठीं अशा म्युनिसिपालिट्या जागजागीं स्थापन झाल्या आहेत.

व सू ल व ज मा ख र्च ( फडणिसी )—इ. स. १७६०–९७ या दरम्यान म्हणजे सुभेदार मल्हाररावांच्या कारकीर्दीच्या शेवटीं शेवटीं व अहल्याबाई व पहिले तुकोजी यांच्या कारकीर्दीत कांहींतरी ठराविक पद्धतीनें वसूल करीत असत. त्यापूर्वी तसें नसे. पुढें पहिल्या तुकोजीच्या मृत्यूनंतर इ. स. १८२० पावेतों वसुल करण्यांत सामान्यतः बळजबरी

केली जात असे. तात्या जोगाच्या कारकीर्दीत ही अनियमितता जाऊन त्या कामास थोडें व्यवस्थित स्वरूप प्राप्त झालें व इ. स. १८२०–२६ पावेतों पांच लाखांवरचें उत्पन्न २७ लाखांवर आलें. हें पारडें इ. स. १८४४ पर्यंत पुन्हां फिरून ९ लाख जमा व २३ लाख खर्च होऊं लागला. दुसरे तुकोजीराव महाराज यांच्या कारकीर्दीत सांपत्तिक स्थितीची भरभराट होऊं लागली.

ह ल्लीं ची प द्ध ति व फ ड णी स.—वार्षिक बजेट पास होऊन दर आक्टोबरपासून तें अमलांत येतें. संस्थानांतील सर्व हिशेब फडणीस पाहतो. प्रत्येक खात्याचा जो मुख्य असतो, तो आपल्या अधिकारांत आपल्या सहीनें पैशाची वांटणी करतो.

ज मा बं दी चें अं दा जीं उ त्प न्न.—१९१३–१४ सालची एकूण जमा ८९१०९५५ व एकूण खर्च ७९८०५४७ याप्रमाणें होता.

पु रा ण व स्तु सं शो ध न.—प्राचीन सुबक, कोरींव, नकशीकाम धामणेर आणि ऊन येथें आढळून येतें. याशिवाय दहाव्या शतकापासून तेराव्या शतकापर्यंत बांधलेल्या देवळांचे सुबक, कोरींव कामाचे अवशेष माळव्यांत सर्वत्र आढळून येतात. मोरी, इंदोक, झारडा, माकला वगैरे दुसऱ्या पुष्कळ ठिकाणीं असले अवशेष विशेष आहेत. नेमाड आणि नेमावर या प्रांतीं मुसुल्मानांच्या काळचे अशा प्रकारचे अवशेषहि जागजागीं आढळतात. तसेंच त्या काळचे किल्लेसुद्धां संस्थानांत पुष्कळ आहेत. त्यांत हिंगलजगड, बिजागड व सेंधवा येथील किल्ले फार प्रसिद्ध आहेत.

इ ति हा स.—पुण्यापासून ४० मैलांवर फलटणच्या राज्यांत नीरा नदीच्या कांठीं होळ म्हणून एक गांव आहे. तेथें ४०० वर्षांपूर्वी मालीबा या नांवाचा एक धनगर जातीचा गृहस्थ होऊन गेला. त्यानंतरचा ११ व्या पिढींतला पुरुष खंडोजी हा त्या गांवचा चौगुला होता. त्याला मल्लारी नांवाचा एकुलता एक मुलगा होता. त्यानें होळकर राज्याची स्थापना केली. यांच्या होळगांवीं कित्येक पिढ्या गेल्यामुळें होळकर हें नांव पडलें. या घराण्याचे पूर्वज पूर्वी मथुरेच्या आसपास रहात असावे. तेथून मेवाडांत चितोड नजीक व त्यानंतर दक्षिणेकडे जाऊन औरंगाबादच्या आसपास त्यांनीं वस्ती केली असावी, असा शोध लागला आहे.

मल्हाररावाचा जन्म १६९४ च्या आक्टोबरांत झाला. त्याचा बाप खंडोजी हा मल्लारी लहान असतांनाच निवर्तला, त्यामुळें त्याच्या आईनें होळ सोडलें व ती मुलासह खानदेशांत तळोदें गांवीं आली. तेथें तिचा भाऊ भोजराज बारगळ रहात असे. तो खाऊनपिऊन सुखी होता. त्याचे कांहीं स्वार मराठ्यांचे सरदार कदम बांडे यांच्या तैनातींत असत. मल्हाररावासहि त्यांच्याकडे नोकरीस ठेविलें होतें. भोजराज बारगळचा नारायण नांवाचा मुलगा उदेपूरकरांकडे नो असून त्याच्या कामगिरीबद्दल राजानें त्यास बुध हें गांव जहागीर दिलें होतें. भोजराजाची मुलगी गौतमाबाई मल्हाररावास दिली होती. मल्हाररावांची कीर्ति, शौर्य व इमानीपणा पाहून बाजीराव पेशव्यानें इ. स. १७२४ त त्यास आपल्याकडे मागून घेतलें. तेथें लवकरच त्यास ५०० स्वारांवर मुख्य नेमण्यांत आलें. याप्रमाणें मल्हाररावाच्या भरभराटीस आरंभ झाला.



याच सुमारास बाजीरावासारखा खंबीर पेशवा लाभल्यामुळें मराठ्यांची सत्ता वाढत होती, माळवाआदिकरून उत्तरेकडील मुलूख जिंकण्याचा त्याचा मुख्य उद्देश होता. महमदशहानें त्या वेळचा माळव्यावरचा सुभेदार निजाम-उल्मुल्क यास काढून नागर ब्राह्मण गिरधर यास सुभेदार केलें होतें. निजाम व त्याचा पुतण्या हमीदखान यांच्यामध्यें भांडणें लागलीं होतीं. त्याचा फायदा घेऊन इ. स. १७२५ त माळव्यावर चौथाई व सरदेशमुखी बसविण्यासाठीं बाजीरावानें होळकर, शिंदे व पवार यांस कांहीं हक देऊन पाठविलें. त्यांस माळव्याचा सुभेदार गिरधर बहादूर यानें प्रतिबंध केला होता, तरी तो पुढें इ. स. १७२९ च्या मोहिमेंत ठार झाला व त्याची जागा दायबहादूरला मिळाली. तोहि धाडशी व शूर होता. गिरधर बहादुराप्रमाणें यानेंहि मराठ्यांच्या हल्ल्यांस अडथळा केला. पुढें निजामानें बादशहाचा सूड घेण्याच्या बुद्धीनें माळव्यावर स्वारी करण्याची बाजीरावास सल्ला दिली. त्याप्रमाणें इ. स. १७३१ त पेशव्यानें आपला भाऊ चिमणाजीआप्पा व मल्हारराव ह्यांस माळवा कायमचा हस्तगत करण्यासाठीं पाठविलें. त्यांची व दायबहादूरची धारजवळ तरला येथें लढाई होऊन तो ठार झाला. माळवा सर झाल्यामुळें बाजीरावास आनंद झाला. व त्यानें होळकरास माळव्यांतील ८२ परगणे जाहागीर दिले व धारच्या पोवारांच्या वाढत्या सत्तेस आळा बसविण्यासाठीं माळव्याची राज्यव्यवस्थाहि त्याच्याकडे सोंपविली. नर्मदेच्या आजूबाजूचा प्रदेश मल्हाररावानें पूर्वींच जिंकला होता. त्यामुळें दोन्ही प्रदेशांचें महेश्वर हेंच राजधानीचें शहर झालें. इ. स. १७३५ त मल्हाररावास माळव्यांत ठेवून बाजीराव पुण्यास गेला. इकडे मल्हाररावानें आग्र्यापर्यंतचा मुलूख पादाक्रांत करून त्यावर चौथाई व सरदेशमुखी बसविली. पुढच्या वर्षी बाजीराव दिल्लीस गेला. त्याच्याबरोबर मल्हाररावहि होताच. तेथें मोंगलांचा पराभव करून येत असतां भोपाळ येथें निजामाची गांठ पडली. तेव्हां लढाई होऊन मराठ्यांची सरशी झाली. त्यांत मल्हाररावाचें अप्रतिम शौर्य दिसून आलें. त्यानंतर वसईच्या वेढ्यांत ( १७३९ सालीं) व रोहिल्यांवरच्या स्वारींत (१७४८ सालीं) हि त्याचें कौशल्य दिसलें.

इ. स. १७४३ त जयपूरचा राजा सवाई जयसिंग मृत्यू पावला व त्याचा वडील मुलगा इसरीसिंग गादीवर बसला ह्यामुळें त्याचा सावत्रभाऊ–उदेपूरकरांचा भाचा–माधोसिंग यास राग आला. माधोसिंगानें मल्हाररावास मदतीस बोला-

विलें तों ईश्वरीसिंगानें आत्महत्या केली. यामुळें जयपूरचें राज्य माधोसिंगास मिळून त्यानें ६४ लाख रुपये व रामपुरा, भानपुरा आणि टोंक हे जिल्हे मल्हाररावास दिले. इ. स. १७४५ त राणोजी शिंदे मृत्यू पावला त्यावेळीं माळव्यापैकीं ७४॥ लाख उत्पन्नाचा मुलूख होळकराकडे होता.

दक्षिणच्या सुभेदारीबद्दल निजामउल्मुल्कच्या मुलांमध्यें तंटे उपस्थित झाले. त्यावेळीं मल्हाररावानें गाजीउद्दीनचा पक्ष घेऊन तो त्यास सुभेदारी देण्यासाठीं दक्षिणकडे घेऊन जात होता. इतक्यांत गाजीउद्दीनास कोणी विषप्रयोग केला. पुढें इ. स. १७५४ त मल्हाररावानें गाजीउद्दीनाचा मुलगा मीरसाहेब उद्दीन याचा पक्ष धरून त्यानें बादशहाच्या फौजेचा दिल्लीनजीक अगदीं पराभव केला. दुसऱ्या अलमगिरास दिल्लीच्या तख्तावर बसविण्याच्या कामीं व अहमदशहाच्या हिंदुस्थानांतल्या उलाढालीच्यावेळीं त्यानें शहाबुद्दीनचा पक्ष उचलला होता.

इ. स. १७६१ त पानिपतची लढाई होऊन तींत मराठी सत्तेस जबर धक्का बसला. या लढाईत मल्हारराव मनापासून लढला नाहीं. त्यानें आपलें अंग काढून घेतलें होतें. कारण भाऊसाहेबांचा गर्विष्ठ स्वभाव व तदनुरूप वर्तन त्यास आवडलें नाहीं. त्यानंतर निजामाशीं राक्षसभुवन येथें जी लढाई झाली, तींत मल्हाररावाची कामगिरी विशेष होती. ह्यामुळें त्यास आणखी ३० लाखांचा मुलूख मिळाला.

याप्रमाणें मल्हारराव ७२ वर्षांमध्यें अगदीं गरीबाचा राजा झाला. व इ. स. १७६६ सालीं राघोबादादा बरोबर उत्तरेकडे स्वारीवर गेला असतां मेच्या २०व्या तारखेस अलमपूर येथें एकाएकीं मरण पावला. तेथें त्याची छत्री आहे. मल्हारराव हा एक साधा शिपाई होता. महादजी सिंद्याप्रमाणें जरी तो मुत्सद्दी नव्हता, तरी त्याची लढण्याची कला व राज्यव्यवस्था ह्या उत्तम होत्या. हा बाणेदार निधड्या छातीचा पुरुष त्या धामधुमीच्या काळांत मराठ्यांचा एक पुढारी होता. त्यास खंडेराव या नांवाचा एक मुलगा होता. तो राजपुतान्याकडे रघुनाथराव व दत्ताजी शिंदे यांजबरोबर जात असतां कुंभेरीच्या वेढ्यांत मारला गेला. खंडेरावाचें लग्न शिंदे घराण्यांतील अहिल्याबाईशीं झालें होतें. व तिच्यापासून मालेरावबाबा व मुक्ताबाई अशीं दोन अपत्यें त्यास झालीं. मालेराव हा मल्हाररावाच्या मागें गादीवर बसला व एक वर्षाच्या आंतच वेड लागून मृत्यू पावला.

मालेराव जिवंत असतां अहल्याबाईनें राज्यांत चांगला बंदोबस्त ठेवून व्यवस्थित रीतीनें राज्य चालविलें होतें. स्त्री असल्यामुळें तिला सैन्याचें आधिपत्य स्वीकारून लढाईवर जातां येत नसे, म्हणून त्या कामाकरितां सैन्यांतील तुकोजी होळकर या अधिकाऱ्याची तिनें योजना केली. तुकोजीराव महत्त्वाच्या प्रसंगीं अहल्याबाईचा सल्ला घेत असे.

इ. स. १७६९ त विसाजी कृष्ण व रामचंद्र गणेश हे रोहिले व जाठ ह्यांवर चालून जात असतां त्यांस १५००० फौजेनिशीं तुकोजीराव जाऊन मिळाला. इकडे शिंद्याच्या मनांत जनकोजीच्या मरणामुळें रोहिला नजिब उद्दौला याचा सूड घ्यावयाचा होता. पण तुकोजी होळकरानें नजिब उद्दौल्यास आश्रय दिला, त्यामुळें शिंद्यांचा नाइलाज झाला. इकडे पुण्यास इ. स. १७७२ च्या नवंबरच्या १८ व्या तारखेस माधवराव पेशवा मरण पावला, व त्याचा धाकटा भाऊ नारायणराव हा पेशवा झाला. त्यानें विसाजीपंतास रोहिल्यांच्या मोहिमेवरून परत बोलाविलें. परंतु लौकरच इ.स.१७७३ त आगष्टच्या ३० व्या तारखेस नारायणरावाचा खून होऊन त्याचा चुलता राघोबादादा ह्यास पेशवापद प्राप्त झालें. त्यास तुकोजीचा पाठिंबा होता. तुकोजीस आपल्याकडे घेण्यासाठीं नाना फडणीसानें शिंद्यास मध्यस्थी घातलें. त्यानें इ. स. १७७८ त ७९ लाख रु. लांच देऊन होळकराचें मन नानाफडणविसाच्या बाजूस वळविलें. इ. स. १७८५ त टिपू सुलतानावर गणेशपंतास पाठविलें, तेव्हां त्याच्या मदतीस तुकोजीस दिलें होतें. तें काम फत्ते केल्यावर अहल्याबाईस भेटण्यासाठीं तो महेश्वरास आला. पुन्हां इ. स. १७८८ त त्यानें महेश्वर सोडलें व अलिबहादूरवर स्वारी करण्यासाठीं शिंद्यावरोबर दिल्लीस गेला. इ. स. १७९५ च्या आगस्टच्या १३ व्या तारखेस अहल्याबाई कैलासवासी झाल्या, तेव्हां संस्थानचीं सर्व सूत्रें तुकोजीच्या हातीं आलीं.

इ. स. १७९५ त सवाई माधवराव मृत्यु पावला, त्यावेळीं राघोबाचा मुलगा बाजीराव यास गादीवर बसवूं नये, अशी तुकोजीची इच्छा होती; परंतु त्यानें त्या राजकारस्थानांत आपलें मन घातलें नाहीं. इ. स. १७९७ त आगस्टच्या १५ व्या तारखेस तो मरण पावला. त्याचा स्वभाव एखाद्या साध्याभोळ्या शिपायाप्रमाणें होता, तरी त्या काळच्या मराठा पुढाऱ्यांस साजेल असेंच त्याचें शौर्य होतें. तो मोठमोठ्या महत्त्वाच्या प्रसंगीं अहल्याबाईचें मत घेत असे.

तुकोजीस काशीराव व मल्हारराव असे दोन औरस आणि यशवंतराव व विठोजी हे दोघे दासीपासुन झालेले असे चार मुलगे होते. काशीराव हा क्षुद्रबुद्धि असल्यामुळें राज्य चालविण्याच्या कामीं मुळींच लायक नव्हता. मल्हारराव शूर व तरतरीत होता; पण त्याचा स्वभाव कांहींसा जुलमी होता. त्यानें इ. स. १७९१–९२ मध्यें खुद्द होळकरसंस्थानास व आणखी कांहीं संस्थानांना बराच त्रास दिला होता. या मल्हाररावाच्या कृत्याबद्दल तुकोजीस बराच राग आला. त्यानें अहल्याबाईसहि त्याविषयीं लिहिलें होतें.

तुकोजीच्या मृत्यूनंतर त्या दोघां भावांमध्यें गादीविषयीं भांडण जुंपलें. मल्हाररावानें पेशव्यांचा आश्रय धरिला व काशीरावानें शिंद्यांचा कारभारी सर्जेराव घाडगे याची मदत मागितली. होळकर संस्थानांत अनायासें आपला हात

शिरकविण्याची आतां वेळ आली आहे, असें वाटून घाडगे यानें काशीरावास मदत देण्याविषयीं शिंद्यांचें मन वळविलें. त्याप्रमाणें शिंद्यानें मल्हाररावाच्या तळास पुणें येथें वेढा दिला. त्यांत मल्हारराव पडला व त्याचा तान्हा मुलगा खंडेराव शिंद्यांच्या हातीं लागला. त्यानंतर यशवंतराव नागपुरास व विठोजी कोल्हापुरास पळून गेले.

त्या वेळेपासून यशवंतराव हा होळकर घराण्याचा मुख्य बनला. यशवंतराव नागपुरास जातांच भोसल्यांनीं शिंद्यांच्या म्हणण्यावरून त्यास कैद केलें. तेथून तो सहा महिने कैद भोगून मोठ्या युक्तीनें खानदेशांत पळून गेला व एका भिल्ल सरदाराच्या आश्रयास राहिला. नंतर वढवाणीवरून तो धारेस गेला. तेथें आनंदराव पवारानें त्याचें उत्तम प्रकारें आदरातिथ्य केलें. याचवेळीं रंगराव ओरेकरच्या हाताखालील पेंढाऱ्यांच्या हल्ल्यांतून यशवंतरावानें धार संस्थान वांचविलें. पुढें शिंद्यांनीं पवारास भीति घातल्यामुळें त्याला धार सोडून जाणें भाग पडलें. अशा स्थितींतहि त्यानें देपाळपुरावर हल्ला करून तें लुटलें. ह्या हल्ल्यांत यशवंतरावाचें नांव होऊन लोक भराभर त्यास मिळत चालले. यशवंतरावास आपली खरी योग्यता माहीत असल्यामुळें होळकरांच्या दौलतीवर आपला हक्क आहे, असें त्यानें दर्शविलें नाहीं. मी मल्हाररावाचा मुलगा खंडेराव याचा कैवारी आहे, असें लोकांस भासविलें व जुन्या लोकांनां मिळण्यास सांगितलें. पुढें लवकरच सारंगपूरचा वजीरहुसन आणि अमीरखान ( हल्लीं टोंकच्या गादीवर असलेल्या नवाबाचा पूर्वज-पहा ) हे त्यास येऊन मिळाले. कसराबादेस डुड्रनेकच्या कांहीं पलटणींवर यशवंतरावास जय मिळाल्यामुळें डुड्रनेकहि नामधारी काशीरावास सोडून यशवंतरावास मिळाला, यामुळें त्याची कीर्ति वाढून त्यास लोक येऊन मिळाले व सर्वत्र वाहवा झाली. डुड्रनेकच्या मदतीनें त्यानें आणखी कांहीं यूरोपियन मंडळी आपल्या पदरीं ठेवली आणि डॉड व प्लमेट ह्यांच्या हाताखालीं त्यानें दोन ब्रिगेडी उभारल्या. पुढें तो महेश्वरास गेला. तेथें त्याच्या हातीं बराच खजिना लागला. त्यांतून त्यानें फौजेचा पगार वाटला. येथें तो नर्मदाकांठीं बसून मशाली पेटवून गोळीबार करून स्वतःची करमणूक करीत असतां एकाएकीं बंदूक फुटून त्याचा एक डोळा गेला. नंतर त्यानें माळव्याकडे कुच केलें व देवास वगैरेच्या संस्थानिकांकडून खंडणी वसूल करून शिंद्यांच्या ताब्यांतील मुलुखहि त्यानें लुटला ( १७९९ ). ह्या वेळीं शिंद्यांची फौज लखबादादाच्या हाताखालीं आग्र्याच्या किल्ल्याला वेढा देण्यांत गुंतली होती व खुद्द शिंदे पुण्यास होता. त्यास १८०१ पावेतों दक्षिण सोडून आपल्या प्रांताकडे येतां आलें नसतें, यामुळें यशवंतरावाचें फावलें. इ. स. १८०१ च्या एप्रिलमध्यें विठोजीनें पुण्यास पुंडावा माजविला होता म्हणून त्यास धरून आणून पेशव्यांनीं हत्तीच्या पायीं दिलें. ह्या कृत्याबद्दल यशवंतरावानें पेशव्यांचा द्वेष मनांत ठेवला. इकडे यशवंतरावाचें कृत्य दौलतरावाच्या कानीं पडतांच तो उत्तरेकडे यावयास निघाला व त्यानें मेजर जॉर्ज हेसिंग याला उज्जैनवर चाल करून जाण्यास सांगितलें. १८०१ च्या जुलै महिन्यांत लढाई होऊन मेजर हेसिंगचा पूर्ण मोड झाला.

इ. स. १८११ च्या आक्टोबरच्या २८ व्या तारखेस यशवंतराव वेड लागून भानपुरा मुक्कामीं मरण पावला. त्या काळीं त्याच्यासारखा घोड्यावर बसणारा उमदा कोणीहि नव्हता. तसाच तो शूर योद्धाहि होता. सेनापतीच्या अंगीं जे गुण पाहिजेत ते सर्व त्याच्या अंगीं होते. त्याला उत्तम लिहितांवाचतांहि येत असे.

यशवंतराव वेडा होऊन राज्य चालविण्यास असमर्थ झाल्यामुळें कारभारी बाळारामशेट हा तुळजाबाईच्या देखरेखीखालीं राज्यकारभार चालवूं लागला. संस्थानचा कारभार सुमारें १० वर्षे ( १८०८-१८१७ ) या बाईच्या हातीं होता. यशवंतरावाच्या मरणापूर्वीच तिनें केसरीबाईपासून झालेला त्याचा मुलगा मल्हारराव ह्यास दत्तक घेतलें होतें. १८१७ त संस्थानची राजधानी इंदूर झाली. १८२६ मध्यें तात्या जोग हे राज्यकारभाराचे आधारस्तंभ कारभारी मयत झाले व यामुळें संस्थानचें बरेंच नुकसान झालें. महाराज मल्हारराव १८३३ सालीं आक्टोबरच्या २७ व्या तारखेस कैलासवासी झाले.

पुढें १८३४ च्या एप्रिलच्या १७ व्या तारखेस हरिहरराव हा गादीवर बसला, याच्या कारकीर्दींत राज्यांत बरेच घोंटाळे माजले. महाराज अशक्त असल्यामुळें राज्यकारभाराची दगदग पुढें त्यांच्यानें होईना म्हणून त्यांचा जांवई राजाभाऊ फणसे हा राज्यकारभार पाहूं लागला; पण पुढें राज्यकारभार चालविण्याचें ज्ञान त्याच्या अंगीं नसल्यामुळें नारायणराव पळशीकर यास दिवाण नेमावें लागलें; पण तोहि लवकरच मरण पावला म्हणून त्याचा मुलगा रामराव यास त्याच्या जागीं नेमलें. तो वयानें लहान असल्यामुळें राज्यकारभार पाहण्याची योग्यता त्याच्या अंगीं नव्हती म्हणून राजाभाऊ फणशे पुन्हां राज्यकारकार पाहूं लागला. पुढें रेसिडेंटाच्या मदतीनें हरिहररावानें जोशीखेडा येथील जमीनदार बापूजी होळकर याचा ११ वर्षांचा मुलगा खंडेराव यास इ. स. १८४१ च्या जुलैच्या २ ऱ्या तारखेस दत्तक घेतलें. ता. १६ आक्टोबर १८४३ रोजीं भ्रम होऊन हरिहररावांचा अंत झाला.

हरिहररावांच्या मृत्यूनंतर नोव्हेंबरच्या १३ व्या तारखेस खंडेराव ( १८४३-४४ ) हा गादीवर बसला; पण पुढें वयाच्या पंधराव्या वर्षीच मृत्युमुखीं पडला. त्याच्यामागें राज्याचा खरा वारस कोणीच उरला नव्हता; पण पुढें सर रॉबर्ट हॅमिल्टन या रेसिडेंटाच्या मदतीनें मासाहेब केसरीबाई यांनीं भाऊ होळकरांच्या दोघां पुत्रांपैकीं धाकट्या तुकोजीरावास पसंत करून १८४४ मध्यें जूनच्या २७ व्या तारखेस

गादीवर बसविलें. इ. स. १८५२ सालीं त्यांच्या हातांत सर्व राज्यसूत्रें आलीं. इ. स. १८६१–६६ पर्यंत इंग्रज सरकार व होळकर यांच्या प्रांतांपैकीं कांहीं प्रांतांची अदलाबदल होऊन होळकरांचे प्रांत कांहींसे एकत्रित झाले.

अनेक गोष्टींनीं आपली कारकीर्द चिरस्मरणीय करून महाराज दुसरे तुकोजीराव इ. स. १८८६ मध्यें जूनच्या १७ व्या तारखेस मरण पावले. यांच्यामागें यांचे दत्तक शिवाजीरावमहाराज गादीवर बसले. इ. स. १८९९ मध्यें इंदूर दरबारीं स्वतंत्र रेसिडेंट नेमण्यांत आला. इ. स. १९०२ मध्यें जुनें नाणें बंद करून ब्रिटिशांचें नाणें संस्थानांत सुरू झालें.इ.स.१९०३ च्या जानेवारीच्या ३१व्या तारखेस श्रीमंत सवाई तुकोजीराव यांस गादीवर बसवून ते बडवाई येथें राहण्यास गेले. तेथेंच ते १९१० सालीं मरण पावले.

महाराजांस १९११ च्या नोव्हेंबर ६ तारखेस राज्यकारभार पहाण्याची परवानगी मिळाली, तेव्हांपासून राज्यांत अनेक उपयुक्त सुधारणा घडून येत आहेत. महाराजांस 'हिज हायनेस महाराजाधिराज राजराजेश्वर सवाई तुकोजीराव' अशी बहुमानात्मक पदवी असून संस्थानच्या हद्दींत २१ तोफांची व बाहेर १९ तोफांची त्यांस सलामी आहे.

रा. रहाळकर यांनीं संस्थानच्या दशवार्षिक प्रगतीचा एक अहवाल तयार केला आहे त्याचा सारांश असाः—

शे त की.—इसवी सन. १९१० पासून दहा वर्षांत ३५७००० एकर नवीन जमीनी लागवडीला आल्या त्या योगानें संस्थानच्या उत्पन्नांत प्रतिवर्षी ५००६७१ रुपये वाढ झाली आहे. इ. १९२० सालीं विहिरींनीं भिजणारी जमीन ४९ हजार एकर व तळीं व पाटबंधारे या योगें भिजणारी जमीन पांच हजार एकर होती. दुसऱ्या प्रकारच्या जमीनींपैकीं २३७१ एकर जमीन पाटबंधाऱ्यांनें भिजणारी होती व २२६८ एकर जमीनींत पाणी मोटेनें शेंदून घालावें लागे. इंदूर जिल्ह्याखेरीज इतरत्र विहिरींची संख्या वाढली आहे व तळीं कमी झालीं आहेत. इंदूर जिल्ह्यांत४०तळीं नवीन झालीं आहेत.संस्थानांत १९२०मध्यें २१३४४ विहीरी व ५३८ तळीं होतीं. १९०६।७ सालाच्या जमीनमहसुलाच्या आकारणीपूर्वी संस्थानचा जमीनमहसूल ३३५२४९४ रु. होता परंतु आतां त्यांत शेंकडा ३३ वाढ झाली आहे. एकंदर लागवडीस आलेली नवीन जमीन लक्षांत घेतां सदर वाढ, शेतकऱ्यांना सहज झेपेल इतकाच सारा बसविण्यांत येतो, याची द्योतक आहे.

संस्थानांत २०१ संयुक्त पतपेढ्या आहेत, चार मध्यवर्ती बँका आहेत. १७८ शेतकरी लोकांच्या, २ नागरीक व १७ कोष्टी लोकांच्या अशी पतपेढ्यांची विल्हेवारी आहे. शेतकरी पेढ्या मध्यवर्ती बँकांतून ९ टक्के व्याजानें कर्ज आणतात व तें शेतकऱ्यांनां १२ ते १५ टक्के व्याजानें मिळतें. या पतपेढ्यांच्या योगानें उसाची शेती करण्याची पात्रता शेतकरी लोकांच्या अंगीं आली आहे. यापूर्वी द्रव्यसहाय्याच्या अभावीं उसाची शेती हातीं घेणें शेतकऱ्यांनां कठिण जाई.

उ द्यो ग धं दे—गेल्या चौदा वर्षांत पूर्वीपेक्षां संस्थानांत उद्योगधंदे दुपटीनें वाढले आहेत. इसवी सन १९२० सालीं १३५ कारखाने होते, ५७ कापूस पिंजण्याचे कारखाने, १३ कापसाचे गठ्ठे दाबण्याचे कारखाने आणि १५ लांकडी हातदाबाचे कारखाने अशी कारखान्यांची विल्हेवारी आहे. माळवा युनायटेड मिल्स, हुकूमचंद मिल्स आणि स्टेट मिल्स या कारखान्यांतून इतर कारखान्यांपेक्षां अधिक माल बाहेर पडला.या मालाच्या पैदाशीमुळें कापडावरील कराच्या सरकारी उत्पन्नांत पुष्कळच वाढ झाली आहे. कापसाव्यतिरिक्त संस्थानचे ५, जॉइंट स्टॉक कंपन्यांचे ६ व बाकीचे सर्व इतर कारखाने खासगी लोकांचे आहेत.

म जू री व का मा चे ता स—निष्णात पुरुष मजुरास १ रुपया २ आणे ६ पै रोजमुरा मिळतो. दररोज पावणेआठ ते सव्वा नऊ तास मजुरांनां काम पडतें परंतु रामपुऱ्यांतील स्वतंत्र मजूर स्वेच्छेनें १४॥ ते १६॥ तास दररोज काम करितात. १९२१ सालीं कामाचे तास ठरविण्याकरितां, मुलांनां रोजगार देण्यासंबंधानें आणि दुखापत झालेल्या मजुरांना नुकसानभरपाईदाखल कांहीं तनखा करून देण्यासंबंधीं विचार करण्यासाठीं एक पंचायत नेमण्यांत आली आहे.

म जु रां चें व र्गी क र ण.— इसवी सन १९२१ च्या खानेसुमारींत असें आढळून आलें आहे कीं, शेंकडा ८९ कारागीर आनुवंशिक धंद्यास चिकटून राहिले आहेत. त्यांपैकीं शेंकडा १७ मुसुलमान, १३ सुतार व शेंकडा १३ सोनार आहेत. एकंदर ५५९२ कारागिरांपैकीं फक्त ३९४ स्त्रिया आहेत आणि त्यांपैकीं महेश्वर येथेंच १०३ आहेत. येथील कित्येक कोष्टी विणण्याकरितां स्त्रियांनाच नोकरीस ठेवितात. एकंदर कारागिरांत शेंकडा १७ विणकाम करणारे, शेंकडा १५ सुतारकाम करणारे, शेंकडा १४ चांदी सोन्याचीं कामें करणारे आणि शेंकडा १० बांधकाम व खोदकाम करणारे आहेत.

द र मा ण सीं अं दा जी उ त्प न्न.— इंदूर शहरांत दर माणसीं अंदाजीं उत्पन्न सालीना १२० रुपयांचें आहे, परंतु जिल्हानिहाय तें दरमाणसी सालीना ३० ते ३७ रुपये आहे, सर्व संस्थानचें सरासरी उत्पन्न दरमाणसीं सालीना ४२ रुपयांचें आहे. (हिंदुस्थानचें उत्पन्न दर माणसीं सरासरी ३६ ते ५३ रुपये सालीना ठरविण्यांत आलें आहे.) लोकांची आर्थिक परिस्थिति अगदीं समाधानकारक आहे असें म्हणतां येत नाहीं. कारण व्याज वगैरेंचे उत्पन्न दर माणसी सालीना फक्त दोन रुपये आहे. इंदूर शहर खेरीज करून इतरत्र संस्थानांत पाळीव जनावरांचें लोकवस्तीशीं प्रमाण शेंकडा ५३ असें आहे. खुद्द इंदूर

शहरांत मात्र, तें शेंकडा फक्त ६ च आहे. कारण शहराची एकंदर राहाणी बरीच खर्चाची असते. एक म्हैस अथवा गाय बाळगण्यास दरमहा २० ते २५ रुपयेपर्यंत खर्च येतो. १९१९ । २० सालीं संस्थानचें अंदाजी उत्पन्न १०६ लक्षांचें होतें. दर माणसीं ८ रुपये कर पडत होता. बडोदें संस्थानच्या मानानें पाहतां हा कर बराच जास्त आहे. आयात निर्गतीवरील करास १९०९ सालीं सुरुवात केली होती आतां तो संस्थानांत पूर्णपणें अमलांत आहे.

सा मा जि क.— इंदूर शहरांतील दहा इस्पितळें व इतर दवाखाने मिळून सर्व संस्थानांत एकंदर ५० वैद्यकीय संस्था १९२० सालीं होत्या. त्यापैकीं चार आयुर्वेदिक दवाखाने होते. संस्थानचें एकंदर आरोग्य उत्तम प्रकारचें आहे असें खानेसुमारीच्या वेळीं झालेल्या चौकशींत आढळून आलें. कारागिरांचें आरोग्य उत्कृष्ट होतें.

१९१८ सालीं जरी संस्थानांत बालविवाहप्रतिबंधाचा कायदा सुरू करण्यांत आला आहे तरी १९१८ ते १९२० पर्यंत एकंदर बालविवाहेच्छूंचे ११५६ अर्ज आले परंतु त्यांतील १४१ अर्जदारांखेरीज १०१५ अर्जदारांनां बालविवाहास परवानगी दिली होती. १९१८ ते १९२० पर्यंत ५०० च्या वर गुन्ह्यांची चौकशी व निवाडा करण्यांत आला होता. १९१५ सालीं विधवाविवाहाचा कायदा पास करण्यांत आला होता. १९१६ च्या इंदूर सिव्हिल मॅरेजच्या कायद्याअन्वयें १९२० सालापर्यंत फक्त चारच लग्नें झालीं. संस्थानांत सुमारें ३००० लोक गुन्हेगार जातींपैकीं आहेत. संस्थानांत मुख्यत्वेंकरून धार्मिक स्वरूपाच्या १२३ जत्रा सालिना भरत असतात.

वा ह नें.—बैलगाड्या हेंच अद्याप तरी संस्थानमध्यें मुख्यत्वेंकरून वहातुकीचें साधन आहे. संस्थानमध्यें भाड्याच्या बैलगाड्या ५००० वर आहेत. भाडोत्री घोड्याच्या गाड्या फक्त ४२३ आहेत, खुद्द इंदूर शहरांत मोटारी ६३ व सर्व संस्थानांत मिळून १९२० सालीं ७८ होत्या. संस्थानांत २२ हत्ती आहेत. १९१० सालीं नवीन पक्क्या ( काळ्या खडीच्या ) सडका बांधण्यांत आल्या. सध्यां अजमासें ५००-६०० मैल पक्क्या सडका संस्थानांत आहेत.

शि क्ष ण, वा च ना ल यें आ णि छा प खा ने.—संस्थानांत १९२० सालीं १८६ मुलांच्या शाळा होत्या. त्यांतून ७०० शिक्षक काम करीत होते व सर्व शाळांत मिळून १७॥ हजार विद्यार्थी शिक्षण घेत होते. होळकर कॉलेज व संस्कृत विद्यालय खेरीज करून खुद्द इंदूरांत १६ शैक्षणिक संस्था होत्या. होळकर कॉलेजांत विद्यार्थी १९२ होते. मुलींच्या शाळा २७ असून त्यांत ८३ शिक्षक व २००० विद्यार्थिनी होत्या. आहिल्याश्रम या नांवाची संस्था विधवांनां शिक्षण देण्यासाठीं व मुलींचें हाय स्कूल या दोन्ही संस्था १९१३ सालीं स्थापन करण्यांत आल्या. १९१९ सालीं इंदूर शहरांत १६ मोफत वाचनालयें व पुस्तकालयें होतीं. १९२० सालीं पुढील वृत्तपत्रें संस्थानांत प्रसिद्ध होत असत.—( १ ) होळकर सरकार गॅझेट, ( साप्ताहिक ) ( २ ) होळकर स्टेट पोलीस गॅझेट, ( ३ ) होळकर कॉलेज मॅगेझिन् ( ४ ) मल्हारी मार्तंड विजय ( साप्ताहिक ) संस्थानांतील व्यापारी व औद्योगिक खात्यामार्फत उपयुक्त लहान लहान पत्रकें प्रसिद्ध होतात.

पो ष्ट.—१९२० सालीं ८२ पोस्ट ऑफिसें व १२ संयुक्त ऑफिसें होतीं. दर १०१ चौरस मैलांत एक पोस्ट ऑफिस आहे.

श ह र.—हें शहर सरस्वती व खान या दोन नद्यांच्या तीरावर वसलेलें आहे. हें मुंबईहून ४५० मैल आहे व ह्या शहरास जाण्यास राजपुताना-माळवा रेल्वेच्या अजमीर-खांडवा शाखेनें जावें लागतें. ह्या शहराचें क्षेत्रफळ ५ मैल असून तें समुद्र पृष्ठभागापासून १७३८फुटांवर आहे.सन१७१५ सालीं एक खेडेगांव ह्या ठिकाणीं वसलें व ह्या गांवांत कांहीं जमीनदार लोक हल्लींच्या इंदूर शहरापासून १६ मैल असलेल्या कांपेल खेडेगांवाहून आले व ते येण्याचें कारण मराठे सरदार दख्खनहून उत्तरेकडे जातांना येथें उतरत व त्या जमीनदार लोकांचा व्यापार ह्या मराठे सरदारांच्या व इतर लोकांच्यामुळें चांगला चाले हें होय. सन १७४१ सालीं त्या व्यापाऱ्यांनीं इंद्रेश्वर नांवाचें एक देवालय बांधिलें व त्या नांवावरून त्या खेडेगांवाला इंदूर नांव पडलें व तेंच हल्लींचें इंदूर शहर होय.

म रा ठे शा हीं ती ल इं दू र.— शके १६८७ मधील एका फारशी पत्रांत इंदूर तालुक्याचा उल्लेखआहे ( खं. १२ प. ७८ ). तुकोजी होळकर इंदुराहून निघाले. त्यास सरकार कामावर घ्यावें म्हणून अहिल्याबाईनें लिहिल्याचा उल्लेख शके १७०२ मधील दोन पत्रांत ( खंड १० प. २६३-६४) आहे. शके १७०२ मधील पुरुषोत्तम महादेव यांच्या पत्रांत इंग्रजांची मोहीम अपुरी सोडून सरदार इंदुरास आले म्हणून पादशहास संशय येऊन त्यानें इंग्रजास वस्त्रें वगैरे देऊन सलोखा करण्याचा प्रयत्न केल्याचा उल्लेख ( खं. १२ प. ७ ) आहे. राघोबादादाच्या १७५७ च्या मोहिमेंत नानासाहेबांस लिहिलेल्या पत्रांत ( पत्र रा. खं. १. प. ५२) इंदूर येथें पोहोंचल्याचा उल्लेख आहे. ३१ मे १७५७च्या कृष्णाजी त्रिंबक यांनीं औरंगाबादेहून पाठविलेल्या पत्रांत जाधवराव इंदुरावर चाल करून येतात म्हणून उल्लेख आहे ( खं. १ प. ६५ ). गोविंद कृष्णाच्या शके १७१५ मधील दोन पत्रांत इंदूर बोधन वगैरे महाल नंफुरुदौला मरहूम याजबाबत शंकरराव जोग यांजकडे होते. त्यांतील बाकी थकल्यामुळें दौलाची मर्जी खपा होऊन वरील इंदूर बोधन वगैरे ठाणीं त्यानें काढून घेतलीं असा उल्लेख रा. खं. ७ मध्यें आहे. शंकरराव जोग यांजकडील इंदूर बोधन

तालुक्याचें काम व्यंकटराव सुरापूरकर यांचे पुत्र त्रिमलराव यांजकडे सांगितल्याचा उल्लेख (खं. ७ )मध्यें आहे. शके १७१५ तील दुसऱ्या एका पत्रांत होळकर इंदुरास आले असा उल्लेख ( रा.खं.७ ) आहे. दयाबाई मुलास घेऊन इंदुरास गेली होती, तिची यादी करार करून देऊन तिला परत आणविली असा उल्लेख ( रा. खं. १० प. १६५ शके १६९७ ) मध्यें आहे. इंदूर व बोधन हे दोन्ही परगणे पेशव्यांच्या स्वाधीन करण्याबद्दल जून, जुलै १७९५ मधील दोनतीन पत्रांत उल्लेख आला आहे (खं. ५ प. ५७,५८,५९).

श्रीअहिल्याबाईचें प्रेम ह्या शहरावर फार होतें व तिनें हें शहर आपल्या राजधानीचें ठिकाण केलें. ती माउली हयात असतांना ह्या शहरची भरभराट फार होती; पण दौलतराव शिंदे व यशवंतराव होळकर यांच्या तंट्यांत व सर्जेराव घाटगे याच्या अनन्वित कृत्यांनीं ह्या शहरची धूळधाण झाली; पण १८१८ सालापासून पुनः ह्या शहराला महत्त्व आलें व तें अजूनपर्यंत वाढत आहे. याची लोकसंख्या सारखी वाढत आहे. सन १९०१ सालीं येथील लोकसंख्या ८६६८६ होती. ती १९२१ सालीं ९३०९१ झाली. यांपैकीं हिंदूंची संख्या ६९८७२ असून मुसुलमानांची १९७२३, जैनांची २८६८ व इतरांची ६२८ होती.

हें शहर राजधानीचें ठिकाण असून मध्यहिंदुस्थानांतील अत्यंत महत्त्वाच्या व्यापाराच्या ठिकाणांपैकीं एक आहे. शिवाय दक्षिण माळव्यांत जाणाऱ्या येणाऱ्या मालाच्या वाटेवर हें शहर असल्यामुळें याला महत्त्व चढत चाललें आहे. ह्या शहरचे दोन मुख्य भाग होतात. एक जुनें इंदूर व नवें इंदूर. खान नदीवरून जाणारा एकच मुख्य हमरस्ता आहे व बाकीचे अरुंद असून भिकार आहेत. मरहूम शिवाजीराव होळकर यांनीं आपल्या कारकीर्दीत बरेच नवीन व रुंद रस्ते बांधविले व त्याचप्रमाणें प्रेक्षणीय इमारतीहि बांधविल्या. हल्लीं चांगले मोठे रस्ते झाले असून रस्त्यांत विजेचे दिवेहि झाले आहेत.

या शहरांत प्रमुख असे दोन रस्ते आहेत. एक पूर्वेकडून पश्चिमेकडे जातो व दुसरा दक्षिणेकडून उत्तरेकडे जातो. या पहिल्या रस्त्यानें चाललें असतां महाराणी सराई, मोतीबंगला, हायकोर्ट, तुकोजीराव हॉस्पिटल, मुलांसाठीं व मुलींसाठीं बांधलेल्या शाळा, पोस्ट टेलिग्राफ ऑफिस, बोलिया साहेबाची छत्री इत्यादि प्रेक्षणीय इमारती आहेत. दुसऱ्या रस्त्यावर, लालबाग राजवाडा, मोती तबेला, हरसिद्धी देऊळ, पंढरीनाथाचें देऊळ, बक्षीबाग वगैरे सुंदर इमारती आहेत. यांशिवाय शहरांतील इतर भागांत छत्रीबाग, अहिल्याश्रम वगैरेहि प्रेक्षणीय इमारती आहेत. तसेंच मोठमोठ्या धनिकांनीं बांधलेल्याहि कांहीं दर्शनीय इमारती आहेत. त्यांत हुकुमचंद सावकाराचा रंगमहाल, जव्हेरीबाग या प्रमुख आहेत.

इंदूर शहराची व्यवस्था ठेवण्याकरितां १८७० सालीं म्युनिसिपालिटी स्थापन करण्यांत आली. या म्युनिसिपालिटीचे ३० सभासद असून त्यांपैकीं १५ लोकनियुक्त व १५ सरकारी असे असतात. आपला अध्यक्ष व चिटणीस नेमण्याचा अधिकार म्युनिसिपालिटीकडे आहे. याशिवाय म्युनिसिपालिटीतर्फे, इंजीनियर, कर वसूल करणारा अधिकारी व आरोग्य खात्याचा अधिकारी, असे तीन अम्मलदार नेमण्यांत आले आहेत.

कामाच्या सोयीसाठीं टेलिफोनची पद्धत सुरू करण्यांत आली असून टेलिफोन ऑफिसची इमारत, किंग एडवर्ड हॉलच्यासमोर आहे. राजवाडे व कांहीं सार्वजनिक इमारती यांमध्यें टेलिफोन ठेवण्यांत आला आहे. पिपलिया व बिलौली हे दोन मोठे तलाव असून त्या तलावांचें पाणी नळांच्या योगानें शहरांत आणलें आहे.

शहरच्या व्यवस्थेसाठीं प्रत्येक मुख्य भागांत पोलीस स्टेशनें असून एकंदर २३४ पोलीस शिपाई आहेत. यांशिवाय खास पोलीस पलटणी व घोडेस्वार हे निराळेच.

मध्य हिंदुस्थानांत इंदूर हें व्यापारी चळवळीचें मोठें केंद्र आहे असें म्हटलें तरी चालेल. १९२० सालीं या शहरामध्यें पांच सूत कातण्याच्या व विणण्याच्या गिरण्या, ६ सरकी काढण्याचे कारखाने, ३ कापूस दाबण्याचे कारखाने, २९ दळण्याच्या गिरण्या होत्या. या गिरण्यांमध्यें माळवा युनाइटेड मिल्स, हुकुमचंद मिल्स, स्वदेशी मिल्स, कल्याण मिल्स व स्टेट मिल्स या प्रमुख आहेत. आणखीहि नवीन गिरण्या निघण्याच्या बेतांत आहेत. विशेष महत्त्वाची गोष्ट म्हणजे या गिरण्या बहुतेक स्वतंत्र रीतीनें लोकांनीं काढल्या असून त्यांना संस्थानाचा आश्रय वगैरे कांहीं नाहीं. या गिरण्यांनीं इंदूर शहराला व्यापारी वैभव प्राप्त करून दिलें आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

या शहरामध्यें १९२१ सालीं १४९ $\frac{1}{2}$ लक्षांचा माल बाहेरून आला. १९११ सालीं अवघा ५५ लाखांचा आला होता. त्यावरून या दहा वर्षांत इंदूर शहराची व्यापारी दृष्ट्या किती भरभराट झाली हें दिसून येईल. शहरांतून १९२० सालीं १८४२७१ रुपयांचा माल बाहेर गेला.

शहरामध्यें बँक ऑफ बाँबेची एक शाखा व इंदोर बँक लिमिटेड अशा दोन बँका आहेत.सुमारें २५ कंपन्या रजिस्टर झाल्या आहेत. विटा व कवलें करण्याचा एक कारखाना शहरांत असून, हरसिद्धीच्या देवळाजवळ, एक पितळ व लोखंड तयार करण्याची गिरणी आहे.

शहरांत टांगे, गाड्या वगैरे सार्वजनिक वाहनांची संख्या तीनशेंवर आहे. याशिवाय मोटार, सायकली, वगैरे निराळ्याच. कारागिरांची संख्या २८४४ असून त्यांपैकीं १२४ बायका आहेत. या कारागिरांपैकीं १७९९ स्वतंत्र धंदा करणारे आहेत. मजुरीवर पोट भरणाऱ्या लोकांची

संख्या ६७०९ असून त्यांत १६२० बायका आहेत यांच्या दररोजच्या मिळकतीचें सरासरी प्रमाण कमींत कमी ६ आणे व जास्तींत जास्त १४ आणे पडतें. शहरांतील माणसांचें सरासरी उत्पन्न वर्षाला ४२ रुपये आहे. शहरांत देवळांची संख्या खूप मोठी असून, त्याशिवाय पन्नास साठ मशिदी आहेत. शेंकडा ७५·५ हिंदु असून,२१·१ मुसुलमान ३·१ जैन, २ ख्रिश्चन आहेत.

शहरामध्यें २४ शिक्षण संस्था असून त्यांपैकीं ७ स्त्रियांच्यासाठीं आहेत. शेंकडा ५४ मुलगे व १९ मुली या शिक्षणसंस्थांचा फायदा घेतात असें १९२० च्या संख्या पत्रकावरून दिसतें. शहरांतील या निरनिराळ्या शाळांमधून व कॉलेजमधून जाणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या मुलें व मुली मिळून,५६७९ आहे.धर्मार्थ दवाखाने पांच सहा असून त्यांची व्यवस्थाहि उत्तम प्रकारची आहे.

[ संदर्भ ग्रंथ—इंदोरस्टेट गॅ. नाडकर्णी—होळकरांच्या राज्याचें सामान्य वर्णन. सेन्सस रिपोर्ट. अॅड्मिनिस्ट्रेशन रिपोर्ट. इं. गॅ. कर्नल मॅलेसन— अॅन हिस्टारिकल स्केच ऑफ दि नेटिव्ह स्टेट्स ऑफ इंडिया. ]

**इदैयन**—तामिल देशांत धनगरांची ही एक जात आहे. हल्लीं या जातींत कांहीं लोक नोकरी किंवा इतर धंदे करूं लागले आहेत. या जातींत अनेक वर्ग आहेत; पण मुख्य दोन वर्ग पाडतां येतील. एक पूर्णपणें सुधारलेला व दुसरा मूळ जातीचें वैशिष्ट्य कायम ठेवणारा. पहिल्या वर्गांतील लोक वैष्णव असून नाम लावितात व आपणाला यादव म्हणवितात. दुसऱ्या वर्गांतील लोक भुताराक्षसांची उपासना करितात व आपण यदुवंशांतले आहोंत असें समजत नाहींत; कपाळाला भस्म लावून, शैवपंथीय बनतात.

विजयानगरच्या कृष्णदेव राजाचा दिवाण तिम्मराज इदैयन जातीचा होता असें हे लोक म्हणतात. कलकट्टी, पासी, पाल, पेंडुकुमेकी, शिबियन, संगुकट्टी, सांबन, पड्डुनाटु वगैरे यांच्यांत पुष्कळ पोटजाती आहेत. यांच्यांत एक विशिष्ट पंचायत पद्धत असून, कीटहारी किंवा कीलारी या गांवपाटलानें गांवच्या मेळ्यावर देखरेख करावयाची असते.

कांहीं ठिकाणीं मुलीला ऋतु प्राप्त झाल्यास तिचा मामा किंवा मामे भाऊ हिरव्या नारळाच्या पानांचें एक झोपडें बांधून त्यांत तिला सोळा दिवस ठेवतो, व नंतर शांति करण्यांत येते. मरवदेशांत प्रौढ इदैयन मुलीचें लग्न कधीं कधीं दहा बारा वर्षांच्या मुलाशीं देखील करण्यांत येतें.लग्नांत नवरा किंवा नणंद वधूच्या गळ्यांत ताली बांधते.

त्रावणकोर येथील इदैयनांचे दोन वर्ग पडतात–एक तामिळी बोलणारा व दुसरा मल्याळम बोलणारा. शिबि किंवा शिवियर ही इदैयनांची पोटजात पूर्वी पालखी वाहाण्याचें काम करीत असे. मध्ययुगांतील राजांनी त्यांना तामिळ देशांतून इकडे आणिलें असावें. एकंदर लोकसंख्या ( १९११ ) ७४४३७२. पैकीं मद्रास—७३४७६७ कोचीन–३८० व त्रावणकोर–९२२५ अशी यांची विभागणी होती.

[ थर्स्टन–कास्ट्स अँड ट्राइब्स ऑफ सदर्न इंडिया-सेन्सस रिपोर्ट १९११ ]

**इन्दोरी**—(मध्यप्रांत) कवर्धा संस्थानांतील सर्वांत मोठें गांव. हें राजधानीपासून पूर्वेस १० मैलांवर असून बहुतेक वस्ती चांभार लोकांची आहे. येथें शाळा व मोठा आठवड्याचा बाजार आहे. गौन्तिया कुर्मी जातीचा असून मुख्य पीक तांदुळाचें आहे. ( छत्तिसगड गॅ. )

२ हें इंद्रायणी नदीच्या डाव्या तीरावर मावळ तहसिलींतील एक खेडें असून खडकाळ्याचे पूर्वेस १० मैलांवर वसलेलें आहे. येथें एक बुरजी किल्ला असून त्याच्या पायथ्यास इंद्रायणी नदी वाहून जाते. तळेगांवच्या दाभाड्यांकडे हे इनामी गांव आहे. ( मुं. ग्या. )

कर्नल अपटण यास इंदोरी कोणी मारून टाकल्याचा उल्लेख राज. खं. १२ लेखांक ९९मध्यें आहे. परगणे जुन्नरपैकीं इंदोरी गांव चाकणचे कृष्णंभट ब्रह्मे वगैरे यांच्याकडे इनाम असल्याबद्दल उल्लेख राजवाडे खंड ११ मध्यें पांच सात पत्रांत आहे.

**इन्द्र**—इन्द्राचें वैदिक, विशेषतः ऋग्वेदांतील, स्वरूप ' वेदविद्या ' नांवाच्या ज्ञानकोशाच्या दुसऱ्या खंडांत सविस्तर रीतीनें वर्णिलें आहे.( पृष्ठ २५५ ते २८२. )

पौराणिक स्वरूप.—पुराणांतून इन्द्राला पहिलें स्थान दिलेलें आढळत नाहीं. त्रैमूर्तीच्या खालचें स्थान आहे तरी इतर देवांत तो श्रेष्ठ मानला आहे. तो अंतरिक्षाचा आणि पूर्व दिशेचा राजा असून स्वर्गावर व स्वर्गस्थ देवादिकांवर त्याचा धर्म शिल्लक असून त्यांपैकीं कांहीं जास्त बळावलेले दिसतात. तो विद्युत सोडतो, व फेंकतो आणि इंद्रधनुष्य सज्ज करितो. बऱ्याच वेळां असुरांशीं तो लढतो. त्यांची त्याला भीति वाटते व पुष्कळ वेळां त्यांच्याकडून तो पराभव पावतो अशा तऱ्हेचें वर्णन जागजागीं आढळतें. वृत्र नांवाच्या ब्राह्मणाची हत्या घडल्यानें त्याला बरेच दिवस लपून बसावें लागलें. पुढें अश्वमेध केल्यावर त्याचें पातक नाहींसें होऊन पुनः इन्द्रपदप्राप्ती झाली ( म. भा. ५. १० ). सोमरसाविषयींची त्याची गाढ आसक्ती महाभारतांत एका कथेंत आढळते. त्या कथेंत च्यवन ऋषीनें इन्द्राला, अश्विनांनां हविर्भाग देणें भाग पाडलें आहे. त्याच्या बदफैली वर्तनाचीं अनेक उदाहरणें आढळतात तथापि त्याच्या शौर्यापुढें त्याचे अवगुण झांकून जातात तेव्हां त्याचें अनुकरण करणें इष्ट नाहीं हें नहुष राजाच्या उदाहरणावरून दिसतें. वृत्रवध करून ब्रह्महत्या पदरीं घेतल्यावर इन्द्र जेव्हां लपून राहिला तेव्हां त्याची जागा नहुष राजाला इन्द्रपदावर बसवून देव ऋषींनीं भरून काढिली. इन्द्राचें सर्व ऐश्वर्य त्याला प्राप्त झालें पण त्याची पत्नी शची मात्र त्याला मिळाली नाहीं. शची महान

पतिव्रता होती तिनें इन्द्राचा सल्ला घेऊन नहुष राजाला आपल्या प्राप्तीसाठीं विपरीत गोष्ट करणें भाग पाडलें. तेव्हां नहुष राजा दुर्गतीला पोंचून इन्द्र पुनः शची समवेत राहिला ( म. भा. ५. ११; १२. ३४२ ). महाभारतांतच इन्द्रानें अहल्येला कपटानें उपभोगल्याचें वर्णन ( ५. १२. ) दिलें आहे. अहल्या गौतम ऋषीची पत्नी होती. गौतमानें इन्द्राला शाप दिला त्यायोगानें त्याच्या अंगावर योनीच्या आकाराचीं हजार क्षतें पडलीं त्यावरून त्याला सयोनि असें नांव पडलें पुढें या क्षतांचें नेत्रांत जेव्हां रूपांतर झालें तेव्हां त्याला नेत्रयोनि किंवा सहस्राक्ष असें म्हणूं लागले. गौतमाच्याच शापानें इंद्र वृषणहीन झाला असतां देवांनीं त्याला मेषवृषण लावून पुन्हां पूर्ववत केलें. [ रामायण बालकांड सर्ग ४९ ]

रामायणांत लंकेचा राजा रावण यानें इंद्राशीं युद्ध करून याचा पराभव केला. त्याचा मुलगा मेघनाद ( इंद्राला जिंकलें म्हणून इंद्रजित ) यानें त्याला लंकेला बांधून नेलें. ब्रह्मा आणि इतर देव यांना इंद्राच्या मुक्ततेकरितां शरण जावें लागलें व रावणाला अमरत्वाचा वर देऊन इंद्राची मुक्तता करून घ्यावी लागली. त्यावेळीं ब्रह्मयानें अपमानित इन्द्राला अहल्येशीं जारकर्म केल्यामुळें तुला ही शिक्षा भोगावी लागली असें सांगून त्याचें समाधान केलें. ( रामायण उत्तरकांड सर्ग ३० ). तैत्तिरीय ब्राह्मणांत इन्द्रानें इतर स्त्रिया टाकून इन्द्राणीलाच आपली बायको म्हणून पसंत केलें त्याचें कारण तिच्या ठिकाणची कामुक आकर्षकता असें दिलें आहे. कांहीं ग्रंथातून त्यानें तिला भ्रष्ट केली व तिचा बाप जो पुलोमा दैत्य याला ठार मारलें. असें वर्णन आढळतें. इन्द्र हा अर्जुनाचा पिता असून त्यानें त्याच्याकरितां कर्णाचीं कवचकुंडलें फसवून मिळविलीं; पण त्याबद्दल कर्णाला आपली वासवी शक्ति दिली. जर कोणी कडक तपश्चर्या आचरूं लागेल तर त्याच्याकडे एखादी अप्सरा पाठवून त्याचा व्रतभंग करावयाचा हा जो इन्द्राचा परिपाठ होता तो त्याच्या नैतिक स्वभावाचें द्योतक आहे.

पुराणांतून इन्द्र आणि कृष्ण यांच्यामधील स्पर्धेविषयींच्या बऱ्याच गोष्टी आढळतात. एकदां इन्द्रानें त्याला दुर्वासानें अर्पण केलेल्या पुष्पमालेचा अनादर केला तेव्हां त्या कोपिष्ट मुनीच्या क्रोधाग्नींत सांपडून, तुझ्या सर्व साम्राज्याचा नाश होईल असा शाप मिळाला. दैत्यांकडून त्याचा पूर्ण पराभव झाला व शेवटीं त्याची इतकी स्थिति आली कीं, थोड्याशा घृताकरितांहि त्याला भीक मागावी लागली, विजयानें त्याचे शत्रू चढून जाऊन ते आपलें कर्तव्य विसरले व त्यामुळें इन्द्राला त्यांचा सहज पाडाव करून पुनः राज्य मिळवितां आलें. भागवत पुराणांत इन्द्रानें ब्राह्मणवध केल्यामुळें चांडाली नांवाचा दोष त्याच्या पाठीस लागला असें वर्णन आहे.

व्रजामधील गोपांकडून इन्द्रयाग केला जात असे. कृष्णानें त्यांना तो न करण्याविषयीं उपदेश केल्यावरून इन्द्राचा त्यावर कोप झाला, व त्यानें त्यांना बुडवून टाकण्यासाठीं अतिशय मोठा पर्जन्य धाडून दिला तेव्हां कृष्णानें गोवर्धन पर्वत उपटून आपल्या करंगळीवर धरला. सात दिवसपर्यंत गोकुलावर भयंकर वृष्टि होत असतांहि तेथील सर्व मंडळी गोवर्धन पर्वताखालीं वसती करून राहिल्यानें सारेजण सुरक्षित राहिले. तव्हां इन्द्राचा गर्व नाहींसा होऊन तो श्रीकृष्णाला शरण आला ( भागवत दशमस्कंद. अ. २४–२७). पुनः जेव्हां एकदां कृष्ण अमरावतीस गेला व तेथील परिजातक वृक्ष बरोबर घेऊन येऊं लागला, त्यावेळीं त्या वृक्षाकरितां इन्द्र व कृष्ण ह्यांच्यामध्यें लढाई जुंपली. त्यांत इन्द्राचा पराभव झाला. पुराणांत सांगितलेल्या इन्द्राच्या पराक्रमांत, त्यानें केलेला दितीचा गर्भनाश व त्यापासून झालेले मरुत्, हाही एक आहे ( म. भा. हरिवंशपर्व अ. ३ ). यानें आपल्या वज्रानें पर्वतांचे पंख तोडल्याचीहि कथा आहे. इन्द्र हा सुरूप असून पांढऱ्या घोड्यावर किंवा हत्तीवर हातांत वज्र घेऊन बसतो. त्याच्या मुलाचें नांव जयंत, असें सांगितलें आहे. हल्लीं इन्द्राची प्रत्यक्षपणें पूजा होत नसून शक्रध्वजोत्थान (गुडीपाडवा)नांवाच्या सणांत त्यावरील प्रासंगिक भक्ति दिसून येते ( म. भा १. ६३. ). इन्द्राची नांवें पुष्कळ आहेत. उदाहरणार्थ महेन्द्र, शक्र, मघवान, ऋभुक्ष, वासव, अर्ह, दत्तेय, इत्यादि, त्याच्या पदव्याहि अनेक आहेत. वृत्रहन्, वज्रपाणि, मेघवाहन, पाकशासन, देवपति, आणि सुराधीप, दिवस्पति, मरुत्वान, स्वर्गपति, विष्णु, पुरंदर उलुक, उग्रधन्वन, इत्यादि, बुद्धपूर्वजग ( पा. १६२–६४ ) या ग्रंथांत इंद्रविशेषणें दिलीं आहेत. इन्द्राचें निवासस्थान स्वर्ग, राजधानी अमरावती, राजवाडा वैजयन्त, बाग नंदन, कंदसार किंवा पारुष्य, त्याचा हत्ती ऐरावत, घोडा उच्चैः श्रवस, रथ विमान,सारथी मातली, धनुष्य शक्रधनु आणि तरवार परंज नांवांची होय. [ वेदविद्या बुद्धपूर्वजग. डौसनहिंदु क्लासिकल डिक्शनरी; महाभारत; पुराणें].

( २ ) हें नांव साधारण आहे. ब्रह्मदेवाच्या एका दिवसांत म्हणजे प्रातःकालापासून अस्तमान पर्यंतच्या कालांत, स्वर्गामध्यें चौदा इंद्र होऊन जातात. या प्रत्येक इंद्राचें नांव वेगवेगळें असतें. त्या सर्वांचीं नांवें अशीं.—पहिला इंद्र यज्ञ, २ रोचन, ३ सत्यजित, ४ त्रिशिख, ५ विभु, ६ मंत्रद्रुम, ७ पुरंदर, ८ बली, ९ अद्भुत, १० शंभु, ११ वैधृति, १२ ऋतधमा, १३ दिवस्पति. आणि १४ शुचि. यांत, सद्दा इंद्रकल्प, आरंभल्यापासून, होऊन गेले असून, प्रस्तुत स्वर्गामध्यें पुरंदर इंद्र आहे, व बलीपासून शुचीपर्यंत सात, कल्प समाप्तीपर्यंत होणारे आहेत. इंद्राची जी स्त्री, ती इंद्राणी होय. हेंहि नांव, असेंच साधारण आहे

**इंद्रकील**—(पौराणिक स्थळ, ) हें हिमालय पर्वताचें शिखर आहे.कोणी हें मंदार पर्वताचें नांव होय असें म्हणतात.

इंद्राकडून नूतन शस्त्रास्त्रांची प्राप्ति व्हावी या हेतूनें अर्जुन हा तपश्चर्या करण्यासाठीं या शिखरावर आला. तेथें त्याला इंद्रानें तपस्व्याच्या रूपांत दर्शन देऊन, त्याला शंकराची आराधना करून त्याला प्रसन्न कर म्हणजे मी तुला शस्त्रास्त्रें देईन असें सांगितलें. त्याप्रमाणें अर्जुनानें घोर तपश्चर्या करण्यास आरंभ केला. अशा रीतीनें अर्जुन तप करीत असतां मूक नामक दैत्य त्या शिखरावर त्याला ठार मारण्याकरितां आला आहे हें वर्तमान शंकराला समजतांच तो किरात वेषानें त्या शिखरावर आला, व त्यानें त्या दैत्यावर बाण सोडला. इकडे याच संधीस अर्जुनानेंहि त्या दैत्यावर बाण सोडला. त्या दोघांच्या बाणांनीं तो दैत्य मारला गेला. पण कोणाच्या बाणानें तो दैत्य मारला गेला या निमित्त अर्जुन व किरात यांमध्यें भांडण उपस्थित होऊन त्या दोघांमध्यें युद्ध झालें. पुढें किरात हा शंकरच आहे असें अर्जुनास कळून येतांच त्यानें शंकराला साष्टांग नमस्कार घातला. शंकरानें त्याला ' तूं अजिंक्य होशील ' असा वर दिला व त्यानें अर्जुनाला आपलीं शस्त्रास्त्रें दिलीं. पुढें इंद्रानें व लोकपालांनींहि आपापलीं शस्त्रें अर्जुनाला दिलीं. ( म. भा. ३. ३७ )

**इंद्रगिरी किल्ला**—( इंद्राइ ) मुंबई इलाखा. नाशिक जिल्हा. चांदोरच्या वायव्येस ४ मैलांवर शैरा घाटावर समुद्रसपाटीपासून ४५२६ फूट उंचीवर हा किल्ला होता. त्याची तटबंदी १८१८ मध्यें पाडून टाकण्यांत आली. याची वाट बिकट आहे. किल्ल्यावर कांहीं लेणीं व शिल्पकामें पहाण्यासारखीं असून एक फारसी शिलालेखहि आहे. ( मुं. गॅ. १६ )

**इंद्रजव**—कुड्याचें बीं. ' कुडा ' पहा.

**इंद्रजित**—लंकाधिपति रावणास मंदोदरीपासून झालेला पुत्र. यानें जन्मतांच मेघासारखी गर्जना केल्यामुळें, याचें मेघनाद असें नांव ठेविलें होतें. ( अध्यात्म रामायण उत्तरकांड सर्ग २ ) मेघनाद हा स्वभावतः भयंकर असे. यानें शुक्राचार्यांच्या साह्यानें निकुंभिला येथें, अश्वमेध, अग्निहोम, बहुसुवर्णक, राजसूय, गोमेध, वैष्णव, आणि माहेश्वर, असे सात यज्ञ केले व शिवप्रसादानें दिव्य रथ, धनुष्यबाण, शस्त्रें, तामसी माया, इत्यादिक प्राप्त करून घेतलीं. यानें आणखींहि कित्येक यज्ञ करावे असें मनांत आणिलें, परंतु रावण देवांचा द्वेष्टा असल्यामुळें त्याला देवांस हविर्भाग देणें इष्ट नव्हतें, त्यामुळें इंद्रजिताला अधिक यज्ञ करणें शक्य झालें नाहीं. (वा. रा. उत्तरकांड स. २५ )

रावण, देवांस जिंकण्याकरितां, स्वर्गीं गेला असतां तेथें देवांचा व राक्षसांचा, घोर संग्राम झाला या युद्धांत मेघनादानें अपूर्व युद्धकौशल्य दाखवून, इंद्रास आपल्या शस्त्रास्त्रांनीं जर्जर करून बद्ध केलें. तेणेंकरून रावण हर्षित होऊन, जयशब्द करीत त्यास घेऊन लंकेस गेला. इकडे इंद्र गेला असें पाहून सर्व देव चिंताक्रांत होऊन ब्रह्मदेवास शरण गेले. ब्रह्मदेव हे स्वतः मेघनादाकडे आले व त्यांनीं इंद्राला सोडून देण्याविषयीं मेघनादाजवळ प्रार्थना केली. पण 'मी अग्नींत जेव्हां हवन करीन, तेव्हां त्यांतून अश्वासहित दिव्य रथ निघत जावा, आणि त्यावर जोंपर्यंत मी आहें, तोंपर्यंत मी विजयी व अमर असावें' असा वर दिल्यास मी इंद्राची सुटका करीन असें मेघनादानें म्हणतांच ब्रह्मदेवानें तथास्तु म्हटलें, आणि इंद्रास सोडवून आणून, त्यास त्याच्या पदावर स्थापिलें. त्या दिवसापासून मेघनादास, इंद्रजित असें नांव पडलें. ( वा. रा. उत्तर. स. २९–३० ).

मारुती सीताशुद्धीसाठीं अशोक वनांत आला, त्यावेळीं त्यानें रावणाचें असंख्य सैन्य मारलें. तेव्हां इंद्रजितानें मारुतीला ब्रह्मास्त्रानें बद्ध करून रावणाकडे नेलें. ( वा. रा. सुंदर. स. ४२ )

सीताशुद्धि करून, मारुती किष्किंधेस परत गेल्यावर, वानरसेनेसहित रामचंद्र लंकेस आले असतां, रावणाशीं युद्धप्रसंग उपस्थित होऊन, प्रथम दिवशीं इंद्रजित हाच युद्धास उभा राहिला. त्यानें अंगद वगैरेंशीं अनिवार युद्ध करून रामलक्ष्मणास व इतर वानरांस नागपाशानें बद्ध करून मूर्च्छित केलें व तो लंकेस परत गेला. ( वा. रा. युद्ध. स. ४५ )

पुढें देवांतक नरांतकादि रावणपुत्र, तसाच कुंभकर्ण, महापार्श्व, आणि महोदर, हे युद्धांत मरण पावल्यावर, रावणास अतिशय दुःख झालें, त्या काळीं, हा त्याचें सांत्वन करून युद्धास निघाला तो प्रथम निकुंभिलेस जाऊन, तेथें यानें आपलीं शस्त्रास्त्रें अभिमंत्रित केलीं. नंतर युद्धभूमीवर येऊन अद्वितीय पराक्रम गाजवून सदुसष्ट कोटि वानर एका प्रहरांत मारून, रामलक्ष्मणांसहि मूर्च्छित करून हा लंकेस रावणाकडे हर्षानें परतला. ( वाल्मिकी रामायण युद्ध. स. ७३ )

नंतर मकराक्ष युद्धास जाऊन तोही मरण पावला. तेव्हां रावणानें यास पुनः युद्धास पाठविलें. त्या काळीं हा नित्याप्रमाणें निकुंभिलेस जाऊन, रथांत बसून, रामसैन्यावर आला, व त्यास यानें अतिशय पीडा दिली, तिच्या योगानें ते सर्व व्यथित आहेत, तों यानें मायीक सीता निर्माण करून, व ती मुखानें 'राम राम' असा दीन शब्द करीत आपल्या रथांत आहे, असें सर्वांस दाखवून ते पाहत असतां, तिचा वध केला व तो लंकेस परत गेला. तें कृत्य सुग्रीवादिकांस सत्यच वाटून, ते शोकाकुलित झाले. पण बिभीषणानें खरा प्रकार सांगून त्यांचें समाधान केलें. ( वा. रा. युद्ध. स. ८१ ).

इंद्रजित निकुंभिलेस गेला, आणि ब्रह्मदत्तवराप्रमाणें, तेथें त्यानें हवन आरंभिलें. त्यांत कोणाचा प्रवेश होऊन त्यास विघ्न होऊं नये, अशी व्यवस्था त्यानें जागोजाग राक्षसांचीं मंडलें स्थापून केली होती. पण तें वृत्त बिभीषणास

केलें, म्हणून त्यानें रामाची आज्ञा घेऊन, मोठ्या वानर समुदायासहित लक्ष्मणास त्या यज्ञाचा विध्वंस करण्याकरितां पाठविलें. त्याप्रमाणें वानरसेनेनें आसमंताद्भागीं संरक्षणास असलेल्या सर्व राक्षसांस मारून यज्ञाचा भंग केला. तथापि याचा यज्ञ पूर्ण होत आला होता, म्हणून यानें, इतका नाश झाला तरी तिकडे लक्ष दिलें नाहीं. परंतु वानरांनीं त्याच्या शरीरावर अनेक प्रहार करून, अग्नीहि पाषाणादिकांच्या वृष्टीनें छिन्न केला. तेव्हां इंद्रजित निरुपाय होऊन, क्रोधानें उठला, व वानरांस मारूं लागला, आणि बहुतांस पीडित करून, त्याचा तेथें एक अदृश्य होण्याचा वटवृक्ष होता, तिकडे तो जाऊं लागला; परंतु बिभीषणाच्या सांगण्यावरून वानरांनीं त्याला तिकडे जाऊं दिलें नाहीं. त्यामुळें तो चिडून जाऊन युद्धाला उभा राहिला. इतक्यांत लक्ष्मण पुढें होऊन, त्यानें याशीं युद्ध आरंभिलें, त्यांत लक्ष्मणानें प्रथमतः याचा सारथि मारिला. इतर प्रमुख वानरांनीं याच्या रथाचे घोडे मारिले. इंद्रजित हा दुसऱ्या रथांत बसून आला व त्यानें क्रोधानें लक्ष्मणावर शक्ति सोडिली, ती लक्ष्मणानें मध्येंच छेदिली. लगेच दुसरी यमदत्त शक्ति त्यानें त्यावर टाकिली; तिचाहि लक्ष्मणानें छेद केला. लक्ष्मणाचें व याचें तीन अहोरात्रें भयंकर युद्ध झालें. शेवटीं इंद्रजित मरत नाहीं असें पाहून लक्ष्मणानें ऐंद्रास्त्र हातांत घेतलें, आणि प्रतिज्ञा केली कीं, जर श्रीराम, धर्मात्मा आणि सत्यप्रतिज्ञ असेल, तर या बाणानें इंद्रजित मरण पावो, असें म्हणून तो त्यावर सोडतांच,त्याचें किरीट. कुंडलयुक्त मस्तक तात्काळ तुटून पृथ्वीवर पडलें. ( भार-वन. अ. २८८–२८९ ). तें पाहतांच देवांस व महर्षींस आनंद होऊन, त्यांनीं लक्ष्मणावर पुष्पवृष्टि केली. इंद्रजिताचें मस्तक रामास दाखविण्याकरितां वानरांनीं सुवेलाचळीं नेलें. ( वा. रा. युद्ध स. ८६–९२ ). इंद्रजितास सुलोचना या नांवाची स्त्री होती. ही स्त्री अतिशय पतिव्रता होती. हिनें रामाकडून तें मस्तक परत आणलें व त्यासह ती सती गेली.

**इंद्रद्युम्न.**—एक राजर्षी. हा स्वर्गातून पतन पावला असतां, मार्कंडेय ऋषीच्या आश्रमीं येऊन, त्यास पुसूं लागला कीं, आपण चिरजीवी आहां, तस्मात् मला जाणतच असाल. त्यांनीं हिमवान पर्वतावरील प्रावारकर्ण नांवाच्या उद्काकडे, प्रावारकर्णानें इंद्रद्युम्न सरोवराच्या कांठीं असणाऱ्या नाडीजंघ नांवाच्या बकाकडे, नाडीजंघानें अकूपार नांवाच्या कांसवाकडे बोट दाखविलें. अकूपाराकडे राजा गेला तेव्हां अकूपार म्हणाला होय, मी तुला जाणतों. नंतर त्यानें सर्वांस सांगितलें कीं, या राजानें मोठमोठे बहुत यज्ञ केले, व त्या यज्ञांत ज्या दक्षिणा दिल्या, त्यावेळीं सोडलेल्या उदकांचेंच हें सरोवर झालें. असा हा राजा अत्यंत पुण्यवान आहे. इतकें बोलतांच विमान आलें, व राजानें स्वर्गास गमन केलें. ( भा. वन अ. १९९ )

( २ ) स्वायंभु मन्वंतरांतील अगस्त्य ऋषीनें, तूं गजयोनि पावशील, म्हणून ज्यास शाप दिला होता, तो राजा. हा पांड्य देशाचा अधिपति होता. याची गजयोनींतून मुक्तता हरि नामें जो विष्णूचा अवतार चवथ्या तामस मन्वंतरांत झालेला त्यानें केली होती.

(३) विदेहवंशीय एक जनक, याचा पुत्र ऐंद्रद्युम्नि या नांवाचा होता.

**इंद्रधनुष्य**—हा चमत्कार आकाशांत पाऊस पडल्यावर दिसतो व त्याकडे मनुष्याचें लक्ष अगदीं प्राचीन काळापासून लागलें असलें पाहिजे पण त्याचें बरोबर कारण सांगणें त्या काळीं कठिण होतें. इंद्र हा देवांचा राजा व हें धनुष्य आकाशांत दिसतें तेव्हां आपल्या पूर्वजांनीं त्यास वरील नाव दिलें. याचा आकार अर्धवर्तुलाकार असतो व त्या वर्तुलाचा मध्यबिंदु, पाहणारा व सूर्य यास जोडणाऱ्या रेषेवर असतो.बहुतकरून धनू दोन दिसतात. जास्त इंद्र धनुष्येंहि दिसणें शक्य आहे. पहिल्या इंद्रधनुष्याची त्रिज्या ४१° असते व तें फारच मजेदार रंगाचें झालेलें दिसतें. साध्या डोळ्यानीं आपणास त्यांपैकीं ४ किंवा ५ रंग दिसतात पण त्यात जहि रंग असतात व ते इतके मिसळलेले असतात कीं एक कोठें संपतो व दुसऱ्याला कोठें सुरुवात होते हें सांगणें फार कठिण जातें. त्याच्या शेवटीं तांबडा व सर्वांत आतला जांभळा रंग असतो. कित्येक वेळा जें दुसरें इंद्रधनुष्य दिसतें त्याचे रंग पहिल्याच्या उलट असतात म्हणजे बाहेर जांभळा व आंत तांबडा असतो त्याची त्रिज्या ५७° असते. या दोन इंद्रधनुष्यांमधील जागा आकाशांत काळी दिसते.तसेंच पहिल्या इंद्रधनुष्याच्या आंतील भागास व दुसऱ्या इंद्रधनुष्याच्या बाहेर पण जवळच कित्येक रंगाचे पट्टे दिसतात त्यास पुरवणी इंद्रधनुष्यें असें म्हणतात.

इंद्रधनुष्याचें विवरण करण्याचे पुष्कळांनीं प्रयत्न केले पण त्यासंबंधीं कोणास नीटसें सांगतां आलें नाहीं. डॉमिनिस, डेकार्टे इत्यादींनीं भूमितीच्या आधारें त्याचें स्पष्टीकरण केलें व तें पुष्कळ अंशीं बरोबरहि होतें. पण न्यूटननें जेव्हां पांढऱ्या किरणाचें पृथक्करण करून सप्त किरणांचे निरनिराळे वक्रीभवनांचे कोन असतात व इंद्रधनुष्याचे रंग आणि हे पृथकृत सात रंग यांचा क्रम एक असतो हें दाखविलें तेव्हां त्याचें बरेंच बरोबर असें स्पष्टीकरण झालें. पण त्यामुळें पुरवणी इंद्रधनुष्यासंबंधीं कांहींच सांगतां येईना. व तो प्रश्न यंगनें आपल्या लहरी मीमांसेनें तेथें व्यतिकरण होतें हें दाखवून सोडविला.

यंगनें असें दाखविलें कीं ज्या वेळेस दोन किरण एका बिंदूमधून जातात त्यावेळेस ते निराळ्या मार्गांनीं जातात; अर्थात त्यांमध्यें फरक फार थोडा असतो. या फरकामुळें लहरी निराळ्या अवस्थे (फेज)मध्यें येतात व त्यांचें व्यतिकरण होऊन आपणांस कांहीं एक दिसत नाहीं तर फक्त एक काळा पट्टा दिसतो.

कित्येक वेळां चंद्रप्रकाशामुळें देखील इंद्रधनुष्य दिसतें, परंतु तें फार फिकट असतें. कित्येक वेळां सूर्याच्या समुद्रांत पडलेल्या प्रतिबिंबामुळें सुद्धां इंद्रधनुष्य होऊं शकतें.

**इंद्रनंदिन**—भरत नरपति व श्राद्धदेव यांच्याबरोबर ३६ उपनिषदांचा ( वेदवेदांत )कर्ता म्हणून इंद्रनंदिन्‌विषयीं उल्लेख आहे. पार्श्वनाथाष्टक ग्रंथ इंद्रनंदिन् यानें लिहिला आहे. ( पीटर्सन रिपोर्ट ४ बॉ. ब्रँ. रॉ. ए. सो. १८९४ )

**इंद्रप्रस्थ**—शक्रप्रस्थ, शक्रपुरी, शतक्रतुप्रस्थ, व खांडवप्रस्थ अशीं याचीं दुसरीं नांवें आहेत. महाभारतांतील कौरवपांडवांच्या कथांनीं ज्या इंद्रप्रस्थाचें नांव अजरामर केलें आहे, व जें प्रत्येक हिंदूच्या कर्णपथावर अनेक वेळां आलेलें आहे. तें सुप्रसिद्ध नगर दिल्लीच्या दक्षिणेस दोन मैलांवर आहे. येथें पांडवांच्या वेळचीं धनसंपन्न नगरी आतां राहिली नाहीं. फक्त मुसुलमानी किल्ल्याचा जीर्ण झालेला कांहीं भाग व त्यांत कांहीं जुन्या मशिदी आहेत. येथें उत्तुंग देवालयें, किंवा रमणीय उद्यानें वगैरे सांप्रत मुळींच नाहींत.

इंद्रप्रस्थ नगराचें सविस्तर वर्णन महाभारतांत दिलेंच आहे. त्याचा सारांश असा—द्रौपदीचें स्वयंवर होऊन द्रौपदीला घेऊन पांडव परत हस्तिनापुराला यावयास निघाले, तेव्हां कौरवराज धृतराष्ट्र यास अशी भीति पडली कीं, आतां हे हस्तिनापुराला आले म्हणजे राज्याच्या वांटणीकरितां आपल्या पुत्रांचें व यांचें भांडण सुरू होईल. तें टाळावें एवढ्याकरितां त्यानें धर्मराजास विदुराकडून असा निरोप पाठविला कीं, तुम्ही हस्तिनापुरास न येतां येथून थोड्याशा अंतरावर जें खांडववन अथवा इंद्रवन म्हणून महारण्य आहे, तें उध्वस्त करून तेथें नवें शहर वसवावें व त्या ठिकाणीं सबांधव राज्य करावें. धर्मराज भोळे असल्यानें त्यांनीं ती गोष्ट तत्काळ मान्य करून तें इंद्रवन जाळून व उध्वस्त करून मोठें थोरलें नगर त्या ठिकाणीं वसविलें. यासच इंद्रप्रस्थ किंवा खांडवप्रस्थ असें नांव दिलें. महाभारतांतील आदिपर्वाच्या २०७व्या अध्यायांत या नगराचें वर्णन फारच सुंदर दिलें आहे. कविवर्य मुक्तेश्वर यांनीं आपल्या रसाळ वाणीनें हें शहर कसें वसविलें या प्रसंगाचें फार चटकदार वर्णन केलें आहे. त्या मनोहर वर्णनावरून इंद्रप्रस्थ नगरी कशी होती हें चांगलें ध्यानांत येईल. मुक्तेश्वराच्या वर्णनांत म्हटल्याप्रमाणें प्रत्यक्ष परमेश्वराच्या आज्ञेनें त्या इंद्रप्रस्थ नगरीची रचना विश्वकर्म्यानें केलेली असो, किंवा ज्याप्रमाणें नगरें वसवावयाचीं म्हटलें म्हणजे हळूहळू वसविलीं जातात, त्याप्रमाणें तीं वसविली असो एवढी गोष्ट उघड दिसतें कीं पांडवांनीं ही इंद्रप्रस्थ नगरी वसविली व ती अत्यंत सुंदर होती, आणि ती इतकी विलक्षण होती म्हणूनच कौरवांकडे मागितलेल्या गांवांत तिला अगदीं आद्यस्थान मिळालें असावें. पांडवांनीं जो कौरवांस निरोप पाठविला तो असाः—

> इंद्रप्रस्थं वृकप्रस्थं जयन्तं वारणावतं ।
> देहि मे चतुरो ग्रामान् पंचमं किंचिदेव तु ॥ १ ॥

"इंद्रप्रस्थ, वृकप्रस्थ, जयन्त वारणावत् हे चार गांव आम्हांला द्याच. मग पांचवें कोणतें पाहिजे तें द्या." पण हीं गांवें कौरवांनीं पांडवांस दिलीं नाहींत.

पांडवांनीं केलेला राजसूय यज्ञ याच शहरांत झाला; व मयासुरानें केलेली विचित्रसभा–जिची खालची जमीन पाण्याप्रमाणें वाटत होती व पाणी जमीनीप्रमाणें वाटत होतें ती– याच नगरांत होती. या नगरीचें नांव भारतांत अनेक वेळां निघालें आहे. दुसरीं चार प्रस्थेंहि नांवानें मात्र आज हयात आहेत. त्यांच्या जागा सांप्रत दाखविल्या जातात. ह्या प्रस्थांचीं किंवा पतांचीं नांवें पानिपत, सोनपत, तिलपत, बाधपत अशीं आहेत. हीं सर्व दिल्लीच्या टापूंत यमुनेच्या पश्चिम किनाऱ्यावर पसरलेलीं होतीं.

इंद्रप्रस्थ येथें पांडवांच्या वेळच्या नगरीचा आतां अल्प अंशही राहिला नाहीं. तथापि ह्या स्थलाचें पवित्र्य अद्यापि कायम असून भाविक हिंदु जनांच्या दृष्टीनें अत्यंत पूज्य अशा क्षेत्रांमध्यें त्याची अद्यापि गणना आहे. पद्मपुराणामध्यें इंद्रप्रस्थ माहात्म्य वर्णिलेलें असून त्यांतः—

> यमुना सर्व सुलभा त्रिषु स्थानेषु दुर्लभा ।
> इंद्रप्रस्थे प्रयागेच सागरस्यच संगमे ॥ १ ॥

म्हणजे "यमुना सर्वत्र सुलभ आहे, पण इंद्रप्रस्थ, प्रयाग व समुद्रसंगम या तीन ठिकाणीं दुर्लभ आहे," अशी महती वर्णन केलेली आहे. येथें यमुनेच्या तिरीं 'निगमोद्बोध' नामक तीर्थ फार प्रसिद्ध असून येथें यात्रेकरू लोक जात असतात. ह्या तीर्थाशिवाय लहान लहान तीर्थें व देवता येथें अनेक आहेत.

दिल्ली शहरांतून इंद्रप्रस्थ पाहाण्याकरितां गेलें म्हणजे प्रथम 'लालदरवाजा' नामक एक जुनाट पण भरभक्कम असा दरवाजा लागतो. हा शीरशाहाच्या राजधानीचा एक प्रसिद्ध दरवाजा होता. ह्या दरवाजाच्या सन्मुख बाजूस हुमायून पादशहानें बांधलेला 'पुराण किल्ला' दृष्टीस पडतो. हेंच प्राचीन इंद्रप्रस्थ होय. ह्या किल्ल्यास हुमायुन बादशहानें 'दिनपन्हा' असें नांव दिलें होतें हुमायून या किल्ल्यांतून पळून गेल्यानंतर त्याचा प्रतिपक्षी शीरशहा ह्यानें ह्या किल्ल्यास शीरगड अथवा शाहागड असें नांव दिलें होतें. प्रथमतः १५३३ मध्यें हुमायूननें हा किल्ला बांधण्यास सुरवात केली, व पुढें सात वर्षांनीं शीरशहानें त्यावर उत्तम तट बंदीचें काम करून त्यास शोभा आणिली. ह्या तटाचा घेर सुमारें एक मैल आहे. ह्या किल्ल्यामध्यें 'किल्ला कोना मशीद' व शेरमंदल अशा दोन जुन्या प्रेक्षणीय इमारती आहेत. ह्यापैकीं पहिली इमारत तांबुस व संगमरवरी दगडांची असून तिचें बांधकाम कुशलतेचें आहे. ही पठाण बादशहांच्या कारकीर्दींत इ. स. १५४० मध्यें तयार झाली. शिल्पकला प्रवीणांच्या दृष्टीनें हिच्या कामाची योग्यता फार असून, हिंदुस्थानांतील शिल्प-

कलेच्या इतिहासाचे कर्ते मि. फर्ग्यूसन यांनी ह्या इमारतीची फार तारीफ केली आहे. त्यांनीं असें लिहिलें आहे कीं, इटली देशांतील लोक, ज्या प्रमाणें व्हेनिस येथील ' कॅयापनाइल ' नामक अत्युच्च राजवाडा हा आपल्या राज्यसत्तेचें व विजयवैभवाचें दर्शक समजत असत, त्याप्रमाणें पठाण लोक ह्या मशीदीचा अत्युच्च मनोरा हा प्रार्थनामंदिराचा नुसता एक भाग न मानितां आपल्या अभ्युदयाचा व राज्यसत्तेचा एक कीर्ति स्तंभ आहे असें मानीत असत. त्यांचा धर्मोपदेशक ह्या मनोऱ्यावरून सर्वांस प्रार्थनेस येण्याबद्दल मोठ्या तालसुरानें पाचारण करीत असे त्यामुळें बादशहास देखील आपल्या राजवाड्यातून मोठ्या त्वरेनें येथें यावें लागत असे. हुमायून बादशहा ह्या मशिदीजवळच्या शेरमंदल राजवाड्यामध्यें राहात असे. त्यास ह्या मशिदीच्या मनोऱ्यावरून प्रार्थनेस येण्याबद्दल काजी साहेबांचे आव्हान झालें. त्यासरशी तो गडबडीनें उठून राजवाड्यांतून धांवत धांवत येत असतां जिन्यांतून पडला, व त्या योगानें इजा होऊन ता. २६ जानेवारी इ. स. १५५६ मध्यें मृत्यु पावला.

अर्जुनानें जेथें उभे राहून आपल्या गांडीव धनुष्यानें इंद्रप्रस्थ नगरीच्या कोटाचें संरक्षण केलें, तेथें आतां 'किल्ला कोना मशीद ' दृष्टीस पडते, ज्या महालामध्यें भगवान श्रीकृष्ण आणि पांडव ह्यांचे हितमंत्र चालत असत; त्या महालाचे ठिकाणीं शेरमंदल अथवा शीरशहाचा राजवाडा उभा आहे. ह्या राजवाड्यापुढें सांप्रत जी पडकी जागा दिसत आहे त्या स्थळीं राजसूय यज्ञाचा समारंभ झाला होता, अशी तेथील लोक माहिती सांगतात [ पारसनीसकृत दिल्ली अथवा इंद्रप्रस्थ ].

शके१६६० पिलाजी जाधवाच्या पत्रांत(रा. खं.६ प.१३२) इंद्रप्रस्थाकडे जाण्यास श्रीमंतांची अनुज्ञा असल्याचें लिहिलें आहे. शके १६७४ चैत्र शुद्ध द्वितीयेच्या एका पत्रांत इंद्रप्रस्थ येथील अंताजी माणकेश्वर यांचीं ठाणीं उठविण्यांत आलीं होतीं नंतर त्यांचें बापूसाहेबाशीं वचनप्रमाण झालें असा उल्लेख रा. खंड ६ प. २४४ मध्यें आहे. पुरुषोत्तम महादेव व बापूजी महादेव किंवा महादजी गोविंद यांचीं ९-१० पत्रें शके १६७७–७८ मधील रा. खं. ६ मध्यें आहेत. तारीख ५ आगस्ट १७६१ च्या पत्रांत नजीबखान रोहिला यानें इंद्रप्रस्थाचा बंदोबस्त करून अंतर्वेदींत प्रवेश केल्याचा उल्लेख ( रा. खं. १ प. २९७ ) मध्यें आहे. आंगरेज बहाद्दर व महाराज हरवलासपाल यांच्यामधील इंद्रप्रस्थ मुक्कामीं शके १७२५ मध्यें झालेला फारशी तहनामा रा.खं.१० प. नं; ६५७ मध्यें आहे.

**इंद्रभूति.**—(अथवा गौतम) हा पहिला गणधर महावीराचा पहिला शिष्य. याला गौतम इंद्रभूति असेंहि म्हणत. तो गौतम गोत्री ब्राह्मण होता. त्याच्या बापाचें नांव वसुभूति व आईचें नांव पृथ्वी होतें. मगधांतील गोवरग्राम त्याची जन्मभूमि होती. आपल्या वयाच्या ९२ व्या वर्षी राजगृह येथें तो महावीराच्या निर्वाणापूर्वी १२ वर्षे मृत्यु पावला. ( पीटर्सन रिपोर्ट, ब्रॉ. ए रा. ए. सो. १८९४. वेबर इं ॲ. ११ )

**इंद्राणी.**—इंद्रपत्नी ' इंद्र ' पहा. आजपर्यंत : सहा इंद्र होऊन गेले. त्यांची नांवें जशीं पृथक पृथक आढळतात. तशीं इंद्राणीचीं आढळत नाहींत. तरी त्यांचीं पृथक पृथक नांवें असावींत असें वाटतें, कारण सांप्रतच्या इंद्राणीस शची असें नांव आहे. ओरिसांत इंद्राणीची प्रचंड मूर्ति सांपडली आहे.

**इंद्रावणी.**—हीस मराठींत कडू इंद्रावण गुजराथींत इंदखणी, हिंदी इंद्रायण व इंग्रजींत सिट्रूलस कोलोसिंथिस अशी नांवें आहेत. इंद्रावणीचेवेल मध्य, दक्षिण व वायव्य हिंदुस्थान, अरबस्थान, पश्चिम आशिया, आफ्रिकेच्या उष्णकटिबंधांतील कांहीं भाग व भूमध्य समुद्राच्या आसपासचे प्रदेश इतक्या ठिकाणीं आढळतात. या वेलीचीं पानें कलिंगडाच्या प.नासारखीं असून फळें आकारानें नारिंगासारखीं असतात. त्यांचा रंग आरंभीं हिरवा असून तीं पिकावयास लागलीं म्हणजे पिवळीं होतात. या झाडाच्या दोन जाती आहेत. एक गोड इंद्रावण व दुसरी कडू इंद्रावण. दुसरीचें फळ निंबाएवढें असतें हिंदुस्थानांत वनस्पति विकणारे लोक जंगलांतील ताजीं फळें जमा करून विकतात. सरकारी दावाखान्यास पुरविण्याकरितां सहाराणपूर येथें त्यांची लागवड केली आहे. ह्यांचीं फळें कडू असतात. परंतु हा कडवटपणा बियांत नसतो. इंद्रावणीचें फळ रेचक असून त्याचा देशी व विलायती औषधांतून उपयोग करितात. बियापासून शेंकडा १५ ते १७ पर्यंत स्थिर तेल निघतें. त्याचा दिव्यांत जाळण्याकरितां उपयोग होतो असें म्हणतात. लंडनमध्यें सोलीव फळें स्मरना, ट्रिस्ट, फ्रान्स स्पेन, व इराणमधून येतात. असोली फळांचा पुरवठा मोगयाडोर मधून होतो. हिंदुस्थानांतील फळांत गर कमी असतो. व तो बाह्यांगापासून बरोबर सोडवितां येत नाहीं.

ह्या वेलाचा औषधाचे कामीं पुष्कळ उपयोग होतो. सर्पदंशावर–इंद्रावणीचें मूळ विड्यांत यावें. दंतकृमीवर–इंद्रावणीचें पिकलेलें फळ तापलेल्या तव्यावर टाकून त्याचा धूर दांतांस द्यावा म्हणजे दांतांतील किडे पडून जातात. लहान मुलाच्या पोटांतील डब्यावर इंद्रावणीचें फळ म्हशीच्या मुतांत उगाळून थोडेसें पाजावें. गंडमाळेवर इंद्रावणीच्या मुळाची साल व कडू शेवग्याची साल समभाग एकत्र कुटून ती भुकटी गुडगुडींत ओढावी. संधिवातावर इंद्रावणीचें मूळ, पिंपळी व त्याचे चौपट गूळ हीं एकत्र करून तें रोज एक तोळाप्रमाणें भक्षीत जावें. ( वॅट, पदे )

**इंद्रावती नदी**—कालाहंडी संस्थानच्या उंचवट्यांतील प्रदेशांत या नदीचा उगम असून ती पश्चिमेकडे मद्रास इलाख्यांतील जयपुर संस्थानांत वाहत जाऊन पुढें बस्तर संस्थानांत शिरते. अहिरी–जमीनदारीच्या जवळून ही नदी वाहत जाऊन सोम्नूरजवळ गोदावरी नदीस मिळते.

चित्रकोट येथें या नदीचा एक छानदार धबधबा आहे. धबधब्याच्यावर नदीचें पात्र अरुंद असून खालीं रुंद झालेलें आहे; व नदींत बरींच बेटें आहेत. नारिंगी, भरदाघ, गद्रा, आणि कोठरी ह्या हिला मिळणाऱ्या नद्या होत.

**इंद्रियविज्ञानशास्त्र**—शारीर व इंद्रियविज्ञान पहा.

**इद्रिसा**—किंवा एद्रिसी ( अबु अबदल्ला महंमद, इब्न अबदल्ला, इब्न इद्रिसी; सुमारें इ. स. १०९९–११५४ ) हा एक अरबी भूगोलवेत्ता होता. याच्या चरित्राविषयीं फारच थोडी माहिती आहे. हा इस्लामी भूमि सोडून एका ख्रिस्ती राजाच्या दरबारीं भाट झाल्यामुळें कट्टे मुसुलमान होतां-होईतों त्याच्या नांवाचा उल्लेख करीत नाहींत. त्याचा आजा दुसरा इद्रिसी, वायव्य आफ्रिकेंतील खलिफ घराण्यांतील असून मलग येथें राज्य करीत होता; त्याच्या मृत्यूनंतर १०५७ मध्यें ग्रानडानें मलग जिंकून घेतल्यावर इद्रिसी घराणें स्यूटा येथें गेलें असावें. या ठिकाणीं आपल्या चरित्र-नायकाचा जन्म झाला असावा असें दिसतें. त्याच्या भूगो-लांत कार्डोव्हाचें फार सुंदर वर्णन आढळतें त्यावरून त्याचा विद्याभ्यास त्या ठिकाणीं झाला या म्हणण्याला बळकटी येते. त्याच्या या ग्रंथावरून ११५४ पूर्वी केव्हांतरी तो लिस्बन आणि ॲन्डाल्युसियाच्या खाणी पाहून आला होता असें दिसतें. तसेंच एकदां तो मोरोक्को शहराजवळ व एकदां कॉन्स्टंटाईन येथें राहिला होता. १११७ त आपण एफिसस येथील सात निद्रिस्थांची गुहा पाहून आलों असें हा सांगतो. आशिया मायनरमध्यें त्यानें बराच प्रवास केला. त्याच्या ग्रंथांतील संदिग्ध उताऱ्यांवरून तो इंग्लंड व फ्रान्स देशाचा किनारा पाहून आला असावा असा कांहीं वाचक अर्थ काढ-तात. सिसिलीच्या दुसऱ्या रॉजरनें त्याला खगोल आणि त्या वेळचें ज्ञात जग दाखवणारा एक पट ( दोन्ही चांदीचे ) करावयास सांगितला होता. रॉजरनें दिलेल्या चांदीपैकीं फक्त एक तृतियांश चांदी खगोल व पट करण्याच्या कामीं खर्च झाली. तेव्हां उरलेली दोन तृतियांश चांदी व १००००० नाणीं आणि बार्सिलोना येथून आलेल्या जहाजा-वरील मौल्यवान् माल रॉजरनें त्याला बाक्षिस दिला. पुढें रॉजरनें, प्रत्यक्ष निरीक्षण केलेल्या अनिर्जन जगाचें वर्णन ज्यांत आहे असा एक ग्रंथ तयार करण्याची त्याला आज्ञा दिली. इद्रिसी व राजा या दोघांनीं जगांतील निरनिराळ्या प्रदेशांत तेथलें निरीक्षण करून खरी माहिती मिळविण्या-करितां हुशार दूत पाठविले. ते जेव्हां परत आले तेव्हां त्यांनीं आणिलेली माहिती इद्रिसीनें आपल्या नवीन भूगोल ग्रंथांत समाविष्ट केली. अशा पद्धतीनें हा अति विख्यात ग्रंथ ११५४ च्या जानेवारींत पुरा करण्यांत आला. त्याच्या उत्पादकावरून व आश्रयदात्यावरून त्याला अलरॉजरी असें नांव देण्यांत आलें. पण त्या ग्रंथाचे सबंध नांव ' भूगोलावरील सर्व प्रदेश, प्रांत, द्वीपें, आणि शहरें व त्यांचें क्षेत्रफळ व स्थळनिश्चय हीं शोधण्याकरितां एका चौकस माणसाचें बहिर्गमन " अशा अर्थाचें आहे. याचेंच संक्षिप्त नांव ' पृथ्वि–पर्यटणेच्छूची करमणूक किंवा चौकस मनाला विसावा ' असें आहे. ' नुबियन भूगोल ' हें नांव अगदीं चुकीनें पडलें आहे. ' रॉजेरियन ट्रिटाइज ' मध्यें कर्त्याला माहित असलेली जगाची संपूर्ण माहिती आलेली आहे. वस्ती असलेलें जग सात हवामानांप्रमाणें विभागलें आहे. विषुववरेषेपासून सुरवात करून अगदीं उत्तरेकडे ज्या ठिकाणीं थंडीमुळें पृथ्वी निर्जन दिसते त्या ठिकाणापर्यंत ही मर्यादा घेतली आहे. नंतर प्रत्येक हवामानाचे लांब रेषा काढून अकरा भाग पाडले आहेत. त्यांत आफ्रिकेच्या पश्चिम किनाऱ्यापासून आशियाच्या पूर्वकिनाऱ्यापर्यंतचा प्रदेश येतो. अशा रीतीनें सर्व पृथ्वीचे ७७ चौरस कप्पे केले आहेत. पहिल्या हवामानाचा पहिला भाग इद्रिसीनें साहारा अरण्याच्या अगदीं पश्चिमेपासून व सुदनच्या वाय-व्येकडील लहान प्रदेशापासून सुरू करून या हवामानाच्या निरनिराळ्या विभागांतून तो नेऊन त्याचा शेवट चीनच्या समुद्रांत केला आहे. पुन्हां परत दुसऱ्या हवामानाच्या पहिल्या भागाकडे येऊन मागच्या प्रमाणेंच पूर्वेकडे जावयाचें अशा रीतीनें ७ व्या हवामानाच्या अकराव्या भागापर्यंत तो गेला आहे. हा शेवटचा भाग आशियाखंडाच्या ईशान्य प्रदेशापर्यंत इद्रिसीच्या मतें पोहोंचतो. त्याची ही पृथ्वी विभागण्याची रीत उघड उघड गैरसोयीची आहे.

इद्रिसी जरी त्यावेळीं सुधारणेच्या शिखरावर असलेल्या ख्रिस्ती संस्थानांत प्रसिद्धपणें वावरत होता तरी यूरोपीयन विचारावर व ज्ञानावर त्याची कोठेंहि फारशी छाप पडलेली दिसून येत नाहीं. इद्रिसीचीं मतें टॉलेमीप्रमाणें असल्यानें त्याच्या ग्रंथांतील कांहीं भागांना परागतिक स्वरूप प्राप्त झालें आहे. उदा० पूर्वआफ्रिका आणि दक्षिणआशिया याविषयीं त्यानें दिलेली माहिती. सामान्य मुसुलमाना-प्रमाणें भूगोलविषयक अंधश्रद्धामूलक त्याचीं मतें सोडून दिल्यास, शास्त्रीय सत्याची त्याची आवड, मोठें मन, विस्तृत ज्ञान आणि मागील संशोधनाचा उपयोग करण्याची हातोटी लक्षांत ठेवण्याजोगी आहे. त्यानें अतिशय महत्त्वाची अशी स्कँडेनेव्हिया, आफ्रिकेचा कांहीं भाग, नायगर नदी, इजिप्त, सिरीया, इटली, फ्रान्स, ॲड्रियाटिक किनाऱ्यावरील प्रदेश, जर्मनी आणि ॲटलांटिक द्विपें या विषयींची भरपूर माहिती मागें ठेविली आहे. दुसऱ्या कोण-त्याहि अरबी ग्रंथांत महत्त्वाच्या भौगोलिक मुद्यांची अशी व्यवस्थेशीर मांडणी आढळून येणार नाहीं. आपल्या दुर्दै-वानें त्याच्या हस्तलिखितांतील गांवांचीं नांवें फार दुर्बोध

वाटतात. इद्रिसीचा जगाचा नकाशा मध्ययुगांतील मुसुलमानी रेखाचित्रांमध्यें अत्युत्तम म्हणतां येईल.

'रॉजरी' खेरीज इद्रिसीनें दुसरा एक मुख्यतः भौगोलिक विषयांचा ग्रंथ लिहिला आहे. त्याचें इद्रिसीनें दिलेलें नांव "मानवी उपवनें व आत्म्याची करमणूक" असें आहे. दुसऱ्या रॉजरचा मुलगा व वारस जो विल्यम दि बॅड (११५४–११६६) याच्याकरितां हा रचिला व तो हल्लीं उपलब्ध नाहीं. इब्न सैय्यदच्या म्हणण्याप्रमाणें, भैषज्यावर त्यानें कांहीं लिहिलें आहे. शिवाय कांहीं कविताहि केल्या आहेत असें दिसतें. [ ए. ब्रि. ए. रि. एं. बॉल ]

**इंद्रोतःशौनक**—एक शौनक कुलोत्पन्न ऋषि. जनमेजय नामक एका राजास,ब्रह्महत्या घडली असतां,त्यानें तिची निवृत्ति व्हावी, म्हणून आपल्या पुरोहितास प्रार्थिलें, परंतु त्यानें तें अमान्य केल्यामुळें, या ऋषीस राजा शरण आल्यावरून, यानें त्याकडून अश्वमेध यज्ञ करवून, व त्यास पुनीत करून, स्वर्गी पाठविलें ( भार० शांति० अ० १५२ )

**इध्मजिव्ह**—प्रियव्रत राजर्षींच्या दहा पुत्रांतील दुसरा. हा, इक्षुरसोदानें वेष्टित जें प्लक्षद्वीप, त्याचा स्वामी होता. यानें आपल्या द्वीपाचे वर्षसंज्ञक सात भाग करून शिव, यवया, सुभद्र, शांत, क्षेम, अमृत आणि अभय, या सात पुत्रांत क्रमानें त्यांचींच नांवें त्यांस देऊन, विभागून दिले होते. याचा उल्लेख महाभारतांत आढळत नाहीं. (प्रा. को).

**इध्मवाह**—अगस्त्यपुत्र दृढस्यु, यासच हें नामांतर आहे. हा तेजस्वी, महाब्राह्मण आणि महातपस्वी अगस्त्य ऋषीचा पुत्र, सात वर्षेपर्यंत गर्भवास भोगल्या नंतर अंगें, उपांगें आणि उपनिषदें ह्यांसह सर्व वेदांचा जप जप करीत करीतच मातेच्या उदरांतून बाहेर आला. तो तेजस्वी आपल्या पित्याच्या गृहामध्यें बालपणींच समिधांचे भारे वाहून आणित असे. म्हणून तो इध्मवाह ह्या नांवानें प्रसिद्ध झाला. ( महाभारत वनपर्व अध्याय ९९ )

**इनाम( हिंदुस्थान)**.—ब्रिटिश अमदानीपूर्वी देश्य राज्यकर्ते खाजगी व्यक्तींनां व धार्मिक संस्थांनां देणगीदाखल जमीनी इनाम म्हणजे सरकारसारा माफ करून देत असत. व्यक्तींनां इनाम जमीनी केवळ देणगी–बक्षीस म्हणून देत. किंवा कांहीं नोकरी बजावण्याच्या अटीवर देत असत. अशा जमीनींच्या देणगीला इनाम म्हणतात. 'इनाम' हा शब्द अरबी भाषेंतून आलेला आहे. त्याचा सामान्य अर्थ देणगी किंवा बक्षीस, वरिष्ठानें कनिष्ठाला दिलेली देणगी असा आहे. हिंदुस्थानांत व विशेषतः मराठी मुलुखांत इनाम याचा अर्थ सरकारसारा माफ करून दिलेली जमीन असा आहे. अशी देणगी सामान्यतः निरंतरची व वंशपरंपरा दिलेली असते. कित्येकदां, जी जमीन एखाद्या इसमाकडे मालकीहक्कानें असते तिच्यावरील सरकारसारा देणगी म्हणून माफ करण्यांत येत असे. कित्येकदां जमीन देऊन शिवाय सरकारी तिजोरींतून नक्त रक्कम देणगीदाखल देण्यांत येत असे.

इनामांची वर्गवारी.—सरकारनें दिलेल्या जमीनीच्या किंवा नक्तीच्या देणगीचे प्रकार येणेंप्रमाणें (१) कांहीं चाकरी करण्याच्या अटीवर दिलेली देणगी. अशा देणग्यांना चाकरीइनाम किंवा वतन, म्हणतात. (२) चाकरी करण्याची वगैरे कोणतीहि अट नसून दिलेली देणगी. अशी देणगी सरकारची मेहेरबानी म्हणून दिली जात असे. शुद्धाचरणी व विद्वान, किंवा सुप्रसिद्ध साधू, किंवा राजाचे नातेवाईक किंवा इतर मर्जीतले इसम अशांना देणग्या देण्यांत येत असत. तसेंच मोडकळीस आलेल्या सरदारांच्या घराण्यांतील इसमांना किंवा लढाईत पडलेल्या शिपायांच्या वारसांनां इनामें देत असत. यांना 'जातइनाम' म्हणतात. (३) तिसरा प्रकार धार्मिक देणग्यांचा. देवळें मशिदी,धर्मशाळा, वगैरे संस्थांनां दिलेल्या देणग्या या सदराखालीं येतात. यांना 'देवस्थान इनाम,' असें म्हणतात. यांपैकीं पहिला प्रकार चाकरी–इनामें उर्फ वतनें हा विशेष महत्त्वाचा होय. त्याचा इतिहास इतरत्र दिला आहे. ( 'वतन' लेख पहा ) बाकीच्या इनामांसंबंधाची व्यवस्था ब्रिटिश सरकारनें पुढीलप्रमाणें लाविली.

इनाम कमिशन.—पेशवाई बुडून ब्रिटिश अम्मल सुरू झाल्यावर ब्रिटिश सरकारला हा इनामदारांचा प्रश्न सोडवावा लागला. ब्रिटिश सरकार शेतसाऱ्याची वसुली करूं लागल्यावर पुष्कळशा जमीनी इनाम म्हणजे शेतसारा माफ असलेल्या, असल्याबद्दल लोक सांगूं लागले. एलफिन्स्टन साहेबांनीं १८२७ च्या हुकुमानें असें फर्माविलें कीं, सर्व जमीनीवर सारा वसूल करण्यांत येईल; ज्याच्या जमीनी इनाम असतील त्यांनीं आपला हक्क कोर्टांत किंवा कलेक्टरकडे शाबीत करून घेतला तर त्यांनां सारामाफी मिळेल. या प्रमाणें चौकशा सुरू झाल्या. अनेक अधिकाऱ्यांनीं इनाम शब्दाचे निरनिराळे अर्थ केले. त्यामुळें लोकांना इनामी हक्कासंबंधानें फार अनिश्चितता वाटूं लागली. म्हणून सरकारनें या हक्कासंबंधाची निश्चित व्यवस्था लावण्याकरितां १८५२ सालीं इनाम–कमिशन नेमलें; व त्यानें केलेल्या शिफारशी सरकारनें मान्य केल्या व त्यांत उरलेसुरलेले दोष १८६३ चे समरी सेटलमेंट ॲक्टस पास करून दूर केले. या एकंदर व्यवस्थेप्रमाणें इनामांचे तीन प्रकार करण्यांत आले. (१) धार्मिक इनामें—हीं त्या त्या धार्मिक संस्थेकडे निरंतर चालू ठेवण्याचें ठरलें. मूळ सनदेंत तसे शब्द नसले तरी असलीं इनामें निरंतरचीं करण्याचें ठरलें. अर्थात हीं इनामें देवस्थानाकडेच निरंतर चालावीं म्हणून तबदिलीहक्कहीन ( नॉट ट्रॅन्सफरेबल ) असल्याचें ठरविण्यांत आलें. (२) जात इनामें—हीं थोडा सरकारसारा बसवून वारसदारी व तबदिली ( ट्रॅन्सफरेबल ) या दोन्ही हक्कांनीं निरंतरचीं कायम देण्यांत आलीं.जीं इनामें वारसदारी हक्कानें व निरंतर हक्कानें नव्हतीं तींहि कांहीं नजराणा घेऊन वारसदारी व तबदिली दोन्हीं हक्कांनीं देण्यांत आलीं. (३)

चाकरी–इनाम उर्फ वतन अशा वतनदारांचे गांववतनदार व जिल्हा ( परगणा ) वतनदार असे दोन मुख्य वर्ग होते. पैकीं गांववतनदारांचे तीन पोटवर्ग करण्यांत आले. ( अ ) गांव व सरकार यांपैकीं कोणालाहि ज्यांचा उपयोग नव्हता अशा महाजन, बेलदार, वगैरे इसमांचीं वतनें निम्मीं खालसा करून फक्त निम्मीं त्यांच्याकडे तबदिलीचा हक्क देऊन निरंतरचीं करण्यांत आलीं. ( आ ) ज्यांचा फक्त गांवास उपयोग होतो अशा काजी, जोशी वगैरे इसमांची गांवची चाकरी करण्याच्या अटीवर कायम ठेवण्यांत आलीं; व ज्यांना सनदापत्रांनीं हक्क शाबीत करतां आला नाहीं त्यांच्याकडून उत्पन्नाचा चौथा हिस्सा सारा घेण्याचें ठरवून निरंतरचीं दिलीं, आणि तबदिली हक्कविहीन ठरवून त्या त्या घराण्याकडे निरंतर चालतील असें करण्यांत आलें. ( इ )तिसरा पोटवर्ग सरकार व गांव दोघानाहि उपयोगी असलेल्या कामगारांचा. त्याच्यासंबंधाने स्वतंत्र 'हेरिडिटरी ऑफिसेस ॲक्ट' पास करून त्यांची व्यवस्था करण्यांत आली. ( 'वतन लेख पहा ).

गॉ र्ड न व पे ड र से ट ल में ट् स.–परगणा वतनदारांत देशमुख व देशपांडे हे मुख्यतः येतात. ब्रिटिश अम्मल सुरू झाल्यानंतरहि आरंभीं त्यांच्याकडून पूर्ववत कामें करून घेण्यांत येत होतीं. पण पुढें सांप्रतची रेव्हेन्यु पद्धती सुरू केली तेव्हां त्यांच्या चाकरीची जरूर उरली नाहीं. तेव्हां त्यांच्या इनामी हक्कांची व्यवस्था लावण्याचा प्रश्न उद्भवला. इनाम कमिशननें त्यांच्या हक्कांचा विचार केला नव्हता. म्हणून महाराष्ट्राकरितां ( कोंकण व सदर्न मराठा कंट्री ) गॉर्डन साहेबाच्या, व गुजराथकरितां पेडरसाहेबाच्या, अध्यक्षतेखालीं दोन कमिट्या नेमण्यांत आल्या; व त्यांनीं सुचविलेल्या व्यवस्थेला सरकारनें मंजुरी दिली. या व्यवस्थेंत असें ठरलें कीं, सरकारनें या जिल्हावतनदारांना चाकरीच्या जबाबदारींतून कायमचें मुक्त करावें व उलट वतनदारांनीं आपल्या इनामी उत्पन्नाच्या दररुपयांतले पांच किंवा सहा आणे सरकारसारा दरसाल देत जावा. शिवाय हें इनामी उत्पन्न खासगी स्वरूपाचें करून घेण्याकरितां नजराणा म्हणून दररुपयास आणखी एक आणा सरकारला देत जावा. तसेंच दत्तकाचा हक्क पाहिजे असल्यास वरच्या शिवाय आणखी दररुपायास एक आणा सरकारास देण्याचें कबूल करावें. अशा दोन सवलती गॉर्डन कमिटीनें महाराष्ट्रांत दिल्या. शिवाय वतनदारांच्याच विनंतीवरून हीं वतनें तबदिली हक्क विहीन असल्याचें ठरविण्यांत आलें.पण गुजराथमध्यें बहुतेक वतनें तबदिली हक्कयुक्त असल्याचें उभयसंमतीनें ठरलें. जिल्हा वतनासंबंधाच्या ह्या व्यवस्थेलाच गॉर्डन व पेडर सेटल्मेंटस असें म्हणतात.

इ ना म खा ल सा क र ण्या चा ह क्क.—जीं इनामें चाकरीकरितां म्हणून दिलेलीं आहेत तीं चालू ठेवणें किंवा खालसा करणें यासंबंधानें सरकारनें स्वतंत्र नियम केले आहेत. मूळ इनामें चाकरीकरितां दिलेलीं असून पुढें १८७४ च्या कायद्याच्या १५ व्या कलमाप्रमाणें चाकरीची माफी करून त्याऐवजीं सरकारसारा घेण्याचा करार सरकारनें केला असेल तर त्या सनदेंतील करारावरहुकुम तें वतन चालू ठेवण्यास सरकार बांधलेलें आहे. पण अशा प्रकारचा चाकरीच्या माफीसंबंधाचा कांहीं करार झाला नसेल आणि कांहीं इसमाच्या हयातीनंतर किंवा घराण्याचा वंश खुंटल्यानंतर इनाम खालसा करण्यासंबंधानें जें सरकारनें किंवा सरकारी अधिकाऱ्यानीं ठरविलें असेल त्याप्रमाणें तीं खालसा करण्यांत येतील. वरच्यापैकीं कोणताहि करार झालेला नसेल अशीं इनामें सामान्यपणें कायदेशीर वारस असेपर्यंत चालू ठेऊन कोणी वारस नसल्यास खालसा करण्यांत येतात. पण अशीं इनामें ज्या चाकरीकरितां दिलेलीं असतात त्या चाकरीची आवश्यकता नसेल किंवा चाकरी बद्दलच्या योग्य वेतनापेक्षां इनाम फार जास्त असेल, किंवा इनामदाराच्या हातून कांहीं मोठा गुन्हा किंवा गैरवर्तणूक झाली असेल, किंवा तें वतन कायद्याला मान्य नसलेल्या स्त्रीवारसाच्या किंवा दुसऱ्या इसमाच्या ताब्यांत गेलें असेल तर सरकार तें खालसा करील, किंवा योग्य अटीवर पुन्हा चालू ठेवील, किंवा कांहीं भाग खालसा करून बाकीचें इनाम योग्य अटीवर चालू ठेवील. तसेंच चाकरीची माफी देतांना तबदिलीचा हक्क दिला नसूनहि जर इनामाची तबदिली १८७४ च्या कायद्यांतील कलमांविरुद्ध करण्यांत येईल तर तें इनाम सरकार खालसा करील.

इ ना म दा र व शे त कु ळें–खं ड वा ढ वि ण्या चा ह क्क.—जेव्हा इनाम जमीनीचें नसून केवळ उत्पन्नाचें ( रेव्हेन्यूचें ) असेल तेव्हां इनामदार व शेतकरी याचे परस्पर संबंध बारकाईनें तपासले पाहिजेत. असलें इनाम सुरू होण्यापूर्वीपासूनच जर ती जमीन दुसऱ्याच्या ताब्यांत असेल तर इनामदाराला जमीनीची मालकी मुळींच नसून फक्त उत्पन्नाची ( रेव्हेन्यूची ) मालकी असते. पण इनाम चालू झाल्यानंतर लागलेलीं शेतकुळें असलीं तर जमीनीचें शक्य तितकें जास्ती उत्पन्न येण्याकरितां कुळांत अदलाबदल करण्याचा हक्क इनामदाराला असतो. अर्थात कुळांत अदलाबदल करण्याचा हक्क जेथें असतो तेथें खंड वाढविण्याचा हक्कहि असतोच. परंतु इनामदारापूर्वीचीं कुळें असल्यास तीं कायमचीं किंवा मिरासदार कुळें होत. शिवाय इनामदार सनदापत्रानें असा मिरासदारीचा हक्क कुळांना देतात. अशीं कुळें योग्य तो खंड देत असल्यास तो खंड वाढविण्याचा किंवा कुळांनां काढून लावण्याचा हक्क इनामदारास नाहीं. खंड वाढविणें झाल्यास ती वाढ वाजवी प्रमाणांत आहे, आसपासच्या मिरास जमीनीवरील खंडाइतकीच आहे असा पुरावा करण्याचा बोजा इनामदारावर असतो.

**इंपे, सर एलिजा** ( १७३२–१८०९ )—हा बंगालचा सर न्यायाधीश १३ जून १७३२ मध्यें जन्मला. त्याचें शिक्षण वारन हेस्टिंग्सबरोबर वेस्ट मिन्स्टर येथें झालें. १७७३ मध्यें त्याला कलकत्याच्या नवीन वरिष्ठ कोर्टामध्यें पहिला सर न्यायाधीश नेमण्यांत आलें. त्या जागेचा पगार दरवर्षास ८००० पौंड असे. त्याच्या जोडीला आणखी तीन न्यायाधीश देण्यांत आले होते. इ. स. १७७५ त नंदकुमाराचा खटला याच्यापुढें चालला होता, व या खटल्यामुळेंच याचें नांव इतिहासांत प्रामुख्यानें या काळीं पुढें येतें. १७८७ मध्यें हाऊस ऑफ कॉमन्सपुढें त्याच्यावर नंदकुमाराचा कायद्यानें खून करण्याच्या आरोपावरून खटला करण्यांत आला. बर्क, मिल, थॉर्नटन, मेकाले इत्यादिकांनीं इंपेवर अनेक गुन्हे लादून त्याला दोषी ठरविण्याचा अटोकाट प्रयत्न केला, पण तो सफळ झाला नाहीं. हेस्टिंग्सचा हा मित्र होता व वेळोवेळीं हेस्टिंग्सला त्यानें मदत केली यामुळेंच त्याला शत्रू उत्पन्न झाले होते. कॉसिजुरा ( कलकत्यापासून ८० मैलांवर ) व पाटणासंबंधींच्या खटल्यांत इंपेला जो दोष देण्यांत येतो तो अजिबात खोटा आहे असें सर जेम्स फिट्झजेम्स स्टीफेन याचें मत आहे.

१७८०मध्यें हेस्टिंग्स व त्याचें मंत्रीमंडळ यांच्यांत भांडण तंटे सुरू असतां, इंपेला कंपनीच्या कोर्टाचा म्हणजे 'सदर दिवाण अदलत' चा मुख्य नेमण्यांत आलें; व त्या कामाकरितां महिना ५००० रुपये जादा वेतन ठरविलें. पण हा कारभार बेकायदेशीर होता, तेव्हां डायरेक्टरांनीं इंपेला परत बोलाविलें व पुढें त्याच्यावर खटला भरला.

इंपे हा फार धोरणी व हुषार न्यायाधीश होता. त्यानें मोठ्या मेहनतीनें १७८१ त एक कोड तयार केलें. हिंदूंचे आचारविचार ओळखून तो न्याय देत असे; व साम्राज्यांत स्वास्थ्य रहावें याविषयीं त्याची खटपट असे. पण त्याच्या गुणांचें शेवटीं चीज झालें नाहीं. तो पार्लमेंटांत होता. १८०९ मध्यें त्याचा अंत झाला. [ स्मिथ. ए. ब्रि. ]

**इंफाल**–( आसाम ) मणिपुर संस्थानची राजधानी आहे. आसामबंगाल रेल्वेवरचें मणिपुर स्टेशन हेंच या गांवाला जवळचें स्टेशन म्हणतां येईल, तेथून इंफाल १३४ मैलांवर आहे.ह्या शहराचीलोकसंख्या(१९११) ७४६५०होती त्यापैकीं शेंकडा ९६ लोक हिंदु आहेत. एवढी मोठी जरी लोकसंख्या आहे तरी ह्या ठिकाणाला शहर म्हणण्यापेक्षां अति विस्तृत खेडेंगांव म्हटलेलें जास्त शोभेल. कारण ह्या ठिकाणाला तीन नद्या येऊन मिळतात व प्रत्येक नदीच्या तीरावर झोपड्यांची एक रांग आहे. भोंवतालीं झाडांची खूप दाटी आहे. ह्या ठिकाणीं पाऊस ७० इंच पडतो व हवा थंड असून मजेदार आहे. ह्या शहरीं बाजार रोज भरतो. ह्या गांवाला पाण्याचा पुरवठा नदीपासून होतो व नदीचे पाण्यांत वारंवार घाण मिसळत असल्यामुळें पटकी वगैरे रोगांचा उपद्रव फार आहे [ इं. गॅ. ]

**इन्फ्ल्युएंझा**—खोकला, पडसें, सर्दी, हीं लक्षणें ज्यांत प्राधान्येंकरून असतात असा हा एक प्रकारचा सांथीचा ताप आहे. पुष्कळ लोक साधारण पडशासहि व विशेषतः त्यांत ताप वगैरे असल्यास त्यास इन्फ्ल्युएंझा म्हणतात, परंतु ती चूक होय. या तापाच्या सांथी अतिप्राचीनकाळीं यूरोपादि देशांत पुष्कळदां येऊन गेल्या होत्या. अलीकडील अत्यंत जोराची सांथ इ. स. १८४७–४८ यूरोपांत होती. त्यानंतर ती नष्ट होऊन पुनः इ. स. १८९०–९१ सालीं उद्भवली. तिचा प्रथम उद्भव सेंटपीटर्सबर्ग ( पेट्रोग्राड ) येथें होऊन लवकरच ती ऑस्ट्रिया, जर्मनी, फ्रान्स आणि इंग्लंड या देशांत पसरली. व तेथून त्वरेनें इतर यूरोपिअन देश व्यापल्यावर अमेरिकेंतील संयुक्त–संस्थानांत तिचा प्रादुर्भाव झाला. थोड्याच महिन्यांनीं हिंदुस्थान, आस्ट्रेलिया, न्यूझीलंड, आफ्रिकेंतील किनाऱ्यालगतचें प्रांत व दक्षिण अमेरिका या सर्व ठिकाणीं या सांथीचा कहर मोठ्या चपलतेनें झाला. ही सांथ हिंदुस्थानवासीयांच्या आठवणींतून बुजली असेल नसेल तोंच उग्र स्वरूपांत तिला फारच मागें टाकणारी अशी इ. स. १९१८–१९ मधील सांथ यूरोपांतून इकडे आली व सर्व देशभर फैलावून तिच्या योगानें थोड्या अवधींत अश्रुतपूर्व प्राणहानि खेड्यापाड्यापासून तों मोठमोठ्या शहरांत झाली, व अद्याप ती सांथ सौम्य स्वरूपांत आपणांत वास्तव्य करीतच आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. जेथें ही सांथ प्रवेश करिते त्या देशांत चार पांच वर्षें राहून ती शेवटीं नाहींशी होते.

**रो गो द्भ वा चीं का र णें.**—पूर्वी अशी समजूत असे कीं, हा रोग स्पर्शजन्य नसून वायुजन्य असावा. कारण या सांथीच्या प्रसाराचा झपाटा कांहीं विलक्षणच असतो. थोड्या दिवसांच्या अल्पावधींत शहरांतील गर्दीच्या भागांतून शेंकडों माणसें एकदम अजारी पडतात ही गोष्ट व दुसऱ्या कांहीं गोष्टींमुळें या समजुतीस बळकटी आली होती. परंतु पुढें इ. स १८९२ मध्यें फीफर यानें या तापाच्या विशिष्ट जंतूचें अस्तित्व ठामरीतीनें सिद्ध केलें हा जंतु बहुधा रोग्यांच्या कफामध्यें व क्वचित रक्तामध्यें सांपडतो. यावरून हा रोग स्पर्शसंचारी आहे हें उघड झालें. आतां शेंकडों माणसांत या रीतीनें एकदम संसर्ग होऊं शकतो हा विशेष या सांथीमध्यें आहे येवढेंच. सांथीचें कारण हे जंतूच होत असें निश्चित ठरलें आहे. हा बारिक जंतू सूक्ष्मदर्शक यंत्रानेंच पहातां येतो व याचे दोन तीन भेद असावेत असें अनुमान आहे. याबरोबर स्ट्रेप्टोकॉकाय, स्टॅफीलोकॉकाय व पुप्फुसदाह उत्पन्न करणारे न्यूमोकॉकाय नांवाचे जंतू मिश्रित असतात व त्यांच्यामुळें या तापांत आगंतुक दोष उत्पन्न होतात. यांच्या स्पर्शानें मनुष्यास विकृति होते व रोगोद्भव होण्याची गर्भावस्था एखाददुसऱ्या तासापासून ते थोड्याशा दिवसांपर्यंत असते, आणि मग रोगलक्षणें दिसूं लागण्यास आरंभ होतो. अंमळ श्रमपूर्वक व शोधक

दृष्टीनें पाहिलें असतां स्पर्शानें संसर्ग कसा बाधला हें निश्चित ठरवितां येतें. पण बारीकसारीक सांथी ज्या मागाहून उद्भवतात त्या या जंतूंचीं बीजें ( अंडीं ) पूर्णावस्थेप्रत येऊन आपोआप नवीन जंतू निर्माण होतात व ते अदृश्य असल्यामुळें रोगोद्भव कसा झाला व संसर्ग कोठून आला हें कोडें पडतें. भिन्न प्रकृतिमानाप्रमाणें कांहीं लोकच या सांथीचे तडाख्यांत पुनःपुनः सांपडतात. कित्येक जणांस जन्मतःच या रोगापासून निर्भयता असलेली आढळून येते.

लक्षणें.—या तापाचे लक्षणानुसार भेद पुष्कळच आहेत, व त्यांत वैचित्र्यहि बरेंच दिसून येतें. ( १ ) ज्वरप्रधान भेद अगर साधा दोषरहित ज्वर—पुष्कळ लोकांस अशा प्रकारचाच ताप येतो. त्यांत फक्त ज्वराचीं लक्षणें असतात. व महत्त्वाचीं इंद्रियें बिघडून दोष उत्पन्न होत नाहींत. कपाळाचा पुढील भाग एकाएकीं दुखूं लागून डोळ्याचे मागील भाग दुखतो. कमरेचे स्नायु मनस्वी ठणकून दुखतात, व नंतर मांड्या, पोटऱ्या व शरीराच्या इतर भागांसहि असेंच होऊं लागतें. थंडी वाजून येत नाहीं, पण ताप लवकरच १०२°–१०४° पर्यंत चढतो व ज्वराचीं लक्षणें म्हणजे जलद चालणारी नाडी, थोडी तहान व लालसर रंगाची लघवी हीं असतात. जिभेवर पांढरी दाट बुरशी येऊन तिला किंचित कंप असतो व तिच्यावर दांताचे वण असतात. घसा व गलग्रंथी लाल होऊन तोंडास व श्वासास अंमळ दुर्गंधि येते. पाणथरी जरा मोठी झालेली असते. त्वचा बहुधा रुक्ष असते पण कधीं कधीं बराच घामहि सुटतो. रोग्यास अगदीं चैन पडेनासें होऊन त्याची उलघाल होते; झोंप येत नाहीं; अगदीं निःशक्त होऊन असहाय असा अंथरुणांत पडून रहातो व जबर दुखणें आल्याचीं स्पष्ट चिन्हें दिसतात. बहुधा यांपेक्षां अन्य लक्षणें होत नाहींत व अशी स्थिति २४ तास ते ४८ तासपर्यंत राहिल्यावर उतारहि पण भराभर पडूं लागतो.तथापि ताप निघाल्यावर सुद्धां सर्वांग ठणकणें व अशक्तपणा हीं लक्षणें जीं प्रथम दिसून येतात तीं चांगलीशीं कमी होत नाहींत. कांहीं दिवसांनीं सावकाशपणें तीं कमी होतात. तथापि हें उघड दिसून येतें कीं, या तऱ्हेच्या तापाचा जोर, आरंभ, मुदत व शेवट यांमध्यें बरेंच वैचित्र्य आढळून येतें. उदाहरणार्थः—कांहीं रोग्यांत तापाची तीव्रता फार असते पण तो थोडा वेळ टिकून निघतोहि लवकर; तर कांहीं रोग्यांत ताप मध्यम पण जरा दीर्घकालीन असून निघण्यास अवधि लागतो व सावकाश निघतो यामुळें विषमज्वरादि इतर तापाशीं याचें साम्य होऊं लागल्यानें मनांत घोंटाळा उत्पन्न होतो. या दोन्हीहि प्रकारांमध्यें ताप उलटणें संभवनीय असतें.

( २ ) कफप्रधान ज्वरः—या भेदांतहि तापाची सुरुवात वरीलप्रमाणेंच होते. ताप, डोकेदुखी, हातपाय व सर्वांग वळणें आणि अत्यंत अशक्तपणा ही चिन्हें तर असतातच, पण लवकरच असें आढळून येतें कीं, रोग्यास दम लागला आहे, छातींत दुखूं लागून त्रासदायक खोकला येतो आहे व असें झालें म्हणजे श्वसनमार्ग व इंद्रियें यांमध्यें बिघाड होण्यास आरंभ झाला असें समजून येतें. छाती तपासून पाहिली असतां श्वासनलिकांचा दाह सुरू झाल्याचीं लक्षणें आढळून येतात व त्या खोकल्याबरोबर अति दाट असा कफ पडतो. हें सौम्य प्रकारच्या रोगाचें वर्णन झालें. पण श्वासमार्ग दूषित झालेल्या बऱ्याच रोग्यांमध्यें निवळ श्वासनलिका दाहापेक्षां मिश्र फुप्फुसदाह झाल्याचें आढळतें, व छाती तपासून परीक्षा केली असतां पाठीमागें, फुप्फुसांत एकेच ठिकाणीं अगर तुटक तुटक अशा दोन तीन ठिकाणीं फुप्फुसें बिघडल्याचें कळून येतें. अतिशय दम लागतो. नंतर कफ पुष्कळ फेसाळ पूर्वीपेक्षां कमी दाट व लालसर रंगाचा पडूं लागतो. कांहीं थोड्या रोगांत निव्वळ फुप्फुसदाह असतो व फुप्फुसावरणदाह व फुप्फुसावरणपूर्णदाह हेहि रोग झालेले आढळतात. ह्या रोगांत रोग प्रखर असून रोगी बरा होणें कठिण असतें! ज्या मानानें या श्वसनेंद्रियांत बिघाड झालेला असेल, त्या मानानें ज्वराची तीव्रता असते. या तापांत पुष्कळसें पडसें डोळे आणि पापण्या पडशानें गेंगारल्याप्रमाणें फुगीर दिसणें हीं लक्षणें प्रथम होतात असें लोक समजतात.पण पुष्कळदां श्वसनेंद्रियें बिघडलेल्या रोग्यांत व अन्य साध्या प्रकारच्या रोग्यांत हीं लक्षणें नसतात.

(३) पित्तप्रधान ज्वर.—या प्रकारचे रोगी कमी असतात व निरनिराळ्या साथींत या प्रकारच्या ज्वराचें प्रमाण कधीं कमी तर कधीं जास्ती असलेलें आढळतें. यामध्यें उदर व त्यांतील नळ वगैरे इंद्रियें यामध्यें विकार उत्पन्न होऊन पोटशूळ, ओकारी, अतिसार व क्वचित् प्रसंगीं कावीळ हीं लक्षणें होतात. या प्रकारांत वर वर्णिलेल्या दोन भेदांपेक्षां ज्वरमान कमी व सौम्य असतें. या प्रकारच्या ज्वरांत व कफप्रधान ज्वरामध्यें मूलतः हा ज्वर आणि त्यांत आगंतुक उत्पन्न झालेले कफ व पित्त हे दोष व मागाहून उत्पन्न झालेले रोग तापाचे परिणाम होत असें जाणावें. मूळच्या तापाशीं त्याचा संबंध नसतो. याप्रमाणें पण जरा कालावधीनें शरीराचे इतर भागांतही दोष उत्पन्न होतात.

(४) हृद्दौर्बल्य प्रधान ज्वर.— यामध्यें हृदयाची क्रिया अति मंदत्वानें चालल्यामुळें मूर्च्छा व बेशुद्धीचे झटके येणें हातपाय थंड पडून मृतप्राय स्थिति होणें, दम, अनियमित व अशक्त नाडी व त्वचेंत एकदम लाली येणें ही लक्षणें होतात. दुर्बलतेनें हृदयास शिथिलता येते. नाक, तोंड, गुद, इत्यादि द्वारांतून रक्तस्राव होणें हीं लक्षणें कधीं कधीं होतात.

(५) वातप्रधान ज्वर.—हा प्रकार बराच सर्व साधारण आहे. आरंभीं ताप आल्यानंतर सुस्ती, झांपडहि विशेष दिसून येते. जास्त तीव्र रोगांत रोग्यास वात होऊन

तो बरळूं लागतो. नंतर उलटा प्रकार होऊन निद्रानाशामुळें रोग्यास पीडा होते. कोठले तरी एका अगर अनेक मज्जातंतूचे ठिकाणीं लवकर आराम न पडूं देणारा असा शूल उद्भवतो. व सर्व शरीरांतील मांसल भाग ठणकतात. कांहीं रोग्यामध्यें अशा विवक्षित ठिकाणीं वेदना न होतां बरीच दीर्घकाल रहाणारी अशी अशक्तता शरीराला येते. किंचितहि शारीरिक अथवा मानसिक काम करवेनासें होतें. तापाच्या आरंभापासून तो कित्येक महिनेपर्यंत रोग्याच्या मनःस्थितिमध्यें अत्यंत औदासिन्य व दुर्बलता दिसून येते.

या ज्व रा पा सू न हो णा रे आ ण खी प रि णा म.—हे त्वचेंतहि दिसून येतात. ऐन तापांत कधीं कधीं अंगावर पुरळ अगर फोड दिसतात, किंवा ते मागाहूनहि पहाण्यांत येतात. गुलाबसर रंगाची अथवा गोंवर, गांधीं इत्यादि व्याधिमध्यें जसा लालसर पुरळ येतो तशी लाली कांहीं ठिकाणीं डाग खारखी आढळते. या शिवाय या तापाचा कोणत्याही इंद्रियावर थोडा फार परिणाम झाला नाहीं असें घडतच नाहीं. सर्व ठिकाणीं दाह उत्पन्न होणें अगदीं संभवनीय असतें. यामुळें खालील दाहयुक्त दुष्परिणाम निरानिराळया रोग्यांत पहाण्यांत येतात ते असेः—कर्णदाह, वृषणदाह, मज्जातंतुदाह, शिरादाह, कर्णपार्श्वग्रंथीदाह, हृदावरणदाह, मस्तिष्कावरणदाह, मास्तिष्कदाह, पृष्ठरज्जुदाह, अक्षिफटदाह, डोळयावर साराफुलें, मूत्रपिंडदाह, संधिरोग, गंडदाह. मज्जातंतू व मज्जस्थानाची रचना विकृत न होतां फक्त त्यांच्या क्रिया विकृत झाल्यामुळें खालील दुष्परिणाम उद्भवतात. रसनेंद्रिय व घाणेंद्रियांतील तंतू विकृत होऊन चव व सुवास अगर घाण कळत नाहीं.कांहीं रोग्यामध्यें मनाची उद्विग्नस्थिति इतक्या विकोपाला जाते कीं परम औदासीन्ययुक्त अगर भ्रमयुक्त वेडहि लागलेलें पहाण्यांत येतें. या तापाच्या सौम्य सांथी वारंवार उद्भवतात व त्यांतले त्यांत दुसरी अगर तिसरी दिवाळयाचे दिवसांत उत्पन्न होणारी सांथ फुप्फुसदाहादि दोष उत्पन्न होत असल्यानें विशेष भयंकर असते, व त्या सांथींत प्राणहानी अतिशय होते. नाहींतर एरवीच्या सांथी एवढ्या प्राणघातक नसतात.

नि दा न.—वर सांगितलेले व इतर अन्य भेद या तापाचे असल्यामुळें हा मूळचा फुप्फुसदाह रोग आहे किंवा विषमज्वरादि इतर प्रकारचा ज्वर आहे, हें त्या त्या भेदांत सांगितलेल्या लक्षणांवरून ओळखतां येतें. या निदानास बळकटी आणण्यासाठीं ताप एकदम येणें, अंग ठणकणें, व ताप थोडेच दिवस टिकणें हीं मुख्य लक्षणें उपयोगी पडतात. पण कांहीं सौम्य ज्वरांमध्यें हीं लक्षणें नीटशीं जमेस धरण्याजोगीं नसतात. अशावेळीं मागून बरेच दिवस रहाणारा अशक्तपणा अगर शरीरांत होणारे दोष अगर वर सांगितलेले दुष्परिणाम यांच्या योगें अनुमान करणें सोपें जातें. ज्या रोग्यांत श्वसनेंद्रियें बिघडून कफोत्पत्ति झालेली असते, त्यांच्या कफांत आढळून येत असलेले फ्लीफरचे जंतू योग्य साधनांच्या योगानें दाखवितां येतात.

ज्व र प्र ति बं ध क उ पा य.—सांथ सुरु असतां रोज २-४ गुंजा क्किनाईन घेतल्यानें ज्वर येत नाहीं असा पुष्कळ सांथींत अनुभव घेतलेला आहे. विशेषतः मोठमोठ्या शाळांतील वसतिगृहांतून मुलांना अगर मुलींना नियमितपणें शिक्षकांच्या देखत हें औषध रोज देत गेल्यानें त्यांमध्यें सांथीचा प्रादुर्भाव होऊं नये व त्याच वसतिगृहांतील हें औषध घेत नसलेल्या नोकर मंडळींत तेवढी सांथ पसरावी हें या औषधाची उपयुक्तता उत्तम रीतीनें दाखवितें. कोणास हा ताप आल्यास ( १ ) त्याचा कफ ज्या भांड्यांत असतो त्यांत जंतुघ्न औषध टाकित जावें. ( २ ) रोग्यास वेगळया खोलींत अगर इमारतींत निजवावा व इतर सर्व माणसांनीं त्याजकडे जाऊं नये. ( ३ ) पुष्कळ माणसें जमतील असे प्रसंग घडवून आणूं नयेत. ( ४ ) व जेथें अशीं माणसें जमणें अपरिहार्य असतें तेथील खिडक्या, दारें, उघडीं टाकून स्वच्छ हवेनें दूषित हवेचें शुद्धीकरण करीत असावें. या स्वल्प उपायांनीं सांथीच्या प्रसारास आळा चांगला बसतो.

उ पा य.—या ज्वरास उत्तम उपाय म्हणजे इकडे तिकडे हिंडून जो शक्तिपात या ज्वरांत एकदम होतो तो होऊं नये यासाठीं अंथरुणात अगदीं निश्चेष्ट पडून रहावें. ज्वराचे आरंभीं अंग अतिशय ठणकतें त्यासाठीं सोडा सालिसिलेट १० ग्रेन दर चार ते सहा तासांनीं दिल्यानें आराम वाटतो. अथवा एस्पिरिन ५-७ ग्रेन अगर फेनासिटिन ५ ग्रेन हीहि चांगलीं औषधें आहेत. पण हीं औषधें डाक्तराचे सल्ल्यानें घ्यावीत कारण मागाहून जी दीर्घकाल टिकणारी अशक्तता येते तिला उत्तेजक हीं औषधें असल्यामुळें यांचा उपयोग बेतानेंच करावयाचा असतो. हीं औषधें न देतां पोटास सायट्रेट, आमोनियम आसिटेट यासारखीं निरुपद्रवी क्षारयुक्त औषधें कफोत्सर्जन करणाऱ्या इतर औषधांशीं मिश्र करून देणें फार चांगलें. ताप कमी झाल्या नंतर शक्ति लवकर येईल अशी औषधयोजना करावी. क्विनाईन व कुचलाअर्क यांचा या कामीं पुष्कळ उपयोग होतो. अति लहान मुलें, अशक्त माणसें व वृद्धलोक यांना रोगाच्या तीव्रावस्थेंत अल्कोहलमिश्रित उत्तेजक औषध देणें जरूर असतें. उदाहरणार्थ, पोर्टवाईन वगैरे. मागाहून जी विलक्षण अशक्तता येते त्यासाठीं लोह, स्ट्रिकनिया मिश्रित औषधें फायदेशीर असतात. पूर्ण विश्रांति व समुद्रकाठीं अगर डोंगराच्या उंचवट्यावर हवापालट करणें तर उत्तमच होय. अशावेळीं हृदयक्रिया फारच अशक्त असल्यास कापूर १० ग्रेन व आलिव्ह तेल १०० भाग या मिश्रणाचे २० थेंब दिवसांतून १-२ वेळां टोंचून घालावे. सांथीच्या दिवसांत प्रत्येकानें किंचित् मीठ पाण्यांत विरघळवून त्या पाण्यानें नाक, घसा व तोंड या ठिकाणीं तुषार उडवून हे भाग साफ ठेवावे, अथवा या पाण्याचें उपःपान करावें.

**इन्व्हर्नेस**—इन्व्हर्नेस हें स्कॉटलंड देशामधील इनव्हर्नेसशायर परगण्यांतलें बंदर व मुख्य ठिकाण असून, रॉयल म्युनिसिपल व पोलिसबरो आहे. याची लोकसंख्या (१९०१) २१,२३८ होती. या शहराचा बराच भाग नेस नदीच्या उजव्या तीरावर असून शिवाय हें दोन्ही तिरांवर पसरलेलें आहे. आसमंतांतील वनश्री व सुंदर इमारती यांमुळें याला डोंगराळ प्रदेशाची राजधानी म्हणण्याची चाल पडली आहे. उन्हाळ्यांत या ठिकाणीं पुष्कळ प्रवासी येतात. सध्यांचा किल्ला नवीन असून नदीजवळच्या टेंकडीवर आहे. त्यांत कोर्टें व काउंटीच्या कचेऱ्या आहेत. येथें प्रार्थनामंदिरें, शाळा, दुसऱ्या शिक्षणसंस्था व रॉयल ॲकॅडेमी ह्या सार्वजनिक संस्था आहेत. त्याप्रमाणें येथें पदार्थसंग्रहालय, ग्रंथसंग्रहालय, वेधशाळा, व इतर बऱ्याच इमारती आहेत. टॉमनॅह्यूरिक नांवाच्या टेंकडीवर एक सुंदर अशी स्मशानभूमी आहे. व्हिक्टोरिया पार्क, मॅगॉट ग्रीन, शारीरिक खेळ जेथें होतात ती जागा, हीं सर्व सार्वजनिक मैदानें आहेत. दारू काढणें, कातडीं कमावणें, साबण व मेणबत्त्या करणें हे मुख्य धंदे चालतात. जहाजें बांधण्याचा धंदा थोड्या प्रमाणावर चालतो. शहराच्या पश्चिमेस एक मैलावरून कॅलेडोनियन कालवा जातो. शहरावर मॅजिस्ट्रेटचा अधिकार चालतो. इनव्हर्नेस फॉरेस, फॉर्टरोज व नेर्न मिळून पार्लमेंटसाठीं एक सभासद निवडतात.

इनव्हर्नेस हें पिक्ट लोकांचें अत्यंत मजबूत ठिकाण होतें. ईशान्येस अर्ध्या मैलावर असलेल्या एका टेंकडीवर एक किल्ला असून त्यांत मॅकबेथनें डंकनचा खून केला. हा किल्ला मालकम कॅनमोर यानें जमीनदोस्त करून, दुसरा किल्ला बांधला. इ. स. १४२७ सालीं पहिल्या जेम्सनें येथील किल्ल्यांत पार्लमेंटची बैठक भरविली. इ. स. १७४६ त जॅकोबाईट लोकांनीं हा किल्ला सुरुंग लावून उडऊन दिला. [ ए.ब्रि. ]

**इनव्हररी.**—हें स्काटलंडमधील अर्गाइलशायर परगण्याचें मुख्य ठिकाण असून (सनदी) रॉयल म्युनिसिपल बरो (गांव) आहे. याची लोकसंख्या (१९०१) १६३९ आहे. ॲरे नदी फाईन सरोवरास जेथें मिळते याच ठिकाणीं झालेल्या उपसागराच्या दक्षिण किनाऱ्यावर हें शहर आहे. येथें पूर्वपश्चिम जाणारा रस्ता असून उपसागराकडे तोंड असलेली घरांची रांग आहे. 'हेरिंग' जातीचे मासे येथें धरतात व त्याबद्दल याची प्रसिद्धी आहे. पूर्वीं हें गांव उपसागराच्या उत्तर बाजूस होतें. सध्यांची जागा १८ व्या शतकाच्या मध्यांत निवडण्यांत आली. अर्गाइलच्या ड्यूकचा 'इनव्हेररी किल्ला' येथून एक मैलावर आहे. या घराण्यांतील पुरुषांनीं इनव्हेररी गांवाच्या सुधारणेसाठीं बरीच खटपट केली. [ ए. ब्रि. ]

**इन्सीन** (शहर).—हें शहर खालच्या ब्रह्मदेशांत हंथावडी जिल्ह्यांतील एक पोट विभागांत आहे. हें शहर रंगूनच्या वायव्येस १० मैलांवर आहे व बर्मा रेलवे कंपनीचें वर्कशाप असलेलें रेलवेचें मुख्य ठिकाण आहे. ह्या शहरीं सबंध प्रांतांतील मुख्य तुरुंग आहे व एक इंजीनीअरींग स्कूल व रिफॉर्मेटरी स्कूल आहे. ह्याच नांवाचा जो एक पोटविभाग आहे त्याची लोकसंख्या सन १९०१ सालीं १०३९८४ होती. ह्या पोटविभागाची जमीन समुद्राच्या पृष्ठभागाबरोबर असून सुपीक आहे. [ इं. गॅ. ]

**इब नदी**—ही नदी जशपूर संस्थानांत खुरिया पठारावर उगम पावून या संस्थानांत उत्तरेकडून दक्षिणेकडे वहात गेली आहे. नदीचा प्रवाह डोंगरावरून सखल प्रदेशांत वहात असल्यामुळें पुष्कळ ठिकाणीं धबधबे व भोंवरे आहेत; व कोठेंच नाव टाकतां येत नाहींत. सर्वांत सुंदर असा धबधबा बेनेघाग येथें आहे. सात्रा येथें मात्र कांहीं कोरलेल्या खोडांचीं होडगीं नदींत टाकितात. गांगपूरनजीक नदीकांठीं थोड्या प्रमाणावर सोनें सांपडतें. लोवाखेडा येथें नदीचा देखावा फार सुरेख आहे. [ छत्तिसगड गॅ ]

**इबादी पंथ**—इबादी हे एका मुसलमानी पंथाचे लोक आहेत. यांचा पंथ खवारिज पंथाची एक शाखा आहे. या पंथाला हें नांव ह्या पंथाचा संस्थापक अबदल्ला बिन इबाद याच्या नांवावरून पडलें.ताबरीच्या बखरींत या संस्थापकाची माहिती अशी दिली आहे कीं अझारिक पंथाचा संस्थापक नाफी बिन अल्ल–अझरक याच्यापासून हा फुटून निघाला आणि जुन्या परंपरेला सोडून वागणाऱ्या लोकांनां कसें वागवावें याबद्दल नाफीपेक्षां तो अधिक उदार धोरणाचा होता, परंतु शुफीय पंथाचा संस्थापक अबदल्ला बिन शफर याच्यापेक्षा त्याचें धोरण कमी सौम्य होतें. या माहिती खेरीज इबाद बद्दल अधिक माहिती बखरीमध्यें फारच थोडी आढळते इतकेंच नव्हे तर कित्येक ठिकाणीं याचा याच नांवाच्या इतर कित्येक व्यक्तींशीं घोंटाळा केलेला आढळतो. परंतु इबादीपंथाच्या ग्रंथामध्यें यानें उमइद खलीफ अबद अल्ल–मलिक याला लिहिलेलीं दोन पत्रें दिलीं आहेत आणि हा मुआविया (इ. ६६१–६८०) व अबद् अल्ल–मलिक (इ. ६८५—७०५) या दोन सुलतानांच्या कारकीर्दींत हयात होता असें सांगितलें आहे. हीं पत्रें खासगी स्वरूपाचीं आहेत, व त्यांमध्यें इब्नइबाद याच्या पंथाच्या विशिष्ट तत्त्वाबद्दल निश्चित अशी माहिती फारच थोडी आहे. शिवाय हीं पत्रें अस्सल आहेत असें मानण्यास फार थोडा आधार आहे. कारण अशा प्रकारचीं पत्रें बनावट तयार करण्याचा प्रकार बराच प्रचलित आहे, इब्नइबाद यानें काफीर या शब्दाचा एक निराळाच अर्थ केला. या शब्दाचा सामान्य अर्थ नास्तिक असा आहे. शिवाय कृतघ्न असाहि त्याचा अर्थ होऊं शकतो. परंतु काफीर म्हणजे फांशीची शिक्षा ज्याला आहे असा गुन्हा केलेला मुसुलमान असा अर्थ इब्नइबाद यानें ठरविला. व या व्याख्येनुसार असेंहि

ठरविलें कीं, वरील व्याख्येप्रमाणें जे मुसुलमान काफीर म्हणून ठरतील त्यांचा प्राण घेण्यास हरकत नाहीं. मात्र त्यांची मालमत्ता जप्त करण्यांत येऊं नये. हें जें एक या पंथाचें तत्त्व म्हणून ताबरीनें दिलें आहे तेंच पुढील लेखकांनीं इबादीपंथाचें मुख्य तत्त्व म्हणून सांगितलें आहे.

उमइद खलिफांच्या कारकीर्दीच्या अखेरीस इब्नइबादाच्या पंथाला बरेच अनुयायी मिळाले होते. कारण हिजरी सन १३० मध्यें झालेल्या बंडाचा पुढारी अबदल्ला बिन यह्या हा इबादी पंथाचा होता व त्याला मदत करण्याकरितां बसरा हाद्रमाऊत व येमेन या ठिकाणचे लोक पुढें आले होते. या बंडाची सविस्तर हकीकत अघानी नामक ग्रंथांत दिली आहे. ( पहिली आवृत्ति बुलाक १२८५, २०.९७–११४ ) या ग्रंथांतील सदहू बंडाची हकीकत देतांना बंडांतील पुढाऱ्यांच्या तोंडचीं म्हणून जीं कित्येक प्रवचनें दिलीं आहे. त्या प्रवचनांत या पंथाचीं तत्त्वें आलेलीं असून त्यांचा हा येथील उल्लेख सर्वांत अधिक विश्वसनीय होय असें मानण्यास हरकत नाहीं. या बंडांत इबादीच्या अनुयायांनीं मक्का व मदिना येथें कांहीं काल सत्ता स्थापिली परंतु लवकरच उमइदांच्या सैन्यानें त्यांचा पूर्ण पराभव केला. अब्बासी घराण्याच्या कारकीर्दीच्या आरंभीं आफ्रिकेमध्यें या पंथाचा विजय झाला व त्यांनीं इ. ७५८ मध्यें सिजिलमस हें शहर वसविलें आणि कैरावन येथें ७५८ पासून ७६२ पर्यंत सत्ता चालविली. पुढें इ. ९४२ व ९४७ या सालीं हा पंथ पुन्हां प्रबल झाला परंतु फातिमीडांनीं त्यांचा पराभव केला, तेव्हां या पंथाचे उरलेले अनुयायी जेबेलनेफ्युस येथें आश्रय करून राहिले व त्यांचे वंशज अद्यापहि तेथें नांदत आहेत. आफ्रिकेंतून या पंथाचे अनुयायी पुढें स्पेनकडे गेले. त्यांच्याबद्दल हिजरी पांचव्या शतकांतील लेखक इब्नहजम हा असें म्हणतो कीं, स्पेनमधले इबादीचे अनुयायी यहुदी किंवा ख्रिस्ती लोकांनीं मारलेल्या प्राण्याचें मांस खात नसत. अब्दल्ल काहिर याच्या ग्रंथांत असा उल्लेख आहे कीं या पंथांत चार पोटभेद होते. त्यांचीं नांवें हफिसय्या, हारीथीय्या, यझीदिय्या व केवळ ईश्वराकरतां केलेल्या नव्हे पण पवित्र अशा कृत्यावर विश्वास ठेवणारे अशीं दिलीं आहेत. या चार पोटपंथांच्या अनुयायांत बऱ्याच बाबतींत मतभेद होते परंतु काफीर या शब्दाचा वर दिलेला अर्थ सर्वांनां मान्य होता. ओमान येथें या पंथाचें प्रथमपासून वर्चस्व होतें व तेथील सरकार हल्लींहि या पंथाचें आहे. इब्नबतूता याला चौदाव्या शतकात या ठिकाणीं हे लोक आढळले होते. व त्यानें असें लिहून ठेविलें आहे कीं शुक्रवारीं दुपारी हे लोक चार उद्देशांनीं ईश्वराची प्रार्थना करीत असतात व खुत्बा प्रमाणेंहि कांहीं म्हणतात. जे. आर. वेल्स्टेड (अरबस्तानांतील प्रवास लंडन १८३८,१. ३१२)या युरोपियन लेखकानें सदहू पंथाच्या तत्त्वांविषयीं माहिती दिली आहे. परमेश्वराची भेट परलोकामध्यें होईल ( असें सुनी पंथाचे लोक मानतात.) ही गोष्ट इबादी पंथाच्या लोकांनां मान्य नाहीं. असें जें विधान वेल्स्टेडनें केलें आहे त्याला साचौच्या लेखानें पुष्टि मिळते.

जेबेल नेफयूस शिवाय इबादी पंथाचे अनुयायी हल्लींहि जेथें आढळतात तीं स्थळें म्हणजे जेर्बा बेट आणि अलजीरिया मधील सर्कल लघाऊट हीं होत. अलजीरियामधील इबादी पंथाचे लोक १८८४ सालीं ४९००० होते व त्यांची रहाणी विशेषतः संन्याशासारखी होती. ते फार प्रामाणिक नीतिमान आणि ईश्वरभक्तिपरायण आहेत असें एल. रिननें लिहून ठेविलें आहे (मारबाउट्स एट खाऊन अल्जीअर्स १८८४). इबादी पंथाचीं तत्त्वें आणि सुनी पंथाचीं तत्त्वें यांच्यांत फारसा फरक नाहीं. पूर्वकर्मवाद दोघांनाहि मान्य आहे. आणि पाश्चात्तापांतर शुद्धी हें तत्त्व फक्त अबुद्धिपुरस्कर केलेल्या पापांना लागू आहे असें हे मानतात. झांझीबारचे सुलतान या संप्रदायाचे आहेत.

१८८२ मध्यें माझब प्रांत फ्रेंचांनीं आपल्या राज्यास जोडला तेव्हां फ्रेंच पंडितांनीं या पंथाच्या कायदेकानूंचा अभ्यास केला व नंतर इ. झेस यानें एमझबाइट कायद्याचें पुस्तक तयार केलें. [ ए. रि. ए. ]

**इब्न गॅबिरोल.**—( सॉलोमन बेनजुडा ) हा यहुदी कवि व तत्त्वज्ञानी १०२१ च्या सुमारास मलग येथें जन्मला. लहान असतांनाच त्याचे आईबाप वारले. सॅम्युएल इ नगीद या विद्वानांच्या पोशिंद्यापाशीं तो राहिला. त्याच्या रागीट स्वभावामुळें सॅम्युएलचें व त्याचें भांडण होत असे. गॅबिरोल हा लहान वयांतच वारला असें सर्वांचें मत आहे.

त्याचा साहित्याभ्यास लहान असतांनाच सुरू झाला. सोळाव्या वर्षी त्यानें पद्यें रचिलीं. याच सुमारास व्याकरणावर अनक नांवाचें एक काव्य केलें. त्याच्या ४०० ओळींपैकीं साऱ्या ९७ आज उपलब्ध आहेत. हिब्रूमध्यें अरबी छंद योजण्याचा त्यानें परिपाठ घालून दिला. हल्लीं ज्यू लोकांनां तो कवि म्हणूनच कायतो माहीत आहे. १९ व्या शतकांतील फ्रान्स आणि इंग्लंडमधील अद्भुत रम्य वाङ्मयसंप्रदायाशीं त्याच्या वाङ्मयाची तुलना करितां येईल. वीणाकाव्यें आणि औपरोधिक काव्यांखेरीज सामाजिक प्रार्थना-गीतेंहि त्यानें रचिलीं आहेत. त्याच्या प्रार्थनागीतांतील अति विख्यात म्हणजे केथर, मलकूत ( प्रायश्चित्त दिनाकरितां ) आणि अझरोथ हीं होत.

ज्यू समाजाबाहेर तो तत्त्वज्ञानी अव्हिसब्रॉन म्हणून ओळखला जाई. त्याचीं विशेष तत्त्वें म्हटलीं म्हणजे ( १ ) भौतिक किंवा आध्यात्मिक सर्व श्रेष्ठ वस्तु, द्रव्य आणि रूप यांच्या बनविलेल्या असून द्रव्याचे निरनिराळे प्रकार केवळ विश्वद्रव्यांतील भेद होत. त्याचप्रमाणें सर्व रूपें एका विश्वरूपांत सांठविलीं आहेत. ( २ ) आधिक आणि बुद्धि यांच्यामध्यें दैवी इच्छा असून ती द्रव्य आणि रूप यांनीं अबाधित आहे. पण त्यांचा संयोग करणारी ती एक शक्ति आहे

अव्हिसब्रॉननें आपला तत्त्वज्ञानी पंथ स्वतंत्रपणें उभारला. त्याची मतें ज्यू संप्रदायाला मुळींच मान्य न होणारी अशीं होतीं. त्याचा दुसरा महत्त्वाचा ग्रंथ म्हणजे इसला अल अखलाग ( स्वभावसुधारणा ), मिबहार हपेनीनीम हा अरबी भाषतील सुभाषितांचा ग्रंथ त्याच्याच नांवावर मोडतो. [ ए. ब्रि. ]

**इब्नतुफैल.**—किंवा तोफैल ( अबुबकर महंमद इब्न अबदुल मलिक इब्न तुफैल उल क्वाझी ); मृत्यू ११८५. हा मुसुलमानी तत्त्ववेत्ता ग्रानाडाजवळील ग्वाडीक्स गांवीं जन्मला. तेथें त्याला वैद्यक आणि तत्त्वज्ञान यांचें शिक्षण मिळालें. तो आव्हेम पेसचा शिष्य होता असें म्हणतात. ग्रानाडाच्या सुभेदाराचा तो चिटणीस होता. पुढें मोहद खलीफ अबुयकूब युसफ याचा दिवाण व वैद्य झाला. मोरोक्को येथें त्याचा अंत झाला. [ ए. ब्रि. ]

**इब्नबतूता.**—( १३०४ ते १३७८ ) ह्याचें नांव अबु-अबदुल्ला महंमद असें असून आडनांव इब्नबतूता हें होतें. हा बडा मुसुलमान प्रवासी टांजियर येथें इ. स. १३०४ मध्यें जन्मला. १३२५ त यानें आपल्या प्रवासाला आरंभ करून १३५५ मध्यें तो पुरा केला. प्रथम भूमध्यसमुद्रकिनारा पालथा घालून तो आलेक्झांड्रिआ येथें गेला. वाटेंत त्याला दोन बायकांशीं लग्न करण्याला फुरसत मिळालीशीं दिसते. कायरो येथें कांहीं दिवस काढल्यावर व तांबड्या समुद्राच्या किनाऱ्यावर असलेल्या ऐधबपासून मक्केला जाण्याचा त्याचा प्रयत्न निष्फल झाल्यावर तो पॅलेस्टाईन, ॲलेप्पो आणि दमास्कस या ठिकाणीं गेला. नंतर तो मक्का व मदिना येथें यात्रेकरितां गेला. मशदअल्ली येथील अल्लीच्या कबरीचें दर्शन घेऊन पुढें तो बसऱ्यास गेला. तेथून खुझिस्तानचे पर्वत ओलांडून इस्पहानहून शिराजला आणि परत कुफा व बगदाद या गांवीं तो आला. मोसल आणि दिआर बेकर येथील प्रवास आटपून तो दुसऱ्यांदा मक्केला गेला. तेथें त्यानें तीन वर्षें काढलीं. पुढें तो तांबड्या समुद्रांतून त्या वेळच्या व्यापाराचें प्रसिद्ध ठिकाण जें एडन तेथें पोहोंचला. एडनचें महत्त्व व मोठाल्या कुंडांपासून त्याला मिळणारा पाणीपुरवठा बतुतानें वर्णन केला आहे. आफ्रिकेच्या किनाऱ्यानें पुढें जाऊन मोम्बासा, क्विलोआ आणि इतर पुष्कळ ठिकाणें त्यानें पाहिलीं. पुन्हां उत्तरेकडे वळून ओमानमधील मोठाल्या शहरांवरून तो नवीन ओर्मझला पोहोंचला. इराणी आखातांतील इतर भागांत जाऊन आल्यावर तो अरबस्तान ओलांडून तिसऱ्यांदा हाज करण्याकरितां मक्केला गेला. तांबडा समुद्र ओलांडून तो बरेच कष्ट सोसून सायनेला गेला. तेथून नाइल नदीच्या किनाऱ्यानें कायरोला पोहोंचला. पुढें सिरीयामधून प्रवास करून त्यानें आशियामायनरमधील बारीकसारीक संस्थानें पाहिलीं. नंतर तो काळ्या समुद्रांतून काफ्फा येथें गेला. त्या ठिकाणीं जिनोइ लोक राहात होते. बतूतानें पाहिलेलें हें पहिलेंच ख्रिस्ती-शहर असावें, कारण तो तेथील घंटानादानें बराच त्रस्त झाला. पुढें त्यानें किप्चाकचा प्रवास केला व तेथील खान महंमद उझबेग याच्या छावणींत राहिला. रशियन साम्राज्यांतील त्यानें पाहिलेल्या स्थळांपैकीं बोलघर ( ५४° ५४' उत्तर ) हें एक असून उन्हाळ्यांतील लहान रात्र पाहाण्याकरितां तो तेथें गेला होता. आणखी उत्तरेकडे जाऊन तिमिर-प्रदेश पाहाण्याची त्याची इच्छा होती पण त्याला आपला बेत बदलावा लागला. परत खानाच्या छावणींत येऊन तो एका ग्रीक राजकन्येबरोबर कॉन्स्टॅन्टिनोपल येथें गेला. तेथें त्यानें तिसरा अँड्रोनिकस ( १३२८–१३४१ ) बादशहा याची मुलाखत घेतली. व्होलगा नदीकांठीं सराई येथें पडलेल्या उझबेगच्या छावणींत पुन्हां परत येऊन ख्वारीझम आणि बोखारा पठारें त्यानें ओलांडलीं. तेथून खोरासान आणि काबूलमधून हिंदुकुश मार्गानें इ. स. १३३३ च्या सप्टेंबर महिन्यांत तो सिंधुनदीच्या काठीं आला. येथें त्याच्या इतिहासाचा पहिला खंड संपतो.

सिंध प्रांत समुद्रापर्यंत व तेथून वर पादाक्रांत केल्यावर तो मुलतानला निघाला व शेवटीं दिल्लीचा बादशहा महंमद तघलक यानें आमंत्रण दिल्यावरून त्या ठिकाणीं गेला. महंमदशाह फार चमत्कारिक स्वभावाचा व अती ढोंगी होता. त्यानें सार्वजनिक धर्मार्थ संस्था काढिल्या होत्या. पंडितांना तो चांगला आश्रय देई पण पितृहत्या, भ्रातृहत्या इत्यादि पापें त्याच्या हातून घडलीं होतीं. तो फार लहरी व रक्तपात पाहाण्यास उत्सुक असे. रोजच्या रोज राजद्वारीं कोणीतरी उत्कर्ष पावे तर कोणी मरणाच्या द्वारीं बसत. अशा तऱ्हेच्या बादशहानें आपल्या या प्रवाशाला दिल्लीचा काजी नेमलें व त्याला १२००० चांदीचे दिनार बक्षिस देऊन तितकेंच वेतन दरवर्षी करून दिलें. सुलतानाच्या नोकरींत बतूता आठ वर्षें राहिला, पण त्याच्या उधळ्या स्वभावामुळें त्याला वेतनाच्या चार पांच पट कर्ज झालें. शेवटीं बादशहाच्या मर्जीतून उतरून तो तेथून निघाला. त्यावेळीं मंगोल घराण्यांतील चीनच्या शेवटच्या बादशहानें दिल्लीस एक वकीलात पाठविली होती. ती वकीलात परत जाण्याच्या वेळीं हा मूर तीबरोबर जाणार होता ( १३४२ ). ही मंडळी मध्यहिंदुस्थानांतून खंबायतला गेली. तेथून जलमार्गानें कालिकतला पोहोंचली. बतूतानें कौलम ( क्विलामन ), ॲलेक्झांड्रिया, क्रिमियामधील सुडाक आणि चीनमधील झेटन यांच्या तोडीचें कालीकत बंदर असून तें जगांत एक अति मोठें व्यापारी ठिकाण आहे अशा तऱ्हेचें वर्णन केलें आहे. हें वकीलातमंडळ चिनी जहाजांतून व लहान लहान गलबतांतून प्रवास करणार होतें पण जें जहाज इतर वकीलमंडळी व नजराणे घेऊन जाणार होतें तें इब्नबतूता जाण्याची तयारी करण्याच्या पूर्वीच बंदरांतून निघालें व समुद्रांत पार फुटलें. बतूताचें सामान पुढें गेलें व तो मात्र कालीकत बंदरांतच

राहिला. पुन्हां परत दिल्लीला जाण्याचें धाडस त्याच्यानें करवेना म्हणून तो होनावर व पश्चिम किनाऱ्यावरील इतर शहरें हिंडला. त्या अवधींत तो मालदीव बेटाला जाऊन आला. त्या ठिकाणीं तो काजी बनला व चार बायका त्यानें करून घेतल्या. मालदीव बेटांची त्यानें उत्तम माहिती लिहून ठेविली. आगस्ट १३४४ त त्यानें मालदीव सोडलें व सिलोनला आला. त्या ठिकाणीं त्यानें आदामचें पाऊल ज्या ठिकाणीं उठलें आहे त्या आदाम शिखराची यात्रा केली. तेथून तो कॉरोमांडल किनाऱ्यावरील माबर गांवीं गेला. त्या ठिकाणीं त्याला मदुरेंत राहाणारा एक मुसुलमान धाडशी गृहस्थ भेटला,तो त्या प्रदेशाचा बहुतेक मालकच बनला होता पुन्हां एकदा मलबार किनारा आणि माळदीव बेटें या ठिकाणीं जाऊन, त्यानें ४३ दिवसांचा बंगालचा प्रवास केला. सद्‌कवन ( चितागांग ) येथें तो उतरला. बंगालमध्यें असतांना शेख जलालुद्दीनची त्यानें गांठ घेतली. जलालुद्दीन हा प्रख्यात मुसुलमान साधु असून सिलहट येथें अद्याप त्याची यात्रा भरते. डाका जवळच्या सोनारगांव येथें जाव्हाला जाणाऱ्या जहाजांत तो बसला. अराकानच्या किनाऱ्याला लागून त्याचें जहाज ४० दिवसांत सुमात्रा येथें पोहोंचलें. त्या बेटाच्या उत्तर किनाऱ्यावर नुकत्याच पसरलेल्या इस्लामी धर्माचा मलिक-अल-धाहीर म्हणून एक कट्टा अनुयायी तेथें होता. त्यानें चीनला जाणारें एक जहाज तयार करून ठेवलें होतें. त्यांत बसून बतूता निघाला. काम्बोजच्या मार्गानें जाऊन चीनमध्यें झेटन येथें बतूता उतरला. सीन् कलन ( कँटन ) खानसा ( हंगचौ ) आणि खानबलिक ( कँबेलक किंवा पेकिंग ) हीं शहरें त्यानें पाहिलीं. चीनमधील इतर ठिकाणाप्रमाणेंच मुसुलमान बंधुत्वाचें त्यानें वर्णन केलें आहे. मुसुलमानी वैद्य आफ्रिका आणि आशिया या ज्ञात खंडांत कोठेंहि आढळतो, हें त्या धर्मांतील बंधुत्वाचें लक्षण बतूता मोठ्या चटकदार भाषेंत पुढें मांडतो. घराकडे परत जातांना वाटेंत मोठा रुख पक्षी त्यानें पाहिला( ! ) पुन्हां सुमात्रा, मलबार, ओमान, इराण आणि बगदाद हीं ठिकाणें पाहून व वाळुकारण्य तुडवून पामिर आणि दमास्कस येथें तो गेला. त्या ठिकाणीं त्याला प्रथमच घरची बातमी समजली. १५ वर्षांपूर्वी आपला पिता मृत्यू पावल्याची दुःखद वार्ता त्यानें येथें श्रवण केली. हामाथ आणि अलेप्पो येथें जाऊन दमास्कसला परत आल्यावर त्या ठिकाणीं काळा आजार चालू असून रोज २००० वर माणसें मरत आहेत असें त्यानें पाहिलें. यरुशलेम आणि कायरो येथला पुन्हां प्रवास करून चौथ्यांदां त्यानें हाज केलें, आणि शेवटीं २४ वर्षांनीं, ८ नव्हेंबर १३४९ या दिवशीं फेज येथें पाऊल टाकलें, सर्व देशांत त्याला मोरोक्को फार बरा वाटला. टांजियर येथें घरीं जाऊन तो स्पेनमध्यें शिरला, व जिब्राल्टरवरून अँडाल्यूसियाला त्यानें प्रदक्षिणा घातली. १३५२ मध्यें पायावर चक्र पडलेल्या या माणसानें मध्य आफ्रिकेचा प्रवास केला. सहारा ओलांडून तो टिंबक्टू आणि गोगो येथें गेला. पण त्याच्या राजानें परत बोलावल्यावरून तो १३५४ त फेज येथें गेला. अशा रीतीनें २८ वर्षांचा व सरळ रस्ता धरून मोजल्यास ७५००० मैलांच्यावर होणारा प्रवास त्यानें पुरा केला. राजाज्ञेनें त्यानें आपल्या प्रवासाचा इतिहास महंमद इब्नजुझाई यास सांगितला. व त्यानें तो १३ डिसेंबर १३५५ त लिहून पुरा केला. इब्नबतूता १३७८ मध्यें ७३ वर्षांचा होऊन वारला. [ ए. ब्रि. ]

**इब्न हझम** ( ९९४–१०६४ ).—याचें सबंध नांव अबु महंमद अली इब्न अहंमद इब्न हझम हें होतें. हा मुसलमानी संत कॉर्डोव्हाच्या असमंतांत जन्म पावला. तो इतिहास, कायदा आणि धर्मशास्त्र यांचा अभ्यासक असून बापाच्या मागें वझिर पदावर आला पण नास्तिक वादाबद्दल त्याला पदच्युत करण्यांत आलें. आपलें बाकीचें आयुष्य यानें एकांतवासांत काढलें. कायद्याच्या बाबतींत तो प्रथम शफी संप्रदायाचा अनुयायी होता. पण पुढें त्यानें जाहिरी मतें अंगीकारलीं. कुराणांतील प्रत्येक वाक्य सामान्य व व्यापक अर्थानें घ्यावयाचें; तें ज्यावेळीं लिहिलें त्या काळांतील प्रसंगाशीं असलेला विशेष संदर्भ गाळून टाकावयाचा; कुराणांतील प्रत्येक शब्द अक्षरशः अर्थानें लिहावयाचा; पण तो अर्थ केवळ कुराणांत इतर ठिकाणीं केलेल्या त्याच्या उपयोगावरून ठरवावयाचा इत्यादि मतें हा प्रतिपादित असे. इब्न हझमशहाच्या शिकवणींतील विशेष प्रकार म्हटला म्हणजे, वरील तत्त्वांचा उपयोग केवळ कायद्याच्या अभ्यासाकडे न करितां सांप्रदायीक ईश्वरज्ञानाकडेहि त्यानें त्यांची योजना केली. यामुळें एकावेळीं मोटॅझिलाइट व दुसऱ्या वेळीं अॅशराइट यांच्याशीं त्याचें वांकडें आलें. तथापि संप्रदाय काढण्याच्या कामांत त्याला यश आलें नाहीं. त्याचा मुख्य ग्रंथ म्हटला म्हणजे किताब-उलमिलल्‌ वन-निहल ( पंथांचें पुस्तक ) होय. [ ए. ब्रि. ]

**इब्राहिम कुतुब्शहा.**—गोंवळकोंड्याचा एक बादशहा. पहिला कुली कुतुब्शहाचा मुलगा व जमशीदचा भाऊ. जमशीदच्या मृत्युनंतर त्याचे सरदार त्याच्या सात वर्षें वयाच्या मुलाला गादीवर बसवून राज्य हांकूं लागले; पण जेव्हां हा बाळ सुलतान राज्याला अयोग्य वाटला तेव्हां विजयनगराहून इब्राहिमला बोलावणें धाडून त्याला राज्याभिषेक केला ( १५५० ). इब्राहिमनें इतर मुसलमान राजांना बरोबर घेऊन विजयानगरच्या रामराजावर स्वारी १५६५ त केली. या लढाईत रामराजाचा पराभव होऊन तो मारला गेला. इ. स. १५७१ त इब्राहिमच्या रफतखान नांवाच्या वजीरानें हिंदूंचा राजमहेंद्रि किल्ला सर केला. ३२ वर्षें मोठ्या ऐश्वर्यांत घालवून इब्राहिम इ. स. १५८१ त वारला. त्याच्या मागून महमद कुतुबशहा गादीवर बसला (कुतुब्शाही, पहा) याच्या कारकीर्दीत मराठ्यांचा उत्कर्ष झाला. याचा

दिवाण जगदेवराव नांवाचा मराठा सरदार होता. तथापि यानें बरीच हिंदुराज्यें धुळीस मिळविलीं. इब्राहिम स्वतः चांगला विद्वान होता. राज्यांत त्यानें बंदोबस्तहि चांगला ठेविला. कलाकौशल्याचीं बांधकामेंहि करून घेतलीं. न्याय देण्याच्या बाबतींत फार दक्ष म्हणून या बादशहाची ख्याति आहे. [ मुसलमानी रियासत; मोडक-मु इतिहास; बील इत्यादि ]

**इब्राहिमखान गारदी.**—इब्राहिमखान हा आरंभीं बुशीच्या हिंदी शिपायांवरील एक अंमलदार होता. पुढें कांहीं कारणामुळें बुशीची त्याजवर इतराजी झाली; व म्हणून तो बुशीची चाकरी सोडून वऱ्हाडांत निजामअल्लीकडे गेला. इ. स. १७५८ च्या सुमारास बुशीनें लांच देऊन निजामअल्लीच्या ज्या सरदारांस आपणांकडे वळवून घेतलें, त्यांत इब्राहिमखानहि होता. [बसालतजंग पहा]. इ. स. १७५९ मध्यें निजामअल्लीनें वऱ्हाणपुरापासून खंडणी घेऊन, मिळालेल्या पैशांतून तो जेव्हां सैन्य जमा करूं लागला, तेव्हां इब्राहिमखान पुन्हां त्यास जाऊन मिळाला. परंतु पुढें लवकरच आपला भाऊ, सलाबतजंग याचें मन राखण्याकरितां निजामअल्लीनें इब्राहिमखानास आपल्या नोकरींतून काढलें. यानंतर इब्राहिमखानास सदाशिवरावभाऊनें आपल्या पदरीं ठेविलें इब्राहिमखानाजवळ जय्यत तोफखाना असून त्यानें आपल्या पायदळ सैनिकांस यूरोपियन शिपायांच्या धर्तीवर कवायतीचें शिक्षण दिलेलें होतें. हा उदगीरच्या लढाईंत सदाशिवरावभाऊबरोबर होता.

उदगीरच्या लढाईनंतर इब्राहिमखानाच्या पायदळांतील शिपायांची संख्या दुप्पट करण्यांत आली. इब्राहिमखानाच्या जय्यत तोफखान्याच्या व कवाईत शिकविलेल्या त्याच्या पायदळांतील १०,००० शिपायांच्या कार्यक्षमतेवर सदाशिवरावभाऊचा इतका दृढविश्वास होता कीं, यांच्या मदतीनें आपण अफगाण लोकांशीं समोरासमोर लढून त्यांचा सहज पराभव करूं शकूं असें त्यास वाटून, मल्हारराव होळकर व सुरजमल्लजाट यांच्या सल्ल्यास न जुमानतां तो आपलें पायदळ सैन्य घेऊन अबदालीशीं युद्ध करावयास आला. दिल्लीचा किल्ला सर करण्यांत व कुंजपुरा घेण्यांत इब्राहिमखानाच्या तोफखान्याची भाऊस फार मदत झाली परंतु पानिपत येथें अडकून पडल्यावर मात्र इब्राहिमखानाचें पायदळ व त्याचा अवजड तोफखाना यामुळें मराठ्यांस फार पेंच पडला. मल्हारराव होळकरानें गनीमीकाव्यानें लढण्याविषयीं यावेळीं जेव्हां सदाशिवराव भाऊस पुन्हां सूचना केली, तेव्हां इब्राहिमखानानें उघड बोलून दाखविलें कीं, अशा रीतीनें लढण्यास सुरवात करून जे मराठे सरदार मला येथें खाईंत टाकण्याचा प्रयत्न करतील त्यांच्यावरच प्रथम मी आपल्या तोफा चालवीन. ता. १४ जानेवारी सन १७६१ रोजीं पानिपतच्या रणभूमीवर मराठे व अफगाण यांच्यामध्यें जी अखेरची घनचक्कर लढाई झाली, तींत इब्राहिमखानानें सुमारें ८००० रोहिल्यास रणभूमीवर लोळऊन, आपल्या समोरच्या अफगाण सैन्याचा मोड केला होता. परंतु या युद्धांत अखेरीस मराठ्यांचा मोड झाल्यावर तो जखमी होऊन शत्रूच्या हातीं लागला व तेथें त्याचा शिरच्छेद करण्यांत आला. [ ग्रँटडफ. मराठी रियासत पानिपत प्रकरण ]

**इब्राहिम शाह.**— जौनपूरच्या शर्की घराण्यांतील सुलतान. हा इ. स. १४०२ मध्यें आपला बाप ( बीलच्या मतें भाऊ ) मुबारिक शहा याच्यामागून गादीवर आला. वाङ्मयाला त्यानें जें उत्तेजन दिलें त्यामुळें त्याचें नांव सर्वश्रुत होतें. त्या अंदाधुंदीच्या काळांतहि जौनपूर हें विद्येचें आगर म्हणून प्रसिद्ध होतें, असें त्यावेळीं इब्राहिमशहाला अर्पण केलेल्या अनेक ग्रंथावरून समजतें, असें फेरिस्ता म्हणतो. इब्राहिम इ. स. १४४० त वारला. तो फार लोकप्रिय असे. त्याच्या मागून त्याचा वडील मुलगा महमदशहा शर्की जौनपूरचा सुलतान झाला. [ बील. मावेल डफ. ]

**इब्रो नदी.**—आयबेरियन द्वीपकल्पांतील नद्यांतील सर्वांत मोठी नदी. ही कॅन्टाब्रियन पर्वतात उगम पाऊन भूमध्य समुद्रास जाऊन मिळते. इच्या उजवीकडे हिजर ही उपनदी येऊन मिळते.

इच्यावरचीं मुख्य शहरें लोग्रोनो, कॅलाहोरा, ट्युडेला, सॅरगोसा, व कारच हीं आहेत. या नदीची लांबी सुमारें ४६५ मैल आहे.

इच्या उजवीकडील उपनद्या जलॉन व मॅटरना. डावीकडील उपनद्या–येगा, ॲरगॉन, अरबा गॅलेगो व सिग्रे. ह्या नदीला व्यापारी दृष्टीनें आतां फारसें महत्त्व नाहीं. पांचव्या चार्लस बादशहानें ( १५००–१५५८ ) बांधलेला या नदीचा एक कालवा आहे. [ ए. ब्रि. ]

**इब्लिस**—किंवा एब्लिस. मुसुलमानी पुराणांतील सैतान. शैतान या नांवानें कुराणांत याचा बऱ्याच वेळां उल्लेख आलेला आहे. त्यांत इब्लिस हा शब्द ११ वेळां, व शैतान हा ८७ उताऱ्यांतून आढळतो. दुष्ट भुतांचा तो राजा असें त्या ठिकाणीं दाखविलें असून, मूळ ज्यु प्रकृतीवरून ही व्यक्ति बनविल्याचें उघड दिसतें. इब्लिसनें अल्लाविरुद्ध बंड केलें, म्हणून त्याला स्वर्गांतून हांकून देण्यांत आलें. आमची उपासना करण्याचें त्यानें नाकारलें म्हणून त्याला अशी शिक्षा देण्यांत आली अशी कुराणांत कथा आहे. त्याला प्रथम देहदंडाचीच शिक्षा देण्यांत आली होती; पण त्याच्या विनवणीवरून उत्थापनाच्या दिवसापर्यंत त्याला ईश्वरानें अवधि दिला. (कुराण ७, १३. )

**इमर्सन राल्फवाल्डो**—(१८०३–१८८२)हा अमेरिकन कवि व निबंधकार बोस्टन येथें ता. १५ मे सन १८०३ इ. रोजीं जन्मला. स्वावलंबन, स्वातंत्र्यप्रियता, कळकळ, नेमतपणा, ध्येयप्रीति, वगैरे त्याच्या वाडवडिलांच्या अंगच

सद्गुण इमर्सनमध्यें उतरले होते. त्याचीं मतें प्युरिटन पंथाचीं होतीं.

बाळपणीं मिस मेरी मूडी इमर्सन नांवाच्या त्याच्या आतेनें त्याच्या शिक्षणाची काळजी घेतली. विद्यार्थी दशेंतच त्यानें वाङ्मय व वक्तृत्व या बाबतींत नांव मिळविलें होतें. त्याच वेळेपासून त्याला कविता करण्याचा व वाचनाचा नाद लागला होता. शिक्षण संपल्यावर कांहीं दिवस त्यानें शिक्षकाचें काम केलें पण स्वातंत्र्य, कळकळ व सत्यप्रीति यांची त्याला दिवसेंदिवस अधिकाधिक जरूरी भासूं लागली व शेवटीं त्यानें हा उद्योग सोडून धार्मिक विषयांत आपलें मन घातलें व तो धर्मोपदेशक बनला. देवभोजन ( लॉर्डस सपर )हा कायमचा संस्कार व्हावा असा ख्रिस्ताचा हेतु नव्हता असें त्याचें मत होतें; पण हें मत कोणास मान्य न झाल्यामुळें त्यानें हा धंदा सोडून दिला. कोलरिजचें तत्वज्ञान, वर्डस्वर्थच्या कविता कार्लाइलचे निबंध यांचा इमर्सनवर बराच परिणाम झाला होता. इ. स. १८३२ सालीं तो ज्यावेळीं प्रवासास निघाला त्यावेळीं त्यानें इंग्लंडमध्यें जाऊन लँडार, कॉलेरीज, वर्डस्वर्थ व कार्लाइल या वाङ्मय सेवकांशीं परिचय करून घेतला. कार्लाइलबरोबर याचा बराच स्नेह झाला; त्यांना एकमेकांविषयीं अत्यंत आदर वाटत असे.

इ. स. १८३३ सालीं इंग्लंडमधून परत आल्यावर त्यानें कांहीं काल व्याख्यानें देऊन घालविला व शेवटीं प्रेमळ माणसांच्या सहवासांत कॉंकॉर्ड येथें आपलें आयुष्य घालविलें. ज्याला बौद्धिक काम करावयाचें असेल त्यानें शारीरिक श्रमाचीं कामें करूं नयेत असें त्याचें स्वानुभवावरून मत झालें होतें.

इमर्सन हा बौद्धिक स्वातंत्र्याचा अत्यंत चहाता होता. तत्कालीन तत्ववेत्ते इमर्सनकडे वारंवार येत व त्याला मान देत असत.

इमर्सनची वक्ता या नात्यानें अधिक कीर्ति झाली. 'मोठी माणसें' 'इंग्रजी वाङ्मय' व 'इतिहासाचें तत्वज्ञान' यांवर त्यानें दिलेलीं व्याख्यानें फारच लोकप्रिय झालीं.

इ. स. १८४७ सालीं तो इंग्लंडमध्यें पुन्हां गेला व तेथून परत आल्यावर त्यानें 'इंग्लिश ट्रेट्स' नांवाचें पुस्तक प्रसिद्ध केलें.

सामाजिक व राजकीय सुधारणेची त्याला फार आवश्यकता वाटत असे. त्याचीं मतें गुलामगिरीच्या विरुद्ध होतीं. त्यानें व्याख्यानांत प्रतिपादिलेलीं मतें व व्याख्यानांतीलच विचारसरणी त्याच्या निबंधांतून दृष्टीस पडते. त्याला कवितांची व गूढ तत्वज्ञानाची फार आवड होती. तो कादंबऱ्या क्वचितच वाचीत असे.

इमर्सन हा कोणाचा अनुयायी नसून त्यानें प्रत्येकापासून प्राह्यांश तेवढा उचलला होता. त्याच्या अंगीं असलेल्या परमध्येयाकांक्षेला सत्याविष्करणाचें स्वरूप आलें होतें. त्याची लेखनशैली जोरदार भेदक व सूत्रवत आहे. त्याच्या ग्रंथांतून आशावादित्व दिसून येतें. त्याची कविता त्याच्या गद्याइतकी सरस नाहीं. इ स. १८६६ सालीं हारवर्ड कॉलेजनें त्याला डॉक्टरची पदवी दिली

इमर्सन ता. २७ एप्रिल १८८२ इ. रोजीं मरण पावला. 'एसेज' 'रिप्रेझेंटेटिव्ह मेन' 'दि कॉंडक्ट ऑफ लाईफ, वगैरे त्याचीं मुख्य पुस्तकें आहेत.

[ संदर्भग्रंथ.—जार्ज विलिस कूक–राल्फ वाल्डो इमर्सन, हिज् लाइफ, रायटिंग्ज अँड फिलॉसफी ( बोस्टन १८८१) अलेक्झांडर आयर्लंड–राल्फ वाल्डो इमर्सनः हिज् लाइफ जीनिअस अँड रायटिंग्ज (लंडन १८८२); ए, ब्रॉन्सन अल्कॉट–राल्फ वाल्डो इमर्सन, फिलासफर अँड सीअर ( बोस्टन १८८२ ); भॉंकुअर डॅनिअल कान्वे–इमर्सन, अॅट होम अँड अॅब्रॉड ( बोस्टन १८८२ ); जोएल बेंटन–इमर्सन अॅज ए पोएट ( न्यूयार्क १८८३ ); एफ 'बी' सॅनबोर्न ( एडिटर )—दि जीनिअस अँड कॅरॅक्टर ऑफ इमर्सनः लेक्चर्स अॅट दि कॉंकॉर्ड स्कूल ऑफ फिलॉसफी ( बोस्टन १८८५ ); आलिव्हर वेंडेल होल्मस—राल्फ वाल्डो इमर्सन ( "अमेरिकन मेन ऑफ लेटर्स सीरिज" ) बोस्टन १८८५; जेम्स इलियट केवट—ए मेमॉयर आफ राल्फ वाल्डो इमर्सन. मॅथ्यू आर्नोल्ड ( डिस्कोर्सेस इन अमेरिका ) आणि जॉन मोर्ले ( क्रिटिकल मिसेलनीज ) यांनीं इमर्सनवर उत्तम भाष्य केलें आहे, कूक—बिब्लिऑग्रफी ऑफ राल्फ वाल्डो इमर्सन ( बोस्टन १९०८ ). ]

**इमादशाही**.( इ. स. १४८४–१५७२ )—वऱ्हाडांत एलिचपुर येथें अर्वाचीन काळांत जें एकच स्वतंत्र राज्य होऊन गेलें तें होय. या घराण्याच्या कारकीर्दींत वऱ्हाडाला बरेंच महत्त्व आलें व त्याचा विस्तारहि बराच झाला. या घराण्याचा संस्थापक फत्तेउल्ला होय.

फ त्ते उ ल्ला इ मा द श हा ( १४८४ ).—हा मूळचा तैलंगी ब्राह्मण. ह्याचा बाप विजयनगरांत रहात असे. विजयनगरच्या राजाबरोबर चाललेल्या लढाईंत कैद होऊन तो मुसुलमानांच्या हातीं लागला. आणि त्यास मुसुलमानी धर्माची दीक्षा मिळाली. तेव्हांपासून तो बहामनी राज्यांतील महमद गवानच्या मेहेरबानीनें हळूहळू योग्यतेस चढला. पुढें त्यास इमाद-उल्मुल्क हा किताब व वऱ्हाडची सुभेदारी मिळाली. सन १४८४ त इमादशहा असें नांव धारण करून तो आपल्या सुभ्याचा कारभार स्वतंत्रपणें करूं लागला. पुढें तो त्याच वर्षी मरण पावला.

अ ला उ द्दी न इ मा द श हा ( १४८४–१५२७ ).—ह्यानें गाविलगड ही आपली राजधानी केली, हा किल्ला बिकट ठिकाणीं बांधिलेला असून मजबूत आहे. तेथें त्यावेळची एक मशीद अद्यापि हयात आहे. महंमदशहा बहामनी बेदरहून पळाला, तो कांहीं दिवस अलाउद्दीनकडे येऊन राहिला होता. पण कांहीं दिवसांनीं तो पुनः वजीर

अमीर बेरीद याजकडे गेला. कित्येक कारणांवरून अहंमद नगरच्या निजामशाहाशीं अलाउद्दीनचें वैर जडलें आणि त्याशीं युद्ध करण्याकरितां खानदेश, व गुजराथ येथील राजांची त्यास मदत घ्यावी लागली. त्यासाठीं गुजराथच्या राजास त्यानें आपला बराच मुलूख दिला. सन १५२७ त अलाउद्दीन मरण पावला. आणि त्याचा ज्येष्ठ पुत्र दर्या इमादशहा तख्तावर बसला.

शे व ट चे बा द श हा—दर्या इमादशहानें निजामशहाच्या घराण्याशीं सोयरीक केली. त्याच्या अंमलांत दंगेधोपे न होतां राज्यांत शांतता होती. त्याचा मुलगा बुन्हाण इमादशहा लहान असतांच गादीवर आला. त्याच्या अल्प वयांत तोफलखान नामक एका धाडशी व धूर्त सरदारानें सर्व अधिकार बळकाविला. सन १५७२ ह्या वर्षी तोफलखानावर मूर्तुझा निजामशहानें स्वारी केली. तोफलखान नरनाळा किल्ल्यांत जाऊन राहिला. मूर्तुझा निजामशहा व त्याचा दिवाण जंगीजखान यांनीं तोफलखान व इमादशहाचा वंशज ह्यांस जिंकून ठार मारिलें, आणि वन्हाडचें राज्य अहंमदनगरच्या निजामशाहीस जोडिलें (निजामशाही पहा). याप्रमाणें इमाद शाहीचा शेवट झाला.

इमादशाहींत कलाकौशल्यास चांगलें उत्तेजन मिळालें. एलिचपूरच्या आसपास हल्लीं जे रेशमी व सुती कापडाचे कारखाने आहेत ते त्यावेळेपासूनचे होत. लहानमोठे किल्लेहि तेव्हांच बांधले गेले. [ काळे—वन्हाडचा इतिहास. मुसुलमानी रियासत. मोडक—दक्षिणेंतील मुसुलमानी राज्याचा इतिहास. इ ]

**इमामः**—हा अरबी शब्द असून याचा अर्थ ज्याचें चांगलें वाईट अनुकरण करावयाचें तो पुढारी, नेता, असा आहे. हा शब्द कुराणाला, गवंड्याच्या पाणसळाला आणि ओळंब्याला, तसेंच रस्त्याला, विद्यार्थ्यांच्या रोजच्या कामाला व लेखी माहितीला लावतात. कुराणांत अशा अनेक अर्थानें हा शब्द आलेला आहे. पण विशेषतः एखाद्या पुढाऱ्याला आणि अब्राहामला ( २. ११८ ) लाविला आहे. अशा रीतीनें मुसुलमान पुढाऱ्याला इमाम असें नांव पडलें. त्याचा अधिकार महंमदाप्रमाणें फार मोठा असतो. त्याचें कर्तव्य म्हणजे पैगंबराचा खलिफ किंवा नायब म्हणून राहाणें; राजशासन आणि धर्मसंरक्षण करणें हें होय. त्याच्या अधिकाराच्या बुडाशीं आणि उगमाभोंवती सर्व मुसुलमानी राज्याच्या भानगडी वास करीत आहेत. सुनी पंथाचे लोक असें प्रतिपादितात कीं माणसांनां इमाम नेमण्याचा अधिकार असून मुसुलमानांच्या सामान्य चालीरीतींनां संमति व मान देणें हें त्याचें काम आहे; इमामांची जरूरी नेहमीं कबूल केली जात व नेहमीं इमाम निवडण्यांत येतो; म्हणून व्यावहारिक दृष्ट्या इमामांचें अस्तित्व करारावर अवलंबून असून कुराणावर किंवा महंमदापासूनच्या परंपरेवर उभारलेलें नाहीं. शियापंथी लोक असें मानितात कीं "इमामाची नेमणूक पैगंबरामार्फत ईश्वर करितो, व आतांपर्यंत त्यानेंच नेमणुका केल्या आहेत; अलीच्या वंशजांनांच फक्त ही पदवी आहे; खारीजी, इमामाची मुळींच अवश्यकता नाहीं, तो असला तर बरा तेव्हां त्याचा अधिकार अबाधित नसून मानण्यावर अवलंबून आहे असें प्रतिपादितात. मोटझीलाइट, इमामाची नेमणूक करार म्हणून झालेली नसून प्रयोजनामुळें झालेली आहे" असें मानतात. सुनी आणि शिया यांच्यामधील दुसरा भेद असा कीं इमाम हा दोषाधीन असून जोंपर्यंत तो इस्लामी धर्माचे नियम पाळतो तोंपर्यंत तो स्वतः पाप करीत असला तरी त्याची आज्ञा पाळावी. पुढारी कार्यदक्ष मात्र पाहिजे अशा तऱ्हेचा सुनींचा कटाक्ष आहे. पण शियांचें असें म्हणणें आहे कीं, ईश्वरानें नेमलेला इमाम ईश्वरी वंशाचा असून तो दोषबाह्य असतो. आतांपर्यंत वर्णन केलेला बडा इमाम होय. धाकटा इमाम शुक्रवारच्या प्रार्थना संप्रदायांतील पुढारी असतो. प्रथम शुक्रवारची प्रार्थना बड्या इमामाच्या देखरेखीखालीं होत असे. त्यावेळीं तो उपदेश ( खुतबा ) करीत असे. पण मुसलमानी साम्राज्याचा विकास होऊन व खलिफा सामान्य लोकांत मिसळेनासा झाल्यापासून हा अधिकार एका दुय्यमाला देण्यांत आला. तुर्कस्तानांत हे छोटे इमाम आपल्या हद्दींतील अधिकारी असून परवाना देणें, सुन्ता, लग्न आणि और्ध्वदेहिक संस्कार करणें यासारखीं कामें त्यांच्याकडे असतात. इराणमध्यें शिया लोकांतील इमाम जास्त शुद्ध व अध्यात्मी असून सरकारच्या सत्तेखालीं ते येत नाहींत. त्यांच्या कांहीं पुढाऱ्यांनां मुज्तहीद म्हणतात. मुज्तहीद म्हणजे धार्मिक प्रश्नावर स्वतंत्र मत देण्यालायक असणारे इमाम. इमाम या शब्दाचा उपयोग बहुमानार्थक पदवी म्हणूनहि करतात.

अलीच्या कुळांतील बारा शिया इमामांचीं नांवेंः—इमाम अली, महंमद पैगंबराचा जांवई. हसन हुसेन, झैन—उल अबिदीन, बाकीर किंवा महंमद बाकीर, जाफर सादिक. मूसी काझिम, अली मूसी राझा, टाकी किंवा महंमद टाकी. अली नकी, हसन अस्करी, महादी [ बील. ए.ब्रि. ]

**इरकद**—मद्रास. सालेम जिल्हा व तालुक्यांतील सिवराय टेंकडीवरील थंड हवेचें ठिकाण. हें समुद्रसपाटीपासून ४८२० फूट उंच असून लोकसंख्या १९०१ सालीं ७७८७ होती. उन्हाळ्यांत हें स्थान फार बहारीचें असल्यामुळें पुष्कळ लोक येथें हवा खाण्यास येतात. येथील स्वाभाविक देखावा इतका सुंदर व मनोहर आहे कीं, तसा उटकमंड अथवा कोडैकनाल या ठिकाणीं नाहीं. या ठिकाणीं पारा ७५ अंशांवर कधींहि चढत नसून ६० अंशांहून खालीं कधीं उतरत नाहीं. सभोंवार कॉफीचे मळे आहेत. हें सालेम रेल्वे स्टेशनपासुन २० मैल असून तेथें जाण्याचीं साधनें विपुल आहेत. [ इं. गॅ. ]

**इरलिग**—हे लोक बहुतेक म्हैसूर संस्थानांत बंगलोर जिल्ह्यांत आढळतात. या लोकांचा मुख्य धंदा शेती व मजुरीचा आहे. हे लोक विशेषतः जंगलांत मजुरी करतात. यांची भाषा तामिळ असून तींत कानडी व तेलगु शब्द मिसळले आहेत. हे लोक डोंगरी मुलुखांत मुख्यतः आढळतात. ते आपला निर्वाह कंदमुळें, वनस्पती, फळें यांवर करतात. ते मूळचे अनामलाई जंगलांतले रहिवासी आहेत असें म्हणतात. १९११ सालीं यांची संख्या दोन हजार होती [सेन्सस रिपोर्ट म्हैसूर १९०१ व १९११.]

**इराक**—इराणांतील एक प्रांत. हा कुम आणि कशनच्या पश्चिमेस व बुरुजिर्दच्या पूर्वेस आहे. उत्पन्न दरसाल सुमारें १६००० पौंड आहे. या प्रांतांत अनेक संपन्न गांवें आहेत; त्यांतून धान्य वगैरे होतें; पण या प्रांतांची प्रसिद्धी त्यांत होणाऱ्या गालिचांवर अवलंबून आहे. येथील गालिचे बहुधा सर्व यूरोपला पाठविण्यांत येतात व त्यांची किंमत दरसाल सुमारें १००,००० पौंड होते. याची राजधानी जी सुलतानाबाद त्या ठिकाणीं या गालिचांचा व्यापार करणारी एक मोठी ब्रिटिश कंपनी आहे. सुलतानाबाद कुमच्या नैर्ऋत्येला ७७ मैलांवर वसलेलें आहे. तेथील लोकसंख्या ८००० वर असून पोष्ट आणि तारऑफिसहि आहे. हें शहर १८०८ मध्यें वसलें गेलें व यामुळें त्याला अद्याप कधीं कधीं "शहर–इ–नो" ( नवें शहर ) असें म्हणण्यांत येतें.

**इराक**—( मेसापोटेमिया ) आशियाखंड, अरबस्तान, गेल्या महायुद्धापर्यंत इराकला स्वतंत्र अस्तित्व नव्हतें. तेव्हां त्यासंबंधीं माहिती 'मेसापोटेमिया' या लेखांत अंतर्भूत झालेली सांपडेल. इ. स. १९२१ च्या पुढील माहिती येथें दिली आहे.

हेजाझच्या हुसेन राजाचा धाकटा मुलगा अमीर फैजूल हा सन १९२१ च्या आगस्टमध्यें पहिला फैजूल म्हणून इराकच्या गादीवर आला. इराकचें राज्य इंग्लिशांच्या तंत्रानें चालवयाचें होतें व फैजूल ब्रिटिशांशीं स्नेहभावानें वागे म्हणूनच बसरा येथून तो निवडला गेला; यावरून बऱ्याचशा अरबांचा ब्रिटिश राज्याबद्दल विश्वास वाटत असलेला दिसून येतो. लीग ऑफ नेशनच्या धोरणास अनुसरून सौम्यपणानें व नेकीनें राज्य चालविण्याच्या गुणामुळें तो तुर्कस्तानचें उत्तरेतील वजन, खुर्द प्रांतांतली अस्वस्थता, इराणांतील बोल्शेविकांचें वस्तान, व बाकीच्या अरब राजांची स्पर्धा इतक्या अडचणींतून देशाचें संरक्षण करूं शकला. १९२१ च्या आक्टोबरांत प्रोव्हिजनल कौन्सिल ऑफ स्टेट बसविण्यांत आलें. सैन्यांतील माणसांची संख्या कमी करून त्यांचें बल विमानें ठेवून वाढविण्याचें धोरण यावेळीं ब्रिटिश सरकारनें स्वीकारलें होतें ( अरबांशीं वागतांना ब्रिटिश सरकार ठेवीत असलेलें धोरण 'अरबस्तान' लेखांत सांपडेल. )

इराक येथून ब्रिटनला १९२१—२२ मधील जकाती व व राज्यकारभार याचा वार्षिक वसूल एकंदर १६२२००० पौंड मिळाला. १९२२ च्या मार्च मध्यें मि. चर्चिल यांनीं इराक येथें ब्रिटिशसत्ता स्थापन करण्यास आलेल्या खर्चाचा अंदाज ३५०००००० पौंड केला. यापैकी चारपंचमांश निवळ लढाईचा खर्च होता.

सन १९२२ च्या एप्रिल मध्यें आखवानी नांवाचे धार्मिक आचारांत प्युरिटनच्याहि पुढें गेलेले, स्वतःस खऱ्या व साध्या राहणीचे प्रवर्तक म्हणवून घेणारे परंतु धर्मवेडे व जबरदस्तीनें दुसऱ्यांना बाटविणारे मुसुलमान हे इराक येथील लोकांवर—त्यांनीं इब्न सय्यद ( नेज्दचा राजा ) यास खंडणी द्यावी म्हणून—छापे घालूं लागले. इब्न सय्यद हा युफ्रेटीस नदीच्या उजव्या तीरावरील प्रदेशाचा स्वतःस मालक समजत असे. आखवान चळवळ इराकच्या शेजारच्या इब्नसय्यद मुलखाच्या उत्तरभागांत उत्पन्न झाली व तिचा त्यानें राजकीय कार्याकडे उपयोग करून घेतला. उलट आखवान संप्रदायी अनुयायी मिळविण्यांत त्याच्या इराकवरील मालकीचा उपयोग करून घेऊं लागले. या आततायी लोकांचा प्रतिकार करण्याच्या प्रश्नावर मतभेद होऊन इराकच्या कॅबिनेटमधील पांच दिवाणांनीं राजीनामे दिले. तथापि इब्नसय्यदनें इराकचा हाय कमीशनर सर पर्सी कॉक्स याजपाशीं खेद प्रदर्शित करून या धर्मवेड्यांच्या चळवळी थांबविल्या. अनेक प्रमुख शेख ब्रिटिशांचा जरूर तेवढा ताबा कायम रहावा, कार्यक्षम अरबांच्या नेमणुका व्हाव्या, व धार्मिक पुढाऱ्यांची राजकीय गोष्टींतील ढवळाढवळ थांबवावी अशा मताचे होते. शियापंथाच्या लोकांनीं केलेल्या कारस्थानांमुळें अडचणी उत्पन्न होऊन त्यांचा परिणाम म्हणजे १९२२ च्या आगस्टमध्यें मुख्य प्रधान नाकीब व इतर सहा प्रधान यांनीं राजीनामे दिले. सर पर्सी कॉक्स यानें आगस्टच्या अखेरीस नॅशनॅलिस्ट पक्षाच्या कांहीं लोकांना पकडलें व बगदादच्या दोन वर्तमानपत्रांच्या संपादकांना दूर करून तीं पत्रें बंद करून टाकलीं. जातीचे पुढारी व बसऱ्याचा व्यापारीवर्ग मॅंडेटला अनुकूल, तर इकडे बगदादचे बडे लोक व अधिकारीवर्ग प्रतिकूल होता. हिला पक्षाकडून राजकीय बाबींत त्रास पोहोचूं लागला. सर पर्सी कॉक्स यानें शांतता स्थापण्यासाठीं मोठे परिणामकारी उपाय योजिले. राष्ट्रीय पक्षाची अनेक मुत्सद्दीमंडळी जंगलांत चालती झाली.

१९२२ सालच्या आक्टोबरांत वीस वर्षे टिकणारा आंग्लो–इराक तह बगदाद येथें झाला; त्याच्या अटी पुढीलप्रमाणें.—( १ )इराकच्या खऱ्या अधिपतीला ब्रिटननें जरूर तो सल्ला व सहाय्य खुल्या मनानें द्यावें, ( २ ) इराकच्या व्यतिरिक्त कोणत्याहि राष्ट्रांतील इसमाची ब्रिटनच्या संमतीखेरीज अधिकाराच्या जागीं नेमणूक करण्यांत येऊं नये; ( ३ ) ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या नेमणुकीच्या अटी व संख्या निश्चित

ठरविण्यांत यावी; ( ४ ) धार्मिक लोकांमध्यें फक्त नीति व सुव्यवस्था यांचा प्रचार करणारा धार्मिक कायदा इतर धार्मिक पंथांचें संरक्षण होण्या करितां तयार करण्यांत यावा; ( ५ ) ब्रिटनच्या सांपत्तिक व सार्वराष्ट्रीय महत्त्वाच्या बाबींशीं संबंध येणाऱ्या प्रश्नांवर इराकचा राजा ब्रिटनच्या सल्लया-प्रमाणें चालण्याचें कबूल करीत आहे; ( ६ ) इराक मधून जाणें येणें अनियंत्रित रहावें; ( ७ ) व सर्व वादाचे प्रश्न ' लीग ऑफ नेशनस्' पुढें मांडण्यांत यावे.

लो को प यो गी का में.—इराकची असमाधानकारक सांपत्तिक परिस्थिति सुधारणें शक्य आहे असें दिसल्यावरून कालवे, आगगाड्या व तेलाची पैदास यांची जुळणी करण्याचें ठरविण्यांत आलें. निर्गत मालापेक्षां आयात व्यापार बराच अधिक असतो. कालव्यांची सोय, बियाण्याची योग्य निवड व पिकाच्या वाढीचे उपाय यांच्याकडे लक्ष पुरविल्यास इराक शेतकीच्या बाबतींत पहिल्या दर्जाचा देश होण्यासारखा आहे. पाटबंधाऱ्यांची व्यवस्था केली तर उत्कृष्ट इजिप्शियन कापसाच्या तोडीचा विपुल कापूस इराकमध्यें होऊं लागेल. म्हणून १९२२-२३ मध्यें विस्तृत प्रमाणावर मोजणी होऊन कांहीं कालवे वाढविण्यांत व कांहीं दुरुस्त करण्यांत आले. पोस्ट व तारखात्यांत पुष्कळ इराकींचा भरणा करण्यांत आला असून आगस्ट १९२१ पासून बगदाद व केरो यांच्या दरम्यान पंधरव-ड्याची वैमानिक टपालाची सोय करण्यांत आली आहे, व तिचा चांगला उपयोगहि करून घेण्यांत येत आहे. बस-ऱ्याचें बिनतारीचें स्टेशन १९२२ च्या जूनमध्यें पूर्ण झालें असून इराकचें हिंदुस्थान, केरो व कान्स्टाटिनोपल यांच्याशीं प्रत्यक्ष दळणवळण होऊं लागलें आहे. १९२०च्या एप्रिलमध्यें ब्रिटिश सरकारच्या ताब्यांत रेल्वे देण्यांत आल्या होत्या, त्या इराक सरकारनें जुलै १९२३ मध्यें आपल्या ताब्यांत घेतल्या. रेल्वेवरील परदेशी नोकरांची संख्या १७००० होती. ती उतरवीत १७०० च्या खालीं आणली असून इराकी नोकरांची संख्या सध्या५०००झाली आहे.रेल्वेचे रस्ते वाढवितांना जरी तेथील लोकांनीं प्रथम विरोध केला होता तरी आतां त्यांनां दळणवळण वाढल्यामुळें धान्य वगैरे खप-ण्याची चांगली सोय झालेली पाहून रेल्वेचें महत्त्व पटूं लागलें आहे. १९२१ मध्यें पुरामुळें रेल्वे रस्त्यांचें फार नुकसान होऊन बगदाद-बसरा रेल्वे कित्येक मैल वाहून गेली.

ब्रि टि शां चें धो र ण.—१९२२ च्या डिसेंबरमध्यें लार्ड कर्झन यांनीं, तुर्कांच्या ताब्यांतून अरबांनां पूर्ण स्वातंत्र्य मिळवून देण्याची ब्रिटनची इच्छा जाहीर केली. इराकमध्यें खर्च करण्यास ब्रिटिशांकडून कर वसूल करणें पार्लमेंटला योग्य वाटलें नाहीं. म्हणून इराकमधून ब्रिटननें आपलें अंग का व केव्हां काढून घ्यावें याची चर्चा झाली. इराकमधील रेल्वेची किंमतच ३५ लक्ष असून ती इराक सवडीप्रमाणें फेडणार यांत शंका नाहीं. ब्रिटननें इराकवर संरक्षणासाठीं केलेला खर्च ६३ लक्ष ८० हजार पौंड, तसेंच हाय कमीशनरचा पगार व खर्च यांकरितां ३० हजार पौंड, सैन्याच्या कामीं ५८० हजार पौंड याप्रमाणें १९२३ च्या एप्रिलमध्यें खर्च दाखविण्यांत आला होता. सामान्य धोरण असें ठरविण्यांत आलें कीं, तुर्कस्तानाबरोबर इराकचा समा-धानकारक संधि होतांच इराकला ब्रिटिशांच्या मदतीची अपेक्षा राहणार नाहीं. परंतु तोंपर्यंत इराकमधून सर्वस्वी अंग काढून घेणें ब्रिटिश साम्राज्यास धोक्याचें आहे. इ.स.१९२३ च्या मेमध्यें सर पर्सी कॉक्स याच्याजागीं सर हेनरी डॉब्ज हाय कमिशनर झाला. इराकची शीघ्र प्रगति पाहून१९२२च्या मेमध्यें तहाची मुदत पांच वर्षांपर्यंत खालीं आणून मँडेटचें बंधन दूर करण्याचें ठरलें व त्याप्रमाणें कच्च्या मसुद्यावर सही करण्यांत आली.[ डब्ल्यु आइन्सवर्थ-रीसर्चेस इन असीरिया ( लंडन १८३८ ) चेस्नी-एक्सपीडिशन फॉर दि सर्व्हे ऑफ दि रिव्हर्स युफ्राटीस ॲन्ड टैग्रीस ( २ भाग १८५० ); लॉफ्टस-खाल्डिया ॲन्ड सुसियाना ( १८५७ )]

**इराण**—हें पश्चिम आशिया खंडांतील एक राज्य आहे. याच्या उत्तरेस कास्पियन समुद्र, रशियन ट्रॅन्सकॉकेशिया व ट्रॅन्सकास्पियन राज्य, पूर्वेस अफगाणिस्तान व बलुचिस्तान, दक्षिणेस अरबी समुद्र व इराणी आखात आणि पश्चिमेस तुर्कस्तानचा प्रदेश आहे.

प श्चि म स र ह द्द.—आरास नदीवरील एका बिंदूपासून नैर्ऋत्य दिशेनें आराराट पर्वतापर्यंत जाणारी२० मैल लांबीची एक रेषा रशियापासून इराणला अलग करते. आरारट पर्वतापासून दक्षिणेस इराणी आखातांतील शाट-एल-अरब नदीच्या मुखापर्यंत सुमारें ७०० मैलपर्यंत इराणी-तुर्की सर-हद्द पसरलेली आहे; परंतु ही निश्चित केलेली नाहीं.

उ त्त र स र ह द्द.—ही सरहद्द आरास नदीवरील बिंदू-पासून टेजेन नदीवरील सेरॅखपर्यंत पसरली आहे.

पू र्व स र ह द्द.—पूर्व सरहद्द सेरॅखपासून अरबी समुद्रा-वरील ग्वेट्टेरपर्यंत सुमारें ८० मैलपर्यंत पसरलेली आहे.

द क्षि ण स र ह द्द.—ही सरहद्द म्हणजे इराणी आखात व अरबी समुद्र यांचा ग्वेट्टेरपासून शॅट-एल-अरब नदीच्या मुखापर्यंतचा सुमारें ८८० मैल लांबीचा समुद्रकिनारा होय. इराणी आखाताच्या उत्तर किनाऱ्याजवळचीं होर्मोझ(ऑर्मझ) लाराक, किश्म, हेंगम, फुरर, किश ( कैस ), दराबि, शेखशु ऐब, जेब्रिन, खरक, खाराकु (खोर्गु) हीं बेटें इराणी राज्यांत मोडतात. या सरहद्दी वरचेवर अनेक कमिशनें नेमून अखे-रीस निश्चित झाल्या आहेत.

नै स र्गि क व र्ण न.—इराण हा देश नैसर्गिक दृष्ट्या एक पठार आहे व अर्वाचीन इराण या पठाराचा पश्चिमार्ध व्यापतें. समुद्रकिनाऱ्याजवळचा प्रदेश मात्र सखल आहे. मोठ्या पर्वतश्रेणींना इराणी नांवें नाहींत. पश्चिमे-कडील अझरबैजनपासून पूर्वेस खोरासानपर्यंत ५०० मैल

पसरलेल्या पर्वताच्या ओळीला असलेलें एल्बूर्झ पर्वत हें नांव, इराणी लोक या पर्वताच्या फक्त ५० मैल लांबीच्या भागालाच लावतात. अझरबैजनपासून वायव्येस बलुचिस्तानपर्यंत ८०० मैल अखंड पसरलेल्या मोठ्या मध्यवर्ती पर्वतश्रेणीला " सेंट्रल रेंज " म्हणतां येईल. एल्व्हेंड, शुटुरुन कुह, शहान कुह, कुहिगेरा, झार्डेह कुह, कुहिकारान हीं बखत्यारी प्रदेशांत व दक्षिणेस कर्मानजवळ बिदखान, लालेहझार, शाहकुह, जमालबारिझ वगैरे उंच शिखरें आहेत. खोरासानमध्यें कित्येक पर्वतांच्या ओळी आहेत. एल्बुर्झ पर्वतांत डेमाव्हेंड शिखर १८००० फूट उंच आहे. आग्नेय इराणांत कुहिबास्मन नांवाचा निद्रित ज्वालामुखी पर्वत व कुहिताफ्तान नांवाचा तीन शिखरांचा ( जागृत ) ज्वालामुखी पर्वत आहे.

न द्या.—सीफिड रूड, हराझ, गुर्गान व आट्रेक ह्या नद्या कास्पियन समुद्राला मिळतात. अजिचै, सफिचै, मुर्डिचै, जघटु व टाटा व वगैरे चौदा नद्या उर्मिया सरोवराला मिळतात. हाब्लेहरूड, जजरूड केंड, केरेज, शुरेहरूड, कारा-सु, रेझाचै, जेहरूड व कुमरूड या नद्या कुम व कशनच्या पूर्वेच्या कवीर ( खारट दलदली ) मध्यें मिळतात. इस्पहानची नदी ( झेंदेहरूड ) गव्हखानी दलदलीला मिळते. फार्समध्यें कुर नदी आहे व डियाला, केर्खेज टायग्रीस नदीला मिळतात. अबिडिझ व कारुन शाट-एल-अरबला मिळतात. जाराहि व टाब इराणी अरबस्तानचा नदीमुखाचा प्रदेश बनवितात. मांड व मिनाब या नाव्य नद्या आहेत. इराणचें मोठें वाळूचें मैदान नैर्ऋत्येकडून आग्नेयेकडे उंच इराणी डोंगरपठारांत पसरलेलें आहे. याच प्रदेशांतून तीन तारांचे लोखंडी खांबावरील १९०७ मध्यें पुरें केलेलें तारायंत्र गेलेलें आहे.

भू स्त र व र्ण न.—इराणचा मध्य प्रदेश चतुर्थ युगांतील थरांनीं व्यापलेला आहे व याच्या उत्तर, पश्चिम व दक्षिण सरहद्दीवर जुन्या खडकांचा कडा आहे.

ह वा.—कास्पियन समुद्राच्या जलविभाजक क्षेत्रा खेरीज या देशांतील कोणत्याहि भागांत सालीना १३-१४ इंचांहून जास्त पाऊस पडत नाहीं. आक्टोबरपासून एप्रिलपर्यंत पडणाऱ्या पावसावर व बर्फाच्या पावसापासून पिकांचें रक्षण करण्याइतकें पिकावरील बर्फाच्छादन यांवर चांगलीं पिकें अवलंबून असतात. या देशांत नैर्ऋत्येकडून व आग्नेयेकडून वारे वाहतात.

प्रा णी.—घोडे, उंट, शेळ्या, मेंढ्या, कुत्रे, मांजरें, हे प्राणी येथें पैदा होतात. सिंह, वाघ, चित्ता, लिंक्स, पिंगट अस्वल, वनगायी, डुकरें, बॅजर, सायाळ, पोल-कॅट, बीझल, मार्टेन, लांडगा, कोल्हा, खोकड, ससा, जंगली गाढव, जंगली मांजर व शेळी, डोंगरी बकरा, गॅझेल व हरीण वगैरे पशु येथें सांपडतात. इराणांत पक्ष्यांच्या ४०० जाती आहेत. कास्पियन समुद्राच्या दक्षिण किनाऱ्यावर मासे सांपडतात.

व न स्प ती.—उत्तरेकडील सखल प्रदेश व डोंगराळ प्रदेशांतील थोडीशीं निवडक ठिकाणें खेरीज करून बहुतेक सर्वत्र झाडें व वनस्पती फार क्वचित आढळतात. खजुरीचीं व ऑलिव्ह झाडें होतात. फळांच्या जाती पुष्कळ आहेत. यूरोपांतील बहुतेक सर्व फळें या देशांत उत्पन्न होतात. उत्कृष्ट टरबुजें, द्राक्षें, जरदाळू, चेरी, मनुका, अननस हीं फळें उत्पन्न होतात. येथील फळें यूरोपांतील फळांची बरोबरी करतात. भाजीपाला विपुल आहे. यूरोपांतील बहुतेक सर्व फुलें व दुर्मिळ फळें देखील आतां या देशांत उत्पन्न होतात.

क्षे त्र फ ळ व लो क सं ख्या.—हा देश पूर्वपश्चिम ९०० मैल व दक्षिणोत्तर ७०० मैल आहे, याचें क्षेत्रफळ६२८००० चौरस मैल आहे. यांपैकीं बराच भाग वाळुकामय मैदान असल्यामुळें दर चौरस मैलास १५ हून जास्त लोकांची वस्ती या देशांत आढळत नाहीं. लोकसंख्या सुमारें ९५ लक्ष ते दीड कोट आहे. यूरोपियन लोकांची संख्या १२०० हून जास्त नाहीं. भ्रमणवृत्ति लोकांपैकीं २६०००० अरब, ७२०००० तुर्क, ६७५००० कुर्द व लेक, २०७०० बलुची जिप्सी, आणि २३४००० लुरी याप्रमाणें लोकांची वस्ती आहे

इ रा णां ती ल मु ख्य श ह रें.—तेहरान ३५००००, ताब्रिझ २०००००,इस्पहान८००००, मेशद, कर्मान६०००० वार्फुरुश शिराझ ५००००, येझ्द ४५००, काझ्विन, कोम, काशान, रेश्त ३५०००, हमदान, कर्मानशहा ४००००.

स्व भा व.—इराणी मनुष्य शांतताप्रिय असून कोणत्याहि वस्तूंच्या अल्हादजनक स्वरूपाकडेच बहुधा त्याचें लक्ष जातें. हे लोक अतिथ्यतत्पर, उपकार करणारे व परकी लोकांविषयीं प्रसन्नचित्त असतात. त्यांच्या अंगीं बरेच सद्गुण वसत असतात. ते आपल्या लेकरांचे फार लाड करतात. इराणी मुलगा आपल्या आईबापांविषयीं फार आदर दाखवितो, तो बापाच्या समक्ष कधींहि बसत नाहीं व त्यास धनी म्हणून संबोधितो. त्याच्या मनांत आईविषयीं फारच प्रेम व पूज्यभाव वसत असतो. इराणी पुत्र आपल्या आईची उपासमार कधींहि होऊं देत नाहींत, व आईची आज्ञा कायद्याप्रमाणें शिरसावंद्य मानतात. कुटुंबांत आईला व विशेषतः आजीला फारच महत्त्व असतें, आपली सासू आपणाजवळ असावी अशी इराणी जांवयाची उत्कट इच्छा असते. चुलत्याचें नातें पाश्चात्यांपेक्षां हे लोक जास्त निकट समजतात, व पित्याच्या बाजूच्या चुलत बहिणीस इराणी पुरुष आपल्या स्वाभाविक बायका समजतात.

काळे गुलाम व पुरुष दाया अथवा लाला यांना फार मान असतो, व दूध पाजणाऱ्या दाईला दुसऱ्या आईप्रमाणें मानतात आणि तिच्या खाण्यापिण्याची आयुष्यभर तरतूद केलेली असते. इराणी लोक आपल्या नोकरांस मुलांप्रमाणें वागवितात. धनी गुलामास बच्चा म्हणून हांक मारतो व गुलाम धन्यास पिता म्हणून संबोधितो. इराणांत गुलामांना चांगलें

वस्त्रप्रावरण व खाणेंपिणें देऊन अत्यल्प सायासाचीं कामें करावयास लावतात; बहुतकरून स्त्री गुलामांचीं आवडल्या पुत्रांशीं लग्नें लावण्यांत येतात अथवा स्वतः मालक आपल्या राखेप्रमाणें त्यांनां बाळगतो. हे फार विश्वासू नोकर असतात, व मालकांचा पैसाअडका यांच्या ताब्यांत असून फार महत्त्वाचीं कामें देखील हे करीत असतात. गुलामास बंधमुक्त करून आपला चरितार्थ चालवावयास लावणें ही गुलामांस द्यावयाची कडक शिक्षा होय अशी तेथें समजुत दिसते. हबशी अथवा अबिसिनियन गुलामास फार किंमत पडते, सोमाली अथवा सुहाली गुलाम कमी काळा असून कमी किंमतीचा असतो. कोळशाच्या वर्णाचा व सर्वांत कमी किंमतीचा गुलाम देशाच्या अंतर्भागांतील बोम्बासी हा होय. बोम्बासी गुलामाची किंमत त्याच्या शारीरिक शक्तीवर अवलंबून असते व याच्याकडून स्वयंपाकाचें काम करवितात. बाहेर देशांहून मागवितात तेव्हांच फक्त गुलामांची विक्री होते. आपल्या गुलामांशीं अथवा घोड्यांशीं इराणी मनुष्य कधींहि क्रूरपणानें वर्तन करीत नाहीं. फारच विपन्नावस्था प्राप्त झाली तर इराणी मनुष्य स्वतःचे कपडे विकण्यास तयार होईल परंतु आपले गुलाम कधींहि विकणार नाहीं. हबशी बारा ते चौदा वर्षांच्या चांगल्या मुलीस ४० पौंड किंमत शिराझच्या बाजारांत द्यावी लागते, त्याच प्रकारच्या सोमाली मुलीची २० पौंड व बोम्बासी मुलीची किंमत १४ पौंड असते.

व्यापारी सचोटींत इराणी लोक यूरोपियनांच्या बरोबरीचे असतात. हे लोक गरिबांविषयीं दानशूर असतात. दिरंगाईपणा हें इराणी मनुष्याच्या स्वभावाचें लक्षण आहे. वारंवार स्नान करून व कपडे धुवून इराणी लोक स्वच्छ राहतात. हे लोक आपल्या कपड्यांच्या नीटनेटकेपणाविषयीं विशेष खबरदार असतात.इराणी लोक जनावरांचे फार शौकी असतात. क्रूरपणा हा दुर्गुण इराणी लोकांत आढळत नाहीं. एकांतवास, बऱ्याच मुदतीची सक्तमजुरी वगैरे शिक्षा या देशांत नाहींत. नवीन वर्षाच्या पहिल्या दिवशीं तुरुंगांतील बहुतेक कैद्यांस मुक्त करीत असल्यामुळें कोणाहि इसमास एक वर्षाहून जास्त तुरुंगवास कंठण्याची क्वचितच पाळी येते.

पे ह रा व.—इराणी लोक अंगांत मानपट्टी नसलेला, पोकळ बाह्यांच्या सुती कापडाचा सदरा घालतात. दक्षिण इराणांत या सदऱ्याच्या मानेच्या भागावर उत्तम नक्षी काम केलेलें असतें. कनिष्ठ वर्गाचे लोक निळ्या रंगाचा व उच्च वर्गाचे लोक आणि सेवक लोक पांढरा सदरा वापरतात.

र स्ते.—(१)तेहरान-कोम (२) तेहरान-रेश्त,(३)ताब्रिझ-जुल्फा (रशियन सरहद्द)(४) काझ्विन--हमदान, (५) मेशद-अस्काबाद, (६) कोम-सुलतानाबाद. शिवाय इतर चांगले रस्तेहि या देशांत आहेत; व यांची एकंदर लांबी ९०० मैल आहे. या देशांतील बाकीचे मार्ग म्हणजे निव्वळ खेंचरांचे आहेत.

रे ल्वे.—या देशांत आठ मैल रेल्वे व साडेसहा मैल ट्राम्वे रस्ता होता. इराणी आखातास मिळणाऱ्या कारून नदींतून अह्वाझपर्यंत व्यापारी गलबतें चालतात.

डा क खा तें—१८७४ पर्यंत टपालाचें काम चपर्चि बशि नांवाचा अधिकारी करीत असे. इराण सरकारच्या तैनातींतील आस्ट्रियन अधिकाऱ्यानें १८७७ मध्यें इराणांत प्रथम नियमितपणें टपाल नेण्याची पद्धति प्रचारांत आणिली. व इराणांतील मुख्य मुख्य शहरांमध्यें नियमितपणें चालणाऱ्या टपालाचें दळणवळण सुरू करण्यांत आलें. हा देश व परकीदेश यांमध्यें डाक आठवड्यांतून दोन वेळ व हिंदुस्थान व इराण यांच्यामध्यें आठवड्यांतून एक वेळ जात असते.

ता रा यं त्र.—इंडोयूरोपियन टेलिग्राफ कंपनीच्या तारायंत्राशिवाय इराणी सरकारच्या तारायंत्राचें दळणवळण ६३१२ मैलपर्यंत चालतें. एकंदर तारआफिसें १३१ आहेत.

उ द्यो ग धं दे.—मातीचीं भांडीं, कौलें, हत्यारें, कापड, कलाबतूचें व कशिद्याचें काम, धातूंचें काम,लांकडाचें खोदीव काम व चित्रें, हस्तलिखितें, मुलामा देणें, जवाहीर व गायनाचीं वाद्यें हे जिन्नस व शाली, गालीचे, लोंकरी, रेशमी व सुती कापड आणि गुलाबपाणी या देशांत तयार करतात. ताब्रिझ, हमदान, सुलतानाबाद, व कर्मान हीं शहरें उद्योगधंद्याचीं मुख्य ठिकाणें आहेत.

शे तीं त उ त्प न्न के ले ले प दा र्थ.—गहूं, जंव, व तांदूळ सर्व जिल्ह्यांत पिकवितात. वाटाणे, बीन, मसूर, चणे, मका नाचणी, हीं धान्यें देखील सर्वत्र उत्पन्न होतात. फळें उत्तम व विपुल होतात. धान्य व सुकलेलीं फळें बाहेर देशीं पाठवितात. ताग, तंबाखू, टुंबुन नांवाचा तंबाखु, अफू, व विपुल रेशीम यांची पैदास होते. गळिताचीं धान्यें, व बटाटे, कोबी व टमाटे वगैरे शाकभाज्या होतात. निरनिराळे डिंक, रंग कापूस व लोंकर हे पदार्थ बाहेरदेशीं रवाना होतात.

घोडे,खेंचरें व गाढव यांची निपज आतां कमी आहे. येथून पुष्कळ इमारतीलांकूड बाहेरदेशीं जातें. कास्पियन समुद्रावरील मासे धरण्याचा हक्क रशियन कंपनीला १८६८ पासून पट्ट्यानें देण्यांत आला आहे.

ख नि ज . प दा र्थ.—तांबें, शिसें, लोखंड, मँगनीज, जस्त, निकल, कोबल्ट हीं द्रव्यें या देशांत विपुल सांपडतात. निशापुरजवळ टर्काइझ नांवाच्या रत्नांच्या खाणी आहेत. मीठ, कर्पूरशिलाजित, चुना, संगमरवरी दगड, संगमरवरी दगडासारखा पांढरा दगड, शंखजिरें, कोळसा हीं द्रव्यें, या देशांत सांपडतात. नॅफ्था देखील या देशांत सांपडतो. खाणींच्या प्रदेशापासून बाजार व बंदरें दूर असल्यामुळें व चांगले रस्ते, विपुल सरपण आणि शास्त्रीयज्ञान या गोष्टींच्या

अभावामुळें या देशांतील खनिज संपत्ति मोठ्या प्रमाणावर खणून काढतां येत नाहीं.

व्या पा र.—ताब्रिज, तेहरान, हमदान, व इस्पहान हीं मुख्य व्यापारी ठिकाणें आहेत. बंदर अब्बास, मोहम्मेराह, व बुशायर इराणी आखातावरील व आस्तारा, एन्झेली, मेचे-डिस्सार व बंदरगेझ हीं कास्पियन समुद्रावरील मुख्य बंदरें आहेत. १८९९ मध्यें इराणी सरकारनें अझर्बैजन व कर्मान-शहा प्रांतांतील, व पुढल्यावर्षी इतर सर्व प्रांतांतील जकात मक्त्यानें देण्याची वहिवाट बंद करून आयात व निर्यात मालावर किंमतीच्या शेंकडा ५ सरकारकर बसविला. मुहम्रा कारून नदीप्रदेश, कुर्दिस्तान, व सिस्तन हे प्रांत व इराणी आखातावरील कांहीं लहान बंदरें यांच्या बाबतींत यावर्षी ढवळाढवळ केली नाहीं तसेंच इराणी आखातांतील मोत्यांच्या व्यापाराकडेहि पुढल्या वर्षांपर्यंत लक्ष देण्यांत आलें नाहीं. १८५७ मध्यें ग्रेट ब्रिटनशीं झालेल्या व्यापारी तहानें इराणशीं होणाऱ्या ग्रेटब्रिटनच्या व्यापाराला ' विशिष्ट सवलती ' देण्यांत आल्या. १९०२ मध्यें रशियाशीं तह होऊन १९०३ पासून रशियन मालावर नवीन जकात सुरू करण्यांत आली. याच्या अगोदरच ग्रेटब्रिटनशीं तह होऊन ब्रिटिश आयात मालावर रशियन आयात मालाइतकीच जकात बसविण्यांत आली. एकंदर व्यापारापैकीं शेंकडा ५९.६ व्यापार रशियाशीं व २१.३ व्यापार ब्रिटिश राज्याशीं चालतो. त्रिबिझोंद, रेश्त व मेशद शहरांवरून रशियाला, खोरासान व सिस्तन प्रांतांतून अफगाणिस्तान व हिंदुस्था-नला, आणि कर्मानशहा प्रांतांतून बगदादला व्यापारी रस्ते गेले आहेत.

कापसाचें कापड, साखर, चहा लोंकरीचेंकापड, सूत, पेट्रोलियम, लोंकर व कापूस यांचे मिश्र जिन्नस, लोंकर, लोखंडी सामान, आगपेट्या, लोखंड, पोलाद, रंग, तांदुळ, मसाले, व कांचेचें सामान हे जिन्नस किंमतीच्या मानानें या देशांत येतात. व फळें, गालीचे, कापूस, मासे, तांदुळ, डिंक लोंकर, अफू, रेशमी कापड, कातडीं, जनावरें रेशीम, सुताचें कापड, गहूं, जंव, औषधें व तंबाखू बाहेर देशीं रवाना होतात.

ज हा जें.—या देशांत चार मोठीं बंदरें व कित्येक लहान बंदरें आहेत. इराणी आखातांतील जहाजें इराणी सरकारचीं आहेत. कास्पियन समुद्रांत चालणारीं जहाजें रशियाचीं आहेत.

ना णीं.–क्रान नांवाचें रुप्याचें नाणें युनिट आहे. पूर्वी पूल व शाही हीं ताब्याचीं नाणीं चालत असत. परंतु हीं नाणीं बंद करून १९०० मध्यें याच नांवाचीं निकलचीं नाणीं सुरू करण्यांत आलीं.

रा ज्य प द्ध ति—१९०६ पर्यंत इराणची राज्यव्यवस्था मुसुलमानी धर्मानें घालून दिलेल्या कायद्याप्रमाणें अनियंत्रित राजसत्ताक पद्धतीची होती. शहाला लोक पैगंबराचा मुख्य प्रतिनिधि मानीत असत. १९०६ मध्यें लोकांनीं ओरड केल्यावरून मुझफर-उद्दिनशाहनें १५६ सभासदांचें राष्ट्रीय मंडळ ( मजलिस-इ-शोरा-इ-मिल्ली ) बनविण्याचा हुकूम दिला. चांगल्या वागणुकीच्या पंचवीस वर्षें वयाच्या इराणी पुरुषास हे सभासद निवडण्याचा अधिकार दिला होता. शिपाई व गुन्हेगार लोकांना मत देण्याचा अधिकार नाहीं. सभासद होण्यास इराणी भाषेच्या लेखनवाचनाचें ज्ञान व चांगली वागणूक हे गुण अवश्य होते. परकी मनुष्य, तीस वर्षांहून कमी व ७० हून जास्त वयाचा इराणी मनुष्य, सरकारी नोकरींतील, सैन्य व आरमार खात्यांतील मनुष्य व गुन्हेगार यांना सभासद होतां येत नसे. ७ आक्टोबर १९०६ रोजीं हें मंडळ शहानें भरविलें. १९०७ मध्यें राज्यपद्धतीवर शहानें सही केली. या पद्धत्यन्वयें शहा शियापंथाचा असला पाहिजे. त्याचा वारस त्याच्या काजार घराण्यांतील आईच्या पोटीं जन्मलेला वडील मुलगा अथवा त्याच्या खालचा पुरुष वारस असला पाहिजे. शहाचें खाजगी उत्पन्न ५ लक्ष तोमान ( ३ लक्ष पौंड ) असलें पाहिजे.

कार्यकारी सत्ता सात आठ प्रधानांच्या प्रधानमंडळाच्या हातीं असे. या प्रधानांच्या संज्ञा येणेंप्रमाणें असत.

प्रधान मंडळाचा अध्यक्ष व अंतर्गत कारभाराचा मंत्री, } सेफाहसालर अझम.

परराष्ट्रीय कारभाराचा मंत्री,... ...सारेभेद् दौलेह.
न्यायमंत्री,... ... ..., ...अलाउल्-मुल्क.
टपाल व तारखातें यांचा मंत्री,......सरदार मन्सूर.
युद्धमंत्री,... ... ... ......सरदार कबिर.
जमाबंदी मंत्री,... ... ......यामिनोल्-मुल्क.
शिक्षणमंत्री,... ... ......मोम्ताझोल्-मुल्क.
सार्वजनिक कामांचा मंत्री, ... ...मोचिर अझम.

देशाचे ३३ प्रांत करून प्रत्येक प्रांताचा कारभार एका गव्हर्नर जनरलच्या हातीं असे, हा मध्यवर्ती सरकारला जबाबदार असे, व याला आपल्या प्रांतातील जिल्ह्यांचा कारभार पाहाण्याकरितां लेफ्टनंट गव्हर्नर नेमण्याचा अधिकार असे. गव्हर्नर-जनरल यास वली, फर्मान फर्मा इत्यादि म्हणत, व गव्हर्नर आणि लेफ्टनंट गव्हर्नर यांना हाकिम म्हणत. लेफ्टनंट गव्हर्नरास नायब-अल-हुकुमाह असेंहि म्हणत; लहानशा जिल्ह्याचा कारभारी असल्यास त्याला झाबित म्हणत. प्रत्येक शहरावर एक मेयर अथवा मुख्य मॅजिस्ट्रेट-कलांतर, दरोगा, अथवा बेग्लरबेगी नेमलेला असतो; शहराच्या विभागाच्या अथवा खेड्याच्या अधिकाऱ्यास केदखोदा म्हणत. या अधिकाऱ्यांचें मुख्य काम कर वसूल करणें असून यांची नेमणूक बहुतेक लेफ्टनंट गव्हर्नर करीत. अथवा कधीं कधीं यांची निवडणूक नागरीक करीत. बहुतेक गव्हर्नरच्या हाताखालीं एक वजीर अथवा पेष्कार असे. हा वजीर हिशेब ठेवी व

राज्यकारभाराचीं चिल्लर कामें करी. गुरांचे कळप घेऊन हिंडणाऱ्या लोकांच्या नायकांस इल्खानी, इल्बेगी, वली, सरदार, शेख, दुम्माल म्हणतात; ज्या प्रांतात यांच्या टोळ्या हिंडत त्या प्रांताच्या गव्हर्नराजवळ आपल्या लोकांपासून कर वसूल करून देण्याची जबाबदारी या नायकांवर असे.

१९०७ मे च्या एका कायद्यान्वयें ग्राम व नगर कौन्सिलें निवडण्याची परवानगी दिली. या निवडणुकींत मत देण्याचा अधिकार प्रत्येक इसमास आहे, व या कौन्सिलांचा राष्ट्रीय कौन्सिलाशीं प्रत्यक्ष संबंध असतो.

१९०७ आगष्ट ३१ रोजीं रशिया व ग्रेटब्रिटन यांनीं आपसांत ठराव करून इराणांतील आपलीं वर्चस्व क्षेत्रें ठरविलीं, त्यांचें क्षेत्रफळ, जकातीचें उत्पन्न व लोकसंख्या ( आकडे १९१३–१४ सालांतील आहेत. ) येणेंप्रमाणेः– ब्रिटिशक्षेत्र १३७००० चौ. मै. ६९०००० लो. सं. उत्पन्न ३८८९८ पौंड. रशियनक्षेत्र ३०५००० चौ. मै. ६९००००० लो. सं. उत्पन्न ६६८२६४ पौंड. तटस्थक्षेत्र १८८००० चौ. मै. १९१०००० लो. सं. उत्पन्न १३५१३१ पौंड.

परंतु १९१३ मध्यें सीस्तान ( ब्रिटिश क्षेत्र ) चें उत्पन्न खोरासान ( रशियन क्षेत्र ) च्या उत्पन्नांत मिळविण्यांत आलें, व तटस्थ क्षेत्रातलें उत्पन्न कर्ज व अगाऊ दिलेल्या रकमा यांबद्दल इंग्लंडजवळ तारण गहाण ठेवण्यांत आलें. इराणमध्यें सध्या लोकानुवर्ती राजसत्ता आहे. १९२४ च्या प्रारंभीं शहाला हांकलून दिल्यावर लोकसत्ता होण्याचा संभव होता पण ती प्रस्थापित झाली नाहीं.

ध र्म.—या देशांत सरासरी ९० लक्ष लोक शिया पंथाचे व ८ लक्ष अथवा ९ लक्ष लोक सुनी पंथाचे मुसुलमान आहेत; ८० ते ९० हजार ख्रिस्ती, ( आर्मेनियन नेस्टोरियन, ग्रीक आर्थोडॉक्स रोमन कॅथोलिक व प्रॉटेस्टंट) ३६००० यहुदी व ९००० झोरास्ट्रियन लोक आहेत.

शि क्ष ण.–प्राथमिक शिक्षणाच्या शाळांतून इराणी भाषा, थोडेसें आरबीचें ज्ञान व थोडेसें गणित सातपासून बारा वर्षांच्या मुलांस शिकवितात. या शाळा ( मकताब ) असंख्य आहेत, विद्यालयें मद्रसा प्रत्येक शहरांत आहेत. येथें विद्यार्थ्यांना शिक्षण, भोजन व राहणें मोफत मिळतें.

अलीकडे शिक्षण खात्यांत सुधारणा होऊन सर्व शिक्षण यूरोपीय पद्धतीनें दिलें जातें. स्त्रीशिक्षणाचीहि वाढ झाली आहे. सध्यां सुमारें १८० शाळा आहेत. तेहरान येथें एक १८४९ मध्यें धंदेशाळा स्थापन झाली तींत बरेच यूरोपीय प्रोफेसर असून त्या शाळेचा शास्त्रीय प्रगतीस बराच उपयोग झाला. एक फ्रेंच शाळा तेहरान येथें आहे. शहानें तेहरान येथें लष्करी व पाश्चिमात्य शास्त्रीयज्ञानाच्या शिक्षणाकरितां इतर शाळा स्थापल्या आहेत. आर्मेनियन, प्रॉटेस्टंट, व रोमन कॅथोलिक मिशनें शिक्षणाच्या कामीं बरीच मदत करतात.

सै न्यः—१८०७ पर्यंत येथें खडे सैन्य नव्हतें. नंतर कांहीं पायदळ पलटणें ( सर्बाझ ) तयार करण्यांत आलीं. फ्रेंच, ब्रिटिश, आस्ट्रियन व रशियन लष्करी अधिकारी बोलावून त्यच्यांकडून कवाईत शिकवून सैन्य तयार करण्यांत आलें. सालीना लष्करी खर्च संस्थानच्या उत्पन्नाच्या $\frac{1}{3}$ इतका आहे. मध्यंतरीं रशियानें तेहरान व ताब्रिज येथें कोसॅक रेजिमेंट तयार केल्या होत्या. त्यांत शिपायी इराणी असून अधिकारी रशियन असत हल्लीं त्याचा खर्च इंग्रज चालवितात.

आ र मा र.—इराणी सरकाराजवळ नऊ आगबोटी व पांच बोटी ( लॉंच ) आहेत. या देशाचें आरमार फार क्षुद्र आहे, कारण एकच बोट आहे व ती जकात वसुलीच्या कामीं वापरतात.

न्या य.—गव्हर्नर व त्यांचे प्रतिनिधि उर्फ म्हणजे न लिहिलेला, अथवा प्रचारांतील कायद्याप्रमाणें, व शेख–उल् - इस्लाम आणि इतर धर्मोपदेशक शार म्हणजे लिहिलेल्या अथवा ईश्वरप्रणित कायद्याप्रमाणें इन्साफ करतात. या कोर्टांची चौकशी नेहमीं संक्षिप्त असते. १८८८ मध्यें एक जाहीरनामा काढून कोणीहि इसमास इतः पर कायद्यानें चौकशी केल्याशिवाय शिक्षा होणार नाहीं व प्रत्येकास जीवित स्वातंत्र्य राहील असें शहानें जाहीर केलें. पोलीस यूरोपियन पद्धतीवर बनविलें आहे. शिवाय परकी गुन्हेगारांची चौकशी त्यांच्या राष्ट्रांच्या इराणांतील प्रतिनिधिकडून होते.

जमाबंदी—इराणांतील उत्पन्नाच्या बाबी ( १ ) जमीन, गुरांचे कळप, व्यापारी, शिल्पकार यांच्यावरील कर, ( २ ) सरकारी जमिनीवरील महसूल, ( ३ ) जकात, ( ४ ) सरकारी मक्त्यांचें भाडें या आहेत. १९११-१२ सालीं उत्पन्न २०४२८५० पौंड व खर्च १६०८६०० पौंड झाला. १९१३–१४ सालीं उत्पन्न १४८०७७८ पौंड होतें.

पे ढ्या.—१८८९ मध्यें शहानें बॅरन ज्युलिअस डि रूटर नांवाच्या इसमास इराणची स्टेट बँक बनविण्याची परवानगी दिली. ही बँक १८८९च्या आक्टोबरमध्यें ' इराणची इंपीरियल बँक ' या नांवानें सुरू झाली. या बँकेचें मंजूर केलेलें भांडवल ४० लक्ष पौंड होतें, परंतु हें पुढें वाढवितां येत होतें. इराणी सरकारच्या परवानगीशिवाय ८ लक्ष पौंडापर्यंत किंमतीच्या नोटा काढण्याचा अधिकार या बँकेस दिला होता. बँक निघाल्यानंतर पहिलीं दोन वर्षेंपर्यंत शेंकडा ५० व नंतर शेंकडा ३३ रोकड ठेव या बँकेस ठेवावी लागत असे. इराणी राज्यांतील लोखंड, तांबें, शिसें, पारा, कोळसा, पेट्रोलियम, मँगनीज, बोरॉक्स, व ॲसबेस्टॉस या खनिज द्रव्यांच्या खाणी खणण्याचे अगोदरच कोणासहि न दिलेले हक्क या बँकेस देण्यांत आले.१८९०च्या एप्रिलमध्यें या बँकेनें न्यू ओरियंटल बँक कार्पोरेशन( लंडन ) हिचा इराणांतील सर्व व्यवहार आपल्या ताब्यांत घेतला.१८९० च्या एप्रिलमध्यें स्थापन झालेल्या पर्शियन बँक ऑफ मायनिंग राईटस कारपोरेशन लिमिटेड या बँकेस खाणी खणण्याचे हक्क दिले होते. व जानेवारी १८९४मध्यें हिचें दिवाळें

निघालें. तेहरान येथें ' बँक्वे डि एस्कॉम्प्टे ' नांवाची एक रशियन बँक होती हिलाच पूर्वी 'बँक्वे डेस् प्रेटस् डि पर्से ' म्हणत असत. ( ही रशियन स्टेट बँकेला जोडलेली होती. व हिनेंच १९०० व १९०२ मधील इराणी कर्ज जमविलें होतें ). तेहरान येथें एक मोठ्या पगाराचा ' इराणांतील रशियन जमाबंदी एजंट ' नांवाचा अधिकारी कायमचा असे. १९०७ फेब्रुवारी ७ रोजीं नॅशनल बँक नांवाच्या एक पेढीस व १९०७ जुलै पासून तीस वर्षें मुदतीची एक जर्मन पेढी स्थापन करण्याची परवानगी दिली गेली होती, परंतु ( जानेवारी १९१३ पर्यंत) यांपैकीं एकहि पेढी स्थापन झाली नव्हती. इराणला रशिया व ब्रिटिश कर्ज बरेंच आहे. १९१८ मध्येंच ब्रिटिशांनीं दीड कोटी क्रान कर्ज दिलें आहे.

इ ति हा स.—इराणचा प्राचीन इतिहास ज्ञानकोश विभाग चवथा बुद्धोत्तरजग पर्शुभारतीय संस्कृति या प्रकरणांत दिला आहे. त्या ठिकाणीं ससन घराण्याचा अंत होऊन इराण देश अरबाच्या ताब्यांत गेल्यापर्यंतच कथासूत्र आहे.

परकी राज्यकर्ते.—ससन घराण्याचा लय झाल्यापासून तैमूरच्या मृत्यू ( १४०५ ) पर्यंतच्या कालास संक्रमण काल म्हणतां येईल. सॅसेनिड घराण्याचा अखेरचा पराभव झाल्यापासून इराणचें राजकारणघटक या स्वरूपाचें महत्व नाहींसें झालें, व या देशावर परकी राजे एकामागून एक होऊन गेले. या राज्यकर्त्यांनीं या देशाच्या प्राचीन संस्था अथवा धर्म यांची मुळींच निगा ठेविली नाहीं. सुमारें दीडशें वर्षेंपर्यंत या देशावर मुसुलमान खलिफांचे अधिकारी प्रथम मदिनाहून व नंतर बगदादहून कारभार चालवीत असत. यांचा मुख्य हेतु या देशांतील धर्म नष्ट करून इराणी लोकांचें राष्ट्रीय तेज नाहींसें करण्याचा होता. या धोरणाचा परिणाम असा झाला कीं, इराणांतील लोकांनीं मुसुलमानी धर्म अगदीं वरकरणी स्वीकारला; व इराणांतील लोकांनींच उमईद खलिफांच्या जागीं अब्बासी खलिफांची स्थापना केली. ही गोष्ट घडून येण्याच्या अगोदर साहसी लोक व असंतुष्ट मुसुलमान अधिकारी खलिफावर स्वारी करण्याच्या कामीं इराणी लोकांचा उपयोग करून घेत असत. व पूर्वेकडील देश काबीज करण्याकरितां इराणांत अरबी सैन्य वारंवार येत असे. पहिल्या मेरवानच्या कारकीर्दींत मोखतार नांवाच्या अधिकाऱ्याच्या हाताखालीं इराणी लोकांनीं कुफा शहरांत स्वातंत्र्य जाहीर केलें परंतु त्यांचा लवकरच पराभव झाला. यानंतर बरींच बंडें झालीं परंतु खलिफांनीं तीं सर्व मोडून टाकलीं; व अबदल मलीक ( मृत्यु ७०५ ) यानें मुसुलमानी नाणीं प्रचारांत आणून व अरबी भाषा सर्व राज्यांत दप्तरी भाषा करून मुसुलमानी सत्ता मजबूत केली. नंतर खोरासानचा अरबी सुभेदार क्वोटीबा बिन मोस्लिम यानें इराण आणखी जेरीस आणला. दुसऱ्या उमरनें झकात नांवाचा कर खेरीज बाकीच्या सर्व करांची अरबी नसलेल्या मुसुलमानांना माफी दिली. यामुळें पुष्कळ इराणी लोक इस्लामी धर्माची दीक्षा घेऊन शहरांत जाऊन राहिले व शियापंथी धर्मोपदेशकांच्या आधिपत्याखालीं त्यांनीं राजद्रोही संघ स्थापन केले. दुसऱ्या यजिदच्या ( ७२०–७२४ ) कारकीर्दींत खोरासान प्रातात भयंकर बंडें झालीं व हिशमच्या ( मृत्यु ७४३ ) वेळीं ही अंदाधुंदी अब्बासी व शिया पंथी धर्मोपदेशकाच्या प्रोत्साहनानें वाढतच चालली. अखेरीस दुसऱ्या मेरवानच्या वेळीं अरब नसलेल्या मुसलमानांनीं अबु मोस्लिम नांवाच्या मौलानाच्या आधिपत्याखालीं मोठें सैन्य जमा केलें, खलिफाच्या सेनापतीस पळावयास लावलें व अखेरीस मेरवानला हांकून लाविलें. येणेंप्रमाणें अब्बासी इराण व अरबी राज्य यांचे मालक बनले. इराणी लोकांच्या मदतीनें अब्बासी खलिफांना राज्यप्राप्ति झाल्यामुळें यापुढें इराणी लोकांनां त्यांचें नष्ट झालेलें राष्ट्रीयत्व पुन्हां प्राप्त होऊं लागलें. अब्बासी हें एक इराणी घराणें होतें व या लोकांनीं अरबांची ज्ञातिपद्धति नष्ट करून जुलमानें राज्य केलें. खोरासान प्रांताचे लोक जुन्या अलिद घराण्याच्या वतीनें लढले होते व अबु मोस्लिमचा खून झाल्यावर शियापंथी लोकांमध्यें अस्वस्थता पुन्हां माजली. हरून–अल–रशीद खलिफाच्या कारकीर्दींत खोरासानमध्यें बंड झालें व हें बंड खलिफानें स्वतः मोडलें. लवकरच समरकंद येथें बंड झालें व तें बंड मोडण्यास हारुन निघाला असतां ( ८०९ ) तो तुस येथें मरण पावला. हरूनचे मुलगे अमिन व मामून यामध्यें गादीबद्दल तंटा लागला. अमिन खलीफ झाला; परंतु ताहीरच्या मदतीनें मामूननें अमिनला पदच्युत करून ठार केलें व स्वतः खलीफ बनला. ताहीरला खोरासानचा सुभेदार ( ८२० मध्यें ) नेमण्यांत आलें व यानें या देशांत एक स्वतंत्र घराणें स्थापिलें. हें नांवाला बगदादचें अंकित असे. ८७३ पर्यंत या घराण्याची सत्ता खोरासानवर चालत होती. मोतासिम खलिफाच्या कारकीर्दींत मझ्दपंथी इराणी लोकांचें व बिझांशिअमच्या लोकांचें बंड व ताबरिस्तानमधील बंडें कष्टानें मोडण्यांत आलीं. दहावा खलीफ मोतावाक्की याच्या कारकीर्दींत याकूब बिन लैथ अल–सफर यानें ताहिरि घराण्याचा मोड करून सिस्तन प्रांतांत सफारि घराणें स्थापिलें.

कनिष्ठ घराणीं.—इराणच्या बऱ्याच भागांत व सरहद्दीवरील प्रदेशांत बरींच घराणीं स्थापलेलीं होतीं. ८७९-९३० पर्यंत अझरबैजन प्रांतांत साजिद घराणें राज्य करीत होतें व ताबरिस्तानमध्यें ८६४–९२८ पर्यंत अलिद घराणें स्वतंत्र होतें, नंतर सॅमॅनिद घराण्यानें त्याचा मोड केला. या काळांत तुर्की अधिकाऱ्यांच्या सत्तेमुळें खलिफांचा झपाट्यानें ऱ्हास होत होता. चौदावा अब्बासी खलिफ यानें तुर्की अधिकारी काढण्याचा प्रयत्न केला पण तो फसला. नंतर मोतामिद खलीफ झाला. याकूब सफारिद यानें या खलिफावर हल्ला केला; परंतु त्याला पळावें लागलें. याकूबचा भाऊ अमर यानें ( ८७८–९०० ) राज्य केलें; परंतु इस्मायल बिन अहमद सॅमॅनिद यानें त्याला कैद केलें.

सॅमॅनिद घराणें:—यानंतर सफारिद घराणें ( ९०० ते १२२९ ) हें सॅमॅनिदांचे वेळीं नामधारी सत्ताधीश होतें. तिसऱ्या यझ्देगर्दनंतर सॅमॅनिद याच एकट्या अरब नसलेल्या इराणी घराण्यानें इराण व ट्रॅन्सॉक्सियाना या देशांवर सत्ता चालविली. याच्या कारकीर्दींत विद्या व कला यांची भरभराट झाली. अखेरीस सबक्तगीनच्या गझनवी घराण्यानें या घराण्याचा मोड केला.

मोतादिदच्या वेळीं मेसापोटेमियांतील खारिजाइट घराण्याचा मोड झाला. हें पुढें महत्त्वाचें घराणें झालें. नंतर खलीफांस उतरती कळा लागली व इराणांतील मोठ्या घराण्यांनीं आपलें स्वातंत्र्य जाहीर केलें. क्वाहिरच्या ( मृत्यु ९३४ ) कारकीर्दीत इराणमध्यें बुयिद नांवाचें घराणें उदयास आलें. हें घराणें सस्सन घराण्यांतील अबु शाजा बुया नांवाच्या पुरुषापासून निघालें होतें. हा पुरुष डैलामचा नायक होता. याचा एक मुलगा इमाद-अद्दौला हा कारानचा सुभेदार, दुसरा मुलगा रोकन अद्दौला हा राय व इस्पहान प्रदेशाचा व तिसरा मुलगा मोइझ अद्दौला हा कर्मान, अहवाझ व बगदाद प्रांतांचा सुभेदार झाला.

मोत्ताकी खलिफाच्या कारकीर्दीत डैलामाईट, तुर्क व हम्दानिद लोकांमध्यें एकसारखे तंटे चालू होते. बुयिद घराणें वरपांगी खलिफाची सत्ता कबूल करीत होते; पण वास्तविक त्याची सत्ता अमर्याद होती. बुयिद घराण्यानें शहाणपणानें बगदादवर राज्य केलें व निरनिराळीं लोकोपयोगी कामें करून या शहराची बरीच सुधारणा केली. इराणी आखातापासून कास्पियन समुद्रापर्यंत यांची सत्ता चालत होती. अखेरीस आपसांतील भांडणामुळें या घराण्यास उतरती कळा लागली व गझनवी घराण्यानें याचा सहज मोड केला. मध्यंतरीं ( ९९९ मध्यें ) सॅमॅनिद घराण्याचा तुर्कस्तानच्या इलेकखानांनीं नाश केला.

गझनवी घराणें:—इराणी राजकारणाचें केंद्र आतां पश्चिमेकडून पूर्वेकडे गेलें. आतांपर्यंत वरील सत्ता बगदादच्या नामधारी खलिफांच्या हातीं असे व आतांपर्यंत वर्णिलेल्या सर्व घराण्यांनां खलिफापासून सत्ता प्राप्त होत असे. गझनवी व सेल्जुक घराण्यांचा उदय झाल्यापासून खलिफांची स्वतंत्र सत्ता नाहींशी झाली. गझनवी घराण्यानें थोड्याच अवकाशांत इराणांतील बहुतेक देश्य घराण्यांचा नाश केला. पहिला मन्सूर सॅमॅनिद आपल्या मालकाशीं भांडून अफगाणिस्तानांत जाऊन राहिला व या देशांत त्यानें एक बहुतेक स्वतंत्र असें राज्य स्थापन केलें. याचा तुर्की गुलाम अलप्तगीन हा गझनवी घराण्याचा मूळ पुरुष होता. मन्सूरच्या मागून तीन दुर्बल सुभेदार झाले. नंतर ९७७ मध्यें पूर्वी गुलाम असलेल्या सबक्तगीनच्या हातीं सत्ता गेली. सॅमॅनिद घराण्याचा तातार इलखानानें मोड केला. सबक्तगीनचा मुलगा प्रसिद्ध महमूद यानें सॅमॅनिद व तातार लोकांचा पराभव करून सुलतान ही पदवी धारण केली व खोरासान, ट्रॅन्सॉक्सियाना व वायव्येकडील हिंदुस्थानचा बराच भाग या प्रदेशावर आपली सत्ता बसविली. महमूद मोठा विजयी पुरुष होता व जेथें जेथें त्यानें स्वारी केली तेथें तेथें त्यानें महमंदी धर्म स्थापन केला. महमूद विद्येचा आश्रयदाता होता. याच्या वेळीं फर्दोसी कवीनें शहानामा ( राजांचें पुस्तक ) ग्रंथ लिहिला. याच्या वंशजांची सत्ता ११८७ पर्यंत चालू होती; परंतु ११५२ मध्यें त्यांचें हिंदुस्थानांतील राज्य घोरी घराण्यानें घेतलें. याच्या अगोदरच याचे इराणांतील कांहीं प्रांत सेल्जुक लोकांनीं हिरावून घेतले होते. महमूदाचा मुलगा पहिला मासउद याच्या कारकीर्दीत सेल्जुकांनीं खोरासान प्रांत घेतला. १३०७ मध्यें मर्व्ह, निशापूर हीं शहरें व पुढील अठरा वर्षांत सेल्जुकांनीं बल्ख, जॉर्जन, ताबरिस्तान, ख्वारिझम, हमदान, राइ, इस्पहान व अखेरीस बगदाद ( १०५५ त ) हीं ठिकाणें घेतलीं. अब्बासी खलिफ सेल्जुकांच्या संरक्षणाखालीं आले व त्यांचा बाह्यात्कारी सर्व प्रकारचा मान सेल्जुक लोक राखीत असत. सेल्जुकांचें राज्य पश्चिमेस आशियामायनर व पूर्वेस हिंदुस्थान व मध्य आशियापर्यंत पसरलेलें होतें.

तोघ्रुल बेग, आल्प-आर्स्लान व मलिकशहा हे पहिले तीन सेल्जुक राजे होऊन गेले. मलिक शहाच्या मरणानंतर त्याचे मुलगे बार्कियारोक्, महंमद व सिंजार यांच्यामध्यें यादवी सुरू झाली. याचा परिणाम असा झाला कीं, सिंजार मरेपर्यंत ( ११५७ ) सेल्जुकांच्या खऱ्या वारसांचे हातीं नामधारी सत्ता मात्र होती व याच घराण्याच्या इतर शाखांनीं राज्याच्या निरनिराळ्या प्रांतांत सिरीया, रूम ( आशियामायनर ) कर्मान, इराक व कुर्दिस्तान यांत स्वतंत्र राज्यें स्थापन केलीं.

सेल्जुकांचें राज्य मूळचें लष्करी होतें. याची त्यांच्या स्वतःच्या अधिकाऱ्यांवर सत्ता नव्हती व तुर्की गुलामांच्या हातीं हे अधिकार देत असत. हे अधिकारी स्वामिभक्त नसत. इराणांत मोंगल लोक येण्यापूर्वी फार्स प्रांतांत, तुर्की सरदार सलघार यानें स्थापलेलें सेलघॉरि घराणें होऊन गेलें. या घराण्यांतील शेवटची राजकन्या आबिश ( मृत्यु १२८७) हिचा हुलागूचा मुलगा मांगू तैमूर याशीं विवाह झाला होता.

ख्वारिझमः—ख्वारिझमच्या शहांचा मूळ पुरुष गझनीचा तुर्की गुलाम अनुष्ताजिन हा होता. हा प्रथम सेल्जुक मलिक शहाचा पेला धरणारा हुजऱ्या होता. नंतर १०७७ मध्यें ख्वारिझम ( खिव ) चा सुभेदार झाला. ११३८ मध्यें या घराण्यांतील तिसरा पुरुष अत्सिझ यानें बंड केलें, परंतु सिंजारनें त्याचा पराभव करून त्याला हांकून लावलें, पण लवकरच तो परत आला. इल-आर्स्लान, सुलतान शहा महमूद, तुक्श ( ११७२–११९९ ), अलाएद्दीन महंमद ( ११९९–१२२० ) व जेलालुद्दीन हे या घराण्यांतील शहा होऊन गेले. तुक्शनें खोरासान, राइ, इस्पहान हे प्रांत व

अलाएद्दीननें बहुतेक सर्व इराण, बुखारा, समरकंद, ओट्रार, गझनी हे प्रदेश जिंकले. १२३१ मध्यें शेवटचा शहाजेलालुद्दीन यास हद्दपार करण्यांत आलें व येणेंप्रमाणें ख्वारिझम शहांच्या राज्याचा नाश झाला.

अब्बासी खलिफ बगदाद येथें नामधारी राजे असतांना खरी सत्ता चाळीस लहान घराणीं व सहा मोठीं घराणीं यांच्या हातीं होती. ८७४–१२३१ पर्यंत सॅमॅनिद, बुयीद, गझनवी, सेल्जुक, सेलघॉरि व ख्वारिझमचे शहा हीं घराणीं इराणचें राज्य वस्तुतः करीत होतीं.

मंगोल लोक.—बाराव्या शतकाच्या अखेरच्या वर्षांत मोंगोल लोकांनीं पश्चिमेकडे चाल केली व काबाकिटैचें प्राचीन राज्य जिंकून त्यांनीं ख्वारिझमच्या शहांचें राज्य घेतलें. जेंगिझखान १२७२ मध्यें मेला, व कास्पियन समुद्रापासून पिवळ्या समुद्रापर्यंत पसरलेलें त्याचें राज्य त्याच्या मुलांमध्यें वाटून देण्यांत आलें. इराणच्या कांहीं भागाचा जगताईच्या राज्यांत व बाकीच्याचा गोल्डन होर्ड (सोनेरी टोळी )च्या प्रदेशांत समावेश होत असे. इराणचा खरा सुभेदार टुलुइ अथवा तुले होता. याचा मुलगा हुलागू अथवा हुलाकू हा इराणचा पहिला राजा झाला. हा १२५६ मध्यें गादीवर बसला. यानें इराणांतील देश्य घराणीं एकदम नाहींशीं केलीं व १२५८ मध्यें बगदाद घेतलें आणि अडतीसाव्या अब्बासी खलीफाचा वध करून खलीफाचा नायनाट केला. हुलागू व त्याचे वंशज यांचें राज्य उत्तरेस जगताईच्या राज्यापासून दक्षिणेस इजिप्त पर्यंत व पश्चिमेस बिझान्शियमपासून चीनपर्यंत पसरलेलें होतें. हुलागूनें अझर्बैजन प्रांतांत मराघा येथें आपली राजधानी केली व एक वेधशाळा स्थापली. याच्या सांगण्यावरून नासिरुद्दीन तुसीनें झिद्जि-इल-खानि नांवाचीं ज्योतिष शास्त्रीय कोष्टकें केलीं. हुलागू १२६५मध्यें मेला. याच्या मागून याचा मुलगा अबाघ गादीवर बसला. हा स्वभावानें शांत होता व यानें शहाणपणानें राज्य करून देशांत शांतता राखली व देशाची भरभराट केली. जेंगिझखानाच्या वंशांतील इतर मंगोल राजांचीं दोन बंडें यानें मोडलीं. याचा भाऊ निकुदर हा याच्या मागून १२८१ मध्यें गादीवर बसला. यानें इस्लामी धर्माची दीक्षा घेतली व ख्रिस्ती लोकांचा छळ केला. मंगोल लोक इस्लामी धर्माचा तिटकारा करीत असत. मंगोल व ख्रिस्ती लोक यांची सहाजिकपणें निकुदराविरुद्ध एकी झाली व निकुदर १२८४ मध्यें मारला गेला. मंगोल नायकांनीं अबाघचा मुलगा अर्घन यास गादीवर बसविलें. याची कारकीर्द अंदाधुंदीची होती. याच्या पहिल्या दोन वजीरांचा वध करण्यांत आला. तिसरा वजीर साद अद्दौला नांवाचा यहुदी वैद्य होता. याची जमाबंदी व्यवस्था फार दूरदर्शीपणाची होती. परंतु यहुदी लोकांनां यानें सरकारी नोकऱ्या जास्त दिल्यामुळें मंगोल सरदारांनीं याचा १२९१ मध्यें खून करविला. हुलागूचा नातू बैदुखान याचें बंडहि अर्घनच्या कारकिर्दीत झालें होतें. हा राजा सादच्या खुनानंतर लवकरच मेला. याच्या मागून कैखातु गादीवर बसला. याचा १२९५ मध्यें बैदुखानानें खून केला. अर्घनचा मुलगा गझन महमूद यानें बैदूचा खून करून गादी (१२९५–१३०४) बळकावली. गझन फार कर्तृत्ववान पुरुष होता. यानें लष्करी जमाबंदी व न्यायखात्यावर कायमचे अधिकारी नेमले; नाणीं, वजनें व मापें यांची कायम पद्धति ठरविली, व घोडेस्वारांकडून टपाल नेण्याची तजवीज केली. यानें इजिप्तवर जय मिळविला. १३०३ मध्यें याच्या सैन्याचा मर्ज अल सफर येथें पराभव झाला व मंगोल लोकांनीं सिरिया देशावरील हक्क सोडला. इस्लामी धर्म निश्चितपणें स्वीकारणारा पहिला मंगोल राजा अशी गझनची ऐतिहासिक ख्याति आहे. हा १३०४ मध्यें मेला. याच्या मागून याचा भाऊ उल्जैतु गादीवर बसला. तातारवरील विजयी लढाई व ताब्रिजहून सुलतानिया शहरास राजधानी नेणें या याच्या कारकिर्दीतील मुख्य गोष्टी होत. हा शियापंथी होता, हा १३१६ मध्यें मेला व याचे मागून याचा मुलगा अबुसाइद गादीवर बसला. याच्या कारकिर्दीत इजिप्तच्या मामेलुक राजांशीं निश्चित तह करण्यांत आला. याला त्याचे वजीर व सरदार यांजपासून फार त्रास झाला. अमीर हुसेनची बायको व अमीर चुपानची मुलगी बगदाद खातून हिच्या विलक्षण मोहामुळें याला फारच त्रास झाला. हा १३३५ मध्यें मेला व याच्या बरोबरच इराणांतील पहिल्या मंगोल अथवा इलखान घराण्याचा शेवट झाला. या वेळीं खरी सत्ता चुपान, हुसेन जेलैर व त्याचे धाकटा हसन व थोरला हसन नांवाचे मुलगे यांच्या हातीं होती. या दोघां हसनांनीं कांहीं नामधारी राजे प्रथम गादीवर बसविले व १३४४ नंतर हसन बुझुर्ग ( थोरला ) हा पहिला जेलैरिदखान म्हणून गादीवर बसला.

इतर घराणीं:—अबु साइदच्या वेळेपासून इराणवर पांच घराण्यांची सत्ता चालत होती. ( १ ) जेलैरिद, ( २ ) मोझफरिद,( ३ ) सर्बादरिद, (४ ) बेनि कुर्त, ( ५ ) ज्युबानियन हीं तीं घराणीं होत. यांचा तैमूरच्या सैन्यानें नाश केला.

तैमूरची सत्ता इराणमध्यें १३९५ पासून त्याच्या मृत्यू-(१४०५) पर्यंत अव्याहत चालत होती. त्यानें एकामागून एक विजय संपादन केले, परंतु जिंकलेले प्रांत त्याच्या कारकिर्दीत कधींच व्यवस्थित नव्हते. पराजित केलेलीं घराणीं वारंवार बंडें करीत व त्याला मंगोल लोकांच्या टोळ्यांचाहि बंदोबस्त करावा लागे. त्याच्या वंशजांची सत्ता इराणावर फार थोडा काळ टिकली; व शहारुख ( १४०९-१४४६ ) व अला अद्दौला ( १४४७ ) या राजांनंतर तैमुरी घराण्याची इराणवरील सत्ता नाहींशी झाली.

तैमूरच्या मृत्यूपासून सफाविद घराण्याचा ऱ्हास होईपर्यंत (१४०५—१७३६ )

तैमूरचे वंशज ( तैमुरी ) व तुर्कोमन लोक ( इसवी सन १४०५-१४९९ ).— तैमूर आपल्या वयाच्या ७० व्या वर्षी चीनवर स्वारी करण्याच्या सुमारास १४०५ मध्यें मेला. ट्रॅन्सॉक्सियाना, कॉकेशस, आस्ट्राखान, खालचा व्होल्गा प्रदेश, मेसापोटेमिया, सिरिया, आशियामायनर, अफगाणिस्तान, हिंदुस्थान या प्रदेशांशिवाय १९ व्या शतकांतील आशियांतील रशियाचा विस्तृत प्रदेश व अस्ट्राबादपासून होर्मझपर्यंतचा इराण देश या अवाढव्य प्रदेशावर तैमूरचें राज्य पसरलेलें होतें.

तैमूरच्या हयातींत त्याच्या मिरनशहा नांवाच्या तिसऱ्या मुलानें इराणच्या कांहीं भागावर राज्य केलें होतें, परंतु हा वेडा असल्यामुळें तैमूरनें गादीवरील त्याचा हक्क काढून आपल्या एका मृत पुत्राचा पुत्र पीर महंमद याला गादीचा वारस म्हणून जाहीर केलें होतें; परंतु मिरनशहाचा मुलगा खलिलशहा यानें गादी पटकावली. परंतु शादुलमुल्क नांवाच्या राखेच्या सहवासांत पुष्कळ पैसा व काळ घालविल्यामुळें त्याला पदच्युत करून १४०८ मध्यें त्याचा चुलता शहारुख खोरासानचा सुभेदार हा गादीवर बसला व खलिलशहाला राज्यपद सोडून खोरासानचा सुभेदार व्हावें लागलें. १४०९ मध्यें खलिलशहा मरण पावला.

शहारुख हा तैमूरचा चौथा मुलगा होता. यानें अडतीस वर्षे राज्य केलें व हा शूर, उदार, आणि सुसंकृत राजा होता. यानें आपली गादी समरकंदहून हिरात शहरीं आणली. याच्या कारकिर्दींत हिरात व मर्व्ह या शहरांची भरभराट झाली. सर जॉन माल्कम यानें या शहाच्या दरबारच्या ऐश्वर्याचें व यानें केलेल्या शास्त्रीय शिक्षण व विद्या यांच्या उत्कर्षाचें वर्णन केलें आहे. यानें चीनला एक वकील पाठविला होता व यानें पाठविलेला अबदुर रझ्झाक नांवाचा प्रवाशी हिंदुस्थानांत आला होता. आशियामायनरमधील कारा कुयुन अथवा 'काळी मेंढी' नांवाच्या तुर्कोमन लोकांनीं या शहाच्या ताब्यांतील तांब्रिज शहरावर चाल केली होती. इ. स. १४४६ मध्यें शहारुख मेल्यावर त्याचा मुलगा उलुघबेग त्याच्या गादीवर बसला. या शहाची विद्याकलाभिरुचि याचें नांव धारण करणाऱ्या ज्योतिषशास्त्रीय कोष्टकांवरून व्यक्त होते. शिवाय हा स्वतः कवि व विद्येचा आश्रयदाता होता. यानें समरकंद शहरीं एक विद्यालय व वेधशाळा बांधली. तैमूरशहानें कास्पियनसमुद्राच्या दक्षिणेस जिंकलेल्या प्रदेशास यानें बळकटी आणल्याचा कांहीं एक पुरावा नाहीं. याला याचा मुलगा अबदुल लतीफ यानें ठार मारलें व सहा महिन्यांनीं अबदुल लतीफला त्याच्या खुद्द शिपायांनीं ठार केलें. तैमूरच्याच वंशांतील एक वडील पुरुष बाबर(इतिहासप्रसिद्ध मोंगल बादशहा नव्हे ) नंतर गादीवर बसला व थोडाकाळ राज्य करून मरण पावला. याच्या मागून मिरनशहाचा नातू अबुसाइद यानें गादीवर हक्क दाखविला. व उझबेग तातारशीं दोस्ती करून यानें बुखारा व खोरासान प्रांत घेतले व कारा कुयुन नांवाच्या तुर्कोमन लोकांवर स्वारी केली. परंतु अखेरीस उझन हसननें त्याला कैद करून १४६८ मध्यें ठार मारलें.

अबदुल लतीफ मेल्यानंतर अठरा वर्षांत घडलेल्या इराणी इतिहासांतील थोड्याशा गोष्टींच्या तारखा देणें शक्य नाहीं. अबु साइदचा वडील मुलगा सुलतान अहमद बुखारा येथें व त्याचा भाऊ उमर शेख फर्घना प्रांतांत राज्य करीत होता. उमरचा मुलगा इतिहासप्रसिद्ध बाबर याला उझबेगांनीं काबूल व हिंदुस्थानकडे हांकून लावलें होतें. तैमूरचा मुलगा उमर शेख याचा पणतू सुलतान हुसेन मिर्झा यानें हिरात येथें १४८७—१५०६ पर्यंत राज्य केलें. मिर्खोंड, व ख्वादामिर नांवाचे इतिहासकार, जामि व हातिफी कवी व इतर विद्वान लोक यांचा हा शहा आश्रयदाता होता. परंतु मध्य व पश्चिम इराणवर याची कधींहि सत्ता नव्हती. इराणच्या या भागावर अबुसाइदच्या मरणानंतर आक कुयुन ( पांढरी मेंढी ) चा नायक उझन हसन यानें काराकुयुन ( काळी मेंढी ) चा नायक जहान शहा याचा पराभव व वध करून, सत्ता चालविली होती. या दोन्ही टोळ्यांमध्यें हाडवैर होतें. या दोन्ही टोळ्यांतील लोक आशियामायनरमधील रहिवाशी असून 'काळ्या मेंढी' च्या टोळींतील लोकांनीं व्हान येथें व 'पांढऱ्या मेंढी' च्या टोळींतील लोकांनीं डायार्बेकर येथें आपली सत्ता स्थापली होती.

उझन हसनच्या दरबारीं कॅटॅरिनो झेनो, बार्बरो, व कॉटॅरिनि हे व्हेनिसचे वकील आले होते. हसननें डेस्पिना नांवाच्या ग्रीक स्त्रीशीं लग्न लावलें होतें व झेनोची बायको, डेस्पिनाची पुतणी असल्यामुळें झेनोच्या चिथावणीवरून हसननें तुर्कस्तानवर स्वारी केली होती व या स्वारीचा परिणाम शहास फार घातुक झाला होता. तॉरिस ( ताब्रिझ ) शहर या शहाची राजधानी होती. हा शहाणा व शूर राजा होता. जुन्या इतिहासकारांनीं या शहाला आलिम्बियस, असेम्बियस, असेम्बेक, असिम्बेओ, अथवा उसन कॅसॅनो अशीं नांवें दिलीं आहेत, त्यामुळें हा शहा कोणता होता हें निश्चितपणें सांगतां येत नाहीं. अकरा वर्षे राज्य करून आपल्या वयाच्या सत्तराव्या वर्षी १४७७–१४७८ मध्यें हा मेला. याच्या मागून याचा मुलगा याकूब आपल्या भावास ठार मारून गादीवर बसला, परंतु याच्या बायकोनें याला विषप्रयोग केल्यामुळें हा १४८५मध्यें मेला.

बेबंदशाहीः—याकूब नंतर गादीवर कोण बसला या विषयीं निरनिराळ्या लेखकांचीं निरनिराळीं मतें आहेत. झेनो म्हणतो कीं याकूबचा मुलगा अलामूर ( अलामत, अल्वान्ते, एल–वेंद व अलवंगबे असेंहि याला म्हणत ) हा नंतर गादीवर बसला होता व याच्या राज्यांत इराण शिवाय डायार्बेकर व युफ्रेटीस नदी जवळील मोठ्या आर्मेनियाचा कांहीं भागांत या प्रदेशाचा समावेश होत असे. उलट

क्रुसिन्स्कि म्हणतो कीं, याकूब निपुत्रिक मेल्यामुळें जुलान्हर नांवाच्या एका सरदार नातेवाईकानें गादी बळकावून तीन वर्षे राज्य केलें. याच्या मागून १४८८ मध्यें बैसिंगर गादीवर बसला. यानें १४९० पर्यंत राज्य केलें. नंतर रुस्तन ( रुस्तम ) नांवाच्या तरुण सरदारानें सात वर्षे सत्ता चालविली. नंतर अहमद नांवाच्या कोणा पुरुषानें रुस्तमचा खून करून गादी बळकावली. याला हालहाल होऊन मृत्यु प्राप्त झाला, त्यामुळ हसनाच्या चौदा वर्षे वयाचा धाकटा मुलगा अलामत याला अनायासें गादी मिळाली. अँगिओलेल्लो नांवाच्या व्हेनीसच्या प्रवाशानें लिहिलेल्या वर्णनावरून या गोष्टीस आधार मिळतो. अलामतनें शेख इस्माइल सुफी गादीवर बसेपर्यंत राज्य केलें. याच्या भावाचें नांव मुराद होतें. जुलेन्हर अथवा रुस्तम विषयीं विशेष माहिती नाहीं, परंतु बैसिंगर हा उझुन हसनचा समकालीन, उमर शेख फर्घना प्रांताचा राजा याचा पुतण्या होता. याकूब मेल्यानंतर अलामत गादीवर बसेपर्यंत बरीच बेबंदशाही होती, व अलामत अज्ञान असतांना बैसिंगरनें राजप्रतिनिधि या नात्यानें दोन वर्षेपर्यंत राज्यकारभार चालविला असावा असें अनुमान करतां येतें. मार्खम म्हणतो कीं अलामत हा तैमूरच्या वंशांतील शेवटचा राजा होऊन गेला, व याला सफाविद घराण्याचा प्रसिद्ध स्थापक इस्माइल सुफी यानें पदच्युत केलें.

सुफी अथवा सफाविद घराणें:–( १४९९-१७३६) सातवा इमाम मुसा याचा वंशज शेख सैफुद्दीन इझाक हा चौदाव्या शतकांत केव्हां तरी कास्पियन समुद्राच्या नैर्ऋत्येस अर्देबिल येथें रहात होता असें म्हणतात. त्याच्या पावित्र्याची कीर्ति ऐकून तैमूर भेटीस त्याच्या घरीं गेला होता व चकित होऊन या शेखाच्या सांगण्यावरून तैमूरनें बरेच तुर्क अथवा आर्मिनियन कैदी सोडून दिले होते. यामुळें या लोकांची शेखवर भक्ती बसून पुढें हे लोक याच्या वंशजांच्या फार उपयोगी पडले.

याचा मुलगा सादुद्दिन व नातू ख्वाजा अली ( हे मक्केला गेले होते व यरुशलेम येथें हे मरण पावले) हे देखील प्रसिद्ध धर्मपुरुष होऊन गेले. ख्वाजा अलीचा नातू जुनैद यानें उझुन हसनच्या बहिणीशीं लग्न केलें होतें व जुनैदचा मुलगा शेख हैदर यानें आपली मामेबहीण मार्था–उझुन, हसन व डेस्पिना राणी यांची मुलगी हिच्याशीं विवाह केला होता. या जोडप्याला सुलतान अली,इब्राहिम मिर्झा व इस्माइल(हा १४८० मध्यें जन्मला असें म्हणतात ) असे तीन मुलगे झाले. शेख हैदर यानें धर्मसंबंधीं आपल्या पूर्वजांचें नांव पुढें चालविलें होतें. याच्या शिक्षणाचा परिणाम असा झाला कीं, इस्लामी जगांत अत्यंत महत्त्वाचा असा एक महंमदी धर्माचा पंथ निघाला. अर्दाबिलच्या तत्त्ववेत्त्यांनीं निर्माण केलेल्या धर्मपंथाकडे इराणी लोकांच्या मनाचा कल सहज वळत असे.

याकूब शहा निपुत्रिक निवर्तला असें जे ग्रंथकार म्हणतात ते शेख हैदर सुफीचा गादीवरील हक्क कायदेशीर मानतात. पुर्चास म्हणतो कीं, 'ऐडरच्या कीर्तिचा व त्याला मिळणाऱ्या शिष्यशाखेचा हेवा वाटून खुद्द याकूबनें ऐडरचा गुप्तरीतीनें खून करविला' परंतु रुस्तमनें हा खून केला असें क्रुसिन्स्कीचें म्हणणें आहे. झेनो म्हणतो कीं, शेख हैदर या धर्मभक्ताचा खून लढाईंत अलामतनें केला.एका निनांवी व्यापाऱ्याच्या इराणच्या प्रवासवर्णनांत अलामतच्या सेनापतीनें लढाईत शेख हैदरला ठार केलें असें लिहिलें आहे,व अँगिओलेल्लो प्रवाशी म्हणतो कीं, रुस्तमनें पाठविलेल्या सुलेमानबे नांवाच्या अधिकाऱ्यानें शेख हैदरला लढाईत मारलें. हब्दतुत्तवारिखच्या आधारें माल्कम म्हणतो कीं, शिर्वानच्या सुभेदारानें शेख हैदरचा मोड करून खून केला व हैदरच्या तिन्ही मुलांना त्यांच्या उझुन हसन नांवाच्या आजाच्या याकूब नांवाच्या वंशजानें मत्सरानें फार्स प्रांतांतील इस्त्खर नांवाच्या डोंगरी किल्ल्यांत कैदेंत ठेविलें. हें पुर्चासच्या म्हणण्याचें दुसरें स्पष्टीकरण आहे; फक्त व्यक्ति व विषय यांचा गोंधळ झाला आहे. झेनोनें या काळच्या गोष्टी काळजीपूर्वक नमूद करून ठेविल्या आहेत असें दिसतें. झेनोच्या आधारावरून शेख हैदरच्या मुलांपैकीं एक म्हणजे इस्माइल हा १४९२ मध्यें गिलन प्रांतांत पळून गेला. यावेळीं इस्माइलचें वय तेरा वर्षांचें होतें.

पहिला इस्माइलः— या सुफी तरुणाचें चरित्र या वेळेपासून त्याच्या राज्यारोहणापर्यंत (१४९९) फार बडामोडीचें आहे. झेनो म्हणतो कीं, वयाच्या अठराव्या वर्षी हा व्हान सरोवरांतील बेटांतून निघून आरास व कर या नद्यांमधील कॅराबाख प्रदेशांतून आग्नेयमार्गानें गिलन प्रांतांत आला. या प्रदेशांत आपल्या पित्याच्या एका स्नेह्याच्या मदतीनें थोडेसें सैन्य जमवून कास्पियन समुद्रावरील बाकू व शिर्वान प्रांतांतील शेमाख हीं शहरें यानें घेतलीं. अलामत ससैन्य आपणावर चालून येत आहे असें समजतांच यानें जॅार्जियन ख्रिस्ती व इतर लोक यांचें सैन्य गोळा केलें. सोळा हजार लोकांच्या मदतीनें आपल्या प्रतिपक्षाचा अगदीं मोड केला व थेट ताब्रिझ शहरावर चालून गेला. हें शहर याला शरण आलें. लवकरच ( १४९९ ) याची इराणचा शहा म्हणून द्वाही फिरविण्यांत आली.

अलामत डायार्बेकरला पळून गेला, परंतु त्याचा भाऊ मुराद हा तुर्की लोकांच्या साहाय्यानें लढाईस उद्युक्त झाला व इस्माइलनें मुरादचा ताब्रिझच्या मैदानांत पराभव केला. मुराद डायार्बेकरला पळून गेला. इस्माइल, इराक–इ–आजामि व शिराझ प्रांतात मुरादखानावर चालून गेला. इस्माइलची वाढती सत्ता पाहून मुरादचे लोक त्याला सोडून पळाले, मुरादचा पराभव झाला व कदाचित खूनहि झाला असेल. अलामतला विश्वासघातानें इस्माइलच्या हवालीं

करण्यांत आलें व त्यानें अलामतचा वध केला असें म्हणतात.

इस्माइल (१५०१) ताब्रिझला परत आला व त्यानें मोठा जयोत्सव केला. १५०३ मध्यें त्यानें टायग्रीसवरील बगदाद, मोसल व जेझिरा हीं शहरें घेतलीं. पुढच्या वर्षी त्यानें गिलनप्रांतांतील एका बंडखोर राज्यकर्त्याचा बंदोबस्त केला. यानंतर १५०७ पर्यंत यानें शांततेनें काळ घालविला. सर्व ग्रंथकारांच्या आधारानें असें म्हणतां येईल कीं, १५०८ मध्यें शहाचें लक्ष शैबान अथवा शाहिबेगच्या खोरासानवरील स्वारीनें वेधिलें. हा उझबेग जेंगिझखानाचा वंशज असून यानें बाबरला (मोगल बादशहा) काबूलकडे हांकून लावलें होतें, नंतर यानें समरकंद, ताश्कंद, फर्घना, हिस्सार, कुंडुझ व ख्वारिझम येथें जय मिळवून मुर्घाब नदी ओलांडून साराखस् प्रांतावर हा चालून आला होता. इस्माइलनें आपलें सैन्य जमवून इस्पहान येथें तळ दिला. १५१० मध्यें शैबानीनें खोरासान प्रांतावर दुसरी स्वारी करून कर्मन प्रांत उध्वस्त केला तेव्हां इस्माइलनें हे प्रांत आपले वंशपरंपरागत आहेत असें सांगून शैबानला त्यानें केलेल्या नुकसानीबद्दल जबाब विचारला. शैबाननें इस्माइलचा या प्रांतावरील हक्क कबूल केला नाहीं, तेव्हां इस्माइल सैन्यानिशीं चालून गेला. उझबेगांचें सैन्य लहान लहान टोळ्या करून देशभर पसरलें व हिरातकडे मोर्चा फिरवून पळून गेलें; शैबान मर्व्हला पळून गेला. इस्माइलनें चाल करून त्याचा पराभव केला व त्याला पकडून त्याच्या बऱ्याच अनुयायांसह त्याचा वध केला.

सेलिमशीं लढाई.—यानंतर घडलेली महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे इस्माइलनें तुर्की सुलतान पहिला सेलिम याशीं केलेलें युद्ध ही होय. या युद्धाचें कारण तुर्की राज्यांत पाखंडवादी मुसलमानांचा छळ होत असे या गोष्टीनें चिडून जाऊन (इस्माइल) शहानें जुना सुनी पंथ सोडणाऱ्या ४० हजार तुर्कांची कत्तल केली हें होय. सुलतानचें सैन्य अझर्बैजन प्रांत व पश्चिम इराण या प्रदेशांवर चालून आलें. इस्माइलचें बरेंच सैन्य यावेळीं खोरासान प्रांताच्या बंदोबस्तांत गुंतलेलें होतें. इस्माइलनें शत्रूच्या सभोंवारचा प्रदेश उजाड करून शत्रूला दाणावैरणीच्या टंचाईनें जेरीस आणण्याचें युद्धधोरण स्वीकारलें. अखेरीस अझर्बैजन प्रांताच्या सरहद्दीवरील खोई शहराजवळ उभय सैन्यांची गांठ पडून इराणी सैन्याचा पराभव झाला (१५१४) व सेलिम विजयोत्सवानें ताब्रिजमध्यें शिरला.

सेलिमचा ताब्रिझ शहरांत आठ दिवस मुक्काम होता. यानें येथील पुष्कळसे कुशल कारागीर पकडून कान्स्टांटिनोपलला पाठवून दिले व वसंतऋतुंत इराणवर फिरून चाल करण्याच्या इरादानें कारबाग प्रांतांत हिंवाळ्यांतील मुक्काम करण्याकरितां निघून गेला; परंतु आपल्या सैन्याच्या बेदिलीमुळें तो तुर्कस्तानला घाईनें परत गेला. या स्वारीमुळें इराणच्या शहाचा गर्व उतरून सुलतानानें डायार्बेकर व कुर्दिस्तान हे प्रांत आपल्या राज्यास जोडले.

१५१४ पासून १५२४ पर्यंत इराण व तुर्कस्तान या दोन राज्यांमधील द्वेषाग्नि धुमसतच होता; परंतु म्हणण्यासारखी लढाई झाली नाहीं. इराणपेक्षां इजिप्तकडे सेलिमचें लक्ष जास्त वेधलें होतें. हा सुलतान १५१९ त मेला. या गोष्टीचा फायदा घेऊन शहानें जार्जिया प्रांत काबीज करण्याचा प्रयत्न केला; परंतु सेलीमच्या मागून गादीवर बसलेल्या सुलेमान सुलतानानें शहाचें कांहींएक चालूं दिलें नाहीं. १५२४ त इस्माइल अर्देबिल येथें मरण पावला.

इस्माइलचा स्वभावः—इराणी लोक इस्माइलच्या स्वभावाचें फार गौरवानें वर्णन करतात. इस्माइल हा एका मोठ्या राजघराण्याचा पाया घालणारा पुरुष असून यानें इराणी लोकांचा आवडता धर्म राष्ट्रीय धर्म केला असें इराणी लोक म्हणतात. याचे प्रजाजन याला साधु समजून याच्या नांवाचा आपल्या प्रार्थनेंत उच्चार करीत असत. इस्माइल सेनापति असतांना शिराई चिलखतें अंगावर घालीत नसत व याच्या सैनिकांचा या नवीन धर्मासंबंधीं उत्साह इतका दांडगा होता कीं, 'शिया शिया' म्हणून हे लोक बेधडक शत्रूवर चालून जात असत.

शहा तहमास्प.—इस्माइलच्या चार मुलांपैकीं सर्वांत वडील मुलगा आपल्या बापाच्या गादीवर बसला. याच्या कारकीर्दींत पुढील मुख्य गोष्टी घडल्या. खोरासान प्रांतावर उझबेगांनीं स्वारी केल्यामुळें त्यांच्या सैन्याचा (१५२७) मोड करण्यांत आला, बगदाद (१५२८) परत घेण्यांत आलें, किझिल–बाश (शामलु व तुकुलू) टोळ्यांमधील भांडण बदमाष लोकांची कत्तल करून (१५२९) मिटविण्यांत आलें, खोरासानमधील आणखी एक बंड मोडण्यांत आलें, हिरात शहर उझबेगांच्या वेढ्यांतून मुक्त करण्यांत आलें (१५३०), इराणवरील तुर्कांची स्वारी इराणांतील कडक हवामानानें मागें हटविली गेली (१५३३), सुलतान सुलेमानानें (इ. स. १५३४) शहापासून बगदाद शहर घेतलें,शहाच्या सर्वांत धाकट्या भावानें बंड करून हिरात शहर घेतलें त्यामुळें हिरात परत घेऊन कंदाहारवर (१५३६) चाल करण्यांत आली, कंदाहार शहर तेथील सुभेदारानें (१५३७) बाबरशहाचा मुलगा राजपुत्र कामरान याच्या हवालीं केलें, हुमायून (पळून आलेला मोंगल बादशहा) चें आदरातिथ्य (१५४३) करण्यांत आलें, शहाहून धाकटा असलेल्या शहाच्या इल्खास नांवाच्या भावानें तुर्कांशीं दोस्ती करून बंड केलें त्यामुळें तुर्कांशीं लढाई करावी लागली (१५४८) व अखेरीस जार्जिया प्रांतावर स्वारी करून हजारों लोकांनां बंदिवान करून सूड उगविण्यांत आला (१५५२).

तुर्कस्तानच्या सुलतानाच्या बायेझिड नांवाच्या मुलानें बंड केलें त्याचा सुलतानाच्या सैन्यानें (१५५९) मोड केला म्हणून तो पळून शहाच्या आश्रयास येऊन राहिला.

शहानें त्याला कायमचा आश्रय देण्याचें वचन दिलें. सुलेमान सुलतानानें त्याला शहाकडून परत मागितलें व शहानें सुलतानाकडून आलेल्या लोकांबरोबर त्याला पाठवून दिलें, त्यामुळें शहा व सुलतान यांमध्यें तह घडून आला. सुनी व शियापंथांतील हाडवैरामुळें या दोन राज्यांमध्यें भांडण उपस्थित होणें शक्य होतें; परंतु यूरोपियन संस्थानांच्या कारस्थानांमुळें सुलतानानें कान्स्टांटिनोपलच्या पश्चिम व उत्तर प्रदेशांतील चढाईचें धोरण सोडून दिलें.

१५९१ मध्यें अँथोनि जेन्किन्सन इलिझाबेथ राणीचें पत्र घेऊन इंग्लिश व्यापाऱ्यांसाठीं व्यापाराचें बोलणें लावण्याकरितां इराणांत आला होता परंतु त्यापासून कांहीं एक निष्पन्न झालें नाहीं.

तहमास्प १५७६ मध्यें मरण पावला. हा शहा मध्यम बांध्याचा, जाड ओंठाचा व पिंगट रंगाचा दांडगा मनुष्य होता. हा लढवय्या होता. याला पुष्कळ संतति होती व याच्या मृत्यूनंतर याचा पांचवा मुलगा हैदर मिर्झा यानें किझिल बाश लोकांच्या मदतीनें आपल्या नांवाची शहा म्हणून द्वाही फिरविली. परंतु तहमास्पचा चौथा मुलगा इस्माइल यानें आफशर लोकांच्या मदतीनें गादी मिळविली.

दुसरा इस्माइलः—यानें दोन वर्षें राज्य केलें. हा काझ्विन शहरांत एका हलवायाच्या घरांत मेलेला सांपडला. याच्या मृत्यूनें प्रजेस सुटका झाल्याचा आनंद झाला म्हणून त्याच्या मृत्यूच्या कारणाची विचारपूस करण्यांत आली नाहीं. याच्या मागून याचा सर्वांत वडील भाऊ महंमद मिर्झा अथवा महंमद खुदाबंद गादीवर बसला. पूर्वी याच्या शारीरिक दुर्बलतेमुळें याचा गादीवरील हक्क वगळण्यांत आला होता. यानें एका कर्तबगार प्रधानाच्या हवालीं सर्व राज्यकारभार केला होता, परंतु भित्रेपणानें यानें या प्रधानाला शत्रूच्या हवालीं केलें. याच्या कारकीर्दींत आपसांतील तंटे व बंडें झालीं, व देशाबाहेरच्या शत्रूंनीं देखील हल्ले केले होते. पूर्वेस त्याच्या सर्वांत धाकटया अब्बास नांवाच्या पुत्रानें खोरासान प्रांत ताब्यांत ठेविला होता. पश्चिमेस सुलतानच्या सैन्यानें अझर्बैजन प्रांतावर चढाई करून ताब्रिज शहर घेतलें होतें. याचा वडील मुलगा हम्झा मिर्झा यानें बंडखोरांचें पारिपत्य करून, तुर्क लोकांची पिच्छेहाट करून त्यांना तह करावयास लाविलें; परंतु कोणा मारेकऱ्यानें त्याचा खून केला. ही वार्ता ऐकून अब्बासचा संरक्षक मुर्शिद कुलीखान किझिलबाश लोकांचा नायक हा अब्बासला घेऊन काझ्विन शहरीं गेला. ही गोष्ट होण्याच्या दोनतीन वर्षांपूर्वी निशापुर येथील सरदारांनीं अब्बासला शहा बनविलें होतें व आतां तो खरोखरी इराणचा राजा बनला. मालकम म्हणतो कीं महंमद खुदाबंद या सुमारास मरण पावला.

अब्बास दि ग्रेटः—हा शहा गादीवर बसल्याबरोबर ( १५८६ ) खोरासान प्रांतावर उझबेगांनीं स्वारी करून हिरात शहर घेतलें व सुभेदाराचा खून करून सभोंवारचा प्रदेश जाळून पोळून टाकला. अब्बास मेशदवर चालून गेला परंतु अंतस्थ बंडाळीमुळें त्याला काझ्विनला परत जावें लागलें. इतक्यांत शहा तेहरान येथें अत्यवस्थ आजारी पडला, त्यामुळें उझबेगांचा नायक अबदुल–उल–मुनिमखान याच्या सैन्यास लूटमार करण्यास आयतीच संधि मिळाली. सर्व राज्यांत अंदाधुंदी माजली व राज्यांत शांतता व सुरक्षितता प्रस्थापित करण्यास शहास फार प्रयास पडले. नंतर त्याला फार्स प्रांतांतील बंड मोडण्यास शिराजला जावें लागलें; आणि पश्चिमेकडून होणाऱ्या तुर्क लोकांच्या स्वाऱ्यांचा बंदोबस्त करावा लागला. जॉर्जियाच्या तिसऱ्या मुरादशीं शहाला लढाई करावी लागली. १५९० मध्यें तह झाला; परंतु ताब्रिझ शहर व कास्पियन समुद्रावरील एक दोन बंदरें इराणच्या ताब्यांतुन जाऊन पहिल्या तीन खलिफांची निर्भत्सना करावयाची नाहीं, ही अट इराणी लोकांस मान्य करावी लागली.

१५९७ मध्यें उझबेगांचें पारिपत्य करून शहानें त्यांच्या पासून हिरात शहर व खोरासान प्रांत परत मिळविला व याच्या सरहद्दीवर कुर्द घोडेस्वारांची वसाहत करवून शहानें या प्रांताचा बंदोबस्त केला. पूर्वेस बल्ख शहर घेतलें व व दक्षिणेस इराणी आखातांतील बेहरीन बेटें, इराणच्या समुद्रकिनाऱ्याचा प्रदेश व लगतचीं बेटें व लार प्रांत इतका प्रदेश शहाच्या सेनापतींनीं काबीज केला. १६०१ मध्यें तुर्कस्तानवर स्वारी अब्बासनें नेटानें सुरू केली व तिसऱ्या महंमद सुलतानच्या दुर्बलतेचा फायदा घेऊन गमाविलेले प्रांत एकामागून एक परत मिळविले. अखेरीस दुसऱ्या ओथमान सुलतानानें तह करून पहिल्या इस्माइल शहाच्या वेळची इराणी राज्याची सरहद्द कबूल केली. तहमास्पच्या किल्लेदारानें मोंगल बादशहाला दिलेलें कंदाहार शहर १६०९ मध्यें परत घेण्यांत आलें.

बेचाळीस वर्षें राज्य करून वयाच्या सत्तराव्या वर्षी १६२८ मध्यें मझंदरान प्रांताच्या समुद्रकिनाऱ्यावरील फाराहाबाद येथील आवडत्या महालांत हा शहा मरण पावला. हा सर्व राजांत फार प्रसिद्ध शहा असून याची कीर्ति दिगंतविख्यात होती. याच्या दरबारांत इंग्लंड, रशिया, स्पेन, पोर्तुगाल, हालंड व हिंदुस्थान या देशांचे वकील होते. आपल्या राज्यांतील ख्रिस्ती लोकांवर हा दया करीत असे व त्यांना त्यांचा धर्म त्यानें पाळूं दिला होता. देशांतील तुर्क व उझबेग लोकांची धुंडाई मोडून शांतता स्थापणें, हितकर कायदे करणें व लोकोपयोगी कामें करणें या गोष्टींनीं या शहाची कारकीर्द चिरस्मरणीय झाली आहे उंच नाक व तीक्ष्ण पाणीदार डोळे यांनीं मंडित असा याचा मनोहर चेहरा होता. हा मध्यम बांध्याहून ठेंगणा, चपळ, शिकारी व काटक होता; परंतु या विख्यात शहाच्या उज्वल कीर्तीला त्यानें केलेल्या आपल्या सुफी मिर्झा नांवाच्या वडील मुलाचा खून व दोघां धाकट्या बंधूंचा छळ या गोष्टीनें काळीमा

लाविली आहे. इतिहासकार म्हणतात कीं, यानें मरतेवेळीं सुफीबद्दल फार शोक केला व सुफीचा मुलगा साम मिर्झा यास आपला वारस नेमलें.

शहा सुफीः—मृत शहाच्या आज्ञेनुसार सरदारांनीं साम मिर्झाला शहा सुफी या नांवानें गादीवर बसविलें, त्या वेळीं याचें वय सतरा वर्षांचें होतें. याच्या चौदा वर्षांच्या कारकीर्दीत अनेक क्रूर व अमानुष कृत्यें यानें केलीं. दारूच्या धुंदींत यानें आपली आई, बहीण, आवडती राणी व शहा अब्बासचा प्रख्यात सेनापति व शिराझच्या विद्यालयाचा पाया घालणारा महात्मा इमाम कुलीखान यांचा खून केला असें म्हणतात. याच्या कारकीर्दीत उझबेगांनां खोरासान मधून हांकून लावून गिलन प्रांतांतील बंड मोडण्यांत आलें; परंतु कंदाहार शहर मोंगल बादशहाला पुनः देण्यांत आलें व सुलतान मुरादनें बगदाद शहर घेतलें. ख्रिस्ती लोकांविषयीं हा अन्यायी नव्हता. शहा सुफी १६४१ मध्यें कशन येथें मरण पावला.

दुसरा अब्बास शहाः—याच्यामागून याचा मुलगा दुसरा अब्बास गादीवर बसला. यानें वयाच्या सोळाव्या वर्षी स्वतः चाल करून कंदाहार परत घेतलें असें म्हणतात. या गोष्टीशिवाय याची इतिहासांत जास्त माहिती नाहीं. यूरोपमधील राष्ट्रांचे व फ्रेंच ईस्ट इंडिया कंपनीचे वकील याच्या दरबारीं होते. उझबेगांच्या आश्रित नायकांचा चांगला आदर करून यानें त्यांनां शांत राखलें, तुर्कस्तानशीं सलोख्यानें राहिला, जॉर्जियाच्या राजाला बंदिवान करून यानें त्याला क्षमा केली व सर्व धर्मांनां मुभा देऊन ख्रिस्ती लोकांवर विशेष मर्जी या शहानें दाखविली. हा दारूबाज व विषयासक्त होता. आपल्या पूर्वीच्या शहाप्रमाणें आपल्या नातलगाचे डोळे तापलेल्या लोखंडानें फोडण्याऐवजीं हा बुबुळेंच बाहेर काढवीत असे. हा अडतीसाव्या वर्षी सत्तावीस वर्षें राज्य करून ( १६६८ ) मरण पावला. याला याच्या पित्याच्याच मशिदींत कुम येथें पुरलें आहे.

सुलेमानः—अब्बासच्या मागून दुसरा शहा सुफी गादीवर बसला. यानें शहा सुलेमान या नांवानें फिरून राज्याभिषेक करविला. हा दुर्बल, व्यसनी व क्रूर होता. याचा समकालीन चार्डिन म्हणतो कीं, इस्पहान येथील याचा दरबार पाहून यूरोपियन राष्ट्रांचे वकील व इतर परदेशीय पाहुणे चकित झाले होते. केम्फर नांवाचा विद्वान म्हणतो कीं, हा शहाणा व धोरणी शहा होता. याच्या कारकीर्दीत उझबेगांनीं खोरासानवर फिरून स्वारी केली. किप्चाक तातारांनीं कास्पियन समुद्रकिनारा लुटला व डच लोकांनीं किश्म बेट घेतलें. हा शहा सव्वीस वर्षें राज्य करून वयाच्या एकुणपन्नासाव्या वर्षी १६९४ मध्यें मेला.

हुसेनः—क्रुसिन्स्किच्या टिपणांत सुलेमानच्यामागून गादीवर बसलेल्या हुसेन शहाची भरपूर माहिती आहे. याला वडील व धाकटा असे दोन सख्खे भाऊ व अब्बास नांवाचा सावत्र भाऊ होता. पित्याच्या आज्ञेवरून वडील भावाचा वध करण्यांत आला होता व धाकट्या भावास त्याच्या आईच्या खटपटीनें लपविण्यांत आलें होतें. अब्बास हा गादीला लायक होता; परंतु शहा निवडणारे सरदार व खोजे (कंचुकी) लोक यांचा हुसेन गादीवर बसण्यांत फायदा होता म्हणून त्यांनीं ( १६९४ ) हुसेनला शहा केलें. यानें राजवाड्यांतील दारूचीं सर्व भांडीं फोडून दारू पिण्याची मनाई केली व आणखी इतर धर्मबंधनांवरील भक्ति यानें दाखविली. हुसेनशहा व नादीरशहा गादीवर बसेपर्यंत त्याच्यामागून झालेले शहा यांची हकीकत सर क्लेमेंट्स मार्खम याच्या वर्णनावरून घेतली आहे.

लवकरच या शहावर मुल्लांचा पगडा बसला व आपल्या उत्पत्तीचा विसर पडून यानें सुफी लोकांचा छळ सुरू केला. हा चांगल्या अंतःकरणाचा पण दुर्बळ व विषयांध होता. धर्मवेड्या लोकांच्या तडाक्यांतून सुटल्याबरोबर याच्याभोंवतीं जनानखान्यांतील स्त्रियांचा गराडा पडत असे व त्यांच्या कारस्थानांचा सुळसुळाट होत असे. राज्यांत सर्वत्र वीस वर्षेंपर्यंत शांततेचें साम्राज्य नांदत होतें; परंतु हें सफाविद घराण्याचा नाश करणाऱ्या भविष्य काळांतील आपत्तींचें जणूं सूचकच होतें. यावेळीं कंदाहार व काबूलच्या डोंगराळ प्रदेशांत काटक अफगाण लोक स्वतंत्रपणें नांदत होते. यांच्या दोन शाखा होत्या—गिझनी व काबूलचे घिलझइ लोक. कंदाहार व हिरातचे सादुझइ लोक व १७०२ मध्यें शहानवाझ अथवा गुर्जिखान नांवाचा नवीन नेमलेला सुभेदार मोठ्या सैन्यासह कंदाहारला जाऊन पोहोंचला. हा हुशार व कर्तबगार पुरुष होता व कंदाहार फिरून मोंगल बादशहाच्या हवालीं करण्याचा वहीम असलेल्या अफगाण लोकांचा बंदोबस्त करण्याची आज्ञा या सुभेदारास मिळाली होती. या सुभेदारानें आपल्या जाचणीनें पुष्कळ अफगाण लोकांनां नाराज केलें होतें. मिरवाइस नांवाच्या घिलझइ नायकानें या जुलमाविरुद्ध तक्रार केल्यामुळें त्याला कैद करून इस्पहानला पाठविण्यांत आलें. हा नायक फार धूर्त होता. याला मक्केच्या यात्रेला (१७०८) जाण्याची परवानगी मिळाली. यात्रेहून परत आल्यावर त्यानें दरबारच्या लोकांचा इतका विश्वास संपादन केला कीं, त्याला स्वदेशीं जाण्याची परवानगी मिळाली. कंदाहार येथें यानें एक कट करून गुर्जिखान व त्याचे लोक यांची कत्तल करून शहर काबीज केलें, व शहाच्या दोन इराणी सैन्यांचा पराभव केला; पण तो १७१५ मध्यें मरण पावला. याच्या मागून याचा भाऊ मिर अबदल्ला अफगाणांचा राजा झाला, परंतु थोड्याच महिन्यांनीं मिर वाइसचा सर्वांत लहान मुलगा महमूद यानें चुलत्याचा खून करून राज्यपद मिळविलें.

इतक्यांत सादुझइ लोकांनीं हिरात शहरीं बंड करून १७१७ मध्यें आपलें स्वातंत्र्य जाहीर केलें; कुर्द लोकांनीं

हमदानच्या सभोंवारच्या प्रदेशावर हल्ला केला; उझबेगांनीं खोरासान उध्वस्त केला; व मस्कतच्या आरबांनीं बेहरीन बेट घेऊन बंदर अब्बासीवर चाल करण्याची धास्ती दाखविली. येणें प्रमाणें चोहोंकडून आलेल्या संकटांनीं भांबावून जाऊन शहानें इराणी आखातांतील आपला मुलूख परत मिळविण्याचा प्रयत्न केला व तो फसला.

अफगाणांची स्वारीः—या अपयशाची वार्ता इस्पहान येथें पोंहचतांच महमूदानें अफगाणांचें मोठें सैन्य घेऊन १७२१ मध्यें इराणावर स्वारी केली, व कर्मान प्रांत घेऊन इस्पहानपासून चार मजलांच्या अंतरावर येऊन थडकला. शहानें महमुदास कंदाहारला परत जाण्याबद्दल मोठी रक्कम देऊं केली परंतु त्यानें ती न जुमानतां पुढें चाल केली.

१७२२ च्या मार्चच्या ८ व्या तारखेस ५० हजार सैनिक व २४ तोफा अशा भपकेदार पोषाखाच्या इराणी सैन्यानें उन्हानें पोळलेल्या व चालून चालून थकलेल्या मूठभर अफगाण सैन्याशीं सामना केला. शहाच्या पक्षाच्या अरबांच्या वलीनें अफगाणांच्या डाव्या बगलेवर जोराचा हल्ला करून त्यांची दाणादाण केली व त्यांची छावणी लुटली. मुख्य वजीरानें शत्रूच्यां उजव्या बगलेवर हल्ला केला, परंतु त्याची दाणादाण झाली. अफगाणांनीं लागलीच इराणी तोफा काबीज करून त्यांचा मोर्चा इराणी सैन्यावर फिरविला. त्यामुळें सर्व इराणी सैन्य लढाई सोडून पळत सुटलें. अरबांचा वली इस्पहान शहरांत पळून गेला व महमूदचा जय झाला. महमूदनें इस्पहानला वेढा घातला. अन्नाच्या तुटवड्यामुळें वेढ्यांतील लोकांचे हाल होऊं लागले तेव्हां हुसेनशहा शरण आला. हुसेनशहानें आपल्या हातानें पिसाच्या तुऱ्याचें राजचिन्ह महमूदच्या पागोट्यांत खोंवलें. महमूदनें विजयोत्सवानें इस्पहान शहरांत प्रवेश केला व राजवाड्यांतील सिंहासनावर तो मोठ्या थाटानें आरूढ झाला. हुसेन यानें त्यावेळीं त्याला इराणचा शहा या नात्यानें सलाम केला. हुसेनचा मुलगा तहमास्प या गडबडींत अगोदरच पळून गेला होता. त्याला आपल्या पित्यानें राज्यत्याग केल्याचें समजतांच काझ्विन शहरीं त्यानें शहाची पदवी स्वतः धारण केली.

इराणांतील या धांदलीचा तुर्कस्तान व रशिया या देशांच्या राज्यकर्त्यांनीं फायदा घेतला. तुर्कांनीं तिफ्लिस, ताब्रिझ व हमदान हीं शहरें घेतलीं. रशियाच्या पिटर दि ग्रेटनें शिर्वान व गिलन प्रांत घेतले व अफगाण लोकांना हांकून लावण्याच्या कामगिरीबद्दल दरबांद, बाकू, गिलन, मझंदारन, व अस्त्राबाद हे प्रांत रशियाला कायमचे देण्याबद्दलचा तह दुसऱ्या तहमास्पनें १७२२ मध्यें केला.

इकडे महमूदनें १७२३ मध्यें ३०० मुख्य इराणी सरदारांना मेजवानीस बोलावून त्यांची कत्तल केली व त्यांच्या मुलांनांहि मारून टाकलें. नंतर त्यानें इस्पहानच्या हजारों नागरिकांना ठार करण्याचा सपाटा चालला. अखेरीस हें शहर बहुतेक निर्जन झालें. १७२५ मध्यें शहा सोडून राजघराण्यांतील सर्व मंडळी त्यानें राजवाड्याच्या अंगणांत जमा केली व त्यांची कत्तल उडविली. हुसेन तहमास्प व दोन मुलें फक्त या प्रसंगांतून निसटलीं असें म्हणतात. अखेरीस हा नरपिशाच्च महमूद वयाच्या सत्ताविसाव्या वर्षी १७२५ मध्यें मेला. याचे खांदे वाटोळे असून चेहरा रुंद, नाक सपाट, दाढी विरळ, व खालीं पहाणारे तिरवे डोळे होते, मान जवळजवळ याला नव्हती.

महमूदचे मागून त्याचा चुलत भाऊ अश्राफ गादीवर बसला. हा शूर परंतु क्रूर होता. यानें पदच्युत केलेल्या शहाला मुबलक वेतन देऊन सौम्य पद्धतीनें प्रजेची मर्जी संपादण्याचा यत्न केला. १७२७ मध्यें थोडा वेळ लढाई करून यानें तुर्कांशीं तह केला व सुलतानचें मुसुलमानांवरील आधिपत्य कबूल केलें. परंतु यावेळीं दुसऱ्या तहमास्पचें दैव जोरावर येऊन अफगाणांचे दिवस भरत आले होते. तहमास्पनें मझंदारन प्रांतांत लहानसें सैन्य जमविलें होतें व कजर लोकांच्या फत्तेअलिखान नांवाच्या नायकानें याचा पक्ष घेतला होता. १७२७ मध्यें नादीर कुली नांवाच्या दरोडेखोरांच्या नायकानें फत्तेअलीचा खून करून तहमास्पची मर्जी संपादन केली व स्वतः त्याच्या सैन्याचा सेनापति झाला. या गोष्टीनें भिऊन जाऊन १७२९ मध्यें अश्राफखानानें अफगाणांचें सैन्य घेऊन खोरासानवर चाल केली परंतु नादीरनें दमघान येथें त्याचा पराभव केला व इस्पहानवर चाल केली आणि शहराबाहेर अश्राफचा फिरून पराभव केला तेव्हां अश्राफ उरलेल्या सैन्यानिशीं शिराझला निघून गेला. नादीरनें शत्रूशीं लगट करून त्यांचा १७३० मध्यें अगदीं मोड केला. कंदाहारकडे एकटाच पळून जात असतांना अश्राफचा बलुची दरोडेखोरांनीं खून केला. येणेंप्रमाणें नादीरच्या कर्तबगारीनें इराणची क्रूर अफगाण लोकांच्या तावडींतून सुटका झाली.

सफाविद घराण्याचा लयः—राजनिष्ठा व्यक्त करण्यापेक्षांहि नादीरची महत्त्वाकांक्षा जास्त होती.नालायकीच्या सबबीवर नादीरनें दुसऱ्या तहमास्प शहाला १७३२ मध्यें पदच्युत करून खोरासान प्रांतांत बंदिवान म्हणून पाठवून दिलें. व नंतर नादीरच्या मुलानें त्याचा वध केला. धूर्त नादीरनें तहमास्पच्या अज्ञान मुलाला तिसरा अब्बास म्हणून गादीवर बसविलें. हें मूल १७३६ मध्यें मेलें. नंतर नादीरनें गादी पटकावली व बहुजनसमाजानें मोघानच्या मैदानावर नादीरला इराणचा शहा म्हणून मान्य केलें. सफाविद घराण्याबरोबरच इराणांतील राष्ट्रीय राजघराण्याचा शेवट झाला.

१७२८ मधील इराणची स्थितिः—क्रुसिन्स्किच्या ग्रंथांत १७२८ मधील इराणी राज्याचा विस्तार दाखविणारा नकाशा दिला आहे, त्यावरून पश्चिमेस तिफ्लिस, एरिव्हान, खोइ व बगदाद आणि पूर्वेस बल्ख व कंदाहार या शहरांचा समावेश इराणी राज्यांत होत असे; ताब्रिझ, हमदान या

प्रदेशाची लांब, रुंद पश्चिमेची पट्टी 'तुर्कांनीं जिंकलेला प्रदेश' म्हणून दाखविली आहे; आस्ट्राखानपासून मझंदारनपर्यंतच्या कास्पियन समुद्राच्या सर्व पश्चिम किनाऱ्याचा ' झारनें जिंकलेला प्रदेश' असा निर्देश केला आहे; मकरान प्रदेशाला ' स्वतंत्र लढवय्ये राष्ट्र ' म्हटलें आहे. याशिवाय अफगाण लोकांच्या ताब्यांतील प्रदेश वगळला तर खुद्द इराणी राज्याचा विस्तार किती होता व हें राज्य पूर्वस्थितीप्रत आणण्याकरितां नादीरशहाला केवढा उद्योग करावा लागला या गोष्टीची सहज कल्पना होईल.

दुसऱ्या तहमास्पनें तुर्की सुलतानाशीं तह केल्यामुळें नादीरनें त्याला पदच्युत केलें; देशांतील लढाऊ सरदारांना पत्रें लिहून त्यांची मदत मागितली व तुर्की सुलतानाला सुभेदार या नात्यानें पत्र लिहून इराणी राज्याचा प्रदेश परत देण्याचा आग्रह केला. बगदाद शहर लढवणारा टोपाल ओथमान याचा नादीरनें पराभव करून ठार मारलें परंतु हें शहर त्याला काबीज करतां आलें नाहीं. तिफ्लिस, कार्स व एरिव्हान हीं शहरें नादीरनें परत घेतलीं.

याच वेळीं रशिया व तुर्कस्तान या देशांनीं आपसांतील वैर एका बाजूस ठेवून इराणी राज्याच्या प्रदेशांची वांटणी करण्याबद्दल १७२३ मध्यें एक तह केला. या तहान्वयें असें ठरलें कीं, अस्ट्राबाद, मझंदारन, गिलन, शिर्वानचा कांहीं भाग, व दाघिस्तान हे प्रांत झारनें घ्यावें; आरास व कुर नद्यांच्या संगमापासून निघालेल्या व अर्देबिल, ताब्रिझ व हमदान या शहरांवरून कर्मानशाह शहरापर्यंत गेलेल्या रेषेनें सुलतानच्या प्रदेशाची हद्द दाखविली जावी; व हा तह मान्य केल्यास तहमास्पनें बाकीचें राज्य घ्यावें. परंतु दुर्बल इराणी राज्याला शह देणाऱ्या या दोस्त राष्ट्रांवर नादीरनें युद्धकौशल्यानें मात केली.

नादीरशहाच्या १७३६ मधील राज्यारोहणापासून १८८४ पर्यंत.

नादीरचें राज्यारोहणः— ' नव-रोझ ' म्हणजे इराणी वर्षाच्या वर्षप्रतिपदेच्या दिवशीं नादीरनें जमलेल्या सरदार व अधिकारी मंडळींना उद्देशून भाषण केलें व नंतर त्याला राजमुगुट अर्पण करण्यांत आला. सफाविद घराण्याचा गादीवरील हक्क नष्ट झाला असें समजून नादीरचा हक्क वंशपरंपरागत असावा, व सुनी पंथाप्रमाणेंच शिया पंथाच्या लोकांना पूजाअर्चा करावयास लावावी असें ठरविण्यांत आलें दुसऱ्या दिवशीं राजा व प्रजा यांमधील हा करार मंजूर होऊन, इराणचा शहा अशी नादीरची द्वाही फिरविण्यांत आली. राज्याभिषेक समारंभ काझ्विन येथें झाला, परंतु याची तारीख अनिश्चित आहे. काझ्विनहून नादीर इस्पहानला आला. लुटालूट करणाऱ्या लुटारू बखत्यारी नायकाचा खून करून त्यानें देशांत शांतता स्थापन करून नंतर कंदाहारवर स्वारी केली. एक वर्षभर वेढा दिल्यावर हें शहर शरण आलें. याचा मुलगा रिझा कुली यानें बल्ख शहर घेतलें व आक्सस नदी ओलांडून उझबेगांचा पराभव केला. राष्ट्रधर्म पदावरून शिया पंथाची उचलबांगडी केल्यामुळें नादीरशहावर सुनी पंथाचे अफगाण लोक खुष झाले होतें असें वाटतें. नादीरशहाला यावेळीं १६हजार अबदाली व घिलजइ लोक आपल्या सैन्यांत भरती करतां आले.

हिंदुस्थानवरील स्वारी.—हिंदुस्थानांत जाऊन राहिलेल्या कांहीं लोकांची मागणी करण्याकरितां नादीरशहा यानें मोंगल बादशहाकडे एक वकील पाठविला. परंतु कांहीं एक समाधानकारक उत्तर मिळालें नाहीं. उलट या वकीलास स्वदेशीं परत येतांना अडथळे करण्यांत आले. एवढें कारण नादीरशहास हिंदुस्थानवर स्वारी करण्यास पुरेसें झालें; व कांहीं पळालेल्या लोकांचा पाठलाग करतां करतां तो गिझनीहून काबूलाला गेला. हें शहर या वेळीं दिल्लीच्या महंमदशहाच्या सुभेदाराच्या ताब्यांत होतें. हा सुभेदार नादीरशहाच्या भीतीनें पेशावरास पळून गेला.नादीरशहानें तोफांचा मारा करून ( १७३८ ) हें शहर घेतलें. काबूलला त्या वेळीं हिंदुस्थानचें एक प्रवेशद्वार समजत असत. काबूलहून दिल्ली दरबारची कानउघाडणी करण्याकरितां नादीरशहानें फिरून एक वकील पाठविला परंतु जलालाबादच्या सुभेदारानें त्याचा खून करून त्याच्या लोकांस परत पाठविलें. नंतर नादीरशहानें जलालाबाद शहर घेतलें व खैबर घाटाच्या मार्गानें तो पेशावरच्या मैदानांत गेला व या ठिकाणींच त्यानें मोंगल सैन्याचा प्रथम पराभव केला. या वेळेपासून हिंदुस्थानच्या स्वारीस आरंभ झाला. कर्नालच्या लढाईत नादीरचा जय झाल्यामुळें मोंगल बादशहा शरण आला.

नादीरशहा दिल्लींत असतांना त्यानें कत्तल व लुटालूट केली ही गोष्ट इतिहासप्रसिद्ध आहे. औरंगजेबाच्या नातीशीं त्यानें आपल्या एका मुलाचें लग्न लावलें व पदच्युत केलेल्या बादशहाला फिरून विधिपूर्वक गादीवर बसविलें. १७३९मध्यें दिल्ली सोडून लाहोर-पेशावरच्या मार्गानें घाटांतून काबूलला तो गेला, व नंतर १७४०मध्यें कंदाहारहून हिरातला तो येऊन पोहोंचला. महंमदानें सिंधु नदीच्या पश्चिमेकडील सर्व प्रदेश नादीरशहास दिला. या भागांत सिंध देशाचा समावेश होत असे. मोंगल बादशहाचें प्रख्यात मयुरासन व इतर मौल्यवान वस्तु नादीरशहानें हिंदुस्थानांतून इराणांत नेल्या.

उत्तरेकडील काबीज केलेला प्रदेश.—हिरातहून त्यानें बल्ख व बुखारा या शहरांकडे मोर्चा फिरविला. उझबेगांचा राज्यकर्ता अबुल फैजखान त्याला शरण आला, तेव्हां ऑक्सस नदी ही इराणी राज्य व उझबेगांचें राज्य यांमधील सरहद्द ठरवून त्यानें अबुल फैजखानास फिरून त्याच्या गादीवर बसविलें.ख्वारिझमच्या खानानें इराणी राज्यावर वारंवार स्वाऱ्या केल्या होत्या, त्याला कैद करून नादीरशहानें त्याचा वध केला. नंतर तो किलातच्या किल्ल्यास गेला व मेशद शहर त्यानें आपल्या राज्याची राजधानी

केलें. उत्तरेस ऑक्सस नदीपर्यंत व पूर्वेस सिंधुनदापर्यंत त्यानें आपल्या राज्याचा विस्तार केला होता.

पश्चिम प्रदेशांतील लढाया.—दक्षिणेस अरबी समुद्र व इराणी आखात असल्यामुळें त्याला राज्यविस्तार करण्याच्या कामीं अडथळा झाला, परंतु पश्चिमेस त्याचा मार्ग खुला होता इब्राहिमखान नांवाच्या त्याच्या भावाचा खून केल्याबद्दल लेरिधयन लोकांवर प्रथम सूड उगवून नंतर तुर्कांवर स्वारी करण्याचा इरादा होता. परंतु पहिल्या गोष्टींत त्याला अपयश येऊन त्याचें बरेंच नुकसान झालें. तो कांहीं अफगाण लोकांच्या मदतीस गेला असतांना त्याच्यावर कोणीं गोळी झाडून त्याला जायबंदी केलें. तेव्हां या बाबतींत आपला मुलगा रिझाकुली याचें अंग असावें अशी शंका धरून नादीरनें त्याचे डोळे काढविले. या वेळेपासून या राजाच्या शौर्यास ओहोटी लागली; व तो खिन्न, जुलमी आणि शंकेखोर बनला. तुर्क लोकांवर आनायसें एक जय मिळविल्यानें त्याची कीर्ति विशेष वाढली नाहीं व लागलीच त्यानें सुलतानाशीं तह केला या तहानें इराणचा थोडासा फायदा झाला. तुर्क लोकांशीं झालेल्या आणखी एका लढाईंत डायार्बेकरजवळ शहाच्या नासिर उल्ला मिर्झा नांवाच्या धाकट्या मुलानें जय मिळविला तरी परिस्थिति विशेष बदलली नाहीं.

नादीरशहाच्या अखेरच्या दिवसांत अंतस्थ दंगेधोपे माजले. राजा खून करीत असे व प्रजाजन कट व बंडें करीत असत. कांहीं कायदेबाह्य ठरविलेल्या लोकांनीं या अर्धवट वेड्या जुलमी राजाचा खून करण्याचा कट केला. त्याच्या संरक्षकांच्या सलाहबे नांवाच्या नायकानें हा बेत तडीस नेला ( १७४७ ). मरते वेळीं याचें वय सुमारें साठ वर्षांचें होतें व यानें अकरा वर्षें राज्य केलें होतें. नादीरशहा उंच, पीळदार बांध्याचा, दांडगा सहा फुटांहून उंच व देखणा होता याचे डोळे सुंदर काळेभोर व विस्तृत होते, वर्ण तांबूस असून तोंडावर ऊन व वारा यांच्यामुळें जास्तच राकटपणा आला होता. हा दारू माफक पीत असे, साधें अन्न खात असे व प्रसंगविशेषीं फुटाणे व पाणी यांवरच आपली क्षुधा भागवीत असे.

नादीरच्या कारकीर्दींत कास्पियन समुद्राच्या द्वारें इराणशीं व्यापार खुला करण्याचा ब्रिटिश लोकांनीं प्रयत्न केला. या बाबतींत जोनास हॅन्वे व जॉन एल्टन हीं ध्यानांत ठेवण्याजोगीं नांवें आहेत, पैकीं हॅन्वेनें इराणची याकाळची अमूल्य हकीकत लिहून ठेवली आहे.

बेबंदशाहीचा काळ.—(नादीरशहापासुन कजर घराण्यापर्यंत ) नादीरशहाच्या मरणानंतर तेरा वर्षेंपर्यंत बेबंदशाही माजली होती. नादीरच्या मरणाची वार्ता कळतांच अबदाली अफगाणांचा नायक अहमदखान यानें कंदाहार घेऊन कांहीं खजीना लुटला. याच्या कर्तबगारीनें यानें अफगाणिस्तानचें स्वतंत्र राज्य स्थापलें. बख्त्यारी लोकांचा नायक रशीद कांहीं खजीना घेऊन पहाडांत पळून गेला. नादीरचा खून करणाऱ्या कटवाल्यांनीं नादीरचा पुतण्या अली यास गादीवर बसण्याकरितां बोलाविलें. प्रजेनें अलीचें स्वागत केलें. अलीनें चुलत्याचा खून करविल्याचें कबूल केलें व लोकांना शांत करण्याकरितां त्या वर्षाचा जमीन महसूल व पुढील दोन वर्षांतील इतर कर यांची सूट दिली.

आदिलशहा म्हणजे न्यायी राजा ही पदवी धारण करून हा गादीवर बसला व यानें नादीरचे मुलगे रिझा कुली व नासर उल्ला व इतर प्रतिस्पर्धी यांची कत्तल केली. रिझाचा मुलगा शहा रुख याला त्यानें जिवंत ठेवलें. याला याचा भाऊ इब्राहीम यानें पदच्युत केलें व इब्राहिमचा शहारुखच्या पक्षांतील लोकांनीं पराभव करून शहारुखला राजा केलें.

शहारुख.—हा राजपुत्र नादीरशहाचा नातू असून शिवाय आईकडून सफाविद शहा हुसेनचाहि नातू होता, त्यामुळें याला गादीवर बसण्याचा जास्त व कायदेशीर हक्क होता. हा शहा प्रेमळ, उदार व दिलदार मनाचा होता, पण आडदांड व आपसांत नेहमीं लढणाऱ्या लोकांवर राज्य चालविण्या इतका वयस्क व खंबीर नव्हता. मेशदचा मुख्य मुल्ला मिर्झा दाऊद याचा मुलगा साईद महंमद, याची आई सुलेमानची प्रख्यात मुलगी होती. यानें आपणांस राजा म्हणवून शहारुखला कैद केलें व त्याचे डोळे काढले. राजकीय सैन्याचा नायक युसफ अली यानें साइद महंमदचा पराभव करून खून केला व शहारुखला फिरून गादीवर बसविलें आणि स्वतः राजप्रतिनिधी झाला. जाफर कुर्द, मिर आलम आरब वगैरे नायकांचा संघ निर्माण झाला व या संघानें युसफ अलीचा खून करून शहारुखला फिरून कैदेंत टाकिलें. यानंतर भांडण होऊन मिर आलमला जाफरवर जय मिळाला. याच सुमारास अहमदशहा अबदाली हिरातहून इराणी खोरासान प्रांतांत आला, व मेशद काबीजकरून त्यानें मीर आलमचा वध केला, आणि अंधशहारुखला राज्य सांभाळण्याच्या कामीं मदत करण्याचें वचन स्थानिक नायकांजवळून घेऊन अहमदशहा अफगाणिस्तानांत परत गेला. परंतु यावेळेपासून हा केवळ नामधारी शहा होता व इराणवर याची कोणतीच सत्ता नव्हती.

आणखी अंदाधुंदी.—या अंदाधुंदीच्या काळांत कित्येक प्रमुख व्यक्तींनीं देशाची वांटणी केली. कास्पियन समुद्राच्या आग्नेय कोपऱ्यांत कजर लोकांची वस्ती होती. या लोकांच्या अशघा शाखेचा नायक फत्ते अलीखान यानें दुसऱ्या तहमास्पचा पक्ष उचलला होता. याचा नादीरनें खून करून युकारी नांवाच्या याच लोकांच्या एका शाखेच्या इसमास आस्ट्राबादचा अधिपती नेमलें होतें. तेव्हां फत्ते अलीखानाचा मुलगा महंमद आपल्या भावासह तुर्कोमन लोकांजवळ पळून गेला, व यांच्या मदतीनें त्यानें आस्ट्राबाद परत मिळविण्याचा प्रयत्न केला. नादीरशहा मेल्यावर गिलन

मझंदारन व आस्त्राबाद या प्रांतांचें स्वतंत्र राज्य त्यानें स्थापलें. अझरबैजन प्रांतांत नादीरशहाचा सेनापति अझादखान यानें एक राज्य स्थापिलें व बखत्यारी लोकांच्या नायकाचा भाऊ अलिमर्दान यानें इस्पहान प्रांताचा जबरीनें ताबा घेतला.

अली मर्दाननें शहा हुसेनचा पुतण्या इस्माइल यास पुढें करून स्वतः व झेंद कुर्दांचा नायक करीमखान असे दोघे इस्माइलचे वजीर बनले. शहा इस्माइलच्या हातीं कांहीं एक कारभार नसून हे दोघे सर्वस्वी सत्ताधारी होते. कालांतरानें अलीमर्दानचा खून करण्यांत आला व करीम खानानें सर्व सत्ता आपल्या हातीं घेतली. आर. जी. वॅट्सननें या काळाची हकीकत येणें प्रमाणें दिली आहेः—

तिघा प्रतिस्पर्ध्यांची लढाई.—करीम, अझाद व महंमद हसन यांनीं इराणची सत्ता कोणाच्या हातीं रहावयाची या प्रश्नाचा लढाईनें निकाल करण्याचें ठरविलें. करीम इस्पहानचा बंदोबस्त करून मझंदारनवर चालून गेला. मझंदारनचा अधिपति महंमद हसन यानें निकराची लढाई करून करीमचा पराभव केला, परंतु त्याला करीमचा पाठलाग करतां आला नाहीं, कारण अझाद अफगाण गिलन प्रांतावर चालून आला होता; परंतु हसनच्या विजयाची वार्ता ऐकून तो परत गेला. करीमनें आपलें सैन्य व्यवस्थित करून अझादवर चाल केली. तेव्हां अझादनें काझ्विन शहराच्या तटबंदीच्या आश्रयानें करीमच्या सैन्याची बरीच नासाडी केली, त्यामुळें करीम इस्पहनाला परत गेला व पुढल्या वर्षी त्यानें अझादवर फिरून चाल केली, परंतु अझादचा जय होऊन त्यानें करीमचा पाठलाग केला. करीम गरमझीर म्हणजे उष्ण प्रदेशांतील अरब यांच्या आश्रयास पळून गेला. अरब लोकांनां अफगाणांचा तिटकारा वाटत असल्यामुळें त्यांनीं अझादच्या सैन्यावर हल्ला केला. तेव्हां अझाद ताब्रिझला निघून गेला. करीमनें अरबांच्या मदतीनें आपलें नुकसान भरून काढलें व इस्पहानवर चालून गेला.

इस्पाहानहून झेंद नायक करीम यानें दुसऱ्यानें चाल केली व त्याचा कजर नायक हसन यानें फिरून पराभव केला. करीम शिराझच्या किल्ल्यांत दडून बसला व हसनला त्याला हुसकून बाहेर काढतां आलें नाहीं, तेव्हां त्यानें आपला मोर्चा अझरबैजन प्रांताकडे फिरविला. अझादच्या अंगांत हसनचा प्रतिकार करण्याची ताकद नव्हती. हसननें या प्रांतांतील महत्वाचीं सर्व ठाणीं घेतलीं, अझादनें बगदादचा पाशा व जॉर्जियाचा झार यांची मदत मागितली. परंतु त्याला यश आलें नाहीं. नंतर हसननें करीमचा निकाल लावण्याकरितां शिराझवर फिरून चाल केली. करीमनें शिराझच्या किल्ल्याचा फिरून आश्रय धरून हसनच्या सैन्यांत द्रव्याच्या लालुचीनें फूट पाडण्याच्या युक्त्या योजल्या; शिराझच्या आसपासचा मुलुख उजाड करून हसनच्या सैन्यास दाणागोट्याचा तुटवडा पाडला. हळूहळू हसनचें सैन्य त्याला सोडून गेलें, तेव्हां तो इस्पाहानला गेला व तेथें निभाव लागत नाहीं असें कळतांच नंतर मझंदारनच्या स्वतःच्या मुलखांत निघून गेला. तेव्हां करीम इस्पहानवर चालून आला व इराणांतील सर्व मुख्य शहरांवर आपला ताबा बसवून त्यानें शेख अली नांवाच्या आपल्या कसलेल्या सेनापतीची हसनचा पाठलाग करण्याकरितां रवानगी केली. हसनच्या सरदारानें बेइमानी करून मझंदारन प्रांताच्या प्रवेशद्वारांतून शत्रुसैन्याला आंत घेतलें हसनला लढाई करावी लागली व शौर्याची कमाल केली असतांहि हसनचा अगदीं मोड झाला. पळून जात असतांना हसनच्या सजातीय हाडवैऱ्यांनीं त्याचा वध केला.

यानंतर करीम खानानें खोरासान प्रांताशिवाय सर्व इराण देशावर वकील अथवा राजप्रतिनिधि या नात्यानें एकोणीस वर्षें राज्य केलें. शिराझ येथें त्यानें आपली राजधानी ठेविली व आपल्या भावांच्या मदतीनें आपली सत्ता हाणून पाडण्याचा प्रयत्न करणाऱ्या प्रत्येक इसमाचा त्यानें बंदोबस्त केला. या झेंद नायकाची कारकीर्द न्यायी व सौम्य होती. इराणी इतिहासांत हा एक निष्कलंक पुरुष होऊन गेला.

१७७९ मध्यें शिराझ शहरीं करीमखान मरण पावला. त्यानें शिराझचा बाजार व हाफीझ कवीचें थडगें बांधलें आणि सादी कवीच्या थडग्याचा जीर्णोद्धार केला. त्याचप्रमाणें त्यानें व्यापार व शेतकी या धंद्यांनां उत्तेजन देऊन इराणी आखाताच्या किनाऱ्याची बरीच काळजी घेतली व आपल्या राज्यांतील आर्मेनियन लोकांच्या कल्याणाची खबरदारी बाळगली. याच्या कारकीर्दींत ब्रिटिश वखार बंदर अब्बासीहून बुशायरला नेण्यांत आली.

झाकीः-करीमच्या मृत्यूनंतर अंदाधुंदीचा काळ फिरून सुरू झाला. याचा क्रूर व खुनशी भाऊ झाकी यानें राज्यकारभार आपल्या हातीं घेतला. करीमचा दुसरा मुलगा अबुल फत्तेखान व आपला भाऊ महंमदअली यांनां यानें आपले समाईक वारस नेमले. अबुल फत्तेखानच्या लोकांनीं शिराझचा किल्ला कपटानें आपल्या ताब्यांत घेतला. या झाकीला करीमच्या मृत्यूमुळें दोन भयंकर शत्रू उत्पन्न झाले, त्यामुळें झाकीला आपल्या विश्वासघाताचीं फळें लवकरच चाखावीं लागलीं.

आस्त्राबादच्या कजर लोकांच्या महंमद हसन नायकाचा मुलगा अगामहंमद याला नादीरशहानें कैद केलें होतें व आदिलशहानें क्रूरपणानें छिन्नविच्छिन्न केलें होतें. हा आपल्या बापाच्या मृत्यूनंतर करीमखानास शरण गेला होता व यास शिराझमध्यें नजर कैदेंत ठेविलें होतें. करीमच्या मृत्यूची बातमी ऐकतांच हा मझंदारन प्रांतांत पळून गेला व आपले जातिबांधव एकत्र करून इराणच्या गादीबद्दल झाकीशीं लढाई करण्याची त्यानें तयारी चालविली. दुसरा

शत्रु म्हटला म्हणजे झाकीचा भाऊ सादीक हा होय. यानें तुर्की सुभेदारापासून बसरा शहर जिंकून बरीच कीर्ति संपादन केली होती; व करीमच्या मृत्यूची वार्ता ऐकतांच हा आपल्या सैन्यानिशीं बसऱ्याहून शिराझवर चालून आला. झाकीनें आपला पुतण्या अली मुराद याजला निवडक सैन्यासह उत्तरेस आगा महंमदवर रवाना केलें व सादीकच्या अनुचरांचीं कुटुंबें पकडून दुसरे क्रूरपणाचे उपाय योजले; तेव्हां सादीकचे सैनिक शिराझचा वेढा उठवून सादीकला सोडून गेले, त्यामुळें सादीक कर्मान प्रांतांत पळून गेला व याठिकाणाहून त्यानें अली मुरादची मदत मागितली. ही वार्ता अलीमुरादनें आपल्या सोबत्यास कळविली, तेव्हां त्यांनीं झाकीच्या विरुद्ध लढण्याचें ठरवून अलीमुरादलाच आपला धनी बनविलें. अली मुराद आगा महंमदचा पाठलाग सोडून देऊन इस्पहानला परत आला व करीमखानाच्या वडील मुलास सादीकचा वारस बनविण्याचा आपला उद्देश आहे असें दर्शवितांच इस्पहानच्या लोकांनीं अली मुरादचें संतोषानें स्वागत केलें. आपल्या पुतण्याच्या या कृत्यामुळें चिडून जाऊन झाकी शिराझहून इस्पहानवर चालून गेला; वाटेंत तो येझिदकास्त शहरीं थांबला व तेथील नागरिकांजवळ एक मोठी रक्कम त्यानें मागितली व त्यांनीं ती देण्याचें नाकारतांच अठरा प्रमुख नागरिकांचा त्यानें कडेलोट केला. तेव्हां एकाएकीं लोकांचा कट होऊन झाकीला ठार मारण्यांत आलें ( १७७९ ).

अली मुरादः—झाकीच्या मृत्यूचें वर्तमान कर्मान प्रांतांत पोंहोचतांच सादीकखान त्वरित शिराझला आला व अबुलफत्तेखानला नालायक ठरवून स्वतः राजा बनला. अली मुरादवर पाळत ठेवण्याकरितां त्यानें आपला पुत्र जाफर यास इस्पहानचा सुभेदार नेमून पाठविलें व अली नाकी नांवाच्या धाकटया मुलास रणांगणावरील सैन्याचें आधिपत्य दिलें. पण अली मुरादनें शिराझ काबीज केलें व सादीकचा वध करवून स्वतः गादीवर बसला असा अखेरचा लढाईचा निकाल झाला.

माल्कमच्या संक्षिप्त इतिहासावरून या काळापासून आगा महंमदाच्या राज्यारोहणापर्यंत घडलेल्या ठळक ठळक गोष्टींची माहिती होईल.

अली मुरादनें १७८५ पर्यंत इराणचें राज्य केलें, व आगा महंमदाचा मझंदारन प्रांतांत कित्येक वेळां पराभव करून तेहरान व सारी हीं शहरें त्यानें घेतलीं होतीं. तेहरानहून इस्पहानला येत असतांना हा मरण पावला. याच्या मागून सादीकचा मुलगा जाफर हा शिराझ येथें गादीवर बसला. हाजि इब्राहिम नांवाचा कर्तबगार परंतु उलटया काळजाचा मुख्य न्यायाधीश या राजांस राज्यकारभारांत मदत करीत असे. याविरुद्ध कट होऊन याला विषप्रयोग करण्यांत आला व कटवाल्यांपैकीं एकजण ( सय्यद मुराद ) गादीवर बसला. हाजी इब्राहिमनें प्रजेचें इमान ब्रँद राजांविषयीं कायम राखून मुरादला ठार मारविलें व जाफरचा मुलगा लतफ अलीखान याला राजा बनविलें. हाजी इब्राहिम राजाचा मुख्य सल्लागार बनला. गादीवर बसतेवेळीं लतफ अलीचें वय वीस वर्षांचें होतें. हा फार सुंदर, उंच, मनोहर व घोड्यावर बसण्यांत पटाईत होता. हा गादीवर बसून थोडे दिवस लोटले नाहींत तोंच आगामहंमदनें शिराझला वेढा दिला. परंतु लवकरच तो आपल्या प्रांताची राजधानी तेहरान या शहराला परत गेला. यानंतर कांहीं काळपर्यंत शांतता राहिली. नंतर १७९० मध्यें यानें आपलें सैन्य जमवून कजर लोकांवर इस्पहान मार्गानें चाल केली. परंतु हाजी इब्राहिमनें लतफ अलीविरुद्ध त्याचे अधिकारी सैनिक व त्याचा शत्रु आगा महंमद यांशीं कारस्थान केलें. त्यामुळें लतफ अलीचें सर्व सैन्य त्याला सोडून गेलें, तेव्हां तो शिराझला परत आला; परंतु हाजी इब्राहिमनें शहरचे दरवाजे बंद केले. लतफ अली बुशायरला गेला तेव्हां त्यास आढळून आलें कीं त्या शहराचा शेख देखील त्याच्या विरुद्ध पक्षास मिळाला होता. नंतर लतफनें धैर्यानें हल्ला चढवून बुशायर शहर घेतलें व शिराझला वेढा दिला. त्याच्या शौर्यामुळें त्याला बरेच साथीदार मिळाले व १७९२ मध्यें त्यानें त्याच्यावर चालून आलेल्या एका कजर सैन्याचा देखील पराभव केला.

नंतर स्वतः आगा महंमद लतफवर चालून आला. शिराझजवळ मर्दश्त येथें त्यानें तळ दिला. काळोखांत थोड्याशा लोकांसह लतफनें आगाच्या सैन्यावर हल्ला केला, त्यामुळें आगाच्या सैन्याची अगदीं दाणादाण उडाली परंतु आगानें प्रसंगावधान राखून प्रभात होतांच आपल्या तंबूंतून प्रातःकालचा निमाज पढण्याकरितां आपल्या लोकांस ओरडून हांक मारण्यास एका अधिकाऱ्यास (मुअझिन) फर्माविलें, तेव्हां कजर सैन्य परत आलें असा ब्रँद घोडेस्वारांचा समज होऊन ते पळत सुटले व आगा महंमदाचा अनायासें जय झाला. यानें शिराझमध्यें प्रवेश करून विश्वास घातकी हाजी इब्राहिमला आपला वजीर नेमलें. लतफ अलीखानानें खोरासान प्रांतांतील ताब्बासच्या नायकाच्या आश्रयानें कांहीं सैन्य गोळा करून फार्स प्रांतावर चाल केली, परंतु त्याचा पराभव होऊन त्याला कंदाहारला पळून जावें लागलें.

कर्मान शहर पाडाव केलें:—१७९४ मध्यें गादी परत मिळवावयाची अथवा मरावयाचें या इराद्यानें लतफअली इराणी हद्द ओलांडून आला व त्यानें कर्मान शहर घेतलें. आगा महंमदनें कर्मानला १७९५ मध्यें वेढा दिला. बराच वेळ निकरानें लढून शहराच्या वेशी विश्वासघातानें उघडण्यांत आल्या. तेव्हां लतफ अलीनें तीन तासपर्यंत रस्त्यांत लढून शौर्याची कमाल केली, परंतु कांहीं फायदा झाला नाहीं. अखेरीस तीन सोबत्यांसह कजर सैन्यांतून लढून त्यानें मार्ग काढला व बाम-नर्मशीर प्रांतांत तो पळून गेला.

शत्रू निसटून गेल्यामुळें चिडून जाऊन आगानें सरसकट कत्तल करण्याचा हुकूम सोडला. २०,००० बायका व मुलें यांना गुलाम म्हणून विकलें व कर्मानच्या ७०,००० रहिवाशांचे डोळे काढून त्यांचा आगा महंमदापुढें ढीग घालण्यांत आला.

लतफअली बाम शहरांत दडून बसला, परंतु तेथील सुभेदारानें आगाची मर्जी प्रसन्न करण्याकरितां लतफ घोड्यावर स्वार होत असतांना त्याच्यावर पुष्कळ लोकांनिशीं हल्ला केला. घायाळ होऊन लतफ पकडला गेला व त्याची आगाकडे रवानगी करण्यांत आली, तेव्हां अंगावर शहारे आणण्या इतके लतफचे हाल करून त्याला आगानें ठार मारलें. लतफचे सोबती व त्याच्या घराण्यांतील सर्व इसमांची कत्तल उडविण्यांत आली, व येणेंप्रमाणें इराणांतील उत्कृष्ट व कुलीन लोकांचा वध करून विजयी नराधम आगा महंमद यानें कजर घराण्याचा पाया घातला.

कैयानियन राज्यांच्या वेळेपासून चालत आलेल्या लाक लोकांच्या एका शाखेला झेंद म्हणत असत. झरथुष्ट्रानें झेंद ग्रंथाचें जतन करण्याचें काम आपल्याकडे सोंपविलें होतें असें हे लोक म्हणत. मार्खमनें लिहिलेल्या इतिहासाच्या या घराण्याविषयींच्या खंडांतील वंशवृक्षांत आठ पुरुषांचीं नांवें दिलीं आहेत. त्यांपैकीं चार भाऊ होते. एका भावास फक्त एक मुलगा व दुसऱ्या भावास एक मुलगा, एक नातू व एक पणतू होता. या आठांपैकीं चारांची कत्तल झाली होती, एकाचे डोळे काढण्यांत आले होते व एकाचें शरीर छिन्नविच्छिन्न करण्यांत आलें होतें. एकेवेळीं एका भावानें दुसऱ्या भावास मारलें होतें व दुसऱ्या प्रसंगीं चुलत्यानें पुतण्याचे डोळे काढले होते.

**कजर घराणें.**—आगा महंमदासारखा दुष्ट व खुनशी, जुलमी राजा आजवर होऊन गेला नाहीं. परंतु यूरोप व जगांतील इतर देश यांना आपल्या राज्याविषयीं वोज वाटावा अशी खबरदारी तो राखीत असे; व आपल्या पूर्व वयांत मझंदारन प्रांतांत रशियन अधिकाऱ्यांशीं वारंवार संघटण घडल्यामुळें रशियन लोकांविषयीं त्याच्या मनांत दृढ अविश्वास उत्पन्न झाला होता.

फॉर्स्टर नांवाचा प्रवाशी म्हणतो कीं, आगा महंमद हा हिंदुस्थानांतील रजपूत लोकांप्रमाणें नेहमीं सशस्त्र असणाऱ्या कजर लोकांचा नायक होता व त्याच्या आधिपत्याखालीं मझंदारन, आस्ट्राबाद हे प्रांत व खोरासान प्रांतांतील कांहीं जिल्हे यांचा समावेश होत असे. गिलन प्रांत मात्र त्याच्या ताब्यांत नव्हता.

**जॉर्जियावरील स्वारीः**—जसजशी आगाची सत्ता वाढत चालली तसतसें रशियन लोकांविषयीं वाटत असलेल्या त्याच्या द्वेषास जास्त व्यावहारिक स्वरूप प्राप्त होत चाललें. लतफ अलीवर जय मिळविल्यावर आगानें जॉर्जियावर स्वारी केली. नादीरशहाच्या मृत्यूनंतर जॉर्जियाचा वली हेराक्लियस यानें इराणचें वर्चस्व झुगारून देऊन रशियाची राणी कॅथराईन हिच्याशीं तह केला, व तो रशियाचा अंकित बनला. आगानें हेराक्लियसला इराणचा अंकित होण्यास आज्ञा केली व त्यानें तसें करण्याचें नाकारल्यावरून ६०,००० सैन्याच्या तीन तुकड्या करून आगानें एक तुकडी डागेस्तान प्रांतावर, दुसरी एरिव्हान शहरावर व तिसरी शुशा शहरावर पाठविली. जोराचा प्रतिकार झाल्यामुळें शुशाचा वेढा सोडून आगा एरिव्हानच्या सैन्यास जाऊन मिळाला व तेंहि सोडून तो पहिल्या तुकडीस जाऊन मिळाला व गुंजा (अर्वाचीन एलिसावेत्पोल) येथें हेराक्लियसच्या सैन्याचा मोड करून त्यानें तिफ्लिस शहर घेतलें. नंतर तो विजयोत्सवानें तेहरानला परत आला व तेथें त्याला जाहीर रीतीनें इराणचा शहा म्हणून राज्याभिषेक झाला. एरिव्हान शहर शरण आलें; यामुळें रशियाला लढाई करावी लागली. डरबेंट, बाकू व शुमाखी हीं ठाणीं घेतलीं गेलीं, परंतु इतक्यांत रशियाची राणी मेल्यामुळें लढाई बंद पडली.

**खोरासान प्रकरण.**—इकडे आगाला खोरासानकडे लक्ष द्यावें लागलें. हा प्रांत शहारुखच्या ताब्यांत केवळ नांवाला होता. या प्रांताचा पूर्वेकडील भाग अफगाणांच्या ताब्यांत होता. मेशद शहरांत होणारीं बंडें व या प्रांतावर होणारे परकी लोकांचे हल्ले यांचा शहारुखला बंदोबस्त करतां येत नसे. जॉर्जियावरील स्वारीवरून परत आल्यावर आगा मेशदवर चालून गेला. त्यानें जाहीर रीतीनें शिया पंथ स्वीकारला होता. लढाई न करतां आगाला मेशद शहरांत प्रवेश करतां आला. इमाम रिझाच्या थडग्याजवळ पायीं चालत जाऊन आगानें तेथें गुडघे टेकले व आपण कट्टा शिया असल्याचें दर्शविलें. नंतर खजीना, व जवाहीर लपवून ठेविलें होतें ती जागा दाखवावी म्हणून शहारुखचा क्रूरपणें छळ करण्यांत आला व त्याला हद्दपार करण्यांत आलें. शहारुख दमघान येथें मरण पावला. मेशद येथें १२ हजार शिपायांची शिबंदी ठेवून सर्व खोरासान प्रांत खालसा केला.

**आगा महंमदचा मृत्यु व स्वभाव.**—यानें तेहरान शहरीं आपली राजधानी ठेविली. कास्पियन समुद्राच्या पश्चिमेकडील आगानें जिंकलेल्या प्रदेशावर रशियन लोकांनीं फिरून स्वारी केली. १७९७ मध्यें आगाशहानें आपल्या सैन्यानिशीं आरास नदीकडे मोर्चा फिरविला. रशियन लोक निघून गेले होते, तरी त्यांनीं टॅलिश पर्यंतचा दक्षिणेकडील प्रदेश परत घेतला होता. नदी ओलांडून शुशा शहर आगानें काबीज केलें व तेथें तळ देऊन राहिला असतां त्याच्या सेवकांनींच त्याचा खून केला. मरतेवेळीं याचें वय सत्तावन वर्षांचें होतें. राज्याभिषेकानंतर यानें सुमारें एक वर्षच राज्य केलें.

आदिलशहाच्या वेळीं तरुण आगाला क्रूरपणें वागविण्यांत आल्यामुळें व त्याचे शत्रू त्याला 'नपुंसक' या

नांवानें चिडवीत असल्यामुळें आगाचा स्वभाव असा क्रूर झाला होता. परंतु ऐषआरामाचा कंटाळा, डामडौल न दाखविणें, व्यापाराची वृद्धी व सैनिकांची निगा वगैरे वाखाणण्यासारखे गुण याच्या अंगीं होते, परंतु हा मेल्यावर अमानुष जुलमाबद्दलचीच कीर्ति याच्या मागें शिल्लक राहिली. दाढी नसल्यामुळें याचा चेहरा सुरकुत्या पडलेल्या एखाद्या म्हातारीप्रमाणें दिसत असे. याच्या तोंडावर आनंदाची छटा कधींहि झळकत नसे. आपल्या तोंडाकडे कोणी पाहिल्याचें त्याला कधींहि खपत नसे.

फत्तेअली शहाः—आपला सख्खा भाऊ हुसेन कुली खान याचा मुलगा फत्ते अलीशहा यानें आपल्या पश्चात गादीवर बसावें असें आगानें ठरविलें होतें. आगाचा खून झाल्यावर कांहीं काळ अंदाधुंदी माजली होती. आगाच्या प्रेताची विटंबना करण्यांत आली. नवीन जिंकलेला किल्ला सोडून देऊन सैन्यांत गडबड उडाली होती; परंतु वजीर हाजी इब्राहिमनें स्वामीभक्त राहून तो मोठ्या सैन्यानिशीं राजधानीवर चालून गेला व मिर्झा महंमद खानानें शिराझहून फत्तेअलीशहा येईपर्यंत तेहरानच्या वेशी बंद करून टाकिल्या. १७९८ मध्यें फत्तेअली शहाला राज्याभिषेक झाला. यानंतर बरींच बंडें झालीं, पैकीं तीन मुख्य होतीं.(१)सादिक खान शकाकी नांवाच्या एका सेनापतीच्या सैन्याचा काझ्विन येथें पराभव करण्यांत आला, परंतु राजाचें जवाहिर त्याच्या ताब्यांत असल्यामुळें त्याला क्षमा करण्यांत आली. परंतु राजाची त्याजवर गैरमर्जी झाल्यावरून त्याला तुरुंगांत भिंतींत चिणून ठार मारण्यांत आलें. (२) आगाचा भाऊ हुसेन कुली खान याच्या बंडाचा आईच्या मध्यस्थीनें निकाल लावला गेला. (३)झाकीखान झेंद याचा मुलगा महंमद यानें बंड केलें होतें. परंतु त्याचा अनेक वेळां पराभव होऊन तो तुर्क राज्यांत पळून गेला. आगा महंमद मेशदला जाण्यापूर्वी शहारुखचा मुलगा नादीर मिर्झा अफगाणांच्या आश्रयास पळून गेला होता. त्याला फत्ते अलीनें बजाविलें असतांहि त्यानें खोरासानवर चाल केली होती. फत्ते अली निशापुर व टर्बेट हीं शहरें घेऊन मेशदला जाऊन पोंहोचला, तेव्हां नादीर मिर्झा शरण आला. नादीरच्या मुलीशीं एका कजर नायकाचें लग्न लावून समेट करण्यांत आला.

रशियाशीं युद्धः—फत्ते अली शहा बत्तीसाव्या वर्षी गादीवर बसला व छत्तीस वर्षे राज्य करून अडुसष्टाव्या वर्षी मरण पावला. इराणचा मुख्य उद्देश सफाविद राजांच्या वेळच्या या राज्याच्या वायव्य व ईशान्य सरहद्दी परत मिळविण्याचा होता, परंतु बलाढ्य यूरोपियन राष्ट्रांची हद्द या राज्याच्या हद्दीस भिडलेली असल्यामुळें ही गोष्ट साध्य करणें सोपें काम नव्हतें. आपल्या कारकीर्दीच्या प्रारंभीं फत्ते अलीनें कास्पियन समुद्राच्या पश्चिम बाजूवर रशियाशीं लढाई केली, ही नित्याची व त्रासदायक लढाई झाली. जॉर्जिया मुसुलमानी सत्तेखालीं पुन्हां कधींहि येणार नव्हता हें स्पष्ट होतें. १८०० मध्यें या देशाचा झार जॉर्ज यानें रशियाचा पक्ष घेतला; परंतु याचा भाऊ अलेक्झांडर यानें या कृत्याचा निषेध केला. जनरल लॅझेरोव्हनें त्याचा पराभव केला, म्हणून इराणनें पुन्हां लढाई सुरू केली. इराणच्या सैन्याचें आधिपत्य युवराज अब्बास मिर्झा याच्या कडेस होतें व रशियन सैन्याचा सेनापति जनरल झिझियानोव्ह हा होता. एक्मियाझिन येथें तीन दिवस चालणारी लढाई, रशियन सेनापतीचे एरिव्हान शहर घेण्याचे निष्फळ प्रयत्न, अब्बासचो शिशाह शहरावर चाल व एरिव्हान शहर घेणें, रशियन लोकांची गिलन प्रांतावरील निरर्थक चढाई, झिझियानोव्हचा बाकूच्या इराणी सुभेदारानें केलेला खून, शुशाच्या इराणी नायकाची रशियन शिबंदीनें केलेली कत्तल वगैरे गोष्टी या युद्धांत घडल्या. रशियन लोकांना सैन्यबल, मुबलक पैसा व तोफखाना अशा तीन गोष्टी इराण्यांपेक्षां जास्त होत्या. इराणी लोक निकरानें लढले. विजयश्री उभय पक्षांच्या गळ्यांत आळीपाळीनें माळ घालीत असे. शिर्वान प्रांतांत आपल्या लष्कराचा मांड मोडून अब्बास मिर्झा कांहीं एक प्रगति न करतां ताब्रिझला परत आला. रशियनांनीं मात्र टर्बेट, बाकु, शिर्वान, शेकी, गंज, टालिश व मुगन या प्रांतांचा ताबा मिळविला. परंतु रशियन गव्हर्नर—जनरलचें तहाचें बोलणें इराणी लोकांनीं मान्य केलें नाहीं.

रशियाशीं इराणची लढाई पुन्हां सुरू झाली व १८१२ मध्यें इराणी दरबारांतील ब्रिटिश वकिलानें तह घडवून आणण्याचा प्रयत्न केला पण तो निष्फळ झाला. ख्रिस्ती व लिंड्से नांवाचे ब्रिटिश अधिकारी इराणी सैन्यावरोबर होते. शत्रूंनीं अचानक छापे रात्रींच्या वेळीं घालून इराणी सैन्याची दाणादाण केली. ख्रिस्ती मारला गेला, लेंकोरन ठाणें इराणी लोकांनीं घेतलें, परंतु रशियानें तें परत मिळविलें. इराणी दरबारांतील ब्रिटिश वकील सर जॉर्ज आउस्ले यानें गुलिस्तानचा तह १८१३ मध्यें करवून या लढाईचा निकाल लावला. इराणनें जॉर्जिया व वरील सात प्रांत व कारवाक रशियाच्या हवालीं केलें.

१८२५ मध्यें अलेक्झांडर झार मेल्यावर इराण व रशियामधील ठरलेल्या सरहद्दीच्या लढ्यांचा निकाल लावण्याकरितां राजपुत्र मेन्शीकोव्ह तेहरानला आला होता. परंतु त्यावेळेस रशियाच्या ताब्यांत असलेल्या एका जिल्ह्याबद्दलची इराणची मागणी कबूल न केल्यामुळें रशियन वकिलास निरोप देण्यांत आला व लढाई सुरू झाली. तालीशच्या नायकानें लेंकोरनहून रशियनांस हांकून लावून लढाईचा ओनामा केला. यानंतर सर्वत्र इराणी लोकांचा जय झाला व शिर्वान, बाकू व शेकी प्रांतांचे वंशपरंपरागत नायक इराणी सैन्याच्या मदतीस धांवून आले; आणि शुशाचा छोटा किल्ला एवढेंच ठाणें रशियाच्या ताब्यांत

राहिलें, परंतु लागलीच लढाईचें पारडें फिरलें. अब्बास मिर्झाचा पुत्र महंमद मिर्झा याचा ऋेसम नदीवर रशियन सैन्यानें पराभव केला, अब्बासच्या सैन्याची गंज येथें धूळधाण उडविण्यांत आली; शहानें लढाई चालू ठेवण्याचे अटोकाट प्रयत्न केले, परंतु अब्बासच्या सैन्यांत फार दुफळी माजली होती. एरिव्हान व नाखिचेव्हान प्रांत व लढाईचा खर्च रशिया मागत असल्यामुळें इराणचें तहाचें बोलणें वायफळ झालें; व १८२७ मध्यें लढाई फिरून सुरू झाली. ठाणीं घेणें व सोडणें असा प्रकार होतां होतां रशियनांनीं इराणचीं एरिव्हान व ताब्रिझ हीं शहरें घेतलीं. अखेरीस ब्रिटिश वकील मॅक्डोनल्ड याच्या मध्यस्थीनें तुर्कमंचैचा तह होऊन रुसो–इराणी सरहद्द मुक्रर करण्यांत आली. या तहान्वयें एरिव्हान नाखिचेव्हन प्रांत रशियास कायमचे द्यावे लागले, इराणला कास्पियन समुद्रावर लढाऊ जहाज बाळगण्याची मनाई करण्यांत आली व ३० लक्ष पौंड युद्धखर्च द्यावा लागला.

इंग्लंड, हिंदुस्थान व फ्रान्स या देशांशीं इराणचा संबंधः—मुंबईच्या ब्रिटिश गव्हर्नरचें शहाला पत्र घेऊन महादी अलीखान नांवाचा इसम बुशायर येथें आला. त्याच्या पाठोपाठ हिंदुस्थानच्या गव्हर्नर–जनरलकडून कॅप्टन माल्कम नांवाचा वकील आला. यानें अफगाण व फ्रेंच लोक आणि इराणी आखातांतील व्यापार यांविषयीं बोलणें लावलें. अखेरीस व्यापार व राजकारण या बाबतींत एक तह घडून आला व इराणच्या शहाकडून एक मिशन हिंदुस्थानला पाठविण्यांत आलें. १८०१ मध्यें बगदादचा एक आर्मेनियन व्यापारी नेपोलियन बादशहाचीं पत्रें घेऊन आला परंतु त्यावर विश्वास ठेवला गेला नाहीं. पांच वर्षांनीं जॉबर्ट तेहरानला आला, याच्या बरोबर इराणी वकील यूरोपांत गेला व फ्रेंच बादशहाशीं फिंकेन्स्टन येथें तह झाला. इराणी वकील परत आल्यावर जनरल गार्डेन व आणखी कांहीं अधिकारी यांचें मिशन इराणी लष्करास कवाईत शिकविण्याकरितां आलें या कारणामुळें ब्रिटिश सरकारनें सर हारफोर्ड जोन्सला पाठविलें. हा मुंबईस १८०८ मध्यें येण्यापूर्वीच हिंदुस्थानच्या गव्हर्नर–जनरलनें माल्कमला इराणांत पाठविलें होतें.

सर हारफोर्ड १८०९ मध्यें इराणच्या राजधानीस जाऊन पोंहोचला. या पूर्वीच, फ्रान्स व रशियामध्यें टिल्सिटचा तह झाल्यामुळें जनरल गार्डेनला बडतर्फ करण्यांत आलें होतें. सर हारफोर्डनें इराणशीं तह केला. हिंदुस्थान सरकारनें या कृत्यामुळें तृप्त न होतां माल्कमला १८१० मध्यें फिरून पाठविलें. यानें कांहीं तोफा व इराणी सैन्यास कवाईत शिकविण्याकरितां ख्रिस्ती, व लिंडसे हे अधिकारी शहाच्या स्वाधीन केले. शहानें माल्कमचें स्वागत केलें; नंतर एक महिन्यानें माल्कम हिंदुस्थानला परत गेला. १८११ मध्यें हारफोर्डच्या जागीं सर जॉर्ज आउस्ले हा ब्रिटिश वकील होऊन आला.

१८१४ मध्यें सर आउस्ले परत आला व मि. एलिस आणि मि. मोरिअर यांनीं ग्रेटब्रिटनच्या वतीनें तेहरानचा तह केला. या तहानें इराणनें उपस्थित न करतां इराणवर परकी स्वारी झाली तर इंग्लंडनें इराणला सैन्य अथवा पैसा पुरवावा आणि इराणनें अफगाण लोकांनीं हिंदुस्थानवर स्वारी केल्यास त्यांच्यावर हल्ला करावा असें ठरलें. १८१५ पासून ग्रेटब्रिटनचा एक वकील इराणच्या दरबारी नेहमीं असतो. फत्ते अली शहाच्या कारकीर्दीत हेन्री मार्टिननें इराणांत राहून नव्या करारांचें इराणी भाषेंत भाषांतर केलें. १८२८ मध्यें रशियन वकील एम् ग्रेबायडोव्हचा तेहरान येथें खून झाला. त्यामुळें समेट घडवून आणण्याकरितां इराणच्या युवराजाचा पुत्र व इतर इराणी उमराव यांचें मिशन सेंट पिटर्सबर्गला पाठविण्यांत आलें व तह होऊन रशियाशीं दोस्ती करण्यांत आली; आणि इंग्लंडचें इराणी दरबारांतील वजन हलकें पडलें

तुर्कस्तानशीं लढाईः—पश्चिमेस इराण व तुर्कस्तान या दोन राज्यांची सरहद्द एक होती. १८०४–१८०५ मध्यें तुर्की सुलतानानें काळया समुद्राच्या आग्नेय किनाऱ्यावरून रशियन सैन्यास इराणी सैन्यावर चाल करण्यास मार्ग खुला केला होता. शहाचा वडील मुलगा महंमद अली मिर्झा व बगदादच्या सुभेदाराचा जांवई सुलेमान पाशा यांच्यामध्यें चकमक झाली होती. १८२१ मध्यें इराणी यात्रेकरू व व्यापारी यांच्या कागाळया व सरहद्दीवरील भांडणें यामुळें परमावधी होऊन लढाई सुरू झाली. अब्बास मिर्झानें टोप्राक, कलाह व आक सराई हीं तुर्कांचीं तटबंदीचीं ठाणीं घेऊन तुर्की सैन्याचा मोड केला व मुश, बिटलिस व इतर ठाणीं यांवर हल्ला चढविला. तुर्की सैन्यानें दक्षिणेस इराणी सरहद्दीवर स्वारी केली. तुर्की सैन्याचा अधिपति बगदादचा पाशा याचा महंमद अली मिर्झानें पराभव करून बगदादपर्यंत चाल केली. इराणी सैन्यांत पटकीचा रोग उद्भवल्यामुळें महंमद अली इराणी सरहद्दींत परत आला व किर्रिंडच्या घाटांत मृत्युमुखीं पडला. स्वतः शहा हमदानावर चाल करून आला; परंतु पटकीचा आजार सुरू झाल्यामुळें इराणी सैन्य निघून गेलें.

उत्तरेस असाच एक रोग उद्भवल्यामुळें अब्बासची प्रगति थांबली व लढाई बंद पडली. चार महिन्यानंतर एरिव्हानच्या सरदारानें अर्झरूमच्या रस्त्यावरील एक तुर्की लष्करी ठाणें घेतलें व अब्बासनें आपल्याहि पेक्षां मोठ्या तुर्की सैन्याचा अगदीं मोड केला. अब्बास अर्झरूमच्या पाशाशीं तहाचें बोलणें लावून इराणी हद्दींत निघून आला. परंतु बगदादमध्यें कांहीं गडबड असल्यामुळें दीडवर्षपर्यंत हें बोलणें लांबणीवर पडलें. अखेरीस १८२३ मध्यें अर्झरूमच्या तहानें या लढाईचा शेवट लागला. इराणी प्रवाशी व यात्रेकरू

यांपासून बळजबरीनें कर वसूल करणें, राजघराण्यांतील व इतर कुलीन स्त्रियांचा मक्केच्या यात्रेला जातांना होणारा अपमान, बेकायदेशीर जकात वसुली व कुर्द दरोडेखोरांनां शिक्षा न देणें या लढाई उपस्थित करणाऱ्या गोष्टी पुन्हां घडून येऊं नयेत अशी व्यवस्था या तहानें करण्यांत आली.

अफगाण प्रकरणः—इराणी राज्याच्या पूर्वसरहद्दीबद्दल अफगाण लोकांशीं इराणला लढाई करावी लागली; परंतु अफगाण लोक रशियन लोकांप्रमाणें चिकाटीचे नव्हते किंवा तुर्कांप्रमाणें उच्छृंखल दोस्तहि नव्हते. बलाबलाच्या मानानें इराणी लोकांप्रमाणें जरी अफगाण लोक होते, तरी त्यांना व्यवहारज्ञान व अनुभव नव्हता. शिवाय राष्ट्राभिमान व स्वदेशभक्ति या दोन गुणांचा लोप होऊन अफगाणिस्तानांतील राजघराण्यांत फूट झाली होती.

नादीरशहाच्या वंशांतील हद्दपार केलेल्या शहा रुखचा पुत्र नादीर मिर्झा याच्या बंडामुळें शहाचें लक्ष खोरासान प्रांताकडे वेधलें होतें हें अगोदरच सांगितलें आहे, व इराणी शिबंदीमुळें जरी मेशदमध्यें तात्पुरती शांतता प्रस्थापित झाली होती तरी नादीर मिर्झाविषयीं फिरून कागाळ्या आल्या होत्या. हात तोडणें, जीभ कापणें वगैरे घोर उपायांनीं याचा बंदोबस्त करण्यांत आला. अफगाण लोकांनीं नादीर मिर्झाचा पक्ष कधींहि नेटानें उचलून धरला नव्हता किंवा खोरासान प्रांतावरील इराणच्या शहाच्या स्वामित्वाचा कधींहि स्पष्टपणें प्रतिकार केला नव्हता असें आढळून येतें. परंतु नादीरच्या मृत्यूपासून इराणी राज्याचा नांवाला एक प्रांत याशिवाय इराणचा या प्रांतावर कधींहि भारी पगडा नव्हता. १८३० मध्यें रशियाच्या सल्लयानें इराणी शहानें आपल्या राज्याच्या पूर्वेकडील सर्व बंडखोर नायकांचा बंदोबस्त करण्याकरितां मोठें सैन्य जमविलें. येझ्द व कर्मानवर हल्ला करून खोरासानमध्यें प्रवेश करण्यांत आला. अब्बासच्या सैन्यानें बरीच निकाराची लढाई करून व प्राणहानि सोसून कूचान, सेराखस वगैरे कित्येक किल्ले व ठाणीं काबीज केलीं. व स्वारीचा इष्ट हेतु बहुतेक तडीस नेला.

तैमूरशहाचा मुलगा हाज्जी फिरुझुद्दिन हा १८००-१८१६ पर्यंत अव्याहतपणें हिरात शहरावर राज्य करीत होता हा व याचा भाऊ महमूद फत्तेअली शाहाच्या राज्यारोहणापासून इराणी छत्राखालीं होते. इराण हिरातवर नादीरशहाच्या राज्याचा भाग म्हणून हक्क दाखवीत असे आणि खंडणी अथवा उडवाउडवीचीं उत्तरें देऊन प्रसंग निभवून नेण्यांत येत असे. यावेळीं जेव्हां इराणी सैन्यानें हिरातवर चाल केली तेव्हां फिरुझुद्दिननें आपला भाऊ काबूलचा शहा महमूद याची मदत मागितली व त्यानें फत्तेखान बरकझाइ नांवाच्या विख्यात वजीराला पाठवून दिलें. या वजिरानें कारवाईनें किल्ला व शहर आपल्या कबज्यांत घेऊन इराणी सैन्यास इराणी हद्दींत हांकून लावलें. मुस्तफाखानानें तात्पुरता हिरातचा कबजा घेतला होता, त्याच्या विनंतीवरून १८२४ मध्यें इराणी सैन्य हिरातवर पाठविलें होतें, परंतु लांच देऊन हें सैन्य परत पाठविण्यांत आलें. यानंतर आठ नऊ वर्षांनी अब्बास मिर्झानें मेशदमध्यें असतांना हिरातच्या यार महंमद खानास समेट करण्याकरितां बोलावलें होतें परंतु त्याचा कांहीं एक परिणाम न होता अब्बासचा पुत्र महंमद मिर्झा यानें इराणी सैन्यासह हिरातवर चाल केली परंतु अब्बासच्या मृत्युमुळें महंमद मिर्झा मेशदला परत आला.

फत्तेअली शाहाचें कुटुंब मोठें होतें. यानें आपला दुसरा मुलगा अब्बास मिर्झा यास गादीचा वारस नेमलें होतें. हा पित्याच्या हयातींत वारल्यामुळें अब्बासचा मुलगा महंमद मिर्झा याला शहानें आपला वारस नेमलें होतें.

महंमदशहाः—हा शहा १८३४ मध्यें गादीवर बसला. यावेळीं याचें वय अठ्ठावीस वर्षांचें होतें. साडे तेरा वर्षे राज्य करून हा बेचाळीसाव्या वर्षी मरण पावला. तेहरान व शिराझ प्रांताचे सुभेदार अनुक्रमें अली मिर्झा व हसन अली मिर्झा यांनीं इराणच्या तख्तावर हक्क दाखविला होता, ब्रिटिश वकील सर जॉन कॅम्पबेल व कर्नल बेथ्युन यांच्या साहाय्यानें या दोन्ही बंडखोरांचें पारिपत्य करण्यांत आलें व नंतर शहाचा राज्याभिषेक जाहीर रीतीनें झाला. मुख्य वजीराला गळा दाबून मारणें, तेहरान शहरांत प्लेग व महामारी रोगांचा उपद्रव या गोष्टी या शहाच्या कारकीर्दीच्या पहिल्या वर्षी घडल्या.

हिरातवरील स्वारीः—हाजी मिर्झा अघासीं नांवाच्या एरिव्हानच्या रहिवाशास त्याच्या विद्वत्तेच्या कीर्तीमुळें इराणचा वजीर करण्यांत आलें. रशियन वकील कौंट सायमोनिकनें या वजीराला हिरात व खोरासान प्रदेशावर स्वारी करण्यास प्रोत्साहन दिलें परंतु या लढाईस आणखी बरींच कारणें झाली. अब्बास मिर्झानें नेस्तनाबूद केलेल्या नायकांनीं फिरून बंड केलें होतें. फत्तेअली शहाला दिलेलीं वचनें वजीर यार महंमद व कामरान शहा यांनीं मोडलीं होतीं व इराणच्या स्वामित्वाखालचा सीस्तान प्रांतहि त्यांनीं घेतला होता. अफगाण लोकांचा स्वतंत्र राज्यपद्धतीचा हक्क शहानें नामंजूर केला व कंदाहार आणि गझनी प्रांतावर जुन्या सफाविद घराण्याचा राज्याचे प्रांत म्हणून हक्क दाखविला. हिरातच्या सादुझइविरुद्ध मदत देण्याचें वचन, कंदाहाराच्या बरकझइ नायकांनीं तेहरानला मिशन पाठवून शहाला कळविलें याच सुमारास शहाची कर्मानने कांहीं आगळीक केली त्यामुळें इंग्लिश वकीलाच्या सल्लयाविरुद्ध शहानें लढाई पुकारली.

१८३६ मध्यें इराणी सैन्याचा तळ आस्ट्राबाद जवळ पडला. अन्नाचा तुटवडा सैन्यास फार भासूं लागला. पगार व भरपूर अन्न न मिळाल्यामुळें सैन्यांत बेदिली पसरली.

तुर्कोमन लोकांनां त्यांच्या एका मजबूत ठाण्यांतून हांकून लावण्यांत आलें, परंतु त्यांचा पूर्ण बंदोबस्त मुळींच करतां आला नाहीं. हिरातच्या लोकांनीं खंडणी देण्याचें कबूल केलें व ही गोष्ट शहास पसंत नसेल तर त्यानें खुशाल स्वारी करावी असा निरोप शहास पाठविला. शहानें शाहरुड येथें लष्करी कौन्सिल भरविलें व त्यांत असें ठरलें कीं, राजधानीला परत जाऊन पुढल्या वर्षी फिरून स्वारी करावी. शहा सैन्यास रजा देऊन तेहरानला परत आला, १८३६ मध्यें ब्रिटिश वकीलानें हिरातच्या स्वारीचा नाद सोडण्याचा शहास फिरून सल्ला दिला. परंतु तो न ऐकतां शहानें १८३७ मध्यें हिरातप्रांतावर चाल करून हिरात शहराला वेढा दिला.

हिरातचा वेढाः—हा वेढा दहा महिनेपर्यंत चालला होता. एम्.नील या ब्रिटिश वकीलानें हिरातचे लोक व शहा यांमध्यें तडजोड करण्याचा बराच प्रयत्न केला पण तो फसला. एम्.नील निघून गेल्यावर रशियन वकीलाच्या चिथावणीमुळें शहाच्या सैन्यानें पांच ठिकाणीं हल्ला केला. व एका ठिकाणीं त्यांचा जय झाला असता परंतु ब्रिटिश सैन्यानें हिरातला केलेल्या मदतीमुळें इराणी सैन्यास हार खावी लागली. कर्नल स्टोडार्टनें "ब्रिटिश सरकारला यांत ढवळाढवळ करावी लागेल" अशी धमकी शहास दिल्यामुळें शहा वेढा उठवून निघून गेला. ब्रिटिश मध्यस्थांच्या मार्फत या भांडणाचा निकाल लावला जाईल या स्टोडार्टच्या उत्तरानें प्रसंग निभावून नेला.

महंमद शहाच्या कारकीर्दीतील महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे हिरातचा वेढा होय. ब्रिटिश सरकारशीं नवीन तंटे, आगाखान महालतीचें बंड, तुर्कस्तानशीं उपस्थित झालेली कुरापत, खोरासानचा सुभेदार व शहाचा मामा असफद्दौला यानें बंड केल्यामुळें त्याला हद्दपार करणें, त्याच्या मुलाचें बंड व मोड आणि बाबीपंथाचें बंड या गोष्टी शहाच्या उरलेल्या कारकीर्दीत घडल्या.

इंग्लंडशीं बखेडाः—ब्रिटिश सरकारनें इराणजवळून अफगाण लोकांशीं झालेल्या लढाईत फाराह्व व सब्झेवार हीं जिंकलेलीं ठाणीं सोडून देणें व ब्रिटिश वकिलातीच्या जासुदास केलेल्या अडथळ्याबद्दल भरपाई या मागण्या केल्या. एम.नीलनें या मागण्यांचा निकाल लावण्याकरितां कांहीं वेळ दिला व त्या मुदतींत इराणकडून समाधानकारक जबाब न मिळाल्यामुळें राजकारणसंबंध तोडून ब्रिटिश अधिकाऱ्यांस हिंदुस्थानला पाठवून दिलें व आपल्या मिशनच्या लोकांसह अर्झरूमला निघून गेला. इराणनें एम.नीलवर कांहीं आरोप ठेवून त्यांचें समर्थन करण्याकरितां इंग्लंडला एक वकील मुद्दाम पाठविला. शिवाय इराणच्या वतीनें ब्रिटिश सरकारचें मन यूरोपांतील इतर राष्ट्रांच्या प्रधानमंडळांकडून वळविण्याचा देखील प्रयत्न करण्यांत आला. १८३९ मध्यें इराणी वकील व ब्रिटिश परराष्ट्रीय प्रधान यांची मुलाखत होऊन इराण सरकाराजवळून ब्रिटिश सरकारनें केलेल्या मागण्या तपशीलवार सांगण्यांत आल्या, व बराच काळ लोटल्यावर इराणनें या सर्व मागण्या मान्य करून देऊनहि टाकल्या.

१८४१ मध्यें तेहरानला जॉन एम.नीलचें नवीन मिशन पाठवून राजकीय संबंध फिरून सुरू करण्यांत आले. शहानें या मिशनचें फार मनःपूर्वक स्वागत केलें व उलट ब्रिटिश सरकारनें हिंदुस्थानांतील ब्रिटिश सैन्यानें काबीज केलेलें खाराक बेट इराणला मोकळें करून दिलें. काउंट सायमोनिक व इतर रशियन अधिकारी यांनीं हिरात शहरीं केलेल्या उलाढालीबद्दल यूरोपांत बराच पत्रव्यवहार ब्रिटिश व रशियन सरकारांमध्यें झाला व अखेरीस रशियानें इराण सरकारची चूक व ब्रिटिश सरकारच्या मागण्या रास्त असें आपलें मत दिलें व कंदाहारहून आपला एजंट परत बोलावून अफगाण लोकांशीं व्यापाराशिवाय कोणत्याहि प्रकारचा राजकीय संबंध न ठेवण्याचें ठरविलें.

सरहद्दीसंबंधीं तुर्कस्तानशीं लढा उपस्थित झाला, परंतु हें प्रकरण आंग्लो-रशियन कमिशनरच्या मध्यस्थीवर सोंपविण्यांत आलें. याच शहाच्या कारकीर्दीत इराणांत आफ्रिकेहून गुलाम आणण्याच्या पद्धतीस आळा घालण्यांत आला व इंग्लंडशीं व्यापारी तह करण्यांत आला.

महंमदशहा १८४८ मध्यें दुःसाध्य रोगानें मरण पावला. याला इराणच्या शहांचीं थडगीं असलेल्या कुम शहरीं पुरण्यांत आलें. हा ठेंगणा व लठ्ठ असून याचा चेहरा प्रेक्षणीय व नाक गरुडासारखें होतें.

नासिरुद्दिन शहाः— महंमदशहाच्या मरणाच्या वेळीं, युवराज नासिरुद्दिन अझर्बैजन प्रांताचा सुभेदार असल्यामुळें ताब्रिझ शहरीं होता. ब्रिटिश वकीलानें रशियन वकिलांशीं संगनमत करून शहाच्या अत्यवस्थ स्थितींत नासिरुद्दीनला मुद्दाम जासूद पाठवून तेहरानला बोलाविलें. तरी माजी शहाच्या मृत्यूनंतर नवीन शहा गादीवर बसेपर्यंत लोटलेला सहा आठवड्यांचा काळ फार अंदाधुंदीचा होता. वजीर हाजी मिर्झा आघासी राजवाड्यांत दडून बसला.हद्दपार केलेल्या असफउद्दौल्याचा साथीदार मिर्झा आगाखान यास राजधानींतील लोकांनीं परत बोलाविलें. राजधानींत राज्यक्रांति सुरू होऊन येझ्द प्रांतांत लुटालूट चालू होती. तेहरानचा सुभेदार राजपुत्र अली मिर्झा याच्या मुलानें काझ्वीनला गादी मिळविण्याकरितां बंड केलें, परंतु त्याचा पूर्ण मोड झाला. १८४८ सप्टेंबर २ रोजीं मध्यरात्रीं शहाला अभिषेक झाला. यावेळीं मेशद येथें एक बंड जोरानें चालू होतें.

या शहाच्या कारकीर्दीत (१) खोरासान प्रांतांतील बंड, (२) बाबी लोकांचें बंड, (३) अभिरुनिझामचें पतन, व (४) इंग्लंडशीं लढाई या चार गोष्टी मुख्यत्वेंकरून घडल्या.

खोरासान प्रांतांतील बंडः—मुख्य वजीराच्या जागेबद्दल हाजी मिर्झा अघासीचा प्रतिस्पर्धी यास बंड केल्यामुळें हद्दपार करण्यांत आलें होतें व त्याच्या मुलानें

तुर्कोमन लोकांचा आश्रय घेतला होता हें अगोदरच सांगितलें आहे. महंमदशहाच्या मरणापूर्वी चार महिने अगोदर हा परत आला व यानें मेशद काबीज करून तेथील इराणी सुभेदार हिरातचा यार महंमद या शहाच्या लोकांस परत जावयास लावलें. नासिरुद्दिनच्या मुराद मिर्झा नांवाच्या चुलत्यानें अठरा महिने वेढा दिल्यावर हा बंडखोर शरण आला, नंतर तो व त्याचा भाऊ यांचा वध करण्यांत आला आणि मुराद मिर्झाला खोरासानचा सुभेदार नेमण्यांत आलें.

बाबी पंथः—बाबीपंथाचा मुख्य शिराझचा मिर्झा अली महंमद याचें चरित्र व बाबी लोकांची चळवळ याविषयीं माहिती बाबीपंथ यांवरील स्वतंत्र लेखांत दिली आहे.[बाबीपंथ पहा. ]. १८५० मध्यें या मुख्याचा वध करण्यांत आला. तरी त्याच्या अनुयायांनीं राज्यक्रांतिकारक धर्मप्रसार सुरूच ठेविला. १८५२ मध्यें तेहरानच्या आसपास शहा घोड्यावर बसून चालला असतांना चार बाबी लोकांनीं हल्ला करून व एकानें पिस्तुल झाडून थोडीशी दुखापत केली. यानंतर चाळीस इसमांचा कट उघडकीस येऊन यांपैकीं दहांस देहांत शासन व इतरांस कडक शिक्षा देण्यांत आल्या.

मिर्झा टाकीचें पतनः—मिर्झा टाकी अमिरुन्निझाम, अथवा मुख्य सेनापति हा इराणांतील स्वतःचे हिमतीवर उदयास आलेला एक उत्तम गृहस्थ होता. महंमदशहाचा भाऊ बहराम मिर्झा याच्या आचाऱ्याचा हा मुलगा होता. राज्यांतील उच्च व महत्त्वाच्या जागेवर काम करून यानें बरीच संपत्ति मिळविली होती. नासिरुद्दिनशहानें याला आपला मुख्य वजीर केलें होतें. हा प्रामाणिक, दीर्घोद्योगी व उदार होता दुर्दैवेकरून याच्यावर राजमातेचा विश्वास नव्हता, यामुळें टाकीच्या शत्रूंना बरेंच फावलें व अखेरीस या लोकांच्या कानभरणीमुळें शहाचें मन टाकीविरुद्ध कलुषित झालें. राजसत्ता आपल्या हातीं घेण्याचा याच्यावर आरोप लादण्यांत आला, सैन्यावरील याचें वजन घातुक समजण्यांत आलें. १८५१ मध्यें टाकीला वजीरीपदावरून काढून टाकून मिर्झा आगाखान यास मुख्य वजीर नेमण्यांत आलें. कर्नल शीलच्या मध्यस्थीवरून यानें कशान प्रांताच्या सुभेदारीची जागा स्वीकारली, परंतु चाळीस दिवसांनींच त्याचा वध करण्याचा हुकूम सोडण्यांत आला; हें अगोदरच ताडून टाकीनें आत्महत्या केली.

इंग्लंडशीं लढाईः—रशियापेक्षां सुनीपंथी तुर्कस्तान शियापंथी इराणचे कट्टे शत्रू होते. १८४१–१८५६ या काळांत इंग्लंड व इराणमध्यें बरेंच सख्य होतें. अफगाणिस्तानांत १८४२ मध्यें यार महंमद वजीरानें आपला धनी कामरान यास तुरुंगांत गळा दाबून ठार केलें व स्वतः हिरात येथें राज्य करूं लागला. हा १८५१ मध्यें मेल्यावर याच्या मागून याचा मुलगा साइद महंमद हिरातचा अधिपति झाला. हा लवकरच इराणच्या फायद्याच्या कारस्थानांत सामील झाला. अब्बास कुली नांवाच्या इसमानें असफ उद्दौल्याचा मुलगा मेशदचा बंडखोर याचा विश्वासघात केला होता. या अब्बास कुलीस साइद महंमदनें हिरातचा किल्ला काबीज करूं देऊन शहाचें सैन्य घुरियानमध्यें ठेवूं दिलें. कर्नल शीलनें कान उघाडणी करतांच अब्बास कुलीस परत बोलावून हिरात प्रकरणांत ढवळाढवळ करण्याचें इराणी सरकारनें सोडून दिलें. १८५५ मध्यें कामरानचा पुतण्या महंमद युसफ सादुझेइ यानें साईदला ठार करून हिरात काबीज केलें. याच सुमारास कंदाहारचा कोहन दिलखान या नांवाचा एक नायक मरण पावला, व काबूलच्या दोस्त महंमदनें हें शहर आपल्या राज्यास जोडलें. कोहनचे कांहीं नातेवाईक शहाच्या आश्रयास पळून आले व शहानें त्यांचें गाऱ्हाणें कानावर घेऊन, इराणवर स्वारी होण्याचें घाटत आहे असें जाहीर करून मेशदच्या गव्हर्नरास हिरात काबीज करण्यास फर्मावलें. ब्रिटिश वकिलाचें बोलणें वायफळ होऊन १८५६ मध्यें इराणवर स्वारी पुकारण्यांत आली.

गव्हर्नर-जनरलनें पाठविलेल्या सैन्यानें खारक बेट व बुशायर बंदर काबीज करून रिशीदचा किल्ला हल्ला करून घेतला. मुंबई सरकारनें जनरल आउट्रामच्या हाताखालीं पाठविलेलें सैन्य दाखल झाल्यावर बोराझानवर चाल करण्यांत आली व खुशाब, मुहम्रा व कारून नदी या ठिकाणीं झटापटी होऊन या स्वारीचा ब्रिटिशांच्या तर्फे अनुकूल असा शेवट झाला. ता ५एप्रील १८५७ रोजीं पॅरीस येथें तह झाल्याची वार्ता येऊन दाखल झाली व बुशायर येथें तहाच्या अटी जुन्या होईपर्यंत थोडेसें ब्रिटिश सैन्य ठेवून जनरल आउट्राम हिंदुस्थानला बाकीच्या सैन्यासह परत आला. हिरातसंबंधीं पूर्वीप्रमाणेंच अटी ठरविण्यांत येऊन, ब्रिटिश मिशनच्या केलेल्या उपमर्दाबद्दल इराणला माफी मागावी लागली व इराणी आखातांतील गुलामांचा व्यापार बंद करण्यांत आला.

आंग्लो इंडियन तारखात्याची लाईनः— इंग्लंड व हिंदुस्थान यांच्यामध्यें तारेचें दळणवळण सुरू करण्याकरितां इराणांत तारायंत्र स्थापण्याचें बोलणें १८६२ मध्यें लावण्यांत आलें, व ब्रिटिश वकीलानें या बाबतींत एक करार केला. तीन वर्षांनीं ब्रिटिश वकील व इराणी परराष्ट्रीय प्रधान यांनीं याच खांबांवरून दुसरी तार चालविण्याची परवानगी देणाऱ्या तहावर सही केली. बुशायर व कराची यांमध्यें मकरान समुद्रकिनाऱ्यावरून व बुशायर बगदाद यांच्यामध्यें तेहरान मार्गानें दळणवळण सुरू झालें. आशियांतील तुर्कस्तानमधील तारेच्या अव्यवस्थेमुळें, इंडोयूरोपियन तारायंत्राची तार रशियामधून काळ्या समुद्राच्या पूर्वकिनाऱ्यानें लंडनहून तेहरानपर्यंत सुरू करण्यांत आली व इराणांतील खुश्कीवरील बुशायर-कराची यांमधील बंदरांतलि तारांचा संबंध या मार्गाशीं जोडून या तारेचें काम १८७२ पासून उत्तम चाललें आहे.

सीस्तान मिशन इंग्लंडहून १८७० मध्यें तेहरान शहरीं येऊन दाखल झालें, व येथून बलुचिस्तानकडे गेलें. इराण व कलात संस्थानें यांमधील उभय पक्षास संमत अशी सरहद्द ठरवावयाची होती, परंतु अफगाण कमीशनर व इराणी कमीशनर यांचें एकमत न झाल्यामुळें मध्यस्थानें सीस्तानच्या पाहणीवरून घेतलेल्या टिपणांवरून स्वतःचा निकाल १८७२ मध्यें तेहरान येथें जाहीर केला. इराण व कलात सरकारांनीं परराष्ट्रीय कारभाराच्या ब्रिटिश स्टेट-सेक्रेटरीकडे केलेल्या अपीलांत मध्यस्थाचाच निकाल मंजूर करण्यांत आला; व तो उभयपक्षांनीं मान्य केला.

नासिरुद्दिनशहानें १८७३ व १८७९ यावर्षी यूरोपांत प्रवास केला. पहिल्या प्रसंगीं तो फक्त इंग्लंडलाच गेला. या वेळीं शहाच्या बरोबर मुख्य वजीर मिर्झा हुसेनखान होता. दुसऱ्यावेळीं शहा रशिया, जर्मनी, फ्रान्स व आस्ट्रिया या देशांत जाऊन आला.

इराणची १८८४-१९०१ पर्यंतची स्थिति.—अरब खलाशी व इंग्लिश दर्यावर्दी अधिकारी यांनीं युक्त अशा दोन तीन आगबोटींचा ताफा इराणी आखातांत तयार करण्याची कल्पना शहानें १८६५ मध्यें सुचविली; परंतु बेहरीन बेटांचें स्वातंत्र्य व मोत्यें काढण्याचा उद्योग यांस हा काफिल विघातक होईल या सबबीवर ही कल्पना ब्रिटिश सरकारनें खोडून काढली. सर्व बंदरांत व विशेषतः लहान बंदरांत चालणाऱ्या चोरट्या व्यापाराचा बंदोबस्त केल्यास इराणचें जकातीचें उत्पन्न बरेंच वाढेल असें अधिकाऱ्यांच्या निदर्शनास पंधरा सोळा वर्षांनीं आणल्यावर १८८३ मध्यें शहानें दरवर्षी एक या रीतीनें चार पांच बोटी खरेदी करण्याचें ठरविलें. एका प्रसिद्ध जर्मन कंपनीचें टेंडर पसंत ठरून सुसा व पर्सिपोलिस या नांवाच्या दोन आगबोटी ३२००० पौंड खर्च करून १८८५ मध्यें तयार करवून इराणी आखातांत आणल्या. इराणांतील ब्रिटिश वकिलाच्या सांगण्यावरून तेहरानपासून कारून नदीपर्यंत गाड्यांच्या सोईचा रस्ता व अहवाझपर्यंत कारून नदीवर चालणाऱ्या जहाजांचा बंदोबस्त ठेवण्याकरितां एक लहानशी आगबोट बांधण्याचें शहानें ठरविलें. इराणी आखातांत या आगबोटी काम करण्यास तयार झाल्याबरोबर, आखातांतील जकातीचा मक्ता असलेल्या लोकांनीं पर्सिपोलिस बोटीचा खर्च देण्याचें नाकारलें व कारून नदीवर चालणाऱ्या जहाजांवरील जकातीच्या उत्पन्नावर आपला वंशपरंपरागत हक्क आहे या सबबीवर मुहम्राच्या सुभेदारानें या बाबतींत ढवळाढवळ करण्यास इराणी सरकारास हरकत केली. शेवटीं पर्सिपोलिस बोट बुशायर बंदरांत व सुसा बोट मुहम्राजवळ कुजत पडली व कारून नदीमार्ग खुला करणें व अहवाझपासून तेहरानपर्यंत रस्ता बांधणें हा बेतहि सोडून देण्यांत आला.

तेहरान-मेशद शहरांमधील तारेच्या दळणवळणाच्या मार्गांत १८७५ मध्यें बरेच अडथळे करण्यांत आल्यामुळें या मार्गाची देखरेख व काम मेशद येथील इंग्लिश सिग्नलर व इन्स्पेक्टर यांच्या स्वाधीन ठेवण्याचें ठरलें व हिंदुस्थान सरकारनें या बाबतींत सालीना २०हजार रु पर्यंतचा खर्च स्वतः सोसण्याचें कबूल केलें. जास्क येथील ब्रिटिश टेलिग्राफ सेटलमेंट व १८६८ आणि १८७२ मधील इराणांतून यूरोप व हिंदुस्थान यांमध्यें स्थापिलेलें तारेचें दळणवळण या बाबींबद्दल इराणी व ब्रिटिश या सरकारांमध्यें १८८७ चा ठराव होऊन प्रथम या कररांची मुदत १९०५ पर्यंत ठरविण्यांत आली व नंतर ही मुदत १९२५ पर्यंत वाढविण्यांत आली आहे.

अफगाणिस्तानच्या शेरअलीचा मुलगा अयुबखान हा १८८१ मध्यें इराणच्या आश्रयास येऊन राहिल्यामुळें ग्रेट ब्रिटन व इराण यांमधील १८८४ च्या ठरावान्वयें सालीना ८ हजार पौंडांचें पेन्शन देऊन अयुबखानास तेहरान मध्यें अटकबंद करून ठेविलें होतें. यानें १८८७ मध्यें तेथून निसटून अमीर अबुल रहमान विरुद्ध अफगाण प्रदेशांत बंड करण्याचा प्रयत्न केला, परंतु तो फसला व नंतर तो मेशद येथील ब्रिटिश कान्सल जनरलला शरण आला. त्याला बगदाद मार्गानें तुर्की सरहद्दीवरून बंदोबस्तानें हिंदुस्तानांत रवाना करण्यांत आलें. रशियन दोस्तांना खुष करण्याकरितां अयुबखानाच्या निसटून जाण्याकडे इराणी परराष्ट्रीय प्रधान याह्याखान मुशिरद्दौला यानें दुर्लक्ष्य केल्याचें समजून आल्यावरून त्यास बडतर्फ करण्यांत आलें.

१८८७ मध्यें सर हेनरी ड्रमंड वुल्फ याची इराणच्या मंत्र्याच्या जागीं नेमणूक झाली. याच्या सांगण्यावरून शहानें १८८८ मध्यें जाहीरनामा काढून आपल्या प्रजाजनांस त्यांच्या जीवित व संपत्तीबद्दल सुरक्षितपणाचें आश्वासन दिलें व अहवाझपर्यंतचा कारून नदीचा मार्ग व्यापारी दळणवळणाच्या सोईकरितां खुला केला. १८८४ पासून मुख्य प्रधान असलेल्या अमिनेस्सुलतान यास मुख्य वजीर नेमिलें. याच वर्षी तेहरानपासून शहा-अदुवल-अझम पर्यंतची ५॥ मैल लांबीची बेल्जियम कंपनीच्या ताब्यांतील इराणी रेल्वे सुरू करण्यांत आली. १८८९ मध्यें बॅरन ज्युलियस डि रूटरला इराणी सरकारी पेढी स्थापून नोटा काढण्याचा मक्ता व लोखंड, तांबें, शिसें, पारा, कोळसा, पेट्रोलियम, मँगनीज, बोरॅक्स ( सोहागी ) व ॲसबेस्टास या खनीज द्रव्यांच्या संबंध इराणांतील (अगोदरच न दिलेल्या) खाणी खोदण्याचा हक्क देण्यांत आला. ही पर्शियन इराणी सरकारी पेढी १८८९ सप्टेंबर २ च्या ब्रिटिश बादशाही सनदेनें स्थापन होऊन हिनें ' इंपीरियल बँक ऑफ पर्शिया' या नांवानें इराणांत व्यापार सुरू केला. पांच वर्षेपर्यंत इराणांत कोणत्याच रेल्वेसंबंधीं सवलती देण्यांत येणार नाहींत असा शहाचा लेखी करार १८८९ मध्यें रशियन

मक्तास मिळाला. हा करार बदलून इराणांतील सर्व रेल्वेस १८९० मध्यें मनाई करण्यांत आली.

शहाचें १८८९ मधील यूरोपांत तिसरें प्रयाण.—इ. स. १८८९ मध्यें शहा तिसऱ्यांदा यूरोपांत गेला. इंग्लंडमध्यें एक महिना राहून मुख्य दरबारांत जाऊन शहा परत आला. या खेपेस सर ड्रुमंड हा शहाच्या बरोबर होता. १८९० मध्यें इराणी सरकारनें ब्रिटिश भांडवलवाल्यांस तंबाखूचा मक्ता दिला. इंग्लंडमध्यें असतांनां शहानें वाईट सल्ला ऐकून एका इराणी मनुष्यास इराणांतील 'लॉटरीचा' मक्ता दिला. यानें हा मक्ता ४० हजार पौंडास एका ब्रिटिश कंपनीला विकला. शहानें पुढें हा मक्ता रद्द केला परंतु ब्रिटिश कंपनीला नुकसानभरपाई मिळाली नाहीं, त्यामुळें बराच काळपर्यंत लंडनच्या हुंड्यांच्या बाजारांत इराणच्या दर्तीची किंमत कमी झाली. तंबाखूच्या मक्त्याविरुद्ध तेहरानमध्यें बंड झाल्यामुळें हा मक्ता इराणी सरकारनें १८९२ मध्यें रद्द केला व शेंकडा ६ टक्क्यांचें ५ लक्ष पौंडांचें कर्ज इंपीरियल बँकेपासून घेऊन तंबाखूच्या मक्तेदारास नुकसानभरपाई देण्यांत आली व १९०० मध्यें शेंकडा ५ टक्क्यांचें रशियन कर्ज काढून बँकेचें कर्ज फेडण्यांत आलें.

१८७२ पासून ग्रेटब्रिटनच्या दरबारीं असलेल्या माल्कम खान निजाम–उल–मुल्क नांवाच्या इराणी सरकारच्या प्रतिनिधीस परत बोलावून त्याच्या जागीं टिफ्लिसचा कान्सल जनरल मिर्झा महंमद अलीखान याची नेमणूक १८८९ मध्यें करण्यांत आली. १८९० मध्यें अहवाझपासून तेहरानपर्यंतचा रस्ता बांधण्याचा बेत पुन्हां हातीं घेऊन इंपीरियल बँकेला कांहीं सवलती देण्यांत आल्या व १८९३ पर्यंत काम चालू ठेवण्यांत आलें. याच वर्षी इंपीरियल बँकेचे इराणांतील खाणी खणण्याच्या कामाचे हक्क पर्शियन "बँक मायनिंग राइट्स कॉर्पोरेशन"ला देण्यांत आले. दळणवळणाचे मार्ग नसल्यामुळें माल नेण्या आणण्याचा खर्च विशेष येत असे, व खनिज पदार्थांच्या प्रदेशांत पाणी व सर्पण यांचा तुटवडा असल्यामुळें या कार्पोरेशनला किफायत पडत नसे, म्हणून बरेंच भांडवल खर्च करून १८९४ मध्यें या कार्पोरेशनला आपला रोजगार बंद करावा लागला.

केट ग्रीनफील्ड प्रकरणः—केट ग्रीनफील्ड नांवाच्या इंग्लिश मुलीला तिच्या आईच्या घरांतून एका कुर्दानें बळजबरीनें पळवून नेलें व ब्रिटिश अधिकाऱ्यांनीं ती मुलगी परत मागितली असतां परत न करतां हा कुर्द सौजबुलाघ येथें पळून गेला व तेथें तुर्की अधिकाऱ्यांनीं त्याचें संरक्षण केलें. यामुळें बराच गोंधळ माजला होता; परंतु 'स्वसंतोषानें आईचें घर सोडून मी कुर्दाची बायको झाल्यें' असें त्या मुलीनें ब्रिटिश अधिकाऱ्यांस स्पष्ट कळविल्यावरून हा लढा मिटला.

१८९२ त तेहरान शहरांत व त्याच्या आसपास पटकीची सांथ जोरानें उद्भवली व सुमारें शेंकडा आठ लोक मृत्युमुखीं पडले. १८९३ त हा रोग पुनः उद्भवला; परंतु विशेष प्राणहानि झाली नाहीं. १८९३ त इराणनें रशियास फिरुझा नांवाचा महत्त्वाचा जिल्हा व बाबा दुर्मोझ व लुफ्ताबादमधील खोरासानच्या उत्तर हद्दीवरील प्रदेश देऊन अझर्बैजनच्या सरहद्दीवरील रुक्ष प्रदेशाची पट्टी व हिस्सार खेडें घेतलें.

फ्रेंच लोकांनां पुराणवस्तु संशोधनासंबंधीं दिलेले हक्कः—१८९५ त एक फर्मान काढून फ्रेंच सरकारास इराणांतील वस्तूंचा शोध लावण्याची परवानगी दिली. शोधलेल्या वस्तूंपैकीं सोनें, रुपें व जवाहिरांच्या वस्तूंखेरीज बाकीच्या वस्तूंचा निम्मा भाग फ्रेंच सरकारास देण्याचें ठरलें व इराणी सरकारच्या वांट्याच्या निम्म्या वस्तू इराणी सरकार विकीत असल्यास त्या विकत घेण्याचा प्रथम हक्कहि फ्रेंच सरकारास देण्याचें ठरलें. १८९७ त एम. जे. डि मॉर्गनच्या मिशननें या कामास सुरवात केली.

शहाचा खून (१८९६):—ता. १ मे १८९६ रोजीं शहा-अबदुल अझिमच्या मशिदींत निमाज पढत असतांना कर्मानच्या मिर्झा रेझा नांवाच्या एका क्षुल्लक व्यापाऱ्यानें नासिरुद्दिन शहाचा खून केला. या मारेकऱ्यास कमालुद्दिन नांवाच्या अफगाण शेखानें कान्स्टांटिनोपल येथें चिथावणी दिली होती. कमालुद्दिन मरण पावला व मिर्झा रेझाला १८९६ आगस्ट १२ रोजीं फांशी देण्यांत आलें. हा शहा आणखी पांच दिवस वांचला असता तर शहाच्या कारकीर्दीच्या पन्नासाव्या वर्षास सुरवात झाली असती. याच्यामागून मुझफरुद्दिन (जन्म मार्च २५१सन८५३) हा तक्तावर बसला (१८९६).

नाण्यांची आपत्तिः—तीन चार वर्षांत तांब्याचें नाणें वाजवीपेक्षां जास्त झाल्यामुळें गरीब लोकांची व चिल्लर व्यापाऱ्यांची फार दैन्यावस्था झाली. मांसाचा भाव कमी करण्याकरितां प्राचीन काळापासून चालत आलेला मांसावरील कर काढून टाकण्यांत आला. सरकारी अधिकारी लुच्चेगिरीनें फाजील तांब्याचें नाणें स्वस्त दरानें विकत घेऊन महाग असलेल्या ठिकाणीं विकीत असत, त्यामुळें इंपीरियल बँकेला जबर किंमत देऊन जास्त असलेलें तांब्याचें नाणें विकत घ्यावें लागलें व त्यामुळें सरकारचें अतोनात नुकसान झालें व ही आपत्ति १८९९ त नाहींशी झाली. किंमत वाढविण्याच्या इराद्यानें व्यापारी मांसाची एकदम खरेदी करीत त्यामुळें मांसावरील कर काढून टाकला असतांना देखील मांस स्वस्त झालें नाहीं.

प्रधानांच्या नेमणुका (१८९६ ते ९८):—१८९६ त मुख्य वजीर अमिनेस्सुलतान व बडे बडे इराणी अधिकारी यांचें वांकडें आल्यामुळें अमिनेस्सुलतानास अझर्बैजन प्रांताचा मुख्य कारभारी करून पाठविण्यांत आलें. शहानें अमिनेस्सुलतानाच्या प्रतिस्पर्ध्यांचें मंत्रिमंडळ बनविलें; परंतु

राज्याच्या कारभाराचें काम शिल्लक पडून अंतर्गत राज्यकारभाराचें खातें फारच अव्यवस्थित झालें. शहानें अमिनेस्सुलतानास परत बोलावून मुख्य वजीर नेमिलें व ( १८९८ ) नासुलमुल्क यास जमाबंदीचा प्रधान नेमिलें. यानें हिशेब ठेवण्याची साधी पद्धति, अंदाजपत्रक करणें, महसूलखात्याची पुनर्रचना, जमीन महसुलीची नवीन जमाबंदी वगैरे सुधारणा पुढें आणल्या; परंतु अधिकाऱ्यांच्या अडथळयामुळें त्या अपुऱ्या राहिल्या.

१८९७ त इंग्लिश तारखात्याचा इन्स्पेक्टर इ. ग्रेव्हस याचा बलुची लोकांनीं खून केला. बऱ्याच मोठ्या प्रदेशांत बंड झालें, त्यामुळें कर्मान प्रांताच्या सरसुभेदाराच्या हाताखालीं सैन्य पाठवून १८९८ त कॅनॉक ठाणें हस्तगत करण्यांत आलें व शांतता स्थापन करण्यांत आली. एका खुनी इसमास जास्क येथें फांशी देण्यांत आलें.

१८९८ मधील ब्रिटिश कर्जाबद्दलचें अपुरें बोलणें:—१८९८ च्या प्रारंभीं शहाच्या वैद्यांनीं शहास जर्मनी अथवा फ्रान्समधील खनिज पाण्याचा उपयोग रोग दुरुस्तीबद्दल सुचविला. यूरोपांत या कामाकरितां जाण्यापूर्वी राज्यकारभाराच्या खर्चाकरितां, सैन्याचा थकलेला पगार देण्याकरितां व कर्जफेडीकरितां पैशाची गरज पडली. यूरोपांत कर्ज मिळविण्याचे प्रयत्न करण्यांत आले; परंतु कर्ज न मिळतां इराणची पत मात्र गेली. लंडनच्या भांडवलवाल्यांनीं इराणी आखातांतील बंदरें व फार्स प्रांत या प्रदेशांतील जकातीच्या तारणावर शेंकडा ५ टक्क्याचें १२५० हजार पौंड कर्ज देण्याचें कबूल केलें. या भांडवलवाल्यांनीं या प्रदेशांतील जकातीच्या नाक्यांवर रोकडीचें काम ( कॅशर ) करण्याकरितां स्वतःचे लोक ठेवण्याची अट घातली. ही अट मान्य करून अमिनद्दौला या मुख्य वजिरानें कर्मानशाह व बुशायरच्या जकातीवसुलीच्या तारणावर ५०,००० पौंड कर्ज काढलें. इतर प्रधानांकडून फार अडथळा झाल्यामुळें यानें आपल्या जागेचा राजिनामा दिला. परराष्ट्रीय कारभाराचा प्रधान मुशिनखान हा नंतर प्रधानमंडळाचा मुख्य झाला व त्यानें कर्जाबद्दल फिरून बोलणें लावलें; परंतु त्याला यश आलें नाहीं. शिवाय या वेळेस इराणी सरकारानें पूर्वीच्याच तारणावर पूर्वीच्या दुप्पट कर्जाची मागणी केली. यामुळें कर्जाचें बोलणें फिसकटलें. अमिनेस्सुलतानला फिरून मुख्य वजीर नेमण्यांत आलें. याच्या अतिशय लोकप्रियतेमुळें व पेढ्यांजवळून तात्पुरतें अगाऊ कर्ज मिळाल्यामुळें पैशाची अडचण तात्पुरती भागविण्यांत आली. यानें तिघां बेल्जियनांची जकातीचे अधिकारी म्हणून नेमणूक केली व जकातीच्या मक्त्यांची पद्धत मोडून जकातखातें दुरुस्त करण्याबद्दलची माहिती मिळविली आणि १८९९ त अझरबैजन व कर्मानशाह प्रांतांतील जकातीचीं नाकीं बेल्जियन अधिकाऱ्यांच्या देखरेखीखालीं ठेविलीं. या प्रयोगाचा परिणाम फार फायदेशीर दिसून आला, त्यामुळें इराणी सरकारनें जकातीच्या मक्त्यांची पद्धत मोडून राज्यांतील सर्व जकातीनाक्यांवर बेल्जियन जकातीअधिकाऱ्यांची नेमणूक १९०० मध्यें केली.

लंडनकडून कर्जाचें अनुकूल बोलणें न निघाल्यामुळें व शहास यूरोपांत जाण्याची अत्यावश्यकता भासल्यामुळें शहानें फर्मान काढून रशियन पेढीवाल्यांस कर्ज उभारण्याची परवानगी दिली. यानंतर लंडनच्या भांडवलवाल्यांचें कर्ज देण्याचें बोलणें अमान्य करण्यांत आलें.

१९०० मधील रशियन कर्ज.—फार्स परगण्यांतील व इराणी आखातांतील बंदरांची जकात खेरीज करून इराणांतील बाकीच्या सर्व जकातीउत्पन्नाच्या तारणावर ५ टक्के दराचें २४०० हजार पौंडांचें कर्ज देण्याची रशियन सरकारनें परवानगी दिली. वसुलाचे हप्ते व व्याज यांची रक्कम थकल्यास मात्र जकातीनाक्यांचा बंदोबस्त बँकेच्या स्वाधीन करण्याचें ठरलें. या कर्जाची शेंकडा ८५ रक्कम इराणला मिळाली व रोखे घेणारांस रशिया सरकारनें हमी दिली. रोकड तात्काळ तेहरान शहरीं येऊन पोहोंचली. थकलेलें देणें देऊन टाकून १८९२ च्या शेंकडा ६ टक्क्यांच्या लंडनकर्जाच्या शिलकी देण्याचीहि फेड करण्यांत आली.

शहाचें यूरोपांत प्रयाण ( १९०० व १९०२ ):—१२ एप्रिल १९०० रोजीं मुख्य वजीर व मोठा लवाजमा बरोबर घेऊन शहा यूरोपच्या प्रवासास गेला. राज्यकारभार त्याचा दुसरा मुलगा मलिक मन्सूर मिर्झा शुआ–इस–सुलतानेह याच्या स्वाधीन करण्यांत आला होता. कॉन्ट्रेक्सेव्हिल येथें एक महिना मुक्काम करून शहा सेंटपीटर्सबर्ग ( पेट्रोग्राडला–लेनिनग्राड)ला गेला व तेथून पारिसला परत आला. येथून लंडनला जाण्याचा त्याचा इरादा होता; परंतु इटलीचा राजा व सॅक्स कोबुर्ग–गोथाचा डयूक यांच्या मृत्यूमुळें बरेच दरबार दुखवट्यांत होते म्हणून इंग्लंड, जर्मनी व इटली या देशांत जाण्याचा बेत रहित करण्यांत आला. आगस्ट २ ( १९०० ) रोजीं पारिस शहरांत शहाचा खून करण्याचा प्रयत्न एका अराजकानें केला.

रुसोब्रिटिश स्पर्धा ( १९०२—१९०७ ) व इराणी राज्यक्रांति ( १९०६—१९०९ ):—१९०२ मध्यें मुझफ्फरुद्दिनशहा मुख्य यूरोपियन राजधान्यांच्या शहरीं पुन्हां गेला, व आगस्टमध्यें सातव्या एडवर्ड बादशहानें पोर्टस्मथ येथें शहाचें स्वागत केलें. नंतर व्हायकाउंट डाउनच्या अध्यक्षतेखालीं एक मिशन पाठवून शहाला १९०३ मध्यें ऑर्डर ऑफ गार्टरचें सदस्यत्व देण्यांत आलें. एका आठवड्यानें इराण व ग्रेटब्रिटन यांमध्यें एक व्यापारी तह करण्यांत आला. त्यामुळें जकातखात्यांत कित्येक सुधारणा करून उभयदेशांस हितावह अशा अटी ठरविण्यांत आल्या आणि १८५७ च्या करारान्वयें मालाच्या किंमतीवर शेंकडा ५ टक्के कर घेण्याऐवजीं नियमित कर आयात व निर्गत मालांवर बसविण्यांत आले. १९०२ मध्यें झालेल्या रूसो—इराणी

तहानें झालेलें ब्रिटिश व्यापाराचें व हिंदुस्थानच्या चहाच्या व्यापाराचें नुकसान या तहान्वयें कांहीं अंशीं भरून काढलें. १८९९—१९०३ रशियन बँकेनें इराणला ४०,००,००० पौंड कर्ज दिलें होतें, पैकीं निम्मी रक्कम शहाला त्याच्या खर्चाकरितां दिली होती. ताब्रिझपासून तेहरान पर्यंत (१९०२) व ताब्रिझपासून कास्पिअनपर्यंत ( १९०३ ) रस्ते बांधण्याचा हक्क रशियन सवलतीदारांस दिला होता; व रशियन बँकेच्या शाखा सीस्तान प्रांतांत उघडण्यांत आल्या होत्या. इराणी आखातांत फक्त रशिया व ग्रेटब्रिटनमधील स्पर्धा विकोपास जाण्याचा संभव होता. ग्रेटब्रिटनला या आखातांतील व्यापाराचा बहुतेक मक्ता होता; व या आखातांत (खडक वगैरे दाखविण्याकरितां) तरते शंकू ठेवणें, दिव्यांची व पोलिस बंदोबस्ताची व्यवस्था करण्याची हमी ग्रेटब्रिटनकडे होती. परराष्ट्रीय प्रधान लॉर्ड लॅन्सडाऊन यांनीं लॉर्डांच्या सभेत बोलून दाखविलें कीं, कोणतेंहि परराष्ट्र इराणी आखाताच्या किनाऱ्यावर जबरदस्तीनें वर्चस्व स्थापण्याचा प्रयत्न करील तर त्याचा ग्रेटब्रिटन शक्य त्या सर्व उपायांनीं प्रतिकार करील. १९०३ मध्यें हिंदुस्थानचा व्हाइसरॉय लॉर्ड कर्झन कराचीहून इराणी आखातांत गेला. याच्या जहाजाबरोबर चार क्रूझरें होतीं; परंतु बुशायर येथें फार्सच्या इराणी सुभेदारानें राजकारणाच्या शिस्तीचा भंग केल्यामुळें किनाऱ्यावर न उतरतां लॉर्ड कर्झन परत आला व हें राजकारण संपलें. इकडे रशियाचें व्यापारी व सांपत्तिक वजन इराणांत वाढतच चाललें; १९०४ मध्यें इराणनें पाठविलेल्या एका खास मिशनची झारनें मुलाखत घेतली; व १९०५ मे मध्यें स्वतः शहा सेंटपीटर्सबर्ग व व्हिएन्ना येथील दरबारांस भेट देण्याकरितां यूरोपांत गेला.

१९०२ तें १९०५ चें सीस्तान मिशनः—अफगाणिस्तान व सीस्तान या देशांमधील सरहद्दीबद्दल भांडण १९०२ मध्यें उपस्थित झालें होतें. हेलमंड नदीच्या प्रवाहाच्या रोखानें काढलेल्या रेषेनें—हिलाच गोल्डस्मिड रेषा म्हणतात.—या देशांमधील सरहद्द १८७०—१८७२ च्या मिशननें ठरविली होती; परंतु १८७२ व १९०२ मधील काळांत हेलमंड नदीचा प्रवाह बराच पश्चिम वाहिनी झाला होता; व सरहद्दींच्या कांहीं एक खुणा उभारलेल्या नसल्यामुळें एका रुंद पट्टीबद्दल भांडण लागलें. नदीचें जुनें पात्र हीच खरी हद्द असें इराणी लोकांचें म्हणणें होतें परंतु अफगाण लोक म्हणत कीं नवीन पात्र हीच खरी सरहद्द होय. १८५७ च्या तहान्वयें उभय पक्षांनीं या लढ्याचा निवाडा ग्रेटब्रिटनच्या मध्यस्थीवर सोंपविला; व इराण सरकारचें म्हणणें खरें ठरवून १९०५ मध्यें कर्नल मॅक्मोहन यानें निकाल दिला.

ब्रिटिश व्यापारी मिशनः—वायव्य इराणांतील बाजारांचीं स्थळें व व्यापारी रस्ते यांची पहाणी करून रिपोर्ट करण्याकरितां १९०३ मध्यें बोर्ड ऑफ ट्रेडनें पाठविलेल्या मॅक्लिन कमिशनला मिळालेल्या यशामुळें, इराणच्या दक्षिण भागांत अशाच प्रकारचें एक मिशन उत्तर हिंदुस्थानांतील व्यापारी चेंबर, बंगाल व्यापारी चेंबर व हिंदुस्थानी चहावर कर बसविणारी (टी सेस) कंपनी यांनीं पाठविलें. सदर रिपोर्ट १९०६ मध्यें प्रसिद्ध झाला. पाहणी केलेल्या प्रदेशांत सुधारलेली राज्यपद्धति नसल्यामुळें एक रुसो–ब्रिटिश तह करून इराणचीं वर्चस्वक्षेत्रें निश्चित करावीं असा मुख्य उपाय या रिपोर्टांत सुचविला आहे.

१९०७ मधील रुसोब्रिटिश तहः—रुसोजपानी युद्धामुळें उत्पन्न झालेली राजकीय परिस्थिति व खुद्द इराणची अंतस्थ नाजूक स्थिति या गोष्टींमुळें ग्रेटब्रिटन व रशिया या दोघां प्रतिस्पर्ध्यांमध्यें हा तह १९०७ मध्यें घडून आला. इराणसंबंधीं याचीं मुख्य कलमें येणें प्रमाणें होतीं:— ( १ ) कास्त्रिशिरिन पासून इस्पहान, येझ्द व काखवरून रशियन, इराणी व अफगाण प्रदेशांच्या सरहद्दींच्या मिलाफाच्या ठिकाणापर्यंत काढलेल्या रेषेच्या उत्तरेस कोणत्याहि प्रकारचा राजकीय अथवा व्यापारी हक्क स्वतः न मिळविण्याचें, व रशियन सरकार अथवा रशियन इसम यास असली कोणतीहि सवलत मिळविण्याच्या कामांत अडथळा न करण्याचें ग्रेटब्रिटननें कबूल केलें; ( २ ) अफगाण सरहद्दीपासून गाझिक, बिर्जेंड, कर्मान, व बंदर अब्बासी या ठिकाणावरून काढलेल्या रेषेच्या दक्षिणेकडील प्रदेशासंबंधीं अशाच प्रकारचें वचन रशियानें ग्रेटब्रिटनला दिलें; ( ३ ) वर सांगितलेल्या दोन रेषांमधील प्रदेश तटस्थ मानला जाऊन दोन्हीं राष्ट्रांस त्यांमध्यें हक्क संपादन करण्याची मुभा असावी; ( ४ ) इराणांतील कोणत्याहि भागांत सध्यां उपभोगित असलेल्या सर्व सवलती चालू ठेवाव्या; ( ५ ) तहावर सही करण्यापूर्वी इराण आपल्या कर्जाची फेड करणार नाहीं तर ग्रेटब्रिटन व रशिया यांनीं आपापल्या वर्चस्वक्षेत्रांतील इराणी करांच्या वसुलीवर ताबा ठेवण्याचा हक्क आपल्या स्वाधीन राखून ठेविला. या तहाबरोबरच ब्रिटिश परराष्ट्रीय सेक्रेटरी ऑफ स्टेटचें एक पत्र प्रसिद्ध करण्यांत आलें व त्यांत असें म्हटलें होतें कीं, ( १ ) इराणी आखातास हा तह लागू पडणार नाहीं, ( २ ) रशियानें ग्रेट ब्रिटनचे या आखातावरील विशिष्ट हितसंबंध कबूल केले आहेत व ( ३ ) या हितसंबंधाचें रक्षण ग्रेटब्रिटननें पूर्ववत करावें.

इराणी राज्यपद्धतिः—ग्लीडोवे-न्यूकॉमेनच्या रिपोर्टामुळें व येझ्दमधील बाबी उर्फ बाहाई ( पहा ) लोकांच्या (१९०३) कत्तलीमुळें इराणमध्यें असंतोष फार माजला होता. १९०५ मध्यें रशियांतील राज्यक्रांतिकारक पक्षाच्या उदाहरणानें प्रेरित होऊन या असंतुष्ट इराणी लोकांनीं प्रातिनिधिक राजकीय संस्थांबद्दल मागणी केली. १९०६ आगस्ट ५ रोजीं शहानें एक फर्मान काढून सर्व लोकांच्या प्रतिनिधींचें एक

राष्ट्रीय सल्लागार मंडळ ( मज्लिस ) बसविण्याचें ठरविलें. या मजलिसची निवडणूक कायदेशीर रीतीनें होऊन ही खुद्द शहाच्या हातानें १९०६ ऑक्टोबर ७ रोजीं उघडण्यांत आली. १९०७ च्या जानेवारी महिन्यांत मुझफ्फरुद्दिन शहा मरण पावला व याच्यामागून याचा वडील मुलगा महंमद अली मिर्झा गादीवर बसला. नवीन राज्यपद्धतीस मान देण्याचें वचन यानें आपल्या प्रजाजनांस १९०७ फेब्रुआरीच्या ११ तारखेस जाहीर रीतीनें कळविलें.

राज्यक्रांति.—नोव्हेंबर १२ रोजीं शहानें मजलिसमध्यें हजर राहून आपल्या वचनाची पुनरावृत्ति केली; परंतु डिसेंबरमध्यें तेहरानमध्यें एक बंड होऊन राजकीय आणीबाणीचा प्रसंग येऊन ठेपला; यावेळीं शहाचें सैन्य निःशस्त्र प्रजाजनांवर पाठविलें होतें. यावरून मजलिसनें एक जाहीरपत्रक काढून शहाचा नवीन राज्यपद्धति मोडण्याचा विचार आहे असें यूरोपांतील बलाढ्य राष्ट्रांस कळविलें व त्यांना मध्यस्थी करण्याची मागणी केली. तेहरानमधील ब्रिटिश व रशियन वकीलांनीं नवीन पद्धति कायम राखण्याचा महंमद अलीस आग्रह केला, तेव्हां लष्करी मंत्र्याच्या ताब्यांत सर्व सैन्य ठेवण्याचें कबूल करून मजलिसच्या मागण्या मान्य करण्याचें वचन महंमद अलीनें मजलिसला निरोपानें कळविलें. यामुळें पसरलेली अस्वस्थता कांहीं वेळ थांबली, परंतु राजपक्ष व राष्ट्रीयपक्ष एकमेकांविरुद्ध गुप्त कारस्थानें करूं लागले व १९०८ फेब्रुवारीमध्यें शहा तेहरानमधून मोटारमध्यें बसून चालला असतांना त्याच्या मोटारीखालीं दोन बांबगोळ्यांचा स्फोट झाला; शहास मात्र इजा झाली नाहीं. जूनमध्यें संशयास्पद दरबारी मंडळीला घालवून देण्याचा आग्रह मजलिसनें शहास केला. शहानें ही गोष्ट मान्य करून स्वतः तेहरान सोडून गेला, नंतर कोसॅक नांवाच्या राजकीय शरीरसंरक्षक पलटणीची राष्ट्रीयपक्षाच्या लोकांशीं एकदम झटापट होऊन मजलिस सभागृहावर सरबत्ती करण्यांत आली. मजलिसनें या प्रश्नाची वाटाघाट करण्याकरितां कमिशनरची नेमणूक केली. तेव्हां शहानें एक जाहीरनामा काढून मजलिस बरखास्त केली व लष्करी लोकांस तेहरानमध्यें बंदोबस्त राखण्याचा हुकूम केला. स्वतः निवडलेल्या चाळीस सभासदांचें एक सल्लागार मंडळ या मजलिसच्या ऐवजीं नेमण्याचाहि बेत शहानें केला, परंतु ग्रेटब्रिटन व रशिया यांच्या आग्रहावरून हा विचार सोडून देऊन त्यानें जाहीर निवडणूक करण्याचा हुकूम सोडला. मध्यंतरीं प्रांतांमध्यें अंतःकलह सुरू झाले, कुर्द दरोडेखोरांनीं ताब्रिझजवळची बरींच खेडीं लुटलीं. ट्रान्सकाकेशियाच्या सरहद्दीवरील रशियन शिपायांवर इराणी बंडखोरांनीं हल्ला केल्यामुळें रशियन सरकारानें नुकसानभरपाई मागितली. ही न दिल्यामुळें रशियन सैन्यानें कित्येक इराणी खेडीं जाळून टाकलीं. ही गोष्ट व कोसॅकांचा हल्ला यांवरून रशिया राजपक्षास मदत करीत आहे अशी राष्ट्रीय पक्षानें ओरड केली होती. तेव्हां १९०९ मध्यें एक रशियन सैन्याची तुकडी ताब्रिझला राष्ट्रीय पक्षाच्या वतीनें ढवळाढवळ करण्याकरितां रशियानें पाठविली. हें सैन्य येतांच शहाच्या सैन्यानें ताब्रिझचा वेढा उठविला. याच वर्षीं जानेवारी महिन्यांत राज्यक्रांतीचा वणवा इस्पहान शहरांत पसरला, तेथें बख्त्यारी लोक राष्ट्रीय पक्षास मिळाले व त्यांनीं राजपक्षाच्या इस्पहानच्या सुभेदारास काढून टाकून तेहरानवर चाल केली. मे व जून महिन्यांत राज्यपद्धति पाळण्याबद्दल जाहीरनामे शहानें काढले व सर्व राजकीय गुन्हेगारांस माफी करण्याचें शहानें वचन दिलें; परंतु त्याला राष्ट्रीय व बख्त्यारी पक्षांच्या संयुक्त सैन्यास थांबवितां आलें नाहीं. या सैन्यानें जुलै १३ रोजीं तेहरानमध्यें प्रवेश केला. रस्त्यांत निकराचें युद्ध करून कोसॅक बंडखोरांनां सामील झाले, व शहा जुलै १५ रोजीं रशियन वकिलातींत जाऊन राहिला. या कृत्याचा राज्यत्याग असा अर्थ करण्यांत आला. याच दिवशीं राष्ट्रीय कौन्सिलची बैठक होऊन महंमद अलीचा तेरा वर्षांचा मुलगा सुलतान अहमद मिर्झा यास गादीचा वारस निवडण्यांत आलें. कजर लोकांचा नायक आसाद-उल-मुल्क यास राजप्रतिनिधि नेमण्यांत आलें. १९०९ सप्टेंबर ९ रोजीं पदच्युत केलेल्या शहास रशियन कोसॅक व हिंदु स्वार यांच्या बंदोबस्तांत क्रिमियामध्यें हद्दपारींत दिवस कंठण्यास पाठविण्यांत आलें. नोव्हेंबर १५ रोजीं शहानें नवीन निवडलेली मजलिस विधिपूर्वक भरविली.

अर्वाचीन इतिहास.—१९०९ सालामध्यें इराणांत नवीनच मनु सुरू झाला. एकतंत्री शहानें इराणचें स्वामित्व सोडून दिलें होतें व त्यामुळें त्याच्या कारकीर्दींतील गैर व्यवस्था जाऊन हळू हळू सुधारणा होत चालली होती. ग्रेट ब्रिटन व रशिया यांनीं इराणाविषयीं सहानुभूतीचें वर्तन ठेवलें होतें व रशियानें तर इराणमधून आपलें सैन्यहि काढून घेण्यास सुरुवात केली होती. अशा रीतीनें इराणला आपल्या कारभारांत सुधारणा करून दाखविण्याची चांगली संधि प्राप्त झाली होती. प्रथम प्रथम तशी सुधारणा होण्याचीं चिन्हेंहि दिसूं लागलीं होतीं; पण याच वेळीं राजकारणांत जहाल व मवाळपक्ष उपस्थित होऊन जहालपक्षानें आपल्या ताब्यांत सर्व सूत्रें घेतलीं. धर्मयुद्धांत भाग घेणाऱ्या शिपायांनां जास्त पगार देण्यासाठीं ग्रेटब्रिटन व रशियाकडून कर्ज काढण्याच्या बाबतींत दोन्ही पक्षांमध्यें खडाजंगी वादविवाद होऊन जहालपक्षानें आपलें म्हणणें खरें केलें, त्यामुळें सिपहदर व त्याच्या मवाळपक्षाला राजीनामा देणें भाग पडलें व सरदार इ असद यानें आपलें मंत्रिमंडळ तयार केलें; पण याहि पक्षांत अधिकाराच्या जागेसंबंधांत दुफळी माजली व त्यामुळें जिकडे तिकडे अनास्था उत्पन्न झाली. याच सुमारास रशियन वकील पसेक हा आपल्या संरक्षक लोकांसह शिराजला जात असतां त्याच्यावर डोंगरी जातींनीं हल्ला केला. पुढें कांहीं महिन्यांनीं याच जातींनीं ब्रिटिश वकीलावर

हल्ला करण्यास कमी केलें नाहीं. फार्सच्या मुख्य अधिकाऱ्यालाहि दहशत घालण्यांत आली. पदच्युत झालेल्या शहाचे अनुयायी यांनीं अर्देबिल येथील गव्हर्नरला हांकलून लावलें. ब्रिटिशांच्या व्यापारालाहि धोका पोहोंचण्याचा संभव दिसूं लागला, त्यामुळें ब्रिटिश वकीलानें पर्शियाला चांगलीच तंबी देण्याचें ठरविलें.

इकडे १९१० त नसीर एल मुल्क याला रीजंट म्हणून निवडण्यांत आलें व सिपहदर हा पुनः प्रधान मंत्रि झाला. याच सुमारास पदभ्रष्ट शहानें तेहरानवर स्वारी केली व त्याबरोबरच सलर एद दौलेयानेंहि कर्मानशाह येथून आपला मोर्चा राजधानीकडे वळविला; पण पदभ्रष्ट शहाच्या सैन्याचा पराभव झाल्यामुळें त्याला रशियांत पळून जाणें भाग पडलें.

महायुद्ध सुरू होण्याच्यापूर्वी म्हणजे सन १९१३ त इराणची परिस्थिति हलाखीची होती. रशियानें उत्तरेकडे आपलें बस्तान बसविण्याची खटपट चालविली होती. ग्रेटब्रिटन हें रशियाशीं तहनाम्यानें बांधलें गेलें होतें, तरी आंतून इराणला शक्य होईल तें सहाय्य करीत होतें. दक्षिण इराणांतील फार्स व कर्मन या प्रांतांत तर अंदाधुंदी माजलेली होती. फार्सच्या गव्हर्नर जनरलच्या सभेला न जुमानतां कशगई जातीच्या लोकांनीं बंडाळी माजविली होती. कर्मन प्रांतांत तोच प्रकार चालला होता. इराणच्या सरकारी खजिन्यांत मुबलक सैन्य उभारण्याला तर पुरेसा निधि नव्हता. शेवटीं फार्सचा गव्हर्नर जनरल मुखबिरएस सुलतानी याला एक हजार सैन्य उभारण्याकरितां व त्या सैन्याच्या साहाय्यानें बंडखोरांचा पाडाव करण्याकरितां ग्रेटब्रिटननें जवळ जवळ सव्वा लक्ष पौंड कर्ज दिलें व रशियानेंहि तितकीच मदत केली.

महायुद्ध सुरू होण्यापूर्वीची इराणची ही स्थिति होती. ग्रेट ब्रिटन व रशिया यांशिवाय तिसऱ्या एका सत्तेनें आपला शिरकाव करण्याचा यत्न दहा पंधरा वर्षांपासून चालू ठेविला होता. ती सत्ता म्हणजे जर्मनी होय. जर्मनीनें १८९२-९३ पासूनच इराणमध्यें आपला पाय रोंवण्याचा प्रयत्न चालविला होता व खुद्द राजधानीच्या शहरांतच जर्मनांनीं एक कॉलेजहि स्थापन केलें होतें. १८९६ त एका जर्मन कंपनीनें लिंगेह येथें मोत्याचा व्यापार सुरू केला. सन १८९७ त बुशायर येथें जर्मनीनें आपली वकीलात स्थापन केली. तीन वर्षांनंतर जर्मनीनें कुवेट येथें बगदाद रेल्वेची मुख्य इमारत बांधण्यासाठीं जागा घेण्याचें ठरविलें; पण ग्रेट ब्रिटननें जर्मनीचा कावा ओळखून त्या प्रयत्नाला खो घातला. पुढें मोहमेराह येथें जर्मन वसाहत करण्याचाहि त्यांनीं प्रयत्न केला; पण तोहि प्रयत्न ब्रिटननें साधूं दिला नाहीं, तरी पण निराश न होतां १९०६ त इराणच्या आखातांत प्रवास करण्यासाठीं हँबर्ग, अमेरिका सर्व्हिस जर्मनीनें सुरू केली. अशा रीतीनें जर्मनीनें इराणमध्यें हळू हळू आपला जम बसविण्यास सुरुवात केली होती.

सन १९१४ त रीजंटची मुदत संपून सज्ञान झालेला शहा इराणच्या राज्यावर बसतो न बसतो तोंच जागतिक महायुद्धाला सुरवात झाली. लगेच शहानें आपली मजलिस बोलावून तिच्या संमतीनें इराण या युद्धांत तटस्थ रहाणार असें जाहीर केलें; पण अशा रीतीनें तटस्थ रहाणें फारच कठिण होतें. शिवाय इराणांतील सरदार लोक ज्या पक्षाकडून अधिक पैसे मिळतील त्या बाजूला जाण्यास तयार होते. इराणांतील लोकांचा तुर्कांकडे ओढा असून ब्रिटिश व रशियन लोकांशीं त्यांचें पटत नव्हतें.

महायुद्धाच्या आरंभीं इराण हें महायुद्धाचें एक महत्त्वाचें केंद्र होणार ही गोष्ट कोणाला खरी देखील वाटली नसती; पण तसें होणें अपरिहार्य होतें. इराणची हीन स्थिति ध्यानांत घेऊन तुर्कस्तान व इराणच्या सरहद्दीवरील महत्त्वाच्या वाटा तुर्कस्तान व रशिया यांनीं महायुद्धापूर्वीच बळकावल्या होत्या. युद्धाला सुरवात होतांच रशियानें इराणच्या वायव्येला असलेल्या अझरबैजन प्रांतांत चढाई करून तुर्कांनां गचांडी देण्याचा प्रयत्न केला. तुर्कांनींहि कुर्द जातीच्या साहाय्यानें ताब्रिजवर चाल करून तें आपल्या ताब्यांत घेतलें; पण लगेच त्यांनां तें सोडणें भाग पडलें. सन १९१५ साली सरकॅमिश येथें तुर्कांचा रशियानें पराजय केला व उर्मिया शहर काबीज केलें.

अवदान बेटांत अँग्लो पर्शियन कंपनीच्या मोठमोठ्या तेलाच्या कंपन्या होत्या. तुर्कांनीं युद्धाला सुरवात करण्यापूर्वीच हिंदुस्थान सरकारनें या तेलाच्या कंपन्यांचें संरक्षण करण्याकरितां एक पलटण तेथें पाठविण्याची तजवीज करून ठेवली होती. या पलटणीनें तुर्की सैन्याचा सहिल येथें पराभव करून बसरा आपल्या ताब्यांत घेतलें; पण तेलाच्या कारखान्यांचें अशा रीतीनें संरक्षण झालें, तरी तेलाच्या खाणींचा अद्यापि बंदोबस्त झाला नव्हताच. या खाणींपासून मोठमोठ्या नळाच्यावाटे तेल एके ठिकाणीं सांठवून ठेवण्यांत येत होतें. या नळ्या फोडून शत्रूनें बरेंच नुकसान केलें; पण पुढें ब्रिटिश सैन्यानें, तेथें सैन्य पाठवून या भागांतून तर्की सैन्याला हांकलून लावलें.

इराण व अफगाणिस्तान आपल्या बाजूला ओढून घेऊन सर्व इस्लामी जग आपल्या बाजूचें करून घेण्यासाठीं जर्मनीनें आपली पराकाष्ठा केली. आपले हेर ठिकठिकाणीं पाठवून या देशांतील प्रमुख लोकांनां मनमुराद पैसे चारून त्यांनां आपल्याकडे ओढण्याचें काम जर्मनीनें सुरू केलें; पण त्यांत जर्मनीला यश आलें नाहीं.

सन १९१६ त पश्चिम इराणमध्यें तुर्कस्थान व रशिया यांच्यामध्यें पुष्कळ झटापटी झाल्या व त्यांत कधीं तुर्कस्तानला जय तर कधीं रशियाला जय असा प्रकार चालू होता; पण या सालाच्या अखेरीस तुर्कस्तानच्या सैन्यानें रशियाला कर्मनशाह व इमदानमधून हांकलून लावलें. ही स्थिति पाहून इराणी सैन्याच्या साहाय्यानें दक्षिण इराणमध्यें बंदोबस्त

ठेवण्याचा ब्रिटननें निश्चय केला, त्याप्रमाणें पर्सी साइक्सच्या हाताखालीं सैन्य उभारण्यांत येऊन त्या सैन्यानें बंदर अबास हें आपल्या ताब्यांत घेतलें. कवामच्या साहाय्यानें फार्समधील बंडाळीहि मोडली गेली.अशी स्थिति प्राप्त झाल्या-मुळें जर्मनांनां मागें हटणें भाग पडलें. इस्पहानवर तुर्क-स्तानची फौज चाल करून येणार, अशी बातमी समजतांच ब्रिटिश व इराणी सैन्य त्याचें संरक्षण करण्यासाठीं निघालें पण इस्पहानवर तुर्कांनीं स्वारी केलीच नाहीं.

अशा रीतीनें १९१७ त दक्षिण इराणमध्यें शांतता होते न होते तोंच दुसरीकडून एक अकल्पितच संकट उद्भवलें. फेब्रुआरी, मार्च महिन्यांत बगदाद ब्रिटिशांच्या ताब्यांत होतें. तुर्कांची सत्ता दक्षिण इराणमधून नाहींशी झाली होती; पण याच वेळेस रशियांत राज्यक्रांतीनें डोकें वर काढलें होतें. झारला पदच्युत करून झारशाही नष्ट कर-ण्याचा रशियनांनीं आपला हट्ट पुरा केला होता. रशियानें दोस्त राष्ट्रांचा पक्ष सोडला होता व तो आपल्याच अंतस्थ धामधुमीची व्यवस्था लावण्यांत चूर झाला होता. रशियाचा जोर अशा रीतीनें ढिला पडल्यामुळें अझरबैजन प्रांत व तसेंच जार्जिया व आर्मेनिया प्रांत यांनीं आपलें स्वातंत्र्य जाहीर केलें, यामुळें जर्मनीला व तुर्कस्तानला पुनः धीर आला. अशी परिस्थिति पाहून ब्रिटिशांनीं डन्स्टरवेले याला इराणमधील लोकमत अजमावून रशियन लोकांनां व शत्रूंनां हांकून लावण्याचा प्रयत्न करण्यासाठीं पाठविलें. डन्स्टरवेलेनें बरीच खटपट केली व त्यांत त्याला बरेंच यश आलें. ब्रिटिश सैन्यानें बाकू शहर आपल्या ताब्यांत घेतलें.

सन १९१८ च्या पहिल्या महिन्यामध्यें ब्रिटिश सरकारनें आपल्या प्रदेशांतून सैन्य काढून न्यावें व अशा रीतीनें इरा-णला आपल्या मताप्रमाणें सुधारणा घडवून आणण्याला संधि द्यावी असें इराणनें ब्रिटिश सरकारला कळविलें; पण ब्रिटि-शांनीं जें कर्ज द्यावयाचें कबूल केलें तें मात्र इराणनें स्वीका-रावयाचें कबूल केलें. कर्ज देऊन इराणला आपल्या बाजूला ठेवण्याचा ब्रिटिशांचा डाव होता. ब्रिटिश लोक सैन्य काढून घेत नाहींत हें पहातांच त्यांनां हांकलून लावण्यासाठीं सोलाह नांवाच्या काशगाई जातीच्या नायकाच्या आधिपत्याखालीं एक कट करण्यांत आला. या कटवाल्या पुढाऱ्यानें आपल्या सैन्या-निशीं शिराझवर हल्ला करण्याचा बेत केला; पण हा बेत फुट-ल्यामुळें सिद्धीस गेला नाहीं. तरी पण सोलाहनें ब्रिटिशांविरुद्ध बंड पुकारलें. दोन्हीं सैन्यांमध्यें मधून मधून झटापटी होत असत. शेवटीं ब्रिटिश इंडियन सैन्याचें आस्ते आस्ते पाऊल पुढें पडूं लागलें. काशगाई जातीच्या मुल्लांनीं ब्रिटिशांविरुद्ध शिराझच्या लोकांनां चिथावण्याचा प्रयत्न केला. या चिथा-वणीला भुलून शिराझच्या रहिवाशांनीं ब्रिटिशांच्या बाजूचे असल्याबद्दल ज्या लोकांचा त्यांनां संशय आला होता, त्या त्या लोकांनां कापून टाकण्यास सुरवात केली; पण ब्रिटिशांनीं शिराझच्या आसपासच नाकेबंदी करून टाकल्यामुळें या लोकांचें कांहींच चाललें नाहीं. ब्रिटिशांनीं सोलाहच्या जागीं दुसऱ्याला त्या प्रांताचा सुभेदार नेमलें. पुढें १९१८ च्या आक्टोबर महिन्यामध्यें काशगाई लोकांचा ब्रिटिशांनीं पूर्ण मोड केला.

१९१९ सालीं शांततापरिषदेपुढें आपलें म्हणणें मांड-ण्याकरितां, इराणचें प्रतिनिधिमंडळ पॅरिस येथें रवाना झालें. इराणला पूर्ण स्वातंत्र्य मिळालें पाहिजे, ब्रिटिशांनीं जिंक-लेला मुलूख इराणला परत मिळाला पाहिजे व महायुद्धांत इराणच्या प्रदेशाचें जें नुकसान झालें होतें त्याची भरपाई झाली पाहिजे असें इराणचें म्हणणें होतें. १९०७ च्या अँग्लोरशियन तहानें इराण यापुढें बांधला जाणार नाहीं हें इराणनें म्हणणें ग्रेटब्रिटननें कबूल केलें.पण, इराणची अंतर्व्य-वस्था नीट लागेतोपर्यंत, आपली फौज उठवण्याचें मात्र ग्रेट-ब्रिटननें नाकारलें. या इराणी शिष्टमंडळास, परिषदेपुढें आपलें म्हणणें मांडावयाला परवानगीसुद्धां मिळाली नाहीं. यामुळें इराणनें दुसऱ्या एका नवीन प्रतिनिधीला पाठवून सुप्रीम कौन्सिलपुढें आपलें म्हणणें मांडण्याचें ठरविलें.

सन १९१९ च्या एप्रिल मे महिन्यामध्यें इंग्लंड व इराण मध्यें बरीच भवति न भवति होऊन, तेहरान येथें दोन्ही पक्षांमध्यें तहनामा घडून आला. या तहनाम्यान्वयें ब्रिटि-शांनीं इराणचें स्वातंत्र्य कबूल केलें व इराणशीं सख्यत्व ठेवावयाचें आश्वासन दिलें. इराणच्या राज्यकारभारांत जी जी कांहीं मदत लागेल, ती ती देण्याचेंहि ब्रिटिशांनीं कबूल केलें. याशिवाय इराणच्या राज्यव्यवस्थेसाठीं व सुरक्षिततें-साठीं, जितकें सैन्य व दारूगोळा जरूर आहे असें लष्करी तज्ज्ञ ठरवितील, तितकें सैन्य व दारूगोळा नेहमीं तयार रहावा यासाठीं शक्य ती मदत ब्रिटिशांनीं द्यावी असें ठरविण्यांत आलें. तसेंच, इराणमध्यें सुधारणा घडवून आणण्यासाठीं जें कांहीं द्रव्य लागेल तें योग्य जामिनावर, ब्रिटिशांनीं द्यावयाचें ठरलें. याशिवाय दळणवळण व व्यापार सुरक्षित तऱ्हेनें सुरू होण्यासाठीं, निरनिराळ्या रेल्वे तयार करण्याच्या कामांत भरपूर सहाय्य करण्याचेंहि ब्रिटिशांनीं आश्वासन दिलें.

वरील तहनाम्याप्रमाणें जवळ जवळ ६० हजार सैन्य उभारावयाचें ठरलें. सैन्याची देखरेख व व्यवस्था कशी ठेवावी यासंबंधीं सल्ला देण्याकरितां एका इंग्लिश अधि-काऱ्याची नेमणूक करण्यांत आली सैन्याचें अधिपत्य मात्र इराणी अधिकाऱ्याकडे देण्यांत आलें. मे १९२० मध्यें बोल्शेविक आरमारानें, एन्झेलीवर तोफांचा भडिमार सुरू केला व रेश्त शहर काबीज केलें. एन्झेली येथील ब्रिटिश तुकडीनें पळ काढला;त्यामुळें तेहरानमध्यें हाहाकार उडाला. पण थोडक्याच काळांत ब्रिटिशांनीं कोसॅक स्वारांच्या व इराणी शिपायांच्या साहाय्यानें बोल्शेविक लोकांनां हांकलून लावलें. पुन्हां १९२१ सालीं बोल्शेव्हिकांनीं, गिलन प्रांतां-मध्यें चढाई करण्याचा प्रयत्न केला. पण ब्रिटिशांचें सैन्य

त्या ठिकाणीं असल्यामुळें बोल्शेव्हिकांचें कांहींच चाललें नाहीं.

अँग्लोपर्शियन तहान्वयें इराणच्या जमाबंदीच्या बाबतींत सल्ला देण्याकरतां, एक ब्रिटिश फडणवीस नेमण्यांत आला निरनिराळ्या खात्यांत सुधारणा करण्यासाठीं इराणला पूर्वीपासूनच ब्रिटन व रशिया यांनीं कर्ज दिलें होतें. पण अँग्लो–पर्शियन तहानंतर, ब्रिटननें वीस लक्ष जादा कर्ज देऊं केलें.

इ. स. १९२१–१९२४:—गेल्या तीन वर्षांच्या म्हणजे मे १९२१ पासून मे १९२४ पर्यंतचा वर्तमानाचा आढावा येणेंप्रमाणें देतां येईल. या काळांत मंत्रिमंडळांत वारंवार बदल होत असे. "अँग्लोपार्शियन अग्रीमेंट" सोडून देणें (१९२१ मध्यें सोडून दिलें) इंग्रजांशीं संबंध तोडणें, स्वीडन फ्रान्स आणि अमेरिका यांस इराणच्या कारभारांत लक्ष देण्यास उत्तेजन देणें आणि बोल्शेव्हिकांच्या तावडींत इराणांस सांपडूं देणें इत्यादि राजनीतीचीं अंगें दृग्गोचर झालीं. एप्रिल १९२१ मध्यें सोव्हिअट सरकारचा प्रतिनिधि गोल्डस्टीन हा मोठ्या इतमामासह तेहेरान येथें दाखल झाला. आणि इराण व रशियाचा तहनामा झाला होता तरी रशिअन फौज इराणांतून हलविली गेली नव्हती. मे १९२१ मध्यें झैसैयद उद्दीनच्या मंत्रिमंडळाच्या जागीं क्वाम-एस-सुलतान यांचें मंत्रिमंडळ आलें. १९२२ मध्येंमेशिरएद-दौलाचें मंत्रिमंडळ आलें. पुन्हां त्याच्या नंतर थोडक्याच दिवसांनीं क्वाम-एस-सुलतानचें मंत्रिमंडळ आलें पण पुन्हा जानेवारी १९२३ मध्यें तें मंत्रिमंडळ गेलें आणि मोशेवार-एल् मामलेक (हा १९१७–१८ मध्यें पूर्वी प्रधानपदावर होताच) चें मंत्रिमंडळ आलें. पुन्हां सहामहिन्यांत मोहोर–उद्दौला हा अधिकारारूढ झाला पण त्याचा अधिकार दोन अडीच महिनेच होता. १९२३ च्या आक्टोबरमध्यें लष्करी खात्याचा मंत्री असलेला सरदार सेपाह हा मुख्य प्रधान झाला. या वेळेस मात्र लोकांस जोरदार माणसें अधिकारारूढ असावींत असें वाटत होतें. सेपाहची सत्ता १९२४ च्या एप्रिल ७ पर्यंत टिकली आणि त्या दिवशीं जरी त्याला अधिकारत्याग करावा लागला तरी त्यानें कांहीं सहकारी बदलले तेव्हां तो सातदिवसांनीं पुन्हां प्रधान झाला. या अधिकारावर असलेल्या मंडळींच्या अस्थिरतेमुळें इराणच्या उन्नतीविषयीं बाहेरदेशीं लौकिक बराच कमी झाला. आणि देशांत देखील सुधारणा करण्यास फारसें झालें नाहीं. कुरिस्तानांतील बंडाळी देखील १९२३ पर्यंत मोडतां आली नाहीं. इकडे लोक राज्यावरील अनेक प्रधान वारंवार बदलीत होते, तेव्हां शहानें जर जोरदारपणा दाखविला असता तर बराच उपयोग झाला असतां पण शहाला यूरोपाच्या सफरींचा नाद लागला. पूर्वेकडील देशांतील राजे रजवाडे यूरोपांत गेल्यामुळें त्यांची दृष्टि व्यापक होते आणि त्यांस अनेक प्रकारच्या सुधारणा करतां येतात अशी अपेक्षा असते पण त्याचा असाहि परिणाम होतो कीं, त्यांनां परदेशीं जाऊन राहण्याची चट लागते आणि देशांतील राज्यव्यवस्थेकडे त्यांचें दुर्लक्ष होऊं लागतें. शहाच्या सफरीमुळें असाच परिणाम झाला. आणि लोकांत क्षोभ उत्पन्न होऊं लागला १९२४ च्या प्रारंभीं ज्या वेळेस "मजलिस" (पार्लमेंट) युवराजानें उघडली. तेव्हां राजसत्ताविरोधी मंडळींनीं आपली इच्छा तेहरानमध्यें अधिक स्पष्टपणें नजरेस आणणें सुरू केलें. त्यावेळेस प्रागतिक उर्फ लोकसत्तावादी पक्ष मजलिसमध्यें जोरांत होता तो पक्ष आणि समाजसत्तावादी पक्ष यांनीं असें ठरविलें कीं, इराण हें लोकसत्तात्मक राष्ट्र करावें, पण या कार्यास धर्माधिकारी आणि जनता यांचा तीव्र विरोध दिसून आल्यामुळें राजसत्ता नष्ट न करतां शहास पदच्युत करून त्याच्या दोन वर्षांच्या मुलास राज्याधिकारी ठरविलें आणि तोपर्यंत अधिकार राजप्रतिनिधीनें चालवावा असें ठरलें.

या कालांत ब्रिटिश साम्राज्याविषयीं इराणांत काय प्रकारची वृत्ती होती हें लक्षांत घेण्याजोगें आहे. इराणांत सुधारणासाठीं पैसा हवा होता आणि त्यांतल्यात्यांत इराणच्या शहाच्या वाढत्या खासगी खर्चालाहि बाहेरचें कर्ज काढण्याची आवश्यकता उत्पन्न झाली. यामुळें भांडवलवाल्या राष्ट्रांस आपले हातपाय इराणांत पसरण्यास संधि मिळाली. १९२१ मध्यें इंग्लंड व इराण यांच्यामध्यें एक ठराव झाला होता. त्या ठरावाप्रमाणें इंग्लंडनें इराणच्या जमाबंदीची पुनर्घटना करावी आणि इराणास जोरदार राष्ट्रीय फौज निर्माण करण्यास मदत करावी आणि अंतर्गत दळणवळण आणि व्यापार यांच्या वृद्धीस मदत करावी आणि तीन कोट रुपये कर्ज इराणास त्याच्या अंतर्गत आणि जकातीच्या वसुलाच्या तारणावर द्यावें इत्यादि अटी होत्या, परंतु हा ठराव इराणच्या पार्लमेंटनें फेटाळून लावला आणि अमेरिकन सल्लागार बोलावले. या अमेरिकन सल्लागारांची कर्तबगारी अजून दिसावयाची आहे. या वेळेस ब्रिटनविरुद्ध जें लोकमत झालें त्याचें कारण मेसापोटेमियांतील घडामोडी होत. मेसापोटेमियांमधील इराणी शियापंथी उपदेशक घालवून दिले गेले आणि त्यामुळें इंग्रजी मालावर बहिष्कार घालण्याची चळवळ तेहरानमध्यें (जुलै १९२३) सुरू झाली.

बोल्शेविक चळवळ.—१९२२ च्या मे महिन्यांत प्रथमच कर्मन व शिराज येथें रशियन वकिलाती स्थापन झाल्या. १९२३ च्या जुलईत रशियानें इराणच्या मागणीप्रमाणें व्हेन्स्टोर्ग रशियन कंपनीचा व्यापारी मक्ता रद्द करण्याचें नाकारिलें. इराणी व्यापार वाढविण्यासाठीं ब्रिटिशांविरुद्ध चळवळ सुरू करण्यांत आली; बोल्शेविझमची प्रशंसा होऊं लागली व रशियन कान्सलनीं ब्रिटिश मालांवर इराणकडून बहिष्कार घालण्याविषयीं खटपट चालविली. पण जेव्हां रशियन सरकारानें निजनी नोव्हगोरोड जत्रेच्या प्रसंगीं (१९२३)

उत्तरेकडील इराणी व्यापाऱ्यांनां भयंकर कर देण्यास व रोकड इराणांत परत न नेण्यास भाग पाडिलें, तेव्हां ते रशियाच्या विश्वासघातकी, वर्तनाविषयीं ओरड करूं लागले.

वर्तमान पत्रें व त्यांचें धोरण.—१९२१ सालापासून इराणी वर्तमानपत्रांनीं सरकारी नोकरींत असलेल्या यूरोपियन अधिकाऱ्यांवर टीकेचा मारा सुरू केला. सरकारी खात्यांतून फक्त इराणी नोकर नेमावेत असा त्यांचा आग्रह असे. 'इत्तेहाद' ( एकी ) पत्र रशियनद्वेष्टें होतें; 'हाघी हात' ( सत्य ) पुष्कळ सरदारांची नालस्ती करी; 'इराण अझद' ( स्वतंत्र इराण ) आंग्लो इराणी तहाच्या विरुद्ध असे; 'शाफक सोरख' ( रक्तउषा ) युवराजानें केलेल्या पैशाच्या मागणीमुळें रागावलेलें होतें, 'इरामझद' ब्रिटिशांचें वर्चस्व रशियाच्या वर्चस्वा इतकेंच वाईट आहे असें प्रतिपादी. १९२२ च्या सपटेंबर महिन्यांत इराण सरकारानें पुष्कळ पत्रें त्यांतील ब्रिटिशांविरुद्ध लेखांमुळें बंद पाडलीं. युद्ध मंत्र्यावर कडक टीका केल्यामुळें लष्करी तुकडीनें जुलै १९२३ त 'वथन' वर छापा घातला.

तेलावर कर्ज काढण्याचें आंग्ल धोरण.—नवीन सरकारनें पर्शियन ऑईल कंपनीला पूर्वी उत्तर इराणांतलि तेला संबंधी दिलेल्या कांहीं सवलती काढून घेतल्या व १९२२ च्या जानेवारींत अमेरिकन स्टॅन्डर्ड ऑइल कंपनीला पुष्कळ सवलती दिल्या. तेलाच्या उत्पन्नावर इराण सरकारला २ लक्ष पौंड रकम १९२२ च्या मार्च महिन्यांत उसनवार मिळाली. जून महिन्यांत एक कोटी डॉलर कर्ज देण्याच्या बोलीवर एका अमेरिकन कंपनीस बऱ्याच सवलती इराणला देतां आल्या.

येज्दच्या सुलतानानें एका ब्रिटिश कंपनीला इराणच्या आखाताच्या किनाऱ्यावर असणाऱ्या ह्रासा प्रांतांतल्य ४०००० मैलांइतक्या प्रदेशांत तेलाच्या सवलती दिल्या ( जून १९२३ ).

गुलामांचा व्यापारः—ओमान आखाताच्या किनाऱ्यावर बटिने येथील एलसद जातीचे लोक इराणांतून गुलाम आणून व्यापार करितात अशा अर्थाचा पुरावा १९२१ च्या मार्च महिन्यांत ब्रिटिश पार्लमेंट पुढें आला होता.

इराणची भाषा व वाङ्मय यांकरितां फारसी भाषा व वाङ्मय पहा.

[सं द र्भ ग्रं थ.—ॲंडर्सन-माय वॉंडरिंग्स इन पार्शीया; साइक्स-ऑन ए साइड सॅडल थ्रू पर्शिया; वर्झी-पीप्स इंटु पर्शिया; मालकम-स्केचेस ऑफ पर्शिया; चार्डिन-ट्रॅव्हल्स थ्रू पर्शिया ( ३ भाग ); नाइट-ट्रॅव्हल्स इन पर्शिया(भाग ३) बॅसेट-पर्शिया दि लॅंड ऑफ दि इमाम्स; ब्लॅनफर्ड-ईस्टर्न पर्शिया ( लंडन १८७६); मोल्टन-अर्ली रिलिजियस पोएट्री ऑफ पर्शिया; गाल्डिवन-पर्शियन क्लासिक्स (इंग्रजी भाषांतर २ भाग ) स्मिथ-आर्ट ऑफ पर्शिया; फ्रेझर-हिस्टॉरिकल ॲंड डिस्क्रिप्टिव्ह अकाउंट ऑफ पर्शिया; स्टीव्हन्स-हिस्टरी ऑफ पर्शिया (२ भाग; ) सायकीज-हिस्ट्री ऑफ पर्शिया; ( दुसरी आवृत्ति१९२१);प्रो. ब्रॉऊन-दि पर्शियन रेव्होल्यूशन ( १९१० ); पिगॉट-एन्शंट ॲंड मॉडर्न पर्शिया; बेंजामिन पर्शिया ( स्टोरी ऑफ नेशन्स ); जॅक्सन-पर्शिया पास्ट ॲंड प्रेझेंट ( १९०६ ); बार्कर-लेटर्स फ्रॉम पर्शिया ॲंड इंडिया-१८५७-१८५९; कर्झन—पर्शिया ॲंड दि पर्शियन क्श्चन, ( दोन भाग ); डायरी ऑफ दि शहा ऑफ पर्शिया ड्यूरिंग हिज टूर इन यूरोप ( १८७३ ), ( भाषांतरकार-रेड हॉऊस ); फ्रेझर-पर्शिया ॲंड टर्की इन रिव्होल्ट ); हॉल-एन्शंट हिस्टरी ऑफ दि निअर ईस्ट (१९१३ ; डन्स्टरव्हिले दि ॲडव्हेंचर्स ऑफ डन्स्टरफोर्स ( १९२० )]

इरावती-अर्जुनपौत्र परिक्षित राजाची स्त्री; ही विराटपुत्र उत्तराची कन्या होय.

इरावती नदी—ब्रह्मदेशांत ही नदी मखी व मलिखा ह्या दोन नद्यांचा संगम होऊन बनली आहे. ह्या नदीच्या योगानें ब्रह्मदेशाचे पूर्व व पश्चिम ब्रह्मदेश असे भाग पडतात व ही नदी ९०० मैल वहात जाऊन अखेरीस बंगालच्या उपसागरास मिळते. ह्या नदीचें महत्त्व ब्रह्मदेशांत फार आहे. पूर्वीचीं सर्व राजधानाचीं शहरें हिच्याच तीरावर वसलेलीं होतीं. अर्वाचीन काळीं सुद्धां अतिशय लोकवस्तीचीं शहरें उदाहरणार्थ मंडालें, प्रोम, हेंझाड, मिंग्यान वगैरे हिच्या तीराच्या आश्रयानें आहेत. ही नदी सर्व वर्षभर जलपर्यटणास व व्यापारास उपयोगी पडते. ह्याचें मुख्य कारण म्हटलें म्हणजे या नदीला अनेक नद्या येऊन मिळतात. उदाहणार्थ भामोजवळ तापिंग व नंतर श्वेली नदी; आणि उत्तरेस मंडालेजवळ मदय ओढा; पूर्वेकडून म्यिट्न्गे व म्यू, पॅकोकु जवळ चिंडविन नदी व नंतर मॉन व मॅन आणि इतर कांहीं नद्या.

पुष्कळ जमीनीस पाणी पुरविणारी नदी ह्या दृष्टीनें इरावतीचें महत्त्व फार आहे. पावसाळ्यामध्यें हिचें पाणी फार चढतें व त्यामुळें आसपासची निम्न भूमी जलमय होऊन जाते. ज्या वेळीं वर्षाकाल संपतो व सर्व पाणी निघून जातें त्या वेळीं प्रवाहाबरोबर वाहत आलेली सुपीक माती तेथेंच रहाते. म्हणून तांदुळास ही जमीन फारच उपयोगी पडते. पण एक गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे कीं, ब्रह्मदेशांत या इरावती नदीमुळें मुद्दाम बांधलेल्या पाटबंधाऱ्यांना पाणी मिळत नाहीं. ह्या नदीच्या मुखाजवळचा त्रिकोणाकृति जो प्रदेश आहे त्याला ह्या नदीच्या पुरापासून धक्का पोंचत नाहीं. कारण त्याला मोठमोठे बांध घातले आहेत.

ब्रह्मदेशांतला बराच अंतर्व्यापार इरावती नदीच्या मार्गानें चालतो 'इरावती फ्लोटीला' कंपनीचीं जहाजें तेल, चहा, कापूस व धान्यें यांची तसेच मीठ कापड व इतर वस्तू यांची ने आण करीत असतात. कांहीं स्वदेशी बोटी व बांबू आणि लांकूड यांनीं बनवलेले मचवे सुद्धां हे जिन्नस ने आण करण्याचें काम करतात. इरावती नदीच्या तीरावर जीं गावें

आहेत त्या गांवांना ह्या नदीपासून पाणी मिळतें. ह्या नदींत भरतीचें पाणी किनाऱ्यापासून ७० मैल पर्यंत डोनॅबू पर्यंत येतें. ह्या नदीला कोठेंहि पूल नाहीं. [ इं. गॅ. ]

( २ ) पंजाबांतील रावी नदीला इरावती असें नांव होतें. " इरावती परुष्णीत्याहु " असें यास्क म्हणतो. बृहत्संहिता ( १६, २७ ), महाभारत ( कर्ण प. अ. ४४; भीष्मपर्व अ. ९ ) मत्स्यपुराण ( अ. ११३ ) या, ग्रथांतून या इरावतीचा उल्लेख आढळतो.

**इरावान**—अर्जुनास उलूपीपासून झालेला पुत्र. हा भारती युद्धांत पांडवाकडे होता ( भारत भीष्म० अ० ४५ ). यास दुर्योधनपक्षीय आर्षशृंगी राक्षसानें मारिलें. ( भार० भीष्म० अ० ९० ).

**इरावती विभाग**—लोअर बर्मा. हा ब्रह्मदेशाच्या नैर्ऋत्येच्या कोंपऱ्यास आहे. आराकानयोमा हा भाग वगळला तर बाकीचा सर्व भाग उंच प्रदेशांतून प्रवाहाबरोबर वहात येणाऱ्या गाळानें तयार झाला आहे व त्या जमीनीला पुष्कळ नद्यांचें पाणी मिळतें. ह्या विभागाचे पांच जिल्हे आहेत. उत्तरेस हेंझाडा; पूर्वेस माडबिन आग्नेयेस पियापन्, दक्षिणेस म्यौंगम्या व नैर्ऋत्येस बेसिन्. ह्या विभागाची लोकसंख्या सन १९२१ सालीं २०३००४४ होती. ह्या विभागांत ७१९५ खेडेगांव व १३ शहरें आहेत. बेसिन हें विभागाचें मुख्य ठिकाण आहे. ह्या विभागांत ब्रह्मी, करेण, तलैंग, आराकानी, चिन व शान या जातीचे लोक आहेत.

**इरिंजालकुड**-(मद्रास,)कोचीन संस्थान.उ, अ. १०°२२' व पूर्व रेखांश ७६°१४'. येथील लोकसंख्या १९१० मध्यें ८६९९ होती व त्यापैकीं बरेचसे हिंदु आहेत. मुकुंदपुरम् तालुक्याचें हें मुख्य ठिकाण असून ह्या ठिकाणीं तहशीलदाराची कचेरी, मुनसफ कचेरी, एक हायस्कूल व अनेक राजवाडे आहेत. ह्या शहरांत कूडलमानिक्कम् ह्या नांवाचें मोठें उत्पन्न असलेलें देवालय आहे व त्याची व्यवस्था एक शूद्र संन्याशी पाहतो. त्याला 'थचुध्य कैमल' अशी पदवी आहे. त्रावणकोरचे राजे या संन्याशाची नेमणूक करितात. [ इं. गॅ. ]

**इरिट्रिआ**—(आफ्रिका) तांबड्या समुद्रावरील इटलीची एक वसाहत. ही साकिनच्या दक्षिणेस ११० मैलांवर असलेल्या रास कासर ह्या भूशिरापासून बाबेलमांडेबच्या सामुद्रधुनींत असलेल्या रासड्यमेरिआपर्यंत पसरली आहे. ही आंतल्या बाजूस आंग्ल–ईजिप्त, सुडान, अबिसीनिया, व फ्रेंच–सोमाली लँड यांनीं मर्यादित झालेली आहे. इरिट्रिआचें एकंदर क्षेत्रफळ सुमारें साठ हजार चौरस मैल असून लोकसंख्या अंदाजें चार लक्ष पन्नास हजार आहे.

या वसाहतीचे निसर्गतःदोन विभाग करितां येतील. उत्तर भाग हा अबिसीनियाच्या डोंगराळ मुलुखाचा व दक्षिण भाग डानाकिल देशाचा एक भाग होय. या वसाहतींतील सपाटीचा प्रदेश बहुतेक रुक्ष असून त्यांत लाजाळूचीं झाडेंच फार आहेत. ॲन्सलेच्या उपसागराजवळील प्रदेशांत टेंकड्या व दऱ्या खोरीं फार आहेत. या ठिकाणाहून पुष्कळ नद्या वाहत असल्यामुळें हा प्रदेश साधारण सुपीक आहे. इरिट्रिआमध्यें नौकानयनाहं अशा नद्या नाहींत म्हटलें तरी चालेल. कांहीं नद्या उन्हाळ्यांत शुष्क तर पावसाळ्यांत पाण्यानें तुडुंब भरलेल्या असतात.

वसाहतींतील निरनिराळ्या भागांत निरनिराळें हवामान आहे. कांहीं भागांत जून, सप्टेंबर व आक्टोबर ह्या महिन्यांत अतीशय प्रखर उन्हाळा असतो, व तो नोव्हेंबर व एप्रिल या महिन्यांत मंदावतो. कांहीं भागांत आगष्टमध्यें अतिशय पाऊस तर मेमध्यें प्रखर उन्हाळा असतो. उंचवट्याच्या प्रदेशांतील हवा साधारण थंड आहे. डोंगर पठारीच्या भागांत ऑलिव्ह, अंजीर व मका यांचें उत्पन्न फार आहे. येथील जंगलांत सिंह, हत्ती, उंट, काळवीट वगैरे प्राणी सांपडतात. मैदानावर अथवा टेंकड्यांत राहणारे लोक हे अर्धवट भटक्या जातीचे शेतकरी आहेत. उत्तर भागांतील लोक आरब अथवा हॅमिटिक वंशाचे आहेत. डोंगर पठारावर अबीसिनीयन लोक राहतात.

वसाहतींतील बहिर्व्यापाराच्या मुख्य वस्तू म्हटल्या म्हणजे डिंक, मेण, चामडें, काफी, हस्तिदंत इत्यादि होत. मसावा येथें मोत्यें काढण्याचा धंदा फार मोठ्या प्रमाणांत चालतो. इरिट्रिआ ही इटलीची वसाहत आहे. येथील राज्यकारभार मुलकी अंमलदार पाहतो. तो रोम येथील मंत्रिमंडळाला जबाबदार असतो. या वसाहतीचे सहा विभाग केले आहेत. प्रत्येक भागावर एक कमिशनर आहे.

सरहद्दवरील कांहीं भागांत रेसिडेंट नेमले आहेत. हे कमिशनर व रेसिडेंट गांवचा मुख्य, ज्ञातीचा मुख्य, अथवा जिल्ह्याचा मुख्य, यांच्या द्वारें राज्यकारभार चालवितात. दिवाणी दाव्याचे निकाल बहुधा हे मुख्यच देतात. रेसिडेंटला किंवा अपील कोर्टाला हे निकाल फिरवितां येतात.

रोमन साम्राज्याच्या आरंभीच्या काळांत इरिट्रिआ हें आक्झुमाईट लोकांचें स्वतंत्र राज्य होतें. नीरोच्या आमदानीच्या अखेरीस आक्झुमाईट लोकांच्या राजाचें स्वाकिनपासून बाबेलमांडेबपर्यंत तांबड्या समुद्रावर राज्य होतें. हा राजा आपल्याला सम्राट म्हणवीत असे, व याचा व रोमचा मित्रत्वाचा संबंध असे. मॅरेब नदीच्या उत्तरेकडील प्रांतावर सालोसाल हा राजा राज्य करीत असे. त्याचा मंत्री मायकेल यानें त्याला पदच्युत करून तो सबंध उत्तर मॅरब–प्रांत सालोमनच्या शत्रूच्या हवाली केला. सोळाव्या शतकांत झुला व मसावा, हीं ठाणीं तुर्कांनीं काबीज केलीं. १८६५ त मसावा व शेजारचा प्रदेश इजिप्तनें घेतला. १८७२ त केरेन व बोगॉस हीं स्थळें इजिप्तनें घेतलीं व केरेन काबीज करून तेथें आपलें सैन्य ठेविलें. १८८५ च्या फेब्रुवारी महिन्याच्या पांचव्या तारखेस इटलीच्या सैन्यानें

मसावा काबीज केलें. सुएझ कालवाहि आतां पूर्ण झाल्यामुळें इटली, ग्रेटब्रिटन व फ्रान्स, हे तांबड्या समुद्राच्या किनाऱ्यावर मुलुख मिळविण्याच्या फिकीरींत होतेच. १८७० त इटलीनें असाब व त्याचे जवळील कांहीं भाग विकत घेतला; व ग्रेटब्रिटन वगैरे राष्ट्रांची संमति नसतांहि १८८२ च्या जुलई महिन्यांत 'असाब, ही इटलीची वसाहत,' असें जाहीर करण्यांत आलें. औसाच्या सुलताननें डानाकिल किनारा देखील इटलीचे स्वाधीन केला, इतकेंच नव्हे तर आपला सबंध देश इटलीच्या संरक्षणाखालीं दिला.

१८९० च्या ज्यानुआरीचे पहिले तारखेस इटालीच्या तांबड्या समुद्रावरील मुलुखांची एक वसाहत बनविण्यांत आली व तिला इरिट्रियाची वसाहत असें नांव देण्यांत आलें. प्रथम या ठिकाणीं केवळ लष्करी सत्ता स्थापण्यांत आली. पण अबिसीनिअन लोकांनीं वाव दिल्यामुळें तींत बऱ्याच सुधारणा करण्यांत आल्या.

**इरुल**—नीलगिरींमधील एक जात. सर्व नीलगिरी जातींमध्यें या जातीचे लोक अतिशय काळे असतात. यांची भाषा तामिळी भाषेचें एक अपभ्रष्ट स्वरूप म्हणतां येईल. हे रंगस्वामी ( विष्णूचें एक स्वरूप ) चे उपासक आहेत. या देवतेचे पूजारी इरुलच असतात हे बहुधा शेतकीवरच उपजीविका करितात. इरुल बायका पुरुषांप्रमाणें शेतकाम करितात. सध्यां कांहीं इरुल जंगल खात्यांत असून मेण, मध, शिकेकाई, साळी वगैरे जमवून आणण्याचीं कामें करितात. गाईम्हशींचें मांस हे खात नाहींत पण यांना इतर मांस चालतें. यांच्यांत लग्नाच्या कराराची पद्धत नसून, वाटेल तीं दोन स्त्रीपुरुषें एकमेकांशीं संलग्न होतात; संयोगवियोग वगैरे बाबतींत स्त्रीच्या इच्छेप्रमाणें चालतें असें एक ग्रंथकार म्हणतो. मृताला बसलेल्या स्थितींतच पुरतात. पूंगरु, कुडगर ( कुर्गचे लोक ), कलकट्टी, वेल्लक, देवाल आणि कोप्पिलिंगम् या यांच्यांतील पोटजाती होत. पहिल्या पांचांत परस्पर विवाह होत नाहींत. या पांच जातींतील माणसांनीं कोप्पिलिंगम् जातीशीं विवाह करावयाचा असतो.

चिंगलपट व दक्षिणउत्तर अर्काट येथील इरुल वरील वन्य जातीपेक्षां कांहीं सुधारलेले दिसतात. यांचा मुख्य धंदा भात सडण्याचा होय. कांहीं लांकडें, पत्रावळी विकतात; कोणी वैदूचा धंदा करितात. कन्निअम्मा व मारी या देवतांची हे आराधना करितात. उत्तर अर्काट मधिल इरुल सप्तकान्निकै ( सप्त कन्यका ) यांची पूजा करितात. कोणत्याहि समारंभांत हे गायन करीत नाहींत; अंगावर जितके कमी कपडे ठेवितां येतील तितकेच ठेवितात. तान्ह्या मुलाला सुद्धां कपड्यांनीं न झाकितां, जमीनींत लहान खड्डा खणून व त्यांत पानें घालून त्यांवर ठेवितात. इरुल भविष्यें सांगतात; अंगांत देवी आणतात. इरुलांना कधीं कधीं शिकारी म्हणतात. १९११ मध्यें यांची संख्या एक लक्ष होती. [ थर्स्टन. सेन्सस रिपोर्ट. ]

**इरेक**.—(बाबिलोनियन लेखांत उरूक) हे बाबिलोनियांतील एका प्राचीन शहराला बायबलांत नांव दिलेलें आढळतें. सध्यांच्या युफ्रेटिस नदीच्या पूर्वेस हें शहर होतें. हें बाबिलोनियांतील सर्वांत जुनें व महत्त्वाचें शहर गणलें जाई. येथेंच एअन्ना नांवाचें प्रसिद्ध देवालय असून त्यांत नना अथवा इष्टरची पूजा होत असे. इरेकनें त्या देशांतील राजकीय इतिहासांत बराच भाग घेतला होता; नंतर इलेम विरुद्ध झालेल्या बाबिलोनियाच्या राष्ट्रीय युद्धांत इरेक बरेंच पुढें आलें ( इ. स. पूर्वी २००० व त्या पूर्वी ). यानंतर इरेक हें विद्येचें माहेरघर म्हणून प्रसिद्ध होतें. येथूनच असुरबनिपालनें आपल्या निनेव्हेच्या पुस्तकालयांत बरीच ग्रंथसामुग्री नेली. हें शहर इराणी व सेल्युसिद अमलांत अस्तित्वांत असावें असें शिलालेखांवरून कळतें. प्राचीन भाग वार्का या नांवानें ओळखला जातो. हा बाबिलोनियांतील सर्वांत मोठा अवशेष आहे. अतिशय प्रसिद्ध अशा अबुबर्दी नांवाच्या अवशेषांमध्यें एअन्ना देवळाचा एक बुरूज ( झिगुरस ) आहे. वार्काच्या जवळपास निमुळत्या होत गेलेल्या वाळूच्या टेंकड्या आहेत.

**इर्कुटस्क**.—आशियांतील रशियाच्या इर्कुटस्क नांवाच्या प्रांताचें मुख्य शहर. हें सायबेरियांतील फार महत्त्वाचें ठिकाण आहे. लोकवस्तीचें सर्वांत मोठें ठिकाण, मुख्य व्यापाराचें ठाणें, एक तटबंदीचें लष्करी ठिकाण, व विपुल विद्वत्संस्थांचें केंद्रस्थान इत्यादि अनेक दृष्टींनीं या स्थळाला फारच महत्त्व प्राप्त झालें आहे. हें सेंटपीटर्सबर्ग पासून आगगाडीनें ३७९२ मैलांवर आहे. १९०० सालीं येथील लोकसंख्या ४९१०६ होती. मुख्य शहर आंगारा नदीच्या दक्षिण तीरावर आहे. या नदीला शहराच्या अगदीं समोर इर्कुट नदी मिळते.या नदीवरूनच या शहराला हें नांव मिळालें आहे. प्रेक्षणीय शहर म्हणून याची फार पुरातन काळापासून ख्याति आहे. १८७९ मध्यें या शहराला आग लागल्यामुळें त्याची बरीच खराबी झाली. गव्हर्नरचा प्रासाद, औषधि पाठशाळा, एक पदार्थसंग्रहालय, लष्करी दवाखाना इत्यादि सार्वजनिक संस्था व इमारती या ठिकाणीं आहेत. १६५२ सालापासून इव्हान पोखाबॉव्ह हा हिवाळ्यांत येथें मुद्दाम राहूं लागला. यानें मुद्दाम उभारलेल्या निवासस्थानापासूनच या शहरांची स्थापना झाली आहे.

**इलकल**—विजापूर जिल्ह्यांत हुनगुंद तालुक्यांत हें शहर आहे. येथील लोकसंख्या सुमारें नऊ हजार आहे. ह्या गांवाला म्युनिसिपालिटी असून तिचें उत्पन्न १९०३-४ सालीं चौसष्टशें रुपये होतें. हें गांव विणकाम व कापडास रंग देणें ह्या धंद्यांचें मुख्य ठिकाण आहे. येथून रेशमी व सुती कापड आणि शेतीचे पदार्थ बाहेर जातात. ह्या शहरीं पौष महिन्यांत बनशंकरी देवीनिमित्त मोठी जत्रा भरते. येथील लुगडीं प्रसिद्ध असून, हल्लीं दक्षिणी बायकांत त्यांचा बराच प्रसार आढळतो.

**इलयतु**—यांची वस्ती मद्रास व त्रावणकोर संस्थानांत आहे या जातिनामाचा शब्दशः अर्थ कनीयस् असा आहे. हे मलयाळ शूद्रांचें उपाध्येपण पत्करणारे मलबारी ब्राह्मणांपैकींच होत. नंबुद्री आणि यांच्यामध्यें खाणेंपिणें, कपडा, दागिने वगैरे गोष्टींमध्यें बरेंच साम्य आहे. यांच्या जातीविषयींची सर्व व्यवस्था नंबुद्री ब्राह्मणांकडेच असते. हे मलयाल शूद्रांचे संमत पुरोहित होत.

इलयतूंना एलदय असेंहि दुसरें नांव आहे. हे दारिद्र्य-ग्रस्त व उदास दिसतात. भिक्षुकीखेरीज दुसरा धंदा यांनां पसंत पडत नाहीं. नायरांची भिक्षुकी करून हे आपला उदरनिर्वाह करितात. यांच्या घरीं सर्पवाटिका असून त्या ठिकाणीं सर्पपूजा होते. इलयतूंचे गुरु किंवा उपाध्ये नंबुद्री ब्राह्मण असतात. इलयतूंच्या घरीं ब्राह्मण स्वयंपाक करीत नाहींत.

यांचीं दोन गोत्रें असतात. एक विश्वामित्र व दुसरें भारद्वाज. मुलींचीं लग्नें बारा ते अठरा वयापर्यंत करितात. हुंडा देण्याची चाल नसून फक्त कमींतकमी १४० रुपये वरास पावते करतात. ते अशाकरितां कीं, नंबुद्र्यांप्रमाणें इलयतु कुटुंबांत फक्त वडील मुलानें कायतें लग्न करून संसार करावयाचा असतो. बाकीच्या पुरुषमंडळींनीं नायर किंवा अंबलवासी बायका बाळगून रहावें. पतीच्या मृत्यूनंतर बायका केस काढीत नाहींत. ब्राह्मणामधील सोळा संस्कार हे पाळितात. इलयतु यजु असून आश्वलायन व बौधायन सूत्रांचा परिग्रह करितात. बाळंतपणानंतर नव्वद दिवस बायकांनां विटाळ असतो असें मानतात. १९११ सालीं हिंदुस्थानांत एकंदर ४७९६ इलयतु होते. [ थर्स्टन; सेन्सस रिपोर्ट. ]

**इलाम**.—इलाम हें नांव इराण देशाबद्दल बायबलांत सांपडतें इराणला प्राचीन भूगोलवेत्ते सुसियाना या नांवानें संबोधितात. या देशांत निरनिराळ्या जाती रहात असत. व त्या वेगवेगळ्या भाषा बोलत. पश्चिम भागांत मात्र सेमाइट लोक असत. सुसा हें शहर इराणी साम्राज्याची राजधानी झाल्यापासून सुसियाना नांव प्रचारांत आलें. सुसा खेरीज अन्झान (अन्शान, असान) हें शहरहि महत्त्वाचें होतें.

इलाम मधील मुख्य पर्वत—चॅरॅनस व कॅम्बालिदस हे उत्तरेस आहेत. नद्यांमध्येंउलाई अथवा उलेइस (कुरन)पॅसी टिग्रीस चोआसपेस (केरखाह) कॅप्रेटस, हेडिफॉन, अथवा हेडिप्नस ( जेराहि ) व ओरोटिस ( हिंयान ) या मुख्य आहेत.

अक्कडच्या सारगाननें जेव्हां इलाम जिंकले त्यावेळेस सुसा हें तटबंदीचें शहर असून तेथें बाबिलोनियन सुभेदार रहात होता. यानंतर बरीच शतकेंपर्यंत इलामवर सेमेटिक सत्ता होती. उर घराण्यांतील एका राजानें सुसा बांधिलें व बाबिलोनियाच्या प्रथम घराण्याचा उदय होण्यापूर्वीच इलाम स्वतंत्र झालें होतें. इ. स. पूर्वी २२८० त कुतुर-नाख-खुंते नांवाच्या इलामच्या राजानें बाबिलोनियावर स्वारी करून इरेक येथील नना देवीची मूर्ति नेली. याच घराण्यांतील उंतास गाल राजाची इमारती बांधण्याबद्दल प्रसिद्धि असे. सुत्रक नाखखुन्ते ( इ. स. पूर्वी १२२० ) यानें बाबिलोनिया उध्वस्त केला. यानेंच तेथील राजा झमामासुम-इद्दीनला ठार मारून नरमसिनचा स्तम्भ, सिप्परा येथील खम्मुरबीच्या कायद्यांचा ग्रंथ व अक्कड येथील मनिस्तुसुचा स्तम्भ इत्यादि बरोबर आणलें. यानेंच अनुनाक देश जिंकिला. इ. स. ७५० त उंबदरा व ७४२ त खुंबनीगस हे इलामचे राजे होते. या खुंबनीगसनें इ. स. पूर्वी ७२० त सारगानच्या आधिपत्या-खालील असुरियन लोकांशीं दुर-इली येथें युद्ध केलें. याच वेळेस मेरॉडाक बॅलदननें बाबिलोनिया स्वतंत्र केलें व त्यामुळें असुरियन सैन्यास उत्तरेस हटावें लागलें. यापुढें इलाम असुरियनांच्या विरुद्ध लढलें. इ. स. पूर्वी ७०४ त इलाम व बाबिलोनिया यांच्या संयुक्त सैन्याचा पराभव किस येथें झाला. खलुस्सुनें इ. स. पूर्वी ७०० त आपल्या भावास म्हणजे इलामच्या राजास पदच्युत केलें नंतर सहा वर्षांनीं बाबिलोनियांत स्वारी केली व सेनाचेरिबच्या मुलाचा पाडाव करून नेर्गल युसेझिबला गादीवर बसविलें. ६९४ त याचा खून झाला. ६९४ पासून ६८१ पर्यंत लागोपाठ तीन राजे गादीवर बसले. ६८१ त उर्तकी गादीवर आला. हा मेल्यानंतर याचा भाऊ टयुमन गादीवर आला. व यानें असुरबनिपालशीं भांडण उकरून काढिलें. पण याचा पराभव होऊन हा ठार मारला गेला. यानंतर बरीच बंडाळी होऊन पदच्युत झालेला तिसरा खुंबा खालदास पुन्हां गादीवर आला. याच्या वेळेस असुरियन स्वारी होऊन हा राजा पळून गला. शत्रूंनीं सर्व देश उध्वस्त केला व सुसा शहर लुटून फस्त केलें. हें ६४० त ( इ स. पूर्वी ) घडलें असावें. असुरियन साम्राज्याचा लय झाल्यानंतर इलाम येथें सायरसचा पूर्वज इराणी तैसपेस राज्य करूं लागला. सुसा पुन्हां राजधानी झाली. इराणी साम्राज्य स्थापन झाल्यावर सुसा हें महत्त्वाचें सरकारी ठाणें झालें. दरायसच्या वेळेस येथें बंड झालें परंतु इलामचें लोक पुढें इराणी आर्यांत मिसळले इलामचा मुख्य देव इन सुसीनाक होता. याची मूर्ति व देववाणी साधारण लोकांस पाहण्यास व ऐकण्यास मनाई होती.

**इलाम बाझार**—इलाम बाजार हें बंगाल मधील बिरभूम विभागांतील खेडेंगांव आहे. हें व्यापाराचें मुख्य ठिकाण आहे व लाखेचे दागिने, मुलांचे खेळ, तसर रेशीम व पितळेचीं भांडीं ह्याबद्दल प्रसिद्ध आहे.

**इलावृत्त**—प्रियव्रत राजाचा पौत्र, व आग्नीध्राचा पुत्र. याची स्त्री मेरूची कन्या लता. याचा वर्ष याच्याच नांवानें प्रसिद्ध असून हा तेथील अधिपति होता.

(२)जंबुद्वीपच्या नऊ वर्षांतील एक वर्ष. हा मेरूच्या आसमंताद्भागीं अति निकट समचतुरस्राकृतीनें वसलेला असून, ही

आकृति उत्पन्न करणारे. याच्या भोंवती नील, निषध, माल्यवान आणि गंधमादन, असे चार महापर्वत आहेत.

**इलिअट्**—( जॉर्ज ) मेरि ॲन् इव्हॅन्स् ही इंग्लिश-लेखिका जॉर्ज इलिअट या टोपण नांवानें प्रसिद्ध आहे. हिचा जन्म आरबरी फॅार्म येथें इ. स. १८१९ मध्यें झाला. वयाच्या १७ व्या वर्षी आईच्या मरणामुळें शिक्षण सोडून गृहव्यवहारांत लक्ष घालणें तिला भाग पडलें. तरुणपणीं मिळालेल्या कडक धार्मिक शिक्षणानें तिचा उत्साह नाहींसा केला व तिचें मन फार अस्वस्थ झालें; परंतु परमध्येयासक्तीकडे तिच्या मनाचा कल झुकूं लागला. त्याच सुमाराला प्रसिद्ध झालेलीं ' एज्युकेशन ऑफ फीलिंग्ज ' व फिलॉसाफी ऑफ नेसेसिटी ' वगैरे पुस्तकें वाचून तिच्या विचारांत व मतांत क्रांति घडून आली. तिनें प्रार्थनामंदिरांत जाण्याचें सोडून दिलें व ती बुद्धिप्रामाण्यवादी बनली.

१८५१ त ' वेस्ट मिन्स्टर रिव्ह्यु ' च्या दुय्यम संपादकाचें काम तिनें पत्करिलें. हें काम करीत असतांना हरबर्ट स्पेन्सर, कार्लाइल, फ्रान्सिसन्यूमन व हेनरी ल्युइस् वगैरे ग्रंथकर्त्यांशीं तिची ओळख झाली. हेनरी ल्युइसचा व तिचा स्नेह इतका जमला कीं, लवकरच लोकांच्या टीकेचा तो एक विषय झाला, परंतु एकंदरींत तिच्या बुद्धीची बरीच वाढ त्याच्या संगतीनें झाली असें म्हणण्यास हरकत नाहीं. ती फार कोंवळ्या मनाची असल्यामुळें लोकांच्या टीकेचा तिच्यावर परिणाम होत असे. तिनें लिहिलेल्या पुस्तकांत ' आडामबीड ' ' सिलासमारनर ' ' रोमोला ' वगैरे पुस्तकें फार प्रसिद्ध आहेत. ' आडामबीड ' मध्यें तिनें आपल्या बापाच्या शीलाचें व नैपुण्याचें सुंदर वर्णन केलें आहे. रोमोला ही एक ऐतिहासिक कादंबरी असून तीमधील विश्वासघातकी टिटोमेलेमाची भूमिका फारच चांगल्या तऱ्हेनें दाखविली गेली आहे. टिटोमेलेमासारखे लोक प्रत्येक पिढींत सांपडत असल्यामुळें त्या पुस्तकांतील गोडी कायमच रहाणार आहे. इलिअटची लेखनपद्धति जरी मर्दानी आहे तरी ती फारशी बेपरवा व अव्यवहार्य नसून तिच्यांत भिडस्तपणा आढळून येतो. एखाद्या विषयावर झोड उडवण्याची तिची तऱ्हा जेन ऑस्टिनप्रमाणेंच आहे. जेन ऑस्टिनच्या पुस्तकांतून शिष्ट समाजांतील निर्दोष भावनांचें योग्य वर्णन केलेलें आहे, तर इलिअटच्या पुस्तकांतून समाजांतील मतांच्या व ध्येयांच्या पुंडाव्याचें वर्णन केलें आहे. तिच्या लेखांतून द्वाष्टपणा, कटुत्व व विद्येची बढाई कधींच दिसत नाहीं. यथायोग्य वर्णन करण्याच्या प्रबळ इच्छेखालीं तिचा उल्हास दडपला गेला होता. पुढें पुढें तिच्या लेखांतून व्यक्तींच्या प्राबल्यापेक्षां कल्पनेचें प्राबल्य जास्त दृष्टीस पडूं लागलें. तत्त्वज्ञान व जड निरुत्साह यांची या जगांत सांगड दिसून आल्यामुळें तिच्या उतार वयांत लिहिलेलीं पुस्तकें फारशीं लोकप्रिय झालीं नाहींत. ही लेखिका सन १८८० सालीं मरण पावली. [ क्रॉस—लाईफ ऑफ जॉर्ज इलिअट ३ भाग. इंग्लिशमेन ऑफ लेटर्स, ग्रेट रायटर्स, एमिनेंट वीमेन या ग्रंथमालिकांतील इलिअटचीं चरित्रें. ]

**इलिनाय**—हें एक अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांपैकीं महत्त्वाचें संस्थान आहे. याचा शोध १६७३ मध्यें जोलिए व मार्के या दोन फ्रेंच प्रवाशांनीं लावला. त्यानंतर नव्वद वर्षें हा प्रदेश फ्रेंचांच्याच ताब्यांत होता. तो पुढें फ्रान्सनें इंग्लंडला दिला ( १७६३ ). हा इंग्लंडकडे २० वर्षें राहिला १७८३ सालीं इंग्लंडनें संयुक्त संस्थानचें यावर स्वामित्व कबूल केलें. तथापि या प्रदेशास संस्थानचें सदस्यत्व १८१८ पर्यंत मिळालें नाहीं. याचें क्षेत्रफळ सुमारें ५६६६५ चौ. मै. आहे आणि लोकसंख्या ६४ लक्ष आहे. वस्तीच्या दाटीचें प्रमाण यांतील पाण्याचा प्रदेश वजा जातां दर चौ. मैलीं १०० आहे.

या संस्थानांतील नगरवासी संख्या पाहतां शेंकडा ६० हून अधिक वस्ती शहरांतून आहे असें दिसेल. असें असून देखील या संस्थानला कृषिप्रधान संस्थान म्हणण्यांत येतें. या संस्थानांतील सर्वांत मोठें शहर शिकागो होय ( शिकागो पहा ). याची लोकसंख्या २५ लाखांवर आहे आणि पश्चिम गोलार्धांत न्यूयॉर्कच्या खालोखाल हेंच शहर होय. हें शहर वगळलें असतां लाखांनीं मोजण्यासारखीं दुसरीं शहरें नाहींत. ५० हजारांवरील शहरें म्हटलीं म्हणजे पिओरीया, ईस्टसेंट लुई, स्प्रिंगफील्ड ( संस्थानाची राजधानी ), रॉकफोर्ड हीं होत. या संस्थानामध्यें युनिव्हर्सिट्या व कॉलेजें मिळून १३ पदवी देणाऱ्या संस्था आहेत. यांमध्यें युनिव्हर्सिटी ऑफ इलिनॉय ( अर्बाना ), युनिव्हर्सिटी ऑफ शिकागो, नार्थ वेस्टर्न युनिव्हर्सिटी, या मोठ्या आहेत. या संस्थानांतील मुख्य पिकें मका, गहूं, जव व ओट हीं होत. हें संस्थान कारखाने व खनिज या बाबतींत अत्यंत महत्त्वाचें आहे. या संस्थानच्या उत्तरेस सरोवरें असल्यामुळें त्या सरोवरांच्या किनाऱ्यानें मोठा व्यापार चालतो. या संस्थानांतील रेल्वेची लांबी १२००० मैलावर आहे आणि विजेची ट्राम्वे सुमारें ४००० मैल आहे. शिकागो येथें ब्रिटिशांचा कान्सल जनरल व एक व्हाइस कान्सल असतो. संस्थानचें उत्पन्न सुमारें साडेतीन कोट डॉलर आहे.

**इलियड**—होमर पहा.

**इलियाटिक पंथ**—इ. स. पूर्वी ६व्या शतकाच्या अखेरीस जन्मास आलेला व सामॉसच्या मेलिसस बरोबर इ. स. पूर्वी ४५० त लयास गेलेला ग्रीक तत्त्वज्ञानाचा पंथ इलियाटिक पंथ म्हणून प्रसिद्ध आहे. या पंथाचे मुख्य प्रवर्तक पारमेनिडस व झेनो यांचें गांव दक्षिण इटलींतील ग्रीक शहर " इलिया " या नांवापासून या पंथास हें नांव प्राप्त झालें आहे. या पंथाचा संस्थापक कोलोफॉनचा झीनोफानेझ होता असें म्हणतात पण याचीं मतें जरी या पंथांत समाविष्ट होत असलीं तरी या पंथाचा खरा संस्थापक पारमेनिडस हाच होय त्यानेंच या पंथाची पूर्ण वाढ केली. एका

बाजूनें प्राचीन जडवादी तत्ववेत्ते–जे सर्व विश्व मूळ जड तत्त्वापासून उत्पन्न झालें असें म्हणतात–यांस विरोध करण्यांत व दुसऱ्या बाजूनें हेरॅक्लिटसच्या, 'सर्व अस्तित्व म्हणजे अखंड होत असलेला फरक होय,' या मतास विरोध करण्यांत हें मत उत्पन्न झालें. इलियाटिक तत्ववेत्ते म्हणत कीं, सर्व गोष्टींचें खरें स्पष्टीकरण विश्वैक्याच्या कल्पनेंत आहे. इंद्रियास ज्ञात होणारे पदार्थ चंचल व विसंगत असल्यामुळें त्यांना हें वाक्य समजणार नाहीं. फक्त विचारानेंच आपण इंद्रियगोचर असत्य दृश्यापलीकडे जाऊं शकतों व अस्तित्वाचें ज्ञान मिळवूं शकतों व "सर्व कांहीं एक आहे" हें समजूं शकतों.–नवीन असें कांहींच उत्पन्न झालें नाहीं, कारण जें आहे तें जें नाहीं त्यापासून झालेलें नाहीं. कोणतीहि गोष्ट तिच्याहून भिन्न गोष्टीपासून होत नाहीं.सामान्य मतांतील चुका "अस् = असणें, अस्तित्व," या शब्दांच्या संदिग्ध उपयोगापासून झालेल्या असतात. याचा अर्थ 'अस्तित्व' असूं शकतो अथवा त्यामुळें कर्ता व क्रियापद यांचा साधा संबंध दाखविला जातो.

या मुख्य वादांत इलियाटिक पंथानें खरी प्रगति केली व अर्वाचीन अध्यात्मशास्त्रकल्पनेची तयारी केली. ६ व्या शतकाच्या मध्यकालात झीनोफानेझनें प्राचीन ग्रीक दंतकथावर पहिला मोठा हल्ला केला व त्यात होमर व हेसिअड याच्या ग्रंथात आलेल्या सर्व मानवरूपी देवता पद्धतीवरहि कडक टीका केली.पारमेनिडसच्या कडून या स्वतंत्र विचारात अध्यात्मशास्त्राच्या वळणावर प्रगति झाली. नंतर, कदाचित हीं मतें इलियाटिक लोकांस शिष्टाचारांच्या भावनांस विसंगत वाटल्यामुळें असो, अथवा त्यांच्या पुढाऱ्यांच्या नादानपणामुळें असो लवकरच हें मत गतीची शक्यता वगैरे विषयावर वाद करण्यांत गढून गेलें. या पंथाचें उत्कृष्ट कार्य प्लेटोच्या अध्यात्मशास्त्रांत मिसळून गेलें (झीनोफानीझ, व झेनो पहा.)

[ केर्ड—एव्होल्यूशन ऑफ थिऑलॉजी इन् दि ग्रीक फिलॉसॉफर्स १९०४. ]

**इलीरिया**—अर्वाचीन डालमेशिआ, बॉसनिआ, हरझेगोव्हीना, मांटेनिग्रो, क्रोशिआ-स्लाव्होनिआचा अर्धा दक्षिण भाग, पश्चिम सर्व्हियाचा कांहीं भाग, आणि आलबेनिआचा उत्तर भाग यांनीं मिळून झालेल्या बालकन द्वीपकल्पाच्या भागास इलीरिया हें नांव लावतात. एका ग्रीक दंतकथेवरून असें कळतें कीं काडमस आणि हारमोनिआ हे या ठिकाणीं राहिले व त्यांच्यापासून इलीरिअस उत्पन्न झाला. हाच इलीरीयन लोकांचा मूळ पुरुष होय. हिरोडोटस व इतर ग्रीक इतिहासकारांच्या मताप्रमाणें हे लोक रानटी असून आपलीं अंगें गोंदून घेत असत व देवांनां माणसांचे बली अर्पण करीत. असें सांगतात कीं, इलीरियन लोकांच्या बायकांचा सामाजिक दर्जा बराच उच्च असून त्यांतील कित्येक राज्यकारभार देखील चालवीत असत.इ.स. पूर्वी तिसऱ्या शतकापर्यंत इलीरियन लोकांनां आपसांत यादवी माजविण्यापलीकडे दुसरें कर्तव्य ठाऊक नव्हतें. यांचें आणि मॅसिडोनिआ येथील राजांचें हाडवैर असे. इलीरियनांचा पुढारी बारडीलिस यानें मॅसिडोनियाचा राजा दुसरा ॲमिंटास व परडीकास यांचा लढाईत मोड केला. पण विजयशाली फिलिपपुढें इलीरियनांचें कांहीं न चालून त्यांनां आपला बराचसा प्रांत गमावून बसावें लागलें. यापुढें इलीरियनांनीं चांचेगिरीचा धंदा पत्करून आड्रियाटिकमधील व्यापारी माल लुटण्यास सुरुवात केली. यामुळें त्यांचें रोम व ग्रीसशीं युद्ध उपस्थित होऊन फिरून त्याना बराचसा प्रांत गमावून बसावें लागलें. इ. स. पूर्वी १८० मध्यें डालमेशिआ इलीरियन साम्राज्याचें जूं झुगारून देऊन स्वतंत्र बनलें व इ. स. पूर्वी १६८ त रोमनें इलीरियाचें राज्य आपल्या प्रांतास जोडलें. स्वतंत्र डालमेशिआहि रोमला खपेनासा होऊन टायबेरिअसनें त्याचा पुरा मोड केला व डालमेशिया, इयापिडिआ आणि लिबर्निआ मिळून इलीरिकम म्हणून एक प्रांत बनविण्यांत आला.

इ.स. नंतर पांचव्या शतकांत इलीरियावर स्वाऱ्या होण्यास सुरवात झाली. इ. स. ४४१ व ४७त हूण लोकांनीं इलीरियावर स्वारी केली. सहाव्या शतकांत स्लाव्ह लोकांनीं येथें आपला शिरकाव करून कायमच्या वसाहती केल्या व ६०० आणि६५०या वर्षांच्या दरम्यान सबंध इलीरिआ प्रांत क्रोट् व सर्व यांनीं व्यापिला.

इ. स. १८०९ त कारनिओला, डालमेशिया, इस्ट्रिआ, गॉर्झ व ग्राडिस्का हे इलीरियन प्रांत, आस्ट्रियानें इटलीला दिले;ते फ्रेंच राज्यक्रांतीच्या वेळीं नेपोलियनकडे गेले १८१३ त पुन्हां आस्ट्रियाकडे आले. कारिंथिआ, ट्रीस्ट, कार्निओला; इस्ट्रीआ, गॉर्झ व ग्राडिस्का यांचें मिळून १८१६ त इलीरीयाचें राज्य बनविण्यांत आलें. तें १८४९ पर्यंत आस्ट्रियाकडे राहिलें.

**इलुबन**—एक जात. या लोकांची वस्ती मद्रास, कोचीन व त्रावणकोर संस्थान यांतून आहे. लोकसंख्या ( १९११ ) ८७५८५६. या लोकांनां इझावा असेंहि नांव आहे. त्रावणकोर संस्थानांतल्या इझावांची माहिती 'इझावा' लेखांत आलीच आहे. ती सर्वसाधारणपणें या लोकांनां लागू पडते. [ 'इझावा' पहा. ]

**इलेश्वरोपाध्याय.**—तेलंगी कवि. यानें तेलंगण प्रांताचे बेलनाड, मुरिकीनाड, कासलनाड यांसारखे १०० नाड ( भाग ) कल्पून त्यांची व्यवस्थाहि ठरवून टाकिली होती. हा ब्राह्मण न्याय, व्याकरण, अलंकार, मीमांसा व धर्मशास्त्र या विषयांत प्रवीण असे. यानें गौतम स्मृतीवर स्मृतिदर्पण नांवाची टीका लिहिली आहे असें अर्वाचीन कोशकार सांगतात पण आफ्रेक्ट कोशांत ही टीका आंध्रयति व राघव अशा दोन लेखकांच्या नांवावर आढळते. या टीकेखेरीज गिरीश नाटक व इलेश्वरविजय हे दोन ग्रंथ इलेश्वरोपाध्यायानें रचिले असें अर्वाचीन कोशकार म्हणतात. यानें, काव्य,

नाटक, अलंकार वगैरे शास्त्रें शिकविण्याकरितां एक विद्यालय स्थापिलें होतें. व मंदबुद्धीच्या विद्यार्थ्यांसहि ज्ञान व्हावें म्हणून ज्योतिष्मती नांवाचा एक कल्प तयार केला. याला तीन कन्या होत्या, पैकीं 'नाची' प्रसिद्ध आहे. कविचरित्रांत उपाध्याय व अकबराचा सरदार खानखानान यांची भेट झाली होती असें लिहिलें आहे. पण अर्वाचीन कोशांत या कवीचा काल शालिवाहन शकाचें सातवें शतक असा दिला आहे [ अर्वा. कोश. कविचरित्र. ऑफ्रेक्ट कोश ].

**इल्वल**—एक दैत्य. हा हिरण्यकशिपूचा पौत्र व प्ऱ्हादाचा एक पुत्र असून मणिमती नगरींत रहात असे. हा व सहोदर वातापी, असे एकत्र होऊन नेहमीं ब्राह्मणास आदरातिथ्य मिषानें मारीत. कोणी ब्राह्मण आला म्हणजे, त्याचा इल्वलानें मनुष्यरूपानें आदर करून अर्चन करावें. नंतर मेष झालेल्या वातापीचा पाक करून, त्यास भोजन द्यावें. पुढें ब्राह्मण जाऊं लागला असतां, त्याचें शरीर विदारून वातापीनें बाहेर येतांच, ब्राह्मण तत्काळ मरण पावावा, अशा प्रकारें यानें सहस्रावधि ब्राह्मण मारिलें.

एकदां अगस्त्य ऋषीवर हा प्रयोग केला असतां त्यानें वातापीस उदरांत जीर्ण केलें व इल्वलास भस्म करून टाकिलें अशी रामायणांत कथा आहे. महाभारतांत इल्वलावर अगस्त्यानें शेवटीं अनुग्रह केला असा वृत्तांत आढळतो ( वनपर्व अ. ९६ व ९९ )

**इव्हँगोरॉड**—इव्हँगोरॉड हें पोलंडमधील तटबंदी शहर आहे. हें वेझ्र व व्हिश्चुला नद्यांच्या संगमाच्या ठिकाणीं असून आगगाडीनें वार्सापासून ६४ मैल आहे. व्हिश्चुला नदीच्या उजव्या तीरीं असलेल्या नऊ किल्ल्यांनीं व डाव्या कांठावर असलेल्या ३ किल्ल्यांनीं याचें रक्षण केलें आहे.

**इसब**—नेहमींच्या प्रचारांत आढळणारे व महत्त्वाचे असे जे त्वग्रोग आहेत त्यांपैकीं हा एक आहे. विशेष कांहीं कारण घडलें नसतां शरीराच्या एखाद्या भागास दाह उत्पन्न होऊन ओलावा येतो व नंतर चिकट लस उत्पन्न होते. असाच त्वग्रोग कांहीं विवक्षित रासायनिक पदार्थ शरीरास लागले असतां अथवा इतर प्रकारच्या घर्षणजन्यादि कारणामुळें त्वचा कुपित होऊनहि होतो. कांहीं विशिष्ट प्रकृतींच्या माणसांना हा रोग होण्याची स्वाभाविक प्रवृत्ति असते व त्यांना तो रोग होण्यास वरील प्रकारचें एखादें साधेंहि कारण पुरतें. ही प्रवृत्ति बहुधा आनुवंशिक व इतर रोगजन्य असते. उदाहरणार्थः—मूत्रपिंडदाहरोगांत त्वचा व तिचे पापुद्रे यांची पोषणक्रिया बिघडून सूज येऊन त्वचा निस्तेज होते; अगर अग्निमांद्य, कृशता, तैलपिंड त्वग्दाह यांपैकीं एखादा रोग झाला असल्यास हा रोग होतो. मनास धक्का बसल्यामुळें अगर मानसिक जबर चिंता यामुळेंहि हा रोग उद्भवतो. गारठ्यांत जाऊन सर्दी झाल्यामुळें कित्येकांना हा होतो तर कित्येक स्त्रियांना विटाळ जातांना गरोदरपणीं इत्यादि वेळीं हा रोग होतो. मुलांतहि या रोगाचा प्रसार बराच होतो. याचें कारण दंतोद्भव व वर सांगितलेला तैलपिंडत्वग्दाह हें होय. वाताधिक्य होऊन एकदम उसळणाऱ्या दम्यासारख्या रोगाचा व या रोगाचा निकट संबंध आहे असें वाटतें. व दमा होणें म्हणजे श्वासनलिकेस एकप्रकारचा इसब रोगच होतो असें कित्येक जण म्हणतात. ज्यांना संधिवात असतो अशा रोग्यांनांहि हा रोग बहुधा होतो. पण त्या दोहोंचा काय संबंध हें निश्चित झालें नाहीं. कांहीं प्रकारचें इसब, जंतूंचा प्रवेश होऊन त्यामुळें होतें. जंतुजन्य इसब मात्र रोग्यास व इतरांस सांसर्गिक असतें. इतर प्रकारचें सांसर्गिक नसतें. पुरुषांमध्यें हा रोग स्त्रियांपेक्षां अधिक प्रमाणांत आढळतो. मात्र हा नियम म्हातारपणामध्यें लागू नसतो.

लक्षणें.—याचे तीव्र व जुनाट असे भेद दाह जास्त अगर कमी असेल त्या मानानें आढळतात. जेथें त्वचेस रोग होणार तेथें कंड सुटते व आग होते. व तेथील जागा लाल होऊन त्यावर पुटकुळ्या उठतात. त्या भागांत सूज, उष्णता, लाली व दुःख, ठणका इत्यादि दाहाचीं लक्षणें उत्पन्न होतात. या फुटकुळ्या होऊन फुटतात व एकमेकांत मिश्र होऊन जातात. रोगी त्या खाजवतो म्हणून अधिकच चिडून दाह करितात. ती चिकट लस कपड्यास लागली असतां कपडा कडकडीत होतो. ही लस लवकर वाळून खपली न धरतां अधिकाधिक लस वाहूं लागते. ही क्रिया जेव्हां फार असते त्या प्रकारच्या इसबास अश्रुपूर्ण इसब असें म्हणतात. नंतर रोग फार तीव्र नसल्यास दाह कमी होऊं लागतो, व कोंडा व खपल्या धरूं लागून नवी त्वचा खपलीखालीं तयार होते व एकंदर भाग कोरडा पडतो. अगर रोग अति तीव्र असल्यास पुटकुळ्यांचें नवें पीक राहून राहून येतच असतें. व वरील प्रकार पुनःपुनः घडतो. कांहीं ठिकाणीं पुटकुळ्याच विशेष येतात, व लाली थोडी असते. चेहऱ्यावर मात्र इसब झाल्यास लालीच अधिक असून पुटकुळ्या फारशा नसतात. तीव्र रोगांत ज्वर वगैरे येऊन प्रकृति बरीच क्षीण होते. पण सौम्य रोग असल्यास प्रकृतीवर वाईट परिणाम होत नाहीं. फक्त कंड येत असल्यामुळें रात्रीची झोंप येत नाहीं. लाली व दाह दिसण्यांत जरी सौम्य प्रकारचीं दिसतात तरी त्यामुळें उत्पन्न होणारी आग विलक्षण असल्यामुळें रोग्यास अगदीं वेडावून सोडते, इसब हें शरीराच्या कोणत्याहि भागास होतें पण त्यांतल्यात्यांत कांहीं विवक्षित जागेवरच बहुतकरून होतें; जसेः—कोपर, गुडघा अगर मांड्यांच्या बेचकळ्यांत, किंवा कानामागें अगर डोक्याला, हातापायाचे तळवे किंवा स्तनाच्या ठिकाणीं या स्थानमहात्म्याप्रमाणें रोगाचें बाह्य स्वरूपहि वेगवेगळें असतें. बाहु अगर पाय यांचे पुढील त्वचेवर रोग झाला असतां विशेष असणाऱ्या लालीमुळें त्यास आरक्त इसब म्हणतात. डोक्यावरील इसब तैलपिंडदाहजन्य प्रकारचें असतें. व मुलांमध्यें विशेषत

डोक्यांत उवा असल्यास तें पीटिकामय असतें; कारण त्यांत पूयोत्पादक जंतूंचा प्रवेश होऊन फुटकुळ्या बनतात. हात पायांच्या तळव्यांच्या ठिकाणीं यामुळें उपत्वचा जाड होऊन भेगा पडतात.

उ पा य—या रोगास बाह्योपचार व पोटांत औषधें हीं दोन्हीं उपयोगी पडतात. दाह विशेष असतां तो शमण्यास पोटांत अंजन( अँटिमनी )युक्त औषधें दाह शमविण्याच्या व रुधिराभिसरणाचा तेथील जोर कमी करण्याच्या कामीं फार उपयुक्त असतात. अशक्त माणसांना मात्र हें औषध देऊं नये. लहान अगर मोठ्या मुलांनां क्यालोमेल या पारदयुक्त औषधाच्या सूक्ष्म मात्रेचा असाच उपयोग होतो. सोमल व लोहयुक्त औषधें रक्त प्रवाहाचा जोर विकृत त्वचेंत वाढवीत असल्यामुळें तीं देणें प्रशस्त नाहीं. पोटांत नुसतें औषध देऊन उपयोग नाहीं; तर बाह्योपचारहि अत्यंत जरूरीचे असतात. ते लावण्यापूर्वी प्रथम वर जमलेली लस, खरपुड्या, कोंडा हीं सर्व पुसून काढिली पाहिजेत. या औषधांचें कार्य येणें प्रमाणें असतें.–( १ ) तीं आगीचें शमन करतात ( २ )हवा व पूयोत्पादक जंतूंचा त्यांत प्रवेश होणें थांबवितात. ( ३ ) कंडूंचें शमन करतात व त्यामुळें शरीरास व मेंदूस येणारी अस्वस्थता घालवितात. येणेंप्रमाणें कार्य करणारी मलमें, धावनें, व पुड्या वंग, नाग व पारदयुक्त औषधें व इतर प्रकारचीं औषधें यावर लावण्याचीं पुष्कळ आहेत, तीं वैद्यडाक्तराच्या सल्ल्यानें लावावीत.

आ यु र्वे दी य नि दा न.—विसर्प यास मराठींत इसब असें म्हणतात. वैद्यकांत "विविधं सर्पति" निरनिराळ्या प्रकारांनीं पसरत जातो असा या शब्दाचा अर्थ दिला आहे.आंबट, खारट,उष्ण तिखट वगैरे पित्त वाढवणारे व रक्त दुष्ट करणारे पदार्थ नेहमीं सेवन केल्यानें हा रोग होतो. वात, पित्त, कफ, वातपित्त, कफवात, कफपित्त, सांनिपातिक, व क्षतविसर्प आणि विषानें होणारा विसर्प असे नऊ प्रकारचे विसर्प आहेत. ह्या सर्व विसर्पांचे पुन्हा तीन प्रकार आहेत.ते ज्या ठिकाणीं विसर्प होतो त्या ठिकाणावरून केलेले भेद आहेत. अंतराश्रित, बहिर्गत, आणि अंतर्बाह्याश्रित असे ते तीन प्रकार होत.

त्यांत वातादिदोष पूर्वोक्त आपापल्या कारणांनीं व विशेषतः विदाही पदार्थांनीं कुपित होऊन कोठ्यांत असल्यास, आंत, त्वचेंत असल्यास, बाहेर आणि उभयत्र असल्यास दोन्हींहि ठिकाणीं शरीरांत फार लौकर पसरतात. त्यांत मर्मांत पीडा, मूर्छा, कान, नाक वगैरे द्वारांचें विशेष स्फुरण, अतिशय तहान, मळमूत्रांची विषम प्रवृत्ति आणि अग्नि व शक्ति हीं एकाएकीं क्षीण होणें हीं लक्षणें झालीं असतां अंतराश्रित विसर्प जाणावा. याच्या विपरीत लक्षणांचा बाह्य विसर्प समजावा. वातज विसर्पांत वातज्वरासारखे विकार होऊन शिवाय सूज, स्फुरण, टोंचण, फुट्,ताण,पीडा,रोमांच उभे रहाणे,हे विकार होतात. पित्तविसर्प फार लवकर पसरतो. तो अतिशय लाल असतो, आणि त्यांत पित्तज्वरासारखीं लक्षणें होतात. कफविसर्प स्निग्ध असतो. त्यास खाज सुटते आणि कफज्वराचे विकार होतात. कोणत्याहि जातीचा इसब असो त्याची हयगय केली असतां त्यावर त्या त्या दोषांच्या लक्षणांचे पुष्कळच फोड येतात. आणि ते पिकून फुटले म्हणजे त्यांचे व्रण होतात, व त्यांची लक्षणें त्या त्या दोषांच्या व्रणाप्रमाणें असतात

वातपित्तापासून होणाऱ्या विसर्पांत ताप, वांती, मूर्छा, अतिसार, तहान, भ्रम, हाडें फुटणें, अग्निमांद्य, तमकश्वास, व अरुचि, हे विकार, उत्पन्न होतात. सर्वांगाची जळजळीत निखारे ठेवल्याप्रमाणें लाही होते. ज्या ज्या भागांत विसर्प पसरतो तो तो भाग लागलाच कोळशासारखा काळा निळा किंवा लाल होतो.त्यावर एकदम विस्तवानें भाजल्यासारखे फोड येतात हा लौकर पसरत असल्यामुळें त्वरित मर्मांत पोंचतो. त्यामुळें वायु अतिशय प्रबल होऊन सर्वांगांत पीडा उत्पन्न करतो. शुद्धि व झोंप नष्ट करितो. दमा व उचकी उत्पन्न करतो. अशा तऱ्हेची रोग्याची अवस्था झाली म्हणजे त्यास जमीनीवर, बिछान्यावर, बैठकीवर, बसून, निजून कोठेंच बरें वाटेनासें होतें. आणि तो तळमळून एकसारखा गडबडां लोळूं लागतो. त्या योगानें त्यास अतिशय क्लेश होऊन मानसिक व शारीरिक श्रमापासून झोंप येते व त्या झोंपेतून तो जागा होण्यास फार श्रम पडतात. यास अग्निविसर्प म्हणतात.

कफानें वायु अवरुद्ध झाला असतां तो त्या कफाचे पुष्कळसे तुकडे करून व त्यास दूषित करून किंवा ज्याचें रक्त वाढलें आहे अशा मनुष्याच्या त्वचा, शिरा, स्नायु व मांस यांतील रक्ताचे पुष्कळसे भाग करून व त्यास दूषित करून लांब, लहान, वाटोळ्या, स्थूल व खरखरीत अशा लाल रंगाच्या गांठींची माळा उत्पन्न करतो. त्यांत वेदना व ताप, तीव्र असतात. आणि दमा, खोकला, अतिसार तोंडास कोरड, उचकी, वांती, भ्रम, मोह, विवर्णता, मूर्च्छा, अंगमोडणें व अग्निमांद्य हे विकार होतात. कफ व वायू यांच्या कोपापासून होणाऱ्या या विसर्पास ग्रंथिविसर्प म्हणतात.

कफपित्तापासून होणाऱ्या विसर्पांत ताप, अंग ताठणें, झोंप; झांपड, डोकें दुखणें, हातपाय गळणें, बडबड, अरुची भ्रम, मूर्च्छा, अग्निमांद्य, हाडें फुटणें, तहान, इंद्रियें जड होणें, अपक्वमळ शौच्यावाटे पडणें, व स्रोतांस चिकटा बसणें, हे विकार होतात. हा विसर्प बहुधा बेंबी व स्तन यांमधील म्हणजे आमाशयाच्या वरचा एक भाग धरून नंतर इतर भागांत पसरतो. यांत फारशी पीडा नसते. हा पिंवळ्या, लाल, पांडुर रंगाच्या पुळ्यांनीं अगदीं गच्च भरून जातो. हा निळा, काळा, स्निग्ध, मळकट, सुजलेला, व जड असतो. त्यांत खोलभागीं पू होतो. तो फार कडक लागतो. हात लावला असतां फुटून चिघळतो. त्याचें मांस कुजून चिखला-

सारखें होतें. हा स्नायु व शिरांपर्यंत पोंहोचतो. आणि त्यास प्रेतासारखी घाण येते. ह्यास कर्दमविसर्प म्हणतात.

सान्निपातिक विसर्पांत वरील सर्व लक्षणें असून तो सर्व धांतूंत अतिशय पसरतो. क्षत होऊन बाह्य कारणानें कुपित झालेला वायु रक्त व पित्त यांस प्रेरित करून विसर्प उत्पन्न करतो. त्यावर पुळयांसारखे पुष्कळ फोड येतात. तो काळसर व लाल असून त्यांत सूज, ताप, ठणका, व दाह, हे विकार अतिशय होतात. हा क्षतविसर्प होय.

वात, पित्त, व कफ या एकेका दोषापासून झालेले तीन विसर्प व उपद्रवरहित द्वंद्वज विसर्प साध्य आहेत. क्षतविसर्प, सान्निपातिक विसर्प, मर्मस्थानावर पोंचलेले सर्व प्रकारचे विसर्प, ज्यांतील स्नायु, शिरा व मांसें कुजून गेलीं आहेत असे विसर्प तसेंच अतिशय चिघळलेले आणि प्रेतासारखी घाण येत असलेले विसर्प असाध्य जाणावे.

ताप, अतिसार, ओकारी, त्वचा व मांस गळून पडणें, थकवा, अरोचक, आणि अपचन हे इसबांचे उपद्रव समजावे.

चि कि त्सा.—इसबांत आरंभींच लंघन, रूक्षण, रक्त काढणें, वमन, व विरेचन, हे उपाय हितावह होत. स्नेहन मात्र उपयोगी नाहीं. गेळफळ, किंवा कडू पडवळ यांचा ओकारी करितां उपयोग करावा.

दोष कोठ्यांत असल्यास रेचक द्यावें. ज्यास वमन–विरेचन देतां येत नाहीं त्याचा दोष अल्प असल्यास शमन औषधें द्यावीं. ज्यास इसब होऊन तहान फार लागत असेल त्यानें धमासा, पित्तपापडा, गुळवेल यांचा काढा किंवा हिम प्यावा. हातावरील व पायावरील इसबांतील रक्तच काढावें, कारण रक्त नासल्यानेंच त्वचा, मांस व स्नायु, हेहि नासतात. रोगी निराम असून त्याचा कफ क्षीण असून वात व पित्त वाढले असतां तिक्तघृत, किंवा त्रायमाण घृत ( वाग्भट चिकित्सा ) द्यावें.

रक्त काढल्यानें त्वचा, मांस व सांधे यांतील अंतर्गत दोषाची शुद्धि झाली म्हणजे लेप वगैरे बाह्य उपचार करावे. म्हणजे विसर्प ताबडतोब बरा होतो.

इसबांत दाह होत असेल तर शीत उपचार करावे. वडाच्या कोंवळया पारंब्या, केळीचा गाभा; दूर्वा, कमळाचे देंठ याचा शंभरवेळ पाण्यानें धुतलेल्या तुपांत कालवून लेप द्यावा.

रक्त व पित्तजन्य इसबावर हेच थंड लेप झिरझिरीत वस्त्रांत घालून द्यावे. वरचेवर नवे लेप करावे. कारण तेच लेप फार वेळ राहिल्यानें हीनवीर्य होतात.

अग्निविसर्पावर ( आग्याविसर्प ) शतधौत-तुपाचा लेप करावा. किंवा नुस्त्या तुपाच्या निवळीची घडी ठेवावी.

ग्रंथिविसर्प ( गांठ्या इसब ) झाला असतां जळवा लावून रक्त काढावें. नंतर कफवात नाशक पेंड व पोटिसें बांधावीं. गांठ्यां इसबांत शूळ होत असल्यास दशमुळांच्या काढ्यानें सिद्ध केलेलें तेल, दशमुळें घालून कढविलेलें गोमूत्र ऊन करून सेचन करावें. दांतीमूळ, चित्रकमूळ, निवडुंगाचा व रुईचा चीक, गूळ, बिब्बे, हिराकस, यांचा लेप गांठी फोडतो. यानें हि गांठ न फुटेल तर लोखंड, सैंधव, दगड वगैरे तापवून गांठी दाबाव्या म्हणजे जुनी गांठहि फुटते. या अनेक प्रकारच्या अनुभविक उपायांनीं फार बळकट व दगडासारखी टणक गांठ जर बरी झाली नाहीं तर ती क्षार लावून किंवा लोखंडाच्या सळईनें अथवा सोन्यानें डागून जाळावी. किंवा पोटिसें बांधून पिकली म्हणजे फोडून वाहून गेल्यावर जखम भरून आणावी. ग्रंथिविसर्प झालेल्या मनुष्यानें बिघडलेलें रक्त वरचेवर काढून टाकावें आणि रक्त काढल्यावर मग वातकफनाशक औषधें द्यावीं.

दाह व पाक होऊन सडलेल्या इसबावर अंतर्बाह्य व्रणासारखी चिकित्सा करावी. दारुहळद, वावडिंगें व कपिला यांनीं तयार केलेलें तेल व्रणावर लावण्यास चांगलें आहे. विसर्पावर वर सांगितलेले सर्व उपाय एकीकडे व नुसतें रक्त काढणें एकीकडे असें आहे म्हणून वरचेवर रक्त काढावें. रक्त व पित्त यांच्या संसर्गाशिवाय कोणताच विसर्प होत नाहीं आणि त्याचें स्थानहि रक्तच आहे. ज्याचे दोष फार वाढले आहेत अशा विसर्परोग्यास रेचक नसलेलें तूप देऊं नये कारण साध्या तुपानें दोष स्तब्ध होऊन जागच्याजागीं सांचून त्वचा, रक्त, व मांस यांचा पाक करितात.

इसब रोगांत सातु, गहूं, तांदुळ, मुग, मसूर हीं धान्यें खाण्यास द्यावीं, जांगल पशूंचें मांस, लोणी, तूप, डाळिंब, द्राक्षें, आंवळे, हीं फळें पथ्यकारक आहेत. व्यायाम, मैथुन, दिवसाझोंप, रागावणें चिंता करणें, जड अन्न, लसूण, हुलगे, उडीद, तीळ, दारू, ऊन हीं सर्व अपथ्यकारक आहेत.

**इसबगोल**—यास संस्कृतांत स्निग्धजीरक गुजराथेंत उथमु जिरूं, हिंदींत इसबगोल, पर्शियनभाषेंत इस्पगुल व इंग्रजींत इस्फगुल सीड इत्यादि नांवें आहेत. ह्या झाडाचें मूळ उत्पत्तिस्थान मिसर देश व इराण हें आहे. तेथून हें हिंदुस्थानांत औषधी कामाकरितां येतें. य़ा झाडाची उंची सुमारें एक हात असते. व पानें बारीक असून लांब लांब असतात. ह्यास गव्हासारख्या ओंब्या येतात त्यांत हें बीं असतें. त्यांत तीन जाती असतात; पांढरें, तांबडें व काळें. पैकीं पांढरें सर्वांत उत्तम समजलें जातें व काळें बी औषधांत उपयोगी पडत नाहीं. इसबगोलाची बारीक पूड पोटांत घेतली असतां शौचास न होतां मनुष्य मरतें. या करितां अशी पूड कधीं घेऊं नये. सोमलाच्या विषावर-इसब गोल पाण्यांत भिजत घालून तें पाणी गाळून त्यांत बेदाणा, दहीं व गुलाबाचें पाणी घालून प्यावें. म्हणजे वीष उतरेल.

**इसाखेल, त ह शी ल**.—ही तहशील पंजाब मियानवाली जिल्ह्यांत सिंधुनदापलीकडे आहे. ह्या तहशिलींत साखेल व कालाबाग हीं गांवें व ४३ खेडीं आहेत ही तहशील सिंधु नदाच्या पश्चिमेस असल्यामुळें मियानवाली जिल्ह्यापासून

अलग झाली आहे व त्यामुळें वायव्य सरहद्दीच्या प्रांताचा हा एक स्वाभाविक भाग असावा असें वाटतें. पण ह्या प्रांतातल्या वन्नूपासून ही त्रिकाली व मैदानी डोंगरांच्या योगानें ही पूर्णपणें वेगळी झाली आहे. ह्या डोंगरामुळें इसाखेलला मुबलक पाणी मिळून चांगली सुपीकता आली आहे ह्या तहशीलीच्या उत्तर भागास भांगीखेल नांव आहे व तो डोंगराळ मुलूख आहे. ह्या तहशीलीस इसाखेल असें नांव पडण्याचें कारण येथें इसाखेल नांवाचे लोक राहतात हें होय.

शहर.—ह्याच नांवच्या तहशिलीचें हें मुख्य ठिकाण आहे व तें सिंधु नदीच्या उजव्या तीरावर आहे. हें शहर १८३० सालीं हल्लीं जे सिंधु नदापलीकडल्या नियाझाई अफगाण लोकांचे पुढारी खान आहेत यांचा मूळ पुरुष अहमदखान यानें वसविलें. ह्या शहरांत एक दवाखाना, म्युनिसिपालिटी व एक दुय्यम शाळा आहे.

**इसागड**, जिल्हा.—(मध्य हिंदुस्थान.) ग्वाल्हेर संस्थानांत हा जिल्हा आहे. सन १९०१ सालीं ह्या जिल्ह्याची लोकसंख्या २४८६७६ होती. ह्या जिल्ह्यांत मुंगावली व गुणा हीं दोन मुख्य शहरें आहेत व १३६७ खेडीं आहेत. ह्या जिल्ह्याच्या पूर्व पश्चिम सरहद्दिवरचे मुलूख डोंगराळ आहेत व मध्यवर्ती भाग माळवा पठाराप्रमाणें आहे.

**इसिस**—( इजिप्शियन नांव एसे ) इजिप्शियन दैवतांपैकीं सर्वांत प्रख्यात देवी. ही प्रथम मानवी रूपधारी समजली जात असे पण पुढें गाईचीं शिंगें तिच्या डोक्यावर आलीं व तिला पवित्र गाय असें मानण्यांत येऊं लागलें. प्राचीन काळीं तिचें एखादें प्राणिरूप होतें कीं काय किंवा एखादें मोठें शहर तिच्याकरितां राखून ठेवलें होतें कीं काय, याविषयीं कांहीं उलगडा झालेला नाहीं. पुढील काळांत फिली, बेहबेट आणि इतर मोठालीं देवळें तिच्या करितां बांधलेलीं आढळतात. पौराणिक कथा, धार्मिक विधी आणि जादू यांत तिला मोठें महत्त्वाचें स्थान आहे. प्राचीन पिरॅमिड ग्रंथांतून ती ऑसिरिसची बहीण आणि बायको, व होरसची आई म्हणून वारंवार उल्लेखिलेली आढळते. देवतावंशवृक्षांतून ती केब आणि नट (द्यावापृथ्वी) यांची मुलगी म्हणून दाखविली आहे. तिच्या आंगीं अति विलक्षण जादूची शक्ति होती; त्याचप्रमाणें ती फार धूर्त व बुद्धिमति असे. प्ल्यूटार्कनें वर्णिलेली ऑसिरिस आणि इसिस यांची कथा इजिप्शियन जादूच्या ग्रंथांतून घेतलेली दिसते. आपली बहीण नेफथिस हिजबरोबर ऑसिरिसचा देह संरक्षण करीत व त्याच्या निधानाबद्दल दुःख करीत बसलेली इसिस वारंवार उल्लेखिलेली दृष्टीस पडते.

हिरोडोटसनें इसिस आणि डेमेटर एकच आहे, व ती ऑसिरिससह सर्व देवतांत प्रामुख्यानें इजिप्तमध्यें पूजिली जाते असें वर्णन केलें आहे. नवीन राज्य लयाला गेल्यापासून इसिसचें महत्त्व वाढलें. फिली येथील मोठें देवस्थान तिसाव्या घराण्याच्या अमदानींत बांधण्यांत आलें. बेहबेट येथील इसिसचें देवालय दुसऱ्या टॉलेमीनें बांधिलें. इसिसपंथ सिरॅपिस पंथाबरोबरच इ. स. पूर्वी तिसऱ्या शतकांत ग्रीसमध्यें पसरला. इजिप्तमध्यें इसिया किंवा इसिस देवस्थानें यांना फार ऊत आला. कॉप्टॉस येथें जुन्या मिन देवाबरोबरच इसिस ही एक प्रमुख देवता बनली. इ. स. ८० च्या सुमारास सल्लानें रोममध्यें एक इसियॅक कॉलेज काढिलें. पण इ. स. पूर्वी ५८—४८ ग्रामधील उतरत्या काळांत रोम शहरांतील त्यांच्या वेदी कॉन्सलनीं चार वेळां उध्वस्त करून टाकिल्या, व इसिस उपासना कायदा करून दडपून टाकण्यांत आली. इसिस आणि ऑसिरिस कथेमध्यें ऑसिरिसचा खून,इसिसचा शोक व तिचें भटकणें येथवर होरसनें मिळविलेला विजय आणि ऑसिरिसचें पुनरुत्थापन या गोष्टी मुख्य आहेत. पुढील काळांत डेमेटरच्या एल्यूशिनियन गूढ गोष्टींचा वरील कथेवर परिणाम होऊन तिची वाढ झालेली दिसते; ही इसिसची कथा, कल्पना आणि धार्मिक भावना अतिशय उद्दीपित करिते व तिच्या सणाच्या दिवशीं कांहीं लोक जपजाप्य करितात तर कांहीं जादू टोणा सिद्ध करून घेण्याचा प्रयत्न करितात. नाइल नदीमुखप्रदेशांतील राज्यांच्या काळांत आपल्या अंगावर घेतलेलें मूल, ( होरस ) यासह इसिसची प्रतिमा सामान्यतः पाहण्यांत येई. पाँपी आणि रोम येथें संशोधलेल्या इसिसच्या देवळावरून या देवीच्या उपासनेकरितां लहानमोठ्या वस्तू इजिप्तहून इटलींत आणीत हें उघड होतें. व्हेस्पेशियन काळापासून पुढें इसिस उपासना कोठल्याना कोठल्यातरी जातींत रूढ असे व पश्चिम खंडांत ती सर्वत्र पसरली होती. तेव्हां ब्रिटनमध्यें तिचे अवशेष सांपडल्यास आश्चर्य नाहीं. ख्रिस्ती धर्माविरुद्ध या मूर्तिपूजक संप्रदायानें इतका टिकाव धरलेला पाहून यांच्यांत वरेंचसें साम्य असावें असें वाटतें, व तें खरेंहि आहे. इ. स. ३९७ मध्यें अलेक्झांड्रिया येथें सिरॅप्यूम [ सिरॅपिसचें देऊळ ] चा जो नाश करण्यांत आला तेव्हांपासून ग्रीको इजिप्शियन देवतांना उतरती कळा लागली. तथापि इटलीमध्यें इसिसची उपासना पांचव्या शतकापर्यंत चालू होती.

**इस्टर**–(इष्टर)–असुरिया व बाबिलोनिया येथील प्रमुख देवतेचें हें नांव असून फिनीशियन ॲस्टार्टेचें हें प्रतिरूप होय. या नांवाचा शब्दशः अर्थ माहीत नाहीं. तथापि असुर या शब्दापासून तें बनलें असावें असें वाटतें. कसेंहि असलें तरी हें नांव मुळांत सेमेटिक आहे असें हल्लीं सर्वत्र मानण्यांत येतें. हिला नना, निना, इन्न, अनुनित इत्यादि अनेक नांवें आहेत. खमुरब्बीच्या काळीं हीं अनेक नांवें मूळ निरनिराळ्या देवतांचीं असत.असुरी-बाबिलोनी धर्मांत अनेक फरक झाले असूनहि इस्टरच्या ठिकाणींच स्वातंत्र्य आढळून येतें. सर्व देवतासमूहामध्यें तीच कायती एका अर्थी खरी देवी दिसते. इतर देवी आपल्या पतींच्या प्रभावांत वास

करीत असल्यानें त्यांना स्वतंत्र स्थान देण्याचें कारण नाहीं, जरी एखादे वेळीं दक्षिणेंत मार्डुकची पत्नी व उत्तरेकडे असुर पत्नी म्हणून ती वावरत असली तरी तिचें स्वतःचें स्वतंत्र अस्तित्व आहे ही गोष्ट नजरेपुढून केव्हांहि जात नाहीं.

इस्टरच्या ठिकाणीं सर्व प्राचीन देवतांचे गुण उतरले आहेत, सर्व विश्वांतील जीवांची अधिष्ठात्री इस्टर आहे ही कल्पना स्त्रीच्या ठिकाणीं असलेल्या नैसर्गिक उत्पादन-शक्तीवरून आलेली असावी. सर्व पुराणांतून, काव्यांतून व स्तोत्रांतून ही महामाता; पृथ्वीची स्वामिनी, शक्तिमान व दैदीप्यमान मूर्ति म्हणून हिची आराधना केलेली आढळते. पण या जीवाधिष्ठात्री देवीचीं दोन स्वरूपें आहेत. ती उत्पादन करिते, शेतें पिकविते, सृष्टीला आनंदाच्छादन घालते. पण त्याचप्रमाणें आपली कृपा ती परत घेते, व असें झाल्यावर शेतें वाळतात आणि मनुष्यप्राणी प्रजोत्पादन करण्यास असमर्थ होतो. सजीवत्वाच्या ठिकाणीं मृत्यु आक्रमून बसतो. तेव्हां ही क्रूर व विनाशकारी देवी भासते, म्हणून तिला संग्राम–देवता समजून आह्वान करितात. लढाईपूर्वी हातांत धनुष्यबाण घेऊन सज्ज असलेली हिची सशस्त्र मूर्ति सैनिकांनां दिसते. ऋतूंमध्यें फरक होण्यासंबंधींच्या कथेंत हिच्या दोन अवस्था दाखविल्या आहेत. एक जीवदायी व दुसरी जीवहारी. सर्व कथांमध्यें अत्युत्तम कथा म्हणजे जींत ती सात दरवाज्यांतून अधोलोकांत गेल्याचें सांगितलें आहे ती होय. प्रत्येक दरवाजाशीं तिचें एखादें वस्त्र व अलंकार काढून घेण्यांत येतात. शेवटीं शेवटच्या दरवाजांतून जातांना ती अजीबात नग्नावस्थेंत असते. अधोलोकांत ती बंदिवान असतांना पृथ्वीवरील सर्व उत्पादन बंद होतें पण पुढें ती परत जेव्हां येते तेव्हां तिला प्रत्येक दरवाजाशीं तेथील पहारेकरी पूर्वी घेतलेलें वस्त्र व अलंकार परत करितात. अशा रीतीनें सर्व वस्त्रालंकारांनीं सुशोभित होऊन ती सर्व सृष्टीला पुन्हां आनंदायक वाटते. हिच्याच सारखी दुसरी गोष्ट इस्टरच्या तम्मुझवरील प्रेमाची होय. तम्मुझ हा वसंत ऋतु होय. अर्ध्या उन्हाळ्यांत तो मारला जातो आणि अधोलोकाच्या देवीच्या तावडींतून त्यास सोडविण्याकरितां इस्टर त्या ठिकाणीं जाते.

सर्व मोठ्या ठिकाणीं इस्टरचीं देवळें होतीं. एरेक येथें इच्या देवळाचें नांव 'एअन्न' ( स्वर्गीयगृह ), बाबिलोनमध्यें एमख ( महागृह ), निनेव्हे येथें शमश ( हविर्गृह ) अशीं होतीं. हिच्या संप्रदायाची सविस्तर माहिती उपलब्ध नाहीं पण हिच्या उपासनेसंबंधांत कांहीं घाणेरडे प्रकार होत असत अशाबद्दलहि कांहीं पुरावा नाहीं. भिक्षु आणि भिक्षुणी अशीं दोघेंहि हिची उपासना करीत. हिच्या सेवेंत असे तोंपर्यंत कुमारिका लग्न करीत नसत.

नक्षत्रोपासनासंप्रदायांत इस्टर शुक्रग्रह असून हिचीं दोन स्वरूपें शुक्राच्या उन्हाळ्यांतील व हिवाळ्यांतील भिन्न स्वरूपाशीं चांगलीं संबद्ध दिसतात. प्राचीन स्मारकांवर धनुष्यबाण घेतलेली, डोक्यावर मुकुट धारण केलेली व आठ किरणांचें नक्षत्रचिन्ह असलेली हिची प्रतिमा दृष्टीस पडते. वक्षस्थलावर हात ठेवून किंवा मूल घेतलेली अशा नग्नस्थितींतले हिचे पुतळे अनेक ठिकाणीं दिसतात. सिन = चंद्रदेव, शमश = सूर्यदेव यांच्या समवेत ही असून या तिघांची मिळून त्रैमूर्ति बनली आहे. ही पृथ्वीदेवता असल्यानें चंद्र, सूर्य आणि पृथ्वी यांची वरील त्रैमूर्ति साहजिक आहे.

**इस्टालिफ**—अफगाणिस्तान मधल्या काबूल प्रांतांत हें शहर आहे. ह्या शहरांत घिलजई, किझील बशी, ताजीक व शीख लोक असे रहिवाशी आहेत. ताजीक लोक बरेच बंडखोर पण लढवय्ये, मृगयाप्रिय व सुंदर असे आहेत. हें शहर दिसण्यांत फारच सुरेख आहे. हें शहर डोंगरांजवळ असून मनोऱ्याप्रमाणें त्याची आकृति आहे व येथील वाडे फार सुरेख आहेत. प्रत्येक घराला एक सुंदर बाग आहे. येथील लोक मुख्यत्वेंकरून विणकामावर उदरनिर्वाह करतात.

**इष्टुर फांकडा**—मराठीशाहीमधील तीन फांकडे म्हणजे कोन्हेरराव ( एकबोटे ), मानाजीराव ( शिंदे ) व इष्टुर ( जेम्स स्टुअर्ट ) हे होत. क्याप्टन स्टुअर्टला मराठे लोक त्याच्या शौर्यामुळें मोठ्या कौतुकानें ' इष्टुर फांकडा ' असें म्हणत. श्रीमंत रघुनाथराव दादासाहेब पेशवे हे पुण्याची पेशव्यांची गादी मिळविण्याकरितां मुंबईच्या इंग्रजांस जाऊन मिळाले व त्यांचें सैन्य मदतीस घेऊन पुणें दरबाराच्या सैन्याशीं लढण्याकरितां इ. स. १७७८ मध्यें बोरघांटामध्यें आले. या युद्धप्रसंगांमध्यें इंग्रजांच्या वतीनें जे रणशूर योद्धे प्रसिद्धीस आले, त्यांपैकीं क्याप्टन स्टुअर्ट हा एक होय. ह्यावेळीं सर्व इंग्रज सैन्याचें आधिपत्य कर्नल इगर्टन ह्याच्याकडे असून, त्यानें आपल्या सैन्याच्या मुख्य दोन तुकड्या केल्या होत्या. व त्यांचें आधिपत्य लेफ्टनंट–कर्नल कॉकबर्न व लेफ्टनंट–कर्नल के ह्या दोन नामांकित सेनापतींस दिलें होतें. ह्याशिवाय तलासासाठीं पुढें चाल करून जाणारी बिनीच्या सैन्याची एक वेगळी तुकडी केली होती. तिचें आधिपत्य क्याप्टन स्टुअर्ट ह्याजकडे होतें. पुणें दरबारच्या सैन्याच्या वेगवेगळ्या तुकड्या केल्या असून त्यांचें सेनाधिपत्य हरिपंत फडके, रामचंद्र गणेश, बाजीपंत बर्वे, तुकोजी होळकर, महादजी शिंदे, वगैरे नामांकित योद्ध्यांकडे होतें. हे सर्व सरदार आपापल्या सैन्यानिशीं तळेगांवापासून बोरघांटापर्यंत मान्याच्या जागा रोखून युद्धास सिद्ध होते. क्याप्टन जेम्स स्टुअर्ट हा योद्धा फार पटाईत असून, त्यास सर्व रस्त्यांची व घांटनाक्यांची पूर्ण माहिती होती. तो आपल्याबरोबर ग्रेनेडियर शिपायांची एक पलटण व थोडासा तोफखाना घेऊन ता. २२ नोव्हेंबर रोजीं मुंबईहून निघाला व आपटे नदीपर्यंत येऊन तेथून दुसरा मार्ग घेऊनब 'रघांट

चढून वर येऊन पोहोंचला. ता. २५ रोजीं त्यानें खंडाळ्याच्या उंच टेंकडीवर आपलें निशाण लाविलें.

क्याप्टन स्टुअर्ट ह्यानें खंडाळ्यास बराच मुक्काम केला. मुंबईचें दुसरें सैन्य व तोफखाना ता. २३ दिसेंबर इ. स. १७७८ रोजीं पनवेलच्या मार्गानें घांट चढून एकदां खंडाळ्यास येऊन पोहोंचला. इकडे मराठ्यांचें सैन्य व तोफखाना शत्रूंशीं तोंड देण्याकरितां खंडाळ्याच्या आजूबाजूस येऊन मान्याच्या जागा रोंखून युद्धास सिद्ध झालें. मराठ्यांच्या तोफखान्याचे मुख्य सेनापति भिवराव पानसे यांनीं तोफा व बाण ह्यांचा प्रतिपक्षावर दररोज वर्षाव चालविला. मराठ्यांच्या सैन्यामध्यें नरोन्हा नांवाचा एक फिरंगी गोलंदाज होता. तो तोफा डागण्यामध्यें अतिशय कुशल होता. त्यानें शत्रूंवर तोफांचा व बाणांचा असा मारा केला कीं, प्रत्येक खेपेस शत्रूंचा नामांकित शिपाई नेमका गोळ्याखालीं सांपडत असे. अशा प्रकारची निकराची लढाई चालू असतां, क्याप्टन स्टुअर्ट ह्यानें आपल्या पराक्रमाची शर्थ करून व शत्रूंच्या तोफांचा भडिमार सहन करून, कारल्यापर्यंत आपली फौज नेऊन पोहोंचविली. त्या योगानें मराठे सेनापतीस त्याच्या शौर्याचा प्रभाव फार अलौकिक वाटून त्यांनीं त्याची फार वाहवा केली; व त्यास कौतुकानें "इट्टुर फांकडा" असें अभिधान दिलें. मराठ्यांच्या सैन्यामध्यें इंग्रजी फौजेंतील ज्या गुप्त बातम्या येत असत. त्यांमध्यें इट्टुर फांकड्याच्या शौर्याबद्दल, धैर्याबद्दल आणि युद्धचातुर्याबद्दल फार प्रशंसनीय उल्लेख असत. त्यामुळें मराठ्यांच्या सेनापतीसहि इट्टुर फांकड्याशीं शर्थीचें युद्ध करून त्यास आपलें रणशौर्य दाखविण्याचें विशेष स्फुरण चढलें. ह्या निकराच्या चकमकीमध्यें इट्टुर फांकड्यास तोफेचा गोळा लागून तो ता. ४ जानेवारी इ. स. १७७९ रोजीं मरण पावला. ह्या प्रसंगीं मराठी सैन्यानें "इट्टुर फांकड्या शाबास" अशी आनंदचित्तानें शाबासकी दिली.

इट्टुर फांकड्याच्या मृत्यूचें वर्तमान तत्कालीन अस्सल मराठी पत्रांत आढळून येतें. त्यामध्यें इट्टुर फांकड्याच्या नांवापुढें 'लढाव' म्हणजे 'लढवय्या' असें विशेषण मराठ्यांनीं लाविलेलें दिसून येतें. परशुरामभाऊ पटवर्धनांचा कारकून शिवाजी बाबाजी ह्यानें ता. २२ जानेवारी इ. स. १७७९ च्या पत्रामध्यें पुढील उद्गार काढले आहेत. "मुख्यत्वें श्रीमंतांचें पुण्य विचित्र? अवतारी पुरुष! त्यासारखे योग घडले. ज्या मॉष्टिनानें मसलत केली, तो घाटावर येतांच, समाधान नाहीं म्हणोन मुंबईस गेला; तेव्हां मृत्यु पावला. इट्टुर फांकडा लढाव, इकडील फौजेचा, कारल्याच्या मुक्कामीं गोळा लागून ठार जाहला. कर्नेल के म्हणोन होता, त्यास बाण लागून जेर जाहला. आकारिक (कर्ते) होते त्यांची अशी अवस्था जाहली........सारांश, श्रीमंतांचा प्रताप हें खरें" [ ऐ. ले. सं. ७ नं. २४६४ ग्रँटडफ. इतिहास संग्रह ४ अं. १०–१२. ]

**इस्पहान**—हें इराणांतील एका प्रांताचें व तसेंच एका शहराचें नांव आहे. हा प्रांत इराणच्या मध्यभा आहे. यांचें वार्षिक उत्पन्न सरासरी एक लक्ष पौंड आहे व लोकसंख्या पांच लक्षांहून जास्त आहे. या प्रांताचे २५ विभाग आहेत. गहूं, जव, तांदूळ, कापूस, अफू, हे पदार्थ या प्रदेशांत उत्पन्न होतात.

इस्पहान हें शहर पूर्वीं इराणची राजधानी होतीं. आतां तें इस्पहान प्रांताची राजधानी आहे. हें झायेंदे नदीवर उत्तर अ. ३२°–३९' व पूर्व रे. ५१°–४० यांच्या दरम्यान ५३७० फूट उंचीवर आहे. याची लोकसंख्या (जुल्फा येथील आर्मिनियन लोकांची वसाहत वगळली असतां) एक लक्ष आहे. या शहराचे ३७ "मोहल्ले" आहेत. व येथें २१० मशिदी व विद्यालयें आहेत. ८४ धर्मशाळा, १५० सार्वजनिक स्नानगृहें व ६८ पिठाच्या चक्क्या आहेत. पाण्याचा पुरवठा नदीचे कालवे व वायव्येकडील टेंकड्यांतून वाहत येणारे झरे व प्रवाह यांच्यापासून होतो.

सेफाव्हि घराण्यांतील लोकांनीं बांधिलेल्या सार्वजनिक इमारतींपैकीं आतां फारच थोड्या शिल्लक आहेत. चेहेल सितून अथवा "४० खांब" व हश्त बेहेश्त अथवा अष्टस्वर्ग हे दोन राजवाडे बरेच चांगल्या स्थितींत आहेत. त्यांना सोनेरी मुलामा व आरसे यांनीं शोभा आणली आहे. यांच्या भिंतीवर इटालियन व डच चित्रकारांनीं काढलेलीं चित्रें आहेत. या राजवाड्यांना लागून आणखी कांहीं इमारती आहेत. उदाहरणार्थ, इमारेतिनो, इमारत-इ-अश्रफ, तलार तविहले, गुलदस्ते, सर्पुशिदे इत्यादि. यांपैकीं सर्वांत रम्य वाडा सादेताबादच्या बागेंतील हफ्त दस्त अथवा सप्तदरबार हा होय. याच्या जवळच ऐनेह खानेह नांवाचा आरसेमहाल आहे. मैदान-इ-शहा हा जगांत सर्वांत भव्य चौक आहे. शिवाय पहिला शहा अब्बासनें बांधलेली मस्जीद–इ–शहा वगैरे इमारती आहेत. पूर्वेच्या बाजूस १७१० मध्यें शहा हुसेननें बांधलेलें विद्यालय आहे. इस्पहान येथील नदीवरील पांचहि पूल पाहण्यालायक आहेत. इमारती व बगीचे मिळून शहराचा परीघ ३० मैल आहे, पण लोकसंख्या फार नाहीं. इस्पहानची ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हटली म्हणजे येथील आच्छादित बाजारांची तीन मैल लांबीची ओळ ही होय.

इ ति हा सः—इ. स. पूर्वीं तीन ते दोन हजार वर्षांच्या कागदपत्रांवरून असें दिसून येतें कीं, अन्शानप्रांतांतच इस्पहान शहर होतें व ते बाबिलोनियन भूगोलवेत्त्यांना माहित होतें. तुराणी घराण्यांतील राजे या प्राचीन काळीं अन्शान व शुस्तर या दोन प्रांतांवर राज्य करीत होते.

गाबाईचें अवाढव्य शहर हेंच स्ट्राबोच्या वेळीं आकिमेनिडनें वसविलेलें होतें असें म्हणतात, आणि महाशूर सायरस पश्चीमेकडील विजय मिळविण्यास निघेपर्यंत आकेमेनिड घराण्यानेंच अन्शान येथें राज्य केलें सल्न काळीं

गावाई अथवा गाव्ही याचा अपभ्रंश जाई झाला व याच नांवानें अरब लोकांच्या स्वारीच्या वेळीं इस्पहान संबोधिलें जात असे. नंतर जाई याच्या ऐवजीं शेहेरिस्तान अथवा मेदिनेह हें नांव पडलें.

दहाव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास प्रख्यात बुयिद राजानें, शेहेरिस्तान, यहुदिए व आसपासची बगीचशीं खेडीं एकत्र केलीं व दहा मैल परीघाचें एक शहर बनविलें. या शहरास जुनें इस्पहान हें नांव प्राप्त झालें व याची इ. स. १३८७ पर्यंत भरभराट होत गेली. या वेळीं तैमूरच्या स्वारीमुळें याची बरीच नासाडी झाली. या शहराच्या वेशीजवळ तैमूरनें ७० हजार लोकांचीं डोकीं छाटून त्यांचा किल्ले मिनार अथवा डोक्यांचा मनोरा बनविला. परंतु सुपीक जमीन, विपुल पाणी वगैरे नैसर्गिक सोयींमुळें हें शहर लौकरच पुन्हां भरभराटीस आलें व सोळाव्या शतकांत सफाविद घराण्यानें जेव्हां आपली राजधानी काझ्वीन येथून या शहरीं आणली तेव्हां येथील संपत्ति व लोकसंख्या फार झपाट्यानें वाढली. या घराण्यांतील पहिल्या अब्बास राजाच्या कारकिर्दीत या शहराची खरी भरभराट झाली. या राजानें या शहरांत बाहेरील लोक येऊन राहावेत म्हणून निरनिराळ्या युक्त्या योजिल्या. येथील व्यापार, कला, उद्योगधंदे ह्यांना उत्तेजन दिलें व निरनिराळे ऐषआरामाचे प्रकार प्रचारांत आणले. त्यानें पौरस्त्य तऱ्हेच्या मौल्यवान नक्षीकामानें युक्त असे पुष्कळ भव्य राजवाडे बांधले, बाग व दुतर्फा झाडी असलेले रस्ते केले, स्नानगृहें, मशिदी, विद्यालयें, बाजार बांधिले व यूरोपियन कारागीर व व्यापारी यांना या शहरीं येऊन राहण्यास उत्तेजन दिलें. यूरोपांतील पहिल्या प्रतीच्या राष्ट्रांचे वकील त्याच्या दरबारीं होते व इंग्लंड, फ्रान्स, हॉलंड, हान्सियाटिक शहरें, स्पेन, पोर्तुगाल व मास्को येथील व्यापाऱ्यांकरितां येथें कायमच्या वखारी स्थापन केल्या. प्रख्यात प्रवाशी चार्दिन यानें १७ व्या शतकाच्या शेवटच्या अर्धात आपल्या आयुष्याचीं बरींच वर्षें येथें घालविलीं. अर्वाचीन इस्पहानच्या वैभवास उतरती कळा १८ व्या शतकाच्या आरंभीं अफगाण लोकांनीं केलेल्या स्वारीमुळें लागली, व त्यावेळेपासून त्याचें महत्त्व कमी कमीच होत आहे. अठराव्या शतकाच्या अखेरीस कजार घराणें जेव्हां इराणच्या गादीवर आरूढ झालें तेव्हां राजधानी इस्पहानहून तेहरान येथें नेण्यांत आली. फत्तेअलीशहा १८३४ मध्यें येथेंच मेला, व पुढें कांहीं काळपर्यंत राजे लोक उन्हाळ्यांत इस्पहानच्या पश्चिमेस झारडेह कुदच्या सीमेवर गांडुमान येथील हिरवळीच्या मैदानांत हवा पालट करण्यास येत असत. परंतु आतां ही चाल बंद झाली आहे.

**इस्माइल हाजी मौलवी-महंमद**—( १७८१ ते १८३१ ). हा मुसुलमानी धर्म-सुधारक दिल्लीजवळील फोव्हा गांवीं जन्मला. सय्यद अहंमदच्या साहाय्यानें, हिंदुस्थानांतील मुसुलमानी धर्म येथील हिंदुपंथांच्या तावडींतून सोडविण्याचा यानें बराच प्रयत्न केला. हे दोघे पुष्कळ वर्षें इकडे तिकडे आपल्या कामाकरितां फिरले. मक्केला देखील जाऊन आले. वाहाबी चळवळ आपल्या धोरणावरच चालली आहे. असें त्यांनां तेथें आढळून आलें. हिंदुस्थानांत आल्यावर त्यांनीं शुद्ध इस्लामी धर्माचें नवमत उपदेशण्यास सुरुवात केली व अनेक अनुयायी जमविले. पण त्यांची चळवळ सरकारी मुसुलमानी पुढाऱ्यांस पसंत न पडून, त्यांची व यांची भांडणें लागल्यामुळें १८२७ त ब्रिटिश सरकारनें इस्माइल पंथाला विरोध केला. तेव्हां यांची लहान टोळी पंजाब येथें गेली. तेथें अफगाण राजाचें पाठबळ मिळून त्यांनीं शीखांना लढाईस आव्हान दिलें; व पेशावर हें आपलें मुख्य ठिकाण केलें ( १८२९ ). अफगाण यांना सोडून गेल्यावर, यांना पेशावरहून निघून जावें लागलें. शीखांविरुद्ध झालेल्या लढाईत इस्माइल हाजी पडला ( १८३१ ). तथापि त्याची चळवळ नाहींशी झाली नाहीं. वायव्य सरहद्दीवरील पर्वतांतून अद्याप याचे कांहीं अनुयायी भेटतात.

**इस्मालिया.**—हें दक्षिण इजिप्तमधील शहर, सुवेझ कालव्याच्या मधलें स्टेशन, तिमसा सरोवराच्या वायव्य किनाऱ्यावर आहे. हें शहर भूमध्य समुद्रापासून व तांबड्या समुद्रापासून ५० मैलांवर व केरोपासून रेल्वेनें ९३ मैल ईशान्येकडे आहे. येथील लोकसंख्या ( १९०७ ) १०३७३ होती. १८६३ मध्यें खेदिव इस्माइलच्या नांवावरून या शहरास इस्मालिया म्हणूं लागले. येथें कचेऱ्या, वखारी, इतर इमारती, व खेदिवचा महाल या इमारती आहेत. १८८२च्या इंग्रजी लष्करी हालचालीच्या प्रसंगीं या महालाचें रुग्णालय करण्यांत आलें होतें, नंतर ह्या इमारतीकडे कोणीहि लक्ष पुरविलें नाहीं. पक्क्या सडका व वृक्षांनीं परिवेष्टित प्रमाणबद्ध चौक यांमुळें शहरास विलक्षण शोभा आली आहे. तीन बाजूंनीं विस्तीर्ण बाग असलेलें साऱ्या इजिप्तमध्यें हेंच एक शहर आहे. कालव्याच्या बाजूस एक मैलपर्यंत गेलेला मेहेतअली नांवाचा धक्का आहे. याच्या शेवटीं पोर्ट सय्यदला पाणी पुरवठा करणारा तलाव आहे. त्याच्या पलीकडच्या बाजूस हैनासच्या खाणी आहेत. येथूनच शहरांतील इमारती करितां दगड आणीत असत.

**इस्रायल राष्ट्रधर्म**—इस्रायल अथवा यहुदी लोक आज जगाच्या पाठीवर सर्वत्र पसरलेले आढळतात. आज अमुक एका प्रदेशास इस्रायलांचें राष्ट्र असें म्हणतां येत नाहीं, तथापि या अनेक देशांत पसरलेल्या लोकांनीं आपलें वैशिष्ट्य कायम ठेविलें आहे. या लोकांवर धार्मिक, सामाजिक व राजकीय कारणांनीं अनेक संकटें आलीं व अनेकदां क्रूर छळास बळी पडावें लागलें, तरी या जातीनें त्यांतून आपणांस निभावून घेऊन चिकाटीनें आपला मार्ग आक्रमण केला. आज जगांतील श्रीमंत घराण्यांत इस्रायल घराणीं अधिक आहेत. यांचा राजकीय इतिहास व भूप्रदेशावरील प्रसार याची कांहीं माहिती "यहुदी" या लेखांत दिली आहे. हिंदु-

स्थानांत वसाहत करून राहिलेल्या इस्रायलांस बेने इस्रायल असें म्हणतात. त्यांची माहिती "बेने इस्रायल" या लेखांत दिली आहे. त्यांचें जुनें वाङ्मय जो जुना करार त्याचा संपूर्ण वृत्तांत आणि त्याचा सेमेटिक संस्कृतीच्या विकासाशीं संबंध मागें 'सेमेटिक संस्कृतीची जगद्व्यापकता' या प्रकरणांत ( विभाग ४ ) दिला आहे.

उ प प त्ति.—इस्रायल या नामाभिधानावरून सूचित होणाऱ्या अनेक प्रश्नांचा विचार करणें या कार्यास एक निराळा ज्ञानकोशच तयार करावा लागेल. तथापि मानवजातीच्या आध्यात्मिक उपदेशकांवर इस्रायल संस्कृतीचा पुष्कळ परिणाम घडून आला असल्यामुळें या संस्कृतीच्या धार्मिक विचारसरणीमध्यें कसकसा विकास होत गेला, हा प्रश्न अत्यंत महत्त्वाचा आहे. इस्रायल राष्ट्रधर्माचा विकास होऊन तो एक विशिष्ट विचारसंप्रदायहि बनला आणि इस्रायल राष्ट्र जरी नष्ट झालें तरी संप्रदाय टिकून तो इस्रायल धर्म या नांवानें लोकांत ओळखला गेला. अभ्यासकास धार्मिक विचारविकसनाचा अभ्यास करतांना या पंथाच्या इतिहासाकडे दुर्लक्ष करून चालणार नाहीं. इस्रायल या संज्ञेवरून ख्रिस्ती शकापूर्वी एक हजारच्या सुमारास पॅलेस्टाईनमध्यें बनलेल्या एका राष्ट्राचा बोध होतो; परंतु या राष्ट्रामध्यें खऱ्या इस्रायल सांप्रदायिक विचाराची उत्पत्ति बरीच मागाहून झालेली दिसते. इस्रायल लोक अरबी लोकांस आपले पूर्वज मानीत असून पॅलेस्टाईन प्रांत हस्तगत करण्यापूर्वी इजिप्तमध्यें आरेमियन लोक कांहीं काळपर्यंत वस्ती करून राहिले होते. पुढें मोझेझ यानें त्या ठिकाणच्या जुलमांतून त्यांची सुटका केली, अशी इस्रायल लोकांची सामान्य समजूत होती. इस्रायल पंथांतील सर्व जाती कधीं काळीं इजिप्तमध्यें होत्या कीं नाहीं, हा एक प्रश्नच आहे. सांप्रत इस्रायल संप्रदायाच्या ज्या प्राचीन दंतकथा उपलब्ध आहेत, त्यांचें शेवटचें संस्करण इस्रायल लोकांची राष्ट्रीय ऐक्याची कल्पना जोरांत असतांना झालेलें असल्यामुळें मूळ दंतकथांच्या वेळींहि राष्ट्रैक्याची कल्पना अशीच जोराची होती हें म्हणणें चुकीचें होईल.

जा ति वि भा ग व पॅ ले स्टा इ न प्रां ता चें स्वा य त्ती क र ण.—इस्रायल लोकांमध्यें मागाहून ज्या बारा जाती पडल्या त्या सर्वांचे मिळून पूर्वी चार वर्ग पाडलेले होते. तेः- ( १ ) ली, ( २ ) रॅचेल, ( ३ ) झिलपा व ( ४ ) बिल्हा हे होत. या सर्वांचा संबंध मूळ चार स्त्रियांशीं दाखविण्यांत येत असे. या मूळ चार स्त्रियांपैकीं ली व रॅचेल या मुख्य असून झिलपा व बिल्हा या अनुक्रमें त्यांच्या दासी होत असें समजण्यांत येतें. 'ली' वर्गामध्यें रुबेन, सायमन, लेव्ही, जूडा इसेचर व झेब्यूलन; रॅचेल वर्गामध्यें जोसेफ (याच्या पोटजाती एफ्राएम व मनास्से ) व बेंजामिन. झिलपा वर्गांत गॅड व अशर; आणि बिल्हा वर्गांत डॅन व नॅफ्तली इत्यादि जातींचा समावेश होतो. याखेरीज कॅननाइट, कॅलेबाइट इत्यादि दुसऱ्या बऱ्याच मिश्र जातींचा इस्रायल पंथांत समावेश करण्यांत आला असावा. या जातींनीं एकंदर किती प्रदेश व्यापिला असावा हें कळत नाहीं, तथापि जॉर्डनच्या पश्चिमेकडील पांच ली जाती शेजारीं शेजारीं असून जूडा जातीनें दक्षिणेमध्यें वसाहत केली, इसेचर व झेब्युलन यांनीं मॅगिडो येथील सपाट प्रदेश व उत्तरेकडील प्रदेश इत्यादि ठिकाणीं वस्ती केली असावी असें अनुमान होतें.

इस्रायल लोकांच्या पॅलेस्टाइनमध्यें स्वाऱ्या सुरू झाल्या, त्या वेळीं बरेच किल्ले कॅनॅनाइट लोकांच्याच ताब्यांत होते, तथापि क्रमाक्रमानें इस्रायल लोकांनीं त्या प्रांतांत आपली सत्ता स्थापन केली व इतर मिश्र जातींवर आपला अम्मल बसविला.

ह्या जातींचें एकीकरण पुढील रीतीनें झालें असावें. कित्येक पिढ्या तेथील कॅनॅनाइट रहिवाशी इस्रायल लोकांच्या नागवणुकीच्या प्रकारामुळें संत्रस्त झालेले होते. तसेंच इस्रायल लोकांप्रमाणें फिलिस्टाइन इत्यादि लोकहि ह्या प्रांतावर स्वाऱ्या करीत होते. अशा रीतीनें हॅझोर येथील राजाबरोबर झालेल्या युद्धांत नफ्तली वगैरे अनेक शेजारच्या जाती सामील झाल्या होत्या. सिसेराच्या वाढत्या सत्तेमुळें व मेगिडो आणि बेझिल या सपाट प्रदेशांवरील तटबंदी शहरामुळें इसेचर आणि झेब्युलन या ली वर्गांतील इस्रायल जातींना व त्याच्या दक्षिणेस असणाऱ्या रॅचेल वर्गांतील जातींनांहि बरीच दहशत बसली होती. वेळोवेळीं अशा प्रकारच्या कलहांमध्यें विजयी झालेला एखादा शूर योद्धा कांहीं काळपर्यंत राजाप्रमाणें या प्रांतांत अम्मल गाजवीत असे. ख्रिस्त शकापूर्वी अकराव्या शतकाच्या अखेरीस फिलिस्टाईन, ॲमोबाइट व ॲमॅलेकाइट इत्यादि जातींनीं बराच जोराचा विरोध केल्यामुळें त्यांच्या तोडीस तोड देण्याकरितां म्हणून सुसंघटित प्रयत्नाची आवश्यकता भासूं लागली व कांहीं काळपर्यंत रॅचेल व ली वर्गांतील इस्रायल जातींचे ऐक्य झालें. हें ऐक्य फार दिवस टिकलें नाहीं; परंतु त्यावरून इस्रायल लोकांच्या भविष्य कालांतील आदर्शभूत संघशक्तीची थोडकीशी कल्पना आली.

या सुमारास होऊन गेलेल्या सॉल व डेव्हिड या दोन राजांनीं बऱ्याच लढाया मारल्या वगैरे सामान्य माहितीपेक्षां त्यासंबंधीं कांहीं विशेषशी माहिती उपलब्ध नाहीं.

इ स्रा य ल लो कां च्या प्रा थ मि क अ व्य व स्थें ती ल ध र्म क ल्प ना:—पॅलेस्टाईन प्रांत काबीज करतेवेळीं इस्रायल लोकांच्या धार्मिक कल्पना कशा प्रकारच्या होत्या, यांविषयीं प्रत्यक्ष अशी माहिती कांहींच उपलब्ध झालेली नाहीं. ख्रिस्त शकापूर्वीच्या सातव्या आठव्या शतकांत इस्रायल लोक कसल्याहि प्रकारचे यज्ञ करीत नव्हते किंवा आहुति देत नव्हते, असें म्हणतां येत नाहीं. कारण कांहीं पंथांत यज्ञ किंवा आहुति देत असावेत. अशा प्रकारच्या आख्यायिका आढळतात, ही गोष्ट निःसंशय खरी आहे व इतक्या प्राचीन काळांत यज्ञ-

संस्था लोकांस अज्ञात होती असें म्हणणें केव्हांहि सयुक्तिक होणार नाहीं; तथापि ॲमोस व जेरेमिया यांच्या म्हणण्याप्रमाणें यज्ञ हे फार क्वचित् प्रसंगीं होत असत. कारण इस्रायल लोकांचे मोठमोठे सण शेतकीच्या संबंधानें प्रचारांत आले होते. इस्रायल लोकांमध्यें शिकार करून आणिलेल्या जनावरांचें मांस खाण्याची जरी मोकळीक असे तरी कॅनन प्रांत काबीज करण्यापूर्वी हे लोक मुख्यतः दुधावरच रहात असत. अशा रीतीनें प्रथमावस्थेंतील इस्रायल लोकांचें कल्पनाचित्र रंगवावयाचें म्हणजे असें म्हणतां येईल कीं, हे लोक दिसण्यांत निर्दय, भयंकर व अगदीं रानटी तर होतेच; परंतु त्यांचा उदरनिर्वाह शेतकीशिवाय अन्य मार्गांनीं होत असल्यामुळें या लोकांमध्यें शेतकीशीं निगडित असलेली सृष्टिशक्तिपूजा प्रचलित नव्हती.

इस्रायल लोकांच्या राष्ट्रीय देवतेच्या याहवे नांवाचें उत्पत्तिस्थान कोणतें याचा सुद्धां अद्याप निर्णय लागलेला नाहीं. मात्र पॅलेस्टाईन प्रांतावरील विजयापूर्वी इस्रायल जातींनीं याहवे देवतेच्या उपासनेचा सर्वसाधारणपणें स्वीकार केला असावा ही गोष्ट संभवनीय दिसते. निरनिराळ्या जातींच्या एकाच देवतेची निरनिराळ्या स्वरूपांत उपासना करीत असत. उदाहरणार्थ ली वर्गांतील जातींमध्यें या देवतेचें स्वरूप एखाद्या देवदूतासारखें किंवा सपक्ष सर्पासारखें दाखविलेलें असे, व रॅचेल वर्गांतील जाती बैलाच्या स्वरूपांत या देवतेची उपासना करीत. या लोकांमध्यें सुंता करण्याची चाल प्राचीन कालीं होती; परंतु हा विधि मुसुलमान लोकांप्रमाणें लहानपणीं न होतां मनुष्य पूर्ण वयांत आल्यावर होत असे. त्याचप्रमाणें गारगोटीच्या शस्त्रांचा उपयोग वगैरे गोष्टींवरून हा विधि अर्वाचीन झुलु वगैरे असंस्कृत जातींप्रमाणें रानटी स्थितीचा निदर्शक होता. कदाचित् 'याहवे' ही प्राचीनकाळीं युद्धदेवता समजली जात असावी.

वर दिलेल्या कल्पनांखेरीज इस्रायल लोकांच्या ज्या दुसऱ्या कांहीं धार्मिक कल्पना आहेत, त्या त्यांनीं पॅलेस्टाईनमध्यें बाहेरून येतांना आणिल्या किंवा पॅलेस्टाईनमध्येंच संपादन केल्या याबद्दल कांहींच विधान करतां येत नाहीं. तसेंच विश्रांतिदिन (सॅबॉथ) व अमावास्या या व्रतांचा परिपाठ प्राचीनकाळीं होता किंवा नाहीं हेंहि सांगतां येत नाहीं. त्याचप्रमाणें पॅलेस्टाईन-पूर्वकाळामध्यें इस्रायल लोकांच्या नीतिकल्पना कशा प्रकारच्या होत्या, हें कळणेंहि अशक्य झालें आहे. एवढें मात्र म्हणतां येईल कीं, प्राचीन काळीं पुढील काळाप्रमाणें बहुपत्नीकत्वाची चाल रूढ होती, आणि परस्त्रीगमन जरी निंद्य मानिलें जात असे, तरी दासीगमनास पूर्ण स्वतंत्रता होती.

**इस्रालाइट व कॅननाइट धर्मकल्पना व परंपरा यांचें संमिश्रण.**—पॅलेस्टाईनवरील विजयानंतर लवकरच जेते असे जे इस्रायल लोक त्यांनीं कॅननाईट या जित लोकांचे आचारविचार व धर्मकल्पना हळूहळू स्वीकारल्या. कॅननाइट मठ, जित आणि जेते यांच्या संयोगापासून उत्पन्न झालेल्या मिश्र जातींचीं विद्यापीठें बनलीं. या मठांमध्यें इस्रायल लोकांनां त्या त्या मठाशीं संबद्ध असलेल्या मोठमोठ्या व्यक्तींच्या परंपरांचें ज्ञान होऊं लागलें असावें. व कालांतरानें या व्यक्ती एकत्रित झालेल्या समाजाचे पूर्वज मानिले गेल्यामुळें त्यांच्यासंबंधीं नवीन नवीन आख्यायिका प्रचलित झाल्या असाव्यात; कारण ज्या राष्ट्रांत ऐक्याची जाणीव दिवसेंदिवस जास्त होऊं लागते त्या राष्ट्राच्या परंपरा मुळांत जरी विशिष्ट स्थानसंबद्ध असल्या तरी त्यांस लवकरच सर्वमान्यता प्राप्त होते, व अशा रीतीनें एखाद्या विशिष्ट जातीचे सुप्रसिद्ध पूर्वज हे त्या सबंध राष्ट्राच्या आदरास पात्र होतात. या वेळीं कॅननाइट संप्रदायाचा इस्रायल संप्रदायावर बराच परिणाम होणें अपरिहार्य होतें. समाजाच्या प्रथमावस्थेंत शेतकी व धर्म यांचा परस्परसंबंध दृढ असल्यामुळें त्या समाजाच्या शेतकीविषयक हालचालींना धार्मिक महोत्सवाचें स्वरूप येतें. अशा प्रसंगीं दुसरा एखादा गोपालवृत्तीचा समाज जेव्हां पहिल्या मूळच्या समाजांतील शेतकीचा स्वीकार करतो, तेव्हां अप्रत्यक्षपणें त्या समाजाच्या धर्मकल्पनांचाहि तो स्वीकार करीत असतो. इस्रायल लोकांनीं कॅननाइट लोकांची बाल ही देवता व दुसरे अनेक महोत्सव स्वीकारले यांतील रहस्य हेंच होय. इस्रायल संप्रदायामधील कांहीं प्रकार मूळच्या स्थानिक रूढी असाव्यात. उदाहरणार्थ ख्रिस्तशकापूर्वी सातव्या शतकांत होऊन गेलेल्या व ईश्वराचे प्रेषित म्हटल्या जाणाऱ्या कांहीं धर्मसुधारकांनीं निषिद्ध मानिलेली 'मलोक' देवाची उपासना हा प्राचीन कॅननाईट संप्रदायाचा राहिलेला अवशेष दिसून येतो. या उपासनेमध्यें स्त्रीपुरुषांस प्रथम झालेलीं मुलें देवतेच्या साक्षात प्रतिमा म्हणून राजास बळी दिलीं जात असत. या वेळीं मठदेवालयादिकांमध्यें बरींच यज्ञस्थंडिलें असून त्या ठिकाणीं पहिल्याप्रथम जन्मलेल्या मुलांच्या चरबीची आहुति देण्यांत येत असून स्थण्डिलावर रक्ताचा सडा घालण्यांत येत असे, व महत्त्वाच्या मठांतून अशा अनेक कार्यांकरितां एक उपाध्यायवर्ग तयार करण्यांत येत असे. अर्थात् या वर्गास धार्मिक कथांचें रक्षण करणें, देवताप्रतिमांची नीट व्यवस्था राखणें, देवतांना कौल लावणें वगैरे अनेक कृत्यें करावीं लागत असल्यामुळें या वर्गास बरेंच महत्त्व प्राप्त झालें होतें. यापेक्षांहि अत्यंत किळसवाणा प्रकार म्हटला म्हणजे हे मठवासी उपाध्याय सृष्टींतील उत्पादन शक्तीस जास्त प्रज्वलित करणारे असे ईश्वराचे प्रतिनिधी असल्याबद्दल स्वतःस मानीत. या मठवासी उपाध्यायांच्या स्वरूपांत असलेल्या ईश्वराशीं संभोग झाल्यानें विवाहाची जास्तच सफलता होते, अशी त्यावेळची सार्वत्रिक समजूत असल्यामुळें या उपाध्यायाकडून प्रत्येक स्त्रीस झालेलें पहिलें मूल, ही ईश्वराची मालमत्ता समजली जात असे, व प्रथम जन्मलेल्या मुलास यज्ञामध्यें बली देण्याची चाल या कल्पने-

मुळेंच पडली असावी. कांहीं मठांमध्यें याच प्रकारच्या कार्याकरितां मठवासिनी स्त्रियांचाहि वर्ग उत्पन्न झालेला दिसतो. या मठवासी वर्गाखेरीज दुसरे कित्येक स्वतंत्र वर्गहि स्वतःच्या अतीन्द्रियशक्तीनें किंवा दुसऱ्या कांहीं जादूटोण्यामुळें पुढें घडून येणाऱ्या गोष्टींचें स्वतःस आगाऊ ज्ञान होत असल्याचें ढोंग करून लोकांस फसवीत असत.

राजसत्तेच्या अमदानींत ख्रिस्तशकापूर्वी नवव्या शतकाच्या मध्यकालापर्यंतच्या इस्रायलांच्या धार्मिक इतिहासाविषयीं कांहीं माहिती उपलब्ध होत नाहीं. सोल राजानें केलेली स्थण्डिलरचना, डेव्हिडनें मौंट सियॉनवर केलेली नवीन मठाची स्थापना वगैरे बारीक सारीक गोष्टींची माहिती उपलब्ध झाली आहे. एवढें मात्र खरें कीं या वेळीं इस्रायल लोक जरी असंस्कृत स्थितींत होते, तरी कॅननाइट धर्मातील अनेक किळसवाण्या प्रकारापासून पूर्ण अलिप्त राहिले होते.

**बालदेवतेच्या उपासनेस प्रारंभ.**—इस्रायल संप्रदायाच्या धार्मिक इतिहासास वास्तविक ख्रिस्तपूर्व नवव्या शतकाच्या मध्यभागाच्या सुमारास प्रारंभ होतो. या वेळीं ओम्री राजाचा टायर येथील राजाशीं तह झाल्यामुळें व त्याचा मुलगा अहेब याचा जीझेबेल या टायर येथील राजकन्येशीं विवाह झाल्यामुळें हा काळपर्यंत इस्रायल लोकांनीं सर्वसामान्यपणें मान्य केलेल्या देवतेचें प्रमुख स्थान टायरमधील बालदेवतेकडे जातें कीं काय, अशी भीति उत्पन्न झाली. ही नवीन चळवळ लोकप्रिय होणें संभवनीय दिसूं लागल्यामुळें व ओम्री आणि अहेब हे दोन्ही मोठे बलाढ्य राजे असल्यामुळें याह्वेचें वर्चस्व अबाधित ठेवण्याची गोष्ट अशक्य दिसूं लागली. पण एलिजा नामक प्राचीन परंपरेच्या अनुयायांच्या पुरस्कर्त्यानें नॅबोथ याच्या वधामुळें राजकीय कुटुंबाविरुद्ध कलुषित झालेल्या प्रजेच्या चित्तक्षोभाचा फायदा घेऊन ओम्रीचें राजघराणें नष्ट केलें, व इस्रायल राष्ट्रामध्यें 'याह्वेच्या प्रदेशांत याह्वे हाच एक देव' हें तत्त्व पुनश्च प्रस्थापित केलें. बालदेवता-संप्रदाय विशेषतः उत्तर इस्रायलमध्यें बऱ्याच महत्त्वास चढला होता, व जूडाप्रांत उत्तर इस्रायलच्या वर्चस्वाखालीं होता. तथापि, प्राचीन एशियाटिक जेत्यांच्या फक्त खंडणी घेण्याच्या नेहमींच्या चालीप्रमाणें जूडामधील इस्रायल संप्रदायावरहि कसल्याच प्रकारचे अनिष्ट परिणाम झाले नाहींत. या वेळीं एलिजा, याच्या अनुयायांनीं देवतेच्या उपासनापद्धतींत कांहीं सुधारणा केल्याचें दिसून येत नाहीं. कारण यावेळीं इस्रायल लोकांची दमास्कस येथील आरेमियन लोकांबरोबर सुमारें अर्धशतकपर्यंत जंगी झटापट चालली असल्यामुळें हा कालहि धर्मसुधारणेस अनुकूल नव्हता. तथापि याह्वे देवतेच्या उपासनेचें वर्चस्व सुव्यवस्थितपणें जुन्या शिलालेखांवर व "करारांच्या" सुप्रसिद्ध "कमानीवर' खोंदलेल्या दहा धर्माज्ञांवरून स्पष्ट दिसून येतें. या दहा प्राचीन धर्माज्ञा पुढीलप्रमाणें आहेतः—(१) मी याह्वे तुझा देव आहे. माझ्याखेरीज दुसऱ्या कोणत्याहि देवतेची उपासना करूं नकोस. (२) बिनखमिरी रोट्या शिल्लक राखून त्या तूं सात दिवस खात जा. (३) गर्भाशयांतून प्रथमच बाहेर येणारी अर्भकें, बैल व मेंढ्या इत्यादिकांची पहिली प्रजा माझी आहे. (४) सहा दिवस काम करून सातव्या दिवशीं विश्रांति घे व सॅबॅथ सण पाळीत जा. (५) सर्व ऋतूंतील नवीं नवाबळ इतकेंच नव्हे तर गव्हांची पहिलीं पिकें देखील मला अर्पण कर. (६) वर्षाअखेर एकदां तूं माझा महोत्साह कर. (७) आंबलेल्या रोट्यांवर यज्ञिय रुधिराचें तूं हवन करूं नकोस. (८) मला समर्पण केलेल्या अन्नांतील चरबी सकाळपर्यंत (रात्रभर) शिल्लक ठेवूं नकोस. (९) तुझ्या जमिनीच्या पहिल्या पिकांपैकीं प्रथम भाग तुझा देव जो मी याह्वे त्या माझ्या देवालयांत आणून टाक. (१०) बकरीच्या अंगावर दूध पीत असलेलें तिचें पिलूं माझ्याकरितां मारूं नकोस.

**ख्रि. पू. आठव्या शतकांतील उत्तर इस्रायलमधील धर्मोपदेशकांची चळवळ.**—ख्रिस्तपूर्व आठव्या शतकाच्या मध्यापासून इस्रायल संप्रदायांतील महत्त्वाच्या सुधारणाविषयक चळवळीस आरंभ होतो. बाह्यदृष्ट्या हा काल भरभराटीचा दिसत होता. कारण बरेच दिवस चाललेल्या आरेमियन युद्धाची परिसमाप्ति झाल्यामुळें इस्रायल लोकांची भीति नाहींशी होऊन हें देवतेचें वर्चस्व पूर्णपणें स्थापन झालें व याह्वेच्या कृपेमुळेंच जयसंपादन झालें अशी समजूत असल्यामुळें याह्वे देवतेची उपासना इतकी वाढली कीं, त्यामुळें सामाजिक नीतिनियमांकडेहि दुर्लक्ष होऊं लागलें. पॅलेस्टाइनच्या विजयापूर्वी जे इस्रायल लोक गोपाल स्थितीमध्यें केवळ दुधावर राहून उपजीविका करीत, व कधींकाळीं एखाद्या विशिष्ट प्रसंगींच आपल्या कळपांपैकीं एखादी मेंढी मारीत, त्या लोकांमध्यें ख्रि. पू. आठव्या शतकापासून पुष्कळ याज्ञिक माजले. याज्ञिकांच्या या बेसुमार वाढीमुळें बऱ्याच पुराणमतानुयायी धर्मोपदेशकांना या प्रकारांत कांहींतरी सुधारणा घडून येणें इष्ट आहे असें वाटूं लागलें. याच सुमारास असुरियाच्या वाढत्या सत्तेपुढें पॅलेस्टाईन संस्थानांस मान वांकवावी लागते किंवा काय, याबद्दल काळजी उत्पन्न झाली. परंतु या अशा प्रकारच्या राजकीय परिस्थितीची कल्पना फार थोड्या लोकांस होती; व त्यापैकींच ॲमॉस हा एक सुप्रसिद्ध धर्मोपदेशक होय. त्यानें बेथेल या ठिकाणच्या मठामध्यें यज्ञादिकांच्या निष्फलतेबद्दल लोकांना उपदेश केला. त्याचें म्हणणें असें कीं, याह्वे देवता यज्ञानें खूष होणार नाहीं. कारण तसें जर झालें असतें, तर असंख्य यज्ञ करणाऱ्या इस्रायल लोकांवर याह्वेनें कधींच अवकृपा केली नसती. म्हणून याह्वेच्या संतोषाकरितां यज्ञ करण्याऐवजीं सदाचरण व प्रामाणिकपणा यांची कांस धरली पाहिजे.

ॲमॉसच्या मागून थोडक्याच काळांत होसिया नांवाचा एक धर्मोपदेशक उदयास आला. होसियानें केलेल्या धर्मोपदेशाचें एक त्रुटित पुस्तक उपलब्ध झालें आहे. त्यावरून इस्रायल सत्तेचा शेवटचा अधःपात होण्यापूर्वीची त्या ठिकाणची परिस्थिति कशी भयंकर होती हें दिसून येतें. ॲमॉसप्रमाणें होसिया याचीहि यज्ञाच्या निष्फलतेबद्दल खात्री झाली होती परंतु त्याची विशेष कामगिरी म्हणजे धर्माच्या नांवाखालीं राजरोसपणें चाललेल्या वेश्यावृत्तीचा निषेध करणें ही होय. लोभ आणि विषयवासना, उपभोग आणि निष्ठुरता इत्यादि मनोविकार बहुजनसमाजामध्यें इतके वाढले होते कीं, मठ देवालयें इत्यादि धार्मिक स्थानें देखील कुंटणखाने बनलीं होतीं. निसर्गपूजेबरोबर उद्भवणारा जो धर्मभोळेपणा त्याच्या विरुद्ध होसियाचें मत असल्यामुळें अर्थात् प्रतिमापूजेविरुद्धहि त्याला झगडावें लागलें. मूर्तिपूजेचा पहिला इस्रायल निषेधक हाच होय. परंतु हा काल धर्मसुधारणेस प्रतिकूल असल्यामुळें होसियाच्या आध्यात्मिक शिकवणुकीचा इस्रायल लोकांचा धर्मभोळेपणा नाहींसा करण्याच्या बाबतींत कांहीं उपयोग झाला नाहीं.

**सॅमेरिया प्रांतात ख्रि. पू. ७२२ नंतर चालू झालेली याहवे देवतेची उपासना.**—ख्रिस्तपूर्व ७३४ च्या सुमारास असुरियाचा राजा तिगलथ पिलेसर याच्या स्वारीमुळें उत्तर इस्रायलमधील सत्ता नामशेष झाली. ह्यानंतर इस्रायल संप्रदायाचा कसकसा विकास होत गेला हें पाहणें असल्यास समेरिया प्रांताकडे वळलें पाहिजे. तिगलथ पिलेसर, सारगन वगैरेंनीं शेंकडो इस्रायल लोक या देशाबाहेर हद्दपार केले व त्यांच्या जागीं वायव्य मेसापोटेमिया प्रांतांतील बरेचसे वसाहतवाले आणविले; परंतु इतकें करूनहि याहवे देवतेची उपासना नाहींशी झाली नाहीं. ख्रि. पू. ७२२ च्या सुमारास उत्तरेकडील मठांचा पूर्ण नाश झाल्यामुळें व त्यांतील मूर्तीहि पळवून नेल्यामुळें सुधारणावादी इस्रायल लोकांच्या बाजूस जास्तच बळकटी आली, आणि उपर्युक्त दहा धर्माज्ञांमध्यें मूर्तिपूजेचा निषेध करणारा एक नियम जास्त घालण्यांत आला. याशिवाय दुसऱ्या बाजूनें परदेशांहून आलेल्या परकीय लोकांस आपल्या बाजूस ओढून घेण्याकरितां याहवे देवतेच्या उपासकांनीं खूप जोराचे प्रयत्न चालविलेच होते.यामुळें इस्रायल धर्माचा एका नवीन महत्त्वाच्या बाबतींत विकास झाला.

**ख्रि. पू. आठव्या शतकाच्या उत्तरार्धांत जूडा प्रांतांत झालेली सुधारणाविषयक चळवळ.**—जूडा प्रांताच्या धार्मिक इतिहासाबद्दल जोआश यानें केलेल्या सुधारणेपासून अहाझ याच्या कारकीर्दीपर्यंतची कसल्याहि प्रकारची माहिती उपलब्ध होत नाहीं. तथापि या वेळच्या राजांची हकीकत लिहिणाऱ्या ग्रंथकारानें ऐतिहासिक दृष्ट्या उपयुक्त व अत्यंत महत्वाचीं अशीं दोन विधानें केलीं आहेत. यांपैकीं एका विधानांत असें म्हटलें आहे कीं यरुशलेमखेरीज इतर ठिकाणच्या मठांमध्यें जे उपासना करतात, त्या लोकांस याहवे देवतेचा उपमर्द करणाऱ्या वर्गात घालावयाचें. दुसरें विधान म्हटलें म्हणजे नाश हा दुराचरणाचा प्रत्यक्ष परिणाम समजला जात असल्यामुळें ज्यांच्यावर सर्व नाश होण्याची पाळी आली, ते सर्वांपेक्षां जास्त पापी असले पाहिजेत, हें उघडच आहे. यावेळीं जूडा प्रांतांत होऊन गेलेल्या इसाया नांवाच्या धर्मोपदेशकाचीं प्रवचनें जास्त प्रमाणांत उपलब्ध झालीं असतीं तर त्या वेळच्या परिस्थितीबद्दल जास्त विचार करतां आला असता. तथापि आहे या सामुग्रीवरून असें दिसून येतें कीं इसाया यानें त्यावेळच्या धर्मविचारांस दोन प्रकारांनीं जोराची चालना दिली. त्याचें मुख्य आग्रहाचें म्हणणें आहे कीं, याहवे देवतेचें ज्या प्रतिमांच्या साधनांनीं निदर्शन करण्यांत येतें त्या प्रतिमांपेक्षां असंख्य पटींनीं जास्त असणारें याहवे देवतेचें ऐश्वर्य आणि पावित्र्य यांचें मानवी बुद्धीस आकलन होणार नाहीं. इसाया यानें असें म्हटलें आहे कीं, इस्रायल लोकांनां शुद्धीवर आणण्याकरितां याहवे देवतेच्या प्रदेशांत घुसलेले असुरियन लोक हा एक रोगच होय; आणि हें कार्य समाप्त झाल्यावर असुरियन लोकांची महत्त्वाकांक्षा व निर्दयता यांबद्दल त्यांस शासन मिळालेंच पाहिजे. इसाया यानें केलेल्या मूर्तिपूजेच्या निषेधाची आद्य कल्पना याच्या पूर्वीच्या होसिया नामक धर्मोपदेशकापासून घेतलेली दिसते. असुरियन वर्चस्वाबद्दल इसाया यानें केलेल्या भविष्यामुळें व याहवे देवतेच्या ठिकाणीं असलेल्या त्याच्या अढळ निष्ठेमुळें जूडा प्रांतामध्यें कांहीं कालपर्यंत त्याचें वजन इतकें वाढलें कीं त्या योगानें त्यानें हेझेकिया राजाचें कांहीं तरी सुधारणा घडवून आणण्याबद्दल मन वळविणें शक्य झालें. इसायाच्या मूर्तिपूजेविरुद्ध शिकवणुकीचा असा परिणाम झाला कीं, याहवेची कांसें या धातूची बनविलेली जी सपक्ष सर्पाकृति प्रतिमा, तिचा नाश करण्यांत आला. हेझेकियानें घडवून आणिलेल्या धर्म सुधारणेचें स्वरूप नीट रीतीनें समजत नाहीं. ही सुधारणा बहुतेक यशस्तंभ काढून टाकण्याची व धर्मोपदेशकांचीं स्थानें पापाचरणहीन करण्याची असावी. लोकांच्या धर्मसमजुतींत इतक्या तऱ्हेनें ढवळाढवळ करणाऱ्या राजाचें सिंहासन सुरक्षित राहणें ही एक आश्चर्याची गोष्ट आहे. हेझेकिया राजाच्या कारकीर्दीच्या शेवटच्या काळांत बहुतेक लोक असुरियन युद्धाच्या भीतीनें ग्रस्त झाल्यामुळें त्यांस बंड करणें अशक्य वाटून ही सुधारणा स्वीकारणें भाग पडलें असावें.

**सुधारकांविरुद्ध प्रतिक्रिया.**—उपरिनिर्दिष्ट धर्मसुधारकांनीं सुधारणेचें घोडें लोकांनां पटेल व रुचेल यापेक्षां जास्त पुढें दामटलें. हेझेकियाची मूर्तिपूजेविरुद्ध चळवळ हें एक पाप आहे व या पापाचा सूड घेतलाच पाहिजे अशा मताचे त्या वेळीं बरेच लोक होते व हेझेकियाच्या मरणानंतर थोड्याच वर्षांत वरील सुधारणेविरुद्ध प्रतिक्रिया सुरू झाली.

यावेळीं प्राचीन धार्मिक समजुतींचा उद्धार करण्यांत आला. इतकेंच नव्हे तर असुरियन अधिकारी व वसाहतवाले यांनीं कित्येक नवीन पंथ काढले व कांहीं कालपर्यंत जूडा प्रांतामध्यें शुद्ध एकेश्वरवाद दृष्टीआड झाला.

या कालामध्यें इस्रायल संप्रदायावर परकीय विचारांचा कांहींच परिणाम झाला नाहीं असें मात्र नाहीं. या वेळच्या यरुशलेम येथील अत्यंत रानटी उपासनापद्धतीवर शेजारच्या देशांतील उच्च संस्कृतीचा व सुधारलेल्या लोकांचा बराच परिणाम झाला. ख्रि. पू. ७३२ मध्यें अहाझ हा दमास्कस येथें गेला असतां त्यानें त्या ठिकाणीं यरुशलेम येथील देवालयांतील कांशाच्या यज्ञवेदीपेक्षां पुष्कळ मोठी आणि मोठाले यज्ञ करण्यास उपयुक्त अशी पाषाणाची यज्ञवेदी पाहिली, व तशाच नमुन्याचें एक मोठें स्थण्डिल त्यानें यरुशलेम येथें स्थापन केलें.

ख्रि. पू. सातव्या शतकांतील समेरिया प्रांतांत चालू असलेला याह्वे देवता संप्रदाय.—मनास्से राज्यावर आल्यापासून जूडा प्रांतामध्यें जरी धर्मसुधारणेची गळचेपी झाली, व याह्वे संप्रदायाची स्थिति संकटव्याप्त झाली तरी उत्तरेकडे धार्मिक परिस्थिति उत्साहवर्धक होऊं पहात होती. समेरिया शहरांतील इस्रायल सत्तेचा नाश झाल्यापासून बरेच इस्रायल लोक हद्दपार करण्यांत आल्यामुळें व त्या ठिकाणीं अनेक मिश्र जातींची वस्ती झाल्यामुळें याह्वे देवतेचें वर्चस्व अगदीं संपुष्टांत आलें. बेथेल येथील सुप्रसिद्ध मठांतून तेथील धर्मोपदेशकांस हांकून लावल्यामुळें अॅमॉस, होसिया, एलिशा वगैरे धर्मोपदेशकांनीं केलेलें कार्य निष्फळ होण्याचा रंग दिसूं लागला. तथापि या प्रांतांत कांहीं इस्रायल धर्मोपदेशक अद्यापि राहिले होते याच वेळीं देशांत बराच वेळ चाललेल्या युद्धामुळें व लोकसंख्या कमी झाल्यामुळें एकाएकीं ग्रांथिक ज्वराचा प्रादुर्भाव झाला. या संधीचा फायदा घेऊन वरील धर्मोपदेशकांनीं हा रोग याह्वे देवतेची उपासना बंद पडल्यामुळें झाला असें जाहीर करून नवीन वसाहतवाल्यांनां इतकी दहशत घातली कीं, त्यांनीं असुरियाच्या राजास इस्रायल धर्मोपदेशकास याह्वे देवतोपासनेचा उपदेश करण्यास परवानगी देण्याबद्दल याचना केली व ती मान्य होऊन बेथेल येथील सुप्रसिद्ध मठाचें द्वार, राजाज्ञेवरून खुलें करण्यांत आलें. या ठिकाणच्या मिश्र जातींच्या लोकांस विशिष्ट दैवतें सोडून देऊन याह्वे देवतेची उपासना करावयास लावणें ही गोष्ट अशक्य होती. तथापि, त्यांचीं मनें हळूहळू याह्वे संप्रदायाकडे आकर्षिण्याकरितां सार्वजनिक उपदेशस्थानें व यज्ञस्थण्डिलें जास्त जास्त बांधण्याची युक्ति फार उपयोगी पडली. एका बाबतींत मात्र होशियाच्या शिकवणुकीविरुद्ध प्रतिक्रिया झाली. बेथेल येथील सुवर्णवृषभाची प्रतिमा काढून टाकण्यांत येऊन बेथेलाईट धर्मोपदेशकांनीं अमूर्त्युपासनेचा स्वीकार केला.

समेरिया देशाकरितां झालेल्या कायद्याचें क्रमवार संहितीकरण.—समेरिया प्रांतांतील नवीन रहिवाशांनां केवळ इस्रायल लोकांच्या सांप्रदायिक आचाराच्या ज्ञानाची जरूरी होती इतकेंच नव्हे तर इस्रायल लोकांच्या व्यवहारांतील चालीरीतींच्या शिक्षणाचीहि आवश्यकता होती.ही जरूरी भागविण्याकरितां इस्रायल लोकांच्या प्राचीन दहा धर्माज्ञांमध्यें गुलामगिरी, मालमत्ता इत्यादि व्यावहारिक बाबींच्या नियमांची भर घालण्यांत आली. हाच नियमसंग्रह, थोड्याबहुत फरकानें सांप्रत उपलब्ध असलेल्या जुन्या करारांतील एक्झोडस ( प्रकरण २० ते २३ ) मध्यें आढळतो.

केवळ कायदा तयार करण्यानें परकीय परंपरेंतील जाती मनापासून याह्वे देवतेच्या उपासक बनतील, अशांतला भाग नव्हता, तर त्यांनां इस्रायल परंपरेचें व याह्वे देवतेच्या इस्रायल राष्ट्राचें संरक्षण करण्याकरितां वारंवार केलेल्या अचाट कृत्यांचें, शिक्षण देण्याची जरूरी भासूं लागली. हा उद्देश साध्य होण्याकरितां त्या वेळीं मोठमोठ्या मठांत प्रचलित असलेल्या कथा, आख्यायिका वगैरेंचा एक संग्रह तयार करण्यांत येऊन त्या सर्व माहितीचें मिळून एक सुसंबद्ध कथानक बनविण्यांत आलें, व त्यांमध्यें उपर्युक्त मोझेसच्या कायद्याचीहि भर घालण्यांत आली. या संग्रहांतील अंतर्गत पुराव्यावरून याची रचना त्या ठिकाणीं आलेल्या परकीय जातींच्या लोकांकरितां केलेली दिसते. ही एकत्रीकरणाची व संस्मरणाची क्रिया किती काळपर्यंत चालू होती याचें अनुमान करतां येत नाहीं. या क्रियेची परिसमाप्ति ख्रि. पू. सातव्या शतकाच्या अखेरीस झाली असावी व समेरियांतील बेथेलच्या मुख्य मठामध्यें या संग्रहास शेवटचें संस्करण मिळालें असावें. या एलोहीस्टनें केलेल्या संग्रहाच्या मागाहून उत्तर इस्रायलमधील परंपरेचा संग्रह करून ठेवण्याची आवश्यकता तेथील लोकांस भासूं लागली, व लवकरच पॅलेस्टाईनचा विजय आणि न्यायाधीश, राजे व धर्मोपदेशक यांचीं महत्कृत्यें यांसंबधीं प्रचलित असलेल्या आख्यायिकांचे संग्रह करण्याचा प्रयत्न झाला असावा. हे संग्रह करण्यामध्यें संग्राहकांचा केवळ प्राचीन विद्यासंशोधनाचा उद्देश नसून व्यावहारिक दृष्टि होती.

जोसियाच्या कारकीर्दींत सुधारणा.—या सुमारास जूडा प्रांतामध्यें मनास्से याच्या राज्यारोहणापासून धार्मिक सुधारणेविरुद्ध जी जोराची प्रतिक्रिया झाली तिला हळके हळके ओहोटी लागण्याचा रंग दिसूं लागला. मनास्से हा ख्रि. पू. ६४१ मध्यें मरण पावल्यावर त्याचा मुलगा अॅमॉन यास कांहीं थोडीं वर्षें राज्य केल्यानंतर मृत्यू आल्यामुळें याचा आठ वर्षांचा जोसिया नांवाचा मुलगा गादीवर बसला. जोसियाच्या कारकीर्दींतील आरंभीची फार थोडी माहिती उपलब्ध आहे. परंतु ख्रि. पू. ६२६ च्या सुमारास पॅलेस्टाईनच्या उत्तरेकडील भागांत सीथियन लोकांनीं उठविलेल्या

धूळधाणीची बातमी एकाएकीं कानावर येऊन आदळली व या प्रकारचा उपद्रव जूडा प्रांतास न व्हावा म्हणून त्या वेळच्या जेरेमिया इत्यादि प्रमुख धर्मोपदेशकांनीं हीं अरिष्टें, याह्वे देवतेच्या क्रोधाचा परिणाम होय, अशा प्रकारचा उपदेश करण्यास सुरुवात केली. जेरेमियाच्या मतांवर त्याच्या पूर्वी होऊन गेलेल्या होसियाच्या शिकवणुकीचा पुष्कळ परिणाम झालेला दिसतो. अशा रीतीनें जूडियन मठांमध्यें चालू असलेल्या यज्ञविधींसारख्या जुन्या धर्मक्रियांस आळा घालण्याची आवश्यकता राजा व त्याचे मंत्री यांस भासूं लागली असावी हें उघड आहे. परंतु राष्ट्राचें कल्याण, या धर्मकृत्यांवर अवलंबून आहे. अशी सार्वत्रिक समजूत असल्यामुळें वरील सुधारणा नुसता कायदा करून घडवून आणणें शक्यच नव्हतें. कोणताहि राजा कितीहि एकतंत्री असला तरी आपल्या प्रजेच्या सार्वत्रिक भावनांचा बीमोड करण्यास सहजासहजीं धजणार नाहीं. परंतु या वेळीं जोसिया राजाच्या अमलाखालीं असलेलीं सर्व मोठीं नगरें परसत्तेखालीं जाऊन जूडा प्रांतांत यरुशलेम या सुप्रसिद्ध नगराशिवाय बहुतेक सर्व खेडीं शिल्लक राहिलीं होतीं. कोणत्याहि प्रकारच्या परिस्थितींत राजा व त्याचे सल्लागार यांनां यरुशलेम नगरावर धार्मिक सुधारणा लादणें शक्य नसल्यामुळें, सरतेशेवटीं अशी तडजोड निघाली कीं, यरुशलेम नगरास मान्य होईल अशी एखादी सुधारणा काढली तर राहिलेल्या गांवाच्या विरोधास जुमानण्याचें कारण नाहीं. शिवाय यरुशलेम येथील देवालयावर राजास देखरेख ठेवतां येणें शक्य होतें.

अशा सर्व परिस्थितीचा विचार करून जोसिया राजा व त्याचे सल्लागार यांनीं एकदम यरुशलेम खेरीज इतर ठिकाणच्या मठांचा फन्ना उडविला, व देवालयांत वस्ती करून राहिलेल्या कुपथगामी धर्मोपदेशकांस ठार मारिलें, व परठिकाणांहून आलेल्या नवीन पंथांची समूळ उचलबांगडी केली. यज्ञविधींच्या बाबतींत कोणताहि फेरफार न करितां अशी एक अट घालण्यांत आली कीं, पूर्वीचेच यज्ञविधी यरुशलेम खेरीज इतर कोणत्याहि ठिकाणीं करण्यांत येऊं नयेत. या सर्वांस केलेल्या सुधारणेमुळें कांहीं कालपर्यंत अनेक अडचणी उद्भवल्या, हें सांगावयास नकोच. यांपैकीं पहिली अडचण म्हणजे सभोंवतालच्या प्रदेशांतील नष्ट झालेल्या मठांतील लीव्हाइट नांवाच्या मोकळ्या झालेल्या धर्मोपदेशक वर्गास वरील देवालयांतील धर्मोपदेशकांप्रमाणें ठार न मारतां त्यांची कोठेंतरी सोय लावावयास पाहिजे होती. यरुशलेम येथील यात्रेकरूंची संख्या आतां साहजिकच वाढणार असल्यामुळें तेथील उत्पन्नहि वाढेल, व तेथें वरील उपाध्यायांची सहज सोय करतां येईल अशी जोसियाची कल्पना होती; व त्याप्रमाणें त्यानें व्यवस्थाहि केली. परंतु तेथील झेडोकाइट उपाध्याय वर्गानें या बाहेरून आलेल्या उपाध्यायवर्गास जरा कमी प्रतीचें मानल्यामुळें यरुशलेम येथील देवालयांत दोन प्रकारचे उपाध्यायवर्ग निर्माण झाले.

याशिवाय, वरील सुधारणेच्या योगानें बाहेरील प्रांतांत बराच असंतोष माजणें साहजिक होतें. कारण, यज्ञाकरितां आणिलेला पशु आतां केवळ यरुशलेम येथेंच मारावा लागत असल्यामुळें दूरदूर राहणाऱ्या लोकांची फार गैरसोय होत होती. अशा प्रकारच्या धार्मिक परिस्थितींत यज्ञविधींची आवश्यकता प्रतिपादन करणारा एक नवीन उपदेशकवर्ग उदयास आला. अशा रीतीनें उपरिनिर्दिष्ट उपाध्यायवर्ग व जेरेमिया या दोन पक्षांतील मतभेद लक्षांत घेतला, तरी जेरेमियाचें एकंदर समाजावर बरेंच वजन होतें. जोसिया राजास धर्मभोळेपणाचे कित्येक प्रकार व सुधारलेल्या संप्रदायांतील अनीतिमूलक आचार इत्यादि ज्या गोष्टी काढून टाकतां आल्या नाहींत, त्या गोष्टींवर देखील जेरेमियानें झणझणीत कोरडे उडवून वरील प्रकार बंद करण्याचा यशस्वी रीतीनें प्रयत्न केला. जोसियाच्या मृत्यूनंतर लोकांच्या मनानें पूर्वीच्या धर्मभोळेपणाच्या गोष्टींकडे पुनश्च धांव घेतली नाहीं याचें सर्व श्रेय जेरेमियासच दिलें पाहिजे.

कार्चेमिश येथील युद्धांत फारोच्या पराजयामुळें जूडाप्रांतांतील लोकांस ज्या कांहीं खोट्या आकांक्षा उत्पन्न झाल्या त्यामुळें जेरेमियाच्या कर्तृत्वशक्तीस पुन्हां वाव मिळाला. उत्तरेकडून येणाऱ्या शत्रूंच्या हस्तें जूडा प्रांताचा समूळ नाश होईल ही जेरेमियाची अपेक्षा अद्याप खरी झाली नव्हती. कारण, सिथियन लोकांनीं जूडा प्रांतावर स्वारी केल्याचा बिलकूल पुरावा नाहीं. परंतु सुप्रसिद्ध खाल्डियन लोकांच्या स्वारीच्या नवीन उत्पन्न झालेल्या भीतीमुळें वरील अपेक्षा खरी होण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. आपण दिलेला पूर्वीचा निर्णय चुकलेला नसून फक्त जरा पलीकडे गेला, हें दाखविण्याकरितां जेरेमियानें ख्रि. पू. ६२६ सालापासून तयार केलेलीं आपलीं भविष्यें आपल्या बरूच नामक शिष्यास लिहून काढण्यास सांगितलीं.

**जूडा प्रांतांतील राजसत्तेची परिसमाप्ति व यरुशलेम येथील देवालयाच्या नाशानंतरची धार्मिक स्थिति.**— ख्रि. पू. ६०० च्या सुमारास जूडा प्रांताचा राजा जेहुयाकिम यानें नेबुकाडरेसर या खाल्डियन बादशहाशीं केलेला तह मोडून बंड केल्यामुळें यरुशलेमवर खाल्डियन लोकांची स्वारी झाली, व तीमध्यें जेहुयाकिम हा बेपत्ता झाल्यामुळें त्याचा मुलगा जेहुयाचिन हा राज्यावर बसला. परंतु खाल्डियन लोकांनीं जेहुयाचिन याचा चुलता झेडेकिया यास गादीवर बसवून पूर्वीच्या घराण्यांतील सर्व मंडळींस कैद करून बाबिलोन येथें नेलें. खाल्डियन लोकांच्या सामर्थ्याचा झेडेकिया यास पुरा अंदाज नसल्यामुळें जेरेमिया नको नको म्हणत असतां

त्यानें बंडाचें निशाण उभारलें, व याचा परिणाम असा झाला. कीं, यरुशलेम येथील देवालयादिकांची जाळपोळ करण्यांत येऊन पूर्वींच्या स्वारींतून राहिलेले पुष्कळ धर्मोपदेशक व रहिवाशी यांस बाबिलोन येथें कैद करून नेण्यांत आलें. व झेडेकियाचे डोळे काढण्यांत आले. हा सर्व प्रकार ख्रि. पू. ५८६ च्या सुमारास झाला.

जुन्या कराराच्या रचनेचा स्थलदृष्ट्या व कालदृष्ट्या विचार केला असतां तो ग्रंथ उमरावशाहीच्या दृष्टिकोनास अनुसरून लिहिलेला आहे. या धर्मग्रंथावरून सकृद्दर्शनीं असा भास होतो कीं, जूडा प्रांतांतील अत्यंत गरीब लोकांखेरीज इतर सर्व प्रजा हद्दपार केली असावी. परंतु खरी वस्तुस्थिति अशी होती कीं, सर्व जूडा प्रांतास खाल्डियन लोकांपासून बराच त्रास झाला होता, तरी नेबुकाडरेसर याच्या रागाचा मुख्य भर, यरुशलेम नगरावर होता व खाल्डियन लोकांची स्वारी परतल्यावर बरीचशीं हद्दपार केलेलीं कुटुंबें पुन्हां जूडा प्रांतांत परत आलीं. प्रांतावरील सत्ता एका इस्रायल मनुष्याच्या हातांत देण्यांत आली व अहिकमचा मुलगा गेडॅलिया हा जूडा प्रांताचा मुख्य अधिकारी नेमण्यांत आला. पांच वर्षांनंतर गेडॅलियाचा कोणी तरी वध केल्यामुळें या वेळेपासून कोणी तरी बाबिलोनी अधिकारी जूडा प्रांतावर अम्मल चालवीत असे.

गेडॅलियाच्या वधामुळें खाल्डियन लोक चिडून जाऊन जूडा प्रांतावर स्वारी करतील या भीतीनें तेथील बरेचसे इस्रायल लोक ईजिप्तमध्यें पळून गेले. ईजिप्त हा देश बराच कालपर्यंत समेरिया, जूडा वगैरे प्रांतांतील संत्रस्त रहिवाशांचें माहेरघर बनलें असल्यामुळें त्या ठिकाणीं इस्रायल लोकांची बरीच वस्ती होऊन याह्वेदैवतोपासनाहि त्यांमध्यें जारीनें सुरू झाली होती.वरील रहिवाशांनीं ईजिप्तमध्यें आपणांवर जेरेमिया यास येण्यास भाग पाडलें. यानंतरच्या जेरेमियाच्या चरित्राबद्दल व मृत्यूबद्दल कांहीं माहिती उपलब्ध होत नाहीं. कदाचित् तो यरुशलेमला परत येऊन मृत्यु पावला असावा. या ठिकाणीं असें दिसून येतें कीं, शेवटपर्यंत जेरेमिया याच्या वांट्यास विघातक कामगिरी करण्याचेंच श्रेय आलें. आयुष्याच्या शेवटच्या कालापर्यंत जेरेमिया याच्या चित्तांत आपणास कांहीं तरी विधायक कामगिरी केली पाहिजे, ही जाणीव झाली नाहीं.

यरुशलेममधून तेथील उपाध्यायवर्गास हद्दपार केलें व मुख्य देवालय जाळलें, तरी यज्ञविधि करणें, अशक्य झालें नव्हतें. कारण, अहाझ यानें उभारलेलें पाषाणस्थण्डिल अद्यापि शिल्लकच होतें. तथापि, उपाध्यायवर्गाच्या अभावीं पुष्कळ संकटें उत्पन्न झालीं असावीत. कारण, धार्मिक व व्यावहारिक आयुष्यक्रमांतील भेद ओळखण्याची पात्रता सामान्य जनसमूहाच्या अंगीं क्वचितच होती. या बाबतींत जूडा प्रांतापेक्षां सॅमेरियाची स्थिति चांगली होती. कारण, सॅमेरिया प्रांतांत असुरियन बादशहाच्या खास परवानगीनें बेथेल येथील मठद्वार सर्व लोकांस खुलें करण्यांत आलें होतें. डेव्हिडच्या राजघराण्याच्या हकालपट्टीनें समेरिया व जूडा या दोन प्रांतांतील वैमनस्याचें कारणच नाहींसें झाल्यामुळें व दोन्ही प्रांतांची राजकीय परिस्थिति सारखीच झाल्यामुळें परस्परांच्या फायद्याकरितां या दोन्ही प्रांतांचें संगनमत होण्यास कांहींच हरकत नव्हती; व अशा प्रकारचें संगनमत कोणत्या तरी उपायांनीं केव्हां तरी घडवून आणण्यांत आलें, ही गोष्ट अनेक प्रकारच्या इतर पुराव्यावरून सिद्ध होणारी आहे. बेथेल येथील उपाध्यायवर्ग जेरेमिया याचा अनुयायी नसून तत्पूर्वीच्या दुसऱ्या एका परंपरेपैकीं होता. बेथेल आणि यरुशलेम हीं शहरें जवळ जवळ असल्यानें बेथेलच्या उपाध्यायवर्गानें यरुशलेम येथील इस्रायल लोकांच्या गरजा भागवावयाच्या, व याच्या उलट यरुशलेमचा मठ बेथेलच्या मठांतील उपासकांकरितां खुला ठेवावयाचा, असें परस्परानुमतीनें ठरविण्यांत आलें असावें. अर्थात या ऐक्याच्या सार्वत्रिक प्रसाराच्या मार्गामध्यें बरेच अडथळे होते. त्यांतल्या त्यांत यरुशलेम व सॅमेरिया या दोन्ही ठिकाणच्या लोकांस मान्य असलेल्या दोन निरनिराळ्या मूळ धर्मग्रंथांचें एकीकरण कसें करावयाचें हा प्रश्न विशेष महत्त्वाचा होता. समेरियांतील बेथेल वगैरे ठिकाणच्या मठांतून एलोहिस्टीक लेख सामान्यपणें धर्मग्रंथ म्हणून मानिला जात असे व जूडा प्रांतामध्यें जेरेमियाच्या विरोधास न जुमानतां जव्हिस्टिक लेखास मान्यत्व प्राप्त झालें होतें.या दोन्ही जातींपैकीं कोणतीहि एक जात स्वतःस प्रमाणभुत असलेल्या धर्मग्रंथाचा त्याग करण्यास अनुकूल होईल ही अपेक्षा करणेंच चुकीचें होतें आणि ही महत्त्वाची अडचण नाहींशी करण्याकरितां एलोहिस्टिक व जव्हिस्टिक या दोन्ही धर्मलेखांचें एकत्रीकरण करण्यांत आलें.

कोणत्याहि प्रकारच्या राष्ट्रीय आकांक्षा बाळगणारांनां हें उघड दिसून येईल कीं, राष्ट्रांतील शक्तीचें केंद्रीकरण व ऐक्य उत्पन्न करणाऱ्या गोष्टी अत्यंत महत्त्वाच्या असतात. व या दृष्टीनें पाहतां जेव्हां बेथेल व यरुशलेम यांच्या सलोख्यापासून बरेच फायदे होण्याचा रंग दिसूं लागला. तेव्हां आपोआपच एक मठ करणाऱ्या कायद्याचें क्षेत्र विस्तृत होईल तर बरें, असें सामान्य जनसमूहास वाटूं लागलें असल्यास नवल मानण्याचें कारण नाहीं. परंतु या मार्गांतहि बऱ्याच अडचणी होत्या. यरुशलेमखेरीज इतर ठिकाणीं प्राणिवध करतां येणें शक्य नसल्यामुळें जूडा प्रांतांतील दूरदूरच्या प्रदेशांतील लोकांस आधींच गैरसोय झाली होती; मग उत्तर समेरिया किंवा गॅलीली या प्रदेशांतील दूरदूरच्या लोकांनीं ही गैरसोय सहन केली असती, अशी कल्पना करणेंच चुकीचें होईल.

शिवाय, सबंध प्रांतानें एकमतानें यरुशलेम येथील देवालय हीच एक प्राणियज्ञाची जागा म्हणून मान्य केली असती अशी जरी कल्पना केली तरी इतर ठिकाणच्या उपाध्याय

वर्गाची कोणत्या तऱ्हेनें सोय लावावयाची हा प्रश्न पुढें होता. तसेंच, या समाजांत खुनाचा सूड घेण्याची चाल असल्यामुळें ज्या ठिकाणीं एखाद्या उपद्रवी नरहिंसकास आश्रय मिळत असेल ते सर्व मठ मोडून टाकणें या गोष्टीबद्दल तेथील शासनसत्तेस बरेंच अवघड गेलें असावें. दुसरी एक अडचण अशी होती कीं, जूडा प्रांतामध्यें थोड्याबहुत प्रमाणांत या सुधारणाकल्पनांची वाढ अगोदरच झाली असल्यामुळें समेरिया व जूडा या प्रांतांत सारख्याच दर्जाच्या सुधारणा लागू करणें, फायद्याचें झालें नसतें. अशा रीतीनें मागल्या चुकांनीं मिळालेला धडा घेऊन ख्रि. पू. सहाव्या शतकांतील सुधारणावाद्यांनीं उदार धोरण स्वीकारलें. प्रथम जन्मलेल्या अर्भकांची यज्ञांत हिंसा करण्याच्या पद्धतीची पूर्ण बंदी करण्यांत आली, व ग्राम्यपशुहिंसेच्या बाबतींतहि मारलेल्या पशूंच्या अंगांतील चरबी व रक्त हीं अत्यंत पवित्र मानलीं जाऊन चरबीची आहुति देण्यांत येत असे. या पदार्थांपैकीं एकहि खाण्याची परवानगी न ठेवतां फक्त त्या पशूचें रक्त तेवढें जमीनीवर शिंपडण्याची परवानगी देण्यांत आली. अर्थात, या एका दुरुस्तीनें एक मठाचा कायदा चोहोंकडे लागू करण्यामध्यें असलेली मोठी अडचण दूर झाली. या सुधारणावाद्यांचें इतर बाबींतहि उदार धोरण होतें.

इतर ठिकाणच्या उपाध्यायवर्गाची एकाच मुख्य मठामध्यें तरतूद करावयाची, हेंच जोसियाचें धोरण जें मध्यंतरीं झाडोकच्या मुलांनीं बंद केलें होतें, तें पुनश्च स्वीकारण्यांत आलें, व कांहीं मठांमध्यें पशुयज्ञ करण्याची जरी बंदी करण्यांत आली, तरी त्या मठांचे आश्रितांनां राहाण्याचे हक्क कायम राखण्यांत आले. या व आणखी दुसऱ्या कांहीं सुधारणांचें दृश्य स्वरूप म्हटलें म्हणजे डयूटेरोनॉमी हा ग्रंथ असून यांतील मुख्य भाग कायद्याचा होय. या कायद्याच्या भागांतील पहिलें कलम यज्ञकृत्यें एकाच ठिकाणीं करण्यांत यावीत, याबद्दलचें आहे. या कायद्याच्या भागांत यज्ञकृत्यांची आवश्यकता सांगितली असल्यामुळें जरी यांत व जेरेमियाच्या शिकवणुकींत बरेंच अंतर आहे, तरी जेरेमियाच्या यज्ञसंस्थेस उच्चस्वरूप देण्याचा उद्देश यामुळें बराच सफल झाला. पूर्वकाळीं मांसाशन हाच यज्ञक्रियेचा प्रधान उद्देश असल्यामुळें जेरेमियानें यज्ञक्रियांवर झणझणीत टीका केली. परंतु आतां इच्छा होईल त्याला घरीं मांसाशन करणें शक्य असल्यामुळें यज्ञसंस्था तरी या किळसवाण्या प्रकारापासून अलिप्त ठेवणें शक्य झालें. यज्ञ वारंवार न झाल्यामुळें लोकांस कदाचित धर्माची आठवण होणार नाहीं, ही एक भीति असतेच, परंतु या भीतीचें निवारण करण्याकरितां डयुटेरोनोमिक धर्मसुधारकांनीं इस्रायल लोकांचा सामान्य कायदा पाळण्याची आवश्यकता उपदेशिली होती. तसेंच यज्ञसंस्थेच्या आवश्यकतेवर उभारणी केलेल्या प्राचीन दहा धर्माज्ञा त्यावेळीं इस्रायल लोकांनां मान्य होणें शक्य नसल्यामूळें ज्यांमध्यें न्याय, दया व सत्य यांचें महत्त्व प्रस्थापित केलें होतें अशा नवीन दहा धर्माज्ञा बनविण्यांत आल्या. यांमध्यें मूळांपैकीं पहिली व सॅबॅथ हा सण पाळण्याची अशा दोन आज्ञा पूर्वीच्या कायम ठेविल्या असून शिवाय मूर्तिपूजेचा निषेध व जेरेमिया इत्यादि धर्मोपदेशकांनीं केलेल्या समाजनीतिमूलक शिकवणुकी यास धरून बाकीच्या आज्ञा तयार केल्या होत्या. शेवटीं शेकेम येथील मठ तेवढाच वरील कायदा लागू केल्यावांचून राहिला होता. हा मठ जोसेफ याचें दफनस्थान समजण्यांत येत असे व तेथील स्थण्डिलाजवळील कांहीं शिलाखंड जोशिआ यानें स्थापन केले असल्याबद्दल समज होता. वरील एक मठाचा कायदा लागू करून शेकेम येथील मठाचें महत्त्वच कमी होणार होतें. आणि कायदा जर न लागू करावा तर इस्रालय राष्ट्राच्याऐक्यास पूर्णत्व प्राप्त झालें नसतें. ही दुहेरी अडचण टाळण्याकरितां अशी तडजोड करण्यांत आली कीं, शेकेम येथील मठाला नवीन कायदा लागू करण्यांत यावा. परंतु पूर्वीचें यज्ञस्थंडिल कोणत्याहि प्रकारच्या यज्ञक्रियेकरितां उपयोगांत न आणतां तसेंच ठेवण्यांत यावें. या वेळीं यज्ञिय पशुहिंसेच्या उपयोगी पडत असलेल्या शिलाखंडावरील सर्व घाण स्वच्छ करण्यांत येऊन त्यावर चुन्याचें लुकण लावण्यांत येऊन नवीन कायद्याचीं कलमें कोरण्यांत आलीं. राष्ट्रीय ऐक्याची भावना उद्दीपित करण्याच्या कामीं शेकेम येथील जत्रांचा बराच फायदा घेण्यांत आला. अशारीतीनें सर्व ठिकाणच्या इस्रालय लोकांनां एकच कायदा लागू करण्यांत आल्यामुळें इस्रालय लोकांतील राष्ट्रीय ऐक्याची जाणीव पुष्कळच वाढली.

**बा बि लो न म ध्यें ह द्द पा र के ले ल्या लो कां म ध्यें झा ले ला सं प्र दा य वि का स.**—याच सुमारास बाबिलोनमध्यें वस्ती करून राहिलेल्या यहुदी जातीच्या लोकांमध्यें एका अत्यंत महत्त्वाच्या बाजूनें संप्रदायाचा विकास होत होता. ईजिप्तमध्यें राहिलेल्या ज्यू लोकांप्रमाणें यांनींहि देवतेच्या उपासनेकरितां एक दोन देवालयें बांधून आपला संप्रदाय संरक्षण केला असावा. परंतु ईजिप्तमधील यहुदी रहिवाशांनीं स्वखुषीनें आपला देश सोडला होता व बाबिलोन मधील लोकांची तशी स्थिति नसल्यामुळें त्यांमध्यें राष्ट्रीयत्वाचें वारें फार जोरानें खेळत होतें. या लोकांच्या धार्मिक कल्पनांना सुव्यवस्थित स्वरूप देण्याची मोठी महत्त्वाची कामगिरी ख्रि. पू. ५९७ त जेहुचिन याजबरोबर हद्दपार होऊन गेलेल्या झेडोकाइट उपाध्यायांनीं केली. जोशियाच्या सुधारणेमुळें उपाध्याय वर्गास यरुशलेम येथील मठांत महत्त्वाचा उच्च दर्जा प्राप्त झाला असल्यामुळें बाबिलोन देशांत मठ बांधण्याबद्दलच्या मागणीचा उपाध्याय वर्गानें केव्हांहि इनकारकच केला असता. यांपैकीं इझिकेल या धर्मोपदेशकानें आपल्या हद्दपारीनंतर चार वर्षांनीं स्वतःस देवाचा प्रेषित असें म्हणवून घेऊन, सुमारें बावीस

वर्षेपर्यंत आपल्या देशबांधवांमध्यें बरीच धर्मसुधारणा घडवून आणिली. इतर मोठ्या धर्मोपदेशकांप्रमाणें इझिकेल याची देखील अशी पक्की समजूत झाली होती कीं, इस्रायल लोकांस होत असलेला त्रास हीं पूर्वीच्या पापाचीं फळें होत. उदाहरणार्थ बापाच्या बायकांचा मुलानें पत्नीत्वानें स्वीकार करणें, त्याचप्रमाणें पित्यास दुसऱ्या स्त्रीपासून झालेल्या मुलीशीं म्हणजे आपल्या सावत्र बहिणीशीं विवाह करणें, इत्यादि गोष्टी त्यानें अक्षम्य मानल्या आहेत. त्याच्या मतें इस्रायल लोकांचें मुख्य पाप म्हणजे मूर्तिपूजा हें होय. इझिकेल यानें जरेमियाप्रमाणें यज्ञसंस्थेवर टीका केली नाहीं. कारण त्याचें असे ठाम मत होतें कीं,यज्ञसंस्था ही दैवीस्वरूपाची आहे.

अशा प्रकारच्या परिस्थितिमध्यें इझिकेल यानें एक प्रकारचा व्यक्तिवाद स्थापन केला ही गोष्ट स्वाभाविक आहे. या हद्दपार झालेल्या लोकांपैकीं कांहीं बाबिलोनमधील परकीय संप्रदायामध्यें गुरफटून गेले असावेत ही गोष्ट दिसून येते, व अर्थातच इतर लोकांपैकीं प्रत्येकाच्या मनावर याहवे देवतेच्या अचाट सामर्थ्याचें, अनुपमेय कृपेचें महत्त्व ठसलेलें रहावें म्हणून इझिकेलनें प्रत्येक जीवाचा याहवे देवतेशीं अत्यंत जिव्हाळ्याचा असा निकट संबंध असतो हें मत स्थापन करण्याचा अट्टाहासपूर्वक प्रयत्न केला.इझिकेलची अत्यंत महत्त्वाची कामगिरी म्हटली म्हणजे परकीय संस्कृतीच्या हल्ल्यापासून स्वतःचें संरक्षण करण्याकरितां इस्रायल संप्रदायामध्यें त्यानें उत्पन्न केलेली शक्ति होय. झाडोकाइट यांसच यरुशलेम येथील उपाध्येपणाचा हक्क आहे अशी इझिकेलची पूर्ण खात्री असल्यामुळें, त्यानें एकंदर इस्रायल लोकांच्या देवालयांतील याज्ञिकीचा संग्रह करण्यास आरंभ केला व नवीन काळास अनुरूप असे त्यांमध्यें पुष्कळ फेरफार केले.

सायरसनें मिळविलेले विजय व बाबिलोनवर येऊं पहात असलेली परकीय सत्ता या गोष्टींमुळें तेथील हद्दपार केलेल्या इस्रायल लोकांमध्यें इतकेंच नव्हे तर पॅलेस्टाइनमधील त्यांच्या देशबांधवामध्येंहि विलक्षण अस्वास्थ्य उत्पन्न झालें. या प्रकारच्या परिस्थितीमुळें या काळांतील एका धर्मोपदेशकाच्या सुप्रसिद्ध वक्तृत्वास अवसर मिळाला. या धर्मोपदेशकाच्या प्रवचनांपैकीं फार थोडा भाग सांप्रत उपलब्ध आहे, व त्यावरून खाल्डियन सत्तेच्या लौकरच होणाऱ्या ऱ्हासामुळें इस्रायल लोकांची सुटका होणार इत्यादि गोष्टी दूरदर्शीपणामुळें त्यास अवगत झाल्या असाव्यात. अर्थात या अकांक्षा पुढें पूर्ण झाल्या किंवा नाहीं, व बाबिलोनियांतील यहुदी लोकांस स्वदेशीं परत जाण्यास परवानगी मिळाली किंवा नाहीं या गोष्टीस 'किंग्ज क्रानिकल' याच्या विधानाखेरीज दुसरा विश्वासार्ह असा पुरावाच नसल्यामुळें त्यास कांहींच किंमत देतां येत नाहीं. सायरसचा "सिलेंडर शिलालेख" 'यावरूनहि बाबिलोनमधील सर्व इस्रायल लोकांस स्वदेशीं जाण्यास परवानगी मिळाली असें सिद्ध होत नाहीं. मात्र सायरसच्या कारकीर्दीत जूडा प्रांत हा शेस बाझर नांवाच्या बाबिलोनी अधिकाऱ्याच्या हाताखालीं होता असें दिसतें.

यानंतर डरायसच्या कारकीर्दीतील दुसऱ्याच वर्षी जूडा प्रांतांतील पूर्वीच्या राजघराण्यांतील एका झेरुबाबेल नांवाच्या गृहस्थाच्या आधिपत्याखालीं जूडा प्रांत देण्यांत आला. कारण त्या प्रांतांतील रहिवाश्यांनीं सलोख्यानें रहावें अशी डरायस याची इच्छा होती. झेरुबाबेलच्या वेळीं बऱ्याच लोकांना बाबिलोनमधून स्वदेशी परत येण्यास सवलत मिळाली असावी ही गोष्ट खरी दिसत नाहीं. परंतु त्याच्या सभोंवती कांहीं झाडोकाइट उपाध्याय वर्गापैकीं लोक गोळा झाले होते यांत शंका नाहीं.

यरुशलेममध्यें इस्रायल संप्रदायास ऊर्जितावस्था आणण्याकरितां कोणत्याच प्रकारचे प्रयत्न त्यावेळीं झाले नव्हते. त्या ठिकाणच्या स्थण्डिलांवर अद्यापि यज्ञक्रिया चालू होत्या. परंतु देवालयाचा अद्याप जीर्णोद्धार झाला नसून त्याचा मोडकळीस आलेला भागहि स्वच्छ करण्यांत आला नव्हता. यरुशलेम भोंवतालचा तट अद्यापि पडीक स्थितींतच होता, व तेथील रहिवाशी हे सामान्यतः दारिद्र्यानें गांजलेले होते. तथापि, हें दारिद्र्य सार्वत्रिक नसून यापैकीं कांहीं लोकांचीं निवासस्थानें वाजवीपेक्षां जास्त ऐषआरामानें युक्त अशीं बांधिलेलीं होतीं. याच सुमारास झेरुबाबेल याच्या झालेल्या नेमणुकीमुळें लोकांमध्यें यरुशलेम येथील देवालय पुन्हां बांधण्याबद्दल जी खळबळ सुरू झाली, तिचा फायदा घेऊन हग्गइ या धर्मोपदेशकानें लोकांस इतका परिणामकारक उपदेश केला कीं, त्या उत्साहभरांत सर्व जागा साफसूफ होऊन एक महिन्याच्या अवधींतच पायाचा दगड बसविण्यापर्यंत पाळी आली. पर्शियन साम्राज्य मोडण्याबद्दलचें हग्गईचें भविष्य खरें ठरण्याचें चिन्ह दिसेना अशा रीतीनें वाढलेल्या लोकांच्या उत्साहास कमीपणा येऊं नये म्हणून झकारिआ यानें अनेक रूपकपूर्ण भविष्यें लिहून ठेविलीं. देवालयाच्या बांधणीचें काम जसजसें उत्तम तऱ्हेनें होऊं लागलें तसतशी झेरुबाबेलच्या मनांत यरुशलेमचा तट पुन्हा बांधून काढण्याची कल्पना जास्त दृढ होऊं लागली. परंतु या कल्पनेमुळें स्वाभाविकपणें सॅमॅरिटन लोकांच्या मनांत असा संशय येऊं लागला कीं झेरुबाबेल हा दुसरा सालोमन बनण्याची महत्त्वाकांक्षा बाळगीत असावा. अशा परिस्थितींत यरुशलेम येथें कायम वस्ती करून राहिलेल्या इस्रायल लोकांमध्यें व पूर्वेकडून आलेल्या त्यांच्या बांधवामध्यें खटका उडणें अपरिहार्य होतें. या वेळीं जेहोझाडाकचा मुलगा जोसिया हा यरुशलेम येथील मुख्य धर्माधिकारी होता. जोसिया हा पूर्वी बेथेल येथील मठांत काम करणाऱ्या आरोनाइट उपाध्याय वर्गापैकीं असल्यामुळें झेरुबाबेल याच्याबरोबर असलेल्या झाडोकाइट उपाध्यायवर्गास जोसिया हा अत्यंत कमी दर्जाचा आहे असें वाटलें;

तथापि जोशुआ यास आपली बाजू उचलून धरण्यास झकारिआ नांवाच्या उपर्युक्त राजाचें पुष्कळ साहाय्य झालें. कारण झकारिआ यानें असें जाहीर केलें कीं, जोंपर्यंत जोशुआ याह्वे देवतेचा कायदा पाळीत आहे तोंपर्यंत देवालयाचा सर्वाधिकारी तोच असावा. अर्थात् याबरोबर झकारियानें असेंहि कबूल केलें कीं, ड्युटेरोनोमिक कायद्यांतील नियमांप्रमाणें झाडोकाइट उपाध्यायांनां तेथील उपाध्यायकी करण्याची परवानगी असावी; परंतु देवालयांतील मुख्य धर्माधिकाऱ्याची जागा आरोनाइट उपाध्यायास देण्याचा असा परिणाम व्हावयाचा कीं, ज्या झाडोकाइट धर्मोपदेशकांस लोकांची उपाध्यायगिरी करण्याची इच्छा असेल, त्यांनां आरोनाइट वर्गांत आपलीं नांवें नोंदलींच पाहिजेत. ही बातमी जेव्हां बाबिलोनमधील हद्दपार केलेल्या झेरुबाबेलच्या अनुयायी यहुदी लोकांनां कळली, तेव्हां तेथील धर्मोपदेशकांनांहि ही गोष्ट स्वीकारावी लागली व झाडोकाइट वर्गाचा आरोनाइट वर्गाशीं संयोग करणें भाग पडलें असावें.

**समेरिया व जूडा प्रांतांतील मत्सर व यरुशलेम भोंवताल च्या तटाची पुनश्च बांधणी.**— झकारिआ यानें केलेल्या जोशुआच्या तरफदारीचे परिणाम बरेच महत्त्वाचे झाले समेरिआ व जूडा या दोन प्रांतांमध्यें घडून आलेलें धर्मैक्य नवें असल्यामुळें या वेळीं बाबिलोनी पक्षाचें वर्चस्व झालें असतें, तर या दोन्ही प्रांतांचें ऐक्य नाहींसें होऊन समेरियांतील इस्रायल संप्रदाय व राष्ट्रीय जीवन यांचा अगदीं निराळ्या तऱ्हेनें विकास झाला असता. तथापि, या मतभेदाचें वारें सामान्य लोकांस लागलें नव्हतें. या दोन प्रांतांतील स्पर्धेचें स्वरूप धार्मिक म्हणण्यापेक्षां राजकीय होतें व त्यातच राजसत्ता पुन्हां स्थापन करावयाची असल्यास सॉल व डेव्हिड या दोन घराण्यांतील, गादीच्या वारस हक्काबद्दल असलेली तेढ होतीच.

प्राचीन आख्यायिकांचा संग्रह करण्याचें कार्य अद्यापपर्यंत सुरूच होतें. पॅलेस्टाइनच्या विजयाबद्दल निरनिराळ्या जातींमध्यें प्रचलित असलेल्या दंतकथांचें ऐक्यवर्धनाच्या उद्देशानें पुनःसंस्करण करण्यांत आलें होतें. यावेळीं या प्रांतामध्यें परधर्मीय लोकांचे लोटचे लोट येणें चालू असल्यामुळें व याह्वे देवतेच्या उपासनासंप्रदायाची अवहेलना होत असल्यामुळें एक निराळाच धर्मोपदेशक वर्ग पुढें आला. या वर्गानें प्राचीन आख्यायिका आधाराला घेऊन मूर्तिपूजेचा निषेध वगैरे गोष्टींसबंधीं लोकांस उपदेश केला. झकारिआ यानें ज्या लोकांचीं मनें यरुशलेमभोंवतीं तट बांधण्यापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला होता, त्याच लोकांच्या मनांतील वरील कल्पना अद्यापि नाहींशा झाल्या नव्हत्या; व त्याप्रमाणें ख्रि. पू. ५१५ च्या सुमारास यरुशलेमचा तट बांधण्याचें काम सुरू झालें असावें. या कामामध्यें पर्शियन प्रांताधिकाऱ्यांनीं बरेच वेळां हरकती घेऊन काम बंद पाडण्याचा यत्न केला. ख्रि. पू. ४५५ च्या सुमारास बहुतेक तट बांधण्याचें काम पूर्ण झालें. परंतु या वेळीं अर्टाक्सर्क्सिस या पर्शियन बादशहाच्या परवानगीनें समारिटन, अॅमोनाइट, मोबाइट वगैरे मिश्र लोकांचें सैन्य उभारण्यांत येऊन या तटाची पुष्कळ नासधूस, व जाळपोळ करण्यांत आली, व बरेच लोक गिरफदार करण्यांत आले. अशा रीतीनें एका शतकाच्या अवधींत उत्तरेकडून जूडा प्रांतामध्यें समाविष्ट झालेल्या एडोमाइट लोकांस या विश्वासघाताच्या कृत्यामध्यें भाग घेण्यास लावलें असण्याचा पुष्कळ संभव आहे.

लवकरच यरुशलेमवर स्वाऱ्या करणाऱ्या लोकांवर त्यांनीं स्वतः केलेलीं कृत्यें शेकलीं. ख्रि. पु. ४४८ मध्यें मेगॅबिझोस या सीरियन सत्रपानें बंड केलें व त्यामध्यें समेरिया प्रांत समाविष्ट झालेला दिसतो. अर्थातच यावेळीं यहुदी लोक अगदीं दूर राहिले; व या योगानें त्यांच्या राजनिष्ठेबद्दल खात्री पटल्यामुळेंच कीं काय, ख्रि. पू. ४४५ च्या एप्रिलमध्यें नेहेमिया नांवाच्या एका अधिकाऱ्यानें यरुशलेम शहराची पाहणी करण्याबद्दल व त्यासभोंवतीं तट बांधण्याबद्दल परवानगी मिळविली. नेहेमिया यानें यरुशलेम येथें आल्यावर पूर्वीच्या तटाची पाहणी करून नागरिकांची एक सभा बोलावली. या सभेंत नेहेमियाची सूचना मान्य होऊन बावन दिवसांमध्यें तटाच्या दुरुस्तीचें काम पूर्ण करण्यांत आलें. या एका गोष्टीखेरीज धर्मसुधारणेचें फार थोडें कार्य नेहेमियास करितां आलें.

कारण, पूर्वेकडील इस्रायल लोकांस मान्य असलेलीं नेहेमियाचीं धार्मिक ध्येयें पॅलेस्टाइनमधील यहुदी बांधवांस मान्य नसल्यामुळें नेहेमियास असें समजून आलें कीं, आपणास ज्या सुधारणा करावयाच्या त्यांची अंमलबजावणी बाबिलोनमधील आपल्याच मताचे कांहीं लोक आणल्याशिवाय नीट करितां येणार नाहीं. नेहेमिया हा बाबिलोनमध्यें परत गेल्यावर त्यानें एझ्रा याच्या नेतृत्वाखालीं एक यहुदी लोकांचें मंडळ पॅलेस्टाइन प्रांतांत आणण्याकरितां अर्टाक्सर्क्सीस बादशहाची परवानगी मिळविली

**एझ्राचें कार्य व समारिटन लोकांशीं फूट.**— वरील मंडळ यरुशलेममध्यें आल्याबरोबर यहुदी लोकांस इतरांपासून वेगळे करण्याबद्दल व मिश्रविवाहास आळा घालण्याबद्दल बरेच प्रयत्न करण्यांत आले. परंतु त्यापासून कोणत्याहि प्रकारचा फायदा न होतां, उलट तीव्र विरोध मात्र उत्पन्न झाला. यरुशलेममध्यें एझ्राच्या अपेक्षित धर्मसुधारणेस कोणीच पाठिंबा देणारा नसल्यामुळें त्याला कांहींच करतां येईना. सरतेशेवटीं एझ्रानें बाबिलोनमधील झाडोकाइट वर्गाचा कायदा यरुशलेममध्यें प्रसिद्ध करण्याचा निश्चय केला. याकरितां त्यानें पूर्वेकडे प्रयाण केलें. नेहेमिया व एझ्रा यांनीं प्रसिद्ध केलेल्या कायद्यामध्यें जेव्हिस्टिक लेख, एलोहिस्टिक लेख, ड्युटेरोनोमी, प्रीस्टली

वर्षेपर्यंत आपल्या देशबांधवांमध्यें बरीच धर्मसुधारणा घडवून आणिली. इतर मोठ्या धर्मोपदेशकांप्रमाणें इझिकेल याची देखील अशी पक्की समजूत झाली होती कीं, इस्रायल लोकांस होत असलेला त्रास हीं पूर्वीच्या पापाचीं फळें होत. उदाहरणार्थ बापाच्या बायकांचा मुलानें पत्नीत्वानें स्वीकार करणें, त्याचप्रमाणें पित्यास दुसऱ्या स्त्रीपासून झालेल्या मुलीशीं म्हणजे आपल्या सावत्र बहिणीशीं विवाह करणें, इत्यादि गोष्टी त्यानें अक्षम्य मानल्या आहेत. त्याच्या मतें इस्रायल लोकांचें मुख्य पाप म्हणजे मूर्तिपूजा हें होय. इझिकेल यानें जरेमियाप्रमाणें यज्ञसंस्थेवर टीका केली नाहीं. कारण त्याचें असें ठाम मत होतें कीं,यज्ञसंस्था ही दैवीस्वरूपाची आहे.

अशा प्रकारच्या परिस्थितींमध्यें इझिकेल यानें एक प्रकारचा व्यक्तिवाद स्थापन केला ही गोष्ट स्वाभाविक आहे. त्या हद्दपार झालेल्या लोकांपैकीं कांहीं बाबिलोनमधील परकीय संप्रदायामध्यें गुरफटून गेले असावेत ही गोष्ट दिसून येते, व अर्थातच इतर लोकांपैकीं प्रत्येकाच्या मनावर याह्वे देवतेच्या अचाट सामर्थ्याचें, अनुपमेय कृपेचें महत्त्व ठसलेलें रहावें म्हणून इझिकेलनें प्रत्येक जीवाचा याह्वे देवतेशीं अत्यंत जिव्हाळ्याचा असा निकट संबंध असतो हें मत स्थापन करण्याचा अट्टाहासपूर्वक प्रयत्न केला.इझिकेलची अत्यंत महत्त्वाची कामगिरी म्हटली म्हणजे परकीय संस्कृतीच्या हल्ल्यापासून स्वतःचें संरक्षण करण्याकरितां इस्रायल संप्रदायामध्यें त्यानें उत्पन्न केलेली शक्ति होय. झाडोकाइट यांसच यरुशलेम येथील उपाध्येपणाचा हक्क आहे अशी इझिकेलची पूर्ण खात्री असल्यामुळें, त्यानें एकंदर इस्रायल लोकांच्या देवालयांतील याज्ञिकीचा संग्रह करण्यास आरंभ केला व नवीन काळास अनुरूप असे त्यांमध्यें पुष्कळ फेरफार केले.

सायरसनें मिळविलेले विजय व बाबिलोनवर येऊं पहात असलेली परकीय सत्ता या गोष्टींमुळें तेथील हद्दपार केलेल्या इस्रायल लोकांमध्यें इतकेंच नव्हे तर पॅलेस्टाइनमधील त्यांच्या देशबांधवामध्येंहि विलक्षण अस्वास्थ्य उत्पन्न झालें. या प्रकारच्या परिस्थितीमुळें या काळांतील एका धर्मोपदेशकाच्या सुप्रसिद्ध वक्तृत्वास अवसर मिळाला. या धर्मोपदेशकाच्या प्रवचनांपैकीं फार थोडा भाग सांप्रत उपलब्ध आहे, व त्यावरून खाल्डियन सत्तेच्या लौकरच होणाऱ्या ऱ्हासामुळें इस्रायल लोकांची सुटका होणार इत्यादि गोष्टी दूरदर्शीपणामुळें त्यास अवगत झाल्या असाव्यात. अर्थात या अकांक्षा पुढें पूर्ण झाल्या किंवा नाहीं, व बाबिलोनियांतील यहुदी लोकांस स्वदेशी परत जाण्यास परवानगी मिळाली किंवा नाहीं या गोष्टीस 'क्रिग्ज क्रानिकल्र' याच्या विधानाखेरीज दुसरा विश्वासार्ह असा पुरावाच नसल्यामुळें त्यास कांहींच किंमत देतां येत नाहीं. सायरसचा " सिलेंडर शिलालेख' 'याजवरूनहि बाबिलोनमधील सर्व इस्रायल लोकांस स्वदेशीं जाण्यास परवानगी मिळाली असें सिद्ध होत नाहीं. मात्र सायरसच्या कारकीर्दीत जूडा प्रांत हा शेस बाझर नांवाच्या बाबिलोनी अधिकाऱ्याच्या हाताखालीं होता असें दिसतें.

यानंतर डरायसच्या कारकीर्दीतील दुसऱ्याच वर्षी जूडा प्रांतांतील पूर्वीच्या राजघराण्यांतील एका झेरूबाबेल नांवाच्या गृहस्थाच्या आधिपत्याखालीं जूडा प्रांत देण्यांत आला. कारण त्या प्रांतांतील रहिवाश्यांनीं सलोख्यानें रहावें अशी डरायस याची इच्छा होती. झेरूबाबेलच्या वेळीं बऱ्याच लोकांना बाबिलोनमधून स्वदेशी परत येण्यास सवलत मिळाली असावी ही गोष्ट खरी दिसत नाहीं. परंतु त्याच्या सभोंवती कांहीं झाडोकाइट उपाध्याय वर्गापैकीं लोक गोळा झाले होते यांत शंका नाहीं.

यरुशलेममध्यें इस्रायल संप्रदायास ऊर्जितावस्था आणण्याकरितां कोणत्याच प्रकारचे प्रयत्न त्यावेळीं झाले नव्हते. त्या ठिकाणच्या स्थण्डिलांवर अद्यापि यज्ञक्रिया चालू होत्या. परंतु देवालयाचा अद्याप जीर्णोद्धार झाला नसून त्याचा मोडकळीस आलेला भागहि स्वच्छ करण्यांत आला नव्हता. यरूशलेम भोंवतालचा तट अद्यापि पडीक स्थितींतच होता, व तेथील रहिवाशी हे सामान्यतः दारिद्र्यानें गांजलेले होते. तथापि, हें दारिद्र्य सार्वत्रिक नसून यांपैकीं कांहीं लोकांचीं निवासस्थानें वाजवीपेक्षां जास्त ऐषआरामानें युक्त अशीं बांधिलेलीं होतीं. याच सुमारास झेरुबाबेल याच्या झालेल्या नेमणुकीमुळें लोकांमध्यें यरुशलेम येथील देवालय पुन्हां बांधण्याबद्दल जी खळबळ सुरू झाली, तिचा फायदा घेऊन हग्गई या धर्मोदेशकानें लोकांस इतका परिणामकारक उपदेश केला कीं, त्या उत्साहभरांत सर्व जागा साफसूफ होऊन एक महिन्याच्या अवधींतच पायाचा दगड बसविण्यापर्यंत पाळी आली. पर्शियन साम्राज्य मोडण्याबद्दलचें हग्गईचें भविष्य खरें ठरण्याचें चिन्ह दिसेना. अशा रीतीनें वाढलेल्या लोकांच्या उत्साहास कमीपणा येऊं नये म्हणून झकारिआ यानें अनेक रूपकपूर्ण भविष्यें लिहून ठेविलीं. देवालयाच्या बांधणीचें काम जसजसें उत्तम तऱ्हेनें होऊं लागलें तसतशी झेरुबाबेलच्या मनांत यरुशलेमचा तट पुन्हा बांधून काढण्याची कल्पना जास्त दृढ होऊं लागली. परंतु या कल्पनेमुळें स्वाभाविकपणें सॅमॅरिटन लोकांच्या मनांत असा संशय येऊं लागला कीं झेरुबाबेल हा दुसरा सालोमन बनण्याची महत्त्वाकांक्षा बाळगीत असावा. अशा परिस्थितींत यरुशलेम येथें कायम वस्ती करून राहिलेल्या इस्रायल लोकांमध्यें व पूर्वेकडून आलेल्या त्यांच्या बांधवामध्यें खटका उडणें अपरिहार्य होतें. या वेळीं जेहोझाडाकचा मुलगा जोसिया हा यरुशलेम येथील मुख्य धर्माधिकारी होता. जोसिया हा पूर्वी बेथेल येथील मठांत काम करणाऱ्या आरोनाइट उपाध्याय वर्गापैकीं असल्यामुळें झेरुबाबेल याच्याबरोबर असलेल्या झाडोकाइट उपाध्यायवर्गास जोसिया हा अत्यंत कमी दर्जाचा आहे असें वाटलें;

तथापि जोशुआ यास आपली बाजू उचलून धरण्यास झकारिआ नांवाच्या उपर्युक्त राजाचें पुष्कळ साहाय्य झालें. कारण झकारिआ यानें असें जाहीर केलें कीं, जोंपर्यंत जोशुआ याह्वे देवतेचा कायदा पाळीत आहे तोंपर्यंत देवालयाचा सर्वाधिकारी तोच असावा. अर्थात् याबरोबर झकारियानें असेंहि कबूल केलें कीं, ड्युटेरोनोमिक कायद्यांतील नियमांप्रमाणें झाडोकाइट उपाध्यायांनां तेथील उपाध्यायकी करण्याची परवानगी असावी; परंतु देवालयांतील मुख्य धर्माधिकाऱ्याची जागा आरोनाइट उपाध्यायास देण्याचा असा परिणाम व्हावयाचा कीं, ज्या झाडोकाइट धर्मोपदेशकांस लोकांची उपाध्यायगिरी करण्याची इच्छा असेल, त्यांनां आरोनाइट वर्गांत आपलीं नांवें नोंदलींच पाहिजेत. ही बातमी जेव्हां बाबिलोनमधील हद्दपार केलेल्या झेरुबाबेलच्या अनुयायी यहुदी लोकांनां कळली, तेव्हां तेथील धर्मोपदेशकांनांहि ही गोष्ट स्वीकारावी लागली व झाडोकाइट वर्गाचा आरोनाइट वर्गाशीं संयोग करणें भाग पडलें असावें.

स मे रि या व जू डा प्रां तां ती ल म त्स र व य रु-श ले म भों व ता ल च्या त टा ची पु न श्च बां ध णी.— झकारिआ यानें केलेल्या जोशुआच्या तरफदारीचे परिणाम बरेच महत्त्वाचे झाले समेरिआ व जूडा या दोन प्रांतांमध्यें घडून आलेलें धर्मैक्य नवें असल्यामुळें या वेळीं बाबिलोनी पक्षाचें वर्चस्व झालें असतें, तर या दोन्ही प्रांतांचें ऐक्य नाहींसें होऊन समेरियांतील इस्रायल संप्रदाय व राष्ट्रीय जीवन यांचा अगदीं निराळ्या तऱ्हेनें विकास झाला असता. तथापि, या मतभेदाचें वारें सामान्य लोकांस लागलें नव्हतें. या दोन प्रांतांतील स्पर्धेचें स्वरूप धार्मिक म्हणण्यापेक्षां राजकीय होतें व त्यातच राजसत्ता पुन्हां स्थापन करावयाची असल्यास सॉल व डेव्हिड या दोन घराण्यांतील, गादीच्या वारस हक्काबद्दल असलेली तेढ होतीच.

प्राचीन आख्यायिकांचा संग्रह करण्याचें कार्य अद्यापपर्यंत सुरूच होतें. पॅलेस्टाइनच्या विजयाबद्दल निरनिराळ्या जातींमध्यें प्रचलित असलेल्या दंतकथांचें ऐक्यवर्धनाच्या उद्देशानें पुनःसंस्करण करण्यांत आलें होतें. यावेळीं या प्रांतामध्यें परधर्मीय लोकांचे लोटचे लोट येणें चालू असल्यामुळें व याह्वे देवतेच्या उपासनासंप्रदायाची अवहेलना होत असल्यामुळें एक निराळाच धर्मोपदेशक वर्ग पुढें आला. या वर्गानें प्राचीन आख्यायिका आधाराला घेऊन मूर्तिपूजेचा निषेध वगैरे गोष्टींसंबंधीं लोकांस उपदेश केला. झकारिआ यानें ज्या लोकांचीं मनें यरुशलेमभोंवतीं तट बांधण्यापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला होता, त्याच लोकांच्या मनांतील वरील कल्पना अद्यापि नाहींशा झाल्या नव्हत्या; व त्याप्रमाणें ख्रि. पू. ५१५ च्या सुमारास यरुशलेमचा तट बांधण्याचें काम सुरू झालें असावें. या कामामध्यें पर्शियन प्रांताधिकाऱ्यांनीं बरेच वेळां हरकती घेऊन काम बंद पाडण्याचा यत्न केला. ख्रि. पू. ४५५ च्या सुमारास बहुतेक तट बांधण्याचें काम पूर्ण झालें. परंतु या वेळीं अर्टाक्सर्क्सिस या पर्शियन बादशहाच्या परवानगीनें समारिटन, अॅमोनाइट, मोबाइट वगैरे मिश्र लोकांचें सैन्य उभारण्यांत येऊन या तटाची पुष्कळ नासधूस, व जाळपोळ करण्यांत आली, व बरेच लोक गिरफदार करण्यांत आले. अशा रीतीनें एका शतकाच्या अवधींत उत्तरेकडून जूडा प्रांतामध्यें समाविष्ट झालेल्या एडोमाइट लोकांस या विश्वासघाताच्या कृत्यामध्यें भाग घेण्यास लावलें असण्याचा पुष्कळ संभव आहे.

लवकरच यरुशलेमवर स्वाऱ्या करणाऱ्या लोकांवर त्यांनीं स्वतः केलेलीं कृत्यें शेकलीं. ख्रि. पु. ४४८ मध्यें मेगॅबिझोस या सीरियन सत्रपानें बंड केलें व त्यामध्यें समेरिया प्रांत समाविष्ट झालेला दिसतो. अर्थातच यावेळीं यहुदी लोक अगदीं दूर राहिले; व या योगानें त्यांच्या राजनिष्ठेबद्दल खात्री पटल्यामुळेंच कीं काय, ख्रि. पू. ४४५ च्या एप्रिलमध्यें नेहेमिया नांवाच्या एका अधिकाऱ्यानें यरुशलेम शहराची पाहणी करण्याबद्दल व त्यासभोंवतीं तट बांधण्याबद्दल परवानगी मिळविली. नेहेमिया यानें यरुशलेम येथें आल्यावर पूर्वीच्या तटाची पाहणी करून नागरिकांची एक सभा बोलावली. या सभेंत नेहेमियाची सूचना मान्य होऊन बावन दिवसांमध्यें तटाच्या दुरुस्तीचें काम पूर्ण करण्यांत आलें. या एका गोष्टीखेरीज धर्मसुधारणेचें फार थोडें कार्य नेहेमियास करितां आलें.

कारण, पूर्वेकडील इस्रायल लोकांस मान्य असलेलीं नेहेमियाचीं धार्मिक ध्येयें पॅलेस्टाइनमधील यहुदी बांधवांस मान्य नसल्यामुळें नेहेमियास असें समजून आलें कीं, आपणास ज्या सुधारणा करावयाच्या त्यांची अंमलबजावणी बाबिलोनमधील आपल्याच मताचे कांहीं लोक आणल्याशिवाय नीट करितां येणार नाहीं. नेहेमिया हा बाबिलोनमध्यें परत गेल्यावर त्यानें एझ्रा याच्या नेतृत्वाखालीं एक यहुदी लोकांचें मंडळ पॅलेस्टाइन प्रांतांत आणण्याकरितां अर्टाक्सर्क्सीस बादशहाची परवानगी मिळविली

ए झ्रा चें का र्य व स मा रि ट न लो कां शीं फू ट.— वरील मंडळ यरुशलेममध्यें आल्याबरोबर यहुदी लोकांस इतरांपासून वेगळे करण्याबद्दल व मिश्रविवाहास आळा घालण्याबद्दल बरेच प्रयत्न करण्यांत आले. परंतु त्यापासुन कोणत्याहि प्रकारचा फायदा न होतां, उलट तीव्र विरोध मात्र उत्पन्न झाला. यरुशलेममध्यें एझ्राच्या अपेक्षित धर्मसुधारणेस कोणीच पाठिंबा देणारा नसल्यामुळें त्याला कांहींच करतां येईना. सरतेशेवटीं एझ्रानें बाबिलोनमधील झाडोकाइट वर्गाचा कायदा यरुशलेममध्यें प्रसिद्ध करण्याचा निश्चय केला. याकरितां त्यानें पूर्वेकडे प्रयाण केलें. नेहेमिया व एझ्रा यांनीं प्रसिद्ध केलेल्या कायद्यामध्यें जेव्हिस्टिक लेख, एलोहिस्टिक लेख, ड्युटेरोनोमी, प्रीस्टली

कोड, व पावित्र्याचा कायदा, या पांच प्रकारच्या लेखांचा अंतर्भाव होतो. अर्थात या संग्रहामध्यें मागाहून परिस्थितीप्रमाणें बरेच फेरफार करण्यांत आले असावेत. पहिला नेहेमिया हा इतर जातीपासून अत्यंत अलग राहिलेल्या अशा जातीमध्यें जन्मला असल्यामुळें भिन्नभिन्न देशांतील लोक खरे इस्रायल पंथाचे अनुयायी कसे असूं शकतील या गोष्टीची त्यास कल्पनाच करतां आली नसेल. त्याच्या मतें जूडा प्रांतांतील लोक तेवढे खरे इस्रायल पंथाचे असून समारिटन लोकांचा तो अत्यंत द्वेष व तिरस्कार करीत असे. अशा परिस्थितींत लवकरच पुढें मागें एकंदर संप्रदायांत फूट पडणें अपरिहार्य झालें. समेरिया प्रांतामध्यें अद्यापि शेकेम येथील सुप्रसिद्ध मठांचे अवशेष शिल्लक होते. त्या ठिकाणीं मनास्से याची मुख्य धर्माधिकाऱ्याच्या जागेवर पुन्हां नेमणूक करण्यांत आली.ही विभागणी राजकीय दृष्टीनें करण्यांत आली असून त्यायोगानें यरुशलेम येथील यहुदी लोक पॅलेस्टाईन. मधील यांच्या बांधवांपासून विभक्त झाले. यानंतर एक शतकपर्यंत तुटकपणें राहिल्यानें, यहुदी धर्माच्या ठिकाणीं, सुप्रसिद्ध ॲलेक्झांडर दि ग्रेट याच्या अमदानींत उत्पन्न झालेल्या नवीन कल्पनांविरुद्ध झगडण्याचें, सामर्थ्य उत्पन्न झालें.

या विभागणीचे गॅलिलीमध्यें काय परिणाम झाले, याची कल्पना होत नाहीं. परंतु समेरिया व जूडा यांमधील दुफळी राजकीय स्वरूपाची असल्यामुळें, व गॅलिली आणि समेरिया हे प्रांत परस्परांपासून भिन्न असल्यामुळें गॅलिली हा शेवटपर्यंत जूडा प्रांतांशीं सलोख्यानें राहिलेला असावा. यहुदी लोकांच्या हद्दपारीपासूनच इस्रायल संप्रदायामध्यें पूर्वेकडील व पश्चिमेकडील लोकांत कायमची फूट पडणार व या संप्रदायाचा विकास, दोन्हीं प्रांतांत निरनिराळ्या प्रकारांनीं होणार ही गोष्ट स्पष्ट कळून चुकली होती. हें संकट टाळण्याकरितां नेहेमियानें पूर्वेकडील व पश्चिमेकडील कायद्याचें एकत्रीकरण केलें. इजिप्तमध्यें गेलेल्या इस्रायल लोकांस या घडामोडींची वार्ताहि नसावी असें दिसतें. नवीन कायद्याची योग्य तऱ्हेनें अम्मलबजावणी व्हावी म्हणून नेहेमियानें घालून दिलेल्या कडक नियमांमुळें या संप्रदायास बरीच बळकटी आली. तथापि यामुळें लोकांच्या राष्ट्रीय भावना नामशेष झाल्या असा प्रकार नव्हता.

सा मु दा यि क उ पा स ना प द्ध ती ची उ त्प त्ति व य हु दी आ णि ग्री क सं स्कृ तीं म धी ल स्प र्धा.— नेहेमियाच्या संप्रदायसुधारणेच्या प्रयत्नापासून झालेला मुख्य फायदा म्हटला म्हणजे इस्रायल संप्रदायाच्या आध्यात्मिक उत्कर्षांत उपयुक्त अशा सामुदायिक उपासनापद्धतीची उत्पत्ति हा होय. यापुढें सांप्रदायिक नियम अतिशय गुंतागुंतीचे झाले असल्यामुळें जिज्ञासू लोकांनां हे नियम समजावेत हा उद्देश साधण्याकरितां शिक्षणाची आवश्यकता भासूं लागली. बाबिलोनसारख्या उच्च संस्कृतीच्या राष्ट्रांतील लोकांमध्यें राहून देखील यहुदी लोक पूर्वीसारखे असंस्कृत राहणें हें कधींहि शक्यच नव्हतें आणि त्याप्रमाणें ख्रि. पू. ५ व्या व ६ व्या शतकांत पॅलेस्टाइन देशाचा पूर्वेकडील राष्ट्रांशीं जो संबंध आला, त्या योगानें यरुशलेम येथें बरीच विचारक्रांति झाली. समारिटन दुहीपासून ॲलेक्झांडरच्या आगमनापर्यंत घडून आलेल्या यहुदी संप्रदायांतील घडामोडींचा इतिहास अज्ञात स्थितींत आहे. ॲलेक्झांडरच्या आगमनाबरोबर म्हणजे ख्रि. पू. ३३२ च्या सुमारास यहुदी संप्रदायामध्यें नवीन युगास प्रारंभ होतो. पूर्वीचे पर्शियन बादशहा लोकांच्या तिरकारास पात्र झाले होते व ॲलेक्झांडरनें यहुदी लोकांस एकदम पुष्कळच स्वातंत्र्य दिलें. याचा परिणाम असा झाला कीं, प्रथम कांहीं काळपर्यंत जरी सामान्य यहुदी जनतेस या स्वातंत्र्याचें काय करावें अशी भीति पडूं लागली, तरी इस्रायल लोकांनीं ॲलेक्झांडरच्या साम्राज्यांतील अत्यंत दूरच्या प्रदेशांत वस्ती केली. याच सुमारास इस्रायल संप्रदायास जास्त बलवत्तर संकट येऊं पहात होतें. प्रथम प्रथम ॲलेक्झांडरसारख्या बादशहाच्या परधर्मसहिष्णुतेमुळें यहुदी लोकांनां धनाढ्य होण्याची संधि मिळत असल्यामुळें या ग्रीक संस्कृतीचें आकर्षकत्व जास्तच नुकसानकारक होतें. ख्रि. पू. १९८ च्या सुमारास सुप्रसिद्ध अँटायोकस हा जेव्हां पॅलेस्टाईन देशाचा मालक झाला त्यावेळीं यहुदी संप्रदायाची बाह्यतः अत्यंत भरभराटीची स्थिति होती. यावेळीं यहुदी संप्रदायाचा विस्तारहि पुष्कळ ठिकाणीं झाला होता. यावेळीं यहुदी समाजांत धनिक व गरीब असे वर्ग पडले असल्यामुळें गरीब लोक जरी संप्रदायविधि दक्षतेनें पाळीत, तरी धनिकांचीं मतें मात्र परकीय ग्रीक संस्कृतीच्या मोहकतेकडे झुकूं लागलीं होतीं. या दोन्ही वर्गांमधील तेढ वाढत जातां जातां अँटायोकस एपिफेनस यानें यहुदी संप्रदायाचा नाश करण्यापर्यंत पाळी कशी आली, या घडामोडींची सूक्ष्म रीतीनें माहिती देणें या ठिकाणीं अप्रासंगिक होणार आहे. अँटायोकसचा हा शेवटचा प्रयत्न म्हणजे इस्रायल संप्रदायाच्या विकासाचा परमावधि होय. याह्वे संप्रदायाची अशा प्रकारची खडतर कसोटी पूर्वी केव्हांहि आली नव्हती. या परिक्षेंतून इस्रायल संप्रदाय वांचला इतकेंच नव्हे, तर जास्त सतेज होऊन बाहेर पडला. प्रथम प्रथम यहुदी लोकांनीं अक्रियप्रतिकार केला. संप्रदायाकरितां एकामागून एक बळी पडूं लागले व कत्तलीमागून कत्तली होऊं लागल्या. अशा प्रकारच्या विपन्न स्थितीमध्यें याह्वे देवतेस शरण जाणें व पूर्वी होऊन गेलेल्या साधुसंतांच्या वचनावर अढळ निष्ठा ठेवणें एवढ्याच गोष्टी करणें लोकांच्या हातीं होतें.

अशा प्रकारच्या खडतर स्थितींतून पुढें मार्ग काढून यहुदी लोकांनीं कसकसे विजय संपादन केले, ही कथा सांगणें मानवी बुद्धीच्या आवांक्याबाहेरचें आहे. मात्र ख्रि. पू. १६५ सालच्या डिसेंबर महिन्यांतील २५ व्या तारखेस

यहुदी लोकांनां सायमनच्या नेतृत्वाखालीं पूर्ण स्वायत्तता देण्यांत आली. या धामधुमीच्या काळांत यरुशलेम वगैरे महत्त्वाच्या मठांत जुने शास्त्रग्रंथ जाळण्यांत किंवा खाडाखोड करण्यांत आले, आणि या वणव्यानंतर त्रुटित साधनसामुग्रीवरून हे ग्रंथ पुन्हां तयार करण्याची आवश्यकता भासूं लागली; व सांप्रत उपलब्ध असलेला जुना करार, हाच तो संग्रह असून त्यामध्यें यहुदी संप्रदायाचें सुसंस्कृत असें अगदीं निराळेंच स्वरूप दृष्टीस पडतें. या दृष्टीनें पाहतां जुन्या करारांत इस्रायल संप्रदायाच्या तत्पूर्वीच्या सातशें वर्षेंपर्यंत चालू असलेल्या परिणतीचा इतिहास नमूद केला आहे असें म्हटलें पाहिजे.

उ प सं हा र.

राष्ट्रामध्यें उत्पन्न होणारा विचारसंप्रदाय त्याचा विकास आणि त्याचा विशिष्ट मानवसमुच्चयांशीं अन्योन्याश्रय या दृष्टीनें हिंदु आणि इस्रायल यांच्या वैचारिक आणि सामाजिक इतिहासांत अनेक सादृश्यें दृष्टीस पडतात, त्यांपैकीं कांहींचा उल्लेख येथें करतों.

**वै ध ध र्मा तू न आ ध्या त्मि क ध र्मा त सं क्र म ण.**- हें इस्रायल आणि भारतीय या दोहोंतहि दिसून येत आहे. इस्रायल लोकांनीं क्रूर चाली मूर्तिपूजेशीं संलग्न झालेल्या पाहिल्या आणि श्रौतकालीन भारतीयांनीं क्रौर्य श्रौतसंस्थांशीं म्हणजे यज्ञांशीं संलग्न झालेलें पाहिलें; आणि त्यामुळें इस्रायलांमध्यें मूर्तिपूजेविरुद्ध चळवळ सुरू झाली तर भारतीयांमध्यें श्रौतसंस्थांविरुद्ध सुरू झाली.

**ईश्वरैक्य.**— इस्रायलांमध्यें याहवे हा पूर्वी एक विशिष्ट देव होता. याहवेचें अनन्यत्व आणि सर्वश्रेष्ठत्व इतर दैवतांची नाकारणी करून स्थापित झालें व याहवे हा बऱ्याच कालपर्यंत इस्रायलांचा देव म्हणजे जातिदैवताच्या स्वरूपांत राहिला व राजकीय वर्चस्व झालें, त्यामुळें याहवेचें महत्त्व झालें. मूर्तिपूजेविरुद्ध संग्राम करतां करतां याहवेस सर्वेश्वरत्व प्राप्त झालें. भारतीयांत अद्वैत कल्पनांचा उद्भव होऊन निरनिराळे देव एकाच ईश्वराचीं रूपें होत, अशा कल्पना प्रसृत झाल्या व ईश्वरैक्य प्रस्थापित झालें.

संस्कृत वर्गाखेरीज इतर धार्मिक पुरुष.—हे इस्रायलांत प्रवक्ते म्हणून उदयास आले, तर भारतीयांत आरण्यकीय ब्रह्मवेत्ते उदयास आले.

इस्रायल लोकांमध्यें आध्यात्मिक विचारविकास झाला होता, त्याप्रमाणें भारतीयांतहि झाला. इस्रायलांस आपलें आध्यात्मिक धन हें ज्ञातिविशिष्ट वाटे, त्याप्रमाणें भारतीयांसहि वाटे. आणि यामुळें या दोघांचें आध्यात्मिक धन जगाच्या उपयोगास पडण्यासाठीं सामाजिक बाबतींत कमी तुटकपणा बाळगणाऱ्या परंतु अशा राष्ट्रीय आध्यात्मिक विचार ग्रहण करणाऱ्या अशा संप्रदायांची स्थापना झाल्याशिवाय जगाच्या हातीं लागणें शक्य नव्हतें; आणि त्यामुळें इस्रायलांमध्यें ख्रिस्ती संप्रदायाची आणि भारतीयांत बौद्धसंप्रदायाची स्थापना झाल्यानंतर दोघांच्याहि संस्कृतीस अधिक व्यापक स्वरूप आलें.

"इस्रायल" हा राष्ट्रस्वरूपी समुच्चय होता. त्याचें स्वातंत्र्य गेलें तरी त्याच्या वाङ्मयीन आणि सांस्कारिक वैशिष्ट्यामुळें तो समुच्चय स्वतंत्ररूपानें अस्तित्वांत राहिला. इस्रायलांमध्यें विशिष्ट विचारसंप्रदाय विकास पावले; पण ते केवळ विचारसंप्रदाय म्हणूनच राहिले. ते जातिस्वरूप पावले नाहींत. जेव्हां त्यांच्यांतील एक संप्रदाय जातिस्वरूप होऊं लागला आणि मतैक्य आणि उपासनैक्य यांवर आपल्या समाजाचें सदस्यत्व देऊं लागला, तेव्हां जातिरक्षणासाठीं इस्रायल या समुच्चयाचें रक्षण करण्यासाठीं इस्रायलांनां आपल्या समुच्चयाचें सदस्यत्व मतांतर करवून घेऊन इतरांस देण्यास सुरवात करावी लागली. अर्वाचीन भारतीयांतहि जवळ जवळ तीच क्रिया सुरू झाली आहे.

[ संदर्भ ग्रंथ.-रॉबर्टसन स्मिथ—प्रॉफेट्स ऑफ इस्रायल; बेनेट–थिऑलॉजी ऑफ दि ओल्ड टेस्टॅमेंट; बुचॅनन ग्रे—डिव्हाईन डिसिप्लिन ऑफ इस्रायल; कुक–रिलिजन ऑफ एन्शंट पॅलेस्टाईन; एन्सायक्लो. बिब्लिका; ए. रि. ए. ( इस्रायल ). ए. ब्रि. ( हीब्रू रिलिजन ). बुद्धोत्तर जग, प्रकरण १३. ]

**इस्लाम नगर.**—संयुक्त प्रांतांत बदाऊन जिल्ह्यांत हें शहर आहे ह्या गांवाची लोकसंख्या सन १९०१ सालीं ६३६७ होती. सन १८५७ सालच्या बंडांत इंग्रज सरकाराबरोबर राजनिष्ठ राहिलेले रामपूरचे नबाब यांची याच ठिकाणीं बंडखोर लोकांशीं चकमक झाली व तींत बंडखोर लोकांचा पराजय झाला. हें ठिकाण शेतकीच्या जिनसांच्या व्यापाराची मोठी पेठ असून ह्या ठिकाणाहून गूळ बाहेर पाठविला जातो व येथें एक दवाखाना व दुय्यम शाळा आहे.

**इस्लामपूर.**—मुंबई, साताराजिल्हा. हा खेडेगांव वाळवें तालुक्यांत असून साताऱ्यापासून ४८ मैल व पेठपासून ३ मैल अंतरावर आहे. हें कृष्णाखोऱ्याच्या काळीच्या मैदानापुढें आलेल्या रेताड उंचवट्यावर वसलेलें आहे. वाळवें तालुक्याचें हें मुख्य ठिकाण आहे. १९११ सालीं यांत ८५७४ लोकसंख्या होती. गांवांत मुसुलमान लोक फार आहेत कारण हें एकेकाळीं मुसुलमानांच्या ताब्यांत होतें. याचे उरण व इस्लामपूर असे दोन भाग आहेत त्यांपैकीं उरण पूर्वेकडील बाजूस असून इस्लामपुरापेक्षां जुनें आहे व यांत मुसुलमान परि बाबाफान याचा शिष्य शंभूआप्पा कोष्टी, यानें बांधलेला दर्गा आहे. बाबाफान मिरजेंतल्या मालेगांवास रहात असे. मालेगांव इस्लामपूरच्या आग्नेयीस २८ मैल अंतरावर आहे. शंभुअप्पा रोज रात्रीं तेथें जाऊन पुन्हां सकाळीं आपल्या गांवीं येत असे. ह्याचा असा क्रम ८ वर्षें चालला. पुढें त्याच्यानें इतकी मजल मारवेना तेव्हां बाबाफाननें त्याची श्रद्धा पाहून आपणच त्याच्या गांवीं येऊन राहिला. बाबाफान मेल्यावर तो तेथेंच भक्ती करीत राहिला

कोड, व पावित्र्याचा कायदा, या पांच प्रकारच्या लेखांचा अंतर्भाव होतो. अर्थात या संग्रहामध्यें मागाहून परिस्थितीप्रमाणें बरेच फेरफार करण्यांत आले असावेत. पहिला नेहेमिया हा इतर जातीपासून अत्यंत अलग राहिलेल्या अशा जातीमध्यें जन्मला असल्यामुळें भिन्नभिन्न देशांतील लोक खरे इस्रायल पंथाचे अनुयायी कसे असूं शकतील या गोष्टीची त्यास कल्पनाच करतां आली नसेल. त्याच्या मतें जूडा प्रांतांतील लोक तेवढे खरे इस्रायल पंथाचे असून समारिटन लोकांचा तो अत्यंत द्वेष व तिरस्कार करीत असे. अशा परिस्थितींत लवकरच पुढें मागें एकंदर संप्रदायांत फूट पडणें अपरिहार्य झालें. समेरिया प्रांतामध्यें अद्यापि शेकेम येथील सुप्रसिद्ध मठांचे अवशेष शिल्लक होते. त्या ठिकाणीं मनास्से याची मुख्य धर्माधिकाऱ्याच्या जागेवर पुन्हां नेमणूक करण्यांत आली.ही विभागणी राजकीय दृष्टीनें करण्यांत आली असून त्यायोगानें यरुशलेम येथील यहुदी लोक पॅलेस्टाईन. मधील यांच्या बांधवांपासून विभक्त झाले. यानंतर एक शतकपर्यंत तुटकपणें राहिल्यानें, यहुदी धर्माच्या ठिकाणीं, सुप्रसिद्ध ॲलेक्झांडर दि ग्रेट याच्या अमदानींत उत्पन्न झालेल्या नवीन कल्पनांविरुद्ध झगडण्याचें, सामर्थ्य उत्पन्न झालें.

या विभागणीचे गॅलिलीमध्यें काय परिणाम झाले, याची कल्पना होत नाहीं. परंतु समेरिया व जूडा यांमधील दुफळी राजकीय स्वरूपाची असल्यामुळें, व गॅलिली आणि समेरिया हे प्रांत परस्परांपासून भिन्न असल्यामुळें गॅलिली हा शेवटपर्यंत जूडा प्रांताशीं सलोख्यानें राहिलेला असावा. यहुदी लोकांच्या हद्दपारीपासूनच इस्रायल संप्रदायामध्यें पूर्वेकडील व पश्चिमेकडील लोकांत कायमची फूट पडणार व या संप्रदायाचा विकास, दोन्हीं प्रांतांत निरनिराळ्या प्रकारांनीं होणार ही गोष्ट स्पष्ट कळून चुकली होती. हें संकट टाळण्याकरितां नेहेमियानें पूर्वेकडील व पश्चिमेकडील कायद्याचें एकत्रीकरण केलें. इजिप्तमध्यें गेलेल्या इस्रायल लोकांस या घडामोडींची वार्ताहि नसावी असें दिसतें. नवीन कायद्याची योग्य तऱ्हेनें अम्मलबजावणी व्हावी म्हणून नेहेमियानें घालून दिलेल्या कडक नियमांमुळें या संप्रदायास बरीच बळकटी आली. तथापि यामुळें लोकांच्या राष्ट्रीय भावना नामशेष झाल्या असा प्रकार नव्हता.

**सामुदायिक उपासना पद्धतीची उत्पत्ति व यहुदी आणि ग्रीक संस्कृतींमधील स्पर्धा.**— नेहेमियाच्या संप्रदायसुधारणेच्या प्रयत्नापासून झालेला मुख्य फायदा म्हटला म्हणजे इस्रायल संप्रदायाच्या आध्यात्मिक उत्कर्षास उपयुक्त अशा सामुदायिक उपासनापद्धतीची उत्पत्ति हा होय. यापुढें सांप्रदायिक नियम अतिशय गुंतागुंतीचे झाले असल्यामुळें जिज्ञासू लोकांनां हे नियम समजावेत हा उद्देश साधण्याकरितां शिक्षणाची आवश्यकता भासूं लागली. बाबिलोनसारख्या उच्च संस्कृतीच्या राष्ट्रांतील लोकांमध्यें राहून देखील यहुदी लोक पूर्वीसारखे असंस्कृत राहणें हें कधींहि शक्यच नव्हतें आणि त्याप्रमाणें ख्रि. पू. ५ व्या व ६ व्या शतकांत पॅलेस्टाइन देशाचा पूर्वेकडील राष्ट्रांशीं जो संबंध आला, त्या योगानें यरुशलेम येथें बरीच विचारक्रांति झाली. समारिटन दुहीपासून ॲलेक्झांडरच्या आगमनापर्यंत घडून आलेल्या यहुदी संप्रदायांतील घडामोडींचा इतिहास अज्ञात स्थितींत आहे. ॲलेक्झांडरच्या आगमनाबरोबर म्हणजे ख्रि. पू. ३३२ च्या सुमारास यहुदी संप्रदायामध्यें नवीन युगास प्रारंभ होतो. पूर्वीचे पर्शियन बादशहा लोकांच्या तिरकारास पात्र झाले होते व ॲलेक्झांडरनें यहुदी लोकांस एकदम पुष्कळच स्वातंत्र्य दिलें. याचा परिणाम असा झाला कीं, प्रथम कांहीं काळपर्यंत जरी सामान्य यहुदी जनतेस या स्वातंत्र्याचें काय करावें अशी भीति पडूं लागली, तरी इस्रायल लोकांनीं ॲलेक्झांडरच्या साम्राज्यांतील अत्यंत दूरच्या प्रदेशांत वस्ती केली. याच सुमारास इस्रायल संप्रदायास जास्त बलवत्तर संकट येऊं पहात होतें. प्रथम प्रथम ॲलेक्झांडरसारख्या बादशहाच्या परधर्मसहिष्णुतेमुळें यहुदी लोकांनां धनाढ्य होण्याची संधि मिळत असल्यामुळें या ग्रीक संस्कृतीचें आकर्षकत्व जास्तच नुकसानकारक होतें. ख्रि. पू. १९८ च्या सुमारास सुप्रसिद्ध ॲंटायोकस हा जेव्हां पॅलेस्टाईन देशाचा मालक झाला त्यावेळीं यहुदी संप्रदायाची बाह्यतः अत्यंत भरभराटीची स्थिति होती. यावेळीं यहुदी संप्रदायाचा विस्तारहि पुष्कळ ठिकाणीं झाला होता. यावेळीं यहुदी समाजांत धनिक व गरीब असे वर्ग पडले असल्यामुळें गरीब लोक जरी संप्रदायविधि दक्षतेनें पाळीत, तरी धनिकांचीं मतें मात्र परकीय ग्रीक संस्कृतीच्या मोहकतेकडे झुकूं लागलीं होतीं. या दोन्ही वर्गांमधील तेढ वाढत जातां जातां ॲंटायोकस एपिफेनस यानें यहुदी संप्रदायाचा नाश करण्यापर्यंत पाळी कशी आली, या घडामोडींचें सूक्ष्म रीतीनें माहिती देणें या ठिकाणीं अप्रासंगिक होणार आहे. ॲंटायोकसचा हा शेवटचा प्रयत्न म्हणजे इस्रायल संप्रदायाच्या विकासाचा परमावधि होय. याहवे संप्रदायाची अशा प्रकारची खडतर कसोटी पूर्वी केव्हांहि आली नव्हती. या परिक्षेंतून इस्रायल संप्रदाय वांचला इतकेंच नव्हे, तर जास्त सतेज होऊन बाहेर पडला. प्रथम प्रथम यहुदी लोकांनीं अक्रियप्रतिकार केला. संप्रदायाकरितां एकामागून एक बळी पडूं लागले व कत्तलीमागून कत्तली होऊं लागल्या. अशा प्रकारच्या विपन्न स्थितीमध्यें याहवे देवतेस शरण जाणें व पूर्वी होऊन गेलेल्या साधुसंतांच्या वचनावर अढळ निष्ठा ठेवणें एवढ्याच गोष्टी करणें लोकांच्या हातीं होतें.

अशा प्रकारच्या खडतर स्थितींतून पुढें मार्ग काढून यहुदी लोकांनीं कसकसे विजय संपादन केले, ही कथा सांगणें मानवी बुद्धीच्या आवांक्याबाहेरचें आहे. मात्र ख्रि. पू. १६५ सालच्या डिसेंबर महिन्यांतील २५ व्या तारखेस

यहुदी लोकांनां सायमनच्या नेतृत्वाखालीं पूर्ण स्वायत्तता देण्यांत आली. या धामधुमीच्या काळांत यरुशलेम वगैरे महत्त्वाच्या मठांत जुने शास्त्रग्रंथ जाळण्यांत किंवा खाडाखोड करण्यांत आले, आणि या वणव्यानंतर त्रुटित साधनसामुग्रीवरून हे ग्रंथ पुन्हां तयार करण्याची आवश्यकता भासूं लागली; व सांप्रत उपलब्ध असलेला जुना करार, हाच तो संग्रह असून त्यामध्यें यहुदी संप्रदायाचें सुसंस्कृत असें अगदीं निराळेंच स्वरूप दृष्टीस पडतें. या दृष्टीनें पाहतां जुन्या करारांत इस्रायल संप्रदायाच्या तत्पूर्वीच्या सातशें वर्षेंपर्यंत चालू असलेल्या परिणतीचा इतिहास नमूद केला आहे असें म्हटलें पाहिजे.

उ प सं हा र.

राष्ट्रामध्यें उत्पन्न होणारा विचारसंप्रदाय त्याचा विकास आणि त्याचा विशिष्ट मानवसमुच्चयांशीं अन्योन्याश्रय या दृष्टीनें हिंदु आणि इस्रायल यांच्या वैचारिक आणि सामाजिक इतिहासांत अनेक सादृश्यें दृष्टीस पडतात, त्यांपैकीं कांहींचा उल्लेख येथें करतों.

**वै ध ध र्मी तू न आ ध्या त्मि क ध र्मी त सं क्र म ण.**- हें इस्रायल आणि भारतीय या दोहोंतहि दिसून येत आहे. इस्रायल लोकांनीं क्रूर चाली मूर्तिपूजेशीं संलग्न झालेल्या पाहिल्या आणि श्रौतकालीन भारतीयांनीं क्रौर्य श्रौतसंस्थांशीं म्हणजे यज्ञांशीं संलग्न झालेलें पाहिलें; आणि त्यामुळें इस्रायलांमध्यें मूर्तिपूजेविरुद्ध चळवळ सुरू झाली तर भारतीयांमध्यें श्रौतसंस्थांविरुद्ध सुरू झाली.

**ईश्वरैक्य.**— इस्रायलांमध्यें याह्वे हा पूर्वी एक विशिष्ट देव होता. याह्वेचें अनन्यत्व आणि सर्वश्रेष्ठत्व इतर दैवतांची नाकारणी करून स्थापित झालें व याह्वे हा बऱ्याच कालपर्यंत इस्रायलांचा देव म्हणजे जातिदैवताच्या स्वरूपांत राहिला व राजकीय वर्चस्व झालें, त्यामुळें याह्वेचें महत्त्व झालें. मूर्तिपूजेविरुद्ध संग्राम करतां करतां याह्वेस सर्वेश्वरत्व प्राप्त झालें. भारतीयांत अद्वैत कल्पनांचा उद्भव होऊन निरनिराळे देव एकाच ईश्वराचीं रूपें होत, अशा कल्पना प्रसृत झाल्या व ईश्वरैक्य प्रस्थापित झालें.

**संस्कृत वर्गाखेरीज इतर धार्मिक पुरुष.**—हे इस्रायलांत प्रवक्ते म्हणून उदयास आले, तर भारतीयांत आरण्यकीय ब्रह्मवेत्ते उदयास आले.

इस्रायल लोकांमध्यें आध्यात्मिक विचारविकास झाला होता, त्याप्रमाणें भारतीयांतहि झाला. इस्रायलांस आपलें आध्यात्मिक धन हें ज्ञातिविशिष्ट वाटे, त्याप्रमाणें भारतीयांसहि वाटे. आणि यामुळें या दोघांचें आध्यात्मिक धन जगाच्या उपयोगास पडण्यासाठीं सामाजिक बाबतींत कमी तुटकपणा बाळगणाऱ्या परंतु अशा राष्ट्रीय आध्यात्मिक विचार ग्रहण करणाऱ्या अशा संप्रदायांची स्थापना झाल्याशिवाय जगाच्या हातीं लागणें शक्य नव्हतें; आणि त्यामुळें इस्रायलांमध्यें ख्रिस्ती संप्रदायाची आणि भारतीयांत बौद्धसंप्रदायाची स्थापना झाल्यानंतर दोघांच्याहि संस्कृतीस अधिक व्यापक स्वरूप आलें.

"इस्रायल" हा राष्ट्रस्वरूपी समुच्चय होता. त्याचें स्वातंत्र्य गेलें तरी त्याच्या वाङ्मयानें आणि सांस्कारिक वैशिष्ट्यामुळें तो समुच्चय स्वतंत्ररूपानें अस्तित्वांत राहिला. इस्रायलांमध्यें विशिष्ट विचारसंप्रदाय विकास पावले; पण ते केवळ विचारसंप्रदाय म्हणूनच राहिले. ते जातिस्वरूप पावले नाहींत. जेव्हां त्यांच्यांतील एक संप्रदाय जातिस्वरूप होऊं लागला आणि मतैक्य आणि उपासनैक्य यांवर आपल्या समाजाचें सदस्यत्व देऊं लागला, तेव्हां जातिरक्षणासाठीं इस्रायल या समुच्चयाचें रक्षण करण्यासाठीं इस्रायलांनां आपल्या समुच्चयाचें सदस्यत्व मतांतर करवून घेऊन इतरांस देण्यास सुरवात करावी लागली. अर्वाचीन भारतीयांतहि जवळ जवळ तीच क्रिया सुरू झाली आहे.

[ संदर्भ ग्रंथ.-राबर्टसन स्मिथ—प्राफेट्स ऑफ इस्रायल; बेनेट-थिऑलॉजी ऑफ दि ओल्ड टेस्टॅमेंट; बुचॅनन ग्रे—डिव्हाईन डिसिप्लिन ऑफ इस्रायल;कुक-रिलिजन ऑफ एन्शंट पॅलेस्टाईन; एन्सायक्लो. बिब्लिका; ए. रि. ए. ( इस्रायल ). ए. ब्रि. ( हीब्रू रिलिजन ). बुद्धोत्तर जग, प्रकरण १३. ]

**इस्लाम नगर.**—संयुक्त प्रांतांत बदाऊन जिल्ह्यांत हें शहर आहे ह्या गांवाची लोकसंख्या सन १९०१ सालीं ६३६७ होती. सन १८५७ सालच्या बंडांत इंग्रज सरकाराबरोबर राजनिष्ठ राहिलेले रामपूरचे नबाब यांची याच ठिकाणीं बंडखोर लोकांशीं चकमक झाली व तींत बंडखोर लोकांचा पराजय झाला. हें ठिकाण शेतकीच्या जिनसांच्या व्यापाराची मोठी पेठ असून ह्या ठिकाणाहून गूळ बाहेर पाठविला जातो व येथें एक दवाखाना व दुय्यम शाळा आहे.

**इस्लामपूर.**—मुंबई, साताराजिल्हा. हा खेडेगांव वाळवें तालुक्यांत असून साताऱ्यापासून ४८ मैल व पेठपासून ३ मैल अंतरावर आहे. हें कृष्णाखोऱ्याच्या काळीच्या मैदानापुढें आलेल्या रेताड उंचवटयावर वसलेलें आहे. वाळवें तालुक्याचें हें मुख्य ठिकाण आहे. १९११ सालीं यांत ८५७४ लोकसंख्या होती. गांवांत मुसुलमान लोक फार आहेत कारण हें एकेकाळीं मुसुलमानांच्या ताब्यांत होतें. याचे उरण व इस्लामपूर असे दोन भाग आहेत त्यांपैकीं उरण पूर्वेकडील बाजूस असून इस्लामपुरापेक्षां जुनें आहे व यांत मुसुलमान पीर बाबाफान याचा शिष्य शंभूआप्पा कोष्टी, यानें बांधलेला दर्गा आहे. बाबाफान मिरजेंतल्या मालेगांवास रहात असे.मालेगांव इस्लामपूरच्या आग्नेयीस२८ मैल अंतरावर आहे. शंभुअप्पा रोज रात्रीं तेथें जाऊन पुन्हां सकाळीं आपल्या गांवीं येत असे. ह्याचा असा क्रम ८ वर्षें चालला. पुढें त्याच्यानें इतकी मजल मारवेना तेव्हां बाबाफाननें त्याची श्रद्धा पाहून आपणच त्याच्या गांवीं येऊन राहिला. बाबाफान मेल्यावर तो तेथेंच भक्ती करीत राहिला

त्यानें पुष्कळ चमत्कार केले असें म्हणतात. या ठिकाणीं कार्तिकांत यात्रा भरते.

इस्लामपुरांत सरदार आनंदराव मंत्री यांचा वाडा आहे. ('मंत्री' पहा) त्याच्या भोंवतीं भिंत असून खंदक आहे व समोर एक तलाव आहे.

येथून चिपळुणास तंबाखू व गूळ जातो व तेथून मीठ, खजूर, सुपारी, किराणा माल, मसाले देशी व विलायती कापड आणि धातू इकडे येते.

येथील तळ्यांत व विहिरींत जिवंत झरे नसल्यामुळें व पावसाळ्यांतील पाण्यावरच भिस्त ठेवावी लागते त्यामुळें पाण्याची वारंवार हांकाहाक होत असते. १८७६ च्या दुष्काळांत येथें बंधारा बांधण्यांत आला. येथें रेशमी मुकटे व पितळेचीं भांडीं चांगलीं होतात [ मुं. गॅ. ].

**इस्लामाबाद**—काश्मीर संस्थानांत हें एक शहर आहे व तें झेलम नदीच्या उजव्या तीरावर एक मैलाच्या अंतरावर आहे. हें शहर उंचवटयाच्या जागेवर वसविलें आहे व जवळच एक अनंतनाग नांवाचा जोरानें वाहणारा झरा आहे यावरून या शहरास अनंत नाग असें नांव होतें, त्याच ठिकाणीं मलिकनाग नांवाचा दुसरा झरा आहे. त्या झऱ्याच्या पाण्यांत गंधक असल्यामुळें बागायत जमीनींकरितां या पाण्याचा विशेष उपयोग लोक करितात. या ठिकाणीं जरी कांहीं लोक शाली विणणारे असले तरी बहुतेक लोक शेतीवर उदर निर्वाह करतात. हें एके काळीं वैभवाच्या कळसास पोंहोंचलें होतें [इं. गॅ.]

**इक्ष्वाकु**, मं त्रो ल्ले ख.—इक्ष्वाकु हें कुल सूतसंस्कृतीतील अत्यंत प्रसिद्ध कुलांपैकीं होतें पण मांत्रसंस्कृतीच्या लोकांत अध्वर्युप्रधान यज्ञसंस्थेच्या कालाचा उदय होईपर्यंत या कुलाचा फारसा परिचय नव्हता. अथर्ववेदामध्यें प्राचीन इक्ष्वाक हा कुष्ठास चांगली औषधी म्हणून जाणतो एवढाच उल्लेख आहे. यावरून मांत्र लोक पूर्वेकडे गेले तेव्हां त्यांस इक्ष्वाकु म्हणून प्राचीन पुरुष होऊन गेला एवढेंच ठाऊक होतें.

दुसरा उल्लेख ऋग्वेदांतील १०–६० मधील होय. सर्वानुक्रमणी व बृहद्देवता यांसारखे उपबृंहणग्रंथ वगळले व ऋग्वेदांतील सूक्तांकडे लक्ष दिलें तर आपणांस असें दिसून येईल कीं, असमाती नांवाचा एखादा राजा असावा तो भजेरथाचा नेता होता, तो रथप्रोष्ठ राष्ट्रांचा किंवा त्या नांवाच्या कुलांतील राजा होता आणि त्याचें कर्म इक्ष्वाकूच्य साहाय्यानें सुरळीत चाललें. ऐवढ्याच उल्लेखावरून मोठ्या राजकुलाचा संस्थापक जो इक्ष्वाकु त्याशीं या इक्ष्वाकूचा संबंध असेल असें वाटत नाहीं. येथें इक्ष्वाकु हा शब्द एकवचनी आहे हेंही लक्षांत ठेवलें पाहिजे. उपबृंहणग्रंथांनीं मात्र असमातीस इक्ष्वाकुकुलोत्पन्न केलें आहे.

ब्रा ह्म ण का ल.—ब्राह्मणकाल म्हणजे मात्रसंस्कृति व सूतसंस्कृति यांच्या एकीकरणाचा काल. या कालामध्यें मात्र इक्ष्वाकुस बरेंच प्राधान्य मिळालेलें दिसतें आणि मंत्रोक्त राजांचा संबंध इक्ष्वाकूशीं जोडण्यांत आलेला दिसतो व इक्ष्वाकु कुलांतील राजांचा संबंध श्रौतविधींशीं जुळविण्यांत आलेला दिसतो. उदाहरणार्थ त्र्यरुण त्रसदस्यु, हा ऋग्वेदोक्त राजा बृहदेवताकारांनीं ऐक्ष्वाकु बनविला आहे. तसेंच पुरुकुत्साला शतपथ ब्राह्मणानें देखील ऐक्ष्वाकु बनविलें आहे. ब्राह्मणकालांतील यज्ञसंस्थेच्या प्रवर्तकांची कुशलता मॅकडोनल्डच्या लक्षांत न आल्यामुळें पुरुकुत्स ज्याअर्थी ऐक्ष्वाकु होता त्याअर्थी सूर्यवंश हा पुरुपासून निघाला असावा अशी आभासात्मक पांडित्याची मखलाशी 'वेदिक इंडेक्स'मध्यें आढळते. श्रौतविधींशीं इक्ष्वाकु घराण्यांतील राजे चिकटविणारें आणि बेसावध इतिहासकारास घोंटाळ्यांत पाडणारें उदाहरण म्हटलें म्हणजे हरिश्चंद्राचा शुनःशेपाशीं संबंध होय. असमातीशीं इक्ष्वाकूचा जो संबंध जोडण्यांत आला, तो पुराणांवरून अयथार्थ ठरतो. इक्ष्वाकू घराण्यामध्यें असमाति नांवाचा कोणताहि राजा पुराणांत उल्लेखिला नाहीं.

इ ति हा स पु रा णो क्त.—भारत, भागवत, देवी भागवत,रामायण व अनेक पुराणें हीं सर्व इक्ष्वाकु घराण्याचीं इतिहाससाधनें होत आणि काल्पनिक परंपरा अर्वाचीन कालापर्यंत आणून ठेवावयाची असली तर सध्यांच्या उदेपूरच्या राण्यांची वंशावळी पहावी म्हणजे तुम्हांस थेट इक्ष्वाकूपासून किंबहुना सूर्यापासून आजच्या हयात राण्यापर्यंतची कुलपरंपरा अगदीं स्पष्ट दिसेल. विश्वास मात्र ठेवला पाहिजे.

वैवस्वतमनूच्या दहा पुत्रांतील इक्ष्वाकू ज्येष्ठ होय. त्याच्या शिंके ( क्षुत् )पासून हा झाला म्हणून, यास हें नांव होतें. ( भाग. स्कं. ९ अ. ६ श्लोक ४ देवी भा. स्कं. ७ अ. २ श्लो. २०). यास शंभर पुत्र होते, व त्यांत विकुक्षि, निमि, दंडक, आणि दशाश्व, हे चार अत्यंत प्रमुख होते. यानें, आपल्या सर्व पुत्रांस चोहों दिशांकडे स्थापून आपण मध्यें राहिला होता, तथापि विकुक्षि हा यौवराज्यावर असून, इतरहि प्रायः यासमीपच असत.

इक्ष्वाकु राजा अति प्रख्यात असून, याचें कुल सूर्यवंशांत अत्यंत प्रसिद्ध आहे. यानें वसिष्ठापासून अध्यात्मविद्या संपादून परमपद प्राप्त करून घेतलें होतें. याच्या मागें, विकुक्षि ज्यास शशाद असें नांव पडलें होतें, तो राज्याधिकारी झाला होता.

